श्री.

अथ

# श्रीमन्महाभारतसार.

हा ग्रंथ,

रावजी श्रीधर गोंधळेकर

यांणीं

विद्वान मंडळीच्या साह्यानें

तयार करून

पुणें पेठ शनवार येथें,

आपले जगद्धितेच्छु छापखान्यांत छापिला.

तारिख २५ जून १८७२

इसवी.

# प्रस्तावना.

श्रीमन्महाभारत सार हा नवीन ग्रंथ तयार करण्याचा हेतु इतकाच आहे की, पूर्वी जगविख्यात महान् पराक्रमी राजे कोण कोण झाले व त्यांणीं अद्भुत चरित्रें काय काय केलीं आहेत व यांत देवर्षि, ब्रह्मर्षि, राजर्षि, यक्ष, महोरगांचीं अद्भुत माहात्म्यें वर्णन केलीं आहेत व साक्षात् भगवान् वासुदेव याचीं अतिसुंदर माहात्म्यें वर्णन केलीं आहेत व अव्यक्तादि तत्वविचार व महाभूतोत्पत्यादि अध्यात्मशास्त्र, अर्थशास्त्र व धर्मशास्त्र व कामशास्त्र व लोकांच्या वर्तणुकी इत्यादिक सहस्रशः माहात्म्यें व इतिहास श्रीमज्जगत् गुरु व्यासानीं वर्णन केले आहेत. आतां या भारतरूपी अमृताचें सेवन अज्ञानांधःकारांत बुडालेले लोकांस फारच दुर्मिळ आहे; कारण हा इतिहासरूप ग्रंथ संस्कृतांत आहे तेव्हां शास्त्रज्ञ लोकांखेरीज अन्यांस यांतील विषय समजत नाहींत यास्तव केवल परबुद्धीनें मी अज्ञानी असून विद्वानांचे साह्यानें तयार करून स्वधर्माभिमानी व श्रद्धायुक्त पठण करणारांस परम प्रीतीनें देण्याची इच्छा करितों. रुचावें.

रा. श्री. गो.

---



# विनंतिपत्र



सर्वांस विनय पूर्वक कळवितों कीं, या एकंदर ग्रंथाची किंमत रुपये २५ पंचवीस आह्मीं ठेवणार होतों; परंतु श्रीमन्महाराज गायकवाड सरकार यानीं साहाय्य केल्यामुळें रुपये दाहा कमी करून पंधरा ठेविली आहे यास्तव सर्व लोकांनीं महाराजांचा मोठा आभार मानिला पाहिजे आणि उत्तरोत्तर सद्विद्येकडे महाराजांचा प्रेमा अधिक होऊन त्यांची सत्कीर्ती अधिक वाढत जावी व त्यांस अक्षय्य सुख प्राप्त व्हावें. अशी सर्वांनीं ईश्वराची प्रार्थना करावी. असें आह्मीं इच्छितों.

रावजीश्रीधरगोंधळेकर.

श्री

# आभार

या पुस्तका विषयीं जाहिरात दिल्यावर हें पुस्तक कसें सिद्ध होईल या विषयीं आह्मीं फार विचारांत होतों. कारण एक लक्ष ग्रंथाचें भाषांतरा दाखल तात्पर्य काढण्यास फार दिवस लागले असते; परंतु या ग्रंथा पैकीं कांहीं गवें राजमान्य राजश्री त्र्यंबकराव लक्ष्मण कानिटकर यानीं वेदशास्त्र संपन्न राजमान्य राजश्री चिंतामण शास्त्री थत्ते यांजकडून तयार करविलीं होतीं तीं त्यानीं आह्मांस अर्पण दिल्यामुळें हा ग्रंथ लौकर तयार झाला. नाहीं पेक्षां फार च काळ लागला असता यास्तव सद्‌गृहस्थाचे आह्मीं फार आभार मानितों.

रावजी श्रीधर गोंधळेकर.

---

# श्रीमन्महाभारतसाराची अनुक्रमणिका.

## आदिपर्व.

अनुक्रमणिका.

समाप्त.

# अनुक्रमणिका.

## सभापर्व.

अनुक्रमणिका

समाप्त.

# अनुक्रमणिका.

## वनपर्व.

अनुक्रमणिका.

समाप्त.

---

# अनुक्रमणिका
# विराटपर्व

अनुक्रमणिका

समाप्त.


सहदेव
नकुल
भीमसेन
धर्मराज


सभा

अर्जुन

दासी
द्रौपदी

द्रुपदराजा

श्री.

# श्रीमन्महाभारतसार.

## आदिपर्व.

श्रीगणेशायनमः॥ ॥प्रथमाध्याय- नैमिषारण्याचे ठायीं शौनकादि ऋषींनीं द्वादश वर्षांचें नेमानें सत्रास आरंभ केला. त्या मध्यें ब्रह्मऋषींचाही समुदाय मिळाला होता. तेथें सूतपुत्र सौतीनें येऊन सर्व ऋषींस नमस्कार करून त्याणीं दिलेल्या आसनावर तो बसला. नंतर नम्र होऊन सर्वांस कुशल प्रश्न केला, तेव्हां त्यांतून एक ऋषि विचारितो कीं,- हे सौती आपण कोठून आलां? आणि हा कालपर्यंत कोठें होतां? व आपण काय अद्भुत चमत्कार अवलोकन केला तो कृपा करून निवेदन करावा. तेव्हां सौती सांगतो. जन्मेजय राजर्षीचे सर्पसत्रांत वेदव्यासानीं नानाप्रकारचीं पुण्यकारक पुराणें सांगितलीं व इतिहास कथन केले, ते सर्व मी त्यांचे जवळ असल्यामुळें श्रवण करून बहुतेक तीर्थयात्रा करीत करीत समंतपंचक क्षेत्र व कुरुक्षेत्र अवलोकन करून आपल्या दर्शनास आलों. आपण सर्व ब्रह्मनिष्ठ महाभाग्यवंत सूर्याग्नि सारिखे तेजःपुंज आहां तेव्हां आपणास मी कोणत्या कथा सांगाव्या? असें सौतीचें भाषण श्रवण केल्यावर ऋषी बोलतात, हे सौती वेदव्यासानीं सांगितलेलें पुराण, जें देवानीं व ऋषीनीं मान्य केलेलें व ज्यांत सर्व वेदार्थ सांगितले आहेत; आणि चतुर्विध पुरुषार्थ देणारीं व सर्व पापांचा नाश करणारीं अशीं अनेक अद्भुत चरित्रें ज्यांत आहेत, असा महाभारत इतिहास जनमेजय राजाचे सत्रामध्यें व्यासांचे आज्ञे वरून वैशंपायन ऋषीनीं जो वर्णन केला, तो आह्मांस सांगावा. असें ऋषींचें भाषण श्रवण करून प्रथम नरांत उत्तम जो नर, त्या नारायणास व सरस्वती देवीस आणि वेदव्यासांस नमस्कार करून जयकारक पुराणास पुराणिकानीं आरंभ करावा, ह्मणून सर्व चराचर विश्वाचे गुरु साक्षात जे महाविष्णु त्यांस नमस्कार पूर्वक मंगलाचरण करून अनेक शब्द चातुर्य पदरचना नानाछंदवृत्तांहीं करून, परम अलंकृत त्रैलोक्य पूजित असें भारत यास आरंभ करितात. सृष्टीचे पूर्वीं सर्व अंधकार होता. नंतर ब्रह्मांड उत्पन्न जाहलें. त्या पासून ब्र-

ह्मदेव सर्वलोकाधिपति जाहला त्या पासून प्राचेतस दक्ष व त्यांचे सात पुत्र क्रोध, तम, दम, विक्रांत, अंगिरा, कर्दम, अश्व, हे जाहले. पुढें एकवीस प्रजांचे अधिपति, विश्वेदेव, द्वादशादित्य, वसु, अश्विनीकुमार, यक्ष, साध्य, पिशाच, गुह्यक, पितर, ब्रह्मर्षि, राजर्षि, पृथिव्यादि पंचमहाभूतें, संवत्सर, ऋतु, मास व पक्ष इत्यादि क्रमें करून सर्व स्थावर जंगमात्मक विश्व जाहलें. त्यांत अनेक लोकवंशाचे विस्तार व वर्णाश्रमधर्म, लोकांच्या वर्तणुकी, चतुर्विधपुरुषार्थ साधनें हीं सर्व वेदव्यासानीं प्रत्यक्ष अवलोकन करून ब्रह्मचर्यादि तपःसामर्थ्यानें अनादि वेदांचे विभाग व त्यांतील अर्थ रचना युक्त भारत इतिहास केला. नंतर परम सुंदर हें आख्यान शिष्यांस कसें पढवावें असें चिंतन करितात, तों तेथें साक्षात् जगत्गुरु ब्रह्मदेव त्यांच्या संतोषार्थ व लोकोपकारार्थ आले. त्यांस अवलोकन करून अनेक ऋषिमंडळी सहित अति संतोषानें अभ्युत्थान आसनादि निवेदन करून नमस्कारपूर्वक हात जोडून सत्यवती नंदन मोठ्या विस्मयानें प्रश्न करितात कीं, हे ब्रह्मदेवा, मी हें सांगोपांग वेद रहस्यरूप काव्य केलें तें असें कीं, ज्याचें श्रवण पठण केलें असतां जरा, मृत्यु, भय, व्याधि व सर्व पापपरिहार होऊन धर्मार्थादि अनेक पुण्यें प्राप्त होतील. प्रायशः या इतिहासांत ब्रह्मांडांतील सर्व वस्तुजातींचें वर्णन केलें आहे; परंतु यास लेखक कोणी नाहीं हें श्रवण करून ब्रह्मदेव बोलतात व्यासा, आपण केलेलें त्रैलोक्यमान्य काव्य लिहिण्यास गणपतीचें स्मरण करावें असें सांगून ब्रह्मदेव गेले. नंतर व्यासानीं हेरंबाचें स्मरण करतांच ते प्राप्त जाहले. त्यांची पूजा करून सांगितलें कीं, मी केलेल्या काव्यास तुह्मीं लेखक व्हावें. हें ऐकून त्याणीं उत्तर दिलें कीं, जर माझी लेखणी लिहितांना न राहील तर मी लेखक होईन; त्यावर व्यास बोलतात, तुह्मीं अर्थविचार करून लिहावें ह्मणजे लेखणीस खंड पडणार नाहीं. हें वाक्य मान्य करून लिहिण्यास आरंभ केला तो असा कीं, व्यासानीं ग्रंथ रचना करितां करितां मध्येंच कूट श्लोक योजावा. अशीं कूटें सर्व भारतांत आठ सहस्र आठशें केलीं त्या त्या स्थलाचे ठिकाणीं त्या त्या कूटाचा अर्थ करण्यास गणपतीस क्षणमात्र विराम होई. इतक्यांत व्यासांचा बहुत ग्रंथ शिल्लक पडे. नंतर व्यासानीं कूट श्लोका विषयीं ग्रंथांत प्रतिज्ञा केली कीं, पूर्वोक्त कूटें हीं मीं जाणतों, व

शुकाचार्य जाणतो आणि संजय जाणत असेल किंवा नसेल. अशी प्रतिज्ञा करून ह्मणतात कीं, अज्ञानांधकारांत निमग्न झालेल्या लोकांस हा भारतसूर्योदय होऊन ज्ञानप्रकाश करितो अथवा पुराणपूर्ण चंद्रोदयानें श्रुतिरूप कांती प्रकाशित केली तेणें करून लोकांचीं अंतःकरणकमलें प्रसन्न होतात. अथवा भारत प्रदीपानें लोक स्वद्गत अज्ञानाचा नाश होऊन प्रकाश होतो अथवा हा भारतवृक्ष याचें बीज संग्रहाध्याय, पौलोमाख्यान, आस्तीक आख्यान हें मूळ, उत्पत्तीचा अध्याय त्याच फांद्या, सभापर्व वनपर्व हीं ढोलीं, अरणीपर्व हें रूप; विराट्, उद्योग ही अंतर साल, भीष्मपर्व त्या मोठ्या फांद्या, द्रोणपर्व हीं पत्रें, कर्णपर्व हीं पुष्पें, शल्यपर्व हा सुगंध, स्त्रीपर्व व ऐषीक व आश्रमवासि व शांतिपर्व हीं फलें, अश्वमेध हा अमृतरस, मौसलपर्व दीर्घ शाखा, एतादृश भारतवृक्ष हा सर्व लोकांस उपजीवन आश्रयभूत असा वेदव्यासानीं पूर्ण रूपें करून निर्माण केला. या वृक्षाचीं मुख्य पुष्प फलें, धर्म आणि मोक्ष, या पुष्पफलांची ज्यांस अपेक्षा असेल, त्याणीं ह्या वृक्षाचा आश्रय करावा; यास्तव अनेक ऋषिसमाजा मध्यें जनमेजय राजानें वैशंपायन ऋषींस प्रश्न केला. वैशंपायनानीं व्यासांच्या आज्ञेवरून राजास संपूर्ण कथन केलें; यांत कुरूंचा वंशविस्तार, गांधारीची धर्मशीलता, विदुराचें ज्ञान, कुंतीचें धैर्य व वासुदेवाचें माहात्म्य व पांडवांची सत्यता इत्यादिकांचें उत्तमत्व वर्णन केलें आहे आणि दुर्योधनादिकांचें दुष्टत्वही सांगितलें आहे. वेदव्यासानीं भारत संहिता ही एकंदर साठ लक्ष केली, त्यांतून तीस लक्ष देवलोकांत ठेविली. पितृलोकांत पंधरा लक्ष आणि गंधर्वलोकांत चवदा लक्ष व एक लक्ष मनुष्य लोकांत ठेऊन आपले पुत्र शुकाचार्य यांस पढविली त्याणीं गंधर्वांस सांगितली व नारद देवांस सांगतात आणि पितरांस देवल ऋषि सांगतात व मनुष्यलोकांत व्यासांचे शिष्य वैशंपायन ऋषीनीं जनमेजयास सांगितली. तोच इतिहास मी आपणास सांगतों, श्रवण करावा. मातोश्री सत्यवती जी तिच्या आज्ञेवरून व्यासानीं विचित्रवीर्य राजाच्या स्त्रियांचे ठिकाणीं धृतराष्ट्र पांडु आणि विदुर असे तीन पुत्र अग्नीसारिखे तेजःपुंज अनुक्रमानें उत्पन्न करून पुनः आपले आश्रमास तपश्चर्यें करितां गेले. पुढें

कांहीं कालानें पांडु राजानें मृगयासक्त होऊन बहुत श्वापदांचा संहार करीत असतां, त्यांत एका स्थलीं ऋषि, स्त्रीपुरुष मृगरूपी होऊन मैथुन करीत होते; त्यांस मारिलें. त्या कालीं त्याणी तूंही मैथुन समयीं मरण पावशील असा शाप दिला; यास्तव राजा पासून प्रजोत्पत्ती नाहीं मग यमधर्मादिकां पासून कुंतीस तीन व माद्रीला दोन असे पांच पुत्र झाले त्यांस अरण्यांत कुंतीनेंच वाढविलें; नंतर ऋषीनीं माते सहित त्यांस धृतराष्ट्राकडे आणून या पांडुपुत्रांचें तूं संरक्षण करावें, असें सांगून ऋषि अंतर्धान पावले. नंतर तेथें लोक नानाप्रकारचे उपहास करूं लागले कीं, हीं मुलें पांडुराजाचीं नव्हेत, मातृव्यभिचारानें जाहलेलीं आहेत, अशा बहुत निंदा होतात तों अकस्मात् आकाशांतून पुष्पवृष्टि व देवांच्या शंख दुंदुभींचे नाद व जयजयकार शब्द हे पांडवांचे कीर्तिवर्धन होऊं लागले. त्या कालीं सर्वांस अति आश्चर्य होऊन हर्षवृद्धि जाहली. पुढें त्या पांडवांचे वेदशास्त्रांचें अध्ययन व पराक्रम, गुरुसेवा इत्यादि संपन्न पाहून बहुत मान सत्कार सर्व लोक करूं लागले. नंतर अर्जुनानें स्वयंवरांत बहुत राजे जिंकून द्रौपदी वरिली. या योगानें अर्जुनास धनुर्धारी लोकांत पूज्यत्व प्राप्त जाहलें आणि चौघानीं चारी दिशा जिंकून धर्माकडून राजसूय यज्ञ करविला; नंतर दुर्योधन पाहतो तों अपरिमित संपत्ति आहेच व मयासुरानें केलेल्या सभेंत आपला अपमान जाहला हें त्यास सहन जाहलें नाहीं. नंतर त्याणें मोठ्या संतापानें पांडवांचें सर्व ऐश्वर्य कपटद्यूतानें हरण करून त्यांस वनवासादि दुःखें द्यावीं असा विचार, कर्ण, शकुनीच्या संमतानें केला. त्या विषयीं विदुर, भीष्म, द्रोणादिकानीं निवारण केलें; परंतु तें मान्य केलें नाहीं हें धृतराष्ट्रानें समजून या कृत्यानें पुढें काय होणार हें बहुत कालपर्यंत मनन करून संजयास सांगतो कीं, माझे पुत्र व पांडूचे पुत्र मजला समान आहेत. त्यांत दुर्योधनानें त्या दुष्ट कृत्यास आरंभ केला हें आह्मांस अत्यंत शोकास कारण आहे. याचा परिहार माझ्यानें होत नाहीं व माझें मत कोणीही मान्य करीत नाहींत तर या योगानें हृदय भेदकर जीं मजला दुःखें जाहलीं तीं सांगतों. हे संजया श्रवण कर. ज्या कालीं सर्व राजांचा मानभंगपूर्वक मत्स्ययंत्र भेद करून अर्जुनानें द्रौपदी हरण केली; तसेंच सुभद्रा हरण केली व इंद्राचा पराजय करू

न खांडव वन दग्ध केलें, आणि लाक्षागृहांतून मुक्त जाहले, हें ऐकून व दिग्विज-
यांत सर्व राजे जिंकिले. व जरासंधास भीमानें मारिलें आणि राजसूय यज्ञ ध-
र्मानें केला. नंतर शकुनीनें अधर्म द्यूत करून धर्माचें सर्वस्व हरण केलें. दुःशास
नानें द्रौपदीस सभेंत आणून वस्त्र हरण केलें आणि पराजित पांडवानीं अर
ण्यांत असूनही तेथें अनेक अद्भुत कृत्यें केलीं. तीं अशीं कीं, सहस्रशः ऋषिस
माजासहित संचार केला व अर्जुनानें किरातरूपी त्र्यंबकास युद्धांत संतुष्ट क
रून पाशुपतास्त्र संपादन केलें व स्वर्गास जाऊन इंद्राच्या आज्ञेनें कालकेय
पौलोम, निवात कवचादि दैत्य, देवांस अजिंक असतांही त्यांचा संहार केला आ
णि इंद्रादि देवांपासून दिव्यास्त्र विद्या संपादन करून कृतकार्य होऊन पुनः
माघारा आला. नंतर घोषयात्रेंत बांधलेले दुर्योधनास गंधर्वांपासून सोड-
विलें. पुढें यक्ष प्रश्नाचीं धर्मानें उत्तरें दिलीं. आणि विराट नगरांत अज्ञातवा-
स करून एकट्या अर्जुनानें या भाष्म्या पुत्रादिकांचा पराजय केला. नंतर वि
राटानें पांडवांचा मोठा सत्कार करून आपली कन्या उत्तरा अभिमन्यूस दि-
ली. आणि ज्या कालीं सप्त अक्षौहिणी सेनासहित उपप्लव्य नगरांत श्रीकृ
ष्णाचे आश्रयानें असून युद्धाचा उद्योग भीष्मश्रवण करून व नारदानीं कृष्णार्जु
न हे नरनारायण आहेत असें सांगितलें तेणें करून जयाची निराशा झाली.
आणि साम (सख्य) करण्या करितां श्रीकृष्ण आले त्यांचे वाक्याचा अनाद
र करून त्यांस बद्ध करण्याचा विचार कर्णानें व दुर्योधनानें केला; तेव्हां कृ
ष्णानीं विश्वरूप दर्शविलें आणि कुंतीचें सांत्वन करून गमन केलें. पुढें कर्णा
नें प्रतिज्ञा केली कीं, भीष्म असतां मीं युद्ध करणार नाहीं. असें बोलून सभेंतू
न गेला. नंतर भीष्मानीं प्रतिज्ञा करून अर्जुनास मूर्छित केलें. त्या कालीं कृष्णा
नीं संरक्षण करून शिखंडीस पुढें केला. आणि अर्जुनानें हाणून भीष्मास शर
शय्येवर शयन करविलें. पुढें द्रोणाचार्यांनीं अनेक अस्त्रजालें सोडलीं व अर्जु
नाच्या वधार्थ सप्त ससकानीं पराकाष्ठा केली तरीही त्याचा लेशमात्र नाश जाह
ला नाहीं. मग चक्रव्यूह रचना करून षट्रथीनीं अधर्मानें अभिमन्यूचा वध के
ला. आणि दुर्योधनादिकांस मोठा हर्ष जाहला. तेणें करून अर्जुन संतप्त होऊन
जयद्रथास तृणतुल्य मानून प्रतिज्ञापूर्वक लक्षावधी वीरांचा संहार करून

जयद्रथाचें मस्तक उडविलें. नंतर इंद्रानें दिलेल्या शक्तीनें अर्जुनास मारावें म्हणू न कर्णानें यत्न केला, तो व्यर्थ होऊन कृष्णानीं तिचा उपयोग घटोत्कचावर करविला. नंतर अश्वत्थामा हत जाहला हें द्रोणाचार्यांनीं ऐकून ते मरणाचा निश्चय करून बसले. तेव्हां धृष्टद्युम्नानें द्रोणाचार्यांस वधिलें. हें सहन न करून द्रोणपुत्र अश्वत्थामानें मोठें युद्ध करून नारायणास्त्रप्रयोग केला; त्याचेंही निवारण कृष्णानीं करवून द्रोणपुत्राचा पराजय पार्थाचे हातून करविला. नंतर भीमसेनानें रणांत दुःशासनाचा वध केला. व अर्जुनानें कर्णाचा, युधिष्ठिरानें शल्याचा, शकुनीचा सहदेवानें वध केला. हें सर्व अवलोकन करून दुर्योधन बलशक्तिरहित झाला, तथापि अभिमानानें डोहांत जलस्तंभन करून अदृश्य जाहला. नंतर पुनः पांडवांचा नाश करीन अशा अभिमानानें बाहेर निघून भीमाचें व त्याचें तुमुल (दारुण) गदायुद्ध होतां होतां भीमानें त्यास गदाप्रहारानें मारिलें. हें वर्तमान श्रवण करून मरणांत दुःख जाहलें. पुढें अश्वत्थामानें पांचाल व द्रौपदीचे पांच पुत्र निद्रिस्थ असतां त्यांचा शिरच्छेद केला आणि उत्तरेच्या गर्भावर ब्रह्मास्त्र टाकिलें. तेथेंही कृष्णानीं रक्षण केलें. नंतर अश्वत्थामास व्यास व कृष्ण यानीं शाप दिले. सारांश पुत्र पौत्रादि सर्व बांधवं व अष्टादश अक्षौहिणी सैन्याचा क्षय होऊन कृपाचार्य, अश्वत्थामा, कृतवर्मा हे तिघे व कृष्ण, सात्यकि, पांच पांडव असे सात एकूण दहा अवशिष्ट राहिले, येणें करून गांधारीस व मला मोहानें मरणतुल्य व्यथा होते. असें सौतानें शौनकादिकांस सांगून पुढें भाषण करतो कीं, धृतराष्ट्र अतिशय शोक करून मूर्छित जाहला. नंतर क्षणमात्रें करून सावध जाहला. तेव्हां पुनः संजय पुरातन राजांच्या कथानीं समाधान करूं लागला तें असें कीं, हे राजा वेदव्यास व नारद यानीं मोठमोठे राजे अनेक गुणसंपन्न असतां तेही सार्वभौम राज्याचा त्याग करून परलोकास गेले. असें सांगितलें तें श्रवण कर. शैब्य राजा, सृंजय, सुहोत्र, रंतिदेव, काक्षीवंत, औशिज, बाल्हीक, दमन, चैद्य, शर्याति, नल, विश्वामित्र, अंबरीष, मरुत्त, मनु, इक्ष्वाकु, गय, भरत, दाशरथी राम, शशबिंदु, भगीरथ, कृतवीर्य, जनमेजय, ययाति, अशा चतुर्विंशति राजांच्या कथा नारदानीं पुत्रशोकार्त श्वैत्य राजास-

सांगितल्या व याहून इतर असंख्य राजे महाबलिष्ठ महारथी सर्वगुणसंपन्न होते त्यांचीं नांवें सांगतो. पुरु,कुरु,यदु,शूर,विष्वगश्व,अणुह,युवनाश्व,ककुत्स्थ,रघु,विजय,वीतिहोत्र,अंग,भव,श्वेत,बृहद्गुरु,उशीनर,शतरथ,कंक,दुलिदुह,द्रुम,दंभोद्भव,परवेन,सगर,संस्कृति,निमि,अजेय,परशु,पुंड्र,शंभु,देवावृध,देवाह्वय,सुप्रतिम,सुप्रतीक,बृहद्रथ,महोत्साह,सुक्रतु,नैषध,सत्यव्रत,शांतभय,सुमित्र,सुबल,जानुजंघ,अनरण्य,अर्क,प्रियभृत्य,बलबंधु,निरामर्द,केतुशृंग,बृहद्बल,धृष्टकेतु,बृहत्केतु,दीप्तकेतु इत्यादि सहस्रशः कोटिशः पुण्यकीर्ति महाभाग्यशाली असे राजे समृद्ध सार्वभौम संपत्तीचा त्याग करून निधन पावले. त्यांचीं माहात्म्यें विद्वन्मान्य न सदाचार पद्धति,पुराणप्रसिद्ध आहेत,तेही गेले मग तुमचे पुत्र तर महा दुरात्मे,दुःशील,पापकीर्ति त्यांच्या विषयीं राजा,तुह्मी शोक करणें हें योग्य नव्हे. कारण तुह्मीं सर्व शास्त्रज्ञ बुद्धिमंत आहांत मी सांगावें असें नाहीं. भवितव्य जें कालगतीकरून सुख दुःख प्राप्त होणें त्याचा परिहार कोणाच्यानेंही होत नाहीं; कारण कालाचे अतिक्रमणास कोणी समर्थ नाहीं. सर्व भूतमात्रांचें होणें जाणें हें सर्व कालाधीनच आहे. असें समजून अज्ञानजन्य शोकाचा त्याग करून ज्ञानजन्य शांतीनें स्वकीय साधनाचा विचार करावा. असें संजयानें धृतराष्ट्राचें समाधान केलें. असें सौतीनें सांगून पुनः बोलतो कीं,भारतोपनिषद्संबंधि पुण्यकारक कथा व्यासानीं वर्णन केल्या त्या महाकवीनीं अनेक पुराणांत घेतल्या आहेत. या भारतांत देवर्षि,ब्रह्मर्षि,राजर्षि,यक्ष महोरगादिकांची अद्भुत माहात्म्यें वर्णन केलीं आहेत. यांचे परम श्रद्धें करून अध्ययन अध्यापन केलें असतां सर्व पापांचा क्षय होऊन महा पुण्यसंग्रह होतो; कारण ज्यापासून चराचर विश्वांची उत्पत्ति होत्ये व ज्याचीं दिव्य अद्भुत चरित्रें महाज्ञानी वर्णन करितात,असें शाश्वत सनातन परब्रह्म सत्य ज्ञानानंदरूप साक्षात् भगवान् वासुदेव याचीं माहात्म्यें वर्णन केलीं आहेत. व अव्यक्त (निराकार) दितत्वविचार व महाभूतोत्पत्त्यादि अध्यात्मशास्त्र सांगितलें हें श्रद्धापूर्वक धर्मपरायण होत्साते अध्ययन करणारे लोक पापापासून मुक्त होऊन आदर्शांत प्रतिबिंब पाहिल्याप्रमाणें

प्राजस्थ परमात्म्याचा साक्षात्कार होण्यास अधिकारी होता त. त्यांत हा प्रथ म अनुक्रमणिकाध्याय प्रातःकाली व सायंकाली पठण केला असतां दिवा रात्र संबंधि पापक्षयपूर्वक सर्व कष्ट परिहार होतात. समग्र भारत दधिम थन करून नवनीत अथवा सर्वौषधींपासून अमृत जसें सार तसा सर्व रोहा त समुद्र, चतुष्पादांत धेनु, तसा भारत इतिहासांत अनुक्रमणिकाध्याय, याचें श्राद्ध काली ब्राह्मणास श्रवण करविलें असतां पितरांस अक्षय्य तृप्ति होते. हा अध्याय संपूर्ण वेदांचें रहस्य आहे. याचें श्रवण पठण केल्यास संपूर्ण भा रताचें फल प्राप्त होतें व भ्रूणहत्यादि पातकें दग्ध होऊन दीर्घायु व सर्व संप त्ति व सर्वत्र विजय प्राप्ति होते. पूर्वी सर्व देवांनी चार वेद व हा इतिहास यां ची तुलना केली, त्यांत हा इतिहास अधिक जाहला, तेव्हां पासून या लोकीं भा रत असें नाम प्रसिद्ध झालें. अशा त्या अध्यायांत कथा आहेत.

२. अध्याय दुसरा — ऋषि प्रश्न करितात कीं, समंत पंचक क्षेत्र तु ह्मीं सांगितलें तें कसें आहे? नंतर सौती सांगतात. त्रेता, द्वापर, युगसंधींत प रशुरामानीं वारंवार क्षत्रियांचा संहार करून समंत पंचक नावांचे पांच रक्ता चे डोह केले. आणि त्या रुधिरानें ऋचिकादि पितरांस तृप्त केलें. नंतर त्यापि तरानीं वर माग ह्मणतांच परशुरामानीं मागितलें कीं, मी क्षत्रियांचा फार-वध केला, याचें पाप नसावें व हे डोह, तीर्थासारखे व्हावे, असें वर मागतां च तसेंच होईल असें सांगून गमन केलें. त्या डोहांचे आसमंतात् देशाला समं त पंचक देश असें ह्मणतात. तेथेंच द्वापार कलीचे संधींत कौरव पांडवाचें यु द्ध जाहलें. तो देश परम पुण्यकारक व रमणीय यास्तव तेथें बहुत ऋषींनीं तपाचरणें करून देह त्याग केले, असें त्रैलोक्यांत प्रसिद्ध क्षेत्र आहे. नंतर ऋ षि पुनः प्रश्न करितात कीं, अक्षौहिणीची संख्या सांगावी. सौती सांगतात, एक रथ, एक गज, पांच मनुष्यें तीन अश्व यांस पत्ति असें ह्मणतात. तीन प त्तींचें सेनामुख. ३ सेनामुखाचें गुल्म. ३ गुल्मांचा गण. ३ गणांची वाहीनी. ३ वाहिनींची पृतना. ३ पृतनेची चमू. ३ चमूची अनीकिनी. १० अनीकिनींची एक अक्षौहिणी. २१८७० गज, २१८७० रथ, ६५६१० अश्व १०९३५० पाय दळ या प्रमाणें एक अक्षौहिणीची संख्या अशा, कुरु पांडव सेना अठरा-

# आदिपर्व.

अक्षौहिणी १८ दिवसांत नाश पावल्या, त्या अशा कीं, भीष्माचें युद्ध १० दिवस व द्रोणाचें पांच दिवस व कर्णाचें २ दिवस, अर्धा दिवस शल्याचा व अर्धा, गदायुद्ध त्यांत रात्रीं पांचाल व पांडवांच्या पुत्रांचा संहार झाला असा अनुक्रमाध्याय सांगून पुनः सौती सांगतो, जनमेजयाचे सत्रांत व्यासशिष्य वैशंपायनानीं सविस्तर कथन केलें तें आपणास या अध्यायांत सर्व भारताचा कथासंग्रह संक्षेपें करून सांगतों. पौष्याख्यानांतर्गत कथा, आदि अंशावतरण, लाक्षागृह निर्माण, हिडिंब व बक वध, चैत्ररथाख्यान, पांचालीचें स्वयंवर, विदुराचें आगमन, अर्जुनाचा वनवास, सुभद्राहरण, हरणाहरण, खांडव दहन, मयासुराचें संरक्षण, पौलोम आख्यानांत भृगु वंशविस्तार, आस्तीक आख्यानांतर्गत कथा, नागांचें व गरुडाचें जन्मकथन, क्षीरसमुद्र मंथन जनमेजयकृत सर्पसत्र, संभव आख्यानांतर्गत विविध राजाचें वंश कथन, द्वैपायनांचें व देवांचें अंशावतरण, दैत्य, दानव, यक्ष, महोजस, नाग, सर्प, गंधर्व, पक्षी इत्यादि सर्व भूतांच्या उत्पत्तीचें वर्णन, शाकुंतलोपाख्यान व दुष्यंता पासून भरताचें जन्म, वसूंची उत्पत्ति, भागीरथीपासून भीष्माचें जन्म व त्यांचें ब्रह्मचर्यादि धर्माचरण, प्रतिज्ञापालन व विचित्रवीर्यास राज्यस्थापन, कृष्णद्वैपायना पासून धृतराष्ट्रादिकांचे जन्म व पांडवांच्या उत्पत्ति, वारणावत यात्रा, दुर्योधनानें कपट विचारपूर्वक पांडवांस बोलावणें, विदुरानेंमार्गांत पांडवांस म्लेंछ भाषेनें हितोपदेश व सुरुंगक्रिया, लाक्षागृहांत निषादीचे पंचपुत्रांचें शयन व तेथेंच पुरोचनाचें दहन, भीमापासून हिडिंबाचा वध, हिडिंबाचे ठिकाणीं घटोत्कचाचें जन्म, वेदव्यास दर्शन, त्यांच्या आज्ञेवरून एकचक्र नगरींत वास, बकासुराचा वध, द्रौपदीचें व धृष्टद्युम्नाचें जन्म, स्वयंवर दर्शनार्थ पांचालदेशांत पांडवांचें गमन, अर्जुनानें अंगारपर्णास जिंकून त्यासीं सख्य केलें, तापत्य, वासिष्ठ, और्वाख्यान, पांचाल नगरांत अर्जुनानें यंत्रभेद करून द्रौपदी वरिली, भीमार्जुनानीं राजांचा पराजय करून भार्गवशालेंत गमन केलें, पंचेंद्रोपाख्यान, विदुराची प्राप्ति व केशवाचें दर्शन, इंद्रप्रस्थ राज्यप्राप्ति, नारद आज्ञें करून द्रौपदी विषयीं पांचांचे दिवसविभाग, सुंदोपसुंदोपाख्यान, द्रौपदी व धर्मराज यांचे एकांतांत आयुध ग्रहणार्थ अर्जुनाचें गमन, ब्राह्मणाचें कार्य संपादन, प्रतिज्ञा पालनार्थ तीर्थयात्रा, यात्रेंत उलूपी समागम, बभ्रुवाहना·

ची उत्पत्ति, पुण्यतीर्थ सेवन, शापग्रस्त पंचाप्सरांस सोडविणें, प्रभास क्षेत्रांत कृष्णार्जुन, त्यांचे आज्ञेनें द्वारकेंत सुभद्राहरण, तिचे ठिकाणीं अर्जुनापासून अभिमन्यूचें जन्म, द्रौपदीचे ठिकाणीं पांचापासून पांच पुत्रांचे जन्म, यमुनातीरीं कृष्णार्जुन विहार, गांडीवाची प्राप्ती, खांडव वन दहन, मयासुराचें व सर्पांचें संरक्षण, मंदपाल ऋषी पासून शार्ङ्गीचे ठायीं पुत्रोत्पत्ती इत्यादि आख्यानें आदिपर्वांत संग्रह केलीं आहेत. दुसरें सभापर्व यांतील कथा:- पांडवांची नगररचना, नारदापासून लोकपाल सभावर्णन, राजसूय यज्ञ, जरासंध वध, गिरिव्रज नगरांतून जरासंधानें जे राजे बद्ध केले त्यांना कृष्णानीं सोडविलें, पांडवांचा दिग्विजय, राजसूययज्ञास राजांचें आगमन, तेथेंच अग्रपूजा विचारांत शिशुपालाचा वध, पांडवांचें अद्भुत ऐश्वर्य अवलोकन करून भीमानें सभेंत दुर्योधनाचा उपहास केला, तेणें करून त्याणें अतिसंतप्त होऊन द्यूत करविलें, त्यांत शकुनीनें धर्मास जिंकिलें. दुःख समुद्रांत निमग्न द्रौपदीचें संकट पाहून पांडवांस त्यांतून धृतराष्ट्रानें मुक्त केलें. पुनः दुर्योधनानें पांडवांबरोबर द्यूत करून त्यांचें सर्वस्व हरून वनवासास पाठविलें असा कथासंग्रह सभापर्वांत आहे. तिसरें वनपर्व:- पांडवांचें अरण्यांत गमन, त्यांबरोबर नगरवासी लोकांचें गमन, सर्व ब्राह्मणादिकांस अन्नौषधी करितां धौम्यऋषीच्या उपदेशानें सूर्याचें आराधन, त्याचे प्रसादानें स्थाल्याप्राप्ती, दुर्योधनानें हितोपदेश करणाऱ्या विदुराचा त्याग, त्याचें पांडवांकडे गमन, पुनः धृतराष्ट्राकडे आगमन, कर्णाच्या संमतानें पांडवांच्या नाशार्थ दुर्योधनाचा विचार, तो निवारणार्थ व्यासांचें आगमन, सुरभीचें आख्यान, मैत्रेय ऋषीचें आगमन व त्यांचा दुर्योधनास शाप, वनांत भीमापासून किर्मीर राक्षसाचा वध, यादव व द्रुपदादि पांचालांच्या भेटी, कृष्णदर्शन, पांचालीच्या शोकाचें समाधान, सौभवधाख्यान, पुत्रसहित सुभद्रेस द्वारकेस कृष्णानीं नेणें, द्रौपदीचे पुत्रांस धृष्टद्युम्नानें नेलें, द्वैतवनांत पांडवांचा प्रवेश, धर्मभीमासीं द्रौपदीचा संवाद, पांडवांसमीप व्यासांचें आगमन व त्यांपासून पांडवांनीं विद्याग्रहण, काम्यक वनांत पांडवांचें गमन, तेथून अस्त्रसंपादनार्थ अर्जुनाचा प्रवास, किरातरूपी शिवासीं अर्जुनाचें युद्ध, लोकपालांपासून व इंद्रापासून अस्त्रप्राप्ती, धृतराष्ट्राची चिंता, दुःखपीडित युधिष्ठिरास बृहदश्व ऋषीनीं समाधानार्थ नलोपाख्यान सांगितलें, लोमश ऋषीनीं अर्जु-

नंतर स्वर्गांतील स्थितीचें वर्णन, अर्जुनाच्या निरोपानें पांडवांची तीर्थयात्रा, तीर्थाचें पुण्य व फलकीर्तन. पुलस्त्यतीर्थयात्रा, कर्णाचीं कुंडलें इंद्रापासून हरण, गयराजाची यज्ञसंपत्ति, आगस्त्याख्यान. लोपामुद्रेचें आगमन, ऋष्यशृंगचरित्र, जामदग्न्यचरित्र, कार्तवीर्यादिवध. प्रभासतीर्थी पांडव, यादवांच्या भेटी, च्यवनाख्यान. सौकन्याख्यान, शर्यातियज्ञ, मांधातृचरित्र, जंतूपाख्यान, श्येनकपोतीयोपाख्यान, अष्टावक्रीय, यवक्रीताख्यान, रैभ्याख्यान, गंधमादनयात्रा, भीमानें द्रौपदीस्तव सौगंधिकपुष्पहरण व मार्गांत हनुमद्दर्शन, राक्षस, यक्ष, जटासुरादिकांचा वध. वृषपर्वाचें आगमन, आर्ष्टिषेणाश्रमीं पांडवांचा वास, कैलासारोहण, तेथें भीमानें मणिमत्प्रमुख दैत्य व यक्ष यांचा संहार, पांडव कुबेराचा समागम, तेथेंच अर्जुनाची भेट व त्याणें दिव्यास्त्रसंपादन, निवातकवच, पौलोमकालके यांचा संहार, पुनः गंधमादन पर्वताहून अवरोहण (उतरणें), भुजंगग्रस्त भीमास प्रश्न सांगून धर्मानें मुक्त केला, पुनः काम्यकवनांत आगमन, तेथें वासुदेवदर्शन. मार्कंडेय समस्या, पृथुचरित्र, तार्क्ष्यऋषीसरस्वती संवाद, मत्स्योपाख्यान, ऐंद्रद्युम्नोपाख्यान. धौंधुमाराख्यान, पतिव्रताख्यान, आंगिरस आख्यान, द्रौपदी सत्यभामा संवाद, पुनः द्वैतवनागमन, घोषयात्रेंत गंधर्वांनीं बद्ध करून नेलेल्या दुर्योधनास अर्जुनानें सोडविणें, धर्मास स्वप्नांत मृगदर्शन, पुनः काम्यकवनांत गमन, व्रीहिद्रौणिक आख्यान, दुर्वास आख्यान, जयद्रथानें द्रौपदीचें हरण, भीमानें त्याचें पंचधाशिरोमुंडण, रामायण उपाख्यान, सावित्री आख्यान, इंद्रानें कर्णापासून कवच कुंडलें घेऊन शक्तिअस्त्र दिलें, आरणेयोपाख्यान, यक्षप्रश्नोत्तरें करून पांडवांस वर मिळाला. नंतर पश्चिमदिशेस गमन. यांत आख्यानसंग्रह केला आहे. चवथें विराटपर्व- पांडवानीं विराटनगरांत प्रवेश करितांना शमीवृक्षावर आयुधें ठेऊन वेषांतरानें व नामांतरानें नगरांत वास केला; द्रौपदीची इच्छा करणाऱ्या कीचकास भीमानें मारिलें, दुर्योधनानें पांडवांच्या शोधार्थ पाठविलेल्या जासुदांच्या संदिग्ध भाषणावरून त्रिगर्तराजानें गोग्रहण करून विराटास धरून नेलें, त्यास भीमानें सोडवून त्रिगर्ताचा पराजय केला, दुर्योधनादिकांस उत्तरगोग्रहणांत अर्जुनानें जिंकिलें. विराटानें आपली कन्या उत्तरा अभिमन्यूस दिली. यांत इत्यादि आख्यानें आहेत. पांचवें उद्योगपर्व-

यांत उपप्लव्य नगरांत पांडवांचा वास. दुर्योधनानें व पश्चात् अर्जुनानें युद्धाचे साह्यार्थ कृष्णाची प्रार्थना केली तेव्हां त्याणीं मी निरायुध व माझें अर्बुद सैन्य यांत उभयतांस लागेल तें घ्यावें असें सांगितल्या वरून अर्जुनानें कृष्ण व दुर्योधनानें सैन्य घेतलें, पांडवांकडे शल्य येत असतां मार्गांत दुर्योधनानें नाना प्रकारच्या उपचारांनीं त्यास प्रसन्न करून साह्यार्थ बोलाविलें, नंतर त्याणें बरें म्हणून पांडवांस समाधानपूर्वक इंद्रविजयाख्यान सांगून त्यांचेंही भाषण मान्य करून कौरवांकडे गमन केलें, पांडवांनीं तिकडे पुरोहित पाठविला त्याणें तिकडील वृत्तांत कळविल्यावर संजयास मध्यस्थी करितां पाठविलें, त्याचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्रास परमचिंताग्रस्त होऊन निद्रा येईना तेव्हां रात्रीं जागरांत विदुरानें नीति सांगितली व सनत्सुजातानींही राजाच्या मनाचा खेदपरिहारार्थ अध्यात्म ज्ञान सांगितलें, पुनः प्रातःकालीं संजय कृष्णार्जुनाचें माहात्म्य सांगून पांडवांकडे गेला, त्यावर स्वतः कृष्णानीं साम्यार्थ गमन केलें, त्यांच्याही भाषणाचें दुर्योधनानें गुरुत्व न मानून अनादर केला, दंभोद्भवाख्यान, मातलीचें वरान्वेषण, गालवचरित्र, विदुलापुत्रानुशासन, कर्ण दुर्योधनाचें दुष्टत्व जाणून कृष्णानीं विश्वरूप दर्शविलें, कर्णासह वर्तमान कृष्णानीं रथारूढ होऊन कर्णासीं संवाद केला, आणि पुनः पांडवांकडे आगमन करून तिकडील वृत्तांत सांगितला तो श्रवण करून युद्धार्थ सिद्ध झाले व कौरवही गजपुरांतून निघाले आणि पांडवांकडे उलूकास पाठविलें, उद्यीक युद्धास प्रारंभ होणार असा निश्चय झाला, रथातिरथसंख्या व अंबोपाख्यान असा वृत्तांत कथन केला आहे. सहावें भीष्मपर्व- यांत जंबूखंड निर्माण, धर्माचें सैन्याची खिन्नता, अर्जुनाचा मोह कृष्णानीं गीतोपदेशानें परिहार. युद्धास आरंभ, भीष्म प्रतिज्ञा, अर्जुन रक्षणार्थ कृष्णानीं शस्त्रधारण करून भीष्मावर धांवणें, दहादिवस युद्ध, शिखंडीला पुढें करून अर्जुनानें तीक्ष्णबाणानीं भीष्मास शरशय्येवर शयन करविलें, असा कथासंग्रह आहे. सातवें द्रोणपर्व- यांत सेनापत्या विषयीं द्रोणाचार्यास अभिषेक, दुर्योधनाच्या प्रीतीस्तव आचार्यांची प्रतिज्ञा, धर्माचें ग्रहण, संसप्तकांसी अर्जुनाचें युद्ध, भगदत्ताचा वध, बहुतांनीं अभिमन्यूचा वध, अर्जुनानें प्रतिज्ञापूर्वक सप्ताक्षौहिणी सह जयद्रथाचा संहार, अर्जुनाच्या शोधार्थ भीमसेन सात्यकीचा सेनाप्रवेश, अर्जुनानें

निःशेष नवकोटि संसप्तकांस यमलोकीं पाठविलें, व धृतराष्ट्राचे कांहीं पुत्र व पाषाणयोधी, अर्बुद संख्य गोपाळ, अलंबुष, श्रुतायु, जलसंध, सोमदत्ती, विराट, द्रुपद, घटोत्कच इत्यादि अनेक वीरांचा यायुद्धांत क्षयझाल्या व पुत्रशोकानें संतप्त द्रोणाचार्यांचे पतन, अश्वत्थामानें क्रोधें करून नारायणास्त्र सोडिलें, अग्नीचें व रुद्राचें माहात्म्य व व्यासांचें आगमन, कृष्णार्जुनमाहात्म्य, या पर्यंत प्रायशः मोठे मोठे योद्धे मरण पावले इत्यादि कथासंग्रह आहे. आठवें कर्णपर्व- यांत कर्णाचें सेनापत्य व त्याचें सारथ्याविषयीं शल्याची योजना, त्रिपुराख्यान, कर्णशल्याचा महाकठोर संवाद, हंसकाकीयाख्यान, अश्वत्थामानें पांड्यराजाचा वध, दंडसेन व दंडाचा वध, कर्णार्जुनाचे युद्धांत धर्मास संशय प्राप्ती, कृष्णानीं अर्जुनाचें समाधान केलें, प्रतिज्ञापूर्वक भीमसेनानें दुःशासनाचें रक्तप्राशन, अर्जुनानें कर्णाचा वध इत्यादि कथा संग्रह आहे. नववें शल्यपर्व- यांत शल्याचें सेनापत्य, कौमार आख्यान, अभिषेक कर्म, विभागपूर्वक रथ युद्ध कथन, कौरवांत बहुशः मुख्य जे त्यांचा नाश, धर्मराजानीं शल्याचा वध, सहदेवानें शकुनीचा वध प्रायशः सैन्यांचा संहार होऊन किंचित् शेष राहिल्यावर दुर्योधनाचा डोहांत प्रवेश, तेथें लुब्धकानीं भीमाची व धर्माची स्थिति वर्णन केली तेव्हां डोहांतून निघून भीमासीं गदायुद्धारंभ, त्यासमयीं बलरामाचें आगमन, तेथें तीर्थमाहात्म्य कथन, भीमसेनानें गदा प्रहारेंकरून दुर्योधनाचा ऊरुभंग इत्यादि कथा संग्रह आहे. दहावें सौप्तिकपर्व- यांत भग्नोरू, रक्तांळलेला दुर्योधन भूमीवर पडला त्याचे समीप कृतवर्मा, कृपाचार्य, अश्वत्थामा याणीं येऊन शोक केला, अश्वत्थामाची प्रतिज्ञा कीं, पांचाल व पांडव यांचा वध केल्या शिवाय मी कवच काढणार नाहीं, असें बोलून तो रात्रीं शिबिरांत निजलेले पांचाल व पांडव यांच्या वधार्थ गेला तों तेथें मोठा राक्षस होता त्याचें निवारण, रुद्राचे आराधनें करून विश्वासघातपूर्वक धृष्टद्युम्नादि पांचाल व द्रौपदीचे पुत्रांचा संहार केला. त्यांतून कृष्णानीं संरक्षित पांडव व सात्यकी हे मात्र शेष राहिले, असें वर्तमान सूतमुखानें पांडवानीं श्रवण करून द्रौपदीचे पुत्र भ्रातृशोक परिहार पूर्वक सांत्वन करून भीमसेन गदा घेऊन अश्वत्थामावर धांवतो तों त्याणें अपांडवी होण्या करितां अस्त्रप्रयोग केला, त्याचें कृष्णाज्ञे वरून अर्जुनानें प्रत्यस्त्रें करून निवारण केलें, अश्वत्थामा व व्यास यांचा

परस्पर शाप, अश्वत्थाम्याचे मस्तकांतील मणी काढून गाडवानीं द्रौपदीस दिल्या, अशा कथा सांगितल्या आहेत. अकरावें स्त्रीपर्व. यांत युद्धशांतीनंतर धृतराष्ट्रसमीप कृष्णानीं लोहाची मूर्ति आणिली तीस धृतराष्ट्रानें आलिंगन देऊन तिचा भंग केला, विदुराचें शोकनाशक भाषण श्रवण करून धृतराष्ट्रानें सर्व स्त्रियांसहित युद्धभूमीकडे गमन केलें, तेथें वीरांच्या पत्नींचा विलाप, गांधारी, धृतराष्ट्रांचा क्रोध, मोह, युद्धांत जे जे पुत्र, भ्रातृमित्रादि मरण पावले त्या सर्वांचें दर्शन, गांधारीचा क्रोधशमन, धर्मानीं राजांच्या दहनादि क्रिया केल्या व जलांजलिप्रदान केलें, कर्णाची उत्पत्ति कुंतीनें प्रगट केली, अशा कथा वर्णन केल्या आहेत. बारावें बुद्धिप्रकाशकर शांतिपर्व. यांत पितृ, भ्रातृ, पुत्रादि ज्ञातीच्या वधानें विरक्त जो धर्मराज त्यास शरशय्येवरून भीष्मानीं सर्व धर्म सांगितले ते असे कीं, राजधर्म, आपद्धर्म, मोक्षधर्म ज्याचें सर्वांनीं श्रवण, मनन केलें असतां उत्तम ज्ञान प्राप्त होतें हें पर्व मुमुक्षुजनांस परमप्रिय आहे. यांत असें वर्णन आहे. तेरावें अनुशासन पर्व. यांत भीष्माच्या उपदेशानें धर्माचें समाधान, व्यवहारिक धर्म कथन, अन्नदानाचें माहात्म्य व योगमार्ग कथन व अनेक व्रतांचीं विधानें व दानास पात्रविचार, आचारविधि व योग, सत्याची गति, गोब्राह्मणाचें महाभाग्य वर्णन, देशकालोचित धर्मांचें रहस्य, भीष्माचें स्वर्गारोहण इत्यादि वृत्तांत कथन केले आहेत व सर्व धर्मांचे निश्चयही सांगितले आहेत. चवदावें अश्वमेधिक पर्व. यांत संवर्त्त, मरुत्ताच्या आख्यान, सुवर्णकोशप्राप्ति, परीक्षितीचें जन्म व त्याचें गर्भांत अस्त्राग्नी पासून कृष्णानीं संरक्षण केलें, पृथ्वीवर अश्वाचा संचार, जागोजागीं राजांचीं युद्धें, बभ्रुवाहनयुद्ध, अश्वमेध यज्ञांत नकुलाचें आख्यान, अशा कथा आहेत. पंध्रावें आश्रमवासी पर्व. यांत राज्याचा त्याग करून गांधारी सहित धृतराष्ट्रानें विदुरासमागमें तपोवनांत गमन व त्यांचे मागोमाग पुत्र राज्य सोडून कुंतीचेंही प्रयाण व तेथें व्यासांच्या प्रसादानें आश्चर्यकारक परलोकास गेलेल्या पुत्रादिकांचें दर्शन व तत्संयुक्त झालेल्या शोकाचा त्याग, धर्माचरणें करून उत्तम लोकप्राप्ति व विदुर आणि संजय हेही उत्तम गति पावले, धर्मराजानीं नारदापासून यादवादिकांचा नाश श्रवण केला असा वृत्तांत आहे. सोळावें मौसलपर्व. यांत ब्राह्मणाचे शापानें सर्व यादवांनीं समुद्रतीरीं मद्यपान करून ईश्वरी मायेनें

मोहित होऊन परस्पर शस्त्रास्त्र प्रहार झाल्यावर लव्हाळ्यांच्या मुष्टीनीं ताडण करून संहार केला, असा सर्व यादवांचा क्षय झाला असें अवलोकन करून रामकृष्णही निजधामास गेले, अर्जुनानें सर्वांच्या क्रिया करून यादवांच्या स्त्रिया व बाल, वृद्ध शेष राहिलेले घेऊन धर्माकडे येत असतां मार्गांत गांडीवाचा पराभव वस्त्रियादिकांचा नाश झाला हें पाहून धर्मादिकांनीं सर्व ऐश्वर्य अशाश्वत समजून व्यासांचे आज्ञेनें राज्याचा त्याग करून वैराग्य धारण केलें: असे वृत्तांत कथन केले आहेत. सत्रावें महाप्रस्थानिक पर्व. यांत राज्यत्याग करूनं द्रौपदी सहित पांडवांचें महाप्रस्थान, समुद्रतीरीं अर्जुनानें अग्नीचें पूजन करून गांडीव धनुष्य त्यास दिलें, आणि अग्नींत द्रौपदीसहित भीमादिकांचा प्रवेश झाल्या नंतर युधिष्ठिरानेंही प्रवेश केला. असे वृत्तांत आहेत. अठरावें स्वर्गारोहण पर्व. यांत स्वर्गाहून देवरथ आला त्यांत धर्मराजानीं भ्राते व श्वान यां वांचून आरोहण न करूंन जात असतां देवदूतानें नरकस्थानें दाखविलीं व तेथें भीमादि बंधूंस दर्शविलें व स्वर्गांत दुर्योधनादि अवलोकन करून किंचित् खिन्न होऊन पुढें देवगंगेंत देहत्याग करून दिव्य देहानें स्वर्गास गेल्यावर इंद्रानें देवलोकस्थित भीमादिक भ्रातास दाखवून धर्मादिकांचा पूजा सत्कार केला, इत्यादि व्यासानीं कथा वर्णन केल्या आहेत. अशा प्रकारें करून अठरा पर्वांत व्यासानीं कथासंग्रह केला आहे. यापुढें भारतांतील न्यून विषयांच्या पूर्णते साठीं हरिवंश सांगितला आहे. या भारतांत अनुक्रमानें अठरा पर्वे त्यांतील कथा संग्रह व्यासानीं वर्णन केले आहेत यांत अर्थशास्त्र, धर्मशास्त्र व कामशास्त्र वर्णन आहे. हा ग्रंथ श्रवण केला असतां इतर ग्रंथश्रवणाची इच्छा होणार नाहीं. जशा कोकिलांच्या वाणी श्रवण केल्यावर काकशब्द अप्रिय होतात तद्वत लौकिक व वैदिक क्रिया व उत्कृष्ट दान धर्मादिकांचीं फलें व शमदमादि साधनें व ध्यान धारणांचीं विधानें व भक्तिज्ञान वैराग्य साधनें इत्यादिकांस हें भारत आश्रय आहे. या ग्रंथांत नाहींत अशा कथा कोठेंही नाहींत. मनाच्या आश्रयानें सर्व इंद्रियांची प्रवृत्ति जशी होत्ये तशीच या भारताच्या आश्रयानें सर्व पुराणांची प्रवृत्ति कृष्णद्वैपायन मुखांतून उत्पन्न झालेल्या भारताचें पारायण केलें असतां पुष्करादि तीर्थांचे स्नानादिकांचें फल प्राप्त होतें. दिवा व रात्रौ केलेलें पाप प्रातःकालीं व सायंकालीं हाच

अध्यायपठण व श्रवण केला असतां संपूर्ण दग्ध होतें. प्रति दिवशीं सत्पात्र ब्राह्मणास सालंकृत सहस्र गोप्रदानें केल्याचें जें फल तें भारताध्ययनानें प्राप्त होतें त्यांत हा संग्रह अध्याय पठण व श्रवण केला असतां संपूर्ण भारतश्रवणाचें फल प्राप्त होतें. असा विषय या अध्यायांत आहे.

तिसरा अध्याय— पौष्य आख्यान यांत श्रुतसेन, उग्रसेन व भीमसेन असा त्रिवर्ग बंधूंसहवर्तमान जनमेजय राजा कुरुक्षेत्रीं बहुकाल पर्यंत यज्ञ करीत असतां तेथें एक श्वान आला, त्या कालीं जनमेजयाच्या बंधूनीं त्यास ताडन केलें; तेव्हां तो रुदन करीत आपले मातेसमीप गेला, मातेनें त्यास विचारिलें कीं, तूं कां रुदन करितोस? तुला कोणी ताडन केलें? त्याणें उत्तर केलें कीं, जनमेजयाच्या यज्ञा जवळ मी गेलों होतों परंतु मी होमद्रव्यें पाहिलीं नाहींत व त्यांचें अवघाणही केलें नाहीं. असें पुत्राचें भाषण ऐकून ती कुत्री मोठ्या क्रोधानें यज्ञासमीप येऊन तिनें प्रश्न केला कीं, माझ्या पुत्रानें अपराध केला नसतां त्याला ताडन कां केलें? त्या कालीं कोणीही उत्तर केलें नाहीं. नंतर तिणें जनमेजयास सांगितलें कीं, तुला अकस्मात् कांही एक भय प्राप्त होईल. असें तिचें भाषण ऐकून जनमेजय फार खिन्न झाला आणि सत्र समाप्त झाल्यावर हस्तिनापुरांत येऊन आपलें पाप दूर करण्यास योग्य असा उपाध्याय मिळविण्यास मोठा यत्न आरंभिला. एके कालीं तो जनमेजय मृगयेस गेला असतां तेथें त्यानें श्रुतश्रवा ऋषि आश्रमांत बसले आहेत असें पाहिलें, आणि तेथेंच सोमश्रवा नामक त्यांचा पुत्र तप करीत होता तेव्हां राजानें ऋषीस नमस्कार करून प्रश्न केला कीं, आपला पुत्र माझा उपाध्याय असावा असें राजाचें वाक्य ऐकून श्रुतश्रवा ऋषीनें उत्तर दिलें कीं, हे राजा माझें वीर्य सर्पिणीनें भक्षण केल्यामुळें तिच्या गर्भापासून या पुत्राचें विचित्र जन्म झालें आणि तपोबलें करून हा संपन्न आहे; परंतु शिवाच्या कृत्ये वांचून सर्व पापरूपिणी कृत्यांचें निवारण करण्यास हा समर्थ आहे, आणि याचा एक नियम असा आहे कीं, कोणी ब्राह्मण येऊन जें मागेल तें त्यास द्यावें. हें जर तुला मान्य असेल तर यास घेऊन जा. असें ऋषीचें वाक्य श्रवण करून उत्तम आहे असें ह्मणाला नंतर त्या ऋषिपुत्रा सहवर्तमान नगरांत येऊन आपल्या बंधूंस

सांगितलें कीं, तुह्मीं कोणताही विचार मनांत न आणितां ह्मा ऋषी सांगेल त्याप्रमा
णें करावें. असें जनमेजयाचें वाक्य ऐकून सर्वबंधू त्याप्रमाणें करूं लागले. नंतर ज
नमेजय, तक्षशिला नामक देश जिंकण्यास गेला. तो देश त्यानें जिंकिला; नंतर त्या
देशांत कोणीएक धौम्य नामक ऋषी उदक मात्र पान करणारा असून त्याचे उपम
न्यु, अरुणि आणि वेद असे तीन शिष्य होते, त्यांची परिक्षा करण्या करितां एके
दिवशीं त्या धौम्यानें आरुणि नामक शिष्यास आज्ञा केली कीं; मा ह्या शेताचा बां
ध फुटला आहे तो घाल. असें गुरुवाक्यानें श्रवण करून शेता समीप गेला. आ
णि तेथें बांध घालण्याचा यत्न चालेना तेव्हां आपणच आडवा पडून उदकाचें वा
हणें बंद केलें त्यास कांहीं काल गेल्यावर गुरूनीं इतर शिष्यांस विचारिलें कीं,
आरुणि कोठें गेला? गुरुजी, आपण त्यास शेताचा बांध घालण्याकरितां पाठ
विलेंना; असें शिष्यानें वाक्य ऐकून धौम्यानीं शिष्या सहवर्तमान तेथें जाऊ
न मोठ्यानें हे अरुणे असें ह्मणोन त्यास हांक मारिली आणि हे वत्सा तूं कोठें
आहेस त्वकर माझ्या समीप ये असें गुरु वाक्य ऐकून तत्काल तेथून उठून
गुरु समीप आला आणि नमस्कार करून बोलला कीं, गुरुजी काय आज्ञा आ
हे? असें शिष्य वाक्य ऐकून धौम्य ह्मणाले, ज्या पेक्षां तूं उठल्यानें क्षेत्राच्या बां
धाचें विदारण झालें त्या पेक्षां तुझें नाम उद्दालक असें असो. आणि माझी आज्ञा
मान्य केलीस या योगानें तुझें कल्याण होईल व अध्ययना वांचून ही तुला वेद
व धर्मशास्त्र पाठ येईल असें गुरुवाक्य ऐकून आपल्या पांचाल देशास गेला.
नंतर धौम्यानीं उपमन्यु नामक द्वितीय शिष्यास आज्ञा केली कीं, हे उपमन्यो
तूं गायींचे रक्षण कर. हें ऐकून त्यानें सूर्योदया पासून गायींचें रक्षण करून
सायंकाळीं घरीं येऊन गुरूस नमस्कार केला. तेव्हां त्याचें अंग पुष्ट पाहून गुरूंनीं
त्यास विचारिलें कीं, अरे उपमन्यो तूं काय भक्षण केलेंस? त्यानें उत्तर दिलें कीं,
भिक्षान्न सेवन केलें हें ऐकून गुरु ह्मणतात यापुढें तूं मला निवेदन केल्या वांचू
न भोजन करूं नयेस, अशी गुरु आज्ञा मान्य करून त्या प्रमाणें भिक्षा आणून गु
रूस समर्पण केली. ती गुरूनीं घेऊन त्यास गाईचे संरक्षणास आज्ञा दिली. त्या
नें पुनः भिक्षा मागून सेवन केली. तिचाही गुरूनीं निषेध केला. नंतर दुसरे दिव
शीं भिक्षा आणून गुरूस दिली आणि आपण गायींचें दूध प्राशन केलें ह्मणोन

सांगितलें त्याचाही गुरूनीं निषेध केला. नंतर दुसरे दिवशीं पहिल्या प्रमाणें भिक्षा गुरूस देऊन सायंकाळीं गुरूनीं विचारिलें तेव्हां वांसरें दूध पीत असतांनां भूमीवर पडलेला फेंस भक्षण केला असें सांगितलें. त्याचाही त्यानीं निषेध केला. नंतर पुनः पूर्ववत गायींचें संरक्षण करीत असतां गुरूनीं त्याच्या भक्षणाचा सर्वथा प्रतिबंध केला, तेव्हां तो अरण्यांत क्षुधार्त होऊन अतितीक्ष्ण, क्षार, कटु, अशीं रुईचीं पानें त्यानें भक्षण केलीं. नंतर त्या पर्णांच्या भक्षणानें तो तत्काळ अंध झाला आणि अरण्यांत फिरत असतां एक्या विहिरींत पडला. इकडे सूर्य अस्तास गेला तथापि उपमन्यु घरीं आला नाहीं या जमुळें गुरूनीं इतर शिष्यांस प्रश्न केला कीं, अरे मुलं हो उपमन्यु अद्यापि येत नाहीं याचें कारण काय; मला असें वाटतें कीं, मीं त्याच्या भक्षणाचा सर्वथा निषेध केला याजमुळें तो रागाऊन आला नसेल असें बोलून शिष्यांसहित अरण्यांत जाऊन, हे उपमन्यो कोठें आहेस इकडे ये. अशी मोठी हांक मारिली. तों गुरूची हांक ऐकून दीर्घस्वरें करून त्यानें उत्तर दिलें, महाराज मीं रुईचीं पानें भक्षण केल्यामुळें अंध होऊन या कूपांत पडलों आहें. असें त्याचें वाक्य ऐकून गुरू सांगतात, हे उपमन्यो, देवांचे वैद्य जे अश्विनी कुमार त्यांची तूं स्तुती कर ह्मणजे ते तुला नेत्र देतील. असें ऐकून उपमन्यूनें वेदमंत्रांनीं त्यांचें स्तवन करण्यास प्रारंभ केला. बहु प्रकारें स्तवन करून शेवटीं अशी प्रार्थना केली कीं, हे अश्विनी कुमार आपले गुण वर्णन करण्यास मी समर्थ नाहीं. आपण माझें रक्षण करण्यास योग्य आहां. आतां मी या कूपांत अंध होऊन पडलों यास्तव तुह्मास शरण आलों आहें, असें त्याचें स्तवन ऐकून अश्विनी कुमार त्याच्या समीप येऊन ह्मणतात, हे उत्तंका, हा अपूप ( पिंवर ) भक्षण कर. नंतर तो बोलला गुरूस समर्पण केल्या वांचून मी भक्षण करणार नाहीं, असें उपमन्यूचें भाषण ऐकून अरे मुला तुझी दृढ गुरुभक्ती पाहून आह्मीं तुला प्रसन्न झालों तस्मात् तुला नेत्र प्राप्त होऊन तुझें परम कल्याण होईल. असें अश्विनी कुमारानीं भाषण करितांच उपमन्यूस तत्काल दिसूं लागलें. नंतर त्यानें गुरूपाशीं येऊन त्यांस नमस्कार केला. गुरू प्रसन्न होऊन ह्मणाले कीं, अश्विनी कुमारानीं वर दिल्या प्रमाणें तुझें कल्याण होईल. आणि अक्षय

नाथांचून ही तुला वेद व धर्मशास्त्र पाठ येईल. अशारीतीनें उपमन्यूची परिक्षा झाली. नंतर वेदनामक तृतीय शिष्यास आज्ञाकेली कीं, वत्सा वेदा; कांहीं कालपर्यंत माझ्या गृहीं वास करून माझी सेवा कर ह्मणजे तुझें कल्याण होईल. असें गुरुवाक्य ऐकून बहूत दिवस त्यानें गुरुगृहीं वास करून सेवा केली. ती अशी कीं, गुरूनीं बयला प्रमाणें गाडीस जुंपावें, त्यानें शीत, ऊष्ण, आणि पर्जन्य संबंधीं सर्व दुःखें सहन करून त्यांच्या मनोगता प्रमाणें सेवा केली. नंतर गुरु प्रसादें करून त्यास सर्वज्ञता प्राप्त झाली. अशारीतीनें वेद नामक शिष्याची परीक्षाकेली. नंतर तो गुरुआज्ञा घेऊन आपले घरीं आला. आणि गृहस्थाश्रम धारण केला नंतर त्याच्याकडे विद्यार्थी तिघे शिष्य आले. त्यांस त्यानें आपलीं गुरुशुश्रुषारूप कर्मे करण्यास सांगितलीं नाहींत. कारण स्वतः त्यानें त्या दुःखाचा अनुभव घेतला होता. त्याचे गृहीं कोणे एके कालीं जनमेजय राजा व पौष्य या उभयतांनीं येऊन त्याची प्रार्थना केली कीं, तूं आमचा उपाध्याय हो हें त्यानें मान्य केलें. नंतर आपल्या उत्तंक नामक शिष्याची अग्नि सेवे विषयीं योजना करून त्यास सांगितलें कीं, हे उत्तंका, जें माझ्या घरीं व्यंग होईल तें तूं सांग करीत असावें असें त्यास सांगून आपण प्रवासास गेला. उत्तंकही गुरु आज्ञे प्रमाणें तेथें वास करीत असतां आश्रमांत राहणाऱ्या इतर स्त्रियांनीं त्यास हांक मारून सांगितलें कीं, हे उत्तंका, तुझी गुरुपत्नी ऋतुमती आहे याज करितां तूं इचीऋतुशांती करावी. असें त्यांचें वाक्य ऐकून त्यानें त्यांस सांगितलें कीं, मी तुमचें ऐकणार नाहीं कारण गुरूनीं मला पापकर्म करण्यास कांहीं सांगितलें नाहीं. नंतर कांहीं कालें करून गुरूही घरीं आले आणि त्याचें वृत्त श्रवण करून प्रसन्न झाले. आणि ह्मणतात हे उत्तंका, तूं यथान्याय माझी सेवा केलीस तुला मी काय द्यावें? माझ्या कृपेनें तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तूं आपल्या गृहाप्रत जावें असें गुरुवाक्य ऐकून उत्तंक वारंवार ह्मणतो कीं, कोणतें कार्य केल्यानें आपलें प्रिय होईल तें सांगावें. असें त्याचें मधुर भाषण ऐकून गुरु सांगतात; वत्सा उत्तंका, ज्या पेक्षां मला वारंवार विचारितोस त्यापेक्षां तूं आमचे पत्नीस विचार आणि ती सांगेल तसें कर, असें ऐकून गुरुपत्नीस

हात जोडून ह्मणतो कीं, हे मातोश्री आपण जें मागाल तें मी आणून दिलें ह्म
णजे गुरूच्या ऋणापासून मुक्त होईन असें ऐकल्यावर तिणें सांगितलें कीं, हे
उत्तंका, आज पासून चवथे दिवशीं कांहीं व्रताचें उद्यापन कर्तव्य आहे, या
स्तव पौष्य राजाकडे जाऊन त्याच्या स्त्रीचीं कुंडलें मागून आण, ह्मणजे मी
तीं कुंडलें धारण करून ब्राह्मणास अन्न समर्पण करीन, या प्रमाणें तूं मा-
झे मनोरथ पूर्ण केले असतां तुझें उत्कृष्ट कल्याण होईल. असें ऐकून कुं
डलें आणण्या करितां तो जात असतां मार्गांत एक मोठा वृषभ व त्याच्या व-
र बसलेला अतिभव्य पुरुष पाहिला. नंतर त्या दिव्य पुरुषानें उत्तंकास-
आज्ञा केली कीं, हे उत्तंका, या बैलाचें शेण भक्षण कर. उत्तंकानें तें अमा
न्य केलें. तेव्हां पुनः सांगितलें अरे उत्तंका, तुझ्या गुरूनेंही पूर्वीं या बैलाचें
शेण भक्षण केलें व मूत्रही प्राशन केलें होतें यास्तव तूं मनांत विचार न क
रितां भक्षण कर. असें ऐकून त्यानें तें शेण भक्षण केलें व मूत्रही प्राशन के
लें. नंतर जाण्याच्या त्वरेमुळें उभ्यानेंच उदकास स्पर्श करून निघाला तो पौ
ष्यराजाकडे जाऊन त्यास आशीर्वाद करून बोलला. हे राजा, गुरुपत्नीच्या
संतोषार्थ तुझ्या स्त्रीचीं कुंडलें मागण्या साठीं मी आलों तेव्हां राजानें नमस्का
र करून त्यास सांगितलें कीं, आपण अंतःपुरांत जाऊन पत्नी पाशीं मा-
गावीं. नंतर उत्तंक अंतःपुरांत गेला परंतु तेथें राजपत्नी दिसेना तेव्हां तो पु
नः राजाकडे येऊन ह्मणतो कीं, राजा अंतःपुरांत तुझी स्त्री नाहीं तेव्हां
ती कोठें आहे हें सत्य सांग. हें ऐकून राजानें क्षणमात्र विचार करून
त्यास सांगितलें. उत्तंका, तूं उच्छिष्ट आहेस यास्तव ती तुझ्या दृष्टीस
पडली नाहीं व तुलाही ती पाहणार नाहीं. कारण ती पतिव्रता आहे. अ
सें उत्तंकानें राजाचें वाक्य ऐकून मनांत ह्मणतो कीं, मी उच्छिष्ट खराच-
आहें. नंतर उत्तंक पूर्वाभिमुख होऊन बसला. आणि हस्तपादादिकांचें
प्रक्षालन करून पुनः अंतःपुरांत गेला तो तेथें त्यानें राजपत्नीस पाहि
लें व तीणें ही उत्तंकास पाहिलें. नंतर उठून त्याचें आगतस्वागत करून
प्रश्न केला कीं, काय आला आहे असें राजपत्नीचें वाक्य ऐकून उत्तंकानें
भाषण केलें कीं, गुरूपत्नीच्या इच्छेस्तव आपलीं कुंडलें मागण्यास आ

लों; हें ऐकून तिनें हा ब्राह्मण योग्य सत्पात्र असें समजून त्यास कुंडलें दिलीं. आणि सांगितलें कीं, हीं कुंडलें, सर्व सर्पांचा राजा तक्षक मागेल याजकरितां त्यास न देतां मोठ्या सावधपणानें जावें. असें ऐकून, उत्तंक ह्मणाला आपण काळजी करूंनये माझा पराभव करण्यास तक्षक समर्थ नाहीं. असें सांगून तेथून पुनः राजासमीप आला तेव्हां राजानें त्याची प्रर्थना केली कीं, हे उत्तंका तूं सत्पात्र प्राप्त झाल्यामुळें मी पितरांचें श्राद्ध करण्यास इच्छितों. हें वाक्य त्यानें मान्य केल्यावर राजानें सर्व सिद्धता करून त्यास भोजनास बसविलें. तों त्यानें अन्नांत केंश पाहिला तेव्हां तो क्रोधायमान होऊन बोलतो. हे राजा, तूं नपहातां असें अपवित्र अन्न मला समर्पण केलेंस तस्मात् तूं अंध होशील असा शाप ऐकतांच राजानेंहीं त्यास शाप दिला कीं, ज्या पेक्षां तूं पवित्र अन्नास दोष ठेवितोस त्यापेक्षां तुलाही संतती होणार नाहीं. पश्चात् राजानें विचार करून पाहिलें तों केंशमुक्त असून स्त्रीनें पाक केला. व त्या अन्नांत केंशही होता, तेव्हां तो उत्तंकास ह्मणतो कीं, न कळून झालेला अपराध क्षमा करावा हें ऐकून त्यानें सांगितलें जरी माझा शाप व्यर्थ होणार नाहीं, तत्रापि पुनः तुला लवकरच नेत्र प्राप्त होतील; परंतू दिलेला शापपरिहार कर तेव्हां पौष्य ह्मणाला अद्यापि माझा क्रोध शांत झाला नाहीं कारण ब्राह्मणाचें अंतःकरण लोण्या प्रमाणें मृदु व वाणी मात्र वस्त्र्याच्या धारे प्रमाणें तीक्ष्ण असतें. क्षत्रियांचे ठिकाणीं याच्या उलट आहे तत्रापि तूं जा. मी तुला शापमुक्त करीन नंतर तीं कुंडलें घेऊन तो जात असतां वाटेंत उत्तंकानें तीं कुंडलें भूमीवर ठेऊन शौचाचमन करण्या करितां उदका समीप गेला. इतक्यांत एक नास्तिक मताचा क्षणभर दृश्य व अदृश्य होणारा असा क्षपणक येऊन तीं कुंडलें घेऊन पळाला त्याच्या मागोमाग उत्तंक ही शौचाचमन व गुरु देवतांस नमस्कार करून चालला. तों त्या क्षपणकानें आपलें रूप टाकून तक्षक रूप धारण करून बिळांत प्रवेश केला. त्यांत आपण ही जाण्या विषयीं दंडकाष्ठानें तें बीळ खोदूं लागला. तें त्याचें संकट पाहून इंद्रानें वज्र पाठविलें, त्यानें येऊन मार्ग मोठा करून दिला नंतर त्या मार्गानें उत्तंक नागलोकास गेला. तेथें नाना प्रकारचीं रत्नादिकानीं अलंकृत चित्रविचित्र मोठ मोठालीं मंदिरें व आश्चर्य कारक क्रीडा-

त्यानें व त्या ठिकाणीं अनेक नाग अवलोकन करून त्यांची स्तुती करितो कीं, आपण ऐरावत नागराजा जवळ राहणारे, बहु उत्तम रूप धारण करणारे, सूर्या सारखे तेजःपुंज, गंगातीर निवासी, अनेक कुरुक्षेत्रादि पुण्य क्षेत्र निवासी, जे त्यांसव खांडव वनांत वास करणाऱ्या तक्षकास नमस्कार करितो आपण माझीं कुंडलें द्यावीं अशी उत्तंकानें बहुत प्रकारें स्तुती केली तरी कुंडलें मिळालीं नाहींत तों तेथें दोघी स्त्रिया वस्त्र विणीत होत्या त्यांस उभे आडवे श्वेत, नील दोरे व द्वादश धारांचें चक्र तें सहा कुमार फिरवितात. व एक पुरुष व सुंदर अश्व त्यासर्वांसही अवलोकन करून नमस्कार पूर्वक त्यानें त्यांची स्तुती केली. तेव्हां तो पुरुष प्रसन्न होऊन उत्तंकास बोलतो कीं, या अश्वाच्या गुदद्वारीं फुंक, असें श्रवण करून त्याणें तसेंच केलें तों त्या अश्वाचे अंगा पासून सधूम अग्नी निघाला. त्यानें सर्व नाग लोक व्याप्त केला. तेव्हां तो तक्षक भिऊन स्वगृहा बाहेर येऊन तीं कुंडलें उत्तंकास दिलीं तीं घेऊन तो विचार करितो कीं, मी किती दूर आलों व येथून कोणीकडे जावें आणि गुरुपत्नीचें दर्शन कसें होईल असा विचार करितो तों पुरुषानें सांगितलें कीं, या अश्वावर बैस ह्मणजे क्षणमात्रांत हा तुला गुरूचे घरीं घेऊन जाईल. असें श्रवण करितांच त्यानें फार उत्तम आहे असें ह्मणोन अश्वावर आरोहण केलें. इतक्यांत गुरुपत्नीकडे येऊन तिला नमस्कार केला. त्या समयीं गुरुपत्नी स्नान करून केश सिंचरीत बसली होती तिच्या पुढें कुंडलें ठेऊन हात जोडून उभा राहिला. त्यास पाहून ती ह्मणाली कीं, वत्सा बराबर आलास नाहींतर आतांच तुला शाप देणार होतें परंतु आतां आशिर्वाद देतें तो श्रवण कर. तूं गुरुसेवा फार केलीस तुझें कल्याण असो. असें वाक्य श्रवण करून तो गुरूकडे आला. आणि त्यास नमस्कार करून प्रश्न करितो कीं, गुरुजी मार्गांत जो चमत्कार पाहिला त्याचें कारण सांगावें गुरु सांगतात. हे वत्सा, ज्या दोघी स्त्रिया त्या धाता व विधाता जे श्वेत कृष्ण तंतू त्या दिवस, रात्री, संवत्सर रूप चक्र, षट् कुमार हे ऋतु, द्वादश धारा हे महिने, पुरुष तो पर्जन्य, अश्व हा अग्नी, वाटेंत जो वृषभ पाहिलास तो ऐरावत गज, त्यावर बसलेला पुरुष इंद्र, त्या बैलाचें शेण तें अमृत तें तूं भक्षण केलेंस त्या योगानें नागलोकांतून स्वस्वरूप आलास. आतां तूं आपले घरीं जा, तुझें उत्तम कल्याण होईल. अशी गुरु आज्ञा उत्तंकानें गृहण करून तक्षकाचा राग मनांत धरून हस्तिनापु-

रास गमन केलें. तेथें सभेमध्यें प्रधानादिकां सहवर्तमान जनमेजय राजा दिग्विजयी होऊन सिंहासनावर बसला होता. त्यास उत्तंकानें आशीर्वाद करून बहु अर्थ युक्त भाषण केलें कीं, हे राजा, तुह्मीं बाळपणा पासून पुष्कळ कार्यें केलींत तसेंच आणीक कांहीं येक कार्य कर्तव्य आहे, हें राजानें श्रवण करून उत्तंक ऋषींची पूजा केली आणि प्रश्न केला कीं, मी क्षत्रिय धर्मानें प्रजा पालन करीत आहें, आपण कोणत्या कार्यास्तव येणें केलें व आपणास कर्तव्य काय आहे हें सांगावें, उत्तंक सांगतात, राजा, नागेंद्र तक्षकानें तुमचा पिता देवेंद्रा सारिखा महा धर्मात्मा, त्यास निरपराधी दंश करून मारिलें यास्तव सर्पसत्र आरंभ करून जाज्वल्य मान अग्नींत त्या दुष्टाचा होम करावा ह्मणजे पित्याची उत्तम पूजा केली असें होईल आणि माझें ही मोठें कार्य केल्या सारखें होईल, कारण त्याणें माझ्या गुरुकार्यास फार विघ्न केलें हें राजानें श्रवण करून क्रोधायमान होऊन प्रधानास आज्ञा केली कीं, या उत्तंक ऋषीच्या कृपेनें आमच्या पित्यास स्वर्गप्राप्ती होईल. असा विषय या आध्यायांत आहे.

४ अध्याय चवथा:- यांत नैमिषारण्यांत शौनकादि ऋषींस पौराणिक सौती कृतांजली होत्साता विचारितो कीं, आपणास काय श्रवणाची इच्छा आहे, नंतर शौनकानीं होम करून वेदाध्ययनानें देवांस व जलतर्पणानें पितरांस तृप्त करून पूर्वीं बसलेल्या ऋषी समाजांत येऊन आपले आसनावर बसून सौतीस प्रश्न केला. असा विषय आहे.

५ अध्याय पांचवा यांत:- शौनक प्रश्न करितात हे लोम हर्षणे, तुमच्या पित्यानें सर्वपुराणांचें अध्ययन केलें. तसेंच तुह्मीं ही सर्व पुराणांचे अर्थ जाणत आहां तस्मात् पूर्वीं तुमच्या पित्या पासून भृगुवंशाचें वर्णन संक्षेपानें श्रवण केलें होतें तेंच विस्तारें करून तुह्मीं आह्मांस सांगावें सौति सांगतात, वैशंपायनादि ऋषी व आमचा पिता लोम हर्षण यां पासून अध्ययन केलेला, देवेंद्रादिकांनीं पूजित जो भृगुवंश तो विस्तारें करून सांगतों. भृगु हा पूर्वीं वरुणाच्या यज्ञांत अग्नीतून उत्पन्न झाला असें ब्रह्म देवापासून श्रवण केलें आहे व भृगूला प्रियपुत्र च्यवन त्याचा पुत्र प्रमती त्याला, घृताची अप्सरा, तिचे ठिकाणीं रुरु नामक पुत्र झाला. त्याला, प्रमद्वरा अप्सरे पासून शुनक पुत्र झाला. जो तपस्वी, ब्रह्म वेत्ता, महा धार्मिक, सत्य वादी इत्यादि गुण संपन्न तुमचा पिता महा होता असें श्रवण करून पुनः

शौनक प्रश्न करितात. भृगुपुत्राला च्यवन असें नांव कां ठेविलें हें आह्मांस सांगा. सौती सांगतात भृगूची प्रियभार्या पुलोमा होती ती भृगु वीर्यापासून गर्भिणी झाली. पुढें कोणी एका दिवशीं भृगु स्नानास गेले असतां एक राक्षस आश्रमांत प्रवेश करून भृगुपत्नीला पाहून कामानें पीडित झाला व ती ही त्यास पाहून हर्ष पावली आणि त्याचा फलमूला दिकांनीं सत्कार करून हास्ययुक्त मुखानें लज्जित झालेली त्यानें अवलोकन करून आपलें कार्य झालें असें ह्मणोन तीस घेऊन चालला तों, अग्निशालेंत प्रदीप्त अग्नी होता त्या मस्तकीं करून विचारितो कीं, हे अग्ने तूं सर्व देवांचें मुख व सर्वभूत मात्रांचे अंतर्गत असून पाप पुण्याचा साक्षी आहेस तस्मात् खरेंच सांग, ही भार्या माझी किंवा भृगूची कारण पूर्वीं इच्या पित्यानें मला दिली होती आणि इणेंही मजला वरिलें होतें नंतर पुढें भृगूला दिली याज करितां तुला विचारून त्याची ह्मणोन प्रश्न केला तूं न सांगशील तरी ही माझी स्त्री मी तुझ्या समक्ष घेऊन जातो, हें श्रवण करून ऋषींचे शापास व अनृतास भिवून अग्नी बोलतो कीं, तूं पूर्वीं प्रविधीनें वरिलीस आणि इच्या पित्यानें यथा शास्त्र कन्यादान विधि करून भृगुऋषीस माझे साक्षी पूर्वक दिली हें कांहीं अनृत नव्हे. अशी कथा आहे.

६ अध्याय साहावा यांत:- सौती सांगतात शौनकादिक ऋषीहो असें अग्नीचें भाषण श्रवण करून त्या राक्षसानें वराहरूप धरून वायुवेगानें ती पुलोमा हरण करून नेली तों, मार्गांत तिच्या उदरांतून तो गर्भ सूर्यासारखा तेजः पुंज च्युत झाला ( पडला ) यावरून त्यानें नांव च्यवन असें ठेविलें त्याच्या तेजानें तो राक्षस भस्म झाला. नंतर ती स्त्री आपले पुत्रास जवळ घेऊन दुःखानें रोदन करूं लागली, तेव्हां ब्रह्मदेवांनीं येऊन तिचें समाधान केलें व तिच्या अश्रू पासून नदी उत्पन्न झाली ती च्यवनाचे आश्रमा पासून वाहत आहे तिचें नांव वधूसर असें ठेऊन ब्रह्मदेव गेले. नंतर तेथें भृगुऋषींनीं येऊन पुत्रासहित भार्येस अवलोकन करून अति क्रोधानें विचारिलें कीं, कोणाच्या सांगण्या वरून राक्षसानें तुला हरण केली हें खरेंच सांग नाहीं पेक्षां आतांच शाप देतों असें श्रवण करून पुलोमा सांगत्ये, स्वामी, अग्नीनें सांगीतल्या वरून मोठ्यानें आक्रोश करीत असतां तो राक्षस घेऊन चालला तों मार्गांत गर्भ पतन झालें त्याच्या तेजानें राक्षस

भस्म झाला. हें श्रवण करून अतिक्रोधानें भृगूनीं तूं सर्व भक्ष हो असा अ ग्नीस शाप दिला. असा विषय या अध्यायांत आहे.

७ अध्याय सातवा.- सौती सांगतात. असा अग्नीस शाप दिला ते- व्हां तोही क्रोधायमान होऊन बोलतो कीं, त्या राक्षसानें जें विचारिलें तें त्यास मी खरें सांगीतलें यांत काय अन्याय आहे धर्मानें सत्यभाषण मी केलें यास्तव निरपराधी एका एकीं तुह्मी शाप दिला हें कांहीं योग्य नव्हे. खरें वर्तमान ठाऊक असून जर कोणी खोटी साक्ष देईल तर तो आपल्या कुळांतील पूर्वींचीं सात व पुढें होणारीं सात कुलें नरकांत घालणारा होतो. ठा- ऊक असून मुळींच न बोलेल तर तोही तसाच होतो, यास्तव या शास्त्रा व रून मीं सत्य बोललों यांत माझा अपराध नाहीं. मीं तुह्मांसही शाप देण्यास समर्थ आहें; परंतु ब्राह्मणांचा मान ठेविला, नाहींपेक्षां मीं योग सामर्थ्यानें आ हवनीय, गार्हपत्य, दक्षिणाग्नि इत्यादि बहुरूपानें यज्ञामध्यें वेदोक्त विधानें क- रून माझे मुखांत होम केला असतां सर्व देव व पितर तृप्त होतात. तस्मात् मी सर्व भक्ष झालों असतां तेही तसेच होतील, कारण सर्वांचें मुख मीच आहे. असें बोलून अदृश्य झाला. त्यासमयीं अग्निहोत्रें व यज्ञादि कर्मे नाहींशीं झालीं तेव्हां सर्व ऋषी उद्विग्न होऊन देवतांसहित ब्रह्मदेवास सांगतात कीं, सर्व देवांचें मुख अग्नि, ज्यापासून यज्ञभाग देवादिकांस प्राप्त होतात. त्यास भृगूनीं सर्व भक्षत्व दिलें हें कसें सिद्ध होईल. असें ब्रह्मदेवानीं श्रवण करू- न अग्नीस बोलाऊन सांगीतलें कीं, तूं सर्व लोकांचे अंतर्गत असून सर्वांचें पो- षण करणारा, त्रैलोक्याचें दहन, यज्ञादि शुभ कर्में व उत्तरक्रियादि अशुभ कर्में हीं सर्व तुझ्या वांचून होणार नाहींत. सर्व पवित्र व अपवित्र यांचें भ- क्षण तूंच करणारा, तस्मात् सर्व भक्षणत्व सिद्धच आहे. यांत तुला कांहीं दोष नाहीं तूं निरंतर पवित्रच आहेस यास्तव तूं आपल्या तेजानें भृगूचा शाप सत्य कर आणि प्रगट होऊन ऋषींच्या यज्ञादिकें करून स्वमुखानें दे वतांस भाग दे. सौती सांगतात अग्नीनें अशी ब्रह्मदेवाची आज्ञा मान्य करून ऋषींचे यज्ञादिकांत संतोषानें आपलें रूप प्रगट केलें तेव्हां यज्ञादि कर्में चालू. झालीं, त्याकालीं सर्वांसि आनंद झाला. असा भृगू पासून अग्नीला शाप व

पुलोमी पासून च्यवनाचें जन्म, असा वृत्तांत पूर्वी कथन केला आहे. असें चरित्र या अध्यायांत आहें.

८ अध्याय आठवा :- सौती सांगतात, च्यवनऋषीला ऋकन्ये पासून प्रमती नामाचा पुत्र झाला, त्यास घृताची अप्सरा इचेठिकाणीं रुरुनामक पुत्र झाला. त्याचें चरित्र विस्तारें करून सांगतों. पूर्वी कोणीएक स्थूलकेश नामक जगत्प्रख्यात ऋषि होता, तो आश्रमांत तप करीत असतां, कोणी एककालीं विश्वावसू गंधर्वानें मेनकेचे ठिकाणीं गर्भ धारण केला होता तो गर्भ त्या निर्दयेनें नवमासांचा पूर्ण झाल्या नंतर स्थूलकेश नामक ऋषीचे आश्रमा पासीं नदी तीरीं टाकून, ती नदींत स्नान करून आपले लोकास गेली. नंतर तेथें स्थूलकेश ऋषी माध्यान्हीक करण्यास आले तों त्यानीं अति तेजःपुंज देवता तुल्य एकटा पडलेला कन्यारूप गर्भ पाहून पूर्ण कृपेनें उचलून घेतला आणि आश्रमांत नेऊन तिचें यथाविधीनें जातकर्मादि संस्कार करून संरक्षण केलें. ती प्रमदांत (स्त्रियांत) अत्यंत श्रेष्ठ ह्मणून तिचें नांव प्रमद्वरा असें ठेविलें. ती कालें करून रूप यौवन संपन्न झाली. नंतर कोणीएककालीं तेथें रुरुनामक ऋषी आला तो तिला अवलोकन करून कामातुर झाला, हें त्याचा पिता प्रमती, यानें जाणून स्थूलकेशापाशीं ती कन्या मागीतली. तेव्हां त्यानीं पुढें उत्तराफाल्गुनी नक्षत्रावर रुरूचा विवाह करून देईन असा निश्चय केला. नंतर एकेदिवशीं ती कन्या सखीसहवर्तमान वनांत क्रीडा करीत असतां, तेथें निजलेला सर्प न पाहून त्यावर पाय दिला. तों त्यानें तत्काल दंश करतांच ती प्रमद्वरा मरण पावली. इतक्यांत तिचा पिता स्थूलकेश धांवत येऊन पहातोतों अंगांत विष व्याप्त होऊन गतप्राण झालेली असून तेज कमी न होतां निजल्यासारखी पडली आहे. तेव्हां ऋषी अतिशोक करूं लागला. नंतर त्या वनांतील स्वस्ति, अत्रेय, महाजानु, कुशिक, शंखमेखल, उद्दालक, कठ, श्वेत, भरद्वाज, कौणकुत्स्य, आर्ष्टिषेण, गौतम, प्रमती, असे अनेक ऋषी मिळून फार दुःखानें रोदन करूं लागले. त्यांत सर्वांपेक्षा रुरूस अति दुःख होऊन तो दूर अरण्यांत गेला, तेथें मोठ्या आक्रोशानें रडूं लागला. असा विषय या अध्या॰ आहे

९ अध्याय नववा :- सौती सांगतात, असे ते सर्व ऋषी, मुलीच्या

सभोंवतीं खिन्न होऊन बसले असतां, इकडे अरण्यांत रुरु, तिचें स्मरण करू:न अत्यंत दुःखानें विलाप करितो कीं, माझे प्रिये भूमीवर पडून मला अतिशय ताप देत्येस तस्मात् मीं पूर्वीं जर दान, तप, गुरुसेवा, हीं जन्मा पासून दृढ व्रतें धारण केलीं असतील तर ही ममहृदा उठो. असा आक्रोशानें कार्य करितां विलाप करीत होता तों, कोणी एक देवदूत येऊन बोलूं लागला कीं, अरे रुरो, ज्याचें आयुष्य सरलें तो जातो. त्या विषयीं किती जरी शोक केला तरी तो कांहीं पुनः जीवंत होत नाहीं. ही गंधर्वाप्सरांची कन्या काहीं कालपर्यंत येथें राहून आपले लोकास गेली इच्या विषयीं शोक करूं नको. तुला सांगतों तो उपाय कर. तूं आपलें अर्धें आयुष्य हिला दे, ह्मणजे ही उठेल. असें श्रवण करितांच फार उत्तम ह्मणोन रुरुनें आपलें अर्धायुष्य देतों ही शृंगार रूपवती माझी प्रिया उठो. असा संकल्प करितोतों देवदूत व गंधर्वराजा यानीं यमधर्माकिडे जाऊन सांगीतलें कीं, अर्ध आयुष्य दानानें रुरूची भार्या उठवावी. नंतर यमानें उठेल असें ह्मणतांच तत्काल निजून उठल्या सारखी ती सुंदरी उठोन बसली. तेव्हां उभयतांच्या पित्यानीं सुमुहूर्त पाहून त्या उभयतांचा विवाह केला. मग ते स्त्री पुरुष परस्पर अत्यंत प्रीतीनें क्रीडादिक विहार करूं लागले, नंतर रुरुनें सर्प पाहिला कीं मारावा च असें व्रत धारण केलें. एकेदिवशीं पुष्पेंआणावया करितां अरण्यांत गेला, तेथें मोठा स्थूल व वृद्ध डुंडुभ नावाचा सर्प पसरला होता. त्यास कोपें करून भयंकर दंडानें मारूं लागला. इतक्यांत डुंडुभ बोलतो कीं हे रुरो, मीं कांहीं तुझा अपराध केला नाहीं व पुढेंही करणार नाहीं असें असून मला उगीच कां मारितोस. या अध्यायांत असा विषय आहे.

१० अध्याय दाहवा — रुरु बोलतो. अरे माझी प्राणप्रियाजी, तिला एका सर्पानें दंश केला. त्या दिवसा पासून मीं सर्प वधाचें व्रत धारण केलें आहे, या करितां तुझे प्राण हरण करितों. डुंडुभ बोलतो. हे ब्रह्मन् जे दंश करणारे सर्प ते अन्य आहेत. आह्मी डुंडुभ जातीचे सर्प हे आकृतीनेंमात्र त्यां सारिखे आहोंत दंश करणारे नव्हेत. यास्तव या जातीचा वध करूं नको. जे धर्माचरण करितात ते सुख पावतात जे अधर्म करितात ते दुःखाचे विभागी

होतात. तस्मात् तूं धर्मात्मा असून आमचा वधरूप अधर्म करूंनको. हें श्रवण करून हा कोणी ऋषि आहे अशा बुद्धीनें रुरु भिऊन प्रश्न करितो कीं, तूं कोण आहेस व तुला अशी दशा कशानें प्राप्त झाली हें सत्य सांग. डुंडुभ सांगतो. मीं पूर्वी सहस्रपात् नांवाचा ऋषी होतों. तेव्हां ब्राह्मणाच्या शापानें मला सर्पयोनि प्राप्त झाली. नंतर रुरूनें शापाचें कारण विचारिलें असा विषय या अध्यायांत आहे.

११ अध्याय अकरावा:- डुंडुभ सांगतो. पूर्वी माझा मित्र खगम नामाचा अग्निहोत्री तपोनिष्ठ ब्राह्मण होता. तो होमशाळेंत बसला असतां, मीं बाल्य अवस्थेंत खेळतानां तृणाचा सर्प करून त्यानें त्यास भिवविलें. तेणें करून तो ब्राह्मण मूर्छित पडला. नंतर क्षणमात्रें करून सावध झाला. आणि कोपानें जाज्वल्यमान होऊन बोलला कीं, जसा मला भिवविण्या करितां सर्प केलास तसाच तूं सर्प होशील. असें ऐकतांच माझें अंग अत्यंत कंपायमान झालें. तेव्हां मी हात जोडून प्रार्थना केली कीं, सख्या मी तुझा सहज विनोद केला असें असतां, तूं एका एकीं मला महा भयंकर शांप दिलास तस्मात् माझ्या अपराधाची क्षमा करून शापाची निवृत्ति कर. असा भीतीनें घाबरून उद्विग्नपणानें बोलतो हें पाहून त्यास दया आली आणि त्यानें सांगीतलें कीं, हा शाप काहीं खोटा होणार नाहीं परंतु एक उपाय सांगतों श्रवण कर. ज्याकालीं रुरुनामक ऋषीचें दर्शन होईल त्याकालीं शाप मुक्त होशील; यावरून हे रुरो, पहा तुझ्या दर्शनानें इतक्यांत माझें डुंडुभत्व जाऊन मला दिव्य देह प्राप्त झाला. तस्मात् थट्टा ही कोणाची करूंनये. हें सर्व माझ्या शापाचें कारण तुला सांगीतलें. आतां तूं सर्प वधाचें व्रत धारण केलेंस हें योग्य नव्हे. कारण अहिंसा (वधनकरणें) धर्म व वेदाध्ययन, भूतदया, क्षमा, शांति, हे ब्राह्मणांचे धर्म होत. वध करणें, दंड करणें, प्रजापालन, हे क्षत्रियांचे धर्म. पूर्वी जन्मेजय राजानें सर्प संहार मांडिला होता. तेथें शरण आलेल्या सर्पांचें आस्तीक ऋषीनें संरक्षण केलें. अशी कथा या अध्यायांत आहे.

१२ अध्याय बारावा:- रुरु प्रश्न करितो कीं, जन्मेजयानें सर्प संहा-

र कशा करितां व कसा केला त्यांचें रक्षण आस्तीक ऋषीनीं कशास्तव केलें हें सर्व विस्तारें करून सांगावें. असें त्याचें भाषण श्रवण करून डुंडुभ बोलतो हें सर्व तूं ब्राह्मणापासून श्रवण करशील. असें बोलून तो ऋषि अंतर्धान पावला. नंतर रुरूनें त्या वनांत त्याचा बहुत शोध केला परंतु तो कोठेंही दिसेना तेव्हां चिंताक्रांत होऊन मूर्छित पडला. आणि क्षणमात्रानें सावध होऊन आपला पिता प्रमती यास हें वर्तमान सांगीतलें. तें त्यानें श्रवण करून पुत्रास समाधान पूर्वक सर्पसत्राचें आख्यान सांगीतलें. असा विषय या अध्यायांत आहे

१३ अध्याय तेरावा - आस्तीक आख्यान सांगतात, तें असें कीं, शौनक प्रश्न करितात. हे सौते, जनमेजयराजानें सर्पसत्र कसें केलें व तेथें ज्या आस्तीकानें सर्पास वांचविलें तो कोणाचा पुत्र हें आख्यान सविस्तर सांगावें. सौती सांगतो. पूर्वी व्यासांचे शिष्य लोमहर्षण ते आमचे पिते त्यानीं व्यासापासून श्रवण करून नैमिषारण्यवासी ऋषींस कथन केलें त्याकालीं मींहीं समीप असून श्रवण केलें. तें अतिमनोहर, पापनाशक चरित्र आपणास निवेदन करितों. आस्तीकाचा पिता जरत्कारु ह्मणून ब्रह्मचारी अग्नितुल्य, महा तपोनिष्ठ होता. तो योगसामर्थ्यानें जेथें सायंकाल होईल तेथेंच वास करावा. अशा क्रमानें वायुभक्षण करीत, सर्व पृथिवी व स्वर्गादि लोकांत संचार करीत असतां त्यानें आपले पितर खालीं मुखें व वर पाय असे तृणाला लटकून महा भयंकर कूपांत लोंबतात व तृणांच्या मुळ्यांस मूषक करंडितो असें पाहतांच भिऊन त्यांस विचारितो कीं, तुह्मीं कोण व तुमची अशी दशा कां? पितर सांगतात. आह्मी अल्प भाग्य, आमचे वंशांत एक जरत्कारु ह्मणोन आहे तो आपलें लग्न करून संतती उत्पन्न करीत नाहीं ब्रह्मचर्यव्रती विरक्त होऊन फिरतो यामुळें आह्मीं अनाथ व पापी यांसारखे लोंबतों. तूं कोण आहेस? व तुला आमचे विषयीं दया येऊन कां शोक होतो? नंतर जरत्कारु बोलतो आपण माझेच पितर आहांत. आपल्या उद्धारास्तव मी काय करावें तें सांगा. नंतर पुत्राचें भाषण ऐकून ते सांगतात. तूं आपलें लग्न करून पुत्र उत्पन्न कर, ह्मण-

जे आमचें हित होईल, हें नकरितां अन्य उत्तम धर्म कितीही केलेसतरीपि तरांस गति होणार नाहीं, जरत्कारु बोलतो मी विषया पासून विरक्त झालों परंतु तुमच्या हितास्तव स्त्रीचें पाणि ग्रहण करीन. तें असें कीं, न मागतां कोणीं भिक्षा घ्या ह्मणोन अकस्मात आणून द्यावी, तिचें व माझें एक नाम असावें तर मी स्वीकार करीन. आणि तिचे ठिकाणीं जंतु पुत्र होईल तो तुह्मांस तारील त्या योगानें अत्यंत आनंद पावाल: असा विषय या अध्यायांत आहे.

१४ अध्याय चौदावा:- सौती सागतात. जरत्कारूनें पितरांस विचारून पृथिवीवर गमन केलें कन्या कोणीं देईना, तेव्हां पितरांच्या कार्याकरितां तीनं वेळां कन्या भिक्षां देही अशा उच्चस्वरानें गर्जना केल्या तेव्हां वासुकीनागानें आपली भगिनी आणून दिली. आणि सांगीतलें कीं, हे जरत्कारो ही तुह्यांकरितां ठेविली होती हिचें ही नाम जरत्कारूच आहे असें बोलून यथाविधीनें कन्या दान केलें. त्यानें ही तिचें पाणिग्रहण केलें. या अध्यायांत असा विषय आहे.

१५ अध्याय पंधरावा:- सौती भाषण करितो, हे शौनका पूर्वीं सर्पमाता कद्रु, इणें आपल्या पुत्रांस शाप दिला कीं, जन्मेजयाच्या यज्ञांत अग्नि तुह्मांस दहन करील. त्या शापाच्या शांत्यर्थ वासुकीनें आपली भगिनी स्वहस्त जरत्कारु ब्राम्हणास यथा विधीनें दिली; त्यापासून तिला आस्तिक नामा पुत्र झाला. तो महा तपस्वी, वेदवेदांगपारग, सर्वांशीं समत्वानें वागणारा, मातृपितृ पक्षांचें भय दूर करणारा असा होता. नंतर बहु कालें करून पांडव वंशीय जन्मेजयानें सर्पांचे नाशार्थ सर्पसत्रास आरंभ केला. तेव्हां त्या यज्ञांत येऊन आस्तिकानें बंधु, मातुळ व अन्यनाग या सर्वांस आपल्या तपानें मुक्त केलें. पुढें संतति उत्पन्न करून आपल्या पितरांचा उद्धार केला: तशींच अनेक व्रतें व वेदाध्ययनें करून सर्वांचा अनृणी झाला. तो असा कीं, दक्षिणायुक्त याग करून देव, ब्रह्मचर्यें करून ऋषी, संततीनें पितर या सर्वांचे ऋणा पासून मुक्त झाला असतां, जरत्कारु आदिकरून त्याचे सर्व पितर स्वर्गीं वास करू-

लागले. हे भृगुशार्दूला हें आस्तीक आख्यान तुह्मांस सांगीतलें. दुसरें काय सांगावें तें सांगा. असा विषय या अध्यायांत आहे.

१६ अध्याय सोळावा. शौनक भाषण करितात. हे सौते, आस्तीकाचें आख्यान मला सविस्तर निवेदन करा. तुमचा पिता आह्यास श्रवण करण्या विषयीं तत्पर होता तसेंच तुह्मीं ही असावें; असें भाषण श्रवण करून सौति सांगतो, पूर्वीं सत्ययुगामध्यें प्रजापतीस अति लावण्ययुक्त कद्रु व विनता अशा दोन कन्या होत्या त्या कश्यपास दिल्यावर तो त्यांशीं रममाण असतां संतुष्ट होऊन वर मागा असें त्यांस बोलला. तेव्हां कद्रूनें वर मागितला कीं, समान तेजस्वी असे सहस्र नाग मला पुत्र व्हावे. विनतेनें वर मागितला कीं, बलानें शरीरानें व पराक्रमानें कद्रुपुत्रांपेक्षां श्रेष्ठ असे दोन पुत्र मला व्हावेत. भर्त्यानें तथास्तु असें भाषण श्रवण करून उभयतां संतुष्ट झाल्या. नंतर महातपस्वी कश्यप, दोन्हीं स्त्रियांस गर्भ, प्रयत्नानें धारण करावे असें सांगून तप करितां वनांत गेला. कालें करून कद्रूस सहस्र व विनतेस दोन अंडीं उत्पन्न झालीं; तीं सेवकानीं उष्म युक्त पात्रामध्यें पांचशें वर्षे पर्यंत ठेविलीं असतां त्या अंडां पासून कद्रूचे पुत्र बाहेर निघाले परंतु विनतेच्या अंडां पासून कांहींच उत्पन्न न झाल्यामुळें लज्जित होऊन तिणें पुत्रार्थ एक अंड फोडिलें; त्यांतून शीर, ग्रीवा, हस्त, इत्यादि अंगानीं युक्त व चरणादि अवयवांनीं हीन असा पुत्र उत्पन्न झाला असतां त्यानें क्रोधानें मातेस शाप दिला कीं, तूं लोभानें माझी अशी विपरीत दशा केलीस, माझें शरीर पूर्ण झाल्या वांचून तूं अंडभेद केलास यास्तव तूं जिच्याशीं स्पर्धा करित्येस तिची तूं पांचशें वर्षें पर्यंत दासी होशील. नंतर हा अंडस्थ पुत्र तुला दास्यत्वा पासून मुक्त करील; याकरितां पांचशें वर्षांहून ही अधीक या दुसऱ्या अंडाची मार्ग प्रतीक्षा कर. असा मातेस शाप व उःशाप देऊन तो अंतरिक्षीं गेला. तो अरुण नामें विनता पुत्र प्रभातकाळीं सूर्यरथावर आरूढ होऊन सारथ्य करितो तो प्रातःकालीं दिसतो. कालें करून दुसऱ्या अंडा पासून गरुड उत्पन्न होतांच विनतेचा त्याग करून क्षुधेनें पीडित होऊन पित्यानें सिद्ध केलेल्या आपल्या अन्नार्थ आकाशांत

संचार करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७ अध्याय सतरावा- सौति भाषण करितो. हे तपोधना, कोणे एकेकाळीं कद्रु व विनता या उभयतां भगिनी एकत्र स्थित असतां त्यानीं उच्चैश्रवा नामक अश्वास आकाशांत गमन करितानां पाहिलें. हें अश्वरत्न सर्व लक्षणसंपन्न, अमृतमथनकालीं उत्पन्न झालें त्याचें देवगण पूजन करितात. हा अमोघ बलवान् व तेजस्वी असून यास जरादि दोष नाहींत. असें सौतीचें भाषण श्रवण करून शौनक प्रश्न करितात. हे सौते देवांनीं अमृत मंथन कसें? व कोठें केलें? व ज्यांत हा अश्व उत्पन्न झाला हें आह्मास निरूपण कर. सौति सांगतो. अनेक प्रकारच्या नद्या, वृक्ष, पशू, पक्षी व दिव्य ओषधी त्यांच्या योगें अति मनोहर, देव गंधर्वांनीं सेवित व स्वर्णशृंगांनीं शोभायमान अशा गगनचुंबित मेरुपर्वताच्या अति उच्च कांचन शृंगावर एके काळीं सर्व देव एकत्र होऊन अमृत प्राप्तीचा विचार करीत बसले असतां, नारायणांनीं ब्रह्मदेवास सांगीतलें कीं, सर्व औषधी समुद्रांत टाकून देव व असुर यानीं मंथन केलें असतां अमृत व सर्व रत्नें प्राप्त होतील असा विषय या अध्यायांत आहे.

१८ अध्याय अठरावा- सौति भाषण करितात. सर्व देव समुद्रमथनार्थ मंदराचलास आणण्या करितां प्रयत्न करीत असतां लता, वल्ली, वृक्ष व भयंकर पशू यांनीं परिपूर्ण, पक्ष्यांच्या मंजुळनादांनीं युक्त, किन्नर अप्सरा यानीं अलंकृत, अकरा सहस्र योजनें उच्च, तितकाच भूमीमध्यें प्रतिष्ठित, अशा मंदराचलास वर काढण्या विषयीं असमर्थ होऊन, ब्रह्माविष्णु यांस शरण गेले. तेव्हां त्यानीं शेषास आज्ञा करितांच त्यानें वनासह त्या पर्वतराजाचें उत्पाटन केलें असतां, त्यासह वर्तमान सर्व देव समुद्रतीरीं येऊन त्यास भाषण करितांत. हे सरितांपते ( समुद्र ) आह्मीं अमृता करितां तुझ्या जलाचें मथन करितों, त्यासमयीं समुद्र भाषण करितो. देवहो येवढ्या मंदराचलाच्या भ्रमणादिकाचा संमर्द सहन करितों, परंतु मला अमृत भाग असावा, देवांनीं तें स्वीकारिलें; नंतर समुद्रा सन्निध एका कूर्मराजास पाहून देवानीं प्रार्थना केल्या वरून त्यानें आपले

पृष्ठ मंदराचलाच्या अधिष्ठानार्थ अर्पण केलें. त्यावर पर्वत स्थापन करून त्या मंदराचलास मंथा व वासुकीस रज्जु करून समुद्र मंथनास आरंभ केला: त्यासमयीं दानवांनीं वासुकीचें मुख व नारायण प्रभृति देवानीं पुच्छ धारण केलें. शेष नामें नाग विष्णुपक्षीय असून वासुकीच्या मस्तक प्रदेशीं उभा राहून त्यानें मस्तक भूमीवर वारंवार आपटूं लागला. त्याच्या मुखा पासून विष युक्त ज्वाला निघून सर्व देव त्रस्त झाले असें पाहून मेघांनीं त्यांवर दृष्टि केली. समुद्र मथनानें आंतील मत्स्यादि प्राण्यांचा व पातालांत वास करणाऱ्या प्रभृतांचा नाश झाला. मंदराचल पर्वतावरील महान् वृक्ष पर्वताग्रा पासून पक्ष्यांसह वर्तमान पतन पावले. त्या वृक्षांच्या घर्षणा पासून विद्युल्लते सारखा अग्नि उत्पन्न होऊन तो मंदराचलास वेष्टून तत्संबंधी सिंहादि श्वापदांस गंत प्राण करून दहन करूं लागला. आसमंतात् भागीं अग्नि सर्व दहन करितो असें पाहून इंद्रानें मेघोदकानें त्यास शांत केलें. समुद्र मंथन करीत असतां देव बहुत श्रमी झाले परंतु अमृत निघालें नाहीं. त्यासमयीं ब्रह्मदेवाच्या भाषणें करून नारायणानीं सर्व देवांस बल देऊन सांगीतलें कीं, सर्वांनीं तत्पर राहून मंदराचलाच्या भ्रमणानें समुद्रास क्षोभित करावा. त्या प्रमाणें सर्व देवांनीं समुद्र मथन केलें असतां, प्रथम शतसहस्रशः किरणधारी, प्रसन्नात्मा, शीतांशु चंद्र उत्पन्न झाला; नंतर पांडुर वस्त्र परिधान केलेली लक्ष्मी उत्पन्न झाली; नंतर सुरा देवी उत्पन्न झाली; तसाच पांडुर वर्णाचा अश्व उत्पन्न झाला; नंतर किरणांनीं परम शोभायमान असा अमृतोद्भव दिव्य कौस्तुभ मणि उत्पन्न होऊन नारायणांच्या उरस्थलीं शोभूं लागला. लक्ष्मी, सुरा, चंद्र व अश्व हे पूर्व दिशेस देव उभे होते तेथें जाऊन उभे राहिले. नंतर धन्वंतरी, अमृतमय श्वेत कमंडलु ग्रहण केलेला उत्पन्न होतांच त्यास अवलोकन करून दानवांमध्यें अमृता विषयीं महान् शब्द झाला. नंतर चार दंतांचा ऐरावत नामें महा गज उत्पन्न होतांच इंद्रानें तो ग्रहण केला. समुद्राचें अति मंथन होऊं लागलें असतां महा भयंकर कालकूट नामक विष उत्पन्न झालें तें जगतास दहन करूं लागलें. तेव्हां ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेनें शंकरानीं प्राशन करून कंठांत धारण केलें. याजव त्यांचें नीलकंठ हें नांव प्रसिद्ध झालें. हें आश्चर्य पाहून

सकल दानव निराश होऊन अमृत व लक्ष्मी प्राप्त होण्या करितां देवांशीं वैर करूं लागले. त्याकालीं नारायणानीं मोहित करणारें असें स्त्रीरूप धारण करून दैत्यांपुढें आगमन करतांच दैत्यदानवांचें चित्त मोहित झालें, आणि त्यांनीं तें अमृत तिचे स्वाधीन केलें. असा विषय या अ॰ आहे.

१९ अध्याय एकोणिसावा - सौति भाषण करितो. हे शौनका, अमृत मोहिनीच्या स्वाधीन केल्यावर सर्व दानव आपलीं कवचें घालून व आयुधें धारण करून देवांशीं युद्ध करण्यास प्रवृत्त झाले. त्या युद्ध प्रसंगीं दानवांपासून प्राप्त झालेलें अमृत विष्णूनीं ग्रहण करून देवांस प्राशनास दिलें. त्यासमयीं राहूनें देवांसारखें रूप धरून अमृत प्राशन केलें तें त्याच्या कंठेंत होत आहे इतक्यांत चंद्र व सूर्य यानीं सर्व देवांचे हितार्थ हें त्यानें कपट नारायणास श्रुत करितांच त्यानीं आपल्या चक्रानें त्याचें शीर छेदिलें. तें छिन्न झालेलें पर्वतप्राय शीर आकाशांत जाऊन त्यानें भयंकर शब्द केला. आणि कबंध पृथ्वीस कंपित करीत तिजवर येऊन पडलें त्या दिवसापासून राहु, चंद्र सूर्यांशीं वैर अद्यापि करीत आहे, पर्व दिवशीं त्यांस आपलें मुखांत ग्रस्त करितो. भगवंतानीं मोहिनी रूप टाकून अनेक भयंकर शस्त्रांनीं दानवांस कंपित केलें असतां, समुद्रतीरीं देवासुरांचा घोर संग्राम प्रवृत्त झाला. त्यांत चक्रादि अस्त्रांनीं छिन्न भिन्न होऊन रुधिराचें वमन करीत हजारोदानव पृथ्वीवर पडले. त्याकालीं तोडा, मारा, धांवा अशा महा भयंकर शब्दांनीं व शस्त्रांच्या नादांनीं आकाश व पृथ्वी व्याप्त झाली. असें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें असतां, नरनारायण अग्रभागीं येऊन नारायणानीं नराच्या हस्तामध्यें धनुष्य पाहून दानवांचा नाश करणाऱ्या आपल्या चक्राचें स्मरण करतांच देदीप्यमान चक्र हस्तांत प्रगट झालें. तें नारायणानीं शत्रुसैन्यावर फेंकलें तें दैत्य दानवांचा पुनः पुनः नाश करून नारायणाचे हस्तांत येई. या प्रमाणें नारायण रणामध्यें दानवांचा नाश करीत होते, तथापि ते महाबलवान् दैत्य आकाशांत गमन करून पर्वतांची वृष्टी करीत. तेणें करून पृथ्वीवर बहुत नाश झाला. तेव्हां नरानें सुवर्ण बाणानीं पर्वत विदारित करून असुर गणांस विदारित केलें, त्याकालीं

त्या असुरांनीं पृथ्वींत व समुद्रांत प्रवेश केला. सुदर्शन चक्रास व नराच्या बाणांस पाहून असुर पळाले असतां देव विजयी होऊन त्यांनीं मंदराच लाची पूजा करून त्यास स्वस्थानीं पोंचविलें; देव अमृत प्राशनानें हर्षि त होऊन वाद्यें वाजवीत स्वर्गीं गेले. व त्यांनीं अमृताचें परम यत्नानें र क्षण केलें. नंतर अमृत रक्षणा करितां इंद्रादि सर्व देवांनीं नरास एक नि धि दिला. असा विषय या अध्यायांत आहे.

२० अध्याय विसावा:- सौति भाषण करितो:- हे शौनका, देवांनीं कसें अमृत मथन केलें. हें सविस्तर मीं तुह्मांस सांगीतलें; त्यामध्यें प रम शोभायमान व महा पराक्रमी अश्व उत्पन्न झाला. त्यास कद्रु व वि नता यांनीं अवलोकन करून कद्रु विनतेस ह्मणाल्ये, हा उच्चैःश्रवा अश्व कोणत्या वर्णाचा आहे? ती ह्मणाली हा श्वेत वर्णाचा आहे, तुला को णत्या वर्णाचा भासतो तें मला सांग ह्मणजे उभयतां आपण पण करूं असें विनतेचें भाषण ऐकून, कद्रु ह्मणाली या अश्वास कृष्ण केश आहे त हा कृष्ण केशांचा असला तर तूं माझी दासी हो, श्वेत असला तर मी तुझी दासी होईन असा पण होऊन उदयीक अश्व पहाण्यास जाऊं. असें बोलून उभयतां स्वगृहास गेल्या. कपटी कद्रु इणें आपल्या पुत्रां स हांक मारून ह्मणाली पुत्र हो, तुह्मीं कज्जला सारख्या प्रभेनें कृष्ण- केश होऊन अश्वांत प्रवेश करा ह्मणजे मी दासी होणार नाहीं. हें मा तेचें वचन ऐकून किती एकानीं अनुमोदन दिलें. व कांहींनीं निषेध केला यास्तव निषेध करणारांस कद्रूनें शाप दिला कीं, पांडव वंशांतील जनमे- जयाच्या सर्पसत्रांत अग्नि तुह्मांस दग्ध करील. हें ऐकून ब्रह्मादिदेवां- नीं कद्रूची स्तुति करून सांगीतलें कीं, सर्प पुष्कळ असणें हें प्रजेच्या पीडेस कारण आहे असें पाहून मातेनें हें योग्य केलें. नंतर कश्यपास बोलावून ब्रह्मदेव भाषण करितात. आपणा पासून महाशरीरी व तीक्ष्ण विषाचे सर्प उत्पन्न झाले त्यांस त्यांच्या मातेनें शाप दिला या विषयीं आ- पण क्रोधायमान होऊं नये. सर्पसत्रामध्यें सर्पांचा नाश होणार हें अनादि- सिद्ध आहे. असें ब्रह्मदेवानीं कश्यपाचें शांतवन करून विष हरण करणा-

री विद्या त्यांस अर्पण करून आपले स्थानीं गेले. असा विषय या अध्यायां-
त आहे.

२१ अध्याय एकविसावा– सौति भाषण करितो. हे शौनका ती रा-
त्र अतिक्रांत होऊन दुसरे दिवशीं सूर्योदय झाला असतां दास्यता विष-
यीं पण केलेल्या कद्रु व विनता या उभयतां भगिनी परस्पर क्रुद्ध होऊन
आवेशानें ज्या स्थलीं उच्चैश्रवा अश्व होता त्या स्थलीं जाण्यास निघा
ल्या. तों मार्गांत अगाध उदकानीं परिपूर्ण, असोभ्य, नाना प्रकारच्या जल-
चरांनीं सेवित, गंभीर नाद करणारा, रत्नांचा आकर, ( खाण ) ज्यावर पर्वत
प्राय लाटा नृत्य करीत आहेत, असा ज्यांत वडवाग्नि वास करितो, अध्यात्म
योगनिद्रेचें सेवन करून युगादि कालपर्यंत शयन करणाऱ्या पद्मनाभ वि-
ष्णूंस आश्रयीभूत, वज्रपात भयानें त्रस्त झालेल्या मैनाक पर्वतास आ-
श्रय देणारा, चोहींकडून प्रविष्ट नद्यांनीं युक्त होऊन ऊर्मी ( लाटा ) उत्पन्न
झाल्या असतां नृत्य केल्या सारखा दिसणारा, अशा अगाध विस्तीर्ण समुद्रा-
स पाहून उभ्या राहिल्या असा विषय या अध्यायांत आहे.

२२ अध्याय बाविसावा– सौति भाषण करितो. हे शौनका, सर्व ना-
ग एकत्र होऊन मातेचें वचन सत्य करावें, असा संकल्प करून परस्पर
भाषण करूं लागले कीं, मातेचें वाक्य न ऐकिलें तर ती क्रुद्ध होऊन आ-
पल्यास दहन करील, यास्तव तिचे मनोरथ पूर्ण करावे, ह्मणजे ती आपणा-
स शापा पासून मुक्त करील असा विचार करून सर्वांनीं त्या अश्वाच्या पु-
च्छांत प्रवेश करितांच तें कृष्णवर्ण झालें. त्या संधीस कद्रु व विनता उभ-
यतां सपत्नी दक्ष कन्या, त्या अगाध समुद्राची दिव्य शोभा पहात त्याच्या
परतीरास गेल्या असा विषय या अध्यायांत आहे.

२३ अध्याय तेविसावा– सौति सांगतो. हे शौनका, कद्रु व विनता
समुद्र तरून त्वरेनें अश्वाजवळ जाऊन त्यास अवलोकन करतात. तों, चंद्र
किरणा सारखा देदीप्यमान, कृष्णवर्ण केशांनीं युक्त व पुच्छही ज्याचें कृ-
ष्णवर्ण असा तो अश्व पाहिला. त्या समयीं विनता खिन्न होऊन बसली,
नंतर कद्रूनें आपला पण खरा झाला ह्मणून विनतेस आपली दासी केली.

ती परम दुःखानें दास्यत्व करूं लागली. त्या संधीस अंडाचा पूर्ण काल होतां-च माते वांचून अंडाचें विदारण करून महातेजस्वी गरुड उत्पन्न झाला. तो महासत्व, बलानें युक्त, आपल्या कांतीनें सर्व दिशा प्रकाशित करणारा, इच्छित रूप धारण करणारा व इच्छिंगत होणारा, केवळ प्रळयाग्नी सारखा महा भयंकर असा गरुड यानें पर्वतप्राय देह धारण करून घोर शब्द करीत आकाशांत गमन करीत असतां त्यास सर्व देवानीं पाहून भयभीत झाले आणि अग्नीस शरण जाऊन भाषण करितात. हे अग्ने, तूं इच्छिंगत होऊं नको. आह्मास दहन करण्या विषयीं इच्छा करीत नाहिं सना? असे देवांस भयभीत पाहून अग्नीनें त्यांचें शांतवन करून सांगीतलें कीं, तुह्मीं भिऊं नका. हा महातेजस्वी गरुड आहे, विनते पासून याचा संभव व तीस आनंद करणारा, तेजाचा केवळ राशी आहे, यास पाहून तुह्मांस मोह झाला आहे, हा कश्यपाचा पुत्र होय. हा नागांचा व दैत्यराक्षसांचा नाशक असून देवांचें हित करणारा व महा बलाढ्य आहे. असें अग्नीचें वाक्य श्रवण करून सर्व देव गरुडाच्या समीप येऊन त्याची स्तुति करितात कीं, हे गरुडा, सर्व चराचर विश्व तुझ्या पासूनच आहे. सूर्याची प्रभा तुझ्या प्रभेमें तिरस्कृत आहे. आकाश संबंधी अंधःकार तुझ्या तेजानें नाश पावला. तूं सर्वांचा स्वामी आहेस, तुला आह्मीं शरण आलों, तूं आमचें रक्षण कर. तूं दयाळु कश्यपऋषीचा पुत्र आहेस असें आह्मीं श्रवण करून तुझी प्रार्थना करितों. तूं आतां क्रुद्ध होऊं नकोस. शांति पावून जगतावर कृपा कर व आह्मास सुखावह हो. इत्यादि अनेक प्रकारें ऋषिगणांसह देवांनीं गरुडाचा स्तव केला असतां, गरुडानें आपल्या तेजाचा उपसंहार केला. असा विषय या अध्यायांत आहे.

२४ अध्याय चोविसावा- सौति भाषण करितो. हे शौनका, देवांचें वाक्य श्रवण करून गरुड आपलें क्रूर स्वरूप टाकून देवांस ह्मणतो देवहो, तुह्मी या माझ्या भयंकर स्वरूपानें उद्विग्न झालां, यास्तव हें सौम्य स्वरूप धारण केलें आहे. असें त्यांस बोलून स्वइच्छाचारी गरुड, आपल्या पितृगृहापासून अरुणास पाठीवर बसवून समुद्राच्या परतीरीं मातेच्या सन्निध गेला. आणि सूर्य उग्रतेजानें लोकांस जाळण्याच्या इच्छेनें पूर्वेस उदय पा-

ह्मणार अशा संधीस त्यानें अरुणास तेथें स्थापन केलें. प्रमति नामक पित्यास रुरु विचारितो, हे भगवन्, सूर्यानें कशा करितां सर्व लोकांस जाळण्याचें मनांत आणिलें, त्यास राग येण्या सारिखें देवांनीं व लोकांनीं काय केलें हें मला सांगा. असें रुरु नामक पुत्राचें वाक्य ऐकून प्रमति सांगतो. हे पुत्रा, अमृत प्राशनार्थ राहु चंद्र सूर्य यांमध्यें बसला असतां, त्यांनीं हें त्याचें कपट प्रसिद्ध केलें. त्या दिवसा पासून राहु चंद्र सूर्याशीं वैर पडून तो सूर्यास प्रति वर्षी पीडा करूं लागला ह्मणून सूर्य क्रुद्ध होऊन ह्मणाला कीं, सर्व देवांच्या हिता करितां मी राहूचें कपट प्रगट केलें. यास्तव राहु क्रुद्ध होऊन मला पीडा करितो. जें पाप बहुतांस अनर्थ करणारें त्याचें दुःखें मीं एकटा सोसतों, आपल्यास दुःख प्राप्त झालें असतां कोणीं सहाय्य होत नाहीं. पहा राहु माझा ग्रास करितो तथापि देव उपेक्षा करतात. यास्तव आतां मी लोक नाशार्थ उग्ररूप धारण करितों. असा सूर्यानें आपल्याशीं विचार करून उदयाचळीं जाऊन लोक नाशार्थ तप्त झाला; त्याकालीं महर्षी देवांकडे जाऊन भाषण करितात. देवहो, आज अर्धरात्र समयीं लोकांस भयावह त्रैलोक्य नाशकारक महान् दाह उत्पन्न झाला. हें ऐकून ऋषीसह सर्व देव, ब्रह्मदेवाकडे जाऊन त्यास नमस्कार करून आश्चर्यपूर्वक भाषण करितात. आज हें महान् दाहप्रद भय काय उत्पन्न झालें. सूर्य उदय पावला नाहीं तोंच क्षयकारक अवस्था प्राप्त झाली पुढें सूर्योदया नंतर काय अवस्था होईल. असें देव ऋषींचें भाषण ऐकून ब्रह्मदेवानीं सांगितलें कीं, लोकांचे नाशार्थ रवि, उदय पावण्याची इच्छा करितो. हा उदय पावल्यावर लोकांस भस्म करील; यास्तव याचें निवारण पूर्वींच करून ठेविलें आहे. कश्यपाचा पुत्र महाशरीरी व तेजस्वी अरुण सूर्यापुढें बसून त्याचें सारथ्य करून त्याच्या तेजाचें हरण करील ह्मणजे ऋषी व देव या सर्वांचें कल्याण होईल. प्रमति ह्मणतो, रुरो, नंतर ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें अरुणानें सूर्याचें तेज हरण केलें व सारथ्य स्वीकारलें. तेव्हां अरुणास ह सूर्य उदय पावला, हें सूर्यास क्रोध येण्याचें व अरुणास सारथ्यप्राप्तीचें कारण सर्व तुला सांगीतलें. आतां तुझ्या पूर्वींच्या प्रश्नाचें उत्तर सांगतों

श्रवण कर. असा विषय या अध्यायांत आहे.

२५ अध्याय पंचविसावा- सौति भाषण करितो. हे शौनका, महा वीर्यवान् स्वइच्छागामी गरुड महोदधीच्या पर तीरीं गेला, आणि पूर्वीच्या पणानें पराजित होऊन दासिभाव पावल्यामुळें अत्यंत दुःखित व संतप्त झालेल्या आपल्या मातेच्या सन्निध उभा राहिला. एकेसमयीं विनता पुत्रा समीप असतां तिला हाक मारून कद्रु ह्मणत्ये. हे भद्रे, समुद्रकुक्षीमध्यें परम रमणीय पाहण्या सारखें नागांचें स्थान आहे तेथें मला ने. असें ऐकून त्याकालीं गरुड मातेनें कद्रूस स्कंधावर घेतलें. आणि गरुडानें आपल्या मातेच्या आज्ञे वरून सर्व पन्नगांस धारण करून सूर्यमंडळाच्या सन्मुख गेला तेव्हां सूर्याच्या किरणांनीं पन्नग संतप्त होऊन मूर्च्छित झाले. हें पाहून कद्रु इंद्राचा स्तव करूं लागली. हे सर्व देवेशा, हे सहस्राक्षा, हे शचीपते, हे बलसूदना, तुला नमस्कार असो. सूर्याच्या तेजानें संतप्त झालेल्या सर्पांवर दृष्टि करून त्यांचें रक्षण करण्यास तूंच समर्थ आहेस. अशी नाना प्रकारें इंद्राची स्तुति केली असा विषय या अध्यायांत आहे.

२६ अध्याय सव्वीसावा- सौती भाषण करितो. हे शौनका, या प्रकारें कद्रूनें स्तवन केलें असतां भगवान् इंद्र रथामध्यें आरूढ होऊन मेघां सह वर्तमान आकाशास वेष्टून सर्व मेघांस त्यानें आज्ञा केली कीं, हे मेघहो, अमृतरूप जलांची वृष्टि करावी. त्या कालीं इंद्राच्या आज्ञेनें त्यांनीं विपुल वृष्टि केली. ते मेघ विद्युल्लतेसह जाज्वल्यमान होऊन निरंतर आकाशांमध्यें गर्जना करीत असतां आकाश अद्भुत मेघांनीं व्याप्त झाल्यामुळें प्रळयकालीं जसें दिसतें तसें भासूं लागलें. रात्रंदिवस अति वृष्टि होऊन चंद्र सूर्यादि किरणें नष्ट झालीं, इंद्र वृष्टि करीत असतां नागांस परम आनंद झाला. उदकानें आसमंतात् भागीं मही परिपूर्ण होऊन विमल, शीतल जल रसातलामध्यें प्रविष्ट झालें; उदकांच्या लाटांनीं पृथ्वी आच्छादित झाली असतां सर्प आपल्या माते सह वर्तमान रमणक द्वीपांत गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

२७ अध्याय सत्ताविसावा- सौति भाषण करितो. हे शौनका, ते नाग

जलधारांनीं व्याप्त झाल्यावर हर्षानें गरुडाच्या स्कंधावर बसून रमणक द्वीपास गेले. तें द्वीप विश्वकर्म्यानें निर्माण केलें होतें; तेथें पूर्वी नाग गेले होते तेव्हां त्यांनीं लवणासुरास अवलोकन केलें होतें तो आतां नाहीं असें पाहून वनांत यथेष्ट संचार करूं लागले. तें वन, नानाप्रकारच्या सुगंध प्रफुल्लित वृक्षांनीं व लतांनीं वेष्टित, चित्र विचित्र, मंजुळ नाद करणारे पक्षी यांनीं सेवित, गंधर्व, अप्सरा यांस प्रिय, दर्शनीय, रमणीय, कल्याणरूप आणि मनास आल्हाद करणारें असें होतें. त्यांत कद्रुपुत्र नाग आनंदानें संचार करीत असतां महापराक्रमी गरुडास ह्मणाले कीं, हे खेचरा, आह्मास विमलोदक व रमणीय अशा दुसऱ्या द्वीपामध्यें घेऊन जा, तूं आकाश मार्गें गमन करणारा असल्यामुळें बहुत रमणीय देश पहातोस, असें सर्पांचें भाषण श्रवण करून गरुड आपल्या मातेस प्रश्न करितो, हे माते, कोणत्या कारणानें मी सर्पवाक्य ऐकावें? तें मला सांग. विनता भाषण करित्ये, हे पक्षिश्रेष्ठा, सपत्नीच्या दुष्ट भावानें मीं व्यर्थ सर्पकृत उपाधि छलें करून दासीभाव पावल्यें. असें ऐकतांच गरुड दुःखित होऊन सर्पांस भाषण करितो, सर्पहो, तुह्मास काय आणून देऊं? अथवा कोणता पराक्रम करून दाखवूं? ह्मणजे दास्यत्वा पासून माझी माता मुक्त होईल तें तथ्य सांगा. हें ऐकून सर्पांनीं सांगीतलें कीं, तूं आपल्या पराक्रमानें आह्मांस अमृत आणून दे ह्मणजे दास्यत्वा पासून मुक्त होशील. असा विषय या अध्यायांत आहे.

२८ अध्याय अठ्ठाविसावा:- सौति भाषण करितो हे शौनका, सर्पांचें भाषण श्रवण करून गरुड मातेस ह्मणतो, हे माते मी अमृत आणावयास जातों; परंतु मीं क्षुधित आहें; यास्तव भक्षण स्थानाची योजना कर. विनता ह्मणत्ये हे गरुडा, समुद्र कुक्षीमध्यें एकांतीं निषादांचें स्थान आहे, तेथें हजारों निषाद आहेत, त्यांस भक्षण करून तूं अमृत आण. तूं ब्राह्मणांस मारण्या विषयीं कधींही बुद्धि धारण करूं नको. ब्राह्मण अग्नितुल्य पराक्रमी असल्यामुळें सर्व भूतांस ते अवध्य आहेत. कोपपावलेला ब्राह्मण, अग्नि, अर्क, विष, यां सारखा होतो ह्या रूपानें जो युक्त असेल त्यास साधु ब्राह्मण असें ह्मणतात. हे पुत्रा तूं कसाही क्रुद्ध झालास तथापि ब्राह्मणांस मारूं नको. जसा

आचरित व्रत ब्राह्मण क्रुद्ध झाला असतां भस्म करील तसा अग्नि व सूर्य हे भस्म करणार नाहींत. यास्तव अशा चिन्हांनीं जो युक्त असेल त्यास तूं ब्राह्मण जाण. असा सर्व भूतांमध्यें ब्राह्मण प्रथम असून सर्व वर्णांमध्यें श्रेष्ठ, सर्वांचा पिता व गुरु होय. असें मातेचें वचन ऐकून गरुड प्रश्न करितो हे माते, ब्राह्मणाचें रूप, पराक्रम व शील हीं कशीं आहेत तें मला सांग. ते अग्नी सारिखे कसे? व सौम्य दर्शनीय कसे? ते लक्षणें करून जाणण्याची मी इच्छा करितों. असें ऐकून विनता भाषण करिते हे पुत्रा, जो तुझ्या कंठ प्रदेशांत येऊन मत्स्यादिकांचा गलकंठ अंगार रूपानें जसा नाश करितो तसाच दहन करील, तोच ब्राह्मण श्रेष्ठ असें जाण. असें भाषण करून पुत्र स्नेहास्तव गरुडास पुनः सांगते. पुत्रा, तूं क्रुद्ध झालास तरी ब्राह्मणास मारूं नको. तो जठरांत पचन होणार नाहीं. नंतर त्याचा पराक्रम जाणून नागांनीं वंचना केल्यामुळें परम दुःखित होऊन आशीर्वादयुक्त पुनः असें ह्मणाली कीं, हे पुत्रा, तुझ्या सर्व अंगाचें संपूर्ण वेद रक्षण करोत. मीं एकाग्र मनानें तुझ्या स्वस्तिकरणा विषयीं बसतें. तूं आतां निर्विघ्नपणानें कार्यार्थ गमन कर. असें मातृवचन श्रवण करून, गरुड आपले पक्ष विस्तीर्ण करीत आकाशमार्गे बुभुक्षित होऊन अंत करणाऱ्या काला सारखा निषादा जवळ आला. नंतर आपले पक्ष फडफडावले, तेणें करून धूलीनें आकाश व्याप्त झालें, सर्व वृक्ष कंपित झाले, समुद्र कुक्षीमध्यें प्रवेश करून निषादांचा मार्ग रोधून आपलें मुख पसरून उभा राहिला असतां त्याच्या अति विस्तीर्ण पसरलेल्या मुखामध्यें पक्षी आकाशांत गमन करितात तसे ते प्रविष्ट झाले. सर्व निषाद आपले मुखांत आले असें जाणून कांहीं राहिलेल्या निषादांचे भक्षण करितां तो बुभुक्षित होऊन भ्रमण करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

२९ अध्याय एकुणतिसावा- सौति भाषण करितो हे शौनका, गरुडाच्या कंठ प्रदेशांत भार्येसहवर्तमान कोणी एक ब्राह्मण प्राप्त होऊन प्रदीप्त अंगारा सारखा त्यास दहन करूं लागला असतां गरुड ब्राह्मणास भाषण करितो हे द्विजोत्तमा, तूं माझ्या पसरलेल्या मुखांतून सत्वर बाहेर निघ. ब्राह्मण जरी पाप कर्मा विषयीं रत आहेत तथापि ते मला वध्य नाहींत, असें गरुड

वाक्य ऐकोन ब्राह्मण भाषण करितो, ही माझी भार्या निषादी मज सहव- र्तमान बाहेर निघो. असें ऐकून गरुड ह्मणतो हे विप्रा, या निषादीसहवर्त- मान तूं सत्वर बाहेर नीघ. जों पर्यंत तूं माझ्या तेजानें जीर्ण झाला नाहींस तों पर्यंत तूं आपल्यास वांचविण्या विषयीं समर्थ आहेस. असें गरुडवा- क्य ऐकतांच ब्राह्मण निषादीसहवर्तमान बाहेर निघाला, आणि गरुडास आ- शीर्वाद देऊन स्वइच्छित देशास गेला. नंतर गरुड, आपले पक्ष विस्तीर्ण करू- न मनोवेगानें आकाशांत उड्डाण करीत जात असतां, अकस्मात मार्गांत कश्य- प नामक पित्याचें दर्शन झालें. पित्यानें त्यास पाहून प्रश्न केला असतां, त्या- नें यथायोग्य उत्तर देऊन गरुड उभा राहिल्या नंतर कश्यप भाषण करिता- त हे पुत्रा, तुझें कुशल आहेना? तुला भोजन बहुत मिळते किंवा नाहीं? मनु- ष्यलोकांमध्यें तुला बहुत अन्न प्राप्त होतें काय? असें कश्यप वाक्य श्रवण करून गरुड बोलतो हे ताता, माझी माता भ्राता व मी कुशल आहों; परंतु भो- जना विषयीं माझें कुशल नाहीं. मला अमृत आणावया करितां सर्पांनीं पाठवि- लें आहे, मातेच्या दास्यत्व मुक्तीकरितां आज मी अमृत आणितों. मातेच्या आज्ञेवरून हजारों निषाद भक्षण केले तथापि तृप्ती झाली नाहीं; यास्त- व हे भगवन्, आतां मजवर कृपा करून ज्या भक्षणानें मला अमृत आण- ण्यानें सामर्थ्य येईल असें कांहीं दुसरें भक्ष्य क्षुधा निवारणार्थ मला सांगा. हें ऐकून कश्यप सांगतात पुत्रा, हें महा पुण्यरूप सरोवर देवलोकामध्यें वि- ख्यात आहे; त्यामध्यें कोणीएक गज आपला ज्येष्ठ बंधु कूर्मरूपी झाले- ला पाहून निरंतर त्यास जलामध्यें आकर्षण करितो. त्या दोघांचें जन्मांतरीं महत् वैर कसें झालें; त्यांचें बल व प्रमाण किती आहे तें सांगतों श्रवण कर. कोणीएक महान् क्रोधी विभावसु नामक महर्षि होता, त्याचा कनिष्ठ बंधु सु- प्रतिक नामें महान् तपस्वी होता, तो एकत्र असतां आपल्या भ्रात्यास ह्मण- त असे कीं, धनाचा विभाग करावा, ज्येष्ठाच्या मनांत धनाचा विभाग क- र्तव्य नव्हता; ह्मणून तो सुप्रतीकास असें ह्मणाला कीं, विभक्त होण्या क- रितां लोक अविचारानें निरंतर इच्छा करितात, विभक्त झाल्यावर द्रव्यानें उन्मत्त होऊन परस्पर विरोध करितात. कपटी लोक मित्ररूपानें बंधुबंधूंत

कलह उत्पन्न करून आपण मध्यस्थ होतात, आणि त्यांच्या द्रव्याचा अपहार करितात. सारांश विभक्त झालेल्या बंधूंचा लवकरच नाश होतो; यास्तव बंधूंच्या विभागाची साधू पुरुष प्रशंसा करीत नाहींत. पित्याच्या आज्ञेमध्यें जसें राहणें तसें ज्येष्ठाच्या आज्ञेमध्यें राहणें कनिष्ठास योग्य आहे तूं आपल्यामध्यें भेद करून धनाची इच्छा करितोस व आपल्या चित्तानें नियमन करीत नाहींस त्या पेक्षां तूं गज योनीस जाशील. असा विभावसूनें सुप्रतीकास शाप दिला असतां, सुप्रतीकानेंही त्यास शाप दिला कीं, तूं जलामध्यें संचार करणारा कूर्म होशील. या प्रकारें उभयतांनीं परस्परांस शाप देऊन गज, कच्छ रूपें केवळ लोभमूलानें मोहित चित्त होऊन धारण केलीं. पूर्व वैर बलें करून ते या सरोवरामध्यें परस्पर द्वेषा विषयीं रत होऊन संचार करितात. त्यांतून एक गर्जना करीत आला ह्मणजे दुसरा ही त्याच्यावर रोषानें धांवतो. व उभयतां युद्धा विषयीं सन्मुख होतात. गज सहा योजनें उंच व बारा योजनें लांब आहे, कूर्म तीन योजनें उंच व दाहा योजनें मंडळाकार आहे. दोघेही परस्पर वधाच्या इच्छेनें युद्धार्थ सिद्ध झाले आहेत; त्यांस भक्षण करून तूं अमृत आणण्यास गमन कर. असें कश्यपानीं गरुडास सांगून देवांसह वर्तमान युद्धांत तुला यश प्राप्त होवो. सर्व वेद तुला बलदेवोत; इत्यादि अनेक प्रकारें गरुडास आशीर्वाद दिले. नंतर गरुडानें भयंकर वेग धारण करून त्या सरोवर आला, आणि एका नखांत गजास एका नखांत कच्छ्यास ग्रहण करून आकाशांत भ्रमण करूं लागला. त्यांस भक्षण करण्यास स्थल अवलोकन करीत असतां मेरुशिखरावर देव वृक्षांस पाहून त्यांच्या समीप जातांच ते वृक्ष त्याच्या पक्ष वायूनें ताडित होऊन कंपित झाले. हें पाहून त्या वृक्षांस सोडून अग्रभागीं गमन करीत असतां, सुवर्ण रौप्य वैडूर्यमय फल शाखानीं विराजमान, समुद्र उदकानें स्पर्शित असे अनेक वृक्ष अवलोकन केले, त्यांमध्यें रौहिण ह्मणजे वटवृक्ष गरुडास भाषण करितो. ही माझी शतयोजनें दीर्घ महा शाखा आहे. इजवर बसून गज कच्छ यांस भक्षण कर. असें वृक्षाचें वाक्य श्रवण करून महा पर्वतप्राय शरीरी गरुड, शीघ्र उड्डाण करू-

न सहस्रशः पक्ष्यांनीं सेवित पत्रांनीं गर्द झालेल्या अशा त्या शाखेवर येऊन उतरला. असा विषय या अध्यायांत आहे.

३० अध्याय तिसावा.— सौति भाषण करितो हे शौनका, महापराक्रमी गरुडानें त्या वृक्ष शाखेस पादानें स्पर्श करितांच ती शाखा भग्न झाली; परंतु ती खालीं पडूं नदेतां तिजसह वर्तमान् गमन करीत असतां, त्या शाखेस अधोमुख करून लंबायमान झालेल्या वालखिल्य ऋषींस पाहून मनामध्यें विचार करितो कीं, हे ब्रह्मऋषी तप करण्यास अधो मुख होऊन लंबायमान झाले आहेत तर यांचा आतां वध नहोवो. ही शाखा जर माझ्या मुखांतून खालीं पडेल तर हे ऋषी मरण पावतील. असा त्याणें विचार करून नखांनीं गज, कच्छ यांस बळकट धरून व शाखा मुखांत धारण करून तो ऋषींस अवलोकन करीत गमन करूं लागला. हें त्यानें अघटित कर्म पाहून त्या ऋषींस विस्मय झाला असतां, त्यांनीं या महा खगाचें नाव गरुड असें ठेविलें. नंतर गरुडानें त्या ऋषींच्या दयेस्तव मंद गति धारण करून गज कच्छ यांसह् वर्तमान, बहुत देश अतिक्रमण केले; परंतु कोठेंही स्थान मिळेना, ह्मणून गंधमादन पर्वतावर उतरला; तों तेथें आपला पिता कश्यप तपकरीत बसलेला त्यानें पाहिला. कश्यपानें महापराक्रमी, भयंकर, कृतांता सारखा, लोकांचा संहार करणारा असा जो गरुड यास आलेला पाहून, त्याच्या मनांतील संकल्प जाणून त्यास तो भाषण करितो हे पुत्रा, तूं साहस कर्म करूंनकोस केलेंस तर दुःख पावशील. सूर्यकिरणाचेंही प्राशन करणारे हे वालखिल्य क्रुद्ध होऊन तुला दहन नकरोत. असें बोलून त्याच्या हिता करितां, तपानें पाप रहित झालेले वालखिल्यांस स्तवन पूर्वक भाषण करितो. हे तपोधनहो, हा गरुडाचा प्रजा हितां करितां महत् कर्मारंभ आहे यास्तव तुह्मी यास आज्ञा द्या. असें कश्यपानें भाषण केलें असतां, वालखिल्य त्या शाखेस सोडून तपार्थ हिमाचलीं गेले. नंतर गरुड, शाखेनें विकलवदन झाल्यामुळें अव्यक्त अक्षरांनीं पित्यास प्रश्न करितो हे भगवन्, ही शाखा मी कोठें टाकूं? मनुष्य वर्जित जो देश असेल तो मला सांगा, ह्मणजे मी तेथें टाकीन. कश्यप सां-

गतो पुत्रा, हिमानें समृद्ध, मनानेंही गमन करण्यास अशक्य अशा हिमाचलावर या शाखेचा त्याग कर. असें पितृवाक्य ऐकून गरुडानें शाखा, गज व कच्छ यांसहवर्तमान वेगानें उड्डाण केलें, आणि एक्या क्षणांत लक्ष योजनें प्रदेश अतिक्रमण करून, मोठ्यानें शब्द करीत ती शाखा त्या पर्वतावर टाकिली; त्या कालीं गरुडाच्या पक्षवायूनें पर्वत ताडित होऊन कंपित झाल्यामुळें पुष्पवृष्टी झाली. वृक्ष पतन पावले व पर्वताचीं शृंगें गलित झालीं. त्या पर्वताचा आश्रय करून गरुडानें गज कच्छ यांस भक्षण केल्यावर मोठ्या वेगानें उड्डाण केलें असतां देवांस भयसूचक उत्पात झाले. एका एकीं इंद्राचें वज्र, भयानें प्रज्वलित झाले, दिवसास आकाशांतून सधूम ज्वालायुक्त उल्का पतन पावल्या. वसु, रुद्र, आदित्य इत्यादि देवांचीं आयुधें परस्परांवर धावूं लागलीं. मेघ शोणिताची वृष्टि करूं लागले. असे नाना प्रकारचे भयंकर उत्पात अवलोकन करून बृहस्पतीस इंद्र भाषण करितो हे भगवन्, एकाएकीं हे घोर उत्पात कशाकरिता झाले. युद्धामध्यें आमचें घर्षण करणारा शत्रू दिसत नाहीं, असें इंद्राचें वाक्य श्रवण करून बृहस्पति भाषण करितो हे देवेंद्रा, महर्षीजे वालखिल्य यांचा तूं अपमान केलास या अपराधानें व गर्वानें असावध राहिलास, या प्रमादानें हें भय तुला प्राप्त झालें आहे, महर्षी वालखिल्यांच्या तपोबलानें कश्यप मुनी पासून विनतेचा ठायीं उत्पन्न झालेला, आकाशमार्गें गमन करणारा, महाबलवान्, कामरूपी असा गरुड, अमृत हरणार्थ येथें येत आहे. तो सर्व बलवानांमध्यें श्रेष्ठ असल्यानें अमृत हरण करण्यास समर्थ आहे. असें बृहस्पतिवाक्य ऐकून इंद्रानें अमृत रक्षणाविषयीं देवांस आज्ञा केली. नंतर देव विस्मय पावून परम यत्नानें अमृतास वेढून उभे राहिले; प्रतापी इंद्रही अमृताचें रक्षणार्थ वज्र धारण करून उभा राहिला; देवांनीं आपलीं कांचनमय महा मोल्यवान् वैडूर्यमय कवचें धारण केलीं. किती एकांनीं दृढ चर्में धारण केलीं. त्या कालीं देवांच्या शस्त्रां पासून सधूम ज्वाला उत्पन्न झाल्या. चक्र, परिघ, त्रिशूलादि शस्त्रें देवांनीं शक्त्यनुसार धारण केलीं. ज्यांच्या वीर्य व तेज यांस उपमान्य नाहीं, असुरांचें नगर विदारण करणारे

प्रज्वलित अग्नीसारखे शरीराने प्रकाशमान् असे समग्र देव अमृताचे रक्षणार्थ उभे राहिले असतां, एकाएकीं, शतशः किरणांनीं विराजमान् अकस्मात् आकाशा पासून गलित झालेल्या सूर्यासारखा गरुड आकाशास प्रकाशित करीत येत आहे हें अवलोकन करून सहस्रशः परिघासह वर्तमान् देव संग्राम करण्यास सिद्ध झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

३१ अध्याय एकतिसावा— शौनक प्रश्न करितात हे सौते! इंद्राचा अपराध व प्रमाद कोणता? वालखिल्याच्या तपानें गरुड कसा उत्पन्न झाला? कश्यपास हा पक्षिराजपुत्र कसा झाला? तो सर्व भूतांस अधृष्य (जिंकण्यास अशक्य) अवध्य (वधास योग्य नव्हे) कामचारी (इच्छागामी) व कामवीर्य (इच्छितशक्ती) कशानें झाला, हें जर पुराणामध्यें कोठें सांगितलें असेल तर मला तूं सांग. असा शौनकाचा प्रश्न श्रवण करून सौति सांगतो हे शौनका! जें तूं मला विचारिलेंस हें मीं तुला संक्षेपें करून सांगतों श्रवण कर. कश्यप प्रजापति, पुत्र कामनेनें यजन करीत असतां, त्यास देव, ऋषी, गंधर्व सहाय्य झाले. त्याकालीं कश्यपानें इंद्रास इध्मा आणण्या विषयीं आज्ञा केली असतां इंद्र, वालखिल्य, मुनी, व अन्य देवता गण, आपल्या शक्त्यनुसार समिधा भार ग्रहण करून आले. त्यांत इंद्रानें आपल्या सामर्थ्या प्रमाणें पर्वत तुल्य इध्म भार अतिशयवानें आणिला. अंगुष्ठोदरा प्रमाणें शरीर ज्यांचें, असे लहान वालखिल्य ऋषी, एक पलाशयष्टि धारण करून येत होते, ते मार्गांत गोपदमात्र उदकामध्यें निमग्न झाले असतां, इंद्रानें ते ऋषी निराहाराच्या योगें अतिकृश व मंद झालेले पाहून आपण आश्चर्यानें युक्त होऊन उन्मत्तपणानें त्यांचा उपहास करून शीघ्र गमन केलें. त्याकालीं वालखिल्य क्रुद्ध होऊन इंद्रास महान् भय उत्पन्न होण्याजोगें कर्म करण्यास त्याणीं आरंभ केला. त्या महा तपस्वी ब्राह्मणांनीं लाहान मोठ्या मंत्रांनीं यथाशास्त्र अग्नि उत्पन्न करून आपल्या तपोबलानें हवन केलें तें तुला सांगतों श्रवण कर. कामवीर्य, कामगम व इंद्रासही भय उत्पन्न करणारा असा दु-

सरा इंद्र उत्पन्न करण्या विषयीं त्यानीं नियमित व्रतें करून यजन केलें. शौर्य व वीर्य यांविषयीं इंद्रापेक्षां शतगुणित बलवान् व मना सारखा वेगवान् असा दारुण प्रतिइंद्र, आमच्या तपाच्या फलांनीं आज उत्पन्न होवो. अशा संकल्पानें ते यजन करितात, असें इंद्रानें श्रवण करून अत्यंत भय भीत झाला. आणि कश्यपास शरण जाऊन वालखिल्यांचें कृत्य निवेदन केलें. तें श्रवण करितांच कश्यपप्रजापति, वालखिल्यांच्या जवळ जाऊन त्यानें प्रश्न केला कीं, तुमचें कर्म सिद्ध झालें किंवा नाहीं ? त्याकालीं सत्यवादी वालखिल्य ह्मणतात आमचें कर्म सिद्ध आहे, असें कश्यपानें ऐकिलें असतां, त्यांचें शांतवन करून भाषण करितो. ब्राह्मणहो ! देवांच्या आज्ञेनें त्रिभुवन रक्षण होण्या करितां हा एक इंद्र केलाच आहे, तुह्मी दुसरा इंद्र उत्पन्न करितां तर आतां ब्रह्मवाक्य मिथ्या करूंनये; तुमचा इच्छित संकल्प मिथ्या होणार नाहीं. या तुमच्या संकल्पें करून जो बलवान् उत्पन्न होईल तो सर्व पक्ष्यांचा इंद्र होवो. हा देवराज तुह्मास शरण आला आहे यांजवर प्रसाद करावा. असें कश्यपानें भाषण केलें असतां, वालखिल्य कश्यपाची पूजा करून भाषण करितात हे प्रजापति, हा आमचा इंद्रा करितां समारंभ असून तुझ्याही आपल्या करितां समारंभ आहे तर हें आमचें कर्मफल तूं धारण कर. येणें करून तुझें कल्याण होईल, सौती भाषण करितो हे शौनका, या प्रकारें वालखिल्य भाषण करीत असतां, दक्षकन्या विनता पुत्रा करितां तप करीत होती, ती ऋतुकालीं स्नान करून शुचिर्भूत भर्त्याच्या अग्रभागीं प्राप्त झाली असतां, कश्यप तिला ह्मणतात हे देवि, तुझी इच्छा सफल होईल. त्रिभुवनाचे ईश्वर त्रैलोक्यामध्यें पूज्य महाभाग्यवान् असे दोन वीरपुत्र वालखिल्याच्या तपानें व माझ्या संकल्पानें तुला होतील. तूं अप्रमादें करून महान् उदय करणारा गर्भ धारण कर. या गर्भापासून जे पुत्र उत्पन्न होतील ते पक्ष्यांनें इंद्रत्व करितील व लोकांमध्यें संभावित वीर्यवान् व स्वइच्छारूपी होतील; असें विनतेस सांगून कश्यप इंद्रास भाषण करितो हे पुरंदरा, हे तुला सहाय्य करणारे महावीर्यवान् दोघे बंधु होतील. यां पासून तुला कांहीं पीडा होणार नाहीं. हे इंद्रा, तूं आपला संताप टाक; तूंच इंद्र होशील. ब्रह्मवेत्ते ब्रा-

ह्मण अत्यंत कोपी व वाग्वज्र असतात, याकरितां आजपासून कधीं तूं त्यांचा तिरस्कार व अपमान करूं नकोस. असें कश्यप वाक्य श्रवण करून इंद्र स्वस्थ मनानें स्वर्गास गेला. विनताही कृतकार्य होऊन परम हर्षानें अरुण व गरुड या दोन पुत्रांस प्रसवली. त्यांमध्यें अरुण विकलांग जाहला असतां, तो भास्कराच्या पुढें सारथ्यास बसला. गरुडास पक्ष्यांच्या इंद्रत्वें करून अभिषेक झाला. हे शौनका, त्यांचें हें महत्कर्म श्रवण कर. असा विषय या अध्या० आहे.

३२ अध्याय बत्तिसावा— सौति भाषण करितो हे द्विजश्रेष्ठा, पक्षिराज गरुड, अमृत रक्षणार्थ युद्धास प्रवृत्त झालेल्या देवसेने जवळ त्वरित आला; तेव्हां त्या अतिबलवान् गरुडास पाहून सर्व देव कंपित झाले. अमृत रक्षणा करितां विश्वकर्मा बसला होता, त्यास गरुडानें आपल्या पक्ष, तुंड व नखांनीं प्रहार करितांच त्यानें गरुडा समागमें एकमुहूर्तमात्र अनुपम युद्ध करून तो मृता सारखा पडला. त्याकाळीं गरुडानें महा पक्ष वायूनें रज उडवून लोकांस अंधःकार युक्त करून देवांस ताडन केलें.तेव्हां सर्व देव त्याच्या ताडनानें व रजानें मोह पाऊन गरुडास पाहण्यास असमर्थ झाले. नंतर त्यानें पक्षवातानें व पक्ष तुंड प्रहारांनीं देवांस विदारण करूं लागला. इंद्रानें वायूस रज,दूर करण्या विषयीं आज्ञा केल्यावरून त्यानें रज निवारण केलें. देवांनीं गरुडास पीडित केलें व देवगणांनीं त्यास ताडित केलें असतां, पुनः त्यानें आकाशामध्यें महा मेघां सारिखी गर्जना करून सर्व भूतांस भय उत्पन्न करीत उड्डाण केलें. सर्व देवांच्या ऊर्ध्वभागीं आकाशांत तो संचार करीत आहे हें पाहून सर्व देव कवचें घालून पट्टे,परिघ, शूल,गदा इत्यादि त्यास मारीत असतां, त्यानें सर्व लोकांस दहन करतो काय अशा रूपानें आकाशामध्यें संचार करून आपल्या दोन पक्षांनीं व उरानें आसमंतात् भागीं देवांस ताडन केलें. तेणें करून देव बहुत पीडित होऊन पळाले. गरुडाच्या नखतुंड प्रहारांनीं देवांच्या अंगास क्षतें पडल्यामुळें रक्तस्राव होऊं लागला. गरुडानें अमृत रक्षण करणाऱ्या नऊ यक्षांस पक्ष तुंडाग्रानीं ताडित केल्यामुळें ते मरण पावले. नंतर गरुड, अमृता करितां पुढें जातोंनों आसमंतात् भागीं प्रचंड वायूनें प्रेरणा केले

ला महाजाज्वल्यमान् अग्नि व्याप्त झालेला त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां त्यानें अनेक मुखें धारण करून नद्यांचें जल प्राशन केलें. नंतर अग्नी जवळ आला आणि त्यास उदक वृष्टीनें शांत करून गरुडानें आंत शिरण्याच्या इच्छेनें अल्परूप धरिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

३३ अध्याय तेहेतिसावा.- सौति भाषण करितो हे शौनका, सुवर्णमय वर्ण व सहस्रशः किरणानीं प्रज्वलित होऊन समुद्रामध्यें जसा उदक वेग प्रवेश करितो तसा त्या चक्रयंत्रामध्यें गरुडानें प्रवेश करितांच अमृताच्या आसमंतातभागीं कदंब केलिके सारखें सहस्र क्षुरांनीं युक्त, अहोरात्र भ्रमण करणारें, तीक्ष्णधारेचें, लोहमय, सूर्यचंद्र प्रभे सारिखें उज्वलित, मुरुषाचें छेदन करणारें देवांनीं निर्माण केलेलें चक्रयंत्र भ्रमण करीत होतें. तें पाहून चक्राच्या आरावर बसून सूक्ष्मांगानें आंत प्रवेश केला. त्या चक्राच्या अधोभागीं प्रदीप्त अग्नी सारखे कांतिमान्, विद्युल्लते सारख्या ज्यांच्या जिव्हा, चक्षुविष, महा घोर असे दोन सर्प अमृत रक्षणार्थ होते. त्या सर्पांची अशी शक्ती होती कीं, त्यानीं ज्याकडे पाहावें त्याचें भस्म व्हावें. हें गरुडानें जाणून एकाएकीं रजानें त्यांच्या चक्षूंस आच्छादन केलें असतां, त्यांनीं गरुडास नअवलोकन केल्यानें, गरुडानें त्यांस ताडन करून त्यांच्या अंगाचीं शतशः खंडें केलीं. नंतर अमृता जवळ जाऊन कुंभ उचलून आपले पराक्रमानें यंत्राचा भेद करून वेगानें उड्डाण केलें, आणि अमृत प्राशन न करितां परम वेगानें विष्णूच्या जवळ आला. त्याचा अमृता विषयीं निर्लोभ पाहून नारायण संतुष्ट झाले, आणि भाषण करितात हे गरुडा, मी प्रसन्न झालों वर माग. हें ऐकून गरुड भाषण करितो हे नारायणा, तुझ्या ध्वजावर माझा निरंतर वास असावा. आणि अमृता वांचून मीं अजरामर असावें. विष्णूनीं तथास्तु ह्मणतांच तो वर ग्रहण करून गरुड भाषण करितो नारायणा, तुह्मीं जरी भगवान् आहां तरी मी तुह्मांस वर देतो आपण मागा. हें श्रवण करून विष्णू ह्मणतात. तूं माझें वाहन होऊन ध्वजस्तंभीं वास कर, हें ऐकून तथास्तु ह्मणाला आणि मोठ्या वेगानें गमन केलें. नंतर अमृत हरण करून गरुड जात होता, त्यास इंद्रानें पाहून त्यावर वज्र प्रहार केला असतां, गरुड

हांस्य करून इंद्रास मंजुळ वाणीनें ह्मणाला कीं, ज्या दधीची ऋषीच्या अस्तीपासून हें वज्र झालें. त्या ऋषीच्या या वज्राच्या व तुझ्या सन्मानार्थ हा मी आपला एक पक्ष उपटून टाकितों तो पहा. याचा अंत तुला कधीं लागणार नाहीं. वज्रनिःपातानें मला कांहीं पीडा व्हावयाची नाहीं, असें बोलून नंतर पक्षिराजानें आपला एक पक्ष उपटून टाकिला असतां तो अनुत्तम पक्ष अवलोकन करून सर्व भूतें हर्षित होऊन त्यांनीं गरुडाचें नाव सुपर्ण असें ठेविलें. इंद्रानें त्या आश्चर्यकारक पक्ष्यास पाहून हा पक्षी महत्‌भूत आहे असें जाणून त्यास भाषण करितो हे खगोत्तमा, हें तुझें उत्तम प्रकारचें बल जाणण्याची व तुझ्या समागमें सख्यत्व करण्याची माझी इच्छा आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

३४ अध्याय चवतिसावा:- गरुड भाषण करितो हे पुरंदरा, तूं माझ्याशीं सख्य करण्याची इच्छा करितोस तर त्या प्रमाणें तुझें माझें सख्य असो. माझें बल मोठें असात्य आहे तें तुला विदितच आहे. साधुपुरुष आपल्या गुणाचें कीर्तन व बलाची स्तुति आपल्या मुखानें करीत नाहींत. तूं प्रश्न केलास ह्मणून तुला सांगतों; कारणा वांचून आत्मस्तवन करूंनये. पर्वत, वन व सागर यांसहवर्तमान पृथ्वीस एक्या क्षणामध्यें एक्या पंखानें नेईन. तसेंच हे शक्रा, सर्व लोकां सहवर्तमान स्थावर जंगमात्मक जगतास मी श्रमी झाल्या वांचून वहन करीन असें माझें महत् बल आहे. हें ऐकून इंद्र ह्मणाला हें सर्व तुला योग्य आहे. आतां तुझें माझें सख्य झालें. तुला विष्णूनीं अमृत प्राशना वांचून अमरत्व दिलें; आतां तुला या अमृतानें काय प्रयोजन आहे? तूं ज्या सर्पा करितां अमृत नेतोस ते सर्प हें अमृत प्राशन करून आह्मांस पीडा देतील; हें श्रवण करून गरुड बोलतो हे इंद्रा, हें अमृत, मातेस दास्यत्वा पासून मुक्त करण्या करितां नेतों मीं हें कोणास देणार नाहीं. मला देवांतून कोणी विशेष आप्त नाहींत. मी केवळ पणा करितां अमृत कलश नेऊन सर्पां पुढें स्थापन करीन नंतर तूं सत्वर येऊन कलशाचें हरण कर. हें श्रवण करून इंद्र भाषण करितो हे अंडजा, मीं संतुष्ट झालों ईप्सित वर माग. कद्रुपुत्रांचें कपट स्मरून गरुडानें वर मागितला कीं, हे सर्प माझे भक्ष्य होवोत.

इंद्र, तथास्तु ह्मणून आपलें वाक्य सत्य होण्या करितां योगेश्वर हरीस शरण गेला असतां, भगवंतानीं तें मान्य केल्यावर इंद्र ह्मणतो गरुडा, तूं अमृत ठेव तांच मी हरण करीन. नंतर अमृत घेऊन गरुड, माते जवळ येऊन सर्पांसि ह्मणतो सर्पहो, हें मी अमृत आणलेलें या कुशावर ठेवितों, तुह्मीं मंगल स्नान करून प्राशन करावें. आज पासून माझी माता तुमच्या दास्यत्वा पासून मुक्त होवो. तुह्मीं सांगितल्या प्रमाणें अमृत आणून मी तुह्मांस दिलें हें ऐकून तथास्तु ह्मणून सर्प स्नानास गेले असतां, इंद्र येऊन अमृत घेऊन स्वर्गी गेला. इतक्यांत मंगल स्नान करून व जप करून सर्प, मोठ्या त्वरेनें कुशावर अमृत ठेविलें होतें. त्या स्थलीं आलेतों अमृत हरण झालें. हें पाहून त्या दर्भास चाटूं लागले असतां त्यांच्या जिव्हा द्विधा झाल्या. व अमृत स्पर्शानें दर्भ, पवित्र झाले. या प्रमाणें जाहल्यावर मातेसहवर्तमान त्या गरुडाची पक्ष्यानीं पूजा केली. नंतर भुजग भक्षणा विषयीं तत्पर होऊन मातेस हर्ष उत्पन्न करीत गरुड अरण्यांत संचार करूं लागला. सौति भाषण करितो हे शौनका, ही पक्षिराजाची कथा जो कोणी श्रवण करील किंवा ब्राह्मण, सभेमध्यें पठण करील त्यास पुण्य प्राप्त होऊन स्वर्गी गमन करील. असा विषय या अध्यायांत आहे.

३५ अध्याय पस्तिसावा:- शौनक भाषण करितात हे सूत नंदना, मातेनें सर्पांसि शाप दिल्ह्याचें कारण व अरुणानें शाप दिल्याचा हेतु तुला सांगितला; तसेंच कद्रु व विनतेस भर्त्यानें वर दिले ते व विनता पुत्रांचीं नावें तूं सांगितलींस, आतां सर्पांचीं नावें प्राधान्यें करून सांग श्रवण करण्यास मीं इच्छितों. हें श्रवण करून सौति भाषण करितो, हे शौनका, सर्प बहुत आहेत यास्तव सर्वांचीं नावें सांगत नाहीं प्राधान्यें करून श्रवण कर. प्रथम शेष झाला. नंतर वासुकी, ऐरावत, तक्षक, कर्कोटक, धनंजय इत्यादि शतशः सर्प आहेत हे तुला प्राधान्यें करून सांगीतले. इतर बहुत आहेत यास्तव निवेदन करीत नाहीं. हे अयुत प्रयुतशः आहेत यांची संतति गणना करण्यास कोणी समर्थ नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

३६ अध्याय छत्तिसावा:- शौनक भाषण करितात. हे सूतनंदना, तूं

वीर्यवान् सर्पांचें चरित्र सांगितलेस, तसाच त्याना शाप झाल्यावर त्यानीं पुढें काय केलें तें सांग. हें ऐकून सौतिसांगतो, हे शौनका, सर्पांनीं आपल्यास शाप झालेला श्रवण करितांच त्यांमध्यें महायशस्वी भगवान् शेषनामकनाग, कद्रूचा त्याग करून कांहीं काळ पर्यंत गंधमादन पर्वतावर बदरिकाश्रमामध्यें गोकर्णादि तीर्थांचेठायीं उग्र तप करण्या करितां जाऊन एकांतीं इंद्रियें स्वाधीन करून वायुभक्षणादि व्रतपरायण होऊन घोर तप करूं लागला. हें पाहून पितामह तेथें येऊन त्यास शुष्क झालेला व जटा वल्कलें धारण करून सत्यधैर्यानें तप करीत बसलेला पाहून त्यास भाषण करितो हे शेषा, तूं हें काय करतोस प्रजेचें कल्याण होईल तें कर. या तीव्र व्रतानें तूं प्रजेस त्रासमात्र देतोस तर आतां तुझी कामना काय आहे ती सांग मीं पूर्ण करितों. हें ब्रह्मदेवाचें वाक्य श्रवण करून शेष भाषण करितो हे पितामहा, माझे सर्व सहोदर बंधू मंदचित्त आहेत ते परस्पर शत्रू सारखी असूया करितात; यास्तव त्यांचा मला समागम नको. ते पुत्रांसह विनतेस पापदृष्टीनें पहातात, महा बलवान् गरुडनामक तिच्या पुत्राचा ते निरंतर द्वेष करितात. तो कश्यप पित्याच्या वरदानानें सर्पांस भक्षण करण्यास समर्थ आहे. हें जाणून मीं तपाचरणानें या कलेवराचा त्याग करण्याचा निश्चय केला आहे. असें केलें असतां मला त्यांचा या लोकीं व परलोकीं समागम होणार नाहीं. हें ऐकून ब्रह्मदेव भाषण करितात हे शेषा तुझ्या सर्व बंधूंचें चेष्टित मी जाणतों. तुझ्या बंधूंस मातेच्या अपराधानें बहुत भय उत्पन्न झालें आहे ही योजना पूर्वींच करून ठेविली आहे. तूं शोक करूं नकोस. हे शेषा, तुला इच्छित वर असेल तो मी देतों. तुझे ठिकाणी माझी परम प्रीति आहे. हे पन्नगोत्तमा, दैवयोगें तुझी बुद्धि धर्माचेठायीं आहे अदीन निरंतर स्थिर राहील. हें श्रवण करून शेष भाषण करितो; हे पितामहा, माझी बुद्धि धर्माविषयीं, शमाविषयीं व तपा विषयीं स्थिर असो हा माझा इच्छित वर आहे, असें शेष वाक्य श्रवण करून ब्रह्मदेव बोलतात. हे शेषा, या तुझ्या इंद्रियजयानें व मनोजयानें मीं संतुष्ट झालों. तूं माझ्या आज्ञेनें प्रजांच्या हितास्तव ही पर्वतसमुद्रासह पृथ्वी ग्रहण करून अचल राहील असें कर. हें श्रवण करून शेष भाषण करितो; हे ब्रह्मदेवा, आपण ज्या

पेक्षां मला आज्ञा करितां त्यापेक्षां मी पृथ्वीस निश्चल धारण करीन; परंतु माझ्या मस्तकीं आपण ही पृथ्वी आणून स्थापन करावी. ब्रह्मदेव सांगतात हे भुजंगा, तूं या पृथ्वीच्या अधोभागीं गमन कर. ही तुला जाण्यास विवर देईल. तूं या पृथ्वीस धारण केलीस ह्मणजे माझें मोठें प्रिय केलें असें होईल. सौति भाषण करितो हे शौनका, शेषानें असें ब्रह्मदेवाचें वाक्य श्रवण करून आंत प्रवेश केला, आणि समुद्रवलयांकित पृथ्वीस मस्तकावर धारण करितांच ब्रह्मदेव भाषण करितात. हे नागोत्तमा, तूं येवढा ज्यापेक्षां पृथ्वीस धारण करतोस त्यापेक्षां तुला अनंत फणा होतील. जसा मी आणि इंद्र अद्वितीय तसा तूं या पृथ्वीवर अद्वितीय होशील. सौति भाषण करितो हे शौनका, ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें एकाकी शेष पृथ्वीस धारण करून तिचे अधोभागीं वास करीत असतां त्याचे साहाय्यार्थ ब्रह्मदेवानीं गरुडास दिला. असा विषय या अध्यायांत आहे.

३७ अध्याय सदतिसावा.- सौति भाषण करितो हे शौनका, मातेपासून शाप श्रवण करितांच वासुकी, धर्मपरायण जे आपले बंधू ऐरावत प्रभृति यांसहवर्तमान एकत्र बसून भाषण करितो हे सर्पगणहो, ज्या उद्देशें करून मातेनें हा शाप दिला याचें कारण सर्व तुह्मी जाणतच आहां; या शापाच्या मुक्ती करितां आपण सर्व बसून विचार करूं. इतर सर्व शापा पासून मुक्तता होत्ये; परंतु मातेनें शाप दिल्याची मुक्तता कधींही होणार नाहीं. ब्रह्मदेवाच्या अग्रभागीं शाप दिलेला श्रवण करून माझ्या हृदयांत कंप उत्पन्न होतो. मातेनें शाप दिला त्या समयीं ब्रह्मदेव जवळ असून त्यानीं तिचा निषेध केला नाहीं. त्यावरून आमचा सर्वांचा विनाश काळ प्राप्त झाला असें वाटतें, यास्तव आतां सर्व सर्प गणांस आरोग्य होण्या विषयीं विचार करूं आतां हा काल व्यर्थ जाऊं देऊं नका. सर्वही तुह्मीं बुद्धिमान् व विचारवान् आहां. विचारा अंतीं मातृ शापा पासून मुक्त होण्याचा मार्ग सांपडेल. जसा पूर्वीं अग्नि कांहीं कारणानें नष्ट जाहला असतां देवांनीं मंत्ररूप यत्नानें अग्नीस सतेज अवलोकन केलें. तसें आपणही आतां जनमेजयाच्या यज्ञाचा जेणें करून पराभव होईल तसें करण्याचा उद्योग करूं. असें वासुकीचें भाषण श्रवण करून सर्व कद्रु पुत्र तथास्तु ह्मणून विचार करण्यास बसले. त्यांत कोणी ह्म-

णतात आह्मीं यज्ञांतील ऋत्विजांस दंश करूं ह्मणजे विघ्न होईल, कोणीं ह्मणतात आह्मीं जनमेजयासच खाऊं. कोणी ह्मणाले आह्मीं त्याचे मंत्री होऊं. आणि त्यास यज्ञांतील हिंसेमुळें परलोकीं नरक प्राप्ति इत्यादि भयंकर दोष सांगून यज्ञच होऊं देणार नाहीं. अशा अनेक प्रकारच्या कुकल्पना सांगूं लागले. हें श्रवण करून धर्मात्मे इतर नाग भाषण करितात. ही तुमची अज्ञान बुद्धि मला मान्य नाहीं. धर्मानें आपत्तिकाल आला तरी त्या दुःखाची शांति होत्ये; परंतु अधर्मानें परिणामीं सुख होत नाहीं. तेव्हां ते नाग, ह्मणाले अशी आमची सर्वांची बुद्धि आहे; परंतु हे राजा, तुला योग्य दिसेल त्याप्रमाणें करावें. असें भाषण करून सर्प वासुकीच्या मुखाकडे पाहूं लागले. वासुकी मनांत चिंतन करून भाषण करितो. भुजगहो, ही तुमची बुद्धि मला चांगली वाटत नाहीं. आपल्यास हिताची गोष्ट सांगणारा कश्यपा वांचून अन्य कोणी नाहीं, यास्तव त्याचें साधन करावें ह्मणजे तो हितमार्ग सांगेल. तुमच्या भाषणा पासून मला बहुत संताप उत्पन्न झाला आहे. आतां जेणें करून तुमचें हित होईल तें मला केलें पाहिजे. असा विषय या अध्यायांत आहे.

३८ अध्याय, अडतिसावा:- सौति भाषण करितो हे शौनका, सर्व सर्पांचें व वासुकीचें भाषण श्रवण करून एलापत्रनाग भाषण करितो हे सर्पहो, जनमेजयराजाचा यज्ञ होणार नाहीं असें नाहीं व जनमेजयराजाही मंत्रानें व वीर्यानें संपन्न आहे, तेथें तुमचा प्रवेशही होणार नाहीं यास्तव त्यापासून आह्मांस महत् भय आहे, आतां मीं भाषण करितों तें श्रवण करा. जो पुरुष दैवानें नष्ट झाला त्यास दैवा वांचून अन्य आश्रय नाहीं, यास्तव आपण दैवाचाच आश्रय करूं. ज्या कालीं मातेनें शाप दिला त्या कालीं मी मातेच्या उत्संकावर होतों त्यासमयीं सर्व देव आर्त होऊन पितामहास ह्मणाले कीं, स्त्रिया तीक्ष्ण आहेत, असें ह्मणून त्यानीं भाषण केलें कीं, हे पितामहा प्रियपुत्रांची प्राप्ती झाली असतां, कद्रू वांचून कोण अन्यस्त्री असा तीक्ष्ण शाप पुत्रास देणारी तुझ्या पुढें समर्थ आहे? शापवचन श्रवण करून तुह्मी तिचें निवारण न करितां तथास्तु ह्मणून अनु

मोदन दिलें याचें कारण समजण्याची आह्मीं इच्छा करितों. असें देवांचें वाक्य श्रवण करून ब्रह्मदेव सांगतात. हे देवहो, तीक्ष्णविषाचे घोर नाग बहुत आहेत यास्तव मी प्रजांच्या हितास्तव तिला शापापासून निवारित केली नाहीं; परंतु निर्निमित्त लोकांचा प्राण घेणारे दुष्ट असतील त्यांचा शापाच्यायोगें विनाश होईल, धर्मशीलांचा नाश होणार नाहीं. आतां त्यांना शापापासून मुक्त होण्याचा उपाय तुह्मांस सांगतों. तो काल आला असतां त्या प्रमाणें साधन करावें. यायावर कुलामध्यें बुद्धिमान्, महातपस्वी व जितेंद्रिय असा जरत्कारु या नामेंकरून प्रख्यात ब्राह्मण उत्पन्न होईल. त्याला जरत्कारु भार्येपासून आस्तीक नामें पुत्र उत्पन्न होईल, तो या सर्पसत्र करण्याचा निषेध करील. त्या कालीं जे धार्मिक असतील ते मात्र वांचतील. असें ब्रह्मदेवाचें वाक्य श्रवण करून देव बोलतात हे पितामहा, जरत्कारु महामुनी, कोणत्या स्त्रीच्याठायीं अशा महत् पुत्रास उत्पन्न करील तें आह्मांस निवेदन करावें. हें ऐकून ब्रह्मदेव सांगतात. हे देवहो, जरत्कारु या नावाची वासुकीची भगिनी आहे तिजपासून आस्तीक नामक पुत्र उत्पन्न होऊन सर्पांस शापापासून मुक्त करील. एलापत्र भाषण करितो सर्पहो, असें ब्रह्मदेवाचें वाक्य श्रवण करतांच देव, तथास्तु असें ह्मणून आपले स्थानीं गेले. व ब्रह्मदेवही स्वस्थानीं गेले. हें वर्तमान सर्व सर्पांस सांगून एलापत्र वासुकीस भाषण करितो हे वासुकी तुझी भगिनी जरत्कारु नामें आहे, ती जरत्कारुनामक ऋषी भिक्षार्थ आला असतां, नागांच्या भयशांत्यर्थ त्यास अर्पण कर. तो ऋषि सुव्रत आहे त्या पासून आपला मोक्ष होणार असें मी श्रवण केलें आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

३९ अध्याय एकुणचाळिसावा:- सौति भाषण करितो हे शौनका, एलापत्रनागाचें वाक्य श्रवण करून सर्व नागांस हर्ष झाला, आणि साधु साधु असें बोलून ते गेले. त्या दिवसापासून वासुकीनें आपल्या जरत्कारु भगिनीचें रक्षण करून तो हर्षित झाला. पुढें थोडक्याच कालानें देवासुरानीं समुद्र मथन केलें. त्यामध्यें मंथन रज्जु वासुकी होऊन तें कर्म समाप्त झाल्यावर सर्व देव वासुकीसह ब्रह्मदेवाकडे जाऊन भाषण करितात. हे भगवन्,

हा वासुकी शापभीत होऊन बहुत संतप्त आहे, तर त्यानें मानसशल्य उत्पाटन करावें. यास मातेच्या शापापासून ज्ञातीच्या हितास्तव बहुत दुःख झालें आहे, हा नाग आमचा प्रियकारी असून प्रतिकल्पीं समुद्र मंथनास रज्जु करितां उपयोगीं आहे, हें जाणून याच्यावर प्रसादें करून याचा मनोज्वर शांत करावा. हें ऐकून ब्रह्मदेव बोलतात. देवहो, पूर्वीं एलापत्र नागानें जें वासुकीस सांगीतलें तें मीच प्रेरित केलें. आतां हा यथाकालीं आपल्या भगिनीस त्या ब्राह्मणास अर्पण करो. ह्मणजे पापी नाग आहेत त्यांचा नाश होऊन धर्मवानांची स्थिति होईल. जरत्कारु ब्राह्मण उत्पन्न होऊन तीव्र तप करीत आहे, त्यास हा आपले भगिनीस यथाकालीं अर्पण करो. देवहो एलापत्र नागानें पन्नगांचें जें हित सांगीतलें त्या प्रमाणें होईल, अन्यथा होणार नाहीं. असें पितामहाचें वाक्य ऐकून वासुकीनें जरत्कारु ब्राह्मणाच्या शोधार्थ बहुत नागास पाठविलें आणि सांगितलें कीं, तो ज्या समयीं भार्या भिक्षेची इच्छा करील त्या कालीं शीघ्र येऊन मला निवेदन करावें, ह्मणजें त्यांत आपलें बहुत कल्याण आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

४० अध्याय चाळिसावा:- शौनक भाषण करितात. हे सूतनंदना, जरत्कारुनामकऋषि, तूं सांगितलास त्याचें हें नाव पडण्याचें कारण काय? तें मीं ऐकण्याची इच्छा करितों. हें श्रवण करून सौति सांगतात. हे शौनका, जरत् शब्द क्षयवाची व कारु शब्द दारुणवाची प्रसिद्ध आहे. त्या ऋषीनें तीव्र तपें करून आपलें शरीर क्षीण केलें ह्मणून त्याचें नाव जरत्कारु असें प्रख्यात आहे, तशीच वासुकीची भगिनीही, अप्रगल्भ व युवती असतां शरीर क्षपणच श्रेयस्कर जाणून तिणें तप केलें ह्मणून जरत्कारुनाम पावली. हें ऐकून शौनक, हास्यपूर्वक योग्य, योग्य असें बोलून पुनः प्रश्न करितो, हे सौते, त्यां पासून आस्तिक कसा झाला? हें श्रवण करण्याची मी इच्छा करितों. असा शौनकाचा प्रश्न श्रवण करून सौति भाषण करितात. हे शौनका, वासुकी सर्व सर्पांस आज्ञा करून भगिनीला वराच्या उद्देशानें फिरत असतां, बहुत काल गेला तथापि जरत्कारु ऋषि, ऊर्ध्वरेता, तपासक्त, स्वाध्यायवान् व निर्भय असा होऊन पृथ्वीवर भ्रमण करीत असतां, त्यानें मनानेंही स्त्रीची इच्छा

केली नाहीं. कोणे एकेकाळीं कौरव वंशांतील परीक्षिती नामकराजा, आपला प्रपितामह पांडुराजा याप्रमाणें धनुर्धरश्रेष्ठ व मृगयाशील असल्यामुळें नित्यशः मृगयेस जात असे. त्यानें एका मृगास बाणानें वेध करून त्याच्या मागें लागला. तो त्या मृगाच्या शोधार्थ फारच लांब गेला. नंतर श्रांत व तृषेनें पीडित होऊन वनांत फिरतां फिरतां कोणे एक्या गाईचे गोम्यामध्यें वत्स मुखापासून निघालेल्या फेनाचें भक्षण करीत बसलेल्या ब्राह्मणास अवलोकन करून त्वरेनें त्यासमीप जाऊन प्रश्न करितो हे ब्रह्मन्, मी अभिमन्यूचा पुत्र परीक्षिति नामकराजा आहें. मी वेधलेला मृग पळाला तो तूं अवलोकन केलास काय? हें श्रवण केलें असतांही त्या ब्राह्मणानें मौन व्रत धारण केलें होतें यामुळें राजास कांहींच उत्तर दिलें नाहीं. तेणें करून राजास क्रोध येऊन धनुष्य कोटीनें मृत सर्पाचें कलेवर त्याच्या स्कंधावर ठेऊन तो राजा गेला. ब्राह्मणानें कांहीं शुभाशुभ न बोलतां त्याच्या अपराधाची क्षमा केली. राजा क्रोधाचा त्याग करून गेल्या मार्गानें स्वनगरास आला. ऋषि महाक्षमाशील होता ह्मणून राजास धर्मनिष्ठ पाहून त्यानें जरी आपली अवज्ञा केली तथापि कोपाचें आकर्षण करून धैर्य धारण केलें. हा ब्राह्मण इतका धर्मपरायण आहे हें राजास ज्ञान नव्हतें. त्या ऋषीचा पुत्र तरुण, महा तपस्वी, तीक्ष्ण, तेजस्वी शृंगी यानामानें महान क्रोधी व दुःखानींही प्रसन्न होण्यास अशक्य असा होता. तो ब्रह्मलोकीं जाऊन वेळचे वेळीं उपस्थान करीत असे. कोणे एकेकाळीं तो उपस्थान करून ब्रह्माज्ञेनें गृहीं येतेसमयीं क्रीडा करितां करितां व हसतां हसतां कोणी एक सख्यानें त्याची थट्टा करितांच तो अत्यंत क्रोधावेशानें विषतुल्य झाला. पुनः कोणी त्याच्या थट्टेच्या उद्देशानें असें भाषण केलें कीं, हा परम पवित्र व मोठ्या गोष्टी सांगतो. परंतु याचा पिता शववाही आहे. हें वाक्य श्रवण करून शृंगीस क्रोध आला असतां, कृश नामक शिष्य भाषण करितो हे शृंगी, तूं तपस्वी व तेजस्वी खरा. परंतु गर्व करूं नकोस. तुझा पिता आपले स्कंधावर शव वहन करितो. आह्मी ऋषिपुत्र आहोंत तूं आमच्या पुढें कांहीं गर्व करून बोलूं नकोस. आह्मासारिखे सिद्ध ब्रह्मवेत्ते व तपस्वी असतां, तूं पुरुषत्वाचा अभिमान कां करितोस?

हे मुनिश्रेष्ठा, तुझ्या पित्यानें योग्य कर्म केलें नाहीं, या कर्मानें मला अत्यंत दुःख झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

४१ अध्याय एकेचाळिसावा:- सौति भाषण करितात हे शौनका, कृशनामक शिष्यानें असें भाषण केलें असतां, शृंगी क्रोधानें संतप्त होऊन प्रश्न करितो हे कृशा, माझा पिता शववाही कसा झाला हें मला सांग? असा शृंगीचा प्रश्न श्रवण करून कृश भाषण करितो हे शृंगी, परीक्षिति राजा मृगयार्थ भ्रमण करीत असतां, मार्गामध्यें तुझ्या पित्याच्या स्कंधावर मृत सर्प ठेवून गेला. असें कृश वाक्य श्रवण करून शृंगी भाषण करितो हे कृशा, माझ्या पित्यानें अशा दुष्टात्म्या राजाचें काय अनिष्ट केलें हें मला सत्य सांगून माझ्या तपाचें बल अवलोकन कर. कृश भाषण करितो हे शृंगी, परीक्षितिराजा मृगये करितां अरण्यामध्यें येऊन बाणानें चपल मृगास वेधून एकाकी मृगाच्यामागें धांवला असतां, मृग न दिसल्यामुळें श्रांत होऊन माघारा फिरल्यावर क्षुधा व तृषा यानीं व्याकुल होऊन मौनव्रत धारण केलेल्या तुझ्या पित्यास अवलोकन करून त्यास वारंवार प्रश्न करितो कीं, तूं माझा मृग अवलोकन केलास काय? तुझ्या पित्यानें मौनव्रतसंपन्न असल्यामुळें त्यास उत्तर दिलें नाहीं. तेणेंकरून राजास क्रोध येतांच जवळ एक मृत सर्पाचें कलेवर पडलें होतें तें धनुष्यकोटीनें उचलून तुझ्या पित्याच्या स्कंधावर ठेवून हस्तनापुरास गेला. अद्यापि तुझा पिता तसाच व्रतस्थ आहे व स्कंधावर अद्यापि सर्प शव आहे, हें ऐकतांच शृंगी क्रोधानें आरक्त नेत्र व जाज्वल्यमान होऊन नेत्रांस उदक स्पर्श करून त्याणें असा शाप दिला कीं, माझा वृद्ध पिता मौनव्रतामध्यें स्थित असतां, जो पापी राजा त्याच्या स्कंधावर मृत सर्पास स्थापन करून गेला, त्या पाप्यास पन्नगेश्वर तक्षक तीक्ष्ण व तेजस्वी माझ्या वाक् बलानें प्रेरणा केल्यामुळें अति क्रुद्ध होऊन आजपासून सात दिवसांत त्यास दंश करून यम गृहीं पाठवील. जो ब्राह्मणांचा अवमान करणारा व कुरुकुलास कलंक लावणारा याची अशी दशा होईल. याप्रकारें शृंगी परीक्षितीस शाप देऊन क्रोधानें आपल्या पित्या जवळ जाऊन त्यास गोव्रजामध्यें शववाही बसलेला अवलोकन करून अधिक क्रुद्ध होऊन अश्रु टाकीत पित्यास भाषण करितो हे ताता, दुष्टात्म्याप-

रीक्षिती राजानें येऊन त्याणें ही तुझी अमर्यादा केली हें मी जाणतांच कुरुकुला-धमास यथायोग्य उग्र शाप दिला आजपासून सातवे दिवशीं त्या पाप्यास पन्न-गोत्तम परमदारुण यमगृहास नेईल. असें पुत्रवाक्य श्रवण करून पिता शमीक भाषण करितो. हे पुत्रा, तूं माझें प्रिय केलें नाहींस, हा तपस्वी जनाचा धर्म नव्हे. आह्मी त्या नरेंद्राच्या देशामध्यें वास करितों; त्याणें यथान्याय जर आमचें रक्षण केलें तर आह्मासारख्याचा जरी त्याणें अपराध केला तथापि त्याचा द्रोह करूं नये. हे पुत्रा क्षमा करावी. धर्माचें रक्षण केलें असतां तो आपलें रक्षण करितो. धर्माचें रक्षण न केलें तर तो आपला नाश करील यांत संशय नाहीं. जर राजा आमचें रक्षण करणार नाहीं तर स्वरवानें आह्मीं धर्माचरण करण्यास समर्थ नाहीं. धर्मदृष्टि राजांनीं आह्मीं संरक्षित आहोंत ह्मणून विपुल धर्माचरण करितों. आमच्या आचरणामध्यें आमचें रक्षण करणें राजांचाही धर्मभाग आहे. यास्तव राजांच्या अपराधाची क्षमा करावी. याच्या प्रपितामहांनीं जसें आमचें रक्षण केलें व जशा राजांनीं प्रजा रक्षण कराव्या तसें या परीक्षितीनें आमचें रक्षण केलें. राजाच्या नाशानें प्रजोच्छेद कृत पाप तुला प्राप्त होईल. राजा तर क्षुधित व श्रांत झाला होता; मीं व्रतस्थ आहें हें न जाणतां त्याणें सर्प कलेवर माझ्या स्कंधावर ठेविलें असें मला वाटतें. अराजक देशामध्यें तस्करादि दुर्जन पीडा बहुत देतात, सर्व लोक उद्वस्त झाले असतां, राजा दंडानें त्यांचें शासन करितो. दंडापासून भय उत्पन्न होतें व पुढें त्यापासून शांति होत्ये. उद्विग्न झालेला पुरुष धर्म व अन्य क्रिया करण्यास समर्थ होत नाहीं. धर्म राजानें प्रतिष्ठित आहे, धर्मापासून स्वर्ग आहे, राजाच्या यज्ञक्रिया सर्व धर्मापासून होतात, सर्व देव यज्ञापासून प्रतिष्ठित होतात, देवापासून वृष्टि होत्ये, वृष्टीपासून औषधी होतात, औषधीपासून निरंतर मनुष्यांचें हिताहित धाता करितो मनुष्याचा धाता तर राज्य कर्ता राजा होय, वेदाध्ययी पुरुषास श्रोत्रिय ह्मणतात, त्या दाहा श्रोत्रियांची योग्यता एक राजास प्राप्त होत्ये असें मनूनें सांगितलें आहे. त्यांत तो क्षुधेनें व तृषेनें श्रांत झाला होता मीं व्रतस्थ आहें हें न जाणल्यामुळें अज्ञानानें हें कर्म त्याणें केलें परंतु या कर्माची तूं क्षमा करावीस तूं अविचारानें एका एकीं राजास शाप दिलास हें दुष्कर कर्म

केलेंस हे पुत्रा, सर्वथा तो नृप आह्मां पासून शाप पावण्यास योग्य नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

४२ अध्याय बेचाळिसावा - शृंगी भाषण करितो हे ताता, जरी हें मी दुष्कृन व साहस केलें हें तुला प्रिय असो किंवा अप्रिय असो जें मी बोललों तें व्यर्थ होणार नाहीं हें मी तुला सत्य सांगतों. मी स्वइच्छा विहारामध्यें ही अनृत बोललों नाहीं. मग शाप देत असतां तें वाक्य मिथ्या कसें होईल? असें पुत्राचें भाषण श्रवण करून शमीक भाषण करितो हे पुत्रा, तुझा प्रभाव उग्र असून तुझी वाणी सत्य आहे, तूं पूर्वीं कधींही मिथ्या बोलला नाहींस हें वाक्यही तुझें मिथ्या होणार नाहीं. मोद पुत्र जरी झाला तथापि पित्यानें त्यास शासन करीत असावें ह्मणजे तेणेंकरून तो गुणयुक्त होऊन महत् तेज पावतो. तूं तर बाल असतांच तपानें संपन्न आहेस, योग व ऐश्वर्यवान् पुरुषाचा क्रोध अति इद्धिंगत होतो हे पुत्रा, असा क्रोध तूं बाल्यावस्थे पासून धारण केलास तर तो तपाचा नाशक होईल, यास्तव तुला सांगतों एकाएकीं अविचारानें राजशापरूप अकार्यकारण कधीं करूंनये. हें आज तुझे ठिकाणीं पाहून तुला उपदेश करावा असें वाटतें यास्तव तूं आतां क्रोधाचा त्याग करून वनसंबंधी आहार करीत शांतिपर होऊन संचार कर ह्मणजे धर्महानि होणार नाहीं, क्रोध धर्माचें हरण करितो, परलोक सुखाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें मोठ्या यत्नानें संचित केलेला धर्महीन झाला ह्मणजे इष्ट गति होत नाहीं. यत्नवान् व क्षमावान् पुरुषास सिद्धिकारक हा शमच होतो. क्षमावानास हा लोक व परलोक प्राप्त होतो यास्तव जितेंद्रिय व क्षमाशील होऊन धर्माचरण करावें. क्षमेनें क्रम मुक्तिप्रद ब्रह्मलोक पावशील. मी तर शांति धारण करून जें करण्यास योग्य तें करितों. आतां मी परीक्षिती राजास असा निरोप पाठवितों कीं हे राजा, तूं माझी अमर्यादा केलीस त्या तुझ्या अपराधास्तव माझ्या अविचारी मुलानें बहुत क्रुद्ध होऊन तुला शाप दिला आहे, यास्तव तूं आतां आपलें साधन करावेंस. असें पुत्राशीं भाषण करून महा तपस्वी व दयावान् शमीक ऋषीनें हें वर्तमान परीक्षितिराजास सांगण्या करितां गौरमुख नामक सुशील शिष्यास पाठविलें. गौरमुख शिष्य त्वरेनें राजभुवनामध्यें प्राप्त झा-

त्यावर द्वारपालांनीं त्यास राजा जवळ नेला असता कुशल प्रश्नपूर्वक राजानें त्याची पूजा केली. त्याकाळीं गौरमुख विश्रांत होऊन राजा मंत्र्यांस हवर्तमान बसला असतां त्यास शमीकऋषीचें घोर भाषण सांगूं लागला. हे राजेंद्रा, तुझ्या देशामध्यें शमीक नामक कोणी एक ऋषि वास करितो. तो परम धर्मात्मा, दांत, शांत व महा तपस्वी आहे. तो मौनव्रतामध्यें असतां तूं धनुष्य कोटीनें मृत सर्प त्याचे स्कंधावर टाकलास तथापि त्या मुनीनें तुझी क्षमा केली परंतु त्याच्या पुत्रानें तुझ्या अपराधाची क्षमा केली नाहीं. हे राजा, ऋषिपुत्रानें पित्यास न कळवितां तुला असा शाप दिला कीं, सप्त रात्रीमध्यें तक्षक तुझा मृत्युरूप होईल. हें माझ्या पुत्राचें वाक्य कोणी ही अन्यथा करण्यास समर्थ नाहीं. यास्तव तूं आतां आपलें हित होईल त्यारीतीनें करावेंस आणि असें सांगितलें कीं, क्रुद्ध झालेल्या पुत्रास शिक्षा करण्यास मी समर्थ नाहीं, हें मला मुनीनें सांगून राजा तुझ्या हितास्तव मला पाठविलें आहे यास्तव तूं आपल्या हिताचें चिंतन कर. असें गौरमुख शिष्याचें वाक्य श्रवण करितांच महा तपस्वी राजा आपल्या कडून ऋषीचा अपराध झाला ह्मणून पश्चात्ताप पावला. वनामध्यें मुनिश्रेष्ठ मौन व्रतामध्यें होता हें श्रवण करून राजाचें मन बहुत शोक संतप्त होऊन शमीकाची दयायुक्त वाणी श्रवण करून पुनः त्या अपराधा विषयीं पश्चात्ताप पावला. या प्रकारें राजा निंद्य कर्म करून जसा शोक पावला तसा मृत्यु श्रवणानें शोक व दुःख पावला नाहीं. आपल्यावर प्रसाद करण्या करितां परीक्षिति राजा पुनः गौरमुख शिष्यास शमीकाकडे पाठविला. गौरमुख पुनः ऋषीकडे माघारा गेल्यावर इकडे राजा उद्विग्न होऊन मंत्र्यां सहवर्तमान विचार करून आत्मरक्षणा करितां एक्या स्तंभाचा एक प्रासाद निर्माण करून औषधी वैद्य व मंत्रसिद्ध ब्राह्मण यांची ही योजना केली. त्या प्रासादामध्यें बसून मंत्र्यांनीं रक्षित असा तेथेंच राजकार्यें करीत असे. राजाच्या समीप जाऊन त्यास पहाण्यास कोणी समर्थ झाला नाहीं. वायूचाही प्रवेश तेथें दुर्घट झाला. याप्रकारें राजा व्यवस्था करून बसला असतां सातवे दिवशीं कोणी एक काश्यपनामक विद्वान् ब्राह्मण राजाचें सर्प विष हरण करण्या करितां येत होता त्याणें पूर्वीं असें श्रवण केलें होतें कीं, कोणी पन्नगेश्वर

तक्षक, परिक्षितिराजास दंश करून आज यमलोकीं नेणार यास्तव तक्षकानें दंशकेल्या नंतर मी राजास निर्विष केलें ह्मणजे मला अर्थ संपादन होऊन धर्मही घडेल. असा विचार करीत तो मार्गानें येत आहे हें जाणून नागेंद्रतक्षकानें त्यास अवलोकन करून हा केवळ राजाचीच विषबाधा दूरकरण्यास जातो असें समजून वृद्धब्राह्मणाच्या वेषानें काश्यपास भाषण करितो. हे ब्राह्मणा, तूं येवढ्या त्वरेनें कांगमन करितोस? तुला काय कार्याची इच्छा आहे? असें तक्षकवाक्य श्रवण करून काश्यप भाषण करितो. कुरुकुलांत उत्पन्न झालेल्या परीक्षितिराजास आज तक्षक दंश करणार आहे त्याच्या विषानें अग्नीसम तेजस्वी राजा दह्यमान होत असतां मी जाऊन त्याची विषबाधा दूर करीन. तो राजा पांडववंशाचा कुलवर्धन करणारा आहे. असें काश्यपाचें भाषण श्रवण करून तक्षक भाषण करितो हे ब्राह्मणा, राजास दंश करणारा तक्षक तो मीच आहें, मी दंश केल्यावर राजाची विषबाधा दूर करण्यास तूं समर्थ नाहींस यास्तव तूं माघारा फीर. असें त्याचें भाषण ऐकून काश्यप बोलतो, मी आणि तूं बरोबर राजाकडे गमन करूं. तूं त्यास दंश केल्यावर लागलेंच विद्याबलानें मी राजास निर्विष करीन असें मला वाटतें. असा विषय या अध्यायांत आहे.

४३ अध्याय त्रेचाळिसावा— तक्षक भाषण करितो हे काश्यपा, मीं ज्यास दंश करीन त्यास संजीवन करण्याची इच्छा करितोस तर आतां मी या वृक्षास दंश करितों तूं आपल्या मंत्र बलानें यास जिवंत कर. हे द्विजोत्तमा, तूं पहात असतां आतां हा वृक्ष मी दग्ध करितों. असें तक्षक वाक्य श्रवण करून काश्यप भाषण करितो. हे नागेंद्रा, जर तुझी इच्छा आहे तर या वृक्षास तूं दंश केलास ह्मणजे मी यास संजीवन करितों. असें काश्यपाचें वाक्य श्रवण करून तक्षकानें त्या वृक्षास दंश करितांच तीक्ष्ण विषानें तो वृक्ष प्रज्वलित होऊन भस्म झाला असतां तक्षक काश्यपास भाषण करितो हे ब्राह्मणा, कोणत्या यत्नानें तूं या वृक्षास संजीवन करितोस तो कर. असें तक्षक वाक्य श्रवण करून काश्यपानें भस्मीभूत झालेल्या वृक्षाचें भस्म एकत्र करून तक्षकास भाषण करितो हे पन्नगेंद्रा, माझें विद्याबल या वृक्षाचेठायीं तूं अवलोकन कर तुझे समक्ष हा वृक्ष मी जिवंत करितों. असें भाषण करून नंतर भस्मराशी-

वर विद्याबलानें प्रोक्षण केलें असतां प्रथम अंकुर उत्पत्ती झाली. नंतर दोन पर्णे उत्पन्न झालीं. पुढें बहुत पर्णे व शाखा उत्पन्न होऊन पूर्वीं प्रमाणें वृक्ष जिवंत झाला असतां तक्षक तो वृक्ष जिवंत झालेला पाहून भाषण करितो हे ब्राह्मणा, तुझेठायीं हें अद्भुत कर्म मी पाहिलें. हे द्विजेंद्रा माझें किंवा माझ्या सारख्या अन्याचें विष हरण करून तुला काय लाभ आहे. परीक्षिति राजाकडे कोणच्या इच्छेनें जातोस. राजा पासून ज्या फलाची इच्छा असेल तें दुर्लभ जरी असलें तथापि मी तुला देईन. तूं राजाकडे जाऊं नको. त्यांत मला वाटतें कीं, परीक्षिति ब्राह्मणाच्या शापानें पराभव पावून क्षीणायुष झाला आहे, त्याविषयीं तूं यत्न जरी केलास तथापि अर्थसिद्धि होण्यास संशय दिसतो. कदाचित् राजा जर जिवंत झाला तर आजपर्यंत त्रैलोक्यांत जें यश संपादन केलेंस तें यश तूं एकाएकीं राहुग्रस्त सूर्य जसा तेजहीन होतो तसें नष्ट होईल. असें तक्षक भाषण श्रवण करून काश्यप भाषण करितो. हे भुजंगमा, मीं तेथें धनाच्या इच्छेनें जातों. आतां तुझी इच्छा असल्यास तें यथेंच घेऊन माघारा फिरेन. असें कश्यप वाक्य श्रवण करून तक्षक भाषण करितो हे ब्राह्मणा, त्या राजापासून जेवढ्या धनाची इच्छा असेल त्याहून मीं तुला अधीक देईन तूं माघारा फीर. असें तक्षकाचें बोलणें ऐकून महातेजस्वी व बुद्धिमान काश्यप ब्राह्मण, राजाच्या आयुष्या विषयीं ध्यान करून हा क्षीणायु झाला असें दिव्यज्ञानानें जाणून तक्षका पासून द्रव्य घेऊन माघारा फिरला असतां, तक्षक त्वरेनें हस्तनापुरामध्यें प्रवेश करून मंत्र, औषधी व विषहारी वस्तूनीं राजाचें रक्षण केलें आहे हें श्रवण करून मनांत चिंतन करूं लागला कीं, राजाची वंचना करण्या विषयीं कोणचा उपाय करावा. नंतर तापस वेषानें कांहीं भुजंगमास फल, दर्भ व उदक हस्तामध्यें देऊन भाषण करितो, तुह्मीं निर्भयपणें राजाकडे जाऊन फल, पुष्पें व उदक राजास अर्पण करावीं यामध्यें आपलें कांहीं कार्य आहे. असें तक्षक वाक्य श्रवण करून कांहीं सर्प दर्भ, उदक व फलें घेऊन राजाकडे गेले. राजानें त्या ब्राह्मणापासून फुलें व पुष्पें ग्रहण करून ब्राह्मणांस इच्छित द्रव्य देऊन. आतां तुह्मीं गमन करावें. असें सांगतांच ते कपटी तापसरूपी नाग गेले अ-

सतां, राजा अमात्य व सुहृद्गण यांस भाषण करितो. हीं फळें स्वादु आहे-त मजसहवर्तमान तुह्मीं भक्षण करावीं. हीं तापसांनीं आणलेलीं फळें बहु-त उत्तम आहेत असें भाषण करून राजानें सचिवांसहवर्तमान फळें ग्रहण करण्याची इच्छा केली असतां सर्वांनीं एक एक फल ग्रहण केलें. ज्या फला मध्यें सूक्ष्म रूपानें तक्षक प्रविष्ट झालेला होता तें फल राजानें भक्षण केलें तें फल भक्षण करितां करितां त्यामधून एक अल्प कृमी -हस्व, कृष्णनेत्र व ताम्रवर्ण उत्पन्न झाला. त्या अणुमात्र कृमीस राजा हस्तामध्यें धारण करून सचिवांस भाषण करितो, हा सविता अस्ताचलास गेला आतां म-ला विषापासून भय नाहीं. शृंगीमुनीची वाणी सत्य असो. हा कृमि तक्षक रूपी होऊन मला दंश करो ह्मणजे ब्राह्मण वाक्य सत्य होईल असें राजवाक्य ऐकतांच त्या कालप्रेरित मंत्र्यांनीं राजाच्या वाक्यास अनुमोदन दिलें. रा-जानें तो कृमि आपले मानेवर ठेऊन हास्य केलें असतां इतक्यांत तक्षकानें रा-जा हास्य करितो हें पाहून त्या संधीस आपल्या महान शरीरानें त्यास वेष्टून व मोठ्यानें गर्जना करून दंश केला. असा विषय या अध्यायांत आहे.

४४ अध्याय चवेचाळिसावा - सौति भाषण करितो हे शौनका, स-र्पानें राजास वेष्टन केलेलें सचिवांनीं अवलोकन करितांच म्लान मुख व दुः-खित होऊन रोदन करीत सर्पाच्या नाद श्रवणानें पळूं लागले त्या काळीं तो सर्प आकाशामध्यें उडाला असतां स्त्रियांच्या नील केशांमध्यें सिंदुरा नीं आरक्त केलेल्या भांगा सारिखा दिसूं लागला. तक्षकाच्या विषाग्नीनें तो प्रासाद अग्नीसारखा प्रदीप्त जाहलेला पाहून मंत्री भयाभीत होऊ-न दाही दिशोस पळाले. वज्रघातानें छिन्न झाल्या सारखा राजा पतन पाव-ला. राजा मरण पावला असतां राजपुरोहितानें परलोक साधनीभूत क्रिया राजपुत्राकडून करविल्या. पुढें त्याच्या पुत्रास नगर वासी जनांनीं राज्यासनावर स्थापन केला असतां, तो कौरवांमध्यें श्रेष्ठ शत्रुघात करणा-रा जनमेजय नामें प्रसिद्ध झाला. तो बाल असतांच प्रौढ बुद्धीनें मंत्रीपुरो हितांसहवर्तमान कुरुकुलामध्यें श्रेष्ठ जो आपला प्रपितामह युधिष्ठिर या-सारखा राज्य करूं लागला. नंतर प्रधानांनीं हा शत्रूस ताप देण्यास योग्य

झाला, आतां याचा विवाह करावा असा निश्चय करून सुवर्णवर्मा नामक जो काशिराजा याची वपुष्टमा नामक कन्या वरली. असतां सुवर्णवर्मा राजानें कुरुवीर जनमेजयाची धर्मानें परीक्षा करून वपुष्टमा कन्या त्यास अर्पण केली. नंतर जनमेजय, ती स्त्री ग्रहण करून आनंदें निमग्न असतां, अन्यस्त्रियांची इच्छा न करितां पूर्वी जसा पुरूरवा सरोवरें व प्रफुल्लित वन यामध्यें प्रसन्न अंतःकरणानें उर्वशी सहवर्तमान क्रीडा करीत होता तसा तो वपुष्टमेसहवर्तमान क्रीडा करीत असे तशीच वपुष्टमाही जनमेजय राजा पति प्राप्त झाला असतां पातिव्रत्य धर्मानें त्यासहवर्तमान यथाकालीं क्रीडा करीत होती. असा विषय या अध्यायांत आहे.

४५ अध्याय पंचेचाळिसावा – सौति भाषण करितो हे शौनका, त्या समयांत महातपस्वी जरत्कारु, ज्या ठिकाणीं सायंकाळ होई तेंच गृह कल्पून वास करणारा, सर्व पृथ्वीवर अकृतात्म्यास दुश्चर अशी दुस्तर दीक्षा ग्रहण करून अनेक पुण्य तीर्थांमध्यें स्नान करीत व वायुभक्षण करीत निराहारानें दिवसं दिवस क्षीण होऊन एकाकी संचार करीत असतां आपले पितर निराहारानें कृश व दीन झालेले असून अधोमुख करून गर्तेमध्यें लंबमान झालेले पाहून व त्यांस एक दुर्वांचा तंतु अवशिष्ट राहिला असतां त्यासही हळू हळू मूषक तोडितो हें पाहून त्यांचे समीप जाऊन दैन्यरूपानें भाषण करितो, या विरणस्तंभाचा आश्रय करून लोंबणारे तुह्मी कोण आहांत? या दुर्वा मूलांस मूषकांनीं भक्षण करून दुर्बल केलें. त्यांतूनही एक तंतु शेष राहिलेला त्यास तीक्ष्ण दंतानीं आखु आकर्षण करितो. याचा अवशेष अल्प राहिल्यामुळें लवकरच तुह्मीं नष्ट होऊन अधोमुख या गर्तेमध्यें पडणार, तुह्मांस असें पाहून मला दुःख उत्पन्न झालें, तुह्मीं महाज दुस्तर आपत्तीमध्यें पडलांत तर मी तुमचें काय प्रिय करूं? माझ्या तपाच्या चतुर्थांशानें, तृतीयांशानें किंवा अर्ध्यानें आपत्ती तरण्या विषयीं इच्छा असल्यास मला सांगावें. अगर माझ्या समग्र तपानें तुह्मीं मुक्त व्हा. असें जरत्कारूचें भाषण श्रवण करून पितर भाषण करितात. हे ब्राह्मणश्रेष्ठा, तूं वृद्ध ब्रह्मचारी आह्मांस आपल्या तपानीं तारण्याची इच्छा करितोस. परंतु हे ब्राह्मणा, आह्मां-

स तरण्याला आमच्या तपाचें फल पाहिजे आमच्या संतान क्षयानें आह्मीं अशुचि नरकामध्यें पतन पावणार, संतान हा परम धर्म आहे असें पितामहानें सांगितलें आहे. आह्मी या गर्तेमध्यें लंबमान असल्यामुळें मूर्छिता सारखे आहोंत तूं कोण आहेस याचें आह्मास भान नाहीं, तूं विख्यात, पराक्रमी, दृढ व महा भाग्यवान् असून आह्मीं दुःखित झालेले पाहून आमच्या विषयीं शोक करितोस तर तुझें कारुण्य पाहून आह्मीं कोण आहोंत हें तुला सांगतों श्रवण कर. आह्मीं यायावर नामक ऋषी संशित व्रती आहोंत, पुण्यलोका पासून संतान क्षयानें भ्रष्ट होऊन या गर्तेमध्यें लंबमान आहोंत. आमचें तीव्र तप नष्ट झालें. आतां आमचा तंतु राहिला नाहीं. एक आमचा तंतु जरत्कारु नामानें विख्यात आहे. तो मंदभाग्य आमच्या अल्पभाग्यास्तव केवळ एक तपाचेंच आचरण करून वेदवेदांगपारग, नियतात्मा, सुव्रत व महा तपस्वी असल्यामुळें नसल्या सारखाच आहे. त्याणें केवळ तपाच्या लोभानें आह्मांस या संकटामध्यें टाकिलें. त्यास पुत्र, भार्या, बांधव कोणी नाहींत ह्मणून आह्मीं अनाथा सारिखे नष्ट संज्ञ होऊन गर्तेमध्यें लोंबत आहोंत, यास्तव तुला आमची दया आल्यास तूं त्याजकडे जाऊन सांग कीं, तुझे पितर गर्तेमध्यें दीन व अधोमुख होऊन लोंबतात यास्तव तूं उत्तम स्त्री संग्रह करून तीचाठायीं प्रजोत्पादन कर. हे तपोधना, आमच्या कुलांत एक तोच राहिला आहे. हे ब्राह्मणा, विरणस्तंभाचा आश्रय करून आह्मीं आहोंत आमचा कुलस्तंभ येवढा तुटण्याचा अवकाश आहे. आमचे सर्व तंतु कालानें भक्षण केले. जें मूळ तूं अर्धें भक्षण केलेलें पहातोस व आह्मीं ज्यास लंबमान आहोंत तो तंतु एक जरत्कारु तपाश्रयें करून आहे. जो उंदिर पहातोस तो महाबलवान् काल होय. तपाविषयीं लोभी झालेल्या मंदात्म्या जरत्कारूस आकर्षण करण्याची तो इच्छा करितो यास्तव त्याचें तप आह्मांस तारण्याला समर्थ होणार नाहीं. जसे दुष्कृती अधःपात पावतात तसे आह्मीं हें मूलच्छेद झालें ह्मणजे कालानें नष्ट होऊन अधःपात पावूं. हा तंतु तुटून बांधवां सहवर्तमान आह्मी या गर्तेमध्यें पडलों असतां तूंही नरकामध्यें पडशील असें त्यास सांग. जसें संततीनें पितरांचें

धारण होतें तसें तप यज्ञ किंवा अन्य पवित्र कर्में करून होत नाहीं. हे तात बापा, जशी तूं आमची अवस्था पाहिलीस त्याप्रमाणें तूं जरत्कारूस निवेदन कर. तुझ्या सांगण्यानें आमची त्यास दया येऊन तो स्त्री संग्रह करून पुत्रोत्पादन करील असें कर. तूं आह्मांस पाहून बांधवा सारखा शोक करितोस असा तूं कोण आहेस हें आह्मांस निवेदन कर. असा विषय या अध्यायांत आहे.

४६ अध्याय शेचाळिसावा :- सौति भाषण करितो हे शौनका, पितरांचें भाषण श्रवण करून जरत्कारु पितृदुःखानें शोकपरायण होऊन बाष्पसंदिग्ध वाणीनें भाषण करितो, तुह्मी माझे पूर्वज आहांत यास्तव तुमचें काय प्रिय करूं? काय कार्याची इच्छा आहे? परम पापी जरत्कारु तुमचा पुत्र तो मीच होय मी अकृतात्मा व दुःष्कृती असल्यामुळें दंडास योग्य आहें. असें पुत्राचें भाषण श्रवण करून पितर भाषण करितात हे पुत्रा, आमच्या भाग्यानें तूं स्वइच्छेंकरून फिरतां फिरतां या देशामध्यें आलास, तूं काय कारणानें स्त्री संग्रह केला नाहींस, असें पितर वाक्य श्रवण करून जरत्कारु भाषण करितो हे पितरहो, ऊर्ध्वरेता राहून या शरीरास परलोकीं न्यावें स्त्री संग्रह करूंनये असा माझ्या मनाचा निश्चय होता; परंतु आतां तुह्मांस पक्ष्यां सारखे लंबमान अवलोकन करून मी ब्रह्मचर्या पासून बुद्धि परावृत्त केली, तुमच्या प्रीतीस्तव मी निःसंशय विवाह करीन; परंतु मला स्त्री माझ्या नावाची कोणी भिक्षे सारखी ती अर्पण केली पाहिजे मी अशी कन्या ग्रहण करून तिचें पोषण करणार नाहीं. अशा प्रकारें मला कन्या मिळाली तर मी विवाह करीन नाहीं तर करणार नाहीं. हें मी तुह्मांस सत्य सांगतों, त्या कन्येपासून तुमच्या तारणार्थ एक जंतु उत्पन्न होईल. तुह्मी आतां शाश्वत लोकीं वास करावा. या प्रकारें जरत्कारु पितरांस भाषण करून पृथ्वीवर संचार करित असतां हा वृद्ध आहे असें जाणून कोणी यास कन्या दिली नाहीं यामुळें परम खेदयुक्त होऊन मोठ्या दुःखानें अरण्यामध्यें जाऊन मी कन्येची याचना करितों असें त्रिवार हळु हळु उच्च भाषण करून असें ह्मणूं लागला कीं, मीं अरण्यामध्यें येऊन पितरांच्या हिताच्या इच्छेनें याच्ञा करितों तर आतां या वनामध्यें स्थावर जंगम व अंतरिक्ष भूतें असतील

त्यांणीं माझें वाक्य श्रवण करावें मी उग्र तप करीत असतां पितरांच्या आज्ञेनें विवाह करण्यास प्रवृत्त झालों. ते संतानाच्या इच्छेनें पुनः पुनः विवाह कर असें बोलून दुःखार्त झाले, यास्तव मीं आतां कन्या भिक्षा प्राप्त होण्या करितां सर्व भूमीवर भ्रमण करितों मी तर दरिद्री व दुःखशील आहें. पितरांनीं मला आज्ञा केली ह्मणून विवाहा करितां मी ज्या प्रमाणें कीर्तन केलें त्या प्रमाणें ज्या भूताची कन्या असेल त्याणें येऊन मला कन्या अर्पण करावी मी सर्व दिशांकडे भ्रमण करितों माझी सनाम्नी कन्या भिक्षे सारिखी उद्युक्त होऊन मला अर्पण करावी त्या कन्येचें मी पोषणही करणार नाहीं. सौति भाषण करितो हे शौनका, इकडे वासुकीनें जरत्कारूच्या शोधार्थ ठेविलेल्या पन्नगांनीं हें वर्तमान ऐकून वासुकीस निवेदन केलें, तेव्हां आपल्या दूतांचें वाक्य श्रवण करितांच वासुकीनें अलंकृत केलेली कन्या ग्रहण करून अरण्यामध्यें मुनीसमीप येऊन ती कन्या भिक्षे सारखी त्यास अर्पण केली. त्या कालीं जरत्कारु ती कन्या आपल्या नावाची आहे किंवा नाहीं, तीचें पोषण कोण करील व मोक्षमार्गी राहणाऱ्यास स्त्री संग्रह करणें महत् दुःख आहे असें जाणून केवळ पितृकार्या करितांच प्रवृत्त होऊन तीचें ग्रहण करीत भाषण करितो ईचें नाव काय? ईचें पोषण मी करणार नाहीं! असा विषय या अध्यायांत आहे.

४७ अध्याय सत्तेचाळिसावा– सौति भाषण करितो हे शौनका, जरत्कारूचें वाक्य श्रवण करून वासुकी भाषण करितो हे द्विजोत्तमा, ही कन्या माझी भगिनी तुझ्या नावाचीच आहे. ही तुझी भार्या झाली असतां ईचें पोषण व रक्षण यथा शक्ति मी करीन. हे मुनिवरोत्तमा, तुझ्या करितांच आजपर्यंत मी ईचें रक्षण केलें. असें श्रवण करून जरत्कारु भाषण करितो. ईचें पोषण मी करणार नाहीं हा माझा पण आहे. ईणें माझें कांहीं अप्रिय केलें असतां मी ईचा त्याग करून जाईन. असें श्रवण करून वासुकीनें मी ईचें पोषण करीन, असें भाषण केलें असतां, मंत्रवेत्त्यामध्यें श्रेष्ठ जरत्कारु ऋषि वासुकीच्या गृहीं जाऊन विधिपूर्वक मंत्रांनीं तीचें पाणि ग्रहण करून ऋषींनीं स्तूयमान होऊन पन्नगेंद्राच्या रम्य गृहामध्यें अमोल्य तुलि-

कादि अस्तर्णांनीं रचित शयनावर वास करूं लागला. त्याशय्येवर बसून पुनः स्त्रीस भाषण करितो हे स्त्रिये, तूं माझें अप्रिय करूनकोस केलेंस तर तुझा त्याग करून गमन करीन. या वचनाचें स्मरण ठेव. असें पतीचें भाषण श्रवण करितांच वासुकीची भगिनी परम दुःखित होऊन तें पतीचें वाक्य मान्य करून त्यासहवर्तमान रममाण झाली. जरत्कारु, श्वाना सारखा जागृतपणा, हरणा सारखा भयचकितपणा व काकासारिखें इंगितज्ञान इतके गुण धारण करून दुःस्वभाव भर्त्याचें सेवन करीत असतां ऋतुकालीं स्नान होऊन भर्त्याशीं यथाविधीनें रत झाल्यावर त्यापासून तिला अतितेजस्वी गर्भ राहून वृद्धिंगत होऊं लागला. कोणे एकेकाळीं स्त्रीच्याउत्संकावर जरत्कारूनें मस्तक ठेऊन शयन केलें असतां सूर्य अस्ताचलास जातो असें पाहून वासुकीची भगिनी धर्मलोप होईल यास्तव मनांत विचार करूं लागली कीं, भर्त्यास जागृत केला असतां यास क्रोध येईल न जागृत केला तर धर्म लोप होईल, तस्मात् मी दोन्ही प्रकारांनीं संकटामध्यें पडल्येंतर आतां मी अपराधिनी होणार नाहीं याविषयीं काय करावें; परंतु धर्मशीलाचा कोप व धर्म लोप यामध्यें धर्म लोप महत्तर आहे याजकरितां मी यास जागृत करित्यें. असा निश्चय करून सर्प भगिनी महा तपस्वी जो आपला पति यास मधुर वाणीनें भाषण करित्ये हे महाभागा, सूर्य अस्ताचलास जातो यास्तव उठून हस्त, पाद प्रक्षालन करून व संध्योपासन करून अग्निहोत्र अग्नीनें हवन करावें हा दारुण मुहूर्त आहे, याकाळीं कोणी शयन करीत नाहीं. हे प्रभो, ही पश्चिम संध्या प्राप्त झाली असें तीचें भाषण श्रवण करून जरत्कारु क्रोधानें स्त्रीस भाषण करितो हे भुजंगमे, तूं हा माझा अवमान केलास, आतां तुझ्या समीपभागीं मीं वास करणार नाहीं आल्या मार्गानें गमन करितों. मीं निजलों असतां सूर्याची अस्ताचलास जाण्याची शक्ति नाहीं असें असतां तूं मला जागृत केलेंस त्यापेक्षां मी आतां येथून गमन करितों. असें हृदय कंपित करणारें भर्तृ वाक्य श्रवण करून वासुकीची भगिनी भाषण करित्ये हे विप्रा, मी तुला अपमान करण्यास्तव जागृत केला नाहीं, धर्म लोप न व्हावा या करितां जागृत केला. असें तिणें भाषण केलें असतां जरत्कारूस परम कोप उत्पन्न होऊन तो ह्मणतो मीं कधींही अनृतभा-

षण करणार नाहीं. तुझ्याशीं मी जो पूर्वीं संकेत केला होता त्याप्रमाणें आजपर्यंत येथें सुखेंकरून वास केला. आतां माझ्या संकेताप्रमाणें तूं वर्तणूक केली नाहींस त्यापेक्षां तुझा त्याग करितों हें वर्तमान मी गेल्यावर आपले भ्रात्यास निवेदन कर. तूं फार शोक करूं नकोस. असें श्रवण करून स्त्री भाषण करित्ये हे पती, तुमचें भाषण श्रवण करून मला परम शोक व चिंता प्राप्त जाहली आहे. बाष्पोदकें करून माझी वाणी सद्गदित झाली, मुख शुष्क झालें, नेत्रांतून अश्रुधारा वाहात आहेत, आतां तुह्मांस अंजलीपुट जोडून विनंति करित्ये. माझे हृदयास कंप उत्पन्न होऊन भाषण करण्यास तर अगदीं मी असमर्थ आहें; परंतु धैर्य धारण करून बोलत्यें हे धर्मज्ञा, तूं सकल धर्म जाणतोस मीही धर्मस्थित आहें, असें असतां अपराधा वांचून मला टाकणें तुह्मांस योग्य नाहीं. तुमचें प्रिय करण्या विषयीं मी निरंतर रत आहें. ज्या कारणानें माझ्या भ्रात्यानें तुह्मास मला समर्पण केलें तें कारण कांहीं सिद्ध झालें नाहीं, तेव्हां वासुकी आतां मला शब्द लावील. मातृशापानें आमची ज्ञाति नष्ट होण्याचा समय आला यास्तव माझ्या पासून पुत्र होण्याची इच्छा माझा भ्राता करीत होता तो पुत्र लाभ न जाहल्या मुळें आमच्या ज्ञातीचें कल्याण कसें होईल. हे द्विजा, तुझा माझा जो संयोग झाला हा निष्फल कीं काय? तुझा पासून मला पुत्र होऊन आमच्या ज्ञातीचें कल्याण व्हावें अशी मी प्रार्थना करीत आहें, माझ्यावर आतां प्रसाद करावा. अव्यक्त गर्भ असतां माझा त्याग करून कसे जातां. असें भाषण श्रवण करून जरत्कारु भार्येस बोलतो हे स्त्रिये, तुझें भाषण मी श्रवण केलें हे सुभगे, तुझे उदरीं वैश्वानरोपम ऋषीसमान परम धर्मवेत्ता वेदवेदांगपारग असा गर्भ आहे. तूं काळजी करूं नको. असें तो धर्मात्मा भार्येस हें वर्तमान भाषण करून वनामध्यें उग्र तप करण्याचा निश्चय करून गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

४८ अध्याय अठ्ठेचाळिसावा — सौति भाषण करितो हे शौनका, जरत्कारु आपले भार्येचा त्याग करून वनामध्यें गेला असतां नागकन्येनें तें वर्तमान वासुकीनामक आपले भ्रात्यास निवेदन केलें असतां भुजंगराज

भगिनीचें अप्रिय भाषण श्रवण करून अतिशय दुःखित होऊन दीन झाले-
ली जी आपली भगिनी तीस भाषण करितो हे भद्रे, ज्या कारणास्तव तुला
मी जरत्कारूस दिली तें कार्य सिद्ध झालें किंवा नाहीं. तुझ्या पासून जो पुत्र हो-
णार तो समग्र सर्पांच्या सत्रा पासून मोक्ष करील. असें पूर्वी सुरांसहवर्तमा-
न पितामह बोलला, यास्तव हे सुभगे, त्या ऋषिश्रेष्ठा पासून कांहीं गर्भ राहि-
ला आहे कीं काय? त्या ऋषीस ज्या इच्छेनें मी दान केली ती इच्छा माझी कधीं
निष्फल व्हावयाची नाहीं, तो मोठा मनीषी आहे. हें तुला विचारणें योग्य ना-
हीं; परंतु कार्य मोठें, ज्या पासून आमचें हित व्हावयाचें आहे यास्तव तुला
निरभीडपणें विचारतों सत्य सांग. तपस्वी तुझा भर्ता जिकडे गेला तिकडे त्या-
चा शोध करण्या करितां मी ही त्याचे पाठीमागून गेलों असतों; परंतु तो क-
दाचित् रोष युक्त होऊन शाप देण्यास उद्युक्त होईल या भयास्तव मी त्या-
च्या शोधास जात नाहीं. हे भद्रे, तुला गर्भ धारण झाला आहे किंवा नाहीं या
विषयीं मला मोठी घोर चिंता प्राप्त झाली आहे खरें सांग म्हणजे माझ्या हृद-
यांतलें घोररूप शल्य निवृत्त होईल. असें वासुकीचें भाषण श्रवण करून
भगिनी जरत्कारु, भ्रात्यास आश्वासन देऊन भाषण करिती हे पन्नगेश्वरा,
ज्या कालीं माझा भर्ता वनामध्यें जाऊं लागला त्या काळीं मी गर्भा विषयीं वि-
चारिलें असतां त्या महात्म्यानें उत्तर केलें कीं, तुझ्या उदरांत गर्भ आहे कां-
हीं चिंता करूं नको हे भार्ये, पूर्वीं मी सुखावस्थेमध्यें होतों तेव्हां ही कधीं अ-
नृत भाषण केलें नाहीं, आतां या दुःखकाळीं कशा करितां मी अनृत बोलूं
जें झालें वृत्त तें मी तुला निवेदन केलें. माझ्यावर व्यर्थ संताप करूं नको. ज्व-
लित अर्का सारखा माझ्या पासून पुत्र उत्पन्न होईल असें म्हणून भर्त्यानें
गमन केलें. यास्तव तुझ्या मनांतलें जें दुःख उत्पन्न झालें त्याचा त्याग कर.
असें भगिनीचें भाषण नागेंद्र वासुकीनें श्रवण करून तीच्या भाषणाचा
परम सत्कार केला. आणि तीचें शांतवन व्हावें व मान राहावा म्हणून य-
थायोग्य भगिनीची पूजा केली, पुढें कांहीं दिवसांनीं जरत्कारूचा गर्भ
शुक्लपक्षस्थ शशी सारखा दिवसं दिवस वृद्धि पावूं लागला. कांहीं दिवसां-
नीं ती भुजंग स्वसा प्रसूत झाली, सुवर्ण कांती समान माता पितर यांचें

भयमोचन करणारा देवा सारखा एक कुमार उत्पन्न झाला. तो वासुकीचे गृहींच वृद्धि पावत असतां च्यवन भार्गवा पासून त्या पुत्रास सांग वेद प्राप्तझाले. तो बालबुद्धी सत्वगुणांनीं फार उत्तम व चीर्णव्रती होता, या पुत्राचा पिता जरत्कारु वनामध्यें जातेसमयीं भार्येसि ह्मणाला कीं हे भार्ये, तुझ्या उदरांत गर्भ आहे अशा कारणानें सर्व ब्राह्मणांनीं या पुत्राचें नामाभिधान आस्तीक असें ठेविलें. असा हा आस्तीक नामक बालक अमित बुद्धी सर्वांनीं परिरक्षित होऊन वासुकीचे गृहीं वास करीत असतां जसा भगवान् देवेशशूलपाणीच वृद्धि पावतो काय! असा तो वृद्धि पाऊन आपल्या पन्नग कुलास त्याणें हर्षित केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

४९ अध्याय एकुणपन्नासावा - शौनक प्रश्न करितात हे सूतपुत्रा, जनमेजयराजानें आपला पिता जो परीक्षितिराजा यास स्वर्गगति कोणच्या प्रकारें झाली असा प्रश्न आपले मंत्र्यांस केला असतां त्याचें उत्तर जें त्यांनीं दिलें तो वृत्तांत विस्तारें करून आह्मांस सांग. नंतर सूतपुत्र भाषण करितो हे शौनका, आतां तें विस्तारें करून तुला सांगतों श्रवण कर. कोणी एकेकाळीं जनमेजयानें आपले मंत्र्यांस असा प्रश्न केला कीं हे मंत्रीहो, माझ्या पित्याचें मरण वृत्त सर्व तुह्मांस यथास्थित विदित आहे यास्तव तुमच्या मुखा पासून श्रवण करण्याची इच्छा प्राप्त झाली आहे पित्याचें वर्तमान श्रवण करून कल्याण होईल विपरीत कधींही होणार नाहीं यास्तव सविस्तर वर्तमान निवेदन करा? असा जनमेजयाचा प्रश्न श्रवण करून सकलधर्मवेत्ते मंत्री जनमेजयराजास त्याच्या पित्याचें सविस्तर वर्तमान सांगण्याच्या उद्देशानें भाषण करितात हे जनमेजयराजा, तुझा पिता परीक्षितिराजा मोठा धर्मात्मा व प्रजापालनाविषयीं तत्पर होता. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चारवर्ण त्याणें आपआपल्या धर्मामध्यें संरक्षित केले होते. साक्षात् धर्ममूर्तीच काय, असे लोक त्यास ह्मणत असत. तो अतुल पराक्रमी होता. त्याणें पृथ्वीचें उत्तम प्रकारें करून रक्षण केलें. तो समग्र भूतांवर समदृष्टि ठेवीत असे. विधवा, अनाथ, अंगविकल, कृपण व दीन यांचें पोषण करण्या विषयीं मोठा तत्पर असून सर्वांसि प्रिय असे. सत्यवाक्, दृढपराक्रमी होता.

कृपाचार्यापासून त्यास धनुर्विद्या प्राप्त झाली. भगवानास तुझा पिता प्रिय असे. तसेच सर्व लोक त्यास अत्यंत प्रिय होते. असा महा यशस्वी तुझा पिता सकल कौरव कुल क्षीण झालें असतां उत्तरे पासून उत्पन्न झाला. तो राजधर्मामध्यें कुशल, सर्व गुणांनीं युक्त, जितेंद्रिय, प्रज्ञावान्, कामक्रोधादि षड्वर्ग जेत्ता असा होता. त्याणें साठ वर्षें पर्यंत प्रजांचें पालन करून शेवटीं परम लोकीं गमन केलें त्याकालीं सकल प्रजेस परम दुःख झालें. पुढें तूं बाल्यावस्थेमध्येंच होतास तेव्हां तुला राज्याभिषेक केला असतां राजा, तूंही धर्मेंकरूनच प्रजेचें पालन उत्तम प्रकारें करूं लागलास. असें हें कुरुकुलांतलें राज्य सहस्र वर्षें पर्यंत चालत आलें. असें पित्याचें वर्तमान मंत्री मुखा पासून श्रवण करून जनमेजयराजा पुनः मंत्र्यांस भाषण करितो हे मंत्रीहो, आमचें कुलामध्यें ब्राह्मणांशीं द्वेष करणारे असे राजे कधींही झाले नसतील, प्रजांस प्रियकारक असेच राजे आमच्या वंशांत झाले. तेव्हां माझा पिता उत्तम कुलांत झाला असतां त्यास कोणाच्या प्रकारें करून मरण प्राप्त झालें तें तत्वें करून श्रवण करण्याची मी इच्छा करितों. सूत भाषण करितो हे शौनका, असा जनमेजयाचा प्रश्न श्रवण करून परमहितेच्छु मंत्र्यानीं सविस्तर वर्तमान त्यास निवेदन केलें. हे राजा, तुझ्या पित्यास मृगया फार प्रिय होती. कोणे एके दिवशीं तो अरण्यांत मृगये करितां गेला. जसा पांडुराजा मृगये करितां वनामध्यें गेला होता तसा तुझा पिता मृगयेच्या हेतूनें गेला असतां अंगामध्यें चीलखत घालून बद्धकलापी (बाणाचा भाता) पदाती होऊन परम त्वरें करून गहन वनामध्यें बाणानें एक मृग विद्ध करून आणखी दुसऱ्या मृगाचें अन्वेषण करावें ह्मणून वनामध्यें फिरत असतां परम विश्रांत होऊन क्षुधित झाला. साठवर्षांच्या वयाचा तो असल्यामुळें जरें करून व्याप्त झाला होता. अरण्यांत कांहींतरी कोठें भक्षणास मिळेल या कारणानें फिरतां फिरतां एक मुनीचा आश्रम पाहून त्यांत शिरला. मुनि मौनव्रत धारण करून ध्यानस्थ आहे त्यास राजानें तुह्मी कोण ह्मणून प्रश्न केला; परंतु मुनीचें मौन व्रत होतें यास्तव त्याणें राजास कांहींच उत्तर दिलें नाहीं ह्मणून राजास परम कोप आला. या मुनीचें मौनव्रत आहे हें राजाचे ध्यानांत आलें नाहीं. स्थाणूसारखा मौनि, शांत अशातें अवलोकन करून तुझा

पित्यानें त्याचें धर्षण करावें अशा बुद्धीनें मृत सर्पाचें कलेवर पडलें होतें तें धनुष्याच्या कोटीनें उचलून त्या शमीकाच्या स्कंधावर ठेविलें असतांही तो ऋषि कांहीं क्रोधास न येतां व साधु किंवा असाधु याचाही विचार न करितां तें कलेवर स्कंधावर धारण करून स्तब्ध बसला होता. असा विषय या अध्यायांत आहे.

५० अध्याय पन्नासावा.– मंत्री भाषण करितात हे जनमेजय राजा, तुझा पिता परीक्षिति मुनीच्या गळ्यांत भुजंगाचें कलेवर घालून क्षुधनें श्रांत होऊन स्वनगरास आला. त्या ऋषीचा एक पुत्र गवी नामक भार्येपासून उत्पन्न झालेला शृंगी नामक मोठा यशस्वी व अत्यंत कोपी असा होता. तो आचार्यपूजे करितां जात असतां शृंगीचा एक सखा होता त्याणें येऊन ऋषीस सांगीतलें कीं, तुझ्या पित्याच्या गळ्यांत परीक्षितिराजानें मृत सर्पाचें कलेवर घालून स्वनगरीं गेला. मंत्री भाषण करितात हे राजा, शमीकऋषि महा तपस्वी वृद्ध मौनव्रत तत्पर व सर्व भूतानीं शरण जाण्यास योग्य असा असतां त्याच्या पुत्रानें हें राजाचें दुष्कर कर्म श्रवण करितांच तुझ्या पित्यास रोषयुक्त होऊन असा शाप दिला कीं, हे राजा माझा पिता अनपराधी असतां तूं मृत सर्पाचें कलेवर त्याचे गळ्यांत घातलेंस त्यापेक्षां हे दुष्टा, आजच्या दिवसा पासून सात रात्रीचे आंत माझ्या वाक्य प्रेरणेनें महान् विष धारण करणारा नागराज तक्षक आपल्या विषेंकरून तुझें दहन करील. असा शृंगीनें शाप देऊन आपला पिता ज्या स्थळीं होता त्या स्थळीं जाऊन त्यास शापाचें वर्तमान सांगितलें असतां तें वर्तमान शमीकऋषीनें श्रवण करितांच त्याचा एक शिष्य गौरमुख नामक होता त्यास ऋषीनें सांगितलें कीं, परीक्षितिराजाकडे शीघ्र गमन करून त्यास निवेदन कर कीं, माझ्या पुत्रानें तुला असा शाप दिला आहे कीं, सप्त रात्रींचे आंत नागराज तक्षक येऊन तुझा घात करील तूं सावध राहा. या प्रकारें गुरूची आज्ञा होतांच शिष्यानें राजाकडे येऊन सर्व वर्तमान राजास निवेदन केलें. असा गौरमुख शिष्यापासून शृंगीचा घोर शाप राजास कळतांच भयचकित होऊन स्तब्ध बसला. यास साहा दिवस अतिक्रांत झाले. सातवे दिवशीं काश्यप नामक ऋषी-

नें हें वर्तमान श्रवण करितांच तो परीक्षितिराजाकडे येण्यास निघाला. इकडून तक्षकनागराजही राजास दंश करण्या करिता निघाला. मार्गांत उभयतांची भेट होऊन नागराज काश्यपऋषीस प्रश्न करितो, तुह्मी कोण? कशा करिता इतके तरित जातां? काय तुमचे इतके त्वरेचें कार्य आहे तें मला निवेदन करा? असा नागराज सर्पाचा प्रश्न श्रवण करून काश्यपऋषि भाषण करितो हे द्विजा, परीक्षिति नामक राजा आहे त्यास आज तक्षक सर्प येऊन दंश करून त्याचा प्राण नाश करणार असें मला समजलें, यास्तव परम त्वरेनें मीं तेथें जाऊन त्यास संजीवन करणार माझी त्याची गाठ पडली असतां सर्पाची बाधा राजास होणार नाहीं. असें माझें सामर्थ्य आहे. असें काश्यपाचें वाक्य श्रवण करून तक्षक भाषण करितो, अरे मी दंश केला असतां त्यास तूं संजीवन करण्याची का इच्छा करितोस तक्षक ह्मणतात तो मीच, माझें वीर्य काय आहे तें पहा. ज्यास मी दंश करीन त्यास संजीवन करण्याचें सामर्थ्य तुझें नाहीं. असें तक्षकानें भाषण करून तेथें एक मोठा वृक्ष होता त्यास नागराजानें दंश करितांच तत्काल त्याचें भस्म झालें. हें काश्यप ब्राह्मणानें पहातांच पुनः त्या वृक्षास संजीवन केलें. असा हा ऋषीचा अद्भुत चमत्कार पाहून तक्षक ऋषीस भाषण करितो. काय तुझी इच्छा आहे ती सांग. तुझी इच्छा पूर्ण करितों. असें तक्षक वाक्य श्रवण करून काश्यप भाषण करितो, मीं धनाच्या इच्छेनें राजाकडे जातों. असें काश्यपाचें भाषण श्रवण करून तक्षक पुनः कोमल वाणीनें भाषण करितो हे ब्राह्मणा, जितकें धन राजा पासून प्राप्त होण्याची तुला इच्छा असेल त्यापेक्षां मीं तुला अधिक देतों; परंतु तूं येथून माघारा जा. इतकें भाषण झाल्यावर तक्षकानें ब्राह्मणास जितकें पाहिजे तितकें धन दिलें तें ग्रहण करून काश्यपऋषि तेथून माघारा गेला. नंतर तक्षकानें कपट वेष धारण करून धार्मिक तुझा पिता प्रासादावर स्थित होता तेथें जाऊन त्यास दंश करून प्राण घेतला. तदनंतर हे जनमेजया, त्या राज्यावर तुला अभिषेक केला हें वर्तमानही श्रवण केलेलें व पाहिलेलें तुला यथातथ्य निवेदन केलें यामध्यें परीक्षितिराजाचा व उत्तंक ब्राह्मणाचा तक्षकानें नाश केला. यास्तव याउपर तुला जें कर्तव्य असेल तें कर. सौति भाषण करि-

तो हे शौनका, असें मंत्र्यांचें भाषण श्रवण करून राजा भाषण करितो हे मंत्रीहो, हें चरित्र अरण्यामध्यें झालेलें तुह्मांस कोणी सांगितलें. हें मोठें आश्चर्य आहे कीं, नागराजानें वृक्ष भस्मीभूत केला असतां काश्यपानें त्यास संजीवन केला त्या काळीं पापात्मा जो नागराज यास महान् चिंता उत्पन्न झाली कीं, मी राजास दंश केला असतां हा ब्राह्मण जाऊन त्यास संजीवन करील आणि तेणें करून लोकांमध्यें अशी उपहास्यता होईल कीं, तक्षक आतां नष्ट विष झाला यांत कांहीं विषाचें तेज राहिलें नाहीं. नंतर तक्षकानें ब्राह्मणास बहुत द्रव्य देऊन संतुष्ट करून माघारा लाऊन दिला; परंतु मला एक गोष्ट श्रवण करण्याची आहे कीं, निर्जन वनामध्यें हा नागराजाचा व काश्यपाचा संवाद झालेला कोणी ऐकिला व पाहिला व तुह्मास कोणी निवेदन केला हें मी श्रवण करून तक्षकाच्या नाशा विषयीं विचार करीन. असें राजाचें भाषण श्रवण करून मंत्री भाषण करितात हे राजा, जो वृक्ष नागराजानें आपल्या विषें करून दग्ध केला. तो वृक्ष शुष्क झाला होता ह्मणून इंधनें काढण्या करितां पूर्वींच एक ब्राह्मण त्याजवर चढला होता तो त्या वृक्षावर जळून गेला. पुढें ज्या काळीं काश्यपानें तो वृक्ष संजीवन केला त्या काळीं तो ब्राह्मणही संजीवन झाला. तो ब्राह्मण वृक्षावर आहे हें उभयतांसही माहीत नव्हतें त्या ब्राह्मणानें येऊन आह्मांस प्रत्यक्ष झालेलें वर्तमान सांगीतलें तें आह्मी तुला निवेदन केलें. आतां या पुढें तुला जें कर्तव्य असेल तें कर. सौति भाषण करितो हे शौनका, या प्रकारें झालेलें वर्तमान मंत्री मुखा पासून राजानें श्रवण करून परम दुःखार्त होऊन हातावर हात चोळून वारंवार श्वासोश्वास टाकून नेत्रां पासून अश्रुपात करीत रोदन करूं लागला. असा राजास दुर्धर शोक होऊन एक मुहूर्त पर्यंत स्तब्ध बसला. नंतर मंत्र्यांस ह्मणाला कीं, माझ्या पित्याची स्वर्गगति तुमच्या मुखा पासून श्रवण करून माझ्या मतीचा जो आतां निश्चय झाला आहे तो तुह्मांस सांगतों श्रवण करा. हें सर्व कपट दुरात्म्या तक्षकाचेंच आहे, शृंगीऋषि हा मात्र व्यर्थ कारण आहे; परंतु दुष्ट कर्म तक्षकानेंच केलें. काश्यप ब्राह्मण इकडे येऊन माझ्या पित्यास जिवंत करील ह्मणून त्यास लोभ ग्रस्त करून धन दानानें त्यास माघारा फिरविला. हें

कपट नागराजाचें होय. राजा जिवंत झाला असतां माझ्या विषास न्यूनता येऊन लोकांमध्यें उपहास्यता होईल ह्मणून या दुष्टानें ब्राह्मणास धन देऊन माघारा लाविला. तस्मात् हें सर्व कपट तक्षकाचेंच आहे. यांत दुसरा कोणाचा अपराध नाहीं. तक्षकाचा अपराध होय. बरें आतां उत्तंक ऋषीचें माझें तुमचें व पित्याचें जेणेंकरून प्रिय होईल असें करितों. असा विषय या अध्यायांत आहे.

५१ अध्याय एकावन्नावा– सौति भाषण करितो हे ब्रह्मन्, जनमेजयराजानें पूर्वोक्त भाषण करून मंत्री व अमात्य यांचें अनुमोदन घेऊन सर्पसत्र याग करण्याची प्रतिज्ञा केली. नंतर आपले पुरोहितास निमंत्रण करून भाषण करितो, माझ्या पित्यास दुरात्म्या तक्षकानें मारलें. यास्तव त्या तक्षकाचा नाश कर्तव्य आहे या विषयीं कांहीं तरी एक अद्भुत कर्म तुह्मी करा. ज्या दुष्टानें माझा पिता विषाग्नीनें दग्ध केला तो तक्षक सबांधव अग्नीमध्यें प्रदीप्त होईल असा कांहीं यत्न करण्यास मीं इच्छा करितों. त्या पापी दुष्ट पन्नगाच्या नाशाची लवकर योजना करा. असें जनमेजयाचें भाषण श्रवण करून ऋत्विज भाषण करितात हे राजा, तुझ्याच करितां पूर्वी देवांनीं सर्पसत्र ह्मणून एक याग पुराणामध्यें पठित आहे. त्या यागाचा कर्ता तूंच आहेस असें पुराणवेत्ते यांणीं आह्मांस कथन केलें आहे. इतकें ऋत्विजांनीं भाषण करितांच तक्षक अग्नीमध्यें पतन पावला असें मानून राजा मंत्रवेत्त्यांस ह्मणाला कीं, महान् महान् ब्राह्मणांस लौकर निमंत्रणी करा. साहित्याची लौकर सिद्धता करा. अशी राजाची आज्ञा श्रवण करून समग्र ऋत्विजांनीं ज्याठिकाणीं यज्ञमंडप करावयाचा ती जागा किती लांब रुंद पाहिजे त्याविषयीं भूमीची गणना केली. वेदवेदांगपारग मोठमोठे शिष्ट परम बुद्धिमान् असे ब्राह्मण एकत्र जमून धनधान्यांनीं समृद्ध, ऋत्विजांनीं सेवन करण्यास योग्य, यथाविधी असें यज्ञस्थान सिद्ध करून सर्पसत्रयाग संबंधी राजास दीक्षा देण्याचा विचार करूं लागले असतां स्थपति ह्मणून कोणी एक बुद्धिवान् वास्तुविद्याविशारद, शिल्पशास्त्र प्रवीण होता त्याणें राजास सांगितलें कीं, या तुझ्या सर्पसत्रयज्ञामध्यें मोठें विघ्न उत्पन्न होईल कीं, कोणी एक ब्राह्मण निमित्त होऊन तुझा क्रतु समाप्त होऊं देणार नाहीं. हे राजा, ज्या देशांत ज्या काळीं हा क्रतु होईल त्याका-

ळीं याऋतूस कोणी ब्राह्मण निमित्त होऊन ऋतूचा विघात करील असें पूर्वीं सिद्ध आहे. असें पूर्वीं स्थपतीचें भाषण श्रवण करून राजा दीक्षा घेण्याचे पूर्वीं द्वारपालास भाषण करितो कीं माझ्या आज्ञेवेरीज आंत कोणाचा प्रवेश होऊं देऊंनका. असा विषय या अध्यायांत आहे.

५२ अध्याय बावन्नावा:- सौति भाषण करितो हे शौनका, यज्ञ करविणारी मंडळी यथाविधी आपआपल्या अधिकारावर सिद्ध होऊन सर्पसत्र नामक यागास आरंभ झाला. कृष्णवस्त्रें त्याणीं परिधान केलीं होतीं, धूम्रानें ज्यांचे नेत्र आरक्त झाले होते, नानाप्रकारच्या मंत्रांच्या योगें अग्नि प्रदीप्त करून हवन करण्यास आरंभ करितांच समग्र सर्पांचीं मनें कंपित होऊन समुदायांचे समुदाय प्रदीप्त झालेल्या अग्नीमध्यें येऊन पडूं लागले, किती एक सर्प एकमेकांस हांक मारून दीन होऊन अग्निमुखांत पतन पावूं लागले. कोणी सर्प आपल्या पुच्छाच्या योगें एकमेकांस वेष्टन करून शिरें आच्छादन करीत असतांही मंत्रवेगानें येऊन अग्नीमध्यें पतन पावले. कांहीं श्वेतवर्ण, कांहीं कृष्णवर्ण, कांहीं नीलवर्ण, कांहीं स्थवीर, कांहीं शिशु इत्यादि जातीचे सर्प नानाप्रकारचे भयंकर शब्द करीत अग्निमुखांत प्रवेश करूं लागले. कोणीं क्रोशमात्र लांब, कोणी योजनमात्र लंबायमान, कांहीं गोकर्णाकृती प्रमाण असे नाना प्रकारचे सर्प मोठ्या वेगानें अग्नीमध्यें प्रवेश करिते झाले. याप्रकारें शतसहस्रशः प्रयुत अर्बुद संख्याक सर्प अग्नीमध्यें नष्ट झाले. कांहीं अश्वासारिखे वेगवान्, कांहीं गजासारिखे, कांहीं मत्तमातंगा सारिखे मोठ मोठीं ज्यांची शरीरें, कांहीं मोठे, कांहीं लहान, कांहीं चित्रविचित्र वर्णाचे, कांहीं विषें करून जाज्वल्यमान, कांहीं घोर अर्गले सारिखे असे सर्प मातेच्या वाक्‌दंडें करून पीडित होऊन अग्नीमध्यें नाशास पावले. असा विषय या अध्यायांत आहे.

५३ अध्याय त्रेपन्नावा:- शौनक प्रश्न करितात हे सूत पुत्रा, जनमेजय राजानें सर्प सत्र केलें त्यामध्यें ऋत्विज कोण कोण ऋषी होते, तसेंच पन्नगांस भय उत्पन्न करणाऱ्या सर्पसत्रांत सदस्य कोण होते, सर्पसत्राचें विधान जाणणारे असे किती होते हें विस्तारें करून आह्मांस निवेदन कर. नंतर सौती भाषण करितो हे शौनका, सर्पसत्रामध्यें ऋत्विज, सदस्य कोण कोण होते ते सांग-

तों श्रवण करा. च्यवनभार्गवाचे कुलांत उत्पन्न झालेला वेदवेत्यामध्यें श्रेष्ठ चं-डभार्गवास होता केला होंता, कौत्सकुलोद्भव जैमिनिनामक वृद्ध ब्राह्मण उद्गाता होता, अंगिरानामकऋषि ब्रह्मा आणि पिंगलनामक ऋषि अध्वर्यु हे चार ऋत्विज होते. आतां सदस्य ह्मणजे सभासद किती होते ते सांगतों. पुत्र व शिष्य यांसहवर्तमान व्यास, उद्दालक, प्रमतक, श्वेतकेतु, पिंगल, असित, देवल, नारद, पर्वत, आत्रेय, कुंडजठर, कालघट, वात्स्य, वृद्ध व वेदाध्ययनशील असा श्रुतश्रवा. कोहल देवशर्मा मौद्गल्य समसौरभ हे ऋषि व अन्य वेदवेदांगपारग असे ब्राह्मण पारीक्षितीचे सत्रामध्यें बहुत सभासद होते. हे समग्र ऋत्विज होम करीत असतां प्राण्यांस भय देणारे घोर असे सर्प असंख्यात अग्निकुंडामध्यें पतन पावले. सर्पांच्या वपा व मेद दग्ध झाल्यामुळें त्यांचा गंध चोंहीकडून सुटला. जशा नद्या पृथ्वीवर दिसतात तसे सर्पांचे समुदाय वाहात वाहात अग्नीमध्यें येऊन पडूं लागले. ज्या तक्षकानें राजास दंश केला, तो तक्षक परम भयाभीत होऊन इंद्रलोकास जाऊन सर्पसत्राचा वृत्तांत त्यास सांगून भाषण करितो हे इंद्रा, मी भयभीत झालों मीं मोठा अपराधी आहें. आतां या सत्रापासून माझें जसें संरक्षण होईल तसें करावें. मी शरणांगत आलों. असें तक्षकवाक्य श्रवण करून इंद्रास करुणा येऊन भाषण करितों हे तक्षका, मी तुझ्यावर सुप्रीत आहें. तुला सर्पसत्रापासून कांहीं भय नाहीं. तुझ्या करितांच पूर्वीं मी ब्रह्मदेवास प्रसन्न करून घेतला आहे. हे नागेंद्रा, तुझ्या मनांत जें भय उत्पन्न झालें आहे तें टाक. या प्रकारें त्या भुजंगोत्तमास इंद्रानें आश्वासन दिलें असतां त्याचे गृहीं सुखें करून वास करूं लागला; परंतु वासुकीस तर असंख्याक सर्प अग्नींत दग्ध झाले हें पाहून मोठें दुःख झालें. आपला परिवार अल्प राहिला आतां पुढें काय करावें ह्मणून त्यास परम चिंता उत्पन्न झाली असतां सर्पांचा क्षय पाहून त्यास मूर्च्छा आली. नंतर तो अंतःकरणांत अस्वस्थ होऊन भगिनीस भाषण करितो हे भगिनि, जनमेजयराजाच्या सर्पसत्रसंबंधी प्रदीप्त झालेला अग्नि अवलोकन करून पराधीन होऊन पृथ्वीवर आतां पतन पावतों. हे स्वसे, ज्या कार्याकरितां मी जरत्कारूस तुला दिली त्या कार्याचा आज उदय प्राप्त झाला आहे. आह्मां बांधवांस आतां दुःखापा-

सून मुक्तकर. हे भुजंगोत्तमे, तुझ्या आस्तीकनामक पुत्रास त्या यज्ञामध्यें पाठीव ह्मणजे तो तेथें जाऊन राजाचा प्रतिषेध करील. मला पूर्वी ब्रह्मदेवानीं सांगीतलें होतें कीं, आस्तीक यज्ञामध्यें जाऊन तो यत्त प्रतिषेधद्वारा समास करून तुह्यांस दुःखा पासून मुक्त करील. हे वत्से, तुझा कुमार लहान आहे असें तूं समजूं नको हा वृद्धापेक्षांहीं बुद्धीनें महान श्रेष्ठ आहे यास लवकर पाठविण्याचा यत्न कर ह्मणजे सभृत्य सबांधव यांसहित तो आह्मांस मुक्त करील. असा विषय या अध्यायांत आहे.

५४ अध्याय चौपन्नावा:- सौति भाषण करितो हे शौनका, वासुकीनें भाषण श्रवण करून ती भुजंगमा जरत्कारु, आपले पुत्रास हांक मारून भाषण करित्ये हे पुत्रा, माझा भ्राता जो वासुकी याणें तुझ्या पित्यास ज्यानिमित्तानें मला अर्पण केली तो काळ आज प्राप्त झाला आहे, यास्तव त्याचा यथा तथ्य विचार कर. असें मातृ वचन श्रवण करून आस्तीक भाषण करितो हे माते, तुझ्या भ्रात्यानें माझ्या पित्यास तुला दिली याचें कारण मला विदित नाहीं. तें विदित केलेंस ह्मणजे तें करण्यास उद्युक्त होतों. असें श्रवण करून जरत्कारु दीन न होतां पूर्वीचा वृत्तांत सांगत्ये हे पुत्रा, सर्पकुलाची माता कद्रु ह्मणून होती, तिला एकेदिवशीं कोप येऊन आपले पुत्रांस शाप दिला. तो कोप येण्याचें कारण सांगत्ये. विनता आणि कद्रु या उभयतां काश्यपाच्या स्त्रिया होत्या. एके दिवशीं त्यांचा असा पण पडला कीं, उच्चैश्रवा नामक इंद्राचा अश्व आहे त्याचा वर्ण कोण आहे. तेव्हां विनता जो वर्ण ह्मण नहोतीतोवर्ण मिथ्या व्हावा ह्मणून कद्रु आपले पुत्रांस ह्मणाली कीं अरे पुत्रानो, तुह्मीं इंद्रलोकीं जाऊन इंद्राच्या अश्वाचा रंग मी ह्मणत्यें तसा आपल्या विषाच्या योगें करा ह्मणजे माझा पण सिद्धीस जाऊन विनता माझी दासी होईल हें पुत्रांनीं स्वीकारलें नाहीं ह्मणून तिणें कोपयुक्त होऊन असा शाप दिला कीं हे पुत्रहो, जनमेजय राजाच्या गृहीं सर्पसत्र होईल तेथें तुह्मीं सर्व अग्नीमध्यें दग्ध होऊन यमलोकीं गमन कराल. हा शाप जेव्हां तिणें दिला तेव्हां तेथें ब्रह्मदेव होते त्याणीं भाषण केलेंकीं हे कद्रु, तूं ह्मणत्येस त्याप्रमाणें होईल या विषयीं माझेंही अनुमोदन आहे. हें वर्तमान वासुकीनें श्रवण केलेंच होतें पुं

कांहीं दिवसानीं अमृत मंथन समय प्राप्त झाला असतां वासुकी मंथाची र-
ज्जु झाला. नंतर समुद्रा पासून अमृत उत्पन्न होऊन देवांस मिळाल्यामुळें कृ-
तकार्य झाले. तेव्हां वासुकीस पुढें करून संपूर्ण देव ब्रह्मलोकीं जाऊन त्याणीं
प्रार्थना केली कीं हे महाराज, वासुकीस जो शाप झाला आहे त्याची बाधा
त्यास नव्हावी. असें देवांचें भाषण श्रवण करून ब्रह्मदेवानीं सांगितलें कीं,
या वासुकीची भगिनी जरत्कारु नामें आहे, तीला तीच्याच नावाचा जरत्का-
रु नामक भर्ता ज्या काळीं मिळेल त्या काळीं इजपासून एक पुत्र उत्पन्न होई-
ल तो संपूर्ण पन्नगांस शापा पासू न मुक्त करील. हें ब्रह्मदेवाचें भाषण वा-
सुकीनें श्रवण करून तुझा पिता जो जरत्कारु यास मला समर्पण केली हे
पुत्रा, त्या जरत्कारू पासून माझेठायीं तूं उत्पन्न झालास तो काल आज
माझे बांधवांवर प्राप्त झाला आहे त्यांस भया पासून तूं मुक्त कर. हे धीम-
ते, यांच्या मुक्तते विषयीं जो तूं उपाय करशील तो तुझा व्यर्थ होणार नाहीं.
तुझ्या पित्याला मला देण्याचें मुख्य कारण यांची मुक्तता व्हावी हेंच होय.
या प्रकारें मातेचें भाषण श्रवण करून आस्तीक भाषण करितो हे माते, तूं
कांहीं दुःखी होऊं नको. दुःख संतप्त जो वासुकी याचा मीं नाश होऊं देत नाहीं,
असें मातेस सांगून वासुकीस ह्मणतो हे पन्नगोत्तमा, शापा पासून मी तु-
ह्मांस मुक्त करितों. कांहीं काळजी करूं नका. स्वस्थ अंतःकरणें करून रहा.
माझी वाणी कधीं ही मिथ्या होणार नाहीं. दीक्षित झालेला जो जनमेजय
राजा त्याच्या यज्ञायतनांत जाऊन उत्तमोत्तम स्तावक मंगल वाणीनें त्याचें
स्तवन करून तो यज्ञा पासून निवृत्त होईल असें करितों. असें आस्तीकाचें
भाषण श्रवण करून वासुकी भाषण करितो हे आस्तीका, माझें हृदय अ-
गदीं विदीर्ण होऊन गेलें. दिग्भ्रम झाला आहे. ब्रह्मदंडें करून अगदीं पी-
डित झालों माझें भय जात नाहीं. असें श्रवण करून आस्तीक भाषण
करितो हे पन्नगोत्तमा कांहीं संताप करूं नको. दीप्ताग्नी पासून जें भय तु-
ला प्राप्त झालें आहे त्याचा मी नाश करीन. कालाग्नी सारखा घोर जो ब्र-
ह्मदंड तत्संबंधीं भय जरी, तुला प्राप्त झालें तथापि त्याचा मी नाश करीन.
असें आस्तीकानें भाषण करून वासुकीचा मनोज्वर घालवून आपण

परम त्वरेंकरून जो निघाला तो जनमेजयराजाच्या यज्ञसभेस आला. ती सभा विद्वान् ब्राह्मणांनीं युक्त व सूर्याग्नी सारिख्या तेजस्वी सदस्यादि ऋत्विजांनीं सुशोभित अवलोकन करून सभेच्या द्वारप्रदेशीं जातांच द्वारपालांनीं जरी त्याचें निराकरण केलें तथापि आस्तीक ऋषीनें द्वारपालांजवळ यज्ञाचें मोठें स्तवन करून त्यांची मर्जी संतुष्ट केली. नंतर आपण कार्यार्थीआहोंत असें जाणून यज्ञायतनांत प्रवेश करितांच प्रथमतः जनमेजयराजाची, ऋत्विजांची व सदस्यांची स्तुति करून अग्नीचेंही उत्तम स्तवन करूं लागला असा विषय या अध्यायांत आहे.

५५ अध्याय पंचावन्नावा — आस्तीकऋषि राजाचें स्तवन करितो. हे भारतांग्रय पारीक्षितराजा, जसे सोमानें, वरुणानें व प्रजापति यांनें जो हे यज्ञ केले. तसा हा राजा तुझा यज्ञ अत्यंत शोभतो. तुझें कल्याण असो या यज्ञांतील ऋत्विज व सदस्य सर्व विद्वान आहेत यांचेंही कल्याण असो. हे राजा, जसे शतक्रतु इंद्रानें शंभर यज्ञ केले, तसाहा तुझा एकच यज्ञ शंभर यज्ञाचे ठिकाणीं आहे. असा परमश्रेष्ठ तुझा यज्ञ होय. यास्तव राजा तुझें कल्याण असो. जसा युधिष्ठिरराजानें यज्ञ केला तसा हा तुझा यज्ञ मोठा शोभायमान आहे. हे राजा, तुझ्या ऋत्विजांसारखे या लोकांत कोंणी ऋत्विज नाहींत असा द्वैपायनानीं निश्चय केला आहे. या ऋत्विजांचे शिष्य क्षितीवर बहुत आहेत तेही तसेच दीक्षित होऊन आपआपल्या कर्मामध्यें परम निपुण आहेत. तसा हे राजा, तुझ्या यज्ञांतील अग्नि प्रदीप्त असून ज्याच्या ज्वाला प्रदक्षिणावर्त आहेत, तो तुझ्या होमसंबंधी द्रव्याचें भक्षण करण्याची इच्छा करितो. हे राजा, या जीवलोकीं तुझ्या समान प्रजेचें रक्षण करणारा व धैर्यवान् असा नृप कोणी नाहीं. खट्वांगादिक राजाचा जसा प्रभाव या लोकीं विख्यात आहेतसा तुझा प्रभाव या लोकीं विख्यात झाला. भीष्म जसा महातेजस्वी व महाव्रती होता तसा राजा तूं आहेस. वाल्मीक ऋषीसारखें तुझें वीर्य गुप्त आहे, वसिष्ठ ऋषीसारखा तुझा कोप नियमित आहे, इंद्रासारखें तुझें प्रभुत्व आहे व नारायणासारखी तुझी कांति आहे. धर्माच्या निश्चया विषयीं तूं यम

सारखा आहेस. श्रीकृष्ण जसा सर्वगुणांनीं युक्त आहे तसा तूं सर्व गुणां-
नीं युक्त आहेस. वसूच्या गृहीं जसा संपत्तीचा वास त्यासारखा तुझ्या गृहीं श्री-
चा निवास आहे. ऋतूचा केवळ निधान तूंतच काय तूं असें मला वाटतें. दं-
भोद्भव राजा समान तुझें बल होय. परशुराम जसा शस्त्रवेत्ता तसा तूं सकल
शस्त्रास्त्रविद्या जाणतोस. और्व आणि त्रित त्यां सारिखें तुझें तेज होय. भगी-
रथासारखें तुझें कर्म अवलोकन करण्यास मोठें गहन होय. या प्रकारें आस्ती-
कानें सर्वांची स्तुति करून त्यामध्यें विशेषें करून राजाची स्तुति केली अ-
सतां राजा, सदस्य, ऋत्विज व अग्नि हे बहुत प्रसन्न झाले. आस्तीकऋषीचें
इंगित होतें तें जाणून जनमेजयराजा ऋषींस भाषण करूं लागला. असा
विषय या अध्यायांत आहे.

५६ अध्याय छपन्नावा :- जनमेजयराजा भाषण करितो हे विप्रहो,
हा बाल असून मोठ्या वृद्धा सारिखें भाषण करितो. तस्मात् हा बाल नव्हे
मोठा ज्ञानी आहे असें वाटतें. यास्तव यास वरप्रदान करावें असें मी इच्छि-
तों तुह्मीं सर्व ब्राह्मणांनीं एक मत करून मला सांगावें. त्या काळीं सदस्य, रा-
जास भाषण करितात हे राजा, विप्र जो आहे तो बाल असो किंवा कसा अ-
सो राजास मान्य आहे. तशांत विद्वान असला तर फारच पूज्य आहे. तुह्मां
पासून हा ब्राह्मण आपली इच्छा पूर्ण करून घेण्यास योग्य आहे; परंतु
यास वरप्रदान देणें असल्यास तक्षक येथें प्राप्त झाल्यावर द्यावें पूर्वीं देवूं
नये. सौति भाषण करितो हे शौनका, राजानें आस्तीकास वर माग असें
भाषण करून देण्यास प्रसक्त जाहला असतां तें राजवाक्य होत्यानें श्रवण
करितांच तो किंचित् विमनस्क होऊन राजास भाषण करितो हे राजा, या
कर्मांत जों पर्यंत तक्षक येत नाहीं तों पर्यंत वर देऊं नये. राजा भाषण करितो
हें कर्म जेणें करून लवकर समाप्त होईल व तक्षक येथें लवकर येईल या वि-
षयीं सत्वर तुह्मीं यत्न करा. त्यानें माझा वर द्वेष केला आहे. तों इतक्यांत
ऋत्विज भाषण करितात हे राजा, शंसनमंत्रदेवता व अग्नि असें सांगतात
कीं, तक्षकास अतिशय भय उत्पन्न होऊन इंद्राच्या भवनीं आहे. असें ऋ-
त्विजांचें भाषण झाल्यावर ज्या माहात्म्या सूतानें हें होणार भविष्य सांगितलें

होतें तो लोहिताक्षस्थपति राजास भाषण करितो हे राजा, तक्षकाविषयीं ब्राह्मण सांगतात त्या प्रमाणेंच सत्य आहे. मी ही त्याप्रमाणें ह्मणतों. पूर्व कल्पींच्या पुराण वृत्तांत असें लिहिलें आहे कीं, इंद्रानें तक्षकास वर देऊन असें सांगितलें कीं, जनमेजयराजाच्या यज्ञ संबंधी अग्नि तुझा दाह करणार नाहीं. तूं माझ्या गृहीं रहा. असें सूताचें भाषण श्रवण करून दीक्षित झालेला जनमेजयराजा संतप्त होऊन कर्मकालीं आपल्या होत्यास कर्माविषयीं तशीच प्रेरणा करीत असतां होत्यानें मंत्र बलें करून इंद्रासच खालीं आणण्याचा यत्न केला त्याकालीं इंद्र विमानारूढ होऊन सर्व देवांनीं स्तूयमान, विद्याधर व अप्सरागणांनीं वेष्टित असा इंद्र लोकापासून निघाला. इंद्रानें आपल्या उत्तरीय वस्त्रांत नागास जरी वेष्टित केला होता, तथापि नागास अतिशय भय उत्पन्न होऊन दुःखित झाला. इतक्यांत जनमेजयराजा ऋत्विजांस भाषण करितो कीं हे विप्रहो, जर तक्षकनाग इंद्रभवनीं आहे तर इंद्रासहवर्तमान तक्षकाचा अग्नीमध्यें पात होईल असें करा. असें श्रवण करून होत्यानें पन्नगास येण्याविषयीं मंत्रानें आव्हान करितांच तक्षकासहवर्तमान इंद्र व्यथित होऊन आकाशामध्यें दिसूं लागला. तो जनमेजयराजाचा यज्ञ समारंभ अवलोकन करितांच इंद्रास परम भय उत्पन्न होऊन तक्षकाचा त्याग करून आपण स्वभवनीं गेला. नंतर तक्षक भयानें मोहित होऊन वेदमंत्रशक्तीच्या योगें यज्ञपावकाच्या सन्निध प्राप्त झाला असतां ऋत्विज राजास भाषण करितात हे राजा, तुझे कर्म सफल झालें. हा तक्षकनागराज मंत्रबलात्कारें करून अग्निसन्निध आला, आतां तुला या ब्राह्मणास वर देणें असेल तो दे. त्याकालीं जनमेजयराजा आस्तीकऋषीस भाषण करितो हे बाल, तुला मी वरदान देण्यास उद्युक्त झालों आहें, तुला जो इच्छित असेल तो माग. इतक्यांत ऋत्विज राजास भाषण करितात हे नृपा, हा तक्षक प हा कसा मोठ्या वेगानें लवकर येत आहे याचा भयंकर नाद श्रवण कर. आतां इंद्रानें याचा त्याग केला यास्तव विस्रस्तकाय होऊन आकाशामध्यें नष्ट संज्ञ झालेला श्वासोश्वास टाकीत आहे. अग्नींत पतनाचामात्र अवकाश राहिला आ-

हे. इतक्यांत आस्तीकऋषि राजास भाषण करितो हे राजा, जर तूं मला वरप्रदान देण्यास सिद्ध आहेस तर हा वर दे कीं, तुझ्या सत्रामध्यें बहुत पन्नग नाश पावले यास्तव आतां सत्राचा उपरम होऊन नागांचें रक्षण व्हावें व सत्राची समाप्ती व्हावी हें श्रवण करून जनमेजयराजा विमनस्क होऊन आस्तीकास भाषण करितो हे ऋषे, सुवर्ण, रौप्य, उत्तम प्रकारच्या गायी, इत्यादि जें तुला द्रव्य पाहिजे तें माग मी देतों; परंतु माझा ऋतु निवृत्त होण्याविषयीं वर मागूं नको. असें राजाचें भाषण श्रवण करून आस्तीक भाषण करितो हे राजा, सुवर्ण, रजत, गायी, इत्यादिक मी ग्रहण करण्यास इच्छित नाहीं, तुझ्या सत्राचा उपरम होऊन माझ्या मातृकुलाचें कल्याण होवो. या प्रकारें आस्तीकानें भाषण केलें असतां जनमेजयराजा वारंवार त्यास भाषण करितो हे द्विजा, दुसरा वर माग; परंतु हा वर मागूं नको. त्या काळीं सर्व वेदवेत्ते ब्राह्मण व सदस्य प्रभृति ऋत्विज राजास भाषण करितात हे राजा, हा ब्राह्मण जो वर मागत आहे तो यास प्राप्त व्हावा ही फारच चांगली गोष्ट आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

५७ अध्याय सत्तावन्नावा:- शौनक भाषण करितात हे सूता, सर्पसत्रांत अग्नीमध्यें पतन पावले जे सर्प त्या सर्वांचीं नावें मी श्रवण करण्यास इच्छितों ती मजला निवेदन कर. असा शौनकऋषीचा प्रश्न श्रवण करून सौति भाषण करितो हे द्विजसत्तमशौनकऋषे, सहस्रावधि प्रयुत अर्बुद सर्प अग्नींत पडले त्यांच्या संख्येची गणना करूं ह्मटलें तर फारच कठीण आहे यास्तव जितकीं नावें माझ्या स्मरणांत आहेत तीं सांगतों. कोटिश, मानस, पूर्ण, इत्यादि १२ वासुकीच्या कुलांतले सर्प अग्नींत प्रविष्ट झाले. पुच्छांडक, मंडलक, पिंड, इत्यादि १८ इतके तक्षककुलांतले नाग अग्नींत प्रविष्ट झाले. पारावत, पारियात, पांडुर, इत्यादि १० इतके ऐरावतकुलांतले नाग नष्ट झाले. ऐरक, कुंडल, वेणी, इत्यादि ९ कौरव्य कुलांतले नाग अग्नीमध्यें नष्ट झाले. शंकुकर्ण, पिठरक, कुठार, इत्यादि ३६ हे धृतराष्ट्र कुलांतले नाग नष्ट झाले. या प्रकारें कीर्तिमान नामांकित सर्प प्राधान्यें करू-

न हे ब्रह्मन्, तुह्मांस मी निवेदन केलें. या पासून जे उत्पन्न झाले आणि यां-
ची जी पुढें संतति झाली तीची परिगणना करतां येत नाहीं. इतके दीपाग्नीम-
ध्यें पतंगा सारिखे दग्ध झाले. कांहीं त्रिशीर्ष, कांहीं सप्तशीर्ष, कांहीं दशशी-
र्ष, कालानल विषासारिखें ज्यांचें विष असे कांहीं, मोठमोठी ज्यांचीं शरीरें,
महावेगी, शैलश्रृंगासारिखे उंच, योजन पर्यंत ज्यांचा विस्तार, कांहीं दोन
योजन विस्ताराचे, कामरूपी, कामबली हे सर्व नाग मातृवाक् दंडपीडित
होऊन सर्पसत्र अग्नीमध्यें नष्ट झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

५८ अध्याय अठ्ठावन्नावा:- सूतपुत्र भाषण करितो हे शौनका, आ-
स्तीक ऋषीचें अद्भुत कर्म आणखी एकमी श्रवण केलें आहे तें तुह्मांस
सांगतों. ज्या काळीं इंद्राच्या हस्ता पासून सर्प च्युत झाला त्या काळीं तो
सर्प अंतरिक्षांत अधांतरीं तसाच राहिला हें जनमेजयानें अवलोकन करू-
न बहुत चिंताग्रस्त होऊन विचार करूं लागला कीं, हा अग्नी होमद्रव्यानीं
प्रदीप्त झाला असतां तक्षक भयपीडित झालेला तो यांत अद्यापि कां पत-
न पावत नाहीं. असें सूताचें भाषण श्रवण करून शौनक भाषण करितात
हे सूता, ब्राह्मणांचे मंत्र मलीन झाले ह्मणून तो सर्प, मंत्र निर्बलानें अग्नीमध्यें
पतन पावला नाहीं कीं काय? हें श्रवण करून सूत पुत्र भाषण करितो हे
ऋषे, ज्या काळीं तो सर्प इंद्रहस्ता पासून मुक्त होऊन खालीं पडूं लागला
त्या काळीं आस्तीक ऋषीनें त्या सर्पास अवलोकन करून तिष्ठ तिष्ठ असें
तीन वेळ भाषण केलें त्या योगानें तो सर्प अत्यंत खिन्न होऊन जसा ए-
खादा पुरुष आकाश आणि पृथ्वी यांच्या अंतरामध्यें राहतो तसा तो अं-
तरिक्षीं राहिला. तो सदस्यानीं अवलोकन करून राजास प्रेरणा केली अ-
सतां राजानें भाषण केलें कीं, आस्तीक ऋषीनें कथित केलें तेंच सत्य असो.
आतां यज्ञकर्माची समाप्ती करावी. सकल पन्नग समुदाय आतां सुखी असो.
आस्तीक ऋषि संतुष्ट असो. सूताचें भाषण सत्य असो. या प्रकारें राजानें भा-
षण केलेलें सकलांनीं श्रवण करितांच एका एकीं सभेमध्यें हलहला शब्द हो-
ऊन संतुष्ट झाले. या प्रकारें राजानें आस्तीक ऋषीस वर देऊन यज्ञाचा उप-
रम केला. तो यज्ञ समाप्त झाल्यावर राजा बहुत संतुष्ट होऊन जे यज्ञाक-

रितां ऋत्विज प्राप्त झाले होते त्यांस राजानें बहुत धन अर्पण केलें. ज्या लोहिताक्ष नामक शिल्प्यानें पूर्वी राजास सांगितलें होतें कीं, तुझ्या सर्पसत्र निवृत्तीस कोणीं तरी एक ब्राह्मण निमित्त होईल त्यास राजानें बहुत द्रव्य देऊन भोजनाच्छादनादिकें करून संतुष्ट केलें. नंतर राजानें अत्यंत प्रसन्न होऊन यथा विधी अवभृत स्नान केलें. आणि आस्तीक ऋषीवर अत्यंत संतुष्ट होऊन त्यास बहुत द्रव्य देऊन तो ऋषि गृहीं गमन करण्यास निघाला असतां त्यास असें सांगितलें कीं, पुनः वाजीमेधनामक महाक्रतु मीं करणार आहें त्यामध्यें तुह्मास सदस्य करीन यास्तव तुमचें आगमन झालें पाहिजे. असें राजाचें भाषण श्रवण करून आस्तीकऋषि संतुष्ट झाला. व स्वकार्य संपादन केलें व राजाचा संतोष करून स्वगृहीं गेला. आणि आपला मातुल व माता यांजपाशीं जाऊन झालेलें वृत्त त्याणें निवेदन केलें. सौति भाषण करितो हे ऋषे, आस्तीकाचें भाषण श्रवण करून जे पन्नग तेथें प्राप्त झाले होते ते अत्यंत संतुष्ट मनानें आस्तीकावर प्रसन्न होऊन भाषण करितात हे आस्तीका, आह्मीं संतुष्ट झालों आमच्यापाशीं आतां कांहीं तरी वर माग. असें सर्पाचें भाषण श्रवण करून आस्तीक भाषण करितो हे सर्पहो या लोकीं जे कोणी मानव प्रसन्नात्में करून रात्रं दिवस या माझ्या धर्मरूप आख्यानाचें पठण करतील त्या मानवांस तुह्मांपासून कांहीं भय नसावें. असें श्रवण करून सर्प भाषण करितात हे भागिनेया, आह्मीं प्रसन्न झालों परम प्रीतीकरून जो तूं वर मागितलास तो वर आह्मां सर्वांस मान्य आहे, तुझ्या भाषणा प्रमाणें परम नम्रतेनें आह्मीं करण्यास सर्व सिद्ध आहोंत. आस्तीक भाषण करितो हे सर्पहो, असित, आर्तिमंत आणि सुनीथ या तीन ऋषींचें रात्रीस अथवा दिवसास जो स्मरण करील त्यास सर्पाचें भय नसावें. तसाच जरत्कारूपासून जरत्कारूचे ठिकाणीं महायशस्वी आस्तीकनामक ऋषि उत्पन्न होऊन सर्पसत्रामध्यें ज्याणें सर्व पन्नगांचें रक्षण केलें त्या ऋषीचें जो कोणी स्मरण करील त्यास तुमच्या पासून भय नसावें त्याचा प्राणघात तुह्मीं करूं नये. जो कोणी मानव असा मंत्राचा उच्चार करील कीं हे महाविष सर्पहो, तुह्मीं येथून जावें. तुमचें कल्याण अ-

सो. जनमेजयराजाच्या सत्रामध्यें आस्तीकनामक जो ऋषी होता त्याच्या वचनाचें स्मरण करा. हा मंत्र श्रवण करून जो सर्प निवृत्त होणार नाहीं त्याचा मूर्धा शिताफलासारिखा शतधा छिन्न भिन्न होऊन जाईल. सूत भाषण करितो हे शौनकऋषे, याप्रकारें आस्तीकानें भाषण केलें असतां सकल भुजंगश्रेष्ठ संतुष्ट झाले. नंतर आस्तीकऋषीही स्वगृहीं जाण्यास निघाला तो गृहीं जाऊन कांहीं कालांतरानीं संततियुक्त होऊन नंतर मोक्षास गेला. या प्रकारें आस्तीकऋषीचें आख्यान तुह्मांस मीं कथन केलें. या आख्यानाचें कीर्तन केलें असतां सर्पाचें भय त्यास होत नाहीं. सूत भाषण करितो हे भार्गवश्रेष्ठा, तुमचा पूर्वज प्रमति नामक होता त्याणें हें आख्यान आपल्या रुरुनामक पुत्रास परम प्रीतीनें कथित केलें तेंमी तुह्मांस सांगितलें हें मी पूर्वीं श्रवण केलें होतें. हें आस्तीक कवीचें चरित्र पुण्याचें वर्धन करणारें व धर्मिष्ठ, मीं श्रवण केलें होतें तें तुह्मीं विचारिलें ह्मणून तुह्मांस निवेदन केलें. हें आख्यान पूर्वीं डुंडुभानेंही कथित केलें होतें हें श्रवण करून तुझा मानसज्वर जावो आणि अति आनंद प्राप्त होवो. असा विषय या अध्यायांत आहे.

५९ अध्याय एकुणसाठावा- शौनक भाषण करितात हे सूता, आस्तीक आख्यान तुझ्या मुखा पासून श्रवण केलें तेणेंकरून अत्यंत संतुष्ट झालों. यास्तव व्यासाच्या मुखा पासून अशाच दुसऱ्या कथा तूं श्रवण केल्या असशील त्या पुनः तूं मला निवेदन कर. दुःष्पार जें सर्पसत्र याचा आरंभ झाला असतां जे सदस्य असतील त्याणीं चित्र विचित्र कथा प्रसंगोपात प्रकर्णरूपानें कथित केल्या असतील त्या सर्व मीं श्रवण करण्याची इच्छा करितों यास्तव यथा तथ्य निवेदन करा. सूत भाषण करितो हे ऋषे, वेदामध्यें कथित शुनःशेपाख्यानादिक कथा बहुत आहेत त्या कथा सदस्यांनीं सर्पसत्र प्रसंगीं कथित केल्यावर श्रीव्यासानें चित्र विचित्र आख्यानयुक्त असें भारत कथित केलें. असें सूताचें भाषण श्रवण करून शौनक भाषण करितात हे सूता, जनमेजयराजानें पांडवांचें परम यशस्कर जें महाभारत तें श्रवण करण्या विषयीं व्यासास प्रश्न केला

असतां कांहीं एक प्रसंगीं व्यासानें राजास यथा विधी सांगितलें ती पुण्यकारक भारतीय कथा मी श्रवण करण्याची इच्छा करितों. महर्षी व्यासाच्या मनोमय सागरा पासून उत्पन्न झालेली मला सांग. त्याच्या श्रवणमात्रें करून माझी तृप्ति होत नाहीं. असा शौनकाचा प्रश्न श्रवण करून सूत भाषण करितो हे ऋषे, महाख्यान श्रीमत्भारत संज्ञक कृष्णद्वैपायनानें कथित मी तुला सांगतो तें समग्र श्रवण कर. ही भारतीय कथा सांगण्या विषयीं मलाही मोठा हर्ष झाला आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

६० अध्याय साठवा - सौति भाषण करितो हे ऋषे, सर्पसत्रा विषयीं जनमेजय राजा दीक्षित झाला असें श्रवण करून कृष्णद्वैपायन ऋषी राजा जवळ आले, हे पांडवांचे पितामह होत. पूर्वीं शक्ती पुत्र जो पराशर ऋषि याजपासून सत्यवती कन्यावस्थेंत असतां तीचेठायीं यमुनाद्वीपामध्यें व्यास उत्पन्न होतांच एका एकीं त्याच्या देहाची तत्काल वृद्धि होऊन इतिहासा सहवर्तमान सांग वेदाचें ज्ञान अध्ययन केल्या वांचून प्राप्त झालें तसेंच तपें करून, वेदाध्ययनें करून, व्रत अथवा उपवासादिकें करून, किंवा यज्ञयागादि क्रियें करून जें आत्मतत्वज्ञान प्राप्त व्हावयाचें नव्हे तें व्यासास सहज प्राप्त झालें. असा निर्गुण व सगुण ब्रह्म जाणणारा, आदिकवि, सत्यव्रती, महाश्रुचि, वेदवेदांगपारग, त्याणें एकवेद असतां त्याचे चारविभाग केले. पांडु, धृतराष्ट्र आणि विदुर या तीन पुत्रांस ज्याणें उत्पन्न केलें, महायशस्वी, पुण्यकीर्ति, शंतनूची संतति वृद्धि करणारा, महात्मा वेदव्यास, वेदवेदांगपारग शिष्यां सहवर्तमान कोणेएके दिवशीं जनमेजय राजर्षीच्या सत्रामध्यें प्राप्त झाला असतां देवांसहवर्तमान इंद्र जसा स्थित असतो तसा जनमेजयराजा बहुत सदस्यां सहवर्तमान यज्ञसभेमध्यें बसला होता. इतर मूर्धाभिषिक्त राजे व नाना प्रकारचे जनपदेश्वर व ब्रह्मदेवा सारखे महाकुशल ऋत्विज, त्याच्या आसमंतात भागीं बहुत बसले होते तों इतक्यांत व्यास प्राप्त झाले हें राजानें अवलोकन करितांच सकलसमुदाया सहवर्तमान परम प्रीतीनें ऋषीच्या अग्रभागीं जाऊन सदस्यांच्या अनुमतानें कांचनमय आसन देऊन सत्कारपूर्वक ऋषीस बसविलें. इंद्रज

सा बृहस्पतीस आसन देऊन बसवितो तसा देवऋषींनीं पूज्यमान श्रीव्यास आसनावर बसला असतां जनमेजयराजानें यथा शास्त्र ऋषीची पूजा करून नंतर गोप्रदान दिलें तें ग्रहण करून व्यास अत्यंत संतुष्ट होऊन आसनावर स्वस्थ बसले असतां राजानें परमनम्रतें करून व्यासास कुशल प्रश्न केला. नंतर व्यासानेंही राजास कुशल प्रश्न केला या प्रकारें उभयतांचे कुशल प्रश्न झाल्यावर सदस्यांनीं व्यासाची पूजा केली, नंतर व्यासानेंही सकल सदस्यांची पूजा केली. तदनंतर सदस्यां सहवर्तमान जनमेजयराजा, अंजलीपुट जोडून भाषण करितो हे द्विज, कौरव पांडवांचें जें चरित्र झालें तें आपण प्रत्यक्ष अवलोकन केलें आहे यास्तव तें सकल मजला निवेदन करा. मला श्रवण करण्याची बहुत इच्छा झाली आहे. पांडव, रागद्वेषादिरहित असतां कौरवांचा व त्यांचा कलह होऊन भेद कसा झाला ? आणि सकल प्राणीनाशक असें उभयतांचें युद्ध कशा करितां झालें हें पितामहाचें समग्र वृत्त श्रवण करण्याची इच्छा झाली आहे. पांडवांस केवळ देवानेंच आकृष्ट केलें असें वाटतें. या प्रकारें जनमेजयाचा प्रश्न श्रवण करून श्रीकृष्णद्वैपायन आपला शिष्य वैशंपायन इतर शिष्यां सहवर्तमान जवळच बसला होता त्यास भाषण करितात हे वैशंपायना, कौरव पांडवांचा भेद कोणाच्या कारणानें झाला तो वृत्तांत माझ्या मुखा पासून तूं श्रवण केलासच आहेस तो राजास निवेदन कर. या प्रकारें गुरूची आज्ञा होतांच वैशंपायनानें सदस्य व इतर पार्थिव यांसहवर्तमान स्थित जो जनमेजयराजा यास कौरव पांडवांच्या भेदाचा व त्यांच्या नाशाविषयींचा पुरातन इतिहास यथा तथ्य सकल निवेदन करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

६१ अध्याय एकसष्टावा— वैशंपायन भाषण करितात हे जनमेजयराजा, प्रथम मन, बुद्धि आणि समाधि इत्यादिकानीं गुरूस नमस्कार करून नंतर विद्वान ब्राह्मणांची पूजा करितों आणि सकल लोकांमध्यें महाबुद्धिमान् सर्वांसि विश्रुत जो महात्मा व्यास याचें सकल मत तुला निवेदन करितों. तूं ही भारतकथा श्रवण करण्यास पात्रभूत आहेस. हा कथाप्रवाह गुरूचे मुखा पासून उत्पन्न झालेला कथन करण्या विषयीं माझे मनास

फार उत्साह होतो. हे राजा, राज्या करितां कौरव पांडवांचा कलह कां झाला व द्यूतक्रीडा निमित्त पांडवांनीं कसा वनवास केला, नंतर पृथ्वीक्षयकारक असा त्यांचा युद्धप्रसंग कसा झाला हें वर्तमान आतां तुला निवेदन करितो श्रवण कर. हे राजा, पांडवांचा पिता पांडुराजा वनामध्यें मरण पावल्यावर सकल पांडव गृहीं आले आणि त्यांस लवकरच धनुर्विद्या प्राप्त होऊन मोठे विद्वान झाले त्या काळीं सकळ पौरलोक पांडवांचें वीर्य, सत्व, यश व श्री पाहून मोठी स्तुति करूं लागले; परंतु सकल कौरवांस पांडवांची यशश्री व शोभा अवलोकन करून मोठा विषाद होऊं लागला नंतर दुर्योधन, महाक्रूरकर्मा कर्ण आणि शकुनि या त्रिवर्गांनीं मिळून पांडवांस नगरांतून जाण्याचे व मारण्याचे उपाय बहुत केले. कोणी एक कुलिंगनामक पक्षी, सिंव्ह दंष्ट्रागत मांस भक्षण करण्यास जसा उद्युक्त होतो तसा दुर्योधन, राज्या करितां पांडवांस नाना प्रकारच्या उपायें करून पीडा करूं लागला. कोणे एके दिवशीं भीमास जर्जर करावा ह्मणून पापी दुर्योधनानें विषान्न भोजनास दिलें. तो प्रमाणकोटीनामक तीर्थीं निद्रित असतां दुर्योधनानें भीमसेनास बांधून गंगेमध्यें टाकून आपण स्वनगरीं आला. नंतर भीमसेन जेव्हां सावध झाला तेव्हां आपलीं बंधनें तोडून उठला. तसाच भीमसेन निद्रित असतां दुर्योधनानें आशीविष कृष्णसर्पाकडून त्याच्या सर्व शरीरास दंश करविला; परंतु भीमसेन मरण पावला नाहीं. ज्या ज्या काळीं पांडवांचें अप्रिय होण्या करितां दुर्योधनानें उपाय केले त्या त्या काळीं महामति विदुरानें पांडवांस दुःखापासून मुक्त केले. इंद्र जसा स्वर्गस्थ असतां जीवांस सुखावह होतो तसा विदुर पांडवांस फार सुखावह असे. पांडव मरण्या विषयीं नानाप्रकारचे उपाय दुर्योधनानें केले; परंतु कौरवकुलक्षय पुढें होणार या हेतूनें पांडव सुरक्षित राहिले. पांडवांस कांहीं झालें नाहीं हें जाणून कोणे एके दिवशीं दुर्योधनानें धृतराष्ट्राच्या आज्ञेवरून कर्ण व दुःशासनाच्या विच्यारानें पांडवांच्या नाशा करितां लाक्षागृह सिद्ध केलें. नंतर सुतांचें हित व्हावें ह्मणून धृतराष्ट्रानें पांडवांस राज्यभोगाचें मिष दाखवून हस्तनापुरापासून त्यांस काढलें त्याकाळीं विदुर पांडवांचा मंत्री होता त्याणेंच, जतुगृहापासून पांडवांस रात्रौ मुक्त

करून वनांत नेलें. महात्मे सकल पांडव मातेसहवर्तमान वारणावतीं जाऊन कांहीं दिवस तेथें राहिले. पुढें धृतराष्ट्र आज्ञेनेंच जतु गृहीं वास करिते झाले. तेथें पुरोचन नामक एक धृतराष्ट्राचा सेवक होता त्याणें एक संवत्सर पर्यंत पांडवांचें रक्षण केलें. नंतर एक तुरुंग ह्मणजे उभयतो मुखगृह विदुरानें करून ठेवविलें होतें त्या द्वारानें पांडव बाहेर निघाले आणि लाक्षागृहास आग लाऊन दिली त्यांत तो पुरोचनही दग्ध झाला. नंतर पांडव अत्यंत भयाभीत होऊन मातेसहवर्तमान वनामध्यें प्रविष्ट झाले असतां वनांत एक ओढा होता तेथें महाभयंकर एक हिडिंबासुर नामें राक्षस होता त्याचाही वध त्याणीं केला. नंतर पांडवांस असें वाटलें कीं, आपली आतां प्रसिद्धी होऊन दुर्योधनास समजेल या भयानें ते रात्रीसच पळून गेले. पुढें हिडिंब नामक राक्षसी भीमसेनाची भार्या झाली. तीज पासून घटोत्कच झाला. नंतर पांडव एकचक्रा नामक नगरीं राहून वेदाध्ययन संपन्न ब्रह्मचाऱ्याचा वेष धारण करून कोणे एके ब्राह्मण गृहीं मातेसहवर्तमान वास करीत असतां त्या नगरांत मनुष्यांस भक्षण करणारा असा एक बक नामक राक्षस होता, त्याणें समग्र ग्रामास पीडा दिली होती ह्मणून भीमसेनानें आपल्या बाहुबळें करून त्या बकासुराचा वध करून सकळ नागरिक जनांचें शांतवन केलें. पुढें कांहीं दिवस तेथें वास करीत असतां पांचालीचा स्वयंवर होत आहे हें पांडवांनीं श्रवण करितांच तेथें जाऊन द्रौपदीस हरण केली. या कृत्यास एक संवत्सर झाल्यावर पुनः पांडव द्रौपदीस ग्रहण करून हस्तनापुरीं माघारे आले. त्याकाळीं धृतराष्ट्र व भीष्म याणीं पांडवांस असें सांगितलें कीं, तुमचा आणि कौरवांचा कलह होऊं नये म्हणून आह्मीं अशी योजना केली आहे कीं, तुह्मीं खांडव प्रस्थीं जाऊन स्वतंत्रपणें वास करावा. तोही ग्राम फार सुंदर आहे लोक उत्तम आहेत. असें उभयतांचें भाषण पांडवांनीं श्रवण करितांच ते मत्सर रहित होऊन सर्व सुहृद्गणां सहवर्तमान आपल्या बरोबर पांचाल देशांतून जीं रत्नें हरण करून आणिलीं होतीं तीं घेऊन खांडव प्रस्थीं गेले आणि बहुत संवत्सर पर्यंत तेथें त्याणीं वास केला. आपल्या शस्त्रप्रतापें करून सकळ राजे त्यांणीं वश केले. याप्रकारें ते धर्मप्रधान सत्यव्रतप-

रायण शांत गुणवंत असे पांडव अप्रमत्त होऊन बहुत संवत्सर पर्यंत वासक-
रीत असतां महायशस्वी भीमसेनानें प्राची दिशा जिंकिली. महावीर अर्जु-
नयाणें उत्तर दिशा जिंकिली. प्रतीची दिशा नकुलानें जिंकिली. आणि परवी-
रहंता सहदेव याणें दक्षिण दिशा जिंकिली. या प्रकारें सकल वसुंधरा पांडवां-
नीं वश केली. असे ते पांच पांडव आपल्या पराक्रमानें सूर्यासारिखे तेजस्वी
असल्यामुळें ही पृथ्वी साहा सूर्यानींच युक्त आहे असें सर्वांस वाटूं लागलें.
नंतर कांहीं निमित्तानें सत्य विक्रमी युधिष्ठिर राजानें प्राणापेक्षांही प्रियकर,
पुरुषव्याघ्र, स्थिरात्मा, सर्व गुणांनीं युक्त, असा जो आपला भ्राता सव्यसाची
त्यास द्वादश वर्षें वनामध्यें पाठविलें असतां तो वनामध्यें संचार करीत करी-
त कृष्णाच्या दर्शना करितां द्वारकेंत गेला. तेथें कृष्णाची भगिनी पद्मलोच-
ना, सुभद्र भाषण करणारी सुभद्रा नामक होती, ती कृष्णानें अर्जुनास दि-
ली. त्याकाळीं इंद्रासहवर्तमान शची जशी शोभत्ये तशी अर्जुना सहवर्त-
मान सुभद्रा शोभूं लागली. पुढें कांहीं दिवसांनीं कृष्णासहवर्तमान अर्जु-
नानें खांडव वनीं अग्नीस तृप्त केला. पार्थासि श्रीकृष्ण साहाय्य होता म्ह-
णून कांहीं एक कठीण कृत्य करण्यास अर्जुनास अवघड पडलें नाहीं. अ-
ग्नीनें पार्थास उत्तम एक गांडीवनामक धनुष्य दिलें, तसेंच अक्षय्य बाणांनीं
युक्त भाते, व वानर लक्षण युक्त रथ दिला. या खांडव वना पासून मयासु-
रास अर्जुनानें मुक्त केलें होतें म्हणून त्याणें पांडवांस दिव्य व सर्वरत्नखचि-
त अशी एक सभा करून दिली होती. ती दुर्योधनानें अवलोकन करून ती-
जविषयीं त्यास बहुत लोभ उत्पन्न झाल्यामुळें सौबला कडून धर्मराजास
अक्षद्यूतामध्यें वंचित करून तेरावर्षें पर्यंत पांडवांस वनामध्यें पाठविलें
त्याकाळीं पांडवांनीं बारावर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास करून चव-
दावे वर्षीं आपलें राज्य कौरवां जवळ मागीतलें असतां त्याणीं दिलें ना-
हीं तेणेंकरून पांडव अतित्रस्त होऊन त्याणीं युद्धाचा विचार केला. यु-
द्धामध्यें त्यांणीं सकल क्षत्रियांचा नाश केला आणि दुर्योधनास मारून
आपलें राज्य ग्रहण केलें. या प्रकारें अक्लिष्टकर्मे जे पांडव यांचा वृत्तांत
तुला निवेदन केला. हे जयशील श्रेष्ठ राजा, कौरव पांडवांचा जो भेद झा-

ला तो राज्याच्या विनाशास कारण झाला. असा विषय या अध्यायांत आ॰

६२ अध्याय बासष्टावा – जनमेजयराजा भाषण करितो हे द्विजोत्त-मा, ज्यामध्यें चित्रविचित्र कथा व कुरूचें चरित्र वर्णन केलें आहे असें जें महाभारत आख्यान तें विस्तारें करून श्रवण करण्याची मला इच्छा झा-ली आहे यास्तव कथन करा. भारतांतील कथा श्रवण करून मला फार कौ-तुक वाटतें यास्तव विस्तारें करून तें आख्यान मला कथन करण्यास तुह्मीं योग्य आहांत. माझ्या पूर्वजांच्या कथा श्रवण करून तृप्ति होत नाहीं. हें के-वे; भीष्म द्रोणादिक अवध्य असतां धर्मज्ञ पांडवांनीं जरी त्यांचा वध केला तथापि लोकांमध्यें त्या पांडवांची प्रशंसाच करीत आहेत यापेक्षां तें कार-ण कांहीं अन्य नाहीं असें मला वाटतें. ते पांडव महापराक्रमी असून अ-नपराधी असतां दुरात्म्यानीं दिलेले क्लेश कशाकरितां सहन केले. हे द्विजो-त्तमा, दहासहस्र गजांचें ज्यास बल असा जो बाहुशाली भीमसेन त्यास दुष्टानीं क्लेश दिले असतां त्याणें कशा करितां कोपाचा निरोध केला. तसें-च द्रौपदीस दुरात्म्यांनीं अत्यंत क्लेश दिले असतां आपल्या क्रोधचक्षूं करू-न धृतराष्ट्रपुत्रांचा नाश करण्यास समर्थ असून कशा करितां तीणें त्यां-चा नाश केला नाहीं. माद्रिपुत्रांचा दुरात्म्यांनीं छळ केला असतां ते, द्यूत व्यसनामध्यें निमग्न झालेला जो धर्मराज याच्या अनुलक्षें करून कसे गे-ले. धर्मपुत्र धर्मराजा धर्मज्ञांमध्यें श्रेष्ठ असून क्लेश सहन करण्यास अयो-ग्य असतां त्याणें कसे क्लेश सहन केले. बहुत सेना, युद्धास प्राप्त झाली असतां एकाकी धनंजयानें कृष्णास सारथी करून त्या सेनेस कशी यम-लोकीं पाठविली. हे तपोधना, हें जाहलेलें सर्व वृत्त मला निवेदन करा. आ-णखीही त्या महारथ्यांनीं जींजीं कर्मे केलीं असतील तीं तीं सर्व मला निवे-दन करा. असा जनमेजयराजाचा प्रश्न श्रवण करून वैशंपायन भाष-ण करितात हे महाराजा मी कथन करितों याजकडे लक्ष दे. हा पुण्या-ख्यानाचा वक्तव्य अनुक्रम बहुत आहे व तो कृष्णद्वैपायन व्यासानीं रचिले-ला आहे. सकल लोकांस पूज्यमान महात्मा अमित तेजस्वी जे व्यास यां-चें सकल मत आतां तुला निवेदन करितों. सत्यवतीपुत्र जो व्यास याणीं

एक लक्षसंख्याक भारताख्यानाचे श्लोक रचिले आहेत तो श्लोकबद्ध जो भारताख्य ग्रंथ आहे तो जों विद्वान दुसऱ्यास श्रवण करवील अथवा आपण श्रवण करील तो ब्रह्मलोकीं गमन करून त्यास देवाची साम्यता प्राप्त होईल. हें भारतनामक पुराण ऋषीनें कथित केलेलें वेदासारखें अत्यंत पवित्र, सर्वांमध्यें उत्तम व श्रवण करण्यास अति उत्तम आहे, या पुराणांत अर्थ आणि कामाचें निरूपण केलें आहे. हा इतिहास पुण्यकारक आहे यांजवर नैष्ठिकी बुद्धि ठेवावी. अक्षुद्र, दानशील, सत्यशील आणि आस्तिक जे असतील त्यांस हा भारत संज्ञक इतिहास कृष्णद्वैपायनानीं केलेला जो विद्वानास श्रवण करवील त्याचे सर्व अर्थ सिद्ध होतील. अत्यंत पापी जरी पुरुष आहे तथापि हा इतिहास त्याणें श्रवण केला असतां त्याच्या पापाची निवृत्ति होईल. भ्रूणहत्या कृतपाप या इतिहासाच्या श्रवणमात्रें करून नष्ट होईल यांत संशय नाहीं. या इतिहासास जय असें ह्मणतात. हा जयनामक इतिहास जयेच्छु पुरुषानें श्रवण केला असतां त्याचा सर्वत्र जय होतो. राजानें श्रवण केला असतां सकल मही त्यास प्राप्त होऊन शत्रूंचा पराभव करण्यास तो समर्थ होतो. हें आख्यान श्रवण केलें असतां पुत्र प्राप्त होतो व सकल कल्याण करणारें असें होतें. राजानें स्त्री सहवर्तमान हें आख्यान श्रवण केलें असतां महावीर व पराक्रमी असा पुत्र होतो. कन्या झाली असतां राज्याचा उपभोग करणारी अशी होत्ये या इतिहासांत धर्मशास्त्र, अर्थशास्त्र आणि कामशास्त्र अशीं तीन प्रकारचीं शास्त्रें अमितबुद्धि व्यासानीं निरूपण केलीं आहेत. हा भारतनामक इतिहास श्रवण करण्याची सकलांस इच्छा आहे शरीरकृतपाप व वाणीनें केलेलें पाप व मनानें केलेलें पाप असेल तें या भारताच्या श्रवणें करून तत्काल नष्ट होतें. यास्तव, सकल लोकांनीं याचें श्रवण करावें. अनसूया करणारे जे भरतकुलोद्भव पुरुष त्यांचें जन्म या ग्रंथांत कथित केलें आहे यास्तव याचें जे श्रवण करतील त्यांस भय व व्याधि कधींही व्हावयाची नाहीं. मग परलोक भय कोठून होणार. हें भारताख्यान पुण्यकारक, आयुष्याची वृद्धि करणारें, यश देणारें, व स्वर्गाची प्राप्ति देणारें असें आहे. कृष्णद्वैपायन ऋषीनीं हें आख्यान

पुण्याख्या इच्छेनेंच केलें आहे. या आख्यानांत महात्मे जे पांडव यांची कीर्ति कथित केली आहे; तसेच इतर क्षत्रिय महातेजस्वी, सर्व विद्या निपुण ज्यांचीं कर्मे लोकांमध्यें विख्यात आहेत त्यांची ही कीर्ति या ग्रंथांत वर्णिली आहे. यास्तव जो कोणी पुरुष आपल्यास पुण्य प्राप्त व्हावें ह्मणून शूद्रब्राह्मणास हें पुण्यकारक आख्यान श्रवण करवील त्याचा सनातन धर्म राहील. प्रख्यात जो कौरववंश त्याचें जो कीर्तन करील त्याच्या वंशाची वृद्धि होऊन लोकांमध्यें तो पूजित होईल. जो कोणी ब्राह्मण नियत मती होऊन चार महिने पर्यंत या पुण्यकारक भारताचें पठण करील त्याचीं सर्व पापें नष्ट होतील. जो कोणी हें भारत पठण करील तो ज्ञानी होऊन सकल वेदपारग होईल. या भारतांत देवांच्या कथा, राजऋषींच्या कथा व पुण्यवान महर्षींच्या कथा कथित केल्या आहेत. भगवान् श्रीकृष्ण या ग्रंथांत कीर्तित केला आहे. देवीच्या कथा यामध्यें आहेत. अनल - जन्मा जो कार्तिकेय याचा संभव ह्मणजे उत्पत्ति वर्णिली आहे. ब्राह्मण व गायी यांचें माहात्म्य या इतिहासांत वर्णिलें आहे. हा सर्व श्रुतींचा समुदाय एकत्र केला आहे. यास्तव धर्मबुद्धी जे आहेत त्याणीं याचें अवश्य श्रवण करावें. जो कोणी विद्वान् हा ग्रंथ पर्वांत ब्राह्मणाला श्रवण करवील तो निष्पाप होऊन स्वर्ग जिंकून शाश्वत ब्रह्मप्राप्ती विषयीं योग्य होईल. जो कोणी ब्राह्मण हें पुराण अथवा याचा एक पाद तरी श्राद्ध दिवशीं ब्राह्मणांस श्रवण करवील त्याचें श्राद्ध अक्षय्य होईल आणि त्याचे पितर मुक्त होतील. इंद्रियांनीं अथवा मनानें जें दिवसास पातक केलें असेल मग तें ज्ञानें करून अथवा अज्ञानें करून असो तें सकल पातक भारताख्यान श्रवण केलें असतां तत्काल नष्ट होतें. भरतकुलाचे जन्म या इतिहासांत सांगितले आहेत ह्मणून या ग्रंथास महाभारत अशी संज्ञा आहे. ही महाभारत शब्दाची निरुक्ती जो जाणतो तो सर्व पापांपासून मुक्त होतो. भरत राजाचा महान अद्भुत इतिहास यांत सांगितला आहे ह्मणून याच्या कीर्तनेंकरून महा पातकाचा नाश होतो. हें भारत पुराण श्रीकृष्णद्वैपायन व्यासानें केल्यावर तीन वर्षांनीं त्याचे मनोरथ पूर्ण झाले. हें भारत, महर्षी व्यासानें नित्यशः शुचि

होऊन तप व नियमाच्या आश्रयें करून केलें आहे, यास्तव सकल ब्राह्मणां नीं नियम युक्त व शुद्ध होऊन यानें श्रवण करावें. ही अति उत्तम भारतक-था कृष्णद्वैपायनानीं कथित केलेली जे विप्र इतरांस श्रवण करवितील व जे आपण स्वतः श्रवण करतील ते कृतकृत्य होऊन कधींही शोकाला पावणार नाहींत. धर्मकामेच्छु पुरुषानें सर्वदां भारताख्यान श्रवण करावें. हा इ-तिहास संपूर्ण जो श्रवण करितो त्यास संपूर्ण सिद्धि प्राप्त होत्ये. हें आख्यान जो पठण करील त्यास स्वर्ग गति होऊन काळापासून मुक्त होईल. हा अद्भुत इतिहास परम पुण्यकारक श्रद्धायुक्त व पुण्यशील याणें श्रवण केला असतां राजसूय आणि अश्वमेध कतूचें त्यास फल प्राप्त होतें. समुद्र व म-हागिरि मेरुपर्वत या उभयतांची लोकांमध्यें आख्या असून उभयतां र-त्नाचे निधि आहेत तसेंच हें भारत आहे. हें भारत अतिपवित्र फार उत्त-म वेदसाम्यतेचें होय. अर्थानें रम्य असून शब्दानीं अत्यंत उत्तम आहे. याचें पठण केलें असतां पवित्र करतें व उत्तम स्वभाव प्राप्त होत्ये. हे जनमे-जया, हें भारत पुराण पुस्तक लिहून जो वाचकास देतो त्या पुरुषास समुद्र-वलयांकित पृथ्वी दान केल्याचें पुण्य लागतें. हें पारीक्षिती राजाचें दिव्य आख्यान पुण्यार्थ व विजयार्थ मी तुला सकल सांगीतलें तें तूं ऐकलेंसच हें अद्भुत भारताख्यान वेदव्यासानीं तीन वर्षें पर्यंत सतत निरालस्य होऊन ग्रं-थित केलें या पासून धर्म, अर्थ, काम, मोक्ष, या चोहोंची प्राप्ति होते. जे विषय या ग्रंथांत निरूपण केले आहेत ते अन्यत्र कोठें नाहीत. जे विषय या ग्रंथांत नाहींत ते अन्यत्र कोठें नाहींत असें जाणावें. असा विषय या अध्यायांत आहे

६३ अध्याय त्रेसष्टावा:- वैशंपायन भाषण करितात हे जनमेजया, पुरूवंशांत उत्पन्न झालेला महाधृतव्रती, पृथ्वीचें शासन करणारा, वसुनांमक राजा होता, त्यास सकल जन उपरिचर असें ह्मणत असत. तो राजा पृ-थ्वीचें पालन करीत असतां अति उत्तम, रमणीय जो चेदिदेश तेथें मृगया करण्या करितां गेला तों तेथेंच इंद्राच्या उपदेशानें एक आश्रम करून त्यक्त शस्त्र होऊन तप करूं लागला. तो कांहीं दिवस तप करित असतां

एके दिवशीं इंद्रादि देव तेथें आले आणि तपोनिधी जो पुरुराजा त्याच्या अग्रभागीं येऊन भाषण करितात हे राजा, तुझ्या तपाच्या योगानें इंद्राची योग्यता येण्यास तूं योग्य झालास आतां तूं इंद्र होशील. असें देवांचें भाषण श्रवण करून राजानें तपाची समाप्ती केली असतां पुनः देव भाषण करितात राजा, तूं महा धार्मिक आहेस धर्मानें तूं या सकल जगताचे रक्षण केलेंस; परंतु आतां पृथ्वी निर्नायक झाल्यामुळें धर्माची ग्लानि झाली. असें देवांनीं भाषण केल्यावर इंद्र भाषण करितो हे राजा, आतां तूं पृथ्वीचा राजा होऊन या लोकीं उत्तम प्रकारें धर्मानें परिपालन कर. धर्में करून प्रजेचें पालन केलें असतां अविनाशी जे पुण्यकारक लोक त्यांस तूं पावशील आणि पृथ्वीवर रहात असतां स्वर्गांत वास करणारा जो मी तो तुझा प्रियकारक सखा होईन. हा चेदिदेश फार रम्य तसाच पुण्यकारक धनधान्यांनीं समृद्ध व पशूंस हितकारक भोग्य जे भूमी संबंधीं गुण तेणें करून युक्त आहे. स्वर्गलोक जसा सकल गुणांनीं युक्त तसा हा चेदिदेश सर्व गुणांनीं युक्त असल्यामुळें स्वर्गासमान सुखकारक आहे. या देशांत धन व रत्नें यांची समृद्धि बहुत आहे यास्तव हे राजा, याच देशामध्यें तूं वास कर. या देशामध्यें जे लोक रहातात ते सकल धर्मशील आहेत. साधु जे आहेत ते अत्यंत संतुष्ट असतात, या देशांत कोणीही लोक मिथ्या प्रलाप करणारे नाहींत मग व्यभिचाररूप दोष कोठून असतील. तसेच पुत्र आपल्या पित्या पासून द्रव्यादिकाचा विभाग न घेतां एकत्र राहून पितृसेवा तत्पर असतात. या देशांत धान्य पेरल्या वांचून उत्पन्न होत असल्यामुळें नांगरास बैल जोडण्याची गरज नवती. सकल पशु दुःख नसल्यामुळें निरंतर पुष्ट असतात. सकल वर्ण आपले धर्म परिपालन करून स्वस्थ आहेत. हे राजा, तूं मोठा ज्ञानी आहेस. तीन लोकांमध्यें जें काय आहे तें तूं सकल जाणतोस यास्तव या देशांत तूं वास करावास असें मी मानितों. देवांनीं उपभोग करण्यास योग्य असें आकाशगामी स्फटिकमय दिव्य विमान तुला मी देतों त्या विमानामध्यें बसून जसा साक्षात् देवच काय, असा होऊन सर्व लोकांच्या ऊर्ध्वभागीं आकाशमार्गानें निरंतर गमन करशील. म्लान न होणा-

री पंकजोद्भव अशी एक तुला मी वैजयंती माला देतों, ती तूं धारण केली अ-
सतां संग्रामामध्यें शत्रूंपासून तुझा कधींही पराभव व्हावयाचा नाहीं.
मी दिलेली माला तूं धारण केलीस म्हणजे सकल लोकांमध्यें सर्वांस स-
जण्या करितां तुझें एक लक्षण होईल आणि सकल लोकांत तूं धन्य होऊ-
न इंद्रमालि अशा नामानें तुझी ख्याति होईल असें इंद्रानें राजास बोलू-
न एक वेळूची काठी परम प्रीतीनें राजास दिली ती राजानें ग्रहण करून
एक वर्षानंतर इंद्राचे पूजे करितां भूमींत पुरली त्यापासून आजपर्यंत स-
कलराजसमुदायामध्यें या कालानें नाव यष्टिप्रवेश असें प्राप्त झालें तें अ-
द्याप चाललें आहे. हा यष्टिप्रवेशाचा दिवस झाल्यानंतर दुसऱ्या सकल
राजांनीं वस्त्रादिकें करून वेष्टित व माल्यभूषणादिकांनीं युक्त असा एक वेणु-
दंड उभा करून सकलांस सांगूं लागले कीं, या ध्वजावर हंसरूपी परमेश्वर
आहे यास्तव आह्मीं त्याची पूजा करितों. वसुराजानें स्वतः आपण हें व्रत
धारण केलें, या प्रकारें त्या दंडाची पूजा वसुराजानें केलेली इंद्रानें पाहून
परम संतुष्ट मनानें भाषण करितो कीं हे राजा, या तुझ्या उत्साह दिवशीं जे
कोणी नर अथवा राजे ध्वजस्थानीं परम प्रीतीनें माझी पूजा करतील त्यां-
च्या राष्ट्रांत श्रीची समृद्धि होऊन सर्वांचा विजय होईल. सकल जन सुखी
होऊन हर्षित असेल. वैशंपायन भाषण करितात हे जनमेजया, या प्रकारें
महात्मा जो इंद्र याणें परम प्रीतीनें वसुराजाचा सत्कार केला. असेच जे
कोणी नर भूमि, रत्नादि दानपूर्वक इंद्राचा उत्साह करतील ते सकलांस पू-
ज्य होतील. वरदान महायज्ञ व शक्रार्चाच्छाह इत्यादिकें करून युक्त असा
जो वसुराजा, तो इंद्रानें पूजित होऊन चेदिदेशांत वास करून सकल प्रजेचें
धर्मानें परिपालन करूं लागला. इंद्राची प्रीति व्हावी ह्मणून तो इंद्राचा उत्सा-
ह करीत असतां कांहीं दिवसांनीं महावीर्यवान् व अप्रतिम तेजस्वी असे
राजास पांच पुत्र झाले. त्या पुत्रांस भिन्न भिन्न देशांचीं राज्यें देऊन त्या
त्या देशामध्यें त्यांस राज्याभिषेक केला. महारथ, ज्यास मागधदेशामध्यें
बृहद्रथ असें ह्मणतात, प्रत्यग्रह, कुशांब, त्यासच मणिवाहन असें ह्मण-
तात, मावेल्ल आणि शत्रुअपराजित असा यदु हे राजाचे पांच पुत्र ज्या

ज्या देशांमध्यें वास करूं लागले त्या त्या देशांचीं व नगरांचीं नावें आप-ल्या नावांनीं प्रसिद्ध केली. पांचही राजांचीं वसतिस्थानें निरनिराळीं अ-सून पुढें पांचांचे वंशही पृथक् पृथक् झाले. कोणे एके दिवशीं वसुराजा आकाशगामी स्फटिकमय इंद्रदत्त विमानामध्यें बसून संचार करीत अस-तां त्या राजा सन्निध गंधर्व अप्सरा येऊन भाषण करितात हे राजा, तुझें नाव उपरिचर असें सकल लोकांमध्यें विश्रुत आहे. वैशंपायन भाषण करितात हे राजा, त्या राजाच्या पुरासन्निध शक्तिमती नामक एक नदी होती. त्या नदीचा कोलाहल नामक गिरीनें कामातुर होऊन अवरोध केला असतां राजानें त्या गिरीस पादताडण करितांच वसुराजाच्या पादताडणा-नें त्या गिरीस एक विवर पडलें त्या द्वारानें नदीचा प्रवाह पुढें जात असतां त्या नदीचाठायीं पर्वता पासून स्त्री व पुत्र असें एक मिथुन उत्पन्न झालें तें नदीनें पाहून परम संतोषानें राजास सांगीतलें. तें राजानें ग्रहण करून त्या नदीपुत्रास आपला सेनापति आणि गिरिकानामक नदीकन्येस आपली भार्या केली. ती गिरिका नामक नदीकन्या वसुराजाची भार्या झाल्यावर ऋ-तुकाल समय प्राप्त होतांच राजास ह्मणाली हे राजा, मी आतां ऋतुस्नात हो-ऊन शुद्ध झाल्यें, आतां हा पुत्र प्रसवकाल योग्य आहे. असें ज्या दिवशीं भार्येनें राजास निवेदन केलें त्याच दिवशीं राजाचे पितर भाषण करितात कीं हे मतिमंतश्रेष्ठा, आह्मीं तुजवर अत्यंत संतुष्ट होऊन असें सांगतों कीं, तूं आज मृगये करितां अरण्यामध्यें गमन करून मृगहिंसा करावीस असें पितरांचें भाषण श्रवण करून त्यांची आज्ञा परिपालन करण्या करितां रा-जा कामातुर होऊन अति रूपसंपन्न साक्षात् श्रीच काय अशा गिरिकाना-मक भार्येचें स्मरण करून गेला. अशोक, चंपक, पुन्नाग, कर्णिकार, बकुल, पाटल, दिव्यपाटल, नारिकेल, चंदन व अर्जुन इत्यादि वृक्षांनीं युक्त, पुण्य कारक आणि स्वादुफलानीं युक्त, कोकिल गणांनीं नादित, उन्मत्त भ्रमरांनीं शब्दित साक्षात चैत्ररथवनचकाय अशा वनामध्यें वसंत काळीं मृगये करितां राजा गेला. तेव्हां आपली भार्या गिरिका सन्निध नाहीं असें पाहून फारच कामसंतप्त झाला. नंतर स्व इच्छेनें तो वनामध्यें फिरत फिरत रमणीय अ-

शोक वृक्षाच्या अधोभागीं बसला. तेथें सुगंध व मनोहर वायु सुटला होता ते- णें करून राजास वारं वार स्त्रीचें स्मरण झाल्यामुळें अति आसक्त होऊन मनें करूनच मी स्त्रीशीं रत झालों अशी कल्पना करीत असतां त्या वनामध्यें रेतस्खलन झालें तें व्यर्थ न जावें ह्मणून द्रोणांत धरिलें. आणि या पासून आ पल्या स्त्रीस उपयोग पडावा असा विचार करीत बसला असतां एक श्येनप- क्षी दृष्टीस पडला त्यास ह्मणाला कीं, हें तूं घेऊन माझ्या स्त्रीचे स्वाधीन क- र. असें ह्मणून पुत्रोत्पत्ति लिंगक मंत्रांनीं त्या रेतावर अभिमंत्रण करून तें रेत पक्ष्याचे स्वाधीन करतांच तें पात्र चंचु पुटांत धरून तो पक्षी वेगानें उड्डाण करी- त आकाशमार्गानें जात असतां दुसऱ्या एका श्येनपक्ष्यानें त्यास पाहून त्या उभयतांचें युद्ध होऊन तें रेत यमुनानदीमध्यें पडलें. त्या नदींत अद्रिकानामक अप्सरा ब्रह्मशापानें मत्स्यी होऊन संचार करीत असतां तें रेत तिणें भक्षण के ल्यामुळें गरोदर झाली. कांहीं दिवस गेल्यावर धीवराचे जाळ्यांत ती म त्स्यी सांपडली होती ती प्रसूत होऊन एक स्त्री व एक पुत्र हीं उत्पन्न झालीं तीं बालकें धीवरानें राजास दिलीं. तो मत्स्यीच्या उदरा पासून उत्पन्न झाले- ला पुत्र पुढें कांहीं दिवसांनीं मोठा धार्मिक व सत्यशील झाला त्याची मत्स्य राजा अशा नामानें ख्याति झाली.

इकडे ती मत्स्यी पूर्वीं अप्सरा असतां तिला शाप होऊन तिर्यग्योनि प्राप्त झाली. त्या काळीं तिला असा उःशाप होता कीं, दोन मनुष्यें तुझ्या उ- दरा पासून ज्या काळीं उत्पन्न होतील त्या काळीं तूं शाप निर्मुक्त होऊन पू- र्वीं प्रमाणें अप्सरा होशील. त्या प्रमाणें मत्स्यी आपलें स्वरूप टाकून दिव्यदे- ह धारण करून स्वर्गीं गेली. तिला मत्स्यगंधिनी नामक कन्या होती ती रा- जानें पुनः धीवरास दिली. ही कन्या रूपादि सर्व गुणांनीं युक्त असल्यामुळें धीवरानें तीचें नामाभिधान सत्यवती असें ठेविलें. ती आपल्या पित्याच्या सेवे करितां निरंतर नौकेमध्यें राहून नौकावहन करित असतां कोणे एकेकाळीं पाराशर ऋषि नौकेमध्यें आले. त्याणीं ती रूपसंपन्न कन्या पाहून तीस ह्मणा- ले कीं, तूं माझ्याशीं संगत हो. असें श्रवण करून कन्या भाषण करित्ये हे. ऋषे, लोक पहात असतां समागम कसा होईल। असें तिणें भाषण करितां

च ऋषीनें अकस्मात धुकें उत्पन्न केलें. हें महर्षीनें अघटित कर्म पाहून ती विस्मित झाली आणि ह्मणाली कीं हे ऋषे, मी कन्या अवस्थेंत असतां तुम च्याशीं संयोग केला तर माझी कन्या अवस्था दोषित होऊन पितृगृहीं राह- ण्यास मी योग्य होणार नाहीं, या विषयींचा विचार करून जें कर्तव्य असेल तें करावें. हें श्रवण करून ऋषि संतुष्ट होऊन ह्मणाला कीं, तुझें कन्यात्व न ष्ट होणार नाहीं, आणि तुला वर देतों इच्छा असल्यास माग. जो मी व- र देईन तो कधीं व्यर्थ व्हावयाचा नाहीं. असें ऋषीचें भाषण श्रवण करून कन्या भाषण करिती हे महाराज, माझे गात्रास सुगंधता प्राप्त व्हावी असें तिणें भाषण करितांच ऋषीनें तिचा देह सुगंधित केला. तेव्हां ती अति संतु- ष्ट होऊन त्या पराशर ऋषी सहवर्तमान रत झाली. एक योजन पर्यंत तीच्या शरीराचा सुगंध जात असे ह्मणून योजनगंधा असें दुसरें तिचें नाम प्रसिद्ध झालें. सत्यवती हर्षित होऊन पाराशर ऋषीशीं संयुक्त होतांच गर्भ धारण करून यमुनाद्वीपामध्यें प्रसूत झाली असतां व्यास उत्पन्न झाले. नंतर व्या- स मातेची आज्ञा घेऊन तप करण्या करितां वनामध्यें निघाले तेव्हां मातेस ह्मणाले कीं, तूं माझें स्मरण करशील त्या काळीं मी तुला दर्शन देईन. सत्यव- तीनें प्रसव काळीं आपला गर्भ द्वीपामध्यें ठेविला होता ह्मणून द्वैपायन असें नामाभिधान प्राप्त झालें. मनुष्याची शक्ति व आयुष्य, युगाचे मानानें क्षीण हो- त चाललें हें जाणून ब्राह्मणावर अनुग्रह करावा या हेतूनें पाराशर पुत्रानें शाखाभेदें करून वेदाचा विस्तार केला ह्मणून त्याचें नाम व्यास असें वि- ख्यात झालें. भारतासहवर्तमान सकल वेदाचा अभ्यास सुमंतु, जैमिनि, पै- ल व आपला पुत्र शुक यांजकडून करविला. सर्व शिष्यांत वरिष्ठ व वरद अ- शा वैशंपायन, सुमंतु प्रभृति इतर शिष्यांनीं भारताच्या मूलभूत मंत्रब्राह्म- णरूप संहिता पृथक् पृथक् प्रकाशित केल्या. तसाच महावीर भीष्माचार्य वसूच्या वीर्यापासून गंगेचाठायीं उत्पन्न झाला. कोणी एक वेदार्थवेत्ता ब्रा- ह्मण अणिमांडव्य नामें करून विख्यात होता, त्यास कोणी एका राजानें चो- रीची शंका धरून सुळावर दिला होता तेव्हां, ऋषीनें यमधर्मास बोलावू- न असें भाषण केलें कीं, मी बाल्यावस्थेमध्यें एक अळी कात्यानें विद्ध

केली इतकेंच पाप मला स्मरत आहे माझें तप तर अमित असून त्याणें स्वल्प पापाचा नाश होणार नाहीं कीं काय? अरे इतक्याच पापाच्या योगानें ब्राह्मण वधास तूं उद्युक्त झालास तस्मात् तूंच अत्यंत पापी आहेस ह्मणून शूद्रयोनीचाठायीं उत्पन्न होशील. त्या शापाच्या योगानें धर्मही असतां शूद्रयोनींत विदुररूपानें उत्पन्न झाला. गवल्गणापासून ऋषितुल्य संजयनामक सुत उत्पन्न झाला. कुंती कुमारिका असतां सूर्यापासून कवच कुंडलें धारण केलेला असा महाबली कर्ण उत्पन्न झाला. सकल लोकांवर अनुग्रह करावा ह्मणून उत्पत्तिशून्य, संग रहित, निर्गुण, पुरुष, कर्ता, सर्व भूतांचा पितामह, असा श्रीकृष्ण भगवान वसुदेवापासून देवकीचाठायीं धर्मसंस्थापनार्थ अंधक वृष्णी कुलामध्यें प्रादुर्भूत झाला. तोच नारायण अस्त्रवेत्ता, महावीर्य, सर्वशस्त्र विशारद रामकृष्णरूपें करून व्यक्त झाला. नारायण सेवक सात्यकी आणि कृतवर्मा हे उभयतां अस्त्रविद्याकुशल, सत्य आणि हृदिक यांपासून उत्पन्न झाले. उग्र तपस्वी भरद्वाजऋषी यांचें रेत कोणेएकेकाळीं गिरिकंदरावर पतन पावून वृद्धि पावत असतां द्रोणाचार्य उत्पन्न झाले. गौतम ऋषीपासून बाणाग्रावर रेतस्खल होऊन तें द्विधा झाल्यामुळें त्यापासून कन्या व पुत्र हें मिथुन उत्पन्न झालें. त्यांतून कन्या ही अश्वत्थाम्याची माता आणि पुत्र ते कृपाचार्य या नामानें प्रसिद्ध झाले. त्या कृपीचेठायीं पुढें द्रोणापासून अश्वत्थामा उत्पन्न झाला. तसाच अग्नीसारखा तेजस्वी धृष्टद्युम्न, यज्ञकर्माचेठायीं अग्नीपासून द्रोणाचार्याच्या नाशार्थ धनुष्य बाणासहवर्तमान उत्पन्न झाला. त्याच वेदीमध्यें तेजस्विनी, शुभवती अशी कृष्णा ह्मणजे द्रौपदी उत्तम रूपें करून उत्पन्न झाली. प्रन्हादाचा शिष्य सुबल नामें करून होता त्याजपासून पुढें शकुनी व दुर्योधनाची माता हीं उत्पन्न झालीं. कृष्णद्वैपायनापासून विचित्रवीर्यनामक राजाच्या स्त्रीचेठायीं धृतराष्ट्र आणि पांडु हे दोन पुत्र उत्पन्न झाले. धर्मार्थ, कुशल, धीमान्, पापरहित व मेधावी असा विदुर नामक पुत्र शूद्रयोनींत द्वैपायनापासून उत्पन्न झाला. पांडुराजापासून देवासारिखे असे पांच पुत्र झाले. पांडुराजाच्या दोन स्त्रिया होत्या, त्यांमध्यें गुणेंकरून श्रेष्ठ असा युधिष्ठिरराजा यमधर्मापासून झाला. भीम वायूपासून झाला

शस्त्रधान्यामध्यें श्रेष्ठ असा अर्जुन इंद्रापासून झाला. रूपसंपन्न व गुरुशुश्रुषेविषयीं अत्यंत रत असे नकुल आणि सहदेव अश्विनीकुमारापासून झाले. धृतराष्ट्रापासून दुर्योधनप्रभृति शंभर पुत्र व दासीपुत्र युयुत्सु असे एकशें एक पुत्र उत्पन्न झाले. त्यांत दुर्योधन, दुःशासन, दुःसह, दुर्मर्षण, विकर्ण, चित्रसेन, विविंशति, जय, सत्यव्रत, पुरुमित्र आणि वैश्यापुत्र युयुत्सु हे अकरा महारथी होते. अभिमन्यु सुभद्रेचाठायीं अर्जुनापासून उत्पन्न झाला. तसेच पांचालीचेठायीं पांच पुत्र उत्पन्न झाले. त्यांत धर्मापासून प्रतिविंध्य भीमापासून सुतसोम, अर्जुनापासून श्रुतकीर्ति, नकुलापासून शतानीक आणि सहदेवापासून श्रुतसेन असे उत्पन्न झाले. भीमसेनापासून वनामध्यें हेडिंबीचेठायीं घटोत्कच नामें पुत्र झाला. जा स्थूणनामक यक्षानें शिखंडी स्त्री असतां पुरुष केला तो शिखंडी द्रुपदापासून उत्पन्न झाला. या प्रकारें कौरव आणि पांडव यादोघांचा कलह झाल्यामुळें सहस्रावधि राजे आले होते त्यांची अपरिमित नामें असल्यामुळें मुख्य मुख्य राजे होते ते मी तुला निवेदन केले. असा विषय या अध्यायांत आहे.

६४ अध्याय चौसष्ठावा- जनमेजय प्रश्न करितो हे वैशंपायनऋषे, पूर्वीं जे तुह्मीं राजे सांगितले, आणि जे सांगितले नाहींत त्यांचें सविस्तर वृत्त श्रवण करण्यास मीं इच्छितों. देवासारखे पराक्रमी राजे या पृथ्वीवर ज्या कारणास्तव अवतरले त्यांचें आख्यान सांगण्यास तुह्मीं योग्य आहां. असें जनमेजयाचें भाषण श्रवण करून वैशंपायन भाषण करितात हे जनमेजया, स्वयंभूस नमस्कार करून हें देवाचें रहस्य तुला सांगतों. पूर्वीं जामदग्न्यराम एकवीस वेळ निःक्षत्रिय पृथ्वी करून महेंद्रपर्वतावर तप करूं लागले. त्याकाळीं निःक्षत्रिय पृथ्वी झाली असें जाणून आपल्यास प्रजा व्हावी या उद्देशानें सकल क्षत्रियांच्या स्त्रिया ब्राह्मणांकडे गेल्या, तेव्हां नियतव्रती व तपस्वी ब्राह्मण क्षत्रियस्त्रियां सहवर्तमान गमन करीत असतां त्या गर्भवती होऊन सहस्रावधी वीर्यवान् क्षत्रिय व क्षत्रियकन्या अशा उत्पन्न झाल्या: तेणें करून पुनः क्षत्रियकुलाची वृद्धि होऊं लागली. तशीच ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे च्यारी वर्णही स्वस्त्रीचाठायीं ऋतुकालीं गम

न करीत असतां त्यांच्या कुलांचीही वृद्धि होत चालली. तिर्यग्योनीचा ठायीं जे उत्पन्न झाले तेही ऋतुकाळीं स्वदाराभिगमन करूं लागल्यामुळें धर्माची वृद्धि होऊन सहस्त्रावधी जीव वृद्धीस पावले. सकल प्रजा धर्मपरायण झाल्यामुळें आधिव्याधिइत्यादि दुःखें नाहीशीं झालीं. हे राजा, शैल, वन व पट्टण यांसहवर्तमान सागरांत पृथ्वी, क्षत्रियकुलांनीं वेष्टित झाली. क्षत्रिय आपल्या धर्मे करून पुनः पृथ्वीचें उत्तम प्रकारें संरक्षण करूं लागल्यामुळें ब्राह्मणादिक वर्णांसि परम सुख होऊं लागलें. कामक्रोधादि दोषांचा त्याग करून जे दंडास योग्य असतील त्यांसच दंड करून सकल प्रजेचे राजे मोठ्या नम्रतेनें पालन करूं लागले. असें इंद्रानें जाणून यथाकाळीं पर्जन्याचा वर्षाव करून फलमूलादिकांच्या उत्पत्तीनें तो प्रजेचें पालन करूं लागला. बाल्यावस्थेमध्यें कोणास मृत्यु नाहींच. पुरुषांस यौवन अवस्था प्राप्त झाल्या वांचून स्त्री विषयीं इच्छा होत नसे. अशा कारणानें सकल प्रजांचीं आयुष्यें वृद्धिंगत झाल्यामुळें सागरांत पृथ्वी प्रजेनें पूर्ण होऊन गेली. बहुत दक्षिणा युक्त असे याग क्षत्रिय करूं लागले. सांग उपनिषद्वेद ब्राह्मण निरंतर अध्ययन करूं लागले. ब्राह्मणांनीं वेदाचा विक्रय कधींही केला नाहीं. वैश्यांनीं आपलें कृषि कर्म करून या पृथ्वीवर वास केला. नांगरास बैल न जोडितां पेरल्या वांचून पृथ्वी पासून धान्याची उत्पत्ति होऊं लागली. जे कृशांग दिसत होते ते पुष्टांग होऊन जीवन करूं लागले. गायींचे वत्स तृण भक्षण न करून केवळ दुग्धानेंच उपजीवन करीत आहेत तों पर्यंत मनुष्यांनीं गायींचें दोहन केलें नाहीं. वैश्य आपल्या विक्रय कर्मामध्यें कपट न करितां धर्मे करून स्वव्यापार करूं लागले. हे राजा, या प्रकारें सर्व मानव आपआपल्या धर्माचा अंगिकार करून रहात असतां सकल प्रजा धर्मपरायण झाल्या. धर्माचा ऱ्हास कधींही झाला नाहीं. गायी व स्त्रिया स्वकाळींच प्रसूत होऊं लागल्या. ज्या ऋतूंत ज्या वृक्षांस पुष्पें व फलें यावयाचीं त्याच ऋतूंत येऊं लागलीं. असें कृतयुग उत्तम प्रकारें प्रवृत्त झालें असतां सकल मनुष्यांस आनंद होऊन पृथ्वी प्राण्यांनीं व्याप्त होऊन गेली असतां देवांनीं युद्धामध्यें पराजित केलेले

दैत्य ऐश्वर्यापासून नष्ट झाल्यामुळें स्वर्गापासून पतन पावले, तेव्हां मनु-ष्यांमध्यें तरी आपण जाऊन त्यांच्यामध्यें श्रेष्ठ व्हावें अशा हेतूनें ते पृथ्वी-वर येऊन क्षत्रियांच्या कुलामध्यें उत्पन्न झाले. तसेच गायी, अश्व, खर, उ-ष्ट्र, महिष, मांस भक्षण करणारीं भूतें, गज व मृग या योनींत ही त्या असु-रांनीं जन्म घेतले. त्या काळीं पृथ्वीवर अत्यंत भार झाल्यामुळें ती भारधा-रण करण्यास अशक्य झाली. दिती व दनूचे पुत्र आपल्या लोकापासून भ्रष्ट झाल्यामुळें या लोकीं येऊन त्यांणीं नानाप्रकारचीं रूपें धारण केलीं. वीर्य व मदयुक्त असे पृथ्वीचे राजे होऊन सागरांत पृथ्वीवर संचार करूं ला-गले. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व इतर प्राणी यांस आपल्या तेजानें पी-डित करीत भूत गणांची हिंसा करूं लागले. हे राजा, असे ते दुष्ट राजे सह-स्रावधी पृथ्वीवर संचार करीत असतां आपल्या बलें करून व वीर्यमदें क-रून आश्रमवासी बहुत ऋषींस त्रास देऊं लागले. ज्या काळीं सकळ पृ-थ्वी बलदर्पित असुरांनीं पीडित झाली त्या काळीं सर्व भूतांचा पितामह जो ब्रह्मदेव यास शरण जावें, या प्रकारें तिणें मनांत निश्चय करून महा-भाग्यवान्, मोठमोठे द्विज, महर्षी व देव यांसहवर्तमान ब्रह्मलोकीं जाऊन ब्रह्मदेवास नमस्कार करून भाषण करिते हे प्रभो, सुरासुर लोकांचे म-नोगत तुह्मांस विदित आहेत, सकल जगताचा स्रष्टा तूं असतां माझें दुः-ख तूं कसें जाणत नाहींस? असें पृथ्वीचें भाषण ऐकून ब्रह्मदेव भाषण करितात हे वसुंधरे, ज्या कारणास्तव तूं मजकडे आलीस त्या कारणा क-रितां सकल देवांस मी आज्ञा देऊन त्या त्या कृत्याविषयीं त्यांचा विनियो-ग केला आहे असें सांगितलें. आणि तीस, स्वस्थानीं जाण्याची आज्ञा देऊन सकल देवांस भाषण करितात. तुह्मीं पृथक् पृथक् भागानीं पृथ्वी-वर भार हरण करण्याकरितां उत्पन्न होऊन सकलांशीं विरोध उत्पन्न करावा. असें देवांस सांगून नंतर गंधर्व व अप्सरा यांस भाषण करितात कीं, तुह्मीं ही आपल्या अंशें करून मनुष्य लोकामध्यें उत्पन्न व्हावें. या-प्रकारें ब्रह्मदेवाचें भाषण श्रवण करून इंद्रादि देव आपल्या शक्तीप्रमा-णें अंशा अंशानीं पृथ्वीवर मनुष्यामध्यें उत्पन्न होण्याविषयींची इच्छा

धारण करून ते सकल वैकुंठवासी चक्रपाणी सर्व देव पूजित जो नारायण त्याचें स्तवन करूं लागले. नंतर इंद्र,पुरुषोत्तमास भाषण करितात कीं, हे भगवन् आपणही अंशानें पृथ्वीवर अवतार घ्यावा, त्या काळीं भगवंतानीं असें सांगितलें कीं, तुह्मीं सांगितल्या प्रमाणें आह्मीं अवतार घेतों. असा विषय या अध्यायांत आहे.

६५ अध्याय पांसष्टावा :- वैशंपायन भाषण करितात हे जनमेजया, नारायण आणि इंद्र या उभयतांनीं देवां सहवर्तमान पृथ्वीवर अंशें करून अवतार घेण्याचा विचार केल्यानंतर इंद्र, स्वतः आपण सर्व देवांस आज्ञा करून वैकुंठा पासून निघाला असतां सर्व देव, शत्रूंचा नाश व्हावा व सर्व लोकांचें हित व्हावें ह्मणून क्रमें करून पृथ्वीवर कांहीं ब्रह्मऋषींच्या वंशात व कांहीं पार्थिवांच्या वंशात स्व इच्छे प्रमाणें अवतरून दानव,राक्षस, पन्नग,गंधर्व व दुसरे इतर पुरुषांस भक्षण करणारे दुष्ट प्राणी यांचा नाश करूं लागले. त्याकाळीं दानव,राक्षस,गंधर्व व पन्नग हे बलिष्ठ जरी होते तथापि त्या राजांचा पराभव करवला नाहीं. जनमेजय बोलतो हे वैशंपायनऋषे, देव,दानव,गंधर्व,अप्सरा,मानव,यक्ष,राक्षस व आणखी इतर प्राणी यांचा संभव कसा झाला तें सकल मी श्रवण करण्याची इच्छा करितों. असा जनमेजयाचा प्रश्न श्रवण करून वैशंपायन भाषण करितात हे राजा,तूं फार चांगलें भाषण केलेंस आतां लोक प्रभव जो ब्रह्मा, यास नमस्कार करून सकलांचा उत्पत्तिसंभव मी सांगतों श्रवण कर. ब्रह्मदेवाचे मानस पुत्र ऋषिश्रेष्ठ असे मरीचि,अत्रि,अंगिरा,पुलस्त्य,पुलह,क्रतु हे सहा सकलांस मरव्यात असे उत्पन्न झाले. मरीची पासून कश्यप झाला. नंतर कश्यपा पासून ही सकल प्रजा उत्पन्न झाली. दक्षास,अदिति,दिति,दनु, काला दनायु सिंहिका,क्रोधा,प्राधा,विश्वा,विनता,कपिला,मुनी,कद्रु अशा तेरा कन्या झाल्या. यांपासून वीर्यशाली बलवान् अशी पुत्र पौत्रादि संतति बहुत झाली. हे राजा, अदिती पासून द्वादशादित्य भुवनाचे ईश्वर धाता,मित्र,अर्यमा,शक्र,वरुण,अंशभग,विवस्वान्,पूषा,सविता,त्वष्टा,आणि विष्णु या नावानें उत्पन्न झाले. त्यांत तो विष्णु सर्वांपेक्षां कनिष्ठ असून

गुणानें अधिक झाला. दिती पासून हिरण्यकश्यपुनामक एक पुत्र झाला. त्या पासून प्रल्हाद, संल्हाद, अनुल्हाद, शिबी आणि बाष्कल असे पांच पुत्र मोठे प्रख्यात उत्पन्न झाले. प्रल्हादा पासून विरोचन, कुंभ आणि निकुंभ असे तीन पुत्र झाले. विरोचना पासून महा प्रतापी बळी या नावें पुत्र झाला. बळी पासून महासुर रुद्राचा अनुचर बाणनामक असुर सकळांत विख्यात असा झाला, त्यालाच महाकाल असे ह्मणूं लागले. दनुपासून विप्रचित्ती, शंबर, नमुची, पुलोमा, असिलोमा, केशी, दुर्जय, अयःशिरा, अश्वशिरा, अश्वशंकू, गगनमूर्धा, वेगवान्, केतुमान, स्वर्भानु, अश्व, अश्वपती, वृषपर्वा, अजक, अश्वग्रीव, सूक्ष्म, तुहुंड, इषुपात, एकचक्र, विरूपाक्ष, महोदर, निचंद्र, निकुंभ, कुपट, कपट, शरभ, शलभ, सूर्य आणि चंद्र हे उत्पन्न झालेले दानव तुला सांगितले. सूर्य आणि चंद्र यांची उत्पत्ति देवांत आहे आणि दानवांत जे झाले ते भिन्न आहेत. हे राजा, महा बलाढ्य असे दनूचे पुत्र तुला सांगितले आणखीही एकाक्ष, मृतपा, प्रलंब, नरकासुर, वातापी, शत्रुतपन, शठ, गविष्ठ, वनायु आणि दीर्घजिव्ह असे दहा दानव दनूपासून उत्पन्न होऊन त्यां पासून पुत्र पौत्रादि असंख्याक दानव उत्पन्न झाले. सिंहिके पासून चंद्रार्क मर्दन करणारा राहु, सुचंद्र, चंद्रहर्ता व चंद्रप्रमर्दन असे पुत्र उत्पन्न झाले. क्रूरस्वभावजी क्रोधा तीपासून क्रूर स्वभाव युक्त पुत्र पौत्रादि अनंत वंश झाला. त्या सकळ गणांस क्रोधवश नामक गण असे लोकात ह्मणूं लागले. दनायू पासून असुरांत श्रेष्ठ विक्षर, बल, वीर, वृत्र हे चार पुत्र उत्पन्न झाले. कालेपासून कालासारखेच प्रहार करणारे, प्रख्यात, महावीर्यवान् असे विनाशन, क्रोध, क्रोधहंता, क्रोधशत्रु इत्यादिक पुत्र उत्पन्न झाले. असुरांचा उपाध्याय ऋषी यापासून शुक्रनामानें उत्पन्न झाला. उशनाचे पुत्र त्वष्टाधर, अत्रि व दुसरे रौद्र कर्म करणारे असे दोन पुत्र तेजें करून सूर्यासारखे ब्रह्मलोकपरायण असुरांचे गृहीं याग करणारे असे उत्पन्न झाले. या प्रकारें असुर व सुर यांचा वंशप्रभव पुराणामध्यें श्रवण केलेला तुला मी प्रधान्यें करून सांगितला. यांचीं पुढें बहुत अपत्यें झालीं तीं मी विस्तारें करून सांगण्यास समर्थ नाहीं. विनते पासून तार्क्ष्य, अरिष्टनेमि, गरुड, अरुण, अ-

रुणी, वारुणी हे पुत्र उत्पन्न झाले. शेष, अनंत, वासुकी, तक्षक, कूर्म, कुलिक, हे कद्रू पासून उत्पन्न झाले. भीमसेन, उग्रसेन, सुपर्ण, वरुण, गोपती, धृतराष्ट्र, सूर्यवर्चा, सत्यवाक्, अर्कपर्ण, प्रयुत, भीम, चित्ररथ, शालिशिरा, पर्जन्य, कली व नारद हे सोळा पुत्र मुनिनामक दक्षकन्ये पासून उत्पन्न झाले. अनवद्या, मनु, वंशा, असुरा, मार्गणप्रिया, अरूपा, सुभगा, भासी या प्राधेपासून उत्पन्न झाल्या. सिद्ध, पूर्ण, बर्हि, पूर्णायु, ब्रह्मचारि, सुपर्ण, रतिगुण, विश्वावसु, भानु, सुचंद्र हे देवगंधर्वविश्वेपासून उत्पन्न झाले. प्राधे पासून देवऋषींच्या उत्पतीच्या पूर्वींच अलंबुषा, मिश्रकेशी, विद्युत्पर्णा, तिलोत्तमा, अरुणा, रक्षिता, रंभा, केशिनी, मनोरमा, सुबाहू, सुरता, सुरजा, सुप्रिया या अप्सरा उत्पन्न झाल्या व अतिबाहु, हाहा, हूहू व तुंबरु हे चार गंधर्वश्रेष्ठ उत्पन्न झाले. कपिले पासून अमृत, ब्राह्मण, गायी, गंधर्व व अप्सरा या उत्पन्न झाल्या. असें पुराणामध्यें परिकीर्तित आहे. या प्रकारें सर्व भूतांचा संभव व गंधर्व अप्सरांची उत्पत्ति तुला सांगितली. तसेंच भुजंग, सुपर्ण, रुद्र, मरुत, गायी व ब्राह्मण यांचा वंश, आयुष्य व पुण्यकारक असा तुला कथन केला. हा सकल वंश असूयारहित होऊन निरंतर श्रवण करण्यास योग्य आहे ब्राह्मण आणि देव यांच्या सन्निध महात्म्यांचा वंश नियमें करून जो पठण करील त्या पुरुषास अपत्यलाभ, बहुत धन, श्री आणि यश प्राप्त होऊन अंती उत्तम गति प्राप्त होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

६६ अध्याय सासष्टावा — वैशंपायन भाषण करितात हे जनमेजया, महर्षी असे ब्रह्मदेवाचे सहा मानस पुत्र विदित आहेतच. आतां सातवा स्थाणुनामक पुत्र होता त्यापासून महातेजस्वी परम विख्यात मृगव्याध, सर्प, निर्ऋति, अजैकपाद, अहिर्बुध्न्य, पिनाकी, दहन, ईश्वर, कपाली, स्थाणु, भग हे एकादश रुद्र उत्पन्न झाले. मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु हे पराक्रमी व बलवान् ब्रह्मदेवाचे मानस पुत्र आहेत त्यांतून अंगिरापासून बृहस्पति, उतथ्य व संवर्त असे तीन पुत्र सर्व लोकांस विश्रुत असे उत्पन्न झाले. अत्रीपासून जे पुत्र उत्पन्न झाले ते सर्वही वेदवेत्ते, शांतात्मे महर्षी असे होते. हे पुरुषव्याघ्रराजा, पुलस्त्या पासून राक्षस, वानर

किन्नर, यक्ष हे उत्पन्न झाले. शलभ, सिंह, किंपुरुष, व्याघ्र, यक्ष, लांडगे इत्यादि पुलहऋषीपासून झाले. क्रतूऋषीपासून सूर्यासारिखे तेजस्वी, सूर्यासहवर्तमान गमन करणारे, तीन लोकांत विख्यात, सत्यव्रतपरायण वालखिल्य नामक पुत्र झाले. ब्रह्मदेवाच्या दक्षिण अंगुष्ठा पासून शांतात्मा, महातेजस्वी दक्षनामक ऋषी झाला. आणि वामांगुष्ठा पासून दक्षाची भार्या झाली. त्या भार्येपासून दक्षास पन्नास कन्या झाल्या. त्या सर्व कन्या कमललोचना सर्वांगानीं अतिसुंदर असतां दक्षानें त्यांतून दहा कन्या धर्मास दिल्या. सत्तावीस कन्या चंद्रास दिल्या. तेरा कन्या दिव्य विधीकरून कश्यपऋषीस दिल्या. कीर्ति, लक्ष्मी, धृति, मेधा, पुष्टि, श्रद्धा, क्रिया, बुद्धि, लज्जा, मति ह्या दक्षाच्या दहा कन्या धर्माच्या पत्न्या होत. हीं केवळ धर्माचीच द्वारें आहेत ह्मणून ब्रह्मदेवानें कथन केलें आहे. सत्तावीस अश्विन्यादि नक्षत्र नामानीं प्रसिद्ध कन्या चंद्रास दिल्या त्या सकल लोकांत विश्रुत आहेत. दक्षाची वसुनामक एक कन्या होती तीचेठायीं धर्मापासून धर, ध्रुव, सोम, अह, अनिल, अनल, प्रत्यूष, प्रभास असे आठ पुत्र झाले, यांसच अष्टवसु असें ह्मणतात. पूर्वकल्पीं त्या वसुकन्येचें नांव धूम्रा असेंही प्रसिद्ध होतें. ती पासून ब्रह्मविद्या विशारद धर आणि ध्रुव हे दोन पुत्र झाले. मनस्विनी पासून चंद्रमा झाला. श्वासेपासून श्वसन झाला. रते पासून अहनामक पुत्र झाला. शांडिलीपासून हुताशन झाला. प्रत्युष आणि प्रभास असे दोन पुत्र प्रभातेस झाले. आतां वसूंच्या संततीचा प्रादुर्भाव सांगतों. धरास द्रविण आणि हुतहव्यवह असे पुत्र झाले. ध्रुवाचा पुत्र लोकांचा नाश करणारा काल ज्यास ह्मणतात तो झाला. ज्याची उपासना केली असतां तेजस्वी होतो असा वर्चा नामक पुत्र सोमास झाला. सोमाची भार्या मनोहरा होती ती पासून शिशिर, प्राण आणि रमण असे तीन पुत्र झाले. अन्हास, ज्योति, शम, शांत, मुनी असे पुत्र झाले. अग्नीचा पुत्र शरवण स्थानीं झाला. कुमार नामक होता त्यालाच शाख विशाख नैगमेय व पृष्ठज असें ह्मणतात तो पुत्र कृत्तिके पासून झाला ह्मणून ज्यास कार्तिकेय असेंही ह्मणतात. शिवा नामक अनिलाची भार्या तीचे ठायीं मनोजव आणि अविज्ञागति असे दोन पुत्र

झाले. मत्यूषा पासून देवल नामक पुत्र झाला. देवला पासून क्षमावंत आणि मनीषी असे दोन पुत्र झाले. बृहस्पतीची भगिनी सकल स्त्रियांमध्यें श्रेष्ठ ब्रह्मनिष्ठ योगाचे ठायीं आसक्त असून आसक्ता सारखी सकल जगताचे ठायीं संचार करीत असतां वसूमध्यें अष्टम जो प्रभास नामक वसु त्याची भार्या झाली तीचे ठायीं महा भाग्यवान् शिल्पप्रजापती विश्वकर्मा या नामें उत्पन्न झाला, सहस्रवधी शिल्पें त्याणें उत्पन्न केलीं. देवांचा वार्धकी त्यास ह्मणतात. सकल भूषणें त्याणें उत्पन्न केली. सकल शिल्पि जनामध्यें तो श्रेष्ठ होय, आकाशांतील देवांची विमानें विश्वकर्म्यानेंच केली. त्याची शिल्पविद्या मनुष्यांतही विख्यात आहे तेणें करून मनुष्यें उपजीवन करितात; त्या विश्वकर्म्यांचें निरंतर लोक पूजनही करितात. ब्रम्हदेवाच्या दक्षिण स्तनाचा भेद करून मनुष्य विग्रह धारण केलेला, सर्व लोकांस सुखावह असा धर्म नामक पुत्र उत्पन्न झाला. त्या धर्मा पासून सकल भूतांस मनोहर तेजें करून लोकांस धारण करणारे असे शम, काम आणि हर्ष असे तीन पुत्र उत्पन्न झाले. कामाची भार्या रति नामक होती. शमाची भार्या प्राप्ति आणि हर्षाची नंदा यांची लोकामध्यें प्रख्याति बहुत आहे. मरीची पासून कश्यप त्या पासून सुर व असुर उत्पन्न झाले. त्वाष्ट्री नामक सविताची भार्या, वडवा रूप धारण करून होती ती पासून महा भाग्यशाली असे अश्विनीकुमार नामक पुत्र अंतरिक्षांत उत्पन्न झाले. अदिती पासून इंद्र प्रमुख बारा पुत्र उत्पन्न झाले. त्यांमध्यें विष्णु कनिष्ठ होता, विष्णूनें सकल लोक धारण केले ह्मणून त्याची जगतांत कीर्ति आहे. हे राजा, आतां अष्टवसू, एकादशरुद्र, द्वादशादित्य, प्रजापती आणि वषट्कार असे तेहेतीस देव आहेत त्यांचा वंश पक्षें करून व कुलें करून झाला आहे तो सांगतो. रुद्रांचा एक पक्ष स्वतंत्रच आहे. तसाच साध्यांचा व मरुतांचा एक एक पक्ष स्वतंत्रच आहे. वसू, विश्वेदेव यांची भार्गव वंशामध्यें गणना करावी. गरुड, बलवान् अरुणी आणि बृहस्पति यांची आदित्यामध्यें गणना करावी. अश्विनीकुमार, सर्व ओषधी व पशू यांची गुह्यकामध्यें गणना करावी. हे देवगण तुला अनुक्रमानें सांगितले. यांचें

कीर्तन केलें असतां मनुष्य सर्व पापापासून मुक्त होतो. ब्रह्मदेवाचें हृद-य भेद करून भगवान भृगुऋषि उत्पन्न झाले. भृगूचा पुत्र विद्वान् (क-वी) त्याचा पुत्र शुक्रनामक ग्रह झाला. त्रैलोक्याच्या प्राणयात्रे करितां व-र्षण अथवा अवर्षण भय अथवा अभय या विषयीं ब्रह्मदेवानें शुक्राची योजना केली ह्मणून भुवनाचे ठायीं त्याची गति आहे. हा शुक्राचार्य योग बला-नें दोन रूपें धरून दैत्यांचा व बृहस्पति रूपानें देवांचाही गुरु झाला. अ-सा हा शुक्राचार्य महाप्रज्ञावान् ब्रह्मचारी भृगूचा पुत्र हा ब्रह्मदेवानें स-कलांच्या योगक्षेमार्थ योजिला असतां भृगुऋषीनें दीप्त, तेजस्वी, धर्मा-त्मा व यशस्वी असा दुसरा च्यवन नामक पुत्र उत्पन्न केला. तो च्यवनऋ-षी आपल्या मातेची लौकर सुटका व्हावी ह्मणून परम रोषानें गर्भापा-सून उत्पन्न झाला असतां मनूची कन्या आरुषी ह्मणून होती ती त्याणें च्यवन ऋषीस दिली. तीच्या ऊरूचा भेद करून महायशस्वी, महा तेजस्वी, वीर्यवान् असा और्वनामक पुत्र झाला. त्या पासून ऋचीक, त्या पासून जम-दग्नि, त्या पासून च्यार पुत्र झाले. त्यामध्यें सकल गुणांनीं युक्त सर्वशस्त्रा-स्त्र विद्येमध्यें कुशल क्षत्रियांचा अंत करणारा सकलांत कनिष्ठ राम याना-में करून झाला. ऋचीका पासून जमदग्नी प्रमुख शंभर पुत्र झाले. त्यां पा-सून सहस्त्रावधी पुत्र होऊन या पृथ्वीवर त्यांचा वंश विस्तार झाला. ब्रह्मापा-सून धाता आणि विधाता हे दोन पुत्र या लोकीं उत्पन्न झाले. ते मनूसह वर्तमान संचार करूं लागले. त्यांची एक भगिनी पद्मात वास करणारी, स-र्वांस शुभदात्री लक्ष्मी नामक देवी होती, तीपासून मनाचे संहार कर्ते, हा-र्दाकाशीं संचार करणारे असे मानस पुत्र बहुत उत्पन्न झाले. शुक्राचा-र्याची ज्येष्ठ भगिनी देवी ह्मणून होती ती वरुणाची भार्या झाली, ती पा-सून बलनामक पुत्र व सुरानामक कन्या अशीं दोन अपत्यें उत्पन्न झालीं. कोणे एके काळीं प्रजेस अन्न मिळेनासें झालें त्या काळीं एकमेकांस त्या भक्षण करूं लागल्या असतां सकल भूतांचा विनाशक असा अधर्मना-मक पुत्र उत्पन्न झाला त्याची निर्ऋति नामक भार्या होती ती पासून नैर्ऋ-तेय राक्षस झाले. तसेच भय, महाभय, भूतांचा नाश करणारा मृत्यु असे

तीन पुत्र निरंतर पाप कर्म करणारे उत्पन्न झाले. त्यांस पुढें भार्याही नाहीं व पुत्रही नाहीं. ताम्रानामक कश्यपाची भार्या होती तीपासून सकललोकां मध्यें विख्यात काकी, श्येनी, भासी, धृतराष्ट्री, शुकी अशा पांच कन्या झाल्या. त्यांमध्यें काकी पासून सकल उलूक नामक पक्षी झाले. श्येनीपासून श्येनपक्षी झाले. भासी पासून भास आणि गृध्र उत्पन्न झाले. धृतराष्ट्री पासून हंस, कलहंस व चक्रवाकपक्षी झाले. शुकीपासून सकल शुकपक्षी झाले. कल्याण गुणसंपन्न सर्व लक्षणांनीं पूजित क्रोधवशा नामें कश्यपपत्नी होती तीपासून मृगी, मृगमंदा, हरी, भद्रमना, मातंगी, शार्दूली, श्वेता, सुरभी, सर्व लक्षण संपन्न अशी सुरसा, अशा नऊ कन्या उत्पन्न झाल्या. त्यांतून हे राजा, मृगी पासून सकल मृगपक्षी झाले. मृगमंदे पासून ऋक्ष व सृमर पशु उत्पन्न झाले. भद्रमदे पासून ऐरावत गज झाला, त्यासच देवनाग व महागज असें ह्मणतात. हरीपासून मोठे चंचल असे वानर गोलांगूल इत्यादिक झाले. शार्दूली पासून अनेक प्रकारचे सिंह व्याघ्र व महाबलवान् गज झाले. मातंगी पासून मातंग झाले. श्वेते पासून श्वेत दिग्गज झाला. सुरभीपासून रोहिणी भद्रा नामक गंधर्वी विमला आणि अमला अशा कन्या झाल्या. त्यांपैकीं रोहिणी पासून गायी झाल्या. गंधर्वी पासून अश्व झाले. खरजुर, ताल, हिंताल, प्रभृती समपिंड फलनामक वृक्ष विमले पासून झाले. अनले पासून शुकी कन्या झाली. कंक ह्मणोन सुरभेस एक पुत्र झाला. अरुणाची भार्या श्येनी ह्मणून होती, ती पासून वीर्यवान् व महाबलवान् संपाति आणि जटायु असे दोन पुत्र झाले. सुरसे पासून नाग झाले. कद्रू पासून पन्नग झाले. विनते पासून विख्यात गरुड आणि अरुण असे दोन पुत्र झाले. वैशंपायन भाषण करितात हे जनमेजयराजा, असा सकल भूतांचा संभव उत्तम पकारें करून तुला सांगितला. याचें श्रवण केलें असतां पापा पासून मुक्त होऊन सर्वज्ञता प्राप्त होऊन शेवटीं श्रेष्ठ गतीस जातो. असा विषय या अध्यायांत आहे.

६७ अध्याय सदुसष्टावा :- जनमेजय भाषण करितो हे भगवन्ऋषे, देव, दानव, गंधर्व, उरग, राक्षस, सिंह, व्याघ्र, मृग, पन्नग, पक्षी, या सर्वांचा

मनुष्यलोकीं संभव कसा झाला? याचें तत्वेंकरून श्रवण करण्याची मी इच्छा करितों यास्तव या भूतांचें जन्म कर्म काय आहे तें क्रमेंकरून मला सांग? असा त्याचा प्रश्न श्रवण करून वैशंपायन भाषण करितात हे मनुष्येंद्र राजा, स्वर्गामध्यें रहाणारे जे देवदानवादिक ते मनुष्ययोनींत कसे प्राप्त झाले त्यांचें तत्व सांगतों; परंतु पूर्वी दानव असतां त्याणीं मनुष्यांमध्यें जन्म घेतले ते प्रथम सांगतों. विप्रचित्ती या नामानें पूर्वी दानवांमध्यें विख्यात होता, तो पुढें मनुष्यांत जरासंध या नामानें उत्पन्न झाला. दितीचा पुत्र हिरण्यकश्यपु होता तो पुढें शिशुपाल या नामेंकरून झाला. प्रऱ्हादाचा अनुज, संऱ्हाद ह्मणून होता तो वाह्लीक देशाचा राजा शल्य यानामानें झाला. अनुऱ्हाद ह्मणून प्रऱ्हादाचा कनिष्ठ बंधु होता तो धृष्टकेतु या नामानें राजा झाला. शिबी नामक दितीचा पुत्र होता तो द्रुम या नामानें राजा झाला. बाष्कल या नामानें एक असुरांमध्यें श्रेष्ठ होता तो भगदत्त या नामानें सकलांत श्रेष्ठ असा झाला. अयःशिरा, अश्वशिरा, अश्वशंकु, गगनमूर्धा, वेगवान् असे पांच महासुर बलाढ्य होते ते पुढें कैकयदेशीचे राजे झाले. केतुमान् नामक महा प्रतापी व विख्यात असुर होता तो अमितौज्या या नामानें उग्रकर्म कर्ता राजा झाला. स्वर्भानु नामक महासुर विख्यात होता तो उग्रसेन या नामानें उग्रकर्म करणारा राजा झाला. जो अश्व या नामानें विख्यात महासुर होता तो अशोक या नामानें महावीर्यवान् व पराजय करण्यास अशक्य असा राजा झाला. हे राजा, त्या दैत्याचा कनिष्ठ बंधु अश्वपति या नामेंकरून होता तो हार्दिक्य या नामेंकरून राजा झाला. वृषपर्वा ह्मणून जो महासुर विख्यात होता तोच दीर्घप्रज्ञ या नामानें पृथ्वीवर राजा झाला. हे राजा, वृषपर्व्याचा कनिष्ठबंधु अजक नामेंकरून होता, तो शाल्व या नामानें विख्यात पृथ्वीपति झाला. अश्वग्रीव या नामेंकरून बलाढ्य एक महासुर होता तो रोचमान् या नामेंकरून पृथ्वीवर नृप उत्पन्न झाला. हे राजा, सूक्ष्म या नामेंकरून एक मतिमान् दैत्य होता त्यासच कीर्तिमान् असें ह्मणतात तो, बृहद्रथ या नामेंकरून पृथ्वीवर पार्थिव उत्पन्न झाला. तुहुंड या नामानें एक विख्यात असुर होता तो सेनाबिंदु या नामानें विख्यात नरा

धिप पृथ्वीवर उत्पन्न झाला. बलानें अधिक असा इषुपात् या नामेंकरून एक असुर होता तो नग्नजित् या नामानें भूमीवर विख्यात राजा झाला. एक चक्र ह्मणून विख्यात एक असुर होता तो प्रतिविंध्य या नामानें पृथ्वीवर राजा झाला. विरूपाक्ष या नामानें चित्रयोद्धा महासुर होता तो चित्रधर्मा या नामें करून विख्यात राजा झाला. शत्रूचें हनन करणारा कोणी एक दानवोत्तम, हर नामें करून होता तो सुबाहु या नामानें विख्यात राजा उत्पन्न झाला. महा तेजस्वी शत्रुपक्षाचा क्षय करणारा अहर नामेंकरून विख्यात दैत्य होता तो बाल्हीक या नामानें विख्यात पृथ्वीवर राजा उत्पन्न झाला. कोणीएक निचंद्र अथवा चंद्रवक्र या नामेंकरून असुरोत्तम होता तो मुंजकेश या नामानें विख्यात पार्थिव उत्पन्न झाला. जो युद्धांत अजित महामती माननी कुंभनामक दैत्य होता तो भूमीवर भूपतींमध्यें श्रेष्ठ देवाधिप या नामानें राजा उत्पन्न झाला. शरभ नामक जो दैत्यांमध्यें महासुर होता तो पौरव नामक राजऋषी पृथ्वीवर झाला. कुपट या नामानें महावीर्यवान् आणि श्रीमान् असा महासुर होता तो सुपार्श्व या नामानें पृथ्वीवर राजा झाला, तो चक्राय या नामेंकरून राजऋषींमध्यें परिगणीत झाला. कांचन पर्वता सारिखा पार्वतेय या नामेंकरून असुर होता, तो असुरां मध्यें दुसरा शलभच झाला होता तो बाल्हीक देशाचा राजा प्रल्हाद या नामें करून पृथ्वीवर उत्पन्न झाला. चंद्र ह्मणोन दितीचा एक श्रेष्ठ पुत्र होता, या लोकीं त्यास चंद्राचीच उपमा होती तो चंद्रवर्मा या नामेंकरून कांबोजांचा नराधिप उत्पन्न झाला. अर्क या नामें करून विख्यात दानवश्रेष्ठ होता तो ऋषिक या नामेंकरून राजऋषी श्रेष्ठ पृथ्वीवर उत्पन्न झाला. हे राजा, मृतपा या नामेंकरून असुरोत्तम होता तो पश्चिमानूपक राजा झाला. गविष्ठ या नामानें असुर होता तो द्रुमसेन या नामानें राजा झाला. मयूर या नामें करून असुर होता तो विश्व या नामानें विख्यात राजा झाला. सुपर्ण या नामें करून मयूर दानवांचा कनिष्ठ बंधु होता तो कालकीर्ति या नामेंकरून राजा झाला. त्या दैत्यांमध्यें चंद्र हंता ह्मणून एक असुर होता तो शुक राजऋषी झाला. चंद्राचा विनाशन कर्ता महासुर होता तो जानकी नामानें राजा

झाला. दीर्घजिव्हा ह्मणून दानवश्रेष्ठ होता तो काशिराजा झाला. अर्क आणि इंदु यांचें मर्दन करणारा असा एक राहुनामक ग्रह होता तो क्राथ या नामें राजा झाला. दनायुषाचे चार पुत्र होते त्यांतील विक्षर या नामें एक पुत्र होता तो वसुमित्र राजा झाला. विक्षरापेक्षां दुसरा जो त्याचा बंधु होता तो पांड्यराष्ट्राचा राजा झाला. बलीनर ह्मणून विख्यात एक असुर होता तो पौंड्रमात्स्यक नामें राजा झाला. जो वृत्र या नामेंकरून असुर होता तो मणिमान् राजऋषी झाला. क्रोधहंता ह्मणून एक असुर होता तो दंडनृपति झाला. क्रोधवश ह्मणून एक असुर होता तो दंडधार नामें राजा झाला. हे नृपशार्दूलजनमेजयराजा, कालेयाचे पुत्र होते त्यांत आठ पुत्र शार्दूला सारखे पराक्रमी राजे झाले, त्यांतून एक मागधदेशांत जयत्सेन नामक राजा झाला. दुसरा अपराजित, तिसरा महाजयनामक महासुर होता तो निषाधदेशाचा राजा झाला. चतुर्थ होता तो श्रेणिमान् राजऋषीसत्तम झाला. पांचवा महासुर तो महौजा नामें करून राजा झाला. सहावा मतिमान् जो असुर तो अभीरु ह्मणून राजऋषी झाला. त्याच समुदायापैकीं एक असुर होता, तो समुद्रसेन ह्मणून धर्मार्थ तत्ववेत्ता सागरांत पृथ्वीचेठायीं विख्यात असा राजा झाला त्याकालेयामध्यें बृहन्नामक आठवा असुर होता तो सर्व भूत हिताविषयींरत, धर्मात्मा राजा झाला. कुक्षीनामक दानव तो पार्वतीय राजा झाला. क्रथन या नामेंकरून असुर होता तो सूर्याक्ष ह्मणून राजा झाला. जो असुरांमध्यें सूर्य ह्मणून एक महासुर होता तो दरद या नामें बाल्हीक देशाचा राजा झाला. हे जनमेजयराजा, क्रोधवश या नामें एक दानवांचा समुदाय पूर्वी तुला सांगितला. ते सकल दानव पृथ्वीवर राजकुलामध्यें उत्पन्न झाले त्यांचीं नावें सांगतों. मद्रक, कर्ण, वृष्ट, सिद्धार्थ, कीटक, सुवीर, सुबाहु, महावीर, बाल्हीक, क्रथ, विचित्र, सुरथ, नीलनामकराजा, चीरवासा, भूमिपाल, दंतवक्र, दुर्जय, रुक्मी, जनमेजय, आषाढ, वायुवेग, भूरितेजा, एकलव्य. सुमित्र, वाग्धान, गोमुख, कारुष नामक राजे होते. क्षेमधूर्ती, श्रुतायु, उद्वह, बृहत्सेन, क्षेम, उग्रतीर्थ, कुहर हे कलिंग देशाचे राजे होत. हे मनुष्येंद्रजनमेजयराजा, ईश्वर ह्मणून एक मतिमान राजा होता. क्रोधवश ह्मणून एक समुदाय

होता तो राजसमुदाय पृथ्वीवर उत्पन्न झालेला तुला सांगितला. पूर्वीं महाभाग्यवान्, महाकीर्तिमान् व बलवान् कालनेमी ह्मणून दानवांमध्यें महाबली होता तो कंस या नामानें विख्यात उग्रसेनाचा पुत्र झाला. जो पूर्वीं देवक ह्मणून इंद्रासमान कांतिमान् होता तो पृथ्वीवर गंधर्वपति नामक मुख्य राजा झाला. बृहत्कीर्ति बृहस्पति ह्मणून देवऋषीचा अंश भारद्वाज कुलांत अयोनिसंभव द्रोण नामक झाला. तो धनुर्धाऱ्यांमध्यें उत्तम सर्वास्त्रवेत्ता त्याचें कर्म चित्र विचित्र असून सर्वांमध्यें तो वरिष्ठ होता. स्वकुलाची त्या द्रोणानें वृद्धि केली. काम व क्रोध यानें महादेव, अंतक यांची एकत्रता होऊन परंतप, शूर, महावीर्यवान् असा अश्वत्थामा पृथ्वीवर उत्पन्न झाला. वसिष्ठ ऋषीच्या शापेंकरून आणि इंद्राच्या आज्ञेनें शंतनू पासून गंगेचाठायीं अष्ट वसूचे अंश आठ पुत्र झाले. त्यांमध्यें कनिष्ठ पुत्र कुरूस अभय करणारा, बुद्धिमान् भीष्म नामक झाला. त्याणें जामदग्न्यरामाशीं युद्ध केलें होतें. हे राजा, कृपाचार्य ह्मणून ब्रह्मऋषी जो उत्पन्न झाला तो रुद्रगणांचा अंश असा जाण. शकुनी हा द्वापर उत्पन्न झाला. सात्यकी हा यक्षाचा अंश असें जाण. द्रुपद नामक राजऋषी मरुद्गणाचाच अंश होय. हे क्षत्रियश्रेष्ठ जनमेजयराजा, कृतवर्माही मरुद्गणाचाच अंश जाण. परराष्ट्राचें मर्दन करणारा विराटराजाही मरुद्गणाचाच अंश जाण. अरिष्टेचा पुत्र हंस नामा जो गंधर्वपति होता तोच कृष्णद्वैपायनापासून धृतराष्ट्र या नामानें कुरुवंशाची वृद्धि करणारा राजा झाला, तो दीर्घबाहू व प्रज्ञाचक्षु असा होता. ऋषीच्या कोपानें व मातृदोषास्तव तो अंधच उत्पन्न झाला. त्याचा कनिष्ठ बंधु सत्यधर्माचेठायीं अत्यंत रत व शुचि पांडु या नामेंकरून विख्यात होता. महा बुद्धिमान् सर्व पुत्रांमध्यें श्रेष्ठ असा विदुर नामक सूर्याचा अंश जो धर्म तोच हा जाण. कौरवांची अपकीर्ति करणारा दुर्बुद्धि असा दुर्योधन नामक राजा झाला तो कलीचा अंश जाण. पौलस्त्य जे मरण पावले ते मनुष्यलोकीं दुःशासन प्रभृती क्रूर कर्म करणारे शंभर उत्पन्न झाले. दुर्मुख, दुःसह व दुसरेही बहुत आहेत हे सर्व दुर्योधनाचे सहाय्य कर्ते होत. वेश्या पुत्र युयुत्सु नामक धृतराष्ट्रास शतपुत्रांपेक्षां एक अधिक होता. असें वैशंपायनाचें भाषण ऐकून

जनमेजयराजा प्रश्न करितो हे विप्रा वैशंपायन ऋषे, धृतराष्ट्रास शतसंख्याक पुत्र होते त्यांत ज्येष्ठ, कनिष्ठ या अनुक्रमें त्यांचीं नामें मला सांगा.? असा प्रश्न श्रवण करून वैशंपायन भाषण करितात हे जनमेजया, धृतराष्ट्रास प्रथम दुर्योधन झाला, नंतर युयुत्सु, दुःशासन, दुःसह, दुःशल, दुर्मुख, विविंशति, विकर्ण, जलसंध, सुलोचन, विंद, अनुविंद, दुर्धर्ष, सुबाहु, दुष्प्रधर्षण, दुर्मर्षण, दुर्मुख, दुष्कर्ण, कर्ण, चित्र, उपचित्र, चित्राक्ष, चिरु चित्रांगद, दुर्मद, दुःप्रधर्ष, विवित्सु, विकट, सम, ऊर्णनाभ, पद्मनाभ, नंद, उपनंदक, सेनापति, सुषेण, कुंडोदर, महोदर, चित्रबाहु, चित्रवर्मा, सुवर्मा, दुर्विरोचन, अयोबाहु, महाबाहु, चित्रचाप, सुकुंडल, भीमवेग, भीमबल, बलाकी, भीमविक्रम, उग्रायुध, भीमशर, कनकायु, दृढायुध, दृढवर्मा, दृढक्षत्र, सोमकीर्ति, अनुदय, जरासंध, दृढसंध, सत्यसंध, सहस्रवाक्, उग्रश्रवा, उग्रसेन, क्षेममूर्ति, अपराजित, पंडितक, विशालाक्ष, दुराधन, दृढहस्त, सुहस्त, वातवेग, सुवर्चस, आदित्यकेतु, बह्वाशी, नागदत्त, अनुयायी, कवची, निषंगी, दंडी, दंडधार, धनुर्ग्रह, उग्र, भीमरथ, वीर, वीरबाहु, अलोलुप, अभय, रौद्रकर्मा, दृढरथ, अनाधृष्य, कुंडभेदी, विरावी, दीर्घलोचन, दीर्घबाहु, महाबाहु, व्युढोर, कनकांगद, कुंडज, चित्रक हे होत. दुःशलानामें कन्या शंभरापेक्षां अधीक होती. व वैश्यापुत्र युयुत्सुही शंभरपुत्रांपेक्षां अधिक होता. हे राजा हे शंभर धृतराष्ट्रपुत्र व एक कन्या यांचीं नावें यथाक्रमेंकरून तुला सांगितलीं. हे सर्व पुत्र अतिरथी, शूर, सर्व युद्ध विशारद, वेदवेत्ते, क्षत्रिय शास्त्रामध्यें पारंगत, संग्रामविद्येचाठायीं शोभा पावणारे असे होते. हे राजा, यांच्या स्वरूपास योग्य अशा स्त्रिया यांस करून दिल्या होत्या. दुःशीला नामक कन्या होती ती शकुनीच्या अनुमतें सिंधुराज जो जयद्रथ यास दिली होती. युधिष्ठिर हा धर्माचा अंश. भीमसेन हा वायूचा अंश. आणि अर्जुन हा इंद्राचा अंश होय.रूपें करून या भूमीवर अप्रतिम आणि सर्व भूतांस मनोहर असे नकुलसहदेव अश्विनीकुमाराचे अंश असें जाण. सोमाचा पुत्र वर्चा या नामेंकरून महा प्रतापी व विख्यात होता तो अर्जुनापासून अभिमन्यु नामक महान् कीर्तिमान पुत्र झाला. हे जनमेजयराजा, हा अभिमन्यु पुत्र ज्या काळीं पृथ्वीवर अवतरला त्या काळीं सर्व देवांस इंद्रानें असें भाषण केलें

कीं अहो सुरहो, हा वर्चा माझ्या प्राणापेक्षांहीं श्रेष्ठ पुत्र आहे तो मी कधींही देणार नाहीं; परंतु मी एक प्रतिज्ञा केली आहे तीचें अतिक्रमण करण्यास समर्थ नाहीं. पृथ्वीवर जे असुर उत्पन्न झाले आहेत त्यांचा वध कर्तव्य हें देवाचेंच कार्य आहे यास्तव हा वर्चा पृथ्वीवर जाईल; परंतु फार दिवस रहाणार नाहीं. इंद्राचा पुत्र जो नर ज्याचा सखा नारायण तोच अर्जुन या नामेंकरून पांडुराजाचा विख्यात पुत्र होईल, त्याचा हा पुत्र महारथी होईल आणि बाल्यावस्थेंत मोठी कीर्ति संपादन करील. सोळा वर्षे पर्यंत हा पृथ्वीवर वास करील. याच्या सोळाव्या वर्षी महान् संग्राम होऊन त्या मध्यें हा महान् दुष्कर कर्म करील त्या संग्रामामध्यें नर नारायण याच्या सन्निध नसून सकल योद्धे चक्रव्यूह करून याच्याशीं युद्ध करीत असतां हा पुत्र सर्व शत्रूंस विमुख करील. हा बाल असतां अभेद्यचक्रव्यूहामध्यें संचार करील. मोठमोठ्या महारथ्यांचें कदन करून एक दिवसाच्या अर्धभागामध्यें शत्रुसैन्याचा चतुर्थांश नाश करून यमलोकास पाठवील. नंतर सायंकाळ समयीं सर्व महारथी वीर ज्या काळीं एकत्र मिळतील त्याकाळीं हा माझा पुत्र मजकडे येईल. यास एक पुत्र वंश धारण कर्ता महावीर असा उत्पन्न होऊन नष्ट झालेल्या भारत वंशाचा पुनः उद्धार करील. या प्रकारें सोमाचें भाषण श्रवण करून सकल देवांनीं तथास्तु असें ह्मणून सोमाचा मोठा सत्कार केला. हे जनमेजयराजा, तुझ्या पित्याच्या पित्याचें जन्म कथन केलें. धृष्टद्युम्न हा अग्नीचा भाग असें जाण. शिखंडी पूर्वी स्त्री होता तो राक्षसाचा अंश असें जाण. पांच द्रौपदीचे पुत्र विश्वदेव ह्मणून गण आहेत त्यांचा अंश होत. प्रतिविंध्य, सुतसोम, श्रुतकीर्ति, नकुलाचा पुत्र शतानीक, आणि श्रुतसेन अशीं क्रमेंकरून द्रौपदी पुत्रांचीं नावें होत. शूर नामक यादवांमध्यें श्रेष्ठ वसुदेवाचा पिता ह्मणून होता त्याची कन्या भूमीवर रूपेंकरून अप्रतिम पृथा नामक होती ती शूरानें आपल्या पित्याच्या भगिनीचा पुत्र कुंतिभोजनामक अपुत्रीला होता त्यास दिली. ही कन्या देण्याचे पूर्वीच शूरानें कुंतिभोजाशीं प्रतिज्ञा केली होती कीं, मला अपत्य जें प्रथम होईल तें मी तुला देईन. अशी प्रतिज्ञा केल्यावर ही पृथा नामक कन्या झाली असतां ती कुंतिभोजास दिली. ती कन्या पितृगृहीं पित्याच्या आज्ञेनें ब्राह्मण अतिथींचें पूजन करी-

त असतां उग्र व घोर तप करणारा, ब्राह्मण व्रती, धर्मविषयीं ज्याचा दृढनिश्चय, असा दुर्वासानामक ऋषी कुंतिभोजराजाचें गृहीं आला. त्याकाळीं हा उग्र तपस्वी ब्राह्मण आहे असें जाणून सर्व यत्नें करून राजकन्येनें ऋषीचा संतोष केला असतां ऋषीनें संतुष्ट होऊन राजकन्येस यथाविधि अभिचार मंत्राचा उपदेश करून सांगितलें कीं हे सुभगे, तुझ्यावर मी संतुष्ट आहें मी तुला ज्या मंत्राचा उपदेश केला त्या मंत्राच्या योगें ज्या ज्या देवाचें तूं आव्हान करिशील त्या त्या देवाच्या प्रसादें करून तुला पुत्र होतील. याप्रकारें ऋषीचें भाषण श्रवण करून राजकन्येस मोठें कौतुक वाटलें. कोणे एके दिवशीं महान् यशस्वी जी राजकन्या परम आनंदामध्यें असतां कन्या अवस्थेंत प्रकाश कर्ता जो सूर्य याचें आव्हान केलें तेणेंकरून राजकन्येस गर्भ राहून एक पुत्र उत्पन्न झाला. तो पुत्र सर्व शस्त्रधाऱ्यांमध्यें वरिष्ठ असून कुंडलें कवच धारण केलेला, श्रीकरून अत्यंत शोभायमान, सुवर्णासारिखा कांतिमान्, दीप्ती करून साक्षात् दिवाकरासारखा सर्वांगें करून अति सुंदर असा पाहून बंधुपक्ष भयानीं भीत होऊन कुंतीनें त्या यशस्वी कुमाराचा जलामध्यें त्याग केला. तो गर्भ जलामध्यें वहात असतां महायशस्वी राधाभर्ता जो सूत अधिरथ याणें ग्रहण करून आपल्या राधानामक भार्येस पुत्रत्वें करून अर्पण केला. नंतर त्या उभयतानीं त्याचें नाव वसुषेण असें ठेवून सकल दिशेचेठायीं विदित केलें. तो पुत्र राधागृहीं वृद्धि पाऊन सर्वास्त्र विद्येमध्यें अति उत्तम झाला. सकल वेदाचीं अंगें ज्यास प्राप्त झालीं ज्याकाळीं हा सत्यपराक्रमी वसुषेण अनुष्ठानामध्यें असे त्या काळीं ब्राह्मण याचनेस आले असतां त्यांचे मनोरथ पूर्ण करी. हें त्याचें व्रत इंद्रास समजतांच स्वतः इंद्र ब्राह्मणाचें रूप धरून पुत्राकरितां त्याचीं कवच कुंडलें होती त्यांची याचना करूं लागला असतां कर्णानें आपल्या अंगाचीं कवच कुंडलें कर्तन करून ब्राह्मणास दिलीं. त्याकाळीं इंद्रानें एक अमोघ शक्ती कर्णास देऊन विस्मयपूर्वक असें भाषण केलें कीं, ही शक्ति कोणावर ही टाकिली असतां जिवंत रहावयाचा नाहीं असें या शक्तीचें सामर्थ्य आहे. पूर्वीं या कर्णाचें नाव पृथ्वीवर वसुषेण असें होतें. जेव्हां त्याणें आपलें शरीर कंतन केलें तेव्हां या

घोर कर्माच्या योगेंकरून त्याचें नाव कर्ण असें विख्यात झालें. तो मुक्त कवच वीर महा यशस्वी कर्ण या नामें करून झालेला कुंतीचा प्रथम पुत्र होय. हे राजसत्तमा, हा कर्णवीर वृद्धि पावल्यावर दुर्योधनाचा सचिव झाला. हा सूर्याचा अंश होय. जो नारायण नामक देवाचाही सनातन देव तो मनुष्य लोकामध्यें प्रतापी वासुदेव या नामें करून अंशानें अवतरला. अनंत जो शेष याचा अंश महाबली बलदेव होय. महा तेजस्वी जो प्रद्युम्न तो सनत्कुमाराचा अंश जाण. हे मनुष्येंद्र, या प्रकारें बहुत देव वसुदेवाच्या कुलामध्यें अंशें करून अवतरले. आतां अप्सरांचा समुदाय पूर्वी मी तुला सांगितला आहे त्याही अंशें करून भगवंताच्या आज्ञेनें सोळा सहस्त्र गोपी मनुष्य लोकामध्यें वासुदेवाचा परिग्रह करणाऱ्या जन्मल्या. भीष्मकराजाच्या कुलामध्यें साध्वी रुक्मिणी कमला उत्पन्न झाली. ती या पृथ्वीवर भगवंतास रति देण्या करितां श्री लक्ष्मीच आपल्या भागें करून उत्पन्न झाली. द्रुपदराजाच्या कुलांत वेदीमध्या पासून अनिंदिता अशी द्रौपदी उत्पन्न झाली तो इंद्राणीचा भाग असें जाण. ती सर्व लक्षण संपन्न, वैडूर्यमण्या सारखें जीचें तेज, एकांत स्थलीं पांचही पतींच्या चित्तानें समान आकर्षण करणारी अशी होती. पांच पांडवांच्या कुंति आणि माद्री या उभयता माता सिद्धि आणि धृतीचा अंश होत. गांधारी ही मतीचा अंश होय. हे राजा, या प्रकारें देव, असुर, गंधर्व, अप्सरा आणि राक्षस यांणीं अंशें करून पृथ्वीवर अवतार घेतलेले तुला सांगितले. या शिवाय आणखी ही महात्मे ब्राह्मण क्षत्रिय वैश्य अंशानें अवतरलेले युद्ध दुर्मद राजे बहुत जे यदुकुलांत उत्पन्न झाले तेही तुला सांगितले. हें अंशावतरण धनप्रद, यश देणारें, पुत्र देणारें, आयुष्य वृद्धि करणारें, तसेंच विजय देणारें आहे, यास्तव असूया रहित होऊन यानें जो श्रवण करील तो प्राज्ञ ईश्वरास जाणणारा असा होऊन दुःखभोक्ता कधींही व्हावयाचा नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

६८ अध्याय अडुसष्टावा - जनमेजयराजा भाषण करितो हे वैशंपायन ऋषे, देव, दानव, राक्षस, गंधर्व आणि अप्सरा यांचे अंशें करून अवतरण झाल्या-

वें इन उत्तमप्रकारें तुझ्या मुखापासून देवब्राह्मणासन्निध मी श्रवण केलें; परंतु पुनः कौरवांच्या वंशाची आदिकथा श्रवण करण्याची मी इच्छा करितों. असा राजाचा प्रश्न श्रवण करून वैशंपायन भाषण करितात. हे जनमेजयराजा, पौरवांचा वंशकर, महावीर्यवान्, चतुःसमुद्रांत पृथ्वीचा रक्षण कर्ता दुष्यंत नामक राजा होता. तो चतुर्भाग सकल पृथ्वीचा ईश्वर असून म्लेंछदेशासहवर्तमान समुद्रावरण देश जितके होते तितक्यांचाही अधिपति झाला होता. ज्याचे राज्यांत वर्णसंकर कधींही नाहीं, पृथ्वींत धान्य लोकांनीं कधीं पेरलें नाहीं, कोणी पाप करणारा ज्याचे राज्यांत नाहीं, धर्मावर ज्यांची निरंतर मति असे ह्मणून धर्मार्थ ज्यास प्राप्त होत असत. हे राजा, ज्याकाळीं या राजाचें शासन पृथ्वीवर असे त्याकाळीं चोराचें भय किमपि नसे. तसेंच क्षुधेपासून कोणास भय नाहीं, व्याधीचें भय नाहीं, सकल वर्ण दैविक कर्मांत रत होऊन स्वधर्माविषयीं रममाण असत. दुष्यंतराजाच्या आश्रयेंकरून सकल प्रजा निर्भय होत्या. यथाकालीं पर्जन्य पडत असे. सकल धान्यें रसपूर्ण होतीं. पृथ्वी रत्नेंकरून समृद्ध असून पशूंची समृद्धि बहुत झाली. ब्राह्मण निरंतर आपल्या कर्मामध्यें रत असून अनृताचा कधींही त्याणीं अंगिकार केला नाहीं. राजाही अद्भुतकर्मा व महावीर्यवान् असून दृढदेही व तरुण होता. आपल्या बाहुबलेंकरून वन उपवनासहवर्तमान् मंदराचा पर्वतधारण करण्याची त्यास शक्ति असे. प्रक्षेप, विक्षेप, परिक्षेप, अभिक्षेप, असें चार प्रकारचें गदायुद्ध आहे, त्यामध्यें परिनिष्ठित होता. सर्व प्रहरणें व नागपृष्ठ, अश्वपृष्ठांत निष्णात होता. बलाविषयीं विष्णूसमान, तेजाविषयीं भास्करासमान, गांभीर्याविषयीं समुद्रासारिखा व सहिष्णुताविषयीं पृथ्वीसमान असे. सकलराजांस मोठा संमत होता. ज्याचीं राष्ट्रें व पुरें सुप्रसन्न असत. सकल प्रजांनीं आपआपल्या धर्माप्रमाणें असावें अशी राजा वारंवार आज्ञा करीत असे. असा विषय या अध्यायांत आहे.

६९ अध्याय एकुणसत्तरावा:- जनमेजयराजा भाषण करितो हे वैशंपायनऋषे, महामति जो भरतराजा याचें चरित्र व संभव, शाकुंतलेची उत्पत्ति कशी झाली व दुष्यंतराजास शाकुंतला कशी मिळाली तो प्रकार तत्वेंकरून श्रव-

ण करण्याची मी इच्छा करितों? असा प्रश्न श्रवण करून वैशंपायन भाषण करितात हे राजा, कोणे एकें दिवशीं दुष्यंतराजा चतुरंगसैन्यासहवर्तमान वनामध्यें गमन करण्यास निघाला त्याकाळीं प्रासादशिखरावर स्त्रीगणांनीं अवरोहण करून शूर, यशस्वी राजा याची शोभा अवलोकन केली. व मंजुळवाणीनें परम प्रेमेंकरून राजाची स्तुति करीत करीत त्याच्या मस्तकावर पुष्पवृष्टि करूं लागल्या. राजाच्या अनुलक्षेंकरून नगरवासी व देशांत रहाणारे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, हेही आशीर्वाद शब्दांचा घोषकरीत चालले. ते काहीं दूर गेले तेव्हां राजानें त्यांस माघारे जाण्यास आज्ञा दिली असतां ते माघारे फिरले. नंतर राजा रथामध्यें बसून वेगानें गमन करीत करीत नंदनवनप्रतिम अनेक प्रकारच्या वृक्षांनीं शोभित बहुत योजनें लंबायमान, घोर सिंह व्याघ्रादिकांनीं सेवित, अशा वनामध्यें भृत्य बलवाहनासह वर्तमान प्रवेश करून नानाप्रकारचे मृग, गज, व्याघ्रादि मारूं लागला त्याकाळीं समरप्रिय योद्ध्यां सहवर्तमान् अद्भुत वीर्येंकरून वनामध्यें राजा संचार करीत असतां सकल मृगगणांनीं आपले समुदाय नष्ट झाले, हे पाहतांच त्या अरण्याचा त्याग करून ते अन्यत्र स्थलीं गेले त्यांतून कांहीं मृग क्षुधेच्या व तृषेच्या योगानें श्रांत होऊन पतन पावले असतां राजाच्या सैन्यांत बुभुक्षित झालेले लोक होते, त्यांणीं त्या मृगांस भक्षण केलें. कांहीं मत्त झालेले आणि शस्त्रानें घायाळ जाहलेले असे बलिष्ठ गज होते, ते आपलीं शुंडाग्रें संकोचित करून अंगांतून रक्त गळत गळत असे परम वेगानें पलायन करीत असतां त्याणीं बहुत मनुष्यांचें मर्दन केलें असें तें वन, बलरूप मेघानीं व्याप्त, शरधारानीं समृद्ध, मृगानीं आकीर्ण, राजानें मारलेल्या मृगगणांनीं युक्त फारच शोभलें. असा विषय या अध्यायांत आहे.

७० अध्याय सत्तरावा— वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, सैन्य व वाहनें समागमें घेऊन सहस्त्रावधी मृग मारीत मारीत दुष्यंत राजा एकामृगाच्या पाठीस लागून एकटाच दुसऱ्या एकावनामध्यें गेला. तेथें क्षुधेनें व तृषेनें अत्यंत श्रांत होऊन वनसंबंधी शोभा पहात त्याचेही अतिक्रमण करून दुसरे वनांत गेला. त्यावनामध्यें उत्तम प्रकारचे मनास आल्हाद करणारे व पहाण्या-

सही मनोहर असे बहुत आश्रम होते, शीतळ वायु सुटला होता, सुपुष्पित वृक्षांनीं आकीर्ण असून, हरीत तृणें ज्यामध्यें सुखदायक झालीं होतीं, पक्ष्यांच्या मधुर शब्दांनीं सर्व वन नादित झालें. अशा मनोरम वनामध्यें नानाप्रकारची शोभा पहात तो धनुर्धारी दुष्यंतराजा गेला असतां कुसुमशाली द्रुमास वायूचा समागम होतांच ते वारंवार चित्रविचित्र पुष्पांची वृष्टि करूं लागले. व ते द्रुम आकाशास स्पर्श करणारे असून पक्ष्यांचे मधुर शब्द व पुष्पभारांनीं नम्र झालेले असून त्यांच्या कोमल पल्लवांचेठायीं मधूचें लीहन करणारे भ्रमर मधुर मधुर रव करीत आहेत. असे प्रदेश त्या वनामध्यें बहुत होते. नानाप्रकारचीं लतागृहें मनास प्रीति उत्पन्न करणारीं, भ्रमरांनीं विराजित असून कुसुमसमुदायांनीं मंडित होती. अशी ती वनाची शोभा पाहून महातेजस्वी राजा बहुत हर्ष पावला. सिद्ध आणि चारण यांचे समुदाय त्या वनामध्यें बहुत होते, गंधर्व अप्सरा आणि किन्नर हे रहात होते. उन्मत्त झालेले गज त्या वनामध्यें संचार करीत होते. सुखकारक शीतल आणि सुगंधही असा वायु पुष्पसंबंधी रेणूस ग्रहण करून वनामध्यें रमण्याचे इच्छेनें सुटला होता. नदीच्या तटाकीं जसे प्रदेश असतात तसे सजल प्रदेश त्या वनामध्यें बहुत होते असें उत्तम गुणयुक्त वन, राजानें पाहून त्या वनामध्यें सकल आश्रमांत श्रेष्ठ, मनोरम्य असा एक आश्रम पाहून तो आश्रम नाना प्रकारच्या वृक्षांनीं आकीर्ण असून चोहीकडे अग्नी प्रज्वलित झाले आहेत असा अप्रतिम आश्रम पाहून राजानें त्या आश्रमाचा सत्कार केला. तो आश्रम यती, वालखिल्य व इतर मुनिगण यांणीं युक्त व अग्निहोत्रस्थानें त्या आश्रमाच्या आसमंताद्भागीं बहुत होतीं. त्या आश्रमाच्या जवळ पुण्यकारक आणि सुखकारक उदक जीचें अशी मालिनी नामक नदी होती. ती नदी पक्षिगणांनीं आकीर्ण असून तपोवनीं मनोरम होती, तीच्या आसमंताद्भागीं सौम्य अशा सर्प, मृगांस पाहून राजा परम संतोष पावला. आणि श्रीमान् तो राजा देवलोकोपम, सर्वतः मनोहर अशा आश्रमास येऊन त्याणें सर्व प्राण्यांस जननी सारखी अधिष्ठित पुण्यतोया अशी नदी आश्रमा सन्निध पाहिली. जीच्या पुलिनावर चक्रवाक पक्षी, वा-

नर, किन्नरगण आहेत अशा नदीच्या तीरीं भगवान् महात्मा जो कण्वऋषी याचा महर्षीगणांनीं सेवित सर्व आश्रमामध्यें श्रेष्ठ असा आश्रम पाहून व त्याच्या समीप वाहणाऱ्या नदीस पाहून राजास आश्रमामध्यें जाण्याविषयीं मति उत्पन्न झाली. त्यारम्य मालिनीच्या तीरीं सुशोभित असें एक नरनारायणाचें स्थान होतें त्याच्या आसमंताद्भागीं मत्त झालेल्या मयूरांच्या शब्दानें तें सकल वन नादित होऊन गेलें होतें, साक्षात कुबेराचें चैत्ररथवनच काय! अशी त्या वनास विलक्षण शोभा होती. तें वन सकल गुणानीं युक्त असल्यामुळें त्यास कोणाचीच उपमा देण्यास योग्य नाहीं अशा वनांत वास करणारा जो कण्वऋषी त्याचें दर्शन घ्यावें ह्मणून अश्व, पदाती, गज, सकुल जें सैन्य त्यास राजानें आज्ञा केली कीं, मी विरक्त जो तपोधन कण्वऋषी याचे दर्शनास जातों यास्तव मी येईं तोंकाल पर्यंत तुह्मीं सर्वांनीं या वनद्वारीं उभे असावें. असें सांगून राजा, कण्वऋषीच्या तपोवनांस प्रवेश करण्यास उद्युक्त झाला असतां त्याची क्षुधा व तृषा जाऊन बहुत हर्ष पावला. अमात्य व इतर जीं कांहीं राजचिन्हें होतीं तीं व पुरोहित इतक्यांस समागमें घेऊन आश्रमा सन्निध आला. तो आश्रम भ्रमरानीं नादित व द्विजगणांनीं युक्त असा पाहिला. तेथें यज्ञ सामगायन करणारे जे ब्राह्मण त्यांच्या संहिता, पदें, क्रम यांच्या अध्ययनानें तें वन नादित झालें होतें. शब्द संस्कार युक्त भाषण करणारे जे ब्राह्मण याणीं तो आश्रम ब्रह्मलोका सारिखा नादित केला होता. या विद्वान ब्राह्मणांच्या वाणी श्रवण करून राजा आश्रमा सन्निध आला. तो आश्रमाच्या आसमंताद्भागीं नाना प्रकारचे नियतव्रती, जप होमपरायण असे ब्राह्मण त्यानें पाहिले. आणि त्यांचीं चित्रविचित्र, सुंदर, मनोहर आसनें व त्या ब्राह्मणांनीं पूजा केलेली देवनायतनें पाहून आज मी ब्रह्मलोकींच आलों काय! असें तो नृपसत्तम आपल्यास मानूं लागला. असा तो काश्यपऋषीच्या तपानें संरक्षित तपोवनाच्या गुणांनीं युक्त असा आश्रम वारंवार अवलोकन करून राजाची तृप्ति न होतां तो अमात्य व पुरोहितां सह्वर्तमान् आश्रमामध्यें जाण्यास उद्युक्त झाला. असा विषय याअ-

ध्यायांत आहे.

७१ अध्याय एकाहात्तरावा-: वैशंपायन सांगतात हे जनमेजया, त्यानंतर दुष्यंतराजा अमात्यांचें विसर्जन करून एकटाच ऋषीच्या आश्रमांत गेला असतां आश्रमामध्यें ऋषीकोठें दृष्टीस नपडल्यामुळें आश्रमांत कोण आहे अशा उच्च शब्दानें तो आश्रम राजानें नादित केला. तो शब्द श्रवण करून श्रीसदृश रूप धारण करणारी, महातापसी अशी एक कन्या आश्रमांतून बाहेर आली आणि दुष्यंत राजास पाहून परम त्वरेनें भाषण करित्येंं कीं, यावें महाराज! स्वागत असो. असें सत्कारपूर्वक भाषण करून तिणें त्यास बसावयास आसन देऊन अर्घ्यपाद्यादिकें करून पूजा केली. नंतर त्या नराधिपास कुशल प्रश्न करून पुनः विस्मयपूर्वक भाषण करित्ये हे महाराज, कोणाच्या कार्याच्या उद्देशानें आपलें आगमन झालें. मी आपलें कार्य कोणतें करूं? असा तिणें प्रश्न केल्यानंतर मधुरभाषिणी जी शकुंतला तिजला दुष्यंतराजा भाषण करितो हे भद्रे, भगवान् कण्वऋषीचें दर्शन करण्याकरितां आलों होतों, ऋषी कोठें गेले तें मला सांग? असें भाषण श्रवण करून शकुंतला बोलत्ये हे राजा, माझा पिता फळें आणण्याकरितां गेला आहे, एक मुहूर्त पर्यंत मार्गप्रतीक्षा करा ह्मणजे तुह्मांस भेटतील असें कन्येनें भाषण ऐकून सकल स्त्रियांमध्यें श्रेष्ठ, श्रीमती, चारुहासिनी, शरीरें करून देदीप्यमान अशा कन्येस दुष्यंतराजा भाषण करितो हे सुश्रोणि, तूं अशा रूपगुणांनीं संपन्न कोणाची कोण? या आश्रमांत कां आलीस? हे शुभे, तुझ्या दर्शनमात्रें करून माझें मन आकृष्ट झालें तस्मात् तूं कोण आहेस हें मला सांग? या प्रकारें त्या आश्रमामध्यें राजानें कन्येस प्रश्न केला असतां कन्या हांस्य करीत मधुर वाणी नें भाषण करित्ये. तपस्वी महात्मा भगवान् जो कण्वऋषी त्याची मी कन्या आहें. असें तीचें भाषण श्रवण करून दुष्यंतराजा बोलतो हे महाभागे, सकलांस पूजित जो कण्वऋषि तो ऊर्ध्वरेता आहे, साक्षात धर्मही आपल्या आचरणापासून चंचल होईल; परंतु शंसितव्रती भगवान् कण्वऋषि आपल्या व्रतापासून भ्रष्ट व्हावयाचा नाहीं, असें असतां हे वरवर्णिनि, तूं त्याची कन्या

ह्मणोन सांगत्येस तेव्हां मला मोठा संशय उत्पन्न झाला आहे तो दूर करण्यास योग्य आहेस. असें त्याचें भाषण ऐकून शकुंतला बोलत्ये हे राजा, मी मुनीची दुहिता कशी झाल्यें. याविषयीं पूर्वीची कथा काय आहे ती तुला यथातथ्य सांगत्यें. कोणी एका ऋषीनें माझ्या पित्यास माझ्या जन्माविषयीं प्रश्न केला असतां त्या ऋषीस कण्वऋषीनें माझ्या जन्माचा वृत्तांत असा सांगितला कीं, पूर्वी विश्वामित्र ऋषी महाउग्र तप करीत असतां त्याच्या तपानें सुरगणांचा ईश्वर इंद्र, अत्यंत संतप्त होऊन आतां हा ऋषि मला स्थाना पासून भ्रष्ट करील असा भयाभीत होऊन मेनकानामक अप्सरेस भाषण करतो हे मेनके, तूं सकल स्वर्गस्थ अप्सरेमध्यें श्रेष्ठ आहेस यास्तव जेणेंकरून माझें कल्याण होईल असें एक कृत्य मी तुला सांगतों तें श्रवण करून माझें कल्याण कर. हा सूर्यासारखा तेजस्वी, महातपस्वी विश्वामित्र तप करीत आहे तेणेंकरून माझें मन कंपित झालें आहे यास्तव हे सुमध्यमे, हा भार तुजवर आहे, याणें उग्र तपास आरंभ केला आहे, यास्तव हा मला स्थाना पासून भ्रष्ट करणार नाहीं असा कांहीं यास लोभ उत्पन्न करून त्याच्या तपास विघ्न कर ह्मणजे मी निर्विघ्न झालों. हे वरारोहे, रूप, योवन, माधुर्य आणि चेष्टा विस्मित पूर्वक भाषणांनीं या ऋषीस लोभ उत्पन्न करून तपापासून विमुख कर. असें ऐकून मेनका बोलत्ये हे इंद्रा, तो ऋषि महातेजस्वी, महातपस्वी व कोपी आहे हें तूं जाणतच आहेस, त्या ऋषीच्या तेजानें, तपानें व कोपानें तुह्मांस उद्वेग झाला आहे तेव्हां मला कसा होणार नाहीं. ज्याणें वसिष्ठ ऋषीस पुत्रापासून वियुक्त केलें व पूर्वीं क्षत्रिय असतां आपण तपोबलानें ब्राह्मण झाला, आणि आपल्यास स्नानार्थ बहुत जलांनीं परिपूर्ण अशी मोठी दुर्गम पुण्यकारक नदी उत्पन्न केली, तिला सकल लोक कौशिकी असें ह्मणतात. मातंग ह्मणजे त्रिशंकु राजा यास ज्याकाळीं व्याधावस्था झाली त्याकाळीं अशा संकट समयीं त्याच्या कुटुंबाचें याणें पोषण केलें. दुर्भिक्षकाळ अतिक्रांत झाल्यानंतर विश्वामित्र ज्याकाळीं पुनः आपले आश्रमीं आला त्याकाळीं कौशिकीनदीचें नाव पारा असें ठेविलें. हे सुरेश्वरा, ज्याकाळीं हा ऋषि,

प्रीत अंतःकरण होऊन मातंगाचे गृहीं यजन करण्यास गेला त्या काळीं याचे भयानें तूंही सोमपान करण्यास गेला होतास. गुरुशापानें नष्ट झाला जो त्रिशंकुराजा, यास रहाण्या करितां नक्षत्रकांतीनें युक्त असा दुसराच एक स्वतंत्र लोक याणें उत्पन्न करून दिला. त्या लोकांत श्रवणादिक सकल नक्षत्रें ज्याणें नवीन उत्पन्न केली. अशीं याचीं अद्भुत कर्मे आहेत त्यास मी फार भीत्यें. यास्तव हे विभो, जेणें करून तो ऋषि क्रुद्ध होणार नाहीं अशी मला आज्ञा कर. ज्याच्या तेजें करून सकल लोक दग्ध होतात. तशीच मेदिनीही कंपित होत्ये व महामेरुपर्वत चंचल होतो, सकल दिशा एकत्र होतात असा तपस्वी, जितेंद्रिय, प्रदीप्त पावकासारखा तेजस्वी, हुताशनासारखा देदीप्यमान, चंद्रसूर्यासारख्या ज्याच्या अक्षीतारका, कालासारखी ज्याची जिव्हा, यम, सोम, महर्षी, साध्य, विश्वेदेव व सर्व वालखिल्य ज्या ऋषीच्या प्रभावास भीतात अशा ऋषीस माझ्यासारखी स्त्री स्पर्श करण्यास कशी योग्य होईल; परंतु हे सुरेंद्रा, तूं मला सांगितलें असतां मी ऋषीच्या सन्निध कसें न जावें? यास्तव माझ्या रक्षणाची तूं कांहीं तरी योजना कर ह्मणजे तुझ्या करितां मी तेथें जाईन. हे देवेंद्रा, ज्या काळीं मी ऋषीच्या अग्रभागीं कांहीं क्रीडा करण्यास उद्युक्त होईन त्या काळीं वायूनें माझ्या स्वाधीन असलें पाहिजे आणि मदनही साहाय्य झाला पाहिजे यास्तव त्यां उभयतांस माझे स्वाधीन असण्या विषयीं आज्ञा कर ह्मणजे त्यांच्या साहाय्यें करून मी तुझें कार्य करित्यें. असें मेनकेनें भाषण करितांच इंद्रानें वायु व मदन या उभयतांस मेनकेचें साहाय्य करण्या विषयीं आज्ञा दिली त्या काळीं सुगंधिक असा वायु वना पासून मेनकेचे जवळ आला. नंतर मेनका इंद्राच्या आज्ञेनें कौशिकऋषीच्या आश्रमीं जाण्यास उद्युक्त झाली. असा विषय या अध्या॰ आहे.

७२ अध्याय बाहात्तरावा: कण्वऋषि भाषण करितात. या प्रकारें मेनका वायूस बरोबर घेऊन विश्वामित्रऋषीच्या आश्रमीं आली. तपें करून ज्याणें आपलें पाप दग्ध केलें असा विश्वामित्रऋषी आश्रमांत तप करीत बसला आहे, असें पाहून मेनका, ऋषीस नमस्कार करून त्याच्या

सन्निध क्रीडा करूं लागली असतां चंद्रासारखें स्वच्छ देदीप्यमान असें मेनकेनें परिधान केलेलें वस्त्र वायूनें तीच्या अंगापासून उडविलें त्याकाळीं ती अप्सरा किंचित् विस्मित झाल्या सारखी होऊन लज्जित झाली, आणि पृथ्वीवर पतन पावलेलें वस्त्र घेऊं लागली असतां विश्वामित्रऋषी, ती एकांत स्थलीं आलेली, जीचें वय आणि रूप अति उत्तम तिला मोहित होऊन इकडे ये असें आव्हान करूं लागला तेव्हां मेनका, ऋषीच्या सन्निध आली. आणि तीं उभयतां बहुतकालपर्यंत क्रीडा करूं लागलीं. तो काल एक दिवसा सारखा गेला. नंतर त्या मुनीपासून मेनकेस एक कन्या झाली. ती तिणें रम्य जो हिमाचल पर्वत याच्या सन्निधभागीं मालिनी नामक नदी होती, त्या नदीच्या तीरीं निर्जन वनीं ठेविली. आणि आपण कृतकार्य होऊन त्वरेनें शक्रसदनीं गेली. तदनंतर तो पतन पावलेला गर्भ शकुंत पक्ष्यांनीं पाहून त्यानें रक्षण करूं लागले. कोणे एके दिवशीं मी आन्हिक कर्म करण्यास नदीतीरीं जात असतां त्या पतन पावलेल्या कन्येस शकुंतपक्षी रक्षण करीत आहेत हें पाहून तिला मी गृहीं आणिली आणि तीचें मी कन्ये सारखें पोषण केलें. शकुंतपक्ष्यांनीं तीचें पोषण केलें म्हणून तीचें नाव मी शकुंतला असें ठेविलें. शकुंतला भाषण करित्ये हे राजा, या प्रकारें त्या ब्राह्मणानें माझ्या जन्माचें वृत्त विचारिलें तें कण्वऋषीनें सांगीतलें मी तुला सांगीतलें हें सत्य जाण. माझा पिता कोणता हें मला माहीत नाहीं त्यापेक्षां कण्वासच मी पिता असें जाणत्यें. असा विषय या अध्यायांत आहे.

७३ अध्याय त्र्याहात्तरावा - दुष्यंतराजा भाषण करितो हे कल्याणि, तूं फार चांगलें भाषण केलेंस आतां तूं माझी भार्या हो. तुझें काय कार्य कर्तव्य असेल तें मला सांग. सुवर्णाच्या माला, वस्त्रें इत्यादि नाना प्रकारचे अलंकार तुला मी देतों. माझें सकल राज्य तेंही तुझेंच आहे; परंतु तूं माझी भार्या हो. सकल विवाहांमध्यें गांधर्व विवाहाच श्रेष्ठ आहे तो यथाविधीनें करूं. असें राजाचें भाषणश्रवण करून शकुंतला बोलत्ये हे राजा, फलें आणण्या करितां माझा पिता गेला आहे तो एक मुहूर्तानें येईल नंतर तो तुझे मनोरथ सिद्ध करील. असें शकुंतलेचें भाषण श्रवण करून दुष्यंत बोलतो हे

अनिंदिते, मी तुझी फार इच्छा करितों माझा स्वीकार कर. तुझ्या करितांच मी यथें बसलों आहें, तुझे ठिकाणीं माझें मन अति सल्लग्न झालें आहे, आपण आपला बंधु, आपण आपली गति, आपणच आपलें दान करणारा यास्तव तूं आपलें दान केलें असतां हा धर्मच आहे; कारण धर्मशास्त्रामध्यें आठ प्रकारचे विवाह सांगीतले आहेत त्यांचीं नावें. ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस, पैशाच्य हे होत. या आठ विवाहाचे धर्मही स्वायंभुमनूनें यथानुक्रमें सांगीतले आहेत. विवाहकाळीं अलंकारासहित कन्येचें दान करण्यास ब्राह्म, यज्ञसमाप्त झाल्यावर ऋत्विजांस कन्यादान करण्याला दैव, उभयतां वधुवरांनीं धर्में करून आचरण करावें अशा संकल्पानें कन्यादान करण्यास प्राजापत्य, नवऱ्या मुलापासून दोन बैल घेऊन नंतर त्यास कन्यादान करण्यास आर्ष, द्रव्य घेऊन कन्यादान करण्यास आसुर, वधु आणि वर यांचें एक मत होऊन जो विवाह होणार त्यास गांधर्व, कन्या निद्रित आहे किंवा प्रमत्त आहे तीचें हरण करून विवाह करण्यास पैशाच, मोठें युद्ध करून कन्या रुदन करीतच आहे व तिचे पिता इत्यादिक रुदन करीत असतां जें हरण करणें त्यास राक्षस विवाह ह्मणावा. यांत ब्राह्म, दैव आणि आर्ष, प्राजापत्य हे चार विवाह ब्राह्मणांस. साहा अनुपुर्वीं करून क्षत्रियांस. कदाचित् राक्षस विवाहही राजास. वैश्य आणि शूद्र यांस असुर विवाह प्रशस्त आहे. आतां पांच विवाहांमध्यें वास्तविक पाहतां तीन विवाह धर्म्य आहेत आणि दोन विवाह हे अधर्म्य आहेत. पैशाच आणि असुर हे नर करूंच नयेत तेव्हां पृथक् विधी करून अथवा मिश्र विधी करून विवाह करावा. हे वरवर्णिनि, तूं मजविषयीं व मी तुजविषयीं उभयतां सकाम आहोंत तेव्हां गांधर्व विवाहानें तूं माझी भार्या होण्यास योग्य आहेस. असें ऐकून शाकुंतला बोलत्ये हे राजा, तूं ह्मणतोस हा जर धर्ममार्ग आहे तर मी एकांतस्थळीं येऊन प्रतिज्ञा करित्यें ती तूं मान्य केली पाहिजेस. तुझ्यापासून मला जो पुत्र होईल त्यास यौवराज्य देशील तर तुझा माझा संयोग होईल. अशी शकुंतलेची प्रतिज्ञा राजानें मान्य करून पुढें

अविचारानें असें बोलला कीं हे शुचिस्मिते, तुला मी आपलें नगरांत घेऊन जाईन, असें राजऋषीनें भाषण करून शकुंतलेचें गांधर्वविधीनें पाणिग्रहण करून रममाण झाला. आणि तिला ह्मणाला कीं हे शकुंतले, तुला मी नेण्याकरितां चतुरंग सैन्य पाठवीन तोंपर्यंत आपल्या गृहीं रहा. या प्रकारें दुष्यंतराजा शकुंतलेस सांगून मनांत ह्मणतो,जर कण्वऋषीस हें वर्तमान कळलें तर तो आतां काय करील अशी चिंता करीत आपल्या पुरास गेला. नंतर एका मुहूर्तानें कण्वऋषि आश्रमीं आले असतां शकुंतला लज्जित होऊन पित्याचे अग्रभागीं आली नाहीं. त्याकाळीं महानपस्वी कण्वानें आपल्या कन्येचें कृत्य जाणून परम प्रीतीनें कन्येस बोलतो हे भद्रे, तूं एकांतस्थलीं माझा अनादर करून पुरुषाशीं जो संग केलास तो धर्मास घातक नाहीं; कारण क्षत्रियांस गांधर्व विवाहाच श्रेष्ठ आहे, सकाम स्त्री आणि सकाम पुरुष झाले असतां त्याणीं एकांतीं गांधर्व विधीनें रत होण्यास चिंता नाहीं. हे शकुंतले, दुष्यंतराजा धर्मात्मा श्रेष्ठ पुरुषांमध्यें उत्तम आहे, यास्तव तूं त्यास पति केलास ही गोष्ट चांगली आहे. यापासून जो पुत्र होईल तो महाबलवान् व महात्मा सागरांत पृथ्वीचा उपभोग करील. असें ऋषीनें भाषण करून पादप्रक्षालन केलें आणि विश्रांति घेत बसले असतां ऋषीनें आणलेला फलांचा भारा आश्रमांत ठेऊन पित्यास बोलत्ये. सकल पुरुषांमध्यें उत्तम जो दुष्यंतराजा त्यास मी पति वरला. आतां त्या राजावर तूं प्रसाद कर. असें ऐकून कण्वऋषि बोलतात. हे वरवर्णिनि मी तुझ्या करितां त्याजवर प्रसन्न आहें, यास्तव तुला इष्ट असेल तो वर माग. असें कण्वानें भाषण ऐकून दुष्यंतराजानें हित व्हावें ह्मणून सकल पौरवांस धर्मिष्ठता व त्याची राज्यापासून च्युति नसो इतकावर द्यावा. असा विषय या अध्यायांत आहे.

७४ अध्याय चवऱ्याहात्तरावा - वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुष्यंतराजानें शकुंतलेशीं प्रतिज्ञा करून तो स्वदेशीं गेला. नंतर कांहीं दिवसानीं शकुंतलेस पुत्र झाला. तो पुत्र दीप्त अग्नी सारखा कांतिमान् तीन वर्षांचा झाला असतां त्याचें रूप व औदार्य पाहून ऋषीनें त्याचे यथाविधि संस्कार केले. तेव्हां तो पुत्र दिवसें दिवस वृद्धि पाऊं लागला. आणि तो सर्व राजचिन्हा

नीं पूर्ण, कण्वाचे आश्रमीं साहावर्षांचा झाला असतां सिंहादि महा बलाढ्य पशूंस आपल्या बलानें बंधन करून आश्रमा समीप आणून त्यांजवर आरोहण करीत असे. हें त्याचें कृत्य कण्वाश्रम निवासी सकल ऋषींनीं पाहून ह्मणाले कीं, हा पुत्र सर्वांचें दमन करितो. यास्तव याचें नांव दमन असें ठेविलें. कण्व ऋषीनें पुत्राचा पराक्रम पाहून आतां याचा यौवराज्याचा समय आला ह्मणून आपल्या शिष्यांस बोलतात. हे शिष्य हो, पुत्रासहवर्तमान शकुंतलेस भर्तृगृहीं नेऊन पोंचवा. याप्रकारें कण्वऋषीनें आज्ञा करितांच त्या शिष्यांनीं सुवर्णकांतिमान् अशा पुत्रासहवर्तमान शकुंतलेस घेऊन हस्तनापुरीं गेले. आणि प्रथम राजास निवेदन करून नंतर पुत्रासहवर्तमान शकुंतलेस राजासन्निध पोंचवून ते सर्व शिष्य कण्वाच्या आश्रमीं गेले. नंतर शकुंतला राजाची पूजा करून भाषण करित्ये हे राजा, या पुत्रास तूं यौवराज्याचा अभिषेक करावास. तुझ्यापासून मला हा पुत्र देवासारखा झाला आहे. हे नरश्रेष्ठा, ज्या प्रमाणें तूं पूर्वी प्रतिज्ञा केली होतीस त्या प्रमाणें वर्तणूक कर. या प्रकारें शकुंतलेचें भाषण ऐकून राजास त्या भाषणाचें स्मरण जरी होतें तथापि विसरल्या सारखें करून भाषण करितो, तूं जें ह्मणत्येस याचें मला स्मरण नाहीं. तुझ्याशीं मी काय प्रतिज्ञा केली आहे हें मला विदित नाहीं. तुला येथें राहणें असल्यास राहा. असें राजाचें भाषण श्रवण करून सकल स्त्रियांमध्यें श्रेष्ठ जी शकुंतला ती लज्जित होऊन स्तंभासारखी निश्चल उभी राहिली. आणि राजाचें भाषण न सहन झाल्यामुळें आरक्त नेत्र होऊन ओष्ठसंपुट स्फुरण होऊं लागले तथापि हा आपला आकार संरक्षित करून क्रोधानें अत्यंत उद्विग्न झाली, आणि नेत्रकटाक्ष दृष्टीनें आणि क्रोधानें भर्त्याकडे पहात भाषण करित्ये. हे महाराज, सकल रत्न जाणत असतां नाहीं असें कसें बोलतां. औदासिन्य रूपानें आपल्या आत्म्याचा अवमान करूं नका. जो या आत्म्यास व्यापक असतां अव्यापका सारखा मानितो तो आत्मापहारी चोर ह्मणावा. अरे जो आंतर्यामी पाप व पुण्य कर्मांचा वेत्ता आहे त्याच्या समक्ष तूं पाप कसें करितोस व पाप कर्म करून मी कांहीं केलें नाहीं ह्मणून कसें मानितोस? जो आंतर्यामी पु-

रूप आहे त्यास सकल आदित्यादि देव जाणतात. ऱ्हदयस्थ कर्माचा साक्षी क्षेत्रज्ञ ज्याच्यावर संतुष्ट आहे त्या पुरुषाचें पाप यम दूर करितो. आणि जो दुरात्मा आहे त्यास यम अत्यंत व्यथित करितो. जो मनानें आपल्या आत्म्याचा अवमान करून त्यास अन्यथा मानितो त्याचें देव कल्याण करीत नाहींत. अरे, पहा तुझ्या सन्निध मी पतिव्रता स्त्री स्वतः भार्यात्वें करून आल्यें. माझा अंगिकार कां करीत नाहींस? आणि या सभेंत माझी उपेक्षा कां करितोस? मी येथें तुझ्या अग्रभागीं रुदन करीत असतां माझें कांहींच श्रवण करीत नाहींस; परंतु हे दुष्यंतराजा, तुला एक निश्चयें करून असें सांगत्यें कीं, माझ्या भाषणाचा अंगीकार न करशील तर तुझ्या मस्तकाचे शंभर तुकडे होतील. भार्येचा ठायीं पतीच प्रविष्ट होऊन पुनः उत्पन्न होतो ह्मणूनच भार्येस जाया असें ह्मटलें आहे. जी स्त्री आपल्या गृहकार्याविषयीं दक्ष, जीस प्रजा होत्ये, जी आपल्या पतीवर प्राणासमान प्रेम करित्ये, व जी पतिव्रताधर्मानें राहत्ये तीसच भार्या ह्मणावी. भार्या, हें पुरुषाचें अर्ध शरीर, धर्म, अर्थ, काम या त्रिवर्गाचें मूळ भार्याच आहे; ज्यास भार्या आहे तोच क्रियावान् व गृहस्थाश्रमी, निरंतर सुखी असून त्याचे गृहीं श्री वास करित्ये. आपल्यास अत्यंत विषमकाळ आला असतां प्रिय भाषण करणाऱ्या भार्ये शिवाय दुसरा सखा कोणी नाहीं, धर्मकार्याचेठायीं भार्याच पित्यासारखें हित इच्छिणारी आहे, कांहीं दुःख झालें असतां ती माते समान दुःख निवृत्त करण्यास उद्युक्त होत्ये. ज्याणें भार्यापरिग्रह केला असेल त्याजवरच विश्वास ठेवावा. यावरून पुरुषास भार्या, ही परम गति आहे. भर्ता जरी नरकांत पडला असेल तरी जी पतिव्रता भार्या असेल ती तेथें जाऊन आपल्या पतीचा उद्धार करित्ये. जर भार्या पतीच्या अगोदर मरण पावली तर ती, पतीची प्रतीक्षा करीत असत्ये. जर पति भार्येच्या पूर्वी मरण पावला तर ती पतीच्या अनुलक्षें करून जात्ये. यास्तव हे राजा, पाणिग्रहण करण्याचें कारण हेंच आहे. तस्मात् भार्या पतीस यालोकीं व परलोकींही सोडीत नाहीं. आत्माच भार्येचेठायीं उत्पन्न होतो ह्मणून बुध, त्यास पुत्र ह्मणतात. याकारणावरून पुत्राची माता जी आपली भार्या तिला मातृवत् जा-

णावी. मनोदुःख व व्याधिइत्यादिकानीं पीडित मनुष्यास भार्यादर्शनें करून हर्ष होतो. पुरुषास् किती जरी कोप आला तथापि भार्येचें दर्शन झाल्यावर रहात नाहीं. इतकी भार्येचाठायीं रति, प्रीति आणि धर्म ठेविले आहेत. स्त्रिया, हें एक आपले जन्म होण्याचें पुण्यकारक क्षेत्र. स्त्रिया वांचून ऋषीचीही प्रजा उत्पन्न करण्याची शक्ति नाहीं. ज्या काळीं धुळीनें अवकुंठित असा पुत्र आपले पित्यास जाऊन आलिंगन देतो त्याकाळीं पित्यास असें वाटतें कीं, या सुखापुढें दुसरें सुख कांहींच नाहीं. तो हा पुत्र तुझ्यापुढें येऊन तो तुजकडे कटाक्षानें पहात असतां त्याचा अवमान कां करितोस? अरे, पिपीलिकाही आपले अंडाचें पोषण करित्ये मग तूं धर्मज्ञ असून आपल्या आत्मजाचें पोषण कां करीत नाहींस? बालाचा स्पर्श पित्यास जाहला असतां जें सुख होतें तें वस्त्रें, स्त्रिया अथवा जलस्पर्शानेंहीं होत नाहीं. जसा द्विपदांमध्यें ब्राह्मण, चतुष्पदांमध्यें गाय, मान्यांमध्यें गुरु जसा श्रेष्ठ तसा स्पर्श पदार्थांमध्यें पुत्र श्रेष्ठ आहे. हे नरेंद्रा, हा तुझा शोकनाशकर्ता पुत्र झाला आहे, याचें जन्म ज्या काळीं झालें त्याकाळीं सुतकामध्यें आकाशवाणी झाली कीं, हा पुत्र शंभर वाजीमेध याग करील. कोणी पुरुष कोठून आपल्या ग्रामांत आल्यावर पुत्र अंकावर येऊन बसला असतां त्याच्या मस्तकाचे अवघ्राणानें किति आनंद पावतो? पुत्राच्या जातकर्म संस्कार काळीं जे वेदपठित मंत्र ब्राह्मण ह्मणात ते तुलाही विदित असतील ते मंत्र सांगत्ये. पिता ह्मणतो हे पुत्रा, माझ्या अंगा अंगापासून तुझा संभव आहे, हृदया पासून तूं झालास, माझ्या सारखें द्वितीय प्रतिबिंबच तूं आहेस यास्तव शंभर वर्षें वांच. हे पुत्रा, माझें जीवन तुझ्या आधीन आहे, तसेंच अक्षय्य संतानही तूंच आहेस या हेतूस्तव माझा पुत्र सुखी होत्साता शंभर वर्षें जीवित्व पाव. असे वेदोक्त मंत्र आहेत ते तुला ठाऊक नाहींत कीं काय? हे राजा, तुझ्या अंगापासून दुसरा एक पुरुषच उत्पन्न झाला आहे. स्वच्छ जलामध्यें जसें आपलें द्वितीय प्रतिबिंब दिसतें, तसा हा पुत्र प्रतिबिंब सदृश तुझ्या सारखा आहे किंवा नाहीं तो पहा! हे राजा, पूर्वीं तूं मृगयाहेतूनें माझ्या पित्याच्या आश्रमीं आलास तेव्हां तुझा माझा संग झाला. उर्वशी, पूर्वचित्ती, सहज-

न्या, मेनका, विश्वाची, घृताची इतक्या संहा अप्सरा श्रेष्ठ आहेत त्यांमध्यें मेनका नामक अप्सरा ब्रह्मदेवा पासून झालेली स्वर्गांतून पृथ्वीवर येऊन विश्वामित्राशीं संगत झाली आणि गर्भवती होऊन हिमालयाच्या पृष्ठभागीं गेली. तेथें प्रसूत होऊन तिणें माझा त्याग केला. हे राजा, जन्मांतरीं कांहीं एक मी अशुभ कर्म केलें असेल ह्मणून बाल्यावस्थेमध्येंच बांधवजनानीं मला या जन्मीं टाकिली. सांप्रत तूंही माझा त्याग केलास! बरें असत. हा तुझा पुत्र बाल आहे याचामात्र तूं त्याग करण्यास योग्य नाहींस. असें शकुंतलेचें भाषण ऐकून दुष्यंतराजा बोलतो हे शकुंतले, तूं जें बोललीस तें मला कांहीं एक विदित नाहीं. स्त्रियांचें असत्य भाषण असतें यास्तव तुझ्या भाषणावर काय खरेपणा ठेवावा. जो मेनकेनें हिमाचलाचे पृष्ठभागीं निर्माल्या सारखा तुझा त्याग केला ती मेनका जारिणी तुझी जननी. आणि पूर्वीं क्षत्रिय योनींत असून कामवश झालेला, ब्राह्मणत्वा विषयीं लुब्ध विश्वामित्र तुझा पिता, सर्व अप्सरांमध्यें श्रेष्ठ मेनका आणि महर्षींमध्यें श्रेष्ठ विश्वामित्र या उभयतांचें तूं अपत्य असतां व्यभिचारिणी सारखें काय भाषण करित्येस? तुझें भाषण श्रद्धा ठेवण्यास योग्य नाहीं. मेनका व विश्वामित्र यांचा संबंध सांगण्यास तुला कशी लज्जा वाटत नाहीं? यास्तव हे दुष्टे, तूं येथून जा. अगे कोठे तो श्रेष्ठ तपस्वी, कोठे ती अप्सरा आणि कोठें तूं तापस वेष धारण करणारी आणि हा तुझा पुत्र अतिकाय असतां बाल्यावस्थेंतच मोठा बलवान्, शालस्तंभा सारखा कोठून झाला? मला असें वाटतें कीं, तुझी अतिनीच योनि आहे ह्मणून व्यभिचारिणी सारखें भाषण करित्येस. अथवा असेंही असेल कीं, यदृच्छेंकरून मेनका कामपीडित होऊन तूं जाहली असशील; परंतु हें सर्व कृत्य मला कांहीं विदित नाहीं, तूं कोण आहेस हेंही मला माहीत नाहीं यास्तव तूं येथून गमन करावेंस. असें ऐकून शकुंतला बोलत्ये हे राजा, दुसऱ्याचीं छिद्रें मोहरी येवढीं जरी असलीं तरी पाहतोस. परंतु आपलीं बिल्वफलप्राय दृष्टीस पडत असतांहीं तीं पहात नाहींस. अरे, मेनका देवांमध्यें रहात्ये, तिला देवही अनुलक्षूनच आहेत तर हे दुष्यंत राजा, तुझ्या जन्मापेक्षां माझेंच जन्म श्रेष्ठ आहे, तूं तर पृथ्वीवर संचार करतोस, माझा संचार

अंतरिक्षीं आहे, यास्तव मेरु आणि मोहरी यांचें जितकें अंतर तितकें तुझें माझें आहे. हे नृपा, इंद्र, कुबेर, यम, वरुण यांचे भवनीं माझें गमन आहे. पहा जितकें मी भाषण करत्यें तितकें तुला खरेपणा वाटण्याकरितां करित्यें द्वेषेंकरून माझें भाषण नाहीं यास्तव हें माझें सकल भाषण क्षमा करण्यास योग्य आहेस. कुरूपी पुरुष जों कालपर्यंत आपलें मुख आरशांत पहात नाहीं तों कालपर्यंत आपल्यास सर्वांपेक्षां मी रूपवान् असें मानितो आणि आरशांत पाहिल्यावर दुसऱ्याचें व आपलें अंतर किती आहे हें तो समजतो. जो अति रूपवान् असतो तो दुसऱ्याचा अपमान कधींही करीत नाहीं, जो दुर्भाषण करणारा असतो तो फारकरून निंदक असतो. मूर्ख पुरुष शुभ आणि अशुभ भाषणांतील अशुभ भाषणच ग्रहण करितो. प्राज्ञपुरुष शुभ भाषणाचेंच ग्रहण करितो. दुसऱ्याची कोणी निंदा केली असतां साधूस मोठा खेद होऊन दुर्जनास हर्ष होतो. वृद्धांचा सत्कार केला असतां साधु सुख पावतात. सज्जनाचे निंदेनें मूर्ख सुखी होतो, यास्तव ही एक गोष्ट लोकांमध्यें हांस्य करण्यासारखी आहे. दुर्जन असतो तो आपल्यास मी सज्जनच आहें असें ह्मणतो. सत्य धर्म परित्याग करणाऱ्या पुरुषाचा नास्तीक पुरुष त्याग करितो. मग आस्तीक पुरुष करणार नाहीं कीं काय! हे राजा, आपल्या पुत्रास आपल्या सारखा जो पुरुष मानीत नाहीं त्याची लक्ष्मी देव नष्ट करितात, आणि तो परलोकासही योग्य होत नाहीं. सर्व धर्मांमध्यें पुत्र हा पदार्थ उत्तम आहे यास्तव त्याचा त्याग करूंनये. आपल्या विवाहित पत्नी पासून झालेला, मिळालेला, विकत घेतलेला, उपनयनादि संस्कार आपण केलेला आणि ज्यास लहानपणापासून वाढवलेला असे पांच प्रकारचे पुत्र आहेत ह्मणून वैवस्वत मनूची उक्ति आहे. मनास प्रीति उत्पन्न करणारे पुत्र, धर्म व कीर्ति पितराची संपादन करणारे पुत्र त्राण नरका पासून करतात. यास्तव हे राजा, तूं सत्य आणि धर्माचा परिपालन कर्ता आहेस तेव्हां पुत्राचा त्याग व तूं कपट करावेंस हें योग्य नाहीं. हे राजा, शंभर कूपापेक्षां एक वापी, शंभर वापीपेक्षां एक यज्ञ, शंभर यज्ञापेक्षां एक पुत्र, शंभर पुत्रापेक्षां सत्य हें श्रेष्ठ आहे. सहस्र अश्वमेधांपेक्षांही सत्य हें अधिक आहे. सर्व वेदांचें ज्ञान व सर्व तीर्थीं

स्नान हीं दोन्हीं सत्याची साम्यता करतील किंवा नाहीं याचाहा संशय आहे, सत्या सारखा धर्म किंवा दुसरें कांहीं नाहीं. हे राजा, अनृता सारखें दुसरें कोणतेंही पातक नाहीं, या सत्याचा त्याग करूं नको. सत्य पदार्थच सख्य करण्यास योग्य आहे, जर सर्व व्यापार तुझा अनृत असेल तर तुझ्यावर मी श्रद्धा ठेवीत नाहीं. आणखी तुला मी सांगत्ये कीं, या पुत्रास तूं राज्य जरी न दिलेंस तरी हा माझा पुत्र शैलराजा होऊन पृथ्वीचें पालन करील. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, असें शकुंतलेनें भाषण करून मागें फिरली असतां दुष्यंतराजास अंतरिक्षा पासून आकाशवाणी झाली कीं हे दुष्यंतराजा, माता हा कोशचर्म आहे, याचे ठायीं स्थापित जें बीज तें मातेचें होत नाहीं, तर जो बीज निक्षेप कर्ता पिता त्याचेंच आहे, यास्तव जो उत्पन्न झाला तो पित्याचाच पुत्र याकारणावरून याचें पोषण तूं कर. शकुंतलेचा अवमान करूं नको. हे राजा, जो रेतानें सिंचन करतो तोच पुत्ररूपानें उत्पन्न होऊन आपल्या पितरास नरका पासून उद्धरतो तेव्हां तूंच या गर्भाचा निषेचन कर्ता आहेस म्हणून शकुंतलेनें जें भाषण केलें तेंच खरें आहे. आपलीं अंगें द्विधा करून जाया पुत्रास प्रसवते म्हणून याचें पोषण कर. हे राजा, या पुत्राचा त्याग करून जो वांचेल त्यास अभाग्य आलें असें जाणावें. तस्मात् हे राजा, तूं या पुत्राचें पोषण करावेंस तुझ्या पुत्राचें नाव भरत असें असावें. अशी आकाशवाणी झालेली राजानें ऐकून तो हर्षानें बोलतो अहो, हें देवदूताचें भाषण श्रवण करा. हा माझा आत्मज आहे असें मी जाणतों; परंतु या शकुंतलेच्या भाषणावरून जर या पुत्रास ग्रहण केला असता तर सर्व लोकांमध्यें मी अशुद्ध झालों असतों. वैशंपायन सांगतात हे जन्मेजया, त्याकाळीं देवदूताच्या वाक्यावर पुत्राची शुद्धि झाली. नंतर राजानें हर्षित होऊन पुत्रास ग्रहण करून उपनयनादिक जीं कृत्यें तीं सर्व प्रीतीनें केलीं. आणि पुत्राच्या मस्तकाचें अवघ्राण केलें. नंतर ब्राह्मणानीं राजाची पूजा केली असतां राजानें बहुत हर्ष पाऊन धर्मानें भार्येचा सत्कार करून असें भाषण केलें कीं, हे शकुंतले लोकांच्या परोक्ष तुझ्याशीं मी संबंध केला तो सकलांस विदित नाहीं, यास्तव तुझी शुद्धि व्हावी म्हणून हा विचार मी केला. नाहीं तर सकल जन

तुला असें ह्मणते कीं, स्त्रीभावें करून ही राजाशीं संगत झाली ह्मणून या पुत्रास राज्याची इच्छा करित्ये. हे प्रिये, तूं मला कोपें करून जें अप्रिय भाषण केलें असशील त्याची मी क्षमा केली. या प्रकारें दुष्यंतानें त्या पट्टाभिषिक्त स्त्रियेस बोलून तीचा सत्कार केला आणि शकुंतलेच्या पुत्राचें नाव भरत असें ठेऊन यौवराज्याचा अभिषेक केला. त्यादिवसा पासून भरत याची आज्ञा चोंहीकडे झाली. सकल महीपाल आपल्यास वश करून सद्धर्मनीत्याणें प्रसृति केली. आणि उत्तम प्रकारच्चें यश संपादन केलेला तो महा प्रतापी भरतराजाचक्रवर्ती सार्वभौम होऊन याणें बहुत याग केले. बहुत दक्षिणा युक्त असे याग कण्वऋषीनें भरताकडून करविले. नंतर गोवितत व वाजीमेध नामक याग केले. त्यामध्यें भरतानें कण्वऋषीस कोटीशत द्रव्य सहस्त्रवार दिलें. त्याराजापासून ही भारती कीर्ति झाली. ज्याच्या योगें सकल कुलच भारत या नामेंकरून प्रख्यात झालें. याकुलांत जे पूर्वज व उत्तर झालेले ते सर्व भारत नामें विख्यात झाले. या भरत राजाच्या कुलामध्यें जे राजे उत्पन्न होतील ते सर्व देवा सारखे बलवान् व ब्रह्मदेवासारखे श्रेष्ठ होतील. त्या सर्व राजाची अपरिमित नामें आहेत; परंतु त्यांतील मुख्य मुख्य महाभाग्यवान् देवासारिखे सत्य आर्जवपरायण यांचीं नावें सांगेन. अ वि. या अ. आहे.

७५ अध्याय पंचाहात्तरावा - वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दक्षप्रजापती, वैवस्वतमनु, भरत, कुरु पूरु. तसाच आजमीढ, यादव, सकल कौरवांचा वंश व भरताचा वंश पुण्यकारक, कल्याणदायक व यशस्वी असा आहे, तो तुला मी सांगतो श्रवण कर. प्राचीनबर्हीचे दाहा पुत्र प्राचेतस नामें महापुण्यवान् . महर्षी सारखे तेजस्वी, होते. त्या प्राचेतसा पासून प्राचेतसनामक दक्ष उत्पन्न झाला. त्या पासून ही सकल प्रजा झाली. हे राजा, तो प्राचेतस दक्ष सकल लोकांचा पितामह त्याची वीरिणी नामक भार्या होती तिला सहस्त्र पुत्र झाले त्यास नारदानें मोक्ष देणाऱ्या अशा सांख्यज्ञानाचा उपदेश करितांच ते सकल पुत्र मोक्षास गेले. नंतर दक्षप्रजापतीस पन्नास कन्या झाल्या. त्यांतील दहा कन्या धर्मास, तेरा कश्यपास व कालमानास नेणाऱ्या अश्विन्यादि सत्तावीस कन्या चंद्रास दिल्या. कश्यपास तेरा दिल्या होत्या त्यांत दाक्षायणी-

नामक कन्या होती तीपासून कश्यपानें सकल इंद्रादिक आदित्य व विवस्वान् हे उत्पन्न केले. त्या विवस्वानापासून वैवस्वत यम झाला. मार्तंडापासून मनु झाला असतां यम जो पुत्र होता तो मनूचा अनुज होता. तो मनुराजा धर्मात्मा सकल भूतांचा प्रतिष्ठानभूत होता ह्मणून हा सकल वंश मानव यानामें करून विख्यात झाला. ब्रह्मक्षत्रादिक हे सकल मनूपासून झाले ह्मणून मानव अशानामास पावले. वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, पुढें ब्राह्मणकुलं व क्षत्रियकुल हें एकत्र झालें असतां त्यांत ब्राह्मण मानव होते ते वेदाध्ययन करते झाले. त्या मनुराजास वेन, धृष्णु, नरिष्यंत, नाभाग, इक्ष्वाकु, कारुष, शर्याति, इला, पृषध्र, नाभागारिष्ट असे दहा पुत्र झाले. त्यांत पृषध्र हा धर्मपरायण होता, तसेच आणखी दुसरे पन्नास पुत्र मनूस झाले होते ते आपआपल्यामध्यें कलह करून मरण पावले असें ऐकतों. पुढें इलेचेठायीं बुधापासून पुरूरवानामक पुत्र झाला. त्या पुत्राची माता इलाहीच व पिताही इलाच होता असें ऐकतों. तो पुरूरवा त्रयोदश द्वीपवती पृथ्वीचा उपभोग कर्ता होता, महायशस्वी अमानुष ज्याचें बल असे. कोणेएके दिवशीं सनत्कुमारानें ब्रह्मलोकापासून येऊन राजास बहुत उपदेश केला तथापि राजानें श्रवण केला नाहीं ह्मणून ऋषींस अत्यंत क्रोध येऊन राजास शाप देतांच तो नष्ट झाला. त्यानेंच पूर्वी सद्धर्माकरितां उर्वशीसहित गंधर्वलोकापासून तीन अग्नी आणिले होते. नंतर उर्वशीपासून आयु, धीमान्, अमावसु, दृढायु, वनायु, आणि शतायु असे सहा पुत्र ऐलेयनामक झाले. पुढें त्यांमध्यें ज्येष्ठ जो आयु त्यापासून नहुष, वृद्धशर्मा, रजीगय, अनेनस असे पुत्र स्वर्भानवीस झाले. त्यामध्यें ज्येष्ठपुत्र जो नहुष तो महाबुद्धिमान् व सत्यपराक्रमी होता, त्याणें धर्मेंकरून पृथ्वीचें शासन केलें. पितर, देव, ऋषि, विप्र, गंधर्व, उरग, राक्षस, क्षत्रिय, वैश्य इत्यादिकांचें ज्याणें पालन केलें. व तस्कर समुदायास मारून ऋषीस करभाग दिले. नहुष आपल्या पृष्ठभागावर ऋषीस वहात असे. आपलें तेज, तप, विक्रम व बल इहींकरून त्यानें देवांचें इंद्रत्व केलें. त्या नहुषराजास यति ययाति संयाति आयाति अयति व ध्रुव असे सहा पुत्र प्रियकरणारे झाले. त्यांतून हा यतिनामक पुत्र महामुनि होता तो योगबलानें ब्रह्मभू-

त झाला. दुसरा ययातिनामक पुत्र झाला. तो ययाति राजा शत्रूस अजित असतां त्याणें उत्तमरीतीनें सकळ प्रजेचें पालन केलें. या ययातिराजास सर्व गुणांनीं युक्त,महायोद्धे असे पुत्र देवयानि व शर्मिष्ठा या दोन स्त्रियांचे ठायीं झाले ते सांगतो. देवयानी पासून यदु आणि तुर्वसु असे दोन पुत्र झाले. शर्मिष्ठेपासून द्रुह्यु अनु व पुरु असे तीन पुत्र झाले. असा तो ययातिराजा बहुत वर्षें पर्यंत धर्मेंकरून प्रजांचें पालन करीत असतां रूपाची नाश करणारी जरा राजास प्राप्त झाली. कोणेएके दिवशीं जरेनें पीडित होऊन ययाति राजा पुत्रांस बोलतो हे यदु, पुरु, तुर्वसु, द्रुह्यु, व अनुनामक पुत्रहो, मी तरुण होऊन स्त्रियांसहवर्तमान क्रीडा करावी व त्यांशीं विहार करावे अशी इच्छा करितों यास्तव तुह्मीं माझें साहाय्य करावें. असें पित्यानें भाषण केल्यावर ज्येष्ठ पुत्र बोलतो हे राजा, आमच्या यौवनापासून तुझें काय कार्य व्हावयाचें आहे, असें भाषण ऐकून ययाति बोलतो हे पुत्रा, तूं माझी जरा घे. आणि तुझें यौवन मला दे. ह्मणजे त्या यौवनें करून मी संचार करीन. बहुत दिवस मी दीर्घ सत्रें केलीं ह्मणून व्रतांनीं बद्ध होतों आणि शुक्राचा मला शापही आहे तेणें करून काम आणि अर्थ या उभयतां पासून हीन झालों. या कारणानें हे पुत्रहो, मला खेद उत्पन्न झाला आहे. असें पित्यानें पुत्रास सांगितलें तथापि यदुप्रभृतींनीं त्याची जरा ग्रहण केली नाहीं. नंतर कनिष्ठ पुरुनामक पुत्र पित्यास बोलतो हे राजा, माझी नवीन यौवनावस्था आहे ती मी तुला देतों ती घेऊन तूं संचार कर. तुझी जरा आहे ती मी घेऊन तुझ्या आज्ञेनें राज्यावर बसतो असें पुत्रानें भाषण केलें असतां राजानें आपली जरा पुत्रास दिली. आणि पुरूचें नूतन वय आपण घेऊन पुरूस राज्य दिलें. ययातिराजानें नूतन वय ग्रहण करून एक सहस्रवर्षेंपर्यंत आपल्या उभयतां स्त्रियांसहवर्तमान यथेच्छ विहार केला. तो ययाति राजा दीर्घकाळ स्त्रियांसहवर्तमान क्रीडा करून तो विश्वाची नामक अप्सरेसहवर्तमान चैत्ररथवनीं पुनः क्रीडा करूं लागला; परंतु तो महायशस्वी राजा तृप्ति पावला नाहीं त्याकाळीं राजानें मनामध्यें उद्विग्न होऊन अशी गाथा गायन केली कीं, जसा अग्नि,हविर्भाग आणि अन्याहुतीच्या योगानें अधिकच वृद्धि पावतो. तसा हा कामाग्नि

उपभोगाच्या योगानें अधिकच वृद्धि पावतो. ही स्त्रानीं पूर्ण झालेली सकल पृथ्वी, हिरण्य, पशु, स्त्रिया इत्यादि पदार्थ पुरुषास जरी मिळाले तरी त्याची तृप्ति होत नाहीं, कामाची शांति केली असतां सर्वदा सौख्य होतें. जो कोणी पुरुष कर्म, मन आणि वाणी यांनीं पाप कर्म करीत नाहीं तो ब्रह्मरूप होतो. ज्या काळीं हा पुरुष कोणास भीत नाहीं व यासही कोणी भीत नाहीं व कांहीं इच्छा करीत नाहीं व कोणाचा द्वेष करीत नाहीं त्याकाळीं ब्रह्मसंपन्न होतो. याप्रकारें काम अति तुच्छ पदार्थ आहे असें ययातिराजानें जाणून आपलें समाधान करून पुत्रापासून आपली जरा घेतली आणि यौवन घेतलें होतें तें पुनः पुरुनामक पुत्रास देऊन राज्याभिषेक त्यास केला. नंतर अतृप्त झालेला तो पुत्रास बोलतो हे पुत्रा, तुझ्या योगानें मी पुत्रवान् झालों. आतां आजपासून तुझ्या वंशाचें नांव पौरव असें प्रसिद्ध होईल. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, नंतर ययातीनें पुरूस राज्याभिषेक केल्यावर आपण भृगुतुंगनामक पर्वतीं तप करण्यास गेला आणि कांहीं काळ निरशन करून मरण पावला आणि भार्येसहवर्तमान स्वर्गास गेला. असा वि० या अ० आहे.

७६ अध्याय शाहात्तरावा :- जनमेजय प्रश्न करतो हे वैशंपायनऋषे, आमचा पूर्वज ययातिराजा प्रजापतीपासून दहावा होता, त्यास शुक्राचार्यांची परम दुर्लभ कन्या कशी मिळाली? त्या राजाचे वंशांत जे उत्पन्न झाले त्यांचें वृत्त विस्तारें करून मला सांगा? असें ऐकून वैशंपायन बोलतात हे राजा, इंद्रासारखा कांतिमान् ययातिराजा, राज्य करीत असतां शुक्राचार्य आणि वृषपर्वा दानव या उभयतांनीं ययातीस जामात केला तो वृत्तांत सांगतो श्रवण कर. पूर्वी सुर आणि असुर या उभयतांचा त्रैलोक्यांच्या ऐश्वर्याविषयीं विवाद होत असतां आपला जय व्हावा ह्मणून देवांनीं अंगिरामुनीस आणि असुरांनीं शुक्राचार्यास पुरोहित केला असतां ते उभयतां ब्राह्मण एकमेकांशीं स्पर्धा करूं लागले. देवांनीं युद्धांत जितके दानव मारिले तितके शुक्राचार्यानें संजीवन केले असतां ते पुनः युद्ध करूं लागले आणि असुरांनीं जे देव मारिले त्यांस जीवंत करण्याची विद्या बृहस्पतीस ज्ञान नव्हती यामुळें सकळ देवांस महान् विषाद होऊन भयानें बृहस्पतीचा ज्येष्ठपुत्र जो कच त्यास

भाषण केलें कीं, हे कचा आह्मीं तुझें भजन करितों तर तूंहीं आमचें उत्तम साहाय्य करकीं, अमित तेजस्वी जो ब्राह्मण शुक्राचार्य त्याजवळ संजीवनी विद्या आहे ती लौकर ग्रहण करून तूं ये. तो ब्राह्मण निरंतर दानवांचें रक्षण करितो देवाचें करीत नाहीं. तूं त्या शुक्राचार्याचें आराधन कर. तूं पूर्ववयस्क आहेस त्यापेक्षां शुक्राचार्याची देवयानि नामक कन्या आहे तीचें आराधन करण्यास तूं योग्य आहेस दुसरा कोणी नाहीं. कारण शील, दाक्षिण्य, माधुर्य, आचार व दम इत्यादिकांनीं देवयानि संतुष्ट झाली असतां तुला ती विद्या मिळेल. या प्रकारें देवांचें भाषण ऐकून कचानें सांगितलें कीं, फार चांगलें आहे. तेव्हां देवांनीं पूजित केलेला कच वृषपर्व्याच्या सुरेंद्रपुरीस आला आणि शुक्राचार्यांचे जवळ येऊन बोलूं लागकीं, हे आचार्य मी बृहस्पतीचा साक्षात् पुत्र, मला कच असें ह्मणतात. मी तुमचा शिष्य होण्यास इच्छितों माझें ग्रहण करा. गुरुगृहीं राहून मी ब्रह्मचर्यव्रत धारण करीन हे ब्राह्मणा, एक सहस्र वर्षेंपर्यंत माझा अंगिकार कर. असें कचवाक्य ऐकून शुक्राचार्य बोलतो हे कचा, तुझें आगमन इकडे झाले हें फार चांगलें झालें. तुझ्या भाषणाचा मीं अंगीकार केला. तुझ्या अर्चनेंकरून तुझा पिता बृहस्पति अर्चित असो. वैशंपायन सांगतात हे राजा, शुक्राचार्याचें भाषण ऐकून त्यानें कथन केलेल्या व्रताचा कचानें अंगीकार केला. तेव्हां त्या तरुण कचानें वनामध्यें गायी चारण्या करितां निरंतर गमन करावें. व गायन, नृत्य इत्यादिकें करून देवयानीचा संतोष करावा. असा तो कच ब्राह्मण नियमव्रत करणारा फार चांगला आहे असें जाणून त्याच्या अग्रभागीं देवयानीनें गायन करावें, या प्रकारें ब्रह्मचर्यव्रतामध्यें पांचशें वर्षें कचाचीं गेलीं. कोणेएके समयीं कच एकांतीं वनामध्यें गोरक्षण करीत बसला होता, इतक्यांत कांहीं दानव क्रोधयुक्त होऊन आपली विद्या रक्षण व्हावी या बुद्धीनें त्याचे तुकडे तुकडे करून लांडग्यास भक्षणार्थ दिल्हे. नंतर यथाकालीं गायी व गोप वनांतून निघून आपआपल्या गृहीं आले. आणि कच मात्र आला नाहीं. हे देवयानीनें पाहून ती मनांत विचार करूं लागली कीं, सकल गोप व गायी गृहीं आले; परंतु कच अद्याप कां आला नाहीं? नंतर आपल्या पित्यास बोलली, हे तात, तूं

अग्निहोत्र संबंधी होम केल्यास, सूर्य अस्तास गेला, गायी व गोप गृहीं आले, परंतु कच कोठें दिसत नाहीं, तस्मात् मला असें वाटतें कीं, कोणी तरी कचास मारिलें; परंतु तुला सत्य सांगत्ये कीं, कचा वांचून मी आपला जीव ठेवणार नाहीं, असें ऐकून शुक्राचार्य बोलतात कन्ये, मी कचास संजीवन करून आव्हान करितों असें ह्मणून संजीवनी विद्येचा प्रयोग करून शुक्राचार्य कचास आव्हान करीत असतां त्या विद्येनें वृकांचीं शरीरें भिन्न करून कच परम हर्षानें बाहेर निघाला. त्याकाळीं देवयानीनें कचास विचारिलें कीं, तुला इतकावेळ कां लागला? तेव्हां कच बोलतो हे देवयानि, समिधा आणि कुशांचा भारा बांधून आश्रमीं येण्यास लौकर निघालों तों मार्गांत वटवृक्षाच्या अधोभागीं थोडासा बसलों व सर्व गायीही वटवृक्षाच्या छायेखालीं बसल्या होत्या इतक्यांत असुर माझ्या जवळ येऊन ह्मणाले कीं, तूं कोण आहेस? तेव्हां मी सांगितलें कीं, मला बृहस्पति पुत्र कच ह्मणतात असें मी सांगतांच मला त्यांणीं मारून पीठ केलें आणि लांडग्यास भक्षणास देऊन ते निघून गेले. नंतर शुक्राचार्यानें मला आव्हान करितांच कांहीं माझें जीविंत होतें ह्मणून तुझ्या समीप आलों. असें ऐकून पुनः देवयानीनें कचास सांगितलें कीं, अरण्यांत जाऊन तूं पुष्पें घेऊन ये. तेव्हां कच वनामध्यें गेला असतां त्यास पुनः दानवांनीं पहातांच त्याचें चूर्ण करून समुद्रांत टाकिलें. त्यादिवशीं कचास गृहीं येण्यास विलंब लागल्यामुळें देवयानीनें पित्यास सांगतांच पुनः शुक्राचार्यानें कचास आव्हान केलें असतां विद्याबलानें त्यानें येऊन झालेलें वर्तमान सांगितलें. नंतर देवयानीनें पुनः पुष्पां करितां वनामध्यें पाठविला तेव्हां असुरानीं कचास मारून जाळून चूर्ण करून सुरेमध्यें घालून ती सुरा शुक्राचार्यास भक्षणास दिली. त्या काळीं देवयानि पुनः पित्यास बोलत्ये हे तात, कच अद्यापि कां येत नाहीं? पुष्पें आणण्या करितां पाठविला होता तो अजून कोठें दिसत नाहीं? तेव्हां मला असें वाटतें कीं, त्यास कोणी तरी मारला यास्तव लौकर आण? असें ऐकून शुक्राचार्य बोलतो हे पुत्रि, बृहस्पतिपुत्र मरण पावला त्यास मी विद्याबलानें संजीवन जरी केला तथापि पुनः तो मारला जातो त्यास मी आतां का-

यकरूं! हे देवयानि, तूं आतां शोक करूं नको. जरी तूं मृत्युलोकीं उत्पन्न झालीस तथापि माझ्या प्रभावानें अमरा सारखी आहेस. नित्यशः संध्योपस्थान काळीं सकल वेद, ब्राह्मण, इंद्रादिक देव, वसु, अश्विनीकुमार, दैत्य व सर्व जगत् मला नमस्कार करितें. इतका जरी मी श्रेष्ठ आहे तथापि आतां मी त्यास जिवंत करण्यास अशक्य आहें. असें पित्याचें भाषण श्रवण करून देवयानि बोलली हे तात. ज्याचा पितामह अंगिरा ऋषि तो अतिवृद्ध आणि ज्याचा पिता बृहस्पति साक्षात तपोनिधि तो हा ऋषीचा पुत्र, तसाच पौत्र असतां त्याविषयीं शोक करून कशी मी रुदन करणार नाहीं बरें तशांतून तो कच ब्रह्मचारी, तपोधन कर्माविषयीं मोठा दक्ष, यास्तव मला मोठा मान्य आहे, तेव्हां जिकडे तो गेला असेल त्या मार्गाचा अवलंब करित्यें अतः पर भोजन मी करणार नाहीं. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, महर्षीशुक्राचार्यास देवयानीनें अत्यंत पीडित केला असतां तो परम कोपानें सकल दैत्यांस आव्हान करून भाषण करितो हे असुरहो, निः संशय तुह्मीं माझ्याशीं द्वेष करितां, माझे जे शिष्य आहेत त्यांस मारतां, ब्रह्महत्याद्वारें मला अब्राह्मण करण्यास इच्छितां, तुह्मीं अत्यंत रौद्रकर्मी आहांत, माझ्या विरुद्ध नित्यशः आचरण करितां बरें, या पापाच्या योगें तुमचा नाश होईल असें जाणा. ब्रह्महत्या इंद्राचाही नाश करित्ये असें सर्व दैत्यांस सांगून, नंतर कचा, इकडे ये. असें भाषण केलें असतां त्या गुरूच्या भाषणानें कचास मोठें भय उत्पन्न होऊन तो उदरांत मंदमंद कांहीं भाषण करूं लागला तें आचार्यानें ऐकून कचास बोलतो अरे शिष्या, अरे विप्रा, तूं कोणाच्या मार्गानें माझ्या उदरांत जाऊन राहिलास तें सांग? असें बोलून त्याणीं जाणलें कीं, हा मृत्यूच्या मुखांत गेला. आतां देवयानी करितां यास हाक मारावी असें ह्मणून कचास आव्हान केलें त्याकाळीं कच उदरांतून भाषण करितो हे गुरो, तुझ्या प्रसादानें माझी स्मृति नष्ट झाली नाहीं, सर्व पूर्वीचे वृत्त मी स्मरतों; परंतु तुझ्या उदराचें विदारण झालें तर माझ्या तपाचा क्षय होईल, यास्तव तुझ्या उदरांत घोर क्लेश सहन करून आहें. हे काव्या, असुरांनीं माझें चूर्ण करून सुरेमध्यें घालून ती सुरा तुला प्राशनास दिली त्या योगानें मी तुझ्या उदरांत प्रविष्ट झालों; तेव्हां नंतर ब्राह्मी

आसुरी, दैवी या तीन मायेचा अभिज्ञ आहेस, यास्तव तुझ्या उदराचा भेदक रणें मला दुःसाध्यच आहे, या प्रकारें उदरस्थित जो कच याचें भाषण ऐकून शुक्राचार्य बोलतात हे वत्से, तुझें मी प्रिय कसें करूं? माझा जर वध झाला तर कच जिवंत होईल, माझ्या कुक्षीचा भेद केल्या वांचून कच तुझ्या दृष्टीस पडणार नाहीं, असें ऐकून देवयानि बोलत्ये हे तात, कचाचा आणि तुझा नाश हे दोन्ही मला दुःखदायक आहेत, यास्तव हे उभयतां शोकाग्नि जेणेंकरून माझा दाह करणार नाहींत असें कर. असें देवयानीचें भाषण ऐकून शुक्राचार्य बोलतो हे बृहस्पतिसुता, देवयानीची भक्ती बहुत तुझ्यावर आहे यास्तव तूं आतां विद्या ग्रहण करण्यास सिद्ध हो. याकाळीं मी तुला संजीवनीविद्या देतों. जर तूं आज कचरूपी इंद्र आला असतास तर उदरांत जीर्ण करून टाकिला असता. जो माझ्या उदरांत गेला तो ब्राह्मण वर्जित करून कधींही जिवंत बाहेर निघावयाचा नाहीं, तूं तर ब्राह्मण आहेस त्यापेक्षां आतांही मी विद्या देतों ग्रहण कर. हे तात, तुला मी आतां पुत्राची भावना करतों तूंही माझ्यावर भाव ठेव. विद्या प्राप्त झाल्यावर कृतघ्न होऊं नको. गुरूपासून तूं कृतविद्य झालास ह्मणजे धर्मवती दृष्टीनें पहा, अधर्मी होऊं नको. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रकारें गुरूनें भाषण करून कचास संजीवनी विद्या देतांच ती विद्या ग्रहण करून तो विप्र दिवस नष्ट झाल्यावर पौर्णिमेचे दिवशीं इंदु जसा उदय पावतो तसा शुक्राचार्याचा कुक्षिभेद करून बाहेर आला आणि शुक्राचार्य तत्काल मृत होऊन पृथ्वीवर पडला हें कचानें पहातांच तत्काल गुरूस संजीवन करून नमस्कार करीत भाषण करतो हे शुक्राचार्य, जसा तुह्मीं माझ्या कर्णांचाठायीं अमृतसंजीवनी विद्येचा निषेक केलात तसा दुसरा जो कोणी मला मोक्षरूप विद्येचा निषेक्ता होईल त्या तुह्मां उभयतांस माता आणि पिता मानून त्यांच्याशीं मी कधींही द्रोह करणार नाहीं, या उभयतांनीं माझ्यावर मोठा उपकार केला असें मानून त्या गुरूवर मी निरंतर संतुष्ट असेन. कर्मोपासनाज्ञान येतत्कांडत्रयात्मकवेदरूप निधि परम उत्तम आहे, हा निधि ज्या गुरूपासून ज्या शिष्यांस प्राप्त होऊन ते लब्धविद्य झाल्यावर आपल्या गु-

रूची जे पूजा करणार नाहींत ते शिष्य अप्रतिष्ठित होऊन पापी लोकास जा तील. असें कचानें भाषण केल्यावर हे राजा, महाविद्वान् शुक्राचार्य असुरांच्या वंचनानें सुरापान केल्यावर आपली बुद्धि नष्ट व कचही मोहित झाला असें पाहून रागानें सुरापानाचें निषेध वाक्य बोलला कीं, आजपासून जो कोणी मंदबुद्धि ब्राह्मण सुरापान करील तो धर्मापासून नष्ट होऊन ब्रह्महत्या पातकी होईल, आणि या लोकीं त्याची अत्यंत निंदा होऊन परलोकीं निंद्य होईल. ही मी आज ब्राह्मण धर्माची शीमा सर्व लोकांमध्यें स्थापित केली आहे, ती शीमा साधुब्राह्मण, गुरुशुश्रुक व या लोकीं जे श्रेष्ठ असतील त्यांणीं श्रवण करावी. असें त्या महानुभाव शुक्राचार्यानें भाषण करून नंतर मूढबुद्धीनें दानवांस आव्हान करून तो बोलला कीं हे दानवहो, माझें भाषण श्रवण करा तुह्मी मूरर्ख आहांत: कारण कचास माझ्या उदरांत घालून त्याची कार्य सिद्धि त्वरित केली. आतां तो कच संजीवनी विद्या ग्रहण करून माझ्या साररवाच मतापी झाला, असें बोलून शुक्राचार्य विराम पावला. नंतर सकल दानव विस्मय पावून आप आपल्या गृहीं गेले. सहस्त्र वर्षे पर्यंत कचानें गुरुगृहीं राहून पुढें त्रिदशालयीं जाण्याविषयीं गुरूस आज्ञा मागितली. असा विषय या अध्यायांत आहे.

७७ अध्याय सत्याहात्तरावा - वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कचानें व्रत समाप्त झाल्यावर शुक्राचार्यानें त्रिदशालयीं जाण्या विषयीं आज्ञा दिली असतां कच जाण्यास निघाला, तेव्हां देवयानि बोलल्ये हे कचा, विद्या, तप, इंद्रिय निग्रह इत्यादिकें करून तूं फारच शोभतोस, जसा महायशस्वी अंगिराऋषि माझ्या पित्यास मान्य आहे, तसाच तुझा पिता बृहस्पति मला मान्य आहे. हे कचा, तूं व्रतस्थ व नियमस्थ अशा तुझेठायीं जशी मी वर्तल्यें व जें मी बोलल्यें तें तूं जाणतच आहेस तुझें व्रतहीं समाप्त झालें तेव्हां माझेठायीं तूं अनुरक्त असावेंस तें असें कीं, मंत्रसंस्कारानें यथाविधि तूं माझें पाणिग्रहण करावेंस, असें ऐकून कच बोलतो हे निर्दोष आंगि, जसा तुझा पिता मला पूज्य व मान्य आहे, तशी तूंही मला पूजनीय आहेस, किंबहुना त्यापेक्षां अधिक पूजनीय आहेस. भार्गव शुक्राचार्यास तूं प्राणापेक्षां पलीकडे आ-

हेस. हे भद्रे, तूं गुरूची पुत्री ह्मणून मला सर्वदां मान्य आहेस, यास्तव तूं असें भाषण करण्यास योग्य नाहींस. असें भाषण ऐकून देवयानि बोलत्ये हे द्विजोत्तमा, तूं गुरूच्या पुत्राचा पुत्र माझ्या पित्याचा तूं कांहीं पुत्र नव्हेस नस्मात् तूं मला मान्य व पूज्य आहेस. हे कचा, असुरांनीं बहुत वेळ तुझा प्राण घेतला त्या दिवसापासून तुझ्यावर माझी किति प्रीति आहे त्याचें स्मरण कर. बरें तुझे ठायीं माझें सौहार्द, अनुराग व भक्ति बहुत आहे, यास्तव हे धर्मज्ञा, अनपराधी मी असतां माझा त्याग करण्यास योग्य नाहींस. असें ऐकून कच बोलतो हे शुभव्रते, जें कर्म करण्यास मी योग्य नाहीं, त्याविषयीं माझी योजना कत्येंसि काय? तूं तर गुरूपेक्षां गुरुत्तर आहेस तेव्हां माझ्यावर कृपाच करावी. हे चंद्रनिभानने, ज्या उदरांत तूं वास केलास त्याच शुक्राचार्यांच्या कुक्षीमध्यें मी वास केला, तेव्हां धर्मतः पाहिलें असतां तूं माझी भगिनी झालीस ह्मणून तूं असें भाषण करूं नको. मला कोप येऊन मी हें भाषण करतों असें नाहीं. आतां तुला मी विचारून स्वस्थानीं जातों. मला मार्गांत बरें असण्याविषयीं आशीर्वाद दे आणि धर्मास विरोध नयेतां कांहींतरी कथांतर निघालें म्हणजे तूं माझें स्मरण करीत जा. व निरालस्य होऊन तूं माझ्या गुरूची शुश्रुषा कर. असें देवयानीनें ऐकून भाषण केलें कीं हे कचा, धर्मकार्याविषयीं मी याचना कर्त्ये, जर याकाळीं माझा अंगिकार न करशील तर तुझी अमृतसंजीवनी विद्या निष्फल होईल असें तूं जाण. कच बोलतो हे देवयानि, तूं माझ्या गुरूची पुत्रि असें जाणून मी तुझें तिरस्कार करितों; परंतु तूं दोषी आहेस ह्मणून मी अंगिकार करीत नाहीं. तशांतूनही गुरूची मला आज्ञा नाहीं, इतकें असून जर तूं मला शाप देत असशील तर दे. हे देवयानि, ऋषिप्रणीत जो धर्म आहे तो तुला सांगितला. तेव्हां धर्मेंकरून तूं मला शाप देण्यास योग्य नाहींस. स्वइच्छेनें देत असल्यास दे. तुझी जी इच्छा आहे, ती सिद्ध होण्यास कठिण आहे, तर मीही तुला शाप देतो कीं, ऋषिपुत्र तुझें पाणिग्रहण कधींही करणार नाहीं. आतां तूं मला शाप दिलास कीं, माझी विद्या फलद्रूप होणार नाहीं, तर ही विद्या मी दुसऱ्यास अध्यापिन करून सफल करीन. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रकारें तो द्विजश्रेष्ठ क-

च देवयानीस भाषण करून त्रिदशालयीं जाता झाला. नंतर इंद्र प्रभृति देवांनीं कच आला असें पाहून बृहस्पतीची प्रशंसा करीत असें भाषण करिते झाले-कीं हे गुरो, आमच्या हिता करितां जें कांहीं तूं अद्भुत कर्म केलेंस त्या योगानें तुझ्या यशाची कधींही हानि व्हावयाची नाहीं आणि तूं आमचा भागभोक्ता होशील. असा विषय या अध्यायांत आहे.

७८ अध्याय अठ्ठ्याहात्तरावा- वैशंपायन सांगतात हेजनमेजया, कृतविद्य झालेला कच आला, हे देवांनीं पाहून परम हर्षित झाले, आणि कचापासून ती विद्या घेऊन कृतार्थ झाले. व ते सर्व एकत्र होऊन इंद्रास भाषण करितात हे पुरंदरा, तुझ्या पराक्रमाचा काळ आला आहे, यास्तव तूं शत्रूंस जिंक. असें देवांचें भाषण ऐकून इंद्र सकल देवांसहवर्तमान दानवांचा पराभव करण्यास निघाला. तो मार्गांत एक कुबेराच्या वनासारखें वन आलें, त्यामध्यें कांहीं कन्या जलक्रीडा करितात. असें पाहून इंद्र वायुरूप होऊन त्यांचीं सकल वस्त्रें एकत्र केलीं. हें कन्यांनीं पहातांच जला बाहेर येऊन आप आपलीं वस्त्रें परिधान केलीं, त्यांत देवयानीचें वस्त्र शर्मिष्ठेनें परिधान केलें, त्याकाचीं देवयानीचा व शर्मिष्ठेचा वस्त्रा करितां मोठा कलह झाला. देवयानि शर्मिष्ठेस बोलल्ये हे असुर कन्ये, तूं आमची शिष्यीण असून माझें वस्त्र कसें परिधान केलेंस? तुह्मीं असुर आचार हीन आहांत, यास्तव हें करणें तुह्मांस योग्य नाहीं, असें शर्मिष्ठेनें भाषण ऐकून ती बोलल्ये अगे देवयानि, माझा पिता स्थित असतां किंवा निद्रित असतां तुझा पिता अत्यंत नम्र होऊन नीचस्थानीं उभा राहून वारंवार बंदीजना सारखी स्तुति करतो. यास्तव तुझा पिता याचक, स्तवन करणा व प्रतिग्रह कर्ता त्याची तूं कन्या. आणि याचकास देणारा, स्तुति करण्यास जो योग्य त्याची मी कन्या, तेव्हां तुझें व माझें किती अंतर आहे तें पहावें? हे याचकी, फार झालें तर तूं आपला ऊर बडवून घेशील, अथवा धुळीमध्यें लोळशील, तूं तर दरिद्री आहेस यास्तव तुझें कांहीं माझ्यापुढें चालावयाचें नाहीं, व्यर्थ मी तुझी शत्रु होईन असें मात्र करशील. वैशंपायन सांगतात हेजनमेजया, देवयानि आपल्या वस्त्रा विषयीं अत्यंत आसक्त झाली असें शर्मिष्ठेनें पाहि-

लें. नंतर देवयानीस कूपामध्यें टाकून मृत झाली असें जाणून क्रोधवेगपरायण होऊन स्वगृहीं आली. कांहीं काळानें ययातिराजा मृगया करीत करीत तृषित झालेला निर्जळ कूपामध्यें जलप्राशन करण्याच्या बुद्धीनें आला असतां साक्षात् अग्निज्वाळेसारख्या कन्येस पाहून मंजुळ वाणीनें असें बोलला कीं हे कन्ये, तुझीं नखें ताम्रवर्ण असून तूं षोडशवार्षिकी आहेस; मणिकुंडलादिकें करून सुशोभित असतां आतुरासारखी शोक करीत कोणाचें ध्यान करित्येस? लतातृणाच्छादित कूपामध्यें कशी पतन पावलीस. हे सुमध्यमे, तूं कोणाची कन्या आहेस तें मला सांग? असें ऐकून देवयानि बोलत्ये अरे, दैत्य मृत झाले असतां त्यांस विद्येंकरून जो जिवंत करतो त्या शुक्राचार्यांची मी कन्या आहें हे राजा, ताम्रवर्णनखयुक्त जो माझा दक्षिण हस्त त्यास ग्रहण करून तूं मला वर काढ. तूं कोणी तरी कुलीन आहेस असें मी समजते, तूं मोठा शांत दिसतोस तसाच वीर्यवान्, यशस्वी आहेस यास्तव यापासून माझा उद्धार करण्यास योग्य आहेस. नहुषपुत्रानें ही ब्राह्मणकन्या आहे असें जाणून तीचा दक्षिणहस्त धरून कूपापासून बाहेर काढिली. आणि तीस विचारून तो स्वपुरास गेला. इकडे देवयानि शोकसंतप्त झालेली, पुरापासून एक दासी आली होती तीस बोलली कीं हे दासि, तूं लवकर जाऊन माझ्या पित्यास सांग कीं, मी वृषपर्व्याचें नगरांत प्रवेश करीत नाहीं असें देवयानीचें वाक्य ऐकून दासी संभ्रांत चित्त होऊन तत्काल निघाली ती असुरमंदिरांत जाऊन शुक्राचार्यांस बोलली कीं, हे ब्रह्मन् वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा इणें देवयानीस वनामध्यें मारून टाकिली. इतकें दासीचें भाषण ऐकतांच शुक्राचार्य दुःखित होऊन तत्काल निघून कन्येचा शोध करीत वनामध्यें आला. नंतर देवयानीस पाहून बाहूनें तीस आलिंगन देऊन भाषण करितो हे पुत्रि, आपल्या स्वकृत कर्मानें सकल जन, सुख दुःख पावतात. त्यांत त्यांचा कांहीं अपराध नाहीं, बरें त्या फलाच्या भोगानें आतां तुझ्या पापाचें निरसन झालें. असें ऐकून देवयानि बोलत्ये हे पित्या, माझें एक भाषण आहे तें स्वस्थपणें श्रवण कर. वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा मला असें बोलली कीं, तुझा पिता शुक्राचार्य माझ्या पित्याचा गायक आहे, आणखी एक क्रोधानें आरक्त नेत्र करून कठोर भा-

षण तिणें केलें कीं, याचक व प्रतिग्रह करणारा याची तूं कन्या आहेस. मी तर याचकास देणाऱ्याची कन्या आहें. हे तात, जर मी स्तुति करणाऱ्याची व प्रतिग्रह कर्त्याची दुहिता आहें तर सखीनें मला सांगितलें आहे त्या प्रमाणें शर्मिष्ठेस प्रसन्न करित्यें. असें तीचें भाषण ऐकून शुक्राचार्य बोलतात हे देवयानि, तूं स्तुति करणाऱ्या याचकाची कन्या नव्हेस तर ज्याचें स्तवन करण्यास कोणाची शक्ति नाहीं, अशाची तूं कन्या आहेस. स्तवन करण्यास मी योग्य आहे किंवा नाहीं हें वृषपर्वा किंवा नहुष राजा जाणतो. माझें अचिंत्य ऐश्वर्य आहे, तसेंच अपरिमित बल आहे. अचिंत्य, निर्द्वंद्व जें ब्रह्म त्याचें ऐश्वर्य मला प्राप्त आहे. पृथ्वी व स्वर्ग यांचाठायीं जें काय जगत् आहे, त्या सर्वांचा मी ईश्वर आहें असें ब्रह्मदेवानें सांगितलें आहे. सकल प्रजांच्या हितास्तव मी जलांची वृष्टि करून सकल औषधि पुष्ट करितों हें माझें भाषण सत्य जाण. या प्रकारें विषादपावलेल्या देवयानीचें मधुर भाषणानें पिता शुक्राचार्यानें शांतन केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

७९ अध्याय एकुणऐंशिवा:- पुनः शुक्राचार्य बोलतो हे देवयानि, जो मनुष्य दुसऱ्यांनीं केलेली निंदारूप भाषणें सहन करितो त्या मनुष्यानें हें सकल जगत् जिंकिलें असें जाणावें. जो आपल्यास क्रोध आला असतां त्याचा सर्पानें जीर्णत्वचेचा त्याग केल्या प्रमाणें जो त्याग करून क्षमा धारण करतो त्यास साधु ह्मणतात. जो पुरुष शंभर वर्षें पर्यंत महिन्या महिन्याचे ठायीं निरंतर पितृयाग करितो आणि जो पुरुष क्रोध पावत नाहीं, या उभयतांची साम्यता केली असतां अक्रोधी पुरुष योग्यतेनें अधिक आहे, कुमार अथवा कुमारी याणीं जसें मूर्खपणानें वैर केलें तसें वैर प्राज्ञानीं कधींही करूं नये; कारण त्या बालांस ज्ञान अगदीं नसतें ह्मणून ते वैर करितात. असें पितृ वाक्य ऐकून देवयानि बोलल्ये हे तात, तूं जें बोललास तें सर्व मी जाणत्यें; परंतु शर्मिष्ठेनें जें दुर्भाषण केलें तेणेंकरून अरणीचें मंथन केल्यानें जसा अग्नि उत्पन्न होतो तसा माझ्या हृदयाचें मंथन होऊन संतापरूप अग्नि उत्पन्न झाला. आपला शत्रु संपत्तीनें श्रेष्ठ झाला असतां हीन पुरुष जर त्याची उपासना करूं लागेल तर त्यापेक्षां त्यास मरण येईल तर फार उत्तम आहे,

असें विद्वज्जन ह्मणतात. असा विषय या अध्यायांत आहे.

८० अध्याय ऐंशिवा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, असें देवयानीचें भाषण ऐकून क्रोधयुक्त शुक्राचार्य, वृषपर्व्याचे समीप जाऊन अविचारानें बोलला कीं हे राजा, जशी धेनु तत्काल फल देणारी होत्ये तसा अधर्म केला असतां तत्काल फल देतो असें नाहीं, तो हळुहळू अधर्म करणाऱ्या पुरुषाचीं मूळें खंडण करीत असतो. अरे जो पुरुष आपले पुत्र अथवा नातु यांस आपलें समान पहात नाहीं त्याचें पापच फलद्रूप झालें असें समजावें. अरे अंगिरा ऋषीच्या कुलांत झालेला ब्राह्मण अपापशील माझ्या गृहीं राहून माझी शुश्रूषा करणारा कच होता, तो वधास योग्य नसतां त्याचा तुह्मीं वध केलात तेणेंकरून माझी कन्याही वधास योग्य केलीत काय ? यास्तव हे वृषपर्व्या, सबांधव तुझा मी त्याग करितों; कारण तुझ्या देशांत राहण्यास मी योग्य नाहीं. हे दैत्या, मी मिथ्या प्रलापी आहें, असें तूं समजतोस काय ? शपथमात्रेंकरून माझें सांत्वन करितोस; परंतु आपल्या दोषांचा निग्रह करीत नाहींस ? असें शुक्राचार्याचें भाषण ऐकून वृषपर्वा बोलतो हे भार्गवा, तुझेठायीं अधर्म किंवा मिथ्या भाषण हीं कांहीं नाहींत, तर धर्म आणि सत्यहीं मात्र आहेत यास्तव माझ्यावर प्रसन्न हो. जर माझा त्याग करून तूं येथून जाशील तर आह्मीं अतःपर समुद्रांत प्रवेश करूं. असें भाषण ऐकून शुक्राचार्य बोलतो हे असुर हो, तुह्मीं समुद्रांत जा अथवा दुसरे कोणते देशांत जा; परंतु मी आपल्या कन्येचें कधींही अप्रिय करणार नाहीं, तर तुह्मीं देवयानीचा जेणेंकरून संतोष होईल असें करा. माझें सर्व जीवित्व तेथें आहे, जसा बृहस्पति इंद्राचा योगक्षेम करणारा आहे, तसा तुह्मां सर्वांचा मी आहें. असें भाषण ऐकून वृषपर्वा बोलतो हे भार्गवा, जें कांहीं आह्मां दैत्येंद्रापाशीं भूमि, हस्ति व इतर द्रव्यें यांसहवर्तमान् माझा ईश्वर हो. असें भाषण ऐकून शुक्राचार्य बोलतो हे महासुरा, जें काय तुह्मां दैत्येंद्राचें द्रव्य आहे त्याचा मी स्वामी होतों; परंतु देवयानि जर संतुष्ट होत असली तर या सर्व गोष्टि घडतील. असें वृषपर्व्यानें भाषण केल्यावर शुक्राचार्यानें देवयानीस हें वर्तमान सांगीतलें त्याकाळीं ती बोलत्ये हे तात, जरी तूं वृषप-

र्थांचा स्वामी झालास तथापि मी हें कांहीं जाणत नाहीं. असें भाषण ऐकून वृषपर्वा बोलतो हे शुचिस्मिते, ज्याची तूं इच्छा करीत असशील तें मी तुला देतों. असें भाषण ऐकून देवयानि बोलत्ये हे वृषपर्व्या, माझा पिता मला जेथें अर्पण करील तेथें तुझ्या कन्येनें दोन सहस्र कन्ये सहवर्तमान माझें दास्यत्व करावें. आणि माझ्या पृष्ठभागीं निरंतर गमन करीत असावें. असें देवयानीचें भाषण ऐकून वृषपर्वा बोलतो हे धात्रि,जा आणि लवकर शर्मिष्ठेस घेऊन ये. व देवयानि जें काय सांगेल तें तिणें सत्वर करावें. असें त्यानें भाषण करितांच धात्री त्वरेनें उठून शर्मिष्ठेकडे गेली आणि तीस भाषण करित्ये हे शर्मिष्ठे, सत्वर ऊठ. आणि देवयानि जें कांहीं इच्छित आहे त्याचा तूं अंगिकार कर. असें धात्रीचें भाषण ऐकून शर्मिष्ठा बोलत्ये हे धात्रि, देवयानीस जें काय इच्छित असेल तें मी आज करण्यास सिद्ध आहें. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, असें शर्मिष्ठेनें बोलून आपण शिबिकेंत बसली आणि दोन सहस्र कन्या बरोबर घेऊन आपल्या पुरापासून निघाली आणि देवयानीच्या संन्निध जाऊन ती असें बोलूं लागली कीं हे देवयानि, या दासी सहवर्तमान मी तुझी परिचारिका झाल्यें. जेथें तुझा पिता तुला अर्पण करील तेथें तुझ्या पृष्ठभागीं निरंतर असेन. असें भाषण ऐकून देवयानि बोलत्ये अगे शर्मिष्ठे, स्तुति करणारा, याचना करणारा, व प्रतिग्रह करणारा त्याची मी कन्या. आणि स्तुति करण्यास जो योग्य त्याची तूं कन्या असतां माझी दासी कशी होशील ? असें ऐकून शर्मिष्ठा बोलत्ये हे देवयानि, कोणच्याही प्रकारें आमच्या ज्ञातीस सुख होईल तें मी करण्यास सिद्ध आहें, तुझा पिता तुला जेथें देईल तेथें मी तुझ्या पृष्ठभागीं असेन. या प्रकारें वृषपर्व्याच्या कन्येनें दास्यत्व स्वीकृत केलें. असें जाणून देवयानि, पित्यास बोलत्ये हे द्विजसत्तमा, आतां मी नगरांत जात्यें. असें तिणें भाषण केल्यावर महायशस्वी शुक्राचार्य सकल दानवांनीं पूजित होऊन कन्येसहवर्तमान हर्षानें नगरांत आला. असा विषय या अध्यायांत आहे.

८१ अध्याय एक्यांशिवा -- वैशंपायन सांगतात हे नृपोत्तमा, यास बहुत काळ गेल्यावर कोणेएके दिवशीं देवयानि, पूर्वींच्याच वनांत क्रीडा करि-

ण्यास निघाली त्याकाळीं शर्मिष्ठा सहस्र दासी सहवर्तमान देवयानि बरोबर आली. आणि सखीसमागमें वनांत क्रीडा करूं लागली. माधवीनामक मधु,प्राशन करून व नाना प्रकारचीं भक्ष्यें भक्षण करीत आहेत अशा प्रसंगीं मृगया करीत ययाति राजा श्रमी होऊन जलाच्या इच्छेनें त्याच वनामध्यें आला देवयानि शर्मिष्ठा व इतर स्त्रिया दिव्य आभरणें धारण केलेल्या मद्यपान करून क्रीडा करीत आहेत, त्यामध्यें रूपानें अप्रतिम अशी देवयानि बसली आहे, हें ययाति राजानें पाहून तो बोलला कीं, दोनसहस्र कन्यांनीं परिवारित अशा तुह्मीं दोनकन्या येथें कोण बसल्या आहांत ? व तुमचें नाम गोत्र काय आहे तें मला सांगा ? असा प्रश्न ऐकून देवयानि बोलल्ये हे नराधिपा, श्रवणकर. सकल असुरांचा जो गुरु शुक्राचार्य त्याची मी कन्या आहे, ही दुसरी सखी माझी दासी आहे, ही वृषपर्वानामक दानवांची दुहिता होय. असें भाषण ऐकून ययाति बोलतो. ही असुरेंद्राची कन्या सकल स्त्रियांमध्यें श्रेष्ठ असतां तुझी दासी कशी . हें मला फार कौतुक वाटतें. असें ऐकून देवयानि भाषण करित्ये हे राजा, सर्वांमध्यें दैव हें फार श्रेष्ठ आहे, तें व्हां दैवानें काय होणार नाहीं असो. तुझें रूप,वेष हे राजा सारखे दिसतात. आणि ब्राह्मणा सारखी वाणी आहे, तेव्हां तूं कोण तुझें नाव काय व कोणाचा तूं पुत्र हें मला सांग ? असें भाषण श्रवण करून ययाति बोलतो. मी राजाचा पुत्र ययाति ह्मणून तुला श्रुत असेलच. असें राजाचें भाषण ऐकून देवयानि बोलल्ये हे नृपते, कोणत्या अर्थाकरितां या देशांत आलास. जलसंबंधीं किंवा पद्मादिक प्राप्त व्हावीं अथवा मृगाच्या इच्छेनें येथें आलास कींकाय ? असें भाषण ऐकून ययाति बोलतो हे भद्रे, मी मृगेच्छु असून जला करितां येथें आलों. मृगानें पलायन केलें ह्मणून मी त्याच्या मागें गमन करीत असतां अत्यंत श्रांत झालों आहें, आतां तूं जी आज्ञा करशील ती ऐकण्यास मी योग्य आहें. असें ययातीचें भाषण ऐकून देवयानि बोलल्ये हे राजा, दोन सहस्र कन्या बरोबर घेऊन शर्मिष्ठा माझी दासी आहे, ती सहवर्तमान मी तुझी भार्या होत्यें. तूं माझा भर्ता हो. तुझें कल्याण असो. असें भाषण ऐकून ययाति बोलतो हे देवयानि, तूं

शुक्राचार्यांची कन्या आहेस, यास्तव मी तुला पति योग्य नाहीं. तुझा पिता शुक्राचार्य यास्तव आह्मीं राजे तुमच्याशीं विवाह करण्यास योग्य नाहींत. असें राजवाक्य श्रवण करून देवयानि बोलत्ये. ब्राह्मणांत क्षत्रियाचें व क्षत्रियांत ब्राह्मणाचें कुळ मिळालें आहे. दोन्हीं कुळें एकमेकांत संसृष्ट झालीं आहेत. यद्दावरें, पूर्वी क्षत्रियकुळाचा ज्या काळीं च्छेद झाला त्या काळीं ब्राह्मणवीर्यापासून क्षत्रियकुळाची उत्पत्ति झाली. लोपामुद्रादिक क्षत्रिय कन्या असतां त्यां पासून ब्राह्मणांची उत्पत्ति झाली. आतां बुधापासून इलेचाठायीं पुरूरवा झाला. त्यापासून अयु, त्या पासून नहुष आणि त्यापासून तूं झालास. आतां क्षत्रियकन्येचेठायीं ब्राह्मणां पासून उत्पत्ति झाली असतां त्यांस क्षत्रिय असें ह्मणतात. असा जर कोणाचा आग्रह आहे तर इला ही क्षत्रियाची दारा नवती, तेव्हां तीपासून तुमच्या वंशाची उत्पत्ति आहे, यास्तव तुह्मीं ऋषींच आहांत ह्मणून हे नहुषपुत्रा, तूं माझ्याशीं लग्न करावेंस ह्मणून मी प्रार्थना करित्यें. असें ऐकून ययाति बोलतो हे वरांगने, चारी वर्ण जरी एकाच परमेश्वराच्या देहा पासून उत्पन्न झाले तथापि त्यांचे धर्म व आचार हे निरनिराळे आहेत, त्यांत सर्वांमध्यें ब्राह्मण हा वर्ण श्रेष्ठ आहे, असें भाषण ऐकून देवयानि बोलत्ये हे राजा, माझें पाणिग्रहणरूप धर्म पूर्वी कोणत्याच पुरुषानें केला नाहीं आणि तूं तर मला पूर्वी वरलें आहेस ह्मणून मी तुला वरत्यें. एकदां तूं ऋषिपुत्रानें माझें स्वतः पाणिग्रहण केलें स तर, तोच माझा विवाह. असें देवयानीचें भाषण ऐकून ययाति बोलतो हे देवयानि, जाज्वल्यमान् क्रोधी झालेला जसा दंष्ट्राविष सर्प, त्यापेक्षां ब्राह्मण अत्यंत दुराधर्ष आहेत. असें ऐकून देवयानि बोलत्ये. हे पुरुषश्रेष्ठा, जाज्वल्यमान् सर्वतो सुख क्रुद्ध आशी विषापेक्षांही विप्र दुराधर्ष आहेत ह्मणून जें तूं भाषण केलेंस तें काय? असा प्रश्न ऐकून ययाति बोलतो हे देवयानि, आशी विषसर्प एकाचाच प्राण घेतो, शस्त्रानें एकाचाच वध केला जातो आणि ब्राह्मण कोपला असतां सकल राष्ट्राचा व पुराचा नाश करितो, यास्तव हे स्त्रिये, ब्राह्मण दुराधर्ष आहेत असें मी ह्मणतों ह्मणून तुझ्या पित्यानें तुला, मला समर्पण केली नाहीं ह्मणून तुझ्याशीं विवाह करीत नाहीं

असें भाषण श्रवण करून देवयानि बोलत्ये हे राजा, माझ्या पित्यानेंच मला तुला दिल्ही ह्मणून मी तुला वरला. आणखी असें आहे कीं, आपण याचना न करितां दुसऱ्यानें आपणास कन्या आणून दिली असतां प्रतिग्रह करणाऱ्यास दोषनाहीं. असें देवयानीनें बोलून आपल्या पित्याकडे धात्रीस पाठवून हा सर्व वृत्तांत त्यास सांगितला. तो ऐकून भार्गव शुक्राचार्य त्यास्थलीं आला असतां ययातीनें त्यास पाहून मोठ्या नम्रतेनें शुक्राचार्यासमीप उभा राहिला त्याकाळीं देवयानि पित्यास बोलत्ये. हे तात, हा नहुषराजाचा पुत्र ययातिराजा याणें संकटकाळीं माझें पाणिग्रहण केलें आहे, यास्तव यासच मला दे. तुला नमस्कार करित्यें. या राजाशिवाय या लोकांत दुसरा पति मी वरीन नाहीं असें भाषण ऐकून शुक्राचार्य बोलतो हे वीर नहुषात्मजा, ही माझी सुता मला फार प्रिय आहे, इणें पति तुला वरला यास्तव मीच तुला दिली. असें समजून ईचें ग्रहण कर. आतां ही राजाची महिषी झाली. असें शुक्राचार्याचें भाषण ऐकून ययाति बोलतो हे भार्गवा, वर्णसंकररूप अधर्म मला स्पर्श नकरो, अशी मी तुझी प्रार्थना करितों. असें भाषण ऐकून शुक्राचार्य बोलतो हे राजा, तुला अधर्मापासून मी मुक्त केला. आतां एखादा ईप्सित वर माग. या विवाह संबंधानें तूं म्लान होऊंनकोस. तुझ्या पापाचें दूरीकरण मी करीन. हे राजा, ही वृषपर्व्याची कुमारी शर्मिष्ठा आहे, ही ही तुला निरंतर पूज्यच आहे, हिला शयनस्थानीं बोलावूं नकोस असें शुक्राचार्याचें वाक्य ययातीनें श्रवण करून त्यास प्रदक्षिणा करून शास्त्रोक्त विधीनें विवाह केला. दोनसहस्र कन्या बरोबर अशा शर्मिष्ठेसहवर्तमान देवयानि शुक्राचार्यापासून ययातिराजास मिळाली असतां तो नृपसत्तम हर्षानें शुक्राचार्याची आज्ञा ग्रहण करून स्वनगरास आला. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

८२ अध्यायब्यायशि — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, ययातिराजानें आपल्या पुरांत प्रवेश केल्यावर देवयानीस अंतःपुरांत प्रविष्ट करून तीच्याच अनुमतानें सहस्त्रदासी सहवर्तमान जी शर्मिष्ठा होती तिला अशोकवनिकेच्या संनिध एक गृह करून त्यांत ठेवून अन्नपानादिक पदार्थांनीं तीचा मोठा सत्कार केला. नंतर नहुषात्मज परमसत्वानें देवया-

नी सहवर्तमान बहुत वर्षें विहार करीत असतां ऋतुकाल आल्यावर देवयानि प्रथम गर्भिणी होऊन एकपुत्र प्रसवली. या कृत्यास एकसहस्त्र वर्षें झाल्यावर वृषपर्व्यांची कन्या शर्मिष्ठा इला यौवन अवस्था येतांच ऋतूतें पाहून ह्मणत्ये कीं, ऋतुकाल तर मला प्राप्त झाला. पतिही मी कोणाचा वरला नाहीं, तेव्हां इतउत्तर मी आतां काय करावें? देवयानि प्रजावती झाली. माझें यौवन तर वृथा चाललें. तस्मात् देवयानीनें जो भर्ता वरला तोच आतां मी वरत्यें. आणि राजानें याकाळीं मला पुत्र ऋतुफल द्यावें. अशी माझी मति निश्चित झाली. आतां याकाळीं तो धर्मात्मा एकांतिं माझ्या दर्शनास येईल तर फार चांगलें. अशी शर्मिष्ठा चिंताग्रस्त होऊन विचार करीत आहे तों ययाति राजा यदृच्छेनें फिरावयास निघाला तो फिरतां फिरतां अशोकवनिके जवळ आला. आणि त्यानें शर्मिष्ठेस पहातांच उभा राहिला. त्याकाळीं राजा एकांतीं आहे, असें शर्मिष्ठेनें पाहून ती सन्निध आली. आणि अंजली पुट जोडून बोलली कीं हे नहुषात्मजा, सोम, इंद्र, विष्णु, यम, वरुण व तूं इतक्यांच्या गृहीं स्त्रीस पहाण्यास कोण समर्थ आहे, माझें रूप, शील व कुल हें तूं सर्व जाणतच आहेस यास्तव मी तुला अशी प्रार्थना करित्ये कीं, मला ऋतुदान करावेंस. असें तीचें भाषण ऐकून ययाति बोलतो हे कन्ये, तुझें शील मी जाणतों. व तुझें रूप सूच्यग्रा इतकेंही मला व्यंग दिसत नाहीं; परंतु ज्याकाळीं मी देवयानीशीं विवाह केला त्याकाळीं शुक्राचार्यानें मला असें सांगितलें कीं, या शर्मिष्ठेशीं तूं संबंध करूं नको. असें राजवाक्य ऐकून ती बोलत्ये हे राजा, परस्पर एकमेकांच्या थट्टेमध्यें, गम्यस्त्रियांशीं, विवाहकाळीं, आपला प्राण जात असला तर, सर्व धनाचा अपहार होत असला तर या पांचस्थलीं अनृत भाषणानें पातक लागत नाहीं. हे नरेंद्रा, सभेमध्यें सभासदांनीं साक्षीदारास प्रश्न केला असतां त्याणें खोटी साक्षी दिली तर तो पापी होतो; परंतु गो ब्राह्मण, स्त्री, दीन व अनाथ इतक्या करितां खोटी साक्षी देणारास पातक लागत नाहीं तर पुण्यच लागतें. आतां प्रस्तुतकाळीं तुझा व माझा उद्देश एकच आहे, त्यापेक्षां देवयानीच्या विवाहकाळीं तूं जरी असा निश्चय केला आहेस त-

थापि तो दोषदायक होत नाहीं, तेव्हां माझा अंगिकार कर. असें शर्मिष्ठेचें भाषण ऐकून ययाति बोलतो हे शर्मिष्ठे, सकलभूतमात्रांस राजाच प्रमाण आहे, तोच राजा मिथ्या भाषण करूं लागेल तर तत्काल नष्ट होईल. महान संकट जरी आलें तथापि मिथ्या भाषण कदापि करूं नये, म्हणून मिथ्या भाषण मी करीत नाहीं. असें राजाचें भाषण ऐकून शर्मिष्ठा बोलत्ये हे राजा, तूं माझ्या सखीचा पति आहेस त्यापेक्षां माझा पति अर्थातच झालास. ज्या काळीं देवयानीनें तुला वरलें त्याचकाळीं मी तुला वरलें. असें ऐकून ययाति बोलतो हे शर्मिष्ठे, याचक प्राप्त झाले असतां त्यांस अवश्य दान करावें हें माझें व्रत आहे. तूंतर माझ्याशीं संभोग मागत्येस तेव्हां मी काय करावें ? असें ऐकून शर्मिष्ठा बोलत्ये राजा, आतां अधर्मापासून माझें रक्षण कर. तुझ्यापासून मी अपत्यवती होऊन यालोकीं उत्तम धर्माचें आचरण करून राहीन असें कर. हे राजा, भार्या, दास, आणि सुत हे तिघे यालोकीं अधन म्हणून सांगितले आहेत हे तीन ज्याचे असतील त्याचें धन समजावें. मी देवयानीची दासी ती देवयानि तुझी भार्या झाली तेव्हां मीही तुझ्या स्वाधीनच आहें. असें तीचें भाषण ऐकून हें सर्व सत्य आहे असें त्याणें जाणून नंतर शर्मिष्ठेचा सत्कार करून व इच्छेप्रमाणें तिच्याशीं संभोगकरून ययातिराजा स्वस्थानीं गेला. त्या उभयतांच्या समागमेंकरून शर्मिष्ठा गर्भिणी झाली. नंतर कांहीं काळ गेल्यावर राजीवलोचना शर्मिष्ठा, पद्मलोचन व सुवर्णसदृश कांतिमान अशा पुत्रास प्रसवली. असा विषय या अध्यायांत आहे.

८३अध्यायच्यायशिवा :- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, शर्मिष्ठेस पुत्र झाला हें वर्तमान ऐकून देवयानि परम दुःखार्त होऊन शर्मिष्ठेच्या सन्निध गेली. आणि तीस बोलली कीं हे सुभ्रु, कामास लुब्ध होऊन हें काय पातक केलेंस ? असें भाषण ऐकून शर्मिष्ठा बोलत्ये हे देवयानि, कोणी एक धर्मात्मा ऋषि आला. त्याणें मला विचारलें कीं, मी तुला वर देण्यास उद्युक्त आहें, त्यापेक्षां तुला वर कोणचा पाहिजे तो माग. त्याकाळीं मी असा वर मागितला कीं, ऋषीपासून मला एक अपत्य व्हावें इतकीच मी इच्छा

करिल्यें. असें ऐकून देवयानि बोलल्ये हे भीरु, फार चांगलें केलेंस, बरें तो द्विज कोणचा आहे हें तूं जाणल्येस? त्याचें नाव व गोत्र काय आहे तें मी ऐकण्यास इच्छित्यें. असें ऐकून शर्मिष्ठा बोलल्ये हे शुचिस्मिते, तो द्विज तपानें व तेजानें देदीप्यमान होता, त्यास मी पहातांच स्पर्श करण्यास माझी शक्ति झाली नाहीं. असें ऐकून देवयानि भाषण करिल्ये हे शर्मिष्ठे, तो महातपस्वी द्विज ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे त्यापासून तुला अपत्य झालें ह्मणून मला कांहीं कोप आला नाहीं. देवयानि व शर्मिष्ठा या उभयतांचें संभाषण झाल्यावर देवयानि किंचित् हंसली व हें खरें असें जाणून स्वगृहीं गेली. नंतर ययातीपासून देवयानीचेठायीं शक्र व विष्णुसारखे यदु व तुर्वसु असे दोन पुत्र झाले. आणि शर्मिष्ठेचेठायीं द्रुह्यु, अनु व पूरु असे तीन पुत्र झाले. कोणेएकें समयीं ययाति सहवर्तमान देवयानि वनामध्यें गेली होती. तेथें देवांसारखे रूपवान् असे कुमार क्रीडा करीत आहेत, त्यांस पाहून देवयानि विस्मित झाली. आणि राजास बोलली हे दारक, देवपुत्रांसमान हे कोणाचे आहेत. कांति व रूपेंकरून हे तुझे असें मला वाटतें. असें त्यास बोलून कुमारांस भाषण करिल्ये हे पुत्र हो, तुमचें नाव तुमचा वंश व पित्याचें नाव काय हें यथा तथ्य मला सांगा? असें देवयानीचें भाषण ऐकून त्या कुमारांनीं आपली तर्जनी राजाकडे दाखवून सांगितलें कीं, आमची माता शर्मिष्ठा होय. असें बोलून नंतर ते पुत्र एकत्र होऊन राजाच्या सन्निध आले- असतां देवयानि, जवळ होती ह्मणून राजानें त्या मुलांचा धिःकार केला. त्या काळीं ते पुत्र रुदन करीत शर्मिष्ठेजवळ गेले. त्या बालांची अवस्था पाहून राजा लज्जित झाला. नंतर देवयानीनें बालांची प्रीति राजाचेठायीं आहे असें पाहून शर्मिष्ठेस बोलली हे कामिनि, तूं मला सांगितलेंस कीं, कोणीएक ऋषि माझ्या सन्निध आला होता; परंतु तो ययातिराजाच होय. त्यासच तूं प्रोत्साहन केलेंस ह्मणूनच मी तुला पूर्वींच ह्मटलें होतें कीं, तूं कांहीं तरी पाप कर्म केलेंस तेंच खरें झालें. अगे, तूं मला किमपि भीत नाहींसकीं काय? असें तीचें भाषण ऐकून शर्मिष्ठा बोलल्ये हे चारुहासिनि, मी तुला सांगितलें कीं, कोणीएक ऋषि होता तेंच माझें सत्य आहे, त्या-

यानें व धर्मानें मी चालत असतां तुला भीणार नाहीं. ज्या काळीं तूं आपल्यास भर्ता वरलास त्याच काळीं मी आपल्यास वरला. हे शोभने, आपल्या सखीनें धर्मेंकरून जो भर्ता वरला तोच तीच्या सखीचा भर्ता होतो. तूं मजपेक्षां ज्येष्ठ आहेस व ब्राह्मणी आहेस यास्तव मला पूज्यतम आहेस आणि हा राजऋषि तुझ्यापेक्षांही पूज्यतम आहे हें तूं जाणत नाहींस कीं काय? असें तीचें भाषण ऐकून देवयानि राजास बोलली कीं हे राजा, तूं माझें अप्रिय केलेंस. आतां तुझ्या पाशीं वास करण्यास मी इच्छित नाहीं. असें ह्मणून देवयानि अश्रुपूरित नेत्र होऊन एकाएकीं परम त्वरेनें शुक्राचार्याकडे जाण्यास निघाली असतां, राजाही परम दुःखित व संभ्रांत होऊन तीचें शांतवनास पाठीमागून निघाला. ती देवयानि क्रोधानें राजाशीं कांहीं भाषण न करितां शुक्राचार्याच्या सन्निध आली. आणि पित्यास पाहून अभिवादन करून अग्रभागीं उभी राहिली तो ययातिराजाही येऊन शुक्राचार्यांची पूजा करूं लागला. त्याकाळीं देवयानि शुक्राचार्यास बोलली कीं, हे तात, अधर्मानें धर्म जिंकला. नीचाची अभिवृद्धि होऊन उत्तमाचा ऱ्हास झाला. वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा इणें माझी अमर्यादा केली. पहा बरें ययातीनें शर्मिष्ठेपासून तीन पुत्र उत्पन्न केले. आणि मी दुर्भगा मजपासून दोन पुत्र झाले. हे तुला सांगण्यास आलें आहें, अरे हा ययाति धर्मज्ञ ह्मणवितो आणि याणेंच त्याची मर्यादा अतिक्रांत केली. असें कन्येचें भाषण ऐकून शुक्राचार्य बोलतो हे ययातिराजा, तूं धर्मज्ञ असतां अधर्म करणारा झालास तस्मात् दुर्जय अशी जरा तुला धर्षण करील. असें शुक्राचार्याचें भाषण ऐकून ययाति बोलतो हे भगवन्, दानवेंद्र कन्या ऋतुकालीं माझे सन्निध संभोगाची याचना करण्यास आली ह्मणून मी भोग दिला. हा धर्मच मी केला. केवळ कामाच्या इच्छेनें हें कर्म केलें असें नाहीं, ऋतुकालीं स्त्री याचना करण्यास आली असतां स्त्रीस जो संभोग देत नाहीं त्यास भ्रूणहत्येचें पातक लागतें असें शास्त्रवेत्ते ह्मणतात. जी गमनास योग्य अशी स्त्री एकांतीं ऋतुकालीं संभोगास आली असतां तीच्या संभोगानें पुरुष धर्मापासून भ्रष्ट होत नाहीं. हे भृगुश्रेष्ठा, इत्यादिक कारणें मी पाहून

च शर्मिष्ठेसहवर्तमान गमन केलें .असें ययातीचें भाषणऐकून शक्रा-चार्यबोलतो हे नहुषपुत्रा, ज्याकाळीं मी तुला कन्या दिली त्याकाळीं तूंमाझे आधीन झालास तेव्हां हें कर्म करण्यास माझी आज्ञा पाहिजे ती तूं घेतली नाहींस ह्मणून तूं धर्माचा चोर झालास. असें शक्राचार्यानें क्रोधयुक्त भाषण करून शाप देतांच ययातिराजाचें पूर्व नूतन वय जाऊन तत्काळ जरा आली. त्याकाळीं ययातिराजा भाषण करितो हे भृगुकुलश्रेष्ठा ब्राह्मणा, देवयानीच्या संभोगाविषयीं अद्याप मी तृप्त नाहीं, यास्तव मला यौवनाची अपेक्षा आहे तेव्हां जरेनें माझेठायीं प्रवेश करूनये असें मी मागतों असें त्याचें भाषण ऐकून शक्राचार्य बोलतो हे राजा, माझें भाषण खोटें व्हावयाचें नाहीं जरा जी तुला आली ती आली. आतां ती तुला नको असल्यास दुसरा कोणी घेणारा मिळाला तर त्यास दे. असें त्याचें भाषण ऐकून राजा बोलतो हे शक्राचार्य, जो माझा पुत्र आपलें नूतन वय देऊन ही माझी जरा घेईल तो राज्याचा भोक्ता होऊन कीर्तिमान होईल. असें ययातीचें भाषण ऐकून शक्राचार्य बोलतो हे नहुषपुत्रा, ही जराजरी तूं दुसऱ्यास दिलीस तरी पापी होणार नाहींस. आणि जो नूतन वय तुला देईल तोच तुझ्या राज्याचा अधिकारी होऊन आयुष्य,कीर्ति व संततिमान असा होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

८४ अध्याय चवऱ्यांशिवा - वैशंपायन सांगतात हेजनमेजयराजा, ययातिराजा जराग्रस्त होऊन स्वनगरांत आल्यावर ज्येष्ठपुत्र यदूस तो भाषण करितो हेपुत्रा, जरेंकरून माझ्या अंगास वळ्या,केशांदिकांस शक्लता आली. हें कृत्य शक्राचार्याच्या शापापासून झालें. माझी तर यौवनाविषयीं अद्यापि तृप्ति झाली नाहीं. तस्मात् हे पुत्रा, ही जरा तूं घे. आणि तुझें यौवन मला दे, ह्मणजे मी यथेच्छ विषयाचा उपभोग करीन. एकसहस्र वर्षें झालीं ह्मणजे तुझें यौवन तुला देईन आणि ती जरा मी घेईन. असें पित्याचें भाषण ऐकून यदु बोलतो हे तात,जरेमध्यें बहुत दोष आहेत, पानभोजनाविषयीं जराग्रस्त पुरुषास शक्ति रहात नाहीं, यास्तव ती घेण्यास माझी मति होत नाहीं. याच प्रमाणें तुर्वसु, द्रुह्यु, अनु या पुत्रांनीं त्यास सांगि-

तलें. नंतर ययातीनें पूरुनामक पुत्रास भाषण केलें कीं, हे पुरु तूं माझा प्रियपुत्र आहेस. तूं सकल भ्रात्यांमध्यें वरिष्ठ होशील. हे पुत्रा, शुक्राचार्यांचे शापानें ही जरा मला प्राप्त झाली आहे ही तूं घे आणि तुझें यौवन मला दे. अद्याप यौवना विषयीं माझी तृप्ति झाली नाहीं यास्तव तुझें यौवन मी घेऊन कांहीं कालपर्यंत विषयांचें सेवन करीन. एक सहस्त्र वर्षे पूर्ण झालीं ह्मणजे तुझें यौवन तुला देऊन मी आपली जरा घेईन असें पित्याचें भाषण ऐकून पूरु भाषण करितो. हे महाराज, जें मला भाषण केलेंस तें तुझें वचन मी सत्य करितों. तुझी जरा मी घेतों. माझें यौवन तूं घे. आणि यथेच्छ कामाचें सेवन कर. तुझें वय व रूप मी घेऊन संचार करीन. असें पुत्राचें भाषण ऐकून ययाति भाषण करितो. हे पुरो, मी संतुष्ट झालों. तुझे सकल मनोरथसिद्ध होऊन तुझी प्रजा राज्याधिकारी होईल. असा मी तुला आशीर्वाद देतों. असें ययाति बोलला व शुक्राचार्यांचें स्मरण करून आपली जरा पूरूस दिली. असा विषय या अध्यायांत आहे.

८५. अध्याय पंचायशिवा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पूरूचें वय घेऊन ययाति राजा प्रीतियुक्त होऊन नाना प्रकारच्या प्रियविषयांचें सेवन करूं लागला. जें जें सुख इच्छेस येईल तें तें सुख यथाकालीं धर्मास विरोध न येतां त्यानें उत्साहानें सेवन केलें. यज्ञानें, श्राद्धानें पितरांची तृप्ति केली. जे दीन होते त्यांस जें इष्ट असेल तेंच त्यास देऊन त्यांची तृप्ति केली. ब्राह्मणांस इच्छिल्या पदार्थांनीं व अतिथींस अन्नपानादिकानीं संतुष्ट केलें. उत्तम परिपालनें करून वैश्यांचा संतोष केला. शूद्रांवर क्रौर्य न करितां त्यांचें पालन केलें. चोरांचें शासन केलें. असें सकल प्रजेचें धर्मे करून ययातीनें पालन केलें. साक्षात् इंद्रच असें सर्व लोक ययातीस ह्मणूं लागले. असा तो ययातिराजा सिंहासारखा पराक्रमी तरुण विषयाविषयीं अति उत्सुक असून सकल मनोरथ पूर्ण होऊन खिन्न झाला. कारण सहस्त्र संवत्सरांचें स्मरण करून कलाकाष्ठादिकानीं कालाचें परिगणन करूं लागला. नंतर नंदन वनामध्यें जाऊन विश्वाचीनामक अप्सरेसह वर्तमान रममाण झाला. ज्या कालीं धर्मात्मा काल राजाचे दृष्टीस पडला त्या कालीं राजानें आपला काल परिपूर्ण झाला असें

जाणून तो पूरुनामक आपले पुत्रास भाषण करी- हे पुत्रा, तुझें यौवन मी घेऊन यथेच्छ विषयोपभोग केले. जसा अग्नि घृतधारेनें अधिकच वृद्धि पावतो तसा कामउपभोगानें अधिकच वृद्धि पावतो. अरे या पृथ्वींत जितके व्रीहि, यव, हिरण्य, पशु, स्त्रिया आहेत तितक्या एक पुरुषास जरी प्राप्त झाल्या तथापि त्याची तृप्ति व्हावयाची नाहीं यास्तव तृष्णेचा परित्याग करावा. ही तृष्णा केवल प्राणांतिक रोगच आहे तर तिचा त्याग केला असतां सुखच होईल. एक सहस्र वर्षे पर्यंत मी विषयासक्त जरी झालों तथापि दिवसें दिवस तृष्णेची वृद्धीच होत आहे. तस्मात् आतां या तृष्णेचा परित्याग करून ब्रह्माचे ठायीं अंतःकरण ठेऊन निर्द्वंद्व होत्साता मृगांमध्यें आतां जातों. हे पूरु तुझें कल्याण असो. आतां हें आपलें यौवन घे. तूं माझा प्रीतिकारक पुत्र आहेस यास्तव हें राज्यही तुला देतों. असें ह्मणून नंतर ययाति राजानें पुत्रास यौवन देऊन आपली जरा घेतली आणि त्यास राज्याभिषेक केला. त्या काळीं ब्राह्मणादिक सकल वर्ण राजास भाषण करूं लागले कीं, हे प्रभो शुक्राचार्याचा नातु देवयानीचा पुत्र यदुनामक ज्येष्ठपुत्र असतां त्याचा त्याग करून पूरूस कसें राज्य देतोस! जो तुझा ज्येष्ठपुत्र यदु आहे तोच राज्याधिकारी हें तुला सांगण्या करितां आह्मीं येथें आलों. असें प्रजावाक्य ऐकून ययातिराजा भाषण करितो हे ब्राह्मण प्रमुख वर्णहो, माझें भाषण ऐका. मी ज्येष्ठ पुत्रास कां राज्य देत नाहीं याचें कारण असें आहे कीं, यदु ज्येष्ठ असतां त्याणें माझी आज्ञा परिपालन केली नाहीं. जो पुत्र आपले पित्यास प्रतिकूल झाला तो साधूस संमत नाहीं. जो पुत्र माता आणि पिता यांचें वचन परिपालन करितो व निरंतर त्यांचें हित करितो आणि सत्यभाषण करितो त्याच पुत्रास पुत्र असें ह्मणावें. यदु, तुर्वसु, व द्रुह्यु आणि अनु यानीं माझी आज्ञा मान्य केली नाहीं. माझें भाषण पूरूनें सत्कारपूर्वक मान्य केलें. तो माझा कनिष्ठ पुत्र असतां माझी जरा त्याणें धारण केली. आतां शुक्राचार्यानें मला असा वर दिला आहे कीं, जो पुत्र तुझ्या आज्ञेप्रमाणें वर्तेल तो पृथ्वीपति होईल. यास्तव तुमची मी प्रार्थना करितों कीं, पूरूसच राज्याभिषेक करावा. असें राजाचें भाषण ऐकून प्रजा भाषण करितात, हे राजा जो पुत्र गुणसंपन्न असून निरंतर मातापितरांचा हित कर्ता आहे

तो कनिष्ठ जरी असला तथापि सर्व प्रकारच्या कल्याणास योग्य होता.यास्तव पूरु पुत्र राज्यास योग्य आहे. तशांतून शुक्राचार्यानेंही वरदान दिलें आहे. ते व्हां यावर आह्मी कांहीं उत्तर करण्यास शक्य नाहीं. असें सकलपौर जनानीं भाषण करून राजास संतुष्ट केलें असतां पुढें नहुषपुत्र ययाति,पूरूस राज्याभिषेक करून सकल राज्य त्यास देऊन त्यानें वनवासदीक्षा धारण केली.आणि सकल ब्राह्मण व तपस्वी यांसहवर्तमान आपल्या पुरापासून वनांत जावयास निघाला. पुढें कांहीं दिवसानीं यदूस यादव व द्रुह्यूस भोज, तुर्वसूस यवन व अनूस म्लेंच्छ असे पुत्र झाले. व पूरूपासून पौरव वंश झाला. त्याच वंशांत तूं स्ववश होऊन सहस्रावधि वर्षे राज्य करण्याच्या इच्छेनें उत्पन्न झालास. असा विषय या अध्यायांत आहे.

८६.अध्याय शायशिवा. वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा,या प्रकारें नहुषपुत्र ययातिराजा यानें आपले ईप्सित पुत्रास राज्याभिषेक करून तो वानप्रस्थ झाला. आणि ब्राह्मणांसहवर्तमान नियतव्रती होऊन कंदमूलें भक्षण करून व कांहीं दिवस वनामध्यें राहून शेवटीं स्वर्गलोकीं गेला. तेथें बहुत काळ पर्यंत सुखानें वास करीत असतां शेवटीं इंद्रानें खालीं पाडला. तेव्हां तो स्वर्गापासून पडत असतां भूतलावर न येतां अंधांतरीं राहिला. पुढें वसुमान,अष्टक, प्रतर्दन आणि शिबि या राजां सहवर्तमान पुनः तो इंद्रसभेस गेला असें मी ऐकिलें. असें वैशंपायनाचें भाषण ऐकून जनमेजय प्रश्न करितात. हे ऋषे, कोणत्या कर्मानें पुनः ययाति स्वर्गास गेला? अरे ययाति राजा हा पृथ्वीचा पति असून इंद्रा सारखा पराक्रमी होता. हा कुरुवंशाचा वृद्धि करणारा त्याचें इहलोकचें व परलोकचें सकल चरित्र, अग्नीसारखी ज्याची कांति, विस्तीर्ण ज्याचें यश हें ऐकण्याची इच्छा करितों. असा राजाचा प्रश्न ऐकून वैशंपायन भाषण करितो हे राजा,आतां ययातीची फार उत्तम कथा या लोकीं व स्वर्गलोकीं झालेली पुण्यकारक सर्व पापनाश करणारी अशी तुला सांगतों. ययातिराजानें आपले पूरुनामक पुत्रास राज्याभिषेक करून व यदुप्रभृति पुत्रांस म्लेंच्छ देशाचे अधिपति करून आपण फलमूलांचें भक्षण करीत वनांत रहात

असतां जितक्रोध होऊन पितरांचें तर्पण करूं लागला. तसाच वानप्रस्थ विधीनें त्यानें अग्नीमध्यें हवन केलें. स्वतः आपण वनसंबंधि हविष्यान्न भोजन करून अतिथीचें पूजन करी शिलोंच्छवृत्तीचा आश्रय करून नंतर ब्राह्मणास भोजन घालून अवशिष्ट अन्नानें आपण भोजन करी या वृत्तीनें एक सहस्त्र वर्षें पूर्ण झालीं. पुढें वाणीचें व मनाचें नियमन करून उदक प्राशन करीत ३० वर्षें राहिला. नंतर एक संवत्सर निरालस्य होऊन वायूचें भक्षण केलें. पुढें एक संवत्सर पर्यंत पंचाग्नीसाधन केलें. सहा महिने पर्यंत वायु भक्षण करून एका पायावर उभा राहिला. पुढें ययातीची कीर्ति पृथ्वी व आकाश यांत व्याप्त होऊन स्वर्गी गेला. असा विषय यांत आहे.

८७. अध्याय सत्याऐंशिवा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सकल राजांमध्यें श्रेष्ठ ययातिराजा स्वर्गांत जाऊन देवगृहीं वास करीत असतां देव साध्य व मरुत याणीं त्याची पूजा केली. नंतर तेथून देवलोकीं ब्रह्मलोकीं आपल्या पुण्यानें गमन करीत बहुत दिवस होता असें मी ऐकिलें. नंतर कोणे एके दिवशीं ययातिराजा शक्राकडे गेला. आणि तेथें शक्राशीं संभाषण करीत असतां कांहीं एक कथाप्रसंगावरून इंद्र ययातिराजास प्रश्न करूं लागला कीं हे राजा, ज्या कालीं पूरु तुझी जरा घेऊन भूमीवर संचार करीत असतां तूं आपलें सकल राज्य त्यास दिलेंस त्या कालीं तूं पूरूस काय बोललास? तें सत्य सांग. असा इंद्राचा प्रश्न ऐकून ययातिराजा बोलतो. हे इंद्रा, मी पुत्रास भाषण असें केलें कीं, हे पुत्रा, गंगा आणि यमुना यामध्यें जी पृथ्वी आहे तो देश तुझा आणि या देशाचे आसमंताद्भागीं जे देश आहेत त्यांचे राजे तुझे भ्राते होत. असें सांगून नंतर या प्रकारची नीति सांगितली कीं, क्रोध्यापेक्षां अक्रोधी श्रेष्ठ, असहन करणारापेक्षां सहन करणारा श्रेष्ठ, अमनुष्यापेक्षां मनुष्य श्रेष्ठ, अविद्वानापेक्षां विद्वान श्रेष्ठ होय, यास्तव क्रोध कधींही आणूं नये; दुसऱ्याचें मर्म स्पर्श करण्या सारखें भाषण, तसेंच घातुक भाषण, अभिचारादिक प्रयोग करून शत्रूस वश करण्याची इच्छा इत्यादिक करणारा जो पुरुष त्याचें मुखावलोकन केलें असतां अलक्ष्मीदायक आहे; यास्तव

अशा पुरुषाचा संग्रह करूं नये. जो साधूंनीं पूजित पुरुष असेल त्याचीच पूजा करावी. ज्या दुष्टांच्या मुखापासून वाग्बाण सुटून दुसऱ्याचें मर्म ताडित झालें व ते रात्रंदिवस शोक करीत असतील त्या दुष्टाचा अवलंब पंडित कधींही करीत नाहींत. या कारणास्तव सांत्वयुक्त भाषण करावें. व कठोर भाषण करूं नये. पूज्य जे असतील त्यांचा सत्कार करावा, दान करावें, याच्ञा कधीं करूं नये. असा विषय या अध्यायांत आहे.

८८. अध्याय अठ्ठायशिवा.- इंद्र भाषण करितो हे नहुषपुत्रा, सर्व कर्मांची समाप्ति करून गृहत्याग करून वनामध्यें गमन केलेंस यास्तव तुला असें विचारितों कीं, तपें करून तूं कोणासारखा आहेस? असा प्रश्न ऐकून ययाति बोलतो. हे वासवा, देव, मनुष्य, गंधर्व आणि महर्षि यांजमध्यें मी आपल्या तपासारखा कोणी पहात नाहीं. असें भाषण ऐकून इंद्र बोलतो. हे राजा, तुला दुसऱ्याचें सामर्थ्य काय आहे हें ठाऊक नसतां सर्वांस अल्प मानितोस त्यापेक्षां तुझे हे सर्व लोक नाशवंत झाले ह्मणून क्षीणपुण्य असा तूं आज अधोगतीस जाशील. असें भाषण ऐकून ययाति बोलतो. हे देवराज, सुर, ऋषि, गंधर्व आणि नर यांचा मी अवमान केला ह्मणून मी या लोकांपासून हीन होईन असें तूं ह्मणतोस तर मी अशी इच्छा करितों कीं, साधूंमध्येंच माझा निरंतर वास असावा. असें भाषण ऐकून इंद्र बोलतो. हे ययातिराजा, बरें तर जरी तूं अधोगतीस गेलास तथापि तुझा वास साधूंमध्यें होऊन पुनः त्या लोकीं वास घडेल; परंतु तूं कोणाचा अवमान करूं नको. असें ययातीचें आणि इंद्राचें भाषण झाल्यावर इंद्रसेवित पुण्यकारक लोकाचा त्याग करून पतन पावणाऱ्या ययातिराजास पाहून सद्धर्मविधान गोप्ता राजर्षिवर्य अष्टक बोलतो. अरे इंद्रासारखें रूप ज्याचें व अग्नीसारखा देदीप्यमान आणि आकाशगामी जे आहेत त्यांत जसा सूर्य श्रेष्ठ तसा तूं तरुण पुरुष कोण आहेस? आह्मी सर्व तुला अभ्युत्थान देऊन तुझें पतन कोणत्या कारणानें झालें याचें वास्तविक ज्ञान होण्याची इच्छा करीत आहोंत. परंतु तुझें रूप अत्यंत स्पृहणीय दिसतें. या तात्पर्यानें आह्मींच तुला विचारितों कीं, कोणत्या निमित्तानें तूं येथें आलास? तुझा प्रभाव इंद्रासारखा आहे यास्त

व भयविषाद आणि मोह यांचा लौकर त्याग कर. आतां तूं साधूंच्या संन्निध आलास त्या पेक्षां इंद्रही तुला सहन करण्यास समर्थ नाहीं. हे अमरराजस दृशा सुखापासून जे च्युत झाले त्या पुरुषास साधूच आश्रय आहेत. त्यांत तूं आलास. आतां तुला कांहीं भय नाहीं. ताप करणाऱ्यां मध्यें अग्नी जसा श्रेष्ठ तसा साधूं मध्यें अभ्यागत श्रेष्ठ होय. असा विषय या अध्यायांत आहे.

८९. अध्याय एकुणनव्वदावा.- ययाति बोलतो मी नहुषाचा पुत्र, मला ययाति ह्मणतात, पूरूचा मी पिता, सर्व भूतांचा मी अवमान केला म्हणून सुरसिद्ध ऋषि याचे लोकापासून भ्रष्ट झालों. तुह्मांपेक्षां मी वयानें श्रेष्ठ असून तुमचा पूर्वज आहें यास्तव तुह्मांस मी अभिवादन करीतनाहीं. असें भाषण ऐकून अष्टक बोलतो. हे राजा तूं सांगितलेंस कीं, मी वयानें वृद्ध आहें त्या पेक्षां तूं आह्मांस अधिकच पूज्य आहेस. अरे जो विद्येनें आणि तपानें वृद्ध तोच द्विजांस पूज्य आहे. असें अष्टकाचें भाषण ऐकून ययाति बोलतो. अरे, पुंण्यास प्रतिकूल पाप आहे तें पाप गर्वापासून होतें आणि तो गर्व तरी असम्य पुरुषास होतो. यास्तव हें पाप असत्पुरुषास नरकप्रद आहे. असें जाणून संत त्याचा अंगिकार करीत नाहींत. दंभादि रहित होऊन मी बहुत पुण्यरूप धन मिळविलें परंतु तें अभिमानानें नाहिसें झालें तें पुनः संपादन करण्यास यत्न करितों. परंतु तें आतां प्राप्त होत नाहीं. अस्तु जो आपली गति जाणण्या विषयीं यत्नवान होतो तोच धीरवान असें ह्मणावें. महान धन मिळालें असतां कधींही हर्षित होऊं नये. हे अष्टका, यास्तवच मी कधींही मोह पावत नाहीं. या लोकीं देव जसा मला ठेवील तसा मी वर्तेन. बरें काय केलें असतां संताप पावणार नाहीं. असा मी विचार करीत असतां अप्रमत्त होऊन संतापाचा त्याग करीन. असें ययातिराजा बोलत असतां अष्टक गुणानीं युक्त असून स्वर्गलोका पासून भ्रष्ट होऊन अंतरिक्ष स्थित सर्वगुणसंपन्न आपल्या त्या मातामहास बोलतो. हे राजा, किती काळपर्यंत कोण कोणाच्या लोकाचा तूं उपभोग केलास तें सर्व सांग. कारण, तूं मोठ्या ज्ञान्या सारखा धर्मानें बोलतोस असा अष्टकाचा प्रश्न ऐकून ययाति बोलतो. मी पूर्वीं सार्वभौम राजा होतों. नंतर एक सहस्र वर्षें पर्यंत

या लोकीं वास करून पुढें इंद्राची पुरी मोठी रम्य आहे तेथें सहस्र वर्षे वास केला. आणि मोठ्या कष्टानें प्राप्त होण्यास अशक्य असा प्रजापतीचा लोक आहे तेथें सहस्र वर्षे पर्यंत राहिलों. त्या ब्रह्मलोकीं देवा सारखी कांति मला प्राप्त होऊन माझी स्तुति देव करीत असत. नंतर मी दहा हजार वर्षें पर्यंत अप्सरांसहवर्तमान क्रीडा करीत व उत्तम पदार्थांचें सेवन करीत नंदनवनांत वास केला. मी नंदनवनीं देवसुखाचा उपभोग करीत असतां माझा बहुत काळ गेल्यावर कोणी एक उग्ररूप देवदूत येऊन उच्चस्वरानें तीन वेळ असें बोलला कीं अरे यास खालीं टाका. हे राजसिंहा इतकें मला विदित आहे. मग मी नंदन वनापासून भ्रष्ट झालों तो अंतरिक्षांत मोठ्या आक्रोशानें झालेली देवाची वाणी अशी ऐकिली कीं, कायहो, ययाति राजा पुण्यवान व पुण्यकीर्ति असतां या काळीं क्षीणपुण्य होऊन खालीं पडतो आहे तेव्हां ती वाणी ऐकून देवास असें बोललों कीं, माझा साधूंमध्यें वास होईल असें करा. हें माझें भाषण ऐकून त्याणीं सांगितलें कीं, ही तुमची यज्ञभूमि आहे ही पहा. ती मी पाहून व हविर्द्रव्य संबंधि धुमाचा समुदायही पाहिला. नंतर हर्षित झालेला मी येथें आलों आहें. असा विषय या अध्यायांत आहे.

९०. अध्याय नव्वदावा.– अष्टक भाषण करितो. हे राजा, कृतयुग संबंधीं धर्माचरण करणाऱ्यांमध्यें तूं महाश्रेष्ठ असून अयुत संवत्सर पर्यंत नंदनवनीं वास केलास. नंतर त्याचा त्याग करून पुनः पृथ्वीवर आलास याचें कारण काय असें भाषण ऐकून ययाति बोलतो. अरे अष्टका, जसे ज्ञाति, मित्र, स्वजन असतांही वित्तक्षीण झालें ह्मणजे मानव त्याचा त्याग करितात तसे स्वर्गामध्यें मनुष्याचें पुण्य क्षीण झालें ह्मणजे इंद्रप्रभृति देव त्याचा त्याग करितात. असें त्याचें भाषण ऐकून अष्टक बोलतो. हे राजा, स्वर्गास प्राणी गेल्यावर ते क्षीणपुण्य कसे होतात, या विषयीं माझें मन अत्यंत मोहयुक्त झालें आहे. आणि ब्रह्म देवाच्या लोकीं गमन झालें असतां पुनः त्या देहास अधःपात होत नाहीं, असें असतां तुझा ब्रह्मलोकांपासून अधःपात कसा झाला? कारण तूं क्षेत्रस्वरूप जाणणारा आहेस असें मी मानितों. असे अष्टकाचे दोन प्रश्न ऐकून ययाति उत्तर देतो. हे नरदेवा, काय कर्मानें अध्यात्मादि तापत्रय प्रा

स झाल्यामुळें भूमीवरील प्रपंचरूप नरकांत पडून अनेक प्रकारच्या वासनेनें, पुत्र पौत्रादि रूपानें अतिशय वृद्धि पावतात आणि कोल्हे, कुत्रे इत्यादिकानीं भक्षण करण्यास योग्य अशा शरीरा करितां क्षीण होतात. ह्मणून दुष्ट व निंद्य असें हें काम्यकर्म याचा त्याग करावा. हें कर्म दुष्टलोकप्रद होय. असें मी तुलास र्व सांगितलें. आतां जें विचारावयाचें असेल तें विचार, ह्मणजे त्याचें उत्तर देतों. असें ययातीचें भाषण ऐकून अष्टक भाषण करतो. हे राजा, नरकास प्राणी प्राप्त झाला असतां गृध्रशितिकंठ पक्षी पतंग इत्यादि त्या देहाचें भक्षण करितात असें असतां पुनः त्यास देह कसा प्राप्त होतो. व भौम नरक आहे; ह्मणोन ह्मणतोस तेव्हां यास भौम हा नरक कसा ह्मणतात. असा अष्टकाचा प्रश्न ऐकून ययाति बोलतो. हे राजा, देहाचा नाश झाला तथापि आत्म्याचा नाश होत नाहीं. ह्मणून ते जीव कर्मप्राप्त देहानें व्यक्त होऊन पृथ्वीवर संचार करितात, त्यासच भौम नरक ह्मणतात कारण येथें पतन पावलेले जीव अनेक वर्षें जरी गेलीं तथापि ते आपला विचार न करितां व्यर्थ वय घालवितात. साठ हजार अथवा ऐंशीं हजार वर्षें पर्यंत जरी स्वर्गांत वास केला तथापि शेवटीं या भूमीवर त्या देहाचा पात अवश्य होतोच. पुनः भूमीवर येऊन संसारामध्यें आला ह्मणजे दारापुत्रादि ह्मणूं लागतात, आमचें रक्षण करा आह्मांस हें द्या अशा नानाप्रकारच्या भाषणानीं त्या पुरुषास मोह घालतात. तेव्हां दारापुत्रादि हेच कोणी राक्षस होत. असें ययातीचें भाषण ऐकून अष्टक भाषण करितो. हे राजा, स्वर्गीं राहणाऱ्या देहाचें पुण्यक्षीण झाल्यावर पापामुळें ते या पृथ्वीवर पतन पावतात. नंतर पुत्रदारादिक भौम राक्षसरूपानें त्या प्राण्यास व्यथा करितात, ह्मणून तूं सांगितलेंस खरें; परंतु ते प्राणी ज्या काळीं स्वर्गांतून खालीं भ्रष्ट होतात त्या काळीं ते विशीर्ण कांहीं होत नाहींत. त्याचीं इंद्रियें कशीं राहतात? ते पुनः गर्भत्वास कसे पावतात तें सांग? असें अष्टकाचें भाषण ऐकून ययाति बोलतो. हे राजा, स्वर्गापासून प्राणी भ्रष्ट झाला ह्मणजे दुःखानें त्याचें जलमय शरीर होतें. नंतर तेंच जलरूप होऊन त्याचें रक्त रेत होतें. नंतर तेंच रेत पुरुषाच्या संबंधानें स्त्रीच्या गर्भाशयांत जातें. त्या पासून गर्भ होतो. तेव्हां पुरुषाचें रेत उत्पत्ती विषयीं कारण

आहे जेव्हां मेघ वृष्टी करितात तेव्हां तें गर्भबीज असतें आणि रेतजल, वायु पृथ्वी आणि अंतरिक्ष यांत जाऊन तद्वारा वनस्पती व औषधी यांत शिरतें. नंतर त्याच्या भक्षण संबंधानें उदरांत जाऊन द्विपद चतुष्पदाच्या उदरांत गेलें ह्मणजे गर्भाचा संभव होतो असें ययातीनें भाषण ऐकून अष्टक बोलतो हे राजा, नरयोनींत उत्पन्न झालेला जो जीव तो आपले पूर्वीचे शरीरानें मातेच्या उदरांत प्रविष्ट होतो अथवा दुसरेंच शरीर धारण करितो कीं काय या संशयाचें उत्तर सांगवें. याजीवास पूर्वी दुसरे कांहीं जन्म नवते अशी कल्पना करावी तर शरीर आणि चेतना इत्यादिक प्राप्त होणार नाहींत बरें अन्य जन्म आहे ह्मणावें तर या देहाची उत्पत्ती स्वाभाविकच असल्यामुळें उपाधी संततीचा अविच्छेदानें जीवास नित्य संसारित्व घडेल यास्तव तूं क्षेत्रज्ञ आहेस ह्मणोन तुला हा प्रश्न करितों असा त्याचा प्रश्न ऐकून ययाती बोलतो हे अष्टका स्त्रीनें ऋतुकाळीं पुरुषाशीं संभोग केला असतां स्त्रीच्या योनीमध्यें रेत पडतें त्या काळीं स्त्रीच्या गर्भाशया मध्यें वायूचा प्रवेश होऊन रेत योनीमध्यें स्थिर होतें तें एकरात्र राहिलें ह्मणजे कलिल, पांच रात्री जाहाल्यावर बुदबुद, सात रात्री जाहाल्यावर पेशी, चौदा रात्री गेल्यावर अर्बुद, पंचवीस रात्री गेल्यावर तो आपले स्थानस्थित होतो व एक महिन्यानें कठीण, दोन महिन्यानंतर त्या गर्भास शीर, तीन मास जाहाले ह्मणजे ग्रीवा, च्यार मास जाहाल्यावर त्वचा, पांचवे महिन्यांत नखरोमादिक, साहावे महिन्यांत मुख नासिका, नेत्र, कर्ण हीं उत्पन्न होतात, सातवे महिन्यांत चलन वलन शक्ती, अष्टम महिन्यांत त्या गर्भास बुद्धीचा प्रादुर्भाव होतो, नऊ महिन्यानीं सर्वांगानें पूर्ण होतो. अशा अनुक्रमानें स्त्रीचे उदरांत गर्भाची वृद्धि वायूच्या योगें होते यास्तव या देहास उत्पन्न करणारा वायूच होय या प्रकारें तो गर्भ सर्वांग संपन्न होऊन योनी पासून बाहेर निघाल्यावर त्यास जन्मांतरीय वासनेच्या योगें मी मनुष्य आहें असा अभिमान होतो आणि कर्णादिकानीं शब्दादिक विषय जाणतो असें जाण. असें ययातीचें भाषण ऐकून अष्टक भाषण करितो स्थूलदेही पुरुष दग्ध जाहाला, भूमी मध्यें पुरला अथवा शुष्क होऊन गेला असतां त्याचा अत्यंताभाव जाहाल्यावर तो पुनः कसा उत्पन्न होतो? असा प्रश्न

ऐकून ययाती बोलतो हे अष्टका पुरुषास निद्रेमध्यें स्वप्न पडून त्यास असें वाटतें कीं, मला दुसरें एक देहांतर जाहालें आहे तसा स्थूल देह हाही जरी नष्ट जाहाला तथापि सूक्ष्म देह नष्ट न होऊन सुकृत दुष्कृताच्या योगें त्याच देहानें दुसरी योनी प्राप्त होते. बरें जन्मांतरीं पुण्य केलें असेलतर ब्राह्मणादिक पुण्य योनी, पाप केलें असल्यास कीट, पतंगादि तिर्यग्योनी प्राप्त होतात यास्तव काम्य कर्मांच्या योगानें योनी संचार करण्या विषयीं माझी इच्छा नाहीं तर भूमीवर येऊन मोक्षेच्छ हेतु, निष्कर्म साधन करावें असें मी इच्छितों. द्विपद, चतुष्पद, षट्पद इत्यादि योनीचा प्रादुर्भाव कशानें होतो याविषयींचें तत्व मी तुला सांगितलें आतां दुसरें काय ऐकण्याची इच्छा आहे तें सांग असें ययातीचें भाषणश्रवण करून अष्टक बोलतो, हे तात, या मनुष्यास जन्म मरण रूप आवृत्ति शून्य असे लोक कर्मानें अथवा उपासनेनें प्राप्त होतात कीं काय हें मलासांग. कोणत्याक्रमानें मनुष्याचें, शुभ लोकास गमन होतें असा प्रश्न ऐकून ययाती बोलतो तप, दान, शम, दम, लज्जा, आर्जव आणि दया हीं सात कर्मे पुरुषास केवळ स्वर्गाचीं द्वारें आहेत ह्मणोन साधू बोलतात, मीच कर्ता असा पुरुषास अभिमान जाहाला असतां त्यानें तो नष्ट होतो असें साधूनीं सांगितलें आहे. अभिमानी पुरुषास शमदमादिक कांहीं उपयोग करीत नाहींत, सकल अध्ययन करून मी पंडित आहें असा अभिमान धारण करून जो पुरुष दुसऱ्याची अप्रतिष्ठा करतो त्या पुरुषास अध्ययनाचें फल न प्राप्त होतां नाश पावतो. अग्निहोत्र, मौंजीधारण, वेदाध्ययन आणि यज्ञादिक हीं च्यार कर्में पुरुषास अभय प्रद आहेत परंतु प्रतिष्ठे करितां या चार कर्मांचा अवलंब केला असतां हींच च्यार कर्में भयास कारण होतात आपला मान केला असतां ज्यास हर्ष होतनाहीं आणि अवमान केला असतां ही संताप होत नाहीं, अशा पुरुषानें पूजन यालोकीं संत करितात यास्तव मानापमान वर्जित असावें. दान, यज्ञ इत्यादिक दांभिक बुद्धीनें केलीं असतां भय प्रदच होतात यास्तव त्या कर्मांचा त्याग करावा. अरे अष्टका हा काल पर्यंत तपाचें फळ सांगितलें आतां विद्या ह्मणजे ज्ञानाचें फळ सांगतों ऐक. मनोनिग्रह करणाऱ्या पुरुषास आश्रय असून का-

र्य कारण सारखे विकार न पावणारे आणि केवळ मनानेंच जाणण्यास यो
ग्य अशा वस्तूतें जे विद्वान् आहेत ते जाणतात तेच वस्तु तुह्यातें ब्रह्माशीं
ऐक्य पावून याच देहीं देहाभिमानाचा परित्याग करून उत्तम मोक्षास जा
तात. असा विषय या अध्यायांत आहे.

९१ अध्याय एक्याणवावा:— अष्टक भाषण करितो हे ययाती रा-
जा गृहस्थानीं कोणच्या धर्मानें आचरण करावें, संन्याशाचे धर्म कोणते, ब्रह्म
चाऱ्यानें कोणच्या धर्मानें राहावें, वानप्रस्थाचा धर्म कोणता, विद्वान्जे आहे
त ते धर्माचीं द्वारें बहुत कथन करितात यास्तव प्रश्न केला आहे तर त्याचें उ
त्तर सांगावें असा प्रश्न ऐकून ययाती बोलतो हे अष्टका, प्रथम ब्रह्मचाऱ्या
चा धर्म कोणता तो सांगतों. ब्रह्मचाऱ्यानें गुरूच्या गृहीं राहून त्यानें बोलवि-
ल्यानंतर त्याजवळ वेदाध्ययन करावें त्यानें नसांगतां त्याचें कार्य करावें.
गुरूच्या पूर्वी प्रातः कालीं उठावें, गुरूनें शयन केल्यानंतर आपण शयन क
रावें. मृदु, दांत, धृती व सावधपणा यानीं वेदाध्ययनीं तत्पर असावें हा ब्रह्म
चाऱ्याचा धर्म होय. आतां गृहस्थ धर्म सांगतों, धर्मानें द्रव्य संपादन करू
न यजन व दान करावें अतिथीस भोजन द्यावें जे आपणास अप्राप्त आहे
त्याचें दान करण्याची ईच्छा करूंनये हा गृहस्थाश्रम्याचा धर्म होय. स्वसा
मर्थ्यानें जीवन करावें, पापापासून निवृत्त असावें, दान करावें परास जेणें
करून ताप होईल असें करूंनये, नियत आहार, विहार असावें, अरण्यवास
करावा याप्रकारें वानप्रस्थानें धर्म आचरिले असतां त्यास मुख्य सिद्धि तत्का
ल होत्ये. आतां यतीधर्म सांगतों, शिल्पविद्येनें उपजीवन करूंनये, नित्य गु
णवान्, जितेंद्रिय, सर्व पदार्थांपासून विमुख असावें, शून्यागार, देवाल
यें, कुंभारशाळा, गृहस्थाश्रम्याचे स्थानावांचून अन्यस्थानीं शयन करा
वें, परिग्रहशून्य असावें, एकाकी देश संचार करावा, हे भिक्षूचे धर्म होत
ज्या काळीं आपल्यास संसारापासून उपरती होईल तो त्याच काळीं सं-
सार परित्याग करून विद्वान् मनाचें नियमन करणारा अरण्यामध्यें वा-
स करितो, रात्र हा सुखाचा काल आहे तथापि रात्रीस जरी वैराग्य आलें
तरीं गृहपरित्याग करून अरण्यवासी व्हावें; असा तीव्र वैराग्यशील ब्र-

ह्य निष्ठ आपल्या स्वशरीर संबंधीं धातूचा त्याग करून तत्काळ अरण्यवा
सी जाहाला असतां तो आपलीं पूर्वींचीं दाहा व उत्तरचीं दाहा व आपण-
अशा एकवीस कुळांचा उद्धार करतो असें ययातीचें भाषण ऐकून अष्ट
क बोलतो हे ययाती तूं चार आश्रमाचे धर्म सांगितलेस त्यांत संन्यासाश्र
म हा मोक्षा विषयीं अती निकट आहे असें तुझ्या भाषणांत स्पष्ट दिसतें
तेव्हां मोक्षास योग्य कोण व मोक्षाचे मार्ग किती आहेत हें ऐकण्यास मी इ
च्छितों तर सांग असा प्रश्न ऐकून ययाती उत्तर देतो हे अष्टका जो अंतरनि
ष्ट योगी आहे तो अरंण्यांत जरी राहिला तरीं योगसामर्थ्यास्तव ग्राम संबं
धी वस्तु त्याच्या समीपच असतात अथवा ग्रामांत त्याणें जरी वास केला तथा
पि अरण्यांत केल्या प्रमाणेंच आहे, कारण अंतरनिष्ठयोग्याची दृष्टी एकसा
रखी सर्वत्र न्यूनाधिक्य रहित असल्ये असा योगी मोक्षास योग्य होय अ-
सें ययातीचें भाषण ऐकून अष्टक प्रश्न करितो हे राजा, आतां जें मला सांगि
तलेंस हें कसें घडतें असा प्रश्न ऐकून ययाती बोलतो अरे अष्टका यांत का
य कठीण आहे ज्यानें तीव्र वैराग्य होऊन योगाचा अभ्यास केला तो मुनि
ग्राम्य संबंधीं सुखाचा त्यागकरून अरण्या मध्यें राहिला तर ग्राम्य संबंधी
सुखाचीच कल्पना तेथें करून आनंदा मध्यें राहातो तेव्हां अशा योग्या
स ग्राम्य सुख पृष्ठभागीं अर्थात जाहालें. आतां जो विवेकी, संन्याशी, ज्यास
अग्नी क्रिया, गृह गोत्र इत्यादिक कांहींच नसून कौपिनाच्छादन होईतों पर्यं
त वस्त्र धारण करावें आणि प्राण रक्षणच केवळ होण्या पुरतें भोजन करा
वें असा जो यती असेल तो ग्रामांत जरी राहिला तथापि अरण्यांत वास के
ल्या प्रमाणेंच आहे ज्या योग्यानें आपले मनोरथाचा त्याग करून जितेंद्रिय
होत्साता मौन धारण करून स्तब्ध बसला आहे तो मुनी मोक्षसिद्धीस योग्य
होतो तेव्हां अशा आत्मज्ञ पुरुषाचें अर्चन कोण साधु करणार नाहींत, तपें
करून जो कृश जाहाला, तपानेंच ज्याची अस्थी, मांस, शोणित क्षीण होऊ
न गेलीं असा पुरुष या लोकास तुच्छ मानून स्वर्गीं जातो तो योगी अति
उत्तम जाणावा असा विषय या अध्यायांत आहे.

९२ अध्याय त्याणवावा:- अष्टक प्रश्न करितो हे राजा योगी आणि

ज्ञानी सूर्य चंद्रा सारखे उभयतां ब्रह्म प्राप्ती विषयीं यत्न करीत असतां पूर्वी ब्रह्म प्राप्ती कोणास होत्ये असा अष्टकाचा प्रश्न ऐकून ययाती उत्तर देतो हे अष्टका, ज्ञान्यास श्रुति आणि युक्ती या उभयें करून जगत मिथ्या आहे असा निश्चय असल्या मुळें एक क्षणांत निर्विकल्प साक्षात्कार होऊन अद्वैतब्रह्मच आहे असा निश्चय होतो ह्मणोन ज्ञानी, पूर्वी ब्रह्म प्राप्तीस योग्य आहे योग्यास तर निर्विकल्प समाधीच्या अभ्यासानें ज्या काळीं द्वैताचें स्मरण होईल त्या काळीं ब्रह्म प्राप्तीची योग्यता येईल यास्तव योगी ज्ञान्या पेक्षां कनिष्ठ आहे ह्मणोन तो नंतर मुक्त होतो. असें ययातीचें भाषण ऐकून अष्टक व प्रतर्दन हे बोलतात, तरुण, रूपवान्, उत्तम कांती युक्त, माळा धारण केलेला असा दूत तुला येथें कोणी पाठविला आहे कीं काय अथवा कांही एक राज्य स्थानांची योजना करून तूं येथें आला आहेस तें सांग. असा प्रश्न ऐकून ययाती राजा उत्तर देतो अरे बाबा जे स्वर्गी वास करितात त्यांचें पुण्य क्षीण झालें ह्मणजे ते गगना पासून भ्रष्ट होऊन या पृथ्वीवर भौमनामक नरकांत येतात. हें तुह्मांस सांगण्या करितां मी येथें आलों आहें, आतां निरोप सांगून मी पुनः स्वर्गी जाईन. मी पूर्वी ब्रह्म लोकीं वास करीत होतों तो क्षीण पुण्य झाल्यामुळें अधोलोकीं जेव्हां येऊं लागलों तेव्हां इंद्रानें मला वरदान दिलें कीं, तुला भूतलावर साधूचा समागम घडेल. तो आज मीं तुमच्या साधूंच्या संन्निध आलों आहें, तुह्मीं मोठे गुणवान आहां असें मी समजतों स्वर्गाहून माझें पतन अधोभागीं झालें खरें परंतु तुमचा सहवास घडला तेणें करून मला कांहीं दुःख नाहीं असें ययातीचें भाषण ऐकून अष्टक व प्रतर्दन हे उभयतां बोलतात हे पार्थिव तुझें पतन अधोभागीं होत आहे तें न व्हावें अशी आमची इच्छा आहे अंतरिक्षांत अथवा स्वर्गांत जे आमचे लोक असतील त्या लोकीं तूं जावेंस यास्तव आमचे लोक कांहीं तिकडे आहेत किंवा नाहींत तें सांग; कारण तूं मोठा धर्मज्ञ व क्षेत्रज्ञ आहेस असें आह्मीं तुला मानितों असें त्याचें भाषण ऐकून ययाती बोलतो हे नरेंद्र सिंव्हा यावत्पृथ्वीवर १ अरण्यांत अथवा पर्वतावर गजाश्वादिक वास करितात तितक्यांचे लोक स्वर्गांत आहेत त्यांचे त्यांचे अधिकारा प्रमाणें त्यास ते प्राप्त होतात असें समजा. असें य-

यातीचें भाषण श्रवणकरून ते बोलतात हे राजा स्वर्गांत अथवा अंतरिक्षांत सर्वांचे लोक त्यांच्या अधिकाराप्रमाणें जर आहेत तर आमचा अधिकार ज्या लोकास जाण्याचा आहे त्या लोकीं तूं जावेंस खालीं तुझें पतन होऊंनये जा आमचा लोक आह्मीं तुला दिला असें त्याचें भाषण ऐकून ययाती बोलतो हे नरेंद्रराज, मुख्य ब्राह्मण जसे प्रतिग्रह करितात तसे आमचे सारखे क्षत्रिय जे आहेत ते करीत नाहींत अरे जाकाळीं मी पृथ्वीवर राज्य करीत होतों-त्या काळीं जितका देय पदार्थ या पृथ्वीवर होता तितका दान मी ब्राह्मणास केला तो आज मी ब्राह्मणासारखा कृपणा पणानें जीवन करीन कीं काय, याच्या ही ब्राह्मणाची वीरपत्नी आहे ती मी आज ग्रहण करीन कीं काय, असें ययातीचें भाषण ऐकून वसुमान राजा बोलूं लागला. असा विषय या अ० आहे.

९३ अध्याय ध्यांणवावा:- वसुमान् नामक राजा भाषण करतो हे नरेंद्र ययाती राजा उषदश्वाचा पुत्र वसुमान नामक मी तुला असा प्रश्न करितों कीं गमन करण्यास योग्य असे कांहीं स्वर्गांत माझे लोक आहेत किंवा नाहींत असें त्याचें भाषण ऐकून ययाती राजा बोलतो हे राजा अंतरिक्ष, पृथ्वी, दिशा इत्यादिकांचे ठायीं जेथें सूर्याचा प्रकाश आहे तेथें तुह्मीं गमन करण्यास असे-लोक बहुत आहेत असें वाक्य ऐकून वसुमान् बोलतो हे राजसिंव्हा असे नरलोक आह्मीं गमनकरण्यास योग्य बहूत आहेत तरते समग्र लोक मी तुला दिले त्या लोकीं तूं गमन कर परंतु खालीं पडूं नको जर प्रतिग्रह करणें हें कर्म तुला दुष्ट आहे असें वाटतें तर तूं मला कांहीं तृण दे ह्मणजे मी आपले लोक तुला विकत देतों मग तर त्या लोकीं तुला जाण्यास चिंता नाहीं. असें वसुमानानें भाषण श्रवण करून ययाती भाषण करितो हे राजा असा मिथ्याविक्रय मी कधीं करणार नाहीं कारण अहो रात्री उभयतां संध्याकाळच्या देवता मनुष्याचे पाप पुण्य निरंतर जाणतात यास्तव त्या देवतांस मी फार भीतों असें ययातीचें भाषण ऐकून वसुमान बोलतो हे ययाति राजा जर कपटक्रय करणें तुला इष्ट नाहीं तर जसो परंतु माझे जे लोक आहेत त्या लोकीं मी जात नाहीं तुलाच अर्पण करितों यास्तव या लोका प्रत तूं निःसंशय गमन कर असें वसुमानानें भाषण केल्यावर शिबी राजा बोलतो हे ययाति, मी उशीनर राजाचा पु-

त्र मला शिबी असें ह्मणतात मला वास करण्यास असे लोक अंतरिक्ष अथ-
वा स्वर्गांत कांहीं आहेत किंवा नाहींत तें सांग असा प्रश्न ऐकून ययाती भाष-
ण करितो हे राजा, वाणी अथवा हृदयें करून तूं साधूचा अवमान कधींही के-
ला नाहींस या पुण्याच्या योगें तूं गमन करण्यास योग्य असे लोक स्वर्गामध्यें वि
द्युल्लते सारखे देदीप्यमान, मोठे बृहत असे बहुत आहेत या लोकीं तूं जाण्यास
योग्य आहेस असें त्याचें वाक्य श्रवण करून शिबी राजा भाषण करितो हे य-
यातीराजा जरी क्रय तुला इष्ट नाहीं तर नसो जे माझे लोक आहेत त्यामध्यें-
मी जात नाहीं ते समग्र तुला दिले या लोकीं गेलें असतां शोकपावन नाहींत
असे हे लोक आहेत असें शिबीचें भाषण ऐकून ययाती बोलतो हे राजा,
तुझा प्रभाव इंद्रासारखा आहे तुझे लोकही अनंत आहेत खरे परंतु ते लोक
तूं मला देऊन त्या लोकीं मी वास करावा अशी माझी इच्छा नाहीं वास्तव हे
शिबिराजा तुझ्या लोकांत राहून मला कांहीं हर्ष व्हावयाचा नाहीं असें यया-
तीचें भाषण श्रवण करून अष्टक राजा पुनः भाषण करितो हे ययाती रा-
जा आह्मीं आपले लोक प्रत्येक येकयेकानीं तुला दिले ते तुला ग्रहण करण्या
ची इच्छा नसेल तर आह्मीं सर्व मिळून आपले लोक तुला अर्पण करून आ-
ह्मीं या भूलोकीं राहतों असें ऐकून ययाती बोलतो तुह्मीं श्रेष्ठ साधूस त्या
चे अभिनंदन करणारे आहां वास्तव जें मला योग्य असेल त्याविषयीं तुह्मीं
यत्न करा जें कांहीं पूर्वी मी कृत्य केलें आहे तें मी कांहीं जाणत नाहीं असें
ययातीचें भाषण ऐकून अष्टक बोलतो हे ययातीराजा ज्या रथामध्यें आरो
हण करून शाश्वत लोकास पुण्यवान जातात ते हिरण्मय पांच रथ तेथें दि
सतात हे कोणाचे आहेत तें सांग असें अष्टकाचें भाषण ऐकून ययाती ह्म
णतो हे सुवर्णाचे पांच रथ अग्नी शिखे सारखे जाज्वल्यमान अत्यंत प्रका-
शित जाहालेले उच्चभागीं दिसतात हे तुह्मांस नेण्याकरितां आले आहेत-
असें ऐकून अष्टक बोलतो बरें तर ययाती राजा तूं या रथांत बसून स्वर्गा-
त गमन कर आमचा गमन काल जाकाळीं येईल त्या काळीं आह्मींही तुझ्या
मागून येऊं असें त्याचें भाषण ऐकून ययाती भाषण करितो हा देवमार्ग अ
गदीं स्पष्ट जाहाला आहे तो पहा आतां आपण सर्व मिळूनच स्वर्गास जा-

उ. वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा असें ययातीनें भाषण केल्याव र ते सर्व राजे रथारूढ होऊन स्वर्गी गेले त्या काळीं अष्टक, ययातीस भाषण करतो कीं, हे राजा, मी आज पर्यंत असें समजत होतों कीं, मीच पूर्वी स्वर्गास एकाकीं जाण्यास योग्य आहें आणि इंद्राचा सरवाही मीच आहें असें अस तां ह्या उशीनर राजाचा पुत्र शिबि आमच्या पेक्षां ही पूर्वीच रथारूढ होऊन ए कटाच गेला असें त्यानें पुण्य कायश्रेष्ठ आहे असें त्यानें भाषण ऐकून यया- ति बोलतो हे अष्टका, हा उशीनर राजाचा पुत्र यास शिबि असें ह्मणतात, याणें आपलें जें कांहीं वित्त होतें तें ब्रह्म लोक मार्ग मिळावा ह्मणोन दान के लें यास्तव तुह्मा मध्यें हा राजा मोठा श्रेष्ठ आहे असें समजा ह्मणून तो ब्र ह्म लोकास गेला आणि तुह्मीं सर्वांनीं पितृमार्गानीं गमन केलेंत असें य- यातीचें वाक्य ऐकून अष्टकराजा ययातीस बोलतो हे नृप, तुला आ- तां मीं विचारतों तूं कोण तूं कोठून आलास कोणाचा पुत्र तूं जें कृत्य केलेंस- तें कृत्य आह्मीं कधींही, केलें नाहीं बरें तुह्मासारखा असा पुण्यवान राजा आ ज पर्यंत दुसरा कोणी जाहाला होता किंवा नाहीं बरें ब्राह्मणांत तरी तुह्मा सा रिखा पुण्यवान आज पर्यंत कोणी जाहाला असेल हें परम कौतुकानें मी तु ला विचारतों असा प्रश्न ऐकून ययाती उत्तर देतो हे राजा नहुषराजाचा मी पुत्र पुरुनामक राजाचा पिता असा जो मी ययाति तो पृथ्वीचा सार्वभौम रा जा होतों आतां मी तुमचा मातामह आहें तुह्मी माझे स्वकीय आहां त्यापे क्षां माझें जें काय गुह्य आहे तें तुह्मांस सांगतों. मी पूर्वीही सर्व पृथ्वी जिंकून ब्राह्मणास जीविके करितां दान दिली तसेच पवित्र स्वरूप असे असंख्याक अश्वमेध करून देवतांस तृप्त केलें यास्तव देव माझें भजन करितात पुण्या वांचून देव कोणाचें भजन करीत नाहींत. गाई, सुवर्ण, धन, वाहनें, यां सह वर्तमान सकल परिपूर्ण पृथ्वी व शत अर्बुद गोप्रदानें ब्राह्मणास दिली: आकाश, पृथ्वी, अग्नी हे साक्षीक आहेत त्यांचे समक्ष मी कधींही वृथा भा षण केलें नाहीं. हे अष्टक हे प्रतर्दन ही तुह्मांस मी सत्य सांगतों कीं समग्र लो क, मुनी, देव हे सत्याचे पूजक आहेत हें माझें मनोगत तुह्मांस मी निवेदन केलें मी आज पर्यंत असत्यानें कधीं ही वर्तलों नाहीं हें आमचे स्वर्ग जिता

चें आख्यान जो कोणी पुरुष असूया रहित होऊन श्रेष्ठ ब्राह्मणा कारणें यथा-स्थित निवेदन करील त्या पुरुषास आमचें सलोकता स्थान निःसंशय मिळेल या प्रकारच्या त्या परम उदार कर्मी ययाति राजानें पृथ्वीचा त्याग करून स्वक र्माच्या योगें पुनः स्वर्गी गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

९४ अध्याय चवऱ्याणवावा- जनमेजय राजा प्रश्न करितो हे भग-वन् वैशंपायन ऋषे पुरूच्या वंशांत जे नृप उत्पन्न जाहले ते किती वीर्यवान व पराक्रमी कसे होते हें ऐकण्याची मला इच्छा जाहली आहे तर विस्तारें करून सांगा असा प्रश्न ऐकून वैशंपायन बोलतात हे राजा, पुरूचे वंशधारण करणा-रे महावीर शक्रासारखे तेजस्वी, बहुत द्रव्य दान करणारे, पराक्रमी सर्वलक्षणान्नीं पूजित असे प्रवीर ईश्वर व रौद्राश्व हे तीन पुत्र महारथी पुरूपासून पौष्टि ना-मक भार्येचे ठायीं झाले, त्यांत प्रवीर नामे पुत्र होता, त्या पासून शूरसेनी नाम-क भार्येचे ठायीं मनस्यु नामक पुत्र झाला, त्यापासून सौवीरीनामें भार्येचे ठायीं पराक्रमी असे शक्र, सन्हनन, वाग्मी असे तीन पुत्र जाहाले. आणि मिश्र के-शी नामक भार्येचे ठायीं अन्वक, भानु प्रभृती पुत्र झाले. रौद्राश्वापासून अ-प्सरेच्या ठायीं महाधनुर्धारी यागशील असे ऋचेयु, कक्षेयु, कृकणेयु, स्थंडि लेयु, वैनयु, जलेयु, तेजेयु, सत्येयु, धर्मेयु, संनतेयु असे दाहा पुत्र झाले. याजपासून अनाधृष्टीनामक पुत्र मोठा विद्वान होता त्याजपासून राजसूय अश्वमेध करणारा परम धार्मिक असा मतीनार यानामें करून एक पुत्र झा ला त्या मतीनारापासून तंसु, महान्, अतिरथ, द्रुह्यु, असे चार पुत्र जाहाले त्यांत तंसु महावीर्यवान् पुरूचा वंश धारण करणारा होता, त्याणें मोठी की र्ती संपादन करून सकल पृथ्वी जिंकिली. त्याजपासून महावीर्यवान् असा इलिननामक पुत्र झाला, त्या इलीना पासून रथंतरी भार्येचे ठायीं दुष्यंत, शूर, भीम, प्रवसु व वसु असे पांच पुत्र पंचमहा भूतां सारखे पराक्रमी जा हाले, या मध्यें दुष्यंत राज्याधिकारी झाला. दुष्यंता पासून शकुंतलेच्या ठा यीं भरतनामक पुत्र जाहाला त्यासच शाकुंतल असें ह्मणतात. या भरता-च्या वंशा पासून उत्तरोत्तर या कुलाच्या यशाची वृद्धी होत चालली पुढें भर तास तीन भार्या होत्या त्यां पासून नऊ पुत्र झाले ते पुत्र आपल्या पित्यासारखे

पराक्रमी नवते ह्मणोन राजा त्या पुत्रावर संतुष्ट नसे असें जाणोन राजपत्न्या नीं परम क्रोधानें ते आपले पुत्र मारून टाकिले नंतर स्त्रियांस असें वाटलें कीं, राजास पुत्र नाहीं त्यापेक्षां त्याचें जन्म केवळ व्यर्थ आहे नंतर भरतानें बहुत याग केले त्या काली भरद्वाज ऋषी प्रसन्न होऊन त्याच्या प्रसादानें भूमन्यु नामक एक पुत्र भरता पासून झाला. त्या काळीं तो पौरवनंदन राजा आपल्यास मी पुत्रवान आहें असें मानूं लागला. आणि त्यानें भूमन्यु नामक पुत्रास यौवराज्याचा अभिषेक केला. नंतर त्यास पुष्करणी पासून दिविरथ, सुहोत्र, सुहोता, सुहवी, सुयजु आणि ऋचीक असे साहा पुत्र जाहाले या पुत्रां मध्यें सुहोत्र हा ज्येष्ठ होता ह्मणोन पृथ्वीचें राज्य त्यास मिळालें तेव्हां त्याणें पृथ्वी, पानकानें भाराक्रांत होऊन निमग्न झालेली पाहिली त्या कालीं धर्में करून पृथ्वीचें शासन करीत असतां यज्ञस्तंभानीं युक्त अशा पृथ्वीवर लोकांची समृध्धी होऊन धान्य समृद्ध असल्यामुळें पृथ्वी अत्यंत शोभली. असा हा सुहोत्र राजा राज्य करीत असतां याची इक्ष्वाकु कुलांत उत्पन्न जाहलेली ऐक्ष्वाकी नामक भार्या होती तिजपासून आजमीढ, सुमीढ आणि पुरुमीढ असे तीन पुत्र झाले त्या तीन पुत्रां मध्यें आजमीढ हा ज्येष्ठ पुत्र वंशाचा प्रतिष्ठापक होता त्यास तीन भार्या होत्या त्यांजपासून साहा पुत्र उत्पन्न जाहाले त्यांचीं नावें धूमिनीनामक भार्येपासून ऋक्ष, नीलीनामक भार्येपासून दुष्यंत आणि परमेष्ठी, केशिनी नामक भार्येपासून जन्हु, व्रजन, व रूपि असे पुत्र जाहाले. हे सकळ पांचाळ दुष्यंत आणि परमेष्ठी यांचे वंश होत. जन्हू पासून कुशिक वंश उत्पन्न जाहाला. व्रजन आणि रूपिण यांजपेक्षां ऋक्षनामक ज्येष्ठ होता त्याज पासून त्या वंशाचा धारक संवरण नामक पुत्र झाला तो राज्य करीत असतां सकल प्रजेचा बहुत क्षय जाहाला असें मीं ऐकतों क्षुधा, मृत्यु, अनावृष्टी, इत्यादिक नानाप्रकारचीं क्षयकारणें होऊन राज्य नष्ट जाहलें शत्रूनीं येऊन भारत वंशाचा नाश करून आपल्या बळानें चतुरंग पृथ्वी स्वाधीन करून घेतली. दाहा अक्षौहिणी सैन्य बराबर घेऊन पांचाळ नामक राजानें संवरणास युद्धामध्यें पराजित केला असतां तो अत्यंत भयाभीत होऊन दारा, अमात्य, पुत्र व सुहृज्जन यां सहवर्तमान-

पलायन करून पर्वताच्या समीप भागीं सिंधुनदीचा एक प्रदेश होता तेथें निकुंजामध्यें वास करूं लागला. तसेच सकल भारतकुलोद्भव राजे शत्रूंच्या भयानें सिंधूनदीच्या तिरीं पर्वतसंबंधी दुर्गाचा आश्रय करून वास करीत असतां बहुत संवत्सर अतिक्रांत जाहाले.

कोणे एके दिवशीं भगवान् वसिष्ठ ऋषी तेथें आले हें सकल भारतांनीं पाहिलें व त्यांस सामोरे जाऊन उत्थापन दिलें अर्घ्य पाद्यादिकें करून ऋषींची पूजा केली आणि परम सत्कारानीं आसनावर बसविलें नंतर राजा ऋषीशीं भाषण करितो कीं, हे भगवन्, तुह्मीं आमचे पुरोहित व्हावें ह्मणजे आमचें राज्य आह्मांस प्राप्त होईल असें राजाचें भाषण ऐकून ऋषीनीं त्या भाषणाचा अंगिकार केला. नंतर राजास राज्याभिषेक करून साम्राज्य पदवी त्यास प्राप्त जाहाली. सर्वक्षत्रियां मध्यें श्रेष्ठता प्राप्त होऊन राजाची सर्वत्र रव्याती जाहाली आणि आपलें पूर्वीचें राहाण्याचें स्थळ होतें तेथें जाऊन वास करीत असतां सकल मांडलिक राजे त्यास करभार देऊं लागले. असा तो अजमीढ कुलोद्भव संवरण नामक राजा पुनः पृथ्वीचें राज्य करीत असतां आपल्या तेजोबलानें बहुत दक्षणा युक्त असे याग करूं लागला. त्याची सूर्यकन्या तपतीनामक भार्या होती तिजपासून कुरुनामक पुत्र झाला, त्यास राज्यासन प्राप्त झाल्यावर सकल प्रजा, हा राजा सर्वधर्मार्थज्ञ आहे असें मानूं लागल्या. या राजाच्या नावानें विरव्यात असें एक कुरुजांगल नामक नगर जाहलें. कुरुक्षेत्रीं बहुत तप करून पुण्य संपादन केलें. कुरुराजा पासून वाहिनी नामक भार्येस अश्वेवंत, अभिष्यंत, चैत्ररथ, मुनी आणि जनमेजय असे पांच पुत्र मोठे विरव्यात जाहाले असें ऐकितो. आविक्षिता पासून परिक्षित, शबलाश्व, आदिराज, विराज, शाल्मली, उच्चैश्रवा, भंगकार, व जितारी असे आठ पुत्र झाले. या आठ पुत्रांतून जेष्ठ जो परीक्षित त्यास कर्मेंकरून, गुणेंकरून मरव्यात महारथी, धर्मार्थ जाणणारे जनमेजय, कक्षसेन, उग्रसेन, चित्रसेन, इंद्रसेन, सुषेण, व भीमसेन असे सात पुत्र जाहाले. पुढें जनमेजयापासून भूमीचे गायीं विरव्यात महाबलि धृतराष्ट्र, पांडू, बाल्हिक, निषध, जांबुनद, कुंडोदर, पदती. आणि वसती असे आठ पुत्र जाहाले, हे सकल पुत्र धर्मार्थ कुशल सर्वभूता

चे हितकर्ते असे होते. यांत प्रथम पुत्रजो धृतराष्ट्र यास राज्यप्राप्ती झाल्यावर कुंडिक, हस्ती, वितर्क, क्राथ, कुंडीन, असे पांच पुत्र जाहाले पुढें कुंडीक यास ही बहुत पुत्र जाहाले परंतु हविश्रवा, इंद्राभ, भूमन्यू, या तीन पुत्रांची प्रख्याती या भूमंडळावर जाहाली. प्रतीप, धर्मनेत्र व सुनेत्र हे ही तीन पुत्र होते त्यांत प्रतीपाची विख्याती पृथ्वीवर बहूत होती त्या प्रतीपा पासून देवापी, शांतनु, आणि बाल्हीक असे तीन पुत्र जाहाले त्यातीन पुत्रां मध्यें देवापी होता तो धर्महिताकर्ता वनामध्यें गेला. पुढें शांतनु व बाल्हीक हे दोघे राहिलेते पृथ्वीचें पालन करूंलागले. असें भरताच्या कुलामध्यें देवासारखे सत्यवान बहुत राजे उत्पन्न झाले आणखी दुसरे महारथी राजे बहुत जाहाले हे सकल राजे मनुकुलोद्भव जो ऐलनामक राजा त्याच्या कुलाचे विवर्धनकरणारे होते. असा विषय या अध्यायांत आहे.

९५ अध्याय पंच्याणवावा:— जनमेजय राजा भाषण करितो हे ब्रह्मन् माझ्या पूर्वजाची उत्पत्ती तुझ्या पासून ऐकली तसेच या वंशात जे उदार राजे जाहाले तेही ऐकिले परंतु हें सकल आख्यान संक्षेपानें ऐकिल्या मुळें माझी तृप्ती जाहाली नाहीं यास्तव विस्तारें करून मला कथन कर हे ऋषे मनु पासून प्रजापती पर्यंत जेराजे जाहाले त्यांच्या ज्या दिव्य आणि पुण्यकारक कथा त्या श्रवण केल्या असतां कोणास प्रीती उत्पन्न होणार नाहीं बरें सद्धर्मगुण माहात्म्यानी दृद्धिंगत ज्याचें यश त्यानें त्रैलोक्य व्याप्त झालें व कीर्ती तीनलोकांत होऊन सामर्थ्य, सत्व, उत्साह, बल इतक्या गुणानीं युक्त जे त्यांच्या अमृतासमान मधुर कथा श्रवणानें मी तृप्त होत नाहीं असा प्रश्न ऐकून वैशंपायन बोलतात हे जनमेजया द्वैपायना पासून तुझ्या वंशाचें शुभ कारकजनन मी ऐकिलें तें तुला सांगतों, दक्षप्रजापती पासून अदिति, तिला विवस्वान, व त्याला मनु, त्या पासून ईला, तिला पुरूरवा, त्यास आयु, त्याला नहुष, त्यास ययाती राजा जाहाला त्यास दोन भार्या होत्या. एक शुक्राचार्याची कन्या देवयानी, दुसरी वृषपर्व्या दानवाची कन्या शर्मिष्ठा त्यांत देवयानीस यदु आणि तुर्वसु असे दोन पुत्र झाले. वृषपर्व्याच्या कन्येस द्रुह्यु, अनु, आणि पुरु असे तीन पुत्र जाहाले त्यांत यदूस यादव आणि पुरूस पौरव जाहाले

पुरूची भार्या कौशल्या तिला जनमेजयनामक पुत्र जाहाला त्याणें तीन अ श्वमेध केले आणि विश्वजित नामक याग करून वनांत प्रवेश केला त्यास मा धवी नामक भार्या होती तिज्ञ पासून प्राचीन्वान नामक पुत्र जाहाला त्यानें ए क दिवसांत उदयाचल पर्वतापर्यंत पृथ्वी जिंकिली ह्मणोन प्राचीन्वान् असें नाम प्राप्त जाहालें त्यास यादवकुलोद्भव अश्मकी ह्मणोन भार्या होती तिला संयाती नामक पुत्र जाहाला त्याची भार्या दृषद्वताची कन्या वरांगी नामक हो ती तिजपासून अंहयाती जाहाला त्याची भार्या कृतविर्याची दुहिता भानुम ती ह्मणोन होती तिजपासून सार्वभौम नामक पुत्र झाला त्यानें केकयाची कन्या सुनंदा नामक युद्धांत हरण करून आणिली होती तिज पासून ज यत्सेन पुत्र जाहाला त्याची भार्या वैदर्भी सुश्रवा नामक होती तिजपासून अवाचीन नामक पुत्र जाहाला त्याची भार्या दुसरी एक विदर्भ कुलांतली म र्यादा नावाची होती तिला अरीह झाला. त्यानें अंगदेशोद्भव भार्येशीं विवाह केला तिला महाभौम पुत्र झाला, त्याची भार्या प्रासेनजिताची कन्या सुयज्ञा नामें होती तिला अयुतनाई पुत्र जाहाला त्याणें आपले यज्ञांत अयुत पुरुष आणिले होते ह्मणोन त्याचें नाव अयुतनाई असें जाहालें त्याची भार्या पृ- थुश्रव्याची दुहिता कामानामें होती तिला आक्रोधन नामक पुत्र झाला त्याची भा र्या कलिंगराजाची कन्या करंभा नामें होती तिला देवातिथी नामें पुत्र झाला त्यानें विदर्भकुलांतील मर्यादा नामें भार्या केली होती तिला अरिहा नामें पुत्र झाला. त्या ची भार्या अंगदेशांतली सुदेवा नामें होती तिला ऋक्ष नामें पुत्र झाला. त्याची भा र्या तक्षक दुहिता ज्वाला नामें होती तिला मतीनार नामक पुत्र जाहाला. त्यानें स रस्वती तीरीं द्वादश वार्षिक सत्र केलें होतें तें ज्याकाळीं समाप्त झालें त्याकाळीं स रस्वती साक्षात् येऊन तिनें मतीनारास भर्ता केला पुढें तिज पासून तंसु नामें पु त्र झाला. याविषयीं प्राचीन श्लोक असाच आहे. पुढें तंसु पासून कालिंगीचे ठायीं इलीन नामें पुत्र झाला त्यापासून रथंतरीचे ठायीं दुष्यंतादिक पांच पुत्र जा हाले. दुष्यंतानें विश्वामित्राची कन्या शकुंतला तिच्याशीं विवाह करून तिचे ठा ई भरत नामें पुत्र झाला. याविषयीं दोन श्लोक आहेत ते सांगतों. माताही भ्रा त्या समान आहे यास्तव ज्या पुरुषा पासून जो उत्पन्न असेल तो त्याचा पिता ह्म

णोन हे दुष्यंत राजा पुत्राचें पोषण कर शकुंतलेचा अवमान करूंनको अशी त्या कालीं आकाशवाणी जाहाली त्या कालीं दुष्यंत राजानें पुत्रा सहित शकुंतलेचा स्वीकार केला तो भरत राजा राज्य करीत असतां त्यानें काशीराजाची कन्या सार्वसेनी सुनंदा नामक भार्येचा स्वीकार केला तिचे ठाईं भूमन्यु नामक पुत्र झाला त्यानें दाशार्हाची कन्या विजया नामें भार्या केली. तिज पासून सुहोत्र नामें पुत्र झाला त्यानें इक्ष्वाकूची सुवर्णा नामें कन्या वरिली तिचे ठायीं हस्ती नामें पुत्र जाहाला त्या हस्तीनें एक नगर निरमाण केलें ह्मणोन त्या नगराचें नाव हस्तनापूर असें जाहालें. त्या हस्तीनें त्रिगर्त कुळांतील यशोधरा नामें भार्या केली तिला विकुंठन नामें पुत्र झाला त्यानें दाशार्ह वंशांतील सुदेवा नामक भार्या केली तिजपासून अजमीढ नामें पुत्र जाहाला. त्यास कैकेयी, गांधारी, विशाला, व ऋक्षा अशा चार भार्या होत्या त्यांना पृथक् पृथक् वंश धारण करणारे असे चोवीशें पुत्र जाहाले. त्यांतून वंश वृद्धी करणारा संवरण नामक पुत्र होता त्यानें तपती नामें सूर्याची कन्या वरिली तिला कुरु नामें पुत्र जाहाला. त्यानें शुभांगी नामें भार्या केली होती तिज पासून विदुर झाला. त्याची माध्वी संप्रिया नामक भार्या होती तिला आजस्वा नामें पुत्र झाला. त्याची भार्या आमृता नामें होती. तिला परीक्षिती जाहाला. त्याला बाहुदा नामें भार्येपासून भीमसेन झाला. त्याची भार्या कैकेयी नामें होती तिजपासून प्रतीश्रवा नामक पुत्र झाला. त्याला प्रतीप पुत्र जाहला त्याची सुनंदा नामें भार्या होती तिला देवापि, शांतनु, बाल्हिक असे तीन पुत्र जाहले. त्या तिघांतून देवापीनें बालपणीच अरण्यांत प्रवेश केला आणि शांतनु राज्यारूढ झाला. त्यानें ज्याला स्पर्श करावा तो जीर्णजर्जर असला तरी त्यास सुख होऊन पुनः तरुण व्हावा ह्मणोन त्याचें नाव शांतनु असें विख्यात जाहालें त्यानें भागीरथीशीं विवाह केला तिजपासून भीष्म जाहाले. नंतर भीष्मानें आपल्या पित्याचे प्रीतीस्तव सत्यवती नामक दुसरी एक भार्या त्यास करून दिली तिला पूर्वी गंधकाली असें ह्मणत ही कन्या अवस्थेंत असतां तचे गयीं पाराशरा पासून व्यास जाहाले. ती शांतनूची भार्या झाल्यावर तिला विचित्रवीर्य आणि चित्रांगद असे दोन पुत्र जाहाले त्यांत चित्रांगदास लहानपणीच गंधर्वानें मारला. विचित्रवीर्यानें कोशल देशचे राजाच्या अंबिका आणि

अंबालिका अशा दोन कन्या वरिल्या परंतु विचित्रवीर्य अनपत्य असतांच मरण पावला त्या काळीं सत्यवतीस चिंता प्राप्त जाहली कीं, दुष्यंताच्या वंशाचाउच्छेद होऊनये या विषयीं काय उपाय करावा ह्मणून द्वैपायनाचें चिंतन केलें नंतर ऋषीव्यास सत्यवतीच्या अग्रभागीं उभे राहून भाषण करितात कीं, काय आज्ञा आहे त्या काळीं सत्यवती बोलली कीं, तुझा विचित्रवीर्य नावाचा बंधु अनपत्य असतां स्वर्गी गेला तेव्हां त्याचे भार्येच्या ठायीं अपत्यें तूं उत्पन्न कर अशी मातेची आज्ञा जाहालेली व्यासानें ग्रहण करून बरें आहे असें ह्मणोन धृतराष्ट्र, पांडू आणि विदुर असे तीन पुत्र उत्पन्न केले त्या काळीं द्वैपायनानीं धृतराष्ट्रास वरप्रदान दिलें होतें कीं, गांधारीचे ठायीं तुजपासून शंभर पुत्र होतील त्याप्रमाणें धृतराष्ट्रास शंभर पुत्र जाहाले त्या पुत्रांतून दुर्योधन, दुःशासन, विकर्ण व चित्रसेन हे चार पुत्र धृतराष्ट्राचे प्रधान होते. पांडुराजास कुंती आणि माद्री अशा दोन भार्या होत्या. कोणेएके काळीं पांडूराजा मृगये करितां वनामध्यें गेला असतां एक ऋषी मृगाचा वेष धारण करून मृगीशीं सहवर्तमान क्रीडा करीत होता त्याची क्रीडा समाप्त न होऊन अत्यंत कामातुर जाहाला असतां त्यास पांडूराजानें पाहून त्यावर बाण टाकिला त्या बाणानें मृगविद्ध होऊन पांडूराजास भाषण करितो कीं हे राजा तूं मोठा धार्मिक ह्मणवितोस आणि मी कामातुर असतां माझ्यावर बाण टाकिलास तेणें करून आज मी मरणार परंतु तूंही कामामध्यें असाच अत्यंत निमग्न असतां मरण पावशील असा मृगाचा शाप ऐकून पांडुराजा तत्काळ अत्यंत विवर्ण जाहाला आणि आपल्या शापाचा आतां परिहार होणार नाहीं असें जाणोन भार्यासंग करूंनये असा त्यानें निश्चय केला नंतर प्रथम कुंतीस बोलतो कीं, हे भार्ये माझ्या चापल्य दोषानेंच ही अवस्था मला आली असें मी समजतों परंतु अनपत्यास परलोकप्राप्ती होत नाहीं यास्तव तूं पुत्र उत्पन्न करून घे तें पतीचें वाक्य ऐकून कुंतीनें धर्म, मारुत आणि शक्र या तीन देवांची प्रार्थना केली असतां कुंतीस धर्म, भीम आणि अर्जुन हे तीन पुत्र जाहाले ते पांडू राजानें पाहून तो अत्यंत हर्षीत झाला नंतर कुंतीस बोलतो कीं, ही तुझी सपत्नी (सवत) अनपत्या आहे हिला अपत्य

होण्यास कांहीं उपाय सांग. त्याकाळीं कुंतीनें आपली विद्या माद्रीस दिली अस तां माद्रीस अश्विनी कुमारा पासून नकुल आणि सहदेव असे दोन पुत्र जाहा ले कोणे एके दिवशीं माद्री अलंकार धारण केलेली पांडुराजानें पाहतांच ति- ला स्पर्श केला तों तत्काल मरण पावला त्या काळीं राजोस दहन करण्या क- रितां जी चिता केली होती त्या चितेवर माद्रीनें पतीशीं सहगमन केलें त्याका ळीं कुंतीशीं असें बोलली कीं, माझ्या उभयतां पुत्रां विषयीं प्रमाद किमपी क- रूं नये नंतर कोणी तापसानीं कुंती सहवर्तमान पांडवांस हस्तना पुरीं आणू न भीष्म व विदुर यांचे स्वाधीन केलें तसेच सकल राष्ट्र निवासी जनास वि- दीत करून समग्र लोक पहात असतां ते तपस्वी एका एकीं अंतरधान पाव ले त्या तपस्व्यांनीं केलेलीं भाषणें ईश्वरानें ऐकून आकाशापासून पुष्पवृष्टी झाली. देवांनीं दुंदुभी वादन केलें. पांडवांचा स्वीकार केल्यावर त्याणीं आप ले पित्याचें मरण वृत्तनिवेदन केलें नंतर त्याचें और्ध्वदेहिक कृत्य करून ह स्तना पुरी वास करीत असतां बाल्यता पासूनच पापबुद्धी दुर्योधन त्यांचा द्वेष करूं लागला. पांडवांस दायभाग द्यावा लागेल ह्मणोन नाना प्रकारची- राक्षसी बुद्धी करून अनेक उपायांनीं त्यांच छळ करूं लागला. धृतराष्ट्र रा जानें कांहीं कपटें करून वारणावतीस पांडवांला पाठविण्याचा विचार के- ला. तेथेंही दुर्योधनानें लाक्षागृह करून पांडवांस दग्ध करण्याचा विचार केला होता परंतु विदुरानें तो विचार पांडवांस विदित केल्यावरून तो सिद्धी स गेला नाहीं. पुढें लाक्षा गृहा पासून मुक्त होतांच मध्यें हेडिंब राक्षसाचें ह- नन करून एकचक्रा नगरींत गेले तेथेंही बकासूर नामक राक्षसाचें हनन करून पांचाल नगरामध्यें गेले तेथें द्रौपदी नामक भार्या मिळवून आ- पल्या स्वदेशीं गेले तेथें सुखें करून वास करीत असतां धर्मराजापासून प्रति विंध्य, वृकोदरापासून श्रुतसोम, अर्जुनापासून श्रुतकीर्ति, नकुलापा सून शतानिक व सहदेवा पासून श्रुतकर्मी असे पुत्र झाले पुढें कांहीं दि- वसांनीं शैब्याची कन्या देविका नामें स्वयंवरामध्यें धर्मराजास मिळाली अ सतां तिजपासून यौधेय नामक पुत्र झाला. बलंधरा नामें काशराजाची क न्या वीर्य शुल्का होती ती भीमसेनास मिळाली तिज पासून सर्वग नामें पु-

त्र झाला. अर्जुनानें द्वारकेस जाऊन कृष्णाची भगिनी सुभद्रा वरिली. पुढें तिजपासून सकळ गुणसंपन्न वासुदेवास प्रिय असा अभिमन्यु नामें पुत्र झाला. चैद्य कुळांतील करेणुमति नावाची नकुलास भार्या मिळाली तिचे ठायीं निरमित्र नामें पुत्र झाला. मद्र राजाची माद्री ह्मणोन कन्या होती ती स्वयंवरामध्यें सहदेवास मिळाली तीस सुहोत्र नामक पुत्र झाला. हेडिंबि नामें राक्षसी होती तिला भीमसेनापासून घटोत्कच नामें पूर्वीच पुत्र झाला होता. याप्रकारें अकरा पुत्र पांडवांस जाहाले. त्यांतून वंशधारक असा अभिमन्यु झाला. उत्तरा नामें विराट राजाची कन्या होती तिच्याशीं अभिमन्यूचा विवाह होऊन तिचे ठायीं गर्भ राहिला होता तो उदरांतच मृत झाला त्याकाळीं पुरुषोत्तम वासुदेवानें अशी प्रतिज्ञा केली कीं, या गर्भास मी आपल्या तेजोबलानें आतां संजीवन करितों असें ह्मणोन त्या गर्भास उदरांत संजीवन केला आणि त्यास सांगितलें कीं, हे गर्भा तुझें कुल अगदीं परिक्षीण झालें होतें ह्मणोन तुझें नाव परीक्षिती असें होईल. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, परीक्षितापासून तुझी माता जी माद्रवती तीचे ठायीं तूं जनमेजय नामक पुत्र जाहालास. तुझेपासून वपुष्टमा नामक भार्येचेठायीं शतानिक आणि शंकुकर्ण असे दोन पुत्र झाले. शतानिकापासून वैदेहीच्या ठायीं अश्वमेधदत्त नामें पुत्र झाला. याप्रकारें पुरु व पांडव यांचा वंश पुण्यकारक परम पवित्र असा तुला मी कथन केला. त्या वंशाचें ब्राह्मणानीं नियमें करून निरंतर श्रवण करावें नंतर स्वधर्मनिरत जे क्षत्रिय तसेच वैश्य व शूद्र यानीं भक्तीनें या वंशाचें आख्यान नेमानें ऐकावें हा पुण्यकारक इतिहास जे मनुष्य, लोकांस ऐकवितील अथवा श्रवण करतील ते लोक पुण्यकारक लोकाचे ठायीं गमन करतील आणि ते मनुष्य निरंतर देव, ब्राह्मण, व मनुष्य यांस मान्य होऊन पूज्य होतील. हें भारत व्यासानीं मोक्त महापवित्र यातें श्रद्धायुक्त, मत्सर रहित, ज्ञानपूर्वक ब्राह्मणादिक वर्ण जर श्रवण करतील तर ते स्वर्गास जातील असा विषय या अध्यायांत आहे.

९६ अध्याय शाणणवावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, इक्ष्वाकु वंशाचे ठायीं पृथ्वीपती महाभीष या नामें विख्यात, सत्यवान्, पराक्रमी राजा होता त्याणें सहस्र अश्वमेध आणि शंभर राजसूय यज्ञ करून इंद्राचा-

संतोष केला आणि स्वर्गी गेला. कोणे एके दिवशीं सर्व देव ब्रह्मदेवाचे दर्शना क रितां आले होते, तेथें सकल राजऋषीही आले त्यांमध्यें माहाभिष राजा ही हो ता आणि सर्व नद्यां मध्यें श्रेष्ठ जी भागीरथी तीही ब्रह्मदेवाच्या दर्शनास आली होती, त्या काळीं असा चमत्कार झाला कीं, थोडासा वायू सुटून गंगेचें वस्त्र चंद्रा सारखें शुभ्र होतें तें उडून गेलें, हें सकल देवानीं पाहून आपलीं मुखें अधो भा गीं केलीं. माहाभीष राजानें निःशंक होऊन गंगेस पाहिलें. हें कृत्य राजाचें ब्रह्म देवानें पाहून त्यास शाप दिला कीं, हे राजा तुला पुनः मृत्यलोकीं जन्म घडेल अ सें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून राजा चिंताग्रस्त झाला आणि दुसरे तपोधन व राज ऋषी आले होते त्यांकडे पाहून निश्चय करितो कीं, आपल्यास मृत्य लोकीं पुनः जन्म होणार त्या पेक्षां महा तपस्वी प्रतीप राजा आहे त्यासच पिता करावा. इकडे धैर्यच्युत जाहालेल्या माहाभीष राजास गंगेनें पाहून तीही त्याचेंच चिंतन क रीत असतां मार्गामध्यें स्वर्गापासून भ्रष्ट जाहालेले असून महातेजानें अत्यंत व्याप्त अशा वसुनामक देवास पाहून ती सरित श्रेष्ठा गंगा, वसुस बोलत्ये कीं, का हीं तुमचीं रूपें नष्ट जाहालीं, त्यापेक्षां देव सुस्वरूप आहेत ना? असें गंगेचें भाषण ऐकून वसु बोलतात. हे महानदी गंगे, कोणे एके दिवशीं वसिष्ठऋषी प्रछिन्नरूपा नें संध्या करण्यास बसले असतां आह्मीं त्याची धेनू चोरिली हें वर्तमान ऋषी स समजतांच त्यानें शाप दिला कीं, तुह्मीं मनुष्य योनीच्या ठायीं जन्म पावाल ते व्हां या स्वल्प अपराधानें ऋषीचा महान शाप आह्मांस जाहाला त्या पेक्षां हे गंगे तूं भूमीचे ठायीं मनुष्य योनीस जाऊन आह्मांस उत्पन्न कर. हे शुभे, साक्षात म नुष्य स्त्रियाचे जठरामध्यें प्रवेश करण्यास आह्मीं योग्य नाहीं, परंतु ब्रह्मवादी जे आहेत त्यांचें भाषण कधींही अन्यथा व्हावयाचें नाहीं. याप्रकारें वसूचें भाष णं ऐकून गंगा बोलत्ये फार चांगलें आहे परंतु तुह्मांस मी असा एक प्रश्न करत्यें कीं मृत्य लोकीं तुह्मांस उत्पन्न करणारा असा सकल पुरुषां मध्यें श्रेष्ठ पुरुष कोण आहे तो सांगा. असें गंगेचें भाषण ऐकून वसु बोलतात, हे गंगे प्रतीप राजा स सकल लोकांमध्यें विश्रुत असा पुत्र पृथ्वीवर शांतनु ह्मणोन होणार आहे तो आमचा उत्पन्न करता होईल. असें वसूचें वाक्य ऐकून गंगा बोलत्ये हे देव हो जें तुह्मीं भाषण केलें तें मी स्वीकार केलें मलाही हें इष्टच आहे त्यापेक्षां तुमचें इ-

च्छित जें तेंच मी करीन असें भाषण ऐकून पुनः वसू बोलतात. हे लोकवासिनी गंगे आमची स्थिती या भूमंडळीं फार दिवस नव्हावी अशी आमची इच्छा आहे यास्तव जेजे तुला पुत्र होतील तेते सर्व तूं जळामध्यें टाक. असें वसूचें भाषण ऐकून गंगा बोलत्ये, हे देवहो! पुत्रहेतु करतां जाशीं मी संगत होईन तेथें माझें गमन व्यर्थ न होतां तत्काल पुत्र व्हावा असें भाषण ऐकून वसू बोलतात हे गंगे आह्मीं समय मिळून एक एक आप आपला अष्टमांश देतों त्यावीर्यें करून तुला ईप्सीत पुत्र होतील त्या पुत्रांस पुनः मृत्यलोकीं संगती होणार नाहीं. हे गंगे असावीर्यवान असून पुढें ज्यास पुत्र होणार नाहीं अशा पुत्रातें तूं प्रास होशील. असें बोलून त्यानीं गंगे सहवर्तमान शीघ्र गमन केलें अ. वि. या अध्या. आहे.

९७ अध्याय सत्ताणवावा:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, तदनंतर सकल भूतांचें हितकरणारा प्रतीप राजा गंगा द्वारीं येऊन बहुत वर्षें वास करीत असतां राजाच्या गुणानीं युक्त अशी लोभ उत्पन्न करणारी आकृती धरून, साक्षात भागीरथी स्त्रीवेषानें जलांतून येऊन राजाच्या उजव्या मांडीवर बसली, तेव्हां प्रतीपराजा तीस ह्मणतो. हे स्त्रिये तुझें इच्छित प्रिय मी कोणतें करूं असें राजाचें भाषण ऐकून स्त्री बोलत्ये हे राजा, मी तुझी इच्छा करित्यें यास्तव माझा अंगिकार कर. अरे जी स्त्री सकाम झाली आहे तिच्या त्याग करणें हें साधूनीं निंदीत केलें आहे असें भाषण ऐकून प्रतीपराजा बोलतो हे स्त्रिये कामानें इतर वर्णाच्या परस्त्रीशीं मी गमन करीत नाहीं हें माझें व्रत आहे, असें भाषण ऐकून स्त्री बोलत्ये हे राजा, गमन करण्यास अयोग्य अशी मी नव्हे सकल स्त्रियां मध्यें मी श्रेष्ठ असून तुझें सेवन करण्यास आल्यें त्या पेक्षां माझा स्वीकार कर. असें ऐकून प्रतीपराजा बोलतो. हे स्त्रिये जें प्रिय आहे त्याविषयीं तूं मला प्रेरणा कत्येस खरी परंतु जरमी अन्यथा वर्तलों तर धर्मापासून भ्रष्ट होऊन नाश पावेन नशांत आपत्य व स्नुषा यानीं सेवनास योग्य असा हा दक्षण उरू होय तोच तूं सेवन केलास तेव्हां जर तुझी इच्छा असेल तर तूं माझी स्नुषा हो मी आपल्या पुत्रा करितां तुझा संग्रह करीन; असें राजाचें भाषण ऐकून स्त्री बोलत्ये हे राजा जर तुझी इच्छा असेल तर तुझी स्नुषा होईन तुझा भक्ती करितां प्रख्यात जें भारतकुल त्याचें मी सेवन करि

त्यें, जे पृथ्वीचे गायीं पार्थिव आहेत त्यांस तूं आश्रय आहेस शंभर वर्षे पर्यंत जरी मी तुझे गुण वर्णन केले तथापि अंत लागणार नाहीं, तुझ्या कुळास जें योग्य तेंच मी आचरण करीन व तुझ्या पुत्र ही त्याप्रमाणें वागून स्वर्गी वास करील असें बोलून ती तेथेंच गुप्त झाली. त्या दिवसा पासून प्रतीपराजानें पुत्र जन्माची इच्छा करून भार्ये सहवर्तमान तप केलें. त्यास कांहीं काळ गेल्यावर ते उभयतां स्त्री पुरुषें अति वृद्ध होऊन शांत दशेस आलीं असतां माहाभीष नामें राजाच त्याचे उदरीं आला तो शांत अवस्थेंत जाहाला ह्मणोन त्याचें नाव शांतनु असें ठेविलें. या राजास जन्मांतरीची अशी स्मृती होती कीं, मी आपल्या कर्माच्या योगें अक्षय लोक जिंकिले होते तो आजमी मृत्युलोकीं पुनः आलों काय असें जाणोन निरंतर पुण्य कर्माचाच अवलंब करूं लागला कोणी एके दिवशीं आपला पुत्र शांतनु यौवन अवस्थेंत आला हें प्रतीप राजानें जाणोन त्यास बोलतो हे पुत्रा पूर्वी एक स्त्री तुझें कल्याण करावें या बुद्धीनें माझ्या कडे आली होती तिला पुत्राची इच्छा आहे तीजर एकांतीं तुला येऊन भेटेल तर तिला तूं कोण कोणाची असें न विचारतां माझ्या आज्ञेनें तिचा अंगिकार कर. अशी प्रतीपानें शांतनूस आज्ञा करून त्यास राज्याभिषेक केला आणि आपण वनामध्यें गेला. तो इंद्र कांती शांतनु राजा निरंतर मृगव महिष यांची हिंसा करीत गंगेच्या तिरीं गेला तों एके दिवशीं शरीरानें जाज्वल्य मान साक्षात दुसरी श्रीच काय अशी सुंदर स्त्री राजानें पाहून मनांत ह्मणतो ही रूपवती स्त्री कोण आहे, तिची रूपसंपत्ती पाहून राजास मोठा विस्मय झाला व तीजकडे पहात असतां त्याची तृप्ती होईना इकडे वनांत संचार करणारा महाद्युतिमान अशास स्त्रीनें पाहून तिची ही तृप्ती झाली नाहीं, असे परस्पर एकमेकाच्या दर्शनानें तृप्त असतां स्त्रीस राजा बोलतो कीं, हे स्त्रिये तूं कोणी देवकन्या, दानवी, गंधर्वी, अप्सरा, यक्षी किंवा पन्नगी अथवा कोणी मानुषी आहेस कीं काय, हे शोभने तूं माझी भार्या व्हावी ह्मणोन मी तुज पाशीं याच्चना करितो. असा विषय या अध्यायांत आहे.

९८ अध्याय अठ्याणव— वैशंपायन सांगतात हे जनमेजया असें राजाचें भाषण ऐकून त्या स्त्रीस वसूंच्या भाषणानें स्मरण जाहालें असतां मना

मध्यें मोग आल्हाद पावून बोलली कीं, हे महीपाल, मी तुझी महीषी होईन परंतु हे राजा शुभ अथवा अशुभ जें मी करीन त्या पासून माझें निवारण तूं करूं नये. असें माझें कृत्य तुला मान्य असल्यास मी तुझी भार्या होईन, कदाचित तूं मला कां हीं विप्रीय भाषण केलेंस तर मी तुझा त्याग करीन. नंतर राजानें त्या सकल भाषणाचा अंगीकार करतांच तिणें तथास्तु ह्मणोन राजास वरलें मग राजानें अत्यंत हर्षीत होऊन पित्याच्या आज्ञे प्रमाणें स्त्रीला कांहींच प्रश्न न करितां तिचा उपभोग केला स्त्रीचे सकल दृत्तरूप औदार्य आणि इतर जे काय दुसरे गुण तसेच उपचार इत्यादिकानें तो राजा संतोष पावला, ती साक्षात गंगा असतां मानुषरूप धारण करून त्याची भार्या जाहाली, नृपसिंह जो शांतनु राजा यास संभोग, स्नेह चातुर्य, हावभाव व सुंदर हास्य इत्यादिकें करून ती रमवीत असतां राजानें ही त्या स्त्रीस पूर्वोक्त गुणानीं रमविलें असा तो शांतनु राजा त्या स्त्रीचे ठायीं अती आसक्त जाहाल्यामुळें स्त्रीनें आपल्या गुणें करून राजास आपल्यन केला या अवस्थेंत कितीएक संवत्सर गेले याची संख्या राजास राहिली नाहीं. या प्रकारें नरेश्वर यथेच्छ स्त्रीशीं रममाण झाल्या वर त्या स्त्री पासून अमरा सारखे आठ पुत्र जाहाले ते जा जा काळीं होत त्या त्या काळीं त्यास घेऊन ती असें ह्मणे कीं, मनुष्य देहाच्या वियोगानें देवता रूप जे तुह्मीं त्या तुमचा संतोष करित्यें, असें बोलून तिणे या सर्वांस आपल्या प्रवाहांत टाकिलें. हें तिचें अप्रिय कर्म शांतनु राजानें पाहिलें तथापि भार्या आपला त्याग करील या भयानें तिला कांहीं बोलला नाहीं. जा काळीं आठवा पुत्र झाला त्याकाळीं त्या पुत्रास पाहून ती स्त्री किंचित हास्य करीत आहे तों राजा दुःखीत होऊन भार्येस बोलतो कीं, हे स्त्रिये पुत्राची हिंसा करणारी अशी तूं कोण आहेस? अतःपर पुत्राचा वध करूं नको तूं बहुत बालकांचें हनन केलेंस हें अति निंद्य कर्म केलेंस असें शांतनु राजाचें भाषण ऐकून स्त्री बोलत्ये हे पुत्रकामुक राजा तुझ्या पुत्राचा मी वध करित्यें असें तूं समजूं नको, या पृथ्वीवर त्या पुत्रांचा बहुत दिवस वास व्हावयाचा नाहीं, अशी माझी प्रतिज्ञा आहे याचें कारण सांगत्यें ऐक. जन्हु ऋषीची सुता जिला गंगा ह्मणतात ती मी, महान् महान् ऋषी माझें सेवन करितात देवांचें कार्य सिद्धि व्हावी ह्मणोन आजपर्यंत तुज सहवर्तमान मी वास केला हे आठ पुत्र

वसू नामक देव आहेत यांस वसिष्ठ ऋषीचा शाप झाला ह्मणोन मनुष्य योनी च्या ठायीं हे प्राप्त जाहाले; यांचा उत्पादक तुझा वांचून या भूमंडळावर दुसरा कोणी नाहीं आणि माझ्यासारखी माताही मनुष्य योनीच्या ठायीं नाहीं. असें जाणोन मी मनुष्य देह धारण केला आणि त्यांची जननी जाहाल्यें. हे जे तुला पुत्र जाहाले यांच्या योगें तूं आतां अक्षय्य लोक जिंकिलास या वसू नामक देवानीं अशी प्रतिज्ञा केली होती कीं, आमचा वास पृथ्वीवर बहुत दिवस नव्हावा ह्मणोन जाजाकाळीं आह्मीं उत्पन्न होऊं त्यात्याकाळीं आह्मांस उदकामध्यें प्रक्षिप्त करावें ह्मणोनच मी यास प्रवाहा मध्यें टाकून मनुष्य देहा पासून सोडविलें. यामुळें हे वसू वसिष्ठऋषीच्या शापा पासून मुक्त केले. आतां हे राजा, हा अष्टम पुत्र महाव्रती आहे याचें पालन कर. आतां मी जात्यें हा तुझापासूनच झाला असें समज, हा वसूत गंगादत्त आहे, तुझ्या करितांच या पुत्रा विषयीं मी वसू जवळ प्रार्थना केली होती. असा विषय या अध्यायांत आहे.

९९ अध्याय नव्याणवावा.— शांतनु राजा बोलतो हे गंगे आपव नावाचा हा कोण? ज्याचे शापानें ते सर्व वसू मनुष्य योनींत आले असें त्यानें दुष्कर्म कोणतें, तसाच हा कुमार तूं दिल्हेला त्या कुमारानें काय केलें ज्यानिमित्तानें हा मनुष्य योनित राहाणार आहे आणि हे वसू सर्व लोकाचे ईश असतां मनुष्य योनींत कां आले हें मला सांग असा शांतनु राजाचा प्रश्न ऐकून गंगा बोलत्ये हे राजा पूर्वी वरुणाचा पुत्र वसिष्ठ होता त्यासच आपव असें लोक ह्मणत तो एके दिवशीं मेरुपर्वताच्या पृष्ठभागीं मृग पक्ष्यानीं व सर्व ऋतूंतील पुष्पानीं युक्त अशा आश्रमांत तप करीत होता. दक्षप्रजापतीची कन्या सुरभी नामक होती तिला कश्यप ऋषी पासून नंदिनी नामें एक धेनु जाहाली ती वसिष्ठऋषीस मिळाली. कोणे एके काळीं ऋषीनीं सेविन अशा अरण्यांत निर्भयपणे ती धेनु संचार करीत असतां तेथें पृथ्वादिक अष्टवसू आपल्या भार्ये सहवर्तमान आले आणि पर्वत व नाना प्रकारचीं वनें उपवनें याची शोभा पाहून रममाण जाहाले असतां एका वसूच्या भार्येनें ती वसिष्ठ ऋषीची कामधेनु पाहून आपला पती जो द्यु नामक वसू त्यास ती नंदिनी दाखवून ह्मणत्ये, काय या धेनूची कांस सुंदर व बहुत दुग्ध देणारी आहे असें दिसतें, या गाईचे खुर व पु

ख हीं फारच चांगलीं दिसतात. नंतर सकल गुणानीं युक्त व रूप संपन्न अशी नं-
दिनी वसूनें पाहून तो भार्येस बोलतो हे वरारोहे, ही उत्तमा गो व हें वन वसि
ष्ठ ऋषीचें आहे या धेनूचें स्वादुक्षीर जो मानव प्राशन करील तो स्थिरयौवन
होऊन व दश सहस्त्र वर्षे पर्यंत जिवंत राहील. असें पतीचें भाषण ऐकून वसु-
भार्या बोलते हे पती, कोणी एक उशीनर नामें राजऋषी आहे त्याची दुहिता-
जितवती नामक ती माझी अत्यंत प्राणसखी होय ती रूपसंपत्तीनें मनुष्यलोकां
त प्रख्यात आहे. यास्तव त्या सखी करितां ही धेनु लौकर मला आणून दे ह्मण
जे या धेनूचें दुग्ध माझ्या सखीनें प्राशन केलें असतां ती मनुष्य लोकांत जरा,
रोग विवर्जित होईल. हें माझें कार्य करण्यास तूं समर्थ आहेस, या कार्यापेक्षां
प्रियतर कार्य दुसरें कोणतेंही मला नाहीं. असें भाषण ऐकून तिचें प्रिय करण्यां
च्या इच्छेनें आपल्या भ्रात्या सहवर्तमान त्यानें त्या धेनूचें हरण करून भार्येस
दिली परंतु त्या ऋषीचें तीव्र तप किती आहे व याचा परिणाम पुढें काय होई-
ल हें त्या वसूनें जाणलें नाहीं. इतक्यांत फल मूलें आणून तो वसिष्ठ ऋषी आ
पल्या आश्रमीं आला तों वनामध्यें धेनू नाहीं. नंतर दिव्य दृष्टीनें पाहातांच व
सूनीं आपली धेनू नेली असें जाणोन क्रोधानें वसूंच्या सन्नीध येऊन त्यास-
असा शाप दिला कीं, हे वसु हो सुपुच्छ युक्त माझी दोग्ध्री धेनु तुह्मीं हरण केली
त तर तुह्मीं मनुष्य योनींत जाऊ असा वसूंस शाप देऊन पुनः तप करण्या क-
रितां स्वस्थानीं गेले तेव्हां ब्रह्मर्षी वसिष्ठानीं महाप्रभाव युक्त क्रोधसमन्वि
त होऊन आपल्यास शाप दिला असें जाणोन पुनः ते वसु वसिष्ठाच्या आ-
श्रमीं येऊन त्यानीं ऋषीची प्रार्थना केली परंतु त्या ऋषीनें प्रसाद केला नाहीं
शेवटीं तो असें बोलला कीं, हे वसु हो तुह्मांस मी शाप दिला त्या पासून ए-
क संवत्सरानंतर मुक्त व्हाल आतां जा वसु कर्त्तो तुह्मां सकल वसूंस मी शा
प दिला असा द्यु नामक वसु तो मात्र दीर्घ काल मनुष्य योनींत पृथ्वीवर वा
स करील मी क्रोधें करून जो तुह्मांस शाप दिला तो अनृत कधींही व्हावया-
चा नाहीं आतां तो द्यु नामक वसु मनुष्यांमध्यें आपल्यास प्रजा उत्पन्न हो-
ण्या विषयीं इच्छा करणार नाहीं सर्वशास्त्रवेत्ता धर्मात्मा असा होईल:
आपल्या पित्याच्या हिता करितां स्त्री संभोग वर्ज करील असें बोलून ते गे-

ले. जान्हवी ह्मणत्ये हे शांतनु राजा ते शापयुक्त झालेले वसूनामक घेऊन भेटले आणि मला बोलले कीं, हे गंगे तूं आह्मांस उत्पन्न करून उदका मध्यें टाकीत जा, या कारणास्तव त्या वसूस शापा पासून मुक्त करण्याकरितां उदकामध्यें टाकून मनुष्य योनी पासून सोडविलें त्या वसूंतून द्यु नामक एक वसू जास चिरकाल मनुष्य देहांत वास करण्या विषयीं शाप जाहाला होता तो हा अष्टम पुत्र जाण, हा चिरकाळ मनुष्यलोकीं वास करील असें गंगेनें शांतनुराजाप्रत वृत्त सांगितलें आणि त्या कुमारास घेऊन तेथेंच गुप्त झाली नंतर त्या पुत्रास देवव्रत गांगेय असें नाव मिळालें. शांतनुच्या गुणापेक्षा ही अधीक गुण त्या पुत्राचे होते पुढें शांतनु राजा दुःखार्त होऊन स्वनगरांत गेला त्या शांतनु राजाचे बहुतगुण आहेत ते मी आतां तुला सर्व सांगेन. असा विषय या अध्यायांत आहे.

१०० अध्याय शंभरावा.— वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, तो शांतनु राजा धिमान, देव, राजऋषी यांणीं सत्कृत, धर्मात्मा, सत्यवक्ता असा लोकांत प्रसिद्ध आहे व ज्याचे ठायीं इंद्रिय निग्रह, दान, क्षमा, बुद्धी, धृती, लज्जा, धैर्य व उत्तम तेज राहातात असें जाणोन सकल राजांनीं यास राज्याभिषेक केला त्या दिवसा पासून जितके पृथ्वीचे राजे होते त्यांनीं निर्बाधसुखें करून निद्रा केली शत्रूचें भय ह्मणोन पृथ्वीवर राहिलें नाहीं शक्रा सारखी राजाची कीर्ती ऐकून सकल भूमी पाल यज्ञक्रियेमध्यें तत्पर जाहाले. सर्व लोकांचा वर्णाश्रम धर्म उत्तरोतर वृद्धीस पावला. सकल क्षत्रिय ब्राह्मणाचे, वैश्य क्षत्रियांच्या व या तीन वर्णांच्या अनुरोधें करून शूद्रही वागूं लागले. असा हा शांतनुराजा कुरूच्या हस्तिन नामक पुरांत राहात असतां सागरांत पृथ्वीचें ज्याणें पालन केलें असा तो राजा चंद्रासारखा प्रिय दर्शनी, सूर्या सारखा तेजस्वी, वायूसारखा वेगवान्, यमासारिखा कोपी आणि पृथ्वी सारखा क्षमावान असे. पशू, वराह तसेच मृगपक्षी यांचा वध ज्याच्या राज्यांत कधींही जाहाला नाहीं. ज्याचे राज्यांत देव, ऋषी, पितर संबंधी ज्या क्रिया कर्तव्य त्यांचा लोप कधींही झाला नाहीं. व हा राजा छतीस वर्षे स्त्रीविवर्जित वनामध्यें राहिला. रूप, आचार, वृत्त आणि श्रुत ज्याचें कधींही नष्ट जाहलें नाहीं या राजास गंगेपासून देवव्रत नामक पुत्र झाला तो सर्व शास्त्रांमध्यें निष्णात, महा बली व महारथी असा होता. कोणे एके काळीं शांतनु राजा एक मृग-

विद्ध करून गंगेकडे पाहातो तों गंगा अल्प जला जाहाली ह्मणून चिंताग्रस्त झाला आणि मनांत विचार करितो कीं, सर्व नद्यां मध्यें श्रेष्ठ अशी जी भागीरथी ती आज पूर्वी प्रमाणें कां वाहात नाहीं, असा तो विचार करीत आहे तों इतक्यांत रूप संपन्न चारु दर्शन दिव्य अस्त्रें धारण केलेला साक्षात पुरंदरच असा एक कुमार नदी मध्यें पाहिला आणि ज्या कुमारानें त्या नदीचा प्रवाह व्याप्त करून टाकिला आहे. ती नदी मनुष्य रूपानें त्या कुमाराच्या सन्निध आहे असें राजानें पाहून हें कांहीं तरी अमानुष कर्म आहे ह्मणून तो विस्मय पावला. वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा पूर्वी शांतनू पासून गंगेचे ठायीं हा पुत्र ज्या काळीं झाला त्या काळीं राजानें स्वस्थपणें पाहिला नव्हता ह्मणोन हा पुत्र आपलाच अशी राजास स्मृति राहिली नाहीं परंतु पुत्र, पित्यास लोभ उत्पन्न करून तेथेंच अंतरधान पावला. हें अद्भुत कृत्य पाहून शांतनु राजा शंकित होऊन गंगेस ह्मणतो कीं हे स्त्रिये जो पुत्र आतां मी पाहिला तो तूं मला दाखीव असें भाषण ऐकून गंगेनें आपण स्वतः उत्तम प्रकारचें रूप धरून कुमारास दक्षण हस्तामध्यें घेऊन राजास दाखविला. तेव्हां ही स्त्री मी पूर्वी पाहिली होती अशी ही स्मृति राजास राहिली नाहीं असें गंगेनें जाणोन आपण स्वतः राजास बोलल्ये, हे राजा जो पूर्वी माझे ठायीं तुझे-पासून प्रथम पुत्र जाहाला त्या पुत्रास घेऊन तूं गृहीं जा वसिष्ठऋषी पासून यास सांग वेद मिळाले आहेत. जसा देवराज इंद्र अस्त्रविद्येमध्यें निपुण आहे-तसा हा आहे सुर आणि असुर यांस हा पुत्र मान्य आहे शुक्राचार्यास जें शास्त्र ज्ञात आहे तेंच यास आहे तसाच अंगिराचा पुत्र बृहस्पती जें शास्त्र जाणतो तें या पुत्रास सकल विदित आहे शत्रूनीं धरण्यास अशक्य असा जमदग्नी पुत्र परशुराम जी अस्त्र विद्या जाणतो ती सकल या पुत्राचे ठायीं प्रतिष्ठित आहे. हे शांतनु राजा असा हा पुत्र महा धनुर्धारी, धर्मार्थ वेत्ता वीर माझा पासून जाहला हा माझाच पुत्र मी तुला दिला तो घेऊन तूं आतां आपले गृहीं जा. अशी गंगेनें राजास आज्ञा दिली असतां शांतनुराजा पुत्रास घेऊन स्वनगरास आला नंतर त्यानें आपल्या राज्यास अभय असावें ह्मणून गुणवान् पुत्रास यौवराज्याचा अभिषेक केला. नंतर शांतनु पुत्रानें सकल पौर वाचें व आपले पित्याचें व राष्ट्राचें उत्तम प्रकारें रंजन केलें. कोण्हे एके काळीं शांतनुराजा यमुना नदीच्या आ

समंतात् मार्गी वनामध्यें फिरत असतां अती उत्तम असा गंध वायूच्या योगानें आला तो राजानें आघ्राण करून त्याचा शोध करण्या करितां वनामध्यें फिरत असतां देवासारखें जीचें रूप,अशी एक धिवराची कन्या राजानें पाहून तो तिला बोलतो हे भीरु तूं कोणाची कन्या आहेस,या वनामध्यें कोणच्या इच्छेनें आली स,असें राजाचें भाषण ऐकून कन्या उत्तर देत्ये मी धीवराची कन्या आहें माझा पिता सकल धीवरांचा राजा आहे त्याच्या अनुज्ञें करून धर्मार्थ ही नौका वाहत्यें असें भाषण ऐकू न त्या कन्येचें देवा सारखें रूप मधुर भाषण आणि उत्तम गंध यानें पाहून शांतनु राजा तिजविषयीं कामित जाहाला आणि तिच्या पित्याकडे जाऊन भाषण करितो कीं हे धीवर राज ही तुझी कन्या मला दे असें ऐकून दाशराज भाषण करितो कीं हे महीपती जाकाळीं ही कन्या झाली त्याच काळीं ही वरास अर्पण करावी परंतु माझे म नांत कांहीं एक इच्छा आहे ती तुला सांगतों श्रवणकर ही माझी कन्या तुझी धर्म पत्नी असावी ह्मणोन माझा पाशीं जर तूं प्रार्थना करितोस तर तूंही सत्यवक्ता आहेस त्यापेक्षां कांहीं एक संकेतानें तुलाही कन्या अर्पण करावी असें मी इच्छितों. याकन्येस तुझ्यासा रखा वर कधींही मिळणार नाहीं असें भाषण ऐकून शांतनुराजा बोलतो हे धीवरा,तुझा संकेत काय आहे तो सांग,त्याप्रमाणें तुला देण्यास योग्य असल्यास मी देईन अदेय असल्यास कधींही देणार नाहीं. असें भाषण ऐकून धीवर बोलतो हे राजा याकन्येच्या गर्भी जो पुत्र तुझापासून होईल त्यास तुझापाठी मागें राज्याभिषेक करावा असें होत असल्यास ही कन्या मी तुला देतों. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, असें दाशानें भाषण केलें असतां तें राजास नरुच ल्या मुळें त्या नें अंगीकार केला नाहीं परंतु त्या कन्येस पाहून राजाचा शरीरामध्यें अति तीव्र कामाचा संताप झाला आणि दाश कन्येचें वारंवार चिंतन करीत तो हस्तना पुरीस आला नंतर कांहीं दिवसानीं आपला पिता शांतनु शोकांत निमग्न झाला आहे हें देवव्रतानें पाहून तो पित्यास बोलतो हे तात, सर्वप्रकारें आपलें क्षेम आहे ना, सकळ पार्थिव कुशल आहेत ना, आपण फार दुःखीत दिसतां तर याचें कारण कांहीं कळत नाहीं हे राजन् ध्यानस्था सारखे होऊन माझाशीं कां भाषण करीत नाहीं. आपलें शरीर विवर्ण व कृश जालें आहे,

काय असा व्याधी आपणास जाला आहे तो समजला ह्मणजे त्याची प्रतिक्रिया मी करीन. असें पुत्राचें भाषण ऐकून शांतनु राजा बोलतो हे वत्सा मी निःसंशय ध्यान स्थित जालों आहें यानें कारण तुला आतां सांगतों यामाझा महान भारत कुला मध्यें तूं मला एकटा पुत्र आहेस तूं शस्त्र वेत्ता असून पौरुष ही तुझें मोठें आहे परंतु हे पुत्रा ही मृत्यलोकची वस्ति अनित्य आहे यास्तव मी बहुत शोक करितों आणखी ही मी तुला निश्चय सांगतों. तूं एकटा पुत्र शतपुत्रां पेक्षां ही वरिष्ठ आहेस तूं जर आमच्या कुलांत जिवंत आहेस तर तुझ्या कुळास कधींही विपत्ती होणार नाहीं. बरें आपलें संतान अविनाशी असावें अशा हेतूनें पुनः एक दारसंबंध आणखी करावा तोही करण्यास मी इच्छित नाहीं आतां तुझें कल्याण असो, परंतु धर्मवादी असें बोलतात कीं, अनपत्य असणें आणि एक पुत्र असणें ही दोन्ही सारखींच, अग्निहोत्र वेदत्रय आणि अक्षय्य संतान या तिन्ही मध्यें संतानाच्या सोळाव्या कळेची ही योग्यता अग्निहोत्र व वेदत्रय यांस नाहीं. परलोकाची प्राप्ती पुत्र जाला असतांच होते इत्यादि अर्थ प्रतिपादक पुराणास मूळभूत श्रुति अशीच आहे. कर्मेंकरून पितृलोक आणि विद्येंकरून देवलोक प्राप्त होतात असें वेद आणि पुराण यांत कथित आहे, हे पुत्रा, तुला युद्धा वांचून मरण कधींही यावयाचें नाहीं परंतु असा ही कधीं तुझा मरण काळ आला असतां काय करावें ह्मणोन चिंताग्रस्त आहें हेंच माझ्या दुःखाचें कारण तुला सांगितलें. असें पित्याच्या दुःखाचें कारण ऐकतांच देवव्रतानें तत्काल जे वृद्ध वृद्ध अमात्य होते त्यांच्या संन्निध जाऊन पित्याच्या शोकाचें कारण त्यांस विचारलें असतां त्या काळीं अमात्यानीं त्या कोळ्याच्या कन्येचा वृत्तांत सांगून ते ह्मणाले कीं, तुझ्या पित्यास तेंच दुःख आहे कन्येचा पिता आपणास वर मागतो या मुळें राजास बहुत दुःख जालें आहे असें भाषण ऐकून देवव्रत तत्काळ कांहीं वृद्ध क्षत्रिय व अमात्य बराबर घेऊन त्या धिवराच्या संन्निध जाऊन त्यानें आपल्या पित्या करितां कन्येची याच्या केली ते भीष्मानें भाषण धीवरानें स्वीकृत केलें आणि यथाविधि त्याचा सत्कार करून तो राजसभेंत त्यास बोलला कीं, हे भीष्मा, शांतनु राजास तूंच पुत्र पुरे आहेस, तुझ्याशीं मी काय बोलूं, तुमच्या सारख्या श्रा-

घ्य संबंधाचा त्याग करून कोण पुरुष संताप पावणार नाहीं, तर इंद्रही संताप पावेल. ज्या पुरुषाच्या वीर्यापासून सत्यवती जाहाली त्याच आर्याच्या कुलामध्यें तुझ्या सारखा गुणवान् तुझा पिता झाला असें बहुतांपासून ऐकिलें आहे, यास्तव सत्यवतीस हा धर्मज्ञ नराधिप विवाह करण्यास योग्य आहे, पूर्वी असित नामक देवऋषी या कन्येशीं विवाह करण्यास आला होता परंतु तो ऋषी श्रेष्ठ असतांही मी त्याचें प्रत्याख्यान केलें आतां कन्यापितृत्व माझाकडे आहे ह्मणून मी तुझाशीं कांहीं बोलतों तें ऐक. सापत्न भाव हा एक मोठा दोष आहे तशांतून तूं क्रोधीत होऊन ज्याचा सापत्न होशील तो गंधर्व असो अथवा असुर असो तो कधींही जिवंत राहावयाचा नाहीं इतकाच कायतो दोष आहे ह्मणोन मी कन्या द्यावी किंवा नद्यावी याचा विचार करीत आहें या खेरीज दुसरें कारण कांहीं दिसत नाहीं असें गांगेयानें त्या धीवरानें भाषण ऐकून सकल भूमीपाल स्थित असतां आपल्या पित्याचें हित व्हावें ह्मणोन भाषण करितो कीं हे धीवरा, हें जें मी आतां भाषण करितों तें पूर्वी कोणी केलें नसेल व पुढेंही कोणी करावयाचा नाहीं. जें तूं भाषण केलेंस त्या भाषणास अनुगुण माझें भाषण आहे असें तूं जाण. यातुझ्या कन्येचे गर्भी जो पुत्र होईल तो आमचा राजा होईल, असें ऐकून दाशराजा बोलतो हे भीष्मा राज्य त्याग करणें हें एक मोठें दुष्कर कर्म होय ही एक प्रतिज्ञा तूंच केलीस, दुसऱ्याचें हें कर्म नाहीं, तूं तर धर्मवेत्ता आहेस त्यापेक्षां सकल राजसभे मध्यें जें भाषण केलेंस तें मिथ्या करणार नाहींस खरें परंतु आमच्याकडे कुमारिकेचा पक्ष आहे त्यापेक्षां आह्मांस फार भय आहे आतां तुझ्या भाषणा विषयीं तर मला कांहीं संशय राहिला नाहीं परंतु तुला जें पुढें आपत्य होईल त्या विषयीं मला संशय आहे तो दूर जाहाला नाहीं. असें धीवरानें भाषण ऐकून भीष्म कैवर्तांचें हृद्गत जाणोन पित्याचें प्रिय सिद्ध व्हावें यास्तव पुनः प्रतिज्ञापूर्वक भाषण करितो कीं, हे दाशराज, हे सकलराजे ऐकत असतां पित्याच्याहितास्तव मी जें बोलतों तें तूं ऐक मी राज्य करणार नाहीं ह्मणोन पूर्वी प्रतिज्ञा केलीच आहे, आतां आपत्या करितां दुसरी प्रतिज्ञा करितों, आजपासून मी ब्रह्मचर्यव्रत धारण करीन मी अपुत्र जरी राहिलों तथापि अक्षय्य लोक मला मिळेल, असें भाषण ऐकून दाशराजाचे शरीरावर हर्षाचे रोमांच उत्पन्न जाहाले

आणि तो देवव्रतास बोलतो जर तुझी अशी प्रतिज्ञा आहे तर ही कन्या तुझे पित्यास मी दिली, असें भाषण केल्यावर अप्सरा, देवगण व ऋषीगण यांणी आकाशांतून भीष्मावर कुसुमांचा वर्षाव करून बोलले कीं, याणें मोठें भयंकर कर्म केलें त्यापेक्षां भीष्म याचें नाव योग्य आहे. नंतर पित्याचा अर्थ सिद्ध जाहाला असें जाणोन भीष्म, दाशकन्येस ह्मणतो कीं हे माते आतां या रथावर आपण आरूढ व्हावें ह्मणजे उभयतां स्वगृहीं जाऊं. असें भीष्मानें भाषण करून तो कन्येसहवर्तमान हस्तनापुरीं आला आणि जाहालेलें कृत्य त्यानें शांतनूस सांगितलें तें ऐकून सकल राजे देवव्रताची प्रशंसा करीत बोलले कीं,- हा भीष्म मोठा भयंकर आहे, शांतनु राजानेंही तें पुत्राचें दुष्कर कर्म ऐकून- आपण संतोषानें त्यास असा वर दीला किं, हे भीष्मा तूं स्वेच्छामरणी होशील. असा विषय या अध्यायांत आहे.

१०१ अध्याय एकशेंएक.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, नंतर ती भीष्मानें आणलेली जी कन्या तिशीं शांतनु राजानें विवाह केला. पुढें त्या कन्येचे ठायीं शांतनु पासून चित्रांगद व विचित्रवीर्य असे दोन पुत्र जाहाले, ते उभयतां पुत्र अप्राप्त यौवन असतांच शांतनु राजा मृत्यु पावला नंतर भीष्मानें सत्यवतीच्या अनुमतें चित्रांगदास राज्याचा स्वामी केला असतां तो आपल्या वीर्येंकरून सकल पार्थिवांची निंदा करूं लागला, असा तो चित्रांगद सुर, मनुष्य, असुर यांची निंदा करीत असतां कोणी एक चित्रांगद नावाचा गंधर्व आला त्या काळीं त्या उभयतां चित्रांगदाचें मोठें तुंबल युद्ध स्वरस्वती तीरीं होत असतां तीन वर्षें जाहालीं, मोठा रण समारंभ चालला होता, शेवटीं त्या युद्धांत चित्रांगद गंधर्व मायावी विद्येंत अधीक असल्यामुळें त्यानें कुरुमुख्य जो चित्रांगद याचा प्राण घेऊन तो स्वनगरीं गेला. नंतर चित्रांगदाची उत्तरक्रिया भीष्मानें करून अप्राप्त यौवन बाल असा विचित्र वीर्य होता त्यास कुरूचे राज्याचा अभिषेक केला तो विचित्रवीर्य भीष्माचे आज्ञेंत राहून राज्याचें रक्षण करूं लागला आणि भीष्माचें धर्मेंकरून पूजन करीत असतां भीष्मानें ही विचित्र वीर्याचें उत्तम प्रकारें पालन केलें. अ. वि. या अध्या. आहे.

१०२ अध्याय एकशेंदोन.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, चित्रां

दास गंधर्वानें मारल्यावर आपला भ्राता विचित्रवीर्य बाळ आहे असें भीष्मानें जाणोन सत्यवती नामक मातेच्या आज्ञेनें राज्याचें परिपालन केलें, पुढें विचित्रवीर्य यौवनावस्थेंत आला हें पाहून भीष्मानें त्याचा विवाह करण्याची मती धरिली. कांहीं दिवसानीं काशीपती नामक राजाच्या तीन कन्या अप्सरेसारख्या असून त्यांचा स्वयंवर होत आहे, हें वर्तमान ऐकून भीष्म, मातेची आज्ञा घेऊन वाराणशी पुरीस गेला तेथें सकल राजाचे समुदाय स्वयंवराकरितां आले होते त्यांस पाहून सकल कन्याही पाहिल्या नंतर तेथें जे राजे आले होते त्यांचीं नाम कीर्तनें होत आहेत तों भीष्मानें त्या तिन्ही कन्या आपण घेऊन रथामध्यें स्थापन केल्या आणि सकल महीपालांस बोलला कीं, हे महीपाल हो माझें भाषण ऐका. पूर्वी ब्राह्मादि जे आठ प्रकारचे विवाह सांगितले तसा हा स्वयंवर विवाह क्षत्रियांस प्रशस्त आहे त्या सर्व विवाहांत बलात्कारानें कन्या हरण करणें हाच श्रेष्ठ असें धर्मवादी ह्मणतात यास्तव हे पृथ्वीपाल हो मी आतां बलात्कारानें या तीन कन्या हरण करितों तुमची शक्ती असेल तर माझा पराभव व तुमचा उत्कर्ष होण्या करितां यत्न करा मी तर आतां युद्धा विषयीं निश्चय करून उभा राहिलों आहें, असें भीष्मानें सकल राजास व काशी राजास सांगून सर्व कन्या रथामध्यें बसवून चालला तें भाषण राजानीं ऐकून ते क्रोधानें भीष्मा कडे चालले त्या काळीं गमनाच्या त्वरे मुळें कांहीं राजाचीं भूषणें, कवचें हीं भूमीवर पडलीं सर्व क्षत्रियानीं रथामध्यें बसून क्रोधानें युद्धाची उत्तम सिद्धता केली व आपलीं आयुधें घेऊन भीष्माशीं युद्धास आरंभ केला नंतर दहासहस्र राजानीं एकदम दहासहस्र बाण भीष्मावर टाकिले ते भीष्मानें एक महान लोमवाही बाणानें मध्येंच छिन्न करून टाकिले नंतर भीष्माच्या आसमंतात भागीं चोहों कडे ते राजे येऊन मेघ जसे पर्वतावर अंबुधारांची वृष्टी करितात तशी बाणाची वृष्टी करून त्यानीं भीष्म आच्छादित केला. नंतर भीष्मानें त्या सर्व बाणाचें निवारण करून सर्व राजांस तीन-तीन बाणानीं ताडित करतांच सकल राजानीं ही पांच पांच बाणानीं भीष्मास ताडित केला, पुनः भीष्मानें दोन दोन बाणानीं सकल राजांस ताडित करून योध्यांचीं धनुष्यें ध्वजांचीं अग्रें, कवचें शिरें सहस्त्रावधी तोडून पृथ्वी

वर पाडली, त्याकाळीं हें भीष्माचें लाघव सकल योध्यानीं पाहून त्याचा सत्का-
र केला आणि असें ह्मणाले कीं, शाबास भीष्मा, युद्धामध्यें आपलें रक्षण करून
शत्रूचा नाश करीत आहेस, असें युद्ध लाघव आजपर्यंत आह्मीं कोणाचें पाहिलें-
नाहीं, सकलराजे पराभूत जाहाले असें जाणून भीष्म त्या राजांस विसर्जित करू
न कन्यांशीं सहवर्तमान आपल्या भारत कुलाकडे निघाला, इतक्यांत महारथी-
शाल्वराजा मोठ्या त्वरेनें भीष्माच्या पृष्ठभागीं रण करण्याच्या इच्छेनें आला, ज-
सा एखादा गज हस्तिणीच्या इच्छेनें तिच्या जवळ असतां दुसरा बलाढ्य गज त्या
चा कटिपूर्वभाग दंतानें भिन्न करून त्याच्या पृष्ठभागीं उभा राहतो, तसा स्त्रीचीइ
च्छा करणारा शाल्व राजा भीष्माच्या पृष्ठभागीं येऊन बोलला कीं अरे उभा रा-
हा असें भाषण ऐकून भीष्म क्रोधानें निर्धूम अग्निसारखा प्रदीप जाहाला. नंत-
र आपला रथ माघारा फिरवून शाल्वाच्या सन्मुख आले त्या भीष्मास सकलरा-
जानीं पाहून त्याचें युद्ध पाहण्या करितां ते उभे राहिले नंतर ते बलशाली उभय-
तां वृषभा सारखी गर्जना करून एकमेकाच्या सन्मुख आले तेव्हां शाल्व राजा
नें सहस्त्रावधी बाणाचा भीष्मावर वर्षाव करून त्यास पीडित केलें, हें त्याचें ह
स्त कौशल्य राजानीं पाहून साधुसाधु अशा शब्दानें शाल्व राजाची स्तुती के-
ली ती ऐकून भीष्म क्रोधानें शाल्वास उभाराहा उभाराहा असें ह्मणोन आप-
ल्या सारथ्यास बोलला कीं, हे सारथ्या जिकडे हा पार्थिव शाल्व आहे तिकडे-
माझा रथ लौकर ने आणि गरुड जसा भुजंगास मारतो तसा मी जों पर्यंत या-
राजांचा संहार करीन तों पर्यंत माझा रथ त्याच्या पुढें उभा कर असें भाषण ऐकू
न सारथ्यानें भीष्माचा रथ शाल्वा पुढें नेतांच भीष्मानें वारुणास्त्राचा प्रयोग क
रून शाल्वाचे रथाच्याचार अश्वाचें मर्दन केलें नंतर राजानें जीं अस्त्रें टाकिलीं
होतीं तीं सर्व आपल्या अस्त्र बलानीं निवारित केलीं पुढें शाल्वराजास कांहींबा
णानीं ताडित करून त्याचा सारथी मारला आणि ऐंद्र अस्त्रानें त्याचे घोडे मा-
रिले असतां शाल्वराजा पराजित झाला हें पाहून भीष्मानें त्यास जिवंत सोड
तांच तो आपले नगरांत जाऊन स्वधर्मानें राज्य करूं लागला. इतर राजे स्वयं
वर पाहाण्या करितां जे आले होते तेही आप आपले राष्ट्रांत गेले याप्रकारें-
भीष्म त्या कन्यांस जिंकून नद्या, पर्वत व वृक्ष यांचें अतिक्रमण करीत हस्तना

पुरीं लौकरच आला तों इकडे विचित्रवीर्य राजा आपला पिता जो शांतनु यासा रखें पृथ्वीचें शासन करित होता. नंतर सर्व अरींचा युद्धांत क्षय करून भीष्मानें आणलेल्या काशी राजांच्या कन्या त्या आपला भ्राता जो विचित्रवीर्य यास देण्या विषयीं निश्चय करून सत्यवतीच्या अनुमतें विवाहाचा उपक्रम करण्यास आरंभ केला असतां काशी राजाची अंबा नामक ज्येष्ठ कन्या हास्य करून भीष्मास बोलली कीं, मी पूर्वी मनें करून शाल्व राजास वरला आहे व माझ्या पित्याचीही इच्छा तशीच होती हा विचार जाणून धर्माप्रमाणें जें कर्तव्य असेल तें तूं कर असें ज्येष्ठ कन्येनें विप्रसभेंत भाषण केलें असतां भीष्मास केल्या कर्माची मोठी चिंता होऊन त्यानें ब्राह्मणाच्या अनुमतें अंबेस आपले पित्याकडे जाण्यास आज्ञा दिली नंतर अंबिका आणि अंबालिका या दोन कन्या भीष्मानें आपल्या भ्रात्यास दिल्या, त्याकाळीं उभयतां कन्या राजास मिळाल्यावर त्यानें कन्येशीं रत होण्याची इच्छा केली. त्या कन्याही मोठ व प्रसन्न झालेल्या नसून काळे कुरळे केशानीं युक्त, लाल व उंच ज्याचीं नखें, ज्याचा कटि पश्चात् भाग व पयोधर पुष्ट होते, अशा त्या कन्यानीं आपल्यास हा पती योग्य मिळाला असें मानून त्याची उत्तम प्रकारें पूजा केली, तो विचित्रवीर्य रूपानें अश्विनी कुमारा सारखा व पराक्रमा विषयीं देवा सारखा असून सर्व स्त्रियांचें चित्त हरण करणारा होता त्यानें त्या स्त्रियांशीं एकांत स्थळीं सात दिवस पर्यंत विहार केला तो तरुण असतांच राजयक्ष्मा रोग त्यास झाला. त्या काळीं आप्त वैद्याकडून मित्रजनानीं बहुत उपाय केले परंतु त्या रोगामुळें राजा यम गृही गेला तेव्हां भीष्मास अत्यंत शोक होऊन त्यानें सत्यवतीच्या अनुमतें विचित्रवीर्याचीं प्रेत कर्में ऋत्विज व कुरुश्रेष्ठ जन यांजकडून करविलीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१०३ अध्याय एकशेंतीन.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, विचित्रवीर्याचें उत्तर कार्य जाहाल्या वर सत्यवती उभयतां स्नुषाचें शांतवन करून भीष्मास बोलली कीं, हे भीष्मा माझ्या पतीच्या वंशास सोमवंश असें ह्मणतात हा वंश मोठा धार्मिक आहे तुझा पिता शांतनु याच कुळांत होऊन तो मरण पावला त्याच्यामागें तूंच आतां वंश रक्षण करणारा आहेस यास्तव इत उत्तर वंशाची कीर्ती व संतान तुझेठायीं प्रतिष्ठित असो, जसा तुझा पिता उत्तम

व असंख्य शुभ कर्म करून स्वर्गी गेला, तसाच असंख्य धर्म व सत्य तुझेठायीं प्रतिष्ठित असो व नानाप्रकारच्या श्रुती तशींच सकल वेदांगें हीं तूं जाणतोस व तुझी धर्माची व्यवस्था व कुलाचार हे पाहून हे भीष्मा कांहीं कार्या करितां तुझी योजना करितें, ती अशीकीं, माझा पुत्र महावीर्यवान होतातो तुझा भ्राता असून तुलाही अत्यंत प्रिय होता तो बाल असतांच स्वर्गवासी झाला, त्याच्या त्या उभयतां भार्या काशी राजाच्या कन्या रूपयौवन संपन्न असून पुत्राची इच्छा त्यांस आहे यास्तव यांजपासून तूं पुत्र उत्पन्न कर ह्मणजे आपल्या कुलाची वृद्धी होईल. हे भीष्मा माझ्या आज्ञेनें तूं हा धर्म संपादन करण्यास समर्थ आहेस यास्तव आपल्यास राज्याभिषेक करून तूं सकल भरत कुलाचें पालन कर तसेच धर्मानें दारा संग्रह कर, आपल्या पितामहास नरकांत बुडवूं नको. असा सत्यवती मातेनें भीष्मास बोध केला असतां धर्मात्मा भीष्म असें बोललाकीं, हे माते निःसंशय परम धर्मच तूं मला सांगितलास परंतु आपल्या विषयीं माझी प्रतिज्ञा काय आहे व जे पूर्वी वृत्त तुझ्या करितां जाहालें हें तूं जाणतेस तसेंच हे सत्यवती पुनः मी आणखी अशी सत्यप्रतिज्ञा करितोंकीं, त्रैलोक्याचें राज्य, देवाचें राज्य किंवा त्याहून अधिक राज्य जरी मिळालें तथापि मी सत्याचा कधींही त्याग करणार नाहीं. पृथिव्यादि पंच महाभूतें आप आपल्या गुणाचा ही त्याग करतील परंतु मी सत्याचा कधींही त्याग करणार नाहीं असें भीष्मानें भाषण केलें असतां सत्यवती माता पुनः भीष्मास बोलती हे भीष्मा सत्याचे ठायीं तुझी स्थिती किती आहे हें मी आतां जाणलें, आपले तेजें करून तीन लोक दुसरे उत्पन्न करण्याची तुला शक्ती आहे, माझ्या करितां जें तूं पूर्वी सत्यभाषण केलेंस तेंही मी सर्व जाणलें, परंतु या काळीं आपद्धर्म जाणोन पितामहापासून प्राप्त झालेला जो राजभार त्याचें उल्लंघन करूं नको. हे भीष्मा जेणे करून आपल्या कुलाचा तंतु व धर्म नष्ट न होऊन आपले सुहृज्जन हर्षित होतील असें कर. अशी सत्यवती माता पुनःपुनः पुत्रास प्रेरणा करीत असतां पुत्र हेतूनें अत्यंत कृपण व दीन होऊन धर्म बाह्य भाषण करीत आहे असें जाणोन पुनः, भीष्म बोलतो हे माते सर्व धर्मास पहा धर्माचा नाश करूं नको, क्षत्रियानीं सत्या पासून भ्रष्ट होणें हें धर्मांत नाहीं आतां शांतनु राजास भूमंडळीं

संतान व्हावें अशी तुझी इच्छा आहे तर याविषयीं सनातन क्षात्र धर्म मागेंपासून चालत आला आहे तो तुला सांगतों, तो ऐकून हे सकल पुरोहित महाप्राज्ञ आपद्धर्म व अर्थशास्त्रांत निपुण आहेत यांच्या समक्ष लोकव्यवहार पाहून त्या धर्माचा स्वीकार कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१०४ अध्याय एकशेंचवथा:- भीष्म भाषण करितात हे माते, हैहय देशाचा अधिपति सहस्रार्जुनानें परशुरामाचा पिता जमदग्नी मारला असतांतो पित्याचा वध परशुरामास सहन न होऊन त्याणें सहस्रार्जुनास मारून व त्याचे सहस्र हस्त परशूनें तोडून टाकिले. नंतर पुनः धनुष्य घेऊन महास्त्राचा वारंवार प्रयोग करीत सकल क्षत्रियगण दग्ध केले. त्या अस्त्र प्रयोगा मध्यें लहान मोठे जितके क्षत्रिय होते तितके सर्व मरण पावले. या प्रमाणें एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली. पृथ्वीवर क्षत्रियकुल नाहींसे झालें तेव्हां त्यांच्या स्त्रियां पासून शेवटीं ब्राह्मणानीं प्रजा उत्पन्न केली तेव्हां पासून पुनः क्षत्रिय कुलाची वृद्धी जाहाली. ब्राह्मणा पासून जरी क्षत्रिय स्त्रीचे गर्भीं उत्पती जाहाली तथापि क्षत्रिय क्षेत्रांत उत्पन्न जाहाल्यामुळें ते सर्व क्षत्रियच जाणावे असा वेदाचे ठायीं निश्चय केला आहे. ज्याकाळीं क्षत्रियाच्या स्त्रिया ब्राह्मणाशीं रत जाहाल्या त्याकाळीं मनामध्यें धर्माचें चिंतन करूनच रत जाहाल्या असा क्षत्रियाचा पुनः उद्भव झाला तो लोकांत विदीत आहेच आणखी ही या विषयीं तुला पुरातन इतिहास सांगतों ऐक. पूर्वी कोणी एक उतथ्य यानामें करून विख्यात ऋषी होता त्याची ममता नामक भार्या सर्वांस मान्य अशी होती, उतथ्याचा कनिष्ठ बंधु बृहस्पती नामक देवांचा उपाध्याय असे. कोणे एके दिवशीं बृहस्पती ममतेच्या संन्निध येऊन मैथुनाची इच्छा करूं लागला असतां ती त्यास बोलली कीं, मी तुझ्या जेष्ठ भ्रात्या पासून गर्भिणी आहें यास्तव तूं माझाशीं रत होण्यास योग्य नाहींस, हा गर्भ पहा माझा कुक्षीच्या ठायीं वास्स करीत आहे. ज्या काळीं हा गर्भ माझे उदरांत राहिला त्या दिवसा पासून षडंग वेद यास मिळाले आहेत, तूं तर अमोघ रेता आहेस त्या पेक्षां माझा कुक्षींत दोन गर्भ राहण्यास अवकाश नाहीं ह्मणोनच मी तुझी प्रार्थना करित्यें कीं विषया पासून उपरम पाव, असें मम

नें भाषण केलें तथापि बृहस्पती आपल्या कामाचा प्रतिबंध करण्यास-
समर्थ झाला नाहीं. नंतर ती जरी अकामा होती तथापि तिशीं रत होऊन त्यानें यो
नीचे ठायीं रेतपात करीत असतां गर्भस्थ जीव बोलतो हे तात, अरे विषय करूं नको;
दोन गर्भ राहण्यास आत जागा नाहीं, तशांतून पूर्वीं मी एक आहेंच. तूं तर अमो
घरेता तेव्हां कांमला व्यर्थ पीडा कर्तोस. असें त्या गर्भानें उदरांतून भाषण के-
लें असतां बृहस्पतीनें ऐकून पुनः मैथुनास आरंभ केला, त्याकाळीं उदरस्थ-
गर्भानें आंतून आपले पाय योनी द्वारास लाऊन बृहस्पतीचें रेत आंत येऊं दि
लें नाहीं, तेव्हां तें रेत आंत न जातां पृथ्वीवर पडलें तें बृहस्पतीनें पाहून क्रोधानें
गर्भस्थ जो उतथ्य पुत्र त्यास शाप दिला कीं, अरे मूर्खा, या काळीं मीं रेतसेक केला
असतां त्याचा मार्ग तूं बंद केलास त्या पेक्षां तूं उत्पत्ती काळींच अंध होशील पुढें
तो पुत्र जाहाला त्याचें नांव दीर्घतमा ऋषी असें ठेविलें बृहस्पती समान ज्याची
कीर्ती आणि तेज होतें तसाच धर्मात्मा, वेद वेदांग पारग जरी होता तथापि-
जन्मांध जाहाला, पुढें त्यास विधीचे योगानें तरुणी रूपसंपन्न अशी एक ब्राह्म
णाची कन्या प्रद्वेषी नामक भार्या त्यास मिळाली पुढें कांहीं दिवसानीं उतथ्य ऋ
षीची संतान वृद्धी व्हावी ह्मणून या भार्येच्या ठायीं दीर्घतमा ऋषी पासून गोतमा
दिक महा यशस्वी पुत्र जाहाले, कांहीं दिवसानीं दीर्घतमा ऋषीनें सुरभी पुत्रा
पासून प्रकाश मैथुनाचा उपदेश घेऊन तो आपल्या पत्नी शीं मैथुन करूं लागला
तेव्हां पासून ज्याणें आपली मर्यादा टाकिली असा तो अमर्याद झालेला ऋषी-
सकल आश्रमातील मुनीनीं जाणोन ते क्रोधानें आप आपल्या मध्यें बोलले कीं,
काय हो हा ऋषी अमर्याद जाहाला आहे! आतां आपल्या आश्रमांत राहण्यास
योग्य नाहीं, आपण सर्व मिळून यास येथून घालवून देऊं, असें भाषण ऐकून-
दीर्घतमा ऋषीच्या स्त्रीनें ही विचार केला कीं, आपल्यास पुत्र मिळाला आहे त्यापे
क्षां आपण याचा त्याग करावा, दीर्घतमां ऋषी अगदीं निर्मर्याद वागूं लागला अ
सें जाणोन पती शीं ती भार्या द्वेष करूं लागली असें पतीनें जाणोन तो भार्येस-
बोलला कीं, हे भार्ये तूं माझाशीं द्वेष कां कर्तेस असें पतीचें भाषण ऐकून प्रद्वे
षी बोलत्ये, अरे भार्येचें पोषण केलें ह्मणजे त्यास भर्ता असें ह्मणावें अरे तूं तर
ज्मात्यंध तुला माझें भरण करण्याची शक्ती नाहीं ह्मणोन पुत्रा सहवर्तमान-

आजपर्यंत मीच तुझें भरण केलें, ह्मणून मी अत्यंत श्रमी जाहाल्यें, याजमु ळें तुझें भरण करण्यास मला शक्ती नाहीं भीष्म बोलतो हे माते असें स्त्रीचें भाषण ऐकून दीर्घतमा ऋषि क्रोधानें पुत्राशीं सह वर्तमान प्रद्वेषी भार्येस बोलतो कीं, हे भार्ये मला क्षत्रियाकडे घेऊन जा, ह्मणजे तुला जितकें द्रव्य पाहिजे तितकें देईन. असें भाषण ऐकून प्रद्वेषी भार्या बोलल्ये हे विप्रा तुझें धन मला नको कारण तुझें धन हें केवळ दुःखाचें कारण आहे. तुला जें कर्तव्य असेल तें कर परंतु मी अतःपर तुझें भरण करावयाची नाहीं दुसरा पती करीन असें स्त्रीचें भाषण ऐकून दीर्घतमा ऋषी बोलला कीं, आज पर्यंत ज्या गोष्टी घडल्या त्या घडोत परंतु यापुढें सकलस्त्रियांस यावत् जीव पर्यंत एकच पती होईल. प्रथम पती मृत जरी जाहाला तथापि दुसरा व्हावयाचा नाहीं, जर ती स्त्री दुसऱ्यापाशीं जाईल तर तात्काळ पतीत होईल. आणि विधवा स्त्रियांपाशीं धनसमृद्ध जरी असेल तथापि पुरुषाचा संभोग नसल्यामुळें तें व्यर्थ जाणावें उपभोगास युक्त होणार नाहीं आणि विधवा स्त्रीयांची लोकांमध्यें अपकीर्ती होईल असें पतीचें भाषण ऐकून ब्राह्मणीस मोठा कोप आला आणि तिनें आपले पुत्रास आज्ञा केली कीं, अरे याला गंगेंत नेऊन बुडवा. अशी मातेची आज्ञा होतांच ते गोतमादिक पुत्र कोपित होऊन त्याणी आपले पित्यास एका लघुनौकेस बांधून ती गंगेंत नेऊन बुडविली ते समयीं पित्यास ते असें बोलले कीं, अरे तूं अंध जाहालास, यास्तव आह्मीं तुझें का पोषण करावें. असें बोलून ते गृहीं आले. नंतर तो अंधऋषी नौकेच्या योगानें गंगेच्या प्रवाहांत वहात वहात कोणी एक देशांत गेला, तेथें सर्व धर्म वेत्ता असा बलिनामक राजा होता त्याणें तो ऋषी वाहात चालला आहे हें पाहून त्यास बाहेर काढिला. नंतर आपल्यास पुत्रसंतान नाहीं त्यापेक्षां त्याजकडून संतानोत्पत्ती करून घ्यावी असा निश्चय करून त्या ऋषीस गृहीं आणिलें आणि त्यास सांगितलें कीं, हे ऋषे माझे भार्येचे गर्भीं तूं पुत्र उत्पन्न कर. असें राजाचें भाषण ऐकून ऋषीनें तें अंगीकृत केलें असतां राजानें आपली सुदेष्णा नामक भार्या होती तिला ऋषीकडे जाण्यास आज्ञा दिली, परंतु तो ऋषी अंध व वृद्ध होता यास्तव सुदेष्णेस नरुचून तिची एक दासी होती तिला त्या वृद्धाकडे पाठविली, तो तिशीं रत होऊन त्याजपासून त्या शूद्री

च्या ठायीं काक्षीवदादिक पुत्र जाहाले, हें कृत्य राजास विदित नसल्यामुळें हे पुत्र माझ्या भार्येच्या ठायीं जाहले असें समजून राजा ऋषीस बोलला, हे पुत्र माझे आहेत. महर्षी राजास बोलतो हे पुत्र तुझे नाहींत शूद्रयोनीचे ठायीं माझ्या पासून जाहाले. मी अंध व वृद्ध असें जाणोन तुझे सुदेष्णा नामे भार्येनें माझा कडे आपली दासी पाठविली, त्या दासीचे हे काक्षीवदादिक पुत्र असे समज. असें ऋषीचें भाषण ऐकून त्यास पुनः राजानें सुप्रसन्न केला आणि आपली भार्या सुदेष्णा इला आज्ञा दिली कीं, तूंच या ऋषीकडे जा, अशी पतीची दुसरी आज्ञा होतांच सुदेष्णा ऋषीकडे गेली त्याकाळीं अंध ऋषीनें त्या स्त्रीचीं अंगें स्पर्श करून पाहिलीं आणि तो बोलला कीं, हे देवी, तुझा पासून जे कुमार होतील ते आदित्यासारखे तेजस्वी असतील पुढें अंग, वंग, कलिंग, पुंड्र व सुह्म असे पांच पुत्र जाहाले त्या त्या पुत्राच्या नामानें एक एक देश प्रसिद्ध झाला अंगाचा अंग, वंगाचा वंग, कलिंगाचा कलिंग, पुंड्राचा पुंड्र, व सुह्माचा सुह्म असे देश प्रसिद्ध झाले. असा बलिराजाचा वंश त्या ऋषी पासून झाला, असे दुसरेही बहुत क्षत्रिय वीर्यवान् बलाढ्य ब्राह्मणा पासून या पृथ्वीवर झाले आहेत, हा प्रकार ऐकून माते तुझा इच्छेस येईल त्याप्रमाणें करावें. असा विषय या अध्यायांत आहे.

१०५ अध्याय एकशें पांचवा:— भीष्म भाषण करितात हे माते, आतां भरत वंशाची वृद्धी होण्याचा तुला एक उपाय सांगतों. कोणी एक विद्वान ब्राह्मणास धन दान करून विचित्रवीर्याच्या क्षेत्राच्या ठायीं प्रजोत्पादन करण्या विषयीं त्याची योजना करावी. असें भीष्माचें भाषण ऐकून सत्यवती किंचित लज्जित झालेली हास्य करून बोलत्ये कीं, हे महाबाहो, जें तूं बोललास तें सत्य आहे. परम विश्वासानें कुळाची संतान वृद्धी होण्या विषयीं मी तुला सांगितलें तें या द्वें भाषण प्रत्याख्यान करण्यास तूं योग्य नाहींस कारण माझें भाषण आपद्धर्मास अनुगुण आहे, तूंच आमच्या कुळामध्यें आतां धर्मस्वरूप आहेस, तुझे ठायीं आम्हीं सत्यप्रतीष्ठित केलें, तूंच आमची उत्तमगती याकरितां माझें भाषण ऐकून इत उत्तर, काय कर्तव्य तें कर, परंतु मीजें काय मनांत योजिलें आहे तें तुला सांगत्यें, माझा पिता धर्मार्थवेत्ता होता त्याणें एक पूर्वी नदी मध्यें नौका धर्मार्थ स्थापन

केली होती त्या नौकेवर मी स्थित होत्यें कोणे एके दिवशीं मी यौवनावस्थेंत त्या-
नौकेवर असतां धर्मार्थवेत्त्यां मध्यें श्रेष्ठ जो पराशर नामक ऋषी तो यमुना नदी-
च्या तीरीं येऊन माझ्या नौकेंत बसला आणि परम प्रीतीनें नेण्या करितां मी नौ
का प्रेरित केली, त्या काळीं नौकेंतच तो मला पाहून कामातुर झालेला सांत्वपू
र्वक माझ्याशीं मधुर भाषण करूं लागला. तेव्हां मी तर त्याच्या शापभयानें भि
ऊन गेल्यें, इकडे पित्याचें ही भय खरें. नंतर मी त्या ऋषीस कठीण वरप्रदान दे-
ण्याची अडचण घातली तीही त्याणें स्वीकृत केली, तेव्हां मी त्याचें प्रत्याख्यान-
करण्यास समर्थ झाल्यें नाहीं. मग मी बाला असतां ही त्या ऋषीनें मला वश क
रून त्या नौकेमध्यें अंधःकार करून माझ्याशीं रत झाला तों तत्काल माझ्या उ-
दरांत गर्भ धारण जाहाला तेव्हां ऋषीनीं मला सांगितलें कीं, हा माझे पासून
तुझे ठायीं गर्भ राहिला त्यास याच नदीच्या द्वीपांत टाकून दे, ह्मणजे तूं पूर्वीप्र
माणेंच कन्या होशील, असें मुनीनीं सांगितलें, त्या प्रमाणें मी केलें, तो पाराश
र्य नामक ऋषी मी कन्या असतांच जाहाला त्या पाराशर्यास द्वैपायन ह्मणता-
त त्याणें आपल्या तपाच्या योगें वेदाचे विभाग केले ह्मणोन त्यास व्यास असें
ह्मणो लागले, तो कृष्ण स्वरूपच असल्या मुळें त्यास कृष्ण ही ह्मणतात तो निरं
तर सत्यवक्ता व शांत असून त्याणें आपलें पाप तपानें जाळून टाकिलें आहे.
जा काळीं तो जाहाला त्या काळीं पित्यासहवर्तमान तो वनामध्यें गेला. तो अप्र
तीम कांति व्यास विचित्रवीर्याचा भ्राता जाहाला आहे यास्तव भ्रातृक्षेत्राचे ठा-
यीं तो आपत्य उत्पन्न करील अशी मी योजना केली आहे. ज्या काळीं व्यास मा
झ्यापासून गेला त्या काळीं त्याणें मला असें सांगितलें आहे कीं, संकट काळीं
जेव्हां तूं माझें स्मरण करशील तेव्हां मी तेथें येऊन तुला दर्शन देईन. हे भीष्मा
जर तुझी इच्छा असेल तर मी त्याचें आतां येथें येण्या विषयीं स्मरण करित्यें-
या विषयीं तुझें अनुमत असल्यास सांग ह्मणजे तो येऊन विचित्र वीर्याच्या
क्षेत्राचे ठायीं पुत्र उत्पन्न करील. असें सत्यवतीनें व्यासाचें वर्णन केलें असतां-
भीष्म आपले अंजुली पुढें जोडून भाषण करितो कीं, हे माते, धर्म, अर्थ आणि
काम हे तीन जो जाणतो व अर्थाशीं अर्थाचें व धर्माशीं धर्माचें व कामाशीं का-
माचें जो अनुबंधन करितो तो श्रेष्ठ जाणावा. असा व्यास आहे त्या पेक्षां हें तु-

हें भाषण धर्मार्थयुक्त असून कुलाचें वर्धन करणारें आणि श्रेयस्कर ही आहे, जें तुला रुचेल तें मला ही रुचेल असें जाण. असें भीष्म बोलला असतां सत्यवतीनें तत्काल व्यासाचें चिंतन केल्या बरोबर तो मातेच्या अग्रभागीं आला ते व्हां मातेनें स्वसुतास पाहून यथाविधी त्याची पूजा केली आणि बाहूनी आलिंगन करून नेत्रोदकानें पुत्रावर अभिषिंचन केलें, अशा मातेस पाहून व्यास अभिवादन पूर्वक सत्यवती मातेस बोलले कीं, हे धर्मतत्वज्ञे जें तुला इच्छित आहे-तेंच संपादन करण्याविषयीं मी येथें आलों आहें, आतां माझें रक्षण करून जें तुला काय प्रीय आहे तें मला सांग. नंतर उपाध्यायानें यथाविधी मंत्र पूर्वक व्यासाची पूजा करून त्यास आसनावर बसविलें असतां सत्यवती कुशल प्रश्न करून बोलली कीं, हे व्यासा, माता आणि पिता या उभयतां पासून पुत्र होतात तेव्हां पुत्राचा स्वामी जसा पिता होतो तशी माता ही आहे पूर्व पुण्यानें मी प्रसूत होऊन तूं जसा माझा पुत्र पूर्वीचा आहेस तसाच विचित्रवीर्य माझ्या पासून जाहाल्या मुळें तुझा कनिष्ठ बंधु होय पित्याच्या संबंधानें भीष्म जसा विचित्र वीर्याचा बंधु तसा तूं मातृ संबंधानें त्याचा ज्येष्ठ बंधु असल्या मुळें तुझा तो कनिष्ठ बंधु पुत्रा सारखाच जाण. आतां हा भीष्म सत्य विक्रमी असल्या मुळें आपत्य व राज्यानु शासन या विषयीं इच्छा करीत नाहीं ह्मणोन तुझें स्मरण केलें, यास्तव विचित्र वीर्याच्या कुल संतानाची वृद्धी तूं कर. असें भाषण ऐकून व्यास-बोलतात. हे माते सत्यवती, प्रवृत्ती निवृत्यात्मक मार्ग तूं जाणतेस यास्तव तुझ्या आज्ञेनें धर्माचें कारण जाणोन तुझें इष्ट जें काय आहे तें मी करण्यास सिद्ध आहें मी आपले भ्रात्यास मित्रावरुण सदृश पुत्र देतों परंतु राजाच्या उभयतां स्त्रियांनीं मी सांगतों तें व्रत एक संवत्सर पर्यंत केलें पाहिजे कारण व्रतहीन अंगना जी असेल ती माझ्याकडे येण्यास समर्थ नाहीं असें भाषण ऐकून सत्यवती बोलत्ये हे पुत्रा इतका विलंब नको जेणें करून राजस्त्रिया सत्वर गर्भधारण करतील असें कर. अराजक राष्ट्र जाहाले असतां प्रजा अनाथ होऊन तत्काल नाश पावत्ये यास्तव राष्ट्रांत राजा असणें योग्य आहे, ह्मणोन तुझी प्रार्थना करत्यें, त्या गर्भानें भीष्म रक्षण करील. असें मातेचें भाषण ऐकून व्यास बोलतो हे माते, जर भ्रातृ स्त्रियांस मी अकालीक पुत्र द्यावा अशी तुझी इच्छा

आहे नर माझें रूप मोठें भयंकर आहे तें या स्त्रियांनी सहन केलें असतां तेंच त्यांचें व्रत असें जाणीन, पुत्र होण्यास कांहीं कठीण नाहीं. असें व्यासानें सत्यवतीस भाषण करून सांगितलें कीं, काशी राजाच्या कन्येनें शुचिर्भूत होऊन वस्त्रालंकार धारण करून शयनस्थानीं माझ्या आगमनाची इच्छा करावी. असें बोलून व्यास अंतरधान पावले. नंतर सत्यवतीनें स्नुषेकडे जाऊन धर्मार्थसमायुक्त हितकारक असा तिला बोध केला कीं, हे कौशल्ये तुला मी एक धर्मतंत्र सांगत्यें तें तूं आपले मनांत समज. या भारत वंशाचा उच्छेद जाहाला तेणेकरून मी अत्यंत व्यथित जाहाल्यें, असें भीष्मानें पाहून भारत वंशाची वृद्धी होण्या विषयीं एक बुद्धि त्याणें मला सांगितली आहे ती तुझ्या स्वाधीन आहे, तिचा तूं अवलंब केला असतां नष्ट जाहालेल्या भरत वंशाचा पुनः उद्धार होईल. हे सुश्रोणी, इंद्रासमान तूं पुत्र प्रसवशील आणि तो पुत्र तुझ्या मोठा राज्य कर्ता होईल. असें सत्यवतीनें उभयतां स्नुषांस सांगून त्यांचें मन तिकडे लावलें आणि स्वतः ब्राह्मण भोजन व देवऋषी अतिथी यांची तृप्ती जेणेंकरून होईल तशी केली. असा विषय या अध्यायांत आहे.

१०६ अध्याय एकशें साहावा.— वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, कोणे एके दिवशीं सत्यवतीची स्नुषा अंबिका ऋतुस्नात जाहाल्यावर शयन स्थानीं स्थित असतां सत्यवती बोलली कीं हे कौशल्यकन्ये तुझा देवर आज मध्य रात्रीस येथें येईल त्या काळीं तूं धैर्य धरून त्यास पहा, भिऊं नको, पुत्र रूपानें तो तुझ्या उदरांत उत्पन्न होणार आहे, असें भाषण ऐकून अंबिका उत्तम शुभकारक शयन स्थानीं स्थित होऊन भीष्म व अन्य कुरुश्रेष्ठ यांचें चिंतन करीत असतां आपल्या नियमा प्रमाणें व्यास तेथें आला, तों शयनागारामध्यें दीप प्रज्वलित होते हें पाहून शयन स्थानी गेला तेव्हां व्यासाची कपिल वर्ण जटा व प्रज्वलित जाहालेले नेत्र व मुखावरचे केश भयंकर पाहून अंबिकेनें नेत्र मिटले. असतां मातेच्या प्रिया कर्ता व्यास तीच्याशीं रत जाहाले, तें भयंकर रूप पाहाण्या विषयीं ती समर्थ जाहाली नाहीं नंतर रती जाहाल्यावर व्यास शयन स्थाना पासून निघाले असतां सत्यवती माता पुत्रास बोलली कीं, हे व्यासा इला जो पुत्र होईल तो गुणवान

असून राजपुत्र होईल असें ऐकून व्यास बोलला कीं, हे माते, इचे गर्भी जो पुत्र होईल त्यास दहासहस्र हत्तींचें बळ असून सर्व गुणानीं युक्त असा होईल आणि या माहात्म्या पासून पुढें शंभर पुत्र होतील; परंतु संभोग काळीं इचें वैगुण्य जाहलें ह्मणोन हा पुत्र उत्पत्ती काळींच अंध होईल, असें व्यासाचें भाषण ऐकून सत्यवती पुत्रास बोलली कीं, हे व्यासा, अरे जो अंध आहे तो कुरूचा अधिपती होण्यास योग्य नाहीं. तर आतां असें करकीं, वंशाचा गोप्ता, पित्याच्या वंशाचा उद्धार करता, राज्यासनास योग्य असा द्वितीय पुत्र देण्यास तूं योग्य आहेस, असें ऐकून व्यासानें प्रतिज्ञा केली कीं, माते फार चांगलें आहे, त्या प्रमाणें घडेल, असें ह्मणोन तो गेला. पुढें कांहीं दिवसानीं अंबिका प्रसूत होऊन तिला अंध पुत्र झाला. पुनः सत्यवती अंबालिकेस बोलल्ये हे स्नुषे, पूर्ववत प्रमाणें ऋषीचें आवाहन कर ह्मणजे तो तुझ्या शयन स्थानीं येईल असें भाषण ऐकून अंबालिकेनें ऋषीचें आवाहन केलें असतां ऋषी आले, त्यांस पाहून ती भयानें पांडुर वर्ण झाली, हें व्यासानें पाहून तो बोलला कीं हे कोसल कन्ये मला पाहून तूं पांडुर वर्ण जाहालीस तर तुझा पुत्र पांडूरच होऊन पांडु या नामें पृथ्वीवर प्रख्यात होईल. असें बोलून तो ऋषी शयनागारापासून निघाला असतां सत्यवतीनें पाहून तीणें पुत्रास प्रश्न केला तो ऐकून व्यासानीं मातेस असें सांगितलें कीं, त्या बाळास पांडुरता होईल. त्या काळीं पुनः सत्यवतीनें व्यासास आणखी एक पुत्राची याज्ञा केली असतां व्यासानीं बरें आहे असें उत्तर केलें. कांहीं काळानीं अंबालिकेस पांडुर लक्षणानीं युक्त असा पुत्र जाहाला, त्या पांडु पासून पांच पांडव जाहाले. पुढें ज्येष्ठ जी अंबिका तिला पुनः ऋतु काळ प्राप्त जाहाला असतां सत्यवतीनें ऋषीकडे तिची योजना केली, त्या काळीं अंबिकेनें तसें न करितां अप्सरे समान आपली एक दासी होती ती ऋषी कडे पाठविली असतां तिनें ऋषीचा परम सत्कार केला. नंतर एकांतीं ऋषी तिच्याशीं रत होऊन संतोष पावले आणि शयनापासून उठते समयीं दासीस बोलले कीं, तूं दासी असतांही अदासी होशील, तुझ्या पासून जो पुत्र होईल तो सकलांचा कल्याण कर्ता, धर्मात्मा व सकल बुद्धिमंतां मध्यें श्रेष्ठ असा होईल, तो पुढें विदुर या नामें पुत्र झाला. हा धृतराष्ट्र व पांडू यांचा भ्राता होय. पूर्वी यम धर्मास माडव्य ऋषीचा शाप झाला होता त्या क्र

रणास्तव धर्मच विदुर रूपानें अर्थ तत्वज्ञ,काम क्रोध विवर्जित असा जाहाला. हें सर्व वर्तमान द्वैपायनानीं सत्यवती जवळ येऊन शूद्री पासून पुत्रजन्म झाला, असें सांगून ते तेथेंच अंतर धान पावले.ते हे विचित्र वीर्याच्या क्षेत्राचे ठायीं द्वैपायना पासून उत्पन्न जाहालेले देव गर्भा सारखे कांती मान व कुरुवंशाचें वर्धन करणारे पुत्र होत. असा विषय या अध्यायांत आहे.

१०७ अध्याय एकशेंसातवा:– जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायन-ऋषे,हा यमधर्म कोण त्या ऋषीच्या शापानें शूद्र योनींत झाला?असा प्रश्न ऐकून वैशंपायन बोलतात हे राजा, कोणी एक मांडव्य नामक ऋषी परम विख्यात तपस्वी असा होता,तो आपल्या आश्रम द्वारांत वृक्षाच्या अधोभागीं ऊर्ध्व बाहू करून मौन व्रत धारण केलेला बहुत काळ तप करीत असतां कोणी एक धनीकाच्या गृहांतील द्रव्य तस्करानीं चोरून ते जात होते,त्याच्या मागें द्रव्य रक्षक आले तेव्हां चोरानीं तें द्रव्य तेथें पृथ्वीमध्यें पुरून ते ऋषीच्या आश्रमी गुप्त राहिले,तों इतक्यांत द्रव्य रक्षकांनीं ऋषीच्या आश्रमी येऊन जिकडे तिकडे त्यांचा शोध केला,परंतु ते सांपडले नाहींत,ह्मणोन त्यानीं ऋषीस विचारिलें, हे तपोधना,चोर कोणत्या मार्गानें गेले तें सांग ह्मणजे आह्मीं त्याचा शोध करूं,असें त्यांचें भाषण ऐकून ऋषी कांहींच बोलले नाहीं. तेव्हां द्रव्य रक्षकांनीं त्याच आश्रमांत चोरांचा शोध केला तों तेथें ते लीन होऊन राहिले होते ते रक्षकांनीं पाहातांच त्यांची द्रव्या विषयीं शंका मुनीवरच उत्पन्न झाली.नंतर त्यांणीं चोरांस व मुनीस राजा जवळ नेऊन जाहालेलें वर्तमान त्यास सांगतांच राजआज्ञा जाहाली कीं, यांचा वध करावा.नंतर रक्षकांनीं एक शूळ भूमी मध्यें पुरला आणि त्याजवर त्या तपस्व्यास चढवून व तें धन घेऊन ते राजा कडे गेले. इकडे तो धर्मात्मा ऋषी शूलाग्र भागीं बहुत दिवस निराहारी जरी होता तथापि मृत जाहला नाहीं,तसेंच प्राण त्याणें धारण करून वेदाचें अध्ययन करीतच असे. हें कृत्य पाहाण्यास सकल ऋषी आले होते तेव्हां त्या मांडव्यास पाहून ते संताप पावले.नंतर रात्रीं त्यानीं शकुनी पक्ष्याचें रूप धरून आपली शक्ती,स्वरूपें ऋषीस दर्शवून बोलले कीं, हे ब्रह्मन् ज्या पापाच्या योगें तुला हें दुःख झालें असें तूं पातक तरी काय केलें होतेंस तें-आह्मास सांग?असा विषय या अध्यायांत आहे.

१०८ अध्याय एकशें आठवा— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पर्ण स्वरूप ऋषीनीं त्या ऋषिश्रेष्ठास प्रश्न केला असतां तो बोलला कीं, अहो माझा कोणीच अपराध नकेल्यामुळें मी कोणावर दोष देईत नाहीं, मी आपलेंच कर्म भोगितों. हें वर्तमान रक्षकांनी कांहीं दिवसानीं राजास सांगितलें. तेव्हां राजानें हा अपराधी नाहीं तस्मात् याचें निर्मोचन शूलापासून करावें, असा मंत्र्यां सहवर्तमान विचार करून ऋषीची प्रार्थना करितो कीं, हे ऋषीसत्तम मी मोहें करून तुह्मांस जो अपकार केला त्याची क्षमा करावी. असें ऐकून ऋषीनीं त्याच्या अपराधाची क्षमा केली आणि शूलावरून ऋषीस राजानें काढला. त्या काळीं थोडें-सें शूलाग्र ऋषीच्या हृदयांत मोडून राहिलें तें निःशेष निघालें नाहीं तथापि अंतरगत शूलाग्र असतांच तो ऋषी पुनः तप करण्यास गेला, तपाच्या योगें-ज्याणें इतरांस मिळण्यास अशक्य असे लोक जिंकिले. त्या काळीं त्याचें नांव अणी मांडव्य असें पडलें. कोणे एके काळीं तो ऋषी धर्माच्या घरीं जाऊन धिःकार पूर्वक त्यास असें बोलला कीं, हे धर्मा, मी नजाणतां कोणतें दुष्कृत कर्म केल्यामुळें ही अशी माझी अवस्था झाली हें लौकर सांग नाहींतर माझ्या तपाचें बल काय आहे ते पाहा. असें ऐकून धर्म बोलतो, अरे तपोधना, कोणी एका क्षुद्र जंतूच्या पुच्छास तूं कांटा टोंचलास त्या योगें तुला हें फल प्राप्त जाहालें. जसें-स्वल्प दानानें बहुत फल प्राप्त होतें तसा हा अधर्म अतिशय दुःख देणारा झाला. असें धर्माचें भाषण ऐकून अणीमांडव्य बोलतो हे धर्मा, हें कर्म मी कोणच्या काळीं केलें तें मला सांग, असें भाषण ऐकून धर्म बोलतो, हे ऋषे, तूं बाल असतां हें कर्म केलेंस. असें भाषण ऐकून ऋषी बोलतो अरे बाबा जन्म दिवसा पासून द्वादश वर्षे पर्यंत बाल्या अवस्था असत्ये त्यांत जें कर्म केलें तो अधर्म असें समजूं नये असा धर्मशास्त्राचा निश्चय आहे, असें असतां मला-कां हा मोठा दंड केलास? अरे सर्वभूत वधापेक्षां ब्राह्मण वध श्रेष्ठ आहे तर हे धर्मा, आतां तूं मनुष्यांत शूद्र योनी मध्यें उत्पन्न होशील आणि मी अतःपर अशी लोकां मध्यें मर्यादा स्थापन करितों कीं, जन्म दिवसा पासून चवदा वर्षें पर्यंत कोणी कांहीं कर्म केलें तथापि पातक व्हावयाचें नाहीं. त्यानंतर तो दोषी होईल. असा अणीमांडव्य ऋषीचा शाप धर्मास जाहाला. त्या योगें धर्म विदुर-

रूपानें शूद्रयोनींत आला. असाविषय या अध्यायांत आहे.

१०९ अध्याय एकशें नववा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा धृतराष्ट्र, पांडु आणि विदुर हे तीन बंधु जाहल्या पासोन कुरुजांगल देश सकल कौरव वंश आणि कुरुक्षेत्र हे तिन्ही दिवसानदिवस वृद्धीस पावले. समग्र पृथ्वी रसवंत धान्यानीं समृद्ध जाहाली, ज्याऋतुकाळीं पर्जन्य अपेक्षित त्याच ऋतू मध्यें पर्जन्य पडूं लागला, बहुत पुष्पें आणि फळें येणे करून द्रुम समृद्ध जाहले, वाहनें व मृगपक्षी आनंदीत झालीं व कृत युगा सारखे सर्वत्र धर्म यत्नशील व सत्यव्रती परस्पर प्रीतीनें युक्त असून लोभशून्य असे लोक झाले. उत्तर कुरूशीं सहवर्तमान दक्षण कुरु, देव, ऋषी चारणाशीं स्पर्धा करीत-संचार करूं लागले. ज्याच्या राज्यांत कोणी कृपण व विधवास्त्री नाहीं, ज्याचे राष्ट्रामध्यें कूपादिक समृद्ध झाले, असें भीष्मानें राज्य रक्षीत असतां सकल देश सुखी जाहाला. राष्ट्रनिवासी मोठमोठ्या जनाचे कुमार तसेच पौरजानपद परमोत्सुक जाहाले सकल लोकांच्या गृहांत दान करा, उपभोग करा असे शब्द निरंतर होऊं लागले. धृतराष्ट्र, पांडु आणि महामती विदुर या तिघांस भीष्मानेंच परिरक्षित केलें. या त्रिवर्गाचे भीष्मानेंच संस्कार करून व्रत-आणि अध्ययन या मध्यें त्यांस कुशल केलें, त्यांस यौवनावस्था आल्यावर ते धनुर्वेद वेद, गदायुद्ध, गज शिक्षा व नीती शास्त्र इत्यादिकांमध्यें प्रविण जाहाले. सकलांपेक्षां पांडु धनुर्विद्येमध्यें श्रेष्ठ व धृतराष्ट्र बलानें अधिक होता. तीन लोकांत विदुरा सारखा कोणी नाहीं साक्षात् धर्माचीच मूर्ती असें त्यास सर्व लोक ह्मणत. शांतनु राजाचा वंश नष्ट जाहाला होता तो पुनः उद्धार पावला. अशीं भाषणें होऊं लागलीं. वीरांसप्रसवणाऱ्या स्त्रियां मध्यें काशी राजाच्या कन्या श्रेष्ठ, देशामध्यें कुरजांगल देश श्रेष्ठ, सर्वधर्म वेत्यांमध्यें भीष्म श्रेष्ठ आणि नगरांमध्यें हस्तनापुरश्रेष्ठ, अशी सर्व लोकांत प्रसिद्धी जाहाली. धृतराष्ट्र नेत्रहीन होता व विदुर दासी पुत्र होता ह्मणोन ते राज्याधिकारी नाहीं असें जाणोन पांडु, राज्यासनीं बसला. कोणे एके काळीं भीष्मानें विदुरास कांहीं एक उचित भाषण केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

११० अध्याय एकशें दाहावा:- भीष्म बोलतात हे विदुरा, तुमच्या कुळांत जे राजे जाहाले ते सर्व धर्मवेत्ते आणि माहात्मे होते त्याणीं हें राज्य आज पर्यंत चांगल्या रीतीनें केलें पुढें हें कुल नष्ट होण्याचा प्रसंग आला. तेव्हां मी व सत्यवती आणि माहात्मा द्वैपायन व्यास यांच्या अनुमतें तुमच्यासारख्या कुलतंतूचे गर्यीं हें कुल स्थापन केलें. आतां वसुदेव पिता जो शूर व सुबल व मद्रेश्वर यांच्या कन्या कुलीन असून, रूपवती व पुत्र होण्यास योग्य अशा आहेत, यास्तव आपल्या कुलाची संतान वृद्धि होण्यासागीं या कन्यांचा वैवाहिक संबंध करावा अशी माझी बुद्धी आहे, हे विदुरा तुझ्या मनास कसें येतें तें सांग. असें भीष्मानें भाषण ऐकून विदुर बोलतो हे भीष्मा तूं आमचा मातापिता व गुरु आहेस, आतां जसें तुझ्या विचारास येईल तसें या कुलाचें हित कर. असें भीष्म व विदुर यांचें भाषण जाहाल्यावर कोणी ब्राह्मणानें भीष्मास असें सांगितलें कीं, सुबलाची कन्या जी गांधारी इणें श्रीभगनेत्र हरशिवाचें आराधन करून शंभर पुत्राचा वर संपादन केला. असें भाषण भीष्मानें ऐकून गांधार राजाकडे दूत पाठविला, तो दूत सुबलाकडे गेल्यावर तेथें विचक्षणा जाहाली कीं, धृतराष्ट्र अंध आहे परंतु त्याचें कुल व वंशाची ख्याती व स्वभाव हे गुण चांगले आहेत, तेव्हां त्यास कन्या देण्यास चिंता नाहीं. नंतर गांधारीस धृतराष्ट्रास देण्या विषयीं सुबलानें निश्चय केला. हें वर्तमान गांधारीस समजतांच तिणें एक वस्त्र बहुत बळकट असें सिद्ध करून आपला पती अंध आणि आपण नेत्रयुक्त येणे करून पतीची हेळणा न होऊन आपलें पातिव्रत्य रक्षित व्हावें या हेतूनें तें वस्त्र आपले नेत्रास बांधिलें. नंतर गांधार राजाचा पुत्र जो शकुनी याणें आपली स्वसा गांधारी इला हस्तनापुरीं नेली आणि परम सत्कारानें धृतराष्ट्रास ती भीष्माच्या अनुमतें दिली. नंतर भीष्मानें त्याचा सत्कार केल्यावर तो स्वनगरीं आला. गांधारीही उत्तम आचारानें सकल कौरवांचा संतोष करून राहिली. असा वि० या अध्या० आहे.

१११ अध्याय एकशें अकरावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, सर्व यादवांमध्यें श्रेष्ठ जो वसुदेवाचा पिता शूर, त्याची कन्या पृथानामक या पृथ्वीवर रूपानें अप्रतीम होती ही, होण्याचे पूर्वी इच्या पित्यानें भोजराजापाशीं अशी प्रतिज्ञा केली होती कीं, तूं अनपत्य आहेस त्याजपेक्षां मला जें

प्रथम आपत्य होईल तें तुला देईन. त्या प्रमाणें ही पृथानामक कन्या होतांच ती त्या शूरानें कुंति भोजराजास दिली असतां त्यानें ब्राह्मण, अतिथी यांचा पूजनाकडे तिला योजिली. कोणी एके दिवशीं उग्रतपस्वी ब्राह्मण दुर्वास नामक-ऋषि कुंती भोजाचे गृहीं आला असतां पृथेनें त्या उग्रतपस्व्याचा संतोष सर्वप्रकारें केला, तेणे करून ऋषी संतुष्ट झाला आणि त्यानें या कन्येस कांहीं भावी संतान प्रतिबंध आहे असें पूर्वी जाणोन आपद्धर्मानुरोधानें अभिचारिक मंत्राचा उपदेश करून पृथेस सांगितलें कीं, या मंत्रानें ज्या ज्या देवाचें तूं आवाहन करशील त्या त्या देवाच्या प्रभावानें तुला पुत्र होईल. असें ऐकून कुंतीस अत्यंत कौतुक जाहालें. कोणे एके दिवशीं पृथा, कन्या अवस्थेंत असतांच तिणे मंत्रें करून-सूर्याचें आवाहन केलें तों साक्षात् भास्कर कुंतीच्या अग्रभागीं येऊन उभा राहिला. हें अद्भुतचरित्र पाहून कुंती विस्मयातें पावली तेव्हां सूर्य नारायण कुंतीस बोलला कीं, हे पृथे मी सूर्य आहें, तुझें कोणतें कार्य करूं, असें भाषण ऐकून-कुंती बोलली कीं, हे सूर्या कोणी एक ब्राह्मणानें मलाही विद्या देऊन पुत्र होण्याचा वर दिला आहे, त्याची परिक्षा पाहाण्यासाठीं मंत्रानें तुझें आवाहन केलें हा-माझा मोठा अपराध जाहाला याची क्षमा कर. असें कुंतीचें भाषण ऐकून सूर्य बोलतो हे पृथे दुर्वासानें तुला वर दिला आहे हें मी जाणलें, आतां भयाचा त्याग करून माझ्याशीं संग कर न केलास तर तुला दोष लागेल, असें सूर्यानें पृथेचें शांतवन केलें असतां पृथा ह्मणाली कीं, मी कन्या आहें माझे बांधवजन माझा उपहास करतील त्यास मी भित्यें, असें भाषण ऐकून सूर्य बोलतो हे पृथे माझ्या प्रसादें करून तुला दोष लागणार नाहीं, असें बोलून सूर्य पृथेशीं रत जाहाला. त्या काळीं कुंतीस एक पुत्र जाहाला, ज्याच्या शरीरास सहज कवच कुंडलें उत्पत्ती काळींच कर्ण यानावानें प्रसिद्ध होता. नंतर सूर्य कुंतीस पुनः कन्यात्व देऊन स्वर्गी गेला. पुढें तो उत्पन्न जाहालेला कुमार कुंतीनें पाहून आतां काय करावें कोणाचा उपाय केल्यानें आपल्यास सुकृत प्राप्त होईल. असा विचार करून तो कुमार तिनें गंगेमध्यें टाकिला तो पुत्र नदीमध्यें वाहात असतां कोणी एक सूत पुत्र राधाभर्ता होता त्याणें घेऊन आपल्या पुत्रासारखा त्यास मानिलें, तो पुत्र वस्त्र, कवच कुंडलादिक द्रव्यें सहवर्तमान जाहाला ह्मणून त्यानें नाव वसुषेण-

असें ठेविलें तो पुत्र राधेच्या गृहीं राहात असतां सर्वांशीं मध्यें सिद्ध झाला, अं प्रतापह काळ पर्यंत एकसारखी सूर्या कडे दृष्टी लाऊन जप करीत असे, त्या जप कालीं कोणी ब्राह्मण याञ्चे करितां आला असतां त्याला आदेय असा पदार्थ पृथ्वीवर कर्णानें केला नाहीं, कोणी एके दिवशीं इंद्रानें ब्राह्मणाचें स्वरूप धरून फाल्गुनाचे हिता करितां जपकाळीं कर्णाच्या सन्निध येऊन भिक्षा मागितली कीं, हे कर्णा तुझी सहज कवच कुंडलें आहेत तीं मला दे, त्या काळीं कर्णानें आपले शरिरा पासून कवच कुंडलें कापून ब्राह्मणास दिलीं, तीं त्यानें घेऊन व तेक र्णाचें अघटित कृत्य पाहून संतुष्ट होतांच एक अमोघ शक्ती त्यास दिली आणि बोलला कीं, हे कर्णा देव, असुर, मनुष्य, गंधर्व, उरग, राक्षस यांतून एकास जिंकण्याची इच्छा केली असतां तो या शक्तीनें मरण पावेल, आणि तुझें नाव पूर्वी वसुषेण होतें प्रस्तुत तूं आपलें शरीर कृतन करून मला दिलेंस-ह्मणोन या कर्मानें तुझें नाव कर्ण असें प्रसिद्ध होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

११२ अध्याय एकशें बारावा:– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, नंतर कुंती भोजराजाची कन्या पृथा अत्यंत तेजस्विनी ही यौवना वस्थेंत आली हें कुंती भोजराजानें जाणोन आपल्या कन्येचा स्वयंवर करावा, अशा हेतूनें सकल राजास निमंत्रण केलें आणि एक उत्तम प्रकारची सभा करून त्यांत स्वयंवरा करितां आलेले राजे बसविले असतां सभेकडे कुंती पाहूं लागली तों सर्व क्षत्रियां मध्ये श्रेष्ठ अशा पांडुराजास पाहून तिनें त्याच्या स्कंद प्रदेशीं माळ घातली, हें सकल राजानीं पाहून ते पुनः आपले नगरीं गेले, नंतर कुंती भोज-राजानें उत्तम प्रकारचा विवाह समारंभ करून पांडुराजास आपली दुहिता-व बहुत प्रकारचीं अपार द्रव्यें राजास दिलीं त्या काळीं इंद्राणी जशी इंद्रास हर्वतमान युक्त होत्ये तशी पृथा पांडुराजाशीं युक्त जाहाली तो उत्तम प्रकार-चा विवाह समारंभ जाहाल्यावर ब्राह्मणाच्या आशिर्वादानें सैन्या सहित पांडुराजानें स्वनगरांत येऊन भार्येस आपले मंदिरीं स्थापित केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

११३ अध्याय एकशें तेरावा:– वैशंपायन सांगतात हे जनमेजया-

जा, भीष्मानें पांडु राजाचा द्वितीय विवाह करावा अशी मती धरून तो मद्रपती त्या पुरींत गेला, हें शल्यास समजतांच त्यानें भीष्मास सामोरे जाऊन सत्कारानें त्यास आपले शुभासनीं बसविलें. नंतर भीष्माची पूजा करून आगमनाचें कारण विचारिलें त्याकाळीं भीष्म बोलले कीं, हे मद्रराज तुझी बहीण माद्री नामक आहे ती पांडुराजा करितां वरावी या हेतूनें आलों आहें, तर आमचा व तुमचा संबंध होणें योग्य आहे, असें चिंतन करून यथा विधीनें आमचा अंगिकार कर. असें ऐकून मद्रराज बोलतो; हे भीष्मा, तुमच्या पेक्षां आह्मांस दुसरा कोणचा वर श्रेष्ठ आहे, परंतु आमच्या कुळांत जे पूर्वी राजे जाहले त्यांणीं कुळधर्म नियम करून ठेविला आहे तो चांगला असो किंवा वाईट असो, त्याचें उल्लंघन करण्यास आह्मीं इच्छित नाहीं. असें मद्रराजाचें भाषण ऐकून भीष्म बोलतो हे राजा, कुळधर्म असतील ते परिपालन अवश्य करावे असें ब्रह्मदेवानें सांगितलें आहे, तो आपल्या कुळजांनीं विधि स्थापित केला आहे तो दोषदायक होत नाहीं हे शल्या तुझा कुळांत साधूनीं स्थापित केलेली मर्यादा मला विदित आहे. असें बोलून भीष्मानें कांहीं सुवर्णाचे कुंभ, चित्रविचित्र सहस्रावधी रत्नें इत्यादिक शुभ पदार्थ शल्यास दिले, ते घेऊन शल्य संतुष्ट झाला आणि त्यानें आपली स्वसा माद्री पांडु राजा करितां भीष्माचे स्वाधीन केली, ती भीष्मानें घेऊन तो हस्तना पुरीं गेला आणि सुमुहूर्तावर माद्रीचें आणि पांडुराजाचें पाणिग्रहण झालें, तो विवाह समारंभ समाप्त जाहाल्यावर माद्रीस शुभगृहांत स्थापित केली- नंतर माद्री व कुंती या उभयतां भार्या सहवर्तमान पांडुराजा यथासुखक्रीडा करूं लागला. यास तीस दिवस जाहाल्यावर सकल पृथ्वीचा जय करावा असें पांडुराजाचे मनांत येऊन तो प्रथम पर्वताच्या आश्रय करणारे चोर जे दशार्ण नामक राजे, त्यांस युद्धामध्यें पराजित केलें. त्याचें सर्व द्रव्य घेऊन पुढें मागध देशाचा राजा दीर्घनामें सर्व राजांचा अपराधी होता त्यास मारून त्याचीं कोश, गृह, व वाहनें घेतलीं नंतर मिथिला नगरीस जाऊन विदेह नामक राजास जिंकिलें. पुढें काशी, पुंड्र, सुह्म या राजांच्या देशामध्यें गेला आणि त्यास आपले बाहु बलानें जिंकून कुरूचें यश संपाद

न केलें हें कृत्य त्या राजानीं पाहून पांडूस नमस्कार केला आणि नाना प्रकारचीं र-त्नें, मणी, मुक्ताप्रवाल, सुवर्ण, रंजत, गाई इत्यादिक त्यास देऊन ते आपले देशीं गेले, हे सर्व पदार्थ पांडुराजानें घेऊन तो हस्तना पुरास येण्यास निघाला, तो हस्तना पुराच्या सन्निध आला असतां सकल राष्ट्रनिवासी लोक पांडुराजाचे सन्मुख आले, त्यांस पांडु राजानें युद्धांत हरण केलेलीं द्रव्यें व हस्ती, अश्व इत्यादिक अमोलिक पदार्थ त्यांस दाखविले. तों इतक्यांत भीष्म ही राजा सन्मुख आला, तेव्हां पांडुराजानें त्यास पादाभी वंदन करून पुत्राप्रत भीष्मानें हीं आलिंगन केलें. नंतर ते असंख्याक वाद्यांचे गजर करीत पांडुराजा नगरांत गेला. असा विषय या अध्या० आहे.

११४ अध्याय एकशें चवदावा.— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, पांडुराजानें युद्धांत संपादन केलेलें धन भीष्मास व आपली माता सत्यवती व विदुर यांस धृतराष्ट्राचे आज्ञेनें देऊन इष्ट मित्र व सुहृद यांचा ही संतोष केला. सत्यवतीस जें पांडुराजानें धन दिलें तें तिणें भीष्म व कौसल्यायांजप्रत अर्पण केलें - असा तो महापराक्रमी पांडुराजा हस्तनापुरीं राहात असतां धृतराष्ट्राकडोन अश्वमेधासमान कांहीं महामख करवून आपण, कुंती व माद्री यां सहवर्तमान तो हिमाचल पर्वताच्या दक्षिण भागीं महाशालवनामध्यें वास करूं लागला. दोन हस्तिणी मध्यें जसा इंद्राचा गज शोभतो तसा पांडुराजा उभयतां भार्यां सह शोभला. त्यास वनामध्यें संचार करणारे जे मानव यांणीं पाहून असा तर्क केला कीं,- हा कोणीएक देव आहे असें मानिलें. इकडे भीष्मानें देवकाची कन्या पारसवीनावाची (ब्राह्मणापासून शूद्रयोनीच्या गर्भीं जाहालेली) रूप यौवने करून संपन्न होती, तिला घेऊन महामती जो विदुर याचा तिशीं विवाह केला असतां पुढें तिचे गर्भीं विदुरानें आपले सारखे गुणानीं युक्त असे पुत्र उत्पन्न केले. असा विषय या अध्यायांत आहे.

११५ अध्याय एकशें पंधरावा.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, नंतर धृतराष्ट्रास गांधारीचे ठायीं शंभर आणि वैश्येचे ठायीं एक. असे एकशें एक पुत्र जाहाले आणि पांडूस कुंती व माद्री या उभयतां भार्यांचे ठायीं देवा पासून महारथी, कुलाची संतान वृद्धि करणारे पांच पुत्र जाहाले, असें आपण ऐकून जनमेजय प्रश्न करितात हे द्विजसत्तमा गांधारीचे ठायीं शतपुत्र कसे व किती काला

ते झाले आणि त्यांचें आयुष्य किती होतें, आणि वैश्येचे ठायीं एक पुत्र जाहाला तो कसा? धृतराष्ट्र, धर्माचरण करणारी व आपल्यास अनुकूल असणाऱ्या गांधारीशीं कसा वागला? पांडुराजास ऋषीचा शाप असतां देवांपासून महारथी पांच पुत्र जाहाले ते कसे हें मला सांग. असा प्रश्न ऐकून वैशंपायन बोलता त हे राजा, कोणे एके दिवशीं परिम्लान जाहलेला व्यास गांधारी जवळ आला असतां त्याचा संतोष गांधारीनें बहुत केला. त्या काळीं व्यासानीं गांधारीस वर-माग असें सांगितलें असतां, गांधारीनें भर्त्यापासून शतपुत्र मला व्हावे असा वर मागितला. कांहीं कालानीं धृतराष्ट्रापासून गांधारीस गर्भधारण जाहाला तो गर्भ गांधारीचे उदरामध्यें दोन वर्षें पर्यंत होता. त्या काळीं गांधारी आपल्यास मी अप्रजा आहें असें जाणोन मोठें दुःख करी. इकडे बालसूर्यासमान असा कुंतीस पुत्र जाहाला हें गांधारीस समजतांच तिणें अज्ञानानें आपल्या उदराचा घात केला तेणें करून अत्यंत दुःखित होत्सातो मूर्च्छित होऊन पडली. नंतर कांहीं कालानीं एक मांसाची पेशी लोहमयी गंडिके सारखी दोन वर्षें पर्यंत उदरांत धारण केलेली पृथ्वीवर पडली. तिला गांधारीनें स्पर्श केला असतां हातास अति कठिण लागली. हें वर्तमान व्यासानें जाणोन तत्काल गांधारीचे सन्निध आला. ती मांसपेशी पाहून गांधारीस बोलला कीं, तुला काय इच्छित आहे, असें भाषण ऐकून गांधारी आपला सत्य अभिप्राय सांगत्ये. हे ऋषे कुंती पासून सूर्या सारखा तेजस्वी पुत्र जाहाला, हें वर्तमान मलास-मजतांच अत्यंत दुःखीत होऊन मी आपल्या उदराचा घात केला त्यापासून-ही मांसपेशी झाली. पूर्वीं शंभर पुत्र होतील ह्मणोन आपण मला वर दिला असतां ही मांसपेशीच शतपुत्र स्थानीं आहे कीं काय, असें गांधारीचें भाषण-ऐकून व्यास बोलतो हे सुबल कन्ये, जें पूर्वीं मी भाषण केलें तें अन्यथा कधींही व्हावयाचें नाहीं. तुला आतां एक विधी सांगतों तो लौकर कर. शंभर कुंभ घृतानें परिपूर्ण केलेले सुसंरक्षित स्थावर नेऊन स्थापित कर आणि सीतोदकें करून या मांसपेशीचें सिंचन कर. असें व्यासानीं सांगतांच गांधारीनें मांसपेशीचें सिंचन केल्यावर तिचे शंभर भाग होऊन तिजपासून अंगुष्ठपर्वमात्र प्रमाण पृथक पृथक शंभर पुत्र व एक कन्या अशीं क्रमें करून कांहीं कालानीं

जाहालीं.ते गर्भ घृत कुंभांत नेऊन स्थापित करून व्यासानीं सौबलेस सांगितलें कीं, काहींकाळानीं कुंभ उघडावे असें सांगून व्यास तप करण्याकरितां हिमाचल पर्वतीं गेले.इकडे.गांधारीस क्रमे करून पुत्र जाहाले त्यांत दुर्योधन प्रथम जाहाला,युधिष्ठिर हा जन्मे करून दुर्योधनापेक्षां ज्येष्ठ होता,दुर्योधन ज्या काळीं झाला त्या काळीं भीमसेन कुंतीस जाहाला.हें वर्तमान भीष्म व विदुर यांस भृत्यानीं सांगितलें.ज्या काळीं धृतराष्ट्रास दुर्योधन जाहाला त्या काळींच त्याणें रासभा (गर्दभा) सारखा नाद केला तो ऐकून इतर खर,गृध्र,गोमायु,वायस हे भयंकर नाद करूं लागले,दिशाचा दाह झाला. प्रचंड वायू सुटले,तेणे करून धृतराष्ट्र भयाभीत होऊन ब्राह्मण,भीष्म,विदुर,सुहृद्जन व कुरुमुख्य यांस आणवून बोलला कीं,हा युधिष्ठिर पांडुराजाचा पुत्र माझ्या पुत्रापेक्षां ज्येष्ठ असून कुलाची वृद्धी करणारा आहे,तसेच याचे गुणही श्रेष्ठ आहेत,त्यापेक्षां प्रथम राज्याचा अधिकारी हाच या विषयीं मला कांहीं संशय नाहीं.धर्मराजा नंतर माझा पुत्र दुर्योधन राज्याधिकारी होईल किंवा नाहीं हें तथ्य मला सांग. इतकें भाषण जाहाल्यावर सकल दिशेचे ठायीं राक्षस घोर शब्द करूं लागले. तशाच भल्लुका ही दिशादिशाच्या ठायीं भयंकर नाद करूं लागल्या.हें पाहून विदुर व सकल ब्राह्मण बोलले कीं,हे राजा हीं घोर निमित्तें तुझ्या पुत्राच्या उत्पत्ती समयीं जाहालीं आहेत,त्या पेक्षां हा तुझा पुत्र कुलाचा नाश करणारा होईल असें आह्मांस वाटतें.आतां याची शांती,पुत्राचा त्याग केला असतां होईल.अन्यथा व्हावयाची नाहीं,हे महीपते,एकोन शत पुत्र तुझे जिवंत रहावे अशी जर तुझी इच्छा असेल तर या पुत्राचा त्याग कर.अरे एकाच्या त्यागा करून आपल्या कुलाचें रक्षण होत आहे तर त्याचा त्याग करावा.या प्रकारें सकल ब्राह्मण व विदुर याणीं धृतराष्ट्रास बोध केला असतां पुत्रलोभामुळें राजानें तसें केलें नाहीं,पुढें एक महिन्यानें यथानुक्रमें घृत कुंभांत शतपुत्र उत्पन्न होऊन एक कन्या उत्पन्न झाली.गांधारीनें बहुत दिवस उदरामध्यें गर्भ धारण केले होते ह्मणोन ती अत्यंत क्लिष्ट जाहाली,हें धृतराष्ट्रानें जाणोन वैश्येसह वर्तमान गमन केलें असतां एक संवत्सरानंतर माहा यशस्वी युयुत्सु नामक पुत्र जाहाला या प्रकारें महा बुद्धिमान जो धृतराष्ट्र या-

ज पासून महारथी व वीर असे शंभर पुत्र होऊन एक कन्याही जाहाली. तसाच एक प्रतापवान् व महा तेजस्वी युयुत्सुनामक पुत्र वैश्येपासून जाहाला. असा विषय या अध्यायांत आहे.

११६ अध्याय एकशें सोळावा:— जनमेजय भाषण करितो हे ऋषे, प्रथम तुह्मीं मला असें सांगितलें कीं, व्यासानें धृतराष्ट्रास शतपुत्र होण्याचा वर दिला. कन्या होण्याचें वरदान नसतां शतपुत्रां पेक्षां अधिक एक कन्या व युयुत्सुनामक एकपुत्र अशीं शतापेक्षां दोन आपत्यें धृतराष्ट्रास अधिक कशीं जाहालीं, तर हे वैशंपायन ऋषे, अमित तेजस्वी जो व्यास याणें शंभर पुत्र होण्या विषयीं सांगितलें आणि तूं सांगतोस कीं, शता पेक्षां एक कन्या अधिक जाहली बरें ज्याकाळीं त्या पेशीचे शंभर भाग व्यासानीं केले तेव्हां शंभर पुत्राचा संभव आहे असें सौबलेनें जाणलें नाहीं कीं काय? मग दुःशलेची उत्पत्ती कशी जाहाली हें मला आश्चर्य वाटतें, हे विप्रर्षे वास्तव जें खरें असेल तें मला सांग. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, तूं फार चांगला प्रश्न केलास, याचें उत्तर सांगतों ऐक. ती मांसपेशी ज्याकाळीं जाहाली त्या काळीं व्यासानीं स्वतः आपण सीतोदकानें त्या पेशीचें सिंचन करून त्याचे तुकडे तुकडे केले आणि एक एक भाग हातांत घेऊन धात्री ह्मणजे उपमाता होती तिजकडून घृतकुंभांमध्यें नेऊन ठेवविले. इतक्या अवकाशांत गांधारीस अशी इच्छा जाहाली कीं, आपल्यास एककन्या असावी, शंभर पुत्र आहेत परंतु दुहितेवर माझी अत्यंत प्रीती आहे तर सर्वांपेक्षां कनिष्ठ एक कन्या जाहाली तर मला फार आनंद होईल. इतक्यांत कृष्णद्वैपायनानीं स्वतः शंभर भाग करून त्याची गणना केली, ते शंभरभाग बराबर होऊन एक भाग थोडासा अधिक राहिला, तो पाहून व्यास बोलले कीं, हे सुबल कन्ये, तुझे पुत्र शंभर पूर्ण जाहाले बरें, मी तुला मिथ्या सांगितलें नाहीं. आतां दौहित्रा करितां हा एकभाग शंभरापेक्षां अवशिष्ट अधिक राहिला याजपासून तुझे इच्छे प्रमाणें एक कन्या होईल. असें ह्मणोन आणखी एक त्यास घृतकुंभ आणिला आणि त्यांत तो कन्येचा भाग स्थापित केला त्या भागापासून पुढें दुःशला नामक कन्या जाहाली, हे राजेंद्र असा दुःशलेच्या जन्माचा प्रकार तुला सांगितला. आतां पुढें तुला काय सांगूं. असा विष

य या अध्यायांत आहे.

११७. अध्याय एकशेंसत्रावा:- जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायन-ऋषे, धृतराष्ट्रास जे पुत्र जाहाले त्यांचीं नावें संक्षेपें करून सांग. असें ऐकून वैशंपायन बोलतात हे राजा सांगतों ऐक. प्रथम दुर्योधन नंतर युयुत्सु, दुःशासन आदिकरून एकशेंएक पुत्र व एक कन्या अशीं आपत्यें धृतराष्ट्रास जाहालीं त्या राजाचे पुत्र अतिरथी, महाशूर व युद्धविशारद होते. सर्वांनीं वेदाध्ययन-केलें, ते अस्त्रविद्येंत अति निपुण होते. त्यांचे विवाह यथाविधि यथानुक्रमें परिक्षा करून धृतराष्ट्र राजानें केले. तशीच दुःशला नामक होती ती जयद्रथ नामक राजास धृतराष्ट्र राजानें दिली. असा विषय या अध्यायांत आहे.

११८ अध्याय एकशें अठरावा:- जनमेजय भाषण करितात हे वैशंपायन ऋषे, मनुष्यां मध्यें न घडलेला असा ऋषि प्रसादानें एकाकालींच झालेला धृतराष्ट्रपुत्रांचा उत्पत्तिप्रकार तुह्मीं मला सांगितला व त्यांचीं नामेंही मी ऐकिलीं. आतां पांडवांच्या उत्पत्तीचा प्रकार सांग. कारण पांडव हे देवांचे अंशभूत असून इंद्रासारखे पराक्रमी आहेत, असें तुह्मीं सांगितलें तेव्हां असेजे अमानुषकर्म करणारे यांचें जन्मा पासून घडलेलें कृत्य मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, कोणे एकेकाळीं पांडुराजा मृगसर्पांनीं सेवित अशा अरण्यांत असतां त्यानें मैथुनास प्रवृत्त अशा मृगास पाहून त्या मृगास व मृगीस पांच बाणांनीं वेध केला, तो ऋषी पुत्र महा तेजस्वी भार्येसह वर्तमान मृग वेषानें संचार करीत मृगीशीं अत्यंत संसक्त जाहाला असतां ते बाण राजाचे येऊन त्यामृगास वेध जाहाला. तेणे करून तो मृग भूमीवर पडून विलाप करीत-पांडुराजास बोलला कीं, अरे जे अत्यंत घातुककर्म करणारे, कामक्रोधाचे स्वाधीन झालेले, बुद्धीनें हीन, पापाचे ठायीं अत्यंत रत असे जरी मनुष्य आहेत तथापि ते अशीं क्रूर कर्में करित नाहींत. यास्तव तूं सर्वांपेक्षां नीच आहेस. बुद्धी दैवाचा ग्रास करित नाहीं, तर दैवच बुद्धिचा ग्रास करतें. दैवानें जें प्राप्त जाहालें त्याचें उल्लंघन कोणाच्यानें करवत नाहीं. अरे राजा वारंवार ज्याचा आत्माधर्मा कडेसच आहे अशाश्रेष्ठ राजाच्या कुलामध्यें तुझा जन्म असतां काम लोभाच्या स्वाधीन होऊन मती पासून कसा भ्रष्ट जाहालास, असें ऐकून पांडुराजा बोलतो अरे मृगा

जी वृत्ती शत्रूच्या वधाविषयीं राजाची असावी तीच मृगाच्या वधाविषयीं सांगितली आहे, असें असतां मोहें करून तूं माझी निंदा करण्यास योग्य नाहींस, प्रसिद्धपणी अथवा गुप्तपणी मृगाचा वध अवश्य करावा हा राजाचा धर्म होय. कोणे एके काळीं अगस्त्य ऋषीनीं सत्र केलें तेव्हां त्याणी अरण्यस्थ मृगाची मृगया करून प्रोक्षण विधि केला होता, तेव्हां वेदामध्यें मृगया करण्या विषयीं प्रमाण लिहिलें असतां तूं माझी निंदा कां करितोस? असें राजाचें भाषण ऐकून मृग बोलतो, अरे आपला शत्रु युद्धार्थ संग्रामा मध्यें जर आला नाहीं तर त्याजवर शराचा प्रयोग करूं नये तशांतून शस्त्रहीन असल्यास कधीं करूं नये. असें मृगाचें भाषण ऐकून पांडुराजा बोलतो, अरे मृगा, मत्त भीत अथवा पलाइत जाहालेले जे शत्रु त्यांचा वध निंद्य आहे, परंतु मृग सावध असो अथवा असावध असो त्याचा वध करावा असें उत्तम आहे, तेव्हां माझी कां गर्हा करतोस, असें भाषण ऐकून मृग बोलतो हे राजा, मृगाचा वध करूं नये ह्मणोन मी निंदा करीत नाहीं मी मैथुनासक्त असतां तूं माझा वध केलास हें तुझें अत्यंत घातुक कर्म होय ह्मणोन मी निंदा कर्तो, अरे सर्व भूतांचा हितकारक काल, मैथून आहे अशा मैथून कालीं कोणचा ज्ञानी पुरुष मृगाची हिंसा करील बरें, अरे स्त्रीचे ठायीं पुरुषानें रत व्हावें हा पुरुषाचा धर्मच आहे तो तूं आज माझा विफळ केलास. मला असें वाटतें कीं, स्त्री पुरुषास भोग सुख जें काय आहे त्याविषयीं तुला कांहीं परिज्ञान नाहीं. बरें तूं धर्मार्थ वेत्ता आहेस, तुझी कृती केवळ देवासारखी आहे, असें असतां अस्वर्ग्य दायक असें कर्म तूं कसें केलेंस? हे पार्थिव श्रेष्ठा जे घातुक कर्म करणारे, पापाचरण करणारे त्रिवर्गा विषयीं ज्याची योग्यता नाहीं अशा पुरुषास तूं दंड करावास. हे नरश्रेष्ठ बरें मी तुझा काय अपराध केला होता, मी दम नामें मुनी आहें मृगाचा वेष धरून फलमूलें भक्षण करीत अरण्यांत वास करून शमपरायण असतों असें असतां माझी हिंसा करण्यास तूं प्रवर्तलास तस्मात तुला आता मी शाप देतों, अरे तुलातर मी तपस्वी ब्राह्मण आहें हें माहीत नसल्यामुळें ब्रह्महत्या दोष लागणार नाहीं, आतां माझा वधच करण्यास तूं उद्युक्त जाहालास त्यापेक्षां हे मूढा त्याचें तुला असें फल प्राप्त होईल कीं, काम मोहित होऊन तूं भार्येशीं जर संग करशील तर ही माझी अवस्था तुला होऊन यमलोकीं जा

शील हें माझें भाषण अन्यथा व्हावयाचें नाहीं. असें मृगानें बोलून तो एकक्षणां
न आपल्या जीविता पासून मुक्त जाहाला, तेव्हां राजा त्यायोगें परम दुःखित हो
ऊन ते थून गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

११९. अध्याय एकशें एकोणिसावा:— वैशंपायन सांगतात हे जनमेज
या, नंतर राजास असें वाटलें कीं, कोणी एक हा आपला बांधवच मृत जाहाला
काय तेणे करून भार्येसहवर्तमान शोकार्त व अत्यंत व्याकुल होऊन बोलला कीं,
जे कामानें मोहित जाहाले ते साधु कुलोत्पन्न जरी असतील तथापि ते दुर्गतीस
पावतात. माझा पिता बाल असतां मरण पावला, त्याच्या क्षेत्रांत्याच्या ठायीं कृष्ण द्वै-
पायन ऋषीनीं मला उत्पन्न केलें तो आज हामी बुद्धी भ्रंशित होऊन माझी अशी
अवस्था जाहाली. मृगये करितां अरण्यांत फिरून मी मृग मारला त्याचें फल आ-
ज मला अपुत्रत्व रूप जाहालें आतां मी अपुत्र असल्यामुळें स्वर्गास जाण्यास अ
योग्य जाहलों, दैवानीही माझा त्याग केला. अस्तु हें एक दुःख मला मोठें झालें-
आतां मी मोक्षाचेंच साधन करितों. संसाररूप बंधापासून आतां मी मुक्त होईन,
उत्तम प्रकारची वृत्ती धरून पित्याचा मार्ग शोधीन, अरण्यामध्यें एकेक वृक्षासमी
प भिक्षा मागत राहीन तें असें कीं, अंगावर मल धारण करीत शून्यस्थानीं रा
हीन आणि प्रिय व अप्रिय कोणतें प्राप्त झालें असतां शोक हर्षादिक पावणार
नाहीं व सर्व प्राणिमात्रांचें हित करीत कोणाचा घात न करितां प्रसन्न वदन हो
ऊन राहीन तसाच लाभ व अलाभ झाला असतां समान दृष्टी ठेवीन, आणि को
णी माझा एक हात तोडला व एका हातास चंदन लाविलें असतां त्या उभयतां
चें कल्याण व अकल्याण चिंतणार नाहीं. अशा प्रकारें निर्भय मार्गानें देह ना
श करीन व मी ब्राह्मण द्वारा आपत्य संपादन करण्याची इच्छा करणार नाहीं;-
कारण काम पूर्तिच्या अंतिं श्वाना सारिखें पुत्रेच्छा करणारासही महत् दुःख
आहे. यामुळें संन्यास धर्माचा आश्रम करणेंच श्रेयस्कर आहे. असें दुःखानें पां
डुराजा भाषण करून नंतर कुंती व माद्री या उभयतां भार्यांस असें बोलला कीं,
कौसल्या, विदुर, सत्यवती, भीष्म, आमचे पुरोहित सकल विद्वान ब्राह्मण इत्या
दिकांकडे तुह्मी उभयतांनीं जाऊन सांगावें कीं, आमचा पती पांडुराजा विरक्त
होऊन वनामध्येंच अतःपर वास करणार, सर्व कर्माचा त्याणें संन्यास केला अ

सें भर्यांनें भाषण उभयतांस्त्रि यांनीं ऐकून त्या बोलल्याकीं, हे राजा आह्मीं उभयतां धर्मपत्नीनीं तुज सहवर्तमान तप करण्यास योग्य असे आश्रम बहुत आहेत, तर तेथें आह्मीं तुजसहवर्तमान विपुल तप करूं, असा आमचा खचित निश्चय आहे, इतकें असोन तूं आमचा जर त्याग करशील तर आह्मीं आपल्या जीविताचा निःसंशय त्याग करूं. असें उभयतां स्त्रियांनें निग्रहाचें भाषण ऐकून पांडुराजा बोलला कीं, जर असा तुमचा उभयतांचा धर्मास अनुकूल निश्चय आहे तर तुमच्या सहवर्तमान पितृलोकीं जाण्यास जा रत्ती आहे तत्याचा स्वीकार करीन आणि महत् तप करीत ग्राम्य सुख व आहार यांचा त्याग करीन व वल्कलें धारण करून फळमूलें भक्षण करीन अरण्या मध्यें संचार करीन. दोन्ही काळाचे ठायीं अग्नीमध्यें होम करीन आणि सित, वात, उष्ण, तृषा, यांचें सहन करून दुश्चर तपाच्या योगें या शरीराचें अत्यंत शोषण करीन. वानप्रस्थ व बांधवादिक यांचे दर्शन कधीं ही करणार नाहीं आणि वानप्रस्थाच्या शास्त्रांत विहित उग्रतपाचा आश्रय करून देह पतनाचा समय येई परियंत राहीन. असें पांडुराजानें उभयतां भार्यांस भाषण करून नंतर शीरोभूषणादिक व उत्तमोत्तम मोल्यवान वस्त्रें व इतर स्त्रियांचीं आभरणें सकल ब्राह्मणांस देऊन त्यांस असें बोलला कीं, तुह्मीं हस्तनापुरीं जाऊन पांडुराजानें उभयतां भार्यांसहवर्तमान अर्थ, काम व रती यांचा त्याग करून वनांत गमन केलें असें सांगा. नंतर परिचारकांनीं एका एकीं भयंकर आर्त स्वर काढून नेत्रांतून ऊष्णाश्रुपात करीत करीत हस्तनापुरीं येऊन जें राजानें द्रव्य दिलें तें धृतराष्ट्रास देऊन पांडूचा सर्व वृत्तांत सांगितला तो ऐकून धृतराष्ट्रानें शय्या, आसन, भोग, रती यांचा त्याग करून भ्रात्यानें चिंतन करीत करीत शोकाग्रस्त जाहाला इकडे राजपुत्र पांडु फलमूलें भक्षण करीत उभयतां पत्न्या सहवर्तमान शंतश्रृंग नामक तापसाचें स्थान आहे तेथें गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२० अध्याय एकशेंविसावा– वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, पांडुराजा मोठें तप करीत असतां सिद्धाचारणास अत्यंत प्रिय जाहाला. निरंतर वेदांत ऐकून आत्म्याचा व इंद्रियांचा जाणे निग्रह केला स्वतपोवीर्यें करून स्वर्गास वास करण्याची ज्यास योग्यता आली इतर तपस्वी होते त्यां-

तील कोणी पांडुराजास भ्रात्यासारखे व कोणी मित्रासारखे मानूं लागले. अशा पांडुराजाच्या वृत्तीस कांहीं काळ गेल्यावर निष्पाप असें तप करून ब्रह्मर्षीस दर्शनाची योग्यता जाहली. कोणे एके काळीं अमावास्या पर्व आलें असतां मोठ मोठे ऋषी ब्रह्मदेवाचे दर्शना करितां ब्रह्मलोकीं जाण्यास निघाले असतां पांडुराजा ऋषींस बोलला कीं, हे ऋषी हो तुह्मी कोठें जातां, त्या कालीं ऋषी बोलले कीं, हे राजा ब्रह्मलोकीं देव, ऋषी, पितर हे समग्र ब्रह्मदेवाच्या दर्शनास आज जाणार यास्तव आह्मी सर्व तेथें जातों. असें ऋषींचें भाषण ऐकून पांडुराजाही उभतां पत्न्या सहवर्तमान त्या ऋषीं बरोबर निघाला, तों मार्गांत तापसजन पांडूस बोलतात हे राजा, आतां आपल्यास शैलाच्या उत्तरभागीं जाणें आहे तर नाना प्रकारचे रम्य गिरी व चित्रविचित्र देश, असंख्यात विमानें, गीतस्वनानें नादित जाहलेली अशी ही देव गंधर्व अप्सरा यांची क्रीडा भूमी तशाच भागीरथी नदीच्या मोठमोठ्या दऱ्या व गिरीच्या गहन गुहा पहा. येथें अत्यंत हिम व मोठे पर्वत असल्यामुळें या देशावरून पक्षी जात नाहींत मग मृग कोठून जातील; येथून वायू मात्र वाहतो. किंवा जे सिद्ध ऋषी असतील ते जातात. यास्तव हे राजन्, असा हा हिमाचल राहण्यास अत्यंत कठीण असल्या मुळें या तुझ्या भार्या यापुढें कशा जातील? तर येथूनच तूं माघारें फिरावेंस असें आह्मास वाटतें. असें ऋषींचें भाषण ऐकून पांडुराजा बोलतो हे ऋषी हो, तुमचा आशय मी जाणोन बोलतों तें ऐका. ज्यास प्रजा नाहीं त्यास स्वर्गाचें द्वार प्राप्त होत नाहीं तेव्हां मी अप्रज असल्या मुळें स्वर्गास माझें गमन होणार नाहीं. असा तुमच्या भाषणाचा अभिप्राय तो खरा आहे तर हे तपोधन हो, सर्व ऋणा पासून मी मुक्त जाहालों परंतु पितृऋणा पासून अद्याप मुक्त जाहालों नाहीं. माझा देहनाश जरी जाहाला तथापि चिंता नाहीं; परंतु पितृऋणा पासून मुक्त होण्या विषयीं आतां मी निश्चय कर्तों. या भूलोकीं सकल मानव पितृ, देव, ऋषी आणि मनुष्य या चार ऋणानीं संयुक्त आहेत यास्तव यथा कालीं, यथा बुद्धीनें याच्या ऋणा पासून धर्मवेत्त्यांनीं मुक्तच होण्याचा यत्न करावा. यज्ञ याग केले असतां देव ऋणा पासून, वेदाध्ययनें करून ऋषी ऋणा पासून, श्राद्ध व पुत्रजन्म जाहले असतां पितृ ऋणा पासून आणि अघातुक कर्मानें मनुष्य ऋणा पासून मु-

क्त होतो. यांत ऋषी, देव, मनुष्य या तीन ऋणा पासून मुक्त आहे परंतु पितृऋ
णा पासून माझी मुक्तता नाहीं तर हे नरोत्तम हो, जसा मी आपल्या पितृक्षेत्राचे
ठायीं व्यासा पासून जाहालों तसा माझ्या क्षेत्राच्या ठायीं प्रजेचा संभव कसा हो
ईल तें सांगा. असें पांडूचें भाषण ऐकून ऋषी बोलतात हे धर्मात्म्याराजा, तुला
साक्षात् देवानीच उपमा आहे असें आह्मीं जाणलें तुला पाप रहित असें आ
पत्य होईल हें आह्मीं दिव्यचक्षु करून जाणिलें आतां कांहीं दैविक उपाय कर
त्या उपायांनीं सकलगुण संपन्न तुला प्रतीकारक असें आपत्य होईल. असें
ऐकून पांडुराजा चिंताग्रस्त होऊन आपल्यास तर मृगाचा शाप जाहाला या
स्तव पुत्र होण्या विषयीं जा क्रिया त्या करण्यास आपण अशक्य जाहालों, अ
सें जाणोन एकांतस्थानी कुंतीला बोलला कीं, अपत्योत्पादना विषयीं तूं आ
तां यत्न कर आपत्य जाहाल्या वांचून लोकांत प्रतिष्ठा आणि धर्मही नाहीं. अ
नपत्य पुरुषानें यज्ञ, दान, तपनियम अथवा अनुष्ठान केलें असतां सर्व त्या
चें व्यर्थ होतें. अनपत्य असल्यामुळें शुभ लोकाची मला प्राप्ती न होऊन न
ष्ट होतों ही चिंता रात्रंदिवस मला झाली आहे. मृगाचा शाप जाहाल्यामुळें
मी अकृतात्मा घातुक कर्मी होऊन माझ्या पासून पुत्रजनन होण्याची क्रिया
नष्टजाहाली. धर्मशास्त्रांत द्रव्य भागाचे अधिकारी साहा व अनाधिकारी-
साहा असे बारा सांगितले आहेत ते अनुक्रमें तुला सांगतों. प्रथम स्वयं
जात (परस्पर विवाहीत स्त्री पुरुषा पासून झालेला) दुसरा प्रणीत (विवा
हित स्त्री पासून कोणी एक श्रेष्ठ पुरुषाच्या अनुग्रहानें जाहालेला) तिसरा
परिक्रीत (विवाहित स्त्रीचे ठायीं पर पुरुषास वीर्याचें मौल्य देऊन जाहाले-
ला) चौथा पौनरभव (एक कन्या पूर्वी एकानें विवाहित असून तिचे ठा-
यीं दुसरे पुरुषा पासून जाहालेला) पांचवा कानीन (कन्या अवस्थेंतच
जाहालेला) साहावा विवाहित स्त्री असून व्यभिचारिणी जाहाली असतां
श्रेष्ठ पुरुषा पासून जाहालेला कुंड नामक, हे साहा बंधु वांटणी घेण्यास यो
ग्य होतात. आतां अबंधु दायाद कोणते तें सांगतों. प्रथम दत्तक (मातापि-
तरांनीं समर्पित) दुसरा क्रीत (धनादिक देऊन विकत घेतलेला) तिसरा कृ
त्रीम (आपणाच स्वतः येऊन मी तुमचा पुत्र होतों असा जाहालेला) चौथा

सहोड (गर्भवती असतां विवाह होऊन जो तिज पासून जाहाला तो) पांच
या ज्ञाती रेता (पांच किंवा सात बंधु एकत्र असून अपुत्रीक असतां कोणे एका
स पुत्र जरी जाहाला तथापि ते सकल भ्राते पुत्रवंत होतात तो) साहावा हीन
योनी धृत (हीनयोनीच्या ठायीं जाहालेला) हे अबंधु द्रव्याचे विभागी होत-
नाहींत. यांत एक एकापेक्षां एक एक संबंधानें कमी कमी जाणावे. आपत का-
ळीं औरस पुत्र नसल्यास हे सकल पुत्र स्थानींच आहेत, परंतु आपत काळीं
आणखी असा एक धर्म सांगितला आहे कीं, श्रेष्ठ योग्यतावान् दीर अस-
ल्यास त्या पासून पुत्र जाहाला असतां तो धर्मफल देणारा होतो किंबहुना
आपल्या रेता पासून पुत्र होण्या पेक्षां हाच पुत्र आपत काळीं श्रेष्ठ असे सा-
यंभौम मनूचें वाक्य आहे. यास्तव हे कुंती मी तुला आज शरणांगत आलों
आहें तेव्हां माझा सारखा पुत्र उत्पन्न केला असतां मोठें यशस्कर होईल तु
ला या विषयीं शारदंडायनी नामें स्त्री होती तिची कथा सांगतों. शारदंडाय-
नी ह्मणोन एक वीरपत्नी होती ती रजस्वला स्नान जाहाल्या वर चतुर्थ दिव
शीं पुत्र जन्मास योग्य असें जाणोन भर्त्यानें अनुज्ञा दिली कीं, तूं ब्राह्मणा
सहवर्तमान गमन कर ह्मणजे तुला पुत्र होईल. असें भर्त्याचें भाषण ऐकून
ब्राह्मणा सहवर्तमान ती रत जाहाल्यावर तिज पासून महारथी असे तीन
पुत्र जाहाले तशी तूंहि तापसी ब्राह्मण कोणी असेल त्या सहवर्तमान गम
न करून आपत्योत्पादन कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१२१ अध्याय एकशे एकविसावा.—वैशंपायन सांगतात हे जनमेजया,
पांडूचें भाषण ऐकून कुंती पुनः पांडूराजास बोलत्ये हे धर्मज्ञा, तूं असें भाषण
करण्यास योग्य नाहींस मी तुझी धर्मपत्नी निरंतर तुझे ठायींच रत होणारी अ-
सतां माझे ठायीं तूंच आपत्यें उत्पन्न कर, ही मी तुला वारंवार प्रार्थना करित्यें.
तुझा वांचून अन्य पुरुषाची मनें करून ही इच्छा करणार नाहीं या भूमंडळीं तु
झा सारखा दुसरा कोणी नाहीं. हे राजा, या विषयीं तुला एक पौराणिकी कथा-
सांगत्यें. व्युषिताश्व नामें परम धर्मिष्ठ असा एक राजा होता त्याणें अश्वमेध
यागास आरंभ केला असतां त्यामध्यें इंद्रा सहवर्तमान सकल देव व महर्षी ये
ऊन सोम पानें करून इंद्राची व दक्षणा दानें करून ब्राह्मणाची तृप्ती केली. असा

शिशिर ऋतु काळाच्या अंतीं सूर्य नम्र होतो तसा व्युषिताश्व राजा अत्यंत को-
पित होत्साता, त्याणे प्राच्य,उदीच्य,पाश्चात्य,आणि दक्षिणात्य जितके राजे
होते त्यांस वश करून जितके द्रव्य मिळालें होतें तितकें त्याणें अश्वमेधामध्यें ब्रा
ह्मणास दिलें.या राजास दाहा गजांचें बळ होतें असें ह्मणतात.जे पुराण वक्ते-
ब्राह्मण आहेत ते याराजाचें असें वर्णन करितात कीं, हा व्युषिताश्व राजा कुरू
मध्यें श्रेष्ठ असून त्याच्या यशाची मोठी वृद्धी जाहली होती. याणे समुद्र वल-
यांकित पृथ्वी जिंकून सकल वर्णांचें पुत्रा सारखें परिपालन केलें. कक्षिवतरा
जाची दुहिता भद्रा नामे या राजाची भार्या रूपानें फार उत्तम अशी होती.कोणे
एके दिवशीं परस्पर ते स्त्रीपुरुष रत जाहाले असतां राजास राजयक्ष्मा रोग-
होऊन जसा सूर्य सायंकाळीं अस्तास जातो तसा तो राजा अस्तंगत जाहाला
तेव्हां ती भार्या अत्यंत दुःखीत होऊन विलाप करूं लागली. कुंती भाषण क
रित्ये हे पांडुराजा,ती भार्या अपुत्रवती असल्यामुळें अत्यंत खिन्न होऊन भ
र्त्यास बोलली कीं, भर्त्यांवांचून स्त्रियांचा व्यर्थ जन्म होय,यास्तव हे क्षत्रिय पुं
गव,तुझ्या गतीस जाण्याची मी इच्छा करित्ये मला घेऊन जा.आपली च्छाया
जशी आपल्या बराबर असत्ये तशी मी तुझी छाया तुझे स्वाधीन आहें.हे रा
जा तुझ्या प्रिया विषयीं मी निरंतर रत असेन जर तूं मला आपले कडेस नेत-
नाहींस तर आज पासून हृदयाचें शोषण करणाऱ्या अशा व्याधी मला प्रा
प्त होतील,तुझा आणि माझा वियोग जाहाला अशी मी किती अभाग्या आ
हें ती पहा!मला वाटतें कीं, पूर्वजन्मीं जे संयुक्त असतील त्याचा मी वियोग के-
ला असेल त्या पापाच्या योगें तुझा आणि माझा वियोग जाहाला त्यापेक्षां आ
जपासून दर्भाची शय्या करून तुझ्या दर्शनाची इच्छा करीत दुःखित होऊन-
स्वस्थ शयन करित्यें. हे नरव्याघ्र मला दर्शन देऊन अनाथ विलाप करणा
री जी मी इचें संरक्षण कर. कुंती बोलत्ये हे पांडुराजा,असें व्युषिताश्वरा
जाची स्त्री भद्रा इणे वारंवार भाषण करून शेवटीं पतीच्चें शव पडलें होतें-
त्यास आलिंगन दिलें. त्या काळीं त्या शवांत अशी वाणी जाहाली कीं, हे
भद्रे आतां उठ,विलाप करूं नको.तुला वर असा देतों कीं, माझ्यापासून तुला
पुत्र होतील तूं ऋतुस्नात जाहाल्यावर अष्टम रात्रीं अथवा चतुर्दशरात्रीं श

यन कर ह्मणजे मी तुला भोग देण्या करितां येईन असें ऐकून तिणें तसें के- लें असतां पुढें स्त्री गरोदर होऊन तीन शाल्व व चार मद्र असे सात पुत्र जाहा- ले तसा तूं हीराजा माझे गर्यांरत होऊन पुत्र उत्पन्न कर. असा विषय या अ- ध्यायांत आहे.

१२२. अध्याय एकशें बावीस.- वैशंपायन सांगतात हे जनमेजय- राजा, असें कुंतीचें भाषण ऐकून पांडुराजा बोलला कीं, हे कुंती व्युषिताश्व- राजाचें कथन सांगितलेंस तें मी ऐकिलें, परंतु तो राजा केवळ देवाचाच अव- तार होता ह्मणोन ही गोष्ट त्याणें केली. असो धर्मवेत्ते ऋषी याणीं एक धर्मत- त्व सिद्ध केलें आहे तें असें आहे कीं, पूर्वयुगीं सर्वस्त्रिया यथेच्छाचरण करणा- ऱ्या होत्या आपले मनास जो पुरुष येईल त्या पुरुषाशीं यथेच्छ स्वतंत्र विहा- र करीत. अशा त्या नि ष्प्रतिबंध कौमार अवस्थे पासून राहात हा त्याचा धर्म होय, असें सांगितलें आहे तोच धर्म हाल्लीं पशुपक्ष्यादिकांत आहे. महान- ऋषी आहेत ते या धर्माची निंदा करित नाहींत. हे रंभोरु, स्त्रियानीं यथेच्छ ग- मन करावें हा धर्म प्रस्तुत उत्तर कुरूचेठायीं चालला आहे, तर हा धर्म स्त्रियांस अनुग्रह कारक सनातन होय. या कालीं मात्र नवीन मर्यादा केली याचें कार- ण असें आहे कीं, कोणी एक उद्दालकनामें महर्षी होता त्याचा पुत्र श्वेत केतु; याची माता कोणी एक ब्राह्मणानें त्याचे पित्या समक्ष नेली हें पाहून श्वेतके- तूस बहुत कोप आला असतां त्यास पिता उद्दालक बोलला कीं, हे पुत्रा तूं क्रो- प करूं नको स्त्रियानीं यथेच्छाचार करावें ह्मणोन सनातन धर्मच आहे स- कल स्त्रियांनीं नि ष्प्रतिबंध असावें. जसे गवादि पशु निःप्रतिबंध तशा स्वस्व वर्णाचे ठायीं प्रजानीं निष्प्रतिबद्ध असावें, असें उद्दालकाचें भाषण श्वेतकेतू- स सहन न होतां तो असें बोलला कीं, अतःपर मनुष्यांतील स्त्री पुरुषानीं- आप आपल्या मर्यादेनें राहावें इतर जंतूंस ही मर्यादा नाहीं. जर स्त्रिया स्व- पतीचा त्याग करून स्वच्छ करितां यथेच्छ आचार करूं लागतील अथवा प- ती आपल्या पतिव्रता स्त्रियांचा त्याग करून यथेच्छ आचार करील तर तो पातकी होईल. तसेंच पती आपल्या पत्नीस पुत्रा करितां अन्य पुरुषाचे ठा- यीं संबंध करण्यास आज्ञा देत असतां ती आज्ञा स्त्री परिपालन न करील

तर ति लां ही पातक लागेल अशी उद्दालक पुत्रानें मर्यादा स्थापित केली आ हे. हे रंभोरु, सौदास नामें राजाची भार्या मदयंती नामे होती तिला सौदासानें पुत्रा करितां वशिष्ठ ऋषीशीं रत होण्यास सांगितलें असतां ती रत होऊन निज पासून आश्मक नामक पुत्र झाला. हे कुंती कुरूच्या वंशाची वृद्धी व्हा वी ह्मणोन कृष्ण द्वैपायनानीं आह्मास उत्पन्न केलें. हीं संपूर्ण कारणें जाणू न माझें भाषण अंगीकृत कर. असें पांडूचें भाषण ऐकून कुंती बोलत्ये हे राजा पूर्वी मी पित्याचे गृहीं बाल अवस्थेंत वास करीत असतां अतीथीचें पूजन क रीत होत्यें तेव्हा उग्र तपस्वी असा दुर्वास नामक ऋषि माझ्या गृहीं आला अस तां सर्वप्रकारें मी त्याचा संतोष केला त्याकालीं तो तपस्वी अभिचार युक्त अ सा मंत्राचा उपदेश करून बोलला कीं, या मंत्रें करून ज्या ज्या देवाचें तूं आ व्हान करशील ते ते देव तुला वश होऊन त्यांच्या प्रसादानीं तुला पुत्र होती ल असें ब्राह्मणानें सांगितलें आहे, त्याचा आज काल उपस्थित जाहाला आहे. हे राजा तुझी जर इच्छा असेल तर त्या त्या मंत्रें करून त्या त्या देवा चें आव्हान करत्यें ह्मणजे आपल्यास प्रजा होईल; परंतु तुला असा एक प्र श्न करित्यें कीं, प्रथम कोणच्या देवाचें आव्हान करूं असें ऐकून पांडुराजा बो लतो हे कुंती आज तूं धर्माचें आवाहन कर. कारण धर्म, लोकांमध्यें पूज्य आहे. तशांतून आह्मी अधर्माचा कधींही अवलंब करीत नाहीं. आज तुला धर्मा पा सून पुत्र जाहाला असतां तो आमच्या कुरुवंशांत मोठा धार्मिक होईल. धर्मानें पुत्र दिला ह्मणजे त्याची अधर्मावर रुची राहणार नाहीं. असें भाषण ऐकतांच कुंतीनें पतीस अभिवादन करून त्याच्या आज्ञे प्रमाणें आचरण केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१२३. अध्याय एकशें तेविसावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेज या, गांधारीस गर्भ राहून एक संवत्सर जाहाल्यावर कुंतीनें पुत्रा करितां मंत्रा चा जप करतांच सूर्यासारख्या विमानांत आरूढ होऊन ज्या स्थलीं कुंती जप करीत होती तेथें धर्मराज आला आणि हास्य करून कुंतीस बोलला कीं हे कुंती काय तुझी इच्छा आहे; त्या काळीं कुंतीनें सांगितलें कीं, पुत्र दे. असें ह्मणतांच यम धर्म मूर्ती धरून तो कुंतीशीं रत झाला नंतर ज्येष्ठा नक्षत्र दिवसाच्या अष्ट-

म भागीं आश्वीन शक्लपक्षीं पंचमीचे दिवशीं तूळास्त रवि असतां कुंती पुत्रास प्रसवली, त्या काळीं आकाशवाणी अशी जाहाली कीं, हा पुत्र धार्मिकामध्यें मो ग श्रेष्ठ, सकल मनुष्यां मध्यें उत्तम, महा पराक्रमी सत्य वक्ता असा हा पांडु राजाचा प्रथम पुत्र युधिष्ठीर या नामें करून तीन लोकांत विख्यात होईल असा धार्मिक पुत्र जाहाल्यावर पुनः पांडु बोलला कीं, हे कुंती क्षत्रियां मध्यें बलानें जो जेष्ठ-तोच श्रेष्ठ असें सांगितलें आहे त्या पेक्षां सर्वां मध्यें बलिष्ठ सुत होईल अशी प्रार्थना कर. अशी आज्ञा होतांच कुंतीनें वायूचें आवाहन केलें तेणें करून तो कुंतीचे अग्र भागीं येऊन बोलला कीं, हे कुंती काय तुझा ऱ्हदयांत आहे तें सांग ह्मणजे मी देतों. असें ऐकून कुंती बोलली कीं, हे सुरोत्तमा बलवान महाकाय, सर्वांचा दर्पनाश करणारा असा पुत्र दे नंतर त्या पासून भयंकर पराक्रमी भीम नामक पुत्र जाहाला. त्या काळीं आकाशवाणी अशी जाहाली कीं, हा पुत्र सर्व बलिष्ठांत श्रेष्ठ झाला आहे, आणखीही असें अद्भुत कृत्य जाहालें कीं, भीम होतांच मातेनें आपले अंकावर घेतला असतां तो अंकापासून खालीं शिळेवर पडतांच शिळेचें चूर्ण झालें त्या काळीं कुंतीस कोणी व्याघ्रच आला काय असें वाटून भयाभीत होत्साती सुत जाहलेला पुत्र अंकावर आहे किंवा नाहीं हें तिणें जाणलें नाहीं. ती चूर्णित जाहालेली शिळा पाहून पांडु राजा परम विस्मित जाहाला. ज्या दिवशीं भीमसेन जाहाला तेच दिवशीं दुर्योधन जाहाला. भीम होतांच पुनः पांडुराजास अशी चिंता जाहाली कीं, संपूर्ण लोकांमध्यें श्रेष्ठ, महा योद्धा असा मला पुत्र कसा होईल. सकल देवांचा राजा इंद्र बलाने अप्रमेय वीर्यवान अमित द्युती असा आहे त्यापेक्षां तपें करून त्याचा संतोष केला असतां महा बली पुत्र आपल्यास होऊन तो अमानुष अथवा मनुष्य यांचा संग्रामामध्यें वध करील, यास्तव इंद्राचीच आराधना करावी असा निश्चय करून कुंतीस एक सांवत्सरिक व्रत करण्या विषयीं आज्ञा दिली आणि आपण ही एक पायांवर उभें राहून उग्र तपास आरंभ केला, तो सूर्याच्या सोगें अतिशय संतप्त झाला नंतर इंद्र येऊन बोलला कीं, हे राजा तीन्ह लोकाचे ठायीं विख्यात-ब्राह्मण, गाई, सुऱ्हद यांच्या हिता करितां व बांधवजनास आनंददायक असा पुत्र तुला मी देईन तो आपल्या द्वेष्ट्यांचा नाश करील असें इंद्रानें पांडूरा-

जास सांगितलें तें भाषण कुंतीस पांडुराजानें सांगून बोलतो हे कल्याणी, इंद्र संतुष्ट होऊन मला जसा इच्छित पुत्र होता तसा तो देण्यास सिद्ध जाहाला आहे. यास्त तूं आतां इंद्राचें आवाहन कर. असें पतीचें भाषण ऐकून कुंतीनें इंद्राचें आवाहन केलें असतां देवराज तत्काल येऊन कुंतीशीं रत जाहाला त्या काळीं तिजपासून अर्जुन नामक पुत्र होतांच आकाशवाणी जाहाली कीं, हे आश्रमनिवासी ऋषीहो, हा कार्तवीर्या सारखा जाहलेला पुत्र, सिंहा सारखा पराक्रमी, इंद्रासमान, सकल शत्रूंस हा अजय्य आहे. हे कुंती विष्णु उत्पन्न होऊन त्याणें आपली माता जी अदिती इला जशी प्रीती उत्पन्न केली तसा हा अर्जुन विष्णु समानच आहे हा तुझा प्रीतीची वृद्धी करील हा पुत्र समरास साह्य करून मद्र, कुरु, चेदी आणि कारुष यांचा नाश करून कुरुचीलक्ष्मी संरक्षण करील. याच्या बाहुवीर्यानें खांडव वनीं अग्नी परम तृप्त होईल. सकल महीपालां प्रत जिंकून भ्रात्यां सह वर्तमान तीन अश्वमेध यागकरील हा तुझा पुत्र जामदग्न्या समान योद्धा व विष्णु सारखा वीर्यवान आहे सकल योध्यांमध्यें याची मोठी ख्याती होईल युद्धामध्यें हा माहादेवाचा संतोष करून त्या पासून पाशुपत नामक अस्त्र घेईल. सकल दिव्यास्त्रेंयास प्राप्त होतील नष्ट जाहालेली श्री पुनः हा ग्रहण करील या प्रकारची वाणी कुंती व अरण्य निवासी तपस्वी याणीं ऐकून सर्वांस आनंद जाहाला. नंतर आकाशांत देवानीं दुंदुभीचा नाद करून पुष्प वृष्टी केली. तसेच सर्प, गरूड, गंधर्व, अप्सरा, लोकपाल, भारद्वाज, गौतम, वशिष्ठ, अत्री इत्यादि दिव्य अलंकार घालून बिबत्सेचें गायन करूं लागले. तसेच महर्षींनीं बिबत्स्याच्या आसमंतात् भागीं स्थित होऊन जप केला. भीमसेन, उग्रसेन, ऊर्णायु, अनघ, गोपती, धृतराष्ट्र, सूर्यवर्चा, इत्यादिकांनीं गायन केलें अनुचाना, अनवद्या, मेनका, सहजन्या, उर्वशी अशा अप्सरानीं गायन केलें. द्वादश आदित्य, एकादश रुद्र, अश्विनी कुमार, अष्ट वसु, महाबलि मरुत, विश्वेदेव, साध्य, कर्कोट कादि नाग व गरुड इत्यादि आसमंता द्भागीं आले हें पाहून ऋषींस आश्चर्य वाटलें आणि ते पांडवा विषयीं अधिकच प्रीती करूं लागले. नंतर पांडुराजा पुनः पुत्र लोभास्तव कुंतीस बोलूं लागला.

तों कुंती राजास ह्मणाली कीं, हे राजा, अतःपर चतुर्थ पुत्र जरमी उत्पन्न करी न तर मला दोष लागेल. पांचवा पुत्र उत्पन्न केला तर मी बदूकी होईन. हे असे दोष असतां , तूं अधीक पुत्र उत्पन्न करण्या विषयीं मला कशी आज्ञा देतोस. असा विषय या अध्यायांत आहे.

१२४ अध्याय एकशेंचव्वीसावा:– वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, कुंतीस व तसेच गांधारीस पुत्र जाहाले असतां माद्री पांडुराजास बोलली कीं, तूं प्रजोत्पादना विषयीं असमर्थ जाहालास ह्मणोन मला संताप नाहीं; परंतु हें एक मला मोठें दुःख होतें कीं, आह्मीं तुझ्या उभयतां स्त्रिया तुला समान असतां दैवें करून कुंतीस संतती जाहाली आणि मला नाहीं जर हे राजा, अपत्य संताना विषयीं माझ्यावर कुंती अनुग्रह करील तर तुझेंही हित होईल ती माझी सपत्नी आहे त्या पेक्षां मी अभिमानानें तिला विचारणार नाहीं. जर माझ्यावर तूं प्रसन्न आहेस तर तिला तूंच विचार असें माद्रीचें भाषण ऐकून पांडुराजा बोलला कीं, हे माद्री, तूं जें भाषण केलेंस तो अर्थ माझेही मनांत आहे; परंतु तुला जर बोलून दाखवावें तर तूं काय ह्मणशील याविषयीं मला संदेह जाहाला. मी कुंतीस सांगितलें असतां ती माझी आज्ञा मोडणार नाहीं असा माझा दृढनिश्चय आहे असें माद्रीस बोलून नंतर कुंतीस पुनः असें बोलला कीं, हे कुंती माझ्या कुलसंतानाची वृद्धी करून लोकांस-प्रिय असेल तेंही कर. बहुत पुत्र जाहाले असतां कोणाच्या एखाद्या पुत्रास तरी पुढें अविच्छिन्न संतती होऊन आमच्या संततीचा विच्छेद व्हावयाचा नाहीं यास्तव हे कुंती तुला असें सांगतों कीं, ही माद्री तुझी सपत्नी आहे इजवर आपत्य संतानाची कृपा केलीसतर तुझी कीर्ती होईल. असें पांडूचें भाषण ऐकून कुंतीनें मंत्राचें चिंतन केलें आणि माद्रीस बोलली कीं, हे मद्रकन्ये, मी सांगतें त्या मंत्राचें चिंतन कर ह्मणजे तुला योग्य असें आपत्य होईल. असें सांगून मंत्राचा उपदेश केला. असतां तो माद्रीनें ग्रहण करून अश्विनी कुमाराचें आव्हान करतांच तत्काल अश्विनीकुमार येऊन माद्रीशीं रत जाहाले असतां नकुल सहदेव असे दोन पुत्र रूपानें अप्रतीम जाहाले त्या काळीं अशी आकाशवाणी जाहाली कीं, हे अश्विनीकुमार पुत्र सत्वरूपगुण

यानीं युक्त होतील. सूर्यासारखे तेजस्वी आहेत पुढें हिमाचलनिवासी ऋषी होते त्यांणी या पुत्रांचीं भक्तिकर्मे इत्यादि पाहून अनुक्रमानें युधिष्ठीर, भीमसेन व अर्जुन अशीं कुंतीपुत्रांची व नकुल आणि सहदेव अशीं माद्रीपुत्रांचीं नावें स्थापित केलीं, असे तेजस्वी पांच पुत्र पाहून पांडूस आनंद जाहाला. हिमाचल निवासी ऋषि पांडवांस पाहून संतुष्ट जाहाले. कोणे एके दिवशीं पांडुराजा कुंतीस बोलला कीं, पुनः तूं माद्रीस मंत्राचा उपदेश कर त्याकाळीं कुंती बोलली कीं, एकवार मंत्रोपदेश करून माद्रीस दोनपुत्र जाहाले येणे करून मी देवाची वंचना केली. आतां पुनः मंत्रोपदेश करण्या विषयीं आज्ञादेऊनको इतकेंच वरप्रदान मी तुह्मांशीं मागतें. असे हे पांडुसुत देवानीं दिलेले, महाबली, कुरुवंशाचें वर्धन करणारे हिमाचल पर्वतावर वृद्धीस पावत असतां सकलऋषी परम विस्मय पावले. सरोवरांतील पद्में स्वल्प कालांत जशीं वृद्धी पावतात तसे तिकडे धृतराष्ट्राचे शत पुत्र व इकडे पांडूचे पांचपुत्र वृद्धी पावले. असा विषय या अध्यायांत आहे.

१२५. अध्याय एकशें पंचविसावा:— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, पांडुराजानें आपले रूपवान् पांच पुत्रांस पाहून तो रम्य हिमाचलपर्वतीं राहिला. कोणे एके काळीं वसंतऋतु आला असतां पांडुराजा उभयतां भार्यासहवर्तमान वनाची रम्य शोभा पहात चालला, पलाश, तिलक, आंब्र इत्यादि फलमूलानें समृद्ध जाहलेले वृक्ष व नानाप्रकारचीं जलस्थानें व पद्मिनी पुष्पानीं प्रफुल्लित जाहलेल्या अशा वनास पाहून अत्यंत संतुष्ट जाहाला असतां त्याच्या हृदयांत मन्मथाची पीडा उत्पन्न जाहाली. जसा अमरच वनामध्यें संचार करितो तसा पांडुराजा हर्षानें वनात संचार करीत असतां माद्री एकाकीं आपणच राजाच्या मागून गेली. तिणें सूक्ष्म वस्त्रें धारण केलीं होतीं आणि वयस्था असल्यामुळें तिला पाहातांच राजा एकांतीं आकर्षण करूं लागला त्याकाळीं माद्रीनें राजाचें यथाबळें बहुत जरी निवारण केलें-तरी कामानें अत्यंत व्याप्त असल्यामुळें शापाचें स्मरण न राहातां बलात्कारानें मैथुन धर्मास लुब्ध जाहाला. तेणे करून जीविताचा परिणाम समक्ष आला. असा तो राजा माद्रीपाशीं रत झाला असतां कांहीं समयानें नष्टजी

व जाहाला हें माद्रीनें पाहून निश्चय केला कीं, राजा मृत जाहाला नंतर त्या प्रेतमत माद्रीनें आलींगन करून एका एकीं दुःख कारक शब्दाचा आक्रोश केला तो दुःखितशब्द ऐकून पुत्रा सहवर्तमान कुंतीव माद्रीपुत्र एका एकीं राजाच्या संन्निद्ध आले त्या काळीं माद्री कुंतीस बोलली कीं, हे भद्रे तूं एकटीच आंत ये. ते पुत्र तसेच बाहेर राहूंदे, असें ऐकून कुंतीनें त्या मुलांस बाहेर ठेऊन आपण एकटीच आंत गेली, तों माद्रीचा मोठा आक्रोश चाललाच आहे आणि उभयतां स्त्री पुरुषें धरणीवर पडलीं आहेत. असें पाहून कुंती अतिशय विलाप करून माद्रीस ह्मणत्ये हे मद्रसुते या वीरास आजपर्यंत मी संरक्षित केला असतां त्यानें तुला कसें आर्त केलें अगे याला मृगाचा शाप झाला होता हें विदीत नवतें काय? असत्, हे बाल्हिकी तुला पाहून मला हर्षहोऊन असें वाटतें कीं, तूं मोठी भाग्यवती व धन्य आहेस अंतकाळीं राजाचें मुख तुझ्या दृष्टीस पडलें. असें कुंतीचें भाषण ऐकून माद्री बोलली हे देवी मी राजाचें बहुत निवारण केलें परंतु त्याणें माझें ऐकिलें नाहीं त्याचें दैवच आज अनिष्ट करण्या विषयीं अनुकूल जाहालें असें वाटतें असें ऐकून कुंती बोलल्ये हे माद्री बरें, असो मी राजाची ज्येष्ठ पत्नी आहें यास्तव श्रेष्ठ फल तें माझाकडे आहे, अवश्य जें होणें तें चुकत नाहीं, तूं एकीकडे हो मी पतीशीं सहगमन करतें हे लहान दारक आहेत यांचें उत्तम प्रकारें पालन कर. असें कुंतीचें भाषण ऐकून माद्री बोलत्ये हे भद्रे, भर्त्या सहवर्तमान मीच गमन कर्त्ये मी अद्याप कामानें तृप्त जाहाल्यें नाहीं या करितां तूं ज्येष्ठ आहेस ह्मणून मला आज्ञा दे. माझाशीं याणें गमन केलें ह्मणोन मरण पावला तर मी याचे बराबर यमाचे गृहीं जाऊन याच्या कामाची शांती करीन आतां हे आर्ये, व्रत आचरण करून याच्याशीं सहगमन कर्त्ये. आतां जे माझे पुत्र आहेत त्यांचें आपल्या पुत्रांसारखेंच पालन कर माझामुळें राजा प्रेतत्व पावला त्यापेक्षां राजाच्या कलेवरास हवर्तमान मी आपलें कलेवर दहन करीन असें बोलून तिनें भर्त्याच्या चिताग्नीवर आरोहण केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१२६. अध्याय एकशें सव्विसावा— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडुराजा मृत जाहाल्यावर हिमाचल निवासी सकल महर्षी आपआ-

पल्यांत ह्मणाले कीं, पांडु राजा आपलें राज्य व राष्ट्र याचा त्याग करून या-स्थानीं तप करण्यास आला पुढें ईश्वराचे कृपेनें यास पुत्र जाहाले तो आतां मरण पावला. तेव्हां याचें आपल्यास इतकेंच कर्तव्य आहे कीं, याच्या अस्थि व पुत्र आणि भार्या यांस हस्तनापुरी त्याच्या बांधवजनाचे स्वाधीन करून-यावें असें ते महर्षि आपआपल्यांत विचार करून पांडुराजाची दारा पुत्र-यांस घेऊन भीष्म व धृतराष्ट्र यांचे स्वाधीन करण्या करितां हिमाचल पर्वता पासून निघाले असतां ते मार्गांत एकमेकांस बोलतात कीं, ही पुत्रवत्सला कुंती, राजा असतां किती सुखी होती तिला आज अशा अवस्थेंत आपण हस्तनापुरीं घेऊन जातों असें बोलत नगराच्या द्वारप्रदेशीं गुल्यका सहवर्तमान आले आणि द्वाररक्षक होता त्यास बोलले कीं, आपणास भेटण्या करितां ऋषी आले आहेत असें राजास सांगावें. असें तापसाचें वाक्य द्वारपालानें राजास सांगितलें नंतर राजाची आज्ञा होतांच द्वारपाल तापसास घेऊन राजसभेकडे चालले हें वर्तमान नगर निवासी ऋषीनीं ऐकून त्यांस मोठा विस्मय प्राप्त झाला आणि सूर्योदयानंतर एकमुहूर्त-दिवस येतांच नगर निवासी, बाल, वृद्ध, स्त्रियांचे समुदाय व क्षत्रियांचे-समुदाय यानारूढ होऊन तापसांचा समुदाय पाहाण्यास आले. सकल लोक धर्मबुद्धी होते ह्मणोन कोणी कोणाशीं स्पर्धा करीत नसत. तसेंच भीष्म, सोमदत्त, बाल्हिक, प्रज्ञाचक्षु धृतराष्ट्र, विदुर, सत्यवतीदेवी, कौशल्या, इतर राजांच्या स्त्रिया, गांधारी, धृतराष्ट्राचे दायाद, दुर्योधन प्रभृति. भूषण युक्त होऊन सकल पौर, जानपदासहित येऊन त्यानीं ऋषिगणाची पूजा केली आणि साष्टांग नमस्कार करून पुरोहिता सहवर्तमान ते सकल कौरव ऋषीच्या सन्निध बसले. नंतर त्या ऋषिगणामध्यें एक अतिशय वृद्ध ऋषी जटा कृष्णाजिन धारण केलेला असा होता तो सकल ऋषींचे अनुमतानें उठून असें बोलला कीं, हे कौरव हो तुमचा दायाद पांडु-नामक राजा काम भोगाचा त्याग करून हिमालय पर्वतीं गेला होता तेथें त्यानें ब्रह्मचर्यव्रत धारण केलें असतां मंत्रादिक दैविक उपायानें धर्मापासून-हा युधिष्ठिर झाला, तसाच हा बलिश्रेष्ठ भीम नामक पुत्र, वायूनें दिला. इंद्रा

ऱ्या प्रसादानें कुंतीचे गर्भी हा धनंजय नामें पुत्र जाहाला. तशीच माद्री अश्वि नी कुमाराच्या प्रसादानें हे नकुल सहदेवास प्रसवली. हा पांडु राजा मोठा धर्मात्मा व यशस्वी होता त्याणें नष्टजाहलेल्या पैतामह वंशाचा पुनः उद्धार केला. या पांडूच्या पुत्राची जन्म, वृद्धी व अध्ययनें पाहून आह्मांस मोठी प्रीती वाटते असा तो पांडुराजा साधुव्रत धारण करून वनामध्यें राहात असतां हे पुत्र जाहाल्यावर तो मरण पावला. त्यास आज सत्रा दिवस जाहाले व त्याची द्वितीय भार्या, अग्निमुखांत पतीसहवर्तमान गेली. त्या उभयतांच्या अस्थी व हे पुत्र आणिले आहेत यांस घेऊन ही माता व हे पुत्र यांसहवर्तमान क्रियाकरावी. अंत्येष्टी कर्म समाप्त जाहाल्यावर पांडुराजा आपल्या स्थितीस जाईल. असें सर्वलोक पाहात असतां कुरूस तापसांनी पांडूचें कर्म सांगून ते एकक्षणांत तेथेंच अंतरधान पावले असतां जसें गंधर्व नगर पहावें तसा ऋषिगणाचा समुदाय पाहून सर्वांस एकाएकीं विस्मय झाला. असा वि॰ या अध्या॰ आहे.

१२७. अध्याय एकशें सत्ताविसावा— धृतराष्ट्र बोलतो, हे विदुरा, पांडू व माद्री यांचीं राजासारखीं प्रेत कार्यें कर आणि त्याचीं वस्त्रें, रत्नें, पशु व नाना प्रकारचीं धनें जीं असतील तीं दानकर आणि जेणें करून माद्रीचा सत्कार कुंती करील असें करजा कुंतीनें वायु व आदित्य यांचें दर्शन कधीं केलें नाहीं व जिला देवासमान पांच पुत्र जाहाले आहेत ती कुंती पांडु करितां शोक न करील असें कर. पांडुराजा सर्वांनीं प्रशंसा करण्यास योग्य होता यास्तव तुह्मीं ही त्याचा शोक करूं नका. हें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून विदूर भीष्मा सहवर्तमान पवित्रस्थानीं पांडूचा संस्कार करण्यास निघाला. नगरांतून जाते समयीं तूप, गंध व पांडूचा प्रदीप्त अग्नि घेऊन पुरोहितासहवर्तमान निघाला. सर्व ऋतु कालोद्भव सुगंधिक पुष्पानीं शिबिका अलंकृत करून त्यामध्यें राजा व राजपत्नी यांच्या अस्थि स्थापित केल्या आणि अमात्य, ज्ञाती व सुहृद यांणी ती शिबिका घेऊन प्रयाण केलें. शुभ्र छत्र, चामर व विंझणे घेऊन वाद्यांचा गजर करीत चालले असतां मार्गांत नाना प्रकारचीं असंख्यात रत्नें त्यानीं याचकांस दिलीं छत्र, चामरें दान करण्या करितां बराबर घेतलीं. शुक्लवस्त्रें धारण केलेले उपाध्ये, दीप्यमान अग्नी घेऊन समागमे चालले च आहेत. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य

व शूद्र शोकसंतप्त होऊन रोदन करीत शिबिकेमागून जात असतां असें बोलले कीं, हे राजा, तूं आमचा त्याग करून कोठें गेलास, आतां आह्मीं अनाथानीं कोठें राहावें, तसेच पांडुराजाचे पुत्रही आक्रोश करीत मागें चालले असतां गंगेच्या सुमतिरीं वनांत जाऊन ती शिबिका तेथें ठेविली. नंतर कृष्णागरु इत्यादि सुगंधि पदार्थ त्याच्या शरीरास लाऊन शतशः सुवर्णमय घटानीं तें कलेवर सिंचन केलें त्या कालीं तो नरश्रेष्ठ पांडु उत्तम प्रकारचा शोभूं लागला. नंतर याजकांच्या आज्ञेनें ती उभयतां कलेवरें यत्नानीं, सुगंधिक गंध द्रव्यानीं, पुनः चर्चित केलीं असतां तीं दोन्ही प्रेतें कौसल्येनें पाहातांच हा पुत्र हा पुत्र असा आर्तशब्द करून ती धरणीवर पडली. हे पौरजनपद निवासी लोकानीं पाहून तेही रोदन करूं लागले. भीष्म, विदुर, व इतर कौरवानीं ही मोठा आक्रोश केला. नंतर त्या उभयतां प्रेतांचा दाह करून दुःखित झालेल्या कौरवांच्या स्त्रिया, तसेच पांडव, भीष्म, विदुर, व इतर लोक याणी ही अत्यंत आक्रोश करून तिलांजली दिली. त्याकाळीं पांडुपुत्रांस फार दुःख जाहालें. हें सर्वांनीं पाहून शोकापासून त्यांचें निवारण केलें असतां त्यादिवशीं बांधवां सहवर्तमान पांडवांनीं तसेच नगरनिवासी ब्राह्मण आले होते त्याणीं ही भूमी वर शयन केलें, याप्रकारें द्वादश रात्री त्या सर्वांच्या गंगातिरीं अतिक्रांत जाहाल्या. इकडे सकल हस्तनापुर वृद्धा पासून बाला पर्यंत दुःखित जाहालें. असा विषय या अध्या॰ आहे.

१२८ अध्याय एकशें अठ्ठाविसावा:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया नंतर कुंती, धृतराष्ट्र व भीष्म याणीं पांडूराजाचें स्वधामृतमय असें श्राद्ध करून कुरुव सहस्रावधी विप्रमुख्यां स भोजन घालून बहुत रत्नें व गांव ब्राह्मणांस दिले आणि पांडवांस घेऊन हस्तनापुरीं आले. नंतर पांडुराजाचें वारंवार स्मरण करून पौरजानपद लोक आपला बंधूच मृत जाहाला काय असें जाणोन बहुत शोक करूं लागले. सत्यवतीही दुःखानें मूर्च्छित जाहालेली जाणोन व्यास तेथें आले आणि मातेस बोलले कीं, हे माते अतःपर जे दिवस येतील ते पूर्वीपेक्षांही पापिष्ट येतील. पृथ्वी इत उत्तर फलशून्य होईल, बहुमाया युक्त नानाप्रकारच्या दोषानीं व्याप्त धर्म व क्रियांचा लोप करीत घोर काल अतःपर येईल. कौरवांच्या अनिती मुळें ही पृथ्वी नाश पावेल, आस्त

व तूं आतां तपोवनामध्यें योगाचा आश्रय करून वास करावा या कुलाचा मोठा नाश होणार तो तूं कशाला पाहातेस, असें व्यासानें भाषण अंगीकृत करून आपली स्नुषा जी अंबिका तिला बोलली कीं, हे स्नुषे तुझ्या पौत्राच्या दुरनितीनें सकल भरत कुलांतील सर्वलोक नष्ट होतील असें ऐकिलें आहे यास्तव तुझी इच्छा असेल तर मजसह वर्तमान वनामध्यें चल, तुझें कल्याण होईल. असें सत्यवतीनें भाषण अंबिकेनें ऐकून हा विचार भीष्मास निवेदन केला. नंतर भीष्मानें अनुमोदन देतांच उभयतां स्नुषा सहवर्तमान सत्यवती वनांत उत्तम प्रकारनें तप करीत देहाचा त्याग करून उत्तम गतीस गेली. नंतर पांडवांचे संस्कार वेदोक्त मंत्रानें करून ते बालक पितृगृहीं सुखानें राहिले धृतराष्ट्र पुत्र आणि पांडव एकत्र राहात असतां सर्वांमध्यें धांवण्याविषयीं अथवा मोठी वस्तु उचलण्या विषयीं धृतराष्ट्र पुत्रापेक्षां भीमसेन अधिक असे तो धृतराष्ट्र पुत्रांचें परिमार्दन करी, हर्षें करून सर्व बालकें क्रीडा करीत असतां कांहीं धृतराष्ट्र पुत्रांस भीमसेनानें घेऊन लपून राहावें. एकशें एक पुत्रांस एकदां भीमसेनानें उचलावें. कोणाचे केश हस्तामध्यें धरून भूमीवर हापटावें. कोणे एके दिवशीं धृतराष्ट्राच्या दाहा पुत्रांस उदकामध्यें टाकिलें धृतराष्ट्र पुत्र वृक्षावर चढून फळें तोडीत असतां भीमानें त्या वृक्षावर वेगानें मोठा प्रहार करून फलाशीं सहवर्तमान धृतराष्ट्र पुत्रांस खालीं पाडावें भीमसेना बराबर धृतराष्ट्राचे पुत्र युद्धास कधीं आले नाहींत. बालत्वापासून भीमसेनाची व धृतराष्ट्र पुत्रांची अत्यंत स्पर्धा असल्यामुळें धृतराष्ट्र पुत्र अंतःकरणांत खिन्न असत असें भीमसेनानें बलश्रेष्ठ आहे असें जाणोन दुर्योधनानें भीमा विषयीं घातुकबुद्धी धरिली नंतर सर्व भ्रात्यांमध्यें असें बोले कीं, भीम हा महा बलाढ्य असल्यामुळें आह्माशीं वारंवार बहुत स्पर्धा करतो यास्तव निद्रिस्त असतां यास गंगेंत मी टाकीन आणि या भीमसेनाचा ज्येष्ठबंधू युधिष्ठिर आहे त्यास बंदींत घालून पृथ्वीचें राज्य करीन. असा निश्चय करून भीमसेन एकाकी कोठें सांपडेल याविषयीं दुर्योधन यत्न करूं लागला. एके दिवशीं दुर्योधनानें जलक्रीडा करण्याकरितां प्रमाण कोटी नामक गंगातिरीं कांहीं जलांत व कांहीं स्थलांत अशीं चैल कंबलाचीं चित्रविचित्र पट गृहें करून उदक क्रीडाक

रण्या करितां नागरिक लोकांसही आमंत्रण केलें. त्या पटगृहांत भक्ष्य, भोज्य इत्यादिक पदार्थ कुशल जे पाक करणारे त्यांणीं स्थापित करून धृतराष्ट्रपुत्रास सांगितलें. नंतर दुर्मती दुर्योधन, पांडवांस आमंत्रण करून बोलला कीं, गंगेमध्यें जलक्रीडा करण्याकरितां आह्मीं सकल भ्रात्यांनीं जाण्याचा विचार केला आहे, तर तुह्मीं आमचा बराबर चलावें. असें दुर्योधनानें भाषण ऐकून धर्मराजानें उत्तर केलें कीं, बरें आहे. नंतर मोठे रथ व गज आणून त्यांजवर पांडवां सहवर्तमान कौरव आरूढ होऊन नगरापासून निघाले तों मार्गांत मोठा बाग कौरवांनीं फार सुंदर केला होता. नंतर कांहीं लोक बागेचे बाहेर ठेऊन गिरिगुहेंत सिंह जसे प्रवेश करितात तसें त्या वीरांनीं बागेंत प्रवेश केला. नंतर तेथील उपस्थानें, गृहें यांची शोभा पाहून गृहाच्या दोन्ही बाजूनें नम्र केलेल्या स्तंभयुक्त शाला, गवाक्षें, जलयंत्रें व कारंजी इत्यादि जलानें भूमी सिक्त केलेली, तशाच जलानें परिपूर्ण जाहलेल्या विहिरी तशींच सरोवरें व प्रफुल्लित जाहलेल्या कमलानीं युक्त सरोवरस्थ जलाची शोभा पाहिली. अशा उत्तम स्थलीं पांडवां सहवर्तमान सकल कौरव जाऊन बसले. नंतर नानाप्रकारचीं भोज्यें भक्षण करून हांस्य विनोद पूर्वक एकमेकाच्या मुखामध्यें भोज्यान्नें घालूं लागले. त्या काळीं पापी दुर्योधनानें भीमास मारण्याच्या हेतूनें विष घालून कांहीं भक्ष्य सिद्ध केलें होतें तें भीमाच्या मुखांत प्रीतीनें घातलें हें कृत्य भीमसेनास माहीत नसल्यामुळें त्याणे तें अन्न भक्षण केलें तें पाहून दुर्योधनानें आपल्यास कृतकृत्य मानिलें. नंतर पांडव व कौरव एकत्र होऊन जलांत क्रीडा करूं लागले असतां सायंकाळ झाला नंतर परिश्रांत झालेले सकल कौरव व पांडव पटगृहांत आले. भीमसेन तर जलक्रीडेनें अत्यंत श्रांत होऊन खिन्न जाहाला असतां स्रवें करून निजला. विषानें अंग व्याप्त जाहाल्यामुळें निचेष्ट पृथ्वीवर पडला नंतर दुर्योधनानें लतापाशानें त्यास बांधून गंगेंत टाकिला असतां भीमसेन निःसंज्ञ जाहाल्यामुळें जलांत पडला त्या काळीं सकल नागांचे कुमार भीमसेनास दंश करूं लागले कांहीं सर्प आपल्या कालकूटा सारख्या विषानीं भीमसेनाचीं मर्मस्थानें दंशित करीत असतां भीमाच्या अतिशय बलामुळें त्याच्या त्वचेस कांहीं ही विष बाधा जाहाली नाहीं. कां-

हीं वेळानें भीमसेन सावध होऊन तीं समग्र बंधनें तोडून सर्पांचें कंदन करूं लागला असतां भीमसेनाचे हातून जे सर्प जिवंत राहिले ते वासुकी कडे जाऊन बोलले कीं, हे नागराज कोणी एक मनुष्य बंधन केलेला जळांत निचेष्ट होता असें जाणोन त्यास दंश करण्यास आह्मीं गेलों परंतु हा सावध होऊन आमचें कंदन करितो त्या पेक्षां हा कोण नरश्रेष्ठ आला हें पाहाण्या करितां तुह्मीं तेथें चलावें. असें सर्पांचें भाषण ऐकून नागराज, वासुकी नागां सहवर्तमान भीमास पाहाण्या करितां त्याचे सन्निध गेला, त्या सर्प समुदायांत पृथेचा मातामह आर्यक होता, त्याणे भीमास पाहून आपल्या दौहित्राचा दौहित्र परम दुःखित जाहाला आहे त्यास आलिंगन देऊन परम संतुष्ट जाहाला असतां वासुकीनें हें छत्र पाहून तो आर्यकास ह्मणतो, हा तुमचा संबंधी आहे तर त्यास आपण प्रिय असा पदार्थ काय द्यावा असें ऐकून आर्यक बोलतो हे नागेंद्रा, यास अमृत प्राशना सदे. कुंड संबंधी अमृत प्राशन केलें असतां सहस्र नागाचें बल येतें अशा कुंडातील अमृत जितकें हा प्राशन करील तितकें यास द्यावें. असें आर्यकाचें भाषण ऐकून वासुकीनें त्यास सांगितलें कीं, बरें आहे. नंतर नागानीं भीमाची स्तुती करून त्या अमृत कुंडा जवळ त्यास नेला असतां भीमसेनानें पूर्वेस मुख करून आठ कुंडें प्राशन केल्या नंतर तो एक दिव्य शयनावर निजला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२९. अध्याय एकशें एकूणतीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, नंतर क्रीडा विहार समाप्त होऊन पांडवां सहवर्तमान सकल कौरव हस्तना पुरीं येण्यास निघाले असतां भीमसेन कोठें दिसत नाहीं असें पाहून सर्वांनीं निश्चय केला कीं, तो आपल्या पूर्वींच हस्तना पुरीं गेला असेल. धर्मात्मा जो युधिष्ठिर याचें मनांत विपरित येऊन तो मातेस बोलला कीं, हे कुंती भीमसेन येथें आला आहे कीं काय? सकल वनें आह्मीं शोधुन पाहिलीं भीमसेन कोठें दृष्टीस पडला नाहीं. हे शोभने तो दृष्टीस न पडल्या मुळें मला स्वस्थ वाटत नाहीं, आणि त्याच्या जीविता विषयीं संशय जाहाला आहे, जेव्हां तो निजला होता तेव्हां पासुनच कोठें दिसत नाहीं तेव्हां कोणी मारला तर नसेलना, असें धर्मराजाचें भाषण ऐकून कुंती हा हा असा आक्रो

श शब्द करीत युधिष्ठिरास बोलली कीं, हे पुत्रा, मी भीमास पाहिला नाहीं आ णि तो माझ्याकडे आलाही नाहीं. तीकर आपल्या भ्राते बराबर येऊन त्याचा शो धकर असें बोलून ती विदुराकडे गेली आणि त्यास भीमाचा वृत्तांत सांगून बोलली कीं, हे विदुरा, भीमाचा पराक्रम दुर्योधनास सहन होत नसल्यामुळें त्याणेंही भीमास मारला असेल यामुळें माझे चित्तास समाधान होत नाहीं, असें कुंतीचें भाषण ऐकून विदुर बोलतो हे कल्याणी, तुझे इतर पुत्र आहेत त्यांचें तूं रक्षण कर, दुरात्मा दुर्योधन मोठा क्रूरकर्मी आहे तो तुझे इतर पुत्रही मारील. कांहीं शोक करूं नको तुझे पुत्र दीर्घायुषी आहेत ह्मणोन व्यासानें पूर्वी सांगितलें आहे, थोडक्याच कालांत तुझा पुत्र येऊन तुला आनंद करील. असें बो लून विदुर आपल्या भवनी गेला. कुंतीतर अतिशय चिंताग्रस्त होऊन पुत्रांस-हवर्तमान गृहीं राहात असतां आठ दिवस जाहाले. इकडे नागलोकीं भीमसेना नें रस प्राशन केला होता तो त्याचा रस जीर्ण होऊन सावध जाहाला हें सकल भुजं गानी पाहून भीमसेनाचें शांतवन करीत ते असें बोलले कीं, हे महाबाहो, जा पेक्षां हा रस तूं प्राशन केलास त्यापेक्षां अयुत नाग प्रमाण तूं बलवान होऊन र णांत पराजय पावणार नाहींस. आतां या उत्तम दिव्य जलांत स्नान करून आप ल्या गृहीं जा. तुझावांचून तुझे भ्राते अतिशय दुःखित जाहाले आहेत, असें ना गांचें भाषण ऐकून भीमसेनानें शुभ्र वस्त्रें व माला धारण करून विषनाशक औषधी सहित नागानीं दिलेल्या अन्नाचें भोजन केलें आणि भुजंगानीं पूजित व आशीर्वाद घेत असा नागलोका पासून निघाला त्याकाळीं नागानीं भीमसेना स पूर्वस्थळीं ठेवून ते अंतरधान पावले. नंतर भीमसेनानें हस्तनापुरीं येऊन मा ता कुंती व ज्येष्ठ भ्राता युधिष्ठिर यांस प्रणाम करून आपल्या पेक्षां कनिष्ठ-होते त्यांच्या शिरांचें आघ्राण केलें. नंतर सकल भ्रात्यानीं भीमसेनास आलिं गन देऊन माते सहवर्तमान एकमेकांप्रत कुशल प्रश्न करीत असतां दुर्योधनानें केलेला व नागलोकीं झालेला वृत्तांत भीमसेनानें आपल्या भ्रात्यांस सांगित ला. त्या काळीं युधिष्ठिर भीमास बोलला कीं, हें जाहालेलें कृत्य कोणाजवळ-सांगूं नको. अतःपर सर्वांनीं एकमेकास रक्षण करून असावें असें सर्व भ्रा त्यांस सांगून तेव्हां पासून सावध राहिला. दुर्योधन, कर्ण आणि शकुनी या-

शिवगोनीं मिळून पांडवांस मारण्याचे इतर उपाय बहुत केले ते पांडवांनीं जाणा ले, परंतु ते लोकांत प्रगट न करतां विदुराचे अनुमतानें राहिले. नंतर धृतराष्ट्रानें आ पले पुत्र अतिशय दुर्मद होऊन फार खेळतात याजकरितां विद्याभ्यासा विषयीं वेदशास्त्रार्थ पारग असा कृपाचार्य याजकडे धनुर्विद्येचा अभ्यास करण्या करि तां पांडव व कौरवास पाठविलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१३०. अध्याय एकशेंतिसावा.— जनमेजय प्रश्न करितात, हे वैशंपाय-न ऋषे, कृपाचार्यांची उत्पत्ती कशी जाहाली व शरस्तंभा पासून उत्पन्न होऊन-ज्यास अस्त्रविद्या प्राप्त जाहाली हें कसें, तें मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपा यन सांगतात; हे जनमेजया, महर्षी जो गौतम, याचा शरद्वान् नामें पुत्र होता तो शरा सहवर्तमान वृद्धीस पावला असतां त्याची वेदाध्ययना वर बुद्धी चसोन नि रंतर धनुर्वेदांतच बुद्धी असे जसे तपानें ब्रह्मचाऱ्यास वेद मिळतात तशीं त्यास तपानें सर्व अस्त्रें मिळालीं. तो धनुर्वेद बलानें इंद्रास अत्यंत संताप देत अस-तां कोणे एके दिवशीं इंद्रानें जानपदी नामक देवकन्या होती तिला सांगितलें कीं, तूं जाऊन गौतमाच्या तपास विघ्न कर. अशी इंद्राची आज्ञा होतांच त्या कन्येनें शरद्वान याच्या आश्रमीं जाऊन त्यास लोभ उत्पन्न केला. ती एक वस्त्रा अप्सरा वनामध्यें गौतमानें पाहातांच त्याचे नेत्र प्रफुल्लित जाहाले. परंतु ज्ञानाचे दार्ढ्य व तपाचें सामर्थ्य मोठें होतें ह्मणोन आपलें स्थानमात्र त्याणें सोडलें नाहीं. नं-तर त्या कन्येचे दर्शनानें मुनीचें रेत स्खलन जाहालें तें मुनीनें न जाणतां ध-नुष्य बाण, कृष्णाजिन, आश्रम व अप्सरा या सर्वांचा त्याग करून तो ऋषी चा लला, तों त्या ऋषीचें रेत शरस्तंबावर पडून त्याचे दोन विभाग होतांच त्यापा-सून स्त्रीपुरुष असे मिथुन निर्माण जाहालें, कोणे एके दिवशीं शांतनुराजा-त्या वनांत मृगये करितां आला त्याचा कोणी एक सेनाचर होता त्याणें हें अपत्य मिथुन पाहून पुढें धनुष्य बाण व कृष्णा जिनें हीं पाहिलीं त्याजवरून निश्च-य केला कीं, धनुर्वेदांग जाणणाऱ्या द्विजाचीं हीं अपत्यें आहेत. नंतर तें अ पत्य मिथुन शरासहवर्तमान त्यानें राजास आणोन दाखविलें, तें पाहून रा-जानें त्या उभयतांस गृहीं नेलें आणि हे माझेच पुत्र अशीममता त्याजवर ठेवून त्याचीं संस्कारादिक कर्में केलीं हें वर्तमान गौतमास कळतांच तोही धनुष्य बा-

या, द्रोणाचार्य द्रुपदराजाचे गृहीं जाऊन त्यास बोलला कीं, हे राजा तुझा मी मित्र द्रोणाचार्य आलों आहें, तें मित्राचें भाषण ऐकून द्रुपद राजा क्रोधानें द्रोणास बोलला कीं, हे ब्राह्मणा तुझी प्रज्ञा अद्याप असंस्कृत आहे, कोणाशीं काय बोलावें हें अद्याप तुला माहित नाहीं, मोठ्या बलात्कारानें मला सांगतोस कीं, मी तुझा सखा आलों आहें, अरे तुझासारखे दरिद्री राजाचे सखे कधीं तरीं जाहाले आहेत काय? असें वाईट भाषण राजाशीं कधींही करूं नये, अरे बाबा, कालें करून मित्रपणा जरी असला तथापि तो जीर्ण होतो. तुझा माझा कदाचित पूर्वीं मित्रपणा तुला सामर्थ्य असतां असेल परंतु ते आतां काय आहे. असें द्रुपदराजाचें भाषण ऐकून आचार्य एक मुहूर्त पर्यंत चिंताग्रस्त जाहाला. नंतर क्रोधाचें संतप्त होऊन पांचालराजाचा पराभव जा प्रकारानें होईल तो प्रकार अतःपर साध्य करावा यास्तव हस्तनापुरीं येऊन कृपाचार्याचे गृहीं गुप्तरूपानें राहिला. कधीं कधीं कृपाचार्य गृहीं नसले ह्मणजे अश्वत्थामाच कौरव, पांडवांस अस्त्रविद्या शिकवी परंतु कौरवांनी हा अश्वत्थामा द्रोणाचा पुत्र आहे असें कधीं जाणलें नाहीं. असा कांहीं काळ पर्यंत गुप्तरूपानें गौतमाचे गृहीं द्रोणाचार्यानें वास केला. कोणे एके दिवशीं हस्तनापुरचे कौरवादिक सकल कुमार विटूदांडू खेळण्याकरितां नगरांतून बाहेर गेले होते, तेथें खेळतां खेळतां विटी एके कुपांत पडली, ती काढण्या विषयीं सकल कुमार यत्न करीत परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. इतक्यांत एक अग्निहोत्री ब्राह्मण शाम वर्ण कांहीं वांकलेला असून वृद्ध जाहालेला अशास पाहून ते सकल कुमार ब्राह्मणा संन्निध गेले असतां कुमारास पाहून कौशल्य दर्शन हेतूनें द्रोणाचार्य बोलला कीं, अरे बालक हो, तुमच्या बलास, क्षात्रकर्मास आणि तुमच्या विद्येस धिःकार असो. अरे तुह्मीं भरताच्या कुलांत उत्पन्न होऊन तुमच्यानें कुपांतली विटी बाहेर काढवत नाहीं. बरें आतां माझें सामर्थ्य पाहा, ही मुद्रिका मी कूपांत टाकतों आणि तुमची विटी आणि ही मुद्रिका अशीं दोन्हीं, या दर्भमुष्टीच्या योगें बाहेर काढतों मला भोजन मात्र द्या. असें कुमारास बोलून द्रोणाचार्यानें आपलें अंगुलीचें रत्न निरुदक कूपांत टाकिलें त्या काळीं युधिष्ठिर राजा द्रोणाचार्यास बो-

लला कीं, हे ब्राह्मणा, कृपाचार्याच्या अनुमतानें नगरांत तुह्मीं भिक्षा मागा
वी इतकेंच तुमचें कार्य, असें भाषण ऐकून द्रोणाचार्य बोलला कीं, हे भरतहो,
त्या ईषिका अभिमंत्रित करून आतां कूपांत मी टाकतों यांचें वीर्य काय आहे
तें पाहा त्या ईषिका एकमेकास ग्रंथित होऊन तुमची विटी तुह्मास आणू
न देतील. असें ह्मणोन आचार्यानें दर्भमुष्टी कूपांत टाकतांच ते दर्भ मंत्राच्या
योगें एकमेकास ग्रंथित होऊन त्यानी विटी बाहेर काढिली. हें कृत्य सकल
कुमारानीं पाहून प्रफुल्लित नयन होऊन एकमेकास बोलतात, काय हो हें
आश्चर्य, असें कर्म आपण कधींही पाहिलें नाहीं. असें बोलून द्रोणाचार्यास बो
लले कीं, हे विप्रर्षे आपली मुद्रिका लोकर काढा त्या काळीं द्रोणाचार्यानें आप
ले धनुष्यास अभिमंत्रित बाण लाऊन कूपांत टाकतांच त्याने मुद्रिके सहवर्तमा
न येऊन अंगुलीका द्रोणाजवळ दिली. हें पाहून ते कुमार द्रोणास बोलले कीं,-
हे ब्रह्मन् तुह्मांस आह्मीं नमस्कार करितों. हें कर्म दुसरे कोणामध्यें नाहीं आपण
कोण कोणाचे व कोणच्या हेतूनें येथें आलां हें सांगा. असें भाषण ऐकून द्रोण
बोलतात हे कुमारहो, तुह्मीं भीष्मास माझें रूप व गुण कळवा ह्मणजे भीष्मास-
मी कोण आहें हें कळेल नंतर त्या कुमारानीं ब्राह्मणाचें कर्म भीष्मास सांगितलें
तेव्हां भीष्मानें जाणलें कीं, हा गुरु द्रोणाचार्य आहे हें कर्म त्यावांचून इतर को
णाचें नाहीं. नंतर भीष्मानें द्रोणाकडे जाऊन त्यास आगमनाचें कारण विचारि
लें असतां द्रोणाचार्य बोलला कीं, हे भीष्मा, महर्षी जो भारद्वाज ऋषी याज
पाशीं धनुर्विद्याभ्यासा कर्ता ब्रह्मचारी जटील होऊन बहुत दिवस राहिलों त्या
च काळीं पांचाल देशीचा राजा यज्ञसेन महाबली धनुर्विद्या शिकण्या करितां-
तेथें राहात असतां त्याचें माझें अतिशय सख्यत्व जाहलें, एकमेकानीं उभय
तांवर परस्पर उपकार केले. कोणे एके दिवशीं यज्ञसेन मला बोलला कीं, हे स
ख्या, मी आपले पित्यास फार प्रिय आहें यास्तव जा काळीं तो मला राज्याभि
षेक करील त्या काळीं मला जे भोग्य पदार्थ मिळतील ते तुला मी देईन हें माझें
भाषण सत्य जाण. पुढें तो धनुर्विद्येंत कृतार्थ होऊन तो आपल्या स्वदेशीं गे
ला. पुढें मी पित्याच्या आज्ञेनें व पुत्रलोभास्तव महा व्रतवती अशी गौत-
मी नामक कृपाचार्याची भगिनी तिच्याशीं विवाह करून तिचे ठायीं मजपासू

महाबाहि, आदित्या सारखा तेजस्वी अश्वत्थामानामें पुत्र जाहला तेणे करू
न मी अत्यंत संतुष्ट जाहलों. श्रीमानाचे पुत्र नित्यशः गोक्षीर मासन करीत
हें पाहून माझा पुत्र गोक्षीरा करितां रोदन करूं लागला, असतां मोह उत्पन्न
होऊन मी विचार केला कीं, बहुत धेनु पालण करणारा एखादा ब्राह्मण असे
ल त्याजवळ जाऊन गाईचा प्रतिग्रह करावा यास्तव मी त्याचा बहुत शोध केला
परंतु मला धेनु मिळाली नाहीं तेव्हां मी पिष्टोदक करून बालास दिलें आणि
ही क्षीरच आहे असें सांगितलें असतां त्याचे बरोबरीचे क्रीडा करणारे श्रीम
न होते ते त्यास आपले गृहीं नेऊन क्षीर देत असत, तें बालानें पाहिलें अस-
तां गृहीं येऊन तो सांगे कीं, तें क्षीर मला दे तेव्हां मी त्यास पिष्टरस करून हें
ते क्षीरः असें सांगितलें असतां तो आक्रोश करून माझापुढें नृत्य करी, हें पा
हून सकल लोक ह्मणत कीं, काय हो हा दरिद्री द्रोण, आपल्या पुत्रास क्षीर ह्म
णोन पिष्टोदक देतो. अशीं त्यांचीं भाषणें ऐकून माझी बुद्धी धर्मच्युत जाहा-
ली आणि दरिद्रतामुळें मी आपली वारंवार निंदा करून घेतों, माझा असा
संकल्प आहे कीं, धनाकरितां दुसऱ्याची सेवा करणें हें अत्यंत पापिष्ठ कर्म
होय, असें जाणोनच मी ब्राह्मणा सहवर्तमान अरण्यांत जाऊन उपवास के
ले परंतु सेवा करण्याची इच्छा केली नाहीं. आतां या पुत्राच्या लोभामुळें द्रु-
पद राजाचा पूर्व स्नेह संबंध जाणोन त्याचे गृहीं पुत्र व भार्येसह वर्तमान गे
लों आणि त्यास बोललों कीं, हे सख्या, फार दिवसानीं तुझी माझी भेट जाह
ली आतां पूर्व भाषणाचें स्मरण कर मी तुझा अत्यंत सखा आहें असें मी बो-
लतांच तो बोलला कीं, तुझा माझा स्नेह आतां कसला असीं धिःकार पूर्वक
भाषणें करून शेवटीं बोलला कीं, तुझी इच्छा असल्यास एकरात्र राहा तुला
भोजन मात्र घालूं. असें त्याचें भाषण ऐकून क्रोधानें भार्येसह वर्तमान तत्का
ल तेथून निघालों तो कांहीं कुरुसंबंधी गुणवान शिष्य सिद्ध करावे या हेतूनें
या नगरीं आलों आतां ही माझी इच्छा पूर्ण करणे तुजकडे आहे आतां पुढें का
य करूं तें सांग. असें द्रोणाचार्यानें भाषण ऐकून भीष्म बोलले हे आचार्य तु-
ह्मीं आपल्या धनुष्याची मत्यंचा उतरून सौम्य वृत्ती धरा आणि या कुरुसं-
स्थांन यथेच्छ जे तुम्हास भोग इच्छित आहेत त्यांचा उपभोग करून स्वस्थ-

अंतःकरणानें राहा या कौरवांचें जें वित्तराज्य व राष्ट्र आहे याचे तुह्मीच अधिपती, हे सकल कौरव तुमचे शिष्य आहेत असें समजा आणि जें तुमचे मनांत करणें असेल तें यथेच्छ सिद्ध करा. हे विप्रर्षे माझ्या दैवानेंच आज तुह्मी माझावर कृपा करण्यासत आलां. असा विषय या अध्यायांत आहे.

१३२. अध्याय एकशें बत्तिसावा:— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, याप्रकारें भीष्मानें द्रोणाचा सत्कार केला असतां महातेजस्वी द्रोणाचार्य हस्तनापुरीं राहिला. नंतर भीष्मानें आपल्या सकल पौत्रांस घेऊन द्रोणास सांगितलें कीं, हे शिष्य तुह्मांस विद्याभ्यासा करितां दिले. यांस विद्याभ्यास करावा, असें सांगून नानाप्रकारचीं बहुत द्रव्यें व धनधान्यानीं युक्त व सुशोभित असें गृह दिलें. कोणे एके दिवशीं एकांतस्थलीं सकल शिष्य गुरूचे पादसंवाहन करीत असतां आचार्य संतुष्ट होऊन शिष्यांस बोलला कीं, हे शिष्य हो, माझा हृदयांत एक कांहीं कार्य कर्तव्य आलें आहे तें जे विद्येंत परमचतुर सिद्ध जाहाले असतील त्यांस सांगणार. असें भाषण ऐकून सर्व कौरव स्तब्ध बसले त्या काळीं अर्जुनानें सांगितलें कीं, हे गुरु, जें कार्य असेल तें मला सांगा मी करीतों. असें भाषण ऐकून द्रोणानें अर्जुनाच्या मूर्ध्याचें वारंवार आघ्राण केलें. त्या दिवसापासून द्रोणाचार्यानें दिव्य व मानुष जा नानाप्रकारच्या अस्त्रविद्या होत्या त्या पांडवांस शिकविल्या. असें वीर्यशाली द्रोणाचार्य हस्तनापुरीं राहात असतां अस्त्रविद्येच्या अभ्यासासाठीं बहुत राजपुत्र, वृष्णी, अंधक व इतर नाना देशाचे राजे आले होते. सूतपुत्र राधेय ही विद्याभ्यासा करितां आला होता तो निरंतर दुर्योधनाचा आश्रय करून पार्थाशीं स्पर्धा करी व पांडवांचा अवमान करी. सकल शिष्यांमध्यें भुजबल आणि उद्योगें करून धनुर्वेद शिक्षेमध्यें अर्जुन द्रोणाचार्याची समता करी. अस्त्रविद्येची प्रीति विशेष असल्यामुळें अस्त्रप्रयोग करण्याविषयीं सर्व शिष्यांमध्यें अर्जुन अधिकच जाहाला. असें द्रोणाचार्यानें जाणोन अर्जुनास सर्वांपेक्षा अधिक विद्येचा उपदेश करावा व इतर कुमारांसही यथायोग्यतेप्रमाणें त्यांस शिक्षा करावी. कोणे एके दिवशीं शिष्यांची परिक्षा पाहाण्या करितां सर्व शिष्यांस आचार्यानीं सूक्ष्म मुखाचा कमंडलु व आपले पुत्रास विस्तीर्ण

मुखाचा कुंभ दिला आणि पुत्रास सांगितलें कीं, हा कुंभ परिपूर्ण कर. असें सांग तांच अर्जुनानें गुरुचा आशय जाणोन वारुणास्त्राच्या प्रयोगानें आपल्या स्त्र क्ष्य मुखाचा कमंडलू जलानें परिपूर्ण करून आचार्यपुत्रा बराबर तो गुरूस आणून दिला त्याकाळीं आचार्यांनीं असें निश्चित केलें कीं, आपले पुत्रा पेक्षां हा अर्जुन कृतीनें कमी नाहीं, तस्मात हा मोठा अस्त्रवेत्ता जाहाला. अर्जुन ही परम यत्नें करून गुरूच्या पूजे विषयीं तत्पर असल्यामुळें गुरूची प्रीती त्याज वर बसून अस्त्रविद्या त्यास अधिक शिकवी. अर्जुनानें निरंतर अस्त्रविद्ये मध्यें ऐकाग्र्य चित्तें करूनच असावें, हें गुरूनें पाहून कोणे एके दिवशीं एकांत स्थलीं सूपकारास गुरु असें बोलले कीं, हे सूदा, अंधकारांत अर्जुनास अन्न देऊं नको, त्या कालीं अर्जुन तुला प्रश्न करील कीं, कां देत नाहींस तर तूं त्यास असें सूचीव कीं, अंधःकारांत भोजन केलें असतां हस्तानें ग्रास मुखांत जाणार नाहीं, तेव्हां अर्जुन तर्कित होऊन रात्रीस शब्दवेध करण्याचा अभ्यास करील, कदाचित् हें तुला करण्यास कोणी सांगितलें असें अर्जुनानें विचारलें असतां माझें नाव तूं सांगूं नको, असें द्रोणानें सूदास सांगितल्यावर कोणे एके दिवशीं अर्जुन भोजनास बसला असतां वायूच्या योगें दीप जरी नष्ट जाहाला तथापि अर्जुनानें हस्तांत ग्रास घेऊन मुखांत घातले त्या कारणा वरून अर्जुनानें असा तर्क केला कीं, मुखाचा व हस्ताचा जसा भोजन संबंधीं अत्यंत अभ्यास असल्यामुळें अंधकारांत मुख वांचून हस्ताचें गमन अन्यत्र जसें होत नाहीं, तसा धनुर्विद्येंत शब्दानें लक्ष्य भेद रात्रीं अंधकारांत केला असतां साध्य होईल. नंतर महाबाहु पांडुनंदन, रात्री लक्ष्य भेदाचा अभ्यास करीत असतां त्याच्या धनुष्याचा निर्घोष रात्रीं एकांतीं जाहलेला ऐकून द्रोणाचार्य अर्जुनाच्या संन्निध आले आणि त्यास आलिंगन देऊन बोलले कीं, हे अर्जुना तुझा सारखा धनुर्विद्येंत अभ्यास करणारा दुसरा योद्धा या पृथ्वीवर कोणी नाहीं यास्तव तूं मोठ्या धनुर्धाऱ्यां मध्यें श्रेष्ट होशील. पुढें द्रोणानीं हयविद्या, गजविद्या, रथविद्या, रण विद्या, गदायुद्ध इत्यादिक विद्येंत अर्जुनास निपुण केला. असें द्रोणाचार्यांचें कौशल्य ऐकून सहस्त्रावधी राजे व राजपुत्र धनुर्विद्याभ्यास करण्यास येऊं लागले, कोणे एके काळीं

निषादाचा अधिपती हिरण्य धेनुकनामे होता, त्याचा पुत्र एकलव्य द्रोणाचार्या त्या सन्निध अस्त्र विद्याभ्यासा करितां आला. त्यास द्रोणानें पाहून हा कौरव पांडवांपेक्षां ही श्रेष्ठ होईल, असें जाणोन त्याचा अंगिकार केला नाहीं नंतर तो आचार्यांच्या पादुका शिरावर घेऊन अरण्यांत मृन्मय द्रोणाचार्याची मूर्ती करून इषुअस्त्र प्रयोगाचा अभ्यास परमश्रद्धेनें करूं लागला. श्रद्धेच्या योगें विमोक्ष, आदान, संधान, लघुत्व इत्यादिगुण एकलव्यास मिळाले. कोणे एके दिवशीं द्रोणाचार्याच्या आज्ञेनें कौरव पांडव रथारूढ होऊन मृगये करितां वनांत गेले. असतां कोणी एक मनुष्य हस्तांत मृगबंधन रज्जु घेऊन श्वानास धरण्या करितां जातांच तो श्वान तेथून पळून जेथें एकलव्य स्थित होता तेथें आला आणि कृष्णाजिन व जटा धारण केलेला असा एकलव्यास पाहून भोंकूं लागला, हें पाहून एकलव्यानें सात शर एककालीं त्याच्या मुखांत टाकिले असतां त्या श्वानाचें मुख बाणानीं परिपूर्ण जाहाल्यामुळें त्यास शब्द करण्याचें नष्ट होऊन तो पलायन करीत करीत पांडवांचे सन्मुख आला, त्यास पाहून हें हस्त लाघव व शब्द वेधित्व कोणाचें आहे या विषयीं पांडव लज्जित होऊन त्या योध्याची प्रशंसा करीत त्याचा शोध करण्या करितां वनांत फिरले, तों कोणी एक मनुष्य शराचें मोक्षण करीत आहे हें पाहून त्यास बोलले कीं, तूं असा विरुप दर्शनी कोण आहेस त्या काळीं एकलव्य बोलला कीं, हे वीरहो निषादाचा अधिपती जो हिरण्य धेनु नामक, त्याचा मी पुत्र व द्रोणाचार्यांचा शिष्य आहें धनुर्वेदामध्यें मी बहुत श्रम केला आहे. असें त्याचें भाषण ऐकून पांडव नगरांत आले आणि हें अद्भुत जाहालेलें वृत्त द्रोणाचार्यास सांगितलें नंतर अर्जुन एकांत स्थलीं आचार्यास नम्रतेनें असें बोलला कीं, हे आचार्य प्रीती पूर्वक तुह्मीं मला असें बोलला कीं, माझ्या शिष्यांमध्यें तुझ्यापेक्षां युद्धामध्यें निपुण कोणी व्हावयाचा नाहीं, असें असतां वीर्यानें व हस्त लाघवानें अधिक असा निषादाधिपतीचा सुत एकलव्य तुमचा शिष्य कसा जाहाला. असें अर्जुनाचें भाषण ऐकून आचार्यांनीं असें जाणलें कीं, हें निश्चयाचेंच फल आहे. नंतर अर्जुनास घेऊन द्रोणाचार्य एकलव्य याजकडे गेले असतां एकलव्यानें नम्र पूर्वक पृथ्वीवर साष्टांग नमस्कार करून व उत्तम प्रकारें द्रोणाचार्यांची यथासांग पूजा केली आणि महाराज मी आपला शिष्य आहें असें ह्म

णोन आपलें शिष्यत्व सांगत असतां द्रोणाचार्य त्यास ह्मणाले कीं, हे एकलव्य तूं माझा शिष्य आहेस तर मला गुरुदक्षणा दे. असें द्रोणाचार्यांचें भाषण ऐकून एकलव्य संतुष्ट होत्साता बोलला कीं, हे भगवन् मी आपल्यास गुरुदक्षणा काय द्यावी त्याविषयीं आज्ञा करा. असें भाषण ऐकून द्रोणाचार्य ह्मणाले कीं, हे एकलव्या तुझा दक्षिण अंगुष्ठ मला गुरुदक्षणार्थ दे. असें द्रोणाचार्यांचें परम दारुण भाषण एकलव्यानें ऐकतांच आपण सत्यप्रतिज्ञ आहोंत यास्तव आपलें सत्य रक्षण केलें पाहिजे, असा निश्चय करून तो संतुष्ट वदन झाला आणि आचार्यास आपला अंगुष्ठ देऊन त्या दिवसापासून तो अंगुलीनेंच शरानें आकर्षण करूं लागला. परंतु जसा पूर्वी अस्त्राचा शीघ्रप्रयोग करीत असे तसें त्यानें शीघ्रत्व नष्ट जाहालें हें कृत्य पाहून अर्जुन संतुष्ट जाहाला असतां आचार्य त्यास बोलतात हे अर्जुना, तुझा आतां पराभव करणारा कोणी राहिला नाहीं. दुर्योधन व भीमसेन यांस द्रोणाचार्यांनीं गदायुद्धांत प्रवीण केलें असतां उभयतां सारखे गदायुद्धामध्यें कौरव पांडवांत कोणी नाहीं अश्वत्थामा रहस्य मंत्रांत सर्वांपेक्षां अधिक जाहाला. नकुल सहदेव हे खड्ग युद्धांत मोठे प्रवीण जाहाले. युधिष्ठिर हा रथयुद्धांत मोठा निपूण जाहाला, सर्व विद्येमध्यें धनंजय हा श्रेष्ठ जाहाला. बलानें भीमसेन सर्वांपेक्षां अधिक होता-याजमुळें धृतराष्ट्र पुत्रास त्याचे गुण सहन होईनात. कोणे एके दिवशीं सकलकुमारांस आचार्यांनीं सांगितलें कीं, अरे तुमच्या विद्येची आज मी परिक्षा घेतों असें ह्मणोन कोणी एक शिल्प्याकडोन कृत्रिम पक्षी सिद्ध करवून एका वृक्षाग्रावर ठेविला आणि कुमारास तें लक्ष छिन्न करण्याकरितां दाखवून बोलले कीं, अरे शिष्य हो संपूर्णांनीं धनुष्यें सिद्ध करून लौकर येथें यावें आणि या वृक्षावर जो पक्षी आहे याचें माझ्या वाक्याबराबर शिर उडवावें मी एक एकाची याजविषयीं पृथक् पृथक् योजना करतों असें ह्मणोन प्रथम युधिष्ठिरास सांगितलें कीं, हे युधिष्ठिरा धनुष्यास बाण लाव आणि माझ्यापुढें उभा राहून या वृक्षावर काय आहे तें पाहा आणि मी सांगेन त्याकाळीं त्याचें शीर उडव. असें आचार्यांचें भाषण ऐकून धर्मराज; वृक्ष, भ्राते व आचार्य याजकडे पाहूं लागला हें पाहून द्रोणाचार्य अप्रिय मनस्क होत्साता बोलला कीं

हे धर्मा, तू पाठीमागें सर, लक्ष्य वेध तुझानें होणार नाहीं. नंतर दुर्योधन प्रभृति धृतराष्ट्र पुत्र नसात्न भीमसेनादि पांडवांस व अन्य देशीय राजांस धर्मराजा प्रमाणे प्रश्न करतांत त्यांणी त्या प्रमाणें उत्तरें दिलीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१३३. अध्याय एकशें तेतिसावा:— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, नंतर द्रोणाचार्य विस्मित होऊन धनंजयास बोलला कीं, हे अर्जुना, आतां लक्ष्याचा प्रहार तूं कर. मी जा काळीं बाणाचा मोक्ष करण्यास सांगेन त्या काळीं बाणाचा मोक्ष कर. हे पुत्र, आपलें कार्मुक सिद्ध करून एक मुहूर्त पर्यंत उभा राहा. असें आचार्याचें भाषण ऐकून अर्जुन उभा राहिला असतां द्रोणाचार्य बोलला कीं, हे पार्था, हा भास पाहालासना, तसेंच वृक्षास व मला पाहिलेंसना असें द्रोणाचार्याचें भाषण ऐकून पार्थानें उत्तर दिलें कीं, हे गुरो, एक भासाचें शीर मात्र मी पाहातों. वृक्ष व तुह्मास मी पाहात नाहीं. असें अर्जुनाचें भाषण ऐकून द्रोणाचार्य हर्षानें बोलला कीं, हे पार्था, आतां विचार काय करतोस बाणाचा त्याग कर, असें ह्मणतांच अर्जुनानें वृक्षाग्रस्थ पक्ष्याचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें हें कृत्य पाहून द्रोणानें पार्थास आलिंगन दिलें आणि असा निश्चय केला कीं, हा अर्जुन साहाय्या सहवर्तमान द्रुपद राजाचा पराभव करील, यांत संशय नाहीं. कोणे एके दिवशीं द्रोणाचार्य-शिष्यां सहवर्तमान गंगेस स्नाना करितां निघाले आणि गंगेच्या प्रवाहांत स्नानास उभे असतां कोणी एक जल निवासी ग्राह (सुसर) येऊन त्यानें बलात्कारानें आचार्यास धरलें. त्या काळीं आचार्य ग्राह पासून मुक्त होण्या विषयीं जरी समर्थ होते तथापि सकल शिष्यांस ह्मणाले कीं, अरे मला मकरानें ग्रस्त केलें यास्तव तुह्मीं सत्वर मला सोडवा. त्या काळीं अर्जुनानें निशीत आचार्य असे पांच शर काढून ग्राहाचा छेद केला, इतर शिष्य होते ते स्तब्ध-बसले होते. हें अघटीत कृत्य पाहून द्रोणानीं निश्चय केला कीं, सर्वांपेक्षां हा शिष्य वरिष्ठ आहे या कारणानें आचार्यांची प्रीति अर्जुनावर अधिक होत चालली. ज्या वेळेस द्रोणाचार्य त्या ग्राहा पासून सुटले त्या वेळेस पार्थास असें बोलले कीं, हे पार्था, हें अतिदुर्धर व सर्वांपेक्षां श्रेष्ठ ब्रह्मशीर ना-

मक अस्त्र आहे तें प्रयोगासहवर्तमान मी तुला देतों. मनुष्याच्या ठायीं या अस्त्राचा प्रयोग करूंनको, अल्प तेजस्वी जो आहे त्याजवर या अस्त्राचा प्रयोग केला असतां सर्व जगत दग्ध होईल. हे तात, या अस्त्रास तूं सामान्य असें समजूंनको या अस्त्राचें पवित्रपणानें तूं धारण कर आणि मनुष्याशिवाय रणांत जो कोणी तुझ्या यथार्थ उद्युक्त होईल त्याजवर या अस्त्राचा प्रयोग कर असें द्रोणाचें भाषण ऐकतांच अर्जुनानें अस्त्र घेतलें असा विषय या अध्यायांत आहे.

१३४. अध्याय एकशेंचवतिसावा.—वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा कोणे एके दिवशीं कृपाचार्य, सोमदत्त, बाल्हिक, गांगेय, व्यास आणि विदुर हे धृतराष्ट्रा सन्निध बसले असतां द्रोणाचार्य धृतराष्ट्राजवळ येऊन बोलला कीं, हे राजा तुझे कुमार शस्त्रास्त्र विद्येमध्यें निपुण जाहले आहेत. यास्तव त्यांची परिक्षा पहावी असें द्रोणाचार्याचें भाषण ऐकून धृतराष्ट्र राजा हर्षानें बोलला कीं, हे द्विजश्रेष्ठा, कोणत्याकाळीं कोणत्या प्रदेशीं आह्मास पुत्राची विद्या दाखवाल तें सांगा ह्मणजे आमच्या कडून सिद्धता आहे. मी अशी इच्छा करितों कीं, जे चक्षुष्मान आहेत त्याणीं माझ्या पुत्राचें कौतुक पहावें, ह्मणजे मला फार सुख आहे, असें द्रोणाचार्यास सांगून नंतर विदुरास बोलला कीं. हे विदुरा, हें आचार्यानीं भाषण केलें त्या प्रमाणें सिद्धता करा. असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून विदुर राजाची अनुज्ञा घेऊन बाहेर आला नंतर द्रोणाचार्यानीं जास्थलांत गुल्म नाहींत. सकळ वृक्ष एकसारखे समान कोठें कोठें उदक आहे असें एकस्थल पाहून त्या भूमीची पूजा करून बलि प्रदान केलें. त्या बलि समारंभा करितां वीरांचा समुदाय ही जमला होता नंतर त्या स्थलावर यथाशास्त्र शिल्पी जना कडून एक उत्तम प्रकारची सभा केली आणि राजानीं व राजस्त्रियांनीं पाहाण्यास घरें ही उत्तम प्रकारचीं केलीं इतर जानपद बसण्या करितां बहुत मंचक स्थापित केले होते आणि हें वर्तमान समजण्याकरितां ग्रामांत दवंडी दिली नंतर उत्तम दिवस पाहून भीष्म, कृपाचार्य व सचीव इत्यादिकांस बरावर घेऊन धृतराष्ट्रराजा प्रेक्षागारांत गेला. तशीच माहाभाग्यवती गांधारी, कुंती व इतर राजाच्या स्त्रियानीं व दासी सहवर्तमान पर

म हर्षानें प्रेक्षागारांत जाऊन मंचकावर आरोहण केलें. तसेच ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र प्रभृति चारी वर्ण त्या सभेस एकत्र जमले. नंतर बलिश्रेष्ठ द्रोणाचार्य पुत्रां सहवर्तमान सभेंत आला असतां कुमारानीं आपलीं अंगुलीत्राणे बद्ध केलीं, कक्षा बंधन केल्या, शस्त्रास्त्रें सिद्ध केलीं, भात्या मध्यें बाण भरून धनुष्यें घेतलीं आणि ज्येष्ठ जो युधिष्ठिर यास अग्रभागीं करून ते सकल कुमार यथानुक्रमें सभेंत आले. त्याकाळीं सकल लोकांस परम अद्भुत वाटलें. आपल्यावर बाण पडतील या भयानें कांहीं मनुष्यानीं आपलीं मुखें नम्र केलीं. जे कोणी धीर होते ते विस्मित होऊन इकडे तिकडे पाहूं लागले. नंतर सकल कुमारानीं आप आपल्या नामानीं चिन्हित बाण धारण करून नानाप्रकारच्या लक्ष्याचा भेद केला. नंतर अश्वारूढ होऊन अश्वविद्येचें कौशल्य दाखविलें, तशाच गजारोहण, अश्वारोहण विद्या व युद्धविद्या दाखविल्या. नंतर हस्तांत खड्ग आणि चर्म घेऊन सर्व भूमीचे ठायीं तिर्यक्, ऊर्ध्व इत्यादि खड्गाचे प्रहार करण्याचे प्रकार दाखविले. या प्रकारें सकलकुमारांचें हस्तलाघव सर्वानीं पाहिल्यावर एकमेक नित्य स्पर्धा करणारे सुयोधन आणि वृकोदर हस्तांत गदा घेऊन सभेंत आले आणि मदोन्मत्त गज, हस्तीनी करितां जसे शब्द करितात तसे शब्द करूं लागले. एकमेकांस सव्य प्रदक्षिणा मंडळें करीत त्यास कल सभेंत फिरूं लागले. हें सर्व कुमारांचें चेष्टित विदुरानें धृतराष्ट्र राजास आणि कुंती व गांधारीस सांगितलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१३५. अध्याय एकशें पस्तिसावा:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुर्योधन आणि भीमसेन गदा घेऊन त्या सभेंत आले असतां प्रेक्षकजनांत पक्षपातानुरूप दोन विभाग होऊन आश्चर्यानें कोणी ह्मणाले कीं, हा दुर्योधन!!! हा भीम!!! हे दुर्योधना शाबास शाबास अशा त्या समाजांत वाणी होऊं लागल्या असतां क्षोभ पावलेल्या समुद्रा सारखा तो समाज पाहून बुद्धिमान् द्रोणाचार्य आपला प्रियपुत्र जो अश्वत्थामा यास बोलले कीं, हे पुत्रा या उभयतां वीरांचें तूं जाऊन निवारण कर. असें पित्याचें भाषण ऐकून अश्वत्थाम्यानें भीमसेन व दुर्योधन यांचें निवारण केलें, नंतर द्रोणाचार्य रंगांगणीं येऊन बोलला कीं, पुत्रापेक्षांही मला प्रिय सर्वशस्त्र विशारद केवल प-

राक्रमानें विष्णूसमान असा हा इंद्राचा पुत्र पाहा. असें आचार्याचें भाषण-
ऐकून कांचनाचें कवच धारण केलेला अर्जुन सर्वत्रानीं पाहिला. सूर्य, इंद्र ध
नुष्य व विद्युल्लता या तिघांचा संधी एकत्र झाला असतां जसा मेघ शोभतो-
तसा पार्थ शोभला. सभेंत एका एकीं हर्षाचा शब्द व वाद्यांचा गजर झाला. सर्व
लोक असें ह्मणाले कीं, हा कुंतीचा मध्यम सुत अस्त्रवेत्त्यांत श्रेष्ठ, ज्ञान व शिल
यांचा केवळ दुसरा समुद्रच होय, अशीं प्रेक्षकांचीं भाषणे ऐकून कुंतीचें उरस्थ
ळ हर्षानें आर्द्र जाहालें. हा सभेंतील महान शब्द ऐकून धृतराष्ट्र हर्षानें विदुरा
स बोलला कीं, हे विदुरा, हा एका एकीं, महान शब्द जाला याचें कारण काय-
असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून विदुर बोलतो हे महाराज हा पांडूचा नंदन फाल्गु
न नामा सभेंत कवच धारण करून आला त्याचा हा शब्द असें विदुराचें भाषण-
ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे विदुरा पृथेपासून अग्नित्रयासारखे जालेले तीन पु
त्र यांच्या योगें आज मी सुरक्षित जाहालों. असें धृतराष्ट्राचें भाषण जाहाल्याव
र बिभत्सूनें आचार्यांस आपलें हस्तकौशल्य दाखविण्यास आरंभ केला. प्रथम
अग्नेय अस्त्रानें अग्नि, वायव्यास्त्रानें वायू, पर्जन्यास्त्रानें मेघ, असे उत्पन्न के-
ले. क्षणांत रथामध्यें बसलेला, क्षणात भूमीवर उभा, अशा अस्त्रांची प्रेरणा
केली. नंतर मंडळें करीतांकरीतां पांच लोहमय बाण एकमेकास स्पर्श न होतां
सोडून लोकांस एकच बाण आहे असें भासविलें, याप्रकारें आपलें धनुष्यबा
ण व खड्ग संबंधी हस्तकौशल्य दाखवून अर्जुनानें गदा घेतली आणि नानाप्र
कारचीं मंडळें करून गदास्त्र कौशल्य ही प्रदर्शित केलें. इतकीं कृत्यें जाहाल्या
वर सभेच्या द्वारांतून लोक जात असतां त्यांच्या संघर्षणा पासून जो बलवान
शब्द जाहाला त्याजवरून सर्व लोकांस असें वाटलें कीं, वज्राचें निष्पेषण होऊ
न जसा शब्द होतो तसा हा शब्द झाला. पंच भ्रात्यां सहवर्तमान द्रोणाचार्य ह-
स्त नक्षत्रानीं सयुक्त चंद्रमा जसा शोभतो तसा शोभला. तसाच अश्वत्थामा व आ
पल्या शंभर बंधूनीं वेष्टित दुर्योधन इंद्रासारखा शोभला. असा वि. या अध्या
यांत आहे.

१३६ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सभेंतून कांहीं
लोक बाहेर जात आहेत तों इतक्यांत प्रफुल्लित नयन झालेला सहज कवचा

नें सुशोभित, कुंडलांनीं प्रकाशित जाहालेलें ज्याचें मुख, धनुष्य व खड्ग घेतले ला, असा कर्ण येऊन कृपाचार्य व द्रोणाचार्य यांस प्रणाम करून रणांगणीं उभा राहिला, त्या काळीं कोणी जन ह्मणाले कीं, हा रणांगणीं कोण आला, नंतर सूर्यपुत्र कर्ण उच्च स्वरानें अर्जुन हा आपला भ्राता आहे हें न जाणोन त्यास बोलला हे अर्जुना, या सभेंत जें तूं विशेष कर्म केलेंस तसें मी आतां करितों असें कर्णाचें भाषण ऐकून सकल लोक आपल्या आसना पासून एकाएकीं उठले असतां दुर्योधनास मोठी प्रीती उत्पन्न होऊन अर्जुनास लज्जा व क्रोध आला. नंतर कर्णानें द्रोणाची आज्ञा घेऊन जें कर्म पार्थानें केलें तेंच आचरण करितांच दुर्योधन भ्रात्यां सहवर्तमान आनंदानें कर्णास आलिंगन देऊन बोलला कीं हे महाबाहो, दैवानें तूं मला प्राप्त जाहालास; तूं व मी उभयतां यथेष्ट कुरुराज्याचा उपभोग करूं असें दुर्योधनाचें भाषण ऐकून कर्ण बोलतो हे सख्या, तुझें माझें सख्य असावें. आतां या सभेंत पार्थाशीं मी द्वंद्व युद्ध करण्याची इच्छा करितों. असें कर्णाचें भाषण ऐकून दुर्योधन बोलतो हे कर्णा, तूं निरंतर माझें प्रिय करून मज सहवर्तमान उपभोग कर. त्या काळीं अर्जुन कर्णास बोलला कीं, हे कर्णा, अरे आव्हान केल्या वांचून येतात त्यांस जो लोक प्राप्त होतो, तो लोक मी तुझा वध केला असतां तुला मिळेल. असें अर्जुनाचें भाषण ऐकून कर्ण बोलतो हे फाल्गुना, अरे ही सभा सर्वांची आहे तेव्हां तूं उगीच व्यर्थ भाषण करून का आज या गुरूच्या समक्ष तुझें शीर मी उडवितों. असें ऐकतांच पार्थानें द्रोणाची आज्ञा घेऊन व भ्रात्यास आलिंगन देऊन रणांगणीं येतांच दुर्योधनानें भ्रात्यांसह वर्तमान कर्णास आलिंगन दिलें असतां तोही शर व धनुष्य घेऊन त्या काळीं रणांगणीं आला. हें कौतुक पाहाण्या करितां आकाशांत पुत्रस्नेहानें इंद्र आला हें पाहून सूर्यही उभा राहिला. जिकडे कर्ण होता त्या प्रदेशीं धृतराष्ट्र पुत्रांचा समुदाय उभा होता आणि जिकडे पार्थ होता त्या प्रदेशीं भारद्वाज, कृपाचार्य व भीष्म हे उभे होते त्या काळीं सभेंतील प्रेक्षक लोकांचा द्विधाभाव जाहाला तसें च स्त्रियांत ही द्वैध उत्पन्न जाहलें. त्या काळीं कुंती हा विलक्षण समय पाहून पृथ्वीवर पडली असतां पुनः पृथा आपले स्थितीवर येऊन सभारंगणीं सिद्ध झालेल्या पुत्रांस पाहूं लागली. कर्णार्जुन महाचाप घेऊन द्वंद्व युद्धास प्रवृत्त झाले.

असतां कृपाचार्य त्यास भेट बोलला कीं, हा पृथेचा कनिष्ठपुत्र, दुर्योधना सहवर्तमान द्वंद्वयुद्ध करील, हे कर्णा, तूं आपल्या मातापितरांचें व कुळाचें नाव काय असेल तें सांग. तुझें कुल समजल्या वांचून पार्थ तुझाशीं युद्ध करणार नाहीं, असें कृपाचार्यानें भाषण केलें असतां कर्ण लज्जित झाला. हें दुर्योधनानें पाहून सों कृपाचार्यास बोलला कीं, हे आचार्य सत्कुलांत जन्म, शूर व निरंतर आपले जवळ सेना बाळगतो तो, अशा तीन प्रकारच्या राजाच्या योनी शास्त्रांत सांगितल्या आहेत, जर फाल्गुन अराजाशीं युद्ध करीत नसेल तर या काळीं अंगदेशचे राज्याचा मी कर्णास अभिषेक करितो असें ह्मणोन तेचक्षणी त्याणें कर्णास अंगदेशचे राज्याचा अभिषेक केला. त्या काळीं कर्ण हर्षित होऊन दुर्योधनास ह्मणतो हे दुर्योधना, जसें तूं मला अंगदेशचें राज्य दिलेंस तसें यासमान मी तुला काय देऊं तें सांग. असें कर्णानें भाषण ऐकून दुर्योधन बोलला हे सख्या; तुझ्याशीं मीं अत्यंत सख्य करण्यास इच्छितों इतकेंच मला दे. असें दुर्योधनानें भाषण केल्यावर त्याणीं एकमेकास आलिंगन दिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१३७ वा. अध्याय.—वैशंपायन सांगतात हे जनमेजया, नंतर कर्णाचा पिता अधिरथी याणे कर्णाचें कौतुक पाहून भीतीनें खेदयुक्त झाला आणि वृद्धावस्थे मुळें हस्तांत काठी धरून रंगणामध्यें आला असतां कर्णानें धनुष्य ठेऊन पित्याचें पादाभिवंदन केलें. त्याकाळीं पित्यानें त्यास स्नेहपूर्वक आलिंगन देऊन नेत्राश्रूनें त्यास सिंचन केलें. हें कृत्य भीमसेनानें पाहून तो बोलला कीं, हे सूतपुत्रा, रणाचे ठायीं तुझा वध करण्यास पार्थ योग्य नाहीं, तूं हस्तांत चाबुक घेऊन रथाचा सारथी व्हावेंस हीच तुझी योग्यता अंगदेशीचे राज्याचा उपभोग करण्यास तुझी योग्यता नाहीं. असें भीमसेनाचें भाषण ऐकून कर्ण गगनस्थ सूर्यास पाहून स्वासोच्छ्वास टाकूं लागला. त्या काळीं दुर्योधन उठून भीमसेनास बोलला कीं, हे वृकोदरा, तुला असें भाषण योग्य नाहीं, क्षत्रियाचें बल श्रेष्ठ आहे, शूर आणि नद्या यांच्या उत्पत्ती विषयीं विचार करूं नये. अरे जला पासून अग्नी ची उत्पत्ती आहे तथापि त्याणेच सर्व चराचर ग्रासकेलें. पूर्वी विश्वामित्र प्रभृति क्षत्रिय असतां ब्राह्मण होऊन अक्षय पदवीस गे-

ले. शस्त्र धान्यांमध्यें श्रेष्ठ जे द्रोणाचार्य हे तर कलशा पासून जाहाले. कृपाचार्य शरस्तंभा पासून झाले व तुमचें हि जन्म कसें तें मी जाणतों.हा कर्ण कुंडलें व कवचानि युक्त,आदित्या सारखा तेजस्वी,केवळ व्याघ्र मृगी पासून उत्पन्न होईल कीं काय,हा कर्ण सकल पृथ्वीचें राज्य करण्यास योग्य आहे.असें दुर्येधनानें भाषण केल्यावर सभेंत एका एकीं हाहाकार जाहाला,इतक्यांत सूर्यही अस्तंगत जाहाला असतां दुर्योधनानें कर्णाचा हात धरून गृहीं जाण्यास निघाला.द्रोणाचार्य,कृपाचार्य व भीष्म या सहवर्तमान पांडव ही रणापासून आप आपल्या गृहीं गेले.सकल लोकसमुदायांत कोणी असें ह्मणत कीं, अर्जुन श्रेष्ठ आहे, कोणी असें बोलत कर्ण श्रेष्ठ आहे,कोणी ह्मणत दुर्योधन श्रेष्ठ आहे अंग देशाचें राज्य कर्णास मिळालें हें पाहून कुंती संतुष्ट जाहाली.दुर्योधनाचें ही अर्जुना पासून उत्पन्न झालेलें भय कर्णाच्या आश्रयानें नष्ट झालें.कर्ण हा महावीर व शस्त्रविद्येंत निपुण आहे असें जाणून युधिष्ठिर ह्मणे कीं, कर्णासारखा धनुर्धर पृथ्वीवर कोणी नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१३८ वा अध्याय.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया,पांडव व धृतराष्ट्रपुत्र अस्त्र विद्येंत निपुण जाहाले तेव्हां आतां यांजपाशीं गुरुदक्षणा मागावी असा विचार करून सर्व शिष्यांस द्रोणाचार्य बोलले कीं, हे शिष्यहो पांचाल राज जो द्रुपद यास रणांत पराजित करून माझा कडे आणा हीच तुह्मीं मला गुरुदक्षणा अर्पण करा.असें गुरूचें भाषण ऐकून ते सकल राजपुत्र रथारूढ होऊन परम त्वरेनें द्रोणा सहवर्तमान पांचालनगरांत आले आणि द्रुपदाच्या नगराचें मर्दन करूं लागले. दुर्योधन,कर्ण,युयुत्सु,दुःशासन,विकर्ण,जलसंध व सुलोचन इतके धृतराष्ट्र पुत्र व इतर राजकुमार परस्पर आपल्यामध्यें मी पुढें जातों मी पुढें जातों असें ह्मणोन नगरांत गेले हें पाहून द्रुपद सैन्यासहित कौरव सैन्याचे संन्निध युद्धास जातांत धृतराष्ट्र पुत्र त्या जवर शरवर्षाव करूं लागले असतां यज्ञसेन शुभ्र रथारूढ होऊन कौरवांवर शर वर्षाव करूं लागला. हस्तनापुराहून ज्या काळीं धृतराष्ट्र पुत्र निघाले त्या काळीं पार्थानें द्रोणासह वर्तमान असा विचार केला कीं, धृतराष्ट्रपुत्र उन्मत्त जाहाले आहेत यास्तव त्यानीं प्रथम द्रुपद राजा कडे जावें,आह्मीं द्रुपद नगरा पासून अर्ध

कोश मागें राहातों, कौरवांचा पराभव जाहाला ह्मणजे आह्मी (पांडव) द्रुपदा शीं युद्धास जाऊं. युद्धामध्यें पांचाळास धरण्यास धृतराष्ट्रपुत्र असमर्थ आहेत. त्या विचाराप्रमाणें कौंतेय भ्रात्यांसहवर्तमान द्रुपदनगरापासून अर्धकोश मागें राहिला. इकडे कौरव सैन्य पाहून द्रुपद राजानें महान् शरें करून मोह उत्पन्न केला. त्या काळीं द्रुपद एकाकी असतांही कौरवांनीं त्यास बहुतां सारखा मानला. द्रुपदाचे भयंकर शर सर्व दिशेस व्याप्त जाहाले. पांचाल सैन्यांत शंख भेरी व मृदंगाचे नाद होऊं लागले, प्रत्यंचे पासून शब्द उत्पन्न होऊन आकाश त्या नादांनीं व्याप्त जाहलें त्या काळीं दुर्योधन, विकर्ण, सुबाहु, दीर्घलोचन, व दुःशासन हे क्रोधानें द्रुपद राजावर शरवर्षाव करूं लागले असतां धनुर्धारी द्रुपदानें कौरव सैन्याचें एक क्षणांत कंदन केलें असतां नागरिक लोक मुसळें व यष्टी घेऊन कौरव सैन्यावर मेघासारखे धांवले. असें तुमुल युद्ध होत असतां सर्व कौरव आक्रोश करीत पांडवा सन्निध आले. त्या काळीं पांडवानीं तो कौरवांचा आर्तस्वन ऐकून गुरूस अभिवादन केलें. नंतर ते रथारूढ होऊन अर्जुन युधिष्ठिरास युद्धाविषयीं उपरम व उभयतां माद्रेयास चक्ररक्षक व भीमसेनास सेनाग्रणी करून त्यासहवर्तमान परम वेगानें पांचाल सैन्यांत एकाएकीं गेला. त्या काळीं महाबाहु भीमसेनास दंडपाणी साक्षात् यमच काय असा पाहून द्रुपद सैन्य भयाभीत झालें. नंतर भीमसेन द्रुपद सैन्यांत जाऊन गदाघातानें असंख्यात कुंजरांचें मर्दन करीत असतां ते पर्वतप्राय गज रुधिर वमन करीत पृथ्वीवर पडले. जसा गोपाळ हस्तांत दंड घेऊन पशुगणाचें चालन करतो. तसा रथ व अश्व यांचें वृकोदर चालन करूं लागला. असा भीमाचा पराक्रम पाहून भारद्वाजाचें प्रिय करावें या इच्छेनें अर्जुन बाणाचा वर्षाव करीत करीत द्रुपदाच्या सन्निध येऊन त्यानें अश्व, रथ व गजसमुदाय यांवर ज्वलित युगांताग्नीसमान बाणाचा वर्षाव केला. त्या बाणानीं पांचाल व सृंजय वध्यमान जाहाले असतां नाना प्रकारच्या रथासहवर्तमान द्रुपदानें पांडवांस आच्छादन केलें कांहीं योद्धे मुखानें सिंहनाद करीत पांडवांशीं युद्ध करूं लागले. तो सिंहनाद पांडवांस सहन जाहाला नाहीं. अर्जुनानें एकाएकीं पांचालावर धाऊन जाऊन बाणजाळानीं त्यास आच्छादित केलें

असतां अर्जुन व द्रुपदयांचें अंतर कांहीं राहिलें नाहीं. त्याकाळीं साधुसाधु अ सा योध्यांचा शब्द होऊं लागला. नंतर पांचाल राजा सत्यजितास बराबर घेऊन परम त्वरेनें अर्जुनावर धांवला असतां अर्जुन पांचाल राजावर मोठ्या शरजाला चा वर्षाव करून त्यास धरूं लागला. या हून सत्यगीन पांचालाचे हिता करितां- अर्जुनावर धांवला, त्याकाळीं अर्जुन व सत्यजित या उभयतांचें महान युद्ध जाह्ला लें.इंद्र आणि वैरोचन यांचें युद्ध होत असतां सकळ देवाचें सैन्य जसें क्षुब्ध जा- हालें तसें उभयतांचें सैन्य क्षुब्ध जाहालें. रतक्यांत दाहा बाणानीं पार्थानें सत्य जिताचें मर्म भेदन केलें असतां सत्यजित दुःखित होऊन त्यानें शंभर बाणे क- रून पार्थास पीडित केलें नंतर पार्थानें शर वर्षाव करीन सत्यजिताच्या रथाचे अश्व ध्वज, धनुष्य, व सारथी छिन्न करून टाकतांच सत्यजित युद्धा पासून वि मुख जाहाला; हें पाहून पार्थानें त्याजवर शर वर्षाव केला असतां द्रुपदराजा अ र्जुनाशीं युद्ध करूं लागला. अर्जुनानें द्रुपदावर बाणाचा वर्षाव करून धनुष्य छि न्न केलें. पांच बाणे करून अश्व व सूत नष्ट केला आणि खड्ग घेऊन सिंहनाद क रीत द्रुपदाच्या रथाच्या ईषेवर बसून द्रुपदास धरिला. असें अर्जुनानें आपलें बाहुबल सर्व सैनिकास दाखवून सिंहनाद करीत माघारा फिरला हें पाहातांच स र्व कुमारानीं द्रुपदाचें नगर मर्दन केलें. त्याकाळीं अर्जुन भीमसेनास बोलला- कीं, हे भीमा हा द्रुपद राजा कुरूचा संबंधी आहे या स्तव त्याच्या सैन्याचें मर्दन करूं नका, द्रुपदास मात्र गुरूच्या स्वाधीन करा. असें अर्जुनाचें भाषण ऐकून भी मसेन माघारा फिरला नंतर अर्जुन अमात्या सहीत द्रुपदास घेऊन द्रोणाचार्या सन्निध आला असतां द्रुपदराजास पाहून द्रोणाचार्य पूर्व वैराचें स्मरण करीत बो लला कीं, हे द्रुपदा तुझें राष्ट्र वपूर मी मर्दित करून आतां तूं शत्रुस वश जाहालास तेव्हां आतां मी काय करूं तें सांग. असें बोलून नंतर पुनः बोलला कीं, हे वीरा तूं आपले प्राणा विषयीं कांहीं भय बाळगूं नको. आह्मीं क्षमाशील ब्राह्मण आहों न.तूं व मी बाल्या अवस्थेंत आश्रमी क्रीडा करीत होतों तेणे करून तुझा आमचा स्नेह व प्रीती जी पूर्वीं होती ती आतां असावी अशी माझी प्रार्थना आहे, हे राजा पुनः तुला अर्ध राज्य मिळेल असा मी वर देतों. तूं अराजा असतां माझा सखा होण्यास योग्य नाहींस असें जाणोन हें अर्धराज्य तुला देतों. तूं भागीरथीच्या दक्षण तिरीं

राजा हो. भागीरथीच्या उत्तर तीरीं मी राजा होईन. तूं माझा सखा हो असें द्रो णाचें भाषण ऐकून द्रुपद बोलतो हे ब्राह्मणा जे महात्मे आहेत त्यांचे ठायीं हें कर्म आश्चर्य कारक नाहीं. तुझें हें कर्म पाहून मी फार संतुष्ट जाहालों. असें द्रुपदा चें भाषण ऐकून आचार्यांनीं त्यास मुक्त करून परम सत्कारानें अर्धराज्य दिलें अ सतां द्रुपदराजा विमनस्क होऊन गंगेच्या उत्तर तीरीं माकंदी नामें राजधानी आ णि कांपिल्य नामक पुरीं राहिला. आणि यावत् चर्मण्वती नदी पर्यंत दक्षण पांचा ळाचें राज्य करूं लागला. द्रुपदानें ब्राह्मणा पासून आपला पराभव जाहाला हीही नता मानून आपल्यास पुत्र व्हावा या इच्छेनें पृथ्वीवर फिरूं लागला. असा वि षयें या अध्यायांत आहे.

१३९. वा अध्याय:— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, यास ए- क संवत्सर अतिक्रांत जाहाल्यावर धृतराष्ट्रानें युधिष्ठिराचें धैर्य, स्थैर्य, सहिष्णु त्व, अघातुकपणा, आर्जव, भृत्याचे ठायीं दया इत्यादिक गुण पाहून त्यास यौव राज्याचा अभिषेक केला असतां पांडुराजाची जी कीर्ती पूर्वीं होती तीच कीर्ती युधिष्ठिरानें धरिली. पुढें कांहीं दिवसानीं खड्गयुद्ध, गदायुद्ध व रथयुद्धाची- शिक्षा बलरामा पासून वृकोदरानें संपादन केल्यानंतर सकल भ्रात्यांस वश- जाहाला तसाच अर्जुन अगाद दृढमुष्टित्व लाघव आणि वेधन या विद्येंत नि पुण होऊन क्षुरनाराच इत्यादिक बाणाच्या प्रयोगाविषयीं मोठा समर्थ जाहा ला. कोणे एके दिवशीं सकल पांडव व कौरव सभेंत बसले असतां द्रोणाचा र्य अर्जुनास बोलला कीं हे अर्जुना माझा गुरू अग्निवेश्य नामक तो धनुर्वेदा मध्यें अगस्त्याचा शिष्य होय. त्या अग्निवेश्याचा मी शिष्य आहें आमचे गुरु तीर्थाटणें करीत असतां मीही त्यांज बराबर तीर्थाटणास फिरत होतों माझें तप पाहून अशनी समान प्रकाशित व अमोघ असें ब्रह्मशिर नामें अस्त्र मला गु- रूनीं दिलें तें मी पूर्वीं तुला दिलें. आतां हे सकल तुझे ज्ञाती व ग्रामनिवासी लो क बसले आहेत यांच्यासमक्ष त्या अस्त्रविद्या दानाची गुरुदक्षणा मी जी मा गेन ती मला दिली पाहिजे. असें आचार्याचें भाषण ऐकून अर्जुनानें गुरूस प्रतिज्ञेनें सांगितलें कीं, आपण जी दक्षणा मागाल ती मी देतों त्या काळीं आ चार्य बोलले कीं, हे अर्जुना मी युद्धास उभा राहिलों असतां तूं माझाशीं युद्ध क

यवेंस असें भाषण ऐकून अर्जुनानें सांगितलें कीं, फारचांगलें आहे, आपण भाषण केल्याप्रमाणें घडेल असें बोलून चरणावर मस्तक ठेविला. बृहस्पतीसारखी नीती आचार्यापासून सहदेवास मिळाली असतां तो नीतीजाणणारा होऊन भ्रा त्यांस अत्यंत वश जाहाला. तसाच नकुलास ही आचार्यांनीं अत्यंत शिक्षीत केला होता तेणे करून चित्रविचित्र योद्धा अशी नकुलाची प्रख्याती होऊन अतिरथ्यामध्यें परिगणित जाहाला. पूर्वी गंधर्वांनी उपद्रव केल्यामुळें ज्यानें तीन वर्षे एक यज्ञ केला तो सौवीर नामक यवनाचा अधिपती अर्जुनानें युद्धांत मारला तसेंच विपुल, दत्तामित्र, रूमित्र, व प्राच्य दिशेचे राजे हेहि त्याणे मारिले. नंतर दक्षिण दिशेंतील असंख्याक द्रव्य आणून आपले कुरूचें राज्य समृद्ध केलें. याप्रकारें मनुजोत्तम माहात्म्या सकल पांडवानीं परराष्ट्राचा जय करून आपल्या राष्ट्राची वृद्धी केली असतां पांडवां विषयीं धृतराष्ट्राचेमनांत कपट येऊन त्यास निद्रा आली नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१४० वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, पांडूचे पुत्र महापराक्रमी जाहाले असें ऐकून धृतराष्ट्र मंत्र्यामध्यें श्रेष्ठ असा कणीक नामक मंत्री होता त्यास आव्हान करून बोलला कीं, हे द्विजोत्तमा पांडवाशीं संधिविग्रह करण्याचीं कारणें कशीं आहेत तीं मला सांग. असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून कणिक बोलला कीं, हे राजा, आतां जें मी सांगतों तें ऐक. अरे, भीमसेन आणि दुर्योधन, अर्जुन आणि कर्ण यांचें वैर उत्पन्न जाहालें आहे यास्तव आतां पांडवांशीं संधी करून राहूं नये तर त्यांच्याशीं वैरच करावें. आता शत्रूच्या घाताविषयीं उपाय सांगतों. निरंतर आपण दंडा विषयीं उद्युक्त असावें. निरंतर आपलें पौरुष प्रकट करीत असावें. आपण अछिद्र असून शत्रूच्या छिद्राकडे लक्ष्य ठेवावें शत्रूच्या नाशा विषयीं जीं विवरें आहेत त्यां विषयीं यत्नवान असावें. आपलीं जीं साहाय्य साधनें असतील तीं कूर्मा सारखीं गुप्त ठेऊन आपल्या विवराचें रक्षण करावें. जा कार्यास आपण उपक्रम केला असेल तें कार्य समाप्त होई पर्यंत त्यामध्यें आपण गढून राहावें. अपकार करणारे जे शत्रु यांचा वधच योग्य आहे. महापराक्रमी जरी शत्रू आहे तथापि त्याचा

आपत्काल पाहून नाश करावा. युद्ध करण्यास जरीं सामर्थ्य आहे तथापि आ पत्काल पाहून त्यास युद्धापासून पळवावा. असे शत्रूचे घात अवश्य करीत अ सावे. शत्रूस आश्रय नसतां कोणत्या प्रकारें तो वागतो तें सांगतों. शत्रूचा सा मर्थ्य प्रती घात जाहाला असतां तो साहित्य हीन जाहाल्या मुळें समय विशे- षीं शत्रूस शरण ही जातो. दुसऱ्यानी धि:कार केला असतां कालपरत्वें न ऐकि ल्या सारखें करितो आणि मृगास विश्वास दाखविण्या करितां, व्याध जसा नि- द्रिस्थ असतां निद्रा वश होत नाहीं, तसा शत्रु आपला आकार ही गोपन करितो यास्तव शत्रूस तृणासा रिखा निष्प्रयोजक करून क्षात्रधर्मा पासून भ्रष्ट क रावा. वृक्षाचा मूल भाग छिन्न केला असतां त्याच्या शाखा जशा राहात नाहीं त तसें शत्रूचें ऐश्वर्य, मंत्र व उत्साह यातिहींचा साम, दान, भेद, दंड, विष, फांस व अग्निप्रयोग या सातानीं नाश केला असतां नाश पावतो. आपला काल अन कूल नसल्यास शत्रूस स्कंदावर ही धारण करावा, आपला काल अनुकूल आला ह्मणजे पाषाणावर घट आपटून जसा फोडतात तसा शत्रु नष्ट करून टाकावा. असें कणिकाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र राजा बोलतो हे ब्रह्मन् सांत्व, दान, दंड भेद इत्यादिक उपायांनीं शत्रूचा नाश कसा होतो तो पुन: मला सांग. असा प्र श्न ऐकून कणिक बोलतो, हे राजा, कोणी एक नीतिशास्त्रार्थ वेत्ता जंबुक (को ल्हा) वनात राहात होता त्याचा वृत्तांत सांगतों. हे राजा, एक जंबुक; व्याघ्र, उं- दीर, लांडगा आणि नकुल (मुंगुस) या चार मित्रां सह वर्तमान वनांत राहा- त असतां कोणे एके दिवशीं महा बलाढ्य असा एक मृग अरण्यांत त्याणी पा हिला परंतु त्यास धरण्या विषयीं ते असमर्थ होते. यास्तव आपल्यांत विचा र करूं लागले कीं, या हरिणास धरण्याचा काय उपाय करावा तेव्हां प्रथम जंबुक बोलला कीं, हे व्याघ्रा तूं या हरणास बहुत वेळ मारण्याचा उद्योग के- लास परंतु तो वेगवान असल्यामुळें तुला सांपडला नाहीं तर आतां असें करा वें कीं, हा हरण निद्रिस्त जाहाला ह्मणजे उंदरानें याचे पाय भक्षण करावे. नंत र त्यास व्याघ्रानें जाऊन धरावें नंतर आपण सर्व मिळून भक्षण करून स्वस्थ उं. असें भाषण ऐकून तसा उपाय त्याणीं केला असतां तो मृग कांही चलन व- लन करीत नव्हता. त्यास जंबुकानें पाहून तो सर्वांस बोलला कीं, अरे मित्र हो

तुह्मीं आतां सर्वांनीं स्नानास जावें, मी याचें रक्षण करीत बसतों. असें जंबुकाचें भाषण ऐकून सर्व स्नानास गेले असतां जंबुक चिंताग्रस्त होऊन बसला. तों इतक्यांत प्रथम स्नान करून व्याघ्र आला आणि चिंताग्रस्त मानस जाहालेला जो जंबुक त्यास बोलला कीं, हे महा प्राज्ञ, तूं शोक कां करतोस? असें व्याघ्राचें भाषण ऐकून जंबुक बोलला हे व्याघ्रा, तुला मुषिक बोलला कीं, या व्याघ्राचे बलास धिःकार असो. आज मी मृग मारला माझा बाहुबलाचा आश्रय करून आज हा व्याघ्र तृप्त होणार यास्तव हें भक्ष्य मला रुचत नाहीं. असें जंबुकाचें भाषण ऐकून व्याघ्र बोलतो हे जंबुका, बरें तर मुषक असें बोलत असेल तर आज स्वबाहूबलानें मी सर्व वनचर मारून सर्वांचीं मांसें भक्षण करितों. असें बोलून व्याघ्र वनांत गेला. तों इतक्यांत मुषिक आला त्यास जंबुक बोलला कीं, हे मुषिका, आलास, बरें तुझें कल्याण असो नकुल आतांच आला होता त्याणें असें सांगितलें कीं, मृगाचें मांस हें विष आहे यास्तव मी तें भक्षण करणार नाहीं, तर मी मुषिकाचें भक्षण करीन तर तूं माला अनुमोदन दे. असें त्याचें भाषण ऐकून मुषिक भयानें बिळांत गेला तों इतक्यांत लांडगा आला त्यास जंबुक बोलला कीं, हे वृका, व्याघ्रास महान कोप आला आहे तेव्हां आतां आपले कसें होईल, तो आपल्या भार्येसह वर्तमान येथें येणार तर काय कर्तव्य असेल तें कर. असें भाषण ऐकून वृक आडमार्गानें पळाला तों इतक्यांत नकुल आला त्यास जंबुक बोलला कीं, हे नकुला, मी आपल्या बाहुबलानें त्यास सर्वांस जिंकिलें तर तूंही माझाशीं युद्ध करून हें मांस खा. असें भाषण ऐकून नकुल बोलला कीं, हे जंबुका, मी तुजशीं युद्ध करीत नाहीं असें ह्मणोन तोही गेला. कणिक बोलतो हे धृतराष्ट्र राजा, नंतर ते सर्वही गेले असतां जंबुकानें तें मांस खाल्लें. या जंबुका प्रमाणें जो भूपती विचार करील तो निरंतर सुखाची वृद्धी पावेल. आतां दुसराहि विचार सांगतों एक पुत्र, सखा, भ्राता, पिता, अथवा गुरु हे जरी आपल्या रिपुस्थानीं जाहाले तथापि कल्याण इच्छिणाऱ्या पुरुषानीं त्यांचा वध करावा. शपथें करून अथवा अर्थदानानें किंवा विषानें व मायेनें शत्रूचा नाश करावा. उपेक्षा करूं नये. आपल्यास दुसऱ्याचा नाश कर्तव्य आहे अथवा आपण प्रवृत्त आहोंत तथापि प्रिय भाषण करावें. आणि नाश करण्या

चा समय दृष्टीस पडला ह्मणजे कांहीं एक निमित्त ठेऊन त्याचा नाश करावा. जे दरिद्री असून नास्तिक असतील व चोर या सर्वांस राजानें आपले देशांत ठेऊं नये. भय शंका धरण्यास योग्य नसून त्याजपासून जरी भय जाहालें तथापि तें भय समूल नाश करील. उद्यान, विहार स्थानें, देवतांचीं स्थानें, मद्यमाशन स्थानें, सभा इत्यादिक स्थलीं लोकांचा समाज एकत्र होतो यास्तव या ठिकाणीं शत्रूंचा शोध करीत असावा. दुसऱ्यास फलाची आशा उत्पन्न होईल असें बोलावें. परंतु फल होऊं देऊं नये. धर्मार्थ काम यांचे ठायीं तीन प्रकारच्या पीडा आहेत तशींत्यांजपासून फलें ही निरनिराळीं तीन प्रकारची आहेत. प्रथम धर्मानें वागणाऱ्या पुरुषास अर्थ व काम या उभयतांचा नाश झाल्यामुळें चित्तास खेद होतो यास्तव ही पीडा धर्माचा निग्रह करिते. तेणे करून कामाचें नियमन केलें जातें. तेव्हां त्रिवर्गाच्या आश्रयामुळें सुख होत नाहीं, ज्याची बुद्धी चिंतेंत निमग्न असेल त्यास नल रामादिकांच्या कथा सांगून शांतवन करावें दुर्बुध्धी उत्पन्न जाहाली असल्यास कालांतरें करून तुझें कल्याण होईल अशी आशा दाखऊन त्याचें शांतवन करावें. पंडित असल्यास धनादिक देऊन वर्तमान कालींच त्याचें शांतवन करावें, आपल्या शत्रूशीं संधी करून आतां मी कृत कृत्य जाहालों असें ह्मणोन जो सुखानें शयन करितो तो वृक्षाग्री निद्रिस्त जाहालेला जसा खालीं पडतो तसा जाणावा. हे धृतराष्ट्र राजा मी जी नीती सांगितली तिचा पांडवांचे ठायीं अथवा इतर जे कोणी तुझे शत्रु असतील त्याचें ठायीं उपयोग केला असतां तुझा नाश व्हावयाचा नाहीं. तूं पुत्र व राज्यादिकानीं संपन्न असून कुलशील व बलादिकें करून श्रेष्ठ आहेस यास्तव पांडु पुत्रापासून आपलें रक्षण कर. अशी कणिक अमात्यानें नीती सांगून तो आपल्या गृहीं गेला असतां धृतराष्ट्र राजा शोकार्त जाहाला. असा विषय या अध्यायांत आहे.

१४१ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, नंतर सुबलपुत्र शकुनी, दुर्योधन, दुःशासन आणि कर्ण यांणीं पुत्रांसह वर्तमान कुंतीचा दाह करण्या विषयीं कांहीं एक दुष्ट विचार करून तो धृतराष्ट्रास सांगितला असतां इंगीत जाणणारा व तत्त्व दर्शी जो विदुर याणें यांचें मत ताकानीं

मुक्त, लाटा सहन करणारी व दृढ अशी एक नौका सिद्ध करून कुंतीस बोल लेला कीं, हे कुंती, हा धृतराष्ट्र आपल्या कुल संबंधी कीर्ती व वंश याचा नाश करणारा विपरीत बुद्धी आहे हा आतां धर्म सोडण्याची इच्छा करितो यास्तव मी तुमचे करितां गंगेंत तरणारी व पवन सहन करण्यास योग्य अशी एक नौका सिद्ध केली आहे त्यांत तुह्मीं बसून जलमार्गानें जा, ह्मणजे मृत्यु पाशा पासून तूं पुत्रां सहवर्तमान मुक्त होशील. असें विदुराचें भाषण ऐकून कुंती दुःखानें पुत्रां सहवर्तमान त्या नौकेमध्यें बसून गेली. पुढें विदुरानीं सांगितल्या प्रमाणें पांडवानीं नौकेचा त्याग करून नाविकानीं दिलेलें धन घेऊन ते वनांत गेले. कोणी एक भिल्लिण पांच पुत्रां सहवर्तमान कांहीं एक कारणा स्तव लाक्षागृहांत आली होती ती निरपराधी पुत्रां सहवर्तमान दग्ध जाहाली. दुष्टात्मा पापी मूर्ख्या धम पुरोचन नामा तोही जतुगृहांत दग्ध जाहाला. हो वार्ता दुरात्मा जो धृतराष्ट्र पुत्र यास माहीत नवती. लाक्षागृह दग्ध जाहालेलें वारणावत पुरांत राहाणाऱ्या लोकानीं ऐकून ते दुःखित जाहाले आणि शोक करीत धृतराष्ट्राकडे जाऊन बोलले कीं, हे राजा, पांडवांस दग्ध करून टाकीलेंस आतां तुझे मनोरथ पूर्ण जाहाले बरें! पुत्रां सहवर्तमान तूं आतां राज्याचा उपभोग कर. असें भाषण ऐकून धृतराष्ट्रानें पुत्रांसहवर्तमान बहुत शोक करून भीष्म व विदुर यां सहवर्तमान त्यांचीं प्रेत कार्यें केलीं. असें वैशंपायनाचें भाषण ऐकून जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायन ऋषे लाक्षागृहाचा दाहा व पांडवाचें मोक्षण कसें जाहालें व धृतराष्ट्र पुत्रानीं घातुक कर्म कसें केलें ते मला सांग. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीमसेन बलानें अधिक व अर्जुन शस्त्रास्त्र विद्येंत अतिनिपुण जाहालेला दुर्योधनानें पाहून कर्ण, शकुनी व दुःशासन यांच्या विचारानीं पांडवांस मारण्या विषयीं अनेक उपाय केले; परंतु ते सर्व उपाय विदुराच्या अनुमतें व्यर्थ होऊन पांडव हस्तना पुरीं सुखानें राहिले असें जाणोन पुरनिवासी लोक सभेमध्यें त्यांचा कथा वर्णन करीत, हा प्रज्ञाचक्षु धृतराष्ट्र अंध असल्यामुळें याला पूर्वीं राज्य मिळालें नाहीं. सत्य प्रतिज्ञ व महाव्रती शंतनु पुत्र जो भीष्म याणें तर राज्याचा त्याग केला यास्तव हें राज्य तो ग्रहण करणार नाहीं. तेव्हां हा धर्मरा

ज ज्येष्ठ, तरुण, सत्य जाणणारा आहे यास्तव यास आपण राज्याभिषेक क रूं आणि हाच भीष्म व पुत्रा सहवर्तमान धृतराष्ट्र याचें पोषण करील. हे नागरिक लोकांची भाषणें दुर्योधनास सहन न झाल्यामुळें तो धृतराष्ट्र ए कलाच बसला होता तेथें जाऊन असें बोलला कीं, हे तात, राज्याचा अधि पती युधिष्ठिर व्हावा ही सर्वांची इच्छा आहे हें पौरजनाचें मत भीष्मासही मान्य होईल असें वाटतें. तूं अंध आहेस ह्मणोन तुला राज्य मिळालें नाहीं- आतां पांडूचे पुत्र त्याराज्याचे विभागी असल्यामुळें पुनः तें राज्य त्यासमि ळालें तरमग आह्मी राजवंशांत उत्पन्न होऊन हीन जाहालों. लोकांमध्यें आ ह्मीं अपमानास पात्र होऊं आणि दुसऱ्या गृहीं अन्न भक्षीत असल्यामुळें न रकांत जाऊं यास्तव हे राजा, जेणेंकरून पांडवांस राज्य मिळणार नाहीं असा कांहीं विचार कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१४२ वा अध्यायः— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, दुर्यो धनाचें भाषण ऐकून धृतराष्ट्रराजा कणिकाच्या वाक्याचें स्मरण करून द्वि धा मनस्क होऊन शोक करूं लागला. अ नंतर दुर्योधन, कर्ण, शकुनी आ णि दुःशासन या चौघांनीं कांहीं एक विचार करून पुनः दुर्योधन धृतरा- ष्ट्राकडे गेला आणि त्यास बोलला कीं, हे तात, पांडवां पासून आपल्यास भय न प्राप्त होण्या करितां आह्मीं असा विचार केला आहे कीं, कांहीं एक उत्तम उपाय करून पांडवांस वारणावत नगरीं घालवून द्यावें. असें पुत्रा- चें भाषण ऐकून धृतराष्ट्र राजा बोलला कीं, हे दुर्योधना पांडुराजा धर्मप रायण होता, माझे ठायीं त्याची अत्यंत प्रीती असे. त्याचा पुत्र युधिष्ठिर तो ही तसाच धर्म परायण असल्यामुळें त्यास आह्मीं येथून बळेंच कसें घालवू न द्यावें? हें पितृपैतामह राज्य आहे या कारणानें सकल लोक त्यास साहा य्य विशेषें बहुत आहेत. पांडुराजानें अमात्याचें व सैन्याचें व पुत्रपौत्रा दिकांचें पोषण फार चांगलें केलें. सकल पुरनिवासी लोक युधिष्ठिरा करि तां सबांधव आमचें हनन कसें करणार नाहींत बरें? असें धृतराष्ट्राचें वाक्य ऐकून दुर्योधन बोलला हे तात, हे दोष पुढें उत्पन्न होणार असें मी समजू न सकल प्रजा, धन व मानेकरून पूजित केल्या आहेत यास्तव त्या विशेषें

करून आमचेच सहाय्य करतील यास्तव पांडवांस मृदु उपायें करून येथून वारणावतीं पाठवावें ह्मणजे जाहलें. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलला कीं हे पुत्रा, माझ्या ही मनांत तूं ह्मणतोस तेंच आहे हा अभिप्राय पापरूपी आहे ह्मणोन याचें स्पष्टीकरण करीत नाहीं, भीष्म द्रोण विदुर व कृपाचार्य हे पांडवांस घालवून देण्या विषयीं कधींही अभिप्राय देणार नाहींत कारण आह्मी व पांडव त्यांस समानच आहोंत. असें भाषण ऐकून दुर्योधन बोलला हे तात, भीष्म निरंतर मध्यस्थ रितीनें आहेत, द्रोणाचार्याचा पुत्र माझ्याकडे सच आहे आतां जिकडे पुत्र तिकडेच द्रोणाचार्य होतील यांत संशय नाहीं कृपाचार्य तर द्रोणाचार्याचा व भाच्याचा त्याग करतील असें नाहीं. आतां विदुर आमच्या द्रव्यानें बद्धच आहे कदाचित् गुप्तरूपानें तो पांडवांस जरी साह्य असला तथापि पांडव आपल्यास बाधा करण्यास समर्थ होणार नाहींत तर हे राजा, तूं निःशंक होऊन मातेसह वर्तमान पांडवांस येथून काढून दे. असा विषय या अध्यायांत आहे.

१४३ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, दुर्योधनानें पांडवांस वारणावतीं पाठविण्याचा विचार धृतराष्ट्रास सांगोन हळूहळू सर्व प्रजा धन व मान इत्यादिकें करून आपलेस्वाधीन करून घेतली. नंतर कांहीं कुशल मंत्री होते ते असें बोलले कीं, वारणावत नगरीं पशुपती महादेवाच्या पूजे करितां महान एक रमणीय समाज जमणार आहे तो पाहाण्यास अनेक देशींचे लोक होयेतील हीं त्याचीं भाषणें ऐकून पांडुपुत्रांचे अंतःकरणीं वारणावतीं जाण्याची मती जाहाली हें वर्तमान धृतराष्ट्रास समजतांच तोही पांडवांस बोलला कीं, वारणावत नगरीं पशुपतीचा उत्साह रमणीय होत असतो जर तुमची तेथें जाण्याची इच्छा असेल तर सगण परिवार जाऊन ब्राह्मण व गायकांस बहुत दान करा. असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून शांतनव भीष्म, महामती विदुर, द्रोणाचार्य, ब्राह्मण पुरोहित, पौरजन व यशस्विनी गांधारीस युधिष्ठिर दीन होऊन बोलला कीं, रमणीय जें वारणावत नगर याचे ठायीं धृतराष्ट्राचे आज्ञेनें आह्मीं जाण्याचा निश्चय केला आहे तर तुह्मी सर्वांनीं आह्मास आशीर्वाद देऊन आमच्या कल्याणाची इच्छा करावी. असें धर्मराजानें भाषण केल्यावर सकल कौरव प्रसन्न वदन होऊन पांडुपुत्रांस बोलले हे पांडव हो, तुमचें कल्याण असो. असें कौरवानीं भाषण केल्यावर पांडव वार

णावतीं जाण्यास निघाले. असा विषय या अध्यायांत आहे.

१४४ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धृतराष्ट्रानें पांडवांस वारणावतीं जाण्याविषयीं आज्ञा दिल्यावर दुरात्मा दुर्योधन परम हर्षित होऊन पुरोचन नामें एका सचीवास असें बोलला कीं, हे पुरोचना ही सकल पृथ्वी द्रव्यानें परिपूर्ण माझ्या स्वाधीन आहे जसें मी इचें रक्षण करितों तसें तूं या पृथ्वीचें रक्षण करण्यास योग्य आहेस. तुझ्या साहाय्यानें मी कांहीं एक विचार करणार आहें तो माझे शत्रूस कळूं देऊं नको आतां जें कार्य कर्तव्य तें सांगतों. धृतराष्ट्र राजानें पांडवांस वारणावतीं पाठविण्याचा विचार केला आहे ते तेथें जाऊन पोहोंचण्याचे पूर्वीं तूं तेथें पोहोंच आणि चतुःशालायुक्त उत्तम प्रकारचें रमणीय गृह नगराच्या सन्निध निर्माण कर त्या गृहांत ताग, रस, रज, रसादि अग्नि उद्दीपन द्रव्यें स्थापन कर. तूप, तेल, वसा (मांस), इत्यादि मृत्तिकेमध्यें मिश्र करून त्यांच्या भिंती कर. हे पदार्थ पांडव व इतर जन न जाणतील असें कर. असें गृह तूं निर्माण केल्यावर पांडव परम सत्कारें करून कुंती व सुहृज्जनां सहवर्तमान तेथें येऊन राहातील. नाना प्रकारचीं दिव्य आसनें व शयनें हीं तेथें सिद्ध करून जेणें करून धृतराष्ट्र संतुष्ट होईल असें कर. नंतर पांडव त्या गृहांत राहाण्यास आल्यावर विश्वस्तपणी भयरहित होऊन निद्रिस्त होतील त्या काळीं तूं प्रथम त्या गृहाचे द्वारास अग्नी लाव म्हणजे ते त्यांत दग्ध होतील. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून पुरोचन अमात्य तसें करण्याची प्रतिज्ञा करून वारणावतीं गेला आणि दुर्योधनाच्या विचाराप्रमाणें उत्तम प्रकारचें गृह त्यानें केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१४५ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, पांडव, वायूसमान वेगयुक्त अश्वांनीं जोडलेल्या रथांत बसते समयीं प्रथम भीष्म पादाभिवंदन नंतर धृतराष्ट्र, माहात्मा द्रोण, इतर वृद्ध आमात्य, कृपाचार्य व विदुर यांसही पादाभिवंदन करून निघाले असतां नागरिक लोकही त्यांच्या पाठी मागून निघाले. विदुर व इतर कुरुश्रेष्ठ शोकानें व्याकुल होऊन पांडवांच्या पाठीमागून गेले. कांहीं ब्राह्मण पांडुपुत्रास पाहून बोलले कीं, काय हो!! मंदप्रज्ञ धृतराष्ट्र राजा पांडुपुत्रांस सर्वथा विषम पाहतो. धर्माकडे तर यानें अगदीं लक्ष्य नाहीं आतां वारणावतीं यास पाठविण्याचा विचार केला हें केवळ अयुक्त आहे

पूर्वी शांतनव राजा आह्मांस पित्या सारखा होता. विचित्र वीर्य व पांडु हेही आह्मांस पित्यासमानच होते. दैवयोगानें ते स्वर्गी गेले असतां धर्मराज प्रभृती पांडूचे पुत्र राज्याधिकारास योग्य असून धृतराष्ट्रास हें सहन होतनाहीं. तस्मात् धृतराष्ट्राचें हें कर्म आह्मांस बरें वाटत नाहीं यास्तव आपलीं गृहें टाकून पांडवांच्या बराबर वारणावतीं जाऊं. अशीं त्यांचीं दुःखित भाषणें ऐकून धर्मराज बोलला कीं, हे ब्राह्मण हो, जसा पिता आणि गुरु आपल्यास मान्य व श्रेष्ठ आहे तसाच पृथ्वी पती राजा आहे, त्याणे जें आपल्यास सांगितलें तें निःशंकपणें आह्मी आचरण करितों त्यापेक्षां आतां आह्मास प्रदक्षिणा युक्त होऊन आशीर्वाद द्या आणि येथूनच माघारे फिरा. असें धर्मराजाचें भाषण ऐकून सकल पुरनिवासी लोक पांडवांस प्रदक्षिणा करून आशीर्वाद देत पुनः हस्तना पुरीं गेले. नंतर विदुरानें धर्मराजास म्लेंच्छ भाषेंत असा बोध केला कीं, हे प्राज्ञा सर्व तूं जाणतच आहेस, सर्व भाषेचें ज्ञान तुला आहे ह्मणोन तुला असें स्मवितों कीं, कणिक आमात्यानें धृतराष्ट्रास अशी नीति स्मविली कीं, कपटानें ही शत्रूस विश्वास उत्पन्न करून त्याचा घात करावा त्याप्रमाणें धृतराष्ट्र पुत्रानीं योजना केली आहे. शत्रूनीं वारणावतीं कपटानें गृह निर्मित करून त्यामध्यें अग्नी उत्तेजक असे लाख, राळ, सरस इत्यादिक पदार्थ ठेविले आहेत तुह्मी त्या गृहांत गेलां ह्मणजे त्या गृहास अग्नि लाविण्या विषयीं कोणी एक त्याचा पुरोचन नामा सेवक आहे त्यास आज्ञा दिली आहे, यास्तव तुह्मीं हा प्रसंग जाणोन सावधपणे रहा. आतां या संकटांतून पार पडण्यास तुह्मास एक उपाय सांगतों. कोणी एक विश्वासू माझा आत्मसखा खनक आहे तो गुप्तपणे तुला येऊन भेटेल आणि तुह्मीं सांगाल त्या प्रमाणे तुह्मांस जाण्या करितां एक मार्ग करून देईल त्या मार्गानें तुह्मीं जा परंतु हस्तना पुरीं येऊं नका, आलां असतां शत्रू तत्काळ तुह्मास प्रहार करतील. असें विदुराचें भाषण ऐकून धर्मराज बोलला कीं, हे विदुरा, तुझें संपूर्ण भाषण मी जाणलें आतां मला जाण्यास आज्ञा दे, विदुरानें पांडवांस जाण्या विषयीं आज्ञा देऊन विदुर भीष्म व सकल पौरजन माघारे हस्तना पुरीं आल्यावर धर्मराजास कुंती बोलली कीं हे युधिष्ठिरा दासानें तुला जें सांगितलें तें मी कांहींस

मजलें नाहीं तर मला सांग. असें मातेचें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलला कीं, हे कुंती, विदुरानें मला असें सांगितलें कीं, वारणावतीं ज्या गृहांत तुह्मी राहाल त्या गृहास अग्नी लावणार आहेत परंतु तुह्मास गमन करण्या विषयीं मार्ग सांपडेल त्यामार्गानें जा. वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, हें कृत्य झाल्यावर आठवे दिवशीं रोहिणी नक्षत्रीं फाल्गुनमासीं वारणावत नगरीं पांडव गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१४६ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडव वारणावत नगराच्या संन्नीध जातांच त्यांस भेटण्या करितां सकल नगर निवासी लोक आले. नंतर परस्पर एकमेकांचा सत्कार करून त्या जनसमुदाया सहवर्तमान पांडवानीं वारणावतींत जाऊन ते प्रथम स्वकर्मानिरतीं रत असे जे ब्राह्मण त्यांचे गृहीं गेले नंतर नगराचे जे कोणी अधिकारी होते त्याचे गृहीं जाऊन तेथून मोठमोठे वैश्य व शूद्र यांचे गृहीं कांहीं काल पर्यंत बसले. नंतर पुरोचना सहवर्तमान तेथून एके गृहीं जाऊन राहिले असतां त्या गृहीं भक्ष, भोज्य, पान, द्रव्यें व मुख्य मुख्य आसनें पुरोचनानें देऊन पांडवांचा मोठा सत्कार केला. सकल पुरनिवासी लोकानीं ही पांडवांस अपेक्षित पदार्थ देऊन संतुष्ट केलें. नंतर पुरोचनानें सिद्ध केलेलें जें लाक्षागृह तें पांडवांस दाखविण्या करितां पुरोचन त्यांस घेऊन गेला असतां पांडवांनीं तें उत्तम प्रकारचें गृह पाहिल्या वर तूप व लाख इत्यादिकांचा गंध आघ्राण करून धर्मराज भीमसेनास बोलला कीं, हे भीमा राळ, सरस व तूप यानीं भिजवलेल्या मोळ, तृण इत्यादि पदार्थांनीं युक्त असें अग्नी गृह दुर्योधनाच्या आज्ञे वरून गृह कर्मामध्यें निपुण असे जे कोणी शिल्पी त्याणीं निर्माण केलें यामध्यें आपल्यास विश्वासानें ठेऊन पुढें दग्धकरावें या विषयीं हा पुरोचन आला आहे. हामंद केवळ सुयोधनास अत्यंत वश होऊन आपल्या नाशास उद्युक्त आहे या दुष्टाचा हाविचार विदुरानें मला सांगितला. असें धर्मराजानें भाषण ऐकून भीमसेन बोलला हे धर्मराजा, जर हें अग्नि गृह तुला विदित आहे तर येथें आपण न राहातां पूर्वीं ज्या गृहीं होतों तेथें जाऊं. असें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलला कीं, हे भीमा आपल्या वास्तव्याचे

शा पुरोचनास नसमजतांला अशा युक्तीनें येथेंच वासकरावा हेंच मला बरें वा टतें. दुर्योधनही याच दुष्टा प्रमाणे आहे यास्तव हे वर्तमान आपल्यास सम जेल असें पुरोचनास समजूं नदेतां वासकरावा, कदाचित आपण यागृहां त दग्ध जाहालों तर भीष्मास जरी कळलें तरीं तो कौरवांवर कशाकरितां को प करील. आपण जर पळून जावें तर हें वर्तमान दूत दुर्योधनास जाऊन सांगे तील. दुर्योधन पदारूढ आहे, आपल्यास कोणी साह्याय्य नाहीं याकरितां अ- नेक उपायानीं याकाळीं तो आमचा घात करण्यास चुकणार नाहीं यास्तव- या पाप्याशीं वंचना करून गुप्तरूपाने वासकरावा हेंच योग्य आहे . असा- विषय या अध्यायांत आहे.

१४७ वा अध्याय.– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कोणी ए क विदुराचा सुह्रद, खनन विद्येंत अत्यंत कुशळ असा होता तो पांडवांकडे येऊन एकांत स्थळीं धर्मराजास बोलला कीं, हे धर्मराजा तुमचें प्रियकरावें- ह्मणोन विदुराने मला तुह्माकडे पाठविला आहे यास्तव मी तुमचें गुप्तपणे का य प्रिय करूं तें मजवर विश्वास ठेऊन सांगा. असें भाषण ऐकून युधिष्ठिर बो लला कीं, हे खनका तूं विदुराचा सखा आहेस असें मी जाणलें यास्तव हे ख नका मोठ्या यत्नानें पुरोचनास न समजतां या अग्नी पासून आतां आमची मु क्तता कर. असें युधिष्ठिराचें भाषण श्रवण करून खनकानें त्यास मुक्त कर ण्या विषयीं प्रतिज्ञा करून गृहाची परिखा होती तेथें प्रथम खननास आ- रंभ करून गृहाच्या मध्यभागीं तें बीळ कोणास नकळण्या जोगें असें के- लें आणि पुरोचन भयास्तव त्यानें मुख आच्छादित करून ठेविलें. पुरोचन निरंतर गृहाच्या द्वार प्रदेशीं वासकरी. पांडव ही आयुधासहवर्तमान दिवसा स वनामध्यें मृगये करितां संचार करून पुरोचनाच्या जवळच द्वारप्रदेशीं रा त्रौ वास करीत. असा विषय या अध्यायांत आहे.

१४८ वा अध्याय.– वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, त्यास्था ना मध्यें पांडव एक संवत्सर पर्यंत संतुष्टमन होऊन विश्वस्ता सारखे राहा त्यांचा विश्वासमाझ्यावर पूर्ण आहे असें समजून पुरोचन संतु ष्टवशीं भीमसेन, अर्जुन, नकुल, सहदेव यांस धर्मराज बोल-

लाकीं, आपण या गृहास अग्नी लाऊन पलायन करावें आणि यान पुरोचना स दग्ध करून टाकावा,कदाचित् पुढें ते आपला शोध करूं लागतील यास्तव त्यांस सत्य वाटण्या करितां या लाक्षा गृहांत अग्नी लाविण्या पूर्वीं कोणी साहा मनुष्यें ठेवावीं.तीं मेलें दग्ध गृहांत दृष्टीस पडलीं ह्मणजे त्यांस हे पांडवच दग्ध जाहाले असें समजून ते आपला शोध करणार नाहींत,हा पांडवांचा विचार कुंतीने ऐकून कांहीं दानाच्या निमित्ताने रात्रीं ब्राह्मण भोजन आरंभिलें असतां कोणीएक निषाद जातीची स्त्री,अन्ना करितां पांच पुत्रांसहवर्तमान स्व इच्छेने तेथें आली;तिला ते भक्ष्य पदार्थ व मदिरादि पान पदार्थ मिळाले असतां यथेच्छ भक्षण करून,मद्य प्राशनाच्या योगें पुत्रांसहवर्तमान त्या रात्रीं मृता सारखी तेथेंच निजली. नंतर त्याकाळीं रात्रीं सकळ लोक निद्रिस्थ-जाहाले आहेत व महान वायुही सुटला आहे,असा समय पाहून भीमसेनानें ज्या द्वार प्रदेशीं पुरोचन निजला होता तेथें प्रथम आग लाऊन नंतर गृहाचे सभोंवतीं आग लाविली नंतर पांच पांडव व कुंती अशीं साहा मनुष्यें सुरुंगांत-गेलीं.नंतर वायूच्या योगें अग्नि प्रदीप्त होऊन मोठमोठे शब्द होऊं लागले तेणे करून ग्राम निवासी लोक जागृत होऊन पाहातात तों पांडवांचें गृह प्रदीप्त जाहालें त्या योगें सर्वांचीं मुखें कृश होऊन बोलले कीं,पापी व अपक्व बुद्धी जो दुर्योधन त्याणे हें गृह पांडवांच्या नाशा करितांच बांधिलें.आज पांडवा सहवर्तमान या गृहास दग्ध करून टाकिलें यास्तव धृतराष्ट्राजास धिःकार असो,राजाची बुद्धी कांही समंजस नाहीं,अरे जे पवित्र पांडुराजाचे पुत्र त्यांस शत्रूसारखे दग्ध करून टाकिलें.अरे पांडूचे पुत्र अनपराधी असतां त्यांस पापात्म्या पुरोचनानें दग्ध केलें आणि स्वतः तोही त्यांत दग्ध जाहाला. असे विलाप करीत करीत गृहाच्या आसमंताद्भागीं त्या रात्रीं तसेच बसले.पांडव तर परम दुःखीत होऊन माते सहवर्तमान कोणास न समजतां बिळांत चालले असतां निद्रेचा-भंग जाहाल्या मुळें त्यांस जाण्याची शक्ती राहिली नाहीं.त्या काळीं भीमसेनानें मातेस स्कंधावर ठेविली अंकावर नकुळ व सहदेवास ठेविले आ[illegible]धिष्ठी अर्जुन यांस दोन हस्तामध्यें घेऊन उरस्थलानें वृक्ष मोडित[illegible]नें विदारण करीत,वायू सारख्या वेगानें चालला.असा विषय

१४९ वा अध्याय:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडव त्यावि ठिकाणांतून ऐका वनांत गेले असतां पूर्वी विदुरानें एक नाविक तेथें पाठविला होता त्या नाविकानें माते सहवर्तमान पांडवांस पाहात त्यांस बोलला कीं, तुमचें हें-कृत्य जाहालेलें विदुरास समजल्या वरून त्याणे मला तुह्माकडे पाठविलें आहे, यास्तव या नौकेंत बसून तुह्मी परतीरास चलावें. असें भाषण करून त्या नाविकानें माते सहवर्तमान पांडवांस नावे मध्यें बसवून ती नौका चालविली असतां नाविक बोलला कीं, विदुरानें तुमच्या मूर्ध्याचें आघ्राण करून व तुह्मास आलिंगन देऊन असें सांगितलें आहे कीं, अव्यग्र होऊन नौकेंत बसा, तुमचें अरिष्ट निवृत्त होईल. नंतर नाविकानें विदुराचा निरोप पांडवांस सांगून गंगेच्या पर तीरीं पांडवांस नेऊन स्थलावर उतरलें असतां पांडवांनीं त्या नाविकास आशीर्वाद दिल्यावर तो नाविक पुनः विदुराकडे गेला. इकडे पांडव भागीरथीच्या परतीरीं वनामध्यें गुप्त भावें करून गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१५० वा अध्याय:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, ती रात्र अतिक्रांत जाहाल्यावर सकल नगर निवासी लोक पांडवांस पाहाण्या करितां आले, त्याणी तें लाक्षा गृह व पुरोचन आमात्य दग्ध जाहाला हें पाहून आक्रोश करीत बोलले कीं, पांडवांच्या विनाशा करितांच पाप कर्म्या दुर्योधनानें हें गृह-उत्पन्न केलें यांत संशय नाहीं. पूर्वी धृतराष्ट्रास हें कर्म सांगून नंतर पांडवांचा या दुष्टानें घात केला. नंतर तो सकल अग्नी पांडवां करितां त्याणी शांत केला असतां पांच पुत्रां सहवर्तमान निषादी दग्ध जाहलेली दृष्टीस पडली. इतक्यांत जा खनकानें पूर्वी विवर केलें होतें त्याणें तें इतरांचे दृष्टीस न पडण्या करितां तत्काल धुलिनें आच्छादित केलें. हें वर्तमान जाहालेलें धृतराष्ट्रास कळतांच तो पांडुपुत्रांविषयीं विलाप करून असें बोलला कीं, अमात्या सहवर्तमान पांडव दग्ध जाहाले त्या पेक्षां आज माझा भ्राता पांडूच मरण पावला. बरें असो. आतां वारणावतीं जाऊन त्यांच्या अस्थी काढून मी कर्तव्यतें ज्ञातीनीं द्रव्य द्वारा करावें. तसेच त्यांचे सुहृद जे त्यांच्या समागमें दग्ध जाहाले असतील त्यांच्या ज्ञातीनीहीं त्यांच्या क्रिया करण्या करितां जावें. अशी धृतराष्ट्राची आज्ञा होतांच पांडव व कुंती यांच्या क्रिया करण्यास सुहृद जन गेले. इकडे ज्ञाती सहवर्त

मान धृतराष्ट्रानें पांडुपुत्रांस तिलांजली दिल्या, त्याकाळीं सकल लोक आर्त होऊन हे युधिष्ठिरा! हे भीमा! हे फाल्गुना! हे नकुल सहदेवा! हे कुंती! अशीं नांवें घेऊन आक्रोश करीत, याप्रकारें सर्व लोक पांडवांस उदकांजली देऊन आक्रोश करीत बसले असतां विदुर ही लोकांस दिसण्याकरितां कांहीं दुःखित होऊन किंचित् शोक करीत बसला. इकडे पांडव नदीच्या परतीरीं जाऊन दक्षण दिशेस महावनांत जात असतां तृषा लागल्यामुळें अत्यंत आर्त व निद्रा नसल्यामुळें व्यग्रचित्त जाहाले. त्याकाळीं धर्मराज भीमास बोलला कीं, हे भीमसेना, आतां आह्मास पुढें जाण्यास शक्ती नाहीं, तूं आह्मास घेऊन चल तूं महाबली आहेस. असें धर्मराजानें भाषण ऐकून भीमसेन आपली माता कुंती व भ्राते यांस घेऊन त्वरेनें चालला. असा विषय या अध्यायांत आहे.

१५१ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीमसेन, कुंती व आपले बंधु यांस घेऊन मार्गानें चालत असतां सकल पांडवांस मूर्च्छा आली. जास्थळीं मार्ग विषम अथवा संकीर्ण येई त्यास्थळीं आपली माता कुंती इला पृष्ठप्रदेशीं घेई. याप्रकारें मार्गांतून जातांजातां स्वल्प फलमूलानीं व उदकानीं युक्त अशा देशांत गेला. पुढें सायंकाळ जाहाल्यामुळें क्रूरपक्षी व मृग भयंकर शब्द करूं लागले. संध्याकाळ परम भयंकर दिसूं लागला, सकल दिशा अप्रकाशीत जाहाल्या. त्याकाळीं कुंती तृषार्त होऊन पुत्रांस बोलली कीं, हे पुत्रहो, मी तृषेनें अत्यंत पीडित जाहालें आहें. असें भाषण ऐकून भीमसेन बोलला कीं, हे माते मी जल आणितों स्वस्थ ऐस. असें ह्मणोन ते पांडव तसेच पुढें जातां जातां एक घोर अरण्यांत बहुतच्छाया युक्त रमणीय असा वट वृक्ष पाहिला तेथें सर्वांस ठेऊन भीमसेन बोलला कीं, या छायेंत तुह्मीं सर्वांनीं विश्रांती घ्यावी मी जलाच्या शोधाकरितां जातों. त्या काळीं धर्मराजानें भीमसेनास जाण्या विषयीं आज्ञा दिली असतां तो तत्काल तेथून निघाला, तों एके ठिकाणीं सारस पक्षी शब्द करीत आहेत तेथें जाऊन जलास पाहातांच प्रथम त्याणें जलप्राशन केलें, नंतर स्नान करून माता व भ्रात्यांकरितां उत्तरीय वस्त्रामध्यें जल घेऊन श्वासोच्छ्वास टाकीत माते जवळ आला असतां माता व आपले भ्राते पृथ्वीतलावर निजलेले पाहून विलाप करीत बोलला कीं,

ह माते, तू व त्यांनीं पृथ्वीवर निद्रा केली आहे हें पाहाणारा मी, यांमाझ्या सारखा मंद भाग्य कोण आहे. पूर्वीं बारणावतीं मोठ मोठ्या आस्तरणांनीं युक्त अशा शयनावर शयन करीत होतां ते आज तुह्मीं महीतलावर निद्रिस्त जाहालां. हे माते धर्म, इंद्र आणि वायु यांज पासून तुझेठायीं आह्मीं पुत्रउत्पन्न जाहालों अशी तुझी योग्यता असतां आज परिश्रांत होऊन भूमीवर शयन केलेंस. हा धर्मराज, अर्जुन, नकुल सहदेव हे आज प्राकृत पुरुषासारखे धरणीतलावर निजले आहेत, आमचा ज्ञातीय दुष्ट दुर्योधन याणे आह्मास गावांतून काढून देऊन दग्ध करण्याचा समय आणिला होता, परंतु कांहीं दैव वशात आह्मी वांचलों आणि त्याच दुःखानें फिरतां फिरतां या वृक्षाच्या अधोभागीं आलों, कोणच्या दिशेस जावें असा भ्रम पडला आहे हे धृतराष्ट्र पुत्रा, जर युधिष्ठिर मला आज्ञा देईल तर सूत, आमात्य, कर्ण, सौबल व तुझे बंधु यांसहवर्तमान तुला यमगृहीं पाठवीन इतका क्रोध मला आला आहे, परंतु काय करूं, हा पापी युधिष्ठीर मला आज्ञा देत नाहीं. याप्रकारें महा बाहु भीमसेन क्रोधानें हस्तानें हस्ताचें पीडन करून व श्वासोच्छ्वास टाकीत अगदीं दीन मना जाहाला आणि आपले भ्राते यांस पाहून विश्वासयुक्त असें बोलला कीं, हे बांधव हो आतां येथून ग्राम जवळच आहे हें तुह्मास उदक आणिलें आहे हें पिऊन पुनः शयन करा, तुमचें रक्षण करण्याकरितां मी जागृत राहातों. असें भीमानें भाषण केल्यावर युधिष्ठिर प्रभृती पांडव जल प्राशन करून पुनः शयन करीत असतां भीमसेन त्यांचे संरक्षणार्थ जागृत राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

१५२ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया पांडव वनामध्यें निद्रिस्थ असतां सन्नीधच एकशाल वृक्ष होता, त्यावर राहाणारा हिडींब नामक राक्षस महा क्रूर मनुष्य मांसाचें भक्षण करणारा असा होता, त्याणे पांडवांस पाहून तो आपल्या रूक्ष केशाचें कंपन करूं लागला नंतर मनुष्याचा गंध आघ्राण करून भगिनीस बोलला कीं, हे हिडींबे आज मला फार दिवसानीं प्रीय भक्ष्य मिळणार; आज या माझ्या सूतीक्ष्याग्र ओठ, दाढा फार दिवसानीं मनुष्याच्या देहांत निमग्न होतील यास्तव तूं

जाऊन ते कोण वनांत निद्रिस्थ जाहाले आहेत ते पहा आणि त्यास वधून हनन करून माझाजवळ आण, माझा देशांत हे कोण निजले आहेत यांस कांहींच भय नाहीं काय असें राक्षसानें भाषण केल्यावर हेडिंबी जेथें पांडव निजले होते तेथें गेली आणि पृथेसहवर्तमान पांडव निद्रिस्थ आहेत आणि भीमसेन एकटा जागृत बसला आहे असें पाहून हा पुरुष महाबाहु, महाकांतीमान् असा दिसतो नर आपणास भर्ता योग्य आहे. पतीस्नेह जसा बलवान आहे तसा भ्रातृस्नेह बलवान नाहीं, यास मारलें असतां माझी व माझ्या भ्रात्याची एक मुहूर्त पर्यंत तृप्ती होईल आणि या पुरुषास हनन केलें नाहींतर बहुत वर्षें पर्यंत सुख भोगूं असा विचार करून नंतर हेडिंबी कृत्रिमानें मनुष्याचें रूप धरून भीमाच्या अग्रभागीं जाऊन उभी राहिली आणि किंचित लज्जायमान होऊन हास्य पूर्वक असें बोलली कीं, हे पुरुषश्रेष्ठा तूं कोठून येथें आलास व हीं निजलेलीं कोण आहेत ? हें राक्षसानीं सेवित वन आहे हें तुह्मास माहीत नाहीं? या वनामध्यें पापात्मा हेडिंब नामक राक्षस राहातो त्याची मी भगिनी, त्याणेंच मला इकडे पाठविलें आहे. तुमच्या मांसाचें भक्षण करण्यास त्यास बहुत इच्छा झाली आहे, तुला देवगर्भा सारिखा कांतीमान मी पाहून आतां तुझा शिवाय दुसरा भर्त्ता मी वरणार नाहीं हें सत्य सांगत्यें. तूं धर्मज्ञ आहेस यास्तव कामानें माझें चित्त फार व्यथित जाहलें आहे याजकरितां माझें सेवन कर. या पुरुष भक्षण करणाऱ्या राक्षसापासून तुझें मी संरक्षण करीन. मी यथेच्छ गमन करणारी आहें जेथें तुझी इच्छा असेल तेथें जाऊं. असें हेडिंबीचें भाषण ऐकून भीमसेन बोलला हे राक्षसी, माझी माता, ज्येष्ठ व कनिष्ठ बंधु सर्वें करून निद्रिस्थ जाहालीं आहेत त्यांचा त्याग करून कोण जाईल बरें. असें भीमसेनाचें भाषण ऐकून राक्षसी बोलली कीं, हे पुरुषा, जें तुला प्रिय असेल तेंच मी करीन. या सर्वांस उठीव राक्षसापासून मी यांची मुक्तता करित्यें. असें राक्षसीचें भाषण ऐकून भीमसेन बोलला कीं, हे राक्षसी हीं निजलीं आहेत यांस तुझ्या भ्रात्याच्या भयानें मी उठवीत नाहीं, हे भीरु माझा पराक्रम सहन करण्या विषयीं राक्षस, यक्ष व गंधर्व हीं समर्थ नाहींत मग मनुष्य कोठून असणार; हे चारुलोचने जर तुझी इच्छा असेल तर राहा, नसल्यास जा, तुझा कोण भ्राता आहे त्यास इकडे पाठऊन दे. अ-

ला विषय या अध्यायांत आहे.

१५३ वा अध्याय:— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, हेडिंबी नामक राक्षसीस माघारी येण्यास बहुत काळ लागला असें जाणोन हेडिंबास, र पांडवां कडे गेला. तो भयंकर आपलें मुख पसरून येत आहे हें पाहून हिडिंबी भीमसेनास बोलली कीं, हे पुरुषश्रेष्ठा हा पुरुषघातकी तुजकडे येत आहे या स्तव मी जें तुला सांगितलें त्या प्रमाणे कर. असें हिडिंबीचें भाषण ऐकून भीमसेन बोलला कीं, हे सुश्रोणी तूं भिऊंनको मी असतां यांस मारण्यास कोणी समर्थ होणार नाहीं; असें माझें कर्म तूं पाहाशील. हे सुश्रोणी, मी मनुष्य आं हें असें जाणोन तूं माझा अवमान करूंनको. असें भीमसेनाचें भाषण ऐकून हेडिंबी राक्षसी बोलली हे नरश्रेष्ठा, तूं देवरूपी आहेस तुझा मी अवमान करीत नाहीं, तूं मनुष्यां मध्यें असून राक्षसा साररखा पराक्रमी आहेस असें मी समजतें. असा उभयतांचा संवाद चालला आहे तों राक्षस जवळ येऊन सकुमार सर्वाभरण संयुक्त, सूक्ष्म वस्त्र धारण केले लें असें सुमनोहर मनुष्य रूप हेडिंबीनें धारण केलेलें पाहून बोलला कीं, हे भगिनी मला पुरुषास भक्षण करण्याची इच्छा झाली असतां त्यामध्यें विघ्न करण्यास हा दुर्मती कोण आला आहे; तुला पुरुषाची इच्छा झाली आहे, हे दुष्टे आमच्या पूर्वज सर्व राक्षसांचें यश तूं आज नष्ट केलेंस तर या सहवर्तमान तुला आज मारितों असे भगिनीस बोलून सुप्त जे पांडव त्यांचा वध करण्या करितां दंताने दंतांचें चर्वण करीत त्यांचे जवळ गेला तेव्हां त्या राक्षसास पाहून भीमसेन बोलला कीं, अरे उभाराहा पुढें येऊंनको, आपले भगिनीस भाषण केलेंस तें मी ऐकिलें, हे हेडिंबा सुखें करून हे माझे भ्राते निजले आहेत यांस स्पर्श करूंनको, मा झावरच प्रहार कर ही स्त्री आहे इजवर प्रहार करण्यास तूं योग्य नाहींस. ही तुझी भगिनी माझें रूप पाहून कामबाणानें पीडित जाहाली यांत तिचा अपराध नाहीं तर मदनाचा दोष आहे यास्तव इचा तूं नाश करूंनको, करशील तर आजच मी तुला यमगृहीं नेईन. पूर्वी या वनांत मनुष्यें तूं बहुत भक्षण केलींस त्याजपेक्षां तूं अत्यंत दुष्ट आहेस असें मी समजतों. हे कुलदूषका, मी आज तुला मारला असतां या वनामध्यें सकल पुरुष सुखानें संचार करती-

ल.असें भीमाचें भाषण ऐकून हेडिंब बोलला हे मानवा,व्यर्थ कां गर्जना कर-
तोस,जें कर्तव्य असेल तें करून तरी गर्जना कर. हे प्रिय बोलणाऱ्या,हे निज-
ले आहेत यांस मी प्रथम मारित नाहीं तुलाच मारून तुझ्या गात्रा पासून जें रु
धिर उत्पन्न होईल तें प्राशन करून पश्चात यानिद्रिस्थांस मारीन,नंतर हीअ
प्रिय कारिणी माझी भगिनी इचा वध करीन.असें भाषण करून हेडिंबासुरए
काएकीं आपले बाहू पसरून क्रोधानें भीमसेनावर धावून येतांच भीमसेना
ने हांस्य करीत आठ धनुष्याच्या अंतरावरून त्यास आकर्षित केलें.त्या काळीं
हेडिंब राक्षस पांडवाच्या बलानें पीडित होऊन भयंकर नाद करूं लागला.
असतां भीमसेन त्यास सोडून असें बोलला कीं, अरे स्वरें करून माझे भ्रा
ते निजले आहेत यांस आपल्या शब्दानें त्रास देऊं नको.असें परस्पर आपल्या
बलें करून एकमेकांस ओढीत असतां त्यांच्या महान शब्दें करून युधिष्ठिर
प्रभृती पांडव माते सहवर्तमान जागृत होऊन पाहातात तों प्रथम हेडिंबा
स्त्री दृष्टीस पडली. असा विषय या अध्यायांत आहे.

१५४ वा अध्यायः— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, युधिष्ठिर
प्रभृती पांडव जागृत होतांच अग्रभागीं मनुष्य रूपी स्त्रीस पाहून परम वि
स्मित जाहाले.विशेषें करून कुंती विस्मित होऊन तिला बोलली कीं, हे वरवर्णि
नी,स्वर्णा सारखी तुझी कांती दिसते अशी तूं कोण आहेस,कोणाच्या कार्या
स्तव येथें आलीस हें मला सांग.असें कुंतीचें भाषण ऐकून हेडिंबा बोलली
हे मानुषी हें वन माझ्या भ्रात्याचें व माझें राहण्याचें स्थान होय.या राक्षसें
द्राचीं मी भगिनी होय त्याणे तुझ्या पुत्रांची हिंसा करावी ह्मणोन मला पाठवि
ली असतां नूतन स्वर्णासारखा कांतीमान,महा बली असा तुझा पुत्र मीपा
हून काम वश जाहालें आणि तुझ्या पुत्रास मी भर्ता वरला एथून तुझ्या पुत्रास
मी अन्यत्र स्थलीं नेण्या विषयीं यत्न केला असतां त्याणे तो स्वीकृत केला ना
हीं.या कृत्यास बहुत विलंब लागल्या मुळें हा राक्षस स्वतः आपण तुझ्या पुत्रास
मारण्यास आला असतां तुझ्या या बलवान पुत्रानें त्यास आकर्षित केला.ते
उभयतां गर्जना करीत एकमेकांस आकर्षण करितात ते पाहा.असें राक्षसी
चें भाषण ऐकून युधिष्ठिर तत्काल उठला.अर्जुन व नकुल सहदेव हे ही उठून

पाहातात तों एकमेक एकमेकांस जयाच्या इच्छेनें आकर्षण करितात. असें दृष्टीस पडलें. या प्रसंगीं राक्षसानें भीमास अगदीं जरजर केला हें अर्जुनानें पाहून तो हास्य करीत बोलला कीं, हे महाबाहू भीमसेना, भिऊंनको, आह्मीस वें जागृत जाहालों, तुला राक्षसानें फार त्रास दिला आहे यास्तव मी तुझ्या साहाय्यार्थ येतों नकुल सहदेव मातेचें संरक्षण करितील. असें अर्जुनाचें भाषण ऐकून भीमसेन बोलला कीं, हे अर्जुना बरा करंनको स्वस्थ बसून मीं काय करितों तें पाहा. असें भीमसेनाचें भाषण ऐकून अर्जुन बोलला कीं, हे भीमसेना, आपल्यास येथून पुढें लौकर जावयाचें आहे यास्तव यास लौकर मारण्याचा यत्न कर. असें अर्जुनानें भाषण केल्यावर भीमसेन रुष्ट होऊन त्या राक्षसास पृथ्वी पासून उचलून त्यास बोलला कीं, अरे दुष्टा मांस भक्षण करून व्यर्थ पुष्ट जाहालास; बरें मी तुला मारतों असें समजूनको, सर्वांचें आजमी कल्याण करितों. असें भीमसेनानें भाषण केल्यावर अर्जुन बोलला कीं, हे भीमा युद्धांत या राक्षसाचा वध करण्यास तुला कठिण वाटत असल्यास तुझें साहाय्य करण्यास मी सत्वर येतों नाहींतर तूं तरी याचा सत्वर नाश कर. असें अर्जुनाचें भाषण ऐकून भीमसेनानें राक्षसास मंडळाकार फिरविला आणि भूमीवर हापटून पशू सारखा मारला, त्याकाळीं त्या राक्षसानें महान भयंकर नाद केला. नंतर भीमसेनानें त्यास आपल्या बाहु मध्य प्रदेशीं धरून भग्न केला. हें अघटीत कृत्य पाहून सकल पांडवांनीं त्याची पूजा केली. नंतर अर्जुन वृकोदरास बोलला कीं, हे विभो आतां येथून नगर जवळ आहे यास्तव जेणेकरून सुयोधन आपल्यास न जाणील अशारीतीनें त्या नगरांत जाऊं. असें भाषण करून पांडव, माता व हेडिंबी राक्षसी सहवर्तमान निघाले. असा विषय या अध्यायांत आहे.

१५५ वा अध्याय.— भीमसेन मार्गांत हेडिंबीस बोलला कीं, हे हेडिंबी ज्या मार्गानें तुझा भ्राता गेला त्या मार्गाचा तूं आश्रय कर. असें भीमसेनाचें भाषण ऐकून धर्मराज बोलला कीं, हे पुरुषश्रेष्ठ भीमा, जरीं तुला क्रोध आला आहे तथापि स्त्रियांचा वध करूंनको. असें धर्मराजानें भाषण केल्यावर हेडिंबी राक्षसी हात जोडून कुंतीव धर्मराज यांस बोलली कीं, हे आर्य कुंती, विषय संब

धी जें दुःख, तें आज मला तुझा भीमसेनास पाहून झालें आहे. कांहीं काल मनी क्षा करून त्या दुःखाचें मी सहन केलें, परंतु फलाचा काल आतां आला आहे. या भीमसेनाकरितां मी आपल्या सुहृदांचा व स्वजनांचा त्याग केला आणि तुझा पुत्र मी वरिला, आतां यासमयीं तूं व तुझा पुत्रानें माझें प्रत्याख्यान करूं नये, जर कराल तर मि जिवंत राहाणार नाहीं, आपल्या पृष्ठभागीं तुह्मांस धारण करून पाहिजे ते थें नेईन, तुह्मी सर्वांनीं माझ्यावर कृपा करून भीमसेन माझा अंगिकार करील असें करा. असें हिडिंबीचें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलला हे कमध्यमे, जें तूं भाषण केलेंस तें सत्य आहे बोलल्या प्रमाणें सत्यानें राहा, आतां स्नान करून आन्हीक- क्रिया असेल ती कर आणि परम कौतुकानें मंगल पूर्वक रवि अस्ताचलीं जाण्याचे पूर्वी भीमसेनास तूं वर. भीमसेनासह वर्तमान तूं दिवसास यथेच्छ विहार करीत जा रात्रीचे ठायीं विहार करून को रात्र जाहाली ह्मणजे भीमसेनास आमचे स्वा- धीन करीत जा. असें धर्मराजानें भाषण केल्यावर तिणेत्या भाषणाचा अंगिकार केला असतां भीमसेन बोलला कीं, हे राक्षसी, माझी एक प्रतिज्ञा आहे ती सांग तों, जों काल पर्यंत तुला पुत्र उत्पन्न जाहाला नाहीं तों काल पर्यंत मी तुझाशीं रत होईन अशा प्रतिज्ञेचा राक्षसीनें अंगिकार केला आणि तत्काल भीमसेनास घेऊन उर्ध्वभागीं गेली नंतर सर्वाभरण भूषित उत्तम प्रकारचें रूप धारण करून पर्वत श्रृंगे, देवांचीं स्थानें, सर्व ऋतूंच्या ठायीं उत्पन्न होणारीं फलें जेथें होतात अ- शीं सरोवरें यांचे ठायीं रमणीय रूप धरून हिडिंबी राक्षसी भीमसेना सह वर्त मान रत होत असतां तिचे ठायीं भीमसेनापासून महाबलि, महान जाचें धनु ष्य, शत्रूंचा नाश करणारा, मनुष्या पासून उत्पन्न जाहालेला, पिशाच व राक्षस यांचेहि अतिक्रम करून राहणारा असा पुत्र जाहाला. तो बाल असतांच तरुणा सारखा दिसूं लागला तो सर्वास्त्रां मध्यें महा प्रविण होता. राक्षसी जातींतील- स्त्रियांस गर्भधारण तत्काल होतें व प्रसूतही तत्काल होतात. नाना प्रकारचीं इ च्छीत रूपें त्यांस धारण करण्याची शक्ती असते ह्मणोन ही राक्षसी भीमापासू न तत्काल गर्भिणी होऊन तेच क्षणी प्रसूत जाहाली. हा बाल उत्पन्न होतांच- त्यानें आपल्या मातापितरांस नमस्कार केला. या बालकाचे मस्तकास केश न वते व घटासारिखी मस्तकाची आकृती होती ह्मणोन मातापितरांनीं त्याचें नाव

घटोत्कच असें ठेविलें तो बाळ निरंतर पांडवांस मोठा अनुरक्त होऊन त्यांस तो अतिप्रिय जाहला. नंतर हिडिंबी पांडवांस बोलली कीं, तुमच्या प्रतिज्ञे प्रमाणे जाहालें आतां मला जाण्या विषयीं आज्ञा असावी, असें ह्मणोन ती आपले स्थानीं गेली. नंतर घटोत्कचानें हो पृथे सहवर्तमान पांडवांस नमस्कार करून असें भाषण केलें कीं, तुमचें कायकार्य मी करूं तें निःशंकपणे मला सांगा. त्या काळीं कुंतीनें भाषण केलें कीं, तूं या पांच जणाचें निरंतर साह्य करीत जा. असें पृथेचें भाषण ऐकून घटोत्कच बोलला कीं, हे पृथे आमच्या पितरांचें कांहीं कार्य उपस्थित होईल तेव्हां मी त्यांच्या संन्निधच आहें, आतां मी जातों असें ह्मणोन तो गेला. हा घटोत्कच उत्पन्न होण्याचें कारण असें कीं, अप्रतीम वीर्य असा कर्णाचा हे त्याची अमोघ शक्ती कोणी धारण करण्यास समर्थ नाहीं ह्मणोन इंद्रानें प्रतियोद्धा या महारथ्यास उत्पन्न केला. असा विषय या अध्यायांत आहे.

१५६ वा अध्याय:- वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, महारथी पांडव वनामध्यें मृगाचें हनन करीत करीत जटावल्कलें व अजिनें धारण करून तापस वेषानें कुंती सहवर्तमान अरंण्यांत फिरूं लागले, मुखानें वेद वेदांगाचें पठण करीत जात असतां द्वैपायन व्यासास पाहून माते सहवर्तमान हात जोडून त्याचे अग्रभागीं उभे राहिले. त्या काळीं व्यास बोलले कीं, हे भरतश्रेष्ठ हो, धृतराष्ट्र पुत्र तुह्मास आपले नगरांतून घालवून देणार हें दुःख तुह्मास होण्याचे पूर्वींच येथें मी तुमच्या भेटीस आलों. तुमचें परम हित करावें अशी माझी इच्छा आहे, तुह्मास हें दुःख जाहलें ह्मणोन विषाद मानूं नका. या पासून पुढें तुह्मास सुख होईल. आतां जवळच एक रमणीय नगर आहे त्यांत तुह्मीं गुप्त रूपानें माझी आकांक्षा करीत राहा. असें पांडवांस अश्वासन देऊन पुनः कुंतीस बोलले कीं, हे पुत्री, तुझा हा धर्मराजा पुरुषां मध्यें श्रेष्ठ व महात्मा आहे हा सकल पृथ्वी वरील राजांचें शासन करून धर्मानें राज्य करील. भीम आणि अर्जुन यांच्या साहाय्यें करून हा मोठमोठीं कृत्यें करील. स्वराष्ट्राच्या ठायीं तुझे पुत्र व माद्रीचे पुत्र सुखें करून विहार करतील. सकल पृथ्वी जिंकून बहुत दक्षणायुक्त असे राजसूय व अश्वमेधादि याग करतील. असें व्यासानें भाषण केल्यावर पांडव, ब्राह्मण गृहीं वास करण्यास उद्युक्त जाहले असतां पुनः द्वैपाय

न व्यास बोलले कीं, हे पांडव हो माझ्या आगमनाची मार्गप्रतीक्षा तुह्मीं तेथें करा. असें व्यासानीं भाषण करितांच सकल पांडवानीं अंजली पुट जोडून तथास्तु असें भाषण केल्यावर व्यास तेथून स्वस्थानीं गेले. असा विषय या अध्या आहे.

१५७ वा अध्याय.— जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायन ऋषे, पांडव एकचक्रा नगरींत गेल्या नंतर पुढें तेथें त्याणीं काय केलें तें मला सांग. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, पांडव एकचक्रानगरींत ब्राह्मणाचे गृहीं राहत असतां ते गुण व सौंदर्य करून नगर निवासी लोकांस प्रिय असत-भिक्षे करितां ग्रामांत फिरून जी भिक्षा मिळेल ती रात्रीं कुंतीच्या स्वाधीन करीत जें अन्न मिळेल त्यांतून अर्धें अन्न कुंतीव चार बंधुनीं भोजन करावें, अर्धें अन्न भीमानें भक्षण करावें. याप्रकारें पांडव एकचक्रा नगरींत राहात असतां कोणे एके समयीं सकल पांडव भिक्षे करितां बाहेर गेले. तेव्हां भीमसेन आणि कुंती गृहीं होती तों इतक्यांत त्या ब्राह्मणाचे गृहीं मोठा दुःखकारक व घोर असा एकाएकीं शब्द होऊं लागला, तो ऐकतांच कुंती भीमास बोलली कीं, हे पुत्रा, धृतराष्ट्र पुत्राच्या भयानें आपण येथें गुप्तपणें राहिल्यामुळें आपल्यास बहुत-सुख आहे तेव्हां ज्याच्या गृहीं आपण सुखानें वास केला त्याचें जें प्रिय असेल तें आपण करीत असावें. तेव्हां सांप्रत काळीं या ब्राह्मणास कांहीं एक मोठें दुःख झालें आहे असें वाटतें. त्याजपेक्षां जितकें आपल्या कडून त्याचें साह्य होईल-तितकें करावें. असें मातेनें भाषण ऐकून भीमसेन बोलतो हे माते, ब्राह्मणास-काय दुःख जाहालें आहे त्याचा शोधकर ह्मणजे त्याचें दुःख दूर करीन. अशीं भीमसेन कुंती यांचीं भाषणे चाललीं आहेत तों भार्येसहवर्तमान त्या विप्राने पुनः आक्रोश केला असतां तो ऐकून कुंती त्या ब्राह्मणाच्या अंतःपुरांत गेली तों ब्राह्मण व त्याची स्त्री पुत्र आणि दुहिता हीं च्यार मनुष्यें अधोमुख केलेलीं बसलीं असून ब्राह्मण आपले स्त्रीस बोलत आहे कीं, हे स्त्रिये, या लोकीं फार दिवस वांचणें केवळ दुःखाचें मूळ आहे. जिवंत राहिलें असतां बहुत दुःखें सोसावीं लागतात. कोणी ह्मणतात सर्वांमध्यें मोक्ष श्रेष्ठ आहे परंतु तो तर कोठें दिसत नाहीं. अर्थप्राप्ती केली असतां केवळ नरकच प्राप्त केला असें समजावें. हे प्रिये आपल्यास जी भरस्तत आपत्ती आली आहे तिचा नाश होण्या विष-

यीं कांहीं यत्न दिसत नाहीं. तुलातर मी पूर्वींच ह्मणत होतों कीं, या स्थलाचा-
त्याग करून दुसरे कोठेंतरीं राहूं. परंतु तें माझें भाषण न ऐकून असें बोललीस
कीं, मी या ग्रामांत उत्पन्न होऊन मोठी या ग्रामांतच जाहालें, माझा ही पिता याच-
ग्रामांत जन्मला परंतु हे दुर्मती, तूं असा विचार करकीं, ज्या ठिकाणी आपला-
पिता, माता व बंधु हीं मरण पावलीं त्याठिकाणीं राहण्याची मति चांगली का?
तुला बंधूंचा लोभ सुटला होता ह्मणोन माझें भाषण ऐकिलें नाहींस. तस्मात्
प्रस्तुत बंधुनाशच आला आहे तो आज मला फार दुःख देतो याचा विचार कर
आतां याकाळीं माझाच नाश जाहाला तरीं चिंता नाहीं परंतु दुसऱ्याचा घात होऊन
आपण जिवंत राहावें या सारखें घातुक कर्म दुसरें कोणतें नाहीं हे स्त्रिये तूं तर
माझी सह धर्म चारी, इंद्रिय निग्रह करणारी, गाई सारखी पवित्र आहेस, स्त्री हाए
क देवानें दिलेला मित्र होय स्त्रियांच्यायोगें पुरुषास परमगती प्राप्त होत्ये. त्या
पेक्षां अशा भार्येचा त्याग करून मी जिवंत कसें राहावें. बरें हा सुतही त्याग क
रण्यास योग्य नाहीं हा अद्याप बाल आहे, तशीच ही दुहिता ब्रह्मदेवानें भर्त्या
करितां केवल न्यासभूत उत्पन्न केली आहे, इजपासून पुढें जो पुत्र होईल तो आ
पला दौहित्रच तेव्हां तिचा त्याग आपण करण्यास समर्थ नाहीं. कोणी असें ह्मण-
तात कीं, पित्याची प्रीति पुत्रावर अधिक असत्ये. कोणी ह्मणतात कीं, कन्येवर अ
धिक असत्ये माझीतर उभयतांवर समान प्रीती आहे, तशांत ही बाला पापरहि
त जीच्या प्रसूती मात्रें करून आपल्यास अत्यंत सुख होणार तिचा मि क —
सा त्याग करूं तेव्हां मी आतां आपल्या आत्म्याचा त्याग करून परलोकीं जातों.
असो सर्व आपण एक कालींच मरण पाऊं यांत कल्याण आहे परंतु मी एक-
ट्यानें जिवंत राहाणें हें क्षेमदायक नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१५८ वा अध्याय.— ब्राह्मणी बोलत्ये हे पती, संतापाचा हा काल न
व्हे तशांतून तूं ज्ञानवान् आहेस अवश्य जें होणें त्याविषयीं संताप करू नये
भार्या, पुत्र, दुहिता हीं सर्व आपले हिता करितां आहेत यास्तव ज्या कारणानें-
तुला व्यथा उत्पन्न जाहाली त्या कारणाचा मी स्वीकार करत्यें. भर्त्या करितां प्रा
णाचा त्याग करणें हाच स्त्रियांचा सनातन धर्म होय. हें कर्म मी केलें असतां तु
लाही सुख होईल. या लोकीं व परलोकीं मला हेंच कर्म अक्षय्य श्रेयस्कर-

आहे तस्मात् मी आतां सांगतें हाचमोठा धर्म आणि तुह्माही अर्थधर्म यांत च आहे. ज्या करितां भार्या करावी तोच काल आज उपस्थित जाहाला. मलाए क पुत्र व कन्या जाहाली आहे त्या पेक्षां मीकरणी नाहीं तूं जिवंत राहिला अस सतां कन्या व पुत्र यांच्या पोषणा विषयीं समर्थ आहेस, तशी मी जिवंत राहिलें असतां याचें पोषण करण्याविषयीं समर्थ नाहीं. स्त्रियांस दुसरापती करण्या ची योग्यता नसल्यामुळें भर्तृ मरणोतर त्या स्त्रिया धर्मापासून भ्रष्ट होतात- हीं सर्वकारणें जाणोन आत्मत्याग करूंनको; तूं आत्म्याचें रक्षण करून कुला स कारणी भूत जे हे बाल यांचें रक्षण कर. याप्रकारें ब्राह्मणस्त्रीनें भर्त्यासह व र्तमान भाषण करून त्यास आलिंगन देतांच ब्राह्मण ही नेत्रांतून मंदमंद अश्रु पात करीत दुःखित जाहाला. असा विषय या अध्यायांत आहे.

१५९ वा अध्यायः– वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, ब्राह्मणव ब्राह्मण स्त्री उभयतां दुःखित होऊन संभाषण करीत आहेत तें कन्येनें ऐकून ती अत्यंत दुःखानें बोलली कीं, हे मातापितरहो, तुह्मीं दुःखित होऊन अना- थासारखे कां रोदन करितां; आतां इत उत्तर जें काय कर्तव्य त्याविषयीं मीजें बोलतें तें ऐका. धर्म करून तुह्मी तरी माझा त्याग करणारच त्याजपेक्षां याचका कीं माझा त्याग करून तुह्मी आपलें रक्षण करा. अशीं नाना प्रकारचीं भाषणें ऐकून पिता, माता व कन्या हीं त्रिवर्ग दुःखीत होऊन रोदन करितात हें पुत्रानें ऐकून तो बाल उत्फुल्ल नयन झालेला हातांत एकगवताची काडी घेऊन मधु र वाणीनें मातापितरांस बोलला. तुह्मीं रोदन करूंनका. असें ह्मणोन हांस्य करीत बोलला कीं, हे मातापितर हो, जो राक्षस पुरुषास भक्षण करितो त्यास या तृणानें मी मारीन असें भाषण ऐकून त्या सर्वांस मोठा आनंद जा हाला. त्या काळीं कुंतीनें हे जिवंत असतां मृता सारखे जाहालेले पाहून आतां यांस दुःखाचें कारण विचारण्याचा समय आहे असें जाणोन ती त्यांच्या सन्नि ध जाऊन बोलली. असा विषय या अध्यायांत आहे.

१६० वा अध्यायः– कुंती बोलते हे ब्राह्मणा तुह्मास कोठून काय दुः ख जाहालें ते मला सांगा. तें दुःख परिहार होण्या सारखें असल्यास आ- ह्मी त्या विषयीं यत्न करूं असें भाषण ऐकून ब्राह्मण बोलतो हे तपोधने, थो-

राचा धर्मच आहे कीं दुसऱ्यास कांहीं दुःख जाहाल्यास त्याचें निवारण करावें. परंतु आमचें दुःख मनुष्यानें दूर करण्यास शक्य नाहीं, त्याचें कारण सांगतों. या नगराचे सन्निध एक बकनामक राक्षस राहातो तो या देशाचा स्वामी होय तो महा बलवान आहे तो मनुष्याचीं मांसें भक्षण करून पुष्ट जाहाला आहे, त्याणे च या देशाचें व नगराचें रक्षण केलें आहे राक्षसाचें सैन्यही त्याजवळ बहुत आहे, ह्मणोन परचक्राचें भय आह्मास कधीं येत नाहीं. त्या बकासुरानें या ग्रामावर असा कर बसविला आहे कीं, सर्व लोकांनीं आपले पाळी प्रमाणे प्रतिदिवशीं वीस खंडी तांदुळाचा भात, एकमहिष आणि एक मनुष्य भोजनास देत जावें, तेव्हां बहुत दिवसानीं आजरोजीं आमच्यावर मनुष्याची पाळी आली आहे. बरें कदाचित् कोणी पुरुष मनुष्याची क्षमा मागण्यास गेला असतां पुत्रदारा सहवर्तमान त्या पुरुषाचें भक्षण करितो; परंतु काय करावें कांहीं उपाय चालत नाहीं. आज आमच्यावर पाळी आली, एक पुरुष भोजना करितां दिला पाहिजे बरें दुसरा एखादा पुरुष विकत घेऊन राक्षसास द्यावा तर मी गरिब, मजपाशीं धन नाहीं. कोणी नरी स्वहृद्जन द्यावा तर तो मी देण्यास इच्छित नाहीं. या विषयीं दुसरी कांहीं युक्ती मी पाहातों तीही मला सुचत नाहीं अशा कारणानें मी महान दुःखांत निमग्न जाहलों आहें तेव्हां आतां असा निश्चय केला आहे कीं, आह्मीं सर्वांनीच तेथें जावें ह्मणजे तो दुष्ट आह्मा सर्वांचें भक्षण करील. असा विषय या अध्यायांत आहे.

१६१ वा अध्याय.—कुंती बोलत्ये हे विप्रा, जें तूं भय सांगितलेंस या भया पासून विषाद पावूं नको राक्षसा पासून मुक्त होण्याचा एक उपाय आहे तो सांगत्यें, तुला एकच पुत्र व कन्या ही एकच आहे तेव्हां यांचें यत्नें तूं रक्षण कर. मला पांच पुत्र आहेत त्यापेक्षां त्या राक्षसास तुझ्या करितां मी एक पुत्र देत्यें. असें कुंतीनें भाषण ऐकून ब्राह्मण बोलतो हे ब्राह्मणी, मी असें कर्म करण्यास योग्य नाहीं. अतिथी तुह्मीं ब्राह्मण माझे गृहीं आलां त्या तुह्मास मी आपल्या प्राणा करितां वाईट करूं काय, हें तूं जें भाषण केलेंस तें केवळ अकुलिनाचें आणि अधर्मिष्ठाचें होय. तशांतून मी आ

पण आपला वध करितों असें नाहीं दुसरा माझा वध करणार त्या पेक्षांमला पा तकच नाहीं. भार्येसहवर्तमान जरी माझा वध जाहाला तथापि चिंता नाहीं परंतु ब्राह्मणाच्या वधाविषयीं कधीं मी इच्छिणार नाहीं. असें ब्राह्मणाचें भाषण ऐकून कुंती बोलल्ये हे ब्राह्मणा माझेंही मत असेंच आहे कीं, कोणच्याही प्रकारें ब्राह्मणाचें रक्षण करावें. माझा पुत्र आहे तो राक्षसाचा नाश करण्या विषयी समर्थ आहे. तो राक्षसास चांगलें भोजन देऊन आपली मुक्तता करील. पूर्वी बलवान राक्षसांशीं याचा समागम जाहाला होता, त्यांत अनेक राक्षस त्यानें मारले आहेत. हे विप्रा माझे पुत्र तुझे विद्यार्थी, तूं आग्रह केला असतां माझे पुत्र कायन करितील. असें पृथेनें भाषण ऐकून तो विप्र भार्येसहवर्तमान अतिसंतुष्ट होऊन त्यानें कुंतीचे भाषणाचा सत्कार केला. नंतर कुंती व तो ब्राह्मण याउभयतांनीं भीमासन्निध जाऊन त्यास सकल वृत्तांत सांगितला असतां भीमानें भाषणाचा अंगिकार केला. असा विषय या अध्यायांत आहे.

१६२ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कुंतीचे भाषणा प्रमाणें भीमसेनानें प्रतिज्ञा केल्या नंतर सकल पांडव भिक्षा घेऊन आल्यावर युधिष्ठिरानें भीमाचा आकार कांहीं एक निराळाच पाहून एकांतीं तो आपल्या मातेस बोलला कीं, हे माते, हा पराक्रमी भीमसेन काय कर्म करण्यास इच्छितो, तुझ्या अनुमतानेच अथवा स्वतः हें कर्म करण्यास तो उद्युक्त जाहाला आहे. असें धर्मराजाचें भाषण ऐकून कुंती बोलली हे युधिष्ठिरा माझाच भाषणावरून भीमसेन हें कृत्य करण्यास उद्युक्त जाहाला आहे. हें महत कृत्य ब्राह्मणा करितां आहे. सकल नगराचें ही त्यामध्यें कल्याण होईल. असें कुंतीचें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलला कीं, हे माते हें काय तूं साहास कर्म करण्या विषयीं भीमास योजिलेंस, पुत्राचा त्याग करण्याची प्रशंसा साधु करीत नाहींत, दुसऱ्याच्या पुत्रा करितां आपल्या पुत्राचा त्याग करण्याची कशी इच्छा करतेस जा भीमसेनाच्या बाहुबलाश्रयें करून आह्मी सुखानें निद्रा करितों, जा दुष्टांनी आमचें राज्य हरण केलें तें राज्य पुनः त्यांजपासून हरण करण्याची इच्छा तरीं भीमाच्या बलानेच करितों, अशा भीमसेनाचा त्याग करण्या विषयीं तुझ्या बुद्धीचा कसा निश्चय जाहाला. असें धर्मराजाचें भाषण ऐकून कुंती बोल

ली कीं, हे युधिष्ठिरा, वृकोदराविषयीं तूं इतका संताप करूं नको. अरे पुत्रा, आज पर्यंत या ब्राह्मणाचे गृहीं आपण गुप्तरूपानें स्वस्थ करून वास केला ह्मणोन धृतराष्ट्र पुत्र आपल्यास जाणण्यास समर्थ जाहले नाहींत. या ब्राह्मणानें आपला सत्कार ही चांगला केला. त्याजपेक्षां यावर आपण कांहीं तरी उपकार करणें हें योग्य आहे. भीमसेनाचें बल दहा सहस्त्र गज प्रमाण आहे, याच भीमसेनानें आपल्यास वारणावतांतून बाहेर काढलें, वृकोदरा समान बलानें दुसरा कोणी नाहीं, असें भीमसेनाचें बल मी आपल्या बुद्धीनें जाणोन नंतर ब्राह्मणाच्या कार्या विषयीं योजना केली. हे युधिष्ठिरा, आपण ज्याचे गृहीं राहतो त्याजवर उपकार व धर्म ही जाहाला. जो राजा शरणांगत शूद्र आला असतां त्याची मुक्तता करितो, तो राज्यपूजित व द्रव्यानें समृद्ध अशा कुलाचे ठायीं जन्म घेतो हा धर्म प्रकार पूर्वी भगवान् व्यासानें मला सांगितला आहे, ह्मणोन हें कर्म करण्याची मी इच्छा केली. असा विषय या अध्यायांत आहे.

१६३ वा अध्याय:- युधिष्ठिर बोलतो हे माते, तूं बुद्धि पूर्वक जें भाषण केलेंस तें फार चांगलें आहे, आज तुझा भाषणानें ब्राह्मणाचें त्राण जाहलें. भीमसेन त्या राक्षसाचें हनन करून माघारा येईल. आतां ब्राह्मणास इतकेंच सांग कीं, हें कृत्य नगरवासी लोक जाणणार नाहींत असें कर. ती रात्र अतिक्रांत जाहल्यावर दुसरे दिवशीं भीमसेन अन्न घेऊन ज्या वनांत बकासूर राहात होता तेथें गेला आणि बकासुरास मोठ्या स्वरानें आव्हान करूं लागला असतां भीमसेन अन्न भक्षण करीत आहे असें पाहून नेत्र विस्तीर्ण करून परम क्रोधानें असें बोलला कीं, अरे माझा करितां हें अन्न आणिलें असतां तूं कोण भक्षण करितोस. हे दुर्बुद्धे, तुला यम गृहीं जाण्याची इच्छा झाली काय? असें राक्षसानें भाषण ऐकून भीमसेनानें हास्य केलें. आणि राक्षसाकडे मुख होतें तें फिरवून पुनः भोजनास आरंभ केला. त्या कालीं राक्षसानें मोठा भयंकर नाद करून आपले दोन्ही कर उंच केले आणि भीमसेनास मारण्या करितां त्याचे सन्निध आला, तथापि वृकोदरानें पुनः पुनः भोजनास आरंभ केला. असतां त्याच्या पृष्ठ भागावर राक्षसानें दोन्ही हस्तानें ताडण करून तो उभा राहिला असतां भीमसेनानें पुनः भोजनास आरंभ केला. त्याकालीं

राक्षस एक वृक्ष घेऊन भीमसेनास ताडण करण्यास येत आहे. असें पाहून-भीमसेन पुनः तें अन्न भक्षण करून युद्ध करण्याच्या उद्देशानें राक्षसाचे अग्रभागीं उभा राहिला असतां राक्षसानें भीमसेनावर वृक्षाचा प्रहार केला तो प्रहार भीमानें आपले सव्य हस्तावर सहन केला नंतर भीमानें ही बहुत वृक्षानीं राक्षसास ताडण केलें. त्या काळीं राक्षस हीनमान जाहाला असें भीमसेनानें पाहून नंतर राक्षसाचें वस्त्र धरून दोनवेळ त्यास फिरविला असतां त्याच्या मुखा पासून रुधिराचा स्राव होऊन तो नम्र जाहाला. असा विषय या अध्यायांत आहे.

१६४ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पर्वतराजा सारखा शरीरानें महत्तर असा बकासूर भीमानें भग्न केला असतां त्यानें भयंकर नाद करून प्राणाचा त्याग केला. त्या नादानें राक्षस अनुचर त्रस्त होऊन आपल्या परिवारा सहवर्तमान एका एकीं गृहा पासून भीमाच्या सन्निध आले असतां भीमसेनानें त्यांस असें भाषण केलें कीं, हे राक्षस हो अतःपर तुह्मी मनुष्याची हिंसा कधीं ही करूं नका. जे मनुष्याची हिंसा करतील त्यांस हें असें फळ प्राप्त होतें. असें भीमसेनाचें भाषण ऐकून त्या राक्षसानीं भीमसेना जवळ अशी प्रतिज्ञा केली कीं, तुझ्या भाषणा प्रमाणें अतःपर आह्मी चालूं. त्या दिवसा पासून त्या नगरा मध्यें राक्षस अतिसौम्य जाहाले. नंतर-भीमसेनानें त्या मृत जाहालेल्या बकासुरास घेऊन नगराच्या महाद्वार प्रदेशीं टाकिला असतां बकासुराच्या ज्ञातीय जनानीं भीमसेनाचें हें घोर कृत्य पाहून पलायन केलें. इकडे भीमसेनानें ब्राह्मण गृहीं येऊन जाहालेला सर्व वृत्तांत आपले भ्रात्यांस सांगितला कांहीं वेळानीं नागरीक लोक नगरा बाहेर निघाले असतां रुधिरानें भरलेला असा राक्षस द्वारप्रदेशीं पडलेला पाहून हर्षानें नगरांत आले तसेंच सहस्रावधी नगर निवासी, स्त्रिया, बाल व वृद्ध बकासुरास पाहाण्या करितां जाऊन ह्मणो लागले कीं, हें अमानुष कर्म जाहालें. नंतर सकल नागरिक लोक नगरांतील देवतांचीं पूजनें करून परस्पर-ह्मणों लागले कीं, आज बकासुराचा भोजनाचा दिवस कोणाचा होता, पुढें या ब्राह्मणाचा शोध लावून सर्व नागरिक लोक त्याचे गृहीं आले आणि त्यास प्र-

श्न करूं लागले असतां त्याणें पांडवांचें नाव गुप्त ठेऊन सांगितलें कीं, राक्षसा नें मला येऊन बलिदानाचा निरोप सांगतांच मी कुटुंबासह रोदन करीत बस लों होतों. इतक्यांत माझें रोदन ऐकून कोणी एक मंत्रसिद्ध ब्राह्मण माझ्याज वळ आला आणि दुःखाचें कारण विचारूं लागला असतां त्यास हें वृत्त मी सां गितलें. त्या काळीं ब्राह्मणानें किंचित् हास्य करून सांगितलें कीं, तूं कांहीं भिऊं नको त्या दुरात्म्या राक्षसास मी अन्न नेऊन पोहोंचवितों. नंतर मी सिद्ध केले लें अन्न तो घेऊन बकासुराचे वनांत गेला. त्यानें हें दुष्कर कर्म केलें. हा वृत्तांत ऐ कून नगर निवासी लोक हर्षित जाहाले. इकडे पार्थही ब्राह्मणाचे गृहीं सुख नें राहिले. असा विषय या अध्यायांत आहे.

१६५ वा अध्याय— जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायन ऋषे, पां डवांनीं बकासुराचा वध केल्या नंतर ते पुरुष व्याघ्र एकचक्रा नगरींत काय करूं लागले. तें मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, बकासु राचा वध केल्यानंतर पांडव त्या ब्राह्मणाच्या गृहीं वेदाध्ययन करीत कांहीं दिव स राहात असतां कोणे एके दिवशीं प्रशस्त व्रती एक अतिथी ब्राह्मण फिरतां फिरतां एकचक्रा नगरींत या ब्राह्मणाच्या गृहीं आला. तेथें कुंती सहवर्तमान- सकल पांडव त्याची उत्तम प्रकारें उपासना करीत असतां तो ब्राह्मण नानाप्र कारच्या देशांतील वर्तमानें, तशींच सरोवरें, राजाच्या कथा व पुरांच्या कथा सांगत असतां असें बोलला कीं, पांचाल देशाचे ठायीं याज्ञसेनी नामक द्रु पद राजाची कन्या आहे तिच्या स्वयंवराचा अद्भुत समारंभ चालला आहे. तसेंच धृष्टद्युम्न आणि शिखंडी नामक दोन पुत्र राजास आहेत त्यांची ही उत्पत्ती फार चमत्कारिक आहे. जिचें स्वयंवर होत आहे ती याज्ञसेनी द्रुपदा च्या वंशामध्यें अयोनिज उत्पन्न जाहाली. असें अद्भुत वर्तमान ऐकून पां- डव ब्राह्मणास बोलले कीं, हे महाराज ही कथा आम्हास सविस्तर सांगा. द्रुपदराजाचा पुत्र धृष्टद्युम्न पावका पासून जाहाला व वेदि मध्या पासू- न कृष्णा जाहाली हें अद्भुत आम्हास वाटतें. द्रोणापासून सर्वास्त्रविद्या- धृष्टद्युम्नास कशी मिळाली आणि द्रुपद व द्रोण मित्र असतां ते भिन्न कसे जाहाले याचें कारण काय. असा प्रश्न ऐकून ब्राह्मण पूर्वी द्रौपदीच्या संभ

बानें वर्तमान सांगूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

१६६वा अध्याय:- ब्राह्मण बोलतो हे पुरुषश्रेष्ठहो, पूर्वी भरद्वाज ऋषी गंगाद्वारीं तप करीत असतां कोणे एके दिवशीं गंगेंत स्नान करण्या करितां आला तों पूर्वींच घृताची नामक अप्सरा गंगेंत स्नान करून नदीच्यातीरीं वस्त्र परिधान करीत होती तों इतक्यांत वायूच्या योगें त्या अप्सरेचें वस्त्र उडून गेलें. हें पाहातांच तिचे ठायीं ऋषीचें मनाची आसक्ती उत्पन्न होऊन ऋषी कौमार ब्रह्मचारी असतांही त्या कालीं ऋषीचें रेतस्खलन जाहलें. तें पाहून द्रोण कलश यज्ञपात्र होतें त्यामध्यें तें रेत ऋषीनें धरलें असतां त्यापासून तत्काल द्रोण नामक कुमार उत्पन्न जाहला. पुढें वेदांगासहवर्तमान द्रोणानें विद्याभ्यास केला त्या भारद्वाजाचा सखा पृषत नामक राजा होता त्यास द्रुपदनामक पुत्र झाला. तो भरद्वाजाच्या आश्रमीं निरंतर येत असे. द्रोणासहवर्तमान क्रीडा करी आणि त्याजबरोबर त्याणें अध्ययन केलें. नंतर कांहीं दिवसानीं पृषत राजा मरण पावल्यावर द्रुपद राज्याधिकारी झाला त्यास कांहीं काल अतिक्रांत झाल्यावर जामदग्न्य राम, ब्राह्मणास द्रव्य देतो असें द्रोणानें ऐकून तो द्रव्य यांच्ञेकरितां त्याजकडे गेला. तों राम सर्व द्रव्य दान करून वनामध्यें जाण्यास प्रस्थित जाहले आहेत; अशास भरद्वाज सुतानें पाहून तो बोलला कीं, हे द्विजोत्तमा रामा, तुझा सन्निध मी वित्ताच्या उद्देशानें आलों आहें. असें द्रोणाचें भाषण ऐकून परशुराम बोलला कीं, हे विप्रा, मी ब्राह्मणास सर्वस्व दान केलें. माझें शरीर व हीं वस्त्रें राहिलीं आहेत तर या उभयतां तून काय अपेक्षित आहे तें सांग. असें रामाचें भाषण ऐकून द्रोणाचार्य बोलला कीं, हे रामा, संहारासहवर्तमान अस्त्रें मला दिलीं असतां मी घेतों. असें द्रोणाचें भाषण ऐकून राम बोलला हे भृगुनंदना, फार चांगलें आहे; असें ह्मणोन अस्त्रविद्या परशुरामानें द्रोणास दिली. ती घेऊन द्रोण संतुष्ट जाहला नंतर तेथून द्रोणाचार्य द्रुपदाकडे आल्यानंतर त्यास बोलला कीं, हे राजा, तुझा मी पूर्वींचा अत्यंत सखा आहें. असें द्रोणाचें भाषण ऐकून द्रुपद बोलला कीं, दरिद्री; राजाचा सखा होत नाहीं, तेव्हां हे ब्राह्मणा, पूर्वी तूं माझा सखा होतास ह्मणोन काय भाषण करितोस? असें द्रुपदाचें भाषण ऐकून द्रोण तेथून निघाला आणि जेणें करून त्या द्रुपदाचा नाश होईल असा यत्न करावा

या हेतूनेंच तो कौरवांकडे हस्तनापुरीं आला. तेथें भीष्मानें आपले पौत्र द्रोणाचे शिष्य होण्याकरितां त्याच्या स्वाधीन केले आणि नाना प्रकारचीं बहुत द्रव्यें देऊन द्रोणाचा संतोष केला. नंतर द्रोणानें सकल शिष्यांस एकत्र करून सांगितलें कीं, हे शिष्यहो, तुह्मीं कृतास्त्र जाहालां ह्मणजे माझ्या हृदयांत जें आहे ती गुरुदक्षणा तुम्हीं मला दिलीपाहिजे. त्या कालीं अर्जुन प्रभृतीनीं उत्तर केलें कीं महाराज फारचांगलें आहे. आह्मीं तीच गुरुदक्षणा तुह्मास देऊं. नंतर पांडुवादि प्रभृति सकल शिष्य, अस्त्र विद्यानीं पूर्ण झाले असतां द्रोणाचार्य बोलले कीं, हे शिष्यहो, छत्रवती नगरीचे ठायीं द्रुपदराजा राहातो त्यास तुह्मी बद्ध करून त्या नगरीचें राज्य मला लौकर द्या. असें गुरूचें भाषण ऐकून नंतर पांडुपुत्रानीं द्रुपदास युद्धांत पराजित करून द्रोणाचार्याकडे आणिला. असतां द्रोणाचार्य द्रुपदास बोलला कीं, हे राजा, तुझ्याशीं सख्य असावें हीच प्रार्थना करितों; परंतु अराजाचें आणि राजाचें सख्य होत नाहीं यास्तव भागीरथीच्या दक्षिण तीरीं तूं राज्यकर. मी भागीरथीच्या उत्तर तीरीं राज्य करितों. याप्रकारें, द्रोणाचार्य याणें भाषण केलें असतां द्रुपदानें उत्तर केलें कीं, हे भरद्वाज पुत्रा, तूं ह्मणतोस हें फारचांगलें आहे असेंच असो; तुझें कल्याण होईल. माझ्याशीं तुझें सख्य निरंतर असो अशी मी इच्छा करितों. याप्रकारें उभयतांचें सख्य झालें असतां द्रोण आणि पांचाल हे उभयतां आपआपल्या स्थलीं गेले; परंतु द्रोणानें द्रुपदाची जी अप्रतिष्ठा केली त्यामुळें द्रुपद राजा दुर्मनस्क होऊन दिवसें दिवस तो कृश होत चालला. असा विषय या अध्यायांत आहे.

१६७ वा अध्याय— ब्राह्मण बोलतो, द्रुपदास द्रोणाचें कर्म नसहन झाल्यामुळें पुढें कर्मसिद्ध ब्राह्मण जेथें राहात होते तेथें तेथें तो जाऊं लागला. मला कोणच्या प्रकारें श्रेष्ठ आपत्य होईल, असें वारंवार चिंतन करून शोककरी. कोणच्याही प्रकारें द्रोणाचा नाश करावा असें चिंतन करीत गंगेच्या तीरीं यमुनेचे आसमंतात फिरूं लागला. तेथें ब्राह्मणाचे आश्रम बहुत पाहातां पाहातां शंसित व्रती, संहिताध्ययना विषयीं तत्पर काश्यप गोत्राचे असे याज आणि उपयाज नामक उभयतां बंधु वनांत तप करीत होते. त्यांस पाहू

नराजानें निश्चय केला कीं, हे ऋषी मोठे श्रेष्ठ तपस्वी आहेत; तेव्हां आपल्याला जो विचार कर्तव्य आहे तो यांस सांगावा. नंतर त्या उभयतांत उपयाज कनिष्ठ होता त्याच्या सन्निध राजा येऊन असें बोलला कीं, हे ब्राह्मणा द्रोणाचार्याचा प्राण घेणारा असा पुत्र मला कोणत्या योगानें होईल तो याग मला सांगा. अर्बुद गाई तुह्मास मी देईन. असें द्रुपदाचें भाषण ऐकून ऋषीनें उत्तर केलें कीं, मी उपाय तुला कांहीं सांगत नाहीं. असें जरी ऋषीनें उत्तर दिलें तथापि द्रुपदराजा पुनः ऋषीची सेवा करूं लागला. कांहीं दिवसानीं उपयाज ऋषी मधुर वाणीनें द्रुपदास बोलला कीं, हे राजा, माझा ज्येष्ठ भ्राता याजनामक आहे तो निरंतर दुसऱ्याचे गृहीं जाऊन निरलज्जा सारखा अन्नाच्या गुणाचें कीर्तन करितो. तो माझा भ्राता लोभी आहे असें मी तर्कानें जाणलें, त्या पेक्षां त्याजकडे तूं जा ह्मणजे तुझ्या इच्छे प्रमाणे तो कांहींतरी तुज करितां याग करील. असें ऋषीचें भाषण ऐकून राजा याजनामक ऋषीच्या आश्रमीं गेला आणि ऋषीची पूजा करून बोलला कीं, हे ऋषे आठ अयुत गाई तुज भेटी करितां मी देईन; परंतु माझा करितां कांहींतरी याग कर. द्रोणाचार्याच्या वैरानें मी संतप्त जालों आहें तर आतां युद्धामध्यें द्रोणाचा नाश करणारा असा पुत्र मला प्राप्त होईल असा कांहीं याग करा. त्यामध्यें अर्बुद गाई तुह्मास मी दक्षणा देईन. असें द्रुपद राजाचें भाषण ऐकून याज नामक ऋषी बोलला कीं, फार चांगलें आहे तुझ्या इच्छे प्रमाणें मी याग करितों असें ह्मणोन या महत्कार्या विषयीं कोणचा याग करावा याचा मनांत विचार करून उपयाज नामक आपल्या कनिष्ठ बंधू कडे गेला आणि द्रोण विनाशार्थ पुत्र प्राप्ती याग कोणाचा करावा ह्मणून बंधूस प्रश्न केला असतां उपयाजानें जो याग कर्तव्य तो सांगितला. नंतर याजानें द्रुपदास सांगितलें कीं, हे राजा, महाबलि भारद्वाजाचा हंता असा पुत्र होण्या जोगा याग सिद्ध केला आहे तो करण्यास आरंभ कर. असें ऋषीचें भाषण ऐकून द्रुपद राजानें तो याग करण्यास आरंभ केला असतां त्या यागाचे समाप्तीचे दिवशीं याजनामक ऋषी द्रुपदराजाच्या स्त्रीस बोलला कीं, हे पृषतस्नुषे, लौकर माझा सन्निध ये कन्या आणि पुत्र तुला मिळण्याचा समय आला आहे. असें ऋषीचें भाषण ऐकू

न स्त्री बोलली कीं, हे ऋषे, माझें मुख लाला दिकें करून अवलिप्त जालें आ
हे तेव्हां उत्तम प्रकार चें स्वच्छ स्नान करून ऋतु प्राप्ती करितां तुझा सन्निध
येत्यें, तावत् पर्यंत माझें प्रिय होण्या करितां अवकाश कर, असें भाषण ऐकू
न ऋषी बोलला कीं, हे राज स्त्रि ये, या यज्ञांतील पक्क जालेलें हव्य, उपया-
ज ऋषीनें अभिमंत्रित केलें आहे, तें अर्पित द्रव्य किती काल पर्यंत आह्मी-
ठेवावें, तूं इकडे ये अथवा तेथेंच उभी राहा आमच्या प्रयोगविधीस विलं
ब सहन होत नाहीं असें ह्मणून तें अभिमंत्रित द्रव्य अग्नीमध्यें टाकिलें अ-
सतां अग्नी पासून देवा सारखा ज्वाला वर्ण, किरीट आणि कवच धारण के-
लेला असा कुमार रथारूढ होऊन सन्मुख आला. त्यास पाहून सकल पां
चाल साधुसाधु असा मोठा शब्द करूं लागले. पुत्राचें तेज पृथ्वीसही सह
न जालें नाहीं आकाशांत खेचर असें बोलूं लागले कीं, हा राजपुत्र द्रोणा
चा वध करण्या करितां झाला आहे, तशीच वेदि मध्या पासून कुमारी सु
भगा उत्तम आणि पुष्ट जिचे पयोधर पांचालि नामक कन्या मनुष्याचा देह
धरून साक्षात् अमरस्त्रीच अशी उत्पन्न झाली. जिच्या रूपाला या पृथ्वी
वर कोणाचीच उपमा नाहीं. देव, दानव, यक्ष यांस अत्यंत ईप्सीत, साक्षात् दे
व रूपिणी अशी सुश्रोणी कन्या उत्पन्न होतांच आकाश वाणी झाली-
कीं, ही कृष्णा सकल स्त्रियांमध्यें श्रेष्ठ होय, इच्या मुळें सकल क्षत्रियांचा
क्षय होईल, यथा कालीं ही स्त्री देवाचें कार्य करील. अशी आकाश वाणी ऐ
कून सर्व पांचाल सिंहा सारखा नाद करूं लागले. या प्रकारें पुत्र आणि कन्या
झालेली द्रुपदराजाच्या भार्येनें पाहून ती याज नामक ऋषीस बोलली कीं,
हे ऋषे, मी सुतार्थिनी आहें यास्तव हा पुत्र आणि ही कन्या मलाच जननी
असें ह्मणोत. ऋषीनीं उत्तर केलें कीं, तुलाच ते आपली माता असें ह्मण-
तील. नंतर सकल ऋषींनीं विचार केला कीं, हा पुत्र मोठा धृष्ट ह्मणजे प्रग
ल्भ दिसतो. द्युम्न ह्मणजे राजाचें जें बल तेंही यांत आहे त्या पेक्षां याचें-
धृष्टद्युम्न असें नाव प्रख्यात होईल आणि ही कन्या कृष्ण वर्ण आहे त्यापे
क्षां इचें नाव कृष्णा योग्य आहे, नंतर द्रोणानें या पुत्रास अस्त्रविद्या शिक्षि
त केली. कारण आपण यास अस्त्र विद्या सांगितली नसती तर द्रोण भया

भीत झाला अशा अपकीर्ती जाहली असती. असा विषय या अ० आहे.

१६८ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, अशी कथा कुंती पुत्रानीं ऐकून ते अस्वस्थ मनस्क जाहले. हें पाहून कुंती धर्मास बोलली कीं, हे युधिष्ठिरा, पहिल्या प्रमाणें भिक्षा येथें आतां मिळत नाहीं तर पांचाल देशीं जावें असें वाटतें, तो देश फार चांगला सुभिक्ष आहे असें ऐकिलें. यास्तव हे पुत्रा, तुझ्या मनांत कसें येतें तें सांग. असें कुंतीचें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलला कीं, हे माते, जें तुला मान्य आहे यांत आमचें हित आहे, परंतु हे माझे कनिष्ठ बंधु आहेत यांचे मनांत काय आहे तें समजत नाहीं. असें धर्मराजाचें भाषण ऐकून नंतर कुंतीनें भीमसेन, अर्जून, नकूल व सहदेव यांस विचारलें असतां त्यांणी ही अनुमोदन दिलें, त्याकाळीं पुत्रांसह वर्तमान कुंतीनें त्या ब्राह्मणास हा विचार सांगून द्रुपद नगरीं जाण्याची आपली सिद्धता केली. असा विषय या अध्यायांत आहे.

१६९ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडव एकचक्रा नगरीं मध्यें गुप्तपणें राहात असतां त्यांस पाहाण्या करितां व्यास आले नंतर सकल पांडव त्यास सामोरे गेले आणि प्रांजलिपुट जोडून पुढें उभे राहिले. असतां व्यासानीं सर्वांस बसण्या विषयीं आज्ञा दिली. नंतर व्यास पांडवांस असें बोलले कीं, हे कुंतीपुत्र हो, कोणीएक तपोवनांत माहात्म्या ऋषीची कन्या फार सुंदर होती ती कांहीं कर्माच्या योगें दुर्भगा जाहली ती कन्या अत्यंत रूपवती असतां पती नाहीं असें जाणोन ती महान तप करूं लागली. त्यायोगें महादेव शंकर प्रसन्न होऊन बोलले कीं, हे यशस्विनी, हे भद्रे, तुझा तपाच्या योगें मी फार संतुष्ट झालों आतां वरप्रदान माग. असें शंकराचें भाषण ऐकून कन्या बोलली कीं, हे शंकरा, सर्व गुणानीं युक्त असा पती मला दे. असें भाषण केलें असतां देव असें बोलला कीं, हे भद्रे, तुला पांच पती होतील. असें भाषण ऐकून कन्या बोलली कीं, हे प्रभो, तुझा प्रसादें करून मी एक पतीची इच्छा करितें. पुनः महादेव बोलले कीं पांच वेळ तूं मला पती द्या पती द्या ह्मणोन प्रार्थना केलीस त्यापेक्षां तुला दुसरे जन्मीं पांच पती प्राप्त होतील. नंतर ती कन्या द्रुपद राजाच्या कुळांत उत्पन्न जाहली आहे ती साक्षात् देवरूपिणी आहे असें समजा. ती कन्या तुमची भार्या होणार आहे यास्तव तुह्मीं

पांचाल नगरीं जावें ह्मणजे तुह्मास ती निःसंशय मिळेल, असें व्यासानीं सांगून ते गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१७० वा अध्याय:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, व्यास गेल्यावर पांडव हर्षानें मातेस पुरस्कृत करून निघाले ते उत्तरमुख मार्गानें अर्धरात्रींत भागीरथीच्या तीरीं सोमाश्रयायण नामें तीर्थ आहे तेथें गेले आणि प्रकाशा करितां एक प्रज्वलित काष्ठ धरून महारथी अर्जुन सर्वांचे अग्रभागीं चालला. तों त्या रमणीय गंगेच्या जलामध्यें कोणी एक गंधर्व, स्त्रियां सहवर्तमान जलक्रीडा करण्यास आला होता, त्याणे नदीसन्निध आलेल्या पांडवांचा शब्द ऐकून क्रोधानें आपल्या घोर धनुष्याचें विस्फारण करीत असें बोलला- कीं, अरे पूर्वरात्रीचा जो संध्याकाल तो प्रस्तुत आला आहे, तो मुहूर्त यक्षगंधर्व यांचा कर्मकाल असें सांगितलें आहे. याशिवाय जो अवशिष्ट काल राहिला तो मनुष्याचा कर्मकाल होय. या कालांत जे मनुष्य फिरतील ते बालिश असें समजून त्याचें आह्मीं ग्रहण करितों. बरें तुह्मीं माझ्या सन्निध याकाळीं कशा करितां आलां भागीरथीच्या जलांत मी आलों हें तुह्मास विदित नाहीं कीं काय? अंगारपर्ण नामक महाबलि तो मि, माझें बल तुह्मीं जाणलें नाहींत या वनाचें नाव अंगारपर्ण हें प्रसिद्ध आहे, या स्थळीं गंगा व उत्तम प्रकारचें वन आहे ह्मणोन मी येथें रममाण होतों, येथें राक्षस अथवा अभिचारी प्रयोग करणारे देव अथवा मनुष्य हे कोणी येत नाहींत. असें असतां तुह्मीं कसे आलां, असें गंधर्वाचें भाषण ऐकून अर्जुन बोलला कीं, हे दुर्मते, समुद्र आणि गंगा या उभयतांस रात्रीं, दिवसास आणि संध्याकाळीं स्पर्श करण्यास कोणी निषिद्ध केलें आहे, आह्मी तर शक्तिमंत आहोंत यास्तव अकालींही तुला धरुं. हे क्रूरा जे मनुष्य अशक्त असतील ते युद्धामध्यें तुमची अर्चा करितील आह्मी कधींही भीणार नाहीं. पूर्वी ही गंगा हिमाचलाच्या एक हेम शृंगापासून उत्पन्न जाली ती सप्त प्रवाहानें समुद्रास जाऊन मिळाली, अशी ही गंगा, यमुना प्लक्षजाता सरस्वती, रथस्था, शरयु, गोमती, गंडकी या सात नद्यांचें जल जे प्राशन करितात त्याचें सकल पाप नष्ट होतें. ही गंगा देव गंधर्वां करितां पुनः आकाशगामिनी जाली. तिला आकाशांत अलकनंदा ह्मणतात. तशीच पितृलोकीं वैतर-

णीनामक नदी झाली आहे, जे पाप कर्मे असतील त्यांस वैतरणी उल्लंघन कर ण्यास दुस्तर आहे, ही गंगा स्वर्गास नेणारी, ब्रह्म क्षेम कारी अशी असतां ती-चा अवरोध करण्या विषयीं तूं कशी इच्छा करितोस सकलस्नानद्या भागीरथी चें जल अनिवार्य असल्या मुळें केवल तुझ्याच भाषणा वरून आह्मीं स्पर्श क रूं नये कीं काय; असें अर्जुनाचें भाषण अंगार पर्णानें ऐकून तो क्रुद्ध झाला आणि कार्मुक नम्र करून अशी विष दंष्ट्रा सारखे बाण पांडवांवर सोडूं लागला ते सकल बाण अर्जुन आपल्या हातांतील उल्मुक आणि ढाल यांच्या भ्रम णानें नाशास नेऊन बोलला कीं, हे गंधर्वा जे अस्त्रज्ञ आहेत ते तुझ्या अशा कृत्यास भिणार नाहींत. मानुष, अति मानुष व गंधर्व, या सर्व अस्त्रानें मी जा णतों तर आता दिव्यास्त्रानें युद्ध करूं, माया युद्ध पुरे. हें माझें अग्नेय नामक अस्त्र पूर्वी इंद्रास मान्य जो बृहस्पती याणे भारद्वाज ऋषीस दिलें; भरद्वाजा नीं अग्नी वेश्यांस दिलें; अग्निवेश्यानें माझा गुरु द्रोणाचार्य यास दिलें त्या-द्रोणाचार्यांनें मला दिलें. असें सांगून अर्जुनानें तें अस्त्र गंधर्वावर टाकिलें, त्याच्या योगें गंधर्वाचा रथ दग्ध होऊन तो खालीं पडला असतां अर्जुनानें त्या च्या मान्य युक्त शिरोरुहास धरून भ्रात्या सन्निध आणिला. त्या कालीं गंधर्वा ची भार्या कुंभिनसी नामक होती ती आपल्या पतीचें त्राण करावें या बुद्धीनें युधिष्ठिरास बोलली कीं, हे प्रभो माझ्या पतीची मुक्तता करून माझें त्राण क रा मी कुंभिनसी गंधर्वी, गंधर्वाची भार्या आहें, तुह्मास शरण आल्यें. असें ति चें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलला हे अर्जुना युद्धांत जो जिंकिला, जाला-स्त्रियानीं संरक्षित केला, ज्यास पराक्रम नाहीं तो, इतक्या रिपूंस कोण मारी ल यास्तव हे तात, यांची मुक्तता कर. असें युधिष्ठिराचें भाषण ऐकून अर्जु न बोलतो हे गंधर्वा शोक करूं नको युधिष्ठिर राजा असें ह्मणतो कीं, तुला-आज अभय आहे. असें अर्जुनाचें भाषण ऐकून गंधर्व बोलतो हे अर्जु-ना, माझें आज प्रारब्ध उदयास आलें आहे आज अलभ्य लाभ मला झा ला, जो दिव्यास्त्र धारी तो आज माझा सखा झाला. मला चाक्षुषी नामक विद्या परिज्ञात आहे ही विद्या मनूनें सोमास दिली, सोमानें विश्वावसूस दिली, विश्वावसूनें मला दिली. ही विद्या इतर दुष्ट पुरुषास सांगितली अस-

तां नष्ट होते यास्तव दुष्ट पुरुषास मी सांगत नाहीं, तुला सांगतों. या विद्येचें वी र्य असें आहे कीं, तीन लोकांत जे पदार्थ आहेत ते पाहण्यास आपली इच्छा झाली असतां ते या विद्येच्या योगें दृष्टीस पडतात. एक पदावर साहा महिने त प केलें असतां ही विद्या प्राप्त होत्ये; परंतु तुझ्याकरितां तें साहा मासी कृच्छ्र न मी करून तुला विद्यासमर्पण करितों हे राजा, ही विद्या आह्मास आहे ह्मणून तु ह्मा मनुष्यापेक्षां आह्मी विशेष आहों. आकाशगामी देव आहेत तसे आह्मी- ही आकाशगामी आहोंत हे अर्जुना, गंधर्वजातीचे अश्व फार चांगले आहेत ते तुह्मा प्रत्येकां प्रत शंभर शंभर देतों या अश्वांस देवगंधर्ववाह असें ह्मणतात, यांचे वर्ण दिव्य असून मनासारखा ज्यांचा वेग हे कधीं वृद्ध होत नाहींत. कधीं त रुण होत नाहींत निरंतर मध्यम अवस्थेंत असतात. या अश्वांची उत्पत्ती अशी आहे कीं, पूर्वी वृत्रासुराच्या वधार्थ इंद्रानें वज्र निर्माण केलें होतें तें वज्र इंद्रानें- ज्या कालीं वृत्रासुराचे शिरावर टाकिलें त्या कालीं वज्राचे शत तुकडे झाले. ते तुकडे देवानीं विभागले ते असे कीं, लोकांत यश व धन जास ह्मणतात ही ए क वज्राची तनु जाणावी. ब्राह्मणाचा हस्त हविर द्रव्यप्रद आहे ह्मणून ही एक व ज्राची तनु, क्षत्रियाचा रथही एक वज्राची तनु, दानरूप ही एक वज्र तनु क्षत्रिया चे वज्र रथ ह्मणून सांगितलें तेव्हां रथरूप वज्राच्या उत्कर्षास अश्व कारण आ हेत, जर अश्व चांगले नाहींत तर केवल रथा पासून कार्य किमपी व्हावयाचें नाहीं. यास्तव रथरूप वज्रास साधनीभूत अश्व आहेत त्या पेक्षां क्षत्रियाचें वज्र रथा चे अश्व होत. ते अश्व तुझी कामना पूर्ण करतील. असें गंधर्वाचें भाषण ऐकून- अर्जुन बोलतो हे गंधर्वा तुझ्या जीविता विषयीं तुला संशय आला ह्मणून तूं म ला अश्व देण्यास उद्युक्त जाहालास आणि ही विद्या तरी याच कारणानें देतोस, तर मी घेण्यास इच्छित नाहीं. असें अर्जुनाचें भाषण ऐकून गंधर्व बोलतो हे अ र्जुना, तूं मला जीवित प्रदान केलेंस त्यापेक्षां मला जी विद्या ठाऊक आहे ती- मी तुला देतों. तुझ्या जवळ आग्नेय अस्त्र विद्या आहे ती मी घेईन. असें गंधर्वा चें भाषण ऐकून अर्जुन बोलतो; हे सख्या, फार चांगलें आहे जे तूं मला अश्व देशील ते अश्व मी आपले रथास जोडीन तुझा माझा संयोग झाला आहे हा निरंतर असो. बरें गंधर्वा मी तुला असा प्रश्न करितों कीं, तुह्मापासून भय कोणा

स होतें, भयाचें कारण काय, आह्मी सर्व वेद वत्ते अरीचें मर्दन करणारे असे अ सून तूं आमचें धर्षण करण्यास कसा प्रवृत्त जाहालास याचें तात्पर्य काय, असें अर्जुनाचें भाषण ऐकून गंधर्व बोलतो हे पांडुनंदन हो, तुह्मीं अग्नि रहित असू न आश्रम हीन आहांत आणि ब्राह्मण पुरस्कृत करून आलां नाहींत ह्मणून मी तुह्मास धरण्यास आलों. तुह्मीं कुरु वंशाचे विस्तारक आहांत असें पक्षादि क बोलतात, हे अर्जुना, नारद प्रभृति देव ऋषीच्या मुखा पासून तुमचे गुण आ ह्मीं ऐकिले आहेत; सागरांबरा पृथ्वीचे ठायीं तुमचा संचार आहे ही सकल पृथ्वी तुमच्या स्वाधीन आहे असा तुमच्या कुळाचा प्रभाव मला विदित आहे, हे अर्जु- ना, तुमचा आचार्य द्रोण याची कीर्ती वेद व धनुर्विद्या या उभयतां विषयीं तीन लोकांत विख्यात आहे; धर्म, वायू, शक्र व अश्विनी कुमार व तुमचा पिता पांडु हे तुह्मीं साहाजण कुरुवंशाचे विस्तारक होय. तुह्मीं महात्म्ये, दिव्यात्मे सर्व श- स्त्र धारकां मध्यें श्रेष्ठ आहांत. या प्रकारें तुह्मास जरी मी जाणत होतों तथापि तुह्मास धरण्यास आलों याचें कारण आपली स्त्री आपले सन्निध असतां दु सरा कोणी पुमान आपली अमर्यादा करण्यास आला तर बलवान व द्रव्यवान असल्यास त्या पुरुषाची क्षमा करणार नाहीं, तशांतून आह्मी नक्तंचर आह्मा स रात्रीस बल विशेष येतें ह्मणून सदार असल्यामुळें मला विशेषें करून क्रो ध आला परंतु असा जरी मी होतों तथापि तूं माझा युद्धा मध्यें पराजय केला स याचें तात्पर्य काय तें मी तुला सांगतों. ब्रह्मचर्य व्रत धर्म तुझे ठिकाणी अस ल्या मुळें तूं मला जिंकिलेंस अथवा क्षत्रियकाम व्रत (लग्न झालेला) जरीं आ हे तथापि ब्राह्मणास पुरस्कृत करून आह्मा नक्तचरांशीं जर युद्ध करील तर तो आमचा सर्वांचा पराभव करील. यास्तव हे तापत्या, ब्राह्मणास प्रमुख केलें अ सतां तूं चिरकाल पृथ्वीचें पालन करशील. असा विष० या अध्यायांत आहे.

१७१ वा अध्याय:— अर्जुन बोलतो हे गंधर्वा, आह्मीं कुंतीचे पुत्र अस तां तापत्या ह्मणून तूं मला संबोधन कसें दिलेंस तेव्हां याचें तात्पर्य काय? असा अर्जुनाचा प्रश्न ऐकून गंधर्व अर्जुनास बोलतो हे पार्थ जा सूर्यानें आपल्या मं- डळ संबंधि तेजें करून स्वर्ग व्याप्त केला आहे त्याची भार्या सावित्री तिचे ठायीं सू र्या पासून एक कन्या तपती नामें झाली ही कन्या केवळ तेजानें सूर्यसमान च-

होती, ही तप करीत असतां इचें तपती असें नाम झालें, हिला आतां यौवनावस्था आली असें जाणोन इच्या रूपाशीं व गुणाशीं सदृश असा पती पाहून त्याला ही अर्पण करावी ह्मणोन सूर्यानें बहुत चिंता केली. परंतु तसा पती नमिळाल्या मुळें सूर्याची चिंता नष्ट झाली नाहीं. नंतर कुरु वंशामध्यें श्रेष्ठ महा बलवान ऋक्ष ह्मणून राजा होता त्याचा पुत्र संवरण ह्मणून सूर्य उपासक आहे हें सूर्याने पाहून निश्चय केला कीं, हा राजा कृतज्ञ व धर्मज्ञ आहे, रूपें करून या सारखा भूमीवर दुसरा कोणी नाहीं, तेव्हां याला आपली तपती कन्या द्यावी. कोणे एके दिवशीं संवरण राजा पर्वत, उपवनें इत्यादिकांचे ठायीं मृगये करितां फिरत असतां राजाचे अश्वास क्षुधा व तृषा बहुत लागली यामुळें अश्व मृत झालां. नंतर पादचारीच राजा वनात फिरूं लागला तों वनामध्यें दीर्घ लोचना अशी कन्या दृष्टीस पडली, तिजकडे राजानें पाहून असा तर्क केला कीं, ही कोणी एक रवीची प्रभाच आहे काय? अथवा शरीरें करून व तेजें करून अग्नीची ज्वालाच आहे काय! हीचें रूप पाहून मी असें समजतों कीं, माझ्या नेत्रांचें साफल्य जालें. यास्तव या देशा पासून कोठें अन्यत्र जाण्यास इच्छाच होत नाहीं. या प्रकारें त्या स्त्रीचें रूप व संपत्ती विषयीं संवरण राजानें तर्क करून तो चिंताग्रस्त झाला आणि कामबाणानीं पीडित होऊन तिला बोलला कीं, हे रंभोरु, तूं कोण, कोणाची स्त्री, कशा करितां येथें स्थित झाली आहेस, हे चारुवदने, तुझें वदन चंद्रापेक्षा ही सुंदर असून पद्मपत्र सदृश अक्षानीं युक्त आहे; तें माझ्या मनाचें मंथन करतें. असा त्या निरजन अरण्यांत राजा कामार्त होऊन स्त्रीसह वर्तमान बोलत असतां तिणे कांहीं उत्तर दिलें नाहीं आणि राजा आपल्या विषयीं अति उत्सुक जाला आहे असें पाहून अभ्रामध्यें सौदामिनी जशी लीन होते तशी ती स्त्री एकाएकीं अंतरधान पावली. तिच्या शोधाकरितां राजा अति उन्मत्त होऊन वनांत संचार करूं लागला परंतु कोठें दृष्टीस पडेना असें पाहून बहुत विलाप करित एक मुहूर्त पर्यंत निचेष्ट पृथ्वी वर पडला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७२ वा अध्याय:— गंधर्व बोलतो हे अर्जुना, ती स्त्री अदृश्य जाल्यावर शत्रु संघाचा हरण करता संवरण राजा, काम मोहित होऊन पृथ्वीवर पडला, हें

स्त्रीने पाहून पुनः आपण प्रगट झाली आणि राजाच्या अग्रभागीं येऊन हां स्य करित असें बोलली कीं, हे कुरु कुल विवर्धना; तूं कामानें मोहित होऊन पृथ्वीवर पडलास तर आतां उठ. अरे तूं सकल राजांत श्रेष्ठ असतां पृथ्वीवर कां पडतोस? असें स्त्रीचें भाषण ऐकून राजा बोलला कीं, हे पृथु श्रोणी, मी मन्मथाग्नीनें अत्यंत व्यथित जाहालों आहें तर या काळीं जर माझें सेवन करशील तर माझे प्राण राहतील. हे अंगने माझ्यावर कृपाकर मी तुझा भक्त आहें यास्तव माझा परित्याग करणें तुला योग्य नाहीं. यास्तव हे वरांगने गंधर्व विवाहें करून मला प्राप्त हो. असें राजाचें शोक युक्त भाषण ऐकून सूर्यकन्या तपती बोलली कीं हे राजा, जर इतकी प्रीती तुझी माझे ठायीं आहे तर माझा पित्याकडे जा आणि माझी यांच्या कर. हे नरेश्वरा राजा आजपर्यंत जे प्राण मी रक्षण केलें होते ते माण तुझा दर्शना बरावर हरण झाले परंतु मी काय करूं? मी आपल्या देहाची स्वतंत्र अधिकारिणी नसल्यामुळें तुझा सन्निध येण्यास योग्य नाहीं. यास्तव माझा पित्याकडे जाऊन मला माग. माझा पिता आदित्य आहे त्याजकडे जाऊन प्रथम त्यास प्रणिपात कर, तप कर, नियम कर म्हणजे तो आपल्या इच्छें करून मला देईल. असा विषय या अध्यायांत आहे.

१७३ वा अध्याय.— गंधर्व बोलतो हे अर्जुना, ती तपती कन्या पूर्वोक्त प्रकारें संवरणा सहवर्तमान भाषण करून गेली ती राजानें पाहून तो भूमीचे ठायीं पडला. तों इतक्यांत राजाचा अमात्य सैन्या सहवर्तमान राजाचा शोध करीत करीत वनांत आला असतां राजा शक्र ध्वजा सारखा पृथ्वीवर पडलेला पाहून त्यास बोलला कीं, हे राजा पृथ्वी वर कां पडलास? असें म्हणोन त्वरेनें नृपास भूतलापासून उठवितेसमयीं असें म्हणाला कीं, हे राजा तुझा मी अमात्य, तुला उठविण्या करितां आलों आहें, तूं क्षुधा व तृषाग्रस्त झाला आहेस असा मी तर्क केला. असें म्हणून त्या अमात्यानें स्त्रशीतल उदकानें सिंचन करून वाळ्याचा मुगुट राजाच्या शिरावर घातला, तो उष्णतेच्या योगानें तत्काल म्लान झाला. राजाचे प्राण व्याकुळ झाले होते ते पुनः सावध झाल्यानंतर राजानें सकल सैन्यास माघारे जाण्यास आज्ञा देऊन एक सचिवास मात्र ठेऊन घेतला. नंतर राजानें गिरिकूटावर शुचिर्भूत होऊन अंजली पुट जोडून सूर्याच्या आराधनेस आरंभ केला. आणि म-

नेकरून ऋषीसत्तम आपला पुरोहित जो वसिष्ठ याचें स्मरण केलें. याप्रकारें राजाचे रात्र आणि दिवस मिळून अकरा दिवस अतिक्रांत झाल्यावर द्वादशदिवशीं वसिष्ठ ऋषी, राजा अति संकटांत पडला असें जाणोन राजाचे सन्निध आला आणि राजास जें इष्ट होतें तेंच भाषण करून राजाची अर्थ सिद्धी होण्या करितां ऋषी भास्कराचे दर्शनास गेला. तेव्हां सूर्य बोलला कीं, हे महर्षे, कोणती इच्छा धरून तूं आलास तें सांग. हे वसिष्ठऋषे जें तूं मागशील तें देण्यास दुष्कर जरी असेल तथापि मी तुला देईन. असें सूर्याचें भाषण ऐकून वसिष्ठ ऋषी बोलले कीं, हे विभावसो, तुझी तपती नामक कन्या संवरण राजा करितां मी तुझाजवळ मागतों, तो राजा महा कीर्तिमान, धर्मार्थ वेत्ता, उदार बुद्धी आहे यास्तव तुझा कन्येस योग्य पती होय. असें वसिष्ठाचें भाषण ऐकून सूर्य बोलला कीं, हे विप्रा तुझें भाषण मला मान्य आहे, सकल राजां मध्यें संवरण राजा जसा श्रेष्ठ तसा तूं सकल ऋषी मध्यें श्रेष्ठ आहेस माझी तपती कन्या तीही सकल स्त्रियांमध्यें श्रेष्ठ आहे तेव्हां असा संबंध घडत असतां याचें निवारण कोण करील, असें ह्मणोन आपली तपती कन्या संवरणास देण्या करितां महात्मा जो वसिष्ठ ऋषी याचे स्वाधीन केली. ती कन्या महर्षी तीं घेऊन तो संवरण राजा जेथें पडला होता तेथें आला त्याकालीं वसिष्ठा सहवर्तमान ती चारुहासिनी देव कन्या तपती प्राप्त जाली. असें पाहून राजा हर्षित झाला. नंतर त्या गिरिश्रेष्ठावर यथाविधी राजानें तपतीशीं पाणिग्रहण करून नंतर आपल्या सचीवांस स्वपुरीं जाण्यास आज्ञा दिली. वसिष्ठऋषीही राजाची अनुज्ञा घेऊन स्वस्थानीं गेले असतां त्या गिरीवर भार्ये सहवर्तमान राजा अमरा सारखी क्रीडा करूं लागला. तेव्हां राजाच्या राष्ट्रांत द्वादश वर्षें पर्यंत अनावृष्टी जाली, सकल स्थावर जंगमात्मक प्रजा क्षय पावल्या, सकल लोकांनीं आपल्या स्त्रिया त्याग केल्यामुळें अतिशय अमर्यादा जाली. असें घोर कृत्य जालेलें पाहून वसिष्ठानें पर्जन्य पाडला आणि तपती सहवर्तमान राजास नगरांत आणून ठेविला नंतर राजानें सुखें करून आपले भार्ये सहवर्तमान स्वनगरीं वास केला असतां इंद्र पूर्ववत् प्रमाणे पर्जन्य पाडूं लागला तेणेंकरून राजाचें सकलराष्ट्र पुनः सुखी झालें. गंधर्व ह्मणतो हे अर्जुना, या प्रकारें ती तपती नामक विवस्वानाची कन्या तुमची पूर्वज आहे या तपतीचे गर्भी संवरणा पासून कुरुराजा उत्पन्न जाला, त्या वंशांत तुमची

उत्पत्ती म्हणोन मीतुला तापत्य असें भाषण केलें. असा विषय या अ॰ आहे.

१७४ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, गंधर्वाचें भाषण ऐकून अर्जुन गंधर्वास बोलला कीं, हे गंधर्वा वसिष्ठऋषीचा प्रताप तूं वर्णन केलास तो वसिष्ठऋषी कोण, आमच्या पूर्वजाचा पुरोहित कसा झाला हें म ला सांग. असें भाषण ऐकून गंधर्व बोलतो हे अर्जुना, ब्रह्मदेवाचा मानस पुत्र व सिष्ठ नामक अरुंधतीचा पती होय. याणे आपल्या तपोबलें करून अमरानीं जिं कण्यास अशक्य असे काम क्रोध जिंकून आपल्या पाद संवाहनास योजिले. वि श्वामित्रानें या वसिष्ठऋषीचे शत पुत्र मारिले तथापि विश्वामित्राचा उच्छेद करण्या विषयीं त्याची मती जाली नाहीं. त्या वसिष्ठास इक्ष्वाकु राजा ने पुरो हित केला ह्मणून सकल पृथ्वीचें राज्य त्यास मिळालें आणि त्याच्याच आश्र यें करून सकल याग केले. यास्तव हे अर्जुना, धर्म प्रधान, धर्म वेत्ता, सकल गुण संपन्न ब्राह्मण तुह्मीं एक आपल्यास पुरोहित करा ह्मणजे तुह्मीं पृथ्वीचा राज्य करण्यास समर्थ व्हाल. असा विषय या अध्यायांत आहे.

१७५ वा अध्याय.— अर्जुन बोलतो हे गंधर्वा, वसिष्ठऋषी आपल्या आश्रमीं राहात असतां विश्वामित्रानें आणि वसिष्ठानें वैर उत्पन्न होण्यास का य कारण झालें. असा अर्जुनाचा प्रश्न ऐकून गंधर्व बोलतो हे अर्जुना, कान्यकु ब्ज देशाचे ठायीं कुशीक राजाचा पुत्र गाधिया नामें करून राहात होता, त्याचा पुत्र रिपुमर्दन करणारा विश्वामित्र कोणी एके दिवशीं अमात्य बराबर घेऊन मरुधन्वा नामक देशांत मृगये करितां गेला, तेथें तृषेनें अत्यंत पीडित होऊन वसिष्ठऋषीच्या आश्रमीं आला तों वसिष्ठानीं त्याचा सत्कार करून त्यास आ सनीं बसविला आणि इच्छिलें काम पूर्ण करणारी कामधेनु नामक गाय होती ति शीं पदार्थांची यांचा करतांच, अमृता समान ज्याचा स्वाद, असे अनेक पदार्थ, त शींच महामोल्य वानू रत्नें व नाना प्रकारचीं उत्तमोत्तम वस्त्रें कामधेनूनें दिलीं- तीं ऋषीनीं घेऊन राजाचा उत्तम प्रकारें संतोष केला त्या काळीं राजा अमात्या- सहवर्तमान संतुष्ट होऊन ऋषीस बोलला कीं, हे वसिष्ठा, ही तुमची कामधेनु फा र सुंदर आहे, या गाईबद्दल मी तुला अर्बुद गाई देतों अथवा सकल राज्य देतों त्या ही नंदिनी मला दे. असें गाधिसुतानें भाषण ऐकून वसिष्ठ बोलला हे राजा,

देवता, अतिथी, पितर यांची तृप्ती आणि यागादिक्रिया आमच्या ब्राह्मणाच्या चा लल्या पाहिजेत, यास्तव ही पयस्विनी मी रक्षित केली. तेव्हां जरी तूं मला राज्य दिलें स तथापि ही नंदिनी अदेय आहे. असें वसिष्ठाचें भाषण ऐकून विश्वामित्र बो-लला हे विप्रा, मी क्षत्रिय आहें ही तुझी गाय बलात्कारानें नेईन. असें विश्वामि त्राचें भाषण ऐकून वसिष्ठ ह्मणतो हे विश्वामित्रा तूं राजा बलवान्, बाहुवीर्य युक्त क्षत्रिय आहेस तर जशी तुझी इच्छा असेल त्याप्रमाणें लौकर कर. असें वसिष्ठाचें भाषण ऐकून विश्वामित्रानें हंस व चंद्रा साररव्या शुभ्रवर्णगाई स बलात्कारानें धरून रज्जुनें बद्ध केली आणि दंडें करून ताडण करित असतां ती कल्याणी वसिष्ठाची धेनु हंबारूं लागली आणि आश्रमाचे बाहे र न जातां वसिष्ठ ऋषी कडे आपलें मुख करून स्तब्ध उभी राहिली. त्या कालीं वसिष्ठ ऋषी नंदिनीस पाहून बोलला कीं, हे नंदिनी, विश्वामित्र तु-ला बलात्कारें करून नेतो, मी तर ब्राह्मण क्षमाशील, तेव्हां माझा कांहीं उ पाय नाहीं. असें वसिष्ठऋषी भाषण करीत आहे तों पुनः धेनु विश्वामित्राच्या भयानें वसिष्ठाच्या सन्निध येऊन बोलली कीं, हे ब्राह्मणा रज्जु व दंडें करू-न विश्वामित्राचे सैन्यानीं मला ताडण करीत असतां तूं माझी उपेक्षा करतों स. या प्रकारें ती नंदिनी आक्रोश पूर्वक भाषण करीत असतां वसिष्ठऋषि-धैर्यापासून चंचल नहोतां गाईस बोलतो हे नंदिनी, क्षत्रियांचें बल हेंच त्यां चें तेज आणि ब्राह्मणाचें क्षमा हेंच बल होय. यास्तव मी क्षमा धरली आ हे त्यापेक्षां जर तुझी इच्छा असेल तर विश्वामित्राकडे जा. असें वसिष्ठाचें भाषण ऐकून नंदिनी बोलल्ये हे भगवन्, तूं माझा त्याग करून असें भा-षण करतोस कीं काय? वसिष्ठ ह्मणतो हे कल्याणी मी तुझा कांहीं त्याग क रित नाहीं, तुझी शक्ती असल्यास रहा. हा दृढ दाव्यानीं बद्ध केलेला तुझा वत्स बलात्कारें करून नेतात. तुझी इच्छा असेल तर रहा. तें ऋषीचें वा क्य ऐकून गाईनें आपलें अंग कंपित करितांच अंगावरील सकल रोमां च उभे राहिले त्या योगें गाय भयंकर दिसूं लागली, आणि तिणे हंबार डा फोडला तेणें करून विश्वामित्राचें सैन्य भयाभीत होऊन पळूं लागलें. जे लोक रज्जु व दंड हस्तांत घेण्यास प्रवृत्त झाले होते तेही भयाभीत हो-

ऊन पळूं लागले. वारंवार पुच्छा पासून अंगा र वर्षाव करत्येच काय अ सें लोकांस भासून पुच्छा पासून पन्हव नामक म्लेंच्छ आणि कांसेपासू न द्राविड आणि शक नामक म्लेंच्छ, योनिदेशापासून यवन, शेणा पासू न बहुत शबर नामक म्लेंच्छ तसेच मूत्रा पासून दुसऱ्या जातीचे शबर, पा र्श्वभागापासून पौंड्र, किरात, यवन, सिंव्हल, बरबर, खस, चिबुक, पुलिं द, चिन, केरळ या जातीचे लोक, फेना पासून आणखी कित्तीएक जाती चे म्लेंच्छ उत्पन्न केले. ते सकल म्लेंच्छ नाना प्रकारचीं वस्त्रें पांघरलेले व नाना प्रकारचीं आयुधें घेतलेले असून एक एक योद्धा पांच किंवा सात पुरुष बराबर घेऊन विश्वामित्र पहात असतां त्याच्या सैन्यावर चालून गेला आणि अस्त्रां चा वर्षाव करून सकळ विश्वामित्राचें सैन्याचा नाश करून टाकिला. परंतु ए कही विश्वामित्राचें मनुष्य जिवें नमारितां सर्व सैन्य पळवून दिलें, तें सैन्य तीन कोश पर्यंत पळत असतां त्याचें त्राण करण्यास कोणी समर्थ झाला नाहीं. भयें करून अगदीं त्रस्त झाले. हें सकल आश्चर्य जाहालेलें विश्वामित्रानें पा हून तो बोलला कीं, अहो या क्षत्रिय बलास धिःकार असो. ब्रह्म तेज या- सच बल ह्मणावें इतर सर्व बलें व्यर्थ आहेत, असा बलाबल विचार पाहून तप करावें असा विश्वामित्रानें निश्चय केला नंतर सकल राज्य श्री व सर्व भोगा चा त्याग करून तपास आरंभ केला असतां आपल्या तेजोबलानें सकळ लो क व्याप्त केला, पुढें तपाच्या योगें ब्राह्मण होऊन तो इंद्रा सह वर्तमान यज्ञा मध्यें सोमाचें पान करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७६ वा अध्याय:- गंधर्व बोलतो हे पांडवहो, इक्ष्वाकु वंशाचे ठायीं कल्माषपाद या नामें लोकांत परम विख्यात असा एक राजा होता. कोणे ए के दिवशीं तो राजा घोर वनामध्यें मृगयेस गेला असतां त्या वनांत नाना प्र कारचे मृग व बहुत गेंडे आदि करून श्वापदें मारून अत्यंत श्रांत झा- ला. या राजाचे गृहीं आपण याज्य कर्म करावें म्हणोन विश्वामित्राचे मनांत ब हुत दिवस होतें. राजा तृषेनें व क्षुधेनें अत्यंत आर्त होऊन एक लहान शा सं कोचित मार्गानें जात असतां वसिष्ठ ऋषीचा शक्तिनामक पुत्र तोही त्याच मार्गानें आला, तों मार्गांत ऋषीची व राजाची गांठ पडून उभयतांच्या गम-

नाचा मार्ग निरुद्ध झाला. त्या काळीं राजा बोलला कीं, हे ब्राह्मणा मार्गांतून दूर हो-
मला मार्ग दे. तेव्हां ऋषी बोलला कीं, हे महाराज, सनातन धर्म पाहिला असतां रा
जानीं ब्राह्मणास मार्ग द्यावा असें आहे. तेव्हां तूंच मला मार्ग दे. त्या काळीं ऋषी मा
र्ग सोडीत नाहीं, असें जाणोन राजानें त्यास चाबुक मारिला. तेव्हां ऋषीनें शाप दि-
ला कीं, हे दुष्टा राजा, राक्षसा सारखा क्रूर होऊन ज्यापेक्षां ब्राह्मणास चाबकानें
ताडण करितोस त्याजपेक्षां आज पासून पुरुषास भक्षण करता असा तूं राक्षसः
होऊन मनुष्य मांसा विषयीं अति आसक्त सकल पृथ्वीमध्यें संचार करीत फिर-
शील. जा मूर्खा अधमा, याप्रकारचा तुला शाप असो. असा महावीर्यवान वसिष्ठपु
त्र शक्ति याणें शाप दिला. असतां त्या उभयतांचा विवाद ऐकून विश्वामित्र ही तेथें
आला; पुढें राजानें हा वसिष्ठऋषी सारखा तेजस्वी दिसतो त्यापेक्षां हा त्याचा पुत्र
आहे तेव्हां यास शरण जाऊन आत्म हितार्थ प्रसाद घ्यावा असा निश्चय केला
राजाचा मनोगत भाव विश्वामित्रानें जाणोन तोतत्काल आपण तेथेंच अंतर धान
पावला आणि तेथें किंकर नामाचा एक राक्षस होता त्यास बोलला कीं, तूं राजा
च्या शरीरांत प्रवेश कर. असें विश्वामित्रानें भाषण ऐकून राक्षसानें विचार केला
कीं, विश्वामित्राचें भाषण न ऐकावें तर हा आपल्यास मारिल. राजास तर शक्ति
ऋषीचा शाप राक्षस होण्या विषयींचा आहे त्यापेक्षां आपण प्रवेश करावा. अ-
सा निश्चय करून किंकर नामक राक्षसानें राजाच्या शरीरांत प्रवेश केला. हें जा
णून विश्वामित्रानें अन्यत्र स्थलीं गमन केलें. राक्षसानें राजाच्या शरीरांत प्रवे
श केल्या पासून राजास कांहीं सुचेनासें जालें. कोणे एके दिवशीं राजा त्या वनांत-
फिरत असतां अकस्मात् एक ब्राम्हण आला आणि राजास बोलला कीं, हे रा
जा, मी क्षुधेनें अत्यंत पीडित झालों आहें मला भोजनास दे. असें ब्राह्मणाचें भा
षण ऐकून राजा बोलला कीं, हे ब्राम्हणा, एक मुहूर्त पर्यंत तूं येथेंच राहा मी-
पुनः फिरून येथें येऊन तुला यथेच्छ भोजन देईन. असें म्हणोन राजा त्या स्थ-
ला पासून गेला आणि ब्राह्मण तेथेंच उभा राहिला. नंतर राजा इकडे तिकडे सं-
चार करीत करीत आपल्या पुरांत जाऊन. अंतःपुरांत सुखानें गेला. अर्धरात्र-
झाल्यावर राजास ब्राम्हणाचें स्मरण होतांच उठून त्यानें सूदास आज्ञा केली कीं,
हे सूदा, या वनामध्यें एक ब्राह्मण क्षुधार्थी माझी मार्ग प्रतीक्षा करीत बसला आ

सेल त्यास लौकर जाऊन मांसा सहवर्तमान चांगलें भोजनास दे. अशी राजाची आज्ञा होतांच सूदानें पाकशालेंत शोधकेला तों मांस नाहीं, असें जाणून राजास बोलला कीं, हे महाराज, या प्रसंगीं मांसनर शिल्लक नाहीं, त्या काळीं राजा सूदास बोलला कीं, जर पशूमांस नसेल तर नरमांस भोजनास दे. याप्रकारें वारंवार राजानें सांगितल्यावर बरें आहे असें सूदानें ह्मणोन पशूघात करणाऱ्याच्या गृहीं जाऊन परमत्वरेनें निर्भय पणें नरमांस आणिलें आणि यथाविधी त्याचा संस्कार करून क्षुधार्थी महा तेजस्वी ब्राह्मणा कारणें भोजनास देतांच सिद्धदृष्टीनें तें अन्न ब्राम्हणानें पाहातांच हें अन्न आपणास अभोज्य आहे असें जाणोन क्रोधानें बोलला कीं, हे नृपाधमा, भोजनास अयोग्य अन्न असतां मला तूं भोजनास देतोस त्या पेक्षां याच मनुष्याच्या मांसाचे ठायीं तुझी प्रीती उत्पन्न होऊन भक्षण करण्यास निरंतर लुब्ध होशील. असा दोनवेळ राजास शाप होतांच- तो दिवसें दिवस विसंज्ञ होत चालला यास कांहीं दिवस गेल्यावर कोणे एके दिवशीं वसिष्ठपुत्र शक्ति राजाचे दृष्टीस पडला असतां राजा त्यास बोलला कीं, हे ऋषे, ज्या पेक्षां तूं मला असा अप्रतीम शाप दिलास त्या पेक्षां तुलाच मी आता भक्षण करितों. असें ह्मणोन वसिष्ठ पुत्रास राजानें भक्षण केलें. वसिष्ठपुत्र मृत झाला हें वर्तमान विश्वामित्रास समजतांच वशिष्ठाचे इतर अवशिष्ट पुत्र राहिलेले होते त्यांसही भक्षण करण्या विषयीं राजास विश्वामित्रानें प्रेरणा केली असतां राजानें अत्यंत क्रुध्ध होऊन शक्ती पेक्षां कनिष्ठ नव्याणव वसिष्ठाचे पुत्र होते ते सर्व भक्षण केले. त्याकालीं वसिष्ठास आपले पुत्र विश्वामित्रानें मारविले हें समजतांच आपल्या आत्म्याचा घात करण्या विषयीं मती धरून प्रथम मेरूपर्वतावर जाऊन आपल्या देहाचा पात केला असतां जसा कापसाचा भारा पर्वता वरून खालीं पडतो तसा वसिष्ठ, शरीरास कांहीं दुःख न होतां खालीं पडून मरण पावला नाहीं. या सारखे अनेक उपाय त्यानें केले परंतु तो मरण पावला नाहीं, तेव्हां वसिष्ठऋषी अत्यंत खिन्न होऊन पुनः आपले आश्रमीं आला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७७ वा अध्याय— गंधर्व बोलतो हे धर्मराजा, वसिष्ठऋषी आपल्या आश्रमीं आल्यावर तो आश्रम पुत्रहीन जाहालेला पाहून अत्यंत दुःखि

न होत्साता पुनः त्या आश्रमापासून निघून वनांत चालला. तो प्रावृट् काळीं कोणी एका नदीला मोठा पूर येऊन त्यांत बहुत वृक्ष वाहात चालले आहेत हें पाहतांच वसिष्ठानें आपल्या शरीरास पाशानें बांधून नदी मध्यें उडी टाकिली असतां नदीनें वसिष्ठ ऋषीचे सकल पाश छिन्न करून ऋषीस स्थलावर आणोन-सोडिला. त्या काळीं वसिष्ठानें त्या नदीचें नामाभिधान विपाशा असें ठेऊन फिरू-लागला. मोठमोठ्या पर्वतावर गेला, नाना प्रकारच्या नद्या व सरोवरें पाहात जातां जातां महा भयंकर, प्रचंड ग्राहादिक जंतूनीं व्याप्त, अशी हैमवती नामक नदी पाहून वसिष्ठ ऋषीनें त्या नदीत उडी टाकिली. त्या काळीं नदीनें वसिष्ठास बाहेर आणून टाकिला. वसिष्ठ भयानें नदी शतधा विदीर्ण जाली ह्मणोन त्या दिवसापासून शतद्रु असें नदीचें नाव प्रसिद्ध जालें. शतद्रु नदीपासून वसिष्ठ ऋषी बाहेर-आल्यावर मरणाचा संकल्प होता तो टाकून पुनः आपल्या आश्रमीं आला आणि अदृश्यंती नामक स्नुषा, ज्येष्ठ पुत्राची भार्या होती तीस बरोबर घेऊन नाना प्रकारचे देश शैलवने पाहात जात असतां षडंग वेदाध्ययन करीत करीत आपले पाठीमागून कोणी येत आहे असें समजून ऋषि भाषण करतो; माझेमागून वेदाध्ययन करीत कोण येत आहे. त्या काळीं स्नुषा बोलली कीं, हे महाभाग महातपस्विन, शक्तीची भार्या अदृश्यंती नामक आहे असें स्नुषेचें भाषण ऐकून वसिष्ठ ऋषी बोलला हे पुत्री, शक्ती सारखा सांग वेदाध्ययन केल्याचा ध्वनी कोठून येतो. असें ऋषीचें भाषण ऐकून अदृश्यंती बोलली कीं हे ऋषे, तुझा पुत्र जो शक्ती त्यापासून माझ्या कुक्षीचे ठायीं गर्भ उत्पन्न जाला तो बारा वर्षे पर्यंत वेदाभ्यास करीत कुक्षी मध्यें तसाच आहे. असें स्नुषेचें भाषण ऐकून वसिष्ठ ऋषी बोलला कीं, आपल्यास संतान आहे आतां कांहीं चिंता नाहीं. असें ह्मणोन मृत्यु बुद्धी पासून परावृत्त होत्साता स्नुषेस बरोबर घेऊन माघारा फिरला. तो येतां येतां घोर मनुष्य रहित अरण्यांत कल्माषपाद राजा उग्र राक्षसानें आविष्ट जाहालेला ऋषीनें पाहिला. राजानें ही ऋषीस पाहून तो त्यास भक्षणा करितां सन्निध येत आहे हें पाहून अदृश्यंती वसिष्ठास ह्मणत्ये हे ऋषे, हा क्रूरकर्मा राक्षस हस्तांत दंड घेऊन कोण येत आहे तो पहा. हे ऋषे या घोर राक्षसा पासून माझें रक्षण करा. असें स्नुषेचें भाषण ऐकून वसिष्ठ बोलला हे पुत्री

या राक्षसा पासून भिऊंनको, हा राक्षस नव्हे हा महावीर्यवान कल्माषपादरा-
जा होय. हा लोकांस भय दाखवीत या वनाचे ठायीं राहातो. इतकें ऋषी बोलत-
आहे तों वसिष्ठाच्या अग्रभागीं तो राक्षस आला असतां ऋषीनीं हुंकार मात्रें क
रून त्याचें निवारण केलें आणि अभिमंत्रित जलानें राक्षसास प्रोक्षण केलें अ
सतां मंत्र सामर्थ्यानें तत्काल तो राजा शापा पासून मुक्त झाला आणि अभिवा
दन पूर्वक अंजळी पुट जोडून ऋषीस बोलला कीं हे मुनि सत्तमा, सौदास राजा
तो मी तुझा यजमान होय. तूं माझे घरीं याजक कर्म करण्यास योग्य होस आतां
या कालीं तुझें इष्ट मी काय करूं तें मला सांग. असें राजाचें भाषण ऐकून वसि
ष्ठ बोलतो अस्तु. जें तूं कर्म केलेंस ती गोष्ट माघारी फिरत नाहीं. आतां जा. आप
ल्या राज्याचें परिपालन उत्तम प्रकारें कर म्हणजे झालें. हे मनुष्येंद्रा, आज पा
सून कधींही ब्राम्हणाचा अवमान करूंनको. असें ऋषीचें भाषण ऐकून रा-
जा बोलतो हे महाभाग, अतःपर मी कधीं ही ब्राह्मणाचा अवमान करणार-
नाहीं. तुझ्या आज्ञेंत निरंतर स्थित होऊन द्विजांची उत्तम प्रकारें पूजा करीन; प
रंतु हे द्विजोत्तमा, इक्ष्वाकु वंशाचा जेणे करून मी अनृणी होईन अशा तत्वाची
इच्छा करितों यास्तव उत्तम शील व गुणानीं युक्त असा एक पुत्र मला दे. अ
सें राजाचें भाषण ऐकून ऋषीनीं उत्तर केलें कीं, तुला पुत्र देतों; नंतर ऋषीस
ह वर्तमान राजा अयोध्या नगरींत आला असतां सकल प्रजा आनंद पा
वल्या. कोणे एके दिवशीं राजाच्या आज्ञे वरून राजाची भार्या वसिष्ठा सन्नि
ध येऊन पुत्रा विषयीं प्रार्थना करीत असतां वसिष्ठ ऋषी राजपत्नीशीं दि
व्यविधीनें रत झाले. त्या काळीं राजपत्नीच्या उदरांत गर्भ राहिला. नंतर राजा
च्या अनुज्ञे वरून ऋषी आपले आश्रमीं गेले. इकडे राजपत्नीच्या उदरांत ब
हुत दिवस गर्भ राहिला तेव्हां राजपत्नीनें आपला कुक्षी पाषाणानें भिन्न
केला. त्याला ही बारा वर्षे झाल्यावर राजपत्नीला उत्तम प्रकारचा पुरुषश्रे
ष्ठ असा पुत्र जाला. दगडानें कुक्षी भेद केला म्हणोन या पुत्राचें नाव अश्म
क असें ठेविलें. पुढें हा राजपुत्र मोठ्या महर्षी पदवीस जाऊन पौदन्यना-
मक पुरींत राहूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७८ वा अध्याय:— गंधर्व बोलतो हे धर्मराजा अदृश्यंती नामक

वसिष्ठाची स्नुषा आश्रमीं असून होऊन निला शक्तीच्या कुलाचा वृद्धी करणारा दुसरा शक्तीच असा पुत्र झाला. त्या कालीं वसिष्ठऋषी याणे आपल्या पौत्राच्या जातकर्मादि क्रिया सर्व केल्या आणि आपला पुत्र मृत होऊन अवशिष्ट गर्भस्थापित केला होता या कारणानें त्या पुत्राचें नांव लोकांमध्यें पराशर असें स्थापित केलें. हा पुत्र जन्मापासून निरंतर वसिष्ठापाशींच असे ह्मणून तो वसिष्ठास पिता मानीत असे. कोणे एके दिवशीं अदृश्यंती (पुत्राची मांता) समक्ष असतां पुत्रानें वसिष्ठास हे तात! हे तात! अशी हांक मारली. तें पुत्राचें मधुर भाषण ऐकून अदृश्यंतीचे नेत्र जलानें पूर्ण झाले आणि ती पुत्रास बोलली कीं, हे पुत्रा त्या वसिष्ठास तात तात असें भाषण करूं नको, हा तुझ्या पित्याचा पिता आहे, तुझा तात तर वनामध्यें राक्षसानीं भक्षण केला. असें मातेचें भाषण ऐकून पराशर दुःखानें आर्त होऊन त्यानें त्या सर्व लोकांचा विनाश करावा अशी मती धरिली. हें वर्तमान वसिष्ठऋषीस समजतांच त्यानें त्या मतीपासून पुत्राचें निवारण करण्या स्तव त्यास एक प्राचीन कथा सांगितली ती सांगतों. वसिष्ठ सांगतात हे पुत्रा, कृतवीर्य नामक राजा पृथ्वीचा अधिपती होता त्यानें यज्ञ यागादि क्रिया करून सकल भृगुकुल धनधान्यानीं समृद्ध केलें होतें. कांहीं कालानें कृतवीर्य राजा स्वर्गी गेला असतां त्याच्या कुलांतील पुरुषास द्रव्याचें कारण उपस्थित झालें. तेव्हां आपले उपाध्ये भृगुकुलांतील पुरुष आहेत त्यांजपाशीं द्रव्य यांच्या करावी असा क्षत्रियांनीं निश्चय करून ते त्याकडे द्रव्य यांच्ञे करितां गेले असतां कांहीं भार्गवांनीं आपलें द्रव्य भूमीमध्यें पुरून ठेविलें; कांहीं ब्राह्मणानीं क्षत्रियांच्या भयानें ब्राम्हणास दान केलें आणि आमच्याजवळ द्रव्य नाहीं ह्मणोन सांगितलें. कांहीं भार्गवांनीं भिऊन यथेप्सित द्रव्य दिलें, कोणी एक क्षत्रियानें एका भार्गवाचे गृहांत प्रवेश करून त्याच्या गृहांतील भूमी खनन केली असतां अकस्मात त्यांत द्रव्य सांपडलें. तें सकल क्षत्रियांनीं पाहातांच सकल भृगूचा धिःकार करून अवमान केला. त्या कालीं सकल भृगु राजास शरण गेले तथापि क्षत्रियांनीं निशित बाणें करून सकल भृगुवंशाचा क्षय करून टाकिला. स्त्रियांच्या उदरांतील गर्भाचा वध केला. त्याकालीं भृगूच्या

स्त्रिया हिमाचल पर्वतावर राहूं लागल्या. कोणे एक भृगुस्त्रीनें गर्भमारणभ यास्तव आपल्या उदरांतील गर्भ मांडि मध्यें धारण केला होता. हें वर्तमान एका ब्राह्मणी स्त्रीस माहित होतें तें तिनें क्षत्रियास सांगितलें. तेव्हां सर्व क्षत्रिय गर्भाचें हनन करावें या बुद्धीनें हिमाचल पर्वतीं जाऊन भृगुस्त्रीस पाहात असतां तो गर्भ मांडीचा भेद करून एका एकीं बाहेर निघाला. मध्यान्हकाळीं भास्कर जसा देदीप्यमान असतो त्याप्रमाणें तो पुत्र देदीप्यमान सकल क्षत्रियानीं पाहातांच त्यांच्या दृष्टी नष्ट झाल्या. तेव्हां ते ब्राह्मणीस शरण जाऊन बोलले कीं, हे ब्राह्मणी, आह्मी सकल क्षत्रिय नष्टचेतस जालों. हे शोभने ब्राम्हणी, तूं आतां सपुत्रा झालीस, आमच्यावर प्रसाद करून पुनः आम्हास दृष्टी दे. असा विषय या अ० आहे.

१७९ वा अध्याय:- ब्राह्मणी बोलली हे क्षत्रिय हो, मी तुमच्यावर रुष्ट होऊन तुमच्या दृष्टीचें हरण केलें नाहीं. हा माझा उरूपासून उत्पन्न जालेला भार्गव यानें तुमच्या दृष्टीचें हरण केलें. याच्या पित्याचा तुह्मीं वध केला ह्मणून क्रोधानें तुमचा नाश करण्याविषयीं आतां हा इच्छा करितो; यास तुह्मीं शरण गेलां असतां हा संतुष्ट होऊन तुमच्या दृष्टी तुम्हास देईल. असें मातेचें भाषण ऐकून सकल क्षत्रिय उरूजाच्या सन्निध येऊन प्रार्थना करूं लागले कीं, हे पुत्रा, प्रसन्न होऊन आमचे चक्षु दे. अशी क्षत्रियांनीं प्रार्थना केली असतां त्यांस नेत्र येऊन ते आप आपले स्थलीं गेले. उरूचा भेद करून हा पुत्र बाहेर निघाला या कारणानें त्याचें नामाभिधान और्व असें लोकांत विख्यात झालें. कांहीं दिवसानीं या भृगुपुत्रानें सकल लोकांचा नाश करावा ह्मणोन मनी धरली आणि तपाच्या योगें दिवसें दिवस अत्यंत देदीप्यमान होऊन देवासुरांचे लोकास व मनुष्य लोकास अत्यंत संताप करूं लागला. आपल्या तपाच्या उग्र तेजानें आपल्या पितामहादिकांस अत्यंत आनंद होऊं लागला असतां कोणे एके दिवशीं और्वाच्या पितरांनीं जाणिलें कीं, आपला पुत्र कुलवर्धन करिता जाहाला खरा परंतु सकल लोकांस त्रास देत आहे त्यापासून याची परावृत्ती करावी. असें जाणोन पितृलोकापासून सर्व पितर येऊन बोलले कीं, हे पुत्रा, तुझा तपाचा उग्र प्रभाव आह्मीं पाहिला. आतां सर्व लोकांवर प्रसाद करण्याकरितां आपल्या क्रोधाचें नियमन कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१८० वा अध्याय.– और्व ऋषी बोलला कीं, हे पितर हो, क्रोधाचा नियम कर, ह्मणून तुह्मी मला उपदेश केला खरा; परंतु सर्व लोक नाशाची जी मी प्रतिज्ञा केली ती प्रतिज्ञा माझी कधींही व्यर्थ व्हावयाची नाहीं. धर्मार्थकाम या त्रिवर्गाच्या अशी ष्टांच्या नाशा विषयीं, वसिष्ठांच्या संरक्षणा विषयीं राजानीं अथवा इतरांनीं जर क्रोध आणिला तर तो क्रोध योग्यच आहे. मी गर्भा मध्यें असतां क्षत्रियांनीं भृगूचा वध ज्याकाळीं केला त्या काळीं त्यांच्या स्त्रियांनीं व माझ्या मातेनें जो आक्रोश केला तो मी गर्भांत च ऐकिला, तेव्हां मला मोठा क्रोध उत्पन्न जाला. पहा बरें; क्षत्रिय आमच्या कुलाचा वध करीत असतां सकल लोक त्यांचें निवारण करण्यास समर्थ होते परंतु निवारण केलें नाहीं. ह्मणोन मला अत्यंत क्रोध येऊन सकल लोकांच्या क्षयार्थ उद्युक्त झालों, त्या पेक्षां तुमचें वचन माझ्या कोपाचें निवारण करण्यास समर्थ होणार नाहीं; कदाचित् सर्वलोकांच्या नाशा पासून मला पातक लागेल असें ह्मणूतर मी पातकी नाहीं, हा सकल लोकांस माझा दंड आहे. कोणास कांहीं दुःख होत असल त्यास त्यानें सर्वांनीं रक्षण करावें. हे पितर हो लोकांस क्षय करणारा असा हा मला क्रोध आला त्याचा स्वतेजानें मी निग्रह करीन तर हा क्रोध मला जाळून टाकील. यास्तव तुमची आतां अशी प्रार्थना करितों कीं, जर सर्वलोकांचें हित व्हावें ह्मणोन तुमची इच्छा असल्यास माझें कल्याण व सर्व लोकांचें कल्याण कसें होईल याचा विचार करून मला कांहीं उपाय सांगा. असें और्वानें भाषण ऐकून पितर भाषण करितात हे पुत्रा. तुझ्या कोपा पासून उत्पन्न झालेल्या अग्नीनें लोकांचा नाश होत आहे तो तुझा क्रोधाग्नी जलामध्यें नेऊन टाक. येणे करून देवलोकादि लोकाचा नाशही नसून ते परम सुखानें पावतील. असें पितरांचें वाक्य ऐकून और्वानें आपला क्रोधाग्नी समुद्रा मध्यें टाकिला तो अग्नी समुद्रामध्यें वडवामुख होऊन आपल्या मुखांतून अग्नी निरंतर टाकितो तेणें करून समुद्राचें जल दग्ध होतें. असें वेदवेत्ते पुरुष बोलतात. यास्तव हे पुत्रा, तूंहि लोकाचा दाहा करण्यास उद्युक्त होऊंनको, जसा पितरांच्या उपदेशें करून और्वानें आपला क्रोध त्यक्त केला तसा माझ्या उपदेशानें तूं आपल्या क्रोधाग्नीचा त्याग करून सर्वलोकांचें रक्षण कर. असा वि॰ या अध्यायांत आहे.

१८१ वा अध्याय.– गंधर्व ह्मणतो हे धर्मराजा, असा वसिष्ठानें पराशा-

रास बोध केला असतां पराशरानें सर्व लोक ज्या विषयीं जो कोप केला होता त्या
चा निरोध करून राक्षसाच्या नाशार्थ एक क्रतूचा आरंभ केला. त्यांत बाल वृ-
द्ध असे राक्षस अग्नीमध्यें पराशरानें दग्ध केले. आपला पिता जो शक्ति याचा
वध राक्षसानें केला तें वैर मनामध्यें धरून सर्व राक्षसाचें सत्र करीत असतां पू
र्वीं याणें एक प्रतिज्ञा केली होती ती मी याची भग्न केली. आतां याणें दुसरी प्रति
ज्ञा केलेली मी भग्न करण्यास समर्थ नाहीं. अशी निश्चित मती धारण करून व
सिष्ठ ऋषी राक्षस सत्रापासून पुत्राची निवृत्ती करण्यास उद्युक्त झाले नाहींत.
यज्ञामध्यें तीन अग्नी सिद्ध केले होते, ते अग्नी जसे दैदीप्यमान दिसत तसा-
पराशर ऋषी त्या यज्ञांत चतुर्थ अग्नी सारखा जाज्वल्यमान दिसूं लागला. त्या-
काळीं वसिष्ठादिक सर्व मुनी म्हणो लागले कीं, हा दुसरा सूर्यच नूतन उत्पन्न जा
ला काय. तेव्हां या सत्रा पासून पराशराचा उपरम करावा ह्मणोन अत्री, पुलस्त्य, पुल
ह, क्रतु, महाक्रतु इत्यादि ऋषी राक्षसाच्या जीवन हेतूनें आले आणि त्यामध्यें पु
लस्त्य नामक ऋषी पराशरास बोलले कीं, हे ऋषिश्रेष्ठा, तुझें सत्र निरविघ्न होऊन
तुला आनंद जाला आहे ना, अरे पुत्रा राक्षसाच्या वध संबंधीं दोष न जाणून यास-
त्राचा तूं आरंभ केलास यांत माझ्या प्रजेचा उच्छेद होत आहे, हें कर्म करण्यास तूं यो-
ग्य नाहींस. अरे पराशरा, तुझ्या पित्यानें कल्माषपाद राजास शाप दिला ह्मणोन तो
मृत्यु वश जाहाला, तेव्हां तुझा पिता मरण पावला हा त्याचा दोष न होय, राक्षसाचा
दोष नाहीं. हे वसिष्ठ नंदना, तूं हें आपलें राक्षस सत्र समाप्त करून सत्र संबंधी अ
ग्नी हिमाचलाच्या पार्श्व भागीं टाक आणि कल्याण पाव. असा पुलस्त्य व वसिष्ठ
याणीं पराशरास बोध केला तेव्हां त्यानें त्याप्रमाणें केलें. तो अग्नी अद्याप हि-
माचलाच्या पृष्ठ भागीं राक्षस, वृक्ष, पाषाण यांस पर्वकाळीं भक्षण करितो. समाप्त.

१८२ वा अध्याय — अर्जुन बोलतो हे गंधर्वा, कल्माषपाद राजानें ब्रह्म
वेत्ता जो गुरु वसिष्ठ याजकडे आपली भार्या पुत्रोत्पत्ती करितां पाठविली याचें कारण
काय; आणि वसिष्ठ ऋषी सकल धर्म जाणत असतां त्यानें अगम्य स्त्रीशीं कसें गम-
न केलें हें मला सांग, असें अर्जुनाचें भाषण ऐकून गंधर्व भाषण करितो हे धनंज
या, तूं जो प्रश्न केलास त्याचें उत्तर सांगतों वसिष्ठ पुत्रानें कल्माषपाद राजास मो-
ठा दुर्धर्ष शाप दिला, ती कथा पूर्वी तुला मी सांगितली आहे. आतां त्यांतून अवशि

ष्ट राहिलेली सांगतों. वसिष्ठपुत्र शक्तीनें ज्याकालीं राजास शापदिला त्याकालींरा जास अत्यंत क्रोध आला आणि भार्येसहवर्तमान अरण्यामध्यें जाऊन इकडे ति कडे संचार करूंलागला. नानाप्रकारच्या मृगगणानीं अकीर्ण,नानाप्रकारच्याभयंक र प्राण्यानीं समाकुल.अशा घोर अरण्या मध्यें शापानें ग्रस्त जालेला राजा,भ्रमणक रीत असतां अत्यंत क्षुधेनें व्याप्त जाला.तेव्हां भक्षणा करितां शोध करीत करीत-निरजन अरण्यामध्यें फिरत असतां तेथें एक ब्राह्मण व त्याची स्त्री अशीं उभयतां मैथुन करण्या विषयीं संगत होत आहेत तों इतक्यांत त्या उभयतांनीं या राजासपा हिलें आणि मैथुनानें अकृतार्थ होत्साते भयानें त्रस्त होऊन पलायन करूंलागले अ सतां त्याउभयतांतून पुरुष राजाचे हस्तगत जाहाला. तें पाहून ब्राह्मणी राजास बोल ली हे राजा, तूं मोठा व्रती आहेस तेव्हां मी जें बोलतें तें ऐक. तूं निरंतर अप्रमत्त होत्साता धर्माचें आचरण करतोस, गुरुशुश्रुषणाविषयीं अत्यंत रत आहेस,प्रस्तु त तूं शापग्रस्त जाला आहेस त्यामध्यें तरीं दुसरें आतां पाप कर्म करूंनको,मला ऋतु काल प्राप्त जाल्यामुळें भर्तृव्यसनानें मी कर्षित जाल्यें,तशांतून पुत्रादिक संतानन सल्यामुळें अकृतार्थ आहें ह्मणून प्रसवार्थ भर्त्याशीं संगत होण्यास इच्छितें,या स्तव हे नृपश्रेष्ठा माझावर प्रसन्न होऊन भर्त्यास सोड. अशी ब्राह्मण स्त्री आ-क्रोश करीत असतां त्या राजानें भर्त्यास भक्षण केलें.त्याकालीं स्त्रीस अत्यंत क्रो धयेऊन तिच्या नेत्रांतून जे अश्रु बिंदु पृथ्वीचे ठायीं पडले ते अग्निरूप होऊन-तो देश दग्धझाला. आणि ब्राम्हणीनें कल्माषपादराजास असा शाप दिला कीं, हे राजा क्षुद्रा,आपेक्षां मी मैथुना विषयीं अकृतार्थ असून माझ्या भर्त्यास भक्षण के लेंस त्यापेक्षां तुझ्या पत्नीस ऋतु प्राप्त होऊन तूं तिच्याशीं संगत होतांच प्राणापा सून मुक्त होशील आणि ज्या वसिष्ठ ऋषीचे पुत्र तूं नष्ट केलेस त्या वसिष्ठा सह वर्तमान तुझी भार्या संगत होऊन पुत्र उत्पन्न करील,तो पुत्र तुझ्या वंशाचा उद्धारक रिता होईल. असा ब्राह्मणीनें राजास शाप देऊन चिताग्नींत प्रवेश केला. हें सर्व व र्तमान वसिष्ठ ऋषीनीं ज्ञान योगानें व महातपोबलानें जाणलें,पुढें तो राजर्षी मुक्त शाप झाल्यावर मदयंती नामक त्याच्या भार्येस ऋतु काल आला तेव्हां राजा काम मोहित होऊन स्त्रीशीं रत होण्यास उद्युक्त असतां शापानें स्मरण करून राजा-तत्काल पश्चात्ताप पावला.हे अर्जुना या कारणा वरून स्त्रीचे ठायीं शापदोषा

स्तव, राजा रत होण्यास अशक्य झाला आणि ब्राह्मणीच्या शाप संकल्पा प्रमाणें त्यानें आपली भार्या वसिष्ठ ऋषीकडे योजिली. असा विषय या अध्यायांत आहे.

१८३ वा अध्याय.– अर्जुन बोलतो हे गंधर्वा, आह्मास एक पुरोहित पाहिजे यास्तव आह्मास योग्य असा पुरोहित कोणचा करावा तो सांग. असें अर्जुनाचें भाषण ऐकून गंधर्व बोलतो हे अर्जुना, देवलनामक ऋषीचा भ्राता धौम्य ऋषी तरुण आहे तो उत्कोचला तीर्थी तपश्चर्या करीत बसला आहे त्यास तुह्मीं आपला पुरोहित करा. असें गंधर्वाचें भाषण ऐकून अर्जुन बहुत संतुष्ट झाला आणि आग्नेय नामक अस्त्र यथाविधी गंधर्वास देऊन असें बोलला कीं, हे गंधर्व सत्तमा, तूं मला जे अश्व दिलेस ते अश्व मी तुज पाशींच ठेवितों ज्या काळीं त्या अश्वाचें काम पडेल त्या काळीं मी घेऊन जाईन. असें बोलून सकल पांडव त्या भागीरथी तीरा पासून निघाले ते उत्कोचला तीर्थी धौम्य ऋषीच्या आश्रमीं आले आणि धौम्यास बोलले कीं, हे ऋषे आह्मी पांडव तुला पुरोहित्या करितां वरतों, तूं आमचा पुरोहित हो. असें पांडवांचें भाषण ऐकून धौम्य ऋषी बोलला कीं, मी तुमचा पुरोहित होतों. असें भाषण करून वनसंबंधी कांहीं फलमूलें धौम्यानीं पांडवांस आशीर्वादार्थ दिलीं. तीं पांडवांनीं घेऊन राज्य, श्री व द्रौपदी यांचा आपणास लाभ झाला. असें पांडवानीं मानिलें नंतर धौम्यास पुरस्कृत करून पांचालीच्या स्वयंवरास जाण्याची बुद्धी धरिली. धौम्य याणें जाणलें कीं, हे महावीर आहेत त्या पेक्षां स्वधर्में करून यांचें राज्य यांस मिळेल. नंतर ते मनुजाधिप पांडव धौम्या सहवर्तमान द्रौपदीच्या स्वयंवरास निघाले. असा विषय या अध्यायांत आहे.

१८४ वा अध्याय.– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांच पांडव, द्रौपदी स्वयंवरोत्सव व द्रुपदाचा देश पाहण्याच्या उद्देशानें माते सहवर्तमान द्रुपद नगराकडे निघाले तों मार्गांतून ब्राह्मणाचे समुदाय द्रुपद नगराकडे चालले होते ते मार्गांत पांडवांस बोलले कीं, हे ब्रह्मचारी तुह्मी कोण कोठेंचालांत व कोठून आलां तें सांगा. असें ब्राह्मणाचें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलला कीं, हे द्विजश्रेष्ठ हो, आह्मी एकचक्रा नगरी पासून आलों, हे सकल आह्मीं बंधु आहोंत, ही आमची माता होय, ब्राह्मण ह्मणतात हे ब्रह्मचारी हो,

द्रुपदाचे गृहीं स्वयंवराचा समारंभ मोठा आहे तेथें गेलें असतां द्रव्यप्राप्ती होईल, अशा हेतूनें आह्मीं पांचालनगरीं जात आहोंत, तर तुह्मी ही आमच्या बराबर चला. आह्मास, असें वाटतें कीं, तुह्मीं पांची जणें देवासारखेरूपवान् दिसतां त्या पेक्षां तुह्मातून कोणा एकास तरी द्रौपदी वरील असें आह्मास वाटतें. तुह्मा मध्यें हा तुमचा भ्राता महाबाहू तर फारच सुंदर दिसतो यास्तव दैवयोगानें याचाच विजय होऊन हा बहुत द्रव्य संपादन करील: असें ब्राह्मणाचें भाषण ऐकून धर्मराज बोलला कीं, हे विप्रहो, फारचांगलें आहे तो महोत्सव पाहण्या करितां आह्मीं येतों. तुह्मी व आह्मी कन्या स्वयंवर पाहून नंतर बराबरच माघारे येऊं. असा विषय या अ० आहे

१८५ वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, असें ब्राह्मणासह वर्तमान भाषण करून नंतर पांडव दक्षिण पांचाला कडे निघाले असतां मार्गांत द्वैपायन व्यास यांची भेट झाली. नंतर एकमेकांनीं परस्परांचा सत्कार करून पांडवांनीं आपलें सर्व वृत्त व्यासास सांगितलें. तें ऐकून व्यासानीं पांडवांस पुढें जाण्या विषयीं आज्ञा दिली. नंतर पांडव नाना प्रकारचीं रमणीय वनें व सरोवरें यांची शोभा पाहात पांचाल देशा कडे चालले. तों द्रुपद राजाचा गृह प्राकार दृष्टीस पडला. नंतर कुंभाराची एक शाला होती, त्यामध्यें भिक्षेचा अवलंब करून पांडव राहात असतां कोणी मनुष्यानीं त्यांस जाणलें नाहीं. द्रुपद राजानें आपली कन्या अर्जुनासच द्यावी असा निश्चय करून त्याचा शोध लागण्या करितां नम्रकरण्यास अयोग्य असें एक धनुष्य व एक कृत्रिम केलेलें आकाशस्थ लक्ष्य आणि लक्ष्यास भेद करण्या करितां नलिकायंत्र असे तीन पदार्थ सिद्ध करून सकल नगरा मध्यें असा स्वयंवराचा घोष करविला कीं, हें धनुष्य सज्ज करून या पांच बाणानीं हें लक्ष्य जो विद्ध करील त्या मनुष्यास ही माझी कन्या मिळेल, हा पण ऐकून सकळ राजे व दुर्योधन, कर्ण हे तत्काल स्वयंवरास आले. तसेच महान महान ऋषी देशांतरा पासून स्वयंवर पाहाण्याच्या इच्छेनें आले होते. त्या सर्वांचा द्रुपद राजानें यथायोग्य पूजा सत्कार करून आपल्या नगराच्या पूर्वोत्तर मध्यभागीं उत्तम प्रकारची रंगसभा केली होती त्यामध्यें मोठमोठ्या

सनावर व मंचकावर त्यांस नेऊन बसविलें. त्या काळीं पौरजनांचा व इतर लोकांचा त्या रंगसभेंत सागरासारखा ध्वनी होऊं लागला आणि चारी मार्ग सर्व लोकांनीं व्याप्त झाल्यामुळें फारच शोभा पावले, ती रंगसभा, प्राकार, परिखा व द्वार संबंधीं तोरणानीं अलंकृत करून चित्र विचित्र छतें लाविलीं होतीं. हजारों वाद्यांचे गजर होत होते. त्या विमान सदृश प्राकारांत महासत्व, पराक्रमी, स्वराष्ट्राचें रक्षण करते, असे सकलराजे द्रौपदीच्या दर्शनेच्छेनें अलंकार घालून एकमेकांशीं स्पर्धा करीत बसले असतां ब्राह्मण समुदाया सहवर्तमान पांडव ही त्या सभेंत गेले. त्या समारंभास नट नर्तक ही बहुत आले. या प्रकारें तो समाज परिपूर्ण झाला असतां सोळावे दिवशीं द्रुपदाची कन्या उत्तम प्रकारचें स्नान करून व उत्तम प्रकारचें वस्त्र परिधान करून सर्व आभरणानीं भूषीत होत्साती कांचनमय माला हस्तामध्यें घेऊन रंगसभेंत आली असतां त्या रंगसभेमध्यें धृष्टद्युम्न मेघासारख्या गंभीर वाणीनें असें बोलला कीं, हे राजे हो, हें धनुष्य व हे बाण आहेत यांस घेऊन या यंत्राच्या छिद्र द्वारानें पांच बाणानीं एक काळीं हें लक्ष्य आपल्या बळानें जो छिन्न करील तो कुळानें व रूपानें उत्तम असल्यास ही माझी भगिनी त्याची भार्या होईल हें मी सत्य भाषण करतो. असें द्रुपदपुत्रानें भाषण करून नंतर भगिनीस बोलला कीं, हे द्रौपदी, हे सकलराजे आले आहेत यांचीं नामगोत्रें वयांचीं कर्में तुला मी सांगतों. असा विषय या अध्यायांत आहे.

१८६ वा अध्याय:- धृष्टद्युम्न बोलतो हे द्रौपदी, दुर्योधन, दुर्विषह, दुर्मुख, दुःप्रधर्षण, विविंशति, विकर्णसह दुःशासन, युयुत्सु, वायुवेग, भीमवेग इत्यादि सकल धृतराष्ट्रपुत्र महा बलवान, महावीर, कर्णा सहवर्तमान तसेच इतर असंख्यात क्षत्रियश्रेष्ठ सौबल, शकुनी, वृषक, बृहद्बल हे सकल गांधार राजाचे पुत्र, अश्वत्थामा आणि भोज हे नुझा करितां आले आहेत; बृहत्, मणीमान्, दंडधार, सहदेव, जयत्सेन, मेघसंधी, शंख व उत्तर या पुत्रां सहवर्तमान विराटराजा, सुशर्मा, सेनाबिंदु, सुनामा आणि सुवर्चा या दोन पुत्रांसहवर्तमान सुकेतु राजा, सुचित्र, सुकुमार, वृक, सत्यधृती, सूर्यध्वज, रोचमान, नील, चित्रायुध, अंशुमान, चेकितान, महाबली श्रेणिमान राजा, समुद्रसेनाचा पुत्र महाप्रतापी चंद्रसेनराजा, जलसंध, दंड आणि विदंड हे उभयतां पिता पुत्र, पौंड्रक वासुदेव, वीर्यवा

न भगदत्त राजा, कलिंग, ताम्रलिप्तक, पत्तनाधिपती पुत्रासहवर्तमान महारथी शल्य राजा, संकर्षण, वासुदेव रुक्मिणीचा पुत्र सांब, चारुदेष्ण, प्रद्युम्न पुत्र अक्रूर, सात्यकी, महामती उद्धव इत्यादिक बहुत राजे तुज करितां आले आहेत हे महा पराक्रमी असल्यामुळें तुझी प्राप्ती होण्याकरितां लक्ष्याचा भेद करतील यास्तव हे भद्रे या लक्ष्याचा भेद जो करील त्यास तूं आज वरावेंस. असा विषय या अध्यायांत आहे.

१८७वा अध्याय.— वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, हे सकल आलेले क्षत्रिय एकमेकांशीं स्पर्धा करणारे असल्यामुळें अस्त्रविद्येमध्यें मीच थोर आहें, असें मानीत द्रौपदीस पाहून आपलीं आयुधें उर्ध्व करीत त्या सभेंत एका एकी उठले आणि ही द्रौपदी माझी आहे, असें भाषण करीत स्पर्धेनें एकमेकाकडे पाहात असतां द्रौपदी प्राप्तीच्या संकल्पानें घर्म आल्यामुळें सकल अंगें ज्यांचीं भिजून स्नान केल्यासारखे झाले आणि हे एकमेक सुहृद मित्र जरी होते तथापि द्रौपदीस पाहातांच एकमेकाचा द्वेषभाव करूं लागले. हा समारंभ पाहाण्या करितां विमानारूढ होऊन देवांचे गण, एकादश रुद्र, द्वादशादित्य, अष्टवसु, अश्विनी कुमार, साध्य व मरुद्गण आले. हलायुध बलराम व श्रीकृष्ण हे उभयतां वृष्ण्यंधकांत मुख्य असल्यामुळें सकल वृष्णी वीर यदुपुंगव कृष्ण व बलरामाच्या मुखाकडे पाहात स्तब्ध बसले आहेत तों इतक्यांत पांच पांडव मत्तगजेंद्रासारखे पाहून कृष्ण बलरामास बोलला कीं, हे हलायुधा; धर्मराज, भीम, अर्जुन, नकुल सहदेव हे आले आहेत यांस हळूच मंददृष्टीनें पाहा. इतर राजे व राजपुत्र आले आहेत त्यांचे नेत्र द्रौपदी पाहाण्याकडे गुंतल्यामुळें पांडवांकडे पाहण्यास त्यास अवकाशच झाला नाहीं त्या कालीं स्वर्गलोकीं देव, गंधर्व, गरुड, नाग यांची दाटी होऊन गेली. दिव्य गंधाचे सुगंध सुटले, जिकडे तिकडे पुष्पांचे सडे झाले आहेत, मोठमोठ्या दुंदुभीचे नाद स्वर्गीं होऊं लागले. त्यासमयीं यथानुक्रमें दुर्योधन, शाल्व, शल्य, द्रोणायणी, क्राथ, सुनिध, व इतर ही अन्यराजे व राजपुत्र भूषणें घालून त्या रंगाच्या मध्यें आले आणि द्रुपदराजानें सभेंत स्थापित केलेल्या धनुष्यास धरून हस्तानें नम्र करण्यास उद्युक्त होतांच धनुष्याच्या काठिण्यामुळें हातांतून तें निसटुन गेलें आणि निचेष्टमान होऊन सकल राजे पृथ्वीवर

पडले,त्या काळीं सभेमध्यें एकाएकीं हाहा कार झाला.याप्रकारें सर्व राजांची य थानुक्रमें अवस्था जाली असतां महा धनुर्धार्‍यांमध्यें श्रेष्ठ जो कर्ण त्याणें हें कृत्य पाहून तो रंगाच्या मध्यभागीं आला आणि धनुष्य उचलून तयार करून-बाणाची योजना करित आहे तों द्रौपदी बोलली कीं, हा कर्ण सूतपुत्र आहे,त्यापेक्षां या स मी वरणार नाहीं.असें भाषण ऐकतांच कर्णानें तें धनुष्य तत्काल टाकिलें.या प्रकारें सकल क्षत्रिय निवृत्त झाले असतां चैद्य देशाचा अधिपती,दमघोषाचा पुत्र शिशुपाल सभेच्या मध्यभागीं येऊन धनुष्य धरतांच आपले जानू टेंकून भूमीवर पडला. असें जाहाल्यावर ती सकल राजाची सभा अत्यंत संभ्रांत होऊन स्तब्ध झाली.हें पाहून आतां आपण या धनुष्यास सिद्ध करूनबाण लावावा अशी अर्जुन इच्छा करूं लागला. असा विषय या अध्या० आहे.

१८८ वा अध्याय.- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, सकल राजे धनुष्यास नम्र करण्यास अशक्य होऊन सभामध्या पासून निवृत्त झाल्यावर उदार बुद्धी अर्जुन विप्रसमुदायांतून एकाएकीं उठला. हें सर्व ब्राह्मणानीं पाहून एकाएकीं आपली कृष्णा जिने कंपित केलीं. कांहीं बुद्धिमान ब्राम्हण होते ते आप आपल्यांत असें बोलले कीं, कर्ण,शल्य प्रभृति क्षत्रियश्रेष्ठ महाबली असतां त्यांच्यानें हें धनुष्य नम्र जालें नाहीं.तें धनुष्य हा दुर्बल ब्राह्मण कसा नम्र करील. कांहीं ब्राह्मण असें बोलले कीं,हा ब्राह्मण श्रीमान, सिंव्हा सारखा गतीमान व मत्त गजेंद्रा सारखा विक्रमी दिसतो त्या पेक्षां हें कर्म याच्या हातीं संभवेल असें आह्मांस वाटतें. जो शक्तीनें उत्साहयुक्त असतो तो च कांहीं कर्म करण्यास उद्युक्त होतो. ब्राह्मणाची ब्रह्म लोका पर्यंत गती आहे-यास्तव ब्राह्मणास असाध्य कर्म या लोकीं नाहीं. ब्राह्मण दुर्बल जरीं आहेत तथापि उदक भाशनादिक नियमानींच आपल्या तेजें करून ते बलीच आहेत. पाहा बरें,जामदग्न्य रामानें सकल क्षत्रिय युद्धामध्यें जिंकिले. अगस्त्य ऋषीनें ब्रह्म तेजाच्या योगें अगाध समुद्र जरी होता तथापि त्याचें भाशन केलें.यास्तव सर्वांनीं आतां असें ह्मणावें कीं, हा जरी ब्राह्मण बटु दिसतो तथापि महान धनुष्यास बाणाचें आरोपण करील असे ब्राह्मण नाना प्रकारचीं भाषणें करीत असतां ब्राह्मणसमुदायांतून अर्जुन उठून धनुष्या जवळ उभा राहिला.आ-

णि त्यानें महादेवास शिरानें नमस्कार करून व श्रीकृष्णामत मनांत धारण-करून हस्तामध्यें धनुष्य घेतलें आणि एक निमेषांतरांत सज्ज करून पांच बाणांनीं छिद्रद्वारानें लक्ष्य छिन्न करून एकाएकीं पृथ्वीवर पाडलें. त्या काळीं अंतरिक्षांत व राजांच्या समुदायांत एकाएकीं नाद झाला. पार्थाच्या मस्तकावर देवांनीं पुष्पवृष्टी केली. द्रुपदराजानें हें कृत्य पाहातांच सैन्यासहवर्तमान अर्जुनाच्या साह्यार्थ जाण्याविषयीं इच्छा धरिली. असे सभेंत तुमुल-महान शब्द होत आहेत तों युधिष्ठिर आपल्या दोन भ्रात्यांसहवर्तमान आपले राहाण्याचे ठिकाणीं गेला. इकडे अर्जुनानें लक्ष्य विद्ध केलेलें पाहातांच द्रौपदीनें अर्जुनाच्या गळ्यांत माळ घातली. तो अचिंत्य कर्मा अर्जुन, पत्नीसहवर्तमान त्या सभेंतून निघाला. असा विषय या अध्यायांत आहे.

१८९ अ० एकशें एकुणनवद- वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, द्रुपदराजानें ब्राह्मणास आपली कन्या दिली हें पाहून सकल राजे आप आपल्यांत बोलले कीं, पहा आपण सकल क्षत्रिय येथें आलों असतां द्रुपदराजा, द्रौपदी ब्राह्मणास देतो काय? त्यापेक्षां हा दुराचारी आहे, याचा पुत्रासहवर्तमान घात करावा अथवा या कन्येस अग्नींत टाकून आपण आप आपल्या राष्ट्राचे ठायीं जावें. असा निश्चय करून ते सकल राजे द्रुपदास मारण्याकरितां एकाएकीं हस्तामध्यें धनुष्यबाण घेऊन बाणवर्षाव करूं लागले. तें पाहून द्रुपदराजा सकल ब्राह्मणांस शरण गेला असतां पांडुपुत्र, द्रुपदावर वेगानें आलेल्या बाणांचा निवारणार्थ पुढें गेले. त्या काळीं सर्व क्षत्रिय हस्तांत शस्त्रास्त्रें घेऊन परमवेगानें पांडुपुत्रांवर धांवले. तेव्हां महाबली जो भीमसेन यानें एक वृक्ष उपटून तो अर्जुनाच्या समीपभागीं उभा राहिला तसाच अर्जुनही भीमसेनाचें अद्भुत कर्म पाहून निर्भय पणें उभा राहिला असतां त्यास पाहून भगवान श्रीकृष्ण बलरामास बोलला कीं, हे हलधरा, जो आपल्या हस्तांत धनुष्य घेऊन उभा राहिला आहे तो अर्जुन आणि जो वृक्षाचें उत्पाटण करून राजांच्या समुदायावर एकाकीं धावून गेला तो वृकोदर होय. समरामध्यें असें कर्म करणारा वृकोदरावांचून या भूमंडळावर दुसरा कोणी नाहीं आणि जो पूर्वींच ब्राह्मण समुदायांतून उठून गेला तो धर्मपुत्र होय. जे उ-

भयतां कुमारधर्माच्या मागून गेले ते नकुल सहदेव होत असा मला तर्क दिसतो. ते व्हां लाक्षा गृहापासून पृथे सहवर्तमान पांडव मुक्त झाले हें मी ऐकिलें होतें तें सत्य आहे. असें कृष्णाचें भाषण ऐकून बलराम बोलला-कीं, हे कृष्णा, कौरवां पासून मुक्त झालेली आपली पितृस्वसा कुंती तिला पाहून मी केव्हां संतोषपावेन १ असा विषय या अध्यायांत आहे.

१९० अ० एकशेंनव्वद- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीमार्जुनाचें आणि सकलराजांचें युद्ध चाललें हें पाहून सकलऋषी कमंडलू हातांत घेऊन भीमार्जुनास बोलले कीं, हे विप्रहो, भिऊं नका, आम्ही शत्रूशीं युद्ध करण्यास येतों. असें विप्रांचें भाषण ऐकून अर्जुन बोलला कीं, अहो विप्रहो, तुह्मी माझे पृष्ठ भागीं उभेराहून काय होतें तें पाहा. असें बोलून भीमा सहवर्तमान अचलगिरीसारखा शत्रूच्या अग्रभागीं उभाराहिला आणि युद्धदुर्मद कर्णप्रमुख क्षत्रियांवर धाऊन गेले, त्या कालीं ते सकल क्षत्रिय असें बोलले कीं, ब्राह्मण युद्धास आलात त्याचा ही युद्धांत वध करावा असें ह्मणून कर्ण अर्जुनावर व शल्य भीमावर धांवून गेला, दुर्योधनादिक सकल क्षत्रिय ब्राह्मणांवर धावून युद्ध करूं लागले, त्या कालीं अर्जुनानें धनुष्याचें आकर्षण करून तीक्ष्ण बाणानें कर्णास विद्ध केलें असतां या ब्राह्मणाचें भुजबळ अर्जुनाच्या भुजा सारखें दिसतें तेव्हां याशीं निकट युद्ध केलें पाहिजे, असें कर्णानें जाणोन अर्जुनावर तीबाणाचा वर्षाव करूं लागला. त्याकालीं कर्णाचे वेगवान बाण आले असें जाणोन अर्जुनानें बाणाच्या योगें सर्व सैन्याचा नाश करून कर्णासही व्यास केला असतां कर्ण बोलला कीं. हे विप्रा, तुझा भुजवीर्यें करून युद्धामध्यें मी तृप्त झालों, शस्त्रास्त्रामध्यें तूं परम निपुण होस, त्यापेक्षां तुझा विजय होण्यास कठिण कार्य हे विप्रोत्तमा, मला असें दिसतें कीं तूं साक्षात् धनुर्वेत्ता भार्गवराम आहेस किंवा विष्णु भगवान् अच्युत ज्यास ह्मणतात तो आहेस, तूं आपलें रूप अच्छिन्न करून विप्ररूपानें माझाशीं युद्धास आलास असें वाटतें. मी युद्धामध्यें क्रोधिष्ट झालों असतां माझाशीं युद्ध करितां इंद्र अथवा अर्जुनावांचून दुसरा पुरुष या भूमंडळावर प्राप्त होण्यास योग्य नाहीं, असें कर्णानें भाषण केलें असतां अर्जुन बोलला हे कर्णा, मी साक्षात् धनुर्वेद नाहीं अथवा साक्षात जामदग्न्य रामही नाहीं, सकलयोध्यांमध्यें श्रेष्ठ असा मी ब्राह्मण जातीय आहें, गुरूचे ह

पें करून ब्रह्म व ऐंद्र नामक अस्त्रामध्यें मी शिक्षित आहें. हे वीरा, तुला रणामध्यें जिंकावा ह्मणून तुझ्या अग्रभागीं स्थित आहें तूंही स्थिर हो. असें अर्जुनाचें भाषण ऐकून ब्रह्मतेज अनिवार्य आहे त्यापेक्षां आपलें तेज याच्या अग्रभागीं चालणार नाहीं असें कर्णानें जाणोन तो युद्धा पासून माघारा फिरला. इकडे सभेचे एक बाजूकडे महाबली शल्य आणि वृकोदर यावीरांचें परस्पर युद्ध होऊं लागलें आणि परस्परांवर धावून जाऊन मुष्टीचा प्रहार करीत असतां चरचर शब्द होऊं लागले असें एक मुहूर्त पर्यंत उभयतांचें बाहु युद्ध होऊन शेवटीं भीमानें शल्यास पृथ्वीवर हापटला. हें कृत्य पाहून ब्राह्मणानीं हास्य केलें. सर्वांस असें आश्चर्य झालें कीं, हा ब्राह्मण इतका बलिष्ठ असतां शल्यास खालीं पाडल्यावर त्याचा वध करीत नाहीं. शल्य पृथ्वीवर पतन पावल्यावर त्यास या ब्राह्मणा विषयीं मोठी शंका उत्पन्न झाली. तसेच कर्ण व इतर राजे शंकित होऊन वृकोदरास बोलले कीं, हे ब्राह्मण हो, तुह्मीं कोण आहां, तुमचे जन्म कोणच्या देशांत झाले व तुह्मी कोठें राहातां तें सांगा. असें सर्व क्षत्रिय भाषण करीत असतां श्रीकृष्णानें हे कुंती सुतच आहेत असें जाणून तो सर्व राजांस बोलला कीं, धर्में करूनच यांस द्रौपदी मिळाली असतां तुह्मीं कलह कां करितां. असें श्री कृष्णाचें भाषण ऐकून सकल राजे विस्मय पाऊन आप आपले स्थानीं गेले. ब्राह्मणानीं सकल सभा जिंकून पांचालिस हरण केली, असें भाषण करीत कांहीं लोकांचा समुदाय जाऊं लागला. तंतर सकल शत्रुंचा समुदाय नष्ट झाल्यावर कृष्णाजीन पांघरलेले भीमार्जुन द्रौपदीस बराबर घेऊन सकल ब्राह्मणां सहवर्तमान चालले असतां पौर्णिमेचे दिवशीं चंद्रसूर्य जसे शोभतात तसे ते उभयतां शोभले. इकडे पांडवांची माता कुंती मनांत चिंताग्रस्त होऊन ह्मणते कीं, अद्याप आपले पुत्र भिक्षा ग्रहण करून कां येत नाहींत! धृतराष्ट्र पुत्रांस समजल्या वरून त्यांणीं माझ्या पुत्रांचा घात तर केला नसेलना। व्यासाचे भाषणांत विपरित कसें झालें! या प्रकारें कुंती चिंता करित बसली असतां उभयतां भीमार्जुन ब्राह्मणां सहवर्तमान सकल लोक निद्रिस्थ झाल्यावर रात्रीच्या अपराण्हकालीं कुलालगृहीं आले. असा विषय या अध्यायांत आहे.

१९१अ. एकशें एक्याण्णव.- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, ते भीमार्जुन याज्ञसेनी सहवर्तमान कुलालगृहीं येऊन मातेस बोलले कीं, हे माते, ही

भिक्षा आणिली आहे, त्याकालीं पृथागृहाच्या अंतःप्रदेशीं स्थित असल्या-मुळें पुत्रांस न पाहातां बोलली कीं, हे पुत्रहो, जी भिक्षा आणिली असेल तिचा सर्वांनी उपभोग करावा. असें भाषण करून बाहेर आली आणि द्रौपदीस पाहून बोलली कीं, अरेरे! काय हें मी दुःखकारक भाषण केलें असें ह्मणोन चिंताग्रस्त झाली आणि याज्ञसेनीस हस्तामध्यें धरून युधिष्ठिरास बोलली कीं, हे पुत्रा, ही द्रुपदाची कन्या तुझा कनिष्ठ भ्रात्यानें आणून मला सांगितलें कीं, आह्मीं भिक्षा आणिली आहे, तेव्हां मी पुत्रास उचितच बोलल्यें कीं सर्वांनीं मिळोन तिचा उपभोग करावा. यास्तव हे कुरुश्रेष्ठा, आज हें माझें भाषण अनृत न होऊन पांचाल राजकन्येविषयीं अधर्म उत्पन्न न होतां धर्मापासून विभ्रम न व्हावा असें होण्यास काय उपाय असेल तो सांग. असें कुंतीचें भाषण ऐकून महाबुद्धिमान धर्मराजा एक मुहूर्त चिंताग्रस्त झाला आणि कुंतीस आश्वासन देऊन धनंजयास असें बोलला कीं, हे अर्जुना, तूं याज्ञसेनीस जिंकिलीस यास्तव ती तुझी भार्या होवो. अग्नी प्रदीप्त करून यथाविधी पाणिग्रहण करावें. असें धर्माचें भाषण ऐकून अर्जुन बोलला कीं, हे नरेंद्रा अशिष्टासारखा अधर्म मी कधीं करणार नाहीं. जेणेकरून मी अधर्मी होईन अशी मला प्रेरणा करूं नको. प्रथम तूं विवाहास योग्य आहेस तदनंतर भीमसेन नंतर मी नंतर नकुल सहदेव असा अनुक्रम असतां मला पाणिग्रहण करण्यास कसें सांगतोस. असें अर्जुनाचें भाषण ऐकून सकल पांडव द्रौपदीकडे एकसारखे पाहात असतां द्रौपदीनें आपली दृष्टी पांच पांडवांकडे एकसारखी लाविली. त्याकालीं पांचालीचें अत्यंत रूप पाहून पांच पांडवांचे मनांत कामाचा विकार उत्पन्न झाला. त्याकाळीं धर्म सर्वांचा आकार जाणोन द्वैपायनाच्या वचनाचें स्मरण करून सर्वांस बोलला-कीं, ही द्रौपदी सर्वांची भार्या होण्यास योग्य आहे. असें ज्येष्ठ भ्रात्याचें भाषण ऐकतांच सर्व त्याच अर्थाचें मनांत चिंतन करीत बसले आहेत, तों इतक्यांत श्रीकृष्ण सकल कौरवांस विचारून बलरामासहवर्तमान कुलालगृहीं जेथें पांडुपुत्र होते तेथें आले आणि धर्मराजामध्यें स्थित असून सर्व भ्राते आसमंतात् भागीं स्थित आहेत असें पाहून गृहांत गेल्यानंतर मी कृष्ण आलों असें धर्मराजास कृष्णानें सांगून धर्माचे घट्ट पाय धरले. पाठीमागून बलदेवानें

हीं धर्मराजाचे पाय धरले. नंतर पृथेकडे जाऊन उभयतांनींही पृथेच्या पायास अभिवंदन केलें. त्याकालीं सकल पांडव आनंदानें वासुदेवास बोलले कीं, कृष्णा, आह्मी येथें गुप्तपणें राहिलों असतां तुला कसें समजलें? असें पांडवांचें भाषण ऐकून भगवान हास्यपूर्वक बोलले कीं, अरे बाबा, अग्नि कितीजरी गुप्त ठेविला तथापि तो सर्वांस कळतो, तो पराक्रम आज तुह्मीं केलात. फार चांगलें झालें. घोर अग्नींतून रक्षित होत्साते आमच्या दृष्टीस पडलांत हें आमचें महत् भाग्य, असें आम्हीं समजतों. असो, कोणा क्षत्रियास नसमजतां आतां आह्मीं आपल्या शिबिरांत जातों. आह्मास अनुज्ञा असावी असें बोलून श्रीकृष्ण बलदेवासहवर्तमान आपले शिबिरीं गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

१९२ अ. एकशेब्याण्णव.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीमार्जुन हे उभयतां कुरुनंदन कृष्णेस घेऊन कुलालशाळेंत येण्यास निघाले असतां त्यांच्या पाठीमागून धृष्टद्युम्न कोणास नसमजतां निघाला. तो कुलालशाळेपर्यंत त्यांजबराबरच होता. नंतर ते उभयतां शाळेंत गेले आणि धृष्टद्युम्न त्या शालेबाहेर तसाच उभा राहिला. पुढें चार भ्राते पांडव भिक्षेकरितां नगरांत जाऊन भिक्षा घेऊन कुलालगृहीं आले. त्या कालीं कुंती द्रुपदकन्येस बोलली कीं, हे भद्रे, या भिक्षान्नांतून प्रथम बली दे, नंतर ब्राह्मणास देऊन इतर जे भिक्षोपजीवी मनुष्यें अन्नाची इच्छा करीत असतील त्यांस दे आणि अवशिष्ट जें राहील त्याचा अर्धभाग भीमास देऊन अर्ध जें राहील त्यांतून चार पांडवांचे चार, माझा एक भाग आणि तुझा एक या प्रमाणें साहा भाग कर. असें कुंतीचें भाषण ऐकून द्रौपदीनें सर्व अन्नाचे भाग केले. ते सकल पांडवांनीं भक्षून, नंतर माद्रीपुत्र सहदेवानें कुशानीं आस्तीर्ण केलेल्या शय्येवर प्रथम जाऊन शयन केलें. तसेंच सर्व वीरांनीं दर्भयुक्त आपआपल्या स्वकीय शय्येचा ठायीं शयन केलें. त्यांचे अग्रभागीं कुंती, पादप्रदेशीं कुशास्तीर्णावर द्रौपदीनें शयन केलें. त्याकालीं द्रौपदी मनांत कांहीं दुःख नमानितां त्या कुरुपुंगवाचा तिणें अवमान केला नाहीं. ते सकल शूर निद्रासमयीं नानाप्रकारच्या चित्रविचित्र सैन्यासंबंधीं कथा एकमेकांस सांगूं लागले. द्रौपदी त्या कथा ऐकण्याच्या इच्छेनें आपले कुशशय्येवर उठून बसली असतां पांडव तिकडे पाहूं लागले. हे सकल वृत्त रात्रीं झालेलें धृष्टद्युम्नानें आप

ले गृहीं येऊन द्रुपदास सांगितलें. तें ऐकून द्रुपद खिन्न होऊन पुनः धृष्टद्युम्नास बोलला कीं, हे पुत्रा, अरे ती आपली कन्या कोणी नेली असावी बरें, ती आतां कोठें आहे? कोणी शूद्रानें तर हरण केली नाहींना अथवा एखादे हीन जनानें किंवा लोकांस कर देणाऱ्या एखाद्या वैश्यानें तर नेली नसेलना? तुला ज्यापेक्षां या विषयीं किमपि खेद होत नाहीं त्यापेक्षां नरश्रेष्ठ पार्थ तर नसेलना, हे पुत्रा, वास्तविक जें असेल तें सांग. मला असें दिसतें कीं, पार्थानेंच हें लक्ष्य भिन्न करून पाडलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१९३ अ० एकशेंत्र्याण्णव.- वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, पित्याचें भाषण ऐकून धृष्टद्युम्न हर्षित होऊन बोलला कीं, हे तात, कृष्णाजिन परिधान केलेला; देवासमान ज्याचें रूप, ज्याणें कार्मुकास प्रत्यंचा लाऊन लक्ष्य वेधून पृथ्वीवर पाडलें, ज्याणें वृक्षांचें उत्पाटण करून सकल पार्थिव समुदायाचा पराभव केला. असे हे उभयतां नरेंद्र कृष्णेस घेऊन नगराच्या बाहेर कुलालशाळेंत गेले ते मी पाहिले. त्याच शालेमध्यें कोणीएक स्त्री अग्नीज्वाले सारखी देदीप्यमान होती ती या उभयतांची जननी असावी असा माझा तर्क आहे. या उभयतां सारखे दुसरे तीन पुरुष अग्नीज्वाले सारखे कांतीमान तेथेंच स्थित होते. या उभयतांनीं कुलालशाळेंत जाऊन कृष्णेस तिच्या अग्रभागीं नेऊन ठेविली असतां कृष्णेस तिणे आशीर्वाद दिला पुढें त्यांतून चार पुरुष भिक्षे करितां नगरामध्यें जाऊन भिक्षा घेऊन पुनः मायारे त्या कुलालशालेंत आले असतां त्यांच्या जननीच्या आज्ञें करून द्रौपदीनें त्या भिक्षेंतून प्रथम कांहीं बलिदान करून व कांहीं ब्राह्मणास देऊन नंतर अवशिष्ट राहिलेल्या अन्नाचे विभाग केले. नंतर प्रथम त्या स्त्रीस वाढून मग त्या नरानीं भोजन केलें. पुढें ते दर्भांनीं युक्त शय्येवर निजत असतां त्यांचे पाद प्रदेशीं कृष्णा निजली. ते वीर शयन कालीं कालमेघा सारखे गर्जना करीत नाना प्रकारच्या चित्रविचित्र कथा एकमेकांस सांगत होते. त्या शूद्र संबंधीं अथवा ब्राम्हण संबंधीं नवत्या, त्या सर्व वीरांच्या त युद्ध संबंधीं असल्यामुळें निःसंशयें करून कोणी तरी हे क्षत्रियश्रेष्ठ असावेत अथवा अग्निदाह पासून मुक्त झालेले पांडव असतील अशाद्या त्यांच्या आचरणें करून ते पांडवच असतील असें वाटतें. असें धृष्टद्यु

त्याचें भाषण ऐकून द्रुपद राजानें आपले उपाध्यास पांडवांकडे जाण्यास आज्ञा दिली असतां तो कुलालशाळेंत आला आणि पांडवांस असें बोलला कीं, हे ब्राह्मणांनो, सकल राजांमध्यें वरिष्ठ जो द्रुपद राजा तो अशी इच्छा करितो कीं, जाणें हें लक्ष्य विद्ध केलें तो कोण जातीय आहे. यास्तव तुह्मीं कोणत्या कुलांत व कोणत्या ज्ञातींत उत्पन्न जाहालां हें सांगितलें असतां सपुत्र सामात्य पांचाल राजाच्या हृदयांत अत्यंत आल्हाद होईल. पांडुराजा द्रुपद राजाचा अत्यंत प्रियसखा होता, तेव्हां द्रुपदाची अशी मनीषा होती कीं, मी आपली कन्या पांडुराजाचे पुत्रास देईन. ही द्रुपद राजाची इच्छा त्याच्या हृदयांत असल्यामुळें त्याचा संकेत अर्जुनासच देण्याचा होता त्याकरितांच त्याणें हा समारंभ केला. तें त्याचें भाषण सत्य व्हावें अशी आमची इच्छा आहे, असें पुरोहितानें भाषण ऐकून युधिष्ठिरानें भीमसेनास आज्ञा केली कीं, मान्य जो द्रुपद राजा याचा पुरोहित आला आहे तोही आपल्यास मान्य आहे. त्यापेक्षां त्याचें पाद्य अर्घ्यादिकें करून पूजन कर. असें धर्मराजानें भाषण ऐकून भीमसेनानें पुरोहिताची पूजा केली. नंतर युधिष्ठिर त्यास बोलतो हे ब्रह्मन्, पांचाल राजानें आपली कन्या यथा प्रतिज्ञे प्रमाणे वीरास अर्पण करण्याचा ज्या कालीं उद्देश केला त्याकालीं वर्ण, शील, कुल, व गोत्र याची कांहीं विवक्षा केली होती कीं काय? जो लक्ष्य विद्ध करिल त्याणे ही कन्या घ्यावी असें होतें त्या प्रतिज्ञे प्रमाणें कृष्णाजिन धारण केलल्या या ब्राह्मणानें सर्व राजांच्या समुदायांतून हरण केली यास्तव तूं आतां पांचाल राजास जाऊन सांग कीं, तूं आपल्या कन्ये विषयीं संताप करण्यास योग्य नाहींस. हें कर्म करणारा इतर मानव या भूमंडळीं दुर्लभ आहे. असें युधिष्ठिर राजा पुरोहिताशीं भाषण करीत आहे तों पांचाल राजाचा एक दूत भोजनाची सिद्धता आहे हें सांगण्याकरितां पांडवांकडे आला. असा विषय या अध्यायांत आहे.

१९४ अ. एकशेंचव्याण्णव- दूत बोलतो, द्रुपद राजानें वरपक्षीय लोकांस विवाह कालीं भोजन देण्याकरितां अन्न सिद्ध करून ठेविलें आहे यास्तव सर्वांनीं या रथांत बसून द्रुपद राजाचे गृहीं भोजनास चलावें, कृष्णेचा पाणिग्रहण समारंभ तेथेंच होईल. असें दूताचें भाषण ऐकून ते कुरुपुंगव द्रुपद पुरोहितास पूर्वीं द्रुपदाकडे जाण्या विषयीं आज्ञा देऊन नंतर आपण द्रुपद गृहीं जा-

ण्यास रथारूढ होऊन निघाले असतां कुंती व कृष्णा एक रथांत आरूढ हो ऊन त्या समागमें निघाली. कुंती सहवर्तमान समग्र पांडव द्रुपद गृहीं जातांच पुरोहितानें धर्मराजाचें समग्र भाषण द्रुपदास सांगितलें असतां हे क्षत्रिय आहेत किंवा इतर जातीय आहेत याची परिक्षा करण्या करितां द्रुपदराजानें आपले गृहीं स्थला स्थलाचे ठायीं, अनेक प्रकारचीं द्रव्यें, फलें, कवचें, चर्में, कृषी कर्मसंबंधीं पदार्थ, तसेच क्रीडा संबंधीं पदार्थ, महान महान खड्गें, चित्रविचित्र परशु, रथ, धनुष्यें, उत्तमोत्तम शय्यासनें, नाना प्रकारचीं वस्त्रें ठेविलीं होतीं. तीं इतक्यांत सकल पांडव राज भवनीं येतांच कुंती द्रौपदीस घेऊन द्रुपदाच्या अंतःपुरांत गेली. पांडव रथांतून उतरतांच सिंहासारखी ज्यांची गती असे द्रुपदानें पाहून तो परम हर्ष पावला. नंतर ते वीरश्रेष्ठ आसनावर बसून जांबुनदमय पात्राचे ठायीं नाना प्रकारचे पदार्थ, उत्तम प्रकारचीं कुंडलें व भूषणे धारण केलेल्या दासी व दासानीं परिवेषित केली असतां त्या विरानीं यथेच्छ भोजन करून नंतर ते आसनावरून उठले आणि ज्याज्या स्थलीं जे जे पदार्थ यांच्या परिक्षे करितां स्थापिले होते त्या स्थलीं गेले. हें त्या वीरानें कृत्य पाहून द्रुपदानें निश्चय केला कीं, हे कुंतिसुत पांडवच आहेत यांत संशय नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१९५ अ. एकशेंपंच्याण्णव:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, ते सकल पांडव सांग्रामिक पदार्थ स्थापित केलेल्या स्थलीं गेल्यावर द्रुपदराजा युधिष्ठिरास बोलला कीं, हे विप्रहो, तुह्मी क्षत्रिय अथवा ब्राह्मण, गुणसंपन्न वैश्य अथवा शूद्रयोनीज आहांत यांचा निश्चय आह्मीं कसा समजावा. अथवा तुह्मीं देव असून कपटानें विप्राचें रूप धारण करून सकल द्रौपदीच्या प्राप्ती करितां दिशेच्या ठायीं संचार करीत आहांत कींवा काय? याविषयीं मला संशय उत्पन्न झाला आहे तो दूर होण्या करितां तुमच्या ज्ञातीचा निश्चय मला सांगा. असें द्रुपदराजाचें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलला कीं, हे पांचाल राजा, खिन्न मनस्क होऊं नको प्रीतीयुक्त ऐस, तुझी जी इच्छा होती तीच आज निःसंशय सिद्ध झाली. अरे राजा, माहात्मा जो पांडुराजा त्याचे आह्मीं पुत्र क्षत्रिय आहोंत. त्या राजाचा ज्येष्ठ पुत्र कुंती पासून झालेला तो मी, ज्या उभयतांनीं राजसभेपा-

स्ून तुझी सत्ता हरण केली ते भीमार्जुन आणि जेथें तुझी कन्या द्रौपदी आहे तेथें माझी माता कुंती आहे, तेथें जे उभयतां पुरुष आहेत, ते नकुळ आणि सहदेव असें जाण. आतां तूं आमचा गुरु झालास त्यापेक्षां तूंच आमचें परमपरायण स्थान होय. असें युधिष्ठिराचें भाषण ऐकून द्रुपदराजास अत्यंत हर्ष झाला. पुनः द्रुपदराजा युधिष्ठिरास बोलला कीं, तुह्मीं लाक्षागृहापासून मुक्त होऊन येथें कसे आलां हें मला सांगा. असें द्रुपदाचें भाषण ऐकून धर्मराजानें लाक्षागृह संबंधीं झालेलें वर्तमान यथानुक्रमें सांगितलें. तें ऐकून द्रुपदानें धृतराष्ट्र राजाची अतिशय निंदा केली आणि कुंती पुत्र जो युधिष्ठिर यास पुनः राज्य देण्याविषयीं अश्वासन दिलें. नंतर कुंती, कृष्णा, भीमसेन, अर्जुन व नकुल सहदेव या सर्वांस राहाण्याविषयीं एक मोठें स्थल देऊन त्या स्थलीं ते राहात असतां राजानें त्यांचा परम सत्कार केला. पुढें आपल्या पुत्रांसहवर्तमान राजानें असा निश्चय केला कीं, पुण्यदिवशीं अर्जुनासहवर्तमान द्रौपदीचें यथाविधि पाणिग्रहण करावें हा राजाचा विचार ऐकून धर्मराजा द्रुपदास बोलला कीं, हे राजा, भार्यासंबंध मला ही कर्तव्य आहे. असें धर्माचें भाषण ऐकून द्रुपद बोलला कीं, हे युधिष्ठिरा, जशी तुझी इच्छा असेल त्याप्रमाणें मला सांग ह्मणजे तसें होईल. असें द्रुपदाचें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलतो हे द्रुपदराजा, ही तुझी कन्या द्रौपदी आह्मा सर्वांची भार्या होवो असा आमचे मातेनें आह्मास वर दिला. यास्तव तुझी कन्या अर्जुनानें जरी हरण केली तथापि आह्मीं त्या सर्व रत्नाचे उपभोग करणारे आहोंत. यास्तव धर्में करूनच तुझी कन्या आमची महिषी झाली. असें धर्मराजाचें भाषण ऐकून द्रुपद बोलतो हे कुरुनंदना, एक पुरुषास बहुत स्त्रिया उक्त आहेत; परंतु एक स्त्रीस बहुत पती मी कोठें ऐकिले नाहींत, यास्तव लोक व वेदविरुद्ध अधर्म तूं कसा आचरतोस? असें द्रुपदाचें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलतो हे महाराज, धर्माची गती फार सूक्ष्म असे त्यामुळें आह्मीं जाणत नाहीं; परंतु आमच्यापेक्षां जे वृद्ध पूर्वज आहेत त्यांणीं जो धर्म आचरण केला त्याच मार्गानें आह्मीं जातों. असें धर्मराजाचें भाषण ऐकून द्रुपद बोलतो तुझी माता कुंती, तूं व माझा पुत्र धृष्टद्युम्न हे एकत्र मिळून उद्यां याचा विचार करूं. असें द्रुपदानें भाषण केल्यावर दु-

सरे दिवशीं हे सकल एकत्र मिळोन विचार करीत असतां व्यास त्यास्थळीं एकाएकीं आले. असा विषय या अध्यायांत आहे.

१९६ अ. एकशें शाण्णवः- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कृष्ण द्वैपायन व्यास येतांच सकल पांडव व द्रुपद यांनीं व्यासास अभ्युत्थान देऊन त्याची उत्तम प्रकारें पूजा केली. नंतर द्रुपद राजा व्यासांस बोलला कीं, हे भगवन्, एक स्त्री बहुतांची धर्मपत्नी कशी होईल? झाली असतां संकर होणार नाहीं कीं काय? असें द्रुपदाचें भाषण ऐकून व्यास बोलतात हे राजा, लोक व वेदविरुद्ध असा हा अधर्म आहे असें तुला वाटतें तर या विषयीं तुमचीं कोणाचीं कसकशीं मतें आहेत तीं मला सांगा. असें व्यासाचें भाषण ऐकून द्रुपदराजा बोलतो हे द्विजसत्तमा, एक स्त्री बहुतांची कधींही होत नाहीं. महान् महान् पूर्वी झालेले जे विद्वान यांणीं हा धर्म कधींच आचरण केला नाहीं. यास्तव प्रस्तुत हा धर्म करण्यास मी इच्छित नाहीं. असें द्रुपद राजानें भाषण केल्यावर धृष्टद्युम्न बोलला कीं, हे तपोधन व्यासा, धर्मराजा पेक्षां कनिष्ठ जो अर्जुन याची ही द्रौपदी भार्या होण्यास योग्य असतां ती ज्येष्ठाची भार्या कशी होईल? हा धर्म किंवा अधर्म, याचा निश्चय करण्यास मी अशक्य आहें; परंतु ही माझी भगिनी कृष्णा पांच जणांची भार्या कशी होईल, याचा निश्चय करून आपणच सांगावा. असें धृष्टद्युम्नानें भाषण केल्यावर युधिष्ठिर-व्यासास बोलला कीं, हे द्विजोत्तमा व्यासा, माझी वाणी अनृत कधीं ही व्हावयाची नाहीं, यास्तव मी जें भाषण केलें तो माझा धर्मच आहे. या विषयीं पूर्वी पुराणा मध्यें अशी एक कथा ऐकिली कीं, गौतम ऋषीची कन्या जटिला नामक होती, ती सर्व धर्म जाणणाऱ्यां मध्यें श्रेष्ठ असून तिणें सात ऋषि पती केले होते. तसाच कोणी एक महान तपस्वी मुनी होता त्याची वार्क्षी नामक कन्या, दहा प्रचेतस नामक भ्राते ऋषी होते, त्यांची स्त्री झाली. याजवरून असें दिसतें कीं, गुरूचें वचन हा च धर्म आहे. त्या पेक्षां आमची माता आह्मास परम गुरू असल्या मुळें तिणें भिक्षा सर्वांनीं वांटून घ्यावी; असें सांगितलें तोच आह्मास मोठा धर्ममार्ग होय. असें युधिष्ठिराचें भाषण ऐकून कुंती बोलली कीं हे व्यासा, अनृता पासून मला जें हां तीव्र भय उत्पन्न जालें, तेव्हां मी धर्मराजास हें वृत्त सांगितलें असतां त्याणें मला असें सांगितलें कीं, ही द्रौपदी पांच जणांची पत्नी होईल. असें कुंतीनें भाष

ण ऐकून व्यास पांचाल राजास बोलतात हे राजा, हा सनातन धर्म मी तुला सां गतों. आतां धर्मराजानें जें तुला सांगितलें त्या प्रमाणें तूं निःसंशय कर. असें बोलून व्यासानें द्रुपद राजाचा हस्त धरला आणि उभयतां अंतःपुरीं गेले. नंतर पांडव, कुंती व धृष्टद्युम्न हे आप आपल्या स्थलीं जाऊन उभयतांच्या आगमनाची मार्ग प्रतीक्षा करीत बसले. इकडे व्यास बहुतांस एकपत्नी होण्याचा धर्म, पांचाल राजास सांगूंलागले. असा विषय या अध्यायांत आहे.

१९७ अ० एकशेंसत्याणव:- व्यास बोलतात हे द्रुपदा, पूर्वी नैमिष्या रण्याचे ठाईं सकल देव सत्र करीत होते; त्या सत्रांत विवस्वान पुत्र यम पशु वध करीत होता. तेव्हां यमसत्रांत दिक्षित असल्यामुळें प्रजेचा त्याणें संहार केला नाहीं. या कारणावरून प्रजाच्या मरणकालाचें अतिक्रमण होऊन दिवसें दिवस पृथ्वीवर त्यांची वृद्धी होऊं लागली असतां सोम, शक्र, वरुण, कुबेर, साध्य, रुद्र, वसु, अश्विनी कुमार व इतर सर्व, ब्रह्मदेव यांच्या सदनीं जाऊन त्यास बोलले कीं, हे ब्रह्मदेवा, पृथ्वीवर मनुष्यांची वृद्धी अतिशय झाल्यामुळें आह्मासमोर्वे भय झालें आहे. यास्तव जेणें करून आह्मी सुखी होऊं असें कर असें देवांचें भाषण ऐकून पितामह बोलला हे देवहो, तुह्मी अमर असल्या मुळें मनुष्या पासून तुह्मास भय काय? असें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून देव ह्मणतात हे पितामह, अमर आणि मनुष्य यां उभयतां मध्यें अंतर कांहीं नाहीं ह्मणोन आह्मास खेद झाला आहे. तेव्हां देवास मनुष्या पेक्षां कांहीं विशेष अंतर असावा अशी इच्छा धरून आह्मी आ होंत. असें देवाचें भाषण ऐकून भगवान बोलला, देवहो, विवस्वान पुत्र यम सत्र कर्मा मध्यें गुंतला आहे ह्मणोन मनुष्यास मृत्यु येत नाहीं. सत्र समाप्त झाल्या वर यम सर्वलोकांचा अंत करील. व्यास ह्मणतात हे राजा, असें ब्रह्मदेवानें देवास सांगितलें असतां ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून जेथें देवांचें सत्र होतें तेथें जाण्यास सोम व इंद्रादिदेव निघाले असतां मार्गांत भागीरथी पाहून त्या नदी मध्यें एक उत्तम प्रकारचें कमल पाहून सकल देवांस परम विस्मय झाला आणि सकलां मध्यें इंद्र शूर होता ह्मणोन जेथून गंगेची उत्पत्ती जाली त्या स्थला पर्यंत कमल ग्रहण करण्याच्या इच्छेनें गेला असतां तेथें एक अग्नि सारखी जाज्वल्यमान् स्त्री नदी मध्यें स्नान करून जलाच्या इच्छेनें रोदन करीत बसली होती.

तिच्या नेत्रांतून जे जे बिंदु नदीमध्यें पडत त्या त्या बिंदु पासून कांचन मय पद्में उत्पन्न होत. हें अद्भुत कृत्य पाहून इंद्र त्या स्त्रीच्या सन्निध गेला आणि तिजला बोलला कीं, हे भद्रे, तूं कां रोदन करितेस तें मला यथातथ्य सांग. असें इंद्राचें भाषण ऐकून स्त्री बोलली हे शक्रा, मी मंदभाग्या कशा करितां रोदन करितें, या चें कारण मी जिकडे जाईन तिकडे माझ्या मागें ये ह्मणजे सर्व तुझ्या दृष्टीस पडे ल. या प्रकारें शक्रास सांगून ती स्त्री त्या स्थला पासून निघाली असतां इंद्र ही तीच्या पाठीमागें गेला. पुढें जातां जातां जवळच एक सिंहासनावर स्थित आ णि युवती स्त्री सहवर्तमान अक्षक्रीडा करणारा, तरुण व अति सुंदर असा पुरुष हिमाचलाच्या मस्तक भागीं पाहून त्यास इंद्र बोलला कीं, हे भगवन् मी इंद्र आहें हें तूं जाणलेंस नाऽपुनः क्रोधयुक्त होऊन इंद्र असें बोलला कीं, तूं अक्ष क्रीडे मध्यें अतिमत्त जालास मजप्रत जाणत नाहींस काय? मी सकलदेवांचा ईश आहें; असें ह्मणोन नंतर हस्तामध्यें चक्र घेऊन त्यास मारण्यास उद्युक्त जाला असतां महादेवानें हळू हळू हास्य पूर्वक इंद्रा कडे पाहातांच देवराज इंद्र स्था णू सारखा तेथेंच स्तंभीत झाला. नंतर देवांची अक्षक्रीडा समाप्त झाल्यावर इंद्रा बराबर जी स्त्री आली होती तीस बोलला कीं, या इंद्रास माझ्या सन्निध आ ण म्हणजे त्याचा दर्प मी अगदीं निःशेष करून टाकितों. असें त्या स्त्रीस सांग तांच स्त्रीनें शक्रास स्पर्श केला असतां इंद्राचीं सकल शरीरें गलित होऊन तो पृ थ्वीवर पडला. त्याकालीं पुनः तो इंद्रास बोलला कीं, हे शक्रा, असा दर्प तूं कधीं ही करूं नको; आतां ह्या पर्वतानें एक विवर आहे त्यांत तुझ्या सारिखेच चार पुरु ष वीर्यानें, बलानें व तेजानें युक्त आणि सूर्या सारखे कांतीमान आहेत त्यांत जाऊन तूं राहा. असें भाषण करून त्या उग्र तेजस्व्यानें गिरीचें विवर उघडून दा खवितांच त्यांत च्यार पुरुष महा तेजस्वी असे इंद्रानें पाहून त्यास असें भय उत्पन्न झालें कीं, या च्यार पुरुषांची जी गती आहे तशी माझी होणार कीं काय! असा इंद्र मनामध्यें विचार करून दुःखित झाला असतां इतक्यांत तो उग्रते जा गरीश आपले नेत्र कोपानें भरून करून इंद्रास बोलला कीं, हे शतक्रतु इंद्रा, पूर्वी तूं मौर्ख्यानें माझा अनादर केलास त्यापेक्षां आतां तूं या दरींत जा. असें महादेवानें भाषण केलें असतां इंद्र त्या हिमाचल पर्वताच्या अग्रभागीं

अश्वत्थ पर्णा सारखा थरथर कंपित होऊन महादेवास बोलला कीं, हे परमेश्वरा, तूंच सकल भुवनाचा गोसावी, द्रष्टा आहेस यास्तव तुला मी अंजली पुट जोडून नमस्कार करितों, मला येथून मुक्त कर. असें इंद्राचें भाषण ऐकून महादेव हास्य करून बोलला कीं, हे इंद्रा इतः पर दुसरे इंद्र यादरींत यावयाचे नाहींत, तस्मात् तूं कांहीं चिंता करूं नको, तुह्मी आतां पुढें मनुष्य लोकींच्या ठायीं उत्पन्न होऊन मोठ मोठीं कर्में कराल. सर्वांचा संव्हार करून नंतर आपल्या पूर्वार्जित कर्माच्या योगें इंद्रलोकीं प्राप्त व्हाल. हें जें मी भाषण केलें तें सर्व तुम्हीं भूमंडळीं जाऊन केलें पाहिजे. असें श्रीमहादेवानें भाषण केल्यावर विवरस्थ इंद्र बोलतात हे परमेश्वरा, तुझ्या अनुज्ञें करून आह्मीं देवलोकापासून मनुष्य लोकीं जातों परंतु आमच्या जननीचे ठायी. धर्म, वायु, इंद्र आणि अश्विनी कुमार यांणी प्रवेश करावा ह्मणजे आह्मीं जन्म घेतों. पुढें नाना प्रकारच्या दिव्यास्त्रांच्या योगें मनुष्या सहवर्तमान युद्ध करून त्याचा नाश झाल्यावर पुनः आह्मीं इंद्रलोकीं प्राप्त होतों, या सर्व कर्मा विषयीं तुझा आश्रय आह्मास असावा. असें पूर्वेंद्रानीं भाषण केलेलें ऐकून इंद्र उमापतीस बोलला कीं, हे परमेश्वरा, माझ्या वीर्यासमान माझ्यापासून उत्पन्न जालेला असा अंशभूत पांचवा पुरुष मी देईन. व्यास सांगतात हे पांचाल राजा, पशुपती सहवर्तमान ज्या पांच इंद्रानीं भाषण केलें त्यांचीं नामाभिधानें सांगतों. विश्वभुग, भूतधामा, शिबी, शांती व पांचवा तेजस्वी- अशीं आहेत. या इंद्राचें काम परिपूर्ण करण्याकरितां जें जें यास इष्ट होतें तें तें उमापती भगवान परिपूर्ण करण्यास सिद्ध झाला आणि या पांच पुरुषांस- एकच स्त्री पाहिजे; यास्तव स्वर्ग लक्ष्मीस मनुष्य लोकीं उत्पन्न होण्या करितां- श्री महा देवानीं आज्ञा दिली. नंतर उमापती या पांच इंद्रांस बरोबर घेऊन परमेश्वर जो. नारायण याच्या भुवनीं गेली असतां नारायणानेंही या पांच इंद्रास मनुष्य लोकीं जन्म घेण्यास आज्ञा दिली नंतर कांहीं दिवसानीं ते पांच इंद्र अंशानें पृथ्वीवर अवतीर्ण झाले. भगवान नारायण याणें आपले सित ह्मणजे श्वेत आणि कृष्ण ह्मणजे काळा असे दोन केश उपटून यदुकुलांत टाकले असतां श्वेत केशाचा अवतार रोहिणीचे ठायीं बलराम आणि कृष्ण केशाचा अवतार यशोदेच्या ठायीं श्रीकृष्ण उत्पन्न झाला. हे द्रुपदराजा, जे पूर्वीं हिमा-

चलाच्या दरीं मध्यें चार इंद्र होते ह्मणोन सांगितलें व जो साक्षात् इंद्र होता हे पांच पांडव पृथ्वीवर अवतीर्ण झाले.सव्यसाची अर्जुन हा साक्षात प्राप्त जालेल्या इंद्राचा अंश जाण व चार पांडव, दरिस्थ पूर्वीच्या चार इंद्रांचे अंश-आहेत आणि जी लक्ष्मी माया मनुष्य लोकीं यांची भार्या होण्याकरितां अवतरली ह्मणून सांगितलें, तीच द्रौपदी असें जाण.तूं मनांत विचार करून पहा बरें, स्त्री असून महीच्या उदरापासून दैवयोगानें कशी उत्पन्न जाली.या द्रौपदीचें रूप उत्तम असून जीची कांती चंद्र सूर्या सारखी आहे व जीच्या शरीराचा गंध एक कोश पर्यंत वाहतो, अशी अचिंत्य शक्ती दुसऱ्या स्त्रीस आहे काय.हे द्रुपद राजा, हें जें मी भाषण केलें याची सत्यता पाहाण्याची इच्छा असेल-तर परम प्रीतीनें तुला मी दिव्यचक्षु देतों त्याच्या योगें हे कुंति सुत तूं पाहशील.असें भाषण करून व्यासानीं आपल्या तपाच्या योगें द्रुपद राजास-दिव्य चक्षु दिले असतां सकल पांडव, दिव्य हेम किरिट व माला धारण-करून आदित्य वर्णा सारखे तेजस्वी, साक्षात् इंद्रच काय, अशा पांडवांस पाहून त्याच्या अग्रभागीं साक्षात् श्रीरूपिणी सोमवन्ही सारखी दे-दीप्यमान, पांच पतींस केवल रूपानें व यशानें योग्य अशा द्रौपदीस पाहून द्रुपद राजा आनंद पावला आणि सत्यवती सुत जो व्यास यास बोलला कीं, हे महाऋषी श्रेष्ठा, हीं असलीं कृत्यें तुझे ठायीं असल्यास यांत कांहीं आश्चर्य नाहीं.तूं सर्वांस मान्य व पूज्य आहेस; ही अद्भुत कृती पाहून आश्चर्य सागरामध्यें केवल मी निमग्न जाल्या सारखा झालों; आतां मला कोणतीही शंका नाहीं.असें द्रुपदाचें भाषण ऐकून व्यास बोलले कीं, हे पांचाल राजा, पूर्वीं तपोवनीं कोणी एक ऋषीची कन्या राहात होती.ती अत्यंत-रूपवती असून तिला तिच्या समान पती मिळाला नाहीं ह्मणून तिणे उग्र तप करून शंकराचें आराधन केलें असतां शंकर संतुष्ट होऊन बोलला कीं हे भद्रे, मी सुप्रसन्न झालों वर माग.असें ईश्वराचें भाषण ऐकून कन्या वारंवार बोलली कीं, हे ईश्वरा, सर्व गुणानीं युक्त अत्युत्तम असा पती मला दे मी पतीची इच्छा करीत आहें असें कन्येचें भाषण ऐकून भगवान् बोलला कीं, हे भद्रे, तुला पांच पती होतील.असें शंकराचें भाषण ऐकून कन्या बो-

लली कीं हे परमेश्वरा, सर्वगुणानीं युक्त असा एकपती मला दे. असें कन्येचें भाषण ऐकून शंकर बोलले कीं, हे भद्रे, तूं पांचवेळ भाषण केलेंस कीं, मला पती दे यास्तव तुला पांचपती होतील, हें माझें भाषण मिथ्या व्हावयाचें नाहीं. तुझें कल्याण असो, तुला या देहांत पांचपती नाहींत देहांतर होऊन पांचपती होतील. असें भाषण करून व्यास पुनः बोलतात हे द्रुपदराजा, तीही ऋषीची कन्या देवरूपिणी तुझ्या गृहीं उत्पन्न झाली. ही तुझी कन्या पांडवांस मोठ्या युद्धाचेठायीं स्वर्गश्री देणारी होय. तीच स्वर्गश्री तपाच्या योगें तुझी दुहिता जाहाली तीही तुझी दुहिता साक्षात् लक्ष्मीदेवी सकलदेवानीं सेवित, आपल्या कर्माच्या योगें पांचांची भार्या झाली. हीदेवपत्नी ब्रह्मदेवानें स्वतः आपण उत्पन्न केली आहे असें जाण. हें पांडवाचें व तुझ्या कन्येचें सकल वृत्त तुला निरोपण केलें. या उपर जसें तुला कर्तव्य असेल तसें कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१९८ अ. एकशें अठ्याण्णव.- द्रुपद बोलतो हे व्यासा, तुमचें हें भाषण पूर्वीं मीऐकिलें नवतें तों पर्यंत पांच पुरुषांस कन्या देण्याचा माझा निश्चय नवता; परंतु आतां निश्चय झाला. दैवानेंच प्रेरित हें कार्य उपस्थित झालें त्यापेक्षां दैवाचें अतिक्रमण करण्यास कोणी समर्थ नाहीं. एकपतीच्या लाभाकरितां पूर्वीं ऋषिकन्येनें तप केलें असतां दैवानें दुसरेंच उत्पन्न झालें ती कन्या शिवास अनेक पती मला नकोत ह्मणोन वारंवार ह्मणत असतां शिवानीं वरदिला कीं, तुला पांचपती होतील, तेव्हां शंकरानें केलें तेंच सत्य यांत धर्म असो अथवा अधर्म असो मी कांहीं जाणत नाहीं व माझा आतां अपराधही नाहीं, सर्ववेत्ता शंकर भगवान् तोच आमचें दैवत्य आहे आतां सर्वांनीं यथानुक्रमें करून कृष्णेचें पाणिग्रहण करावें असें मी इच्छितो. असें श्रीव्यासास बोलून धर्मराजास बोलतो हे राजा, तुह्मां सर्व पांडवांस आजचा दिवस फार शुभप्रद आहे व चंद्रमाही अर्थसिद्धी पुष्टी कर्ता आहे त्यापेक्षां आज तुह्मीं सर्वांनीं यथानुक्रमें कृष्णेचें पाणिग्रहण करावें, असें धर्मास बोलून पुत्रास बोलला कीं, कृष्णेला उत्तम प्रकारचें अभ्यंगस्नान घालून व नाना प्रकारचीं बहुत अमोलिक आभरणें घालून येथें आणा. असें द्रुपदाचें भाषण ऐकून धृष्टद्युम्नानें द्रौपदीस अलंकारानीं भूषित करून सिद्ध केली. लग्नसमारंभास द्रुपदराजाचे बहुत सुहृज्जन आले तसेच राजाचे मंत्री व नगरनिवासी पौरजन व मोठमोठे द्विज

श्रेष्ठ, हे समारंभास आले. राजानें सकलगृह, मंडप व गच्चा जिकडे तिकडे मनुष्यांनीं व्यास झाल्या. कोशगृहें रत्नानीं परिपूर्ण केलीं, भांडार गृहें धान्यानी भरून ठेविलीं. नंतर पांडुपुत्रानीं स्नान करून उत्तमोत्तम कुंडलें व आभरणें, अलंकार व योग्य वस्त्रें धारण करून आपलीं शरीरें चंदनानें विभूषित केलीं आणि मंगल संबंधीं कर्तव्य क्रिया करून आपला उपाध्याय जो धौम्य यासह वर्तमान द्रुपदाच्या सभेंत यथानुक्रमें आले. पुढें यथाविधी अग्नी सिद्ध करून होम केला. नंतर यथानुक्रमें कृष्णेचें पाणिग्रहण केलें असतां द्रुपदराजा अत्यंत संतोष पाऊन त्यानें विवाहकालीं आपल्या प्रत्येक जामातास बहुत द्रव्य दिलें. सुवर्णमाला धारण केलेले, अशा चारचार अश्वानीं युक्त मोठमोठे शंभर रथ दिले. उत्तम प्रकारच्या आभरणानीं व वस्त्रानीं भूषित केलेल्या असून अत्यंत तरुण अशा शंभर दासी दिल्या तसेंच गज व नाना प्रकारचीं उत्तम वस्त्रें व महा तेजस्वी अलंकार पृथक् पृथक् अग्निसाक्षिक द्रुपद राजानें जामातांस दिले असतां ते जामात त्यानीं घेऊन जामात बहुत शोभले. या प्रकारें द्रुपद राजाचे गृहीं पांडवांचा विवाह समारंभ होऊन पांडव सुखेंकरून पांचाल गृहीं राहिले. असा विषय या अध्यायांत आहे.

१९९ अ. एकशें नव्याण्णव- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, द्रुपद राजास पांडवांचा संबंध जाल्यावर राजानें देवापासून ही कधीं भय मानिलें नाहीं. द्रुपद राजाच्या सकल स्त्रियांनीं कुंतीच्या संन्निध येऊन तीस नमस्कार केला. तशीच द्रौपदी कुंतीच्या अग्रभागीं अंजली पुट जोडून उभी राहिली असतां रूपलक्षण संपन्न अशा स्नुषेस पाहून कुंती आशिर्वादयुक्त असें बोलली कीं, हे भद्रे, जशी इंद्राणी इंद्राशीं रममाण झाली, नलराजाचे ठायीं दमयंती, वसिष्ठाचे ठायीं अरुंधती, नारायणाचे ठायीं लक्ष्मी रममाण तशी तूं आपले पतीचे ठायीं रममाण हो. हे भद्रे, बहुत वर्षें वांचणारे, महा पराक्रमी अशा पुत्रातें परम सुखानें प्रसव. तूं अत्यंत भोग संपन्न होऊन पतिव्रत परायण हो त्याती यज्ञ पत्नी हो. अतिथी, साधू, वृद्ध, बाल, गुरु यांचें यथान्याय पूजन करण्यामध्यें तुझें वय अतिक्रांत होवो महा बलवान व पराक्रमी जे तुझे पती याणीं पराक्रमानें जिंकलेली सकल पृथ्वी अश्वमेध यागामध्यें ब्राह्मणास दान कर. पुढें तुझ्यापासून जे गुणवान पुत्र उत्पन्न होतील त्यांस पाहून मी आनंद पावेन. असें कुंतीनें द्रौपदीप्रत आशीर्वा-

द युक्त भाषण केल्यावर पांडवांचें सकल वर्तमान श्रीकृष्णास समजतांच. पांडव सपत्नीक झाले. असें जाणोन वैडूर्य मणी, नानाप्रकारचीं चित्रविचित्र हेमाभरणें नाना प्रकारच्या शालजोड्या, ज्यांस स्पर्श केला असतां अत्यंत सुखदेणारीं अमृन बहुतशःप्रभद अशीं कांहीं चमत्कारिक रत्नें, उत्तमोत्तम शयनासनें, गज, अलंकृत अश्व, हस्ती दंताचे रथ व असंख्यात सुवर्णाच्या रासी, श्रीकृष्णानें पांडवांस दिल्या. हें सकल द्रव्य घेऊन धर्मराजा हर्ष पावला. असा वि० या अ० आहे.

२०० अध्याय दोनशें:- वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, द्रौपदीचा विवाह समारंभ झाल्यानंतर सकलराजांचे जे दूत गुप्तरूपानें संचार करीत होते, त्याणीं आप आपल्या स्वामीस जाऊन सांगितलें कीं, द्रौपदी पांडवांस मिळाली; सभेंत ज्या धनुर्धाऱ्यानें धनुष्य घेऊन लक्ष्यवेध केला, तो माहात्मा, जयशाली अर्जुन होय आणि रणामध्यें क्रोधित होऊन ज्याणें मद्रराज प्रभृती राजांचा पराभव केला असतां त्याच्या अग्रभागीं उभे राहण्यास कोणाची शक्ती नाहीं तो सैन्याचा मर्दन कर्ता भीमसेन होय. सकल पांडव ब्राह्मणाचा वेषधारण करून प्रशांत झाल्या सारखे आले होते. हें पांडवांचें वृत्त सकल राजानीं दूत द्वारा ऐकूनने विस्मय पूर्वक बोलले कीं, कायहो, कुंती, पुत्रांसह वर्तमान लाक्षागृहीं दग्ध झाली म्हणोन आह्मीं पूर्वी ऐकिलें असतां असें कसें झालें. अस्तु पांडवांचा पुनर्जन्म झाला असें समजावें. कायहो, भीष्माचार्य व धृतराष्ट्र यांस धिःकार असो, दुष्ट जो विरोचन या पासून पांडवाचा घात करण्या विषयीं या उभयतांनीं योजिलें होतें. याप्रकारें स्वयंवरास जे राजे आले होते ते भाषण करून आप आपल्या देशीं गेले. तसेंच पांडवांचें वर्तमान दुर्योधनास समजतांच विमनस्क होत्साता सकल भ्राते, अश्वत्थामा, मातुल शकुनी, कर्ण व कृपाचार्य यांसहवर्तमान हस्तनापुरीं जाण्यास निघाला असतां त्याजप्रत परम लज्जें करून मंद मंद दुःशासन असें बोलला कीं, हे राजा, ज्याणें द्रौपदी ग्रहण केली हा खचित कोणी नरी ब्राह्मण जातीचा आहे, यांत संशय नाहीं. ब्राह्मणा खेरीज दुसरा क्षत्रिय, अर्जुनाशिवाय तूं असतां द्रौपदी हरण करण्यास कोणी समर्थ होणार नाहीं. परंतु हा अर्जुनच आहे असासचीत निश्चय करितां येत नाहीं. नशांतून दैव सर्वापेक्षां श्रेष्ठ आहे; पौरुष केवल निरर्थक होय. जर कदाचित पां

डव जिवंत आहेत तर आमच्या पौरुषास धिःकार असो. आम्हीं इतका उपाय केला असतां पांडव जिवंत राहिले काय! याप्रकारें संभाषण करीत करीत सकल कौरव दीन मनस्क होऊन हस्तनापुरीं गेले.त्या नंतर लाक्षागृहापासून पांडव मुक्त होऊन द्रुपदाची कन्या द्रौपदी त्यांस मिळाली आणि धृष्टद्युम्न, शिखंडी व इतर युद्ध विशारद राजे सर्व पांडवांस अनुकूल जाहाले, तेणें करून पांडवांचा उत्कर्ष झाला. हें वर्तमान धृतराष्ट्र पुत्रास समजतांच ते भग्नदर्प होऊन आतां हस्तना पुरीं प्राप्त जाले आहेत.असें विदुरास समजतांच हा प्रकार धृतराष्ट्रास निवेदन करण्याच्या उद्देशानें संतुष्ट होत्साता धृतराष्ट्रा सन्निध जाऊन विस्मय पूर्वक भाषण करिता जाहाला कीं,हे कुरुश्रेष्ठा,आपल्या कुरुवंशाची वृद्धी झाली.असें विदुराचें भाषण श्रवण करून आपल्या दुर्योधन ज्येष्ठ पुत्रास द्रुपद राजाची कन्या प्राप्त जाली;असें धृतराष्ट्र समजून परम प्रीतीनें असें भाषण करूं लागला. कीं, फार चांगलें झालें, हे विदुरा, दैव आमचें-, अरे कोण आहे;स्नुषेस उत्तम प्रकारचे बहुत अलंकार,भूषणें देण्यास आणून ठेवा आणि द्रौपदी व दुर्योधन या उभयतांस येथें घेऊन या.याप्रकारें धृतराष्ट्रानें भाषण केल्यावर पश्चात् विदुर भाषण करितो कीं, हे राजा,सकल पांडव कुशल आहेत,द्रुपद कन्या त्यांस प्राप्त होऊन द्रुपदानें त्यांचा मोठा-सत्कार केला. पांडवांचे इतर संबंधी स्वयंवरा करितां प्राप्त जाले होते, त्याचाही द्रुपदानें परम सत्कार केला असें वर्तमान आहे.असें विदुराचें भाषण ऐकून राजा बोलला हे विदुरा, फार चांगलें झालें माझ्या पुत्रां पेक्षां पांडुराजाच्या पुत्रांवर माझी प्रीतीतर फार अधिकच आहे. तूं वर्तमान सांगितलेंस तेणें करून माझे चित्तास-फारच आनंद झाला.द्रुपदराजाचा आणि आमचा संबंध जाहाला त्यापेक्षां माझी प्रीती आतां पांडवांवर फारच उत्पन्न जाहाली आहे, पांडव स्वतः वीर,महा-पराक्रमी असून त्यांस आतां द्रुपदराजाचा संबंध जाहाला,तेव्हां अशा पांडवांशीं वैर करण्यास कोण समर्थ होईल. द्रुपदाचें मित्रत्व असावें ह्मणोन सर्वराजे इच्छा करतात,तोच द्रुपद पांडवांचा स्वशुर झाला. ज्यास आपलें ऐश्वर्य जाण्याची इच्छा असेल तोच द्रुपदाचा द्वेष करण्यास इच्छील. असें धृतराष्ट्रानें भाषण केल्यावर विदुर बोलता हे राजा,प्रस्तुत जशी तुझी बुद्धी आहे,अशीच बुद्धी पांडवां

विषयीं सर्व काळ असो, असें म्हणोन विदुर त्या स्थळापासून स्वगृहीं गेला. त
नंतर दुर्योधन व कर्ण हे उभयतां धृतराष्ट्राजवळ येऊन बोलले कीं, हे राजा
विदुर संन्निध असतां तुला आह्मीं को णतें कांहीं गुणदोष सांगत नाहीं, यास्तव
विदुर गेल्यावर आह्मी एकांतीं जें काय सांगावयाचें तें सांगतों. आपली वृद्धी व्हा
वी ह्मणोन पांडवांशीं दुःसपत्न भाव केलास, आतां विदुराजवळ पांडवांच्या वृद्धी
विषयीं गोष्टी करतोस हें काय? हे राजा, पूर्वीं एकप्रकारची इच्छा करून नंतर
दुसऱ्या प्रकारचें कृत्य करण्यास इच्छितोस, असें आह्मास दिसतें. हे तात, जेणें क
रून आमचा पांडव घात करणार नाहींत याविषयीं आह्मीं निरंतर विचारांत अस
तों आणि तूं तर त्यांच्या वृद्धीची चिंता करितोस. असा विषय या अध्या० आहे.

२०१ अ० दोनशें एक.— धृतराष्ट्र बोलतो हे दुर्योधना, जें तुमच्या उभयतां
च्या मनांत आहे त्याचीच मी इच्छा करितों, तुमचा विचार विदुरास मी समजूं देत ना
हीं. मी पांडवांच्या गुणाचें विशेषें करून कीर्तन करितों तें माझें इंगीत व अभिप्रा
य विदुरास समजत नाहीं. यास्तव हे दुर्योधना, हे कर्णा, तुह्मीं पांडवांच्या अहिता
विषयीं काय योजिलें आहे तें सांगा. असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून दुर्योधन बो
लतो हे राजा, आपले आप्त असून भेद करण्याच्या कामांत मोठे कुशल अशा ब्रा
ह्मणाकडून गुप्तरूपानें पांडवांमध्यें भेद उत्पन्न करावा, कुंतीपुत्र व माद्रीपुत्र या
उभयतांचा कलह लावून द्यावा. अथवा द्रुपदराजास किंवा त्याचे पुत्रांस कांहीं
द्रव्याचा लोभ दाखवून पांडवांपासून त्यांचें पृथक् करण करावें. द्रुपदराजाचे सर्व
अमात्य द्रव्यलोभानें फितवावे. द्रुपदराजा पांडवांचा पक्षपात जेणें करून न करी
ल असा कांहीं एक उपाय द्रव्यद्वारा योजावा, किंवा पांडवांस वारंवार गुप्तद्वारें ब्रा
ह्मणाकडून असें सांगवावें कीं, अतःपर तुह्मीं हस्तनापुरीं राहूं नका. तुमचा आ
णि कौरवांचा द्वेष पडला आहे त्यापेक्षां तुह्मीं द्रुपदाचे नगरींत स्वस्थ राहावें; असें
जालें असतां पांडव आपल्यापासून पृथक राहातील, मग आमची संपत्ती जरी त्या
णीं पाहिली तथापि केवल त्यांस असूया उत्पन्न होणार नाहीं, अथवा पांडवांत
परस्पर भेद उत्पन्न करावा हेंच बरें, किंवा द्रौपदीस कांहीं लोभाच्या गोष्टी दाखवून
ती पांडवांचा त्याग करील असें कांहीं करावें आणि पांडव कृष्णेचा त्याग करतील
असें योजावें, अथवा भीमसेन सर्व पांडवांमध्यें मोठा बलवान आहे, त्याच्या आ

याने पांडव आह्मास मानीत नाहींत, त्यापेक्षां कपटानें भीमसेनाच्या मृत्यु विषयीं योजना करावी. तो नष्ट झाला असतां सर्व पांडवांचा उत्साह व तेज नष्ट होईल, मग ते आपल्या राज्या विषयीं यत्न करणार नाहींत. वृकोदर अर्जुनाच्या रक्षणा करितां त्याच्या पृष्ठभागीं निरंतर असतो ह्मणोन अर्जुन युद्धामध्यें अजय आहे. भीमसेन नष्ट झाल्यानें ते दुर्बल जाले; आपण सबल झालों. मग आपल्याशीं कांहीं कलह करण्यास येत नाहींत. जरी ते येथें आले तरी आपल्या आज्ञेच्या बाहेर राहाणार नाहींत. अथवा पांचां जणांस पृथक् पृथक् उत्तमस्त्रियांविषयीं लोभ दाखवून द्रौपदीस हे सोडतील असें करावें. नंतर कर्णासनिकडे पाठवून पांडवांस इकडे आणण्याची योजना करावी, याप्रकारें उपाययोजिले आहेत. यांतून तुला जो निर्दोष उपाय वाटेल तो करण्या विषयीं यत्न करावा; परंतु इतकें आहे कीं, द्रुपद राजाचा व पांडवांचा नूतनच संबंध झाला आहे. अद्याप केवल पांडवांचा राजावर विश्वास पूर्णपणी बसला नसेल तावत्कालपर्यंत हे सर्व यत्न करावे. एकदां द्रुपदानें आणि पांडवांचें अत्यंत ऐक्य जालें, ह्मणजे आपले हे यत्न कांहीं चालणार नाहींत. हे राजा, याप्रकारें माझी मती आहे; ही साधु अथवा असाधु याचा निर्णय कर्ण करील. का कर्णा, तुला कसें वाटतें, याविषयीं तुझें मत काय आहे तें सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

२०२ अध्याय दोनशें दोन.— कर्ण बोलतो हे दुर्योधना, तुझी प्रज्ञा उत्तम नाहीं असें वाटतें. हे वीरा, जा कालीं पांडवांस कोणी साह्य नवते व ते बालहोते त्या कालीं तुझे उपाय कांहीं चालले नाहींत, आतां तर पांडव साहाय्यवंत जाहाले असून वयस्क झाले आहेत, त्यापेक्षां तुझें कांहींच चालणार नाहीं. तेव्हां तूं सांगतोस या उपायानीं पाडवांस कांहीं व्हावयाचें नाहीं; असें मला खचित वाटतें. दैवानेंच ते आतां दिवसें दिवस वृध्दीप्रत पावतील, तुझ्या असल्याव्यसनास ते कधीं मानणार नाहींत आणि आपल्या पितृपैतामह राज्या विषयीं अवश्य यत्न करतीलच. त्या पांडवांमध्यें कधींही परस्पर भेद उत्पन्न व्हावयाचा नाहीं. जे एकपत्नीचे ठायीं अत्यंत रत झाले, त्यांचा परस्पर भेद कधींही होणार नाहीं. तशीच द्रौपदीही पांडवांस सोडून राहाणार नाहीं. स्त्रियांस बहुत भर्ते इष्टच असतात तेच अनायासें द्रौपदीस मिळाले. भिक्षा मागणारे

जरी बहुत पती स्त्रियांस असतील तरी त्यांचा त्या त्याग करणार नाहींत. मग द्रौपदीस अत्यंत रूपवान, शूर पांच पती प्राप्त झाले तेव्हां ती त्यांचा त्याग कशी करील. द्रुपदराजा मोठा कुलीन आर्यव्रती आहे, तो राज्यलोभानें पांडवांचा कधींही त्याग करणार नाहीं. तसाच त्याचा पुत्र महागुणवान, पांडवांविषयीं अत्यंत अनुरक्त असल्यामुळें पांडवांस सोडणार नाहीं; तेव्हां तूं कथन केलेल्या उपायानीं पांडव साध्य व्हावयाचे नाहींत, असें मी मानितों. आतां मला योग्य उपाय दिसतो तो मी तुला सांगतों. अजून पांडवांस कोणी साह्यच्य नसल्यामुळें ते दृढ मूल झाले नाहींत, तों पर्यंत त्यांच्याशीं युद्ध करून मारून टाकावें. आपला पक्ष अजून दृढ आहे, त्यांचा पक्ष लघु आहे तोंच हा उपाय करावा. असें दुर्योधना प्रत भाषण करून शकुनीस बोलतो, कां शकुनें, वाहनें अजून पांडवांस बहुत मिळालीं नाहींत, पांडवांस अजून बहुत मित्रांची प्राप्ती नाहीं व इतर सामग्री त्यांजपाशीं प्रस्तुत नसल्यामुळें ते आपल्यापेक्षां साधन सामग्रीनें कमी आहेत; तोंच त्यांजवर प्रहार करावा. जों काल पर्यंत श्रीकृष्ण सैन्या सहवर्तमान पांडवांस राज्य दानाच्या इच्छेनें पांचाल नगरीं आला नाहीं; तों काल पर्यंत पांडवां वर आपण एकाएकीं हल्ला करून त्यांस मारून टाकावें. बहुत द्रव्यें, भोगपदार्थ व राज्य ग्रहण करून पांडवांस द्यावें. अशी कृष्णाची मती वारंवार पांडवां विषयीं आहे. अरे दुर्योधना, सर्वत्र पराक्रम करावा, कपट करूं नये. भरत राजानें पराक्रमें करून सकल पृथ्वी वश केली. इंद्रानें पराक्रमें करून तीन लोक जिंकिले. क्षत्रियांनीं पराक्रम केला असतां त्यांची प्रशंसा करितात. पराक्रम करणें हा शूराचा धर्मच होय. यास्तव आपण चतुरंग सैन्यासहवर्तमान द्रुपद नगरीं जाऊन, द्रुपदास पराजित करून पांडवांस येथें आणून बंदित करूं. अरे सामें करून अथवा दानें करून अथवा धनें करून पांडव साध्य होण्यास शक्य नाहींत; पराक्रमें करूनच त्यांचा जय करावा. यास्तव हे राजा दुर्योधना, मी कथित केलेल्या उपायां खेरीज दुसरा उपाय मला योग्य दिसत नाहीं. असें राधेयानें भाषण केलें, तें ऐकून धृतराष्ट्र बोलला कीं, हे महाप्राज्ञ, जें तूं भाषण केलेंस तें सर्व तुला योग्य आहे. आतां भीष्म, द्रोण व विदुर, तुह्मी

उभयतां पुनः एकत्र होऊन या सर्व प्रकारांचा विचार करा. असें बोलून सकल मंत्री मुख्य धृतराष्ट्रानें एकत्र केले आणि कर्णानें करलेल्या भाषणांचा त्यांसह वर्तमान धृतराष्ट्र विचार करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

२०३ अध्याय दोनशेंतीन— भीष्म भाषण करतात हे धृतराष्ट्र राजा, पांडवांशीं विरोध करणें मला रुचत नाहीं. गांधारीचे पुत्र जसे मला तसेच कुंतीचे पुत्र. धृतराष्ट्राचे पुत्र जसे मी रक्षण करण्यास योग्य तसेंच पांडवांचें मला रक्षण केलें पाहिजे. माझा, तुझा, दुर्योधनाचा व पांडवांचा कोणाचाही कलह नसावा. प्रपितामह प्राप्त राज्याचा उपभोग करण्यास तुमची सत्ता जशी आहे, तशीच पांडवांची आहे. वास्तविक पाहातां पूर्वी पांडुराजास राज्याधिकार असल्यामुळें तुझा पेक्षां पांडवांची सदा राज्यावर अधिकृत आहे. पितुः प्राप्तराज्य पांडवांचें आहे, तुमचें नाहीं. असें धृतराष्ट्रास बोलून दुर्योधनास बोलतो हे दुर्योधना, पितृपैतामह राज्य पांडवांस देण्या विषयीं तुझी इच्छा नसेल तर या राज्यावर तुमची तरीं काय सत्ता आहे. हे राजा, मधुर भाषणें करूनच तुह्मीं त्यांस अर्धराज्य द्यावें यांत तुमचें व सर्वांचें हित आहे. मी भाषण केलें यांत जर तुह्मीं अन्यथा कराल तर तुमचें हित नव्हेतां सकलां मध्यें अपकीर्तीमात्र होईल. पाहा बरें, पांडव दैवें करून कसे जिवंत राहिले, तशीच महाभाग्यवती पृथा दैवें करून कशी जिवंत राहिली. दुष्ट व पापी पुरोचन याची इच्छा परिपूर्ण जालीनाहीं. ज्या दिवशीं पांडव दग्ध झाले म्हणून समजलें त्या दिवसा पासून तुह्मांस बहुत आनंद जाहाला आहे; परंतु हें चांगलें नाहीं. यांत लोकांनीं तुह्मास दूषण मात्र ठेविलें. आतां दैवें करून पांडव घोर अग्नी पासून वांचले त्यांचें दर्शन तुह्मीं अवश्य करावें. केलें असतां सर्व पातकांचा नाश होईल असें खचित जाणा. तुम्ही आणखी निश्चय पूर्वक असें समजाकीं, जो पांडवांचा पित्र्यंश अवश्य देय आहे तो तुम्हास दिलाच पाहिजे, साक्षात् इंद्र जरी प्राप्त झाला तथापि फिटणार नाहीं. हे दुर्योधना, जर तुझा मनांत धर्माचें रक्षण कर्तव्य असून माझें प्रिय कर्तव्य आहे तर अर्धराज्य तुह्मीं पांडवांस द्यावें. असा विषय या अध्यायांत आहे.

२०४ अध्याय दोनशेंचार— द्रोण बोलतात हे राजा, सर्वांनीं मिळोन तुझा हिता करितां धर्म, अर्थ व यशप्रद असें भाषण करावें या करितां आज सर्वां-

स निमंत्रण केलेंस ह्मणोन मी ऐकतों, तर भीष्माचें मत तेंच माझें मत जाण. आतां उत्तम प्रकारचा प्रिय भाषण करिता, असा एक दूत बहुत रत्नें त्याज बरोबर देऊन द्रुपद राजाकडे पाठवावा आणि वर व कन्या पक्षीय जे असतील त्यांस तीं रत्नें दूतांकडून अर्पण करा आणि ह्या उत्तम प्रकारचा समारंभ व योग्य संबंध जाहाला ह्मणोन दूत मुखानें त्याचें वर्णन करा. द्रुपद व धृष्टद्युम्न या उभयतांस वारंवार असें बोला कीं, हा तुमचा प्रिय संबंध झाला तेणे करून आह्मी तुमचे झालों; वारंवार कुंती व माद्री यांच्या पुत्रांचें शांतवन करून हिरण्य, उत्तम प्रकारचीं भूषणे द्रौपदीस पाठवा. द्रुपद राजास व धृष्टद्युम्नास व इतर त्याचे संबंधी व सांसर्गिक जे लोक आले असतील त्यांस उत्तम प्रकारचे अलंकार, वस्त्रें पाठऊन त्यांचा सत्कार करा. या प्रकारें उभयतांचा योग्य सत्कार करून नंतर पांडवांस प्रश्न करा कीं, हस्तनापुरीं आपण लौकर चलावें; ह्मणजे त्या प्रमाणें आह्मीं तयारी करितों. याप्रकारें पूर्वी दूतानीं जाऊन सर्व कृत्याची सिद्धता केल्या नंतर, दुःशासन, विकर्ण या उभयतांनीं बहुत सैन्य व अश्वादिक बरोबर घेऊन पांडवांस येथें समारंभानें आणावें. अशा समारंभानें पांडव येथें आले ह्मणजे राजा, वारंवार त्यांचा सत्कार करून सर्व प्रजेच्या अनुमतें पितृपैतामह प्रास राज्याचा अर्धविभाग त्यांस परम आदरानें द्यावा. असें तुह्मी केलें असतां तुझें व तुझ्या पुत्रांचें अत्यंत हित आहे व तुमची कीर्तीही बहुत होईल. भीष्माचें व माझें ही मत हेंच होय. असें द्रोणाचार्यांचें भाषण ऐकून कर्ण बोलला कीं, हे राजा, आज पर्यंत भीष्म व द्रोण या उभयतांचा अर्थ व मानानें सत्कार करून अंतरंग कार्यांत यांची योजना केली आहेस; परंतु या उभयतांच्या विचाराप्रमाणें तूं चालला असतां कधींही तुझें कल्याण व्हावयाचें नाहीं. तुझा शत्रूचें सर्वप्रकारें हित व्हावें ह्मणोन यांची नित्यशः इच्छा आहे यास्तव यांजवर विश्वास ठेऊं नको; कदाचित तूं ह्मणशील कीं, हे उभयतां माझे मित्र कपटी जाले तेव्हां मी आतां विश्वास तरीं कोणावर ठेवावा. कपटी अथवा चांगले याची परिक्षा काय आहे; सर्वत्रांस मी कपटी समान मानूं लागलों तर माझी अर्थसिद्धि कशी होईल, तर सांगतों. आपल्यास सुख व दुःख प्राप्त होणें हें केवल दैवाधीन आहे. कृतप्रज्ञ अथवा अकृतप्रज्ञ असो, बाल अथवा वृद्ध असो, साह्य रहित असो अथवा

साह्य रहित असो. सर्वांस दैव श्रेष्ठ आहे दैवानें कोणास सोडलें नाहीं, याविष- यीं तुला एक पूर्वीचा इतिहास सांगतों. मागध वंशांत अंबु विच नामक एक रा- जा राजगृह नामक नगरींत राहात होता, तो सकल इंद्रियानीं हीन असल्यामुळें महा कर्णी नामक आपल्या अमात्यावर राज्याचा विश्वास ठेऊन आपण स्वस्थ बसला असतां; अमात्य दिवसें दिवस बलिष्ठ होऊन राजाचा अवमान करूं लागला. राजानें उपभोग्य जीं रत्नें व स्त्रिया, त्यांचा उपभोग तो अमात्य आप णाच करूं लागला. सर्व राजाचें ऐश्वर्य त्याणें हरण केलें, जों जों लोभ त्यास- दिवसें दिवस होऊं लागला तों तों त्याची अधिक इच्छा वाढून राजाचें सर्वस्व राज्य ग्रहण करण्या विषयीं त्याची मती झाली. परंतु राजा सर्व इंद्रियानीं ही न जरी होता तथापि दैव प्राबल्यानें प्रधानाची इच्छा सिद्धीस न जातां कांहीं कालांतरानें राजाचें राज्य तसेंच राहिलें, तेव्हां हें कृत्य केवळ राजाचे प्रारब्धा नेंच जालें. याविषयीं राजानें कधींही उद्योग केला नवता, या जवरून सर्वांपे- क्षां दैव श्रेष्ठ आहे. तथापि आपल्याजवळ जे मंत्री ठेवावे ते साधु, दुष्ट, हिते- च्छु किंवा अहितेच्छु याचा विचार राजानें बाह्य दृष्टीनें अवश्य ठेविला पाहिजे. असें ऐकून द्रोणाचार्य पुनः भाषण करतात हे कर्णा, तुझ्या चित्तांतील अभिप्रा- य काय आहे तो मी जाणला. हे दुष्टा, पांडवांच्या नाशाकरितां तूं दुर्योधनास- जें हित ह्मणोन सांगतोस, तें तुझें हितभाषण नव्हे, त्यापासून सकल कौरवां- चा नाश होईल. आतां मी शेवटचें भाषण करितों तें ऐक. कर्णाच्या भाषणाव- र जर कौरव विश्वास ठेवतील तर लौकरच कौरवकुल नाश पावेल. असाविष- य या अध्यायांत आहे.

२०५ अध्याय दोनशें पांच— विदुर बोलतो हे धृतराष्ट्र राजा, तुझे जे बांधव असतील त्यांणी तुझ्या कल्याणाचेंच भाषण करावें हा त्यांचा धर्म होय. आ तां, बंधुजन, हित सांगत असतां जो ऐकत नाहीं तर त्याचें प्रारब्ध ह्मणोनस म- जावें. भीष्मानें जें तुला सांगितलें यांत तुझें अत्यंत हित आहे. तर त्याचा तूं आ- दरच करावास. द्रोणाचार्यानें बहुत प्रकार सांगितला त्यांत तुझें हित आहे. क- र्णानें जें सांगितलें त्यांत तुझें कांहीं हित नसून प्रत्युत त्यापासून नाश आहे. तूं मनांत असा विचार करून पहा बरें; सर्व तुझ्या सुहृज्जनांत व अमात्य जना

त बुद्धीनें व वयानें भीष्म द्रोणापेक्षां कोणी तरी अधिक आहे का, हे उभयतां वयानें अति वृद्ध असून यांची प्रज्ञा कशी वृद्धिंगत आहे व शास्त्रवेत्ते कसे आहेत, तुझावर व पांडुसुतांवर यांची समान दृष्टी आहे, हे उभयतां धर्मानें व सत्यतेनें दाशरथी राम व गयराजा पेक्षांही किंबहुना श्रेष्ठ आहेत, तुझा अकल्याणा विषयीं याणी पूर्वी कधींही इच्छा केली नाहीं व पुढें ही यांची इच्छा नाहीं. जर तूं आपल्या विचारांत यांचें अनुमोदन न घेशील तर तुझें कल्याण व्हावयाचें नाहीं. या लोकीं भूमंडळावर या उभयतां प्रमाणें प्रज्ञावान् दुसरा कोणी नाहीं, असें तूं खचित समज. तुझा नाश व्हावा ह्मणोन कधींही कुटिल भाषण करणार नाहींत. अशामाझी या उभयतां विषयीं नैष्ठिकी बुद्धी आहे. आपल्यास धन प्राप्ती होण्या करितां असत्य पक्षाचा अवलंब कधींही ते करावयाचे नाहींत, ते मोठे धर्मज्ञ आहेत. दुर्योधन प्रभृति तुझे पुत्र भीष्मास व द्रोणास प्रिय आहेत, तसेच पांडुराजाचे पुत्र उभयतांस प्रिय आहेत उभयतांची विषम दृष्टी नाहीं. जें काहीं तुझें अंतरंग कार्य करणारे मंत्री तुझा हिता विषयींच निरंतर रत असून पांडवांची निंदा करीत असतील ते मंत्री तुझे हितकरते नवत असें समज. हे महात्मे महापराक्रमी पांडवांचाच पक्षपात निरंतर करितात म्हणून तुला वाटत असेल, परंतु हे जे पांडवांचा पक्षपात करितात यांतच तुझें हित आहे, हा पांडवांचा पक्षपात तूं समजूं नको. तुझा हिताविषयीं पक्षपात करितात असें समज. वारंवार तुला हे उभयतां सांगतात कीं, पांडव युद्धामध्यें जिंकण्या विषयीं अशक्य हेंच खरें, हे ष्य बुद्धीनें तुला सांगत नाहींत; तूं आपले मनांत पक्का विचार करून पाहावें? धनंजय युद्धांत आला असतां इंद्र तरी त्याचा पराभव करण्यास समर्थ होईल? तसाच भीमसेन संग्रामात उभा राहिला असतां देव तरी त्याचा पराभव करण्यास शक्य होतील. उभयतां माद्रीपुत्र युद्धास सिद्ध झाले असतां कोणचा पुरुष त्यांच्या पराभवाची इच्छा करणार आहे? तसाच धर्मराज रणामध्यें कसा पराभव पावेल तें सांग. ज्या पांडवांचा पक्षपाती बलराम व ज्याचा मंत्री जनार्दन आणि ज्याचा साह्य कर्ता सात्यकी, त्या पांडवांचा पराभव करिता कोण आहे. द्रुपदराजा ज्यांना श्वशुर आणि धृष्टद्युम्न प्रभृती महावीर्यवान द्रुपदपुत्र ज्या पांड-

यांचे शालक असे पांडव बलाढ्य व सत्यशील असून पूर्वी पांडुराजा ज्यांचा पिता राज्यारूढ होता त्या पांडवांस दायभाग देण्याविषयीं भीष्म, द्रोण हे उभयतां सांगतात; यांत तुझें कल्याण आहे किंवा अकल्याण आहे याचा विचार करून पाहा. आणखी दुसरें असें एक आहे कीं, पुरोचन निमित्त तुला अपकीर्तीचा कलंक प्राप्त झाला आहे तो पांडवांस राज्य देऊन नाहींसा कर. पांडवांस राज्य दिलें असतां त्यांजवर तूं अनुग्रह केल्यासारखें होऊन तुझ्या कुलाचें जीवित्व राहीलें व तुझ्या यशाची आणि क्षात्रकर्माची वृद्धी झाली. द्रुपदराजा महा बलाढ्य तुमचा पूर्वी वैरी होता तो प्रस्तूत तुमच्या पक्षांत आला तेणें करून तुमचें हित आहे. तसेच महा बलवान समग्र यादव ते सर्व, कृष्णास अनुकूल आहेत, यास्तव जिकडे कृष्ण तिकडे ते जाणार, ज्यांचा साहाय्य श्रीकृष्ण त्यांचाच जय निश्चयें करून समज. अरे सामोपचारें करून जें कार्य होण्यास शक्य आहे त्या कार्याविषयीं विग्रह कशाकरितां करावा. पार्थ जिवंत आहेत. इतकें पौरजानपद लोकांस समजतांच त्यांस किती आनंद जाला आहे, त्या पार्थांचें प्रिय तूं अवश्य करावेंस दुर्योधन, कर्ण, शकुनी हे अधर्मी, दुष्टबुद्धी व बाल आहेत, यास्तव यांच्या भाषणावर विश्वास ठेवशील तर नाश पावशील. हे राजा, पूर्वी मी तुला वास्तविक सांगितलेंच आहे कीं, दुर्योधनाच्या अपराधानें तूं आपल्या सकल प्रजेचा क्षय करून घेशील, तो समय आणूनको. असा विषय या अध्यायांत आहे.

२०६ अध्याय दोनशें साहा:- धृतराष्ट्र भाषण करतो हे विदुरा, शांतनव भीष्म व विद्वान द्रोण हे माझ्या हिताविषयीं जें असेल तेंच सांगतात, असें खचित मी जाणतों. धर्मेकरून पाहिलें असतां जे कुंतीचे पुत्र ते माझे पुत्र. या राज्यावर माझ्या पुत्रांचा जसा संबंध आहे तसाच पांडवांचा संबंध आहे यांत संशय नाहीं. यास्तव हे विदुरा, तूं द्रुपदराजाच्या नगरीं जाऊन माता व द्रौपदी यांस हवर्तमान पांडवांस येथें लौकर घेऊन ये. अरे आमच्या दैवें करूनच पांडव व पृथा जिवंत राहिली यांत संशय नाहीं. द्रुपदराजाची कन्या त्या महारथ्यास मिळाली हें तरी आमचें दैवच होय. आज दैवें करूनच आह्मी वृद्धीस पावलों, पुरोचनाचा नाश झाला हें तरी आमचें दैवच होय. हें मोठें दुःख आज आमचें नि

वन झालें येणें करून मला बहुत आनंद झाला आहे, असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून विदुरानें नाना प्रकारचीं बहुत रत्नें व द्रव्यें बरोबर घेतलीं आणि धृतराष्ट्राच्या अनुज्ञें करून पांडवांच्या भेटी करितां द्रुपदनगरीं गेला आणि प्रथम द्रुपदाकडे गेला असतां द्रुपद राजानें धर्मपूर्वक विदुराचा आदर सत्कार करून बसविला, नंतर परस्परानीं एकमेकांस कुशल प्रश्न केले, पुढें पांडव व श्रीकृष्ण यांची भेट घेतली असतां स्नेहें करून यथानुक्रमें पांडवांनीं विदुरास आलिंगन देऊन सत्कार पूर्वक त्याची पूजा केली. नंतर विदुरानें धृतराष्ट्र राजाचें कुशल सांगितलें. नंतर कौरवांनीं दिलेलीं भूषणें व आभरणें पांडव, कुंती, द्रौपदी, द्रुपद व द्रुपद पुत्र यांस देऊन श्रीकृष्ण सन्निध बसला असतां विदुर बोलला हे द्रुपदराजा, धृतराष्ट्रानें व त्याच्या सकल आमात्यानीं व सकल पुत्रांनीं व इतर बंधु जनानीं शांतनव भीष्माचार्य, महा प्राज्ञ जो द्रोणाचार्य याणीं तुला कुशल प्रश्न केला आहे, हे पांचाल्य, तुझा आणि पांडवांचा संबंध जाहला तेणें करून धृतराष्ट्रास व धृतराष्ट्र पुत्रांस फारच आनंद होऊन ते असें बोलत आहेत कीं, द्रुपद राजाचा आणि आमचा संबंध जाल्यामुळें आज आह्मीं कृतार्थ जाहलों. आह्मास दुसरें एखादें राज्य प्राप्त जालें असतें तथापि इतका आनंद आह्मास नहोता. आतां पांडुपुत्रांस पाहाण्या विषयीं धृतराष्ट्रास अति उत्कंठा झाली आहे त्यापेक्षां द्रौपदी सहवर्तमान पांडवांचें आगमन हस्तना पुरीं व्हावें हें मला बरें वाटतें. पांडवांस हस्तना पुरीं जाण्या विषयीं आज्ञा असल्यास मी शीघ्रगामी दूताच्या द्वारें हें वर्तमान धृतराष्ट्र राजास लौकर कळवितों. असा विषय या अध्या० आहे.

२०७ अध्याय दोनशें सात:— द्रुपद बोलतो हे विदुरा, आमच्या संबंधानें जसा धृतराष्ट्रास बहुत आनंद झाला आहे तसाच धृतराष्ट्राचा संबंध झाल्यामुळें मला ही बहुत हर्ष झाला आहे. आतां पांडवांचें हस्तना पुरीं आगमन व्हावें ह्मणोन तूं सांगितलेंस तें बरेंच आहे. परंतु मी आपल्या वाणीनें पांडवांस तिकडे जाण्या विषयीं उच्चार करणार नाहीं. युधिष्ठिर, भीमार्जुन, नकुल, सहदेव, रामकृष्ण या सर्वांच्या विचारास जर हस्तना पुरीं जाण्याचें येत असेल तर जावें असें द्रुपदाचें भाषण ऐकून धर्मराज बोलला हे राजा, आह्मी प्रकृत तुझ्या-स्वाधीन असल्यामुळें तूं जसें सांगशील तसें आह्मीं करणार. असें धर्मराजा

चें भाषण ऐकून वासुदेव बोलला हे धर्मराजा, तुह्मीं हस्तनापुरीं जावें हें मला बरें दिसतें, सर्व धर्म वेत्ता जो द्रुपद राजा त्याचें मत जसें असेल त्या प्रमाणें करा. असें श्रीकृष्णाचें वाक्य ऐकून द्रुपद राजा बोलला कीं, पुरुषोत्तम जें ह्मणतो तेंच माझें ह्मणणें आहे, हस्तना पुरीं जाण्याचा प्रस्तुत काल हाच आहे. प्रस्तुत कालीं कुंतीपुत्र जसे माझे संबंधी आहेत तसेच वासुदेवाचे आहेत, तेव्हां वासुदेवास जें रुचेल तेंच मला रुचेल. जसें पांडवांच्या कल्याणा विषयीं श्रीकृष्ण चिंतन करितो तितकें धर्मराजा ही करीत नाहीं. असें भाषण करून द्रुपदानें पांडवांस हस्तना पुरीं जाण्या विषयीं आज्ञा दिली असतां कृष्ण, विदुर, द्रौपदी व कुंती यांसहवर्तमान पांडव परम आनंदानें मार्गांत क्रीडाकरीत करीत हस्तना पुरीं जाण्यास निघाले. हें वर्तमान धृतराष्ट्रास समजतांच पांडवांस आणण्याकरितां विकर्णव चित्रसेन हे उभयतां पुत्र, द्रोणाचार्य व कृपाचार्य यांस सामोरे पाठविले असतां पांडव हस्तनापुरीं हळू हळू आले. त्या कालीं नगर निवासी लोकांस अति कौतुक होऊन सकळ नगर दीपा दिकांनीं सुशोभित केलें. पांडव नगरमार्गांतून जात असतां मनास आनंद देणाऱ्या नाना प्रकारच्या प्रिय वार्ता पांडवांच्या ऐकण्यांत आल्या; तेणें करून त्यांस बहुत आनंद होऊं लागला. नगरनिवासी लोक पांडवांस पाहून असें ह्मणूं लागले कीं, हा धर्मराजा सकळ धर्म जाणणारा असल्यामुळें धर्मे करून आपल्या दायादा प्रमाणें आमचें आतां उत्तम प्रकारें रक्षण करील. आमचा प्रिय करिता आज पांडुराजाच वनांतून या नगरीं आला आहे किंवा काय! आज पर्यंत जें आह्मीं दान, हवन व तप केलें असेल त्या पुण्याच्या योगें आतां हे पांडु पुत्र शतशः वर्षे पर्यंत या नगरांत राहोत. असें नागरिक लोक भाषण करीत असतां पांडवांनीं धृतराष्ट्र, भीष्म व जे योग्य व मान्य पुरुष होते त्यांस पादाभिवंदन केलें व सकल नगर निवासी लोकांस कुशल प्रश्न करून, धृतराष्ट्राच्या अनुज्ञेनें आप आपल्या स्थानीं गेले. तेथें कांहीं काल सुखानें विश्रांती झाल्यावर पुनः धृतराष्ट्र व भीष्माचार्य यांणीं आपल्या सन्निध आव्हान केलें असतां सकल पांडव धृतराष्ट्राच्या सन्निध आले. त्या कालीं धृतराष्ट्र पांडवांस बोलला कीं, हे धर्मराजा, जें मी तुला आतां भाषण करणार तें तूं आपल्या

झाल्यां सहवर्तमान ऐकून त्याचा विचार कर. तुमचा आणि माझा पुत्रांचा वारंवार कलह होतो, तो पुनः न व्हावा ह्मणोन तुह्मीं आतां खांडव प्रस्थीं जाऊन वास करावा. जसा चंद्र सकल देवांचें रक्षण करतो तसा अर्जुन खांडव प्रस्थीं तुमचें रक्षण करील. अर्धराज्य आह्मीं तुह्मास दिलें; आतां खांडव प्रस्थीं जाऊन वास करा. असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून पांडवानीं तत्काल धृतराष्ट्रास नमस्कार केला आणि खांडव प्रस्थ नामक घोर वनीं कृष्णासहवर्तमान निघून गेले. तें सकलवन स्वर्गासारखें सुशोभित करून पुण्य कारक दिवशीं त्या वनाची शांती केली, त्या वनांत एक उत्तम प्रकारचें स्थल पाहून त्यास्थलावर एक सुशोभित नगर बांधण्या करितां कृष्णद्वैपायन प्रभृती ऋषीनीं चतुष्कोण जागा मोजून नगर बांधण्यास मुहूर्त दिला असतां परमचतुर मोठ मोठे शिल्पीं आणून उत्तम प्रकारचें नगर सिद्ध केलें. सागरासारख्या मोठ्या असून मनोहर अशा त्या नगरास परिखा केल्या. आकाशास स्पर्श करणारे असे उत्तमोत्तम प्राकार बांधले. तेणे करून तें नगर बहुतच शोभलें. मंदराचल पर्वता सारखे बाहेरील दरवाजे शोभायमान दिसत, त्या दरवाज्याच्या आसमंतात् भागीं आम्रवृक्ष बहुत लाविले होते, ह्मणोन त्याच्या छायेनें तीं पुरद्वारें निरंतर गुप्त असत. शिल्प शास्त्रांत पुरद्वाराच्या रक्षणा विषयीं जसे उपाय सांगितले आहेत, त्या प्रमाणेंच नाना प्रकारच्या शस्त्रास्त्राच्या योगें तीं रक्षित केलीं होतीं. कोटावरून निरंतर प्रहार करण्या करितां तोफा बहुत ठेविल्या होत्या. नगरामध्यें यंत्रें व शस्त्रें स्थापित करण्या करितां बहुत शाळा बांधिल्या. लोखंडाचे गोलक व लोहमय चक्रें ठेविण्या करितां बहुत स्थलें केलीं; सकल पदार्थ नगरामध्यें स्थापित केले. उत्तम प्रकारचे निराळे असून मोठमोठे असे मार्ग व चतुष्पद त्या नगरास बहुत होते. शुभ्रवर्णाचीं उच्च अशीं भवनें शतशः होतीं; तेणें करून फारच शोभा आली. नगराच्या आसमंतात् भागीं ज्या वनभूमी होत्या त्याही परम शोभिवंत झाल्या. वेद वेदांग पारग मोठ मोठे ब्राह्मण सर्व भाषा जाणणारे असे त्या नगरांत येऊन बहुत राहिले. नाना देशापासून धनाच्या इच्छेनें व व्यापाराच्या इच्छेनें वणिकजन येऊन राहिले. शिल्पशास्त्र वेत्तेही बहुत आले. नगराच्या आसमंतात् भागीं उ-

न्य प्रकारचीं रमणीय उद्यानें निर्माण केलीं. निरंतर सार्वकालिक पुष्पित होणारे असे वृक्ष शतशः त्या उद्यानांत होते. कृत्रिम पर्वत क्रीडे करितां केले होते, जलानीं पूर्ण झालेल्या वापी शतशः बांधिल्या होत्या, सुगंधिक पद्मानीं रम्य झालेलीं अशीं सरोवरें बहुत होतीं. अशा प्रकारचें नगर सिद्ध झालेलें पाहून त्यावर पांडवांची बहुत प्रीती उत्पन्न झाली. त्या नगरांत केवल इंद्रासारखेच पांडव राहात असतां तें नगर भोगावती पुरी सारखें दिवसें दिवस दिसूं लागलें.या नगरांत रामकृष्णा यांनीं प्रवेश केल्यावर कांहीं दिवसानीं पांडवांची आज्ञा घेऊन ते उभयतां द्वारावतीस गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

२०८ अध्याय दोनशेंआठ.— जनमेजय भाषण करितात हे ऋषे, पांडवांस इंद्रप्रस्थाचें राज्य मिळाल्यावर त्यानीं पुढें काय केलें व त्यांची भार्या धर्मपत्नी द्रौपदी आपल्या पतीच्या ठायीं कोणत्या रीतीनें कशी अनुरक्त झाली होती आणि एकस्त्रीस पांच भर्त्ते असल्या मुळें त्यांचें परस्परांचें-ऐक्य कसें राहिलें.कृष्णी सहवर्तमान पांडव युक्त असतां परस्पर कसे वागत हें मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धृतराष्ट्राची आज्ञा घेऊन सर्व पांडव कृष्णी सहवर्तमान खांडव प्रस्थाचे-ठायीं सुखें करून राहात असतां धर्मराजानें धर्में करून पृथ्वीचें पालन केलें,सकल आपले शत्रु पांडवांनीं जिंकून पौर संबंधीं कर्तव्य जीं कृत्यें तीं करीत परम आनंदानें राहात असतां नारद तेथें आले.हें पाहून धर्मराजानें नारदास उत्तमासनीं बसविलें आणि यथाविधी नारदाची पूजा करून सकल राज्य निवेदन केलें. नंतर नारदाच्या दर्शना करितां द्रौपदीस आव्हान केलें असतां ती साध्वी शरीर भूत होऊन जेथें नारद बसले होते तेथें आली आणि नारदाचे चरणास वंदन करून अंजली पुटजोडून उभी राहिली.तीस नारदानीं नाना प्रकारचे आशीर्वाद दिले आणि जाण्या विषयीं-आज्ञा दिली असतां द्रुपदात्मजा अंतःगृहांत गेली. नंतर युधिष्ठिर प्रभृत्ति सकल पांडवांस एकांत स्थलीं नारद बोलला कीं, हे पांडव हो,तुह्मा सर्वांची धर्मपत्नी भार्या द्रौपदी एक आहे,त्यापेक्षां तुह्मांत जेणें करून कधींही-

भेद होऊं नये अशी एक नीती कारक कथा तुह्मास सांगतों. पूर्वी सुंदोपसुंद्र नामक कोणी उभयतां भ्राते होते. त्यांची तीन लोकांत विख्याती असे, त्यांचा वध करण्यास कोणी पुरुष समर्थ नवता; उभयतांनीं मिळोन राज्य करावें. अशी एकमेकांची परस्पर प्रीती असतां तिलोत्तमे करितां एकमेकानीं एकमेकाचा प्राण घेतला. यास्तव हे पांडव हो, तुह्मीं आपलें मित्रत्व रक्षण करावें आणि जेणें करून तुमच्यांत कलह होणार नाहीं असें करा. असें नारदाचें भाषण ऐकून युधिष्ठीर बोलतो हे नारदा, सुंदोपसुंद हे कोणाचे पुत्र, या उभयतां मध्यें परस्पर कसा भेद होऊन त्यानीं एकमेकांचा प्राण घेतला; तिलोत्तमा ती-कोणच्या देवाची कन्या होती हा सर्व वृत्तांत मला सांग. अ. वि. अ. आहे.

२०९ अध्याय दोनशें नऊ.- नारद भाषण करितात हे युधिष्ठिरा, तुला एक पुरातन इतिहास सांगतों भ्रात्यां सहवर्तमान ऐक. पूर्वी हिरण्यकशिपुनामक असुरांच्या वंशामध्यें निकुंभनामक महातेजस्वी व बलाढ्य दैत्य होता, त्या दैत्यास सुंद व उपसुंद यानामें करून दोन पुत्र महावीर्यवान, भीमपराक्रमी होते. कांहीं कार्य कर्तव्य जाहल्यास ते उभयतां एकमत्तानें करीत. एकच पुरुष दोन शरीरानें उत्पन्न जाले असें लोक उभयतांस ह्मणत. ते उभयतां दोघे बराबर वृद्धीपावत असतां त्रैलोक्याच्या विजया विषयीं उभयतांनीं निश्चय करून. दीक्षा धारण केली. आणि विंध्याचल पर्वतीं जाऊन उग्रतपास आरंभ केला. ते उभयतां जटा आणि वल्कलें परिधान करून बहुत दिवस तप करीत असतां क्षुधेनें व तृषेनें अत्यंत श्रांत जाले, अंगावर मल बहुतच दटला. वायु भक्षणाच्या योगें दिवसें दिवस अत्यंत कृश होऊन गेले. पायाच्या अंगुष्ठावर उभे राहून आपल्या मांसानें होम करूं लागले. बाहू ऊर्ध्व करून व नेत्र मिटून कोणाकडेन पाहातां तसेच स्तब्ध उभे राहिले. असें उग्रतप करितां करितां कांहीं कालानें विंध्याचल पर्वतापासून एकाएकीं धूम्र उत्पन्न होऊं लागला. तो पाहतांच सकल देवानीं भयाभीत होऊन त्या तपास विघ्नें केलीं. उत्तमोत्तम प्रकारचीं रत्नें व सुंदर स्त्रिया दिकें करून त्यांस लोभ उत्पन्न केला असतां त्याणीं लुब्ध न होऊन आपल्या व्रताचा भंग केला नाहीं. निरंतर दृढव्रतीच होऊन राहिले. कोणच्याही पदार्थावर जाणी किमपी लोभ ठेविला नाहीं. त्या कालीं देवानीं कांहीं मायेच्या योगें यांच्या

रूपाचा नाश करावा असा विचार करून माया उत्पन्न केली. त्यायोगें त्या उभयतांच्या भगिनी, माता, भार्या, पुत्र, कन्या यांस राक्षसांनीं शूलानीं ताडण करून अत्यंत दुःखित व त्रस्त केलें असतां त्या आक्रोश करूं लागल्या कीं हे सुंदोपसुंद हो, आह्मास राक्षसानीं बहुत दुःख दिलें तेणे करून आह्मी अत्यंत दीन झाल्यामुळें आक्रोश करीत आहोंत यास्तव आमचें रक्षण करा. असा आपल्या कुटुंबाचा आर्तशब्द जरी त्या उभयतांनीं ऐकिला तथापि व्रताचा भंग करून ते त्यांच्या रक्षणास गेले नाहींत. असें त्या मायीक स्त्रियांनीं यांच्या मनास क्षोभ व पीडा कांहींच होत नाहीं त्यापेक्षां आपण अंतरधान व्हावें असा विचार करून ते सर्व मायिक अंतरधान पावले. असें झाल्यावर प्रभु सर्व लोक हित करणारा पितामह ब्रह्मदेव आपण साक्षात् वर देण्याकरितां सुंदोप सुंदाच्या अग्रभागीं आला असतां उभयतां ब्रह्मदेवास अंजलीपुट जोडून बोलले कीं, हे ब्रह्मदेवा, जर तूं आमच्या तपें करून संतुष्ट झाला आहेस तर आह्मीं सर्व मायावेत्ते, अस्त्रवेत्ते, कामरूपें धारण करणारे असे असून आह्मी उभयतांनीं अमर व्हावें असें वर प्रदान दे. असें उभयतांचें भाषण ऐकून ब्रह्मदेव बोलला कीं, हे दैत्य हो, अमरत्वा वांचून जे वर तुह्मीं मागाल ते सर्व तुह्मांस मिळतील. देवा सारखें अमरत्व या तपाच्या योगें तुह्मांस कधींही प्राप्त व्हावयाचें नाहीं. असें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून सुंदोप सुंद बोलले कीं, हे पितामहा, जर तूं आह्मांस अमरत्व देत नाहींस तर असा वर दे कीं, आह्मीं उभयतांनीं एकमेकास मारल्या वांचून स्थावर जंगमात्मक जें काय तीन लोकांत उत्पन्न आहे त्यापासून आह्मांस भय नसावें. असें त्या उभयतां दैत्याचें भाषण ऐकून पितामह बोलतात हे दैत्य हो, तुह्मां उभयतां खेरीज इतर कोणी तुमचा वध करणार नाहीं; जो वर तुह्मीं मागितला तो मी तुह्मांस दिला. नारद सांगतात हे धर्मराजा, याप्रकारें पितामहानें भाषण करून उभयतांस तपापासून निवृत्त केल्यावर आपण ब्रह्मलोकीं गेला. नंतर उभयतां दैत्येंद्र भ्राते वर मिळाल्यामुळें सर्व लोकांस आह्मीं अवध्य आहोंत असें जाणोन स्वगृहीं गेले. हें वर्तमान त्यांचे सुहृदांस समजतांच त्यांस बहुत आनंद झाला. ते उभयतां गृहीं गेल्यावर आपल्या जटांचा त्याग करून उत्तम प्रकारें किरीट व उत्तमोत्तम आभरणें व वस्त्रें धारण

करून भूषित झाले. आपल्या सर्व सत्ज्जनांस दानें करून व भोजनें करून हर्षित करूं लागले त्यांच्या गृहीं भोजन करा, दान करा, गायन ऐका, असे शब्द रात्रं दिवस होत असत, निरंतर वाद्यांच्या घोषानें व करतल नादानें त्याचें पुर हर्षित असे, नाना प्रकारचे कामरूपी विहार करतां करतां बहुत वर्षें त्यांचीं एक दिवसा सारखीं अतिक्रांत झालीं. असा विषय या अध्यायांत आहे.

२१० अध्याय दोनशें दहा.— नारद सांगतात हे धर्मराजा, ते उभयतां दैत्य नाना प्रकारची क्रीडा पृथ्वीवर करीत असतां त्रैलोक्य जिंकण्याची आकांक्षा त्यांस उत्पन्न होऊन आपल्या सकल सैन्यास आव्हान करून व वृद्ध व इष्ट जे मंत्री होते त्यांस बरोबर घेऊन रात्री मघानक्षत्रावर त्यांनीं प्रस्थान केलें. तसेच चारण जनांनीं परम हर्षें करून स्तुति केली असतां प्रथम ते दैत्य, कामगामी-असल्यामुळें देवांशीं युद्ध करण्याकरितां स्वर्गीं गेले त्याकालीं देवांनीं ब्रह्मदेवाचें वर प्रदान या उभयतांस आहे, असें जाणोन ब्रह्मलोकीं जाऊन राहिले. इकडे संदोपसुंदानीं इंद्रलोकाचा जय करून सकल यक्षगणाचा ही पराभव केला. तसेंच इतर आकाशमार्गें जाणारे जे होते त्यांचा ही नाश केला. तसेच पाताल निवासी नागांचे समुदाय होते त्यांस जिंकून समुद्रामध्यें वास करणारे जे म्लेंच्छ जातीय होते त्यांचा ही युद्धांत पराभव केला. नंतर सकल पृथ्वीचा जय करावा या इच्छेनें आपले सैनिकांस जवळ बोलाऊन अशी उग्र आज्ञा केली कीं, या भूमंडळावर जे राजऋषी व महान् महान् श्रेष्ठ ब्राह्मण आहेत ते हव्य कव्य द्वारा देवास तेज, बल व श्री यांचें वर्धन करितात यास्तव प्रथम त्यांचा वध करा. या प्रकारें संदोपसुंदानीं सर्व सैनिकांस आज्ञा देऊन-आपण चोंहींकडे फिरूं लागले. जेथें यज्ञ करणारे द्विज आहेत असें समजतांच त्यांचा त्याणीं प्राण घ्यावा. या प्रकारें सर्व ब्राह्मणांचा नाश केला असतां कांहीं अवशिष्ट ब्राह्मण आश्रमामध्यें दडून राहिले होते ते ही त्यांणीं शोधून मारले व त्यांचीं अग्निहोत्र पात्रें होतीं तीं जलामध्यें टाकून दिलीं. महान् महान् क्रोधी असे ऋषी शाप देणारे होते; परंतु ब्रह्मदेवानें त्या दैत्यांस वर प्रदान आहे असें समजून शाप देण्यास उद्युक्त जाले नाहींत. शिळेच्या ठाशीं मुक्त झालेले बाण जसे शिळांचा भेद करीत नाहींत तसे ब्राह्मणाचे शाप-

व्यर्थ झाल्यामुळें ते सकल द्विज आपली पर्णकुटिका टाकून पळाले. कांहीं राजऋषी व मुख्य मुख्य ब्राह्मण पर्वताचे दरींत व गिरिदुर्गामध्यें लपून राहिले होते त्यांचा नाश करण्याकरितां या उभयतांनीं गज, सिंह व व्याघ्र इत्यादि क्रूर पशूंचें स्वरूप धरून त्यांचा नाश केला. या प्रकारें सर्व ब्राह्मण पृथ्वीवरील नष्ट झाल्यामुळें यज्ञयागादि क्रिया व वेदाध्ययनें यांचा लोप झाला. उत्साह यात्रा, विवाहादि मंगल कार्यें विच्छिन्न झालीं, सकल भूतांमध्यें एकाएकीं भय उत्पन्न होऊन हाहाःकार शब्द होऊं लागला, मोठमोठीं नगरें व ऋषींचे आश्रम उद्ध्वस्त झाले, यामुळें पृथ्वी अस्थींनीं व्याप्त होऊन उग्र दिसूं लागली. याप्रकारें संदोपसंदानीं क्रूर कर्मै करून दाही दिशा जिंकिल्या आणि निःसपत्न होत्साते कुरुक्षेत्रीं जाऊन राहिले. असा विषय या अध्यायांत आहे.

२११ अध्याय दोनशें अकरा.– नारद सांगतात हे धर्मराजा, संदोपसंदानीं सकल जगतास त्रास दिला असतां सकल देवऋषी, महान् महान्सिद्ध ऋषि, महादेव, अग्नि, वायु, चंद्र, आदित्य, शक्र, पारमेष्ठ्यादि महान् ऋषी, वैखानस, वालखिल्य, मरीची प्रभृती वानप्रस्थ हे सर्व जितक्रोध, जितात्मे, जितेंद्रिय दुःखानीं त्रस्त झाल्यामुळें ब्रह्मलोकीं प्राप्त होऊन संदोपसंदानीं जें कर्म केलें तें सर्व यथानुक्रमें पितामहास सांगून बोलले कीं, अतःपर पुढें काय करणें तें आपण केलें पाहिजे. अशी देवांची वाणी ऐकून ब्रह्मदेव विश्वकर्म्यास बोलाऊन त्यास बोलला कीं, हे विश्वकर्म्या, एक उत्तमोत्तम प्रकारची सकल लोकांनीं प्रार्थनीय अशी अतिउत्तम स्त्री उत्पन्न कर. अशी आज्ञा ऐकून विश्वकर्म्यानें तीन लोकांतील स्थावर जंगमात्मक पदार्थ आणून त्यांत उत्तम पदार्थ जितके होते ते पदार्थ त्या स्त्रीच्या स्थला स्थलाच्या गात्रीं स्थापित करून दिव्य एक उत्तम स्त्री निर्माण केली. कोटि शः रत्नें तिच्या गात्रामध्यें स्थापित केलीं. अशी ती रत्नमयी, देवरूपीणी, विश्वकर्म्यानें मोठ्या यत्नानें निर्माण केली असतां तिच्यासारखी स्त्री रूपें करून तीन लोकांत ही कोणी पाहिली नाहीं. साक्षात् लक्ष्मीच, कामरूपा पुष्पवती होऊन येथें आली काय असा सर्वांस भास झाला. सर्व देवांचीं व ऋषींचीं चित्तें, दृष्टीनिंहीं तत्काल हरण केल्या. सकल रत्नांतून तिळमात्र भाग घेऊन ही स्त्री वि

श्वकर्म्यानें निर्मित केली ह्मणोन तिचें नामाभिधान ब्रह्मदेवानें तिलोत्तमा असें ठेविलें. ती ब्रह्मदेवास नमस्कार करून व हात जोडून बोलली कीं, हे सकल भूतेश, मला कोणत्या कार्याकरितां निर्माण केली तें कार्य मला सांगावें. असें भाषण ऐकून पितामह बोलतात हे तिलोत्तमे, सुंदोपसुंद नामक दैत्य आहेत त्यांस तूं आपल्या रूपानें लोभ उत्पन्न करून तुझ्या दर्शनमात्रें करून परस्पर भ्रात्यां मध्यें तुजकरितां विरोध उत्पन्न होईल असें कर. असें पितामहाचें भाषण ऐकतांच तिलोत्तमा ब्रह्मदेवास नमस्कार करून सकल देव समुदाय तेथें बसलेला होता त्यास प्रदक्षणा करून सुंदोपसुंदाकडे जाण्यास निघाली. त्याकालीं भगवान् विष्णु प्राङ्मुख, दक्षिणाभिमुख शंकर व उत्तराभिमुख सकल देव असे बसले होते, त्यांच्या आसमंताद्भागीं सर्व ऋषी चारी दिशेस मुखें करून बसले होते, इंद्र व महेश्वर हे उभयतां तिलोत्तमेस पाहून अत्यंत काममोहित झाले; परंतु धैर्य करून तसेच आप आपल्या स्थलावर बसले. जिकडे जिकडे तिलोत्तमा जाई तिकडे तिकडे शिवास पाहाण्यास मुखें उत्पन्न झालीं. अशीं शिवास तिलोत्तमेस पाहण्याचे हेतूनें चार मुखें उत्पन्न झालीं. तसाच इंद्रही तिलोत्तमेस पाहूं लागला असतां त्याच्या शरीरास सहस्र नेत्र उत्पन्न झाले. जिकडे जिकडे तिलोत्तमा गमन करी तिकडे तिकडे इतर देवांनीं व महर्षींनीं आपलीं मुखें करून तिला पाहिलें. ब्रह्मदेवाशिवाय सकल देवांची व ऋषींची दृष्टी तिच्या शरीरावलोकना विषयीं लुब्ध झाली. अशी ती तिलोत्तमा ब्रह्मलोकापासून ज्याकालीं निघाली त्याकालीं सकल देवऋषींनीं आपलें कार्य झालें असें मानिलें. तिलोत्तमा तेथून गेल्यानंतर ब्रह्मदेवानें सकल देव व ऋषींस स्वस्थानीं जाण्यास आज्ञा दिली. असा विषय या अध्यायांत आहे.

२१२ अध्याय दोनशें बारा.— नारद भाषण करितात हे धर्मराजा, सुंदोपसुंद सकल पृथ्वी जिंकून निःसपत्न व गतव्यथ जाले असतां आपल्यास कृतकृत्य मानूं लागले. सकल त्रैलोक्य त्यांणीं व्यग्र करून टाकिलें. देव, गंधर्व, यक्ष, नाग, राक्षस व इतर पार्थिव यांचीं सर्व रत्नें त्यांणीं हरण केलीं. त्या उभयतांस तीन लोकांत कोणी शत्रु नाहींसा झाल्यामुळें निरुद्यम होऊन अमरासारखे क्रीडा करूं लागले. कोणे एके कालीं विंध्याचल पर्वताचे ठायीं पुष्पित झालेल्या वृक्षा

दिकें करून रमणीय असें एक स्थल पाहून विहार करण्याकरितां स्त्रियांसह वर्तमान तेथें गेले. नाना प्रकारचे दिव्य उपभोग्य पदार्थांचें सेवन करीत ते उभ- यतां स्त्रियांसह श्रेष्ठ आसनाचे ठायीं परम प्रीतीनें बसून स्त्रियांचीं नृत्यें वगी- त इत्यादि काम्योपभोग पदार्थांचें सेवन करीत आहेत तों इतक्यांत त्या वनांत- तिलोत्तमा एक सूक्ष्म वस्त्र परिधान केलेली पुष्पें वेंचण्या करितां गेली. ती मंद मंद नदीतीरस्थ कर्णिकारादि वृक्षांचीं पुष्पें वेंचित वेंचित ज्या प्रदेशीं सुंदोपसुं- द बसले होते तेथें गेली. सुंदोपसुंद मदिरा पानाच्यायोगें आरक्तनेत्र होऊन- स्त्रीस पहातांच परम व्यथित झाले. नंतर आपल्या आसनापासून उठून जेथें ती स्त्री होती तेथें जाऊन कामानें व्यथित जाहाल्यामुळें तिची प्रार्थना करूं लागले. सुंद तिलोत्तमेचा दक्षिण हस्त धरून आपले कडे ओढूं लागला. उपसुंद तिलो त्तमेचा वाम हस्त धरून आपले कडे ओढूं लागला. असे ते वर प्रदानामुळें बला नें उन्मत्त झालेले, दैत्येंद्र सुरापान मदाच्या योगें एकमेकां कडे आकर्षण करीत असतां या उभयतांच्या भृकुटी चढून एकमेक परस्परांस भाषण करूं लागले. प्रथम सुंद ह्मणतो हे उपसुंदा, ही माझी भार्या ती तुझी गुरू होईल. उपसुंद ह्म णतो हे सुंदा, ही माझी भार्या झाली असतां तुझी सून होईल, तस्मात् ही तुझी भार्या होण्यास योग्य नाहीं. असें भाषण झाल्यावर उभयतांस ही क्रोध आला, आणि तिलोत्तमेच्या रूपानें व स्नेह सौहृदानें लुब्ध होऊन मत्त होत्साते उभय- तांही भयंकर गदा धारण करून युद्धास उद्युक्त झाले. उभयतां ही या स्त्रीस- मी पूर्वीं ग्रहण करीन मी पूर्वीं ग्रहण करीन असें भाषण करीत एकमेकां वर गदे- चा प्रहार करूं लागले असतां दोघेही मृत होऊन पृथ्वी तलावर पडले. उभयतांचे ही अंग रक्तानीं भरल्या मुळें आकाशस्थित प्रातःकालच्या सूर्यासारखे दिसूं लागलें. अशी उभयतांची अवस्था झालेली सकल स्त्रियांनीं पाहून त्या तेथून पळाल्या, तसेच त्यांचे दैत्यगण भयानें पातालांत गेले. त्याकालीं देव व ऋषीं सहवर्तमान ब्रम्हदेव त्या स्थलीं येऊन त्याचे तिलोत्तमेचा सत्कार केला. आणि तिला असा वर दिला कीं, हे तिलोत्तमे, आदित्या सारखे तेजस्वी असे जे लोक अ- सतील त्या लोकांचे ठायीं तुझा वास घडेल आणि तूं ज्यास पहाशील तो तुझा तेजानें मोहित होऊन तुझी स्पृहा करणार नाहीं. याप्रकारें ब्रह्मदेवाचें तिलोत्तमे

स वरप्रदान देऊन इंद्रास त्रैलोक्याचा अधिकार दिला. नारद सांगतात हे धर्म राजा, असे ते सुंदोपसुंद सर्व कार्या विषयीं निश्चित बुद्धी असतांही तिलो त्तमे करितां क्रोधें करून त्यांनीं एकमेकांचा प्राण घेतला; यास्तव तुह्मीं परस्पर अत्यंत स्नेही आहांत तुमच्यांत किमपी भेद नाहीं; परंतु या द्रौपदी करितां तुह्मीं आपआपल्यांत जेणे करून भेद होणार नाहीं असें आचरण करा. असें नारदाचें भाषण ऐकून पांडवानीं नारदा समक्ष अशी प्रतिज्ञा केली कीं, हे नारदा, जो कोणी आमच्या पांचां तून द्रौपदी शीं एकांतीं स्थित असेल त्याकालीं त्यास दुसरे कोणीं पाहूं नये; पाहिलें असतां ब्रह्मचर्य व्रत धारण करून बारा वर्षे पर्यंत वनवास करावा. अशी त्या सर्वांची प्रतिज्ञा ऐकून नारद स्वस्थानीं गेला. पांडवांनीं प्रतिज्ञा केल्यावर त्याणीं आपल्या प्रतिज्ञेचा परस्परांत कधींही भंग केला नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

२१३ अध्याय दोनशें तेरा.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडवानीं परस्पर आप आपल्यांत द्रौपदी विषयीं प्रतिज्ञा करून ते खांडव प्रस्थीं राहात असतां सकल राजे त्याणीं आपल्या शस्त्र प्रतापानें वश केले. द्रौपदी पांचपतींचें मन धारण करून त्यांच्याच अनुलक्षानें वश असतां ते पांचपती तिच्यावर अत्यंत प्रीती करूं लागले. कोणे एके कालीं एक ब्राह्मणाचें गोधन कांहीं तस्करानीं हरण करून नेलें असतां ब्राह्मण क्रोधानें खांडव प्रस्थीं येऊन पांडवांस असें बोलला कीं, हे पांडव हो, दुष्ट तस्करानीं बलात्कारानें माझें गोधन हरण करून नेलें; यास्तव लौकर धांवून माझ्या गोधनाचें रक्षण करा. जसें काकानीं हवीर द्रव्य यज्ञांतून न्यावें तसें माझ्या ब्राह्मणाचें गोधन दुष्टानीं नेलें. पृथ्वीचा षष्टांश प्रजेपासून राजानें घेऊन तो प्रजेचें रक्षण न करील तर त्यास पाप कर्मी असें ह्मणतात. तीं विलापयुक्त भाषणें ऐकून धनंजय ब्राह्मणास बोलला कीं, हे द्विजा भिऊं नको. असें त्या ब्राह्मणास भाषण करून नंतर मनांत विचार करितो कीं, ज्या ठिकाणीं आपलीं शस्त्रास्त्रें ठेविलीं आहेत त्या ठिकाणीं द्रौपदी सहवर्तमान धर्मराजा एकांतीं असल्या मुळें तेथें जाणें अशक्य आहे. याचें रक्षण न केलें तर आपल्यास अनास्तिक्य दोष येईल. बरें धर्मराज द्रौपदी सहवर्तमान एकांतीं असल्या मुळें आपण त्यांत प्रवेश केला असतां

बाऱ्या वर्षें वनवास करावा लागेल; कदाचित् वनवास करणें प्राप्त झाल्यास मी-खेद मानीत नाहीं व धर्मराजाची अमर्यादा झाल्यास त्या विषयीं मला दुःख नाहीं; परंतु ब्राह्मणा विषयीं अधर्म जाल्यास मी फार भितों. असा निश्चय करून नंतर द्रौपदी सह वर्तमान धर्मराज जेथें एकांत स्थलीं होता तेथें अर्जुनानें जाऊन राजाची अनुज्ञा घेतली नंतर आयुधागारांत जाऊन धनुष्य बाण घेतले आणि बाहेर येऊन परम संतोषानें ब्राह्मणास बोलला कीं, हे ब्राह्मणा तूं आपल्या गृहीं लौकर जा; तुझ्या गाई घेऊन ते दुष्ट तस्कर दूर गेले नाहींत तोंच मी त्यांज पासून तुझ्या गाई आणून तुला देतों. असें ब्राह्मणास बोलून अर्जुनानें ध्वजयुक्त रथ सिद्ध केला. नंतर कवच धारण करून रथारूढ होऊन ज्यास्थलीं ब्राह्मणाचें गोधन हरण करणारे तस्कर होते त्यास्थलीं गेला आणि शरानीं त्यांस वेध करून गोधन त्यांपासून घेऊन तें ब्राह्मणास दिलें. आणि यशस्वी होऊन स्वनगरीं आल्यानंतर गुरुजनांस अभिवादन करून धर्मराजास बोलला कीं, हे प्रभो, एकांतस्थलीं तुमचें मी दर्शन केलें येणें करून पूर्वीं जी प्रतिज्ञा केली ती नष्ट झाल्या मुळें हा दश वर्षें पर्यंत वनवास करण्या करितां अरण्यांत जातों. असें अर्जुनाचें भाषण ऐकून धर्मराजा त्यास बोलला कीं, हे अर्जुना, ज्या कारण्यास्तव माझ्या एकांतस्थलीं तूं गेलास तें कारण मी जाणलें. हे वीरा, या पासून तुला कांहीं दोष नाहीं; तूं माझें अप्रिय ही कांहीं केलें नाहींस तशांतून आपला ज्येष्ठ भ्राता गुरुसमान तो स्त्रीसह वर्तमान एकांतीं असतां कनिष्ठानें तेथें प्रवेश केल्यास कांहीं दोष नाहीं, यास्तव हे महा बाहो, तूं वनांत जाऊं नको असें धर्मराजाचें भाषण ऐकून अर्जुन भाषण करितो हे राजा, कपटानें धर्म आचरूं नये असें तुज पासूनच ऐकिलें आहे आणि सत्याचा मी कधींही त्याग करणार नाहीं यास्तव मला वनामध्यें जाण्या विषयीं आज्ञा दे. ह्मणजे मी वनचर्य दीक्षा धारण करून बारा वर्षें पर्यंत वनवास करितों. असा विषय या अध्यायांत आहे.

२१४ अध्याय दोनशें चवदा.– वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, महा बाहू अर्जुन धर्मराजाची आज्ञा घेऊन वनवासास नि

घाला असतां त्याचे मागून वेद वेदांग पारग असे ब्राह्मण बहुत निघाले. भिक्षेवर उपजीवन करणारे यती तसेच ब्रह्मचारी, भगवद्भक्त, सूत पौराणिक, कथा करणारे अर्जुनाबरोबर निघाले तों मार्गांत रमणीय चित्रविचित्र वनें, उपवनें, सरोवरें, नद्या, सागर व इतर नाना प्रकारचे सुशोभित देश यांची शोभा पहात व पुण्य कारक तीर्थांचे ठायीं स्नान करीत गंगाद्वाराचे ठायीं येऊन तेथें राहिले. हे राजा, त्यास्थलीं एक अद्भुत कर्म अर्जुनानें केलें तें सांगतों. अर्जुन गंगाद्वारीं राहातो असें सकल ब्राह्मणानीं जाणोन त्याणीं आपलीं अग्निहोत्रें सिद्ध केलीं; अग्नि प्रज्वलित करून देवतांचें पूजन करण्याकरितां पुष्पां दिकांचा संग्रह केला. असंख्याक ब्राह्मण गंगेमध्यें स्नान करण्याकरितां उतरले असतां तेणें करून गंगेचें तीर अत्यंत शोभायमान दिसूं लागलें. त्याकालीं अर्जुन ही स्नानाच्या उद्देशानें गंगेमध्यें उतरला आणि स्नान करून व पितरांचें तर्पण करून अग्नि कार्य करण्याकरितां गंगेंतून बाहेर निघतो तों इतक्यांत कोणी एक नाग कन्या उलूपी नामक होती, ती काम मोहित होऊन तिनें अर्जुनास जलामध्यें आकृष्ट केलें, त्याकालीं अर्जुन जलामध्यें गेल्यावर कौरव्य नामक नागराजाचें एक परम सुंदर भवन होतें तेथें जाऊन एक अग्नि प्रज्वलित झालेला पहातांच अर्जुनानें त्या अग्नीचे ठायीं आपलें जें कर्तव्य अग्निकार्य तें केलें असतां अग्नी परम संतोष पावला. तों उलूपी, नागराजाची कन्या अर्जुनाचे दृष्टीस पडतांच तीस अर्जुन बोलला कीं, हे भद्रे, काय हें तूं साहास केलेंस, असें साहास करण्याचें कारण काय? हा उत्तम प्रकारचा कोणता देश आणि तूं कोणाची कन्या आहेस तें सांग. असें पांडवाचें भाषण ऐकून उलूपि बोलली हे पांडव श्रेष्ठा, ऐरावत कुलाचे ठायीं कौरव्य नामक कोणी एक नागश्रेष्ठ आहे त्याची उलूपी नामक मी कन्या होय. तूं जलामध्यें जाकालीं स्नानाकरितां आलास त्याकालीं तुझें रूप मी पाहिल्यामुळें मदनानें पीडित होऊन मूर्च्छित झाल्यें, यास्तव हे पुरुषश्रेष्ठा, तूं आपल्या आत्म प्रदान करून माझ्या मदनाची शांती केली असतां माझ्यावर प्रसाद केल्यासारखें होईल. तुझ्याखेरीज दुसरा पुरुष कोणी नाहीं असें मी समजत्यें. असें नाग कन्येचें भाषण ऐकून अर्जुन ह्मणतो हे भद्रे, मी आपल्या स्वाधीन नाहीं धर्मरा

ज्ञाच्या अनुज्ञें वरून बारा वर्षें पर्यंत ब्रह्मचर्यव्रत धारण केलें आहे, तथापि हे जलचारिणी, तुझें प्रिय करण्या विषयीं मी इच्छितों; परंतु आज पर्यंत कधीं मी अनृत भाषण केलें नाहीं तेव्हां आतां कसें करूं आणि धर्मा पासून ग्लानी न होतां तुझें प्रिय होईल असा विचार काय करूं तो सांग. असें अर्जुनाचें भाषण ऐकून उलूपी बोलली हे पांडवा, तुमच्या प्रतिज्ञें त असें आहे कीं, द्रुपद कन्या आणि तुह्मा पैकीं कोणी एक पांडव एकत्र एकांतीं बसले असतां तुह्यांतून जर कोणी तेथें गेला तर त्याणें द्वादश वार्षिक ब्रह्मचर्य व्रत धारण करून वनवास करावा. तेव्हां ही प्रतिज्ञा द्रुपद राजाच्या कन्ये विषयींच होय. त्या पेक्षां तूं आतां माझाशीं संबंध केला असतां तुझा धर्मलोप व्हावयाचा नाहीं. कदाचित् माझा संबंध केला असतां यत्किंचित् तरीं सूक्ष्म धर्माचा व्यतिक्रम होईल. असें तुझा मनांत येत असल्यास तेंही मनांत आणूं नको कारण या कालीं तूं मला प्राणदान केलेंस हा धर्म तुझा किती जाला बरें तो पाहा. हे पार्था, जर या कालीं तूं माझा अंगिकार करीत नाहींस तर मी मृत झाल्यें असें समज. तुला मी शरण आल्यें आहें यास्तव या कालीं तूं माझें प्रियच करावेंस. असें नागकन्येचें भाषण ऐकून अर्जुनानें धर्मेकरूनच तिचे मनोरथ पूर्ण केले, एकरात्र पर्यंत नागभुवनीं वास करून सूर्योदय समय कालीं कौरव्याच्या गृहांतून नागकन्ये सहवर्तमान गंगा द्वारीं आला. त्या कालीं उलूपी अर्जुनास बोलली कीं, हे अर्जुना, तुला मी दोन वर देत्यें. जला मध्यें सर्वत्र तुझा विजय असेल आणि सकल जलनिवासी जंतु तुला वश असतील, असें भाषण करून ती नाग कन्या उलूपी आपले मंदिरीं गेली. असा विषय या अध्यायांत आहे.

२१५ अध्याय दोनशें पंधरा:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, हें सकल झालेलें वर्तमान ब्राह्मणांस सांगून अर्जुन तेथून हिमाचलाच्या पार्श्वभागीं गेला. तेथून अगस्त्य वट नामक स्थळ होतें तेथें जाऊन नंतर वसिष्ठ पर्वतीं गेला. तेथून भृगतुंग नामक पर्वतीं जाऊन ब्राह्मणांस उत्तम प्रकारच्या सहस्र गाई व गृहें दान देऊन हिरण्य बिंदु नामक तीर्थीं गेला. तेथें स्नान दान करून पुढें नैमिषारण्यांतील उत्पलीनी नामक नदीच्या तिरीं जाऊन स्नानदान केलें. तेथून नंदा, अपरनंदा, कौशिकी या तीर्थांचे ठायीं स्नान करीत गयेस जाऊन तेथ

न गंगेचे ठायीं स्नानाकरितां आला. याप्रकारें अर्जुन सकल तीर्थांमध्यें स्नान करून पुनः आपला देह पवित्र होण्याकरितां ऋषींचे आश्रम पहात ब्राह्मणांस असंख्याक गाई देऊन पुढें अंग, वंग, कलिंग या देशांतील जितकीं तीर्थें होतीं तितक्या तीर्थांचे ठायीं यथानुक्रमें जाऊन तेथें स्नान करून व ब्राह्मणांस धन देऊन कलिंगराष्ट्राचे द्वारीं गेला. त्याकालीं सकल ब्राह्मण कलिंगदेश गमनास अप्रशस्त आहे असें जाणोन अर्जुनाची आज्ञा घेऊन माघारे फिरले असतां अर्जुनानें त्यांतील कांहीं ब्राह्मण आपल्यास साह्यार्थ बरोबर घेऊन तेथून समुद्रतिरीं गेला. तेथून नानाप्रकारचे देश पुण्यायतनें व महान महान् रमणीय स्थानें पहात तापसांनीं उपशोभीत अशा महेंद्र पर्वताचें दर्शन करून समुद्रतीरानेंच मणिपुरास गेला. आणि मणिपुराच्या आसमंताद्भागीं जीं तीर्थें व पुण्य स्थानें होतीं तेथें जाऊन मणिपुराचा राजा जो चित्रवाहन होता त्याच्या दर्शनाच्या इच्छेनें नगरांत जात असतां चित्रांगदानामें राजाची कन्या अति रूपवती पुरांत फिरत होती तिला पाहून अर्जुन तिच्या ग्रहणाविषयीं मती धरून राजास बोलला कीं, हे राजा, मी तीर्थयात्रेच्या उद्देशानें येथें आलों, जातीचा क्षत्रिय आहें, तुझी कन्या पाहून मोहित झालों यास्तव ती मला देशील तर फार उत्तम होईल. असें अर्जुनाचें भाषण ऐकून राजा बोलतो, तूं कोण, कोणाचा पुत्र, तुझें नाव काय हे सांग? त्याकालीं अर्जुन बोलला कीं, हे राजा, पांडुराजाचा मी पुत्र मला धनंजय असें ह्मणतात. असें अर्जुनाचें भाषण ऐकून चित्रवाहनराजा बोलतो हे अर्जुना, आमच्या कुलांत पूर्वीं प्रभंजननामें राजा होता त्याणें अपुत्रिक असल्यामुळें पुत्राकरितां उग्रतप करून शंकरास संतुष्ट केला, तेव्हां उमापती, राजाच्या अग्रभागीं संतुष्ट होऊन बोलला कीं हे राजा, तुमच्या कुलांत एकएक प्रसव होईल, दुसरें अपत्य व्हावयाचें नाहीं त्या कुलांतील मी एकटाच आपले पित्यापासून उत्पन्न झालों तशीच ही कन्या मला एकच झाली ही माझ्या कुलाचें अंकुरोत्पादन कर्त्री आहे, जसा पुत्र तशीच मला ही कन्या यास्तव हे अर्जुना, ही पुत्रिका यथाविधी तुला अर्पण करून इजपासून जो पुत्र होईल तो माझ्या वंशाचा धारक होईल अशी ही अमोल्य आहे, हें जर तुला मान्य असेल तर तुझाशीं इचा विवाह करितों -

असें राजानें भाषण अर्जुनानें मान्य केल्यावर राजानें त्यास कन्या अर्पण केली. ती अर्जुनानें घेऊन तीन वर्षें पर्यंत तिचा उपभोग करीत मणिपूर नगरीं राहिला. पुढें तिजपासून एक सुत उत्पन्न झाल्यावर राजाची आज्ञा घेऊन अर्जुन यात्रे करितां निघाला. असा विषय या अध्यायांत आहे.

२१६ अध्याय दोनशें सोळा.— वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, मणिपुराहून अर्जुन निघाला तो दक्षिण दिशेस समुद्र तीरीं जीं तीर्थें होतीं तीं तीर्थें करीत चालला. ऋषीनीं सुशोभित जे आश्रम होते त्यांचेंही दर्शन केलें. पुढें अगस्त्य, सौभद्र, पौलोम, कारंधम, भारद्वाज अशीं पांच तीर्थें प्रसिद्ध व पुण्य कारक असतां दुर्मरण भयानें ऋषीनीं त्या तीर्थांचा त्याग केला आहे. असें अर्जुनास समजल्यावरून तो पांच तीर्थांचे सन्निध स्नानोद्देशानें आला आणि तेथील आश्रम निवासी तपस्वी होते त्यांस हस्त जोडून बोलला हे ऋषी हो, तुह्मी महान् ऋषी, ब्रह्मवादी असतां या पांच तीर्थांचा सर्वांनीं त्याग केला याचें कारण काय तें मला सांगा? असा प्रश्न ऐकून तापस बोलले कीं, हे पांडव श्रेष्ठा, या पांच तीर्थांत मोठे भयंकर पांच मगर रहात आहेत ते ग्राह जे कोणी स्नाना करितां या तीर्थांत येतील त्यांस भक्षण करितात; या कारणा वरून ऋषीनी हीं पांच तीर्थें वर्ज केलीं आहेत यास्तव हे तपोधन अर्जुना, तूं या तीर्थांत स्नान करूं नको. असें ऋषींचें भाषण ऐकून अर्जुनाचें ऋषीनीं निवारण केलें असतांही तो प्रथम सौभद्र तीर्थीं स्नाना करितां उतरून त्याणें स्नान केलें; तों जलांत मकरानें अर्जुनाचे पाय धरिले असतां त्यानें बलात्कारें करून त्या ग्राहास बाहेर काढला. त्या ग्राहाची तत्काल सर्वाभरणानें भूषित अशी स्त्री झाली तिच्या तेजानें तो प्रदेश दीप्त झाला. दिव्य मनोरम जीचें लावण्य असा अद्भुत चमत्कार पाहून तिला अर्जुन बोलला कीं, हे जलचरी, तूं कोण आहेस येथें कशा करितां आलीस. असें काय तूं पातक केलें होतेंस कीं त्या पातकाच्या योगें तुला हा वास घडला. असें अर्जुनाचें भाषण ऐकून ती अप्सरा बोलली कीं हे महाबाहो, मी अप्सरा आहें, माझें नांव वर्गा, पूर्वीं देवारण्या मध्यें मी विहार करीत होतें. कुबेरास मी फार इष्ट आहें आणखीं माझ्या चार सख्या होत्या त्यां सह वर्तमान कुबेराच्या वनीं विहारा करि

तां गेल्यें होत्यें. त्या वनांत आह्मीं सर्वांनीं एक ब्राह्मण पाहिला. ज्याच्या तपाच्या तेजानें सकल वन देदीप्यमान झालें होतें, तो तपस्वी ब्राह्मण अत्यंत रूपवान एकांत स्थलीं वेदाध्ययन करीत बसला होता असा पाहिला. तेव्हां आह्मी सर्व त्या वनांत उतरलों आणि त्या ऋषीच्या तपास विघ्न करावें या हेतूनें मी, सौरभेई, समीची, बुदबुदा, लता, अशा पांच जणींनीं एक कालीं गायन करण्यास आरंभ केला. नाना प्रकारचे हांस्य विनोद करून त्या मुनीस लोभ करण्याचा जरीं उपाय केला तथापि तो महावीर्यवान असल्यामुळें त्याचें मन चंचल न होतां आपल्या निर्मल तपामध्येंच निमग्न राहिला आणि आमच्या हावभावानें परम क्रोध पाऊन त्यानें आह्मांस असा शाप दिला कीं, तुह्मीं पांच स्त्रिया शंभर वर्षे पर्यंत जलामध्यें नक्राचा जन्म धरून राहाल. असा विषय या अध्यायांत आहे.

२१७ अध्याय दोनशें सत्रा:— वर्गानामक अप्सरा भाषण करिते हे पार्था, ऋषीनीं शाप देतांच आह्मीं भयाभीत होऊन ऋषीस शरण जाऊन बोललों कीं, हे तपोधना, रूपें करून, वयें करून आह्मीं सुंदर असल्या मुळें कामानें पीडित होऊन हें अयुक्त कर्म आह्मीं केलें या अपराधाची क्षमा कर. जो तूं आह्मांस शाप दिलास येणें करून आमचा वधच झाला, परंतु स्त्रियांचा वध करूं नये असें धर्म वेत्ते ह्मणतात यास्तव आमची हिंसा करूं नको. असें भाषण ऐकून ब्राह्मण बोलला कीं, हे स्त्रिया नों, शत शब्द व शत सहस्र शब्द हे असंख्य परिमाण वाचक आहेत; परंतु मी तुह्मांस शत वर्षे पर्यंत जलचर होण्या विषयीं जो शाप दिला तेथें शत शब्द शंभर वर्षे वाचक आहे असें समजा. तुह्मीं ग्राह होऊन जलामध्यें रहात असतां शत वर्षांच्या अंतीं कोणी एक पुरुष श्रेष्ठ त्या जलांत स्नाना करितां येऊन तुह्मांस बाहेर काढील. त्याकालीं तुह्मी आप आपलीं स्वरूपें धारण कराल. मी जो तुह्मांस शाप दिला तो अनृत व्हावयाचा नाहीं. तुह्मीं तीर्थांतून ज्या कालीं सर्व निघाल त्या दिवसा पासून त्या तीर्थाचें नांव नारी तीर्थ अशी ख्याती होईल आणि तीं तीर्थे पुण्य कारक होऊन बहुत ऋषी तेथें स्नानार्थ येतील आणि आपलीं शरीरें पूनीत करितील. हे अर्जुना, असें त्या ब्राह्मणाचें भाषण ऐकून आम्हीं त्यास वंदन करून निघालों आणि अल्पकालानें आमची शीघ्र मुक्ती होईल अशा कोणत्या तीर्थांत जाऊन रहावें अशी चिंता करीत होतों तों एक मुहू-

तें स्नात्रानें नारद ऋषी त्यास्थलीं आले त्यांस आम्हीं वंदन केलें आणि लज्जित होऊन त्याच्या अग्रभागीं उभ्या राहिलों असतां नारदानें आह्मांस विचारलें कीं तुह्मांस काय दुःख झालें त्याचें कारण मला सांगा त्याकालीं आह्मीं झालेलें वर्तमान नारदास सांगितलें. तें ऐकून नारद आह्मांस बोलला कीं, हे स्त्रियाहो, दक्षिण दिशेस सागराच्या सन्निध सागरा सारखीच पुण्य कारक रमणीय अशीं पांच तीर्थें आहेत त्यांत तुह्मीं जाऊन रहा. कोणे एके कालीं पांडुपुत्र धनंजय त्या तीर्थांत स्नान करण्या करितां येऊन तुमचा लौकर मोक्ष करील. असें नारदाचें भाषण ऐकून आह्मीं तेथून निघोन या तीर्थीं राहिलों, तें नारदाचें भाषण आज सत्य होऊन आमचा उद्धार झाला. हे वीरा, माझ्या आणखी चार सख्या जलाचा आश्रय करून राहिल्या आहेत त्यांचा ही माझ्या प्रमाणें उद्धार कर. असें वर्गानामक अप्सरेचें भाषण ऐकून पांडुपुत्र त्या त्या तीर्थांत स्नाना करितां जाऊन त्या त्या स्त्रियांस जला बाहेर काढतांच त्या पूर्ववत् आपलें अप्सरांचें स्वरूप धरून अदृश्य झाल्या. असा अर्जुन पांच तीर्थांची शुद्धी करून पुनः चित्रांगदेच्या दर्शनार्थ मणीपुरास गेल्यावर निजपासून उत्पन्न झालेल्या बभ्रुवाहन नामक पुत्रास पाहून चित्रवाहन राजास बोलला कीं, या चित्रांगदेच्या योगें उत्पन्न झालेला हा बभ्रूवाहन इच्या मोल्या करितां घे. असें बोलून चित्रांगदेस बोलतो कीं, हे चित्रांगदे, तूं येथेंच राहून याचें रक्षण कर. धर्मराज सर्व पृथ्वी जिंकून राजसूय यज्ञ करील तेव्हां पृथ्वीवरील सकल राजे त्या यज्ञास येतील तेव्हां तुझा पिता ही बहुत रत्नें घेऊन येईल त्याज बरोबर तूं इंद्रप्रस्थ नगरीं ये ह्मणजे माझा सर्व बंधूचें दर्शन तुला घडेल व मी ही तुला पाहीन या करितां तूं माझ्या वियोगामुळें शोक न करितां या पुत्राचें रक्षण कर. हा पांडवांसही अत्यंत प्रिय आहे असें बोलून पुनः गोकर्ण तीर्थीं गेला. असा विषय या अध्या० आहे.

२१८ अध्याय दोनशें अठरा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजय- राजा, पश्चिम दिशेच्या ठायीं जीं तीर्थें व पुण्यायतनें होतीं तीं पाहण्या करितां अर्जुन जाऊन त्यानें यथानुक्रमें तीर्थांचें सेवन केलें, नंतर पुण्य कारक अशा प्रभास क्षेत्रीं गेला असतां कृष्णास आपला सखा अर्जुन आला असें समजल्यावर अर्जुनाच्या भेटी करितां तोही आला, उभयतांनीं एक

मेकांस भेटून आलिंगन दिलें. नंतर उभयतांचे एकमेकांस कुशल प्रश्न झाल्यावर वासुदेव अर्जुनास बोलला कीं हे सख्या, तुला येथें येण्याचें कारण काय तें मला सांग. असा प्रश्न ऐकून अर्जुनानें झालेला सर्व वृत्तांत कृष्णास सांगितला. नंतर उभयतांनीं प्रभास क्षेत्रीं कांहीं दिवस परमसुखानें राहून ते रैवत नामक पर्वतीं वास करण्याच्या उद्देशानें गेल्यावर नटनर्तकादिकांचीं गायनें झालीं. पुढें नटनर्तकांस जाण्याविषयीं आज्ञा झाल्यावर अर्जुनानें त्या सर्वांचा सत्कार केला. नंतर उत्तम प्रकारच्या दिव्य शयनावर महाबाहू भगवान् शयन करीत असतां नद्या, लहान सरोवरें, पर्वत व नाना प्रकारचीं वनें, उपवनें तीर्थें व आश्रम या संबंधीं कथा अर्जुन श्रीकृष्णास सांगूं लागला. नंतर भगवंतास निद्रा लागल्यावर अर्जुन ही आपण उत्तम शय्येच्या ठायीं निजला. दुसरे दिवशीं प्रातःकालीं मंगल व स्तुती पाठक यांणीं गीत व मधुर वाणी करून कृष्णास जागृत केल्यावर उभयतांही शयना पासून उठले. नंतर अर्जुना सहवर्तमान भगवान कांचनमय रथाचे ठाईं आरूढ होऊन द्वारकेस जाण्यास निघाला. कुंती पुत्र अर्जुन द्वारकेंत येणार असें तेथील निवासी लोकांस समजल्यावरून द्वारकेंतील मार्ग, राजमार्ग, चतुष्पथ, गृहें, उपगृहें, आराम व गृहसंबंधीं आराम अलंकृत करून सर्व द्वारका वासी लोक अर्जुनाच्या येण्याची मार्गप्रतीक्षा करीत बसले आहेत तों इतक्यांत अर्जुन व कृष्ण उभयतां आले असतां भोज, अंधक व वृष्णी यांणीं अर्जुनाचा परम सत्कार करून परम आनंदानें एकमेकांनीं एकमेकांस अभिवादन केलें. वृष्णी कुमारानीं अर्जुनास नमस्कार केला. अर्जुनाच्या समान वयाचे जे होते त्यांणीं वारंवार अर्जुनास आलिंगन दिलें. अशा समारंभानें अर्जुन कृष्णाच्या रत्नमय भवनीं जाऊन राहिल्यावर कृष्णानें भोजन उपहारादिकें करून अर्जुनाचा सत्कार केला असतां अर्जुनानें कृष्णा सहवर्तमान बहुत रात्री अतिक्रांत केल्या. असा विषय या अध्यायांत आहे.

२१९ अध्याय दोनशें एकोणीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, अर्जुन द्वारकेंत रहात असतां कांहीं दिवस गेल्यावर रैवतक गिरीचा कांहीं एक उत्साह आला होता; त्याजकरितां सकल वृष्णी व अंधक वीर

रैवतक पर्वतीं उत्साहा करितां जाऊन त्यानीं सहस्त्रावधी ब्राह्मणांस दानें केलीं. गिरीच्या आसमंतात् भागीं रत्नानीं चित्र विचित्र असे प्रासाद व नाना प्रकारचे कल्प वृक्षा सारखे वृक्ष लाऊन तो देश अत्यंत शोभायमान केला होता. नानाप्रकारच्या वाद्यांचे गजर होत होते, अप्सरा व नर्तकजन नृत्य करीत होते. कांहीं नगर निवासी लोक आपल्याभार्यांसहवर्तमान पादचारीच आले. बलराम मदिरा पानाच्या योगें मत्त झालेला असा तोही रैवतक पर्वतीं आला. तसाच वृष्णीचा राजा महा प्रतापी उग्रसेन सहस्त्रावधी स्त्रिया बराबर घेऊन आला. रुक्मिणीचापुत्र व सांब हे मदिरा पानानें उन्मत्त होऊन दिव्यांबरें धारण केलेले अमरासारखी क्रीडा करीत करीत आले. अक्रूर, सारण, गद, बभ्रु, विदुर, निषठ, चारुदेष्ण, पृथु, विपृथू, सत्यक, सात्यकी, भंगकार, महारव, हार्दिक्य, उद्धव व आणखी इतर यादव आप आपल्या स्त्रियां सहवर्तमान पृथक् पृथक् रैवतकोत्सव पाहण्यास आले तेणे करून तो गिरी फारच शोभला. वासुदेव आणि पार्थ हे ही उभयतां रैवतकावर येऊन पर्वताची शोभा पाहण्या करितां इकडे तिकडे फिरूं लागले तों इतक्यांत अलंकार धारण केलेली सख्यांशीं सहवर्तमान सुभद्रा ही रैवतकावर संचार करण्यास आली असतां अर्जुन सुभद्रेस पाहून काम पीडित झाल्यामुळें एकाग्र मनस्क झाला. ही अर्जुनाची चर्या पाहून कृष्ण हांस्य पूर्वक अर्जुनास बोलला कीं, हे पुरुष व्याघ्रा, वनामध्यें संचार करीत असतां कामानें तुझें मन अकुष्ट का झालें? हे पार्था, अरे ही माझी भगिनी सुभद्रा नामक होय. माझ्या पित्यास ही कन्या अत्यंतप्रिय आहे, जर इच्यावर तुझी इच्छा आहे तर मी आपले पित्यास तुझे मनोरथ सांगेन. असें कृष्णाचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे कृष्णा, वसुदेवाची दुहिता आणि तुझी स्वसा रूपें करून फार संपन्न असल्या मुळें इला पाहून कोण मोह पावणार नाहीं बरें? जें तूं भाषण केलेंस यांत माझें कल्याण झालें असें मी समजतों; परंतु हे जनार्दना, ही तुझी भगिनी माझी भार्या होईल असा मी उपाय काय करूं तो सांग. असें अर्जुनाचें भाषण ऐकून श्रीकृष्ण बोलतो हे पुरुषश्रेष्ठा, क्षत्रियांस स्वयंवर विवाह उचित आहे; परंतु त्याचा ही प्रस्तुत कालीं संशय आ

हे, कारण स्वाभाविक स्त्रियांची दृष्टी सुंदर पुरुषावर आसक्त असते तेव्हां आह्मीं स्वयंवर केला असतां कदाचित् सुभद्रेची दृष्टी अन्य पुरुषावर गेली तर तिचा तुला लाभ होणार नाहीं. यास्तव बलात्कारें करून स्त्रियांचें हरण करावें असाही शूर क्षत्रियांस विवाह लिहिला आहे असें धर्मवेत्ते ह्मणतात. तेव्हां हे अर्जुना, स्वयंवरांत बलात्कारें करून या माझ्या भगिनीचें तूं हरण केलें असतां तुला ही मिळेल हें मला बरें दिसतें. हें कृष्णाचें भाषण अर्जुनानें अंगीकृत केलें. नंतर उभयतांचा अशा कृत्या विषयीं निश्चय होऊन कृष्णानें शीघ्रगमन करणारे दूत इंद्रप्रस्थीं पाठवून हें वर्तमान धर्मराजास सांगितलें असतां या कृत्यास त्या महाबाहूनें आज्ञा दिली. असा विषय या अध्यायांत आहे.

२२० अध्याय दोनशें वीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सुभद्रे विषयीं कृष्णाचा आणि अर्जुनाचा पूर्वोक्त विचार झाल्यावर कृष्णानें सुभद्रेच्या हरणा विषयीं पार्थास अनुज्ञा दिली असतां पुढें जें कर्तव्य तें पार्थानें कृष्णाच्या आज्ञेनें सुवर्णमय रथ सिद्ध करून शैब्य सुग्रीवादी अश्व त्यास जोडून युद्धा संबंधीं शस्त्रास्त्रें त्या रथांत ठेविलीं. तो रथ किंकिणी जालानीं सुशोभित केला. आपण ही कवच, खड्ग व अंगुली त्राणादि धारण करून मृगया गमनाच्या मिषानें रथांत बसून वनामध्यें गेला. इकडे सुभद्रेनें रैवतक पर्वताचें पूजन करून नंतर गिरीच्या आसमंताद्भागीं ज्या देवता होत्या त्यांचें अर्चन केलें आणि ब्राह्मणांचे आशिर्वाद घेत घेत गिरीस प्रदक्षिणा करून द्वारकेस जाण्यास निघाली असतां अर्जुन बलात्कारानें तिला आपले रथांत बसवून नेऊन आपल्या स्वपुरीं जाण्यास निघाला. हें कृत्य पहातांच सुभद्रेच्या रक्षणार्थ जे सैनिक होते, त्यानीं द्वारकेंत जाऊन सुधर्मा नामक सभेचा जो सभा रक्षक होता त्यास हें सर्व वृत्त सांगितलें असतां सभापालानें सैन्याच्या सिद्धतेच्या भेरी वाजवितांच द्वारकेंतील सकल भोज, वृष्णी व अंधक क्षुब्ध झालेले अन्नपानादिकांचा त्याग करून सभेंतील सिंहासनावर येऊन बसले असतां सभापालानें अर्जुनाचें सर्व वृत्त त्यांस सांगितलें. तें सभापालाचें भाषण ऐकून वृष्णी वीर आपल्या भृत्यांस अहंकार युक्त असें बोलले कीं, हे भृत्य हो, आमचे रथ लौकर सिद्ध करा. प्रास, धनुष्य वर्चमें व कवचें लौकर आमच्या संन्निध आणा. या

प्रकारें यादवांचे रथ व सैन्य सिद्ध झालें असतां एकाएकीं तुमुल शब्द होऊं लाग ला. त्या काळीं कैलास शिखरासारखा असा वनमाळी बळराम बोलला कीं, हे वी र हो. जनार्दन स्तब्ध बसला आहे त्यापेक्षां तुमची ही बुद्धी काय उपयोगाची? कृष्णा चा अभिप्राय काय आहे तो जाणून जें कर्तव्य असेल तें करा. असें बलरामाचें भ षण ऐकून ते वृष्णी वीर बलरामाच्या भाषणाचा सत्कार करून स्तब्ध बसले. नंतर बलराम वासुदेवाकडे पाहून बोलला कीं, हे जनार्दना, हें जालेलें कृत्य पा हून तूं स्तब्ध कां बसलास? तूं पार्थाचा सत्कार केलास ह्मणोन आह्मीं सर्वांनीं पार्थाचा सत्कार केला; परंतु त्या दुर्बुद्धी कुळपांसनें आमचा केलेला सत्कार- व्यर्थ करून टाकिला. दुसऱ्याचे गृहीं भोजन करून त्याचें पात्र फोडून टाकणा रा असा कोण अधम पुरुष आहे बरें? हे केशवा, तुझा व माझा अनादर करून बलात्कारें करून या दुष्टानें सुभद्रा हरण केली, त्यापेक्षां आज हा मृत्यूच्यामु खांत सांपडला. आमच्या शिरावर याणें आपला चरण निक्षेप करून हें कर्म केलें त्यापेक्षां याच्या त्या कर्मानें कोण सहन करील. आज सकल पृथ्वी निष्कौर वी करून टाकितों. अर्जुनानें हें अनर्थकारक कर्म केलें हें किमपी मला सहन होत नाहीं. या प्रकारें बलराम मेघदुंदुभि सारखा उच्च स्वरानें गर्जना करून- भाषण करीत असतां सकल भोज, वृष्णी व अंधक यानीं त्याच्या भाषणास- अनुमोदन दिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

२२१ अध्याय दोनशें एकवीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सकल वृष्णी प्रभृती वीर बलरामाच्या वाक्यास अनुसरून आप आपल्या प- राक्रमानुरूप वारंवार भाषण करीत असतां कृष्ण असें बोलला कीं, हे वृष्णी वीर हो, अर्जुनानें सुभद्रेचें हरण केलें यांत तुमच्या यादव कुळाचा अपमान- काय जाहाला? किंबहुना तुमच्या कुळाचा अधिक सत्कारच झाला. पार्थ नर असें मानितो कीं, सात्वत कुळांत जे उत्पन्न आहेत त्यांस अर्थाचा लोभ किमपि नाहीं व कन्येचा स्वयंवर करणें हेंही कर्म अति कठिणच होय. कारण स्वयंवरा मध्यें कन्या कोणास मिळते याचा नियम नाहीं असें जाणोन कन्येचे मातापित र द्रव्यवान पुरुषास वरण्याविषयीं प्रेरणा करीत असतात हा स्वयंवरामध्यें- एक दोष आहे. दुसरा दोष असा आहे कीं, जसा एखादा पशु दान द्यावा तसा

कन्यारूप एक पशद्रव दान ग्रहण करावयाचा हें नीच कर्म, अत्यंत हीन तेसकार
ण आहे, तिसरा दोष असा आहे कीं, आपलें अपत्य लोकास विकावें तसें क-
न्यादान ह्मणजे केवळ जामातास आपली कन्या विक्रयच करणें असें होतें-
तेव्हां कौन्तेयानें कन्यादानामध्यें इतके दोष आहेत असें पाहून बलात्कारानें
हरण करणें हाच धर्म, अशा तात्पर्यानें कन्या हरण केली असेल असें मला
वाटतें. अर्जुनाचा आणि सुभद्रेचा संबंध झाला असतां उचितच आहे यांत-
दोष काय? भरत राजा महा धार्मिक असून त्याच्या कुळांत महायशस्वी शंत
नु त्या कुळांत अर्जुनाचा जन्म, कुंती भोज राजाची सुता ज्या अर्जुनाची माता, अ
शा अर्जुनाचा संबंध करण्यास कोण इच्छा करणार नाहीं. कदाचित् तुह्मीं
इच्छा कराल कीं, पार्थास युद्धामध्यें जिंकून सुभद्रा माघारी आणूं तर विरू
पाक्ष भगवान शिव यावांचून पार्थाचा युद्धामध्यें पराभव करण्यास इंद्रादि-
देवही समर्थ नाहींत. तुह्मीं सर्वांनीं मिळून आतां पार्थाच्या पाठीमागून जाऊन
परम हर्षानें त्यास माघारा आणावा असें मला योग्य दिसतें. जर युद्धांत पा-
र्थास जिंकून सुभद्रा माघारी आणण्याच्या उद्देशानें त्याच्या मागून जाल त
र त्याणें तुमचा पराजय केला असतां तुमची यश व कीर्ती नष्ट होईल. असें
वासुदेवाचें भाषण ऐकून सकल यादवांनीं त्याच्या भाषणाप्रमाणें करितां
च अर्जुन माघारा फिरला. नंतर श्रीकृष्णानें सुभद्रेचा विवाह केल्यावर अ
र्जुन एक संवत्सर व आणखी कांहीं दिवस पर्यंत द्वारकेंत रहात असतां-
वृष्णीनंदनानीं त्याचा परम सत्कार केला पुढें अर्जुन अवशिष्ट काळक्षपण
करण्याकरितां पुष्कर तीर्थीं राहून बारा वर्षें पूर्ण झाल्यावर खांडवप्रस्थीं
गेला. नंतर द्वादश वर्षें पर्यंत वनवास नियम व्रत धारण केलें त्या वेषानेंच
प्रथम धर्मराजास भेटून नंतर ब्राह्मणांची पूजा करून द्रौपदी कडे गेला-
असतां द्रौपदी परम नम्रतेनें बोलली कीं, हे कौंतेया, इकडे कां आलास? जिकडे
ती यादव कन्या आहे तिकडेच कां राहिला नाहींस. या प्रकारें नाना प्रकारच्या प्रेम
युक्त भाषणानीं द्रौपदी विलाप करीत असतां अर्जुनानें त्या सर्व भाषणांची वारं
वार क्षमा करून द्रौपदीचें शांतवन केलें. नंतर सुभद्रेस रेशमी वस्त्र परिधाना-
स देऊन गौळणीचे वेषानें प्रथम कुंतीस भेटण्याकरितां पाठविली असतां तीप

रम प्रीतीनें कुंतीस नमस्कार करून अग्रभागीं उभीराहिली. त्याकालीं कुंतीनें सुभद्रेच्या मूर्ध्याचें आघ्राण करून परम प्रीतीनें बहुत आशिर्वाद दिले. नंतर परम त्वरेनें द्रौपदीच्या सन्निध येऊन बोलली कीं, मी तुमची दासी आल्यें आहें. असें सुभद्रेचें भाषण ऐकून द्रौपदीनें सुभद्रेस मस्तकस्थान करून आलिंगन दिलें. आणि तुझा पती निःसपत्न असो असा आशीर्वाद देतांच सुभद्रा परम हर्षित होऊन तथास्तु असें बोलली. त्याकाळीं पांडवांसही मोठा हर्ष झाला. कुंतीसही सुभद्रे विषयीं परम प्रीती उत्पन्न झाली. इकडे श्रीकृष्णास अर्जुन इंद्रप्रस्थीं गेला हें वर्तमान समजतांच त्यास भेटण्या करितां बलरामास बराबर घेऊन इंद्रप्रस्थीं आला. तसाच अक्रूर, महाबुद्धिवान उद्धव, तोही अर्जुनाच्या भेटी करितां आला; सात्यकी, कृतवर्मा, प्रद्युम्न व दुसरेही बहुत यादव, वृष्णी, भोज व अंधक इंद्रप्रस्थीं अर्जुनास प्रीतीदायक वस्त्रें, अलंकार व भूषणें देण्या करितां आले. श्रीकृष्ण इंद्रप्रस्थीं येणार हें समजतांच युधिष्ठिरानें नकुल सहदेवास त्यास आणण्या करितां सामारे पाठविले असतां श्रीकृष्ण त्यां सहवर्तमान इंद्रप्रस्थांत गेला. सकल नगर ध्वज पताकानीं सुशोभित केलें. मार्गामध्यें चंदनाचे सडे टाकिले. त्याकालीं वृष्णी, अंधक व राम यांसहवर्तमान महाबाहू पुरुषोत्तम नगरांत आल्यावर सहस्रावधी ब्राह्मणानीं व पौर जनानीं कृष्णाची पूजा केली असतां पुरंदर गृह सदृश एक युधिष्ठिराचें भवन होतें त्यांत रामासहवर्तमान श्रीकृष्ण गेल्यावर युधिष्ठिरानें श्रीकृष्णाच्या मूर्ध्याचें अवघ्राण करून बाहूनीं आलिंगन दिलें असतां श्रीकृष्ण परम आनंद पाऊन त्यानें पांडवांची यथानुक्रमें पूजा केली. नंतर भीमसेनाचा यथाविधी सत्कार केल्यावर युधिष्ठिरानेंही सकल वृष्णी अंधकांची यथाविधि पूजा करण्यास आरंभ केला. कांहीं आपल्यापेक्षां कनिष्ठ होते त्यांस अभिवादन केलें. असें एकमेकानीं परस्परांचें आदरातिथ्य केल्यावर वरपक्षी यांस देण्या करितां जे पदार्थ श्रीकृष्णानें आणिले होते ते यथानुक्रमें दिले. सूता सहवर्तमान सहस्ररथ, तशाच दहा हजार गाई, सहस्र घोड्या, पांचशें खेचरी, उत्तम वेष धारण केलेल्या लावण्यवती रजोदर्शन ज्यांस प्राप्त झाला नाहीं अशा सहस्रस्त्रिया, परिचर्या कर्मामध्यें अत्यंत दक्ष अशा कांहीं दासी, एक लक्ष अश्व, स्वतःसिद्ध झालेले असे सहस्र गज जनार्दनानें पांडवांस दिले, बल-

रामानें ही परम प्रीतीकरून कांहीं रत्नें,बल,वस्त्रें व महान् महान् गज असे पार्थास दिले.हे सकलपदार्थ ज्याकाळीं पांडवांस दिले त्याकाळीं समुद्र जसा दिसतो तसा तो पदार्थसमुदाय दिसूं लागला. महान् महान् रत्नें हीं ज्यासमुद्राचा ओघ, श्वेतवस्त्रें व कांबळीं हे ज्यांतील फेन, महानगज हे ज्या समुद्रांतील मगर, पताकाह्या ज्या समुद्राची शेवाळ शोभूं लागली. असा सकलपदार्थानीं परिपूर्ण झालेला समुद्र पांडवांच्या द्वेष्ट्यांस शोकदायक झाला. हास कल पदार्थ सागर धर्मराजानें घेऊन सकल वृष्णी, अंधकांची यथानुक्रमें पूजा केली तंतर महारथी वृष्णी,अंधक कांहीं दिवसानीं रामासहवर्तमानपुनः द्वारकेस गेले. श्रीकृष्ण पार्थासहवर्तमान यमुनातिरीं मृगया करण्याकरीतां जाऊन नानाप्रकारचे मृग, वराह यांचा वध करीत.याप्रकारें तेउभयतां इंद्रप्रस्थीं रहात असतां कांहीं दिवसानीं कृष्णाची भगिनी जी सुभद्रा इचेठायीं दीर्घबाहू असा एक पुत्र अर्जुना पासून झाला.तो पाहून सकल पुरुषानीं हा पुत्र महा क्रोधवान व शूर होईल असें जाणोन त्याचें नाव अभिमन्यु असें ठेविलें.त्या काळीं धर्म राजानें ब्राह्मणांस दहा सहस्त्र गाईंदान केल्या. हा पुत्र उत्पन्न झाल्यापासून कृष्णास मोठाप्रिय झाला,हा अभिमन्यु पितृगृहीं दिवसें दिवस वृद्धी प्रत पाऊं लागल्यावर दशविध धनुर्वेद व सकल दिव्य व मानुष अस्त्रविद्या इत्यादिक अर्जुनानें अभिमन्यूस शिकविल्या असतां अभिमन्यु सर्व लक्षणानीं युक्त असून वीर्य,शौर्य, रूप व आकृति ज्याची कृष्णा सारखी होती. पुढें द्रौपदीच्या वीर्ये पांच पती पासून महा श्रेष्ठवीर्यवान् असे पांच पुत्र झाले.युधिष्ठिरा पासून प्रति विंध्य, भीमसेना पासून सुतसोम, अर्जुना पासून श्रुतकर्मा, नकुला पासून शतानिक आणि सहदेवापासून श्रुतसेन असे पांच पुत्र झाले. युधिष्ठिर पुत्र शत्रूंच्या प्रहरणाविषयीं अत्यंत ज्ञाता असून शास्त्र ज्ञानाविषयीं विंध्याद्रि पर्वता सारखा झाला ह्मणून सकलानीं त्याचें नाव प्रतिविंध्य असें ठेविलें. भीमपुत्र, क्रतयाग व सोम यांचे ठायीं सोमाकोसारखा तेजस्वी होईल असें जाणोन त्याचें नाव सुतसोम असें ठेविलें. अर्जुन पुत्र केवळ कांहीं एक कर्म श्रुत होतांच त्यासारखेंच कर्म तत्काल करणारा आहे असें जाणोन त्याचें नाव श्रुतकर्मा असें ठेविलें. महात्माजो-

शतानिक नामक राजऋषी याचें कर्म कीर्ती वर्धन करणारें जसें होतें तसें नकुल पुत्राचें कर्म आहे, असें जाणोन सकळांनीं त्याचें नाव शतानिक असें ठेविलें. वन्ही दैवत्य नामक नक्षत्रीं कृष्णेच्या गर्भी सहदेवापासून पुत्र झाला, असें सर्वांस श्रुत झाल्या वरून त्याचें नाव श्रुतसेन असें ठेविलें. हे द्रौपदीचे पुत्र महान् यशस्वी एकएक वर्षाच्या अंतरानें झाले. त्यांचें जातकर्म व चूडोपनयनादि संस्कार धौम्यऋषीनीं यथाशास्त्र करून त्यांस वेदाध्ययन करविलें. पुढें अर्जुनानें या पुत्रांस दिव्य व मानुष, इषु, अस्त्र विद्या शिकविल्यावर ते महारथी पांच पुत्र दिव्य गर्भासारखे पाहून पांडव परम आनंद पावले. असा विषय या अध्यायांत आहे.

२२२ अध्याय दोनशें बावीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धृतराष्ट्र व भीष्म यांच्या आज्ञेनें पांडव इंद्रप्रस्थीं रहात असतां त्याणीं इतर क्षत्रियांस हनन करून आपल्यास वश केलें. धर्मानें, धर्म, अर्थ, काम या त्रिवर्गांस परस्परांचा उपमर्द न होतां त्यांचें सेवन करून राहत असतां त्यांस आपल्या तीन बंधु सारखें मानिलें. निरंतर वेदाध्ययन करिता व यज्ञयागादि क्रिया करिता व शत्रुभयकारक लोकांचा रक्षण करिता असल्यामुळें सकल लोक धर्मराजाचें फारच सेवन करूं लागले. धर्मराजाची बुद्धी फार विलक्षण होती. असत्य, अयुक्त, असाद्य आणि अप्रिय असें भाषण त्याणें कधींही केलें नाहीं. आपल्या शरीराचें जसें हित करावें तसा तो धर्मराजा सर्वप्रजेचें हित करण्या विषयीं निरंतर इच्छा करी. तसेंच धर्मराजाचे भ्राते ही सकलराजांस तेजानें आक्रुष्ट करून हर्षानें खांडवप्रस्थीं राहिले. त्यांस कांहीं दिवस अतिक्रांत झाल्यावर कोणेएके दिवशीं अर्जुन श्रीकृष्णास बोलला कीं, हे कृष्णा, प्रस्तुत उष्णकालाचे दिवस असल्यामुळें सकल मित्र व सुहृज्जन समागमें घेऊन यमुनातिरीं विहारा करितां जाऊन सायंकाल पर्यंत तेथें क्रीडा करून पुनः माघारी येऊं. असें अर्जुनाचें भाषण ऐकून वासुदेव बोलला हे पार्था, तूं जें बोललास तसेंच माझें मन आहे. याप्रकारें कृष्णानें भाषण केल्यावर अर्जुन व कृष्ण उभयतां धर्मराजाची आज्ञा घेऊन सुहृज्जनां सहवर्तमान यमुना तिरीं गेले. जसें इंद्रानें नंदन वन काय अशा त्या उत्तम प्रकारच्या सुंदर भुवनांत जाऊन त्या

नीं भक्ष्य, भोज्य, पेय व इतर रसयुक्त पदार्थ भक्षण केले आणि नानाप्रकारचीं सुवासिक माल्यें धारण करून व उत्तमोत्तम प्रकारचे सुगंधीक पदार्थ अंगास लावून ते आपल्या सुहृज्जनांसहवर्तमान अंतःपुरांत गेले आणि पिनपयोधरा व पृथुलश्रोणी अशा स्त्रियां सहवर्तमान क्रीडा करूं लागले. ते उभयतां कांहीं स्त्रिया घेऊन कदाचित् जलांत, आपल्या मंदिरांत अथवा वनांत क्रीडा करीत. उत्तमोत्तम कांहीं स्त्रिया नृत्य व गायन करूं लागल्या असतां सुभद्रा व द्रौपदी यांणीं नाना प्रकारचीं आभरणें व वस्त्रें त्या स्त्रियांस दिलीं. सकल स्त्रिया मदिरा पान करून उन्मत्त असल्यामुळें परस्पर एकमेकांकडे पाहून उच्च स्वरानें हास्य करीत कदाचित् नृत्यही करीत. कोणी कोणी स्त्रिया आपआपल्यांत एकमेकावर प्रहार करीत. कोणी पुरुष वेणू, वीणा, मृदंग यांचे शब्द करूं लागले. तेणें करून तें गृह यांच्या शब्दानें पूर्ण होऊन गेलें. असे ते कुरु व दाशार्हनंदन उभयतां क्रीडा करून एक समीप सुरम्य देश होता त्या स्थानीं जाऊन उत्तम प्रकारच्या आसनावर बसले आणि प्राचीन झालेल्या नाना प्रकारच्या कथा सांगत परम प्रेमानें बसले आहेत तों त्या उभयतांच्या अग्रभागीं एक ब्राह्मण शालवृक्षासारखा उंच, तप्तकांचनासारखी दीप्ती, चिर वल्कलें आणि जटा धारण केलेला असा उभयतांच्या अग्रभागीं येऊन उभा राहिला. हें पाहून ते उभयतां वासुदेव आणि अर्जुन आसनापासून त्यास सामोरे गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

२२३ अध्याय दोनशें तेवीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, लोकवीर जे वासुदेव व अर्जुन यांस खांडव वनाच्या सन्निध भागीं तो ब्राह्मण सांत पूर्वक बोलला कीं, हे वीरहो मी बहुभोजन करणारा ब्राह्मण आहें यास्तव माझी तृप्ती होई पर्यंत मी अन्नाची भिक्षा मागतों ती तुह्मी देण्यास समर्थ आहां. असें ब्राह्मणाचें भाषण ऐकून कृष्णार्जुन बोलतात हे विप्रा, कोणत्या अन्नें करून तुझी तृप्ती होईल तें सांग ह्मणजे त्या अन्नाची सिद्धता करूं. असें उभयतांचें भाषण ऐकून पुनः ब्राह्मण बोलतो हे वीरहो, मी अन्नाची इच्छा करणारा ब्राह्मण नव्हे; मी अग्नी आहें असें जाणा. अग्नीस योग्य जें अन्न असेल तें अन्न भोजन देण्या विषयीं माझी प्रार्थना आहे. हें खांडव नामक वन इंद्रानें निरंत

र रक्षित असल्या मुळें त्याचा दाह करण्यास मी समर्थ होत नाहीं. याचें कारण असें कीं, इंद्राचा एक सखा तक्षक आहे तो आपल्या गणां सहवर्तमान त्याच नांत राहतो ह्मणोन इंद्रानें तक्षकां करितां त्या वनाचें रक्षण केलें आहे, कदाचित् मी दग्ध करूं लागलों तर इंद्र तत्काल पर्जन्य वृष्टी करून माझें शांतवन करतो. तुह्मीं उभयतां अस्त्रविद्या विशारद आहांत यास्तव मी खांडव वन दग्ध करूं लागलों ह्मणजे तुह्मीं अस्त्राच्या योगें त्याचें व इतर जीं भूतें आहेत त्यांचें ही निवारण करावें. असें वैशंपायनानें भाषण ऐकून जनमेजय प्रश्न करितो हे वैशंपायन ऋषे, नानाप्रकारच्या जीवानीं युक्त असें खांडव वन इंद्रानें रक्षित असतां त्याचा दाह करण्या विषयीं अग्नीची कां इच्छा झाली? याचें कारण मला सांगा.- असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, तूं फार चांगला प्रश्न केलास. खांडव विनाश संबंधीं ऋषीनीं कथित केलेली पुराण कथा सांगतों. पूर्वी इंद्रासारखा बलानें व पराक्रमानें विख्यात असा श्वेतकी नामक राजा होता, त्या राजासारखा दानपती व बुद्धिमान असा दुसरा राजा पृथ्वीवर कोणीच नवता. याणे बहुत दक्षिणायुक्त असे असंख्याक याग केले. यागा खेरीज याची बुद्धी अन्यत्र कोठेंच नवती, बहुत ऋत्विजां सहवर्तमान राजा याग करीत असतां यज्ञ संबंधीं धूम्रानें अत्यंत दुःखी होऊन राजाचा त्याग करूं लागले. त्या कालीं राजा ऋत्विजांस यागा विषयीं प्रेरणा करीत असतां ही समग्र ऋत्विज नेत्र विकल झा ल्या मुळें याग करण्या विषयीं समर्थ होईनात. असें झाल्यावर राजानें त्या ब्राह्मणाच्या अनुमतें दुसरे ऋत्विज आणोन सत्राची समाप्ती केली. यास कांहीं काल गेल्यावर पुनः राजास अशी इच्छा उत्पन्न झाली कीं, शतसंवत्सरात्मक एक सत्र पुनः करावें, हें वर्तमान ऐकून ऋत्विजानीं सत्राचा स्वीकार केला नाहीं यामुळें राजानें त्या ऋत्विजांचें कर्म करण्या करितां बहुत ब्राह्मणाचा यत्न केला बहुत दान देण्यासही उद्युक्त झाला तथापि ऋत्विजानीं राजाचा अंगिकार केला नाहीं. त्या कालीं पुनः राजा ऋत्विजांस कोपानें बोलला कीं, हे ब्राह्मणहो, तुमच्या शुश्रुषे मध्यें मी तत्पर असेंन माझेपासून तुह्मांस कांहीं वैगुण्य झालें असतां माझा तुह्मीं तत्काल त्याग करा; परंतु मला क्रतु करण्याची श्रद्धा उत्पन्न झाली त्याचा विघात करण्यास तुह्मीं योग्य नाहीं, तुह्मास मी शरण आलों

माझ्यावर प्रसाद करा. इतकें ही करून द्वेषानें तुह्मी माझा त्याग कराल तर मी दुस रे ऋत्विज आणीन. असें भाषण करून राजा विराम पावला असतां ब्राह्मण परम क्रुद्ध होऊन राजास बोलले कीं, हे नृपसत्तमा, तुझें यज्ञकर्म बहुत काल पर्यंत आह्मीं केल्यामुळें परिश्रांत झालों आहोंत. आह्मी द्वेषानें तुझा त्याग करीत नाहीं, यास्तव तूंही आमचा त्याग करूं नको. तुझ्या बुद्धीस कांहीं वैकल्य न ये ऊन सत्र करण्या विषयीं तुझी त्वराच असल्यास महारुद्र भगवान् शिव यांचे संन्निध जा ह्मणजे तो तुझाकडून याजन करवील. असें क्रोधयुक्त ब्राह्मणाचें भाषण ऐकून श्वेतकी राजा कैलासपर्वतीं गेला आणि उग्रतपें करून शंकराचें आराधन करण्यास उद्युक्त झाला. कांहीं दिवस पर्यंत उपवास केले, कधीं कधीं दिवसांच्या द्वादश काळीं, कदाचित् षोडश काळीं फलमूलाचा आहार करी. याप्रकारें श्वेतकी राजा ऊर्ध्वबाहू करून स्थाणुसारखा सहा महिनें पर्यंत एकस्थानीं अचल उभा राहिला असतां त्याच्या त्या उग्रतपानें शंकर प्रसन्न होऊन राजास बोलले कीं, हे राजा, तुझ्या उग्रतपें करून मी संतुष्ट झालों. जो तुला इच्छित वर असेल तो माग. असें रुद्राचें भाषण ऐकून राजा शंकरास बोलला कीं, हे भगवन्, जर माझ्यावर संतुष्ट होऊन वर देण्यास उद्युक्त झालां आहांत तर माझ्या गृहीं आपण स्वतः येऊन याजन करावें. असें राजाचें भाषण ऐकून भगवान् रुद्र बोलले कीं हे राजा, मी याजन करावें ह्मणून तूं हें महत् तप केलेंस खरें; परंतु याजन करण्या विषयीं आह्मांस अधिकार नाहीं; परंतु कोणे एके समयीं तुझाकडून याजन करवीन. द्वादश वर्षे पर्यंत ब्रह्मचर्यव्रत धारण करून अविच्छिन्न घृतधारेनें अग्नीस तृप्त कर ह्मणजे जी तुझी इच्छा आहे ती परिपूर्ण होईल. असें रुद्राचें भाषण ऐकून श्वेतकी राजानें बारा वर्षे पर्यंत ब्रह्मचर्यव्रत धारण करून रुद्रानें सांगितल्या प्रमाणें अविच्छिन्न आज्यधारानें अग्नीचें तर्पण केलें. हें पाहून शंकर परम प्रीतीनें राजास बोलला कीं, हे नृपश्रेष्ठा, तुझ्या या कर्मानें मी आज संतुष्ट झालों; परंतु याजन कर्म हें ब्राह्मणांचें आहे यास्तव मी स्वतः तुझाकडून याजन करवीत नाहीं तर माझाच अंश भूत पृथ्वीवर दुर्वास ऋषी विख्यात आहे तो तुझाकडून याजन करवील. याजन करण्या विषयीं मी त्यास आज्ञा देतों. यज्ञसंबंधीं सामग्रीची सिद्धता करावी. असें रुद्राचें भाषण ऐकून श्वेतकी

राजा स्वनगरीं आला आणि सकळसामोग्री सिद्ध करून पुनः रुद्रास बोलला. हे महादेवा, तुमच्या आज्ञेनें यज्ञसामोग्री सकळ मी सिद्ध केली, उदईक दीक्षा घेण्याची इच्छा आहे. असें राजाचें भाषण ऐकून रुद्रानें दुर्वासा ऋषीस बोलावून सांगितलें कीं हे द्विजश्रेष्ठा, महाभाग्यशाली श्वेतकी राजा आहे त्याचे गृहीं जाऊन तुह्मीं याजन करा. असें रुद्राचें भाषण ऐकून ऋषीनीं सांगितलें कीं, फार चांगलें आहे. नंतर ऋषीनीं राजाच्या सत्रास जाऊन त्याच्या इच्छे प्रमाणें त्याचें सत्र परिपूर्ण केलें. राजानें ब्राह्मणांस बहुत दक्षणा दिल्या आणि ब्राह्मणाचा संतोष केला. असें तें राजाचें सत्र समाप्त झाल्यावर दुर्वासाच्या आज्ञेनें सकल ऋत्विज व याजक ब्राह्मण स्वगृहीं गेले, राजाची आज्ञा घेऊन दुर्वासाही स्वस्थानीं गेला. श्वेतकी राजा स्वनगरीं गेला. त्या कालीं राजाच्या सत्रामध्यें अग्नीस कांहीं विकार उत्पन्न होऊन दिवसें दिवस तेजोहीन होत चालला. अशी आपली प्रकृती झालेली पाहून अग्नी ब्रह्मलोकीं ब्रह्मदेवास शरण जाऊन बोलला कीं हे ब्रह्मदेवा, मी तेजानें हीन झालों माझें सकल बल नष्ट झालें यास्तव तुझा प्रसादें करून माझी स्थिती पूर्ववत प्रमाणें होण्या विषयीं मी इच्छा करितों. असें अग्नीचें भाषण ऐकून पितामह बोलला कीं, हे हव्यवाहना, तूं बारा वर्षें पर्यंत निरंतर घृतधारा भक्षण केलीस तेणें करून ही तुला अत्यंत ग्लानी झाली आहे सकल तुझें तेज नष्ट झालें. हे अग्नि, आतां पूर्ववत् प्रमाणें तुझी प्रकृती होणें कठीण दिसते. पूर्वी तूं इंद्राच्या आज्ञेवरून दैत्यांचें गृह, महाघोर खांडववन नाशक होतेनें तूं भस्म करून टाकिलेंस; आतां त्या वनांत जे प्राणी रहात असती ल त्यांचे मेद भक्षण कर ह्मणजे तुझी प्रकृती पूर्ववत् प्रमाणें होईल. असें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून अग्नी खांडव वनाचा दाह करूं लागला असतां त्या वनांतील राहणाऱ्या प्राण्यानीं पावक शांती करितां उपाय आरंभिले. शतशः गजानीं आपल्या शुंडादंडांत जल धारण करून तृप्त झालेल्या पावकावर शिंचन केलें बहुशीर्ष नाग आपल्या फणावर जलधारण करून परम क्रोधानें पावक शांती करितां यत्न करूं लागले असतां तो पावक शांत झाला. अशा प्रकारें सातवेळ अग्नि खांडव वनाचे दाहार्थ उद्युक्त झाला असतां त्यांतील प्राण्यानीं अग्नीचें उपशमन केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

२२४ अध्याय दोनशें चौविस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजयरा ना, अग्नी खांडव दाह्य विषयीं निराश होऊन त्यानें पितामहास खांडव वन सं बंधीं जालेलें वर्तमान सांगितलें. तें ऐकतांच ब्रह्मदेव अग्नीस बोलला कीं, हे हव्यवाहन, खांडववन दाह करण्याविषयीं मला एकउपाय सुचला आहे तो तूं केला असतां खांडव वन इंद्रानें जरी रक्षित आहे तथापि त्याचा दाह करण्यास तूं समर्थ होशील. हे विभावसो, आदिदेव,नरनारायण नामक स्वर्गामध्यें राहतात ते परस्तून मनुष्य लोकीं गेले आहेत त्यांस लोकांमध्यें वासुदेव व अर्जुन ह्मणतात,त्यांच्या साहाय्यानें तूं खांडव वन दग्ध करशील यास्तव त्यांच्यासाहाय्यार्थ तूं त्यांची प्रार्थना कर. असें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून हव्यवाहनानें परमत्वरेनें कृष्णार्जुनाच्या सन्निध जाऊन झालेलें वर्तमान त्या उभयतांस सांगितलें,तोहा अग्नि ब्राह्मण वेषानें आला असतां अर्जुन त्यास बोलला हे हव्यवाहना, इंद्रासह वर्तमान युद्ध करण्या विषयीं मजजवळ उत्तम दिव्य अस्त्रें बहुत आहेत व मीवीर्यवानही आहें; परंतु या माझ्या अस्त्रानें सहन करण्यास योग्य असें धनुष्य माझ्या जवळ नाहीं; यास्तव समरामध्यें शत्रूचें कसें हनन करूं. सूर्य प्रतिम तेजस्वी रथ जर असेल तर मी आपलें वीर्य प्रदर्शित करीन. तसेंच कृष्णाच्या वीर्या समान त्याजपाशीं आयुध नाहीं; जर कृष्णास आयुध मिळेल तर नागपिशाच इत्यादिकांस मारण्यास माधव समर्थ होईल यास्तव हे भगवन्,या वनाचा दाह करण्यास तूं प्रसक्त झाला असतां इंद्रानें जर वर्षाव केला तर त्याच्या निवारणा विषयीं मी काय उपाय करूं,पौरुषानें जें कर्तव्य तें आह्मीं उभयतां करूं; परंतु या विषयीं जीं साधनें पाहिजेत तीं देण्यास तूं समर्थ आहेस. असा विषय या अध्यायांत आहे.

२२५ अध्याय दोनशें पंचवीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, अर्जुनाचें भाषण ऐकून हुताशन चिंताग्रस्त होऊन उदकांत रहाणारा जो लोकपाल वरुण याच्या दर्शनाची आकांक्षा करूं लागला असतां जलचर वरुण अग्नीस तत्काळ दर्शन देऊन त्याच्या अग्रभागीं स्थित झाला. त्या कालीं अग्नि वरुणास बोलला कीं,हे वरुणा, सोमानें तुजला धनुष्य बाण, अक्षय्य भाते व कपि लक्षण युक्त रथ हें जे दिले आहेत ते इकडे लौकर घेऊन ये. कारण त्या गां

डीव धनुष्याच्या योगें पार्थ महत् कर्म करणार आहे. तसेंच तुजपाशीं चक्र आहे तें वासुदेवास देण्याकरितां माझ्या स्वाधीन कर म्हणजे मी वासुदेवास देतों. असें अग्नीचें भाषण ऐकून वरुणानें त्याप्रमाणें केलें. नंतर अग्नीनें वरुणापासून गांडीव धनुष्य घेऊन अर्जुनास दिलें. तें धनुष्य अद्भुत होतें, ज्या धनुष्याचा पराभव कोणत्याही शस्त्रानें व्हावयाचा नाहीं तें दिसण्यास मात्र भयंकर परंतु मृदु होतें त्यास कोठें छिद्रें नवतीं. देव, दानव प्रभृतीनीं बहुत दिवसपर्यंत ज्या धनुष्याची पूजा केली तें रत्न अग्नीनें अर्जुनास देऊन अक्षय्य भाते व शर दिले. तसाच दिव्यास्त्रानीं परिपूर्ण केलेला, कपि लक्षण चिन्हीत, ध्वजानें उपयुक्त, अश्वानीं योजित, देवदानवास ही अजय्य, सूर्यासारखा तेजस्वी, महान् ज्याचा घोष. असा रथ दिला. हा रथ विश्वकर्म्यानें तपाच्या योगें निर्माण केला होता त्या रथासारखा दुसरा रथ त्रैलोक्यांत कोठें नसेल, तो रवीसारखा देदीप्यमान होता या रथांत सोमानें आरूढ होऊन सकल दानवांचा पराभव केला. नूतन मेघासारखी ज्याची कांती, सकल श्रीनें ज्वलित असा अति उत्तम होता. रथाच्या ध्वजावर वास करणारा वानर सकलांस दग्ध करितोच काय असा दिसूं लागला. त्या ध्वजाच्या आसमंतात् भागीं दुसरीं इतर भूतें बहुत होतीं तेणें करून ध्वजाची शोभा फारच सुंदर दिसूं लागली. असा रथ पाहून अर्जुनानें त्यास प्रदक्षणा केल्या नंतर इतर देवतांस नमस्कार करून कवच, खड्ग व अंगुलित्राणें धारण केलीं व इतर सांग्रामिक शस्त्रें होतीं तीं घेऊन सिद्ध झाला. नंतर अग्नीस पुरस्कृत करून धनुष्यास प्रत्यंचा लाविली त्या कालीं प्रत्यंचेचा मोठा भयंकर नाद झाला तेणें करून तेथें जे प्राणी होते त्यांच्या मनास तत्काल बहुत भय उत्पन्न झालें. हा रथ हें धनुष्य, अक्षय्य शरभाते अर्जुनास प्राप्त होतांच अग्नीचें साहाय्य करण्या विषयीं अर्जुनास मोठी शक्ती आली. रथाची व धनुष्याची प्राप्ती होतांच बहुत हर्ष झाला; तसेंच वज्रनाभ नामक चक्र अग्नीनें कृष्णास देतांच श्रीकृष्णाही तत्काल अग्नीचे साह्यार्थ सिद्ध झाला. अग्नीनें श्रीकृष्णास आग्नेय अस्त्र म्हणजे चक्र देऊन असें सांगितलें कीं, हे मधुसूदना, या अस्त्राच्या योगें अमानुष जे आहेत त्यांचा हीतूं रणामध्यें पराभव करशील. असें भाषण करून नंतर अशनी सारखा जीचा निस्वन, दैत्याचा अंत करणारी, महाघोर कौमोदकी नामक-

गदा श्रीकृष्णास दिली, ती कृष्णानें घेतली. नंतर उभयतां कृष्णार्जुन बहुत हर्षित झाले. नंतर अर्जुन अग्नीस बोलला कीं, हे पावका, हा भगवान् श्रीकृष्ण हस्तामध्यें चक्र धारण करून युद्धामध्यें आला असतां आपल्या चक्रबळें करून सर्वांचें भस्म करील. हा जनार्दन जें अघटित कर्म करील तसें तीन लोकांत कोणी करण्यास समर्थ होणार नाहीं. तसेंच गांडिव धनुष्य व अक्षय्य शर भाते घेऊन मी रणांगणीं आलों असतां तीन लोकांस जिंकीन. आतां तूं चोंहीकडून या वनास दाह करण्याचा यथेच्छ आरंभ कर. आह्मीं उभयतां तुला साहाय्य करण्याविषयीं आतां सिद्ध झालों आहों. असें उभयतांचें वाक्य ऐकून अग्नीनें आपलें तेजसरूप प्रगट केलें आणि चारी प्रदेशांनीं तें वन दग्ध करण्यास आरंभ केला. अग्नीचे कडकडाट शब्द होऊं लागल्यामुळें वनांतील सकल प्राणी कंपित झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

२२६ अध्याय दोनशें सव्वीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, ते उभयतां कृष्णार्जुन दोन रथांत आरूढ होऊन खांडववनाच्या दोन बाजूंस उभे राहून सर्व प्राण्यांचें कंदन करूं लागले. जेथें जेथें ते प्राणी उभयतांच्या दृष्टीस पडत तेथें तेथें आपला रथ नेऊन त्यांचें कंदन करीत. या रथाच्या गतिमुळें त्या प्राण्यांना जाण्यास मार्ग सांपडला नाहीं. रथाचा वेग फार त्वरेचा असल्यामुळें त्यांचें जाणें कोणाच्या दृष्टीगोचर होत नसे. खांडव वन जाकालीं चोंहींकडे प्रदीप्त झालें त्या कालीं लक्षावधी जीवांचे समुदाय नानाप्रकारचे भयंकर नाद करून अग्नींतून बाहेर निघण्यास यत्न करीत; बहुत करून अग्नीच्या योगें सर्व वनसंबंधी देश दग्ध होऊन गेले, कांहीं तप्त झाले, कांहीं काकडी फळासारखे विदीर्ण होऊन गेले, तसेच सर्व प्राणी नाश पावले. वनांतील सकल जलाशय वन्हीच्या योगें काढ्यासारखे तप्त होऊन गेल्यामुळें त्यांतील मत्स्य कूर्मादि सकल प्राणी नष्ट झाले. कांहीं प्राणी लोहमय प्रतिमेसारखे अग्नींत दग्ध होऊन तसेच मूर्तिमंत देहधारी राहिले. याप्रकारें खांडववनांत सकल प्राण्यांचा अत्यंत क्षय होऊन गेला. कांहीं प्रचंड प्राणी होते ते अग्नींतून बाहेर येण्यास उद्युक्त झाले असतां पार्थानें त्यांचे खंडशः तुकडे केले. कांहीं पक्षी आकाशमार्गानें जाण्यास उद्युक्त झाले असतां अर्जुनानें अस्त्राच्या योगें त्यांस पुनः अग्नी-

मध्यें पाडलें. समुद्र मंथन काळीं जसे सकल प्राणी दुःखित झाले होते तसे खांडव वनांतील प्राणी दुःखानें अत्यंत व्याप्त होऊन गेले. दिवसेंदिवस अग्नी अत्यंत प्रदीप्त झाल्यामुळें त्याच्या ज्वाला आकाशापर्यंत जाऊन देव व महान् महान् ऋषी संतप्त झाले. नंतर सकल देव व ऋषी एकत्र होऊन असुरांचें मर्दन करणारा जो सहस्त्राक्ष इंद्र याजकडे जाऊन बोलले कीं, हे इंद्रा, अग्नीच्या ज्वालानीं आह्मीं अत्यंत संतप्त झालों. सर्वलोकांचा क्षयकाल आजच आला नाहींना! असें भाषण ऐकून इंद्रानें प्रत्यक्ष देवांस पाहिलें. नंतर सकल देवांचें वृंद बराबर घेऊन खांडव वनाचें शमन करण्या करितां आकाशांत आला आणि सहस्त्रावधि मेघांस एका क्षणांत धारा वृष्टी करण्यास आज्ञा देतांच जलदानीं अपरमित धारावृष्टी केली असतां अग्नीनें आपलें तेज प्रगट करतांच सकल आकाशांतील जल शुष्क होऊन गेलें. हें पहातांच इंद्रानें बहुत क्रुद्ध होऊन पुनः पुनः मेघांस वृष्टी करण्या करितां आज्ञा दिली. त्याकालीं मेघांच्या धारा व विद्युल्लतेंचे कडकडाट शब्द चोंहींकडे एककालीं होऊं लागल्यामुळें खांडव वन व्याकुल होऊन गेलें. असा विषय या अध्यायांत आहे.

२२७ अध्याय दोनशें सत्तावीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, इंद्रानें पर्जन्य वृष्टी केली असतां अर्जुनानें उत्तम अस्त्राच्यायोगें त्या शरवृष्टीचें निवारण करून निहारानें चंद्रमा जसा व्याप्त होतो तसें खांडववन बहुत बाणानीं आच्छादित केलें. त्यायोगें खांडव वनांतील जीवजंतूंस इकडे तिकडे कोठें जाण्यास अवकाश नाहींसा झाला. त्याकालीं खांडव वनांत राहणारा नागराज तक्षक तेथून कुरुक्षेत्रांत संचार करण्या करितां गेला होता. तक्षकाचा अश्वसेन नामक सुत होता तो दावाग्नींतून बाहेर निघण्या विषयीं मोठा यत्न करीत असतां अर्जुनाच्या बाणानीं निरुद्ध झाल्यामुळें तो बाहेर निघण्यास समर्थ होईना. हें जाणून अश्वसेनाची माता पुत्राचें मुख व पुच्छ आपल्या मुखांत धरून आकाश मार्गानें बाहेर निघण्यास यत्न करीत असतां अर्जुनानें पृथुधार बाणानीं तिचें शीर छिन्न केलें. हें अर्जुनाचें भयंकर कृत्य पाहून इंद्रानें अश्वसेनास मुक्त करण्या करितां अर्जुनास वातवर्ष अस्त्राच्या योगें मोठा मोह उत्पन्न करून अश्वसेनास त्यापासून मुक्त केला त्या

कालीं अर्जुनानें ती इंद्राची घोरमाया पाहून परम क्रोधानें आकाशमार्गी जा णाऱ्या प्राण्यांचे खंड खंड शत्रुकडे केले. त्याकालीं अर्जुन, अग्नि व वासुदेव या त्रिवर्गानीं अश्वसेनास असा शाप दिला कीं, तूं इतउत्तर निराश्रित होशील अथवा पुढें तुझी संतती राहणार नाहीं. नंतर अर्जुन शीघ्र गमन करणाऱ्या बा णानीं आकाशास व्याप्त करून मोठ्या क्रोधानें इंद्राशीं युद्ध करूं लागला असतां देवराजानें अस्त्रबलानें त्या बाणजालाचें निवारण करून वायव्य अस्त्रा च्या योगें चोंहींकडे वायु उत्पन्न केला, तेणें करून सकल समुद्र एकाएकीं क्षो भ पावले. मेघ जलधारांचें वर्षाव करूं लागले. एकाएकीं विद्युल्लतेचे भयंकर शब्द होऊं लागले. हें अर्जुनानें पाहून त्यांचे निवारणार्थ अस्त्राची योजना के ली असतां त्या अस्त्र बलें करून विद्युल्लता स्थिर झाल्या, मेघ एकक्षणांत शुष्क झाले. आकाश अतिशांत होऊन स्वच्छ झालें. वायु सुखकारक व शीतल वाहूं ला गला. सूर्य आपल्या पूर्वप्रकृतीवर आला त्याकालीं अग्नि पुनः घृत धारेनें सि क्त झाल्या सारखा होऊन एकाएकीं प्रज्वलित झाला आणि त्यापासून भयंकर नाद उत्पन्न होऊन सकल जगत त्यानादानें पूर्ण झालें. कृष्णार्जुनानीं तो दावा ग्नि संरक्षित केला असें जाणोन सकलसुपर्णादिक पक्षी अहंकारानें आका श मार्गानें जाण्यास उद्युक्त झाले असतां त्यांचे पक्ष दग्ध होऊन पडले. वज्र सदृश ज्याचे पक्ष, तुंड आणि नखें असा वैनतेय कृष्णार्जुनास प्रहार करण्या करितां आकाश मार्गानें त्याजवर येऊन पडला असतां अर्जुनानें त्याचें निवा रण केलें. तसेच महान् महान् भयंकर विषयुक्त सर्पांचे समुदाय कृष्णार्जुना वर विष वमन करण्या करितां आले असतां अर्जुनानें शराच्या योगें त्यांचें हं नन केलें. त्याकालीं ते सकल सर्प युद्ध होऊन देहाचें अवसान करण्याच्या हेतू नें अग्नीमध्यें गेले. नंतर गंधर्व, यक्ष, राक्षस व कांहीं सर्पांचे समुदाय कृष्णार्जु नाच्या अग्रभागीं येऊन त्यांच्याशीं युद्ध करावें या इच्छेनें उड्डाण करून भयंक र नाद करूं लागले आणि नाना प्रकारच्या शस्त्रास्त्रांची वृष्टी करीत असतां कृ ष्णार्जुनानीं त्या सर्व शस्त्रास्त्रांचा नाश केला. अर्जुनाच्या बाणानीं ही बहुत दैत्य, दानव विद्ध होऊन समुद्राच्या मर्यादे सारखे एकत्र झाले. पुढें जाण्यास- त्यांची शक्ती नाहींशी झाली त्याकाळीं देवांचा स्वामी इंद्र अतिक्रुद्ध होऊन पां

डुरवर्ण गजावर बसून कृष्णार्जुनावर धांवून गेला आणि हस्तामध्यें वज्र-
धारण करून कृष्णार्जुन मरण पावले असा शब्द करीत त्यांजवर वज्राचा-
प्रक्षेप करूंलागला. हें इंद्राचें कृत्य पाहून सकल देवानीं आप आपलीं अ
स्त्रें धारण केलीं आणि ते कृष्णार्जुनावर धांवून गेले. कुबेर आपली गदा घेऊन
कृष्णार्जुनावर गेला, वरुण चित्र विचित्र पाश घेऊन कृष्णार्जुनावर गेला. का
र्तिक स्वामी शक्ती धारण करून कृष्णार्जुनाच्या अग्रभागीं गेला आणि अ-
चल पर्वता सारखा उभा राहिला. देदीप्यमान सकल औषधी घेऊन अश्वि
नी कुमार कृष्णार्जुनावर गेले. एकादशरुद्र, वसु, मरुद्गण, विश्वेदेव, सा
ध्य व इतर बहुत महाबलि व तेजस्वी देव आपल्या स्वतेजानें देदीप्य मान
होऊन कृष्णार्जुनास मारावें या इच्छेनें नाना प्रकारचीं आयुधें घेऊन गेले.
त्या कालीं अत्यद्भुत दिव्य उत्पात झाले, उल्कापतनें होऊंलागलीं. सकल देवां
सह वर्तमान इंद्र एकत्र होऊन उभा राहिला आहे असें पाहून कृष्णार्जुन स
र्व देवांस वज्रोपम बाणानीं ताडित करूं लागले असतां सकल देवगण इं-
द्राच्या सन्निध येऊन उभे राहिले. त्या कालीं माधव, पार्थ यानीं सकल देव ता
डित केले हें पाहून ऋषिगण आकाशांत चमत्कार पहाण्यास आले. इंद्रानें
पुनः संग्राम करण्याच्या इच्छेनें प्रथम त्यांजवर पाषाणाचा वर्षाव केला. त्या
कालीं अर्जुनानें इंद्राचें वीर्य पहाण्याच्या इच्छेनें आपल्या दिव्यास्त्रानें त्या
सर्व पाषाणांचा नाश केला. तेव्हां इंद्रानें मंदराचलाचें एक शिखर द्रुमांस
ह वर्तमान उपटून पांडु नंदनावर टाकिलें. तों इतक्यांत अर्जुनानें प्रज्वलि
त अजिम्हग बाणाच्या योगें त्या शिखराचे सहस्रशः तुकडे केले. त्या का
लीं तीं पर्वत शिखराचीं शकलें खांडव वनावर पडल्यामुळें त्यांतील बहुत
प्राणी त्रस्त होऊन मरण पावले. असा विषय या अध्यायांत आहे.

२२८ अध्याय दोनशें अठ्ठावीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजय
राजा, शैलशृंग, खांडव वनावर पडल्यावर त्या वनांत राहणारे दानव, राक्षस, नाग,
पक्षी, व्याघ्र, गज, सिंह, मृग व महिष अत्यंत भयाभीत होऊन अग्नींतून बाहेर जा
ण्या विषयीं यत्न करीत असतां त्यांचा तो यत्न कृष्ण व अर्जुन या उभयतांनीं सि-
द्धीस न जाऊं दिल्यामुळें ते सकल प्राणी खांडव वनांत दग्ध झाले. कालचक्र ज

सें संपूर्णांचा नाश करितें तसें कृष्णाचे चक्रानें पिशाच, पक्षी, नाग, सहस्त्रावधी पशु यांचा नाश केला. कृष्णाच्या हातांतून वारंवार चक्र मुक्त होऊन सर्वांचा प्राण हरण केल्यावर पुनः पुनः माघारें येत असे. या प्रकारें श्रीकृष्ण सकल राक्षस, पिशाच व उरग यांचा नाश करीत असतां सर्व भूतात्मा जो श्रीकृष्ण यानें रूप फार भयंकर व उग्र दिसूं लागलें. त्या कालीं श्रीकृष्ण व अर्जुन याणीं दानव राक्षसांचा जसा नाश केला तसा पूर्वी कधींच कोणी केला नसेल. हा अग्नीचा शमकरण्या विषयीं असुर व दानव यांची शक्ती चालेनाशी झाली, त्या कालीं ते सर्व त्रस्त होऊन पराङ्मुख झाले. हें कृष्णार्जुनाचें कर्म पाहून इंद्र त्यांची फारच प्रशंसा करूं लागला. सकल देव व असुर; उभयतांचा पराक्रम पाहून युद्धापासून निवृत्त होतांच आकाशांतून अशी वाणी झाली कीं, हे इंद्रा, तुझा सखा तक्षक ह्मणोन होता तो या खांडव वनामध्यें नाहीं कुरुक्षेत्रीं आहे; यास्तव तूं आतां युद्ध करूं नको. हे उभयतां वासुदेवार्जुन युद्धांत कोणाच्या ही प्रकारें जिंकण्यास अशक्य आहेत हें माझें भाषण सत्य जाण. हे उभयतां नरनारायणाचे अवतार, पूर्वदेव यांस ह्मणतात असें स्वर्गांत प्रसिद्ध आहे; हे युद्धामध्यें जिंकण्यास दुराधर्ष असल्यामुळें तूं त्यांच्याशीं युद्ध करूं नको. अशी आकाश वाणी झालेली ऐकून इंद्र पुनः स्वर्गी माघारा गेला असतां सकल देव ही आप आपली सेना घेऊन इंद्राचे मागें गेले. हें कृत्य पाहून कृष्णार्जुन खांडव वनाचा दाह करूं लागले. अर्जुनानें असंख्यात खांडवालय वासी प्राणी छिन्न करून टाकिले. कोणी ही प्राणी अर्जुनाच्या भयानें अग्नीच्या बाहेर येण्यास समर्थ झाला नाहीं. पितृलोक व देव लोक वासी जे होते त्यांसही खांडव वन संबंधीं अग्नीच्या योगें संताप झाला. प्राण्यांचे बहुत समुदाय दीन होऊन आर्त स्वर करूं लागले. त्या प्राण्यांच्या भयंकर नादानें वनाच्या समीपस्थ भागीं जे इतर प्राणी होते तेही त्रस्त झाले. जलांत राहणारे मच्छादि तेही त्रस्त होऊन गेले. असें त्या उभयतांचें भयंकर रूप झालें. या प्रकारें उभयतांच्या शस्त्रास्त्रें करून जे प्राणी मरण पावले त्यांचें मांस, रुधिर, मेदु इत्यादिकांच्या भक्षणें करून अग्नी तृप्त झाला असतां अग्नीचा धूम आकाश पर्यंत व्याप्त झाला. पुढें कांहीं कालानें अग्नि विधुम झाल्यावर त्यास दिप्ताक्ष, दिप्त, जिव्ह, संप्रदिप्त इत्यादि नावें मिळालीं. त्याकाळीं मय ना

मक असुर तक्षकाच्या गृहामध्यें होता तो अग्नीतून बाहेरपडण्या विषयीं उद्युक्त झाला असतां त्याच्यानें बाहेर निघवेना. हें पाहून कृष्ण त्यास चक्र मारण्यास उद्युक्त झाला व अग्नि त्याचा दाह करण्यास यत्न करूं लागला असतां मयासुर भयाभित होऊन बोलला कीं, हे अर्जुना, इकडे येऊन माझें रक्षण कर. तो आर्तशब्द ऐकतांच अर्जुन बोलला कीं, अरे मयासुरा, भिऊं नको मी तुझ्या रक्षणार्थ आहें. याप्रकारें अर्जुनानें नमूचीचा भ्राता जो मयासुर यास अभय वचन दिलेलें ऐकतांच कृष्ण व अग्नि यांणीं ही त्याचें रक्षण केलें. या प्रकारें पावकानें पंधरा दिवस पर्यंत खांडव वनाचा दाह केला तों पर्यंत कृष्णार्जुनांनीं इंद्रा पासून वनाग्नीचें रक्षण केलें त्यांत तक्षक पुत्र अश्वसेन, मयासुर, चार शार्ङ्ग पक्षी हे साहा प्राणी दग्ध न होतां सर्व वनांतील प्राणी दग्ध झाले. असा वि० या अध्या० आहे.

२२९ अध्याय दोनशें एकुणतीस:— जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायन ऋषे, खांडव वनामध्यें शार्ङ्ग नामक पक्षी दग्ध झाले नाहींत याचें कारण काय तें मला सांग? असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, सकल धर्मवेत्त्या ऋषींमध्यें नियत व्रती मुख्य असा एक मंदपाल या नामें करून ऋषी होता. सकल ऊर्ध्वरेते ऋषीनीं आचरित जो मार्ग त्या मार्गाचा अवलंब करून जितेंद्रिय पूर्वक वेदाध्ययन करून तप करीत असतां तपाच्या अंतीं, देहाच्या अंत कालीं तो पितृलोकीं गेला तथापि पितृलोक संबंधी फल त्यास मिळालें नाहीं. तेव्हां हे लोक तपानें साध्य केलेले विफल आहेत असें जाणोन तो धर्मराजाच्या समस्त सकल देवांस असें बोलला कीं, हे देव हो, मी आपल्या तपाच्या योगें जे लोक संपादित केले त्या लोक संबंधीं फलें मला कां मिळत नाहींत? याचें कारण मला सांगा. असें भाषण ऐकून देव बोलतात अरे ब्राह्मणा, ब्रह्मचर्य व्रत धारण करून कर्तव्य क्रिया व प्रजोत्पादन हें न केलें तर प्राणी ऋणी होतात तेव्हां तूं प्रजोत्पादना दिकांचा त्याग करून तप मात्र आचरण केलेंस ह्मणोन भोगरहित हे लोक तुला मिळाले. यास्तव तूं जर प्रजोत्पादन करशील तर त्या त्या लोक संबंधीं बहुत लोक तुला मिळतील. यास्तव संतानोत्पादना विषयीं यत्न कर. असें देवांचें भाषण ऐकून मंदपालानें चिंताग्रस्त होऊन असा विचार केला कीं, शीघ्र आणि बहुत अशीं अपत्यें ज्या योनींत हो

तील त्या योनीचा अंगिकार करावा. पुढें त्याणें पक्ष्यांच्या योनींत जरितानामक एकपक्षिण होती तिजसहवर्तमान गमन करतांच तिचे ठायीं च्यार अंडीं होऊन त्यांतून चार पक्षी उत्पन्न झाले. ते पक्षी बाल्यावस्थेंत असतांच तो मंदपाळ भार्ये चा व त्या बालकांचा त्याग करून लपिता नामक एक स्त्री होती तिजकडे गेला नंतर अपत्य स्नेहानें चिंताग्रस्त होऊन ऋषीनें आपला व बालकांचा त्याग केला तथापि हे बालक लहान आहेत तेव्हां आपण त्यांचा त्याग करूंनये. अ सा विचार करून शोकानें ती खांडव वना मध्यें चार पुत्रां सहवर्तमान राहि ली. आपल्या पक्षी वृत्तीनें त्या पुत्रांचें ती पोषण करीत असतां कोणे एके दि वशीं खांडव वन दग्ध करण्यास अग्नी आला, तेव्हां मंद पालानें अग्नीची-अशी स्तुति केली कीं, हे अग्ने, लोकांचें तूं मुख आहेस, यज्ञसंबंधीं हवीचें तूं भक्षण करतोस ह्मणोन तुला हव्यवाट असें म्हणतात. सर्वभूतीं, भूतांच्या अभ्यंतरीं गुप्त संचार करतोस, तूंच एक परमेश्वर आहेस असें ज्ञानी ह्मण णात. अशी मंदपालानें नाना प्रकारें अग्नीची स्तुती केली असतां अग्नि पर म संतुष्ट होऊन मंद पालास बोलला हे ऋषे, मी संतुष्ट झालों. तुझें प्रिय-कार्य करूं तें सांग. असें अग्नीचें भाषण ऐकून मंदपाल हात जोडून बोलला हे हव्यवाहना, तूं खांडव वन दग्ध करण्यास प्रसक्त झाला आहेस, परंतु-त्या वनांत माझे पुत्र आहेत त्यांस तूं दग्ध करूंनको. असें मंदपालाचें भाष ण ऐकून अग्नि तथास्तु ह्मणोन खांडव वनाचा दाह करूं लागला. असा-विषय या अध्यायांत आहे.

२३० अध्याय दोनशें तीस— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, अग्नि प्रज्वलित झालेला पाहून ते शार्ङ पक्षी शोक करूं लागले, तेव्हां त्यां-ची माता पुत्रांचा आर्तशब्द ऐकून विलाप पूर्वक असें बोलली कीं, हा भयंक र अग्नि सर्ववनाचें दहन करून सकल जगतास दग्ध करतो कीं काय? त्या अग्नीस पाहून मलातर फार दुःख होत आहे. हे मंदचेतस माझे शिशु, मा झें चोंहीं कडून आकर्षण करतात. यांस अद्याप पक्ष नाहींत व चरण नाहींत-आणि आमच्या कुलाचे वृद्धी करणारे हेच होत, या पुत्रांस घेऊन मीही बाहे जाण्यास समर्थ नाहीं. हे पुत्र हो, कोणच्या उपायानें या संकटापासून मीह

त कृत्य होईन. आतां तुमच्या शरीरानें मी आपल्यापक्षानें आच्छादन करून तुह्मां सहवर्तमान मी आतां मरण पावतें असें ह्मणोन पुनः पुत्रांस बोलले हे पुत्रहो, तुमचा निर्दय पिता ज्याकाळीं वनांत गेला त्या काळीं असें बोलला कीं, माझा जरितारी नामक ज्येष्ठपुत्र कुलाचा प्रतिष्ठापक होईल. सारिसृक नामक द्वितीय पुत्र प्रजोत्पादन करून पितरांच्या ऋणापासून मुक्त करील. स्तंभमित्र नामक तृतीय पुत्र तप करील. आणि द्रोण नामक चतुर्थ पुत्र ब्रह्मवेत्यांमध्यें श्रेष्ठ होईल. तेव्हां असे हे तुह्मीं श्रेष्ठ पुत्र असतां या तुमचा त्याग करून मी कशी जाऊं! हे पुत्र हो, तुमचें रक्षण होण्यास मला कांहीं उपाय सूचत नाहीं. असें मातेचें भाषण ऐकून शार्ङ्गपक्षी बोलले हे माते, तूं आमचा त्याग करून जिकडून तुला बाहेर जाण्यास यत्न सूचेल तो कर. आमच्या स्नेहास गुंतूं नको तूं जिवंत असून आह्मीं जरी मरण पावलों तथापि तुला दुसरे पुत्र होतील. तूं जर नष्ट झालीस तर आमची कुलसंतती नष्ट होईल, हे दोन मार्ग आह्मीं तुला सांगितले यांत जेणें करून आपल्या कुलाचें क्षेम होईल असें कर. असें पुत्रांचें भाषण ऐकून जरिता बोलली हे पुत्र हो, या स्थलीं एक उंदराचें बिल आहे त्या बिलामध्यें तुह्मीं प्रवेश करा आणि त्या बिलाच्या छिद्रावर मी मृत्तिका घालतें ह्मणजे आंत अग्नि जाणार नाहीं. तुह्मीं बिलांत प्रविष्ट झाल्यावर मी अग्नीचें उल्लंघन करून बाहेर जाईन; अग्नि शांत झाल्यावर मी पुनः येऊन बिलावरची मृत्तिका काढून तुह्मांस बाहेर काढीन. असें मातेचें भाषण ऐकून शार्ङ्ग बोलतात हे जननी, आह्मीं पक्षहीन असल्यामुळें बिलांत मुषक आह्मांस भक्षण करतील, हें भय पूर्वींच आह्मीं जाणून यांत प्रवेश करण्यास इच्छित नाहीं. त्यापेक्षां हे माते, हुताशनामध्यें मरण येणें श्रेयस्कर आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

२३१ अध्याय दोनशें एकतीस— जरिता भाषण करिते हे पुत्रहो येथें श्येन पक्षी येऊन त्याणें आपल्या पायांत मुषकास धरून बिलांतून नेलेला मी पाहिला आहे, यास्तव या बिलांत आतां मूषकाचें भय नाहीं. असें मातेचें भाषण ऐकून शार्ङ्गपक्षी बोलतात हे माते, मूषकास श्येन पक्ष्यानें नेलें असें मी कधीं ऐकिलें नाहीं. बरें तूं ह्मणतेस तथापि त्या बिलांत दुसरे आणखी मू

षक बहुत आहेत त्या पासून आह्मांस भय आहेत. वायू पासून अग्नीची- निष्पत्ति कदाचित् होते असा संशय असल्यामुळें अग्नि पासून कदाचित् आ- ह्मांस भय होणार नाहीं; परंतु बिलामध्यें निश्चयें करून मूषक वास करितात त्यापेक्षां बिळांत आमचा मृत्यु निःसंशय आहे त्यापेक्षां हे माते, निःसंशयीत मृत्यू पेक्षां संशयीत मृत्यु श्रेष्ठ आहे तेव्हां तूं आकाश मार्गानें जा. तूं जर जिवं त आहेस तर तुला बहुत पुत्र होतील. असें आमच्या बुद्धीस येतें. असें पुत्रां- चें भाषण ऐकून जरिता बोलली हे पुत्र हो, सर्व पक्ष्यांत श्रेष्ठ जो श्येनपक्षी- तो येथें आलेला मी पाहिला, तो बिलांतील मूषकास त्या काळीं घेऊन गेला त्या काळीं परम वेगें करून मीही त्याच्या पाठी मागून जातां जातां त्यास आशी- र्वाद दिला कीं हे श्येनराजा, ज्यापेक्षां माझ्या द्वेष्यास घेऊन तूं जात आहेस त्या पेक्षां तूं स्वर्गामध्यें अक्षय्य सुखें करून राहाशील; पुढें ज्याकाळीं श्येनानें उं- द्राचें भक्षण केलें, त्याकाळीं तें मी पाहून पुनः माघारी आल्ये. यास्तव हे पुत्रहो, त्या बिलामध्यें विश्वासानें प्रवेश करून सुखें करून रहा. असें मातेचें भाष ण ऐकून शार्ङ्गपक्षी पुनः बोलतात हे माते, तूं भाषण केलेंस हें सत्य आहे; प- रंतु श्येनानें उंद्राचें भक्षण केलें असें आह्मांस माहित नाहीं यास्तव त्यांत प्र वेश करण्यास आह्मीं इच्छित नाहीं. असें ऐकून पुनः जरिता बोलली हे पुत्रहो, जरी श्येनानें मूषक नेलेला विदित नसेल तथापि मी तें सर्व कृत्य पाहिलें आ- हे; यास्तव त्या विवरांत तुह्मांस कांहीं भय नाहीं. पुनः शार्ङ्ग बोलतात हे माते, हा सर्व तुझा मिथ्या उपचार आह्मीं जाणला. बरें तर पुढें आमच्या पासून कां हीं तुझ्यावर उपकार व्हावयाचा नाहीं, असें तुझ्या मनांत येऊन तूं आमचा त्याग करण्यास उद्युक्त झालीस. असो या जन्मांत तुझा व आमचा मातृपुत्र संबंध हा तरीं कल्पितच आहे, पुढील जन्मांत तूं कोण व आह्मीं कोण असा संशय अस ल्या मुळें आतां आमच्या स्नेहास न गुंततां आमचा त्याग करून लौकर पती कडे जा. असें पुत्रांचें भाषण ऐकून जरिता खांडव वनामध्यें पुत्रांचा त्याग करून ज्या प्रदेशांत अग्नि व्याप्त झाला नवता, त्या प्रदेशातें गेली. पुढें अग्नीचीही क डे व्याप्ति होऊन जेथें हे चार पक्षी होते तेथेंही प्राप्त होतांच त्या पुत्रांतून जरि- तारी नामक ज्येष्ठपुत्र होता तो अग्नीस ऐकण्यासारिखें बोलूं लागला. असा

विषय या अध्यायांत आहे.

२३२ अध्याय दोनशें बत्तिस.— जरितारी भाषण करितो, ही संसार रूप अटवी महा मोह नामक अग्नीनें व्याप्त असल्यामुळें कदाचित् माता ही पुत्राचें त्राण करण्यास समर्थ होत नाहीं. सर्व आप आपल्या स्वार्थ कामामध्यें निमग्न आहेत, हें सर्वांस सूचविण्याकरितां असें भाषण करितो, मरणाचे पूर्वीच सर्व धीमान पुरुषांनीं ज्ञानसंपादन केलें असतां त्या पुरुषांस मरणव्यथा कधीं ही येत नाहीं. जो पुरुष आपल्यास मरण काल आला असें जाणोन ज्ञान साधनाचा यत्न करूं लागतो. त्या पुरुषास ज्ञानाची प्राप्ती न होऊन त्याचें कल्याण न होतां दुःख मात्र त्यास होतें. असें जरितारीनें भाषण केल्यावर सारी सृक्क भ्रात्यास बोलतो, तूं जें आतां कथन केलेंस तें सर्व सत्य आहे. सत्संगा वांचून उत्तम ज्ञानाची प्राप्ती होत नाहीं. सत्संग झाला असतां जन्ममरण संबंधीं व्यथेचा तत्काल नाश होतो, तूं महा धीर व मोठा ज्ञानवान् होस. सकल ज्ञानीं जे आहेत त्यां मध्यें तूं मोठा शूर, यास्तव या दुःखा पासून तूंच आमचा एकटा संरक्षण करणारा आहेस असें मी मानितों. असें सारिसृक्कानें भाषण केल्यावर स्तंब मित्र बोलतो हे भ्रात्या, ज्येष्ठ भ्राता तो पित्यासमान होय. जो ज्येष्ठ असतो तो कनिष्ठास दुःखा पासून मुक्त करितो, ज्येष्ठ असतां कनिष्ठास कोणत्या ही विषयीं काळजी नसते, तेव्हां तूं ज्येष्ठ असल्यामुळें तुझ्या अनुग्रहा वांचून आमचा तरुणोपाय कसा होईल? असें स्तंबमित्रानें भाषण झाल्या वर द्रोण बोलतो अहो, हा हिरण्य रेता अग्नि अत्यंत देदीप्यमान होऊन परम त्वरेनें आपला क्षय करण्या करितां येत आहे तो पाहा. असें मंदपालाचे चार पुत्र आप आपल्यांत भाषण करून पुनः अग्नीचें स्तवन करूं लागले. प्रथम जरितारी अग्नीची अशी स्तुती करूं लागला हे अग्ने, सकल जगताचा आत्मा तूं आहेस. सकल जगताचें देदीप्यमान शरीर तें तूंच, उदकाचें उत्पत्तिस्थान तूंच आहेस. असें जरितारीनें स्तवन केल्यावर सारिसृक्क स्तवन करितो हे अग्नि, आमची माता नष्ट झाली, आमचा पिता कोठें आहे तो आह्मीं जाणत नाहीं, आह्मास अद्याप पक्ष उत्पन्न झाले नाहींत, यास्तव तुझ्या वांचून आमचा त्राता तीन लोकांत कोणी नाहीं; असें जाणोन हे धूमकेतू, आह्मां बालांचें रक्षण कर. असें

सारिसृक्कानें भाषण केल्यावर स्तंबमित्र स्तुती करतो हे अग्ने, यात्रिभुवनां न तूंच एक अद्वितीय आहेस, सर्व जगत् तुझे ठायीं असल्यामुळें सर्वभूतांचा आधार तूंच होस, त्रिभुवनाचें पोषण, करणारा तुझ्या वांचून कोणी नाहीं. असें स्तंब मित्रानें भाषण केल्यावर द्रोण स्तवन करितो हे जगत्पते, प्राणिमात्र जे भोजन करितात त्यांचे उदरांतील अन्न तूं अंतरभूत होऊन पक्क करितोस तूंच सूर्यरूपी होऊन पृथ्वी संबंधीं रसाचें ग्रहण करून पुनः पृथ्वीचे ठायीं पर्जन्य कालीं रसाचा उत्सर्ग करितोस, यास्तव हें जगत तुझे ठायीं प्रतिष्ठित आहे. हे अग्ने, प्रस्तुत आह्मांस तुझ्यापासून भय झालें आहे त्यांतून तूं आमचें त्राण कर. अशी द्रोणानें अग्नीची स्तुती केली असतां त्याकालीं अग्नीस मंदपालाच्या वाक्याचें स्मरण होऊन ब्रह्मवादी जो द्रोण यास बोलला हे ऋषे, तूं महान् ब्रह्मवादी आहेस. या कालीं तूं ब्रह्माचें प्रतिपालन केलेंस. तुझा पिता मंदपाल याणें पूर्वी मला सांगितलें होतें कीं, माझे चार पुत्र या वनांत आहेत त्यांचा तूं दाह करूं नको, त्या तुझ्या पित्याच्या भाषणाचें स्मरण होऊन व प्रस्तुत तूं जें भाषण केलेंस त्या कारणा वरून तुमचें कार्य गौरव केलें पाहिजे. तेव्हां तुमचें कार्य काय असेल तें सांगा. असें अग्नीचें भाषण ऐकून द्रोण बोलतो हे हुताशन्, या वनांत मारजारांचे समुदाय बहुत आहेत ते निरंतर आह्मांस त्रास देतात यास्तव सबांधव त्यांस दग्ध करून आमचें रक्षण कर. असें द्रोणाचें भाषण ऐकून अग्नीनें मारजार समुदायास दग्ध करून पक्ष्यांचें रक्षण केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

२३३ अध्याय दोनशें तेतीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, मंदपालानें पुत्रांचें संरक्षण करण्या विषयीं अग्नीची जरी प्रार्थना केली होती, तथापि मंदपाल चिंताग्रस्त होऊन आपल्या लपिता नामक भार्येस बोलला कीं, हे भार्ये, पुत्रांचें रक्षण करण्या विषयीं मी अग्नीस सांगितलेंच आहे; परंतु माझ्या पुत्रांची काय अवस्था झाली असेल! त्यांची माता आहे; परंतु ती पुत्रांचें रक्षण करण्यास कशी समर्थ होईल. हा संकट काल आलेला जाणोन त्यांची माता पुत्रां विषयीं अत्यंत शोकार्त होईल. माझे पुत्र उड्डाण करून गमन करण्यास अशक्त असल्यामुळें त्यांची माता त्या बालकांचें दुःख पाहून संतप्त होऊन त्यामुलांचे मागें आक्रोश करीत धांवत असेल. या प्रकारें पुत्रां विषयीं मंदपाल वनांत शोक करीत असतां अस्त

या पूर्वक लपिता नामक त्याची भार्या पतीस असें बोलली कीं, हे ऋषिश्रेष्ठा, पुत्रां विषयीं आतां तुला चिंता कशा करितां प्राप्त झाली? अरे, ते स्वतः तेजस्वी व वीर्यवान असल्यामुळें अग्नीपासून त्यांस भय कोठून? माझ्या समक्ष अग्नीस तूं पुत्राचें रक्षण करण्याविषयीं सांगितलेंस तें तुझें भाषण अग्नि याणें मान्य केलें असतां तो अन्यथा करणार नाहीं; यास्तव पुत्रांविषयीं शोक न करितां स्वस्थ चित्त हो. आतां माझी जी सपत्नी जरिता तिच्याविषयीं तूं इतका शोकार्त कां झालास? वारंवार तिजविषयीं तूं शोक करितोस याजवरून तिच्यावर जेवढा तुझा स्नेह आहे तितका माझे ठायीं नाहीं असें मला स्पष्ट दिसतें. असें लपितेचें भाषण ऐकून मंदपाल बोलला हे भार्ये, जरितेवर माझी प्रीती अत्यंत आहे ह्मणोन जें तुझा मनांत आलें आहे तें सर्व मिथ्या. मी जरितेकरितां खिन्न होत नाहीं माझीं अपत्यें अग्नींत सांपडलीं आहेत त्यांजविषयीं मी वारंवार दुःखी होतों! पहा बरें जरितेचे ठायीं मजपासून जीं अपत्यें झालीं आहेत त्यांचा प्रस्तुत त्याग करून तुझे ठायीं पुढें अपत्यें होतील या आशेवर मी राहावें कीं काय? असा माझा मनाचा उद्देश होय, तो तूं जर न जाणशील तर जसें तुझ्या इच्छेस येईल त्याप्रमाणें कर. असें मंदपालानें लपितेस भाषण केल्यावर कांहीं कालानें खांडव वनांतील अग्नि शांत होत होत जास्थलीं शार्ङ पक्षी होते तेथील ही अग्नी शांत झाला असतां जरिता, पुत्र शोकपरायण झालेली पुत्रांच्या सन्निध आली आणि अग्नीपासून मुक्त झालेले आपले बालक वनामध्यें रुदन करीत आहेत, असें पाहून तिच्याही नेत्रास अश्रुपात आले असतां प्रत्येक बालकास आपल्याजवळ घेऊन त्यांचें लालन करीत आहे. तों इतक्यांत मंदपालही एकाएकीं तेथें आला. त्यास पुत्रांनीं पाहिलें तथापि पित्याशीं कांहीं भाषण केलें नाहीं; त्यांची माता जरी वारंवार पुत्रांचें लालन करीत बसली होती तथापि पुत्रांनीं साधु किंवा असाधु कांहींच विचारलें नाहीं. त्याकालीं मंदपाल आपणच होऊन भार्येस बोलला कीं, हे भार्ये, या चार पुत्रांतून ज्येष्ठपुत्र कोणचा व त्यापेक्षां कनिष्ठ कोणता, मध्यम कोणता व सर्वांपेक्षां कनिष्ठ कोणचा तो सांग. असें पतीचें भाषण ऐकून जरिता बोलली तूं वारंवार विचारतोस कीं, ज्येष्ठ, मध्यम व कनिष्ठ पुत्र कोणचे तर तुला ज्येष्ठ कनिष्ठ पुत्र घेऊन काय कर्तव्य आहे? सर्व प्रकारें मी हीन असतां माझा त्याग करून तूं पूर्वीं गेलास याचें कारण काय? मी वृद्ध झाल्यें ह्मणोन माझा त्याग केला

असशील तर तुझी तरुणी रूपवती दुसरी लपिता नामक जी भार्या आहे तिजकडे सत्वर जा. माझ्याकडे कां येतोस. असें जरितेचें भाषण ऐकून मंदपाल बोलला हे भार्ये, स्त्रियांस पती वांचून परलोकाची प्राप्ती कधींही नाहीं. तूं पतिव्रता आहेस हें सर्व प्राणिमात्रांस विदित आहे; परंतु जर पतीशीं एकदां वैरभाव उत्पन्न झाला ह्मणजे तो तुझ्या मनांस बहुत उद्वेग करील, याचा विचार पहा. स्त्रियांनीं कपटानें पतीचा अवमान करूं नये या पुत्रां करितां आज मी तुझ्या सन्निध आलों असतां माझी निरभर्त्सना करितेस काय? त्या लपितेनें माझी तशीच निरभर्त्सना केली. असस्तु. स्त्रियांवर पुरुषांनीं कधींही विश्वास ठेऊं नये. स्त्रिया पुत्रवती झाल्या ह्मणजे पतीच्या शुश्रुषे विषयीं त्यांचें चित्त नसतें. असें मंदपाल नामक पित्यानें भाषण ऐकून ते सकल पुत्र पित्याची उपासना करूं लागले. पिताही पुत्रांस आश्वासन युक्त भाषण करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

२३४ अध्याय दोनशें चवतीस— मंदपाल भाषण करितो हे पुत्रहो, तुमची अग्नीपासून मुक्तता होण्या विषयीं पूर्वींच मी अग्नीची प्रार्थना केली होती त्या कालीं अग्नीनें तुह्मांस मुक्त करण्या विषयीं प्रतिज्ञा केली होती, त्या अग्नीच्या वचनावरून व तुमची माता धर्मज्ञ होती तिच्या भाषणा वरून व तुह्मीं वीर्यशाली आहांत असें जाणोन मी तुमच्या शोधाकरितां येथें पूर्वीं आलों नाहीं. हे पुत्र हो, यास्तव माझाविषयीं तुह्मीं आपले मनांत संताप करूं नका. असें पुत्रांस आश्वासन दिल्यावर भार्या व पुत्र यांस घेऊन मंदपाल देशांतरीं गेला. इकडे कृष्णार्जुनाच्या साहाय्यें करून अग्नीनें सर्व खांडव वन आपल्या तीक्ष्ण ज्वालांनीं दग्ध करून टाकिलें. प्राण्यांच्या वसा व मेद यांच्या ज्या नद्या उत्पन्न झाल्या त्यांस भक्षण करून अग्नीनें आपलें तृप्त झालेलें शरीर अर्जुनास दाखविलें. त्या कालीं सर्व देवां सहवर्तमान पुरंदर आकाशांतून वनांत येऊन केशव व पार्थ यांस असें बोलला कीं, हे वीरहो, तुह्मीं दुष्कर कर्म केलें त तेणें करून मी संतुष्ट झालों. आतां तुह्मीं पुरुषासही दुर्लभ असे वर मागा. असें इंद्राचें भाषण ऐकून प्रथम महाद्युतीमान पार्थ बोलला हे इंद्रा सर्व अस्त्रें तुज पासून मला मिळोत. असें पार्थाचें भाषण ऐकून इंद्र बोलला हे पार्था, मजपासून अस्त्र प्राप्त होण्याचा काल तुला सांगतों. ज्या कालीं भगवान् महादेव तुझ्यावर प्रसन्न होईल त्या कालीं सर्व अ-

स्त्रें मजपासून तुला मिळतील तुझ्या महत् तपाच्या योगें करून शिव ज्याकाळीं तुला प्रसन्न होतील तो काल मला विदित आहे, त्याकाळीं आग्नेय, वायव्य इत्यादिक अस्त्रें मजपासून तूं घेशील. असें पार्थाशीं भाषण करून नंतर त्यानें वासुदेवासही वर दिला आणि तो अग्नीची आज्ञा घेऊन स्वर्गलोकीं गेला. अग्नि खांडव वनांतील सकल प्राण्यांस भक्षण करून पंधराव्या दिवशीं शांत झाल्यावर कृष्णार्जुनास असें बोलला कीं, हे पुरुष हो, तुमच्या योगें मी खांडव वन संबंधीं प्राण्यांची मेद व रुधिरें भक्षण करून तृप्त झालों. मला सुखही बहुत झालें आतां तुह्मांस असा वर देतों कीं, ज्यास्थलीं तुमची जाण्याची इच्छा असेल त्यास्थलीं अप्रतिबंध तुमचें गमन होईल. असा अग्नी पासून कृष्णार्जुनास वरप्रसाद झाल्यावर ते उभयतां व मयासुर असे त्रिवर्ग अग्नीस प्रदक्षिणा करून रमणीय असें एक नदीचें तीर होतें तेथें गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

आदिपर्व

समाप्त.

·श्री·

# सभापर्व·

१. अध्याय पहिला- वैशंपायन सांगतातः- हे जनमेजय राजा, कोणे एके दिवशीं श्रीकृष्ण आणि अर्जुन हे एकत्र बसले होते, तेव्हां मयासुरानें अर्जुनास हात जोडून मधुर वाणीनें भाषण केलें कीं, तूं खांडव वनदाहप्रसंगीं अग्नीपासून व कृष्णाचे चक्रापासून माझें रक्षण केलेंस यास्तव त्याचे प्रत्युपकारार्थ तुझें कार्य काय करूं तें सांग? तेव्हां अर्जुन ह्मणतो हे मयासुरा, हें जें सर्व कृत्य घडलें तें तूंच केलेंस असें समज. आतां तुझा व माझा स्नेह असावा· नंतर मयासुर ह्मणतो तूं भाषण केलेंस हें योग्यच आहे; परंतु मी दानवांचा विश्वकर्मा आहें यास्तव तुझें प्रिय करण्या करितां माझे योग्य तें प्रमाणें मला कांहींतरी कार्य करण्यास आज्ञा दे. असें मयासुराचें भाषण श्रवण करून अर्जुन ह्मणतो हे मयासुरा, मी तुजला प्राणसंकटांतून मुक्त केलें, ह्मणून तुजपासून प्रत्युपकार करून घेण्याची माझी इच्छा नाहीं; परंतु तुझा मनोरथ भंग करावा हेंही मला योग्य नाहीं. तस्मात् तूं कृष्णाचें प्रिय कर ह्मणजे माझ्यावरच प्रत्युपकार होईल· नंतर मयासुर श्रीकृष्णास भाषण करितो हे वासुदेवा, तुमचें प्रिय मी काय करूं तें सांगावें? नंतर श्रीकृष्णानें एक मुहूर्तपर्यंत मनांत विचार करून मयासुरास सांगितलें. हे शिल्पश्रेष्ठा. तुला मनःपूर्वक माझें प्रिय करण्याची इच्छा असेल तर धर्मराजाकरितां एक उत्तम प्रकारची सभा तयार कर· ती अशी कीं, या लोकीं मनुष्यानीं पाहिली असतां त्यांस तशी करितां येऊं नये, आणि त्या सभेंत मनुष्य, असुर, देव व गंधर्व यांची कृति असावी· व ती सभा पाहिली असतां ब्रह्मांडांतील सर्व वस्तु अवलोकन केल्या प्रमाणें वाटावें· असें भाषण श्रवण करून उत्तम प्रकारची सभा धर्मराजा करितां निर्माण करण्याचा मयासुरानें निश्चय केला. नंतर श्रीकृष्ण व अर्जुन याणीं झालेलें वर्तमान धर्मराजास सांगून मयासुरास भेटविलें; तेव्हां मयासुराचा धर्मराजानें सत्कार केला. नंतर मयासुरानें बिंदुसरोवरीं वृषपर्वा दानवानें यज्ञादिक केले त्या गोष्टी·धर्मराजास सांगून सभे विषयीं पांडवांचा व कृष्णाचा अभि

प्राय घेऊन सभा तयार करण्याचे आरंभीं हजारों ब्राह्मणांस पायस, अन्न व द्रव्य यानीं तृप्त करून सर्व गुणसंपन्न, मनोरम, दिव्य, दशसहस्र हात लांब रुंद अशी सभा करण्याचे स्थलाची योजना केली. या अध्यायांत असा विषय आहे.

२. अध्याय दुसरा:– वैशंपायन सांगतात, हे जनमेजय राजा, खांडवप्रस्थांत श्रीजनार्दन भगवान् पांडवांचे गृहीं राहत असतां पांडवानीं परम प्रीतीनें त्यांचा सत्कार केला. पुढें कांहीं दिवसानीं आपला पिता वसुदेव याची द्वारकेंत जाऊन भेट घ्यावी अशी श्रीकृष्णास इच्छा झाली. तेव्हां जाण्याची तयारी करून प्रथम त्याणीं धर्मराजास विचारिलें. नंतर कुंती, सुभद्रा, धौम्यऋषि, द्रौपदी व अर्जुनादिक भ्राते इत्यादिकांस विचारून त्यांचा निरोप घेऊन निघाले तेव्हां शुभकारक गमनास योग्य जीं कृत्यें तीं करून त्यानीं ब्राह्मणांस द्रव्यादिकानीं संतुष्ट केलें. आणि अंगावर सर्व अलंकार घालून शंखचक्रादि आयुधें ग्रहण करून सत्वर गमन करणाऱ्या गरुडध्वजचिन्हित कांचनमय रथास वायुवेगानें चालणारे शैब्य सुग्रीवादि अश्व जोडून त्या रथांत आरूढ होऊन ते निघाले, तेव्हां दारुकनामें सारथ्यास एकीकडे करून अति प्रेमानें तेथें धर्मराज बसले. आणि रथांत श्रीकृष्णावर अर्जुनानें चामर धरिलें, व पृष्ठभागीं भीमसेनादिक बंधु बसले. पुरोहित धौम्य, नगरवासीजनांसह वर्तमान मागून चालले. तेव्हां प्रिय शिष्य समुदायांत गुरु जसा शोभतो तसा पांडवांत श्रीकृष्ण भगवान् शोभला. पुढें अर्ध योजन गेल्यावर सर्वांस आलिंगन देऊन व सर्वां बरोबर भाषण करून अति संकटानें त्यांस परत जाण्या विषयीं आज्ञा दिली. आणि आपण निघून मोठ्या त्वरेनें द्वारकेंत गेले. इकडे धर्मराज नारायणाचें चिंतन करीत आपले बंधूंसहवर्तमान नगरांत गेले. नंतर सर्वांस आप आपल्या स्थलीं जाण्या विषयीं आज्ञा देऊन द्रौपदीसमागमें धर्मराज आनंद करूं लागले. इकडे श्रीकृष्णा-द्वारकेंत प्रविष्ट होतांच उग्रसेन प्रमुख यादवश्रेष्ठानीं त्यांची पूजा केली. नंतर श्रीकृष्णानीं आपला मातामह उग्रसेन व यशस्विनी देवकी या उभयतांस आणि बलरामासही नमस्कार करून आपण त्यांचे समीप बसले.

त्या काळीं प्रद्युम्न, सांब, निशठ, चारुदेष्ण, गद, अनिरुद्ध, भानु इत्यादि पुत्र भेटी करितां आले त्यांस आलिंगन देऊन वृद्धांच्या आज्ञेनें श्रीकृष्ण रुक्मिणीच्या मंदिरांत गेले. इकडे मयासुरही धर्मराजा करितां रत्नजडित सभा करण्याचा विचार करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

३. अध्याय तिसरा:- वैशंपायन सांगतात, हे जनमेजय राजा, श्रीकृष्ण द्वारकेंत गेल्या नंतर मयासुर अर्जुनास ह्मणतो, हे अर्जुना, कैलास पर्वताच्या उत्तरेस मैनाक पर्वतावर बिंदुसरोवरीं वृषपर्वा दानव याग (यज्ञ) करीत होता त्या काळीं त्याच्या सभेस रंग देण्या करितां नानाप्रकारचीं चित्रविचित्र रंगाचीं मणिमय पात्रें मीं केलीं आहेत; तीं तेथें असलीं तर मीं घेऊन येतों. नंतर तुमच्या मनास आल्हादकारक व रत्नानीं विभूषित अशी सभा करून देईन. त्याच बिंदुसरोवरीं विचित्र रत्नानीं विभूषित, महान् भार सहन करणारी अशी मोठी एक उग्र गदा सर्व रिपूंचा वध करून वृषपर्व्यानें ठेविली आहे, ती भीमसेनास आणून देण्यास इच्छितों. जसें तुझें गांडिव धनुष्य आहे तशी ती दुःसह आयुधांसमान शत्रूंचा नाश करणारी गदा भीमसेनास योग्य आहे. तेथेंच एक वरुणाचा देवदत्तनामक शंख महानादवान आहे तोही मीं आपल्यास आणून देईन. असें मयासुराचें भाषण श्रवण करून अर्जुनानें त्यास जाण्या विषयीं आज्ञा दिली. तेव्हां तो उत्तर दिशेस जाऊन तेथून कैलास पर्वताच्या उत्तरभागीं मैनाक पर्वत आहे त्याच्या हिरण्यनामक शृंगीं बिंदुसरोवर आहे, तेथें गेला. त्या स्थलीं भगीरथ राजानें गंगेचे दर्शना करितां बहुत वर्षें वास केला होता. प्रजापतीनें असंख्याक यज्ञ करून रत्नजडित सुवर्णाचे यज्ञस्तंभ शोभार्थ केले आहेत व त्याच स्थानीं साक्षात् इंद्र याग करून सिद्धि पावला व तेथेंच महादेवानीं सकल प्रजा उत्पन्न केली. व तेथेंच नर, नारायण, ब्रह्मदेव, यम रुद्र हे पांच मिळून सहस्र युग पर्यंत सत्र करीत होते. वासुदेवानेंही तेथेंच बहुत वर्षें धर्मज्ञान होण्या करितां श्रद्धेनें याग करून सुवर्ण

मालानीं युक्त, अतितेजस्वी असे सहस्रावधि यज्ञस्तंभ दान केले. त्या स्थळीं मयासुरानें येऊन वृषपर्व्याचें नानाप्रकारचें सभाद्रव्य, गदा, शंख, इत्यादि ग्रहण करून आपले सेवक हजारों राक्षस यांसहवर्तमान पांडवांकडे येऊन तीन लोकांत विख्यात, मणिमय, दिव्य, अप्रतिम अशी सभा निर्माण केली. आणि महागदा भीमसेनास व देवदत्त शंख अर्जुनास दिला. ती सभा दहा हजार हात लांब व रुंद, अग्नि, सूर्य व चंद्र यांच्या सभे सारखी शोभायमान, सूर्याच्या प्रभे सारखी देदीप्यमान, अनेक प्रकारच्या दिव्य पदार्थांनीं सजल मेघा सारखी, स्वर्गापेक्षां अतिरमणीय, जीचे ठायीं वास केला असतां आनंद देणारी, उत्तम प्रकारच्या द्रव्यानीं, रत्नानीं व प्राकार, तोरणादिकानीं (बाहेरील महाद्वारें) युक्त अशी सभा निर्माण केली. त्या सभेंतील चातुर्य, बलि, बाणासुर इत्यादिक दैत्य व ब्रह्मादिक देव यांच्याही सभेंत नसेल. या सभेच्या संरक्षणार्थ महापराक्रमी असे आठ हजार राक्षस मयासुरानें ठेविले होते. तेथें सरोवर केलें असून त्यांतील कमलें अपूर्व होतीं. त्यांच्या पाकळ्यानीं उदक आच्छादित असल्यामुळें तो प्रदेश कांच किंवा वैडूर्यमण्यानीं जडित भूमीसारखा भासे. यामुळें तेथें जाणारे त्या उदकांत पडत. व तें सरोवर नानाप्रकारच्या पक्ष्यानीं युक्त व कांचनमय, चित्रविचित्र मत्स्य, कूर्म यानीं व्याप्त व सभोंवत्या स्फटिकांच्या पायऱ्या केल्या होत्या. त्यांतील उदक फार स्वच्छ होतें. व मंदवायूनें त्यांत लहरी उठत होत्या. त्याच्या सभोंवता प्रदेश अमोलिक मण्यानीं बांधिला होता. कितीएक राजांस तें सरोवर पाहून हें सरोवर आहे असें ज्ञान होत नसे. त्याच्या सभोंवतें नित्य फुलणारे नानाप्रकारचे मोठमोठे वृक्ष लाविले होते. त्याच्या आसमंतात् हंस, कारंडव व चक्रवाक या पक्ष्यानीं सुशोभित अशा पुष्करिणी केल्या होत्या. तशीच जलज व स्थलज पद्में लाविलीं होतीं. अशा प्रकारची सभा मयासुरानें चौदा महिन्यांत तयार करून धर्मराजास दिली. असा विषय या अध्यायांत आहे.

४. अध्याय चौथा:– वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, नंतर धर्मराजानें त्या सभेमध्यें प्रवेश करून घृत, पायस, मधुमिश्रित भक्ष्य पदार्थ, कंद,

फलें, मूलें, हरिणादि श्वापदांचीं मांसें, तिलमिश्रित ओदन, नानाप्रकारचीं पक्वान्नें इत्यादि पदार्थांनीं नानाप्रकारचे देशांतून आलेल्या ब्राह्मणांस भोजन घालून व नानाप्रकारें वस्त्रादिकांनीं अलंकृत करून प्रत्येकास सहस्त्र गोप्रदानें देऊन संतुष्ट केलें. द्वारादिकांचे ठायीं देवतांचें स्थापन व पूजन करून वाद्यादिकांचे गजर केले. सहस्त्रशः मल्ल व नट आदिकरून धर्मराजाचे दर्शनार्थ आले. तेव्हां धर्मराजानें सर्वांचा सत्कार करून स्वर्गांत इंद्र जसा रममाण होतो तसा बंधूसहवर्तमान धर्मराज त्या सभेंत शोभला. आणि सभेमध्यें धर्मराज बसला असतां नानादेशांतील राजे असित देवल, सत्य, सर्पमाली, महाशिरा, अर्वावसु, कृष्णद्वैपायन, शुक, जैमिनि, याज्ञवल्क्य इत्यादि अनेक जितेंद्रिय, धर्मवेत्ते, विद्वान् ऋषि व इतरही वेदवेदांग पारग असे मुनि त्या सभेंत येऊन धर्मराजाचें स्तवन करून नानाप्रकारच्या कथा कथन करून बसले; व मुंजकेतु, विवर्धन, संग्रामजित्, दुर्मुख, उग्रसेन इत्यादि शतावधि राजे येऊन कुंतिपुत्राची स्तुति करूं लागले. तसेंच कृष्णाजिन परिधान करून अर्जुनाच्या आश्रयानें धनुर्वेदाध्ययन करणारे असे कितीएक राजपुत्र व यादवपुत्र, प्रद्युम्न, सांब, सात्यकि, सुधर्मा, इत्यादि धर्मराजाची स्तुति करूं लागले. तसेंच अर्जुनसखा, तुंबरु, चित्रसेन, आदिकरून सत्तावीस गंधर्व व गीतवाद्यविशारद असे गंधर्व, अप्सरा व किन्नर याणीं धर्मराजाचें संबोधनपूर्वक गायन करून पांडवांस ऋषींसहवर्तमान संतुष्ट केलें. आकाशांत ब्रह्मदेवाची जशी उपासना करितात तसे सर्व गंधर्व तुंबरूच्या आज्ञेनें सभेंत येऊन धर्मराजाची उपासना करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

५. अध्याय पांचवा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, ऋषि व गंधर्व यांसहवर्तमान महाभाग्यवान् पांडुपुत्र सभेंत बसले असतां वेदोपनिषद्वेत्ता, देवगणानीं अर्चित, इतिहास पुराणांचा ज्ञाता, न्यायवेत्ता, धर्मतत्वज्ञ, बृहस्पतिसमान वक्ता, सर्व भुवनकोशाचा ज्ञाता, महाबुद्धिमान्, सांख्ययोगाचा विभाग जाणणारा, सुर व असुर यांचा परस्पर कलह कर्ता, सर्व विद्या व कर्म यांमध्यें पूर्ण असा जो नारदमुनि यानें सर्व लोकांचे

ठायीं संचार करीत करीत ही सभा पहावी व पांडवांचें दर्शन घ्यावें या हेतूनें पारिजात, पर्वत, सुमुख व सौम्य या ऋषींसहवर्तमान सभेमध्यें प्रवेश करून धर्मराजाचे अग्रभागीं येऊन जयपूर्वक आशीर्वादानीं राजाचें अर्चन केलें. तेव्हां बंधूंसहवर्तमान धर्मराजानें उठून विनयानें त्यांस नमस्कार करून उत्तम आसनीं बसवून त्यांची यथान्याय पूजा करून संतुष्ट केलें, तेणें करून नारद परम समाधान पावून धर्म, अर्थ, काम, यांच्या कुशल प्रश्नांनीं धर्मास उपदेश करावा या बुद्धीनें भाषण करिते झाले. राजा, तुझे द्रव्यानें याग, दान व कुटुंबपोषण होतें ना? तुझें मन, धर्माचे ठायीं रममाण होतें ना? सुखाचा अनुभव घेत असतां अंतःकरणांत कांहीं दुःख उत्पन्न होऊन सुखांत कांहीं अंतर पडत नाहींना? हे नरदेवा, तुझ्या पितामहानीं संपादिलेली वृत्ति उत्तम, मध्यम व अधम या तीन स्थानीं व ऋत्विज उपाध्याय व आश्रित यांचे ठायीं योग्यते प्रमाणें तूं चालवितोसना? अर्थाच्या लोभें करून धर्माचा व धर्माच्या लोभें करून अर्थाचा नाश करीत नाहींसना? वक्तृत्व, प्रौढत्व, मेधावित्व, स्मृतिमत्व, नयवेतृत्व व कवित्व हे राजाचे सहागुण सांगितले आहेत. या सहा राजगुणानीं तूं युक्त होऊन साम, दाम, दंड, भेद, मंत्र, औषधि व इंद्रजाल या सात उपायां प्रत अवलोकन करतोसना? नास्तिक्य, अनृत, क्रोध, प्रमाद, दीर्घसूत्रता, अदर्शन, आलस्य, परवशता, सर्वार्थांचें ऐक्यचिंतन करणें, विपरीत आचरण करणारे जे दुष्ट यांजपासून अर्थाचें चिंतन, निश्चित कार्याचें अनारंभण, मंत्राचें अरक्षण, मंगलादि न करणें व शत्रूंवर सर्व दिशांस दंडाच्या इच्छेनें एककालींच गमन करणें हे चौदा राजदोष तूं निरंतर उत्तम प्रकारें पाहतोसना? तसेंच स्वपक्ष व परपक्ष यांचें साम्य किंवा न्यूनता यांचा विचार करतोसना? कृषि, व्यापार, दुर्ग, सेतु, कुंजरबंधन ह्मणजे ग्रामग्रामाचे ठायीं गजांस पोषणा करितां ग्रामिक जनांपासून धन ग्रहण करणें, खनि ह्मणजे रत्नादि उत्पत्तिस्थानें, आकर ह्मणजे सुवर्ण उत्पत्तिस्थानें व करादान ह्मणजे दुसऱ्या पासून कर घेणें हीं आठ कर्में अनुसंधानें करून करितोसना? हीं अनुसंधानपूर्वक केलीं असतां कोशवृद्धि करितात. हे राजा, स्वाम्य

अमात्य, सुहृद, कोश, राष्ट्र, दुर्ग, बल, ह्या राजाच्या सात प्रकृति व लोभी, व्यसनी हे अनुरक्त होऊन कोशाचा नाश करीत नाहींतना? तशाच, दुर्गाध्यक्ष, बला ध्यक्ष, धर्माध्यक्ष, चमूपति, पुरोधा, वैद्य व दैवज्ञ ह्या सात स्वामी प्रकृति, धूत व्यसन रहित असून स्वस्थ आहेतना? हे धर्मराजा, तुझ्या अमात्यानीं केले- ली मसलत तुझे दूत शत्रूंचें वेतन घेऊन बाहेर परिस्फुट करीत नाहींतना? मित्र, शत्रु व उदासीन यांचे मनोभिप्राय यथाकालीं जाणून संधि, विग्रह करि- तोसना? उदासीन कोण व मध्यम कोण याचा विचार करितोसना? हे राजा, आ पल्या सारखे वृद्ध, शुचि, कुलीन व अनुरक्त असे मंत्री पाहून त्यांच्याशीं विचार करितोसना? अरे, मंत्र रक्षित जाहला असतां राजाचा निरंतर जय असतो. तु- झें राष्ट्र शास्त्रवेत्ते जे प्रधान याणीं मंत्रभेद न होतां सुरक्षित केलें असतां तें रा ष्ट्र शत्रु ग्रहण करीत नाहींतना? हे राजा, तूं निरंतर निद्रावश्य होत नाहींसना? तसेंच निद्रिस्थ असतां यथाकालीं जागृत होतोसना? अपरात्रीं उठून अर्थाचें- चिंतन करितोसना? एकदांच नर मसलत करीत नाहींसना? तसाच बहुतां सह वर्तमानही मसलत करीत नाहींसना? तुझी केलेली मसलत राज्यांत परिस्फु- ट होत नाहींना? थोडक्या उपायें करून महा फलाचें अर्थसंपादन करण्या- करितां शीघ्र आरंभ करितोसना? कृषिकर्मांत नियमित केलेले कृषीबल जन अविश्वासी नाहींतना? बरें, अविश्वासु ह्मणोन त्यांचा कदाचित् त्याग केला अ सतां पुनः निश्चयें करून त्यांचा संग्रह करितोसना? हे राजा, तुझे परंपरागत आ प्त लोभी होऊन व सत्य टाकून आपलीं कर्में व विचार लोकांत परिस्फुट करी त नाहींसना? कृप, अश्वत्थामा व द्रोणाचार्य यां सारखे शस्त्रास्त्र विद्ये विषयीं कुशल असे जे आचार्य तुझ्या गृहीं आहेत, ते राजकुमारांकडून विद्याभ्यास करवितातना? सहस्र मूर्खांचा त्याग करून एका पंडिताचा संग्रह करितोस ना? कारण एखादें संकट प्राप्त झालें असतां त्यांतून पंडित मुक्त करितो. हे राजा, तुझे सर्व किल्ले, धनधान्य, आयुधें, उदक, यंत्रें, धनुर्धर योद्धे व शिल्पी जन यानीं परिपूर्ण असतातना? एकच बुद्धिमान, शूर, दाता, विचक्षण, असा- अमात्य जर राजानें संग्रहित केला तर, तो राजास अथवा राजपुत्रास महत् संपत्तीप्रत पाववितो. मंत्री, पुरोहित, युवराजा, चमूपति, द्वारपाल, अंतरवासिक,

कारागृहाधिकारी, द्रव्यसंचयकर्ता, कृत्याकृत्याविषयीं अर्थयोजक, प्रदेष्टा, नगराध्यक्ष कार्यनिर्माणकरिता, धर्माध्यक्ष, सभाध्यक्ष, दंडपाल, दुर्गपाल राष्ट्रांतपालक व अटवीपाल, त्या अठरा प्रकारच्या जनांस तीर्थ अशी संज्ञा आहे. त्यांतून मंत्री, युवराज व पुरोहित यांस वर्ज करून पंधरा तीर्थांचे ठायीं गुप्त बातमीदार जासूद ठेऊन, त्यांची वार्ता तथ्य जाणून स्वकीय प्रजेच्या रंजनें करून स्वराज्याची वृद्धि करावी ती तूं करितोसना? विनयसंपन्न, कुलीन, बहुश्रुत, व विचारवान् असा पुरोहित तुझ्या गृहीं सत्कार पावतोना? होम देण्याकरितां ठेविलेला ब्राह्मण प्रातःकालीं उठून वेळचेवेळीं होम देतो ना? सामुद्रिक शास्त्र व दिव्य उत्पात् आणणारे व ज्योतिषशास्त्रसूचक असे कुशल ब्राह्मण तुझ्या गृहीं आहेतना? उत्तम स्थानीं उत्तमाची मध्यमस्थानीं मध्यमाची आणि अधमस्थानीं अधमाची अशा क्रमानें भृत्यांची योजना करितोसना? पितृपितामह कुलपरंपरागत आलेले असे जे शुचि अमात्य व अधिकारी यांची यथायोग्य कर्मांचे ठायीं योजना करितोसना? उग्रदंड करून प्रजेस पीडा करीत नाहींसना? तुझे राष्ट्रांत मंत्री तुझी आज्ञा पालन करितातना? तूं उग्ररूपानें द्रव्यसंपादन केलेंस हें जाणून याचकजन, पतीता सारखा तुझा अवमान करीत नाहींतना? जशा स्त्रिया स्वेच्छाचारी भ्रष्टपुरुषाचा अवमान करितात, तसा प्रजा संतापा पासून उद्भुत झालेला अग्नि प्रजापीडक राजाचे प्राण, बल व कोश यांचा दाह करून टाकितो; याजकरितां जें नीतिगतद्रव्य असेल तेंच दान करितोसना? हे राजा, निरंतर आनंदी, बुद्धिमान्, धैर्यवान्, शुचि, कुलीन, अनुरक्त व सर्व कर्मा विषयीं दक्ष असा सेनापति तुझ्या गृहीं आहेना? तुझ्या सैन्यामध्यें मुख्य सर्व युद्धा विषयीं कुशल; धैर्यवान्, उदार व पराक्रमी असे जे जन आहेत, त्यांचा तूं मान व सत्कार ठेवितोसना? तुझ्या सैन्यांत प्रतिदिवशीं धान्यादि जें देय आहे व मासाचे ठायीं जें वेतनादि देणें आहे, तें यथाकालीं देऊन कालाचें अतिक्रमण करीत नाहींसना? सेवकजनांस यथाकालीं वेतन व धान्य न पावलें तर ते दरिद्रानें पीडित होऊन यजमानाचें अकल्याण इच्छुन अनर्थ करितात. युद्धांत मुख्यमुख्य आपले म्हणविलेले कुलवान् असे वीर तुझ्या स्वार्थां करितां निरंतर

युद्धामध्यें प्राण देतातना? संग्रामा मध्यें गज, रथ, अश्व, व पायदळ यांजवर तूं स्वतः एकाकी जात नाहींसना? बहुतांचा पालक एक नष्ट जाहला असतां सर्वस्व हानि होते याजकरितां एकानें बहुतांवर जाऊं नये. आपल्या पराक्रमानें उत्तम कर्म केलें असतां, पुरुष अधिक मान पावतो. व राजकृपेनें त्याचें वेतनही वृद्धि पावते. विद्वान्, विद्येनें नम्र व ज्ञानसंपन्न अशा पुरुषाचे यथायोग्य गुण पाहून त्यास दान देऊन त्याचा मान व सत्कार करितोसना? तुझ्या कार्या करितां मरण पावलेले जे पुरुष त्यांच्या स्त्रियांस दुःख न देतां त्यांचें रक्षण करितोसना? क्षीण झालेला, भयें करून शरण आलेला अथवा युद्धांत जिंकिलेला जो शत्रु, याचें पुत्रासारिखें पालन करितोसना? सर्व पृथ्वीप्रत मातापित्या सारखा होऊन रक्षितोसना? स्त्री, द्यूत, मृगया, मद्य, नृत्य, गीत, वृथापर्यटन, वाद्य, निंदा व दिवास्वाप हीं पुरुषास दाहा व्यसनें असतात. यांतून कोणत्याही व्यसनांत शत्रु निमग्न झालेला पाहून तूं आपलें सैन्य कोश व मंत्र यांचें अवलोकन करून वेगानें त्यांजवर जातोसना? आपले पृष्ठरक्षक व पार्ष्णिग्राहक यांस बरोबर घेऊन कृतनिश्चय होऊन शत्रुपराजय करण्या करितां गमन करितोसना? आपल्या सैनिक लोकांस व त्यांच्या मुख्य अधिकाऱ्यांस यथायोग्य वेतनें देऊन व शत्रूचा भेद करण्या करितां नाना प्रकारच्या वस्तु व रत्नें समागमें घेऊन परराष्ट्र मध्यें जातोसना? पूर्वीं आपलीं इंद्रियें जिंकून नंतर प्रमत्त व अजितेंद्रिय अशा शत्रूचा पराजय करितोसना? तूं शत्रूवर जात असतां तुझ्या पुढें साम, दान, दंड व भेद हे चार गुण चालतातना? प्रथम स्वराज्याचें मूळ दृढ करून नंतर शत्रु जिंकण्या करितां स्वारी करून पराक्रमानें शत्रूंस जिंकिल्या नंतर त्यांचें रक्षण करितोसना? रथ, गज, अश्व, योद्धे, पदाति, कर्मकार, चार, देशिकही मुख्य अष्टांगसेना कुलीन, मैत्र, भृत्य, अटविक अशा चार बलानीं युक्त होत्साती शत्रूस प्रतिकूल असे बलमुख्य जे सेनापति याणीं संरक्षित केली आहेसना? धान्य कापण्याची व तें संरक्षण करण्याची संधि पाहून परराज्यांत जाऊन शत्रूस मारतोसना? कारण त्या संधीस शत्रु सुखसाध्य होतात. हे धर्मराजा, स्वराज्यांत व पर राज्यांत स्थापित केलेले अधिकारी अर्थाचें संपादन करून व

कर घेऊन प्रजेचें रक्षण करितातना? तुझे भक्ष्यपदार्थ तशींच उत्तम वस्त्रें व सुगंधि द्रव्यें स्वगृहीं व देशांतरीं उत्पन्न झालेलीं तुझ्याकरितां तुझे विश्वासु सेवक संरक्षण करितातना? तुझा कोश, कोष्ठ, वाहनें, आयुधें, द्वारें, व आयव्य य तुझे जे विश्वासु भक्त यानीं संरक्षित केला जातोना? गृहांतील आचारी प्रभृति सेवक, सेनापति आपले पुत्र व अमात्य यांजपासून तूं आपले पूर्वीं रक्षण करवून नंतर तूं त्यांचें रक्षण करितोसना? अन्न, पान, द्यूत क्रीडा व स्त्रिया यांजकरितां झालेला व्यय, भृत्यजन तुला धर्माचरणकालीं निवेदन करीत नाहीना? उत्पन्नाचे द्रव्यांतून चतुर्थांश अथवा तृतीयांश खर्च करून कोशावृद्धि करितोसना? ज्ञानी, गुरु, वृद्ध, वणिकजन, शिल्पी व आश्रित यांस दरिद्रदशा प्राप्त झाली असतां धनधान्यादिकें करून तूं त्यांचें रक्षण करितोसना? आय व्यय याविषयीं योजिलेले अधिकारी नित्यशः पूर्वाण्हीं येऊन तुला आय व्यय निवेदन करितात ना? अर्थ संपादना विषयीं प्रौढ व हितेच्छु जे तुझे सेवक यांस पूर्वी कांहीं अपराधा वांचून काढीत नाहींसना? उत्तम, मध्यम कनिष्ठ पुरुष पाहून त्यांची नसतशी कामावर योजना करितोसना? लोभी. चोर, वैरी व व्यवहारशून्य पुरुष कांहीं कामावर योजीत नाहींसना? तस्कर व लोभी पुरुष, तूं, तुझे कुमर, स्त्रिया व सैन्य यां पासून राष्ट्रास पीडा होत नाहींना? तुझ्या राष्ट्रांतील शेती करणारे जन दुष्ट नाहींतना, तुझ्या राष्ट्रांतील जलानीं पूर्ण झालेल्या तलावांचें उदक शेत करणाऱ्या लोकांचे शेतास यथाभागशः प्राप्त होतें ना? तुझा देश नदीमातृक असल्यामुळें तुझे राष्ट्रांत शेतास पर्जन्याची गरज आहे असें नाहीं. कृषिबलजन बीजांचें आकर्षण करीत नाहींतना? हे राजा प्रतिमासीं शंभर रुपयांस एक रुपाया व्याज घेऊन कर्ज देतोसना? कृषिकर्म, वणिक्व्यापार, पशुपालन व धनवृद्धि या चार प्रकारच्या वार्ता साधुजन येऊन तुला निवेदन करितातना? कारण त्या वार्ता यथाकालीं समजल्या असतां प्रजा सुखी होते. हे धर्मराजा तूं आपले राज्यांत प्रत्येक ग्रामीं प्रशास्ता, समाहर्ता, संविधाता, लेखक व साक्षी हे पांच अधिकारी बुद्धिमान व शूर असे ठेऊन त्याजकडून उत्तम प्रकारचा बंदोबस्त ठेवितोसना? आपल्या नगराचे रक्षण करितां

जवळ जवळचे ग्रामनगरा सारखे केले आहेना? वत्या ग्रामाचे संरक्षणार्थ आ-
समंताद्भागीं जे लहान ग्राम असतील ते ग्रामा सारखे परिपूर्ण केले आहेस-
ना? तुझ्या राज्यांत सम विषम स्थलाचे ठायीं संचार करणाऱ्या चोरजनाप्रत
ग्रामाध्यक्ष कांहीं सैन्य घेऊन शासन करितातना? हे राजा, तूं आपल्या स्त्रि-
यांचें रक्षण करून त्यांची मर्जी संपादन करितोसना? त्यांचा विश्वास धरून
त्यांजपाशीं कांहीं गुह्यभाषण करित नाहीसना? कांहीं अकल्याणाची गोष्ट
श्रवण केली असतां तिच्या निवृत्तीचा उपाय योजिल्या वांचून अंतःपुरांत
शयन करीत नाहींसना? रात्रीच्या द्वितीय व तृतीय प्रहरीं शयन करूनच-
तुर्थ प्रहरीं धर्मार्थाचें चिंतन करितोसना? प्रातःकाळीं उठतांच अंगावर अ-
लंकार धारण करून सर्वांस भेटतोसना? प्रातःकाळीं उठून समय जाणणा-
रे जे मंत्री त्यांसह वर्तमान राजकार्य यथाकाळीं करितोसना? रक्तवस्त्र परि-
धान करणारे भृत्यजन तुझ्या रक्षणा करितां हस्ताचे ठायीं शस्त्रास्त्रें धार-
ण करून तुझें सेवन करितातना? दंड करण्यास जे योग्य त्यांजप्रत क्रूर हो-
ऊन यमा सारखा दंड करितोसना? व पूज्य पुरुषाची नम्रपणें पूजा करि-
तोसना? प्रिय काय व अप्रिय काय याची परीक्षा करितोसना? तूं स्वतः
शारीर दुःखें, औषधें करून व मानस दुःखें, वृद्धसेवें करून दूर करितोसना?
अष्टांग चिकित्से विषयीं कुशल व निपुण असे वैद्य तुझे हितकर्ते व तुझे ठायीं
अनुरक्त, यांचा आपले शरीर संरक्षणार्थ संग्रह करितोसना? हे राजा, तुझ्या-
गृहीं अर्थी ह्मणजे याचक आणि प्रत्यर्थी ह्मणजे परंपरागत वृत्तीस प्रतिबंध
जाहल्या मुळें तुला निवेदन करण्यास प्राप्त झालेले जन, यांजप्रत मोहें करू-
न, मानें करून अथवा लोभें करून अवलोकन करीत नाहींस असें होत ना-
हींना? आश्रित जनाची उपजीविका हरण करीत नाहींसना? तुझ्या राज्यांत
वास करणारे जे जन त्यांजप्रत परकीय राजानें वश केलें असतां ते तुझ्या-
शीं विरुद्ध वर्तत नाहींतना? ज्या शत्रूस तूं पूर्वी बलें करून पीडित केलेंस
तो शत्रु मंत्र व बलें करून प्रस्तुत बलवान् जाहला नाहींना? दान व मानानीं
वश केलेले राजे तुझ्याकरितां आपला प्राण देण्या विषयीं उद्युक्त आहेत
ना? सर्व विद्वान् ब्राह्मण व साधु यांची यथायोग्य पूजा करितोसना? हे धर्म

राजा, तुझ्या पूर्वजानीं आचरण केलेला धर्म अवलोकन करून त्या प्रमाणें करण्यास तूं यत्न करितोसना? तुझ्या गृहीं ब्राह्मण मिष्टान्नें भक्षण करून दक्षिणेचा लाभ त्यांस होतोना? चित्ताची एकाग्रता करून वाजपेय व पुंडरीक याग करण्याची मति धारण करितोसना? ज्ञाति, गुरु, वृद्ध, देवता, तपस्वी, ग्रामसीमासूचक वृक्ष व ब्राह्मण यांजप्रत नित्यशः नमस्कार करितोसना? तूं शोक किंवा क्रोध करीत नाहींसना? मंत्रवेत्ते पुरोहित प्रभृतिजन आपल्या हस्तामध्यें मंगलद्रव्यें घेऊन तुझ्याजवळ उभे राहून तुला आशीर्वाद देतातना? धर्मार्थ, काम, दाखविणारी आयुष्याची व यशाची वृद्धि करणारी अशी वृत्ति रक्षण करण्याची बुद्धि ठेवितोसना? या पूर्वोक्त सांगितलेल्या नीतीनें जो राजा वर्ततो त्याचें राज्य कधींही नष्ट होत नाहीं. व तो सर्व पृथ्वीस जिंकून अत्यंत सुख पावतो. हे राजा, कोणी प्रतिष्ठित गृहस्थ निंद्यकर्मांत सांपडला असतां त्यास धनधान्यानीं हीन करून त्याचें रक्षण करितोसना? कोणी दुष्ट कर्म करणाऱ्यास चोर धरणाऱ्या लोकांनीं चोरीच्या द्रव्यासहित धरलें असतां त्यांजपासून कांहीं द्रव्याच्या लोभानें लांच घेऊन त्यांस सोडीतनाहींसना? तुझ्या राष्ट्रांतील कोणी पुरुष पूर्वी दरिद्री असून कांहीं कालानें तो श्रीमान् जाहला असतां तुझे अमात्य त्याजवर मिथ्या आरोप ठेऊन त्याचें द्रव्य हरण करण्या विषयीं इच्छा धारण करीत नाहींतना? नास्तिक्य, अनृत, क्रोध, प्रमाद, दीर्घसूत्रता, ज्ञानी पुरुषाचें अदर्शन, आलस्य, चित्तास तिरस्कार करणें, अर्थाचें ऐक्यचिंतन, अनर्थज्ञाशीं मसलत करणें, निश्चित केलेल्या कर्माचा आरंभ न करणें, आपली मसलत बाहेर परिस्फुट करणें, अमंगल कर्मा विषयीं उद्युक्त होणें, व विषया विषयीं लंपट होणें या चौदा दोषांचा त्याग करितोसना? बहुधा जे राजे या दोषांचा स्वीकार करितात ते नष्ट होतात. हे धर्मराजा, तुझे वेद, धन व स्त्रिया व शास्त्रें सफल आहेतना? असें नारदाचें भाषण श्रवण करून धर्मराज साशंक होत्साते नारदास प्रश्न करितात. हे ऋषे, सफल वेद ह्मणजे काय? सफल धन ह्मणजे काय? तशाच सफल स्त्रिया कोणत्या? व सफल शास्त्र कोणतें? तें मला निवेदन करा. असा धर्मराजाचा प्रश्न श्रवण करून नारद भाषण करितात. हे

धर्मराजा, अग्निहोत्र ग्रहण करणें हें वेदाचें फल होय; दान व उपभोग करणें हें धनाचें फल होय; रति व पुत्र होणें हें स्त्रियांचें फल होय, शील व सन उत्तम असणें हें शास्त्रांचें फल होय; या प्रकारें नारद धर्मराजाच्या प्रश्नाचें उत्तर सांगून पुन: धर्मराजाप्रत प्रश्न करितात. हे राजा व्यापारा करितां दूर देशाहून आलेले वणिक लोक यथोक्त व्यापार करीत असतां त्यांजपासून राजग्राह्य कर घेतोसना? तुझे पुरांत व राष्ट्रांत विक्रय पदार्थ विकत असतां त्यांजपासून तुझे अधिकारी जन छल करून द्रव्य घेत नाहींतना? नित्य अर्थवेत्ते व धर्मार्थदर्शी अशा वृद्धांच्या धर्मार्थवाणी निरंतर श्रवण करितोसना? तुझ्या कृषितंत्रामध्यें गायी पासून झालेलें घृतदुग्धादि ब्राह्मणांकारणें पूर्वी अर्पण करितोसना? कारागीर लोकांस चित्रें वगैरे काढण्यास रंगाचे पदार्थ द्यावयाचे ते चार महिन्यांपुरतेंच देतोसना? कोणी पुरुषानें एखादें अलौकिक कृत्य केलें असतां तें त्याचें कृत्य अवलोकन करून साधूंच्या सभेमध्यें सत्कारपूर्वक त्याचें पूजन करून प्रशंसा करितोसना? गज, अश्व, रथ यांचीं लक्षण चिकित्साप्रतिपादक ग्रंथवेत्ते आचार्य यांजपासून त्यांचीं लक्षणविधायक शास्त्रें यांचा संग्रह करितोसना? हे राजा, तुझ्या राष्ट्राचें हित होण्या विषयीं धनुर्विद्याप्रतिपादित सूत्रादिकांचा अभ्यास तूं करवितोसना? तसेंच मंत्रप्रयुक्त शस्त्राभिचार प्रयोग व शत्रूचा नाश करण्या विषयीं विषप्रयोग हे सकल तूं जाणतोसना? अग्नि, सर्प व व्याघ्र, रोग व राक्षस यांच्या भया पासून आपल्या राष्ट्राचें तूं संरक्षण करितोसना? निद्रा, आलस्य, भय, क्रोध, काठिण्य व दीर्घसूत्रता या अनर्थांचा त्याग करितोसना? अंध, मुके, पंगु, अंगहीन विरक्त व जातिबहिष्कृत झालेले अशा पुरुषाचें तूं पुत्रा सारखें पालन करितोसना? वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रमाणें नारदाची वाणी श्रवण करून, कुरुश्रेष्ठ, धर्मराजा, देवरूप जे नारदऋषि यांस नमस्कार करून भाषण करितो. हे नारदा, तुमची वाणी श्रवण करून माझी बुद्धि स्थिर जाहली. आतां तुह्मीं सांगितल्या प्रमाणें आचरण करितों. तुमच्या वचना प्रमाणें आचरण करणारा राजा सागरमेखलांत पृथ्वीचें राज्य पावेल. असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून नारद भाषण करितात:-हे धर्मराजा, मींसां

गितल्या प्रमाणें जो नृपति चारी वर्णांच्या रक्षणा विषयीं तत्पर असतो, तो या लोकीं सुखी होऊन पुढें इंद्राची सलोकता त्यास प्राप्त होते. असा विषय या अध्यायांत आहे.

६. अध्याय सहावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, नारदाचे वचन मान्य करून पुनः धर्मराजा त्यांस भाषण करितो कीं, तुम्हीं कुशलप्रश्न करून धर्माचरण करण्या विषयीं सांगितलें त्या प्रमाणें यथाशक्ति व यथान्यायें मी आचरण करितों व राजानीं जें कर्म करावें तेंच मी करून पूर्वजांचे सन्मार्गरक्षणाची इच्छा करितों. असें धर्माचें भाषण श्रवण केल्यावर, नारद दोन घटिका पर्यंत त्या राजमंडलांत स्तब्ध बसले. नंतर पुनः धर्मराज प्रश्न करितो, हे ब्रह्मन्, तुम्हीं ब्रह्मदेवाच्या सर्व लोकांत गमन करितां, तेव्हां या आमचे सभे सारिखी किंवा हिजपेक्षां विशेष अशी सभा तुम्हीं कोठें पाहिली असल्यास आम्हांस निवेदन करा; नंतर नारद मधुर वाणीनें भाषण करितात. हे राजा, मनुष्यलोकांत अशी सभा मी कोठेंच पाहिली नाहीं; परंतु पितृराज, वरुण, इंद्र, कुबेर व ब्रह्मदेव यांच्या सभा अत्युत्तम असून देवगण, पितृगण, साध्य व शांत इत्यादि मुनिगणानीं सेवित व परम देदीप्यमान अशा अवलोकन केल्या आहेत; नंतर धर्मराज बंधूंसहवर्तमान हात जोडून भाषण करितात. हे ऋषे, त्या सभांची लांबी व रुंदी आदिकरून सर्व कथन करावें. नारद ह्मणतात हे राजा, तें मी तुला सर्व निवेदन करितो. स्वस्थ अंतःकरणें करून श्रवण कर. असा विषय या अध्यायांत आहे.

७. अध्याय सातवा:- हे धर्मराजा, इंद्राची दिव्यसभा विश्वकर्म्यानें निर्माण केली. ती स्वतः इंद्रानें पुण्यकर्में करून जिंकिली. तिची कांति केवल सूर्या सारिखी आहे ती शतयोजनें रुंद व दीडशें योजनें लांब व पांच योजनें उंच आकाशमार्गानें स्वेच्छें करून गमन करणारी अशी आहे. जरा, शोक, श्रम इत्यादि तेथें नाहींत. जन निर्भय व शांत. शुभग्रहा सारखी उंच रमणीय तिजमध्यें आसनें आहेत. दिव्यवृक्षानीं ती सुशोभित आहे. त्या मध्यें देवराज उंच आसनावर शची ( लक्ष्मी ) यानीं शोभायमान आरूढ होतो. देवराजाचें स्वरूपफारच सुशोभित असून तो नानाप्रकारचे अलंकार

वस्त्रें व पुष्पें धारण करितो. मरुद्गण, सिद्ध, देव, ऋषि, देवगण, पाराशर, सावर्णि, गालव इत्यादि सहस्रशः ऋषि व अप्सरा, गंधर्व इत्यादि नानाविध जन त्या देवेंद्राची स्तुति करितात. अशी ही पुष्करमालिनीनामक शतक्रतूची सभा तुला सांगितली. आतां यमसभा सांगतों, श्रवण कर. या अध्यायांत असा विषय आहे.

८. अध्याय आठवा:- विश्वकर्म्यानें वैवस्वताची (यमाची) सभा निर्माण केली ती शंभर योजनें लांब व शंभर योजनें रुंद आहे. सूर्यासारखा तिचा प्रकाश आहे. तेजोमय व सर्वकामना पूर्ण करणारी अशी ती असून तिजमध्यें अतिउष्णता व अति सीतता हीं नाहींत. मनास आल्हाद करणारी असून शोक, जरा, तृषा, क्षुधा, अप्रिय, दैन्य, श्रम व प्रतिकूलता इत्यादि तिजमध्यें अगदीं नाहींत. सर्व देव व मनुष्यें यांचे काम्यमानविषय तेथें राहतात. स्वादु, भक्ष्य, भोज्य, लेह्य, पेय हे पदार्थ मनोहर व रसवंत असे तेथें बहुत आहेत. त्या सभेमध्यें पुष्पमालांचे गंध नष्ट होत नाहींत. वृक्ष निरंतर सफल असतात. तेथील उष्ण व सीतल जलें नेहेमीं मधुर असतात. पुण्यवान् राजर्षि व ब्रह्मर्षि मोठ्या हर्षें करून सूर्यपुत्राची उपासना करितात. ययाति, नहुष, पुरु, मांधाता, सोमक, इत्यादिक राजे व ऋषि, देव, गंधर्व अप्सरा आदिकरून सहस्रशः आप आपल्या पुण्यानुसार सुखोपभोग घेऊन या सभेमध्यें वास करितात. व सहस्रावधि धर्म करणारे व मननशील पुरुष माहात्मा प्रजेश्वर जो यम याची उपासना करितात. अशा प्रकारची यमाची सभा आहे. आतां पुष्करमालिनी नामें जी वरुणाची सभा आहे तिजविषयीं उत्तरअध्यायीं तुला सांगेन असा विषय या अध्यायांत आहे.

९. अध्याय नववा:- नारद सांगतात, हे युधिष्ठिरा, वरुणाची सभा अमितप्रभायुक्त आहे तिची लांबी व रुंदी यमसभे सारखीच आहे व दिव्य प्राकार तोरणें इत्यादिकानीं युक्त व उदकानें परिपूर्ण अशी ती सभा विश्वकर्म्यानें निर्माण केली तेथें दिव्यरत्नमय असे वृक्ष पुष्पफलानीं नेहेमीं युक्त असतात. तसेच नील, पीत, सीत, श्याम, व लोहित अशा वर्णांचे कांही वृक्ष, गुल्म

व मंजिरी यांहीं करून युक्त आहेत. व चित्रविचित्र रंगाचे व मधुर स्वर करणारे पक्षी सहस्रावधि तेथें आहेत. त्या सभे मध्यें बसलें असतां अत्यंत सुख होतें. तेथें सीत व घर्म हीं अगदीं नाहींत. गृहा सारखीं उंच आसनें पीत वर्णाचीं स्थापित केलीं आहेत. त्या सभे मध्यें वरुण, वारुणी सहवर्तमान दिव्य अलंकारानीं युक्त होऊन बसला असतां, दिव्य गंधांच्या माला धारण करून व शरीरास गंध लेपन करून आदित्यगण, जलेश्वर वरुणाची उपासना करितात. वासुकी, तक्षक, ऐरावत, कृष्ण, लोहित, पद्मचित्र, वीर्यवान, कंबल, अश्वतर, धृतराष्ट्र, बलाहक, कर्कोटक इत्यादि व कुंडलाकृति, पताकाकृति व फणा धारण करणारे असे बहुत नाग व बलि, वैरोचन आदिकरून राजे, कालखंज इत्यादि दैत्य दानव हे सर्व तेथें वरुणाची उपासना करितात. चार समुद्र, भागीरथी, कालिंदी, नर्मदा, चंद्रभागा, सरस्वती, इरावती, सिंधु, वैतरणी, शोणानद इत्यादि लोकविख्यात तीर्थें तशाच अप्सरा, सरोवरें, डोह सर्व दिशा, पृथ्वी, पर्वत व जलचर हीं आपआपलीं शरीरें धारण करून वरुणाची उपासना करितात. ही वरुणाची सभा तुला सांगितली. आतां पुढील अध्यायीं कुबेराची सभा सांगेन. असा विषय या अध्यायांत आहे.

१० अध्याय दहावा:- नारद सांगतात हे धर्मराजा, वैश्रवणाची सभा शंभर योजनें लांब व सात योजनें रुंद आहे. ही सभा वैश्रवणानें आपल्या तपोबलानें संपादन केली. ही चंद्रासारखी कांतिमान् व कैलास शिखरासारखी उंच आहे. ती दिव्यसुवर्णमय राजगृहानीं सुशोभित, चित्रविचित्र, दिव्य व गंध यानीं मनोरम आहे व कैलास पर्वताच्या शिखरा सारखा तिचा आकार दिसतो. आकाशमार्गानें गमन करणारी, सुवर्णमय, रंगानीं विद्युल्लते सारखी शोभायमान् अशी ही सभा आहे. या सभेमध्यें वैश्रवण चित्रविचित्र वस्त्रें भूषणें व कुंडलें धारण करून सहस्र स्त्रियां सहवर्तमान वास करितो.- सूर्या सारखा कांतिमान्, दिव्य आभरणानीं युक्त व दिव्य उपधानानीं सुशोभित अशा परमासनीं कुबेर बसला असतां, मांदार व सुगंधिक वन यांचा सुगंध बहुत सुटतो. नंदन वनांत अलकानामें नलिनी आहे तिचा वरील सितलवायु कुबेरास आनंद देतो. देव गंधर्व व अप्सरांचे गण त्या सभेमध्यें दि-

च्य तानानीं गायन करितात. मिश्रकेशी रंभा, चित्रसेना, सुचिस्मिता, चारुनेत्रा, घृताची, मेनका, इत्यादि सहस्रावधि अप्सरा रात्रंदिवस ती सभा गीतवाद्यानीं नादित करितात. किन्नर, गंधर्व, कुस्तुंबरु, पिशाच प्रद्योत व लक्ष्मी तेथेंच वास करितात. देवर्षि, ब्रह्मर्षि, महाबलवान् गंधर्व, यक्ष गंधर्वांचा ईश्वर, भगवान् शूलपाणि, पार्वती देवी व सर्व भूतगणांसह वर्तमान व कैलास, मंदर, मलय, महेंद्र, गंधमादन इत्यादि पर्वत हे सर्व कुबेराचें सेवन करून तेथें बसतात व नृत्य करितात. अशी सभा आकाशमार्गानें गमन करणारी मी अवलोकन केली. आतां पुढील अध्यायीं पितामहाची सभा सांगेन. असा विषय या अध्यायांत आहे.

११. अध्याय अकरावा.– नारद सांगतात हे धर्मराजा, ब्रह्मदेवाच्या सभेला कोणत्याही सभेची उपमा देणें योग्य नाहीं अशी ती अनुपम्य आहे. पूर्वी कृतयुगीं सूर्यनारायण ब्रह्मदेवाची सभा पाहून आकाशमार्गानें मनुष्यलोक अवलोकन करण्या करितां भूलोकीं मनुष्यरूपानें प्राप्त झाला. त्याणें मजपाशीं ब्रह्मदेवाच्या सभेचें वर्णन केलें. ती सभा अप्रमेय, दिव्य, प्रभावानें अनुपम्य व सर्वभूतमनोहर असे त्या सभेचे गुण श्रवण करतांच तिच्या दर्शनाची मला इच्छा झाली. नंतर मी आदित्याची प्रार्थना केली कीं, हे भगवन् पितामहाची सभा अवलोकन करण्याची मी इच्छा करितों यास्तव ज्या तपें करून कर्मे करून अथवा औषधें करून ती पापनाशिनी उत्तम सभा मी अवलोकन करीन असा उपाय सांगा? नंतर सहस्रांशु दिवाकर भाषण करितो कीं, हे ऋषे सहस्र वर्षे पर्यंत नियतांतरात्मा होऊन ब्रह्मव्रत ह्मणजे ब्रह्मोपासना कर. ह्मणजे तूं ती सभा अवलोकन करण्यास योग्य होशील. असें सूर्याचें भाषण श्रवण करून हिमवान् पर्वताच्या पृष्ठभागीं महाव्रतास मी आरंभ केला. पुढें तें समाप्त झाल्यावर भगवान् सूर्यनारायण मला घेऊन ब्रह्मसभेस गेले. नंतर हे राजा मीं तेथें गेल्यावर ब्रह्मसभा अवलोकन केली. परंतु ती अमुक प्रकारची आहे हें मला सांगतां येत नाहीं; कारण ती क्षणमात्रें करून अनुपमेय शरीर धारण करिते. तिचें अमुक परिमाण व अमुक प्रकारची स्थिति हें सांगतां येत नाहीं. तसेंच तिच्या स्वरूपा सारखें स्वरूप कोणत्याही सभेचें मीं पूर्वी कधींही अवलोकन केलें नाहीं. तिजमध्यें अति

सीत व अति उष्ण नाहीं. क्षुधा, तृषा व ग्लानि कोणीही पावत नाहीं. त्या सभे मध्यें राहिलें असतां अत्यंत सुख होतें. नानाप्रकारच्या मणिमय स्तंभानीं धारण केल्या सारखी दिसत्ये. परंतु तुला व स्तंभ हीं मुळींच नाहींत. ती अविनाश असल्यामुळें त्रिकाळीं सारखीच असत्ये. दिव्य व नाना प्रकारच्या सत् भावें करून परिपूर्ण आहे. सूर्य चंद्र व अग्नि यांहून तिची कांति अधिक असल्यामुळें हे त्रिवर्ग तिजपुढें निस्तेज दिसतात. निरंतर ती देदीप्यमान दिसत्ये. त्या सभे मध्यें लोकपितामह भगवान् मनुष्यांस रात्रंदिवस स्वतः एकटाच त्यांच्या त्यांच्या मनोभावें करून सर्वांचें तोषण करून असतो. सकल प्रजापति, दक्षप्रचेता, पुलह, मरीचि, कश्यप, प्रभु, अत्रि, भृगु, वसिष्ठ, गोतम इत्यादि ऋषि व पृथ्व्यादिक पंचमहाभूतें व महान् महान् ऋषि, अष्टांग सहित आयुर्वेद नक्षत्रांसहित चंद्र किरणांसहित सूर्य वायु ऋतु संकल्प प्राण अर्थ, धर्म, काम, हर्ष, द्वेष, तप, दम, अप्सरांचे गण, सत्तावीस नक्षत्रें, लोकपाल, वीस संख्या गंधर्वगण, शुक्र, बृहस्पत्यादि नवग्रह व मंत्र, रथंतर, साम, हरिमान, वसुमान, द्वादशादित्य, अग्नीषोम, इंद्रादिक, सर्व पितृगण, सर्व होम द्रव्यें, ऋग्वेदादि चार वेद, सर्वशास्त्रें, इतिहास, उपवेद, वेदांग, यज्ञ, सोम, सर्व देवता, गृह, सावित्री, दुर्गतरणी, अ, उ, म, अर्धमात्रा, नाद, बिंदु, शक्ति, अशी सात प्रकारची वाणी, मेधा, धृति, श्रुति, प्रज्ञा, बुद्धि, यश, क्षमा, स्तुति, शास्त्रें, सर्व गाथा, भाष्यें, तर्क, युक्ति, नानाप्रकारचीं नाटकें, काव्यें, कथा, हीं सर्व आप आपलीं स्वरूपें धारण करून त्या सभेंत बसतात. तसेंच पुण्यवान् गुरूची सेवा करणारे, मुहूर्त, दिवस, रात्र अर्धमास, षड्ऋतु, संवत्सर व चार युगें इत्यादि व सर्व धर्मचक्रें, अदिति, दिति, दनु, सुरसा, विनता, इरा, इत्यादि देवमाता व रुद्राणी, श्रीलक्ष्मी, इत्यादि व अन्यदेवता, राक्षस, पिशाच, नाग, पक्ष, हे सर्व पुण्यवान् आप आपलीं रूपें धारण करून यथानुक्रमें ब्रह्मदेवाची उपासना करितात. या शिवाय सहस्त्रशः लोक ब्रह्मदेवाची उपासना करितात. सभेस आले त्या लोकांचा योग्यते प्रमाणें मानव सत्कार करून त्यांस नाना प्रकारचे भोग्यपदार्थ ब्रह्मदेव देतात. अशा पुरुषांनीं ती सभा सर्वदां भरलेली सुखप्रद, तेजोरूपी, दिव्य, ब्रह्मर्षिगणानीं सेवित, ब्राह्मी श्रीनें देदीप्यमान

व श्रमरहित शोभते. या प्रकारें मी जी ही ब्रह्मदेवाची सभा अवलोकन केली तशी ही तुझी सभा मनुष्यलोकांमध्यें उत्तम आहे. त्या मी उत्तम सभा देवलोकांमध्यें पाहिलेल्या तुला सांगितल्या. असा विषय या अध्यायांत आहे.

१२. अध्याय बारावा.– धर्मराज भाषण करितात हे नारदा, त्या सर्व सभांमध्यें जे जे राजे गंधर्व, यक्ष, किन्नर आदिकरून प्राप्त झाले त्यांचें तुह्मीं वर्णन केलें आणि इंद्रसभेमध्यें देव गंधर्व महर्षि इत्यादिकांचें वर्णन करून- एकस्थाच हरिश्चंद्र राजाचें वर्णन केलें. तेव्हां इंद्रसभेंत प्राप्त होण्यासारखें हरिश्चंद्र राजानें कोणतें तप केलें? व कोणत्या तपें करून तो इंद्राची साम्यता करण्यास प्रवृत्त झाला? व हे नारदा माझा पिता पंडु याचा व तुमचा समागम कसा झाला आणि तुह्मीं मनुष्यलोकीं येतां हें त्याणें पाहून आह्मांस काय निरोप सांगितला? तो कृपा करून सांगावा? असें धर्माचें भाषण श्रवण करून नारद सांगतात हे धर्मराजा, हरिश्चंद्राचें माहात्म्य सांगतों श्रवण कर. हरिश्चंद्र राजा महाबलवान्, सर्व राजां मध्यें श्रेष्ठ, सर्व पृथ्वीचें शासन कर्ता व सार्वभौम असून पृथ्वीवरील राजे त्याची आज्ञा पालन करित होते. त्याणें सुवर्णरथांत बसून शस्त्रप्रतापानें जंबु, कुश, काश, क्रौंच, शाल्मलि, गोमेद पुष्कर हीं सात द्वीपें व शैलवनकानना पृथ्वी जिंकून राजसुय यज्ञ केला. हे राजा, यज्ञामध्यें सर्व राजे ब्राह्मणांस वाढण्यास सिद्ध असत. ब्राह्मणांस त्यांच्या इच्छे पेक्षां पांचपट अधिक द्रव्य देऊन तृप्त केलें व यज्ञसमाप्तिकालीं ब्राह्मणांस भोजन व बहुत प्रकारचीं द्रव्यें देऊन त्यांस जाण्या विषयीं- निरोप दिला. तेव्हां तो तेजस्वी हरिश्चंद्र राजा सर्व नृपांत श्रेष्ठ होऊन इंद्रलोकास गेला. असेंच जे राजे राजसूय यज्ञ करितील ते इंद्रासमागमें आनंद पावतील. तशींच तीव्र तपानें जे आपली शरीरें त्यक्त करितात तेही इंद्रसभेस जातात. हे कौंतेया, तुझा पिता पंडु इंद्रलोकीं हरिश्चंद्राची संपत्ति पाहून मला ह्मणाला कीं, तूं धर्मराजास माझा निरोप सांग कीं, सर्व क्रतूं मध्यें श्रेष्ठ असा जो राजसुय यज्ञ तो तूं कर ह्मणजे मी हरिश्चंद्रा सारखा बहुकाल पर्यंत इंद्रसभेस राहीन. नंतर मी त्यास सांगितलें कीं, भूलोकास गेलों तर तुझा निरोप सांगेन. तस्मात् हे धर्मराजा तूं हा याग कर ह्मणजे पूर्वजां-

सहवर्तमान इंद्राची सलोकता पावशील. अशीं नानाप्रकारचीं माहात्म्येंसां-गून समागमें आलेल्या ऋषींसहवर्तमान धर्मराजाची आज्ञा घेऊन नारद मुनि यादवनगरीस गेले. नंतर बंधूंसहवर्तमान धर्मराज राजसूययज्ञाचा विचार करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

१३. अध्याय तेरावा:– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रकारें नारदाचें भाषण श्रवण करून श्वासोच्छ्वास टाकीत राजसूय यागा विषयीं धर्मराज फारच उत्कंठा करूं लागला. नंतर सभेंत जे सभासद बसले होते त्यांची राजानें स्तुति केली, तेव्हां त्याणीही राजाची पूजा केली. नंतर यागा विषयीं अति उत्कंठित झालेल्या धर्मराजानें सर्व लोकांवर अनुग्रह करावा म्हणजे आपली इष्टसिद्धि होईल; असा विचार करून प्रथम कोप व मोह यांचा त्याग केला, आणि सर्वांस द्रव्यादिक दान केलें. तेव्हां धर्मास सर्व जन अजातशत्रु म्हणूं लागले. धर्म भीमादिकांनीं प्रजेचें यथान्याय पालन व पोषण केलें. सर्व प्रजा स्वकर्मीं तत्पर राहूं लागली. व यथाकालीं पर्जन्यही वृष्टि होऊं लागली, त्या मुळें धनधान्य समृद्ध होऊन सर्व लोक सुखी होते व लोकांस कोणा पासूनही पीडा होत नसे. सकल प्रजा राजास आपल्या द्रव्याचा षष्ठमांश देऊन आनंदानें राहात होती. व सर्व लोक उत्तम अन्नवस्त्रादिकांचा उपभोग करून सात्विक राजस व तामस वृत्तीनें राहात होते. असा तो धर्मराज सर्व गुणानीं पूर्ण होता. या प्रकारें जो राजा वर्तन करील तो साम्राट् पदवी पावून त्या राजास दाही दिशा मातृपितृतुल्य होतात. या प्रकारचा सकलगुणसंपन्न तो धर्मराजा पुनः पुनः आपले मंत्री व भ्राते यांजला राजसूय यज्ञाविषयीं प्रश्न करूं लागला. तेव्हां त्यानीं राजाचा मनोगत जाणून याग करण्या विषयीं अनुमोदन देऊन राजाची व यागा पासून प्राप्त होणाऱ्या फलाची स्तुति करून आह्मीं तुला सर्व अनुकूल आहों असें त्याणीं भाषण केलें तें राजानें श्रवण करून त्यास परमानंद झाला. आणि हा याग करणें आपल्यास योग्य आहे असा निश्चय करून पुनः आपले भ्राते, ऋत्विज, धौम्य, द्वैपायन, महान् महान् जन यांस एकत्र करून प्रश्न केला कीं, मला राजसूय यज्ञ करण्याची इच्छा झाली आहे परंतु निर्विघ्न-

पणें समासीस कसा जाईल, याचें उत्तर सांगावें, नंतर ऋषि व ऋत्विज् बोलतात, हे राजा तूं कांहीं चिंता करूं नको, याग करण्यास तूं योग्य आहेस. असें त्यांचें भाषण श्रवण करून मंत्री व भ्राते यांनींही त्यांचे भाषणास मान दिला, तथापि महाविचारवान् धर्मराज पुनः विचार करितो कीं, आपल्यास यागाची सिद्धी कशी होईल? कारण लोकांचा नाश न होतां आपल्याच विचारानें ह्या यज्ञ शेवटास जाणें कठिण आहे; यास्तव सर्वांतर्याम व दुष्टांचा नाश करण्या विषयीं ज्याचा अवतार असा जो श्रीकृष्ण वासुदेव त्यास येथें आणावें, ह्मणजे आपली इष्ट सिद्धि होईल. असा धर्मराजानें निश्चय करून श्रीकृष्णास आणण्यास दूतास पाठविलें. तो रथांत बसून द्वारकेंत गेला आणि त्याणें श्रीकृष्णास सांगितलें कीं, आपल्या दर्शनाची धर्मराजास फार इच्छा झाली आहे. असें दूताचें वाक्य श्रवण करून धर्मराजाचे दर्शनाकरितां श्रीकृष्ण रथामध्यें आरूढ होऊन परम त्वरेनें इंद्रप्रस्थीं आले. तेव्हां प्रथम धर्मराजानें श्रीकृष्णाची पित्या सारखी पूजा करून नंतर अर्जुनादिकानीं त्याची पूजा केली. त्या कालीं भगवान् स्थिर झाल्यावर धर्मराज राजसूय यज्ञा विषयीं भाषण करूं लागला. कीं, हे श्रीकृष्णा, कोणत्या उद्योगानें मी राजसूय यज्ञ करीन, तें मला सांगावें. कारण तुजवर माझा भरवसा आहे. यास्तव तूं जसें सांगशील तसें मी करीन. या विषयीं मीं सर्वांस प्रश्न केला परंतु कांहीं जन मित्रत्वास्तव व कांहीं स्वार्थास्तव यास काय दोष आहेत ते सांगत नाहींत व कांही लोक प्रियभाषण करणारे व कोणी असे आहेत कीं, दुसऱ्याचें अरिष्ट मनांत न आणितां आपलें हित झालें म्हणजे झालें. आणि तूं तर इतरांसारखा नाहींस. सर्व लोभ व काम, क्रोध यांचा त्याग करून या लोकीं जें उत्तमप्रकारचें कल्याणकारक असेल तेंच सांगशील असें धर्मराजानें भाषण केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१४. अध्याय चौदावा.- श्रीकृष्ण भाषण करतात, हे धर्मा तूं सर्व गुणानीं संपन्न असल्या मुळें राजसूय यज्ञ करण्यास योग्य आहेस व तूं सर्वज्ञही आहेस; परंतु मी तुला कांहीं एक विचार सांगतों श्रवण कर. पूर्वीं परशुरामानें पृथ्वी एकवीस वेळां निक्षत्रिय केली त्या आलीकडे झालेल्या

क्षत्रिय कुलानीं पृथ्वी व्याप्त झाली आहे. ते राजे सोम व सूर्यवंशांत उत्पन्न झालेले, पुरूरवा व इक्ष्वाकु यांच्या कुलांतील सहस्त्रावधि राजे बद्ध केल्यासारखे तुझ्या आज्ञेंत आहेत. ययातीपासून झालेला जो भोजवंश त्याचे चवदा भेद होऊन त्यांचा विस्तार पृथ्वीवर फार झाला आहे. आणि सर्व क्षत्रियांचें तेज, राज्य व लक्ष्मी त्यांचे गृहीं आहे. त्याच कुलांत जरासंध उत्पन्न होऊन त्यास पृथ्वीच्या मध्यभागाचें आधिपत्य प्राप्त झाल्यामुळें तो सर्व राजांत श्रेष्ठ झाला आहे. तो आपल्या प्रतापानें सर्व राजांचा पराभव करून सर्व पृथ्वीचें राज्य करितो. "जो राजा सर्व पृथ्वी आपल्या पराक्रमानें जिंकून वश करितो, त्यास सार्वभौमराजा ह्मणतात." जरासंधाचा सेनापति शिशुपाल आहे. करूष देशाधिपति वक्र, हंस, डिंभक, वक्रदंत, करूष, करभ, मेघवाहन हे राजे जरासंधाची सेवा करितात. भगदत्तनामा वृद्ध राजा जो तुझ्या पित्याचा परम सखा तो पश्चिम व दक्षिण यांच्या मध्यभागीं पृथ्वीचा राजा आहे. हा जरासंधास नम्र असून स्नेहास्तव तुझे व माझे ठायीं पित्या सारखी भक्ति ठेवितो. व तुझा मातुल, पुरुजित्, कुंतीचे प्रीतीस्तव स्नेहें करून तुला अनुकूल आहे. पूर्वी माझा वेष धरून माझ्या नामानें प्रसिद्ध झाला जो पौंड्रक वासुदेव तो व माझा श्वशुर भीमक राजा हे जरासंधाच्या आश्रयानेंच आहेत. भोजकुला पासून झालेलीं अष्टादश कुलें जरासंधाचे भीतीनें पश्चिम दिशेचा आश्रय करून राहतात. शूरसेन, भद्रकार, बोध, शाल्व, पटच्चर, सुस्थल, सुकुट्ट व कुलिंद हे कुंतिदेशोद्भव राजे व दक्षिण पांचाल व पूर्व कोशल, मत्स्य, शाल्वयन, आपले भ्राते व अनुयायिक यांसह जरासंधाच्या भयानें दुःखित होऊन आपला देश सोडून दक्षिण दिशेस राहतात. तसेंच सर्व पांचाल आपलीं राज्यें टाकून चोहींकडे पळाले. कोणे एके काळीं कंसानें यादवांस ग्रस्त केले तेव्हां जरासंधानें आपल्या दोन कन्या अस्ति व प्राप्ति त्या कंसास दिल्या. त्या मुळें कंस बलिष्ठ होऊन स्वज्ञातीशीं द्वेष करून आपण श्रेष्ठ असें मानूं लागला. त्या काळीं त्या दुष्टाच्या पीडेनें भोजकुलांतील वृद्ध वृद्ध राजे दुःखित होऊन प्राणसंकटास्तव मला शरण आले तेव्हां आहुकाची कन्या, सुतनु,

अक्रूरास देऊन संकर्षणास साह्य करून मी ज्ञातीचें कार्य केलें. पुढें मी व बलराम यांनीं कंस व त्याचा भाऊ सुनामा या उभयतांचा वध केल्यामुळें ते राजे निर्भय झाले; परंतु जरासंध हा एक बलिष्ठ शत्रु आहे याच्या नाशा विषयीं मंत्री, पुरोहित व अष्टादश कुलें यांसहवर्तमान जरासंधाशीं तीनशें वर्षें आपण युद्ध केलें तरी यास मारण्याचें सामर्थ्य आपणास नाहीं; कारण अमरासारखे महाबलवान् हंस आणि डिंभक असे याचे दोन प्रधान आहेत त्यांस शस्त्रानें मरण नाहीं ते यास साह्य असल्या मुळें त्याणीं तीन लोक व्याप केले आहेत. हें केवळ मीच ह्मणतों असें नाहीं. सर्वही राजे असेंच ह्मणतात. पुढें कांहीं कालानें जरासंधाच्या अठरावे संग्रामीं बलरामासमागमें हंसाचें युद्ध होतां होतां हंस मूर्च्छित पडला. तें कोणी एकानें डिंभकास जाऊन सांगितलें कीं, तुझा भाऊ हंस युद्धामध्यें मरण पावला. हें वर्तमान डिंभकानें श्रवण करितांच त्याच्याशिवाय आपण राहण्यास इच्छित नाहीं असें मनांत आणून यमुनेंत उडी टाकून मरण पावला. नंतर हंस सावध होतांच त्याणें आपल्या भ्रात्याचें वर्तमान श्रवण करून बंधूकरितां यमुनेंत उडी टाकून तोही मरण पावला. हें वर्तमान जरासंधानें श्रवण करून दुःखानें तो आपल्या नगरास गेला.

नंतर आह्मीं आनंदानें मथुरेंत राहूं असें मनांत आणिलें तेव्हां कंसाच्या स्त्रिया आपल्या पित्याकडे (जरासंधाकडे) जाऊन दुःखानें पित्यास सांगूं लागल्या कीं, आमचे पतीस ज्याणें मारलें त्याचा तूं वध कर. असें त्यांचे भाषण ऐकून तो आह्मां समागमें युद्ध करण्यास आला. तेव्हां कांहीं काल पर्यंत युद्ध करून आह्मीं ज्ञाती व पुत्र यांसहवर्तमान पळून द्वारकेंत आलों. तेथें मोठमोठे प्रासाद व दुर्ग बांधिले, त्यांत देवांचाही प्रवेश होण्याजोगा नव्हता, यामुळें निर्भयपणानें बहुत दिवस तेथें राहून कांहीं कारणानें गोमंतक पर्वतावर तीन योजनें लांब व एक योजन उंच व एक योजन रुंद असें गृह बांधिलें. त्यास तीन परिघ करून शंभर द्वारें केलीं होतीं. आणि अठरा क्षत्रिय रक्षणार्थ असून अठरा सहस्र आमच्या बंधूंचीं कुलें व आहुकाचे शंभर पुत्र, भ्रात्यासह चारुदेष्ण, चक्रदेव, सात्यकी, मी, बलराम.

सांब, प्रद्युम्न, कृतवर्मा, अनाधृष्टि, समीक, समितिंजय, कंक, शंकु, कुंति, अंधक भोजाचे दोन पुत्र, वृद्धराजा हे सर्व मिळून दहा कुळें मिळून आह्मी सर्व योद्धे वज्रासारखे शरीरी, महावीर व महारथी असतां गोमंतपर्वत मध्यदेशाच आहे असें मानून राहिलों. हे धर्मराजा आह्मीं असे जरी आहों तथापि आह्मांस. जरासंधाचें भय आहे. तूं तर साम्राट् पदवीच्या इच्छेनें राजसूय यज्ञाची इच्छा करितोस; परंतु महाबलाढ्य जरासंध जिवंत आहे तों पर्यंत हा तुझा याग सिद्धीस जाणें कठिण आहे. त्यानें पूर्वीं क्षत्रियांचा पराभव व्हावा म्हणून महादेवाची आराधना केली होती या मुळें सर्व राजांस जिंकून त्यांस बद्ध करून मृता सारखे आपल्या नगरांत आणून ठेविले आहेत. हे धर्मराजा, तुला जर राजसूय यज्ञ करणें असेल तर जरासंधाचे बंदिशाळेंतून सर्व राजे सोडविण्या विषयीं व जरासंधाचा वध करण्या विषयीं उद्योग कर. असें जर न करशील तर तुझा समारंभ तडीस जाईल असें मला वाटत नाहीं. तुझ्या मनांत कसें येतें तें मला निश्चयें करून सांग. या अध्यायांत असा विष० आहे.

१५ अध्याय पंधरावा:- धर्मराज बोलतात हे कृष्णा, तुमचें भाषण श्रवण करून मला फार आनंद झाला. माझे संशयाची निवृत्ति तुह्मां वांचून दुसरा कोणी करणार नाहीं. असें असून हे कृष्णा साम्राज्यपद मिळणें फार कठिण आहे, हें सर्व तुह्मांस ठाऊक असून राजसूययज्ञ सुलभ आहे. अशी आपण प्रशंसा करितां परंतु तो सिद्धीस जाण्यास फार कष्ट आहेत. ही बहुत रत्नानीं युक्त महा विस्तीर्ण पृथ्वी जो तरून जाईल तोच हिचा अनुभव घेईल. तस्मात् हे कृष्णा, आतां आपण स्वस्थ बसावें हीच माझी इच्छा आहे. आह्मीं तर जरासंधाच्या भयानें व त्याचा दुष्टस्वभाव श्रवण करून तटस्थ झालों. हे कृष्णा, आह्मीं तुझ्या बाहुबलाच्या आश्रयानें बली असून स्वतः निर्बल आहों. तूं तर जरासंधाच्या भयानें अत्यंत शंका पावतोस. तूं, बलराम, भीमसेन व अर्जुन या चवघां वांचून जरासंधाचा वध करण्यास दुसरा कोणी समर्थ नाहीं असें मला वाटतें. हे केशवा, तूं मला जसें सांगशील तसें मी करीन. असें धर्माचें भाषण श्रवण करून भीमसेन-बोलतो. जो राजा कांहीं एक कार्याचा आरंभ करून विचार करीत बसतो

तां वारुळा सारखा गळून नष्ट होतो. आपण स्वतः दुर्बल असून प्रयोगानें, नीतीनें अथवा उद्योगानें जो पुरुष निरालस्य होऊन शत्रूवर जातो तो जय पावतो. तशीच कृष्णाचे ठायीं नीति, माझे ठिकाणीं बल व अर्जुनाचे ठायीं जय असल्यामुळें तीन अग्नींनी जशी इष्टि होते तसे आह्मी तिघे जरासंधास साध्य करूं. असें भीमाचें भाषण श्रवण करून श्रीकृष्ण भीमास क्रोध येण्यासारखें धर्मराजा समागमें भाषण करितात. जसा एकादा बालक स्वार्थाची इच्छा करून कार्याचा परिणाम न जाणतां कार्यास आरंभ करितो परंतु तें त्याच्यानें जसें सिद्धीस जात नाहीं तसें हें भीमाचें भाषण होय. मांधाता राजा बाह्य व अंतरिक्ष शत्रु जिंकून साम्राज्यपद पावला. तसाच भगीरथ राजा; कार्तवीर्य राजा, भरत राजा व मरुतराजा हे सर्व तप व बल, प्रजापालन इत्यादिकें करून साम्राज्य पदवीस पावले हें तूं श्रवण केलेंच आहेस. जरासंध शतशः राजे जिंकून तो साम्राज्यपद पावला आहे. व सर्व राजे जरासंधास रत्नें देतात व त्यास वश आहेत. तूं तर दुर्बल असतां जरासंधाचा पराभव करण्याची इच्छा करितोस. जरासंधानें जसे रुद्रयागामध्यें पशु मोक्षित करतात तसे शतशः राजे त्याणें आपल्या कारागृहांत बांधून ठेविले आहेत. व त्यांची आतां जीवित आशा राहिली नाहीं. क्षत्रियांस शस्त्रानें मरण आलें तर ते सत्कार मानितात. याजकरितां हे धर्मराजा जरासंधास संग्रामामध्यें आपल्या स्वाधीन करण्यास आह्मीं उद्युक्त होतों. ज्या राजांस त्याणें प्रतिबंधांत ठेविलें आहे त्यास शायशीं वर्षें जाहालीं आहेत. बाकी चवदा वर्षें पूर्ण झालीं ह्मणजे त्या राजांचा बळी पशुपतीस देणार आहे. यास्तव जरासंधाचा जो बध करील त्याची मोठी कीर्ति होऊन तो साम्राज्य पदवी पावेल. असा विषय या अध्यायांत आहे.

१६. अध्याय सोळावा:- युधिष्ठिर भाषण करतो हे कृष्णा, साम्राज्यपदवीचे इच्छेनें मी तुह्मांस जरासंधाकडे पाठविलें असतां हें माझें मोठें साहस कर्म होईल. भीम व अर्जुन हे माझे नेत्र व जनार्दना तूं माझें मन आहेस. तस्मात् चक्षु व मन यां खेरीज मनुष्य जीवंत कसा राहील. महाबलाढ्य जो जरासंध यास जिंकण्यास यमही समर्थ नाहीं. तेथें तुह्मी जाऊन काय करणार आहां!

आपण अर्थी विषयीं केलेल्या उद्योगांत अनर्थ होईल तर आपण तो उद्योग करूं नये, यास्तव सन्यास ग्रहण करावा असा माझा विचार आहे. राजसूययाग मोठा दुर्घट आहे यास्तव माझें मन तिकडे जात नाहीं. असें धर्माचें भाषण श्रवण करून उत्तमधनुष्य, अक्षय्य भाते, दिव्यरथ, शस्त्र, बाण, उत्साह, वसेना या गोष्टींनीं परिपूर्ण व ज्यास वासुदेव अनुकूळ असा जो अर्जुन तो धर्मराजास भाषण करितो हे राजा, तुह्मीं यागाचा निश्चय करावा; कारण मला सर्व गोष्टी अनुकूल असून मी पराक्रमी आहें. इत्यादि नानाप्रकारें आपली स्तुति करून सन्यासग्रहण करण्या विषयीं धर्मास निषेध केला. आणि शत्रूशीं युद्ध करण्यास आह्मीं शक्तिमान आहों असें सांगितलें. असा विषय या अध्यायीं आहे.

१७. अध्याय सत्रावा:- श्रीकृष्ण भाषण करितात हे धर्मराजा, भरत वंशा मध्यें कुंतीपासून उत्पन्न झाल्यामुळें जी बुद्धि असावी तीच अर्जुनाची आहे. मृत्यु केव्हां येईल व आपण युद्ध न केलें तर अमर राहूं हें आपणास कळत नाहीं. कांहीं एक कार्याचा उपक्रम केला असतां तें दैवानें सिद्धीस जावें असा विचार पुरुषानें संतोषा करितां हृदयांत करावा. अनीति व अनुपाय हे दोन्ही क्षयास कारण होतात. नीति व उद्योग यांचें साम्य झालें असतां शत्रूंचा सहज पराजय होतो. आह्मीं तर नीतिमान् असल्यामुळें शत्रूंचीं मर्में जाणून त्यांचा नाश करूं आणि आपलीं मर्में आच्छादित करूं यांत संशय नाहीं. जरासंधा जवळ युद्ध किंवा व्यूह रचना करून आपणास जय मिळणार नाहीं; यास्तव अन्य उपायानें त्याच्या पराभवाचा विचार करूं. या जरासंधाचा जो पराभव करील तो या लोकीं सुख भोगून स्वर्गलोकीं वास करील. असें कृष्णाचें भाषण श्रवण करून धर्मराज भाषण करितो, हे कृष्णा, हा जरासंध कोण? व याचा तुह्मां पुढें पराक्रम तो काय? जसा पतंग अग्नीमध्यें पडून मरण पावतो तसा हा तुमचे स्पर्शानें मेला नाहीं हें आश्चर्य वाटतें. याजकरितां याची उत्पत्ति विस्तारें करून मला सांगा? असें धर्माचें भाषण ऐकून श्रीकृष्ण बोलतात हे धर्मराजा जरासंधानें आमचा फार वेळ अन्याय केला परंतु आह्मीं त्याची उपेक्षाच केली. आतां त्याचें शौर्य व पराक्रम सां-

गतों. श्रवण कर. मगध देशाचा राजा बृहद्रथ महाबलवान्,रूपवान्,अतुल पराक्रमी व सर्व गुणानीं संपन्न असून त्याणें आपल्या पराक्रमानें सर्व पृथ्वी व्याप्त केली होती. त्याणें काशिराजाच्या जुळ्या व रूपानें फार सुंदर, अशा ज्या दोन कन्या होत्या त्यांच्या समागमें विवाह केला. पुढें कांहीं कालपर्यंत या स्त्रियां समागमें विषयानें निमग्न होऊन त्याणें त्यांचे सर्व तारुण्याचा उपभोग घेतला; परंतु त्या स्त्रियांचे ठिकाणीं वंशवृद्धि झाली नाहीं. यामुळे त्याणें मंगलकारक होम व पुत्रकामेष्टी याग इत्यादि केले, परंतु पुत्र झाला नाहीं. नंतर कोणे एके कालीं चंडकौशिकनामें मुनि तप करून श्रम पावलेला व यदृच्छेनें तरुमूलाश्रित बसला आहे असें श्रवण करून राजानें उभयतां भार्या सहवर्तमान तेथें जाऊन ऋषीस, योग्यद्रव्यानीं त्याचा संतोष केला, तेव्हां तो समाधान पावून ह्मणाला हे राजा, तूं वर माग, असें मुनीचें वाक्य श्रवण करून भार्यासहवर्तमान नम्र होऊन पुत्राविषयीं राजानें प्रार्थना केली. ती मुनीनें श्रवण करून कांहीं कालपर्यंत ध्यानस्थ बसला तों इतक्यांत वरील आम्रवृक्षा वरून मुनीचे मांडीवर एक रसपूर्ण फल पडलें, तें हातांत घेऊन अवलोकन करून हृदयाजवळ नेऊन अभिमंत्रण करून मुनि,राजास भाषण करिता, हे राजा, हें अप्रतिम फल असून पुत्रप्राप्तिकारक आहे, हें मी तुला देतों तूं ग्रहण कर आणि आपल्या गृहीं जा. आज तूं कृतार्थ आहेस, असें मुनीचें वाक्य श्रवण करून त्यास नमस्कार केला, आणि त्याणें दिलेलें फल घेऊन राजा आपल्या गृहीं आला. त्या फलाचे दोन भाग करून त्याणें ते दोन्हीं स्त्रियांस दिले. तेव्हां दोघीनींही आप आपला भाग भक्षण केला. त्या योगानें दोघींसही गर्भ राहिला. तेणें करून राजास परम आनंद झाला. नंतर प्रसूतिकाल आला तेव्हां दोघींसही दोन शकलें झालीं. त्या प्रत्येकास एक एक डोळा व एक एक भिवई अशा अनुक्रमें होतीं. तीं शकलें पाहून त्यांस कंप सुटला व त्या घाबरल्या, आणि तीं सजीव शकलें धात्रीचे हातून त्यानीं पूर्वद्वाराचे बाहेर टाकून दिलीं. तों तेथें रक्तमांस भक्षण करणारी जरानामक राक्षसी दैवयोगानें त्या शकलांजवळ आली. तिणें तीं शकलें पाहून एकत्र

केली. तों तत्काल त्या पासून एक लहान पुत्राची मूर्ति उत्पन्न झाली. त्यास राक्षसीनें अवलोकन करून तिला फार आनंद झाला. त्या पुत्रानें आपल्या मुखांत मुष्टि घालून मेघा सारखी मोठ्यानें गर्जना केली त्यामुळें सर्व नगरांतील लोक, राजा व पुत्रा विषयीं निराश झालेल्या दोघी राजस्त्रिया घाबरून बाहेर आल्या तेव्हां ती राक्षसी त्या स्त्रियांस व राजास व बालकास पाहून मनांत म्हणत्ये कीं, या परम धार्मिक राजाचा हा पुत्र, तशांत मी याचे राष्ट्रांत राहत्यें त्या पेक्षां या बालकास मारणें योग्य नाहीं आणि राजा पुत्रेच्छु आहे त्या पेक्षां हा पुत्र राजासच अर्पण करावा असें मनांत आणून तो पुत्र हातांत घेऊन मनुष्यरूप धरून ती राजास म्हणत्ये हे राजा, हा पुत्र मी तुला दिला, हा तूं घे: ब्राह्मणाचे प्रसादानें तुझ्या दोघी स्त्रियां पासून झालेला हा पुत्र धात्रीनामक दासीनें बाहेर टाकिला होता त्याचें मी संरक्षण केलें. यास घेऊन तूं माघारा जा. नंतर त्या स्त्रियांनी बालकास पाहतांच त्यांचे स्तनास पान्हा फुटला, या मुळें त्या पुत्रावर दुधाचा अभिषेक झाला. हें सर्व कृत्य राजानें पाहून हर्षानें हेमगर्भतुल्य राक्षसीस भाषण करितो, हे कमलगर्भा भे,(कमलाच्या गाभ्या सारखी कांतिजीची ) तूं कोण ? कोणाची व मला हा पुत्र देण्या करितां कोठून आलीस ? हें वास्तविक मला सांग ? तूं तर केवळ मला देवते सारखीच भासत्येस. असा विषय या अध्यायांत आहे.

१८. अध्याय अठरावा:- नंतर राक्षसि बोलत्ये हे राजा, मी कामरूपिणी जरानामक राक्षसि आहें. माझें पूजन तुझे गृहीं होतें या मुळें मी निरंतर तुझे गृहीं वास करित्यें. सर्व मनुष्यांचे गृहीं माझा वास असून मला गृहदेवी असें लोक म्हणतात. पूर्वी ब्रह्मदेवानें मला उत्पन्न करून सर्व दानवांचा नाश करण्या करितां दिव्यरूपानें माझें स्थापन केलें आहे यास्तव माझें भिंतीवर चित्र काढून भक्ष्य, भोज्य, पूजनादिक जे माझें करितात त्यांचें मी कल्याण करित्यें. जे माझें पूजन करणार नाहींत त्यांचा मी नाश करीन. हे राजा, तुझ्या गृहीं माझी पूजा चांगली होत्ये त्याचे प्रत्युपकारार्थ मी विचार करीत होत्यें तों अकस्मात् तुझे मुलाची दोन शकलें पाहून सहज एकत्र जोडिलीं असतां हा दिव्य कुमार झाला. हें सर्व तुझें प्रारब्ध असून मीनि

भित्तमात्र आहे. मेरुपर्वतास भक्षण करण्याचें माझें सामर्थ्य असतां या बालाचा मजपुढें पराक्रम काय? परंतु तुझ्या गृहीं माझें पूजन होत असल्यामुळें मी संतुष्ट होऊन त्या बालकास तुला दिलें आहे असें बोलून ती तेथेंच गुप्त झाली, आणि राजा त्या कुमारास घेऊन गृहीं आला.

नंतर पुत्राचे यथाशास्त्र संस्कार करून देशामध्यें राक्षसीचा महोत्साह करण्या विषयीं आज्ञा दिली. आणि जरानामक राक्षसीनें येऊन त्या बालकास संधित केलें ह्मणून त्याचें नाम जरासंध ठेविलें आणि तो महाबलसंपन्न पुत्र मातापितरांस आनंदकारक झाला. असा विषय यांत आहे.

१९. अध्याय एकुणिसावा.- कृष्ण ह्मणतात, हे धर्मराजा, कोणे एके कालीं चंडकौशिक मुनी मागध देशांत आला, असें श्रवण करून परमानंदानें बृहद्रथराजा, अमात्य, पुरोहित, भार्या व पुत्र यांसहवर्तमान ऋषीस सामोरा जाऊन अर्घ्यपाद्यादिकें करून त्याचें पूजन केलें आणि भाषण करितो कीं, हे मुने, हा पुत्र व हें राज्य आपलें आहे. असें राजाचें वाक्य श्रवण करून संतोषानें मुनि ह्मणतो हें सर्व झालेलें कृत्य मी ज्ञानचक्षूनीं जाणिलें, आतां तुझा पुत्र पुढें कसा होईल तें सांगतों, श्रवण कर. रूप, सत्व, बल, तेज आणि लक्ष्मी इत्यादिकानीं परम श्रेष्ठ होईल, आणि हा आपल्या पराक्रमानें सर्व वस्तु आपल्यास प्राप्त करून घेईल, याच्या समान कोणताही राजा बलाढ्य नाहीं. वेगानें गरुडा सारखा असून देवांच्या शस्त्रानीं यास पीडा होणार नाहीं. हा सर्व पृथ्वीचा अधिपति होऊन सर्व राजांचें तेज हरण करील व त्यास सर्व राजे शरण येऊन द्रव्य देतील. हा चारी वर्णांचा रक्षणकर्ता होईल व सर्व राजे वश झाल्यावर सर्वांस आज्ञा करणारा होईल. त्रिपुरांतक जो शंकर याचें यास साक्षात् दर्शन होईल. या प्रकारें मुनीनें राजास सांगून आपल्या नगरांत जाण्या विषयीं त्यास आज्ञा दिली. तेव्हां राजानें अमात्यां सहवर्तमान नगरांत येऊन पुत्रास राज्याभिषेक केला. नंतर बृहद्रथ राजा दोन्ही स्त्रिया समागमें घेऊन तपोवनांत गेला. पुढें जरासंधानें आपल्या शौर्यें करून सर्व राजांस अनुकूल केलें. तिकडे बृहद्रथ राजा कांहीं कालपर्यंत तपोवनांत राहून तीव्र तप करून स्त्रियांसह स्वर्गास

गेला. इकडे चंडकौशिक मुनीच्या वरानें जरासंध राज्याचें पालन करूं लाग ला. श्रीकृष्णानीं कंसास मारिल्या पासून जरासंधाचें व त्यानें वैर पडलें. ज रासंधानें गदा फेंकली ती गदा मथुरे जवळच एका स्थळीं पडली. तेव्हां प सून त्या स्थानास गदावसान असें ह्मणतात. या जरासंधापाशीं, नीतिशा स्त्रांत कुशल, अशस्त्रमरणी, महाबली, विचारवान् असे हंस व डिंभक न में दोन प्रधान होते ह्मणून पूर्वी तुला सांगितलेंच आहे. हे त्रिवर्ग तीन लो कांत व्याप्त असल्यामुळें बलिष्ठासीं दुर्बलानें स्पर्धा करूं नये ह्मणून कुकुर अंधक व वृष्णि याणीं जरासंधाचा त्याग केला. असा विषय या अध्या० आ०

२०. अध्याय विसावा:- श्रीकृष्ण भाषण करितात हे धर्मराजा, हंस आणि डिंभक हे मरण पावले. कंसास तर आह्मींच मारिलें. आतां जरा संधाच्या मरणाचा काळ जवळ आला आहे. तो रणांगणीं सुरानीं व अ सुरानीं जिंकण्यास समर्थ नाहीं यास्तव त्याशीं द्वंद्वयुद्ध करून त्यांत त्या चा पराभव करावा, हें मला बरें वाटतें. माझे ठायीं नीति आहे, भीमाचे ठायीं बल आहे आणि आह्मां उभयतांचा संरक्षिता अर्जुन आहे. आह्मी त्रिवर्ग मिळून त्या मागधाचा पराभव करूं. अभिमान, गर्व व लोभ यांत तो निमग्न आहे. याजकरितां तो बहुत करून भीमाशींच युद्धास येईल; आणि भीमसेन महाबलाढ्य आहे याजमुळें त्याचा तो एकटाच नाश क रील. हे धर्मराजा जर तुझा माझ्यावर विश्वास असेल तर भीमार्जुन माझे स्वाधीन कर. असें कृष्णाचें वाक्य श्रवण करून युधिष्ठिर कृष्णास भाषण करितो. हे अच्युता, हे शत्रुनाशका, तूं असें भाषण कां करितोस? कारण तूं आमचा नाथ असून आह्मीं तुझे आश्रित आहोंत. आणि तूं जसें बोलतोस तसेंच घडून येतें. ज्यास लक्ष्मी पराङ्मुख झाली त्याच्या सन्मुख तूं कधीं ही जात नाहींस. हे कृष्णा, आह्मीं तुझे आज्ञेंत राहिलों असतां आज जरा संध मेला, सर्व राजे कारागृहापासून मुक्त झाले. आणि मला राजसूय य ज्ञ प्राप्त झाला असेंच मी मानितों. हे कृष्णा, जेणें करून हें कार्य शीघ्र होईल तें तूं कर. मीं तुह्मां तिघां वांचून जीवंत राहणार नाहीं. असें ह्म णून त्याणें त्या त्रिवर्गांचे बला विषयीं नानाप्रकारें स्तुति केली. आणि

कार्यसिद्धी विषयीं भाषण केलें. नंतर त्या त्रिवर्गानीं अजिन, दंड, कमंडलु व काषायवस्त्रें इत्यादि धारण करून ब्राह्मणाच्या वेषानें मागध देशास जाण्यास प्रस्थान केलें. आपल्या ज्ञातीचें कार्य व दुष्टांचा नाश करण्याच्या हेतूनें धर्माची आज्ञा घेऊन ते तिघे कुरू पासून निघाले ते कुरुजांगल देशाच्या मध्यमार्गानें जातां जातां कमलांनीं प्रफुल्लित झालेलें एक सरोवर पाहून तेथें विराम पावले. नंतर कालकूट पर्वत, गंडकी नदी, महाशोण नद, सदां निरा, गिरींद्रपर्वतवाहिनी नद्या, शरयू, पूर्वकोशलदेश, मिथिला नगरी, चर्मण्वती, गंगा, शोणनद, इत्यादिकांचें अतिक्रमण करून, अधोमुख होऊन चीर वल्कलें धारण करून ते त्रिवर्गमागध देशाच्या समीप प्राप्त झाले. नंतर गोरथनामाच्या पर्वतावर चढून जरासंधाचें शोभायमान नगर ते अवलोकन करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

२१. अध्याय एकविसावा:- श्रीकृष्ण भाषण करितात हे पांडव हो, हा मागध देश फार सुशोभित दिसत असून याची रचना फार सुंदर आहे. या देशांत पशु फार आहेत व जलानें हा देश समृद्ध आहे. या देशांत रोग नसून गृहें फार सुशोभित दिसतात. वैहार, वराह, वृषभ, ऋषिगिरि आणि चैत्यक हे पांच पर्वत या देशास मर्यादभूत असून ते एकमेकांस लागलेले आहेत. जरासंधाच्या राहण्याच्या नगराचें नाव गिरिव्रज आहे. इत्यादि नानाप्रकारें त्या देशाचें वर्णन करून श्रीकृष्ण ह्मणतात. पूर्वी औशिनरीनामक शूद्रि होती तिचे ठिकाणीं गोतमा पासून काक्षिवादिक पुत्र उत्पन्न झाले, त्या पासून मागध वंशाचा विस्तार झाला. गोतमाचा मागधांवर अनुग्रह होता ह्मणून ते ऐश्वर्यवान् होऊन त्यांची प्रतिष्ठा झाली. अंग व वंग हे महाबलिष्ठ राजे गोतमाच्या या गृहींच राहात होते तें हें गोतमाचें गृह अवलोकन करा. नंतर त्या गृहाच्या आसमंतात् भागाचें वर्णन करून मागध वंशावर इंद्र व कुबेर यांचाही अनुग्रह आहे, असें सांगून ह्मणतो, हें नगर शत्रूनीं ग्रहण करण्यास असमर्थ असून तें जरासंधास जेव्हां प्राप्त झालें त्या कालीं सर्व अर्थसिद्धी आपल्यास प्राप्त झाली असें जाणून त्यांस फार आभि-

मान झाला, त्या जरासंधाचा आज आपण गर्व परिहार करूं. असें वासुदेवानें भाषण केल्यावर ते त्रिवर्ग मागधपुरांत प्रवेश करण्यास निघाले. तेंनगर सर्वप्रकारें परिपूर्ण पाहून त्याच्या द्वारासन्निध जाऊन उभे राहिले. त्या द्वारास लागून एक उंच गिरीसारखा बुरूज होता त्याजवर चढून त्या बुरूजावर एक मनोरा होता त्यांत त्याणीं प्रवेश केला. तेथें ऋषभनामक दैत्यास बृहद्रथ राजानें मारून त्याचे चर्माच्या मोठमोठ्या तीन दुंदुभि करून ठेविल्या होत्या. त्यांचा ध्वनि एक मासपर्यंत राहात असे. त्या दुंदुभि या त्रिवर्गानीं भग्न करून टाकिल्या. हें वर्तमान द्वाररक्षकांस समजतांच आयुधें घेऊन त्यांच्या सन्मुख आले. तेव्हां हे जरासंधास मारण्या करितां आले आहेत असें त्यांस भासलें. तेव्हां त्यानीं आपल्या बाहुबलानें त्या मनोऱ्याचा भंग करून मागधपुरांत प्रवेश केला. तेव्हां इकडे जरासंधास ब्राह्मणानीं दुर्निमित्यें सुचविलीं. आणि त्यास हत्तीवर बसवून त्याच्या सभोंवतें पेरलेलें कोलित फिरविलें नंतर जरासंध, शांत्यर्थ दीक्षा घेऊन नियमानें उपोषणें करीत बसला. इकडे या त्रिवर्गानीं स्नातक (ब्रह्मचारी) वेष धारण करून जरासंधाशीं युद्धाच्या इच्छेनें त्या पुरींत प्रवेश करून नानाप्रकारचीं पुष्पें व पदार्थ यानीं बाजार भरले आहेत त्या मार्गानें अवलोकन करीत चालले; तों एका माळ्याचे घरीं उत्तम पुष्पें पाहिलीं, तीं त्याणीं बलात्कारानें हरण करून व अंगावरील चित्रविचित्र वस्त्रें व पुष्पांच्या माला परिधान करून, गोष्ठा अवलोकन करीत सिंह जसे जातात तसे ते अवलोकन करीत त्या मार्गानें राजवाड्याकडे चालले. चंदन लेपन केलेले व स्तंभा सारखे बाहूनीं सुशोभित अशा त्या त्रिवर्गास अवलोकन करून नगरवासि जन विस्मय पावले. नंतर ते त्रिवर्ग राजमंदिराचीं तीन द्वारें सहज उल्लंघन करून राजाच्या सन्मुख उभे राहिले. तेव्हां राजानें हे पूजनास योग्य आहेत असें जाणून त्यांचा यथाविधि पूजनादि सत्कार केला; परंतु तो त्याणीं ग्रहण केला नाहीं. हें जरासंधानें अवलोकन करून त्यांचें आगत स्वागत केलें परंतु ते कांहींच बोलले नाहींत. त्यांतून कृष्ण मात्र बोलले कीं, हे जरासंधा, या उभयतांस मौनव्रत आहे, यास्तव हे भाषण करीत नाहींत. मध्यरात्री नंतर हे तुजपाशीं भाषण करितील असें

भाषण श्रवण करून जरासंधानें त्या त्रिवर्गास आपल्या यज्ञशालेंत नेऊन ठेविलें, आणि आपण स्वस्थानीं गेला. अर्धरात्रीचे समयीं यज्ञशालेंत येऊन ब्राह्मणांस ह्मणतो. जे ब्राह्मण माझ्या गृहीं येतात त्यांचा मीं सत्कार करितों, हें सर्वांस विदित आहे. असें भाषण केल्यावर त्यांचा अपूर्व वेष दृष्टीस पडला. तेव्हां तो विस्मय पावला. नंतर त्या त्रिवर्गानीं राजास आशीर्वाद देऊन ते एकमेकांकडे पाहूं लागले. नंतर हे ब्राह्मण छद्मी आहेत असें समजून तुह्मी माझ्या नगरांत आडमार्गानें आलां इत्यादि त्यांस बोलला. तेव्हां श्रीकृष्णभाषण करितात, हे जरासंधा, आह्मीं ब्रह्मचारी ब्राह्मण आहोंत असें जाण. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे, हें व्रत धारण करितात. त्यांत कोणी विशेष नेम धरितात, व कोणी थोडा नियम धरितात. आमचें बाहुबल जर तुला पहावयाचें असेल तर आज तुझ्या दृष्टीस पडेल. आपल्या रिपूच्या गृहीं जाणें झाल्यास-आडमार्गानें जावें व आपल्या स्नेहाच्या घरीं जाणें झालें तर द्वारानेंच जावें, असें पंडितानीं कथन केलें आहे. आह्मीं कार्येच्छु आहों ह्मणून तुझी शत्रूची पूजा ग्रहण केली नाहीं हें आमचें निरंतरचें व्रत होय. असा विषय या अध्यायांत आहे.

२२. अध्याय बाविसावा:— जरासंध भाषण करितो, हे विप्रहो, तुमच्याशीं मी वैर व तुमचा अपराध कधीं केला? व मी तुमचा शत्रु कसा झालों? या विषयीं मी विचार करितों, परंतु मला स्मरत नाहीं, यास्तव मी अपराधी नाहीं असें समजा. कोणी अनपराधी असतां त्याजवर जो अपराधाचा आरोप घेतो तो पापगतीस जाऊन त्याचें अकल्याण होतें. क्षात्रिय धर्मानुसार मी वागत असतां प्रमादें करून तूं अपराधी आहेस, अशी कल्पना केलीत याचें कारण काय? हें वाक्य श्रवण करून श्रीकृष्ण बोलतात हे जरासंधा, आपल्या कुलाचें कार्य कर्त्ता असा कुलामध्यें एकादाच पुरुष उत्पन्न होतो; अरे, उत्तम कुलांत उत्पन्न झालेले क्षत्रिय राजे यांस तूं कारागृहांत टाकून रुद्रयागांत त्यांस पशूंसारखे मानून त्यांचा वध करणार, तेव्हां तूं महा अपराधी आहेस. तूं ज्ञातिक्षय करण्याचें आरंभिलेंस. आह्मीं तर आर्तांचें संरक्षण करिते आहोंत. ज्ञातीची वृद्धि व्हावी ह्मणून तुझा वध करण्या

साठीं आह्मीं येथें आलों आहों. तुझ्या सारख्या ज्ञातिक्षय करणाऱ्या पुरुषाचा रणामध्यें कोणी वध केला तर तो स्वर्गास जाईल, यांत संदेह नाहीं. आह्मीं तर रणयज्ञाचे कार्यी दीक्षित होऊन आलों आहों असें समज. जो रणांत मरण पावतो तो इंद्राचे पदवीस जातो. इत्यादि प्रकार सांगून श्रीकृष्ण परमात्मा बोलतो, हे जरासंधा, तुजपाशीं सैन्य बहुत आहे ह्मणून तुला गर्व झाला आहे, परंतु तुला बाहुबल नाहीं याजकरितां गर्वाचा त्याग कर; आणि कारागृहांत ठेवलेल्या राजांची मुक्तता कर. मनुष्यांमध्यें तुजपेक्षां जास्त शौर्य आहे किंवा नाहीं? हें तुला समजे पर्यंत तुझा गर्व जाणार नाहीं. यास्तव हे मागधा, तूं माझें वचन श्रवण करून गर्वाचा त्याग कर. निरर्थक सूत, अमात्य, सैन्य यांसह वर्तमान यमसदनास जाण्याची इच्छा करूं नकोस. दंभोद्भव, कार्तवीर्य, तसाच बृहद्रथ याणीं आपल्या कल्याणाकडे लक्ष दिलें नाहीं ह्मणून ते सैन्यासह वर्तमान नाश पावले. आह्मीं तुज समागमें युद्ध करण्यास आलों आहों, आह्मीं ब्राह्मण नव्हे. हे दोघे पांडव आहेत व या उभयतांचा मी मातुलबंधु आहें, मला कृष्ण ह्मणतात, तुझा मी रिपु आहें. हे जरासंधा तुला युद्धा करितां आव्हान करण्यास मी आलों आहें; यास्तव प्रतिबंधांत ठेवलेले राजांस मुक्त कर, नाहीं तर यमलोकास जाशील. असें भाषण श्रवण करून जरासंध ह्मणतो, हे कृष्णा, मी सर्व राजे जिंकिले आणि देवतांस अर्पण करण्या करितां त्यांस बंधन करून ठेविले आहेत त्यांस मी तुमच्या भयानें मुक्त केलें असतां आज माझा क्षात्रधर्म नष्ट होईल. यास्तव सैन्यें करून अथवा व्यूह रचना करून युद्ध करण्यास अथवा तुह्मां त्रिवर्गा समागमें किंवा प्रत्येकाशीं युद्ध करण्यास मी समर्थ आहें, यास्तव तुह्मीं जसें सांगाल तसें मी करीन. असें कृष्णास भाषण करून त्यानें आपला पुत्र सहदेव यास राज्याभिषेक केला. आणि सर्व लोकांस युद्धाच्या तयारी विषयीं आज्ञा दिली. तेव्हां कृष्णानें मनांत विचार केला कीं, याच्या वधाविषयीं आपण समर्थ नाहीं आणि हा भाग अन्याचा आहे यास्तव याच्याशीं आपण स्वतः युद्ध करूं नये असा निश्चय केला. असा विषय या अध्यायांत आहे.

२३. अध्याय तेविसावा:- नंतर कृष्ण ह्मणतात हे जरासंधा, आह्मां त्रिवर्गांतून कोणासमागमें युद्ध करण्याची तुझी इच्छा आहे? तेव्हां जरासंध ह्मणतो, मी भीमासमागमें युद्ध करीन असें भाषण त्याच्या पुरोहितानें श्रवण करून युद्धांत मूर्च्छना व रोग इत्यादिकांचें निरसन होऊन सुख व्हावें अशा प्रकारचे पदार्थ घेऊन स्वस्त्ययनपूर्वक आशीर्वाद दिला. त्या कालीं जरासंधानें आपल्या क्षात्रधर्माचें स्मरण करून मस्तकांतील किरीट काढिला, आणि केश बांधून एकाएकीं क्रूरतेनें भीमसेनासमागमें भाषण करूं लागला कीं, हे भीमा तूं मोठें भयंकर युद्ध करणारा आहेस असें मी ऐकतों. यास्तव धर्में करून युद्ध करणें हेंच योग्य आहे, असें ह्मणून भीम पुढें उभा राहिला. तेव्हां भीमानें कृष्णाचा आशीर्वाद घेऊन त्याचे मतानें जरासंधापुढें गेला. नंतर उभयतां बाहुयुद्धामध्यें निपुण असून त्यानीं हर्षानें एकमेकांचा हस्त धरून वंदन केलें, आणि आपआपला कटिप्रदेश रज्जूनें चांगला बंधन करून वारंवार बाहूचें आस्फालन केलें. त्या नंतर एकमेकांस आलिंगन केल्या सारखें करून बाहूंचे भयंकर शब्द करणें व एकमेकांचे गळ्यांत हात घालून एकमेकांचे मस्तकानें मस्तकावर वज्रासारखे आघात करणें, एकमेकांचे उरावर मुष्टिप्रहार करणें, गज व मेघ यां सारख्या गर्जना करून एकमेकांची निर्भर्त्सना करणें इत्यादि प्रकारानीं युद्ध करूं लागले. त्यासमयीं नगरवासि स्त्रिया व पुरुष तें युद्ध पाहण्या करितां अतिशय जमले होते त्या महा भयंकर युद्धास कार्तिक शुद्ध प्रतिपदेस आरंभ होऊन त्रयोदशी पर्यंत तें अहोरात्र चाललें. नंतर उभयतांस फार श्रम झाले असें श्रीकृष्णानीं पाहून संबोधन पूर्वक भीमास भाषण केलें तें असें कीं, तुझें युद्ध मोठें भयंकर आहे यास्तव श्रमी झालेल्या शत्रूस अतिशय पीडा देऊं नको; कारण अतिशय पीडेनें तो गतप्राण होईल. या प्रकारें कृष्णाचें सूचक भाषण श्रवण करून श्रमी झालेल्या जरासंधाच्या वधा विषयीं परम त्वरेनें त्याचें आकर्षण करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

२४. अध्याय चोविसावा:- वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, ज-

रासंध आणि भीमसेन यांचें युद्ध होत असतां भीमसेन कृष्णास ह्मणतो, हे यदुनंदना, मी आपल्या बुद्धिबलानें जरासंधाच्या वधा विषयीं बहुत श्रम केले; परंतु या पाप्याच्या बलाचा माझ्यानें निरोध होत नाहीं. असें भीमाचें भाषण श्रवण करून कृष्ण सांगतात हे भीमा, तुझें परमदैवत जो वायु त्याचें तूं स्मरण कर, ह्मणजे तुझे बलाची वृद्धि होईल; आज तूं आपलें बल जरासंधास दाखीव आणि त्याचे वधाची त्वरा कर. असें कृष्णाचें भाषण श्रवण करून जरासंधास जानु धरून उचलिलें आणि शंभर वेळ फिरवून त्याचा पृष्ठभाग भग्न करून मोठ्यानें गर्जना करीत भीमसेनानें त्याचे दोन्ही पाय दोन्ही हातानीं धरिले आणि जरासंधाचीं दोन शकलें केलीं. त्या कालीं जरासंधाच्या भयंकर शब्दानें व भीमसेनाच्या गर्जनेनें मागधपुरवासि सर्व प्राणि भयभीत होऊन त्रास पावले. नंतर श्रीकृष्ण, भीमसेन व अर्जुन यांस जरासंधाच्या रथांत बसवून आपण बंदिशाळेंत गेला आणि सर्व राजांस बंदमुक्त केलें. त्या कालीं सर्व राजानीं भाषण केलें कीं, हे कृष्णा, तूं आह्मांस महादुःखापासून मुक्त केलेंस, त्यापेक्षां आह्मांजवळ जीं रत्नें व संपत्ति आहे त्यांचा स्वामी तूंच आहेस असें ह्मणून नाना प्रकारें करून त्या परमात्म्या श्रीकृष्णाची ते स्तुति करूं लागले. तेव्हां श्रीकृष्ण त्या रथांत सारथ्यस्थानीं बसून त्या मुक्त केलेल्या राजांस समागमें घेऊन निघाला त्या वेळेस तो, पांडव व राजे यांसह वर्तमान बहुत शोभायमान दिसूं लागला. तो रथ तप्त केलेल्या सुवर्णासारखा देदीप्यमान् असून सर्व अलंकारानीं युक्त, चिन्हानीं पूर्ण होता. अशा रथांत बसून ते जेव्हां नगराबाहेर आले तेव्हां त्या सर्व राजानीं पुनः श्रीकृष्णाची स्तुति करून आह्मांस कांहीं कार्याची आज्ञा करावी असें ते बोलले. त्यांचें भाषण श्रवण करून कृष्ण बोलतात, धर्मराजा राजसूय यज्ञ करीत आहे तर त्यास तुह्मीं साह्य करावें असें कृष्णाचें भाषण श्रवण करून त्याणी ती आज्ञा मान्य केली. तों इतक्यांत जरासंधाचा पुत्र सहदेव रत्नें घेऊन पुरोहितांसह वर्तमान वासुदेवास शरण आला. तेव्हां त्यास अभय देऊन त्याणें दिलेलीं रत्नें कृष्णानें ग्रहण केलीं, आणि त्यास पुनः राज्याभिषेक केला. अर्जु-

न व भीमसेन याणीं त्या राजपुत्राचा सत्कार केल्यानंतर तो आपल्या नगरां त गेला. इकडे श्रीकृष्ण उभयतां पांडवां सह इंद्रप्रस्थीं परत आले. आणि धर्मराजाच्या सन्निध येऊन परम संतोषानें बोलूं लागले कीं, हे धर्मा, जरासंध जरी बलवान् होता तरी दैवें करून भीमसेनानें त्यास मारिलें आणि सकल राजे बंधना पासून मुक्त केले. तुझे भ्राते सुखें करून आपल्या नगरास आले हें फार उत्तम झालें. असें कृष्णाचें भाषण श्रवण करून धर्मानें त्याची पूजा केली. आणि भीम अर्जुन व कृष्ण यांस आलिंगन देऊन. बंधूंस जय प्राप्त झाला यास्तव आलेल्या सर्व राजांचा त्याणें सत्कार केला: तेव्हां ते सर्व राजे धर्मराजाची आज्ञा घेऊन आप आपल्या देशास गेले. तसाच श्रीकृष्णही धर्मराजादि पांडव, द्रौपदी, व इतर सर्व यांची आज्ञा घेऊन जरासंधाच्या त्या मनोगामि रथांत आरूढ होऊन द्वारकेस जाण्यास निघाला. तेव्हां सर्व पांडवानीं त्यास प्रदक्षिणा केल्या. नंतर धर्माची आज्ञा घेऊन कृष्ण द्वारकेस गेले. इकडे जय झाल्यामुळें धर्मास मोठा हर्ष झाला. आणि सर्व राजांस त्याणें अभिवचन दिल्यामुळें त्याची कीर्ति फार वाढली. असा विषय या अध्यायांत आहे.

२५. अध्याय पंचविसावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, अर्जुनास गांडिव, भाते, दिव्यरथ, ध्वज, सभा व यश इत्यादि अप्राप्य असतां तीं प्राप्त झालीं, यास्तव आतां कांहीं कोशवृद्धि करावी म्हणून तो धर्मराजास ह्मणतो कीं, कुबेरानें पालन केलेली जी उत्तर दिशा तेथील राजांस जिंकून कांहीं कर घ्यावा या इच्छेनें मी आजच उत्तम नक्षत्रीं गमन करितों. तेव्हां धर्मराजानें गंभीर वाणीनें भाषण केलें कीं, हे अर्जुना, स्वस्तिवाचन व ब्राह्मणाचें पूजन करून दुष्ट हृदयाच्या पुरुषांस दुःख देण्या करितां व सुहृज्जनास हर्ष होण्या करितां गमन कर. हे पार्था, तुझा निश्चयानें जय होऊन तुझे मनोरथ सर्व सिद्ध होतील. असें धर्मराजाचें भाषण-श्रवण करून अर्जुन, अग्नीनें दिलेल्या दिव्यरथांत बसून सेन्यासहवर्तमान दिग्विजया करितां गेला. नंतर धर्मराजाच्या आज्ञेनें भीमसेन, पूर्वदिशेस गेला. सहदेव दक्षिणेस व नकुळ पश्चिमेस गेला; धर्मराज आ-

पल्या सुहृत्गणांसहवर्तमान इंद्रप्रस्थामध्यें राहिले. असा विषय या अध्या यांत आहे.

२६. अध्याय सव्विसावा- जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायन ऋषे, पांडवानीं दिग्विजय कसकसा संपादन केला तो विस्तारें करून मला सांगा. असें भाषण श्रवण करून वैशंपायन सांगतात. हे राजा सर्व पृथ्वी पांडवानीं एकदांच जिंकिली, त्यांत अर्जुनाचा विजय कसा झाला तो सर्व तुला सांगतों श्रवण कर. महाबाहू अर्जुन प्रथम कुलिंददेशांत गेला आणि तेथील राजास त्याणें सहज आपले स्वाधीन करून घेतलें, पुढें अनर्त व कालकूट यांस जिंकिलें, तेथून सैन्यासहवर्तमान सुमंडलस्थानीं जाऊन तें स्थान जिंकिलें आणि तेथील राजास समागमें घेतलें. पुढें तें शाकलद्वीप वश करून प्रतिविंध्यराजास जिंकिलें नंतर शाकलद्वीप वासि व सप्तद्वीपसंबंधि राजे अर्जुनाच्या सैन्या समागमें युद्ध करूं लागले. तेव्हां अर्जुनानें सर्वांचा पराभव करून व त्यांस समागमें घेऊन प्राग्ज्योतिषपुरामध्यें गेला. तेथें राजा भगदत्त, किरात व अन्यसागर समीपवासि योद्धे यांसहवर्तमान अर्जुनानें आठ दिवस युद्ध केलें तेव्हां भगदत्त राजा अर्जुनास श्रमरहित पाहून भाषण करितो कीं, हे महाबाहो अर्जुना, तूं महायोग्य आहेस आणि मीही इंद्राचा सखा असून युद्धामध्यें त्याजपेक्षांही पराक्रमानें अधिक आहें, परंतु तुझ्यापुढें उभा राहण्यास मी समर्थ नाहीं. हे पंडुपुत्रा, तुझी काय इच्छा आहे? जें तूं सांगशील तें मी करीन. असें त्या राजाचें भाषण श्रवण करून अर्जुन ह्मणतो हे भगदत्ता, धर्मराजा बहुत ब्राह्मणांस दक्षिणा देऊन राजसूयनामें यज्ञ करण्याची इच्छा करीत आहे यास्तव तूं कर (द्रव्य) द्यावा अशी माझी इच्छा आहे. तूं माझा पितृसखा असून माझ्यावर तूं प्रीति करितोस ह्मणून मी तुला आज्ञा करण्यास योग्य नाहीं. प्रीतिपूर्वक तूं कर द्यावास असें अर्जुनाचें भाषण श्रवण करून राजा ह्मणतो हे कुंतिपुत्रा, जसा तुला, तसाच मला धर्मराजा आहे. तूं जी मला आज्ञा केलीस ती मला मान्य आहे; परंतु याशिवाय दुसरें तुझें काय कार्य करूं तें मला सांग? असा विष-

य या अध्यायांत आहे.

२७. अध्याय सत्तावि सावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, असें प्र गदत्ताचें भाषण श्रवण करून अर्जुन ह्मणतो हे राजा, तूं मला कर दिलास ये- णें करून माझें सर्वकार्य झाल्या सारखेंच झालें. आतां तुझी आज्ञा घेऊन मी पु- ढें गमन करितों. असें ह्मणून पुढें उत्तरेस जातां जातां अंतरगिरि व उपगिरीसं बंधि सर्व राजे जिंकून व त्यांजपासून कर घेऊन त्यांसह वर्तमान उलूकपर्वत वासि बृहंतनामक राजाकडे गेला. तेव्हां वाद्यांच्या नादानें, रथांच्या गर्जनेनें व गजांच्या शब्दानें पृथ्वी कंपित झाली. बृहंतराजा सैन्य घेऊन अर्जुना समाग में युद्ध करण्यास निघाला. नंतर उभयतांचा मोठा संग्राम झाला. त्यांत अर्जु नाचा पराक्रम सहन करण्यास तो अशक्य झाल्यामुळें त्यानें अर्जुन जिंक- ण्यास अशक्य आहे, असें जाणून अर्जुनास बहुत रत्नें दिलीं, तीं अर्जुनानें घेऊन त्यास पुनः राज्यावर स्थापिलें, आणि त्यासह वर्तमान सेनाबिंदुराजाक- डे गेला. त्याजपासून करभार घेऊन पुढें मोदापुर, वामदेव, सुदामा, सुसंकुल, व उत्तर उलूक या सर्वराजांस वश करून आपण तेथें राहिला. आणि आप ले दूत पंचगणनामक देशांत पाठवून तेथील सर्व राजे वश करविले. आणि आपण देवप्रस्थास जाऊन सेनाबिंदुराजाशीं युद्ध करून त्यास वश केलें. आणि त्यासह वर्तमान विष्वगश्व राजाकडे गेला, त्यास व पर्वतवासि सर्व रा जे व पर्वतवासि दस्यु (चोर) राजे व तसेच उत्सवसंकेतनामक सप्तगण व काश्मीरदेशाचे क्षत्रिय, लोहित राजा व त्याचे दहा मांडलिक राजे, त्रिगर्त, दार्व, कोकनद व अभिसारी नामाची रमणीयपुरी आपल्या स्वाधीन करून उर- गावासी राजा व रोचमान राजा इत्यादिकांस जिंकून रमणीय सिंहपूर जिंक- लें. पुढें सैन्यासह वर्तमान जातां जातां सुह्म, बाल्हीक, दरद, कांबोज, तेथून पुढें गमन करतां करतां पूर्व उत्तर दिशेस राहणारे दस्युराजे व वनाच्या आ श्रयानें राहणारे सर्व राजे, लोह, परमकांबोज व उत्तरऋषिक या सर्वांस अ- र्जुनानें जिंकिलें. तेव्हां ऋषिकानीं शुकोदर वर्णाचे (पोपटीरंग) आठ, मयु र वर्णाचे बहुत असे अश्व अर्जुनास दिले. या प्रकारें सर्व राजांस जिंकून व त्यांजपासून कर घेऊन अर्जुनानें श्वेतपर्वतीं प्रवेश केला. असा विषय

या अध्यायांत आहे.

२८. अध्याय अठ्ठाविसावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया तो वीर्यवान् अर्जुन श्वेतपर्वताचें अतिक्रमण करून पुढें द्रुमपुत्रानें संरक्षित जो किंपुरुषावासनामक देशाचे राजास जिंकून हाटक देशांत गेला. तेथून उत्तरमानस सरोवरीं जाऊन ऋषिकुल्या व इतर नद्या अवलोकन करून हाटकदेशाचे आसमंतात्भागीं गंधर्वांनीं संरक्षित जो देश होता तो जिंकिला. तेव्हां गंधर्वांनीं काबऱ्या रंगाचे मंडुकाख्यनामक अश्व दिले ते घेऊन पुढें उत्तरेस हरिवर्ष देश जिंकण्या करितां गेला, तेथें महाशरीरी, महा बलवान् व महावीर्यवान् असे द्वारपाल होते ते ह्मणतात हे अर्जुना, हें पुर तूं जिंकण्यास समर्थ नाहींस यास्तव तूं माघारा फीर; कारण या पुरांत जो मनुष्य प्रवेश करितो तो नाहिंसा होतो यास्तव हे वीरा, या कुरूंत मनुष्यदेहानें येणारास कांहींच दृष्टीस पडावयाचें नाहीं. तुला काय कर्तव्य असेल तें सांग? ह्मणजे आह्मी करितों, असें द्वारपालाचें भाषण श्रवण करितांच हास्येंकरून अर्जुन त्यांस बोलतो, द्वारपालहो, बुद्धिमान् जो धर्मराज त्यास सार्वभौमपदाची प्राप्ती व्हावी ह्मणून मी येथें आलों आहें. तुमचे देशांत मनुष्यांस गमन करणें जर उचित नसेल तर मी प्रवेश करीत नाहीं; परंतु तुह्मीं युधिष्ठिर राजास कांहीं कर द्यावा. असें अर्जुनाचें भाषण श्रवण करून त्याणीं करार्थ महावस्त्रें व भूषणें इत्यादिक अर्जुनास दिलीं. तेव्हां अर्जुन तेथून माघारा फिरला. या प्रकारें पुरुषव्याघ्र अर्जुनानें उत्तरदिशेचे महाबलिष्ठ व पराक्रमी राजे जिंकून त्यांजपासून धन, रत्नें, वस्त्रें व उत्तम प्रकारचे अश्व इत्यादिक ग्रहण करून तो सैन्यासहवर्तमान पुनः इंद्रप्रस्थीं आला. आणलेलें सर्व द्रव्य धर्मराजास अर्पण केलें. नंतर धर्माची आज्ञा घेऊन आपल्या स्थानीं गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

२९. अध्याय एकुणतिसावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, वीर्यवान् भीमसेन गज, अश्व, रथ व सैन्य घेऊन पूर्वदिशेस जय करण्या करितां गेला होता त्याणें प्रथम पांचालपुरांत जाऊन नानाउपायानीं पांचालाचें समाधान केलें. पुढें विदेह देशांतील राजांस वश क-

रून तेथून तो दशार्ण देशीं गेला. तेथें सुधर्मनामें राजास जिंकून त्यानें त्यास आपला सेनापति केला; नंतर अश्वमेध पुरीच्या रोचमान नामक राजास स्वल्प उपायानें जिंकिलें. पुढें जातां जातां दक्षिणभागीं वळून तो पुलिंद नगरींत गेला, तेथें सुकुमार व सुमित्र यांस जिंकून शिशुपालाशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें चैद्य देशांत गेला. तेथें उभयतांच्या भेटी व कुशल प्रश्न झाल्यावर शिशुपालानें सर्व राज्य भीमसेनास अर्पण करून आपलें आगमन किमर्थ झालें असें भीमसेनास विचारलें. भीमसेनानें धर्मराजाचें सर्व वृत्त शिशुपालास सांगितलें. शिशुपालानें त्यास त्रयोदशरात्री आपले गृहीं सत्कार पूर्वक ठेऊन त्यास करभार दिला. तो घेऊन भीमसेन पुढें गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

३०. अध्याय तिसावा- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, महाबाहू भीमसेन तो चैद्यदेशा पासून निघून कुमारदेशांतील श्रेणिमान् नामक राजा कोशलदेशाधिपति बृहद्बल राजा, गोपालकक्ष नामक राजा व उत्तरकोसल व मल्लाधिपति राजा, हिमवान् पर्वताच्या पार्श्वभागीं जलोद्भव राजा या सर्वांस जिंकून पुढें निघाला. तो भल्लाटपुराच्या आसमंतात् भागीं जे देश होते ते त्यानें जिंकिले. व शक्तिमंत पर्वत स्वाधीन करून पुढें संग्रामांत मागें न फिरणाऱ्या काशिराजास जिंकिलें नंतर सुपार्श्व देशाच्या आसमंतात् भागीं राहणारा क्रथनामक राजा, मत्स्यदेशाचा मत्स्य, महाबली मलद, व निर्भय अनघनामक राजे यांस जिंकिलें आणि तेथून कांहींसा माघारा फिरून मंदधार राजा जिंकिला. सोमधेयनामक क्षत्रियास जिंकिलें. नंतर कांहीसा उत्तरभागीं वळून वत्सभूमीराजास जिंकून भर्गांचा अधिपति होता त्यास वश करून निषाधपतीस जिंकिलें. पुढें मणिमत प्रमुख बहुत राजे होते त्यांस जिंकून दक्षिणमल्लनामक राजास जिंकिलें. भोगवंत पर्वतीं जाऊन तेथील राजास सहज जिंकून शर्मक व वर्मक राजांस जिंकून विदेहपूरच्या जनकराजास जिंकिलें. नंतर शक व बर्बर यांस जिंकिलें. नंतर विदेहपुरीं राहून इंद्रपर्वताच्या आसमंतात् भागीं राहणारे किरातांचे अधिपति सात राजे होते त्यांस जिंकिलें. नंतर सुह्म व प्रसुह्म हे स्वपंक्षी-

जरी होते तथापि त्यांस जिंकून तेथुन पुढें मागध देशीं जाऊन दंडदंडधार व अन्यराजे यांस जिंकून त्यांसहवर्तमान गिरिव्रजास गेला. तेथें जरासंधाचा पुत्र सहदेव याचें शांतवन करून व त्याजपासून करभार घेऊन कर्णाचे देशीं जाऊन त्यास जिंकिलें. पुढें पर्वतवासि राजांस मोदागिरीवर कोणी एक बलवान् राजा होता त्यास जिंकिलें. नंतर पुंड्राधिप वासुदेव व कौशिकी तीराचे ठायीं कच्छदेशीं राहणारा महौजस राजा या उभयतां समागमें युद्ध करून त्यांस जिंकिलें. वंगराजा, समुद्रसेन, चंद्रसेन कर्वटाधिपति, ताम्रलिप्त राजा, सुह्माचा अधिपति, तसेच समुद्रतीरीं वास करणारे कांहीं म्लेंच्छगण या सर्वांस जिंकून तेथून लौहित्यपुरास गेला. तेथील सर्व म्लेंच्छ राजे व समुद्राचे तीरीं वास करणारे इतर नृपति या सर्वांस जिंकून व त्यांजपासून नानाप्रकारचीं उत्तम रत्नें, चंदनागरु, वस्त्रें, मणि मौक्तिक कंबल, कांचन, रौप्य व पोंवळीं इत्यादि कोटि शतसंख्याकद्रव्य ग्रहण करून भीमसेन इंद्रप्रस्थीं आला. त्यानें सर्व धन धर्मराजास अर्पण करून आपण आनंदानें राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

३१. अध्याय ३१ वा :- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, सहदेव दक्षिण दिशेच्या राजांपासून कर घेण्याकरितां निघाला होता. तो, प्रथम शूरसेननामें देश जिंकून मच्छदेशीं गेला. तेथील राजांस जिंकून तेथून वक्रदंत, सुकुमार, सुमित्र व इतर मत्स्य राजे, निषादभूमि, गोशृंग पर्वत, श्रेणिमान् राजा, कुंतीभोजराजा इत्यादिकांस जिंकून, चर्मण्वतीचे तीरीं गेला, तेथें वासुदेवाचा वैरी जो जंभकाचा पुत्र त्यास जिंकिलें. पुढें जातां जातां सेक अपर सेक यांस जिंकून तो नर्मदा तीरीं आला. तेथें अवंती देशाचे राजे विंद, अनुविंद भीष्मक राजा कोसलाधिपति, वेणातट, कांतारक, प्राकोटक, नाटकेय, हेरंबक, मारुध, रम्यग्रामनाचीन, महाबली अर्बुक तसेच अरण्यांत संचार करणारे राजे व वाताधिपति राजा या सर्वांस जिंकून पुढें गेला. जातां जातां पुलिंद राजा, पांड्यराजा यांस जिंकून, तेथून त्याणें किष्किंधानामक गुहा होती तींत प्रवेश केला. त्या गुहेंत मैंद व द्विविदनामक वानरांचे राजे होते त्यांस

हवर्तमान युद्ध करून त्यांस जिंकिलें तेव्हां त्याणीं रत्नें दिलीं, तीं ग्रहण क-
रून माहिष्मती नगरास तो गेला. तेथें नीलराजा सहवर्तमान युद्ध करी-
त असतां नीलराजास अग्नीनें साह्य करून सहदेवाचे रथ, हय, सैनिक,
व त्यांचीं कवचें दग्ध करून टाकिली. हें सहदेवानें अवलोकन करितांच भ्र
मिष्ट होऊन भाषण करण्यास निःशक्त झाला. असें भाषण श्रवण करू-
न जनमेजय प्रश्न करितात, हे वैशंपायन ऋषे, सहदेव यज्ञाकरितां प्रय-
त्न करीत असतां भगवान् अग्नि युद्धप्रसंगीं त्याचा शत्रु कशाकरितां झाला
हें मला निवेदन करा. असा प्रश्न श्रवण करून वैशंपायन सांगतात, भग-
वान् हव्यवाहन माहिष्मतीपुरीमध्यें परदारा रत होऊन राहिला होता. या
पुरीचा स्वामी जो नीलराजा त्याची कन्या अत्यंत रूपवति होती. ती आप
त्या पित्याच्या यज्ञशाळेंत नित्य येत असे. ज्या काळीं ती अग्निशाळेंत येई
त्या समयीं अग्नि प्रदीप्त होण्याकरितां व्यजनादिक उपाय जरी केले तरी
अग्नीनें प्रदीप्त होऊं नये. आणि त्या कन्येनें आपल्या सुंदर ओष्ठपुटें करून
फुंकिलें ह्मणजे अग्नि प्रज्वलित होई. असे कांहीं दिवस गेल्या नंतर अग्नीस
त्या कन्येच्या उपभोगाची इच्छा झाली. तेव्हां त्याणें ब्राह्मणवेषानें राजाकडे
येऊन कन्येची याञ्चा केली. राजा धर्माचरणी होता यामुळें आपली कन्या
त्या ब्राह्मणास दिली नाहीं, त्या समयीं अग्नीस कोप येऊन एकाएकीं तो प्र-
ज्वलित झाला, हें राजानें पाहून विस्मयानें अग्नीस साष्टांग नमस्कार करू-
न ती कन्या त्यास दिली. तेव्हां भगवान् अग्नि संतुष्ट होऊन भाषण करि-
तो हे राजा, तुझी इच्छा असेल तर कांहीं वर माग? असें ऐकून माझ्या सै-
न्यास शत्रूचें भय नसावें असा राजानें वर मागितला. तेव्हां तथास्तु ह्मणू-
न अग्नि त्या कन्येसमागमें रममाण झाला. त्या दिवसा पासून त्या नगरांत
जो कोणी राजा युद्धास येई त्यास अग्नि दग्ध करी. त्या माहिष्मत पुरींम-
ध्यें तेव्हांपासून स्त्रिया स्वच्छंदी झाल्या. कोणच्या पुरुषाच्या शरीरांत अ-
ग्नि प्रवेश करून स्त्रियांचा उपभोग करील याचा नियम राहिला नाहीं, या
जमुळें त्या स्त्रियांचे पति त्या स्त्रियांस यथेष्टाचरण करण्यास निवारण
करीत नसत. त्या माहिष्मती पुरी मध्यें आपलें सैन्य अग्नीच्या भयानें पी-

डित झालें आहे असें सहदेवानें अवलोकन करितांच चंचल न होतां पर्वता सारखा कांहीं वेळ पर्यंत अचल झाला. नंतर शुचिर्भूत होऊन ह्मणतो हे अग्निनारायणा, तुला नमस्कार असो. हा समारंभ तुझ्याकरितांचआहे, तूं देवांचें मुख आहेस हे पावका, तुलाच यज्ञ असें ह्मणतात. इत्यादि नाना प्रकारें करून त्यानें अग्नीची स्तुति केली.

वैशंपायन ह्मणतात हे राजा, या प्रकारें सहदेवानें केलेलें मंत्ररूप अग्निस्तोत्र पठण करून जो अग्नीचें पठण करितो तो समृद्धि पावून सर्व पापा पासून मुक्त होतो. नंतर सहदेव ह्मणतो हे हव्यवाहना, सूंयज्ञास विघ्न करण्यास योग्य नाहींस असें बोलून दर्भाचें आस्तर्ण करून अग्निप्रवेश करण्याचा निश्चय करून बसला. तेव्हां भयभीत झालेल्या सहदेवाचें सैन्य दग्ध न करितां हळु हळु सहदेवाचे अग्रभागीं येऊन त्यास भाषण करूं लागला. हे सहदेवा, ऊठ ऊठ, तुझी मनीषा सर्व मी जाणली. व धर्मराजाचा अभिप्रायही मी जाणला. जों पर्यंत नीलराजाचे वंशधर पुरुष या माहिष्मती पुरींत उत्पन्न होतील तों पर्यंत मला त्या पुरीचें रक्षण कर्तव्य आहे. परंतु तुझी इच्छा मी पूर्ण करीन. असें अग्नीचें भाषण श्रवण करितांच हस्त जोडून त्यानें अग्नीची पूजा केली, तेव्हां अग्नि शांत झाला. आणि नीलराजानें अग्नीचे आज्ञेनें सहदेवाचें सत्कारपूर्वक पूजन केल्या नंतर नीलराजा पासून त्याणें करभार घेतला. पुढें जातां जातां त्रैपुर राजा, पौरवेश्वर राजा, कौशिकाचा आचार्य, आकृति सुराष्ट्राधिपति यांस जिंकून आपण तेथें राहिला. आणि तेथून भोजकटामध्यें राहणारा जो इंद्रसखा भीष्मक व त्याचा पुत्र रुक्मि यांजकडे दूतांस पाठविलें. राजानें कृष्णाकडे दृष्टि देऊन प्रीतिपूर्वक आज्ञा मान्य करून पुत्रासह तो, सहदेवाकडे प्राप्त झाला. नंतर सहदेवानें त्यानीं दिलेलीं रत्नें घेऊन पुढें जातां जातां शूर्पारक, तालाकट, व दंडक हे सर्व देश वश करून समुद्रद्वीपामध्यें राहणारे म्लेंछ नृपति, तसेच पुरुषास भक्षण करणारे कर्णप्रावर्ण राक्षस व मूळचे राक्षस असून नरयोनींत उत्पन्न झालेले कालमुख नामक राक्षस, कोलगिरि, सुरभीपट्टन, ताम्रद्वीप, रामक पर्वत व तिमिंगिलनामक पुर, पुरु-

षांस भक्षण करणारे एक पायांचे राक्षस तसेंच वनांत राहणारें केरलनामक राक्षस व संजयंतीपुरी जिंकून तेथून करहाटक,पाषंडपुर ,पांड्य,द्रविड,केरल,आंध्रतालवन,कलिंग,उष्ट्रकर्णिक व अटवी नामाची रम्यपुरी आणि यवनाचें पुर,दूतद्वारा वश करून त्यांजपासून करभार घेतला. पुढें समुद्रतीरीं कच्छस्थानीं जाऊन पुलस्त्यपुत्र बिभीषण याजकडे दूत पाठविला.तेव्हां त्याणें प्रीतिपूर्वक त्याची आज्ञा मान्य करून नानाप्रकारचीं रत्नें, चंदनागरु, दिव्यभूषणें, महायोग्यवस्त्रें व बहुमोल्यवान् मणी अशीं पाठविलीं. तीं ग्रहण करून प्रतापी सहदेव तेथून माघारा फिरला. या प्रकारें सहदेव विजयी होऊन सर्व राजांस वश करून व सर्वांपासून करभार घेऊन इंद्रप्रस्थीं धर्मराजा सन्निध आला. आणि राजानीं दिलेलीं रत्नें व वस्त्रें इत्यादिक सर्व धर्मराजास अर्पण करून आपल्यास कृतकृत्य मानून आनंदांत राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

३२. अध्याय बत्तिसावा:- वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, नकुळाचा जय तुला सांगतों श्रवण कर. पूर्वीं वासुदेवानें जी पश्चिम दिशा जिंकिली होती तीच दिशा जिंकावी या हेतूनें मतिमान् नकुल मोठ्या सैन्यासहवर्तमान खांडवप्रस्था पासून निघाला, तो प्रथम बहुधनानी युक्त,रम्य,गवादि पशूनीं व्याप्त, धनधान्यानें समृद्ध असा रोहीतक नामक पर्वत होता,त्यापर्वतीं प्राप्त झाला. तेथें महाशूर जे मयूरनामक राजे यांस जिंकिलें.पुढें मरुभूमि व बहुधान्यानीं युक्त असे शैरीषक व महेत्थ नामक देश होते त्यांस आपल्या स्वाधीन करून पुढें चालला तो आक्रोशनामक राजऋषि यांस जिंकून तेथून दशार्ण देशांत गेला. तेथील सर्व दशार्णांस जिंकून पुढें सिबी,त्रिगर्त,आंबष्ठ,मालव,कर्पट, हे पांच देश आपल्या स्वाधीन करून मध्यमैकेय व वाटधान नामक द्विज यांस वश करून घेतलें,पुनः कांहीं माघारा फिरला. आणि पुष्कर अरण्यनिवासि उत्सव संकेतनामक गण होते,त्यांस वश करून सिंधुकुलाच्या आश्रयानें जे राजे राहिले होते ते महाबलिष्ठ ग्रामणीयनामक राजे,शूद्र व अभीर यांचे गण, सरस्वती तीराचा आश्रय करून राहिलेले मत्स्यपर्वतवासि सकलपंचनद देश,अमरपर्वत,उत्तरज्यो-

तिष व दिव्यकट नामक पुर, द्वारपालनामक पुर, रामठहारहुण व आणखीही इतर पश्चिम दिशेचे राजे यांस जिंकून आमण त्या देशांत राहून वासुदेवाकडे एक दूत पाठविला. तेव्हां यादवांसह श्रीकृष्णानें नकुलाची आज्ञा पालन करून करभार दिला. मद्रकाचें शाकलनामक नगर होतें तेथें जाऊन आपला मामा शल्य यास तो प्रीतिपूर्वक भेटला. शल्यानें त्याचा सत्कार करून बहुत प्रकारचीं रत्नें दिलीं. तीं घेऊन पुढें जातां जातां सागर कुक्षीचे ठायीं राहणारे परम भयंकर म्लेंछगण, पल्हव व बर्बर, किरात, यवन व शक या सर्व राजांस जिंकून त्यांजपासून करभार व रत्नें घेऊन पश्चिमदिशे पासून तो माघारा फिरला. तें सर्व धन दहासहस्र उष्ट्रावर परम कष्टानें घालून इंद्रप्रस्थीं घेऊन आला. आणि तें धर्मराजास अर्पण करून आपण सुखानें इंद्रप्रस्थीं राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

३३. अध्याय तेतिसावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, धर्मराजा राज्य करीत असतां उत्तम प्रकारें प्रजेचें रक्षण होत असे व सत्याचें उत्तम प्रकारें त्याणें परिपालन केलें व सर्व शत्रूंचा नाश करून टाकिला, यास्तव सकल प्रजा आप आपल्या कर्मा विषयीं तत्पर होत्या. प्रजां पासून यथायोग्य कर घेत असे ह्मणून यथा कालीं पर्जन्य पडून सर्व देश धनधान्यानीं समृद्ध असे व गोरक्षण व पृथ्वीचें कर्षण (कृषिकर्म) व वणिक् कर्म यथास्थित होऊं लागलें. राजाची वर्तणुक चांगली असली ह्मणजे प्रजा सुखी होत्ये, चोर व वंचक यांचें भय अगदीं नाहिंसें होतें. राजाच्या प्रिय पुरुषानीं कधींही कोणाशीं मिथ्या भाषण केलें नाहीं, व कधीं आवर्षण नाहीं व कधीं अतिवर्षणही नाहीं व्याधि व अग्नि यांचें भय प्रजेस कधींही झालें नाहीं. याप्रकारें धर्मराजा धर्मे करून प्रजेचें शासन करीत असतां, धर्मराजाचें प्रिय करावें ह्मणून सर्व राजे करभार देण्या करितां येऊं लागले, धर्मे करून तो धनाची वृद्धि करीत असल्यामुळें निरंतर कोशाची वृद्धि अधिकच होऊन शतशः वर्षे कोशाचा व्यय केला तथापि कोश सरूं नये इतकें द्रव्य जमलें. एके दिवशीं राजानें आपल्या कोष्ठा गाराचें व कोशाचें परिमाण पाहून राजसूय यज्ञाविषयीं मति धारण केली. तेव्हां सकल सुहृद् सन्निध प्राप्त होऊन राजास-

भाषण करूं लागले कीं, हे विप्रो धर्मराजा, राजसूय याग करण्याचा प्रस्तुत काल प्राप्त झाला आहे यास्तव आतां सिद्धता करावी, तुह्मांस आतां किमपि न्यूनता नाहीं असें सुहृद, धर्मराजास भाषण करीत आहेत तों इतक्यांत, नारायण भगवान् कनिष्ठ, मध्यम, व उत्तम पदार्थ नत्रांच धनें व रत्नें समागमें घेऊन आपल्या रथघोषाचा नाद करीत धर्मराजाच्या पुरामध्यें प्रविष्ट झाला. त्या काळीं धर्मराजाचें स्थान पूर्ण झालें व कृष्णाच्या आगमनें करून सर्व नगरवासी लोकांसही आनंद झाला. श्रीकृष्ण धर्मराजाच्या सन्निध आला असतां धर्मराज यथाविधि परम हर्षानें त्याचा सत्कार करून धौम्य, द्वैपायन, व्यासप्रमुख ऋत्विज, भीम, अर्जुन, नकुल, सहदेव, भ्राते, यांसहवर्तमान त्यांस कुशल प्रश्न करून भाषण करूं लागला कीं, हे भगवन् तुझ्यामुळें ही सर्व पृथ्वी आह्मांस वश होऊन आह्मीं द्रव्य संपादन केलें. हें द्रव्य श्रेष्ठ ब्राह्मणांस देऊन अग्नीस संतुष्ट करण्याच्या इच्छेनें तुझ्या सहवर्तमान याग करण्याची इच्छा करितों, यास्तव हे महाबाहो, अनुजांसहवर्तमान यागाविषयीं आज्ञा देऊन मी दीक्षित झालेला आपण अवलोकन करावें. हे दाशार्हा, तूं माझा मित्र आहेस ह्मणून मीं निष्पाप आहें असें जाणतों. भ्रात्यांसहवर्तमान आपण मला यागाविषयीं आज्ञा दिली असतां ऋतूचें उत्तम फल मला प्राप्त होईल असें मी समजतों. या प्रकारें धर्मराजानें भाषण केलें असतां त्याच्या गुणांचा विस्तार करून श्रीकृष्ण भाषण करितात हे धर्मराजा, या पृथ्वीवर आतां तूंच साम्राज्यपद प्राप्त होण्यास्तव राजसूय याग करण्यास योग्य आहेस. तुला ईप्सित जो याग कर्तव्य आहे तो कर. मी तुझ्या कल्याणा विषयीं सिद्ध आहें. ज्या कार्या विषयीं तूं माझी योजना करशील तें कार्य मी करतों. असें श्रीकृष्णाचें भाषण श्रवण करून धर्मराज बोलतात. हे कृष्णा, माझा संकल्प सर्व सिद्धीस गेला. ज्यापेक्षां माझें ईप्सित करण्यास तूं उपस्थित झालास त्या पेक्षां माझे सर्व मनोरथ सिद्ध झाले.

वैशंपायन सांगतात हे जनमेजया. या प्रकारें कृष्णानें धर्मराजास-भ्रात्यांसहवर्तमान यागाविषयीं आज्ञा दिली तेव्हां धर्मराज, सहदेव व सकल मंत्री. यांस यज्ञाचें सर्व साहित्य धौम्य सांगतील त्या प्रमाणें सिद्ध करा.

तशीच उपसाहित्यें व मांगलिक पदार्थ जे पाहिजेत ते सिद्ध करा. ब्राह्मणांस निमंत्रण करा. यथायोग्य जे जे पदार्थ तुह्मांस आवश्यक आहेत ते आणण्या करितां भृत्यजनांस लौकर पाठवा. इंद्रसेन, विशोक व अर्जुन सारथी, पुरु या णीं माझें प्रिय होण्या करितां ब्राह्मणांस रसवंत सुगंधी, मनास प्रीतिकारक अशा अन्नाची सिद्धता करून ठेवावी. या प्रकारें धर्मराजानें आज्ञा करितांच सहदेवानें सकल सिद्धता करून धर्मराजास निवेदन केलें. नंतर द्वैपायन व्यासानीं साक्षात् वेदमूर्ति महाभाग्यवान् असे ऋत्विज आणून आपण ब्रह्मत्व करण्यास सिद्ध झाले. धनंजय गोत्रोत्पन्नांत श्रेष्ठ सुसामा ब्राह्मण साम गायन करूं लागला. ब्रह्मवेत्ता याज्ञवल्क्य ऋषि अध्वर्यु झाला. वसूचा पुत्र पैलनामक ऋषि धौम्यासहवर्तमान आला. त्या ऋषीचे पुत्र व शिष्य वेदवेदांगपारग होते. ते सर्व होत्रग झालेल्या सर्व ऋषींनीं यथाशास्त्रविधि पुण्याह वाचनें करून व राजसूय यागाची ऊहरचना करून यज्ञस्थानाची योजना केली. शिल्प्यांनीं पत्निशालादि गृह यथाशास्त्रोक्त सिद्ध केलें. व इतरही गृहें मोठमोठीं सिद्ध करून त्या मध्यें नाना प्रकारचे सुगंधिक पदार्थ स्थापित केले. तीं गृहें साक्षात् देवांच्या गृहां सारखीं सर्वांस दिसूं लागलीं. नंतर धर्मराज, सहदेव व मंत्री यांस आज्ञा करितात कीं, सर्व राष्ट्रांत दूतांस पाठवून, राजांस, ब्राह्मणांस, मोठमोठ्या वैश्यांस, तसेच श्रेष्ठ शूद्र इत्यादिकांस यागा विषयीं आमंत्रण करावें. अशी धर्मराजाची आज्ञा होतांच सहदेवानें सर्व देशांत निमंत्रणा करितां दूत पाठविले ते त्वरित जाऊन सर्वांस घेऊन आले. नंतर सर्व ब्राह्मणानीं धर्मराजास यज्ञदीक्षा दिली. तेव्हां धर्मात्मा धर्मराजा सहस्रावधि ब्राह्मण, भ्राते, ज्ञाति, सुहृत, सचिव, नानादेशा पासून आलेले क्षत्रिय व अमात्य यांसहवर्तमान केवल धर्मराजा मूर्तिमंत धर्मच शोभला. त्याकाळीं इतरही वेदवेदांग सकलविद्यानिष्णात असे ब्राह्मण देशोदेशाहून आले होते त्यांस राहण्या करितां पृथक् पृथक् गृहें करून देऊन अन्नें व वस्त्रें परिपूर्ण करून दिलीं. तीं ग्रहण करून ते ब्राह्मण सुखानें नाना प्रकारच्या कथा वर्णन करीत राहिले. असा तो यज्ञसमारंभ धर्मराजाचा होत असतां रात्रंदिवस सर्व ब्राह्मणांचा त्या यज्ञांत असा शब्द होऊं लाग-

लाकीं, अरे भोजन करा, सुखें करून राहा, व पाहिजे तें ग्रहण करा. धर्मराजानें ब्राह्मणांस सहस्रावधि गायी दिल्या, व शयना करितां सुवर्णाच्या शय्या दिल्या. व उत्तमोत्तम सेवेकरितां दासी पृथक् पृथक् दिल्या. जसा स्वर्गामध्यें इंद्र, तसा या पृथ्वीवर महात्मा धर्मराजा अद्वितीय वीर आहे अशी ख्याति झाली. धर्मराजाचा यज्ञसमारंभ फारच उत्तम झाला. त्या कालीं भीष्म, द्रोणाचार्य, धृतराष्ट्र, विदुर, कृपाचार्य, व आपलेठायीं जे प्रीति करणारे धृतराष्ट्राचे पुत्र होते त्या सर्वांस यज्ञाच्या निमंत्रणा करितां धर्मराजानें नकुलास हस्तिनापुरीं पाठविलें. असा विषय या अध्यायांत आहे.

३४. अध्याय चौतिसावा :- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, धर्माच्या आज्ञेवरून नकुलानें हस्तिनापुरीं जाऊन भीष्म, धृतराष्ट्र, द्रोणाचार्य प्रभृतींस सत्कारपूर्वक राजसूय यागाविषयीं निमंत्रण केलें तेव्हां धृतराष्ट्र, भीष्म, महामति विदुर, दुर्योधन, प्रमुख सकलज्ञाने संतुष्ट होऊन ब्राह्मणांस पुढें करून यज्ञाकरितां निघाले. तसेंच धर्मराजाचा यज्ञसमारंभ श्रवण करून शतशः देशांचे नृपति त्यास अवलोकन करण्याच्या हेतूनें व ती सभा पाहण्याच्या उद्देशानें नानाप्रकारचीं रत्नें घेऊन आले. तसेंच मध्यदेशाचे सकल राजेही राजसूय यागास आले असतां त्या सर्वांस राहण्या करितां उत्तमप्रकारचीं गृहें त्यांत भोजना करितां बहुत प्रकारचीं अन्नें भरून ठेविलीं होतीं. वृक्षानीं सुशोभित अशा वापी प्रत्येक गृहास केल्या होत्या. धर्मराजानें सर्व राजांची पूजा व सत्कार करून त्यांस जशीं अपेक्षित गृहें होतीं तशींतांस देऊन स्थापित केलें. तेव्हां ते सकल राजे परम हर्ष पावले. तीं घरें कैलासशिखरासारखीं उंच व सुशोभित असून द्रव्यानीं भूषित केलीं होतीं. तीं सर्व प्रकारें सुशोभित केलेलीं त्यांत सकल राजे विश्रांति पावून धर्मराजा सभेमध्यें आपल्या सकल ऋत्विजांसहवर्तमान बसला होता. त्यास भेटण्या करितां ते सर्व राजे आले तेव्हां धर्मराजाची सभा अमरांसह वर्तमान स्वर्ग जसा शोभतो तशी सुशोभित दिसूं लागली. असा वि० या० अ०

३५. अध्याय पस्तिसावा :- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, भीष्म द्रोणादिक, धर्मराजाचे सभेच्याठायीं प्राप्त झाल्यावर धर्मराज त्यांचे

अग्रभागीं येऊन अभिवादनपूर्वक भाषण करितो कीं, भीष्माचार्य, द्रोणाचार्य, कृपाचार्य, द्रोणपुत्र अश्वत्थामा, दुर्योधन विविंशति या सर्वांनीं या यज्ञांत माझ्यावर अनुग्रह करावा. माझे जवळ जें थोडें बहुत द्रव्य आहे तें सर्व तुमचेंच आहे त्या सर्व द्रव्याचा व्यय तुह्मीं यथेच्छ करावा, अशी माझी सर्वांस प्रार्थना आहे. या प्रकारें बोलून दीक्षित झालेला जो धर्मराज याणें यथायोग्यते प्रमाणें अधिकारांवर सर्वांची योजना केली. त्यांत यथास्थित भक्ष्य, भोज्य, देण्याच्या अधिकारावर दुःशासन, ब्राह्मणांच्या आगत स्वागता विषयीं अश्वत्थामा, राजांचे पूजे विषयीं संजय; केलें काय व न केलें काय तें पाहण्या विषयीं महामती भीष्मद्रोण यांची योजना केली. सुवर्ण, रत्नें यांची चौकशी व दक्षिणादि दानांकडे कृपाचार्यांची योजना केली. तसेच इतर श्रेष्ठ पुरुष यांची योजना प्रत्येक कार्या विषयीं त्यांच्या योग्यते प्रमाणें केली. बाल्हिक, धृतराष्ट्र, सोमदत्त, जयद्रथ, हे स्वकीयां सारखे रममाण होते. जितका यज्ञसंबंधि द्रव्याचा व्यय व्हावयाचा तितक्यावर विदुराची योजना केली. राजांकडून करभार व भेटी येतील त्या घेण्या विषयीं दुर्योधनाची योजना केली. या सर्व यज्ञाची फलप्राप्ति आपणास व्हावी अशा इच्छेनें ब्राह्मणांचे चरणप्रक्षालन करण्याचें कार्य श्रीकृष्णानें आपलेकडे घेतलें. धर्मराजाची सभा व धर्मराज यांस अवलोकन करण्यास जो प्राप्त झाला, त्याणें धर्मराजाचे भेटी करितां सहस्रपरिमित द्रव्या पेक्षां कमी द्रव्य आणिलें नाहीं. द्रव्या वांचून धर्मराजाचा यज्ञसमारंभ चांगला व्हावयाचा नाहीं, असें एकमेक स्पर्धा करीत सकल राजानीं बहुत द्रव्यें व रत्नें अर्पण करून धर्मराजास संतुष्ट केलें. त्या कालीं तो यज्ञसमारंभ फारच उत्तम प्रकारचा झाला. ब्राह्मण व राजे यांस राहण्या करितां जीं गृहें दिलीं होतीं त्या गृहांच्या ऊर्ध्वभागीं सकल देव व इंद्रादि दिक्पाल यज्ञसमारंभ अवलोकन करण्या करितां विमानारूढ होऊन आले. तेव्हां तीं त्यांचीं विमानें बहुत शोभलीं. विचित्र रत्नें ग्रहण करून सकल ऐश्वर्यानें समृद्धिमान् असे राजे यज्ञांत प्राप्त झाल्यामुळें युधिष्ठिराचा यज्ञ फारच शोभला. यज्ञसमारंभकालीं धर्मराजानें आपल्या ऐश्वर्ये करून च-

वरुणासीं स्पर्धा केली, इतकें ऐश्वर्य धर्मराजाचें हरि पावलें. त्या यज्ञांतआ-रंभणीय, क्षत्र, धृति, व्युष्टि, द्विरात्र, दशपेय, सप्तपेय इत्यादि सहा अग्नीचे-ठायीं धर्मराजानें दक्षिणापूर्वक याग करून लोकांची जसजशी इच्छा होती तसतशी त्यानें परिपूर्ण केली. हा यज्ञ बहुत अन्नें वस्त्रें व रत्नें याणींस-मृद्ध झाला. त्या यज्ञांत कोणास कांहीं कमी नवतें. यज्ञदीक्षा विशारद जे-जे महान् महान् ऋत्विज आले होते त्याणीं ईडा व आज्यहोमाहुति इत्या दिकें करून देवांची तृप्ति केली. जसे देव त्या यज्ञांत तृप्त झाले तसेच स-कल ब्राह्मण धर्मराजानें बहुत दक्षिणा देऊन तृप्त केले. आणि चारी व-र्णांसही परम प्रीतीनें तृप्त केलें असा विषय या अध्यायांत आहे.

३६. अध्याय छत्तिसावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, राजसू-य यागा मध्यें धर्मराजास अभिषेक करण्याच्या दिवशीं राजां सहवर्तमा-न कांहीं ब्राह्मण व सत्कार करण्यास योग्य असे नारदादि महान् महान् ऋषि धर्मराजाच्या अंतर्वेदीमध्यें जाऊन बसले. ते सकल ऋषि व राजर्षि परम शोभा पावले. जसे ब्रह्मदेवाच्या सभे मध्यें देव व देवर्षि येतात तसे सकल ब्राह्मण धर्मराजाच्या सभेमध्यें येऊन कर्मामध्यें कांहीं अवकाश पाहून कित्येक ह्मणतात हें कर्म असेंच करावें, कोणी ह्मणूं लागले कीं, छी, असें करण्यास कांहीं आधार नाहीं, कोणी वितंडवाद करूं लागले, को-णी आपलें मत स्थापन करूं लागले. या प्रकारें भवति न भवति करूं ला-गले. तेव्हां जसें नक्षत्रानें आकाश शोभतें तशी ती धर्मराजाची वेदि वे-दशास्त्र संपन्न महर्षींनीं आकीर्ण झालेली बहुत शोभा पावली. त्या स-भेंत कोणी शूद्र सन्निध नव्हते, व व्रत धारण केलेले सर्व होते अशी ती धर्मज्ञ युधिष्ठिराची अंतर्वेदि यज्ञविधान ज्ञात्या पुरुषांच्या लक्ष्मी करून ब-हुत सुशोभित झालेली पाहून नारद परम हर्ष पावला. आणि सर्व क्षत्रि-यांचा समाज आलेला पाहून ब्रह्मदेवाच्या सभेंत देवांचा समुदाय प्राप्त झाला असतां अंशावतरणाच्या वृत्तांतानें स्मरण होऊन पुंडरीकाक्ष श्री भगवान् जो हरि याचें मनामध्यें स्मरण करून म्हणतो. साक्षात् नाराय-ण जगद्व्यापक परमात्मा देवांच्या अरीचें मर्दन करणाश आपली प्रतिज्ञा

परिपालन करण्यास्तव देवांस भूलोकीं जन्म घेण्याची आज्ञा देऊन त्यांस सांगितलें कीं, तुमचा परस्पर कलह होऊन एकमेकांस मारून पुनः स्वर्ग लोकीं प्राप्त व्हाल. असें सांगून आपण अंधकवृष्णिकुलामध्यें वसुदेव गृहीं अवतार घेतला तो हा परमेश्वर नक्षत्रा मध्यें चंद्र जसा शोभतो, तसा हा सभे मध्यें परम शोभायमान दिसूं लागला. इंद्रादि देव त्याच्या बाहुबलाची उपासना करितात, तोहा अरीचें मर्दन करणारा श्रीकृष्ण मनुष्यांसारखा सर्वांस दिसतो. काय हो हें मोठें आश्चर्य आहे? कीं हें सकल क्षत्रिय कुल येथें प्राप्त झालें यांचा श्रीकृष्ण भगवान् संहार करण्याची इच्छा करितो अशी चिंता करीत नारद स्वस्थ बसला. तेव्हां भीष्म धर्मराजास भाषण करितात हे धर्मराजा, हे सर्व राजे येथें प्राप्त झाले आहेत यांची यथायोग्य पूजा करावी. आचार्य ऋत्विज, आपले श्वशुरादिक संबंधि, स्नातक, मंत्रि व नृपति हे सहाजण पूजेस योग्य आहेत यास्तव यांची यथायोग्य पूजा करावी. यांत जो वरिष्ठ व समर्थ असेल त्याची पूर्वी पूजा करून नंतर इतरांची पूजा करावी. असें भाषण श्रवण करून धर्मराज बोलतात हे पितामह, तुह्मीं सांगितलें परंतु या प्रसंगीं पूर्वी कोणाची पूजा करूं? तें सांगा. असें भाषण श्रवण करून भीष्माचार्य आपल्या बुद्धीचा निश्चय करून सांगतात, हे धर्मराजा, वृष्णिकुलामध्यें उत्पन्न झालेला श्रीकृष्ण या भूमंडळीं सर्वांस पूज्य आहे असें मला वाटतें. हे समस्त जन सभेमध्यें बसले आहेत यांचें तेज व बल कायतें श्रीकृष्णाच होय. असें नाना प्रकारें त्याचे स्वरूपाचें वर्णन करून याची पूजा करणें हें योग्य आहे. अशी भीष्माची आज्ञा होतांच महा प्रतापी जो सहदेव यानें प्रथम यथाविधि श्रीकृष्णास उत्तम अर्घ्य अर्पण केलें, तें त्यानीं ग्रहण केलें हें शिशुपालानें अवलोकन करितांच श्रीकृष्णाची पूजा केलेली त्यास सहन न होऊन त्या सभे मध्यें भीष्म व धर्मराज यांची निंदा करून वासुदेवाची दूषणपूर्वक निंदा करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

३७ अध्याय सदतिसावा :- शिशुपाल भाषण करितो हे महात्मे पृथ्वीपति सभेंत बसले असतां हा यादवकुलोत्पन्न कृष्ण राजानीं ग्रहण करण्यासजो

पूजा ती हा ग्रहण करण्यास योग्य नाहीं, हा पांडवां मध्यें आचार चांगला झाला नाहीं. हे धर्मराजा तूं ज्या कामनें करून याची पूजा केलीस तें येथें कांहींच नाहीं. हे पंडुपुत्र हो, तुह्मीं बालक असल्यामुळें सूक्ष्मधर्म कांहींच जाणीत नाहीं. हा म्हातारा गंगापुत्र भीष्म अल्पबुद्धीस्मरणानें भ्रष्ट झाल्या मुळें असा अधर्मयुक्त होऊन स्वप्रीतीनें हें कर्म केलें; परंतु हा साधूंमध्येंव लोकांमध्यें अपमान पावेल. हा कृष्ण यादवकुलांत झाला आणि हा राजा नसतां राजसमुदाया मध्यें अग्रपूजा ग्रहण करण्यास कसा योग्य होईल? तुह्मीं याची पूजा कशी केलीत? कदाचित् ह्मणाल कीं, हा कृष्ण वृद्ध आहे तर याचा पिता वसुदेव वृद्ध असतां त्याचाच हा पुत्र पूजेस कसा योग्य होईल? कदाचित् वासुदेव आमचा सुहृद असून आह्मांस इष्ट आहे असें जाणून तुह्मीं त्याची पूजा केलीतर द्रुपदराजा सन्निध असतां हा कृष्ण पूजा करण्यास कसा योग्य होईल? हे कुरुनंदना आमचा आचार्य श्रीकृष्ण ह्मणाल तर द्रोणाचार्य सन्निध असतां या वार्ष्णेयाची पूजा कशी केलीस? तूं ह्मणशील कीं, हा कृष्ण आमचा ऋत्विज व पुरुषश्रेष्ठ आहे तर वेदव्यास व स्वच्छंदमृत्यु भीष्म असतां तूं कृष्णाची पूजा कशी केलीस? सर्वशास्त्रविशारद अश्वत्थामा, व सर्व राजांचा स्वामी असा हा पुरुषश्रेष्ठ दुर्योधन, भरत वंशाचा गुरु कृपाचार्य व किंपुरुषाचा आचार्यद्रुमराजा व भीष्मकराजा व रुक्मी राजा, शल्य, कर्ण इत्यादिकांचें अतिक्रमण करून तूं कृष्णाची पूजा कशी केलीस? हा कृष्ण ऋत्विज आचार्य व राजाही नाहीं असें असून तूं ज्या पेक्षां त्याची पूजा केलीस त्या पेक्षां आपल्या मनास वाटेल तसें केलेंस? हे भारता तुला याची पूजा कर्तव्य होती तर हे सर्व राजे येथें अपमान करण्यास बोलाविलेस काय? आह्मीं तुझे भयानें, लोभानें किंवा समाधानानें करभार दिला नाहीं. तूं केवल धर्मा विषयीं प्रवृत्त झालास व सार्वभौम पदाची इच्छा करतोस हें जाणून करभार दिला परंतु तूं आतां आह्मास मानीत नाहींस आणि हे धर्मराजा या कृष्णास छत्रचामरादि चिन्हें कांहींच नसतां या राजांच्या सभेमध्यें तूं याची पूजा केलीस तस्मात् तूं सर्वांचा अपमान केलास यांत संशय नाहीं. अरे या धर्मात्म्या धर्मपुत्राच्या यशाची आज हानि झाली. हा कृष्ण

धर्मच्युत असतां त्याची पूजा कोणबरें करील? अरे या दुष्टात्म्यानें माहात्मा जो जरासंध यास अन्यायें करून मारिलें असतां याची धर्मराजानें पूजा केली तेणें करून याची धर्मात्मता भ्रष्ट झाली. कृष्णाचे ठायीं अग्रपूजा समर्पण केल्यानें हा धर्मराज नीचत्व पावला. अरे माधवा, कुंतीपुत्र याणीं भयानें, लोभानें, अथवा तपस्वीपणानें जरी तुझी पूजा केली तथापि तूं विचार न करितां ती ग्रहण कशी केलीस? आणि तूं पूजेस अयोग्य असून आपली पूजा करण्यास आज्ञा देऊन ती बहुमानें करून कशी ग्रहण केलीस? निर्जनस्थला मध्यें जसा श्वान हविर्द्रव्य प्राप्त झालें असतां आनंद मानितो तशी तूं ही पूजा ग्रहण केलीस येणें करून सर्व राजांमध्यें तुझा अपमान झाला. हे मधुसूदना, जशी नपुंसकास स्त्री प्राप्ती किंवा अंधास रूपदर्शन निरर्थक आहे, तसा तूं राजा नसल्या मुळें ही पूजा तुझे ठायीं निरर्थक झाली. हा युधिष्ठिर, भीष्म तसाच वासुदेव हे सर्व जशास तसेच आहेत, असें शिशुपाल भाषण करून उच्चासनापासून उठला आणि कांहीं राजांसहवर्तमान सभेंतून जाण्यास उद्युक्त झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

३९. अध्याय अडतिसावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सभेंतून उठून शिशुपाल चालला असतां धर्मराज धांवून शिशुपालास सांतवनपूर्वक मधुरवाणीनें भाषण करितो हे पृथ्वीपते तूं जें भाषण केलेंस हें तुला योग्य नाहीं. या मध्यें मोठा अधर्म मात्र झाला. हा क्रूरपणा निरर्थक आहे. कोणीही पार्थिव परम धर्माचा अपमान करीत नाहीं. या शंतनुपुत्र भीष्माची तूं उगीच अप्रतिष्ठा करूंनको. पहा हे राजे तुझ्याहूनही वृद्ध असतां कृष्णाची पूजा केलेली पाहून संतुष्ट झाले, तसाच तूंही संतुष्ट होऊन क्षमा कर. जसा भीष्म तत्वें करून कृष्णास जाणतो असा तूं जाणत नाहींस. असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून भीष्म भाषण करितो. हे धर्मा, शिशुपाल प्रार्थना करण्या विषयीं योग्य नाहीं. यास्तव तूं याचें सांतवन करूं नको. सर्व लोकांत अति वृद्ध जो श्रीकृष्ण याची पूजा केलेली जो मानीत नाहीं त्याचें शांतवन करणें योग्य नाहीं. रणाच्या ठायीं जो क्षत्रिय क्षत्रियांस जिंकून मुक्त करतो, तो क्षत्रियांचा गुरु होतो. पहा बरें, या सभे मध्यें

जितके राजे बसले आहेत तितके कृष्णानें आपल्या तेजें करून जिंकिले नाहींत असे कोणी दिसत नाहींत. हा अच्युत केवळ आह्मांसच पूज्य आहे असें नाहीं. हा महाभुज कृष्ण तीन लोकांसही पूज्य आहे. कृष्णानें महान् महान् क्षत्रिय बहुत युद्धांत जिंकिले. वार्ष्णेय जो कृष्ण याजमुळें सर्व जगत् प्रतिष्ठित आहे. याजकरितां वृद्ध जरी या सभे मध्यें बसले आहेत तथापि मी श्रीकृष्णाचेंच पूजन करीन. अरे शिशुपाला, तूं जें पूर्वी भाषण केलेंस हें तुला योग्य नाहीं. तुझी बुद्धि अशी होऊं देऊं नको. मी बहुत ज्ञान वृद्ध पुरुषांचा समागम करून त्यांच्या मुखापासून भगवान् जो श्रीकृष्ण याचे गुणच श्रवण केले. याचीं कर्मे जीं जीं जन्मा पासून झालीं तीं तीं बहुत लोकांनीं मला निवेदन केलीं. हे चैद्या, आह्मीं केवळ स्व इच्छेनेंच किंवा तो आमचा संबंधि अथवा आह्मीं अर्थी पकाराकरितां त्याचें पूजन करितों असें नाहीं. या भूमंडलीं सर्व लोक सुखें करून याची पूजा करितात. यश व जय याचे ठिकाणीं आहेत आह्मीं परीक्षा केल्या वांचून याची पूजा केली नाहीं. हा हरि सर्व गुणानीं संपन्न असल्या मुळें वृद्धांस सोडून याची पूजा केली. ब्राह्मणां मध्यें ज्ञानानें, क्षत्रियां मध्यें बलानें, वैश्यां मध्यें धनधान्यें करून, शूद्रांमध्यें आयुष्यानें जो श्रेष्ठ असेल त्यास वृद्ध ह्मणतात. त्या कृष्णाच्या पूजे विषयीं दोन कारणें आहेत. तीं अशीं कीं, वेदवेदांगज्ञाता व बलानेंही अधिक आहे. या मनुष्यलोकां मध्यें केशवा पेक्षां कोण श्रेष्ठ आहे? दान, दाक्ष्य, श्रुत, शौर्य, ह्री, कीर्ति, उत्तम बुद्धि, संतति, श्री, धृति, तुष्टि, पुष्टि हे गुण निरंतर अच्युताच्या ठायीं राहतात. हा सत्यसंपन्न श्रीकृष्ण सर्वांचा आचार्य, पिता व गुरु असें जाणून आह्मीं यास अर्घ्य दिलें. याची सर्वांनीं क्षमा करावी. ऋत्विज, गुरु, स्नातक, नृपति, प्रिय, हे गुण हृषीकेशाचे ठायीं राहातात, ह्मणून आह्मीं याचें पूजन केलें. हा अव्यय कृष्ण सर्व लोकांच्या उत्पत्तिविषयीं व नाश विषयीं कारण आहे. हें चराचर जगत् श्रीकृष्णानेंच उत्पन्न केलें. ही जगताची अव्यक्त प्रकृति कृष्णच आहे. हाच जगताचा सनातन कर्ता सर्व भूतांपेक्षां वेगळा ह्मणून हा सर्वांस पूजनीय होय. बुद्धि, मन, अहंकार, वायु, तेज, उदक, आकाश, पृथ्वी व चतुर्विध जगत् सर्व कृ-

ष्यांचे ठायींच प्रतिष्ठित आहे. आदित्य,चंद्रमा,नक्षत्रें,गृह,दिशा,विदिशा,
या सर्वांचा अधिष्ठान कृष्णाच आहे. वेद हे जसें अग्निहोत्राचें मुख,गायि-
त्री जशी सर्व वेदांचें मुख,राजा हा सर्व मनुष्यांचें मुख,समुद्र सर्व नद्यांचें
मुख,चंद्रमा सर्व नक्षत्रांचें मुख,सूर्य तेजाचें मुख,मेरु सर्व पर्वतांचें मुख
गरुड पक्ष्यांचें मुख,तसा ऊर्ध्वतिर्यक् व अधर इत्यादि जगताच्या गतीचा
कारणीभूत जो भगवान् केशव तो देवां सहवर्तमान सर्व लोकांचें मुख हो-
य. हा शिशुपाल अज्ञानी असल्यामुळें कृष्णरूप न जाणतां सर्वकाल त्या-
ची निंदा करण्याचें भाषण करितो. जो बुद्धिमान् पुरुष धर्माचें चिंतन क-
रील तोच पुरुष आह्मीं श्रीकृष्णाची पूजा केलेली यथार्थ जाणील.हा शिशु
पाल तसा नाहीं. वृद्ध बाल,व हे माहात्मे पार्थिव यां मध्यें कृष्णाची पूजा के-
ली असतां कोण अयोग्य मानील. आह्मीं पूजन केलेलें हें जर चेदिपति
शिशुपाल दुष्कृत मानील तर मानो. आह्मीं पूजा केली हें अयोग्य मानून
शिशुपालास जें कर्तव्य करणें असेल तें त्याणें करावें. असा विषय या अध्या
यांत आहे.

३९ अध्याय एकुणचाळिसावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया,
महाबलवान् भीष्म पूर्वोक्त भाषण करून विराम पावला. तेव्हां महाबली
सहदेव अर्थयुक्त भाषण करूं लागला कीं, हे महीपाल हो,आह्मीं श्रीकृ-
ष्णाची अग्रपूजा केली ती तुह्मांस जर सहन होत नाहीं तर जे येथें बलिष्ठ
राजे प्राप्त झाले आहेत त्यांच्या मस्तकावर मी आपल्या चरणांचा निक्षेप
करितों. ज्यास सहन होणार नाहीं त्याणें माझ्या अग्रभागीं येऊन प्रत्यु-
त्तर द्यावें. तोच मला वध्य आहे. हे नृप हो,श्रीकृष्णा पूजेस योग्य जाणू-
नच याची पूजा केली. जे पुरुष बुद्धिमान् आहेत ते आह्मीं केलेलें कृत्य-
योग्य मानतील. त्या प्रकारें त्या सभेमध्यें बुद्धिमान् व बलवान् असे राजे
बसले असतां सहदेवानें आपला चरण पुढें ठेवून भाषण केलें त्यावर को-
णी बलवान् उत्तर देण्यास समर्थ झाला नाहीं. त्या काळीं सहदेवाच्या मस्त-
कावर आकाशांतून पुष्पवृष्टि झाली. आणि शाबास शाबास अशी आका-
शवाणी झाली त्या समयीं भूत भविष्य जाणणारा,संशयाचा निरमोक्ता

सर्वलोकवेत्ता नारदऋषि त्या सकल राजमंडलांत असें स्पष्ट भाषण करूं लागला कीं, जे मनुष्य कमलपत्राक्ष जो श्रीकृष्ण याचें अर्चन करीत नाहींत ते जीवंत असतां मृतासारखे समजावे. त्यांसहवर्तमान कधींही भाषण करूं नये. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, ब्राह्मण क्षत्रियांमध्यें विशेष तारतम्य जाणणारा जो सहदेव यानें श्रीकृष्णाची पूजा करून तें कर्म समाप्त केलें. तेव्हां शत्रुकर्षण करणारा जो शिशुपाल यानें श्रीकृष्णाची पूजा पाहून कोपानें आरक्त नेत्र करून सर्व राजांस भाषण करूं लागला कीं, हे क्षत्रिय हो, तुह्मां सर्वांचा मी या कालीं सेनापति होतों तुह्मी सकल राजे सिद्ध व्हा, ह्मणजे हे वृष्णि आणि पांडव यांसहवर्तमान युद्ध करून यज्ञाचा उपघात करूं असें शिशुपालाचें भाषण सर्व राजानीं श्रवण करून आपला अपमान झाला ह्मणून ते वर्णहीन झाले होते तशांतून हें त्याचें भाषण त्यास अनुकूल होतांच वासुदेवाची अग्रपूजा कोणत्याही प्रकारें सिद्धीस जाऊं देऊं नये. असा निश्चय करून क्रोधानें मूर्छित झाले. तेव्हां त्यांचे सुहृदानीं निवारण केलें, तरी ते शांति पावले नाहींत. आमिषापासून सिंहास दूर केलें असतां जसे ते गर्जना करितात तसे सकल क्षत्रिय गर्जना करूं लागले. त्या कालीं सर्व राजांचा समुदाय समुद्रासारखा क्षोभलेला पाहून श्रीकृष्णानें असा निश्चय केला कीं, आतां यांचा युद्धाचा संकेत दिसतो. असा विषय या अध्यायांत आहे.

४०. अध्याय चाळिसावा.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, प्रलयकालच्या वायूनें ताडित झाल्यामुळें क्षोभ पावलेल्या समुद्रासारखें राजमंडल, क्रोधें करून अत्यंत चंचल झालेलें अवलोकन करून भीष्मास बोलतो. हे महाबुद्धे वृद्ध कुरु पितामह भीष्म, हा राजांचा सागर क्रोधें करून चंचल झाला, या विषयीं आतां पुढें काय करावें? राजांस पीडा न होतां जेणें करून प्रजांचें हित होईल तें मला सांगा? असें धर्माचें भाषण ऐकून भीष्म बोलतो, हे कुरुशार्दूला, तूं भिऊं नको. श्वान जसा सिंहास मारण्याची इच्छा करितो तशी ही शिशुपालाची बडबड आहे. ह्मणूनच मी पूर्वीं कृष्णाचा आश्रयरूप कल्याणकारक मार्ग संपादन केला.

सिंह निद्रिस्थ असतां श्वान जसे एकत्र होऊन भोंकतात तसे हे सर्व राजे जल्प-
ना करितात. हा वृष्णिसिंह जों कालपर्यंत निजल्या सारखा स्वस्थ आहे तोंप-
र्यंत हे श्वानवत् याच्या सन्निध जल्पना करितील. हा पार्थिव श्रेष्ठ अल्पबुद्दि
शिशुपाल सर्वप्रकारें या राजांस आपल्या समागमें यमलोकीं नेण्याची इच्छा
करितो. हे भारता, हा अधोक्षज या शिशुपालाचें तेज निश्चयें करून हरण
करील याची व त्या सर्व राजांची ही बुद्धि भ्रष्ट झाली ह्मणून हा नरव्याघ्र-
श्रीकृष्ण एकदांच सर्वांचा संहार करील. हे युधिष्ठिरा, तीन लोकां मध्यें च-
तुर्विध भूतांची उत्पत्ति,लय करणारा माधव आहे त्या पेक्षां तूं कांहीं भय
बाळगूं नको. असें भीष्माचें भाषण श्रवण करून शिशुपाल परम रुक्ष वा-
णीनें भीष्मास भाषण करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

४१. अध्याय एकेचाळिसावा.– हे भीष्मा, तूं वृद्ध असतां अशा भय
युक्त भाषणानें सर्व राजांस भय दाखवितोस काय? हे कुलाधमा, असें भा-
षण करण्यास तुला लाज कशी वाटत नाहीं? तूं तृतीय प्रकृति (नपुंसक) आ-
हेस त्या पेक्षां हें धर्मभ्रष्ट भाषण केलेंस हें तुला योग्यच आहे. नौकेस नौ-
का बांधिली असतां जशा दोन्ही नौका एकदांच बुडतात, अथवा अंधास ने-
णारा अंध असला ह्मणजे जसे ते दोघे खाड्यांत पडतात तसा तूं कौरवांम-
ध्यें अग्रणी असल्यामुळें, हे सर्व कौरव तुझ्या योगानें नाश पावतील. या कृ-
ष्णानें पूतना घातादि पूर्वी केलेलीं कर्में तूं वर्णन करतोस येणें करून आमचें
मन फार व्यथित होतें. हे भीष्मा, तूं गर्विष्ठ व मूर्ख असल्यामुळें या केशवा-
ची स्तुति करतोस तस्मात् तुझी जिव्हा शतधा कशी विदीर्ण होत नाहीं? हे-
भीष्मा, येथें या कृष्णाची आबाल वृद्धानीं निंदा कर्तव्य असून व तूं ज्ञानवृ-
द्ध असून त्या गोपाचें स्तवन करण्याची कशी इच्छा करितोस? अरे त्या कृ-
ष्णानें तृणावर्त तसेच अश्व व वृषभनामक दैत्य हे युद्धा विषयीं कुशलन-
सतां त्यांस मारिलें ह्मणून नवल केलें काय? चैतन्य रहित काष्ठमय शकट,
पायानें भग्न केला तसाच गोवर्धन पर्वत वारुळा सारखा सात दिवस धार-
ण केला व बहुत अन्न भक्षण केलें व कंसाचा वध केला यांत मला कांहीं आ-
श्चर्य वाटत नाहीं. हे कुलाधमा, कृष्णाचीं जीं कृत्यें तूं श्रवण केलीं नसशील तीं

मीं तुला सांगतों, श्रवण कर. स्त्रिया, गायी, ब्राह्मण, अन्नदाता तसेंच ज्याच्या आश्रयानें राहणें इतक्यांवर शस्त्रपात करूं नये, असें धर्मज्ञ सांगतात. हें सर्व याचे ठायीं व्यर्थ झालेलें दिसतें. अज्ञानी पुरुषां पुढें जसें महान्पुरुषाचें स्तवन करणें तसें माझ्या पुढें हा कृष्ण ज्ञानवृद्ध व माहात्मा आहे म्हणून स्तवन करतोस हें व्यर्थ आहे. हे भीष्मा, हा कृष्ण गोघ्न व स्त्रीघातीं असतां याचें पूजन करण्या विषयीं तूं कशी इच्छा करितोस? हा कृष्ण मतिमानांमध्यें श्रेष्ठ व जगताचा प्रभु आहे असें तूं बोलतोस तेणें करून हा जनार्दन आपली प्रशंसा मानितो परंतु हें सर्व व्यर्थ आहे. बहुत कथा कथन करणाऱ्या पुरुषास त्या कथां पासून कांहीं ज्ञानप्राप्ति न झाल्या मुळें आपल्या मूळप्रकृतीचा त्याग करण्यास तो योग्य होत नाहीं. जसा कोणी एक भूशायन करणारा मनुष्य सिंहाच्या दंष्ट्रांतील मांस भक्षण करण्याची इच्छा करून साहस करूं नको, असा दुसऱ्यास उपदेश करतो आणि आपण तर साहस करण्यास उद्युक्त होतो तसा तूं मोठमोठ्या गोष्टी मात्र सांगतोस परंतु आपल्या नीच प्रकृतीचा त्याग करीत नाहींस. त्या पांडवांस पूज्य कृष्ण आहे. व सन्मार्गा पासून भ्रष्ट झालेला अधर्मज्ञ तूं त्या पांडवांचा मार्गप्रदर्शक आहेस, त्या पेक्षां पांडवांनीं ही पापीवृत्ति आचरावी अशी तुझी इच्छा दिसते. हे भीष्मा, मी धार्मिक व ज्ञानवेत्ता असें तूं आपल्यास मानितोस; परंतु तुझ्या सारखा अधर्मकर्ता कोण असेल बरें? जर तूं धर्म जाणतोस तर अंबा नामक काशिराजाची कन्या अन्यपुरुषाची इच्छा करीत असतां बलात्कारानें तूं तिचें हरण केलेंस. जरी तूं हरण केलेस तरी तिच्याशीं विवाह कां केला नाहींस? तूं इतका जर अभिमानी आहेस व सन्मार्गा मध्यें जर राहतोस तर विचित्रवीर्य नामक तुझ्या भ्रात्याच्या दोन स्त्रिया होत्या त्यांचे ठायीं दुसऱ्या पासून कशी संतति उत्पन्न करविलीस? काय हा तुझा धर्म? हें तुझें ब्रह्मचर्य व्यर्थ आहे. मला असें वाटतें कीं, मोहें करून अथवा तूं नपुंसक आहेस म्हणून हें ब्रह्मचर्य व्रत धरिलेंस यांत संशय नाहीं. हे भीष्मा, कोणत्याही कार्यामध्यें तुझी वृद्धि झालेली मी ऐकिली नाहीं व तूं वृद्धांची सेवाही केली नाहींस. याग, दान, अध्ययन, बहुत

दक्षिणायुक्त यज्ञ ही सकल कर्मे आपत्यवान् पुरुषाच्या सोळाव्या कलेची योग्य ता पावणार नाहींत हे भीष्मा, आनपत्य पुरुषानें बहुत व्रतें व उपवास जरी केले तथापि ते त्याचे सर्व निरर्थक आहेत. हे भीष्मा, तूं आनपत्य वृद्ध व मिथ्या धर्मानुशासन करणारा आहेस त्या पेक्षां हंसा सारखा तूंही आपल्या ज्ञातीपासून वध पावशील असें मला दिसतें. कोणी ज्ञानवेत्या पुरुषानें मला पूर्वी एक हंसाची प्राचीन गोष्ट सांगितली आहे ती तुला श्रवण करण्याची इच्छा असल्यास सांगतों, श्रवण कर. पूर्वी कोणी एक वृद्ध हंसपक्षी समुद्र तीरीं राहून इतर पक्ष्यांस वाणीनें मात्र धर्माच्या बहुत गोष्टी कथन करी परंतु स्वतः त्याचें आचरण चांगलें नवतें. त्याच्या त्या धर्मकारक गोष्टीश्रवण करून सर्व भाविक पक्षी त्यास उत्तम भक्ष्य आणून देत, आणि हा सत्यवादी व धर्मवेत्ता आहे असें जाणून आपलीं अंडीं त्याच्या स्वाधीन करून समुद्रामध्यें संचार करण्यास जात असत. ते पक्षी फिरावयास गेले ह्मणजे इकडे हंस त्यांतील कांहीं अंड्यांचें भक्षण करी. या प्रकारें त्या पक्ष्यांचीं अंडीं कमीं होत चाललीं असतां त्यांत कोणी एक बुद्धिमान् पक्षी होता त्यास शंका उत्पन्न होऊन एके दिवशीं त्याणें हंसाचें कृत्य अवलोकन करून परम दुःखी झाला. आणि हें पापकृत्य त्याणें एके दिवशीं सर्व पक्ष्यांस दाखविलें. तें सर्व पक्ष्यांनीं अवलोकन करितांच ते हंसा जवळ येऊन त्याचा प्राण घेतला. हे भीष्मा, या हंसा सारखा तूं ज्ञातीपासून वध पावशील. तूं धर्मज्ञ आहेस असें पाहून हे सर्व राजे तुझ्या सन्निध येतील. आणि परम क्रुद्ध होऊन हंसा सारखा तुझा वध करतील. हंस अंडींभक्षण करून लोकांस जसा सात्विक उपदेश करीत असे तशा त्या तुझ्या उपदेशानें सर्वांचा अंतरात्मा व्याकुळ झाला असतां हंसा सारखी तुझी अवस्था करतील. या प्रकारें शिशुपालानें बाहेर निंदा दाखवून गर्भित भीष्मस्तवनपूर्वक कृष्णाचें स्तवन केल्यामुळें पुढें तो मरणानंतर भगवंताचें सायुज्यपद पावला. असा विषय या अध्यायांत आहे.

४२. अध्याय बेचाळिसावा:– शिशुपाल भाषण करितो हे भीष्मा, महाबलवान् जरासंध मला बहुत मान्य होता त्यानें त्या कृष्णास दासासार-

ऐसें मानून त्याशीं संग्राम केला नाहीं. जरासंधास मारण्या विषयीं कृष्ण, भीमसेन व अर्जुन याणीं केलेलें कर्म कोणीही चांगलें ह्मणत नाहीं. या कृष्णानें छद्मरूपानें ब्राह्मणां सारखा कपटवेष धरून आडमार्गानें जरासंधाच्या पुरींत प्रवेश करून त्याचा प्रभाव काय आहे तो सर्व पाहिला. नंतर धर्मात्मा जो जरासंध याणें दुरात्म्या कृष्णाचें कपट जाणून त्यास पाद्य दिलें तें त्याणें ग्रहण केलें नाहीं. तसेंच कृष्ण, भीम, धनंजय यांस भोजन करा ह्मणून सांगितलें, परंतु कृष्णानें वैरभाव दाखविण्या करितां तें मान्य केलें नाहीं. हे मूर्खा, या कृष्णास जगताचा कर्ता असें तूं ह्मणतोस तर हा आत्मरूप आच्छादन करून हें कर्म कसें केलें आणि अशाचें तूं स्तवन करतोस हें मला आश्चर्य वाटतें. तूं पांडुपुत्रांस सत्धर्मापासून मुक्त केलेंस तेच तुला साधु वाटतील यांत संशय नाहीं. तूं स्वतः वृद्ध व स्त्रीधर्मी असून पांडवांचा सर्वार्थ प्रदर्शकही तूंच आहेस त्या पेक्षां हें कृत्य केलेंस त्याचें कांहींच आश्चर्य नाहीं. असें शिशुपालाचें रूक्ष व कठोर भाषण श्रवण करून महाबलवान् भीमसेन यास परम कोप येऊन त्याचे नेत्र स्वभावतः कमलपत्रासारखे प्रफुल्लित असून विस्तृत असल्यामुळें क्रोधानें ते फारच आरक्त दिसूं लागले. स्वर्ग, मृत्यु, पातालीं गमन करणारी जी गंगा ती त्रिकूट पर्वतावर आली असतां जशी शोभत्ये तशी भीमसेनाच्या ललाटीं त्रिशिख झालेली भ्रुकुटी सर्व राजानीं पाहिली. भीमसेन क्रोधें करून दांत चावीत असतां त्याचें मुख प्रलयकालींच्या काळा सारखें दिसूं लागलें. वेगें करून भीमसेन शिशुपालावर उड्डाण करितो हें भीष्मानीं पाहून त्याचें निवारण केलें. नंतर द्रोणाचार्यानीं नानाप्रकारच्या वाक्यें करून त्याचें सांतवन केलें. तेव्हां तो शांत होऊन भीष्माच्या वाक्याचें अतिक्रमण न करितां उभा राहिला. आणि भीमसेन क्रुद्ध झाला हें पाहून शिशुपाल भीमसेनास न मानितां भाषण करूं लागला कीं, हे भीष्मा तूं त्यास सोड, सोड. अग्नीमध्यें पतंग जसा दग्ध होऊन पडतो तसा हा भीमसेन माझ्या प्रभावें करून दग्ध झालेला सर्व राजे पाहतील. असें शिशुपालाचें भाषण श्रवण करून कौरव श्रेष्ठ महाबुद्धिमान् भीष्म भाषण करितात. असा विषय या अध्यायांत आहे.

४३. अध्याय त्रेचाळिसावा.- भीष्म भाषण करितात हे भीमसेना, हा शिशुपाल चेदीराजाचे कुलांत ज्या काळीं उत्पन्न झाला त्या काळीं यास तीन नेत्र व चार भुज होते. याणें उत्पन्न होतांच गर्दभाच्या शब्दा सारखा मोठ्यानें शब्द केला तेव्हां त्या शब्दानें त्याचे मातापितर, इष्ट, मित्र, त्रस्त होऊन व हा विलक्षण स्वरूपी आहे याचा त्याग करावा अशी इच्छा केली. त्या काळीं स्त्रिया अमात्य व पुरोहित यां सहवर्तमान राजा चिंतेंत निमग्न झालेला पाहून आकाशवाणी झाली कीं, हे राजा हा तुझा पुत्र श्रीमान् व बलें करून अधिक असा उत्पन्न झाला आहे. या करितां या पासून तूं भय पावूं नकोस. आणि व्यग्र न होतां या शिशूचें रक्षण कर. याचा मृत्युकाळ सांप्रत काळीं प्राप्त झाला नाहीं. याला शस्त्रें करून मारणारा असा एक मृत्यु उत्पन्न झाला आहे. या प्रकारें आकाशांत शब्द झाला तेव्हां त्याची माता पुत्रस्नेहानें संतप्त होऊन भाषण करूं लागली कीं, ज्या भूतानें माझ्या पुत्रा विषयीं हें भाषण केलें त्याला मी नमस्कार करितें. तो देव असो किंवा अन्य कोणी असो. या पुत्राचा मृत्यु कोण आहे तो त्याणें मला यथातथ्य सांगावा असें मातेनें भाषण केलें असतां पुनः आकाशवाणी झाली कीं, ज्याच्या मांडीवर या पुत्राला ठेवतांच दोन अधिक भुज आहेत ते पृथ्वीवर पडतील. व ज्याच्या दर्शनमात्रें करून ललाटाचे ठायीं तृतीयनेत्र आहे तो नाहींसा होईल. तो पुरुष याचा मृत्यु असें जाण. पुढें चेदीराजास तीन नेत्रांचा व चार भुजांचा पुत्र झाला हें वर्तमान श्रवण करून पृथ्वीवरील सर्व राजे त्यास पाहावयाच्या इच्छेनें आले असतां चेदीराज यथायोग्य त्या सर्व राजांचें पूजन करून एक एक राजाच्या मांडीवर त्या पुत्रास देऊन सहस्त्रावधि राजांच्या मांडीवर त्या पुत्रास दिलें, तथापि आकाशवाणी झाल्या प्रमाणें निदर्शनास आलें नाहीं. हें वर्तमान द्वारकेमध्यें महाबलवान संकर्षण व जनार्दन यांणीं श्रवण करितांच आपल्या पितृस्वसे (आते) च्या दर्शनाच्या इच्छेनें चेदीपुरास आले नंतर चेदी राजास व त्याचे भार्येस नमस्कार करून कुशलप्रश्न करीत बसले असतां चेदीराजानेंही उभयतांची परम प्रीतीनें पूजा केली नंतर राजपत्नीनें त्या बाळकास दामोदराच्या मांडीवर ठेवतांच त्यास

अधिक दोन भुज होते ते गळून पडले. व ललाटीं तृतीय नयन होता तो अदृश्य झाला. हें कृत्य राजपत्नीनें पाहतांच अत्यंत व्यथित होऊन कृष्णास बोलली कीं, हे महाभुज कृष्णा, तूं आर्त व भयानें त्रस्त झालेल्याचा अभय दाता आहेस, यास्तव मी भयार्त झाल्यें आहें. मला वरप्रदान असावें. असें राजपत्नीचें भाषण श्रवण करून यदुनंदन श्रीकृष्ण भाषण करितो. हे धर्मज्ञे, हे देवि, तूं भिऊं नको. हे पितृभगिनी माझ्या पासून तुला भय नाहीं. तुला वर कोणता देऊं? देण्या सारखा असो किंवा नसो तुझें वाक्य मी मान्य करीन. असें श्रीकृष्णानें भाषण केलें असतां राजपत्नि बोलल्यें हे कृष्णा तूं माझ्या करितां शिशुपालाचे अपराध क्षमा करावे हाच वर मीं मागत्यें. असें भाषण ऐकून श्रीकृष्ण बोलतात हे पितृष्वसे, मी शिशुपालाचे शंभर अपराध सहन करीन. तूं आपल्या मनामध्यें शोक करूं नको. भीष्म म्हणतात हे भीमसेना, हा मंदबुद्धि व पापी शिशुपाल गोविंदाच्या वरप्रदानें करून गर्वित झाल्यामुळें तुला युद्धाकरितां आव्हान करितो. असा विषय या अध्यायांत आहे.

४४. अध्याय चोवेचाळीसावा:- भीष्म भाषण करितात हे भीमा, चेदिपति जो शिशुपाल याची ही बुद्धि नव्हे. जिच्या योगानें कृष्णास आव्हान करितो हा कृष्णाचाच निश्चय आहे. पृथ्वीतलावर जो पार्थिव माझा तिरस्कार करील तो कालानें ग्रस्त झाला असें समजावें. जसा हा पापी शिशुपाल कृष्णाचा तिरस्कार करितो तसा कोणी करीत नाहीं. हे भीमसेना, आज श्रीहरी आपला तेजोरूप अंश ग्रहण करण्याची इच्छा करितात. ज्या तेजें करून हा शिशुपाल सिंहासारखी गर्जना करून आमची गणना करित नाहीं तें त्याचें तेज आज कृष्ण हरण करील. हें भीष्माचें भाषण शिशुपालास सहन न झाल्यामुळें तो परम क्रुद्ध होऊन भाषण करितो. हे भीष्मा जसे बंदिजन स्तवन करितात तसा केशवाचा प्रभाव तूं आमच्यापुढें वर्णन करितोस. हे भीष्मा, जर तुला दुसऱ्याची स्तुति करण्याची इच्छा आहे तर कृष्णावांचून हे इतर महान् महान् राजे सभेंत बसले आहेत यांचें स्तवन कर. हा बाल्हीक देशाचा राजा उत्पन्न होतांच पृथ्वीचें विदारण केलें त्याचें तूं स्तवन कर. हे भीष्मा, अंगवंग देशाधिपति बलाविषयीं इंद्रा सारखा महाधनुष्य आकर्षण कर-

णारा, दिव्यकुंडलें व कवच ज्यास जन्मतांच उत्पन्न झालीं. बालसूर्या सारखी कांती ज्याची, इंद्रासारखा पराक्रमी व अतिदुर्जय जो जरासंध यास बाहुयुद्धें करून ज्याणें जिंकिला असा पराक्रमी जो कर्ण याचें तूं स्तवन कर. द्रोणव अश्वत्थामा हे पितापुत्र अथवा नानाविध देशांतून आलेले राजे हे सभेमध्यें बसले आहेत यांचें तूं स्तवन कर. कृष्णाचें स्तवन करण्या विषयीं तुझी बुद्धि सार्वकाल कशी प्रवृत्त होत्ये? तूं या कृष्णाचें स्तवन करण्याची इच्छा करितोस परंतु हें तुझें भाषण कोणी मान्य करीत नाहींत. हा कृष्ण भोजकुलांत उत्पन्न होऊन गाईचें पालन करीत असतां या दुष्टात्म्याचे ठायीं तूं आपल्या मनें करूनच सर्व जगताचा समावेश करितोस. अरे, तुझी बुद्धि अद्याप प्रकृतीवर येत नाहीं कीं काय? पूर्वीं मीच तुला भूलिंगनामक पक्ष्याची कथा सांगितली आहे तीलक्ष्यांत आण. हे भीष्मा, तूं त्या सारखें भाषण करितोस; हें तुझें भाषण श्रवण करून सकल राजे तुझी उपेक्षा करितात म्हणून तूं जीवंत राहिला आहेस. तुझ्या सारखा लोकांशीं द्वेष करणारा असा अन्य पुरुष कोणी मी पाहिला नाहीं. वैशंपायन सांगतात हे जन्मेजया, असें शिशुपालाचें कटु भाषण श्रवण करून महा प्रतापी भीष्म भाषण करितो. हे सकल राजे माझी उपेक्षा करितात म्हणून मी जीवंत राहिलों असें तूं भाषण करितोस; परंतु या सकल राजांस मीं तृणासमान मानून कोणाचीही गणना करीत नाहीं असें भीष्माचें भाषण श्रवण करून सकल राजे आक्रोश करूं लागले. त्यामध्यें कांहीं राजांस आनंद झाला. कांहीं राजे भीष्माची निंदा करूं लागले. कांहीं राजे भीष्मवाक्य श्रवण करून बोलूं लागले कीं, हा भीष्म पापी गर्विष्ठ व वृद्ध आहे याची उपेक्षा करणें योग्य नाहीं. या दुष्टबुद्धि भीष्मास पशूसारखा मारावा किंवा सर्वांनीं एकत्र होऊन आवेशानें यास तृण बांधून अग्नीमध्यें दग्ध करावा असें सर्व राजांचें भाषण श्रवण करून भीष्म बोलतात हे राजेहो, युक्तीप्रयुक्तींचा अंत लागणार नाहीं म्हणून मीं आतां जें भाषण करितों तें श्रवण करा. माझा पशूसारखा घात करा. अथवा अग्नीमध्यें माझें दहन करा; परंतु मी आपला पाद सर्वांचे मस्तकावर ठेविला आहे हा माझा सफलच आहे. आम्हीं गोविंदाची पूजा केली हें ज्यास सहन होत नसेल त्यानें या चक्रगदाधर श्रीकृष्णास आप-

ल्या मरणा करितां युद्धाविषयीं आव्हान करावें जो या श्रीकृष्णाचे हातून मरण पावेल तो याचे देहांत प्रविष्ट होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

४५. अध्याय पंचेचाळिसावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीष्माचें भाषण श्रवण करून महापराक्रमी शिशुपाल वासुदेवाशीं युद्ध करण्याचे इच्छेनें श्रीकृष्णास बोलला कीं, हे जनार्दना, मजसहवर्तमान युद्ध करण्याकरितां तुला मीं आव्हान करितों. जो कालपर्यंत पांडवांसहवर्तमान तुझा मी वध करीन, तो कालपर्यंत तूं माझ्याशीं युद्ध कर. हे कृष्णा, तुजसहवर्तमान हे पांडव मला वध्य आहेत हें तूं निश्चयें करून सत्य जाण. अरे हे सकल राजे प्राप्त झाले आहेत यांचें अतिक्रमण करून तूं राजा नसतां तुझी पूजा पांडवांनीं केली काय? तूं दास आहेस. तूं राजा नव्हेस पूजा करण्यास तुला योग्यता नाहीं तूं दुर्मति आहेस यास्तव जे कोणी अज्ञानानें तुझी पूजा करतात त्यांचा मीं वध करणार. या प्रकारें शिशुपालानें गर्जना करून भाषण केलें असतां श्रीकृष्ण मृदुपूर्वक असें भाषण करतात कीं हे पार्थिव हो, तुमच्या समक्ष मीं भाषण करितों हें तुह्मीं श्रवण करा. हा शिशुपाल आमचा शत्रु आहे व हा सात्वत कुळाचा द्वेष करणारा आहे. आह्मीं प्राक्ज्योतिषपुरीं गेलों असें या दुष्टास समजतांच हा वसुदेवाचा भाचा असतां याणें आमची द्वारकापुरी दग्ध केली. पूर्वी रैवतक पर्वतीं भोजराजा कांहीं पुरुषां सहवर्तमान क्रीडा करण्यास गेला असतां त्यास मारून व त्याचें बंधन करून आपल्या पुरामध्यें गेला. आमच्या पित्यानें पूर्वी अश्वमेध करितांना अश्वासमागमें बहुत रक्षणकर्ते योद्धे देऊन अश्व पृथ्वीवर सोडिला असतां या दुष्टानें अश्वास मारून यज्ञास विघ्न केलें. बभ्रुनामक यादवाची भार्या हस्तनापुरापासून सौवीर देशीं येण्यास निघाली असतां या दुष्टात्म्यानें बलात्कारें करून तिचें हरण केलें. या दुष्टानें करुष राजाचा वेष धरून विशालपुरनिवासी राजाची कन्या भद्रानामक होती तिचें हरण केलें. तो राजा याचा मातुल होय. आह्मीं आपल्यापितृष्वसे करितां इतकें दुःख सोसून याच्या अपराधाची क्षमा केली. आज सर्व राजांचे सन्निध हा प्रसंग प्राप्त झाला आहे. याणें माझी कितो अमर्यादा केली हें तुह्मीं सकल राजे अवलोकन करीतच आहां. माझ्या परोक्ष याणें जे पूर्वी अपराध

केलें ते तुह्मांस मी निवेदन केलें. परंतु आज जी याणें माझी अमर्यादा केली ती मी क्षमा करणार नाहीं. या सकल राजमंडला मध्यें हा वध करण्यास योग्य आहे. पूर्वीं या दुष्टानें रुक्मिणी प्राप्त होण्याची इच्छा केली होती परंतु जसा वेद शूद्राचे श्रुतिगत होत नाहीं तशी ती रुक्मिणी या मूढास प्राप्त झाली नाहीं या प्रकारें वासुदेवाचें भाषण सकल राजानीं श्रवण करितांच ते चेदिराजाची निंदा करूं लागले. शिशुपाल तें कृष्णाचें भाषण श्रवण करून उच्च स्वरानें हास्यपूर्वक भाषण करितो. कृष्णा, रुक्मिणीच्या पित्रादिकानीं मला पूर्वीं ही कन्या देण्याचा निश्चय केल्या वरून तिला मी वरली होती हें वर्तमान तूं या सभे मध्यें कथन करितोस काय? विशेषें करून या राजसमुदायामध्यें हें कथन करण्यास तुला लज्जा कशी वाटत नाहीं? दुसऱ्यानें हरण केलेल्या स्त्रीचा परिग्रह करून थोर लोकां मध्यें आपली प्रतिष्ठा वर्णन करणारा पुरुष तुझ्या वांचून अन्य मला कोणी दिसत नाहीं. बरें पितृस्वसेच्या वाक्यावर तुझी श्रद्धा आहे तर माझी क्षमा कर, अथवा न कर. तूं जरी क्रुद्ध झालास अथवा प्रसन्न झालास तथापि माझें काय करणार आहेस? या प्रकारें शिशुपालाचें भाषण श्रवण करून मधुसूदनानें आपले मनामध्यें दैत्यसमुदाय मर्दन करणारें जें चक्र याचें मनामध्यें चिंतन करून तें चक्र हस्तगत होतांच श्रीभगवान् सकल राजाप्रत भाषण करितो. कीं, हे महीपालहो आजपर्यंत मी याची क्षमा कां केली त्याचें कारण सांगतों श्रवण करा. या शिशुपालाच्या मातेनें मजपाशीं क्षमा मागितली होती म्हणून मी तिजला सांगितलें होते कीं, मी शिशुपालाचे शंभर अपराध क्षमा करीन. पुढें अपराध झाले असतां वध करीन. ते याचे शत अपराध आज पूर्ण झाले. आतां तुह्मी सकल क्षत्रिय पहात असतां याचा मी वध करितों असें भाषण करून श्रीकृष्णानें तत्क्षणीं शिशुपालाचें शिर चक्रानें तोडिलें असतां तो महाबाहु वज्राहत झालेल्या पर्वतासारखा पतन पावला. नंतर सकल राजे पहात असतां जसें भास्कर तेज गगनामध्यें व्यापक दिसतें तसें शिशुपालाच्या शरीरा पासून महा तेज उत्पन्न होऊन कृष्णाच्या चरणांस वंदन करून त्याच्या शरीरांत प्रविष्ट झालें. हें कृत्य सकल राजे अवलोकन करितांच कांहीं अद्भुत आहे असें समजले. तेज ज्या

कालीं कृष्णाच्या शरीरांत प्रविष्ट झालें त्या कालीं अभ्र नसतां पर्जन्य पडूं लागला. जाज्वल्यमान् असे वज्रपात होऊं लागले. वसुंधरा कंपायमान झाली. त्या कालीं सकल राजांस भय उत्पन्न होऊन कृष्णाकडे पाहात, कांहीं भाषण न करितां स्वस्थ बसले. कोणी हस्तानें हस्ताचें मर्दन करूं लागले. कोणी क्रोधानें मूर्छित होऊन दंतानें ओष्ठाचें चर्वण करूं लागले. कोणी एकांतीं कृष्णाची प्रशंसा करूं लागले. कोणी महर्षि हर्षित होऊन केशवाच्या संनिध गेले आणि त्याची स्तुति करूं लागले. कोणी ब्राह्मण व माहात्मे महाबली असे राजे कृष्णाचा पराक्रम पाहून त्याची बहुतां प्रकारें स्तुति करून निवृत्त झाले. नंतर धर्मराजानें आपले भ्रात्यांस आज्ञा केली कीं, शिशुपालाचा संस्कार करावा. अशी आज्ञा होतांच त्याचा संस्कार करविला. नंतर धर्मराजानें सकल पार्थिवां सहवर्तमान त्याचे पुत्रास राज्याभिषेक केला. वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा या प्रकारें धर्मराजाचा यज्ञसमारंभ सर्व समृद्धीनें युक्त झाला. सर्वांस यज्ञामध्यें आनंद झाला. तरुणांस अत्यंत प्रीति झाली. या यज्ञांत जें विघ्न आलें होतें तें शांत झालें. या यज्ञाचा आरंभ सुखकारक झाला. धनधान्य, अन्न, भक्ष्य, भोज्य यांची विपुलता झाली. या यज्ञाचें रक्षण कर्त्ता श्री जनार्दन होय. आरंभा पासून समाप्ती पर्यंत राजसूय यज्ञाचें रक्षण शार्ङ्गचक्र गदाधर जो श्री भगवान् जनार्दन यांणीं केलें. अवभृथस्नान झाल्या नंतर सकल राजां सहवर्तमान युधिष्ठिर राजा यज्ञगृहीं आल्यावर सर्व राजे युधिष्ठिरास भाषण करितात कीं, हे धर्मज्ञा धर्मराजा, दैवानें तूं वृद्धि पावलास, साम्राज्य योग्यता आज तुला प्राप्त झाली. आज तूं स्वकीय कुलाच्या यशाची वृद्धि केलीस. अरे, तूं राजसूय क्रतुनामक मोठें कर्म संपादन केलेंस. या यागांत तूं आमचा सत्कारही चांगला केलास. आम्ही सर्वही यथेच्छेनें तृप्त झालों. आतां तुझी आज्ञा ग्रहण करून आम्ही आपल्या राष्ट्रांत जातों. या प्रकारें सकल राजांचें भाषण श्रवण केल्या नंतर युधिष्ठिर त्या सर्वांची यथायोग्य पूजा करून आपल्या भ्रात्यांशीं भाषण करूं लागला. कीं, हे सकल राजे परम प्रीतीनें आपले गृहीं यज्ञसमारंभा करितां आले ते आपल्या देशीं जाण्या करितां माझी आ-

ज्ञा ग्रहण करण्यास आले आहेत यास्त त्यांस पोंचविण्या करितां तुह्मीं आपल्या देशमर्यादे पर्यंत सर्वांनीं जावें असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून सर्वांस पोंचविण्या करितां यथायोग्यते प्रमाणें एक एका समागमें गेले. सहस्रावधि ब्राह्मणांची धर्मराजानें पूजा करून ते सर्व गेल्या नंतर महाप्रतापी वासुदेव धर्मराजास ह्मणाला कीं, हे कुरुनंदना, तुझी आज्ञा ग्रहण करून द्वारकेस जाण्याची सिद्धता करितों. सर्व क्रतूंमध्यें श्रेष्ठ जो राजसूयक्रतु तो तुझ्या दैवें करून समाप्त झाला. फार चांगलें झालें. असें श्रीकृष्णाचें भाषण श्रवण करून धर्मराज भाषण करितो. हे गोविंदा तुझ्या प्रसादें करून हा क्रतुश्रेष्ठ मला प्राप्त झाला. तसाच हा समस्त क्षत्रियसमुदाय तुझ्या प्रसादानें मला वश्य होऊन व करभार देऊन येथें आला तेव्हां हे अनघा तुजला गमनाचे आज्ञे विषयीं माझी वाणी कशी प्रवृत्त होईल? हे वीर, तुझ्या वांचून मला चैन पडावयाचें नाहीं आणि तुला तर अवश्य द्वारकेस गमन कर्तव्य आहे असें भाषण करून धर्मराज कृष्णास पोंचविण्या करितां निघाला असतां त्यास समागमें घेऊन श्रीकृष्ण प्रथम कुंतीकडे जाऊन भाषण करिता झाला कीं, हे पितृष्वसे तुझे पुत्र साम्राज्य पदातें पावले. आतां मी तुझी आज्ञा घेऊन गमन करितों. असें एथेसह वर्तमान भाषण करून तेथून सुभद्रा व द्रौपदी यांजकडे आला आणि त्यांचा संतोष करून पुढें धर्मराजासहवर्तमान त्या पुरा पासून निघण्यास उद्युक्त झाला असतां प्रथम स्नान व जप करून सकल ब्राह्मणांचा आशीरवाद घेतला. इतक्यांत गरुडचिन्हित ध्वजानीं युक्त मेघा सारखी गर्जना करणारा जो रथ तो दारुकानें सिद्ध करून श्रीकृष्णाच्या अग्रभागीं आणिला तेव्हां श्रीकृष्ण त्या रथास प्रदक्षिणा करीत आरूढ होऊन द्वारकेस जाण्यास निघाले. त्या कालीं त्यास पोंचविण्या करितां भ्रात्यांसह धर्मराज पादचारीच जाऊं लागला. हें श्रीकृष्णानीं अवलोकन करितांच आपला रथ मार्गांत उभा करून धर्मराजास भाषण करूं लागला कीं, हे युधिष्ठिरा हे विशांपते, निरंतर अप्रमत्त होऊन सकल प्रजांचें संरक्षण कर. पर्जन्या पासून सकल भूतांचें जसें उपजीवन होतें तसेंच महाद्रुमाच्या मागें सकल पक्षी जसे उपजीवन करितात, सहस्राक्षा मुळें सकल देव जसे उपजीवन पावतात तसे तुझे भ्राते

तुझ्यामुळें उपजीवन पावोत या प्रकारें श्रीकृष्ण आणि धर्मराज यांचें संभाषण झाल्या नंतर एकमेक परस्पर आज्ञा ग्रहण करून आप आपल्या स्थानीं गेले. श्रीकृष्ण द्वारकेस गेल्या नंतर दुर्योधन राजा व शकुनी हे उभयतां मात्र धर्मराजाची दिव्य, अप्रतिम सभा पाहण्याच्या हेतूनें तेथेंच राहिले. असा विषय या अध्यायांत आहे.

४६. अध्याय शेचाळिसा: वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सर्व क्रतूंमध्यें श्रेष्ठ सुखानें प्राप्त होण्यास अशक्य असा राजसूययाग समास झाल्या नंतर व्यास आपल्या शिष्यांसहवर्तमान धर्मराजाच्या अग्रभागीं आले. तेव्हां भ्रात्यांसहवर्तमान धर्मराजानें पितामह व्यासाचें पाद्यादिक पूजन करून कांचनासनावर बसविलें असतां व्यासानीं धर्मराजास आज्ञा देतांच धर्मराजही भ्रात्यांसहवर्तमान आपले आसनावर बसला. त्या कालीं भगवान् व्यास भाषण करितात हे कौंतेया दुर्लभ जें साम्राज्यपद तें दैवें करून तुला प्राप्त झालें. तुझ्या योगानें सर्व कुरुसंबंधि पुरुष वृद्धि पावले हें फार चांगलें झालें. हे राजा आतां तुला विचारून आह्मीं जातों. तूं आमचा बहुत सत्कार केलास असें भाषण श्रवण करून धर्मराज, पितामह व्यासास अभिवादन करून भाषण करितो कीं, हे व्यासा तुह्मीं सकल मनुष्यांमध्यें श्रेष्ठ आहांत त्या पेक्षां मला एक मोठा संशय उत्पन्न झाला आहे, त्या संशयाचें निराकरण तुह्मां वांचून दुसरा कोणी करणार नाहीं यास्तव मी आपणास प्रश्न करितों त्याचें उत्तर मला सांगा? दिव्य उत्पात ह्मणजे वज्रपातादिक, अंतरिक्ष उत्पात ह्मणजे धूमकेतु प्रभृति, पार्थिव उत्पात ह्मणजे भूकंपादिक असे हे तीन उत्पात नारदऋषीनीं सांगितले आहेत तेव्हां आज चैद्याचें पतन होतांच हे महान् उत्पात शम पावले हें काय? या प्रकारें धर्मराजाचें भाषण श्रवण करून व्यास भाषण करितात हे राजा उत्पाताचें महत् फल तेरा वर्षे पर्यंत होईल. हे राजा पुढें सकल क्षत्रियांचा विनाशकाल आला आहे. कांहीं कालांत या क्षत्रियांच्या नाशास तूं कारणीभूतमात्र होशील परंतु दुर्योधनाच्या कांहीं अपराधांमुळें भीम व अर्जुन आपल्या बलानें क्षत्रियांचा क्षय करतील. तूं आज रात्रीच्या समाप्तीस स्वप्नामध्यें वृषध्वज नीलकंठ वृषभावर आरूढ होऊन

निरंतर दक्षिण दिशा पहातो आहे असा पाहशील. हे धर्मराजा असें स्वप्न जरी तूं पाहिलेंस तथापि त्या विषयींचा कांहीं अनुध्यास करूं नको. अतःपर दुरतिक्रम असा काळच प्राप्त होईल. आतां तुला आमचा आशीर्वाद असो. आह्मीं कैलास पर्वतीं गमन करितो. तूं निरंतर अप्रमत्त (सावध) दांत (इंद्रियदमन) होऊन पृथ्वीचें परिपालन कर असें भाषण करून भगवान् व्यास शिष्यगणांसहवर्तमान कैलासपर्वतीं गेला. नंतर धर्मराज श्वासोच्छ्वास टाकून मनांत असें चिंतन करूं लागला कीं, पौरुषें करून दैवास प्रतिबंध कसा होइल? तेव्हां महर्षि व्यासानीं जें सांगितलें तें असत्य व्हावयाचें नाहीं. असा निश्चय करून भ्रात्यांस भाषण करितो कीं, कांहीं काळानें सर्व क्षत्रियांच्या नाशास तूं कारण होशील असें व्यासांचें वाक्य श्रवण करून मी आतां मरणा विषयीं निश्चय केला आहे. ज्या पेक्षां सकल क्षत्रिय राजे माझ्या करितां मरण पावणार त्या पेक्षां मी वांचून काय फळ आहे! असें ऐकून अर्जुन भाषण करितो हे धर्मराजा, बुद्धीचा नाश करणारा असा तुला मोह झाला आहे त्याचा त्याग करून विचारपूर्वक जें तुला चांगलें वाटेल तें कर. असें भाषण श्रवण करून सत्यधृति धर्मराजा व्यासाचें वाक्य मनांत ठेऊन ह्मणतो कीं, हे भ्राते हो, तुमचें कल्याण असो. आजपासून मी जी प्रतिज्ञा करणार ती सर्वांनीं श्रवण करावी. आतां तेरा वर्षे पर्यंत जीवंत राहून काय फळ आहे? अस्तु आजपासून मी आपल्या भ्रात्यांस अथवा इतर राजांस कठोर वाणीनें कधींही भाषण करणार नाहीं. मी आपल्या ज्ञातीच्या आज्ञेमध्यें राहून ते जसें सांगतील तसें आचरण करीन. जसे माझे पुत्र तसेच इतर जन असें मानीन. भेदबुद्धि मानणार नाहीं. ती कलहास कारण आहे. यास्तव प्रिय असेल तेंच माझें सत्य भाषण तुह्मीं श्रवण करा. असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून जेणें करून धर्मराजाचें हित होईल असें ते वर्तूं लागले. या प्रकारें धर्मराजा सकल सभे मध्यें प्रतिज्ञा करून नंतर यथान्यायें पितर व देव यांचें तर्पण करून सर्व राजे आपआपल्या देशीं गेल्यावर सकल भ्राते व अमात्य यांसह वर्तमान आपले नगरांत प्रविष्ट झाला. दुर्योधन आणि शकुनी धर्मराजाची सभा पाहून तेथेंच राहिले. असा विषय या अध्यायांत वर्णन केला आहे. अध्याय ४६ समा०

४७. अध्याय सत्येचाळिसावा:- वैशंपायन सांगतात हे जन्मेजय राजा, दुर्योधन धर्मराजाच्या सभेमध्यें रहात असतां कोणे एके दिवशीं ती धर्मराजाची समग्र सभा पहावी या हेतूनें दुर्योधन शकुनीसहवर्तमान त्या सभेमध्यें फिरतां फिरतां नाना प्रकारचे फार चमत्कारिक सभेंतील दिव्य पदार्थ व देवादिकांसारखीं चित्रविचित्र क्रीडास्थानें पाहिलीं. अशीं हस्तनापुरींत पूर्वी त्याणें कधींही पाहिलीं नाहींत. त्या सभेमध्यें स्फटिकमय एक फार सुंदर स्थल केलें होतें. तें दुर्योधनानें पाहतांच मोहित होऊन हें जलच आहे अशा संशयानें आपलें नेसलेलें वस्त्र उचलून त्या स्थलावर जातांच पडला. पुढें तसाच ती सभा पहात पहात एक पुष्करिणी स्फटिकासारख्या स्वच्छ जलानें युक्त व कमलानीं अत्यंत सुशोभित होती. हें पाहून हें स्थळच आहे असें त्यास वाटून पुढें जातांच त्या वापीमध्यें वस्त्रांसहवर्तमान पडला. हें भीमसेनानें व त्याच्या सेवकानीं अवलोकन करितांच हास्य करूं लागले. नंतर धर्मराजाचे आज्ञेवरून भृत्यानीं दुर्योधनास दुसरीं उत्तमवस्त्रें नेसावयास दिलीं. अर्जुन, नकुळ व सहदेव या सर्वांनीं त्या काळीं हास्य केलें. हें दुर्योधनानें पाहून त्यास फारच क्रोध आला; परंतु आपला कोप बाहेर सर्वांस व्यक्त न दिसूं देतां संतोष दाखवून सभा पहात चालला. पुढें एक स्थल होतें, तें पाहून जलाचे शंकेनें आपलें वस्त्र पुनः ऊर्ध्व धारण केलें हें अवलोकन करून पुनः सर्व लोक हास्य करूं लागले. पुढें जातां जातां एक स्फटिकाचें द्वार होतें तें द्वार दुर्योधनास उघडें आहे असें वाटून त्या द्वारानें बाहेर जाऊं लागला असतां तें द्वार मस्तकास लागून जीव व्याकुळ झाला. तसेंच पुढें एक स्फटिकाचें द्वार होतें तें द्वार आहे असें समजून उघडण्यास गेला, तों हात निसटून पुढें पडला. हें द्वार रक्षकानीं पाहतांच हास्य करूं लागले. असे दुर्योधनाचे बहुत उपहास झाल्यामुळें त्याचे मनांत आलें कीं, पांडवानीं आपली वंचना बहुत केली. नंतर दुर्योधन पांडवांची आज्ञा घेऊन हस्तनापुरीं गेला. राजसूय यागामध्यें पांडवांची अपार संपत्ति पाहून त्याचें मन वीरून गेलें. आणि निरंतर संतप्त होऊन पांडवां विषयीं कांहीं पापात्मक मति धरून सकल राजे पार्थास अनुकूल होऊन हें महत्कृत्य पांडवानीं केलें व पांडवांचा महिमा वृद्धिंगत झाला हें पाहून दुर्यो

धन विवर्ण झाला. मार्गांत चालतां चालतां एकाग्र मनें करून ती सभा व पां-डवांची प्रतापम्य संपत्ति मनांत आणून भ्रमिष्ट झाला. शकुनीनें वारंवार भाषण केलें असतां त्याजवर कांहीं उत्तर न देतां स्वस्थ बसला. अशी व्यग्र स्थिति दुर्योधनाची पाहून शकुनि भाषण करितो हे दुर्योधना, तूं श्वासोच्छ्वास टाकीत चालतोस याचें कारण काय? असें शकुनीचें भाषण श्रवण करून दुर्योधन भाषण करितो हे मातुला ही सकल पृथ्वी अर्जुनानें आपल्या अस्त्रप्रतापें करून जिंकिली व धर्मराजास वश करून दिली. जसा देवांमध्यें महद्युतिमान् शक्राचा याग होतो तसा युधिष्ठिराचा राजसूय याग झाला. अशी पांडवांची संपत्ति पाहून मी रात्रंदिवस संतप्त झालों. ती संपत्ति मला सहन होत नाहीं. ग्रीष्म ऋतूमध्यें जसें अल्प उदक शुष्क होतें तसा मीं शुष्क होत चाललों. कृष्णानें शिशुपालास मारून पृथ्वीवर पाडिलें असतां त्या सभेमध्यें कोणीही राजानीं आपलें पाऊल पुढें केलें नाहीं. पांडवांच्या तेजानें सर्व राजे दह्यमान (दग्ध) झाल्यासारखे होऊन कृष्णाचे अपराधांची क्षमा केली. मला असें वाटतें कीं, वासुदेवानें जें अयोग्य कर्म केलें तें पांडवांचे प्रतापामुळें सिद्धीस गेलें. जसे वैश्यजन कर देतात तशीं सकल राजानीं नाना प्रकारचीं रत्नें समागमें आणून धर्मराजास दिलीं. अशा प्रकारची पांडवांची जाज्वल्यमान् संपत्ति पाहून मला सहन न झाल्यामुळें क्रोधाचे स्वाधीन झालों. तस्मात् हे मातुला मीं असा निश्चय केला आहे कीं, हें दुःख मला ज्या पेक्षां सहन होत नाहीं त्या पेक्षां अग्नीमध्यें प्रवेश करावा. विष भक्षण करावें, अथवा जलांत बुडावें; परंतु अतःपर जीवंत राहूं नये. आपला शत्रु वृद्धि पाऊन आपण हीनता पावलों. याचें सहन करणारा असा या लोकीं पुरुष कोणता आहे बरें? प्रस्तुत पांडवांची संपत्ति पाहून मी ज्या पेक्षां सहन करितों त्या पेक्षां स्त्री पुरुष अथवा क्लीब या तिन्हीं अवस्थांपेक्षां मी कमी असें सिद्ध होतें. पांडवांस पृथ्वीचें ईश्वरत्व, द्रव्यप्राप्ति आणि राजसूय याग पाहून माझ्या सारिखा पुरुष कोणाचा संताप करणार नाहीं? बरें काय करूं? मीं स्वतः पांडवांची संपत्ति हरण करण्यास अशक्त पडलों. मला कोणी सहाय्य नाहीं. त्या पेक्षां मृत्यूचें चिंतन करीत आहें. कुंतिपुत्राची मोठी संपत्ति पाहून

मी असा निश्चय केला आहे कीं, दैवच श्रेष्ठ आहे. पौरुषाचा यत्न निरर्थक आहे. या पांडुपुत्रांच्या नाशा विषयीं मीं पूर्वी बहुत यत्न केला परंतु तो सर्व व्यर्थ होऊन कमला सारखे दिवसें दिवस तन्हीच पाऊं लागले. तस्मात् दैवच श्रेष्ठ, पौरुष निरर्थक हें खचित आहे. धृतराष्ट्रपुत्र हीन होत चालले. आणि पार्थ नित्यशः वृद्धिंगत झाले. हे शकुने पांडवांची श्री, अप्रतिम सभा व सकल सेवक जनानीं माझा उपहास केला. हें पाहून अग्नीनें दग्ध झाल्या सारखा जळून गेलों तस्मात् तूं हें वृत्त धृतराष्ट्रास सांग. असा विषय या अध्यायीं आहे.

४९ अध्याय अट्ठेचाळिसावा.- शकुनि भाषण करितो हे दुर्योधना, तूं धर्मराजा विषयीं मत्सर करूं नको. तो निरंतर आपल्या प्रारब्धानेंच संपत्तीचा उपभोग करीत आहे. पांडवांचें प्रारब्ध अनुकूल असल्यामुळें तूं त्यांच्या नाशा विषयीं जरी अनेक उपाय केलेस तथापि ते सर्व व्यर्थ झाले. पहा बरें ते प्रारब्धवान् असल्यामुळें द्रौपदी स्त्री त्यांस प्राप्त होऊन पुत्रासहवर्तमान द्रुपद त्यांस अनुकूल झाला. तसाच भगवान् श्रीकृष्ण त्यांस साहाय्य झाल्या मुळें त्याणीं सकल पृथ्वी स्ववश केली. पित्र्यंश त्यांस लब्ध होऊन ते दिवसें दिवस आपले तेजानें वृद्धि पावले. त्या विषयीं तूं कां खेद करितोस? अर्जुनानें अग्नीस संतुष्ट केलें असतां त्याणें गांडीव धनुष्य व अक्षय्य भाते दिले. तशींच अन्यही बहुत दिव्य अस्त्रें त्यास लब्ध झाल्यामुळें त्याणें त्या आयुधांच्या योगें आपल्या बाहुवीर्यानें सर्व राजे वश केले. आतां त्या विषयीं कां खेद करितोस? अग्निदाहापासून मयासुरास दानवांसहवर्तमान अर्जुनानें मुक्त केलें या मुळें मयासुरानें त्यांस उत्तम प्रकारची सभा करून देऊन तिचें वहन करण्या विषयीं कांहीं राक्षस दिले. आतां त्या विषयीं तूं कां खेद करितोस? हे राजा तूं पूर्वी असें भाषण केलेंस कीं, मी असहाय आहें तर हें तुझें भाषण मिथ्या आहे. अरे, तुझे सकल भ्राते तुझ्या वश आहेत. महाधनुर्धारी महावीर्यवान् असा पुत्रासहवर्तमान द्रोणाचार्य, सूतपुत्र राधेय, महारथी कृपाचार्य बंधूंसहवर्तमान मी व सोमदत्तीराजा हे सर्व तुला साहाय्य असतां ही सकल पृथ्वी तूं जिंकशील. असें शकुनीचें भाषण श्रवण करून दुर्योधन भाषण करितो हे शकुनि, तूं जर मला अनु

मोदन देशील नर त्या अन्य महारथ्यां सहवर्तमान मी पांडवांस जिंकितों.त्यां स जिंकिलें असतां ही पृथ्वी मला वश होईल. आणि हे सर्व राजे, महामोल्य वान् सभा आपल्या स्वाधीन होईल. असें भाषण श्रवण करून शकुनि भाषण करितो. हे दुर्योधना धनंजय,वासुदेव,भीमसेन युधिष्ठिर,नकुळ व सहदेव, पुत्रासहवर्तमान द्रुपद राजा, हे महारथी महाधनुर्धारी कृतास्त्रयुद्ध विषयीं दुर्मद असल्यामुळें संग्रामामध्यें प्राप्त झाले असतां देवगणहीत्यांस जिंकण्या विषयीं समर्थ होणार नाहींत. परंतु युधिष्ठिरास जिंकण्या विषयीं एक उपाय आहे तो सांगतों तूं श्रवण कर. असें भाषण श्रवण करून दुर्योधन भाषण करितो. हे शकुनि सुहृत् व भ्राते यांसहवर्तमान युधिष्ठिर राजा जेणें करून आपल्यास वश होईल असा एकादा उपायसांग असें भाषण श्रवण करून शकुनि बोलतो. हे दुर्योधना,धर्मराजास द्यूत प्रिय आहे परंतु क्रीडा करण्या विषयीं तो जाणत नाहीं व त्यास कोणी द्यूता विषयीं आव्हान केलें असतां माघारा फिरत नाहीं मीतर द्यूतक्रीडे विषयीं कुशल आहें.माझ्या सारिखा द्यूतक्रीडे मध्यें कोणी पुरुष कुशल नाहीं. याज करितां त्यास तूं द्यूतक्रीडा करण्या विषयीं आव्हान केलें असतां मी फांसे टाकून त्यास जिंकीन. आणि त्याचें राज्य व ती प्रदीप्त संपत्ति तुझ्याकरितां हरण करीन. यांत संशय नाहीं. परंतु हें वर्तमान तूं राजा धृतराष्ट्रास निवेदन कर तुझे पित्यानें आज्ञा दिली असतां त्यास मी निःसंशय जिंकीन असें भाषण श्रवण करून दुर्योधन भाषण करितो. हे शकुनि तूंच धृतराष्ट्र राजाकडे जाऊन यथान्याय हें वर्तमान त्यास निवेदन कर. मी निवेदन करण्यास योग्य नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

४९. अध्याय एकुणपन्नावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, धर्मराजाच्या राजसूय महाक्रतूची सर्व शोभा पाहून गांधारीपुत्र दुर्योधन शकुनीसहवर्तमान हस्तिनापुरीं प्राप्त झाल्या नंतर कोणे एके दिवशीं दुर्योधनाच्या पूर्वसंकेतानुरूप शकुनि,धृतराष्ट्रास एकांतीं बसलेला पाहून त्या जवळ जाऊन भाषण करितो. हे महाराजा धृतराष्ट्रा,तुझा पुत्र दुर्योधन विवर्ण व कृश होऊन चिंतेनें दीन झाला आहे. हें तुला कसें श्रुत नाहीं ? शत्रूपासून

कोणत्या कारणानें तुझ्या पुत्रास ह्रच्छोक झाला याची समर्पक परीक्षा तूं कां करीत नाहींस? असें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र दुर्योधनास बोलतो. हे दुर्योधना, तूं कशाकरितां अत्यंत पीडित होतोस तें कारण सांगण्या सारखें असेल तर मला सांग? हे पुत्रा मी सर्व ऐश्वर्य तुलाच दिलें आहे. सकल बंधु, व सुहृज्जन कोणी तुझें अप्रिय करीत नाहींत. तूं उत्तमोत्तम वस्त्रांचा उपभोग करितोस. मांसमय अन्नाचें भक्षण करितोस. जातीवंत अश्व तुला वहन करितात. असें असून तूं कोणत्या कारणानें पांडूर वर्ण कृश झालास. हे दुर्योधना, महायोग्य शयनस्थानें मनोरम स्त्रिया, सकल गुण संपन्न गृहें, तशींच नाना प्रकारचीं देवा सारखीं विहार स्थानें तुला असतां व सकल जन तुझ्या वाणीचे ठायीं बद्ध असतां दीना सारखा कशा करितां शोक करितोस?. असें धृतराष्ट्राचें भाषण श्रवण करून दुर्योधन बोलतो. हे राजा, जसा निंद्य पुरुष अन्न खातो व वस्त्रें परिधान करितो तसें अन्न भक्षण करून वस्त्रें परिधान करितो; परंतु त्या प्राप्त झालेल्या कालाचें अतिक्रमण होण्या विषयीं मला उग्र शोक झाला आहे, तो सहन होत नाहीं. जो पुरुष आपल्या प्रजेस क्लेशां पासून मुक्त करण्याची इच्छा करितो व दुसऱ्यास दुःख झालें असतां त्याचें निराकरण करितो त्यासच पुरुष असें ह्मणावें. राजानें आपल्या संपत्ती विषयीं समाधान बुद्धि मानली असतां त्या राजाची श्री नष्ट होत्ये. राजास अभिमान झाला असतांही त्याच्या श्रीचा नाश होतो. तसाच राजानें दयेचा अंगिकार केला असतां त्यास भय उत्पन्न होतें ह्मणून संतोष, दया आणि अभिमान या तिघांचा अंगिकार करणाऱ्या पुरुषास महत् फल प्राप्त होत नाहीं. माझा संतोष न झाल्यामुळें मीं दिवसें दिवस तेजहीन होत चाललों. धर्मराजाची जाज्वल्यमान व अपार संपत्ती पाहून माझी तृप्ति होत नाहीं. शत्रु वृद्धिंगत पावून राज्याधिकारी झाले व आपण हीन झालों. हें पाहून तें मला सहन न झाल्यामुळें मी विवर्ण कृश व दीन झालों. अठ्यायशीं सहस्र स्नातक ब्रह्मचारी, धर्मराजाच्या गृहीं आहेत त्यांच्या प्रत्येक प्रत्येकाच्या सेवे करितां तीस तीस दासांचें युधिष्ठिर पोषण करितो. दुसरे दाहा सहस्र ब्राह्मण धर्मराजाच्या गृहीं सुवर्णाच्या ताटांमध्यें नित्य-

शः भोजन करितात. कदलीमृग ह्मणजे कांहीं एक हरिण जातीमध्यें भेद आहे त्यांचीं कृष्ण, श्याम, आरक्त वर्णाचीं अशीं अजिनें व अमोल्य कंबल ह्मणजे शालजोड्या कांबोजराज याणें धर्मराजास दिल्या. कित्येक गज, स्त्रिया, गायी, सहस्रशः अश्व, तीनशें उंटें, शतशः वडवा ह्मणजे घोड्या असे करभार कित्येक राजानीं धर्मराजाच्या गृहीं येऊन त्यास दिले. त्याच क्रतूमध्यें नानाप्रकारचीं रत्नें धर्मराजास राजांपासून प्राप्त झालीं. पांडुपुत्र धर्मराजाच्या यज्ञा सारखा धनानें विपुल असा यज्ञ पूर्वीं कधीं मी पाहिला नाहीं, व ऐकिला नाहीं. हे राजा, धर्मराजाचा तो धन ओघ असंख्यात पाहून चिंता उत्पन्न झाल्यामुळें मी सुख पावत नाहीं. कृषिकर्म करणारे व गाईचें रक्षण करणारे असे ब्राह्मणांचे बहुत समुदाय तीन खर्व द्रव्य करभारार्थ ग्रहण करून धर्मराजाच्या द्वारप्रदेशीं आले असतां त्यांचा आंत प्रवेश झाला नाहीं. तेव्हां सुवर्णमय कमंडलु करभारार्थ ग्रहण करून कांहीं राजे आले, त्यांचाही आंत प्रवेश झाला नाहीं. देवस्त्रिया जशा इंद्रास मधु अर्पण करितात तसे कांस्यपात्रामध्यें समुद्रजल ग्रहण करून कांहीं स्त्रिया युधिष्ठिरास अभिषेक करीत होत्या. सहस्रभार सुवर्णाच्या रत्नानीं भूषित केलेला जो शंख त्या मध्यें जल घालून वासुदेवानें धर्मराजास अभिषेक केला हें सर्व मी पाहून मला ज्वर उत्पन्न झाला. पूर्व, दक्षिण व पश्चिम या तीन समुद्रांचें उदक कोणी आणतात परंतु उत्तर समुद्रास जाण्या विषयीं पक्ष्यांवांचून इतरांची गति नाहीं, तेथें अर्जुनानें जाऊन अमित द्रव्य आणिलें या विषयीं मला आश्चर्य वाटतें. आणखी एक मी आश्चर्य झालेलें तुला सांगतो. श्रवण कर. ब्राह्मणांस वाढण्या करितां एक लक्ष वाढपी ठेविले होते. त्यांचें वाढप पूर्ण झालें ह्मणजे सर्वांस कळण्या करितां शंखनाद करावा. असा पूर्वीं संकेत केला होता. ते शंखाचे नाद वारंवार श्रवण केल्यामुळें माझा हर्ष नष्ट होऊन रोमांच उभे राहिले. जसें आकाशमंडल नक्षत्रानीं शोभतें तसे सकलराजे धर्मराजाचा ब्राह्मणभोजन समारंभ पाहण्या करितां उभे राहिल्यामुळें तें ब्राह्मण भोजनाचें स्थल बहुतच शोभलें. जसे वैश्य आपल्या स्वामीस करभार देतात तसे सकल राजानीं

त्या यज्ञसमारंभांत रत्नांचे पर्वत धर्मराजास कराकरितां आणून दिले. धर्मराजाच्या संपत्ती सारखी संपत्ति इंद्र, वरुण, यम व गुह्यकाधिपति कुबेर यांचीही नसेल. अशी युधिष्ठिराची अद्भुत संपत्ति पाहिल्यामुळें माझें संपूर्ण शरीर दग्ध झाल्यासारखें होऊन मनाची शांति होत नाहीं. असें दुर्योधनाचें भाषण श्रवण करून शकुनी भाषण करितो. हे दुर्योधना, धर्मराजाची जी तूं संपत्ति पाहिलीस त्या संपत्तीची प्राप्ती होण्या विषयीं मी तुला एक उपाय सांगतों श्रवण कर. अक्षविद्येमध्यें या पृथ्वीवर मी मोठा निपुण आहें. अक्षविद्येचें हृदय व पण लावणें या विषयीं मला फार परिज्ञान आहे. धर्मराजासही द्यूतप्रिय आहे. परंतु त्यास द्यूतक्रीडा करण्याचें विशेष ज्ञान नाहीं यास्तव तूं त्यास द्यूतक्रीडे विषयीं येथें आव्हान केलें असतां मी त्यासहवर्तमान द्यूत करून त्याची सकलसंपत्ति हरण करीन. धर्मराजाची तर अशी प्रतिज्ञा आहे कीं, कोणी द्यूता करितां अथवा संग्रामा करितां आव्हान केलें असतां परावृत्त व्हावयाचें नाहीं असें शकुनीचें भाषण श्रवण करून दुर्योधन धृतराष्ट्रास बोलतो. हे राजा हा शकुनि अक्षविद्यावेत्ता असल्या मुळें धर्मराजाची श्री हरण करण्यास इच्छितो यास्तव तूं शकुनीस, पांडवांस जिंकण्या विषयीं आज्ञा दे. असें पुत्राचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र बोलतो. हे दुर्योधना माझा मंत्री विदुर आहे. त्याची माझी भेट झाल्या नंतर याचा विचार करून तुला सांगेन. विदुर दीर्घदर्शनी असून धर्मवेत्ताही आहे. उभयपक्षांस जें हितकारक असेल तेंच तो निश्चयें करून सांगेल. असें धृतराष्ट्राचें भाषण श्रवण करून दुर्योधन बोलतो. हे धृतराष्ट्रा, विदुराची व तुझी जर भेट झाली तर निश्चयें करून तो या कार्या विषयीं तुझें निवारण करील. तूं या कार्या विषयीं निवृत्त झालासअसतां मीं निश्चयें करून मरण पावेन. यांत संशय नाहीं. बरें मी मरण पावल्या नंतर विदुरासहवर्तमान तूं सुखी होऊन पृथ्वीचा उपभोग कर. मी जिवंत असून तुला काय कर्तव्य आहे? असें पुत्राचें दुःखित वाक्य मोठ्या नम्रतेनें श्रवण करून धृतराष्ट्रानें आपल्या सेवकांस तत्काळ बोलाऊन आज्ञा केली कीं, हे शेवकहो, सहस्र स्तंभानीं युक्त, महान विशाल, मनोरम लोकांचे

नेत्रांस आल्हाद करणारी सुंदर शतद्वारांनीं युक्त अशी सभा शिल्पिजनांक-
डून लौकर सिद्ध करवून मला निवेदन करा. या प्रकारें दुर्योधनाची शांति हो-
ण्या करितां धृतराष्ट्रं पुत्रस्नेहानें अपकृष्ट झाल्यामुळें प्रेष्यांस जरी आज्ञा के-
ली तथापि द्यूतामध्यें बहुत दोष आहेत त्यापेक्षां हें विदुरास निवेदन केल्या
वांचून कार्याचा निश्चय करूं नये. असा मनांत विचार करून त्याणें विदुराकडे
दूत पाठविला असतां दूतमुखापासून हें वर्तमान विदुरानें श्रवण करितांच म-
नामध्यें धृतराष्ट्रग्रहीं विनाशाचें मुखकलिद्वार आज उपस्थित झालें. असा नि-
श्चय करून तो तत्काल धृतराष्ट्राकडे प्राप्त होऊन महाश्रेष्ठ जो आपला ज्येष्ठ-
भ्राता त्यास नमस्कार करून भाषण करितो. हे धृतराष्ट्रा, ज्या कार्याचा तूं नि-
श्चय केलास त्या विषयीं मला आनंद होत नाहीं. तुझ्या पुत्रांमध्यें द्यूतक्रीडे-
नें भेद होणार नाहीं, असें तूं कर. असें विदुराचें भाषण श्रवण करून धृतरा-
ष्ट्र बोलतो. हे विदुरा, माझ्या पुत्रांत कलह व्हावयाचा नाहीं. देवाच्या प्रसादें क-
रून सर्व चांगलें होईल. अशुभ अथवा शुभ, हित किंवा अहित यांतून आप-
ल्या प्रारब्धानें जें होणें असेल तें होवो. परंतु सुहृद द्यूतांस आरंभ व्हावा अ-
सें मला वाटतें आणि मी, द्रोणाचार्य, भीष्म व तूं इतके सन्निध असतां द्यूताम-
ध्यें कधींही अनीति व्हावयाची नाहीं. तूं वायू सारखे वेगवान् अश्वरथास
जोडून लौकर खांडवप्रस्थीं युधिष्ठिराकडे जा आणि त्यास आपला हा विचार
न सांगतां येथें आण. हा विचार देवानेंच उत्पन्न झाला. त्यापेक्षां देवच श्रेष्ठ
होय यांत संशय नाहीं. असें धृतराष्ट्राचें भाषण श्रवण करून माहात्मा-
विदुर ही गोष्ट चांगली नाहीं असें मनामध्यें चिंतन करीत दुःखित होऊन म-
हा प्राज्ञ जो गांगेय भीष्म याजकडे गेला. असा विषय ह्या अध्यायांत आहे.

५९. अध्याय एकुणसाठावा:- जनमेजय राजा प्रश्न करितो हे ब्राह्मणश्रेष्ठ
वैशंपायन ऋषे, आमचे पितामह ज्या द्यूतांच्या योगें करून व्यसनग्रस्त झाले
ते महान् अनर्थ उत्पन्न करणारे द्यूत, भ्रात्यांचें परस्पर कसें झालें. त्या काळीं
सभासद राजे या द्यूतप्रसंगास अनुमोदन देणारे व प्रतिषेध करणारे को-
ण होते, हें सकल वृत्त विस्तारें करून मला सांगा? हे द्विजसत्तमा, द्यूतप्रसंग
पृथ्वीच्या विनाशाचें कारण आहे. असा प्रश्न श्रवण करून वैशंपायन भाषण

करितो. विदुराचा अभिप्राय जाणून धृतराष्ट्र राजा एकांतस्थलीं दुर्योधनास भाषण करतो हे गांधारिपुत्रा, द्यूतप्रसंग करूं नकोस. विदुर द्यूताची प्रशंसा करीत नाहीं. तशांतून विदुर महाबुद्धिमान् आहे. आपल्यास जेणें करून अहित होईल तें सांगणार नाहीं. जें हितकारक असेल तेंच तो आपल्यास सांगेल. तस्मात् हे पुत्रा द्यूत न करावें, यांतच तुझें हित आहे, असें मला वाटतें. बृहस्पति इंद्रास जें नीतिशास्त्र सांगतो तें सकल शास्त्र महा कवि विदुर जाणतो. हे पुत्रा, मी ही त्याच्या वचनांत निरंतर असतों. जसा वृष्णिकुलामध्यें उद्धव पूज्य आहे तसा विदुर आमच्या कुरुवंशा मध्यें पूज्य आहे. यास्तव हे पुत्रा द्यूताविषयीं मति धारण करूं नकोस द्यूतामध्यें भेद उत्पन्न होतो, भेदानें कलह होतो; कलहापासून विनाश होतो, असें आहे. हे पुत्रा, आईबापानीं पुत्राचें जें काय कर्तव्य तें तुझें झालें. पश्चाबरें पितृपितामहाचें राज्य व सकल विद्या तुला प्राप्त झाल्या. शास्त्रांत तूं मोठा कुशल आहेस. गृहामध्यें सर्व तुझें लालन करितात. सकल भ्रात्यांमध्यें ज्येष्ठत्व असावें तेंही तुला आहे अशी संपत्ति असतां त्यांत तूं कां सुख मानीत नाहीस? इतरांस अलभ्य जीं भोजनाच्छादनें तीं तुला प्राप्त आहेत. तस्मात् हे महाबाहो पुत्रा कां शोक करितोस? पितृपिता महाच्या सकल राष्ट्राचा स्वामी तूं आहेस. जसा देवेश्वर इंद्र आज्ञा करितो तशी तुझी आज्ञा सर्वत्र मान्य होते. असा तूं महा प्राज्ञ असतां तुला शोकाचें मूळ कसें उत्पन्न झालें? हें मोठें मला दुःखकारक वाटतें. यास्तव तुझ्या दुःखाचें काय मूळ असेल तें मला सांग? असें धृतराष्ट्राचें भाषण श्रवण करून दुर्योधन बोलतो. हे धृतराष्ट्र राजा जसा पापी पुरुष अन्न आच्छादनाचा उपभोग करितो तसाच मी अन्नाच्छादनाचा उपभोग करितों असें जाण. शत्रूच्या संपत्तीस पाहून जो सहन न करितो तो अधम पुरुष जाणावा. हे राजेंद्रा, साधारण संपत्तीनें मी तृप्त नाहीं. कारण जाज्वल्यमान अशी पांडुपुत्र धर्मराजाची संपत्ती पाहून मला अत्यंत व्यथा झाली. सर्व पृथ्वी युधिष्ठिरास वश झालेली पाहून मला बहुत दुःख झालें. यास्तव मी तुला वारंवार द्यूता विषयीं आज्ञा दे ह्मणून प्रार्थना करितों. हे धृतराष्ट्रा, नीद, चित्रक, कौकुर, कारस्कार, लोहजंघ हे सकल राजे युधिष्ठिराच्या गृहीं दासा-

सारखें मी पाहिले. हिमाचल व सागरानुपवासी जे निंद्य राजे होते ते धर्मराजाच्या गृहीं दूर उभे राहिले होते. मी वयानें ज्येष्ठ व श्रेष्ठ असें मानून युधिष्ठिरानें माझा सत्कार उत्तम प्रकारें केला. आणि दुसऱ्यांकडून रत्नें व गजाश्वादिक जितका करभार व भेटी येतील त्या ग्रहण करण्याच्या अधिकारावर मला नेमलें होतें. महान् महान् श्रेष्ठ अमोल्य रत्नांचे समुदाय किती मिळाले होते यांची गणना माझ्यानें करविली नाहीं. तीं भेटीचीं रत्नें घेतां घेतां माझ्या हस्तास मोठा श्रम होऊन मीं कांहीं श्रांत झालों असतां रत्नें देणारे पुरुष स्तब्ध बसत. हे धनराष्ट्र मयासुरानें बिंदुसरोवरा पासून रत्नें आणून स्फटिकमय अशी सभा धर्मराजास करून दिली. त्या सभे मध्यें कमलानें परिपूर्ण झालेलें असें एक सरोवर पाहून नेसलेलें वस्त्र मी वर उचलून धरिलें त्या कालीं वृकोदर मला पाहून हास्य करूं लागला. शत्रूची वृद्धि त्या कालीं होती ह्मणून माझ्यानें त्याचें कांहीं झालें नाहीं. जर सामर्थ्यवान् असतों तर तत्काल वृकोदराचा प्राण घेतला असता. हे राजा जर त्या कालीं मीं भीमास मारण्याचा कांहीं उद्योग चालविला असता तर शिशुपालाची जी अवस्था झाली ती माझी अवस्था झाली असती. शत्रूंनीं माझा उपहास केला तो विशेषें करून मला दाह करितो. हे राजा तशीच एक वापी जलानें युक्त होती ती मलाशिळे सारखी दिसल्या मुळें मी तेथें जातांच तिजमध्यें पतन पावलों. त्या काळीं अर्जुना सहवर्तमान श्रीकृष्ण मोठ्यानें हंसला. कांहीं स्त्रियांसहवर्तमान द्रौपदी सन्निधच बसली होती तिणेंही हास्य केलें. तें द्रौपदीचें हास्य माझ्या मनास बहुत व्यथा करितें. त्या कालीं वापीमध्यें मीं पडलों त्या कालीं माझीं वस्त्रें भिजून गेलीं असतां धर्मराजानें आपले सेवकांस सांगून दुसरीं वस्त्रें मला आणून दिलीं. तें तर माझ्या मनास फारच दुःखकारक झालें. आणखी एक पांडवानीं माझ्याशीं वंचना केली ती सांगतों. द्वार नसतां मला द्वारा सारखें भासून त्या मार्गानें मी जाऊं लागलों असतां माझ्या कपाळास एक शिळा लागून डोळ्यांपुढें अंधःकार झाला. त्या कालीं नकुल सहदेव हे उभयतां माझे बाहु धरून शोक करूं लागले असतां सहदेव वारंवार विस्मित होऊन ह्मणूं लागला कीं, हे राजा हें द्वार हें द्वार इकडून जा तेव्हां भीमसेनानें हास्य करूनमला

असें भाषण केलें कीं, हे धृतराष्ट्रपुत्रा, हें दूर इकडे राहिलें. या प्रकारें पांडवानीं माझी थट्टा केली. तेणें करून व सभेमध्यें पूर्वीं ज्या रत्नांचीं नांवें श्रवण केलीं नवतीं. तीं बहुत रत्नें मीं पाहिलीं. तेणें करून माझ्या मनास अत्यंत ताप झालाआहे तो मला सहन होत नाहीं. असा विषय या अध्यायीं आहे.

५१. अध्याय एकावन्नावा:- दुर्योधन बोलतो हे धृतराष्ट्र पांडुपुत्रांस करभारानिमित्त द्रव्यें मिळालीं त्यांची अमुक संख्या असें सांगवत नाहीं व त्यांचें वर्णनही करवत नाहीं. नानाविध देशांतून आलेल्या राजांनीं रत्नें वस्त्रें व अप्रतिम अश्व व नानाप्रकारचे पदार्थ सहस्रशः करार्थ दिल्हे. आणि यज्ञ पहावया करितां पूर्वदेशीय राजे यज्ञगृहीं गेले. असा विषय या अध्यायीं आहे.

५२. अध्याय बावन्नावा:- दुर्योधन भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, युधिष्ठिरास धनांच्या राशी राजांपासून कसकशा प्राप्त झाल्या त्या पुनः सांगतों श्रवण कर. मेरु आणि मंदराचल पर्वत यांचे मध्यभागीं शैलोदानामक नदी आहे तिचे आसमंतात् कीचक वेणूचीं बेटें बहुत आहेत. त्या वेणूच्या रम्य छायेच्या आश्रयें करून राहणारे खस, एकासन, आर्य, प्रदर, दीर्घवेणु, पारद, कुलिंद, तंगण, आणि परतंगण नामक राजे बहुत आहेत. त्यांणीं पिपीलिकानीं भूमींतून उकरलेलें सुवर्ण द्रोणपरिमित (एंशीं रुपयेभार शेर या मानानें बत्तीस शेर) ग्रहण करून धर्मराजास करदान देण्याकरितां समुदायाचे समुदाय आले. कृष्णवर्ण लाल रंगाचे चंद्राकाररेखायुक्त मणि हिमाचल पर्वतावरील वृक्षसंबंधि उत्तम प्रकारचें स्वादुमधु, उत्तर कुरूपासून कांहीं माल्यें, उत्तर कैलास संबंधि महाबलवर्धन करणाऱ्या कांहीं औषधी व आणखी कांहीं द्रव्य ग्रहण करून पर्वतवासीय राजे धर्मराजाच्या द्वारा जवळ देण्या करितां नम्र होऊन उभे राहिले असतां त्यांचें निवारण केलेलें मीं अवलोकन केलें. मौक्तिक वैडूर्यमणी व नाना प्रकारचे गालिचे ग्रहण करून धर्मराजास कर देण्या करितां सिंहलदेशींचे राजे प्राप्त झाले होते. नानाप्रकारचीं आभरणें व उत्तम वस्त्रें परिधान केलेल्या षोडश वर्षांच्या आरक्तनेत्रयुक्त अशा स्त्रिया घेऊन त्या धर्मराजास कर देण्या

करितां, कांहीं राजे धर्मराजाच्या द्वारप्रदेशीं आले असतां त्यांचें निवारण केलें आंत प्रवेश झाला नाहीं. धर्मराजाचा संतोष व्हावा ह्मणून शतशः ब्राह्मण, युद्धांत जिंकिलेले क्षत्रिय वैश्य व शुश्रुषा करण्यास इच्छु असे शूद्र परमप्रीतीनें युधिष्ठिरगृहीं आले. सर्व म्लेंच्छगण, इतर सर्व वणिक लोक आदि मध्य व अंत्यजातींत झालेले, नानादेशांचे ठायीं उद्भवलेले लोकांनीं युधिष्ठिरास लहान मोठे रत्नांचे समुदाय आणून दिले. धर्मराजाचे गृहीं असंख्याक ब्राह्मणभोजन झालें, त्याची संख्या करविली नाहीं. अशी शत्रूची संपत्ति पाहून मला तत्काल मूर्च्छा उत्पन्न झाली. पांडवांच्या गृहीं प्रतिदिवशीं सिद्ध झालेलें व अपक्क अन्न कोणास प्राप्त होत होतें तें सांगतो श्रवण कर. तीन पद्म व एक अयुत (दहाहजार) गजावर बसणारे तितकेच अश्वारोह अर्बुदसंख्याक रथ व असंख्याकपदाती इतक्या लोकांस प्रतिदिवशीं धर्मराज पक्क झालेलें अन्न व शिधे देऊन त्यांचा संतोष करी. धर्मराजाच्या यज्ञांत कोणास भोजन पान व अलंकार मिळाले नाहीं. कोणाचा सत्कार झाला नाहीं असा कोणी मी पाहिला नाहीं. निरंतर युधिष्ठिर सदनीं पुण्याहवाचन शब्द होत असे. धर्मराजाच्या गृहीं अठ्याऐशींसहस्र स्नातक व गृहस्थाश्रमी ब्राह्मण असत. त्यांच्या प्रत्येकांच्या शुश्रुषे करितां तीस तीस दासींचें पोषण केलें होतें. ते स्नातक ब्राह्मण निरंतर संतुष्ट होऊन धर्मराजास आशीर्वाद देत. दुसरे दशसहस्र ऊर्ध्वरेते यति निरंतर सुवर्णमय पात्रामध्यें भोजन करणारे युधिष्ठिरगृहीं आहेत. अबालवृद्धांनीं भोजन केलें किंवा नाहीं याची चौकशी करून नंतर सर्वांचे मागून स्वतः द्रौपदी प्रतिदिवशीं भोजन करी. हे धृतराष्ट्र राजा, अशी पांडवांची संपत्ति पाहिली तेणें करून माझे शरीराचा दाह झाला आहे. पांचाल हे पांडवांचे संबंधि व अंधकवृष्णि हे पांडवांचे स्नेही ह्मणून या उभयतांनीं मात्र पांडुपुत्र धर्मराजास कर दिला नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

५३. अध्याय त्रेपन्नावा:- दुर्योधन भाषण करितो हे धृतराष्ट्रा युधिष्ठिराच्या यज्ञार्थ मोठमोठे आर्य, सत्य प्रतिज्ञा करणारे, महाव्रति, सर्व विद्यांनीं परिपूर्ण व वक्ते वेदांतविद्येमध्यें निष्णात अकार्याची लज्जा धरणारे

धर्मात्मे महायशस्वी मूर्धाभिषिक्त झालेले असे राजे येऊन युधिष्ठिराची उपासना करूं लागले. अरण्यांत उत्पन्न झालेल्या सहस्रशः गायी कांस्यपात्र दोहनासहवर्तमान दक्षिणार्थ युधिष्ठिरास देण्या करितां त्यांचे गृहीं आणलेल्या मी पाहिल्या. तशीच अभिषेका करितां उत्तमोत्तमप्रकारचीं भांडीं धर्मराज गृहीं राजानीं आणलीं. सुवर्णानें विभूषित केलेला असा एक रथ बाल्हीक राजानें धर्मराजास दिला. त्या रथास जोडण्या करितां कांबोज देशांत उत्पन्न झालेले श्वेताश्व सुदक्षिण राजानें दिले. सुनीथनामक राजानें रथाचे अधोभाग संबंधि काष्ठ व चेदिपतीनें ध्वज दिला. असे नानाप्रकारचे पदार्थ मागधादिक राजानीं धर्मराजास दिले. नारद असित देवल इत्यादि वेदवेदांग पारगमुनि होते त्यांस प्रमुख करून धौम्य व व्यास यानीं धर्मराजास अभिषेक केला. दुसरे इतरही ऋषि धर्मराजाच्या आसमंताद्भागीं बहुत उभे राहिले होते. जसे सप्तर्षि स्वर्गी इंद्रास अभिषेक करिता तसे सकल ऋषीनीं माहात्म्या धर्मराजास अभिषेक केला. त्या कालीं सात्यकी याणें छत्र, धनंजय व भीमसेन या उभयतानीं व्यजनें, नकुल सहदेव हे उभयतां स्वच्छ चामरें धरून धर्मराजाच्या पृष्ठभागीं उभे राहिले होते. सहस्र निष्क (चार हजार तोळे) सुवर्णानें मढविलेला आणि विश्वकर्म्यानें उत्पन्न केलेला असा जो शंख त्या मध्यें जल घालून श्रीकृष्णानें त्या कालीं धर्मराजास अभिषेक केला तें मी अवलोकन करितांच मला तर बहुतच मोह झाला. हे तात धृतराष्ट्रा, पूर्व, दक्षिण व पश्चिम या तीन समुद्रांचे ठाईं सकल लोक गमन करितात; परंतु पक्ष्या वांचून उत्तर समुद्रीं कोणाचें गमन नाहीं, तेथेंही अर्जुनानें गमन करून बहुत द्रव्य आणिलें तें मी पाहिलें. धर्मराजाच्या अभिषेक कालीं मंगलकारक शतशः शंखाचे नाद होऊं लागले. तेणें करून माझे शरीरावर रोमांच उभे राहिले. हीन तेजस्वी असे कांहीं एक राजे होते ते त्या शंखाच्या नादानें तत्काल तेथें पडले. त्या समयीं महासत्वस्थ वीर्यसंपन्न, एकमेकांस अत्यंत प्रिय असे धृतराष्ट्रधुम्न, पांच पांडव, सात्यकी व केशव हे आठजण मूर्च्छित झालेल्या राजांस व मला पाहून हंसले. धर्मराजाच्या अभिषेक कालीं अर्जुन संतुष्ट होऊन त्याणें हेमविभूषित कि-

लेलें असे पांचवें वृषभ श्रेष्ठ ब्राह्मणास दिले. हे धृतराष्ट्र राजा या धर्मराजाच्या यज्ञासारखा यज्ञ रंतिदेव, नाभाग, यौवनाश्व, मनु, वेनपुत्र पृथु, भगीरथ, ययाति व नहुष यांचाही झाला नाहीं. या राजसूय यागामध्यें धर्मराजाची मी जशी शोभा पाहिली. अशी शोभा कोठेंच पाहिली नाहीं. हरिश्चंद्राच्या संपत्ती सारखी धर्मराजाची संपत्ति मी राजसूय यागामध्यें पाहिली. यास्तव अशी शत्रूची संपत्ति पाहून माझें जीवित श्रेयस्कारक तूं कसें पाहतोस. हे राजा कनिष्ठ वृद्धि पावले व ज्येष्ठ हीनता पावले. असा युगविपर्याय कोणी अंधानें केला असावा. आपली हीनता पाहून माझा हर्ष अगदींच नष्ट झाला. तेणें करून मी शोकयुक्त होऊन विवर्ण व कृश झालों. असा विषय या अध्यायांत आहे.

५४. अध्याय चौपन्नावा:- धृतराष्ट्र राजा भाषण करतो हे दुर्योधना, तूं सर्वांमध्यें ज्येष्ठ असून माझा ज्येष्ठ पुत्र आहेस. यास्तव तूं पांडवांशीं द्वेष करूं नको. द्वेष करणारा पुरुष सुख न पावतां मरण पावतो. आणि धर्मराजा तर कपटा विषयीं अनभिज्ञ असून त्यास मित्र आणि द्वेष्टे समान आहेत. तो तुझ्याशीं द्वेष करीत नसतां तूं त्याच्याशीं कां द्वेष करितोस? तुझें व त्याचें धन, वीर्य व संबंधिजन समान असतां मोहें करून आपला भ्राता जो धर्मराजा याची श्री हरण करण्या विषयीं तूं कां इच्छा करितोस? हे पुत्रा, शम पाव. शोक करूं नकोस. धर्मराजाच्या यज्ञ संबंधि ऐश्वर्या सारखें ऐश्वर्य जर तुला संपादन करण्याची इच्छा आहे तर सप्ततंतुनामक याग तुझ्या गृहीं ऋत्विज करतील. त्या यागामध्यें सकल राजे परम प्रीतीनें तुलाही विपुल धन व रत्नें अर्पण करून तुझा बहुमान करतील. परंतु हे पुत्रा, पराच्या द्रव्यावर स्पृहा करणें हें अधमाचेंच कर्म होय. जो स्वधर्मा मध्यें व स्वधना विषयीं संतुष्ट असतो त्यास उत्तम सुख प्राप्त होतें. परार्थ ग्रहण करण्या विषयीं यत्न न करणें आपल्या स्वकर्मा विषयीं उद्युक्त असणें व प्राप्त झालेल्याचें रक्षण करणें हें उत्तम वैभवाचें लक्षण होय. जो विपत्ति प्राप्त झाली असतां दुःख पावत नाहीं, जो सर्व कर्मा विषयीं दक्ष, निरंतर उद्योगी अप्रमत्त व विनितात्मा असतो तोच कल्याण पावतो. हे पुत्रा, पांडव हे तुझे बाहु आहेत यांचें तूं छेदन करूं नको; त्यांचें

धन ग्रहण करण्या विषयीं मित्रद्रोह करावा हें चांगलें नाहीं. मित्रद्रोह करणें हें मोठेंच अनर्थाचें कारण आहे. जे तुझे पितामह तेच पांडवांचे पितामह या-स्तव आपल्या कुलांत उत्पन्न झालेल्याशीं द्वेष करणें हें अनुचित कर्म होय. तूं अंतर्वेदींत राहून दुसऱ्यास द्रव्य दान कर. यथेच्छ प्रिय पदार्थांचा उपभोग कर. आणि निर्भय होऊन स्त्रियांसहवर्तमान क्रीडा करून शांति पाव. असा विषय या अध्यायांत आहे.

५५. अध्याय पंचावन्नावा:- दुर्योधन भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, जशी पळी पाक रसाचा स्वाद जाणत नाहीं तसा स्वतः ज्ञान नसून केवल बहुश्रुत पुरुष शास्त्रार्थानुभावातें जाणत नाहीं. नौकेवर नौका बंधन केली असतां जशा दोन्हीं एकदांच बुडतात. तसा तूं सकल शास्त्रार्थ जाणंत असतां मला मोह घालून बुडवितोस. तुझें स्वार्थावर लक्ष नसून केवळ माझ्याशींच तूं द्वेष करितोस, असें मला वाटतें. ज्या धार्तराष्ट्र कुलाचा तूं शास्ता आहेस तें धार्तराष्ट्र कुल नाहींसें होण्याचें कृत्य भविष्यार्थ तूं मला सुचवितोस. जो पुरुष दुसऱ्याच्या बुद्धीनें चालतो तो आपल्या मार्गा विषयीं मोह पावतो. जे मार्गानें चालतात त्यांस दुसरा मार्गप्रदर्शक कशास पाहिजे. हे राजा तूं वृद्धांची सेवा केल्या मुळें तुझी बुद्धि परिपक्व आहे. तसाच तूं जितेंद्रियही असतां स्वकार्या विषयीं आह्मीं उद्युक्त झालेले पाहून आह्मांस मोह घालूं नको. लोकाचारापेक्षां राजाचा आचार भिन्न आहे असें बृहस्पतीनें कथन केलें आहे ह्मणून राजानें अप्रमत्त होऊन निरंतर स्वार्थाचेंच चिंतन करावें. हे महाराज धृतराष्ट्रा, क्षत्रियांची जयाविषयीं निरंतर बुद्धि असावी मग तो त्या पासून धर्म होवो अथवा अधर्म होवो स्ववृत्तीची परीक्षा करूं नये. जसा रथाचा सारथी प्रतोदानें अश्वांस पाहिजे तिकडे नेतो तशी शत्रूची दीप्त झालेली संपत्ति पाहिजे त्या उपायानीं हरण करावी. गुप्त अथवा स्पष्ट कोणत्या तरी उपायानें शत्रूस पीडा करावी हेंच शास्त्रवेत्त्या पुरुषाचें शस्त्र होय. केवळ जेणें करून छेदन होतें त्यासच शस्त्र ह्मणूं नये. शत्रु किंवा मित्र या विषयीं कोणी लिहिलेले ताम्रपट करून ठेविले आहेत असें नाहीं. जो-ज्यास संताप उत्पन्न करील तोच त्याचा शत्रु ह्मटला आहे. राजास असंतोष

हा केवळ श्रीचें मूळ आहे यास्तव त्या असंतोषाचाच मी स्वीकार केला आहे. जो शत्रूस पीडा करण्या विषयीं उद्योग करितो तीच त्याची नीति असें समजावें. ऐश्वर्या विषयीं अथवा धना विषयीं ममत्व करूं नये. बहुत दिवसानीं संपादन केलेलें धन एकादे काळीं दुसराच हरण करितो, असेंही कदाचित् होतें. इंद्रानें नमुचीनामक दैत्याशीं अद्रोहाचा संकेत करून त्याचें शिर छेदन केलें. त्या दिवसापासून अद्रोह समयानें शत्रूचा नाश करावा. हीच सनातन वृत्ति इंद्रास अभिमत झाली. जसा सर्प बिळामध्यें शयन करणाऱ्याचा ग्रास करितो तसा अविरोद्धा राजा व अप्रवासी संन्यासि व ब्राह्मण या उभयतांचा भूमि ग्रास करिते. हे धृतराष्ट्र राजा, शत्रु म्हणजे कांहीं एक पुरुषामध्यें विजातीय जाति आहे असें नाहीं. शत्रुत्व म्हणून एक साधारण वृत्ति सर्व प्राणिमात्रांवर आहे. जो एकाचा शत्रु असतो तो दुसऱ्याचा मित्रही असतो. शत्रुपक्षाची वृद्धि होत असतां मोहेंकरून जो त्याची उपेक्षा करितो तो शत्रु त्याचें मूल छेदन करितो. अल्पशत्रु असतां जो आपल्या पराक्रमानें वृद्धि पावतो तो वाळवी सारखा सर्वांस ग्रस्त करितो. हे धृतराष्ट्र, रिपूची लक्ष्मी तुह्मा न रुचावी हाच मी तुमच्या शिरावर आपला भार ठेविला आहे. जशी आपल्या आयुष्याच्या वृद्धीची इच्छा करावी तशी धनाच्या वृद्धि विषयीं जो इच्छा करितो तो आपल्या ज्ञातीमध्यें सुख पावतो. द्रव्याच्या वृद्धीची इच्छा करणें हाच त्या पुरुषाचा पराक्रम होय. अतःपर पांडवांचें ऐश्वर्य मी पाहणार नाहीं. आतां त्यांची श्री मी हरण करीन. अथवा त्यांसह वर्तमान युद्ध करून मरण पावेन. पांडव दिवसें दिवस वृद्धि पावत असून आमची संपत्ति वृद्धि पावत नाहीं. तस्मात् असें आमचें जीवित्व असून काय उपयोग आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

५६. अध्याय छपन्नावा:- शकुनि भाषण करितो हे दुर्योधना, पांडुपुत्र युधिष्ठिराची संपत्ति पाहून तूं संतप्त होतोस तो त्याची संपत्ती मी द्यूतामध्यें हरण करीन. राजा युधिष्ठिरास द्यूतक्रीडे करितां आव्हान करावें म्हणजे सेना सुखाचे ठायीं युद्ध केल्या वांचून निःसंशय अक्ष टाकून त्यास मी जिंकीन. मी अक्षविद्ये मध्यें परम निपुण आहें. आणि धर्मराजास तर अ-

क्षविद्याज्ञातनाहीं. द्यूतामध्यें पण करणें हेंच माझें धनुष्य, अक्ष हेच कोणी माझे बाण, अक्षहृदय हीच कोणी एक माझ्या धनुष्याची प्रत्यंचा आणि अक्षक्रीडेचें स्थान हाच माझा रथ असें तूं जाण. अशा साहित्यानें मी धर्मराजास द्यूतामध्यें जिंकीन. असें शकुनीचें भाषण श्रवण करून दुर्योधन धृतराष्ट्रास बोलतो हे राजा, हा शकुनि अक्षवेत्ता आहे. हा पांडुपुत्रांची संपत्ति द्यूतानीं हरण करण्याची इच्छा करितो, यास्तव तूं त्यास आज्ञा दे. असें दुर्योधनाचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र बोलतो हे दुर्योधना, माहात्मा जो विदुर माझा भ्राता त्याचे आज्ञे मध्यें मी स्थित आहें यास्तव त्यास भेटून नंतर या कार्याचा निश्चय तुला सांगेन. असें धृतराष्ट्राचें भाषण श्रवण करून दुर्योधन बोलतो हे कौरव श्रेष्ठा, विदुर पांडवांचे हिता विषयीं जसा स्थित आहे तसा माझ्या. हिती विषयीं स्थित नाहीं त्या पेक्षां ही गोष्ट तूं विदुरास निवेदन केली असतां तुझ्या बुद्धीस तो भ्रंश उत्पन्न करील. राजा, दोघांची मति सारखी नसते, यास्तव कोणत्याही पुरुषानें आत्मकार्य, पराच्या सामर्थ्यें करून आरंभूं नये. वर्षा ऋतूमध्यें भिजलेली कणिंग जशी एका स्थलीं असते कांहीं चलन वलन पावत नाहीं तसा मंद पुरुष निरंतर आपले भयाचा परिहार करून आपल्या आत्म्याचें रक्षण करीत स्तब्ध बसतो. व्याधि किंवा यम हे कल्याणाची वाट पहात नाहींत. जों पर्यंत आपण समर्थ आहोंत तों पर्यंत आपलें श्रेय संपादन करण्या विषयीं यत्नवान् असावें असें दुर्योधनाचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र बोलतो हे पुत्रा, सर्व प्रकारें बलवानाशीं स्पर्धा करणें हें मला चांगलें वाटत नाहीं. वैर उत्पन्न झालें असतां तें आपल्यास पूर्व अवस्थे पासून भ्रष्ट करितें. वैर हें लोहरहित शस्त्र होय. हे राजपुत्रा, तूं अनर्थास अर्थ असें मानून हें द्यूतरूप कर्म कलहाचें ग्रंथन करणारें असतां त्याची तूं इच्छा करितोस; परंतु हें द्यूत प्रवृत्त झालें ह्मणजे अशी व निशित बाणातें हेंच उत्पन्न करील असें धृतराष्ट्राचें भाषण श्रवण करून दुर्योधन भाषण करितो हे राजा, नलादि राजानीं पूर्वीं द्यूतक्रीडा केली आहे तस्मात् त्या मध्यें युद्ध व नाश कांहींच नाहीं. यास्तव तूं शकुनीचें वाक्य मान्य करून सभा करण्यास आज्ञा द्यावी. आह्मीं द्यूतक्रीडा केली असतां आह्मांस

सुख होऊन शत्रूंचा पराजय व आह्मांस धन लाभही होईल. शकुनीस पांड-
वांसहवर्तमान द्यूतक्रीडा करण्या विषयीं तूं त्यास आज्ञा दे. असें भाषण श्रव
ण करून धृतराष्ट्र भाषण करितो. हे पुत्रा, तूं जें भाषण केलेंस तें मला रुचत
नाहीं. तुला जें प्रिय कर्तव्य असेल तें कर. परंतु द्यूतास उपक्रम केलास ह्मण
जे पश्चात्ताप पावशील. हें तूं आरंभिलेलें कार्य धर्मयुक्त आहे असें मला वाट
त नाहीं. जो सर्वज्ञ व ज्यास विद्या व बुद्धि अनुकूल असा जो विदुर त्याणें
पूर्वीं निश्चयें करून जाणलें आहे कीं, हें द्यूतरूप कर्म क्षत्रियांस परम घात
क आहे. या प्रकारें धृतराष्ट्र भाषण करून दैवाचें अतिक्रमण करणें परम
दुस्तर आहे असें मानून पुत्राचें वाक्य परिपालन करण्या करितां मूढबुद्धि
होऊन उच्च स्वरानें सेवकांस ह्मणाला कीं, हे सेवक हो, माझ्या आज्ञेनें सह
स्र स्तंभानीं युक्त, सुवर्ण वैडूर्य मण्यानीं चित्रविचित्र, शतशः द्वारें जिला, स्फ
टिकादि तोरणांनीं युक्त, एक कोश दीर्घ व विस्तृत अशी महान् सभा सिद्ध
करावी. अशी धृतराष्ट्राची आज्ञा होतांच सेवक जन स्वल्प कालांत सहस्र
शः शिल्पी त्यांकडून राजाज्ञे प्रमाणें सभा सिद्ध करून नंतर धृतराष्ट्रास
निवेदन केलें कीं, हे महाराज आपले आज्ञे प्रमाणें रम्य बहुत रत्नें करून
विचित्र व चित्रविचित्र सुवर्णाच्या आसनानीं युक्त अशी सभा सिद्ध झा-
ली. हें सेवकांचें वाक्य श्रवण करून धृतराष्ट्र राजा विदुरास भाषण क-
रितो हे विदुरा, तूं राजपुत्र युधिष्ठिराकडे जाऊन त्यास सत्वर येथें आण.
ही माझी सभा बहुत रत्नानीं भूषित व महान् महान् शय्या व आसनें इ-
त्यादिकें करून परिपूर्ण केलेली इतें बंधूसहवर्तमान धर्मराजा अवलोक
न करून येथें सुहृद द्यूत करो. असा विषय या अध्यायांत आहे.

५७. अध्याय सत्तावन्नावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धृ-
तराष्ट्रानें पुत्रस्नेहामुळें त्याच्या वाक्याचा स्वीकार करून दैव दुस्तर आहे
असें जाणून विदुरास अन्यायानें भाषण केलें असतां बंधूचें वाक्य उत्तम
न मानून विदुर भाषण करितो. हे धृतराष्ट्र राजा, तुझें आज्ञावचन श्रवण
करून मला आनंद होत नाहीं. राजा, तूं असें करूं नकोस. मी, कुलक्षय पुढें
होईल यास्तव भीति पावतों. हे राजा पुत्र भिन्न झाले असतां द्यूतानें कल-

ह होऊन नाश होईल असें मला वाटतें. असें विदुराचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र भाषण करितो हे विदुरा, येथें कलह होईल ह्मणून मी संतप्त होत नाहीं. कारण दैव विपरीत करण्यास कोणी समर्थ नाहीं. त्या सर्व जगतास अंतर्यामीं दैवच प्रेरणा करितें ह्मणून हें जगतच चाललें आहे. हें जगत आपले स्वाधीन नाहीं. वाईट अथवा चांगलें दैवच करवितें. याजकरितां हे विदुरा माझ्या आज्ञेनें धर्मराजाकडे जाऊन त्यास लोकर येथें आण. असा विषय या अध्यायांत आहे.

५८. अध्याय अठ्ठावन्नावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धृतराष्ट्रानें विदुरास पांडवांकडे जाण्या विषयीं आज्ञा केली असतां विदुर महा बलवान सुशिक्षित अशा अश्वांनीं युक्त केलेल्या रथामध्यें आरूढ होऊन पांडवांच्या पुरासंनिध आल्या नंतर त्रैवर्णिकांनीं त्याचा सत्कार केल्यावर तो कुबेरभुवना सारखें अनुपम जें धर्मराजाचें गृह त्यामध्यें गेला. त्या कालीं धर्मराजानें विदुर आपले सन्निध येतो हें पाहून पूजा ग्रहण करून त्याचे अग्रभागीं गेला. आणि सपुत्र धृतराष्ट्रा विषयीं कुशलप्रश्न करून भाषण करूं लागला कीं, हे विदुरा, तूं कुशल आहेसना? तुझें मन हर्षित का दिसत नाहीं? धृतराष्ट्राचे सकल पुत्र कुशल आहेतना? व ते निरंतर राजास वश असतातना! तसेच राजाचे सेवकजन त्याची आज्ञा परिपालन करितात ना? असा युधिष्ठिराचा प्रश्न श्रवण करून विदुर भाषण करितो हे धर्मराजा, पुत्रांसह वर्तमान धृतराष्ट्र राजा कुशल आहे. इंद्रा सारखा तो आपल्या ज्ञातीनीं निरंतर वेष्टित आहे. पुत्रांचे गुण पाहून धृतराष्ट्र राजा निरंतर संतुष्ट असतो. कशा विषयींही तो शोक करीत नाहीं. आपला उत्कर्ष असावा ह्मणून त्याची बहुत इच्छा आहे. धर्माची त्यास गरज नाहीं. त्याणें तुला कुशल प्रश्न विचारून असें सांगण्यास सांगितलें आहे कीं, तुझ्या सभे सारखी अप्रतिम आह्मीं एक सभा निर्माण केली आहे, ती पाहण्या करितां भ्रात्यांसहवर्तमान यावें आणि आपल्या दुर्योधनादिक भ्रात्यांस भेटून त्यांसहवर्तमान रम्य असें सुहृद् द्यूत करावें. तुह्मीं आणि आमचे पुत्र हे सर्व एकत्र झाले असतां माझा बहुत संतोष होईल. असा धृतराष्ट्राचा निरोप सांगून पुनः विदुर धर्मराजासबोलता

हे राजा, धृतराष्ट्र राजानें मोठे मोठे धूर्त कपटी द्यूतक्रीडा करणारे असे अक्षवेत्ते बोलाविले आहेत तेही तूं सभेमध्यें पाहशील. हें सांगण्याच्या हेतूनें मी ये- थें आलों आहें. तुला रुचेल तसें कर. असें विदुराचें भाषण श्रवण करून युधिष्ठिर बोलतो, हे विदुरा, द्यूतामध्यें कलह उत्पन्न होतो यास्तव ज्ञात्या पु रुषास द्यूत रुचत नाहीं या विषयीं तुझें मत काय आहे तें सांग. आम्ही स र्व तुझ्या आज्ञेंत आहोंत असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून विदुर भाष ण करितां हे पंडुपुत्रा, द्यूत हें अनर्थाचें मूळ आहे असें मी जाणतों. या विष यीं धृतराष्ट्राचें बहुत निवारण केलें असतां त्याणें मला तुजकडे पाठविलें आतां जेणें करून तुझें कल्याण होईल असें तूं कर. असें ऐकून युधिष्ठिर बोलतो हे विदुरा, धृतराष्ट्र पुत्रां वांचून तेथें अक्षविद्या कुशल असून मीत्यां च्याशीं द्यूत खेळावें असे कोण कोण आहेत तें सांग. विदुर भाषण करि तो हे धर्मराजा गांधारराज शकुनि हा अक्षविद्येमध्यें मोठा निपुण असून त्याचें हस्तकौशल्यही फार उत्तम आहे. विविंशति चित्रसेन राजा सत्यव्रत व पुरुमित्र हेही अक्षक्रीडावेत्ते आहेत असें विदुराचें भाषण श्रवण करू न युधिष्ठिर बोलतो हे विदुरा हे पुरुष महा कपटी, मायावी, भयंकर अ क्षविद्याविशारद आहेत काय? अस्तु हें सर्व जगत प्रारब्धाचे स्वाधीन आ हे, कोणी स्वतंत्र नाहीं. हे विदुरा, तूं जें भाषण केलेंस त्या प्रमाणें मी करि तों. धृतराष्ट्राची आज्ञा मला मान्य आहे. पुत्रास पिता निरंतर इष्टच आहे. त्या पेक्षां मी धृतराष्ट्राची आज्ञा उल्लंघन करीत नाहीं. शकुनीसहवर्तमान मी नि ष्काम द्यूतक्रीडा करणार नाहीं. कोणी मला सभेमध्यें द्यूतक्रीडेस बोलाविलें असतां मी माघारा निवृत्त होत नाहीं, हें माझें शाश्वत व्रतच होय. वैशंपाय न सांगतात हे जनमेजया, या प्रकारें धर्मराज विदुरासहवर्तमान भाषण क रून नंतर आपल्या बरोबर येण्या करितां गजाश्व शिबिका, शकट, उष्ट्रादि क यांस हस्तनापुरीं निघण्याची सिद्धता करण्या करितां आज्ञा देऊन स्त्रि यांसहवर्तमान द्रौपदी भृत्यजन व आपले भ्राते यांसही आज्ञा दिली. ज सें तेज चक्षूचें हरण करितें तसें, दैव, बुद्धि हरण करितें. जसा एकादा म नुष्य पाशानीं बंधन करावा असे सकल पुरुष दैवानें बद्ध आहेत. असें

जाणून धर्मराजा धृतराष्ट्राचें भाषण सहन न करितां विदुरासहवर्तमान आपले भ्राते समागमे घेऊन दुसरे दिवशीं बाल्हिक राजानीं दिलेल्या उत्तम अश्वांस रथास जुंपून त्यामध्यें बसून निघतांच सकळ ब्राह्मणही त्याजसमागमें निघाले. त्या ब्रह्मश्री व राजश्रीच्या योगें धर्मराज फारच देदीप्यमान दिसूं लागला. धृतराष्ट्रानें कालसंकेता प्रमाणें धर्मराजानें हस्तनापुरीं येऊन प्रथम धृतराष्ट्राची भेट घेतली. नंतर भीष्म,द्रोण,कृपाचार्य,कर्ण,अश्वत्थामा व महाबाहु सोमदत्त यांस भेटला. पुढें दुर्योधन शल्य सौबल व जे राजे धृतराष्ट्रानें निमंत्रित केले होते, त्यांस दुःशासन प्रभृति भ्रात्यांस आणि जयद्रथास भेटून पुनः भ्रात्यां सहवर्तमान धृतराष्ट्राकडे आला. आणि तेथें रोहिणी जशी तारानीं वेष्टित असते तशी महापतिव्रता गांधारी स्नुषानीं परिवेष्टित होती, तीस पाहून अभिवादन केलें, तेव्हां गांधारीनें त्यास आशीर्वाद दिला. नंतर धर्मराज पुनः प्रज्ञाचक्षु जो धृतराष्ट्र याजकडे आला असतां धृतराष्ट्रानें पांडवांच्या मूर्ध्नीचें अवघ्राण केलें, तेणें करून पांडव हर्षित होऊन तेथून निघाले त्यांस पाहून कौरव परम हर्षित झाले. त्याकाळीं पांडव रत्नानीं युक्त अशा ग्रहामध्यें प्रवेश करण्यास गेले त्या काळीं दुःशला व धृतराष्ट्र स्नुषा यांणीं द्रौपदीची अतिशय शोभा पाहिली असतां त्यांचें मन खिन्न झालें. पुरुषव्याघ्र पांडवानीं गृहांत प्रवेश केल्यावर आपल्या स्त्रियांसहवर्तमान कांहीं प्रीतीचीं भाषणें करून नंतर पूर्वाण्हिक कर्तव्यकृत्यें केलीं. सर्वांनीं आपले केशप्रसाधन करून अंगास दिव्यचंदनें लाविलीं. आणि स्वस्थ मनस्क होऊन ब्राह्मणांचे आशीर्वाद घेतले. नंतर उत्तम प्रकारचें भोजन करून आपल्या मंदिरांत गेले. त्यामंदिरांत सुंदर स्त्रियांचीं गायनें व रतिविहारादि होत आहेत तेणें करून पांडव संतुष्ट होऊन ती रात्र सुखें करून अतिक्रमण केली. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं बंदिजनाशीं पांडवांचें स्तवन करून उठविलें असतां ते आपली आन्हिक क्रिया करून परम आनंदानें रम्य सभेंत प्रवेश केला. असा विषय यांत आहे.

५९. अध्याय एकुणसाठावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धर्मराज प्रभृति पांडवानीं प्रवेश केल्या नंतर सर्व राजांस भेटून व पूजेस जे योग्य त्यांचा पूजा करून उत्तमोत्तम चित्र विचित्र आसनांवर बसले असतां

सुबलपुत्र शकुनि धर्मराजास बोलतो हे राजा, हे सर्व नृपति सभेमध्यें तुझीच वा
ट पहात बसले आहेत. आतां पाश टाकून द्यूतक्रीडा करण्याचा समय आहे या
स्तव द्यूतक्रीडा करावी असें शकुनीचें भाषण श्रवण करून धर्मराज बोलतो. हे
शकुने द्युतक्रीडा पापकर्म होय या मध्यें क्षत्रिय पराक्रम नसून सत्य व नीतिही
मुळींच नाहीं, असें असतां द्यूताची तूं कां प्रशंसा करितोस? कपटद्यूत आचरण
करणारा सन्मान पावत नाहीं. अरे शकुनि क्रूरा सारखा अमार्गें करून आह्मांस
जिंकण्याची इच्छा करूं नको. असें धर्मराजाचें वाक्य श्रवण करून शकुनि बोल
तो हे धर्मराजा, द्यूतांतील भविष्य कपट जो जाणतो तो विधिज्ञ ह्मणून समज
ता. आणि जयास योग्य असा पण करून पराजया विषयीं जो चिकित्सा करितो तो
महामति द्यूत समजतो. या उपायतानीं द्यूत केलें असतां कांहीं बाधक व्हावयाचें
नाहीं. द्यूतांत अभक्ष्याचा जय व अभक्ष्याचा पराजय हें फांशांचे स्वाधीन आ
हे; यास्तव दैवें करून जसा अक्षपात होईल त्या प्रमाणें त्याचा जय होईल. त्यां
त द्यूत खेळणाराकडे काय दोष आहे! तूं मनामध्यें शंका न धरितां द्यूतासआ
रंभ लौकर करावा. असें शकुनीचें भाषण श्रवण करून युधिष्ठिर बोलतो. हे
शकुनि, मुनिश्रेष्ठ जे असित देवल यानीं जीं कर्मद्वारें स्वर्ग मोक्ष प्राप्तीचा मा
र्ग सांगितलीं आहेत तीं जो आचरण करितो तो नीतिमान समजावा. ही द्यूत
क्रीडा पापरूप असून कपटी पुरुषा पाशीं केली असल्यामुळें फारच पातकला
गतें, यास्तव तिचा अंगिकार करूं नये. क्षत्रियानीं धर्मे करून युद्धामध्यें क्षत्रि
यांस जिंकावें; परंतु कपटास्त्रें करून कधींही जिंकूं नये. आर्यपुरुष अपशब्द
बोलत नाहींत, कपटानें आचरण करीत नाहींत, त्याच्या वाणींत व युद्धस
मयींही कौटिल्य नसतें, हें सत्पुरुषाचें लक्षण होय. हे शकुनि आह्मीं तर
शक्ती करून ब्राह्मणाचें संरक्षण करण्याची इच्छा करितों त्या पेक्षां आमचें
द्रव्य कपटानें पराजय करून हरण करण्यास तूं इच्छाकरूंनकोस. कपटें क
रून सुख व धन प्राप्त होण्याची मी इच्छा करीत नाहीं. या कपटद्यूताचा प्रका
र उत्तम लोकांस प्रशस्त नाहीं यास्तव तें खेळूं नये. असें धर्मराजाचें भाषण
श्रवण करून शकुनि बोलतो हे राजा, विद्वानानीं विद्वानास जर जिंकिलें तर
त्यांत कपट आहे असें खचित समजावें. जो अक्षज्ञ आहे तोच दुसऱ्यास

कपटें करून जिंकील. अविद्वान् विद्वानाकडे गेला असतां कपट काय करणार आहे? तसाच कृतास्त्र किंवा अकृतास्त्र दुर्बल अथवा बलवान् असले तरी कपटें कोणच्याच कर्मामध्यें नाहीं, असें नाहीं. आतां तूं येथें येऊन मजसह वर्तमान अक्षक्रीडा करणें हें कपट मानितोस तर तुला मजपासून भय उत्पन्न झालें असें वाटतें. वास्तव तूं क्रीडे पासून परावृत्त हो. असें शकुनीचें भाषण श्रवण करून धर्मराज बोलतो हे शकुनि मला युद्धा विषयीं व द्यूता विषयीं कोणी बोलाविलें असतां माघारा फिरत नाहीं हें माझें व्रतच आहे. दैव बलवत्तर आहे त्या पेक्षां मीं त्याच्या स्वाधीन आहें. आतां मी या सभे मध्यें बसतों आहे. मजसह वर्तमान क्रीडा करण्यास कोण येतो? कोणाशीं माझें द्यूत होतें? द्यूतामध्यें पण काय योजिला आहे? हें सांगून द्यूतास प्रवृत्त व्हावें असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून दुर्योधन बोलतो हे धर्मराजा, मी धनाचा व रत्नांचा दाता आहें. माझ्याकरितां हा माझा मातुल शकुनि द्यूतक्रीडा करील. नंतर धर्मराज भाषण करितो हे दुर्योधना, दुसऱ्यानें दुसऱ्या करितां द्यूत करावें हें मला विषम वाटतें. असो. हे विद्वन् पण लाऊन द्यूतास आरंभ करावा. असा विष०

६०. अध्याय साठावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, द्यूत करण्याचा निश्चय झाल्यावर सर्व राजानीं धृतराष्ट्रास पुढें करून सभेमध्यें गेले. भीष्म, द्रोण, कृपाचार्य व महाबुद्धिमान् विदुर हे त्या सभेमध्यें असंतुष्ट मनें करून बसले. त्या सभेंत महान् महान् सिंहासारखे पराक्रमी राजे प्रविष्ट होऊन एक आसनावर दोन दोन व कोणी पृथक् पृथक् बसले असतां आकाशांत जशी देवसभा देव समुदायानीं सुशोभित दिसते तशी दुर्योधनाची सभा त्या काळीं शोभली. सर्वही धनुर्वेदवेत्ते शूर व महातेजस्वी सभेमध्यें बसले असतां द्यूतास आरंभ झाला. त्या काळीं धर्मराज दुर्योधनास भाषण करितो हे राजा, हा बहुत मोल्यवान समुद्रांत उत्पन्न झालेला, उत्तम मण्याचा, सुवर्णानें भूषित केलेला, हार आहे तो मी पणास लावितों. तूं कोणता प्रतिपण लाऊन माझ्याशीं खेळतोस? तें सांग. नंतर दुर्योधन बोलतो मजपाशीं बहुत द्रव्य आहे. मला अर्थाविषयीं कांहीं मत्सर नाहीं. तुला पाहिजे तें द्रव्य घेऊन हा पण जिंक. असें दुर्योधनाचें भाषण श्रवण करून अक्षतत्वाचा जाणता

शकुनि हस्तामध्यें फांसे घेऊन ते भूमीवर टाकून धर्मराजास भाषण करितो. हे राजा, तुझा मी जिंकिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

६१. अध्याय एकसष्टावा:- युधिष्ठिर भाषण करितो हे शकुने, माझ्यापासून कपटानें द्यूतामध्यें द्रव्य हरण करून गर्विष्ठ झालास? बरें, पुनः पण लाऊन खेळतों. सहस्रनिष्क परिमित सुवर्णानें भरलेल्या पेट्या कोश व इतर बहुत प्रकारचें हिरण्य इतकें धन राजा मजपाशीं आहे तें पणास लाऊन तुजसह वर्तमान खेळतों असें ऐकून शकुनीनें हस्तामध्यें फांसे घेऊन राजा हें तुझें धन मी जिंकिलें. असें ह्मणून फांसे टाकून तें सर्व धन जिंकिलें. पुनः युधिष्ठिर भाषण करितो हे शकुनि, सहस्ररथतुल्य व्याघ्रचर्मानें वेष्टित चक्रें व मध्यभाग ज्याचा फार उत्तम किंकिणी जालानीं मंडित असा एक माझा बसावयाचा रथ आहे, हा सर्व रथा मध्यें श्रेष्ठ असल्या मुळें शत्रूस जिंकण्यास जातें वेळीं मी या मध्यें बसतों ह्मणून यास जैत्ररथ असें ह्मणतात. या रथाच्या गमनकाळीं मेघा सारखी गर्जना होते. या रथास कुमुद छायेसारखे आणि सुशिक्षित आठ अश्व वहन करितात. त्या अश्वाचे चरण पृथ्वीस स्पृष्ट झालेले दिसत नाहींत. हें धन माझें आहे तें पणास लाऊन खेळतों असें ऐकून शकुनि फांसे टाकून भाषण करितो. हे राजा, तुझें धन मी जिंकिलें. पुनः युधिष्ठिर भाषण करितो. हे शकुनि, एक लक्षसंख्याक दासि वयानें तरुण, हेमाभरणानीं विभूषित केलेल्या, चतुःषष्टिकला विशारद, उत्तम प्रकारचीं वस्त्रें धारण करणाऱ्या, सामगायनामध्यें बहुतच कुशल हें धन राजा माझें आहे तें पणास लाऊन तुजसहवर्तमान खेळतों. नंतर शकुनि फांसे टाकून हे राजा, हें धन मी जिंकिलें असें शकुनीचें भाषण श्रवण करून धर्मराज भाषण करितो हे शकुनि, लक्ष संख्याक दास मोठे कुशल नाना प्रकारचीं उत्तम वस्त्रें परिधान करणारे अनुलोम जातीचे महाबुद्धिमान, मेधावी इंद्रियांचा निग्रह ज्याणीं केलेला, तरुण कुंडलें धारण करून सुशोभित झालेले, हस्तामध्यें सुवर्णाचीं तारें घेऊन निरंतर अतिथींस भोजन घालणारे हें धन राजा मजपाशीं आहे. पणास लाऊन आतां क्रीडा करितों असें धर्म राजाचें वाक्य श्रवण करून कृतनिश्चित झालेला कपटि शकुनि फांसे टाकून युधि-

त्रिरास ह्मणतो हे राजा तुला जिंकिलें. नंतर धर्मराज भाषण करितो हे सुबलपु त्रा शकुने, सहस्रसंख्याक गज सुवर्णाच्या रज्जूनीं बद्ध केलेले, भूषणानीं सु शोभित, गंडस्थलांचे ठायीं पद्माकार चिन्हानीं चिन्हीत, हेममाळा धारण कर णारे, एक एक गजास आठ आठ हस्तिणी विषया करितां दिलेल्या, पुराचाभे द करणारे, नूतन मेघा सारखे कांतिमान् हें धन मी पणास लाऊन द्यूतक्रीडा करितों असें ह्मणून धर्मराजानें जें जें द्रव्य पणास लाविलें तें तें शकुनीनें कप टाचा आश्रय करून जिंकिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

६२. अध्याय बासष्टावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सर्वस्व अ पहार करणारें असें उभयतांचें घोर द्यूत प्रवृत्त झालें असतां, सर्व संशयाची निवृ त्ति करणारा विदुर धृतराष्ट्रास भाषण करतो हे महाराजा, मी तुला आतां जें भाष ण करितों त्याचा तूं पक्का विचार कर. मुमुर्षु पुरुषास औषध जसें रुचत नाहीं त सें तुला शास्त्र रुचत नाहीं. अरे, हा पापमति दुर्योधन ज्या काळीं उत्पन्न झाला त्या काळीं याणें कोल्ह्या सारखा शब्द केला होता, तस्मात् हा भारतकुलाचा नाश क आहे. निश्चयें करून हा दुर्योधन तुह्मांस कालरूपी प्रगट झाला आहे असें स- मज. अरे राजा, तुझ्या गृहामध्यें दुर्योधन रूपानें कोल्हाच रहात आहे हें तूं मोहें क रून कसें जाणत नाहींस? आतां एक शुक्राचार्याची नीति सांगतों श्रवण कर. को णी एक मधु विकणारा पुरुष मधाचे आशेनें पर्वतावर चढून मध काढण्यासप्र वृत्त होऊन आपण पडूं असें मनांत न आणितां पडतो, तसा हा शकुनि अक्ष द्यूतें करून मत्त होऊन महारथी पांडवांशीं वैर करितो; परंतु पुढें आपला पात होई- ल हें जाणत नाहीं. हे महाराज धृतराष्ट्रा, मला असें एक विदित आहे कीं, भोज कुलांतील कोणी एक राजास असमंजस या नामाचा पुत्र होता तो दुष्ट असल्या मुळें सर्व पौरलोकांस त्याणें दुःख दिलें होतें, ह्मणून पौरांचें हित होण्या करितां राजानें त्या पुत्राचा त्याग केला. अंधक, यादव, भोज यासर्वांनीं एकत्र होऊन कं- साचा त्याग केला. पुढें त्याच्याच अनुमतें करून कृष्णानें कंसास मारिलें असतां सर्व ज्ञातीय शेंकडों वर्षें आनंद पावले. हे राजा, तुलाही मी असेंच सांगतों कीं, अर्जुन त्या दुर्योधनाचा तुझे आज्ञेनें निग्रह करो. त्या पापी दुर्योधनाचा निग्र ह झाला असतां सर्व कौरव सुख पावतील. जसें काकपक्षी देऊन चित्रविचि-

म्र पक्षांचे मयुर विकत घ्यावे, अथवा कोल्हा देऊन शार्दूल घ्यावा तसा तूं राजा दुर्योधनास देऊन या पांडुपुत्रांस घे. हे राजा, तूं शोकसागरांत निमग्न होऊं नको स. एका पुरुषाचा त्याग करून सर्व कुळास सुख होत असल्यास एक पुरुषा-चा त्याग करावा. एक कुळाचा त्याग करून सर्व ग्रामास सुख होत असल्यास एक कुळाचा त्याग करावा. एक ग्रामाचा त्याग करून सर्व देशास सुख होत असल्यास एक ग्राम टाकावा. सर्व पृथ्वीचा त्याग करून आपल्यास सुख होत असल्यास आत्मसुखा करितां पृथ्वीचाही त्याग करावा. या प्रकारची नीति सर्वज्ञ, सर्वांचा भाव जाणता, सर्व शत्रूंसही भयंकर अशा शुक्राचार्यानें जंभासुराच्या त्यागा करितां सर्व असुरांस जी नीति सांगितली ती मी तुला सांगितली. दुस-री अशी एक गोष्ट आहे कीं, कोणी एक धनलोभी पुरुषानें वनांत संचार कर-णारे हिरण्यग्रीवा नामक पक्षी होते त्यांस धरून आपले गृहीं बहुत दिवस पोषित केले होते. पुढें कांहीं दिवसांनीं या पक्ष्यांचा घात केला असतां त्यांज पासून आपल्यास बहुत धन प्राप्त होऊन आपण सुख भोगूं असें त्यास वा टून त्याणें त्या पक्ष्यांचा प्राण घेतला असतां त्याची ती अर्थसिद्धि न होऊन पश्चात्तापांत पडला. आणि इहलोक व परलोक यां पासून भ्रष्ट झाला. तसा तूं धृतराष्ट्र राजा, अर्थकामुक होऊन पांडुपुत्रांचा द्रोह करूं नकोस. जसा पक्षि-घाति पुरुष पुढें पश्चात्ताप पावला तसा तूं पश्चात्ताप पावशील. जसा मालाका-र पुरुष आराम संबंधि वृक्षा पासून पुष्पं मात्र ग्रहण करून वृक्षाचें रक्षण क-रितो तसा तूं पांडवांचें रक्षण करून आपली अर्थसिद्धि करून घे. जसा अंगार-कारी पुरुष समूल वृक्षास दग्ध करितो तसा तूं पांडवांचा समूल नाश करूं न-को. हे राजा, अमात्य व सैन्य यांसहवर्तमान आपले पुत्र यमगृहीं कां पाठवि-तोस? अरे, पार्थ रणांगणीं आले असतां त्यांच्याशीं युद्ध करण्यास कोण सम-र्थ होतील बरें! मरुद् देवां सहवर्तमान इंद्र जरी त्यांच्या अग्रभागीं आला तथा-पि जय पावणार नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

६२. अध्याय बासष्ठावा- विदुर पुनः धृतराष्ट्रास भाषण करितो हे राजा, द्यूत हें कलहानें मूळ असून परस्परांत भेद उत्पन्न होण्याचें भयंकर कारण आ-हे. हा तुझा पुत्र दुर्योधन सभेमध्यें बसून द्यूतद्वारा उग्र वैर उत्पन्न करितो. मला

असें वाटतें कीं, हे सकल प्रतीपवंशांत उत्पन्न झालेले व शंतनूनें वाढविलेले बा-ल्हिकां सहवर्तमान दुर्योधनाच्या अपराधानें महासंकट पावतील. हा दुर्योधन म-दें करून राष्ट्रांतून क्षेमबाहेर काढून टाकितो. जसा उन्मत्त झालेला बलिवर्द आपले शृंगास बलात्कारें करून आस्फालन करितो तसा दुर्योधन आपल्या क्षेमशृंगाचें भेदन करून दूर टाकण्याची इच्छा करितो हे धृतराष्ट्र राजा, जो स्वकीय दृष्टीचा अवमान करून परचित्तें करून अनुसरतो तो समुद्रामध्यें नौका नेणारा बाल असला असतां पार जाणारे जसे घोर संकट पावतात तसा दुर्योधन घोर सं-कटामध्यें सर्वांस बुडवितो. हा दुर्योधन पांडवांशीं पण लाऊन त्यांस जिंकून त्यां-चें द्रव्य आणितो ह्मणोन हे धृतराष्ट्र राजा, तूं वारंवार आनंदामध्यें निमग्न अस तोस; परंतु सर्व लोकांच्या नाशास कारण होणारा विनोद चांगला नाहीं. ज्या पा सून सर्वांचा नाश होतो तें करण्यास प्रवृत्त होऊं नये. हा युधिष्ठिराशीं द्यूतक्रीडा पूर्वक कलह अकस्मात् झाला आहे, या पासून तुला नीच फल मिळेल. हे प्रा-तिपेय हो, हे शांतनव हो, त्या सर्व कौरवांच्या सभेमध्यें शुक्राचार्यांच्या नीति करून मी भाषण करितों हें श्रवण करा. हा घोर प्रज्वलित झालेला कलहा-ग्नि या मध्यें दुर्योधनाच्या अनुलक्षें करून तुह्मीं प्रवेश करूं नका. अहो ज्या काळीं अजातशत्रु पांडव क्रोधाचें नियमन करणार नाहींत वृकोदर, सव्यसाची, नकुल, व सहदेव हे क्रुद्ध होतील, त्या काळीं आपत्ति समुद्रामध्यें तुह्मीं बुडूं लागलां अ-सतां तुमचें रक्षण करण्यास कोण समर्थ होईल? हे धृतराष्ट्र, द्यूत केल्याचे पू-र्वीं मनें करून जेव्हढें द्रव्य तूं इच्छितास तितकें तुला प्राप्त झालें असतें. हे पां डव, बहुत वित्तवान यांस आह्मीं जिंकिलें असें तूं समजतोस; परंतु हा जय प राजयासारखा आहे. पांडव हेच कोणी एक धन ह्मणून त्यांचें तूं सेवन कर-शील, तर तुला महान् लाभ होईल. हा पार्वतीय शकुनी कपटें करून द्यूत करि तो हें आह्मीं जाणतों; आतां हा जेथून आला तेथें गमन करो. हे भारता, भार तांचें आणि पार्वति यांचें आतां द्यूतयुद्ध करवूं नकोस. असा विषय यांत आहे.

६४. अध्याय चौसष्टावा:- दुर्योधन भाषण करितो हे विदुरा, तूं शत्रूंच्या पक्षाचें स्तवन करून धार्तराष्ट्रांची निंदा करतोस हें सर्व आह्मीं जाणतों. बाल्या वस्थेपासून तूं आमचा अवमान करतोस. इष्ट जय, व अनिष्ट पराजय या विष-

यीं इच्छा करितो त्या पुरुषास अन्यत्र काम ह्मणावें; कारण तो तशी निंदा व प्रशंसा करितो. हे विदुरा, तुझें मन व हृदय आह्मां विषयीं सर्व लोकां मध्यें प्रतिकूलता दाखवितें. जसा मांडीवर वाढविलेला सर्प रक्षण करणाऱ्यास मारितो तसा तूं धृतराष्ट्राच्या घाताची इच्छा करितोस. भर्तृघ्न व पापी असें तुला कोणी ह्मणत नाहींत, ह्मणून तूं पापकर्मास भीत नाहींस कीं काय? आह्मीं शत्रूस जिंकून महत् फल पावलों. हे विदुरा, तूं आतां आह्मांस क्रूर भाषण बोलूं नकोस. तूं शत्रूचा सखा होऊन मूर्खपणानें आमचा द्वेष करितोस हें तुला अयोग्य आहे. अयोग्य बोलणारा पुरुष सर्वांचा शत्रु होतो. गुह्यभाषण असेल तें गुप्त ठेवावें. तसें तूं न करितां आमचें सर्व कृत्य प्रकाशित करितोस. या सभे मध्यें पांडवांचा तूं आश्रित होऊन धृतराष्ट्रास इच्छेस येईल तें बोलतोस. हे विदुरा, तुझें मन आह्मीं जाणतों. तूं आमचा अपमान करूं नकोस. तुला ज्ञान नसेल तर चार वृद्ध सभेमध्यें बसले आहेत यांजपासून ज्ञानाची प्राप्ती करून घे. पर कार्या विषयींच केवळ निमग्न होऊन राहूं नकोस. आज पर्यंत आपल्या संपादन केलेल्या यशाचें रक्षण कर. मी कर्ता आहें असें समजुं नको. तूं अशीं कठोर भाषणे नित्यशः बोलूं नको. तुझें कल्याण असो. क्षमा करणारास तूं दुखवूं नको. अरे विदुरा, शासन करणारा एकच दुसरा कोणी नाहीं. गर्भामध्यें वास करीत असतां जो संरक्षण करितो त्यानेंच मला प्रेरणा केल्या मुळें जसें नीच देशा पासून प्रयत्नानें उच्च देशाचे ठायीं जल नेणें असें हें कर्म मी करितों. ज्याच्या नियोगानें पुरुष आपलें शिरें करून पर्वत भेद करितो तोच अनिष्ट विषयीं प्रेरणा करितो. बलात्कारानें आमात्यास जर एकादे कार्यास योजिला असतां तो आपलें शत्रुत्व जर करील तर त्यास त्या कामा विषयीं योजूं नये. हे सभासदहो, तुह्मीं सर्व आमचे मित्र आहांत यास्तव तुह्मीं सर्वांनीं विदुराचे भाषणाची उपेक्षा करावी. जो प्रथम कापूर पेटवून त्याच्या प्रकाशानें रत्नांचा शोध करण्याची इच्छा करितो त्याच्या हातीं रत्नें व कापुराचें भस्म ही लागत नाहीं. हा शत्रुहिताची इच्छा करणारा असून माझ्याशीं द्वेष करणारा आहे; यास्तव अशा अकल्याण कर्त्या मनुष्यास माझे गृहीं मी ठेवीत नाहीं. हे विदुरा, जशी दुष्टस्त्री किती समजाविली असतां स्थीर होऊन गृहीं राहत नाहीं.

तसा तूं आहेस, यास्तव तुझे इच्छेस वाटेल तेथें तूं जा. असें दुर्योधनाचें भाषण श्रवण करून विदुर बोलतो हे धृतराष्ट्रा, तुझा पुत्र व मी यां मध्यें पक्षपात न करितां बोल. सकल राजांचीं चित्तें विद्वेषें करून भ्रष्ट झालीं असें मला दिसतें. ते तर लालूच दाखवून नंतर मुसळें करून ताडन करितात, तसा हा नाहीं. हे मंदबुद्धे दुर्योधना, तूं आपल्यास असें मानतोस; परंतु तूं बाल आहेस. जो कोणी पूर्वी एके पुरुषासीं स्नेह करून नंतर दूषण देतो तो बाल ह्मणावा. जशी अग्निहोत्र्याची स्त्री दुष्ट झाली असतां गृहांत ठेवण्यास योग्य नाहीं, तसाच मंदबुद्धि कल्याण पावत नाहीं. हे भरतर्षभा धृतराष्ट्र राजा, जसा साठ वर्षांचा पति कुमारिकेस प्रिय होत नाहीं, असा माझा बोध तुला पुत्रांसहवर्तमान रुचत नाहीं. जर तुला कार्याचे ठायीं हिताहित होऊन प्रियाची गरज असेल तर हे सकल राजे, स्त्रिया, पंगु व जड बसले आहेत यांस विचार जो मिष्ट भाषण करितो तो निश्चयें करून पापी समजावा; परंतु अप्रिय भाषण असून परिणामीं हितावह असा वक्ता व श्रोता दुर्लभ आहे. जो धर्मपर होऊन आपल्या पोषकाचें प्रिय अप्रिय सोडून केवळ पथ्यकरच भाषण करितो त्यानें राजा सात्यवान होतो. हे राजा, ज्याचें दुष्ट प्राशन करीत नाहींत, अव्याधीतें उत्पन्न करणारा, कटु, तीक्ष्ण, उष्ण, यशाचें हरण करणारा, रूक्ष लसुना सारखा दुर्गंधयुक्त असा जो मन्यु (क्रोध) यातें तूं प्राशन करून शांत हो. हे विचित्रवीर्य पुत्रा, पुत्रांसहवर्तमान तुझें यश व धन निरंतर समृद्ध असो, अशी मी इच्छा करितों. हे राजा, आतां तुझी जशी इच्छा असेल त्या प्रमाणें असो, मी तुला नमस्कार करितों. हे ब्राह्मण हो माझीही स्वस्ति होवो. हे दुर्योधना, आशीविषासारखे नेत्रविष असे क्रूर जे पांडव यांजला विशेषें करून कोपवूं नकोस हेंच मी तुला प्रयत्नें करून वारंवार सांगतों. जो पंडित असेल तो यांस कोप उत्पन्न करणार नाहीं. शस्त्रानें अथवा क्रोधदृष्टीनें पंडव तुला दग्ध करून टाकतील. असा विषय या अध्यायांत आहे.

६५. अध्याय पांसष्टावा:- शकुनि भाषण करितो हे युधिष्ठिरा, तूं बहुत द्रव्य पराजय पावविलेंस, आतां तुझें अपराजित द्रव्य कोणतें आहे तें सांग. असें शकुनीचें भाषण श्रवण करून युधिष्ठिर भाषण करितो, हे सुबलपुत्रा माझें-

द्रव्य असंख्याक असतां तूं मला हें कशाकरितां पुसतोस? आतां अयुत, प्रयुत, शंकु, पद्म, अर्बुद, खर्व, निखर्व, कोटीशत संख्याक द्रव्य पणास लाविलें, क्रीडा करावीस. तुजसहवर्तमान मी क्रीडा करितों. असें युधिष्ठिराचें भाषण श्रवण करून शकुनीनें कपटाश्रित होऊन फांसे टाकून जिंकलें असें भाषण केलें. पुनः धर्मराज भाषण करितो, हे शकुनि, बैल, अश्व, धेनु, असंख्याक शेळ्या, मेंढ्या, परणाशा नदीपासून सिंधुनदी पर्यंत जितक्या आहेत हें सर्व माझें धन यांसहवर्तमान मी तुझ्याशीं क्रीडा करितों असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून पुनः शकुनि फांसे टाकून जित असें बोलला. पुनः धर्मराज शकुनीस भाषण करितो हे शकुनि, पुरें, देश, भूमि, ब्राह्मणा वांचून माझें इतर धन व शेवक हें माझें शेषधन आतां मी पणास लाविलें, मजसहवर्तमान क्रीडा कर. असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून शकुनीनें फांसे टाकून जित असें भाषण केलें. पुनः धर्मराज बोलतो हे शकुने भूषणानीं विभूषित होऊन शोभलेले हे राजपुत्र व इतर कुंडलें कांहीं स्वर्ण व सर्व राजभूषणें हें माझें द्रव्य येणें करून मी तुजसहवर्तमान क्रीडा करितों असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून पुनः शकुनीनें फांसा टाकून जित असें भाषण केलें असतां पुनः धर्मराज भाषण करितो हे शकुनि, श्याम, तरुण, आरक्तनेत्र, व सिंहा सारखे स्कंध ज्याचे, महाभुज, असा नकुल माझा बंधु हें माझें द्रव्य आहे. असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून पुनः युधिष्ठिरास बोलतो हे राजा, आह्मीं नकुलास जिंकिलें. असें शकुनीचें भाषण श्रवण करून धर्मराज भाषण करितो हे शकुनि, सर्व लोकांस धर्माचा उपदेश करणारा असून पंडित पदवी पावलेला राजपुत्र सहदेव द्यूतास लावण्यास अयोग्य व मला प्रिय असतां अप्रिया सारखा मानून त्या द्रव्यें करून मी तुज सहवर्तमान क्रीडा करितों. असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून कपटाश्रय करणारा शकुनि जित असें ह्मणून धर्मराजास बोलतो राजा, तुझे प्रिय भ्राते माद्रीपुत्र मी जिंकिले. आतां भीमसेन व धनंजय हे लावण्यास उत्तम आहेत असें मला वाटतें. असें शकुनीचें भाषण ऐकून धर्मराज बोलतो हे शकुने, तूं निश्चयें करून अधर्माचें आचरण करितोस. कांहीं नीति पहात नाहींस. आह्मी सर्व एक विचारें करून वर्तणारे असतां तूं आ

मच्यामध्यें भेद उत्पन्न करण्याची बहुत इच्छा करितोस असें युधिराचें भाषण श्रवण करून शकुनि बोलतो हे राजा, चित्तास वश होऊन जो अधर्माचें आचरण करितो तो नरकामध्यें चिरकाल गमन करितो. हे राजा, तूं वयें करून ज्येष्ठ व गुणें करून श्रेष्ठ आहेस. हे भरतर्षभा, तुला नमस्कार असो. स्वप्नामध्यें जागृत अवस्थेंतलीं कर्मे दृष्टिगोचर होत नाहींत. धूर्त द्यूत करणारे क्रीडा करीत असतां उन्मत्ता सारखे अनर्थ उत्पन्न करितात. असो हे राजा, मी मत्त होऊन जें भाषण केलें त्याची क्षमा करावी. असें शकुनीचें भाषण श्रवण करून युधिष्ठिर भाषण करितो हे शकुनि, आह्मांस संग्रामा मध्यें नौके सारखा पार नेणारा, शत्रूंचा पराजय कर्ता राजपुत्र महावेगवान, सर्व लोकां मध्यें महावीर, द्यूतामध्यें पणास लावण्यास अयोग्य, ज्या सारखा योद्धा दुसरा कोणी नाहीं असा जो फाल्गुन यास पणामध्यें लाऊन तुजसह वर्तमान क्रीडा करितों. असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून शकुनि जित असें ह्मणाला. असें शकुनीचें वाक्य ऐकून युधिष्ठिर बोलतो हे शकुने जो युद्धामध्यें आमचें रक्षण करितो, जसा दानवांचा शत्रु वज्री, तसा सर्वांचा शत्रु, वक्र दृष्टीनें पहाराणा, नम्र आहेत भृकुटि ज्याच्या, उदार मनाचा, सिंहासारखे स्कंध ज्याचे, जो निरंतर क्रोधी, बला विषयीं ज्याची तुलना करण्यास अन्यपुरुष नाहीं, गदा धारण करणारां मध्यें श्रेष्ठ, शत्रुमर्दन करणारा, द्यूतास लावण्यास अयोग्य जो राजपुत्र भीमसेन हें माझें द्रव्य येणें करून मी तुजसहवर्तमान क्रीडा करितों असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून कपटाचा आश्रय करणारा शकुनि जित असें ह्मणोन भाषण करतो हे कुंतिपुत्रा, बहुत धन व गजाश्व यांसह वर्तमान आपले बंधु पणामध्यें लाऊन पराजय पावल्यास आतां जिंकिल्या वांचून कांहीं अवशिष्ट द्रव्य राहिलें असेल तर तें पणास लाऊन क्रीडा कर. असें शकुनीचें भाषण श्रवण करून युधिष्ठिर बोलतो हे शकुनि, सर्व बंधूंस प्रिय जो मी तो शेष राहिलों आहें. मला पणामध्यें तूं जिंकिलें असतां मी तुमचें दास्यकर्म करीन. असें धर्मराजाचें भाषण ऐकून कपटाचा आश्रय करणारा, द्यूताविषयीं कृतनिश्चय शकुनि जित असें ह्मणून त्यासभाषण करितो हे राजा, तूं आपल्यास पणामध्यें लाऊन पराजित केलेंस हें पापरूप कर्म केलेंस तुझें शेष

द्रव्य असतां तूं आपला पराजय केलास हें केवळ पापकर्म होय, यांत संशय नाहीं. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रकारें शकुनि पृथक् पृथक् फांसे टाकून सर्वांस पणामध्यें जिंकून पुन: धर्मराजास भाषण करितो हे राजा, तुझी प्रिया द्रौपदी हा एक पण जिंकिल्या वांचून राहिला आहे यास्तव प्रथम पांचालराजाची कन्या कृष्णा इजला द्यूतामध्यें लाऊनही पराजय पावल्या नंतर तूं आपल्यास लावण्यास योग्य आहेस. असें भाषण श्रवण करून युधिष्ठिर भाषण करितो हे शकुनि, जी ऱ्हस्व व दीर्घ नाहीं, तशीच कृश किंवा अतिपुष्टही नाहीं, नीळवर्णाचे कुरळ केश जीचे, शरत्कालचे उत्पलां सारखे प्रफुल्लित नेत्र व शरीराचा गंध जीचा असून शरत्कालचे पद्माचें निरंतर सेवन करणारी रूपें करून लक्ष्मी समान, जशी पुरुषास सकलगुणानीं युक्त स्त्री असावी तशी सर्व गुणानीं युक्त, पतींस अनुकूल प्रिय भाषण करणारी, धर्मकामार्थ सिद्धी करितां पुरुषास जशी स्त्री पाहिजे तशी आचरण करणारी, सर्वांच्या मागून शयन करून सर्वांच्या प्रथम जागृत होणारी, गोपाळापासून राजा पर्यंत कृताकृत ह्मणजे कोणी भोजन केलें कोणी न केलें याची तजवीज ठेवणारी, जीचें मुख घर्मबिंदूनीं युक्त झालें असतां तें कमला सारखें शोभतें, मल्लिकापुष्पा सारखा सुगंध जीचा, वेदी सारखी मध्यभागी कृश, दीर्घ केशी, आरक्त मुखी, जिच्या शरीरावर लोम नाहींत, पांचाल राजाची कन्या द्रौपदी हें माझें द्रव्य. हे शकुनि, या द्रव्यें करून मी तुजसह वर्तमान द्यूतक्रीडा करितों. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रकारें बुद्धिमान जो धर्मराजा याणें भाषण केलें असतां वृद्धजनाच्या मुखा पासून धिक् धिक् अशा वाणी उत्पन्न झाल्या. सर्व सभा क्षोभ पावली. भीष्म, द्रोण, कृपाचार्य यांच्या शरीरावर स्वेद उत्पन्न झाला. विदुर गतप्राण झाल्या सारखा होऊन आपल्या मस्तकावर हात ठेवून खालीं पहात चिंतेनें ग्रस्त झाल्यामुळें पन्नगा सारखा श्वासोच्छ्वास टाकूं लागला, त्या कालीं धृतराष्ट्र राजा, हर्षायमान होऊन वारंवार काय जिंकिलें! काय जिंकिलें? असा प्रश्न करीत असतां त्याच्या हर्षाकृतीचें लक्षण आच्छादित झालें नाहीं. दुःशासनादिकांसह वर्तमान कर्णास तर फारच आनंद झाला. इतर सभासदांच्या नेत्रांतून जलधारा चालल्या. त्या कालीं मदोत

करज यानें शोभलेला असा सुबल पुत्र शकुनि पुनः फांसे टांकून जित असें म्ह णून धर्मराजास भाषण करितो हे राजा, तुझें हें द्रव्य मी जिंकिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

६६. अध्याय सासष्टावा:- दुर्योधन भाषण करितो हे विदुरा, पांडवांची अत्यंत प्रियभार्या जी द्रौपदी तीस येथें आण. ती आपल्या दासींसह वर्त मान आमच्या गृहाचें संमार्जन करून राहो. असें दुर्योधनाचें भाषण श्रवण करून विदुर भाषण करितो हे मंदबुद्धे दुर्योधना, तुझ्या सारख्या पुरुषानें अ सें दुर्भाषण करूं नये. पाशानें बद्ध होऊन पर्वता खालीं लोंबल्या सारखा झालास हें कसें तूं जाणत नाहींस? जसा मृग, व्याघ्रास कोपवीत असतां त त्काल नाश पावतो तसा तूं पांडवांस कोपविशील तर तत्काल नाश पावशी ल. हे मंदात्म्या दुर्योधना, जसे महाविष सर्प कोपिष्ट झालेले शरीरावर धारण केले असतां धारण करणारा मृत्युवश होईल, असें तूं पांडुपुत्रांस कोपित क रून यमगृहीं जाऊं नको. धर्मराजानें आपण परवश होऊन द्रौपदीस पणा स लाविली, त्या पेक्षां ती तुमची दासी होण्यास योग्य नाहीं असें मला वाटतें. जसे वेणु परस्पर घर्षणानें आत्मघातास कारण होतात तसा हा दुर्योधन आहे; का रण हें द्यूत वैरास व महाभयास कारण होऊन हा धृतराष्ट्रपुत्र अंतकालास कसा जाणत नाहीं? अरे, भल्या मनुष्यानें दुसऱ्यास मर्मभेदक भाषण करूं नये. कोणास कठोर भाषण बोलूं नये. द्यूतादिक नीच कर्मानें शत्रूस वश करूं नये. ज्या भाषणानें लोकांचें अकल्याण होईल; अथवा त्याचे शरीराचा दाह होईल असें भाषण करूं नये. हीं सकल भाषणें नरकप्रद आहेत. ज्या मर्मभाषणें क रून मनुष्यास रात्रंदिवस शोक होतो असें भाषण थोरलोक शत्रूसही करीत नाहीत. यास्तव हे दुर्योधना, तूं पांडवांस मर्मभेदक भाषण करूं नको. कोणी ए क अजशस्त्र गिळण्यास उद्युक्त झाला असतां तें शस्त्र त्याच्यानें गिळवेना म्हणोन आपलें मुख भूमीवर ठेऊन पायानें उचलून भक्षणास आरंभ करूं लागला त्या कालीं त्या शस्त्राच्या योगें शिरासह कंठ तुटून खालीं पडला आणि तो अजम रण पावला तसा तूं राजा पांडवांसह वर्तमान वैर करून वैररूप शस्त्रानें आप ल्या स्वजनाचा नाश करूं नको. हे दुर्योधना, तूं जरी सार्वकाल बडबड करितोस

असे पांडव कांहीं बोलत नाहींत. श्वाना सारखी वृत्ति धारण करणारे मनुष्य, वनचर, गृहमेधी, तपस्वी अथवा कृतविद्य कोणी असोत त्यांची निरंतर निंदा करितात. हा धृतराष्ट्रपुत्र दुर्योधन, कुटिल आहे, हा, द्यूतरूप कर्म घोर नरकाचें द्वार आहे हें कसें जाणत नाहीं. दुःशासनादि सकल कौरवही त्याच्याच अनुलक्षें करून चालतात त्या पेक्षां हे सकल कौरव वंशीय दुर्योधनासहवर्तमान घोर नरकांत प्रवेश करणारे उदकांत भोपळे कदाचित् बुडतील, पाषाण कदाचित् जलावर तरतील, तशाच नौकाही कदाचित् उदकावर तरण्यास मोह पावतील; परंतु मूढ धृतराष्ट्रपुत्र माझी पथ्यकारक वाणी श्रवण करणार नाहींत, यास्तव मी आतां खचित सांगतों कीं. अतःपर कौरवांचा सर्वस्व हरण करणारा महादारुण असा नाश होणार यांत संशय नाहीं. शुक्राचार्यांच्या नीति सारख्या पथ्यकारक अशा सुहृदाच्या वाणी हा मंदबुद्धि दुर्योधन अगदीं श्रवण करीत नाहीं ज्या पेक्षा यास अतिशय लोभ उत्पन्न झाला त्या पेक्षां हा लोभच याचा नाश करील. असा विषय यांत आहे.

६७. अध्याय सदुसष्टावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, विदुराचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्रपुत्र दुर्योधन गर्वानें उन्मत्त होऊन विदुराचा धिःकार करून त्या आर्यांच्या सभे मध्यें प्रातिकामी नामक दूताला पाहून भाषण करितो हे प्रातिकामी दूता, तूं द्रौपदीस येथें लौकर घेऊन ये. पांडवां पासून तुला कांहीं भय नाहीं. विदुर तर पांडवांस भिऊन या प्रकारचें भाषण करीत आहे आमची वृद्धि असण्या विषयीं विदुराची किमपिही इच्छा नाहीं. या प्रकारें दुर्योधनाचें भाषण प्रातिकामीनामक दूतानें श्रवण करून सिंहाच्या गृहांत श्वान जसा प्रवेश करितो तसा तो तत्काल राजपत्नीच्या गृहांत प्रवेश करून तिजला भाषण करितो हे द्रौपदी, युधिष्ठिर द्यूतमदानें उन्मत्त झाला आहे. दुर्योधनानें तुला पणामध्यें जिंकिली यास्तव तूं आतां धृतराष्ट्रगृहीं चल. तुला नेण्या करितां मी येथें आलों आहें. असें दूताचें भाषण श्रवण करून द्रौपदी भाषण करिते. हे प्रातिकामी दूता, तूं असें कसें भाषण करितोस? कोणताही राजपुत्र आपल्या भार्येस पणास लावील काय? युधिष्ठिर राजा द्यूतानें मूढ झाला तरी त्याजपाशीं पणास लावण्या करितां दुसरें कांहीं नाहीं कीं काय? असें

द्रौपदीचें भाषण श्रवण करून प्रातिकामी भाषण करितो हे राजपुत्री, अजात शत्रु जो युधिष्ठिर राजा, याजपाशीं पणास लाविण्या करितां ज्या कालीं कांहींना हिसें झालें त्या कालीं त्याणें पूर्वीं आपले चार भ्राते पणास लाविले, नंतर आपणास लाऊन घेतलें, नंतर तुला पणास लाविलें असें प्रातिकामीचें भाषण- ऐकून द्रौपदी बोलत्ये हे सूतपुत्रा, तूं सभेमध्यें जाऊन धर्मराजास विचार कीं, पणामध्यें प्रथम तूं आपल्यास लाविलेंस अथवा मला पूर्वीं पणास लाविलेंहें धर्मराजाचें चिकीर्षित जाणून नंतर मी राजाकडे येईन. असें द्रौपदीचें भाषण श्रवण करून प्रातिकामी दूत सभे मध्यें आला. आणि सकल राजांमध्यें युधिष्ठिर राजा बसला होता त्यास भाषण कर्तो कीं, हे राजा, पणास पूर्वीं तूं कोणास लाविलेंस? ह्मणून तुला द्रौपदीनें विचारिलें आहे. असें दूताचें भाषण ऐकून युधिष्ठिर निचेष्ट व गतसत्वा सारखा होऊन साधु अथवा असाधु असें कांहींच भाषण त्या सूतास केलें नाहीं त्या काळीं दुर्योधन दूतास बोलतो अरे दूता, द्रौपदीनें सभेमध्यें येऊन हा प्रश्न केला असतां उभयतांचें भाषण सकल सभासद श्रवण करतील याजकरितां तूं द्रौपदीसच येथें घेऊन ये. असें दुर्योधनानें भाषण करितांच प्रातिकामी दूत दुर्योधनाचा असल्यामुळें पुनःराजभवनीं जाऊन व्यथित झाला, आणि द्रौपदीस भाषण करितो हे राजपुत्री, हे सभासद तुलाच सभेमध्यें बोलावितात याजमुळें आतां सकल कौरवांचें कसें होईल याचा मला संशय झाला आहे. जो लघु पुरुष तुला सभेंत नेतो तो ऐश्वर्याचें पालन करण्यास समर्थ होत नाहीं. असें दूताचें भाषण श्रवण करून द्रौपदी भाषण करिते ईश्वरानें मूर्खास व पंडितास सुख दुःख तर सारखेंच ठेविलें आहे; परंतु लोकां मध्यें धर्म ह्मणून कांहीं एक पदार्थ आहे त्याचें रक्षण केलें असतां मनाचा संतोष होतो तो धर्म आज कौरवांचा त्याग करून रा हो. आतां त्या सभेंत बसणारे सर्व धर्मात्मे व नीतिमंतामध्यें वरिष्ठ आहेत त्यांस जाऊन हें माझें भाषण निवेदन कर, ह्मणजे ते जसें सांगतील तसें मी निश्चयें करून करीन. या प्रकारें याज्ञसेनीचें भाषण श्रवण करितांच प्रातिकामी सभेमध्यें येऊन तें सकल भाषण सभासदांस सांगितलें असतां, ते-सकल सभासद धृतराष्ट्र पुत्राच्या निर्बंधामुळें अधोमुख करून कांहींच भाष

ण बोलले नाहींत. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धर्मराजानें दुर्योधनाचें इ
च्छित जाणून द्रौपदीस मान्य असा एक दूत होता त्यास सांगीतलें, लवकर
तूं द्रौपदीकडे जाऊन तिला असें सांग कीं, एकवस्त्रा, रजस्वला, वस्त्राचे सोग्या
कडे खालीं पहात, रोदन करीत सभेमध्यें येऊन तुझा श्वशुर जो धृतराष्ट्र राजा
याचे अग्रभागीं उभी रहा ह्मणजे तुझी अशी अवस्था पाहून सकल सभास
द धृतराष्ट्र पुत्राची निंदा करितील. हा धर्मराजाचा आशय जाणून तो दूत प
रम त्वरेनें द्रौपदीच्या भवनीं जाऊन धर्मराजाचा आशय तिला सांगितला.
इकडे सकल पांडव सत्याच्या योगें दीन व दुःखित होऊन एकमेकांकडे न पा
हतां स्तब्ध बसले त्या कालीं दुर्योधन पांडवांच्या मुखाकडे पाहून बहुत हर्षि
त होऊन पुनः प्रातिकामी दूतास भाषण करितो हे दूता, द्रौपदीस येथें आण, ह्म
णजे कौरव तिच्याशीं समक्ष भाषण करतील असें दुर्योधनाचें भाषण प्राति-
कामी दूतानें श्रवण करून तो दुर्योधनानुवर्ती जरी होता तथापि द्रौपदीच्या को-
पापासून भीति पावला. आणि दुर्योधनाची आज्ञा भंग करून त्याच्या श्रेष्ठत्वा-
चा तिरस्कार करीत सभासदांस पुनः भाषण करितो, हे सभासद हो, मी द्रौप-
दीस काय सांगूं तें उत्तर द्या. असें दूतानें भाषण केलेलें श्रवण करून दुर्योध
न आपल्या दुःशासननामक भ्रात्यास भाषण करितो हे दुःशासना, हा आप
ला दूत अल्पधीर आहे. वृकोदरास भितो, यास्तव तूंच स्वतः द्रौपदीकडे जा,
आणि तिला येथें घेऊन ये. हे पांडव तर परवश आहेत ते आतां काय करणा
र अशी त्या भ्रात्याची आज्ञा श्रवण करितांच दुःशासन आरक्त नयन होऊन
तत्काल सभेंतून उठला आणि पांडवांच्या गृहांत प्रविष्ट होऊन द्रौपदीस भाष
ण करितो, हे पांचाली, तुला पणामध्यें जिंकिलें यास्तव तूं आतां आपली लज्जा
टाकून दुर्योधनास पाहण्याकरितां सभेमध्यें चल. हे कमलपत्राक्षी, आतां स
कल कौरवांचें सेवन कर. धर्मेंकरूनच तूं आह्मांस मिळालीस ह्मणून सत्वर
सभेमध्यें चल. असें दुःशासनाचें भाषण श्रवण करून द्रौपदी दुर्मनस्क, वर्ण
हीन होऊन हातानें आपलें मुख आच्छादन करून आर्त झालेली जेथें धृत
राष्ट्राच्या स्त्रिया बसल्या होत्या त्यांजकडे धांवूं लागली असतां दुःशासन गर्ज
ना करून परम वेगानें तिच्या संन्निध गेला आणि दीर्घ नीलवर्ण ज्यांतील ऊ-

र्मी सारखे राजसूय क्रतुसंबंधीं अवभृथ स्नानकाळीं मंत्रपूत जलानीं सिक्त केलेले असे द्रौपदीचे केश धरून तिला आपलेकडे आकृष्ट करून सभेमध्यें चा ललाः त्या काळीं द्रौपदी दुःशासनानें आकृष्ट केश केलेली सनाथ असतां अनाथा सारखी झाली. वायूनें जसा कदलीवृक्ष भूमीवर पडतो तशी द्रौपदी दुःखार्त होऊन अंग वांकवून मंदमंद शब्दानीं दुःशासनास भाषण करित्ये, अरे, मंदबुद्धे, मी रजस्वला असून एक वस्त्राचें परिधान केलें आहे, याजकरितां मला सभे मध्यें नेऊं नको. असें द्रौपदीचें भाषण श्रवण करून दुःशासन बलात्कारें केश धरून ज्या काळीं तिला सभेमध्यें नेऊं लागला त्या काळीं याज्ञसेनी हे कृष्णा, हे जिष्णु, हे हरि, हे नरा, असा आक्रोश करूं लागली असतां दुःशासन तिला भाषण करितो, हे याज्ञसेनी, तूं रजस्वला एकवस्त्रा अथवा वस्त्रहीन कशीही ऐस. द्यूतामध्यें आम्हीं ज्या पेक्षां तुला जिंकिली त्या पेक्षां तूं आमची दासि झालीस आतां जीं वस्त्रें तुला इच्छित असतील त्यांचा तूं पुढें उपभोग कर. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुःशासनानें द्रौपदीस आकृष्ट करितांच तिचे सकल केश स्फुरले. आणि दुःशासनाच्या भयानें कंपित होऊन पडली आणि तिजला अतिशय लज्जा भास होऊन कोपानें दह्यमान झाली. पुनः मंद मंद वाणीनें दुःशासनास भाषण करत्ये कीं, हे दुःशासना, अरे, या सभेच्या ठायीं मोठ मोठे शास्त्रवेत्ते, क्रियावान, सर्व इंद्रतुल्य, कांहीं गुरुस्थानीं व कांहीं साक्षात् गुरूच असे सभासद बसले आहेत, यांच्या अग्रभागीं जाण्यास मी इच्छित नाहीं. अरे, तूं आज मोठें क्रूर कर्म करितोस. हें कर्म आर्यजन कधींही करीत नाहींत, त्या पेक्षां माझें आकर्षण करूंनमला वस्त्रहीन करूंनको. हे राजपुत्र बसले आहेत यांस कोपवूं नकोस. इंद्रासह देव जरी तुला साह्य झाले तथापि त्यांचा कोप परम दुर्धर आहे. हा माहात्मा धर्मसूत आपल्या धर्मामध्येंच स्थित झाला आहे. जे सूक्ष्मबुद्धि असतील तेच या धर्मराजाचा धर्म जाणतील. वाणी करून मी आपल्या भर्त्यांचे अणुमात्र दोषाचें उच्चारण न करितां त्यांच्या गुणाचें स्तवन करत्यें. अरे दुःशासना, मी रजस्वला असतां या कुरुवीरांमध्यें मला आकर्षण करून नेतोस हें तुझें मोठें साहसकर्म होय. हें तुझें कर्म पाहून या सभासदांस कशी लज्जा भासे

होत नाहीं. हें तूं कर्म केलेलें चांगलें किंवा वाईट या विषयीं कोणी विचारीत नाहींत. या भारताच्या धर्मास धिःकार असो. आज याचा धर्म नष्ट झाला. र कुल क्षत्रियांच्या स्वभावास धिःकार असो. या कौरवांचा धर्म निरमर्याद झाला असतां यांस अवलोकन करितात, त्यांस धिःकार असो. द्रोणाचार्य भीष्म, तसाच माहात्मा विदुर यांमध्यें कांहींच सत्व नाहीं. त्या कौरव वंशांत हे वृद्ध असून असा उग्रधर्म येथें चालला असतां त्याजकडे हे कसें लक्ष देत नाहींत. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रकारें सुमध्यमा द्रौपदी करुणायुक्त भाषण करीत नेत्रकटाक्षें करून कोपित झालेल्या पतीकडे पहात असतां पांडवांसही बहुत कोप येऊन त्यांच्या शरीराचा दाह झाला. पांडवांचें राज्य हरण झालें. तशींच सर्व धन व रत्नें हरण केलीं तथापि द्रौपदीच्या कटाक्षयुक्त अवलोकनानें जितकें दुःख झालें तितकें झालें नाहीं. कृपण झालेलेले जे पांडव यांजकडे पाहून व द्रौपदीस आकर्षण करून दुःशासन हास्यपूर्वक असें भाषण करितो कीं, द्रौपदी, तूं आमची दासी झालीस. कर्णानें तें दुःशासनाचें भाषण श्रवण करितांच हर्षित होऊन उच्चस्वरानें हास्य करून दुःशासनाचा परम सत्कार केला. तसाच सुबलपुत्र शकुनि दुःशासनाचें भाषण ऐकून बहुत आनंद पाऊन याचें स्तवन करून सभेमध्यें इतर सभासद जे बसले होते ते दुःशासनानें ओढून आणलेल्या द्रौपदीस पाहून बहुत दुःखित झाले. त्या सभेमध्यें कर्ण दुःशासन व दुर्योधन या तिघां शिवाय दुःख झालें नाहीं. द्रौपदीचें भाषण श्रवण करून भीष्म उत्तर देतात कीं, हे सुभगे द्रौपदी, धर्माची गति अतिसूक्ष्म आहे त्याचा निर्णय करितां येत नाहीं ह्मणोन तुझ्या प्रश्नाचें यथार्थ उत्तर देण्यास मी समर्थ नाहीं. दुसरें द्रव्य पणास लावण्यास अन्योन्य समर्थ आहेत. स्त्रिया तर भर्त्यांस वश होऊन असतात. युधिष्ठिर राजा, समृद्ध झालेल्या पृथ्वीचा त्याग करील; परंतु धर्माचा त्याग करणार नाहीं तेव्हां त्याणें पूर्वीं मी जिंकिलों असें भाषण केलें याजवरून धर्मराजा आपण स्वतः जिंकिला स्त्री जिंकिली नाहीं असें सिद्ध होतें; परंतु याचा विचार करण्यास मी समर्थ नाहीं. राजाचा पराजय झाला तेणें करून तुझाही पराजय झाला असें सिद्ध होत नाहीं. शकुनीनें प्रथम

धर्मराजास जिंकून नंतर तुझ्या पणा विषयीं प्रेरणा केली येणें करून असें सिद्ध होतें कीं, द्यूतामध्यें राजा आपण स्वतः पराजित होऊन अस्वामी असतां त्यांच्या आज्ञेनें द्रौपदीस पणास लाविली, तर राजा दोषी नाहीं आणि तूंही पणामध्यें हरली नाहींस; परंतु शकुनीच्या आज्ञे वरून राजानें ज्या पेक्षां तुला पणास लाविलें त्या पेक्षां तुझ्या भाषणांचा निश्चय करण्यास मी समर्थ नाहीं असें भीष्मानें भाषण श्रवण करून द्रौपदी सभेमध्यें भाषण करिते. द्यूतामध्यें कुशल असून दुष्टाचे छलक द्यूतप्रिय अशा दुरात्म्यानीं, धर्मराजानें द्यूता विषयीं प्रयत्न न केला असतां द्यूताविषयीं त्यास आव्हान करून कां सभेंत आणिलें बरें? धर्मराजा पणामध्यें पराजित होऊन अनिवा झाला असतां मल्ला- सभेमध्यें आव्हान करून शत्रूस कां सकाम करिता झाला? सर्व दुष्टानीं एकत्र होऊन आपल्यास कपटानें पराजित केलें तर पुढें पण करूं नये. तितकींच समाप्ति करावी, तें न करितां धर्मराजानें पुनः द्यूतास आरंभ केला. या सभेंत सर्व कौरव स्थित आहेत. पुत्रांचा व स्नुषांचा स्वामी, ईश धृतराष्ट्र राजातोही येथें स्थित आहे या सर्वांनीं माझ्या प्रश्नांचा विचार करून यथा योग्य उत्तर द्यावें. भीष्मा सारखें संशयित उत्तर देऊं नये. या प्रकारें करुणा युक्त भाषण करणारी द्रौपदी कृपण झालेल्या आपल्या पतींस पाहून दुःशासनानें कठिण, अप्रिय व कटु अशीं भाषणें करून द्रौपदीचें आकर्षण केलें. त्या कालीं रजस्वला, उत्तरीय वस्त्र तिचें भ्रष्ट झालेलें अशा अयोग्य अवस्थेंत द्रौपदीचें दुःशासन आकर्षण करितो, हें वृकोदराचे दृष्टीस पडतांच त्याणें युधिष्ठिराकडे पाहून अत्यंत आर्त झालाव परम कोप पावला. असा विषयांत आ.

६८. अध्याय अडुसष्टावा- भीमसेन क्रुद्ध होऊन युधिष्ठिरास भाषण करितो हे युधिष्ठिरा, कपटद्यूत करणाराचे गृहीं दासी असतात; परंतु ते दासींवरही दया ठेऊन त्यांस पणास लावीत नाहींत. अरे काश्यराजानें जें तुला द्रव्य आणून दिलें, तशींच इतर राजानीं जीं तुला नाना प्रकारचीं रत्नें वाहनें, कवचें, आयुधें दिलीं तीं शत्रूनीं कपटानें हरण केलीं. तुझें राज्य शत्रूनीं हरण केलें. तूं आपल्यास पणास लाऊन धनतेंस व आम्हांस लाविलें [illegible]

चा. आणि आमचा स्वामीच आहेस. द्रौपदीस तूं पणास लाविलेंस ही मात्र अमर्याद गोष्ट केलीस असें मला वाटतें. ही आपली भार्या बाला असून हें दुःख सोसण्यास अयोग्य असतां तुझ्या करितां हे दुष्ट दुरात्मे घातुक कर्म करणारे कौरव यांजपासून अत्यंत दुःख पावत आहे; यास्तव हे राजा मला बहुत क्रोध आला आहे, त्या क्रोधाची समाप्ती तुझे ठायींच करितों असें धर्मराजास भाषण करून नंतर सहदेवास भाषण करितो हे सहदेवा, तूं लौकर जाऊन अग्नि घेऊन यें ह्मणजे धर्मराजाचे हस्त जाळून टाकितों. असें भीमसेनाचें भाषण श्रवण करून अर्जुन बोलतो हे भीमसेना, पूर्वी आजपर्यंत अशीं भाषणें कधीं बोलत नव्हतास. आतां असें भाषण करितोस हें काय? मला असें वाटतें कीं, या दुष्ट घातुक शत्रूनीं तुझी धर्मबुद्धि नष्ट केली. हे भीमा, या तुझ्या भाषणानीं शत्रु सकाम होतील, तर त्यांस सकाम करूं नको. धर्माकडे लक्ष दे. आपला ज्येष्ठ भ्राता धार्मिक आहे त्याचें अतिक्रमण करण्यास कोण समर्थ होईल बरें! धर्मराजास दुसऱ्यानीं द्यूता विषयीं आव्हान केलें ह्मणून तो गेला यांत त्याणें आपलें क्षात्रव्रत स्मरण करून परेच्छेनें द्यूत केलें तें आपल्यास महत् कीर्तीसि कारण होईल असें अर्जुनाचें भाषण श्रवण करून भीमसेन भाषण करितो हे धनंजया, हें सर्व धर्मराजाचें कृत्य जर मी जाणालें नसतें तर बलात्कारें करून त्याचे हस्त दग्ध केलेच असते; परंतु तुझें सर्व भाषण मी आतांच समजून हें कृत्य करीत नाहीं.

वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रकारें भीमसेन व अर्जुन या उभयतांचें भाषण झाल्यावर सर्व पांडव दुःखित होऊन स्तब्ध बसले व द्रौपदी तर फारच क्लेश पावली, हें पाहून धृतराष्ट्रपुत्र विकर्ण सभेमध्यें असें भाषण करूं लागला कीं, हे सकल पार्थिव हो, द्रौपदीनें जो तुह्मांस प्रश्न केला त्याचा विचार करून उत्तर द्या. अविचारानें उत्तर दिलें असतां आह्मांस तत्काल नरकप्राप्ती होईल. भीष्म व धृतराष्ट्र हे उभयतां कुरूंमध्यें वृद्ध आहेत ते आज एकत्र होऊन द्रौपदीच्या भाषणावर कांहींच उत्तर देत नाहींत. महामति विदुरही कांहीं बोलत नाहीं. सर्वांचा गुरु द्रोणाचार्य तसाच कृपाचार्य

हे उभयतां ब्राह्मणांमध्यें श्रेष्ठ सभेंत बसले असतां द्रौपदीच्या प्रश्नांचें उत्तर कां देत नाहींत? हे सर्व देशांतील पृथ्वीपाल येथें एकत्र झाले आहेत यांणी तरी कामक्रोध टाकून द्रौपदीच्या प्रश्नाचें यथामति उत्तर द्यावें. द्रौपदीनें वारंवार जें भाषण केलें त्या भाषणामध्यें अमक्याचा अमुक पक्ष आहे असा विचार करून सर्व पार्थिवानीं उत्तर द्यावें, असें मला वाटतें. या प्रकारें सर्व सभासदांस विकर्णानें भाषण केलें असतां त्या सभासद महीपालानीं साधु किंवा असाधु कांहींच उत्तर केलें नाहीं. पुनः एकवेळ विकर्णानें सर्व राजांस असाच प्रश्न केला असतां त्याचेंही उत्तर त्यांणीं कांहीं दिलें नाहीं. नंतर विकर्ण हस्तानें हस्ताचें मर्दन करून श्वासोच्छ्वास टाकीत असें भाषण करूं लागला कीं, हे महीपालहो, माझ्या भाषणाचें तुह्मीं उत्तर द्या, अथवा न द्या; परंतु या सभेमध्यें जें अन्यायकर्म झालें तें तुह्मांस सांगतों. हे कौरवहो, तुह्मींही श्रवण करा. मृगया, मद्यपान, द्यूतक्रीडा व स्त्रीसंभोग अशीं चार व्यसनें राजास सांगितलीं आहेत. या चार व्यसनांत मनुष्य आसक्त झाला असतां धर्माचें उल्लंघन करून वर्ततो. यास्तव या चार व्यसनांत असून राजानें अथवा अन्यानें जें कर्म केलें असेल तें कर्म लोकव्यवहारोपयोगीं होत नाहीं. तसा हा पांडुपुत्र व्यसनानें अत्यंत ग्रस्त झाला असतां कपट्यानीं त्यास प्रेरणा करून द्रौपदीस पणास लावविली. तशांतून ही द्रौपदी सर्व पांडवांची अनिंदित भार्या होय. इजवर एकाचीच सत्ता नाहीं. हा युधिष्ठिर आपण पूर्वीं पणांत जित होऊन नंतर शकुनीनें त्यास प्रेरणा केली असतां त्याणें द्रौपदीस पणास लाविली तेव्हां राजा व्यसनांत ग्रस्त, तशांतून दुसऱ्यानें त्यास जिंकिलें, द्रौपदीस पणास लावण्या विषयीं इतरानें प्रेरणा केली व द्रौपदीही पांचजणांची समान भार्या या चार कारणां वरून विचारपूर्वक मी असें समजतों कीं, द्रौपदीला पणामध्यें जिंकिली नाहीं. या प्रकारें विकर्णाचें भाषण श्रवण करितांच कौरव सभेमध्यें सभासदांचा एकाएकीं हर्ष शब्द होऊन त्यांणीं विकर्णाची स्तुति करून शकुनीची निंदा केली. सभासदांचा हर्षशब्द उपशमातें पावल्यावर कर्ण क्रोधानें मूर्छित होऊन आपला स्कंदरहस्त पुढें करून सभेमध्यें भाषण करूं लागला कीं, हे विकर्णा अरे या सभेमध्यें अशी

बहुत विपरीत कर्मे झालीं आहेत. तेव्हां याच्या विनाशार्थ जसा अरणी पासू न अग्नी उत्पन्न होतो तसा तूं झालास असें मला वाटतें. अरे, द्रौपदीनें वारंवा र सभासदांस जरी प्रश्न केला तथापि त्याणीं कांहीं उत्तर दिलें नाहीं याचें ता त्पर्य असें आहे कीं, धर्मे करूनच द्रुपदात्मजा जिंकिली गेली असें ते मानिता त. हे धृतराष्ट्रपुत्रा, तूं तर केवळ बाल्यभावानें विदीर्ण होतोस. हे विकर्णा तूं बाल असून सभेमध्यें वृद्धा सारखें भाषण करितोस; परंतु हे राजपुत्रा, य थार्थ धर्म तूं कांहींच अद्याप जाणत नाहींस. अरे, द्रौपदीस आह्मीं जिंकिली अ सतां तूं जिंकिली नाहीं ह्मणून म्हणतोस तर द्रौपदी कशी जिंकिली नाहीं तेंसां ग. अरे, ज्या काळीं सभे मध्यें पांडवाग्रज जो धर्मराज याणें आपलें सर्वस्व प णास लाविलें त्या सर्वस्वामध्यें द्रौपदी आली किंवा नाहीं? अशी धर्मानें आह्मीं द्रौपदी जिंकिली असतां तूं अजित असें कसें मानितोस? द्रौपदी पणास ला विती असें ह्मणून पांडवानीं द्रौपदी पणास लाविली असतां कोणत्या कारणा नें द्रौपदी जिंकिली नाहीं असें तूं ह्मणतोस तें कारण आह्मांस सांग. आतां तूं असें ह्मणत असशील कीं, द्रौपदी एकवस्त्रा असतां सभेमध्यें कशी आणि ली? तेव्हां हा अधर्म झाला तर याचें उत्तर श्रवण कर. स्त्रियांस एक भर्ता देवा नीं प्रेरित आहे. ही द्रौपदी ज्या पेक्षां अनेक भर्तृका आहे त्या पेक्षां ही व्यभिचा रिणी व जारिणी अशा संज्ञा पावली आहे. अशा स्त्रीस सभेमध्यें आणलें अ सतां त्यांत आश्चर्य काय आहे? मला तर कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. असो ही द्रौपदी एकांबरा असो अथवा विवस्त्रा असो. पांडवांचें जितकें धन होतें तित कें शकुनीनें धर्मे करून हरण केलें आहे, असें विकर्णास भाषण करून नंत र दुःशासनास बोलतो, हा विकर्ण महामूर्ख असून पंडिता सारखें भाषण- मात्र करितो. असो. आतां तूं पांडवांची व द्रौपदीचीं वस्त्रें हरण करून घे. असें कर्णाचें भाषण श्रवण करितांच सकल पांडव आपलीं वस्त्रें व उप- वस्त्रें काढून टाकून सभेमध्यें जाऊन बसले. नंतर दुःशासन सभेमध्यें जाऊ न बलात्कारानें द्रौपदीचें वस्त्रहरण करण्यास उद्युक्त झाला.

वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुःशासनानें द्रौपदीच्या वस्त्रासआ कृष्ट केलें असतां दुःखाचा व दुष्टाचा हर्ता श्रीहरी आहे तेव्हां या प्रसंगीं श्रीहरी

वांचून मला दुःखांतून उद्धार करणारा दुसरा कोणी नाहीं असें जाणून द्रौपदी हरीचें चिंतन करून एक एक नावानें श्रीकृष्णास आव्हान करूं लागली. हे गोविंदा, हे द्वारकावासि, हे कृष्णा, हे गोपीजनप्रिया, हे केशवा, कौरवांनीं मला वेढिली असतां तूं हें कसें जाणत नाहींस!! हे नाथ, हे रमापते, अरे गोकुलांतील लोकांचीं दुःखें तूं कशीं निवारण केलींस? मी कौरवार्णवा मध्यें निमग्न झाल्यें आहें. आतां या समयीं माझा उद्धार कर. हे जनार्दना, हे कृष्णा, हे महायोगी, हे विश्वात्म्या, हे विश्वकर्त्या, हे गोविंदा, मी तुला शरण आल्यें आहें माझें रक्षण कर. कौरवांमध्यें मी सांपडलें आहें. याप्रकारें द्रौपदी त्रिभुवनेश्वर जो श्रीहरी कृष्ण याचें स्मरण करून दुःखीत होऊन हस्तानें मुखाचें आच्छादन करीत रुदन करूं लागली त्या काळीं याज्ञसेनीचें भाषण श्रवण करितांच कृपाळू भगवान् श्रीकृष्णाही गद्गदित झाला. आणि शय्या, आसन, लक्ष्मी यांचा तत्काल त्याग करून द्रौपदीच्या रक्षणार्थ तिच्या सन्निध गुप्त रीतीनें प्राप्त होऊन कृष्णा विष्णु, हरी, नरा, या नामानीं आपलें त्राण करण्या करितां आक्रोश करणारी अशी जी द्रौपदी तिजला नाना प्रकारच्या रंगांचीं उत्तमोत्तम वस्त्रें नेसविलीं. दुःशासनानें द्रौपदीचें वस्त्रहरण करून आपलेपाशीं घेतलें असतां त्याच वर्णाचें तसेंच दुसरें वस्त्र आंत नेसलेली पाहून तेंही वस्त्र हरण केलें अशीं असंख्याक वस्त्रें दुःशासनानें द्रौपदीचीं फेडलीं असतां नानाप्रकारच्या चित्रविचित्र रंगाचीं वस्त्रें द्रौपदीच्या शरीरावर प्रादुर्भूत झालीं. असें कृत्य द्रौपदीच्या सामर्थ्यानें झालेलें सकलांनीं पाहतांच एका एकीं सभेमध्यें घोर हलकल्लोळ शब्द झाला. लोकांमध्यें हा अद्भुत चमत्कार झाला असें समजून सकल नृपति द्रौपदीची स्तुती करून धृतराष्ट्र पुत्राची अतिशय निंदा करूं लागले. त्या काळीं त्या राजसभेमध्यें भीमसेनास अत्यंत क्रोध येऊन ओष्ठांचें स्फुरण होऊं लागलें. हस्तानें हस्ताचें मर्दन करून त्याणें महान शब्दानें असें भाषण केलें कीं, हे सकल क्षत्रिय हो, माझें प्रतिज्ञावाक्य तुह्मी श्रवण करा. अशी प्रतिज्ञा पूर्वी कोणत्याही राजानें केली नसेल व पुढेंही कोणी करण्यास समर्थ होणार नाहीं. हा पापी दुर्बुद्धि भरत कुलामध्यें केवल नीच उत्पन्न झालेला दुःशासन याच्या हृदयाचा युद्धामध्यें बलात्कारानें भेद करून मी रुधिर प्राशन करीन. ही केलेली प्रतिज्ञा मी आपली सिद्धीस

नेणार नाहीं तर पूर्वज पितामहाच्या गतीप्रत मी जाणार नाहीं. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रकारें भीमसेनाचें भयंकर भाषण श्रवण करून सकल सभासदांच्या शरीरावर रोमांच उभे झाले असतां ते पांडवांचा परम सत्कार करून धृतराष्ट्र पुत्राची निंदा करूं लागले. द्रौपदीचीं जीं वस्त्रें दुःशासनानें हरण केलीं, त्या वस्त्रांच्या राशी सभेमध्यें झालेल्या दुःशासनानें पाहतांच लज्जित होऊन सभेमध्यें येऊन बसला. त्या काळीं सभे मध्यें जे सभासद बसले होते त्याणीं पांडवांस पाहून रोमांच उत्पन्न होण्या सारखा धिःकार शब्द केला. सकल कौरव कांहीं उत्तर न करितां स्तब्ध बसले. सकल सज्जन लोकांनीं आक्रोश करून धृतराष्ट्र राजाची अतिशय निंदा केली. नंतर सकल सभासदांचें निवारण करून सर्व धर्मज्ञ जो विदुर याणें असें भाषण केलें कीं, हे सभासद हो, द्रौपदी तुह्मांस प्रश्न करून वारंवार अनाथा सारखी रोदन करिते आणि तुह्मीं तर तिच्या प्रश्नाचें उत्तर देत नाहीं यास्तव तुह्मीं सकल सभासदानीं धर्माचा त्याग केला. स्मार्ताग्नी जसा प्रज्वलित होतो तसा आर्त सभेंत येतो त्याचें सभासद सत्यधर्में करून शमन करितात. जो कोणी धर्में करून प्रश्न करील त्या प्रश्नाचें उत्तर कामक्रोध मुक्त होऊन सत्यानें द्यावें. हे नराधिप हो, विकर्णानें जो तुह्मांस प्रश्न केला त्याचें तुह्मीं यथामति उत्तर द्यावें, यांत तुमचें बहुत हित आहे. कोणी प्रश्न केला असतां धर्मदर्शी सभासद उत्तर देत नाहींत त्यांस अनृत भाषणाच्या फलाचें अर्धफल प्राप्त होतें या विषयीं तुह्मांस प्रल्हाद व अंगिरस पुत्र सुधन्वा यांचा एक पुरातन संवाद झालेला सांगतों. श्रवण करा. सर्व दैत्यांचा इंद्र जो प्रल्हाद याचा विरोचन आणि अंगिरसपुत्र सुधन्वा हे उभयतां केशिनी नामक कन्येकडे जाऊन तिला बोलले कीं, आह्मीं श्रेष्ठ आहों, आह्मांस तूं वर. असें उभयतां त्या कन्येस भाषण करून नंतर परस्परांत मी ज्येष्ठ, मी ज्येष्ठ आहें असें भाषण करून प्रतिज्ञा केली कीं, जो उभयतां मध्यें ज्येष्ठ ठरेल त्याचें दास्यत्व यावज्जीव पर्यंत कनिष्ठानें करावें अशी उभयतांची प्रतिज्ञा झाल्या नंतर त्याणीं प्रल्हादाकडे येऊन भाषण केलें कीं, हे दैत्येंद्रा, आह्मां उभयतां मध्यें ज्येष्ठ कोण आहे तें सांग. त्याकाळीं उभयतांचें भाषण श्रवण करून प्रल्हाद, सुधन्यास पाहून मिथ्या भाष

णास म्याला. तव्हां सुधन्वा ब्रह्मदंडा साररवा क्रुद्ध होऊन प्रल्हादास भाषणक रितो हे प्रल्हादा, जर तूं माझ्या प्रश्नाचें सत्य उत्तर न देऊन अनृत भाषण कर शील, तर इंद्र आपल्या वज्राचा तुझ्या मूर्ध्यावर शंभरवेळ प्रहार करील.असें सु धन्व्याचें भाषण श्रवण करून प्रल्हाद अश्वत्थ पर्णा सारखा चंचल होऊन महा तेजस्वी जो कश्यपऋषि याजकडे जाऊन त्यास बोलतो हे ऋषे, तूं धर्माचा ज्ञाता आहेस. देव असुर व ब्राह्मण यांचे धर्म तुला विदित आहेत. यास्तव तुला मीं धर्मा विषयीं कांहीं एक प्रश्न करितों त्याचें उत्तर सांग. कोणी प्रश्न केला अ सतां त्याचें उत्तर जे देत नाहींत, अथवा खोटें उत्तर देतात ते कपटी कोणत्या लोकास जातात? तें मजला सांग. असें प्रल्हादाचें भाषण श्रवण करून काश्य प भाषण करितो हे प्रल्हादा, कोणी प्रश्न केला असतां जाणून काम, क्रोध व भय यानें जे उत्तर देत नाहींत त्याचें वरुण सहस्र पाशानीं बंधन करितो. तसाच- गोकर्णा सारिखी शिथिल साक्षी जो सभेमध्यें देतो त्यासही वरुण सहस्र पा शानीं बंधन करितो. शंभर वर्षें पूर्ण झालीं म्हणजे एक एक पाश त्याचे मुक्त होतात. यास्तव कोणी प्रश्न केला असतां वास्तविक असेल तें बोलावें. अनृत बोलूं नये. ज्या सभेंत अधर्मानें धर्म विद्ध झाला असेल तर त्या सभेंत सभ्य अधर्मरूप शल्याचें निकृंतन स्पष्ट भाषणानें न करतील तर ते सभासद अ धर्मानें वेधले जातील. कोणी पुरुषानें निंदित कर्म केलें असतां तो सभेंत आ ल्यावर सभासदानीं त्याच्या कर्माची निंदा करावी. न केली असतां त्या सभेंती ल श्रेष्ठ जो असेल त्यास अर्धें पातक व सभासदांस चतुर्थांश पातक लागतें.आ णि निंदेस योग्य जो पुरुष याची सभेंत निंदा केली असतां श्रेष्ठ सभासद पापर हित होतो. व सभासदही पातका पासून मुक्त होतात. सकल पातक पाप कर णाऱ्यास लागतें. हे प्रल्हादा, प्रश्नाचें उत्तर जे अनृत सांगतील त्यांच्या पूर्वोत्त र सप्त वंशांतील इष्टापूर्तादिक पुण्यें नष्ट होतील. ज्याचें द्रव्य गेलें व पुत्र नष्ट झाला, ऋणी पुरुषास किंवा स्वार्थापासून भ्रष्ट झालेल्यास, पतिहीन स्त्रियांस, राजानें प्रतिबंधांत ठेविलें त्यास, अपुत्रा स्त्रीस, व्याघ्रानें हुंगलेल्यास, को णा स्त्रीस सवत झाली असतां तीस अथवा खोटी साक्ष दिली असतां जें दुः ख होतें तीं सर्व दुःखें अनृत भाषण करणाऱ्यास लागतात. आपण प्रत्यक्षअ-

वलोकन केलें असेल अथवा श्रवण केलें असेल किंवा जाणलें असेल तर तो त्या कर्माचा साक्षी होतो तस्मात् साक्षिदारानें खरी साक्षी दिली असतां धर्मापासून तो भ्रष्ट होत नाहीं. या प्रकारें काश्यप ऋषीचें भाषण श्रवण करून प्रल्हाद पुत्रास भाषण करितो हे पुत्रा, सुधन्वा हा तुझ्यापेक्षां श्रेष्ठ आहे व त्याचा पिता अंगिरा माझ्यापेक्षां श्रेष्ठ आहे. सुधन्व्याची माता तुझ्या मातेपेक्षांही श्रेष्ठ आहे. यास्तव हे विरोचना हे पुत्रा, हा सुधन्वा तुझ्या प्राणांचा ईश्वर झाला यांत संशय नाहीं. असें प्रल्हादाचें भाषण श्रवण करून सुधन्वा भाषण करितो हे दैत्येंद्रा, पुत्राचा स्नेह टाकून धर्माचे ठाई व्यथित होऊन सत्य भाषण केलेंस त्यापेक्षां तुझा पुत्र शंभर वर्षे वांचेल. विदुर सभासदांस भाषण करितो हे सभासद हो, द्रौपदीचा धर्मयुक्त प्रश्न श्रवण करून आतां पुढें काय करावें? याचा विचार करून सांगावें. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, विदुराचें भाषण श्रवण करून सकल पार्थिवांनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं त्या काळीं कर्ण भाषण करतो हे दुःशासना, द्रौपदी ही दासी आहे इजला गृहामध्यें नेतें कर्णाचें भाषण श्रवण करून द्रौपदी लज्जित होऊन पांडवांस अवलोकन करून प्रलाप करीत करीत कोपित झाली असतां दुःशासन तिजला आकर्षण करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

६९. अध्याय एकुणहत्तरावा– द्रौपदी भाषण करित्ये हे दुःशासना, हे दुष्टबुद्धे, मला इतउत्तर जें कर्तव्य आहे तें करी पर्यंत तूं माझी प्रतिक्षा कर असें त्यास भाषण करून नंतर सभासदांस बोलत्ये हे सभासद हो, त्या दुष्ट दुःशासनानें मला बलात्कारें करून आकर्षण केल्या मुळें मी बहुत दुःखित झाल्येंयास्तव कौरव सभे मध्यें बसणाऱ्या सभासदांस मी नमस्कार करित्यें. दुःशासनानें जें कर्म केलें असा कांहीं माझा अपराध नाहीं. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रकारें द्रौपदीस कल सभासदांस भाषण करून नंतर सभेमध्यें पतन पाऊनपुनर्विलापयुक्त असें भाषण करूं लागली कीं, माझ्या स्वयंवर कालीं सकल राजे आले होते त्याणीं मला अवलोकन केली होती. पूर्वीं कधींही मला पाहिली नवती. ती आज मी सभेमध्यें आल्यें. मी स्वगृहीं असतां पूर्वीं वायूनें मला स्पर्श केला नाहीं व सूर्यानेंही पाहिली नाहीं ती आज मी या कौरवस-

भेमध्यें सर्वांच्या दृष्टिगोचर झाल्यें. पूर्वी मी गृहामध्यें असतां वायूनें जर मला स्पर्श केला तर तो पांडवांस सहन होत नसे ती आज मी या दुष्टात्म्यानें स्पृष्ट केली असतां ज्या पेक्षां पांडव हे सहन करितात तसेच कौरव सहन करितात त्या पेक्षां कालच विपरीत आला, असें मी समजतें. स्नुषा अथवा दुहिता क्लेशास अनर्ह असून जर क्लेशातें पावली तर पुरुषास सहन होत नाहीं. मी तर पांडवांची पतिव्रता स्त्री सभेमध्यें येऊन आक्रोश करित्यें तेव्हां या पेक्षां कृपणता दुसरी कोणती असावी. अरे मी कल्याणरूपिणी पतिव्रता स्त्री असतां सभेमध्यें सर्वांस अवलोकन करीत उभी आहें, सर्व राजांचा धर्म आज कोठें गेला? धर्मस्त्री सभेमध्यें नेऊं नये असें मी श्रवण केलें होतें; परंतु तो सनातन धर्म आज कौरव सभेमध्यें नष्ट झाला. पांडवांची भार्या, धृष्टद्युम्नाची भगिनी, वासुदेवाची सखी असतां या राजसभेमध्यें मी कसें यावें. हे कौरव हो, धर्मराजाची मी भार्या, समान वर्णांत उत्पन्न झालेली दासी किंवा अदासी आहें हें मला सांगा म्हणजे मी तसें करीन. हा कुलकलंक कौरव यशाचा हरण कर्ता दुःशासन मला अत्यंत दुःख देतो हें सहन करण्या विषयीं मी समर्थ नाहीं. हे नृप हो, मी जित किंवा अजित आहें याचें मला तुह्मी उत्तर दिलें असतां तसें मी करीन. असें द्रौपदीचें भाषण श्रवण करून भीष्म भाषण करितात हे कल्याणि, धर्माची गति फार गहन आहे, असें मी पूर्वींच सांगितलें होतें. माहात्मे प्राज्ञही लोकांमध्यें धर्म जाणण्यास शक्य होत नाहींत. कर्ण दुर्योधना सारखे जे बलवान पुरुष त्याणीं अधर्म केला असतांही तो धर्मा सारखाच होतो; परंतु धर्माचा निर्णय वेळा प्राप्त झाली तर तो अधर्मच होय. हा तुझा प्रश्न निश्चयें करून सूक्ष्म व गूढ असून त्या मध्यें कार्यगौरवही बहुत आहेत त्याचा निश्चय करण्यास मी समर्थ नाहीं; परंतु या कृत्या पासून पुढें लौकरच कौरव कुलाचा नाश होणार. हे कल्याणि, जे कौरव कुलामध्यें लोभ व मोह परायण होऊन व्यसनानें भ्रष्ट झाले, ज्यांची तूं वधु ते पांडव धर्ममार्गा पासून कधींही भ्रष्ट होणार नाहींत. हे पांचाली, हें जें व्रत तूं धारण केलेंस तें तुला योग्य आहे. इतकें जरी तुला दुःख प्राप्त झालें तथापि धर्मावरच तूं लक्ष ठेवितेस. हे द्रोणादिक सर्व धर्मवेत्ते जन आपलीं शून्य शरीरें करून गतसत्व झाल्या सारखे उगीच सभेंत बसले आहेत. आतां तु-

ह्या प्रश्ना विषयीं युधिष्ठिराचेंच भाषण प्रमाण आहे असें मला वाटतें. हे द्रौप दी, तूं जित किंवा अजित हें युधिष्ठीरच स्वतः आपण सांगण्यास समर्थ आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

७०. अध्याय सत्तरावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडवांची पट्टाभिषिक्त स्त्री द्रौपदी, कुररी पक्षिणी सारखी वारंवार रुदन करीत अस तां सकल पार्थिव राजपुत्र व पौत्र, साधु किंवा असाधु कांहींच उत्तर न देतां दुर्यो धनाच्या भयानें स्तब्ध बसले हें दुर्योधनानें पाहून विस्मयानें पांचाल राजक न्येस भाषण करतो हे उदारसत्वे द्रौपदी, तूं सभेमध्यें प्रश्न केलास तो प्रश्न भी मसेन, अर्जुन, नकुल, सहदेव, हे तुझे पति आहेत यांजवर राहो. ते तुझ्या प्रश्ना चें उत्तर देतील. हे पांचाली, तुझ्या करितां या आर्य सभे मध्यें भीमार्जुनादिक धर्मराजा आमचा स्वामी नाहीं असें ह्मणून धर्मराजास अनृत करोत. असें त्या णीं भाषण केलें असतां तूं आपल्या दास्य भावा पासून मुक्त होशील. धर्माचे ठाचीं निरंतर राहणारा, माहात्मा, केवळ इंद्रासारखाच धर्मसुत जो धर्मरा- जा तो या सभेंत द्रौपदीचा मी ईश आहें किंवा नाहीं या दोहोंतून एक जें भा षण करील त्या प्रमाणें तूं वर्तन कर. हे सकल कौरव सभे मध्यें स्थित आहेत ते तुला पाहून परम दुःखित झाले आणि तुझे पति अल्प भाग्य आहेत ह्मणून- कांहीं बोलत नाहींत. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, असें दुर्योधनाचें भा षण सकल सभासदानीं श्रवण करितांच उच्च स्वरानें त्याची प्रशंसा करून नं तर आपलीं वस्त्रें उडवून हा हा असा नाद केला असतां तो आर्त नाद एका ए कीं सभेमध्यें पूर्ण होऊन गेला. दुर्योधनाचें मनोहर भाषण श्रवण करून- त्या सभेंत सकल पार्थिव प्रीतिमंत होऊन कुरुश्रेष्ठ दुर्योधन धार्मिक आहे असें पुनः युक्त भाषण करून हा धर्मराजा आतां पुढें काय भाषण करितो तें श्रवण करण्या करितां त्याजकडे आपलीं मुखें करून त्यास पाहूं लागले. तसाच भीमसेन, बीभत्सु, व नकुळ, सहदेव हे काय आतां भाषण करतील तें श्रवण करण्या विषयीं उत्सुक झाले. नंतर त्या सभेंतील सर्व राजांचा को- लाहल शब्द स्थिर झाल्यावर भीमसेन आपले चंदन चर्चित भुज पुढें करून असें भाषण करितो कीं हा महामनस्क धर्मराजा आमचा गुरु व आमच्या कु

त्याचा प्रभु नसता तर याचें कर्म आह्मीं सहन केलें नसतें; परंतु ज्या पेक्षां हा आमचा गुरु आहे त्या पेक्षां याचें आह्मीं सर्व सहन करितों. आमचें पुण्य अथवा तप यांचा हा धर्मराजा ईश असून आमचा प्राणांचाही ईश्वर आहे तो जर आपल्यास अजित असें ह्मणत असेल तर आह्मींही जिंकले गेलों परंतु द्रौपदी अजित असतां ज्याणें तिच्या केशाचें आकर्षण केलें तो आतां माझ्या पासून कधींही जीवंत सुटणार नाहीं, असें खचित समजा. हे माझे बाहू दीर्घ वर्तुळ व लोहदंडा सारखे आहेत ते अवलोकन करा. या बाहूंमध्यें साक्षात् शतक्रतु जरी सांपडला तथापि सुटणार नाहीं. मग इतरांची काय कथा? परंतु धर्मपाशानें बद्ध झाल्यामुळें या संकटांतून पार पडण्यास समर्थ नाहीं. धर्मराजाचें गुरुत्व व अर्जुनाचा निरोध या दोहोंनी मी रोधला गेलों आहें. धर्मराजा जर यांकाळीं मला आज्ञा देईल तर सिंह जसा क्षुद्र मृगावर जातो तसा मी धृतराष्ट्र पुत्रांचें, हस्तचपेटीनें व खड्गानें निष्पेषण करून टाकतो. असें भीमसेनाचें भाषण महामति भीष्म, द्रोणाचार्य व विदुर यानीं श्रवण करून त्यास बोलतात हे भीमा, क्षमा कर, क्षमा कर. तूं जें भाषण केलेंस तें तुझे ठायीं संभवत आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

७१. अध्याय एकाहत्तरावा:- कर्ण भाषण करितो हे सभासदहो, भीष्म, विदुर व कौरवांचा गुरु द्रोणाचार्य हे या सभेंतील धर्माचें पालन करणारे समर्थ आहेत. आतां जे आपल्या स्वामीस दुष्ट भाषण करितात व त्याची वृद्धि होण्याविषयीं इच्छा करीत नाहींत ते सभेंतील धर्माचें उल्लंघन करते असें समजावें. दास, शिष्य व अस्वतंत्रनारी हे तीन परतंत्र असल्यामुळें दास व दासस्त्रियांवर त्यांच्या स्वामीची सत्ता आहे यास्तव हे द्रौपदी आतां तूं धृतराष्ट्राच्या परिवाराचें पादसंवाहनादिक कर्म कर. हेंच तुझें अवशिष्ट कर्म राहिलें आहे. हे सकल धृतराष्ट्राचे पुत्र तुझे पति आहेत, असें तूं समज. आतां पांडव तुझे पति नाहींत. पतींचा पराजय पणांत झाला. तेणें करून तुझा पराजय झाला असें जर तूं मानीत नाहींस तर पूर्वींचे पति दास्यभाव पावले तेव्हां तूं अभर्तृका झाली असतां यथेष्ट आचरण करून तुझी वाच्यता होईल. पति विद्यमान असतां स्त्रियानीं यथेष्ट आचरण जरी केलें तथापि लोकांत त्याची निं-

दा होत नाहीं; यास्तव तूं अनेक भर्त्यांशी रत होणारी दासी हो. ह्मणजे तुझ्या क र्माची निंदा होणार नाहीं. दासीस यथेष्टाचरण करणें विहितच आहे. नकुल भीमसेन नसाच युधिष्ठिर सहदेव व अर्जुन हे ज्यापेक्षां पराजित झाले त्या पेक्षां हे याज्ञसेनी, तूं दासी व्हावेंस हेंच चांगलें. जे पराजित झाले त्यांस पति ह्म णूं नये. पांचाल राजानें आपली कन्या सभेमध्यें पणास लाविली असतां अ र्जुनानें ती जिंकिली ह्मणोन अर्जुन आपल्यास पराक्रमी व पौरुषवान् अ सें मानून आपल्या जन्माचीही सफलता मानीत असेल; परंतु तें काय अ सेल तें असो. वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, तें कर्णाचें वाक्य श्र वण करून भीमसेन क्रोधानें अति पीडित होऊन श्वासोच्छ्वास टाकूं लाग ला. धर्मराजाचा सेवक ह्मणोन पाशानें बांधल्या सारखा होऊन क्रोधानें आरक्त नेत्र व लोकांस दहन करतोंच काय असा होऊन धर्मराजास बोलतो हे राजा, या सूतपुत्राच्या भाषणांवर कोप करीत नाहीं. आह्मीं दास्यभाव पा वलों हें सत्य आहे. जर तूं द्यूत, द्रौपदीस पणास लाऊन न करितास तर हेश त्रु माझी निंदा कांबरें करिते! असें भीमसेनाचें भाषण श्रवण करून युधि ष्ठिर निचेतन झाल्या सारखा स्तब्ध बसला हें दुर्योधनानें पाहून त्यास भाष ण करितो हे राजा, भीमसेन, अर्जुन, नकुल व सहदेव हे तुझ्या आज्ञेंत आ हेत असें जर तूं मानितोस तर द्रौपदी जित आहे किंवा अजित आहे या विषयीं तुझें ह्मणणें काय आहे तें सांग. असें धर्मराजास बोलून दुर्यो धनानें आपल्या मांडीवरचें वस्त्र एकीकडे केलें. आणि आपलें ऐश्वर्य मदानें मोहित होऊन कांहीं विस्मय पावल्या सारखें करून पांचालीकडे पाहून कदलीदंडसदृश सर्व लक्षणसंपन्न गजशुंडा सारखा वज्रासम जो राधापुत्र कर्ण यास उत्तेजन देऊन व भीमास कोप उत्पन्न करून द्रौप दी आपलेकडे अवलोकन करीत आहे असें जाणून आपला सव्य ऊरु तिज ला दाखविला. हें दुर्योधनाचें कृत्य भीमसेनानें पाहतांच नेत्रांचें उत्फालन के लें, आणि सर्वांस श्रवण होण्या जोगें त्या राजसभेमध्यें दुर्योधनास असें भा षण केलें कीं, अरे दुर्योधना, महान् युद्धाचे ठायीं हा भीमसेन जर तुझ्या ऊ रूचा भेद करणार नाहीं ज्या पुण्यलोकास माझे पितर गेले असतील त्या पु-

ण्यकारक लोकास मी जाणार नाहीं. आणि जर तुझ्या शिरावरचा मुगुट पाडून तुझ्या शिराचें पायानें मर्दन करणार नाहीं तर मी अग्नीमध्यें प्रवेश करीन. असें भाषण करून वृकोदर बहुत क्रोध पावला असतां दग्ध झालेल्या वृक्षाच्या कोटरा पासून ज्वाला जशा निघतात तशा भीमसेनाच्या रोमरंध्रा पासून पावकाच्या ज्वाला निघूं लागल्या त्या कालीं विदुर भाषण करितो हे प्रतीप वंशज पार्थिव हो, भीमसेना पासून हें मोठें भय उत्पन्न झालें आहे, असें तुह्मीं समजा. देवानें प्रेरितच काय असा अन्याय या भरत कुलामध्यें उत्पन्न झाला. हे धार्तराष्ट्र हो, अमर्याद द्यूत करून ज्या पेक्षां तुह्मीं स्त्रीला सभेंत आणून वाद चालविलात त्या पेक्षां तुमची नीति नष्ट झाल्यामुळें तुमचें योगक्षेम आतां नाश पावलें. तुह्मां कौरवांचा विचार पापरूप आहे.त्यास्तव तुह्मीं धर्मा पासून भ्रष्ट झालां. व तुमची सभाही धर्मा पासून भ्रष्ट झाल्या मुळें नष्ट झाली. हा द्यूत करणारा युधिष्ठिर पूर्वी आपण अजित असून द्रौपदीस जर पणास लाविता तर द्रौपदी दासी झाली असती. परंतु हा पूर्वी आपण पराजित होऊन नंतर द्रौपदीस पणास लाविली. यास्तव स्वप्नांत जसें द्रव्य जिंकावें तसें तुह्मीं पांडवांचें स्त्रीरूप द्रव्य जिंकिलें असें दिसतें. हे कौरव हो, शकुनीचें वाक्य श्रवण करून तुह्मीं धर्मभ्रष्ट होऊं नका. असें विदुराचें भाषण श्रवण करून दुर्योधन भाषण करितो हे द्रौपदी, भीमसेनानें जें भाषण केलें तें श्रवण केलें. आतां अर्जुन नकुळ व सहदेव या तिघांच्या भाषणाची अशीच मी इच्छा करितों. या तिघांनीं धर्मराजास अनिश असें भाषण केलें असतां तूं दास्यत्वापासून मुक्त झालीस असें दुर्योधनाचें भाषण श्रवण करून अर्जुन बोलतो. हा कुंतीसुत धर्मात्मा धर्मराजा आह्मीं गृहीं असतां आमचा ईश होता परंतु आतां हा येथें पराजित झाला तेव्हां तो आतां कोणाचा ईश आहे याचा तुह्मीच विचार करा.

वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रकारें अर्जुनानें भाषण केल्यावर धृतराष्ट्राच्या गृहीं अग्निहोत्रशाळेंत कोल्हा उच्चस्वरानें आक्रोश करूं लागला, तसेच गर्दभ व वायसादिक पक्षी परम भयंकर शब्द करूं लागले, ते शब्द तत्ववेदी विदुर, सुबलात्मजा गांधारी, भीष्म, द्रोण, व विद्वान् कृपाचार्य

याणीं श्रवण करून स्वस्ति असो, स्वस्ति असो; असें भाषण केलें नंतर गांधारी व विदुर याणीं घोर उत्पाद झाले असें जाणून आर्त होऊन धृतराष्ट्र राजास सांगितलें तें राजानें श्रवण करून पुत्रास भाषण करितो हे दुर्योधन, हे मंदबुद्धे, अरे तूं नष्ट झालास. हे दुष्टा, आर्य कौरवांच्या श्रेष्ठ सभेंत स्त्री तशांतून धर्मपत्नी द्रौपदी इला आणून तिची निर्भत्सना केलीस. ही गोष्ट तूं अमर्याद केलीस त्या पेक्षां तुझा नाश आहे असें मला दिसतें. या प्रकारें धृतराष्ट्रानें दुर्योधनास सांगून आपल्या बांधवाचें हित व्हावें या इच्छेनें सकल विचार करून पांचालीस सांत्वनपूर्वक असें भाषण केलें कीं, हे पांचालि, जो तुला इच्छित वर असेल तो मजपाशीं माग. तूं परम धार्मिक व महापतिव्रता आहेस असें धृतराष्ट्राचें भाषण श्रवण करून द्रौपदी बोलत्ये. हे भरतश्रेष्ठा, जर मला वरप्रदान द्यावें अशी तुझी इच्छा आहे तर सर्व धर्मांचा वेत्ता श्रीमान् युधिष्ठिर राजा, अदास असो आणि माझा प्रतिविंध्यनामक पुत्र आहे त्यास तुझे कुमार दासपुत्र असें न ह्मणोत. कारण जो पूर्वीं राजाचा पुत्र ह्मणविला व राजानें त्याचें पालन केलें त्यास दासपुत्र ह्मणणें अयोग्य आहे. असें द्रौपदीचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र भाषण करितो हे द्रौपदी, जसें तूं भाषण केलेंस तसें होईल. आतां दुसरा वर अपेक्षित असल्यास मागावा मी देतों. एक वरप्रदान देऊन माझ्या मनाची तृप्ति होत नाहीं असें धृतराष्ट्राचें भाषण श्रवण करून पुनः द्रौपदी बोलत्ये. हे धृतराष्ट्र, रथ व धनुष्या सहवर्तमान भीमसेन, धनंजय, नकुल व सहदेव हे तुझ्या दास्यत्वा पासून मुक्त होऊन आपल्या स्वाधीन होवोत असें द्रौपदीचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र बोलतो. हे महाभागे, तूं ह्मणत्येस त्या प्रमाणें असो. आतां तिसरा वर माग. दोन वरानीं तूं युक्त झालीस. हे धर्मचारिणी, तूं माझ्या सर्व स्नुषांमध्यें श्रेष्ठ आहेस. असें धृतराष्ट्राचें भाषण श्रवण करून द्रौपदी बोलत्ये हे भगवन्, लोभ, धर्माचा नाशक आहे यास्तव तूं तृतीय वर जरी दिलास तथापि मी घेण्यास इच्छित नाहीं व माझी योग्यता ही तिसरा वर ग्रहण करण्यास नाहीं. वैश्यानीं एक वर, क्षत्रियस्त्रियानीं दोन वर, राजानीं तीन वर व ब्राह्मणानीं शंभर वर मागावे. हे राजा, हे माझे पति दास्यभावानीं नीच द-

शोस पावले आहेत यास्तव ती आपली दशा टाकून पुण्यकर्माच्या योगें कल्याण-पावोत्. असा विषय या अध्यायांत आहे.

७२. अध्याय बाहत्तरावा:- कर्ण सकल सभेमध्यें भाषण करतो. मनुष्यामध्यें रूपानें उत्तम अशा स्त्रिया मी बहुत श्रवण केल्या. परंतु त्या मध्यें असें कर्म करणारी स्त्री कोठेंही आह्मीं श्रवण केली नाहीं. पहा बरें, धृतराष्ट्र पुत्रांवर पांडव बहुत कोपायमान झाले असतांही द्रौपदीनें त्यांची शांति केली. अगाधजलामध्यें कोणी पुरुष बुडत असतां त्यास तारण्या विषयीं जशी नौका प्राप्त होते तसे पंडुपुत्र आपत्ति समुद्रामध्यें बुडत असतां त्यांस पांचाली पार नेण्या विषयीं नौकाच झाली. असें कर्णाचें भाषण भीमसेनानें ऐकून अतिक्रुद्ध झाला आणि पांडवांस तारणारी स्त्रीच झाली. अशा निंद्य कर्णाच्या भाषणानें दूर मनस्क होऊन कर्णास भाषण करितो अरे कर्णा, देवलनामक ऋषीनें असें सांगितलें आहे कीं, अपत्य, कर्म आणि विद्या हे तीन ज्योतिरूप पदार्थ पुरुषास प्रकाशित करतात. उत्तम प्रकारचें अपत्य झालें असतां पुरुषास इहलोक व परलोकाची प्राप्ती होते. हें शरीर अपवित्र व गतप्राण झालें असतां अथवा ज्ञातीनें त्यक्त असतांही हे तीन ज्योतिरूप पदार्थ पुरुषाला उपयोगीं पडतात तेव्हां पुरुषरूप ज्योति ज्या स्त्री पासून उत्पन्न होणार त्या स्त्रीनें आह्मांस रक्षण केलें असतां आश्चर्य नाहीं असें कर्णास भाषण करून नंतर कर्णाच्या ज्ञातीची व उत्पत्तीची निंदा करण्याचे हेतूनें भीमसेन अर्जुनाकडे पाहून बोलतो हे अर्जुना, शिशु सारखें आपत्य स्त्रीचे ठायीं स्वपतीवांचून होईल काय? परानीं अपकृष्ट केलेल्या स्त्रीचे ठायीं उत्तम पुरुषाची उत्पत्ति व्हावयाची नाहीं. वास्तविक पाहतां त्या स्त्रीचे ठायीं संकर जातीचा नीच दुष्ट पुरुष क्रूरकर्म कर्ता, कर्णा सारखाच होईल. अशा स्थलीं वीर पुरुषाचा संभव कोठून होणार बरें. असें भीमसेनाचें भाषण श्रवण करून अर्जुन बोलतो. हे भीमसेना, ज्या क्रूर वाणी पूर्वीं कधीं कोणी बोलला नाहीं व पुढेंही कोणी बोलणार नाहीं ती कठोर वाणी नीच पुरुष बोलतात. उत्तम पुरुष बोलत नाहींत. थोर पुरुष सुकृताचें स्मरण करितात, वैराचें स्मरण करीत नाहींत. जरी त्यास वैराचा प्रत्यय आला तथापि, हा करीत नाहींत असें अर्जुनाचें भाषण श्रवण करून भीमसेन

बोलतो हे भारता,येथें हे सर्व शत्रु आले आहेत या सर्वांस परम त्वरेनें आतां च मी मारून टाकितों. आपल्यास याच्याशीं अतिवाद व भाषण करून काय कर्तव्य आहे बरेंपहा हा मी मारण्यास सिद्ध झालों. तूं पृथ्वीचें रक्षण कर ह्मणजे झालें. असा भीमसेन आपल्या कनिष्ठ बंधू मध्यें बसून हरिणस्थ सिंहा सारखा वारंवार चोंहींकडे पाहूं लागला असतां पार्थानें जरी त्याचें सांतवन केलें तथापि भीमसेन खिन्न झाला त्या काळीं भीमाच्या कर्णादिक इंद्रियां पासून सधूमस स्फुलिंग अग्नीच्या ज्वाळा निघूं लागल्या. भ्रुकुटी चढून गेल्यामुळें भीमाचें मुख पाहण्यास अशक्य झालें. युगांत काळीं कृतांताचें जसें क्रूर रूप होतें तसें भीमसेनाचें रूप क्रूर झालें. त्या काळीं धर्मराजानें बहुशाली भीमसेनाचें निवारण करून वारंवार असा बोध केला कीं, हे भीमा, असें करूं नको उगीच स्तब्ध बैस. हा समय नव्हे. या प्रकारें धर्मराज भीमसेनास भाषण करून नंतर आपला पिता जो धृतराष्ट्र वृद्ध याजकडे अंजलिपुट जोडून भाषण करितो. असा विषय या अध्यायांत आहे.

७३. अध्याय त्र्याहत्तरावा:- युधिष्ठिर भाषण करितो हे धृतराष्ट्रा, आह्मीं आतां काय करावें तें सांग. तूं आमचा ईश्वर आहेस त्या पेक्षां आमचें आतां रक्षण कर. निरंतर तुझी आज्ञा परिपालन करून राहावें अशी आह्मीं इच्छा करतों असें युधिष्ठिराचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र बोलतो हे अजात शत्रो धर्मराजा, तुझें कल्याण असो. निर्विघ्नपणें तुह्मी येथून गमन करून सद्धर्मानें आपल्या राज्याचें रक्षण करा. अशी माझी तुह्मास आज्ञा आहे. हें जें तुह्मांस मी सांगितलें त्यांत तुमचें कल्याण व हित आहे. हे तात, तूं धर्माची सूक्ष्मगति जाणतोस, तूं सुशिक्षित आहेस व वृद्धांचें सेवन केलें आहेस. जेथें उत्तम बुद्धि तेथेंच शांति असते. शांति धारण करणें हेंच बुद्धीचें फळ होय. पाषाणादिकाचे ठायीं कठिणता असल्यामुळें तेथें शस्त्रपात व्यर्थ करूं नये. केला असतां शस्त्रच भिन्न होतें जे वैराचें स्मरण करीत नाहींत गुणातें पाहतात. अवगुणाकडे लक्ष देत नाहींत. कोणाशीं विरोध करीत नाहींत, तेच उत्तम पुरुष जाणावे. साधु सत्कृताचेंच स्मरण करितात. वैऱ्याचें स्मरण करीत नाहींत लोकांवर उपकार करितात. प्रत्युपकाराची गरज बा-

वगीत नाहींत. हे युधिष्ठिरा, अधम पुरुषाच्या भाषणा मध्यें कठोरता असते उत्तरास प्रत्युत्तर देतो तो मध्यम पुरुष जाणावा. कोणी कसेंही भाषण केलें असतां कांहींच उत्तर देत नाहीं, त्यास उत्तम ह्मणावें. पूर्वी कोणी कोणास जीं भाषणें बोललेलीं नाहींत व पुढेंही कोणी बोलणार नाहीं अशीं कठिणभाषणें मूर्ख जल्पना करितात. साधु आपली मर्यादा सोडीत नाहींत. लोकांस प्रिय असेल तेंच करितात. हे धर्मराजा सत्समागमानें तूंही साधूच्या प्रमाणें आचरण करितोस त्या पेक्षां दुर्योधनानें तुह्मांस जीं कठोर भाषणें केलीं असतील त्यांचें हृदयामध्यें तूं स्मरण ठेऊं नको. गांधारी व मी तुझ्या गुणाची आकांक्षा करितों, यास्तव आह्मीं वृद्ध आहों असें जाणून आमच्यावर दृष्टी दे. पुत्राची मित्रता व त्याचें बलाबल पाहण्या करितां बुद्धि पुरःसर हें द्यूत मीं उत्पन्न केलें. असु. तूं सकल कौरवांचा शासनकर्ता आहेस त्या पेक्षां सकल कौरव आतां सुखी असोत. सर्वशास्त्रविशारद व महाबुद्धिवान् विदुर तुमचा मंत्री आहे. तुझे ठायीं धर्म, अर्जुनाचे ठायीं धैर्य, भीमसेनाचे ठायीं पराक्रम आणि नकुळ सहदेव याचे ठायीं गुरुशुश्रुषा हे सर्व गुण तुमचे ठायीं वास करितात. आतां हे धर्मराजा, तुझें कल्याण असो. खांडवप्रस्थीं तुह्मीं आतां गमन करावें, दुर्योधनादिक भ्रात्यांचे ठायीं प्रेम ठेवा, धर्माचे ठायीं मन रक्षण करा असें धृतराष्ट्रानें भाषण केलें. वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, नंतर युधिष्ठिर राजानें उत्तर केलें कीं, हे राजा, तूं ह्मणतोस त्या प्रमाणें मी आचरण करितों. असें ह्मणून धर्मराजा मेघा सारख्या गर्जना करणाऱ्या रथांत द्रौपदीसह बसून आनंदानें इंद्रप्रस्थीं जाण्यास निघाला. असा विषय या अध्यायांत आहे.

७४. अध्याय चवऱ्याहत्तरावा: जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायनऋषे, धृतराष्ट्राच्या आज्ञे वरून पांडव, रत्नें, धन इत्यादि घेऊन इंद्रप्रस्थीं जाण्यास निघाले असतां धृतराष्ट्र पुत्राचें पुनः द्यूत करण्या विषयीं कां मन झालें तें मला सांगा असा प्रश्न श्रवण करून वैशंपायन सांगतात हे राजा, धृतराष्ट्रानें पांडवांस जाण्या विषयीं आज्ञा दिली हें दुःशासनास समजतांच त्यानें दुर्योधनाकडे जाऊन दुःखानें असें भाषण केलें कीं, हे दुर्योधना, आपण परम यत्नानें जें पांडवांचें धन हरण केलें तें या वृद्धानें त्यांच्या स्वाधीन केलें आणि ते येथून जा-

लले असें दुःशासनाचें भाषण श्रवण करितांच दुर्योधन कर्ण व शकुनि हे पुनः एकत्र होऊन पांडवांस पुनः प्रतिकार करण्याचा विचार करून धृतराष्ट्राकडे परम त्वरेनें आले. नंतर दुर्योधन मृदुपूर्वक असें भाषण करूं लागला कीं, हे राजा, बृहस्पतीनें जी नीति सांगितली ती तूं श्रवण केली नाहींस. देवाचा पुरोहित जो बृहस्पति याणें शक्रास अशी नीति सांगितली कीं, कोणत्याही उपायानें शत्रूस मारावें, त्याची वृद्धी होऊं देऊं नये. अशा रीतीनें पांडवांचें धन आह्मीं हरण करून सर्व राजे पूजित केले आतां ते पांडव निरधन होऊन आपल्याशीं युद्धास आले तरी यांत आपली हानी काय होईल पांडवच नष्ट होतील. आशी विष नावाचे सर्प सारखे क्रुद्ध झालेले आपल्यास दंश करण्यास आले असतां त्याच्या कंठ व पृष्ठप्रदेशीं स्पर्श करण्यास कोण समर्थ होईल? तसे हे पांडव कोपित होऊन शस्त्रसहित रथारूढ झाले असतां आपला निःपात करतील. यांत संशय नाहीं. अर्जुन सिद्ध होऊन अक्षय्य भाते व गांडीव धनुष्य धारण करून चालला आहे, तो श्वासोच्छ्वास टाकीत आह्मांकडे पहात आहे. या प्रकारें सर्व पांडव रथामध्यें आरूढ होऊन अश्वांस प्रेरणा करीत इंद्रप्रस्थीं चालले आह्मीं त्याचा प्रतिकार करून द्रौपदीस बहुत क्लेश दिले. यास्तव ते आतां आमची कशी क्षमा करतील? मला असें वाटतें कीं, पांडवां बरोबर पुनः अक्षक्रीडा करून त्यांस वश करावें या विषयीं तूं आज्ञा दे. अतःपर आह्मीं असा पण करणार कीं, जो द्यूतामध्यें पणांत जित होईल त्याणीं अजिनें वल्कलें व जटा धारण करून महारण्यांत बारावर्षें वास करावा, आणि तेरावे वर्षी अज्ञातवास करावा. त्या वर्षी जर कदाचित् ते ज्ञात झाले तर पुनः बारावर्षें वनवास करावा. व पांडवानीं पुनः द्यूतास आरंभ करावा. असें हें कृत्य आह्मीं योजिलें आहे. अक्षहृदयज्ञ शकुनि आहे तो त्याचा पराजय करील. बारा वर्षें पर्यंत आह्मीं राज्य केलें असतां बहुत मित्रांचा व सैन्याचा संग्रह करून बलाढ्य होऊं. उत्तम प्रकारचें जें सैन्य असेल त्याचा आह्मीं संग्रह करून पांडव त्रयोदश वर्षे व्रतांचें परिपालन करून पुनः आले तर आह्मीं त्यांचा पराभव करूं. हा विचार तुला योग्य वाटत असल्यास पहा. असें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र राजा भाषण करतो. हे दुर्योधना, पांडव जरी दूर गेले तथापि त्यांस लौकर

येथें आणून पुनः द्यूतास आरंभ करावा. हा धृतराष्ट्राचा विचार द्रोण, सोमदत्त, बाल्हिक, गौतम, विदुर, द्रोणपुत्र अश्वत्थामा, वैश्यापुत्र भूरिश्रवा, भीष्म व विकर्ण यांणीं श्रवण करून असें भाषण केलें कीं, अतःपर द्यूत करून पांडवांशीं शम करा या प्रकारें अर्थदर्शी जे द्रोणाचार्य प्रभृति सुहृद यांणीं निष्काम बुद्धीनें भाषण केलें असतांही धृतराष्ट्र सुतांचें प्रिय करण्या करितां द्यूता विषयीं पुनः पांडवांस आव्हान करण्यास आज्ञा दिली. असा विषय या अध्यायांत आहे.

७५. अध्याय पंचाहत्तरावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, हें वर्तमान गांधारीस समजतांच शोकें करून धृतराष्ट्रास भाषण करिती हे जनेश्वरा, ज्या काळीं दुर्योधन उत्पन्न झाला त्या काळीं महामतिमान् विदुर बोलला कीं या पुत्रास मारून टाका हा कुलाधम होईल. या पुत्रानें उत्पन्न होतांच कोल्ह्या सारखा शब्द केला त्या पेक्षां हा कुलाचा नाशकर्ता होईल असें जाणा, यास्तव हे राजा तूं आपल्या स्वदोषें करून सकल कुलास बुडवूं नको. दुर्योधनाचा त्याग करून सकल अवशिष्ट राहिलेल्या बालकांचें रक्षण कर. सकल कुलाच्या क्षया विषयीं तूं कारण होऊं नको. अरे बद्ध केलेल्या सेतूचा कोण भंग करील? तसाच अग्नि शांत झाला असतां पुनः त्याचें प्रज्वलन कोण करील? हे भरतश्रेष्ठा, पांडव आतां शांत झाले आहेत त्यांस पुनः कोपवूं नकोस. जर त्यांस कोपविलेंस तर या माझ्या भाषणाचें मी तुह्मांस स्मरण करवीन. दुष्टबुद्धि पुरुषास शास्त्राचा बोध होत नाहीं. तेणें करून तो आपल्या कल्याणा पासून मुकतो. हे राजा जो प्रौढ व वृद्ध आहे त्याची मति बाला सारखी कधींही होत नाहीं ह्मणून तुला मी सांगत्यें कीं, या सकल पुत्रांचें रक्षण करून दुर्योधनाचा त्याग कर. हा सकल कुलाचा घात कर्ता कुलपांसु आहे या प्रकारें तुला विदुर सांगत असतां पुत्र स्नेहें करून तूं तसें करीत नाहींस तर कुलाचें नाशरूप फल तुला निश्चयें करून प्राप्त होईल. शम, धर्म व नीति यानीं युक्त जी तुझी बुद्धी तीच असो. तूं गैरसावध होऊं नको. क्रूरास जी लक्ष्मी प्राप्त होत्ये तिचा नाश होतो. मृदुपुरुषास मिळाली असतां वृद्धि पावून पुत्रपौत्रांस प्राप्त होत्ये. असें गांधारीचें भाषण ऐकून-

धृतराष्ट्र राजा भाषण करितो कीं, माझ्या कुलाचा नाश जरी झाला तथापि पुत्राचें निवारण करण्यास मी समर्थ नाहीं. ते जसे इच्छितात तसें असो. प रंतु पांडव पुनः माघारा येऊन माझे पुत्र पांडवांशीं द्यूत करोत. असा वि षय या अध्यायांत आहे.

७६. अध्याय शाहत्तरावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पां डव दूर गेले असतां धृतराष्ट्राच्या आज्ञे वरून प्रातिकामी दूत पांडवांकडे जाऊन धर्मराजास भाषण करितो. हे युधिष्ठिर राजा, फांसे सिद्ध करून सकल सभा सिद्ध झाली आहे यास्तव पुनः द्यूतक्रीडा करण्यास्तव धृतरा ष्ट्र राजा तुला लौकर बोलावीत आहे. यास्तव सत्वर चला. असें दूताचें भाष ण श्रवण करून युधिष्ठिर बोलतो. प्राणिमात्र दैवाच्या योगें शुभाशुभाग तीस पावतात. दैवाची निवृत्ति होत नाहीं. पहा पुनः वृद्धानें मला अक्षक्री डे करितां बोलाविलें आहे. पुनः मी जाऊन अक्षक्रीडा केली असतां क्षया स कारण होईल. असें जरी मला विदित आहे, तथापि वृद्धाची आज्ञा उ ल्लंघन करण्यास मी समर्थ नाहीं. सुवर्णाचा मृग असंभव जरी होता त री श्रीरामचंद्र त्यास लुब्ध झाला. याजवरून असें वाटतें कीं, ज्याचा परा जय पुढें होणार त्याची पूर्वी बुद्धि भ्रष्ट होत्ये. असें युधिष्ठिर आपले मु खानें भाषण करीत शकुनीची माया जाणत असतांही भ्रात्यांसहवर्तमान पुनः हस्तनापुरीं माघारा येऊन सभेमध्यें गेला त्याकाळीं पांडवांचे जे सुहृद होते त्यांच्या हृदयांत अत्यंत दुःख झालें. सर्व लोकांच्या विनाशार्थ पांडवां स पुनः दैवानें प्रेरणा केल्या मुळें ते सुखानें पुनः द्यूतक्रीडा करण्या करितां येऊन सभेमध्यें बसले. त्या काळीं शकुनी धर्मराजास बोलतो. धर्मा वृद्धानें इष्टधन तुह्मांस देऊन जरी मुक्त केलें तथापि महान मोल्यवान् असा एक पण लावण्याचा राहिला आहे, तो लाऊन द्यूतक्रीडा करूं. तुह्मीं आह्मांस जर द्यूतामध्यें पराजित केलें तर आह्मीं कृष्णाजिनें सेवन करून महार ण्यामध्यें द्वादश वर्षे वास करून नंतर तेरावे वर्षी स्वजनामध्यें अज्ञातवा स करूं त्यांत जर आह्मीं ज्ञात झालों तर पुनः द्वादशवर्षे वनवास करूं. ज र आह्मीं तुह्मांस जिंकिलें तर तुह्मींही त्या प्रमाणें द्रौपदीसहवर्तमान वनांत

जाऊन कृष्णाजिनें सेवन करावीं. या प्रकारें तुमचें व आमचें व्रत समाप्त झालें असतां परस्परांनीं स्वराज्याचें ग्रहण करून वास करावा. हे युधिष्ठिरा, या प्रकारचा पण करून पुनः तूं आमच्याशीं अक्ष क्रीडा करावीस असें शकुनीचें भाषण श्रवण करून सकल सभासद उद्विग्न होऊन आपले हस्त उचलून एकदांच परम वेगानें असें बोलूं लागले कीं, अहो या बंधुजनातें धिःकार असो. हें महत् भय झालें. तथापि या दुर्योधनास कोणी बोध करीत नाहीं. हे धृतराष्ट्र राजा, हा तुझा पुत्र दुर्योधन यास तूं तरी आतां बोध कर. तो तुझा बोध श्रवण करो, अथवा न करो; या प्रकारचें सभासदाचें भाषण धर्मराजा जरी श्रवण करीत होता तथापि कार्पण्य भयानें व धर्म संयोगानें पुनः द्यूताविषयीं प्रवृत्त झाला. या युद्धा पासून पुढें कौरवांचा महान् विनाश होणार असें बुद्धिमान् जो धर्मराजा याणें जाणून द्यूतारंभकाळीं शकुनीस असें भाषण केलें कीं, हे शकुनि, माझ्या सारख्या धर्म पालन कर्त्यास द्यूता करितां आव्हान केलें असतां तो कसा माघारा फिरेल. तस्मात् तुजसह वर्तमान आतां पुनः द्यूतक्रीडा करितों. असें ऐकून शकुनि भाषण करितो. हे धर्मराजा, गज, अश्व, बहुत दुग्ध देणाऱ्या गायी, अपरिमित शेळ्या, मेंढ्या, कोश, हिरण्य, सकल दासी, दास, इतकें द्रव्य तूं पणास लाविलेंस; परंतु वनवासाचा हा एक पण राहिला आहे. यास्तव तुह्मी अथवा आह्मीं या उभयतांतून जो कोणी पराजित होईल त्याणें बारा वर्षे वनवास करून एक वर्ष स्वजनामध्यें अज्ञातवास करावा. असें शकुनीचें भाषण श्रवण करून धर्मराज भाषण करितो. हे सौबलेया, फार चांगलें आहे. तूं ह्मणतोस तोच पण लाऊन द्यूत क्रीडा करितों. नंतर शकुनीनें हस्तामध्यें फांसे घेतले, आणि युधिष्ठिरास जिंकिलें असें ह्मणून फांसे टाकून जिंकिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

७७. अध्याय सत्याहत्तरावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, शकुनीनें पणामध्यें पार्थांस पराजित केल्यावर ते सकल पार्थ वनवास दीक्षे करितां यथानुक्रमें कृष्णाजिन वस्त्रें धारण करून वनांत प्रस्थान करण्या करितां गेले. हें दुःशासनानें पाहून भाषण करितो. हे पांडव अरीचें दमन कर्ते होते ते आतां पराजित होऊन परम विपत्ति पावले. माहात्मा जो दुर्योधन याचें चक्र प्रवर्त-

झाले. पुढें आमचें कल्याण होणार यास्तव देव आह्मांस अनुकूळ झाले. आतां आह्मी गुणें करून व वयें करून पांडवां पेक्षां श्रेष्ठ झालों. दीर्घकालपर्यंत पांडव नरकामध्येंच पडतील. सुखा पासून व राज्या पासून आतां हे चिरकाल भ्रष्ट झाले आतां यांस हें सुख प्राप्त होत नाहीं. जे पांडव धनें करून उन्मत्त झाल्यामुळें सभेमध्यें पडलेला पाहून हांस्य केलें. त्या पांडवांचें धन आह्मीं हरण करून त्यास पराजित केल्यामुळें आतां ते वनांत प्रवेश करीत आहेत. चित्रविचित्र उष्णीषें, कवचें व सुवर्णाचीं देदीप्यमान कटिसूत्रादि आभरणें यांचा आतां त्यागीं त्याग करून शकुनीच्या पणा प्रमाणें सर्वांनीं रौरवाजिनें धारण करावीं. या लोकां मध्यें आह्मांसारखे पराक्रमी कोणी नाहींत, अशी ज्यांची निग्रह बुद्धि झाली होती, ते आज आपले मनांत सर्व सौख्याचें स्मरण करोत. जसे षंढतिल असतात तसे आज पांडव निर्वीर्य झाले. ही रौरवाजिनें स्वेच्छाचारी दीक्षित जे असतात ते धारण करितात. परंतु बलवान पांडव अदीक्षित असतांही दीक्षिता सारखीं कृष्णाजिनें धारण करीत आहेत. हें सर्वांनीं अवलोकन करावें. सोमकराजाचा पुत्र द्रुपद याणें पांडवांस पांचाळीनामक आपली कन्या अर्पण केली. यांत राजास कांहीं सुकृत मिळालें नाहीं; कारण हे याज्ञसेनीचे पति क्लीब आहेत. या प्रकारें दुःशासन पांडवांची निंदा करून नंतर द्रौपदीस भाषण करितो. हे याज्ञसेनी, तुच्छ वस्त्रें धारण केलेले, निर्धन, स्थानापासून भ्रष्ट झालेले अशा पतीस अरण्यांत पाहण्या विषयीं तुला कशी प्रीति उत्पन्न होईल बरें! यास्तव तुला सांगतो कीं, आह्मां कौरवांतून तुला इच्छेस वाटेल त्या पतीनें सेवन कर. पहा हे सर्व कौरव एकत्र झाले आहेत. हे क्षांत, दांत सकल द्रव्यानें पूर्ण असे आहेत. यांतून एकादा चांगलापति वर ह्मणजे तुला हा क्लेशकाल प्राप्त झाला आहे. तो तुझें आकर्षण करणार नाहीं. जसे षंढतिल अफल असतात. जसा चर्माचा अकृत्रिम केलेला मृग व्यर्थ व ज्यामध्यें तंडुलधान्य नसून बाहेर धान्या सारखें दिसतें तें काकयवनामक धान्य व्यर्थ. तसे हे तुझे पति पांडव व्यर्थ निरुपयोगी आहेत हे पतित झालेले षंढतिलां सारखे यांचें सेवन करणें केवळ निरर्थक आहे. या प्रकारें घातुक कर्म करणारा धृतराष्ट्रपुत्र सभेमध्यें कठोर भाषणें पांडवांस श्रवण

करवीत असतां तीं भाषणें भीमसेनानें श्रवण करितांच एका एकीं क्रुद्ध होऊन उच्च स्वरानें कौरवांची निर्भर्त्सना करून हिमाचलस्थ सिंह कोल्ह्यावर जसा एका एकीं धांवून जातो तसा तो एका एकीं दुःशासनावर धांऊन भाषण करितो हे क्रूर कर्म करणाऱ्या पापिजनानीं सेवन करण्यास योग्य असें अकुलार्थ भाषण तूं करितोस. शकुनीच्या विद्येच्या योगें या राजसभेमध्यें व्यर्थ जल्पना करितोस. तुह्मीं बाहुबलानें काय केलेंत तें सांगा? जशी वाक्शरें करून आजआमचीं कर्मे तूं व्यथित करीत आहेस तशीं तुझीं मर्मे युद्धां मध्यें बाणानें व्यथित करून या भाषणाचें तुला स्मरण करवीन. आणि जे कोणी क्रोध लोभाचे स्वाधीन होऊन तुझ्या संरक्षणार्थ येतील, त्यांस पुत्रपौत्रासह वर्तमान युद्धा मध्यें यमाचे गृहीं पाठवीन. असें भीमसेन भाषण करून अजिनानें आपलें शरीर आच्छादन करीत असतां सकल कौरवांमध्यें दुःशासन निर्लज्ज होऊन पुनः पांडवांस भाषण करितो. मधुपर्ककालीं गौगौंगौंः असें त्रिवार उच्चारण करून गाईचा वध अथवा उत्सर्ग करितात तसे हे पांडव पशुतुल्य जाणून अंतक रूप जो अतिथी यास यांचा उत्सर्ग केला ह्मणून हे पांडव हो, तुह्मीं गौगौंगौंः झालां असें जाणा. असें दुःशासनाचें भाषण ऐकून भीमसेन बोलतो. हे दुःशासना, हें घातुक कर्म करणाऱ्या, असें कठोर भाषण करण्यास तूं अयोग्य आहेस. कपटानें धन मिळवून अशी वल्गना करण्यास कोण समर्थ होईल? आतां माझी प्रतिज्ञा तूं श्रवण कर. जर हा वृकोदर युद्धामध्यें तुझ्या वक्षस्थळाचा भेद करून रुधिर प्राशन करणार नाहीं तर पुण्यकारक लोकीं मी गमन करणार नाहीं. आणि युद्धाचे ठायीं सर्व धनुधारी यांमध्यें पहात असतां सकल धार्तराष्ट्रांचा प्राण हरण करून शांति पावेन हें माझें भाषण लौकरच सत्य होईल असें तुह्मीं जाणावें. वैशंपायन सांगतात हे जनमेजया असें भीमसेनानें भाषण केल्या नंतर सकल पांडव सभे पासून निघाले असतां भीमसेन सिंहासारख्या गतीनें चालत होता; त्याचा उपहास करावा ह्मणून दुर्योधन हर्षे करून भीमसेनाच्या पाठिमागून त्याच्या सारखा चालत चालत गेला. तें भीमसेनानें पाठिमागून वक्रदृष्टीनें पाहून भाषण करितो. हे मूर्खा इतक्यानेंच कांहीं झालें नाहीं. अरे

पुत्र बंधुसह वर्तमान लोंकरच मी तुला मारून या विनोदाचें स्मरण करवीन.कां हीं चिंता करूं नको. असें ह्मणोन तो बलवान भीमसेन आपल्या क्रोधाचें नियमन करून धर्मराजाच्या पाठीमागें जात असतां पुनःत्या सभे मध्यें भाषण करितो. हे कौरव हो, मी दुर्योधनास मारीन. व अर्जुन कर्णास मारील. अक्षांत कपटी जो शकुनि याचें हनन सहदेव करील. या सभेमध्यें पुनःमी मोठ्यानें भाषण करितों, तें श्रवण करा. हें माझें भाषण देव सत्य करतील. यांत मुळींच संशय नाहीं. यांचें व आमचें निश्चयें करून युद्ध होणार त्या युद्धामध्यें पापी जो सुयोधन यास मी गदेनें मारून भूतलावर पाडीन. आणि त्याच्या शिरावर मी आपल्या पायाचा प्रहार करीन. मृगराज सिंह, मृगाचें रुधिर जसें प्राशन करितो तसें दुरात्मा जो दुःशासन याचें मी रुधिर प्राशन करीन. नंतर अर्जुन भाषण करितो हे भीमसेना जे साधु आहेत ते वाणीनें निश्चय करीत नाहींत; परंतु आजपासून चौदावे वर्षी काय होईल तें सर्व पहातील. असें अर्जुनाचें भाषण श्रवण करून भीमसेन बोलतो दुर्योधन, कर्ण, दुरात्मा शकुनि आणि दुःशासन या चौघांचें रुधिर भूमि लोकरच प्राशन करील. असें ऐकून अर्जुन भाषण करितो. हे भीमसेना, दुर्योधना विषयीं ज्या पेक्षां प्रतिज्ञा केलीस त्या पेक्षां आमच्याशीं असूया करणारा, दुर्योधनास उत्तेजन देणारा व चलाना करणारा जो कर्ण याचा युद्धामध्यें मी प्राण घेईन. असें पूर्वी भाषण करून पुनः भीमाचें प्रिय व्हावें यास्तव अशी प्रतिज्ञा करितों कीं, कर्ण व कर्णाचे जे कोणी रक्षण करणारे अनुचर असतील त्या सर्वांचा बाणें करून मी प्राण घेईन. व बुद्धिमोहें करून कर्णा करितां जे माझ्याशीं दुसरे कोणी योद्धे युद्धास येतील त्यासर्वांस मी यमगृहीं नेईन. ही माझी प्रतिज्ञा सत्य जाणा; कदाचित् हिमालय पर्वत आपल्या स्थानापासून चळेल, सूर्य कदाचित् निस्तेज होईल, चंद्राचें शैत्य नष्ट होईल, परंतु माझी प्रतिज्ञा असत्य होणार नाहीं. आजपासून चौदावे वर्षी दुर्योधन सत्कारपूर्वक आमचें राज्य आह्मांस न देईल तर मी ह्मणतों हें सत्य होईल. या प्रकारें पार्थानें भाषण केल्यावर श्रीमान् माद्रीपुत्र महाप्रतापी सहदेव आपला हस्त पुढें करून सौबलाच्या वधाच्या इच्छेनें अत्यंत क्रोधानें आरक्त नेत्र होऊन पन्न-

गा सारखा श्वासोच्छ्वास टाकीत असें भाषण करितो कीं, हे गांधार कुलाचें यश हरण कर्त्या, शकुनि मूर्खा. अक्षद्यूतामध्यें जे तूं अक्ष मानिलेस ते अक्ष नव्हेत. युद्धांतील निशित बाण तुला मारण्या करितां येथें आले आहेत असें तूं जाण. सबांधव तुझा नाश होईल ह्मणून भीमानें तुझ्या उद्देशानें जें भाषण केलें त्या कर्माचा कर्ता मी सहदेव आहे. हे सौबला, आपल्या क्षात्र धर्मानें संग्रामा मध्यें जर तूं उभा राहिलास तर बांधवां सहवर्तमान तुझा हंता मी आहें. नंतर नकुळ भाषण करितो द्रौपदीस द्यूतामध्यें दुर्योधन प्रिय जे धृतराष्ट्र पुत्र याणीं जीं कठोर व रूक्ष भाषणें केलीं आहेत त्या दुर्वृत्त मुमुर्षु कालप्रेरित धृतराष्ट्र पुत्रांस भीमसेनानें प्रतिज्ञा केल्या प्रमाणें यमलोकीं पाठवूं. धर्मराजाच्या आज्ञेनें व द्रौपदीच्या मना प्रमाणें थोडक्याच काळांत धार्तराष्ट्र रहित पृथ्वीचा कर्ता मी होईन. या प्रकारें पुरुष व्याघ्र पांडव बहुत प्रकारच्या प्रतिज्ञा करून धृतराष्ट्र राजाच्या अग्रभागीं आले. असा विषय या अध्यायांत आ.

७८. अध्याय अठ्ठ्याहत्तरावा:- धर्मराज भाषण करितो कीं, सकल भरत कुलोद्भव व वृद्ध पितामह भीष्म बाल्हिकराजा द्रोणाचार्य, कृपाचार्य अन्य सकल राजे अश्वत्थामा, विदुर, धृतराष्ट्र, सकल धृतराष्ट्र पुत्र, युयुत्सु, तसेच अन्य सभासद मी सर्वांस विचारून आतां गमन करितों. तुमचें दर्शन पुनः आह्मांस होवो. असें धर्मराजानें गमन कालीं सर्वांस विचारलें असतां ते सर्व परम लज्जित होऊन कांहीं उत्तर न देतां मनामध्यें धर्मराजास त्याणीं कल्याण कारक आशीर्वाद दिला. नंतर विदुर धर्मराजास भाषण करितो हे धर्मा, ही राजपुत्री महाश्रेष्ठ कुंती वनांत येण्यास योग्य नाहीं. ही सुकुमारी असून वृद्ध आहे. व निरंतर इणें सुखच भोगिलें त्या पेक्षां माझ्या गृहीं इणें वास करावा. मी इचा सत्कार ठेवीन. हें माझें वचन तुह्मीं ऐका. तुह्मांस सर्वांस आरोग्य असो. असें ऐकून पांडव बोलतात. हे अनघा विदुरा, तूं जें भाषण केलेंस तें आह्मांस मान्य आहे. तूं आमचा पितृव्य असून पित्यासमान आहेस आह्मी तुझ्या स्वाधीन आहोंत. तूं आमचा परम गुरु होस. जी आज्ञा करशील ती आह्मीं श्रवण करूं. हे महामते, आणखी कांहीं कर्तव्य असल्यास सांग. त्या प्रमाणें आह्मीं करूं. असें भाषण केल्यावर पुनः विदुर बोलतो. हे भरत

श्रेष्ठ धर्मराजा, आतां मी जें तुला सांगतों तें श्रवण कर. अधर्मानें जो पराजित झाला तो दुःखित होत नाहीं तूं तर सकल धर्म जाणतोस. अर्जुन संग्रामामध्यें सर्वांचा पराभव करितो. भीमसेन शत्रूचा हनन कर्ता, नकुळ अर्थसंग्रह कर्ता, सहदेव योजना कर्ता, धौम्यऋषि ब्रह्मवेत्त्यांत श्रेष्ठ, ही द्रौपदी धर्मार्थां मध्यें महा कुशल, धर्माचरण कर्त्री, एकमेकांवर प्रीति करणारे, शत्रूनीं तुमचा भेद करण्यास अशक्य, निरंतर संतुष्ट असे असतां तुमची येथें कोण स्पृहा करणार नाहीं? हे धर्मराजा तुझा हा समाधी सर्व कल्याण कर्ता आहे. इंद्रासारखा शत्रूही या समाधीचें सहन करण्यास अशक्य आहे. हिमाचल पर्वताच्या पाश्वभागीं मेरु सावर्णीनें तुला उपदेश केला. वारणावत नगरीं कृष्णद्वैपायन भृगुतुंग पर्वतीं, परशुराम दृषद्वतीतीरीं शंभूनीं अंजन पर्वतीं असित नामक ऋषि इत्यादिकांनीं तुला उपदेश केला. व कल्माषतीरीं राहणाऱ्या मुनीचा तूं शिष्य झालास. नारदाचें दर्शन तुला निरंतर होतें. धौम्यऋषी तर तुझा पुरोहितच आहे. यास्तव हें धर्मो, तुला इतकेंच सांगतों कीं, मोठ्या संकटकालींही ऋषीनीं पूजित बुद्धीचा त्याग करूं नको. हे धर्मराजा, बुद्धी करून तूं पुरूरवा राजास वार्ता करून, अन्य नृपतींस धर्मसेवें करून, सकल ऋषींस तूं जिंकिलेंस. इंद्रासारखा जय, यमा सारखें कोपनियमन, कुबेरा सारखें दान, वरुणा सारखें वशीकरण, सर्वांचे हितार्थ तुझ्या शरीराचा व्यापार, उदकाचे ठायीं जसा जीवनगुण आहे तसा तुझे ठायीं जीवन गुण, भूमीसारखी क्षमा, सूर्य मंडला सारखें तेज, वायू सारखें बळ, सर्व पंचमहाभूतांच्या ज्या शक्ति त्या सर्व तुझे ठायीं असोत, तुह्मांस आरोग्य असो. परत आल्यावर पुनः तुमचें दर्शन होवो. हे युधिष्ठिरा, आपत्तिकाळींही धर्मामध्यें कांहीं विघ्न न होतां कालाकालाचे ठायीं यथार्थ धर्माचरण करीत जा. हे कौंतेया, तुझें कल्याण असो. आतां गमन करावें. कृतार्थ होऊन तुह्मीं कुशल आलेले मी अवलोकन करीन. तुह्मीं पूर्वीं कांहीं पातक केलें हें कोणी जाणत नाहींत. या प्रकारें विदुराचें भाषण श्रवण करून धर्मराजानें तथास्तु ह्मणून भीष्म व द्रोणाचार्य या उभयतांस नमस्कार करून निघाला. असा विषय या अध्यायांत आहे.

७९. अध्याय एकुणऐशी.- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, पांड

व वनामध्यें प्रस्थान करण्या करितां निघाले असतां द्रौपदी कुंतीस भेटण्या करितां गेली आणि दुःखानें पीडित होऊन गमना विषयीं विचारिलें तेव्हां इतर स्त्रियाही तेथें होत्या. त्यांस यथायोग्य वंदनें व आलिंगनें करून निघाली असतां पांडवांच्या अंतःपुरांत स्त्रियांचा एका एकीं मोठा दुःखार्त नाद होऊं लागला. द्रौपदी जाते हें पाहातांच कुंती अत्यंत संतप्त झाली, आणि शोकानें विव्हलित होऊन तिनें परम दुःखानें भाषण केलें कीं, हे वत्से द्रौपदी, हें महान् भय तुला झालें आहे, त्या विषयीं तूं शोक करूं नको. तूं सकल स्त्रीधर्मास जाणतेस, शील आचारवती आहेस त्या पेक्षां भर्त्या विषयीं मी तुला सांगावें असें नाहीं. तूं महासाध्वी व गुणसंपन्न असल्यामुळें दोन्ही कुलांचें भूषण केलेंस. हे अनघे; तूं आपल्या कोपाग्नीनें हे कौरव दग्ध केले नाहींस त्या पेक्षां हे कौरव सभाग्य आहेत असें मी मानितें. माझें स्मरण करीत मार्गानें गमन कर. तुझा गमनमार्ग निर्विघ्न असो. जो भावी अर्थ होणार तो होतच असतो; परंतु त्या विषयीं उत्तम स्त्रिया खेद करीत नाहींत. तूं गृहस्थधर्मानें संरक्षित होऊन लौकरच कल्याण पावशील. हा माझा सहदेव पुत्र वनामध्यें गमन करीत असतां कधींही दुःख पावणार नाहीं, असें तूं त्याचें संरक्षण कर. असें कुंतीचें भाषण श्रवण करून द्रौपदीच्या नेत्रांतून अश्रूंच्या धारा चालल्या. आणि आक्रोश करीत करीत रजस्वला व एक वस्त्र धारण केलेली व मुक्त केश करून ती निघाली असतां कुंती दुःखार्त होऊन तिचे पाठिमागून चालली. चालतां चालतां कौरवानीं वस्त्रें व अलंकार हरण केल्यामुळें कृष्णाजिनानें आपलीं शरीरें आच्छादन करून लज्जेनें अधोमुख झालेले, बंधुजनानीं शोक उत्पन्न केलेला अशा आपल्या पुत्रांस पाहतांच पुत्रवात्सल्यानें त्यांस आलिंगन करून नानाप्रकारचें विलापयुक्त भाषण बोलूं लागली कीं, हे पुत्र हो, तुम्हीं सद्धर्मानें वागणारे, वृत्ति व स्थिति करून भूषित झालेले, दृढ भक्तिमान्, देवता पूजे विषयीं सादरत असे असतां असें संकट तुम्हांस प्राप्त व्हावें काय! खचित हा दैवाचा विपर्यास झाला किंवा कोणत्या दोषानें हें दुःख तुम्हांस उत्पन्न झालें या विषयीं मी आपल्या बुद्धीनें विचार करून पाहतें; परंतु मला कांहींच समजत नाहीं. आतां मला इतकेंच वाटतें कीं, तुम्हीं माझे पुत्र उत्तम गुणानीं

मुक्त असतां मी ज्या पेक्षां दुःख पावतें त्या पेक्षा अशा पुत्रास उत्पन्न करणा
ऱ्या माझ्या भागावांच कांहीं दोष आहे. हे पुत्र हो, तुह्मी वीर्यसत्व, बल, उत्साह
व तेज यानीं संपन्न असतां सांप्रत कृश होऊन संपत्तिहीन झाल्यामुळें वन
व दुर्ग यांत कसे रहाल? पुढें तुह्मांस वनवास घडणार हें जर मला पूर्वीनि
श्चयें करून समजलें असतें तर शतशृंग पर्वतीं पांडुराजा मरण पावल्या
वर मी हस्तनापुरीं आल्येंच नसत्यें. तुमचा पिता महातपस्वी, महा प्रज्ञावान
व पुण्यवान् होय, तो आपल्या पुत्रांचें दुःख न पाहतां प्रियकारक स्वर्गलोकीं
गेला. तशीच महाधर्मज्ञा व कल्याणी माद्री उत्तमगतीस गेली. तिला मी मो
ठी धन्य असें समजत्यें. मी तर रति मति व गति इत्यादिकानीं मोहित होऊ
न राहिल्यामुळें मला इतकें दुःख पहावें लागलें. अशी जी मी क्लेश भोग
णारी त्या मला धिःकार असो. मला पुत्र तर फारच प्रिय आहेत, त्या पुत्रां
चा आजमी परम दुःखें करून त्याग करणार नाहीं. मीही तुमच्या सभाग
में वनामध्यें येत्यें. हे कृष्णे, हे द्रौपदी, तूं आज माझा त्याग कसा करित्येस
सर्व मनुष्यांचा अंत व्हावयाचा असा नियम असतां ब्रह्मदेव आज माझा
अंत कां करीत नाहीं? हे द्वारकावासि कृष्णा, मला या दुःखा पासून मुक्त कां
करीत नाहीस? तसेंच या नरश्रेष्ठ पांडवांस कां सोडवीत नाहींस? हे परमेश्व
रा तूं अनादिनिधन आहेस जे मनुष्य तुझें निरंतर ध्यान करतात त्यांचें तूं
रक्षण करतोस, असा संवाद कसारे व्यर्थ झाला. हे माझे पुत्र सद्धर्मानेंच
लणारे माहात्मे, यश व वीर्यवान असतांही यांस हें दुःख झालें तें सोसण्या
स हे योग्य नाहींत, यास्तव त्यांवर दया करावी. नित्यधर्मजाणणारे भीष्म, द्रोण
कृपादिक कुलश्रेष्ठ सभेमध्यें बसले असतां माझ्या पुत्रांस अशी आपत्ति
कशी प्राप्त झाली? हे पांडुराजा, शत्रु या पुत्रांस द्यूतामध्यें जिंकून वनामध्यें
घालवितात; यांची तूं उपेक्षा कां करितोस. हे सहदेवा, तूं तरी जाऊं नकोस
सर्व पुत्रां मध्यें तूं मला अत्यंत प्रिय आहेस. माझ्या शरीरा पेक्षां तुझ्या
वर माझी विशेष प्रीति असतां तूं कुपुत्रा सारखा माझा त्याग करून कसा
जातोस? हे तुझे भ्राते सत्यप्रतिज्ञ जर आहेत तर त्यांस जाऊं दे; परंतु तूं
येथें राहून माझें संरक्षणरूप जें फल प्राप्त होईल त्याचें सेवन कर. या प्र-

फार कुंती विलाप करीत असतां आनंदरहित होऊन मातेस अभिवादन पूर्व क प्रणाम करून वनांत जाण्या करितां निघाले त्या काळीं विदुरानीं आर्त झालेल्या कुंतीचें अनेक प्रकारानीं सांतवन करून आपणही दुःखानें कुंतीस गृहांत घेऊन गेले. धृतराष्ट्र पुत्राच्या स्त्रिया, पांडव वनामध्यें गेले व द्रौपदीचें द्यूतमंडलांत आकर्षण केलें हें पाहून सर्व कौरवांची निंदा करीत बहुकाल पर्यंत आपलीं मुखें हस्तांवर ठेऊन रुदन करीत बसल्या. धृतराष्ट्र राजाही आपल्या पुत्रांची अनीति पाहून उद्विग्न हृदय होऊन शांति पावला नाहीं. शोकानें व्याकुळ चित्त झाल्यामुळें विदुरास लौकर येण्या विषयीं दूतांस बोलाऊं पाठविलें असतां विदुर तत्काल आल्यावर धृतराष्ट्र राजा उद्विग्न होऊन पांडवांचें वर्तमान त्यास विचारिलें. असा विषय या अ० आहे.

८०. अध्याय ऐशावा: वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दीर्घदर्शी विदुर आल्यावर अंबिकासुत धृतराष्ट्र साशंकित होऊन त्यास बोलतो हे विदुरा, धर्मपुत्र युधिष्ठिर राजा वनामध्यें कसा गेला तसाच भीमसेन, सव्यसाची अर्जुन, माद्रीपुत्र नकुल, सहदेव, धौम्यऋषि व यशस्विनी द्रौपदी याणीं कसें गमन केलें? व गमनकाळीं त्याणीं आपल्या शरीराचींही इंगितें कस कशीं दाखविलीं असा धृतराष्ट्राचा प्रश्न श्रवण करून विदुर बोलतो हे धृतराष्ट्रा, युधिष्ठिरानें गमनकाळीं आपलें मुख वस्त्रानें आच्छादित केलें होतें. भीमसेन आपल्या विशाल बाहूंकडे पहात गेला. सव्यसाची अर्जुन वाळूचे खडे फेंकीत धर्मराजाच्या मागून चालला होता. माद्रीपुत्र सहदेव आपलें मुख अलिप्त करून गेला. लोकांमध्यें अत्यंत सुंदर असा नकुळ हृदयांत अत्यंत विह्वलित होऊन आपल्या सर्वांगास धूळ लाऊन धर्मराजाच्या मागून गेला. अत्यंत रूपवती व दीर्घलोचना द्रौपदी आपल्या केशानीं मुखाचें आच्छादन करून रुदन करीत करीत धर्मराजाच्या मागून गेली. धौम्यऋषि हस्तामध्यें कुश घेऊन महाभयंकर यमदैवत्य सामाचें मार्गांत गायन करीत करीत गेला. असें विदुराचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र भाषण करितो हे विदुरा, पांडव नाना प्रकारचीं रूपें धारण करून कां गेले? याचें कारण मला सांग. असें धृतराष्ट्राचें भाषण श्रवण करून विदुर

बोलतो हे राजा, तुझ्या पुत्रांनीं कपटें करून पांडवांचें धन व राज्य हरण केलें असतां बुद्धिमान् जो युधिष्ठिर राजा त्याची बुद्धी धर्मापासून कधीं ही चलित झाली नाहीं. अरे, जो धर्मराजा तुझ्या पुत्रांवर अत्यंत दया करीत होता त्या धर्मराजाला तुझ्या पुत्रांनीं कपटानें राज्यापासून भ्रंशित केलें त्या मुळें क्रुद्ध होऊन माझ्या घोर दृष्टीनें हे धृतराष्ट्रपुत्र आज दग्ध होतील, ते न व्हावे अशा हेतूनें आपलें मुख गमनकालीं आच्छादित केलें. भीमसेन बाहूंकडे पहात माझ्या बाहुबला समान बल दुसरे कोणाचेंही नाहीं ह्मणून बाहू हेंच माझें द्रव्य, तेणें करून हर्षित होऊन आपल्या विशाल बाहु लोकांस दाखवीत गेला. कुंतीपुत्र अर्जुनानें वाळू टाकिली तेणें करून त्याणें असें सूचविलें कीं, मी आपल्या बाहुबलें करून शरसंघातरूप मोठें भयंकर कर्म शत्रूंस दाखवीन. जशा सिकता निरनिराळ्या असतात तसे बाणांचे समुदाय निरनिराळे मी शत्रूंवर सोडीन. हें सूचविण्याकरितां दोन्ही हातानीं सिकताकण टाकीत तो गेला. सहदेवास असें वाटलें कीं, आज हें मुख कोणास दाखवूं नये, ह्मणोन तो आपलें मुख आच्छादन करून गेला. नकुलानें विचार केला कीं, मार्गामध्यें स्त्रियांच्या मनाचें आकर्षण करूं नये. ह्मणून आपल्या शरीरास धूळ लाऊन गेला. एक वस्त्र नेसलेली व रजस्वला अशी द्रौपदी केश मुक्त करून रुदन करीत करीत गमन करीत असतां असें बोलली कीं, ज्या दुष्टानीं या अवस्थेस मला नेली त्या दुष्टांच्या स्त्रिया आजपासून चवदावे वर्षी गतभर्तृका होतील. आणि त्यांचे सुत व बंधुजन सर्व मरण पावतील. त्यांचीं शरीरें रक्तानीं भरून मुक्तकेश होतील. आणि आपल्या मृत झालेल्या पतींस तिलांजली देऊन नंतर हस्तनापुरांत प्रवेश करतील. पुरोहित महावीर्यवान् धौम्य नैर्ऋत्य दिशेस दर्भांचीं अग्रें करून यमदेवतात्मक सामगायन करीत गेला. त्याणीं गमनकालीं असें भाषण केलें कीं, युद्धांत कुरुवंशीय पुरुष सर्व मरण पावले असतां कौरवांचे गुरु असेंच सामगायन करतील. अशीं इंगितें दाखवीत भाषण करीत पांडव वनामध्यें जात असतां सकलं ग्रामनिवासिजन एकाएकीं हाहाःकार शब्द करून भाषण करूं लाग-

ले कीं, हे आमचे नाथ हो, आह्मांस टाकून तुह्मीं जातानां! आमच्याकडे अव लोकन तरी करा. या कुरुवृद्धांस धिःकार असो. हे वृद्ध वृद्ध असून यांचीं आचरणें केवळ बाळां सारखीं झालीं. राष्ट्रांपासून पांडुपुत्रांस आज हे घालवून देतात. आह्मीं आतां पांडवांवांचून अनाथ झालों. हे धृतराष्ट्रपुत्र अत्यंत दुष्ट असल्यामुळें यांजवर आमची प्रीति कशी बरें उत्पन्न होईल! वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रकारें ते मनस्वी (मनास वाटेल तसें करणारे) पांडव आकार चिन्हानीं आपलें मनोगत दाखवीत हस्तनापुरा पासून वनांत गेले असतां इकडे हस्तनापुरीं नाना प्रकारचे उत्पात होऊं लागले. अभ्र नसतां विद्युल्लता चमकूं लागल्या. भूमिकंप झाले. अमावास्या पर्वकाल नसतां राहूनें सूर्यास ग्रस्त केलें. उल्कापात झाले. पक्षी अपसव्य मार्गानें नगरांत आले. पिशाच्च व राक्षस भयंकर शब्द करूं लागले. गृध्र, गोमायु, राक्षस हे राजगृह देवालयें व मोठ मोठे प्राकार यांजवर बसून नानाप्रकारचे शब्द करूं लागले. नगराच्या समीपभागीं पिशाच्चें प्रेतें मांस व अस्थी टाकूं लागले. हे सकल महान् दुरासद भरतकुलाच्या नाशास सूचक होत. हे राजा तुझ्या दुष्ट विचारानें हें सर्व घडेल. या प्रकारें धृतराष्ट्र राजा व बुद्धिमान् विदुर यांचा संवाद चालला असतां इतक्यांत नारद ऋषि महर्षिसह कौरव सभेमध्यें येऊन सकल कौरवांच्या अग्रभागीं उभा राहिला. आणि महान् भयंकर असें भाषण केलें कीं, अरे आज पासून चौदावे वर्षी सकल कौरव दुर्योधनाच्या अपराधामुळें भीमसेन व अर्जुन यांच्या बाहुबलानें यमगृहीं जातील. या प्रकारें ब्राह्मश्रीचा धारण कर्ता नारद ऋषि भाषण करून अंतर्धान पावल्यावर दुर्योधन, कर्ण व शकुनि हे द्रोणाचार्यांचा आश्रय करून सर्व राज्य गुरूस निवेदन केलें. त्या काळीं द्रोणाचार्य, दुर्योधन, दुःशासन व कर्ण या सर्वांस असें भाषण करूं लागला कीं, पांडव देवपुत्र असल्यामुळें सर्वांस ते अवध्य आहेत, असें ब्राह्मण बोलतात. तुह्मीं सर्व भक्तिभावानें ज्या पेक्षां मला शरण आलां त्या पेक्षां माझें बल जों पर्यंत चालेल तों पर्यंत तुमचा परित्याग करण्यास मी समर्थ नाहीं; परंतु दैव बलवत्तर आहे. त्या विषयीं सांगवत नाहीं. धृ-

तांत पराजित झालेले पांडुपुत्र धर्मे करून द्वादशवर्षे पर्यंत ब्रह्मचर्यव्रत धारण करून वनामध्यें वास करतील. नंतर क्रोधामर्ष होऊन पुढें यांचे राज्य दूरीकरण करतील. द्रुपदराजा पूर्वी माझा सखा असतां कांहीं द्वेषानें मी त्यास राज्या पासून भ्रष्ट केलें. ह्मणून त्याणें माझ्या वधा करितां कांहीं एक याग केला. याजोपयान नामक ऋषीच्या तपोबलें करून अग्नींतून धृष्टद्युम्न पुत्र व द्रौपदी नामक कन्या अशीं दोन अपत्यें उत्पन्न झालीं. तो धृष्टद्युम्न प्रस्तुत पांडवांचा शालक असून त्यांचें प्रिय कर्ता आहे. त्या पेक्षां धृष्टद्युम्नास मी फार भितों. अग्नी पासून ज्वाला वर्णा सारखा धनुष्य, कवच व शर धारण केलेला, मनुष्या सारखा जेव्हां तो उत्पन्न झाला तेव्हां पासून मला महान् भय उत्पन्न झालें आहे. तोच परवीर हनन कर्ता धृष्टद्युम्न पांडवांचे पक्षास मिळाला आहे. अर्जुनानें त्यास रथातिरथसंख्येंत गणला असून प्राणापेक्षांही तो त्यास प्रिय होय. त्या पेक्षां धृष्टद्युम्नाचा आणि माझा अंतकाळीं जर संग झाला नाहीं तर मी तुह्मांस आश्रय देईन. हे कौरवहो, या दुःखापेक्षां दुसरें आणखी दुःख कोणचें पाहिजे. धृष्टद्युम्न हा द्रोणाचार्याचा साक्षात् मृत्यूच आहे. हा पशू सारखा द्रोणाचार्यांचा नाश करील, असें सर्व लोकांत प्रख्यात आहे. हे दुर्योधनराजा, तुझ्यामुळें तो काळ आज माझ्या सन्निध प्राप्त झाला आहे. हे राजा, तूं हें जें केलेंस इतक्यानेंच आपल्यास कृतकृत्य मानूं नको. कांहीं इतउत्तर श्रेय संपादन कर. हेमंत ऋतूमध्यें जशी तालवृक्षाची छाया मुहूर्तमात्र असते तसें हें राज्यसुख मुहूर्तमात्रच आहे. असें तूं समजून यज्ञयाग दानभोग इत्यादिक जें काय तुला कर्तव्य असेल तें तूं करून घे. आज पासून चौदावे वर्षी तुला महान् भय उत्पन्न होईल. या प्रकारचें द्रोणाचार्याचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र राजा पुत्रांस बोलतो. अरे पांडवांस लौकर माघारें फिरवा. जर कदाचित् ते माघारे न येतील तर शस्त्र, रथ, पदाती त्यास देऊन सत्कारपूर्वक त्यांस जाऊं द्या. असा विषय यांत आहे.

८१. अध्याय एक्यायैंशी.– वैशंपायन सांगतात हे जन्मेजया, द्यूतांत कपटानें जिंत झालेले पांडव वनामध्यें गेल्यावर धृतराष्ट्र राजास मोठी चिंता प्राप्त होऊन श्वासोच्छ्वास टाकीत एकांतीं बसला असतां त्यास संजय भाषण कर्ता

हे धृतराष्ट्र राजा, पांडवांस वनांत पाठवून ही वसुपूर्ण पृथ्वी तुला मिळाली आ तां तूं कांबरें शोक करितोस? असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, पांडव युद्धामध्यें मोठे दक्ष, बलवान् व महारथी आहेत त्यांच्याशीं वैर करून शोकरहित कसें राहवेल? हें ऐकून संजय बोलतो हे राजा, पुत्र पौत्रांस ह वर्तमान नाश करणारें असें पांडवांशीं तुमचें वैर उत्पन्न झालें हेंच तुझें जन्मांतरचें सुकृत उभें राहिलें. या वैराचा कारणीभूत तूंच होस. भीष्म, द्रोण व विदुर यांणीं तुझ्या पुत्रांस वारंवार निवारण केलें असतां तुझा पुत्र निर्लज्ज होऊन पांडवांची प्रियभार्या धर्मचारिणी द्रौपदी सभेंत आणण्याविषयीं राधेयास सूचना केली. तेव्हां त्याणें प्रातिकामी दूतास द्रौपदीकडे जाण्याविषयीं आज्ञा केली. यांत दुर्योधनाचा तरी अपराध काय? ज्याचा पुढें नाश व्हावयाचा असतो त्याची बुद्धी पूर्वीं देव आकर्षण करितात. तेणें करून तो पुरुष विपरीत करूं लागतो. विनाशकाल विपरीत उत्पन्न झाला असतां बुद्धि भ्रष्ट होऊन अनीति नीति सारखी वाटते. ती अनीति हृदयांतून कितीं उपदेश केला तरी निघत नाहीं. अनर्थ अर्थरूपानें व अर्थ अनर्थ रूपानें भासून त्याच्या विनाशास कारण होतात. काल दंड धारण करूनच कोणाचें शीर तोडीत नाहींत तर त्याच्या बुद्धीस तोच विपरीत भासवितो. हेंच कालाचें भय आहे. जी तपस्विनी पांचालकन्या द्रौपदी तिचें आकर्षण करून सभेमध्यें आणली. हें च घोर वैरभय तुम्हांस झालें. अयोनी पासून जीचा संभव, रूपवती, विभाव सूचे कुलांत उत्पन्न झालेली, सर्व धर्म जाणणारी अशा स्त्रियेस दुर्यूतकार करणाऱ्या खेरीज कोण सभेंत आणील बरें? तशांतून ती स्त्री रजस्वला, शोणितानें परिप्लुत झालेली, एकवस्त्रा असून द्रव्य व राज्य ज्यांचें भ्रष्ट झालेलें हृतवस्त्र, सकल श्री ज्यांची नष्ट झालेली, दासभाव पावलेले व धर्मपाशानें बद्ध झाल्यामुळें पराक्रमाविषयीं अशक्त अशा पतींस पाहून दुःखित होऊन परम क्रोध पावली असतां कौरव सभेमध्यें दुर्योधन, कर्ण हे तिला अति कटु भाषण करूं लागले. हे राजा, जसा एकादा मानव विष प्राशन करून सुखानें निद्रा करण्यास इच्छितो असें हें सर्व कृत्य तुम्हीं केलें. असें संजयाचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, द्रौपदीच्या क्रोधाग्नीनें ही.

पृथ्वी देखील दग्ध होईल मग माझ्या पुत्रांतून एक तरी कोणी अवशेष राही ल काय? ज्या काळीं द्रौपदीस सभेमध्यें नेली त्या काळीं गांधारी प्रभृति, भ रत स्त्रिया, तशाच सकल प्रजा, हें कृत्य पाहून आक्रोश करूं लागल्या. त्या दि वशीं सायंकाळीं ब्राह्मणानीं अग्निहोत्रामध्यें होम केला नाहीं. द्रौपदीचें आकर्षण करून सभेंत आणली. हें ब्राह्मणानीं श्रवण करितांच परम को प पावले. घोर प्रलयकाळीं जसे भयंकर शब्द होतात तसे शब्द होऊन वा यु सुटला. आकाशापासून उल्कापात होऊं लागले. पर्वकाल नसतां राहू सूर्यास ग्रस्त करूं लागला. रथशाळेचे ठायीं अग्नी प्रज्वलित होऊं लाग ले. सकल भरतांस भय उत्पन्न करण्या करितां त्याचे ध्वज गळून पडले. दुर्योधनाच्या अग्निहोत्र शाळेमध्यें भालुका भयंकर शब्द करूं लागल्या. भा लुकांचे शब्द श्रवण करून रासभ चारी दिशेस प्रत्युत्तर शब्द करूं लागले. त्या काळीं हे संजया, भीष्म, द्रोण, कृपाचार्य, सोमदत्त, बाल्हिक या सर्वांस- वर्तमान कळलें नंतर विदुरानें हें वर्तमान मला निवेदन केलें असतां द्रौप- दीस मी सांगितलें कीं, जेजे वर तुला इच्छित असतील ते ते वर मजपाशीं माग, मी तुला वरप्रदान देतों, त्या काळीं पांचालीनें असे वर मागितले कीं, पांड व अदास असोत. व त्यांचे रथ आणि धनुष्यबाण त्यांस प्राप्त होवोत. असें द्रौपदीचें वाक्य श्रवण करून मी उत्तर केलें कीं, तूं ह्मणत्येस त्या प्रमाणें होई- ल. नंतर विदुर ह्मणाला कीं, ज्या पेक्षां द्रौपदीस सभेंत आणिलें त्या पेक्षां हा च भरतकुलाचा अंत झाला असें तुह्मी समजा. पहा ही पांचाल राजाची कन्या साक्षात् अप्सराच काय देवानें आली पांडवांचे मागें वनांत जात आहे त्या जे क्लेश होतील ते क्लेश आतां पांडवांस सहन होणार नाहींत. हे पांडव म- हा धनुर्धारी वृष्णी व महारथी पांचाल यांसहवर्तमान वासुदेवानें रक्षित होऊन पुनः ज्या काळीं माघारे येऊन अर्जुन पांचालानीं परिवारित होऊन आ पल्या गांडीव धनुष्याचा टणत्कार करील, तसाच भीमसेन यमाचे दंडा सा रखी गदा धारण करून कंपित करील त्या काळीं अर्जुनाच्या गांडिवाचा नि- र्घोष व भीमसेनाचा गदावेग कोणीही राजा सहन करण्यास समर्थ होणा र नाहीं. यास्तव मला असें वाटतें कीं, पांडवांचा आणि तुमचा स्नेह असावा.

वैर नसावें. सकल कौरवांपेक्षां पांडव बलवान आहेत असें मी मानितों. जरासंध राजा महा द्यूती व मोठा बलिष्ठ असतांही भीमसेनानें बाहुबलें-करून युद्धामध्यें त्यास मारिलें. यास्तव हे भरतश्रेष्ठा त्या पांडवांशीं तुमचा शम असून दोन पक्षांस उचित असेल तेंच निश्चयानें करीत असावें. हे राजा, मी जें सांगितलें तें केलेंस तर तुझें कल्याण होईल. हे संजया या प्रकारें विदुरानें धर्मार्थ सहित वचन मला सांगितलें असतां पुत्राच्या हितेच्छेनें विदुरानें वाक्य मी श्रवण केलें नाहीं. असा विषय या अध्यायांत वर्णिला आहे.

समास.

श्री

# वनपर्व.

१ अध्याय पहिला — जनमेजयराजा प्रश्न करितो, हे वैशंपायन ऋषे, दुरात्मे जे धृतराष्ट्राचे पुत्र यांणीं इंद्रासारखे पराक्रमी आमचे पितामह पांडव यांस कपटानें द्यूतामध्यें जिंकून त्यांची निर्भर्त्सना केली, तेणेकरून मोठें वैर उत्पन्न केलें असतां ते पांडव द्रौपदीसहित ऐश्वर्यापासून भ्रष्ट झालेले सर्व दुःखें सहन करून वनामध्यें कसे गेले व तेथें आहार, विहार इत्यादिकांचा नियम द्वादश वर्षें त्यानीं कसा केला व कोठें कोठें संचार करीत होते इत्यादि तुह्मीं कृपाकरून मला सांगा. नंतर वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, द्यूतामध्यें पांडवांस पराजित करून हस्तनापुरापासून त्यांस दुरात्मे जे धृतराष्ट्राचे पुत्र यांणीं घालवून दिलें असतां संपूर्ण पांडव, वर्धमान नामक पुरद्वारानें शस्त्रास्त्रें व द्रौपदी यांसहवर्तमान उत्तरेस निघाले. त्याकालीं इंद्रसेनादि धर्मराजाचे पंचदश भृत्य स्त्रियांसहवर्तमान रथामध्यें बसून त्यांच्या मागून निघाले. हें गांवांतील जनानीं श्रवण करितांच ते शोकग्रस्त होऊन विदुर, भीष्म, कृपाचार्य यांची आप आपल्यांत निंदा करून बोलतात कीं, पांडव तर वनांत चालले, अतःपर आपण या गावांत राहूं नये. दुर्योधन, दुष्ट शकुनीची आज्ञा परिपालन करणारा व दुःशासनादि भ्रात्यांस अनुमोदन देणारा कोणते वेळेस आमचा घात करील याचा नेम नाहीं. ज्या देशाचा राजा स्वतः पापी असून पाप्याच्या साहाय्यानें राज्य करण्याची इच्छा करितो, तेथें धर्म, आचार व सुख प्रजेस कोठून होणार, हा दुर्योधन गुरुद्वेषी, दुराचारी, अर्थलुब्धक, नीच, अभिमानी आणि निर्दय आहे याचे राज्यांत आपल्यासारख्यांस राहून परिणाम नाहीं. पांडव तर धर्मपरायण, जितेंद्रिय, उदार, निजआहेत त्यांसहवर्तमान आपण वनांत जावें हें उत्तम आहे. असा निश्चय करून संपूर्ण नगरांतील लोक पांडवांकडे गेले आणि हात जोडून भाषण करूं लागले कीं, हे महाराज, आपण आह्मांस टाकून वनामध्यें चाललांत आतां आह्मीं ही तुमच्या समागमें येतों, दुष्टानीं अधर्मानें तुह्मांस जिंकून वनवासास पाठविलें. हें ऐकून आह्मीं दुःखित झालों. तर या कालीं आमची उपेक्षा क

रूंनका. सुहृद व आपलें हित इच्छिणारे भक्त यांचा परित्याग विनाशकाली ही महान लोक करित नाहींत. आमचे मनातून तर दुष्टाचा सहवास नसावा. असें आहे, कारण चांगल्या सहवासानें कल्याण होतें, दुष्टसहवासानें अकल्याण होतें, सर्व गुणदोषाची वृद्धी सहवासानें होत्ये, वस्त्र, जल, भूमी- इत्यादिकांस सुगंधाचा सहवास लागला असतां सुगंध लागतो आणि दुर्गंधाचा सहवास लागला असतां दुर्गंध लागतो. तसेच अज्ञान उत्पन्न होण्यास मूर्खांचा समागम कारण होय. यास्तव प्राज्ञ व थोर प्राणीं तपस्वी, साधु, जितेंद्रिय-यांचा सहवास करावा. ज्यांची विद्या, प्रज्ञा व कर्में चांगलीं आहेत- त्यांच्यांशीं सहवास करणें हें शास्त्राभ्यासापेक्षांही थोर आहे. आह्मीं पापी, दुराचारी व अग्निहोत्रादिक क्रिया न करणारे जरी आहोंत तथापि हे धर्मराजा, तुमच्या सहवासानें पुण्यवान होऊं. दुष्टाचें दर्शन, संवाद व एकत्र बसणें इत्यादिकानीं मनुष्य आपल्या धर्माचारापासून भ्रष्ट व बुद्धीहीन होतात. मध्यमाच्या सहवासानें मध्यम होतात आणि उत्तमाच्या सहवासानें उत्तम होतात. हे धर्मराजा, तुमचे गुण तर या लोकीं शिष्टलोक बहुत प्रकारें वर्णन करितात ह्मणोन तुमचा सहवास करावा अशी आमची इच्छा आहे. असें पौरजनाचें भाषण ऐकून धर्मराज बोलतात हे नागरिकहो, तुह्मीं आह्मांवर अतिस्नेह ठेवितां व आम्हीं गुणी नसतां गुणवान आहों असें ह्मणोन स्तुती करितां तस्मात् आह्मीं धन्य आहोंत; आमचें प्रिय करावें अशी जर तुमची इच्छा असेल तर आह्मीं तुह्मांस सांगतों त्याप्रमाणें ऐकून पुनः हस्तनापुरास माघारे जाऊन पितामह भीष्म, विदुर, गांधारी व इतर सुहृज्जन यांचें मन संतुष्ट करून स्वस्थ राहा. असें केलें असतां माझी आज्ञा पालन केली असें होऊन माझा सत्कार ही केला असें होईल. असें धर्मराजाचें वाक्य ऐकतांच संपूर्ण पौर व घोर आक्रोश करून पांडवांच्या गुणांचें स्मरण करीत करीत दुःखानें निराश होऊन माघारे फिरले. नंतर पांडव रथारूढ होऊन पुढें जान्हवी तीरास जाऊन प्रमाणाख्य नामक वटवृक्षाखालीं एक दिवसपर्यंत राहिले. तो पांडवांमागून अग्निहोत्री व निरग्निक ब्राह्मण शिष्य बांधवांसह वर्तमान राजदर्शनार्थ येऊन प्रमाणाख्य नामक वटवृक्षाखालीं आपले अग्नि प्रज्वलित करून

होम दिल्यानंतर ब्रह्मघोष व शास्त्रचर्चा करूं लागले असतां त्या कालीं युधिष्ठि र राजा ब्रह्मवादी ब्राह्मणासह वर्तमान फारच शोभायमान दिसूं लागला. आणि त्या ब्राह्मणश्रेष्ठानीं वनवासही श्रेयस्कर आहे असें धर्मराजाचें समाधान करीत ती रात्र सर्व घालविली. असा विषय या अध्यायांत आहे.

२ अध्याय दुसराः— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुसरे दिवशीं प्रातःकालीं धर्मराज ब्राह्मणांस बोलूं लागला कीं, हे विप्रहो, आह्मीं राज्यापासून भ्रष्ट झालों, आमचें सर्वद्रव्य कौरवांनीं हरण केलें. वनामध्यें फलमूलें भक्षण करून कालातिक्रम करणार तस्मात् आमच्या समागमें आपण येणें उचित नव्हे. वन तर फारच भयंकर त्यामध्यें नानाप्रकारचीं श्वापदें राहतात, आपणआलां असतां बहुत दुःखें होतील, ब्राह्मणास दुःख झालें असतां देवतेस परांकाष्ठेचा क्रोध येतो, येवढ्या करितां कृपाकरून आपण येथून माघारें जावें. असें ऐकून ब्राह्मण बोलतात हे राजा, जशी तुझी अरण्यांत गती होईल तशीच आमची होईल, आह्मीं वन संबंधीं दुःखें सहन करण्यास सिद्ध आहोंत; आमच्यासारख्या सद्धर्मदर्शींचा त्याग करण्यास तूं योग्य नाहींस. भक्तांवर देव देखील कृपा करितात त्यांतून ब्राह्मणावर फारच करितात. असें ऐकून युधिष्ठिर बोलतो हे ब्राह्मणाहो, माझी ही भक्ती ब्राह्मणाचे ठायीं बहुत आहे, परंतु कायकरूं! साम्राज्य परिभ्रंश झाल्यामुळें, तसेच माझे भ्राते पूर्वी नानाप्रकारचीं उत्तमोत्तम अन्नें भक्षण करीत होते त्यांस हे दुःखाचे दिवस प्राप्त झाल्यामुळें, द्रौपदीच्या छलामुळें व शत्रूनीं सर्वराज्य हरण केलें त्यामुळें मी फारच दुःखित आहें. असें भाषण ऐकून ब्राह्मण बोलतात हे धर्मराजा, वनामध्यें आमच्या पोषणाची तुझ्या मनामध्यें अगदीं चिंता नसावी, आह्मीं भिक्षान्नें सेवन करून तुझा बरोबर येऊं, जपपूजा इत्यादिक करून तुला आशीर्वाद देऊं आणि नानाप्रकारच्या कथा सांगून तुझें मन रंजन करूं. असें ऐकून युधिष्ठिर बोलतो हे विप्रहो, तुह्मीं स्वकष्टार्जित अन्नें भक्षण करून माझा बराबर येणार हें मला योग्य नाहीं. असें नानाप्रकारें ब्राह्मणास बोलून युधिष्ठिर शोककरित बसला असतां योग व सांख्य शास्त्र वेत्ते शौनकऋषी धर्मराजास बोलतात हे राजा, शोकाचीं व भयाचीं कारणें हजारों आहेत, परंतु ज्ञानी व बुद्धिमान् लोकांस तीं स्पर्श करीत नाहींत. तुझासारखे बुद्धिमा.

न लोक त्यांत निमग्न होत नाहींत, हे राजा, तुझा अधिकार काय सांगावा, श्रुतिस्मृत्युक्त जी अष्टांग बुद्धी श्रेय संपादन करणारी ती तुझे ठायीं निरंतर रहात्ये. अर्थनाश व मित्रवियोग यां पासून उत्पन्न झालेली शारीर व मानस इत्यादि दुःखें तुझ्या सारख्या ज्ञानी पुरुषास कधींही होत नाहींत, याविषयीं महात्म्या जनकानें पूर्वी मनाच्या स्थैर्यास कारण जे श्लोक सांगितले ते मी तुला सांगतों. मन व देह यां पासून झालेलीं जीं सुखदुःखें याणीं सर्व जगत् पीडित आहे खरें; परंतु त्यांच्या शमाविषयीं हा उपाय ऐक. व्याधी, अनिष्टसंस्पर्श, श्रम व अन्नादिकांचा त्याग या चार गोष्टींनीं शरीरास फार दुःख होतें; परंतु तुझा सारखे ज्ञानी तसें दुःख पूर्वीच होऊं देत नाहींत. मनास दुःख झालें असतां शरीराचा संताप होतो. यास्तव जसा तापलेला लोखंडाचा गोळा कुंभस्थ उदकांत टाकिला असतां उदक तप्त करतो तसें शरीर तप्त झालें असतां ज्ञानरूप जलानें मानसव्याधी शांत करावा. तो शांत झाला असतां शरीरही स्वस्थ होतें. मनास दुःख होण्यास कारण सर्व पदार्थांवर स्नेह करणें हेंच होय. दुःख, भय, शोक, हर्ष, क्लेश, श्राव व प्रीती हे सर्व स्नेहमूलक आहेत, कोठराग्नी जसा समूल वृक्षाचा नाश करतो तसा स्नेह हा सर्वस्व नाशक आहे, तस्मात् मित्र, धन, शरीर याचे ठायीं स्नेहाचें वर्जन करावें. ज्ञानी व शास्त्रज्ञ, पद्मपत्रासारखे स्नेहा पासून निर्लिप्त असतात. प्रीती पासून काम, त्या पासून इच्छा, इच्छे पासून तृष्णा उत्पन्न होत्ये. ही तृष्णा पापिष्ठ नित्यशः पुरुषास उद्वेग करणारी, अधर्माची वर्धक होय आणि जी, दुर्बुद्धिनीं टाकण्यास अशक्य असून हा पुरुष जरामृत्यूनीं ग्रस्त जरी झाला तरी तीजीर्ण होत नाहीं. ती केवळ प्राणांतिक रोगच होय. सर्व देही तृष्णेचा स्वीकार करतात ह्मणोन नाश पावतात. काष्ठावर काष्ठ संघर्षणें करून अग्नि उत्पन्न होऊन त्या काष्ठाचा जसा तो नाश करतो, तशी आत्मा व देह यां पासून झालेली तृष्णा सर्वस्व नाश करित्ये. यास्तव तृष्णा परित्याग केला असतां सर्व दुःखा पासून प्राणी मुक्त होतो. अर्थ संपादन करणें हें भयाचें कारण होय. जसें मांस अधांत्रीं असतां त्यास पक्ष्यांचें भय, पृथ्वीवर श्वापदांचें भय, उदकांत मत्स्यांचें भय, तसे अर्थवान् पुरुषास राजा, उदक, अग्नि, तस्कर व स्वजन यां पासून बहुत भय आहे. अर्था पासून लोभ, मोह, कार्पण्य, दर्प, मान, भय, उ-

द्वेग हे उत्पन्न होतात, अर्थाचें संरक्षण करणें अथवा व्यय करणें तरीं दुःखाचें घर आहे, अर्थाचें पालन करणें हें केवल शत्रु पालना सारखें आहे. ज्ञानी पुरुष तृष्णेची समाप्ती नाहीं ह्मणून अर्थाचें संरक्षण न करितां सर्वदां संतोषानें काल घालवितात, तस्मात् या संसारामध्यें संतोषा सारखें दुसरें सुख नाहीं. तारुण्य, रूप, कोश, वृद्धी, ऐश्वर्य, इष्टमित्र, यांचा सहवास नाशवंत आहे, ह्मणोन त्या पदार्थावर फारशी इच्छा ठेऊनये. धर्मा करितां द्रव्याची इच्छा करणें त्या पेक्षां निरिच्छ असणें बरें. जसें चिखलांत पाय बुडवून नंतर प्रक्षालन करणें त्या पेक्षां पूर्वीच त्यास स्पर्शन करणें हें योग्य होय. हे धर्मराजा, धर्म करून जितकें ब्राह्मणाचें पोषण होईल तितकें कर. अर्थाची इच्छा फारशी धरूंनको. असें शौनकऋषीचें भाषण ऐकून धर्मराज बोलतो हे ऋषे, आपले उदरा करितां किंवा प्रपंचाकरितां द्रव्याची इच्छा करीत नाहीं, तुमच्या सारख्या ब्रह्मनिष्ठ ब्राह्मणाचें कोणत्याही प्रकारें पोषण करावें, यास्तव अर्थ संचय करावा अशी इच्छा उत्पन्न होते; आमच्या सारखे जे गृहस्ताश्रमी याणीं यती, ब्रह्मचारी, संन्याशी यांस अन्नदान न केलें तर कोणी करावें; पंचमहायज्ञें करून देवतेचा संतोष करावा. अन्नदानें करून यती, ब्रह्मचारी इत्यादिकांचा संतोष करावा. पितर, मनुष्य, यती, ब्रह्मचारी हें गृहाश्रमी पुरुषाच्या अन्नाचे विभागी आहेत, आपल्या घरीं कोणी योग्य मनुष्य आला असतां त्यास आसन द्यावें आणि उत्तम वाणीनें त्याच्याशीं भाषण करून जलप्राशनास द्यावें, हा धर्म सर्व वर्णांस शास्त्रांत सांगितला आहे. आर्त अथवा श्रांत यास राहण्यास जागा द्यावी. क्षुधितास भोजन द्यावें, ज्ञानी किंवा प्राज्ञ आले असतां अभिवादन करावें. अग्निहोत्री, स्वजातीय व बांधव यांचें यथा योग्य पूजन करावें. देवतेस अर्पण केल्या वांचून आपण अन्न भक्षण करूं नये, अग्निहोत्रा खेरीज पशूची हिंसा करूं नये, श्वान व चांडाल इत्यादिकांस वैश्वदेव झाल्यानंतर अन्न द्यावें; असें न करितां अन्न भक्षण केलें तर त्याणें पाप भक्षण केलें असा दोष लागतो. शास्त्रोक्त विधि पूर्वक अन्न भक्षण केलें तर त्या अन्नास अमृत अशी संज्ञा आहे. काया वाचा मनें करून पंचमहायज्ञ, देवतेचें व अतिथीचें पूजन केलें असतां त्याचें पुण्य अनंत आहे, या प्रमाणें गृहस्थाश्रमी याणीं वर्तावें न वर्तलें असतां त्याचे आश्रमास धिःकार असो.

असें ऐकून पुनः शौनक बोलता तं हे राजा, या जगतामध्यें धर्माचा विप-र्यास फार झाला आहे. जेणें करून साधूची निंदा होईल त्यास जन धर्म असें ह्मणतात, इंद्रियांस वश होऊन सर्व लोक आचरण करितात, मोह, राग, अभिमान इत्यादिकांस अनुसरून जें कर्म करावयाचें तें निष्फळ, हें न समजतां त्यांच्या स्वाधीन होतात. जसा मदिरा प्राशन करून सारथी रथारूढ झाला असतां रथाचे अश्व त्याचे स्वाधीन रहात नाहींत. तसें लोभादिकांचे स्वाधीन झालें असतां इंद्रियें स्वाधीन राहात नाहींत. दीप जसा प्रकाशानें सर्वांवर तेज पाडतो, तसें शरीरामध्यें मन, सर्व इंद्रियांत प्रवेश करून त्या त्या इंद्रिय संबंधीं कार्य उत्पन्न करतें. मग इच्छा विषयानें इच्छिल्या पदार्थांवर प्रवृत्ती उत्पन्न होऊन काम बाणानें मन वेधून नाश होतो. जसा पतंग, तेजाच्या लोभानें नाश पावतो तसें मन, लोभानें विद्ध झालें असतां आहार, विहार इत्यादिकानें अतिशय पीडित होऊन दुःख सागरांत निमग्न होतो आणि आपल्यास ओळखत नाहीं. या पापाच्या योगानें नाना प्रकारच्या योनीस जाऊन पुनःपुनः संसारचक्रांत देही भ्रमण पावतो, यास कारण मिळून अविद्या, कर्म व आशा हीं होत. ह्मणोन या तिघांच्या नाशाचा उपाय प्राण्यानीं योजावा. ही गती अज्ञान लोकांची तुला सांगितली. आतां ज्ञान्याची गति सांगतों. जे प्राणी मोक्ष धर्माच्या ठायीं रत आहेत त्यांचा मार्ग निराळा आहे. यास्तव हे धर्मराजा, अभिमान सोडून सद्धर्मानें कर्म कर ह्मणजे सर्व दुःखा पासून मुक्त होशील. पूजा, अध्ययन, दान, तप, सत्य, क्षमा, दम, अलोभ हीं धर्माचीं आठस्थानें आहेत. यांत पूर्वीचीं चार पितृमार्गपर व बाकी चार देवमार्गपर आहेत, या अष्टांगें करून धर्माचें संरक्षण करावें. संकल्प, इंद्रियनिग्रह, संध्यादिक व्रताचरण, गुरुसेवन, आहार, विहाराचे नियम, अध्ययन, कर्माचा त्याग व चित्त निरोध इत्यादि कर्में जे करितात ते संसारा पासून मुक्त होतात. राग, द्वेष इत्यादिकानें देवतेचें आराधन केलें असतां देवता प्रसाद करीत नाहींत. रुद्र, साध्य, आदित्य, वसु तसेच अश्विनी कुमार हे आपल्या ऐश्वर्याच्या तेजानें सर्व प्रजेचें पालन करितात तसें तूं राजा, शांतीचा आश्रय करून ब्राह्मणाच्या पोषणास तपानें सिद्धीची इच्छा कर. असा वि० या अध्या० आहे.

३ अध्याय तिसरा:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, शौनकऋषीचें वाक्य ऐकून युधिष्ठिर धौम्य नामक पुरोहितास बोलतो हे पुरोहिता, वेंद वेदांग पारग जे ब्राह्मण यांचे पोषणा विषयीं तर मी या कालीं समर्थ नाहीं, कारण नानाप्रकारच्या दुःखानें मी पीडित आहें, दान करण्यास मज पाशीं द्रव्य नाहीं, या ब्राह्मणाचा त्याग करावा तरीं ही योग्य नाहीं तेव्हां अतःपर काय काय करावें याचा उपाय मला सांग. असें ऐकून एकमुहूर्त पर्यंत धौम्य मनामध्यें ध्यान करून युधिष्ठिरास बोलतो हे राजा, या विषयीं तुला एक उपाय सांगतों. पूर्वीं ब्रह्मदेवानें सर्व भूतें निर्माण केल्यावर तीं क्षुधेनें अत्यंत पीडित झालीं, हें सूर्यनारायणानें पहातांच दयायुक्त होऊन त्यांच्या क्षुधेच्या नाशाची अशी योजना केली कीं, उत्तरायणामध्यें आपल्या रश्मींनीं सर्व पदार्थांचे रस ग्रहण करून दक्षणायना मध्यें किरण द्वारानीं प्रवेश केला. नंतर तें तेज, चंद्रानें आपल्या किरण द्वारें ग्रहण करून उदकानें पृथ्वीवर सिंचन केलें, त्या कालीं षड्रस औषधी उत्पन्न झाल्या. त्या औषधी भक्षण करून भूतांनीं आपलें उपजीवन केलें, तस्मात् पृथ्वीवर जें अन्न उत्पन्न आहे तें सूर्या पासूनच आहे, याजकरितां सर्व अन्नाचा दाता जो सूर्यनारायण याची आराधना कर ह्मणजे ब्राह्मण पोषणाची चिंता सर्व तुझी नष्ट होईल. कार्तवीर्य, नहुष, वैन्य यांणीं जशी सूर्याची आराधना करून सर्व प्रजेस विपत्ती पासून काढलें, तशी हे राजा, सूर्य नारायणाच्या आराधनेनें ब्राह्मणांची क्षुद् पीडा तूं निवारण कर. असें वैशंपायनाचें भाषण ऐकून जनमेजयराजा प्रश्न करितो हे वैशंपायन ऋषे, धौम्याचें वाक्य ऐकून कुरुश्रेष्ठ युधिष्ठिर राजानें ब्राह्मणांचे पोषणा करितां सूर्याचें आराधन कसें केलें तें मला सांग. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात. धौम्य ऋषीनीं माहात्मा जो धर्मराज यास सूर्याची अष्टशतनामें जीं कथन केलीं तीं मी तुला सांगतों, शुचिर्भूत व स्वस्थांतःकरण होऊन माझ्या भाषणा कडे लक्ष्य दे. सूर्य, अर्यमा, भग, त्वष्टा, पूषा, अर्क, सविता, रवि आदि करून सूर्याची अष्टशत नामावळी ब्रह्मदेवानें पूर्वीं मला सांगितलेली मी तुला सांगितली. हे राजा, या अष्टोत्तर शत नामावळीचें नित्यशः सूर्यउदय कालीं स्वस्थ अंतःकरणें करून जो पठण करील तो पुत्र, दारा, संपत्तीस पाऊन शोका पासून मुक्त होईल. यास्तव भक्ती व धृती पूर्वक प्रातःकालीं उठोन सूर्याची

आराधना करित जा ह्मणजे सर्व संकटापासून मुक्त होशील. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, असें धौम्याचें भाषण ऐकतांच युधिष्ठिर तत्काल जान्हवीमध्यें स्नान करून मोठ्या प्रीतीनें पूर्वेस मुख करून पुष्पें, उपहार, बली इत्यादि पदार्थांनीं सूर्यनारायणाची पूजा करून जितेंद्रिय होऊन स्तुती करूं लागलाकीं, हे भगवन्, तूंच सर्व प्राण्यांचा चक्षु आहेस, सर्वांचा उत्पादक तूं होस, सर्व योगी तुझें निरंतर ध्यान करतात, हें सर्व जगत् तूंच धारण केलेंस, सर्वांवर प्रकाश तूंच करतोस, महान् महान् विद्वान् ब्राह्मण आप आपल्या शाखें करून तुझें त्रिकाल ध्यान करतात. अशी नाना प्रकारें स्तुति करून ह्मणतो हंस, सविता, भानु, अंशुमाली आदिकरून नामांनीं जे तुझें भजन करितात आणि जो सप्तमी व षष्ठी या दिवशीं निरभिमान होऊन भक्तीनें पूजा करितो त्यास लक्ष्मी प्राप्त होते. या प्रकारें धर्मराजानें नाभिमात्र जान्हवी जलांत उभें राहून सूर्यनारायणाची आराधना केली असतां सूर्यनारायण आपलें साक्षात् देदीप्यमान शरीर धारण करून धर्मराजास बोलतो हे राजा, तुला जें पाहिजे तें मी देतों. असें बोलून ताम्रमय पात्र धर्मराजाच्या स्वाधीन करून असें सांगितलें कीं, बारा वर्षे पर्यंत या स्थालीतून चतुरविध अन्नें यथेच्छ उत्पन्न होतील, या अन्नानीं तुला ब्राह्मण भोजन जितकें कर्तव्य असेल तितकें यथेच्छ कर; परंतु प्रतिदिवशीं पांचाली भोजन करण्याचे पूर्वीं ही सर्व सिद्धान्नें स्थालीपासून उत्पन्न होतील. पांचाली भक्त झाल्यावर उत्पन्न व्हावयाचीं नाहींत. इतउत्तर चौदावे वर्षी तुला राज्याची प्राप्ती होईल. असें सूर्यनारायण सांगोन एकाएकीं अंतरधान पावल्यानंतर धर्मराजानें ती स्थाली घेऊन जलाबाहेर निघाला आणि धौम्यास नमस्कार करून आपल्या भ्रातांस आलिंगन देऊन ती स्थाली द्रौपदीच्या स्वाधीन केली. द्रौपदीनें स्वयंपाक गृहांत नेऊन ठेविली आणि या स्थालींतून चतुरविध पक्वान्नें सिद्ध करून युधिष्ठिर लक्षावधी ब्राह्मणांस उत्तम प्रकारें करून भोजन घालूं लागला. सर्व ब्राह्मण तृप्त झाल्यावर राजा आपण भोजन करी, राजाचें भोजन झाल्यावर शेवटीं पांचाली भोजन करी. याप्रकारें धौम्याच्या कृपेनें युधिष्ठिरास सूर्यापासून स्थाली प्राप्त होऊन असंख्यात ब्राह्मण भोजन होऊं लागलें. जें जें ब्राह्मणांस इच्छित तें तें युधिष्ठिर देऊं लाग

ला व नक्षत्र पर्व संबंधीं हजारों इष्टी करूं लागला. त्या योगें ब्राह्मण तृप्त होऊ-
न धर्मराजास नानाप्रकारचे आशीर्वाद देऊं लागले. नंतर कांहीं काळानें भ्राते, ब्राह्म-
ण व भार्या यांसह वर्तमान धर्मराज जान्हवीतीरापासून काम्यक वनीं गेला.
हा सूर्यनारायणाचा स्तव स्वस्थंत:करणें करून नित्यश: जो करील त्याची पुत्र
दारादि संपत्ती व विद्या यांची वृद्धी होईल. दोन्ही संधेच्या ठायीं स्त्रियांनीं अथ-
वा पुरुषांनीं हा स्तव पठण केला असतां आपत्ती पासून मुक्त होतील, बंधनस्थ
असल्यास या सूर्यस्तवें करून बंधन मुक्त होतील, आपत्ती कधींही प्राप्त होणा-
र नाहीं. ही सूर्याची आराधना पूर्वी ब्रह्मदेवानें इंद्रास, इंद्रानें नारदास, नारदा-
नें धौम्यास, धौम्यानें धर्मराजास सांगितली; ही उपासना सर्वप्राणिमात्रानीं
केली असतां युधिष्ठिरासारखे ते महान् संकटापासून मुक्त होतील. असा वि-
षय या अध्यायांत आहे.

४ अध्याय चवथा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया पांडवांनीं व-
नांत प्रवेश केल्यानंतर धृतराष्ट्र कांहींसा त्रस्त होऊन विदुरास बोलतो हे विदु-
रा, तूं भार्गवासारखा बुद्धिमान व सर्वधर्म जाणणारा आहेस. कौरव व पांडव
या उभयतांस ही मान्य आहेस, ह्मणोन तुला मी कांहीं प्रश्न करितों याचा विचा-
र करून उत्तर दे. पांडव तर वनांत गेले, आतां प्रजा आमच्या स्वाधीन झाल्या
त्या आमचें कोणत्या प्रकारें हित चिंतन करतील असा चांगला उपाय योजून
मला सांग. असा प्रश्न ऐकून विदुर बोलतो हे राजा, धर्मे करून स्वर्गप्राप्ती होते;
चांगल्या रीतीनें वागणाऱ्यास राज्य प्राप्त होतें, धर्मानें चालणाऱ्या राजांचा क-
धींही नाश होत नाहीं यास्तव जसें तूं आपल्या पुत्रांचें संरक्षण करितोस तसें-
च तूं पांडवांचें संरक्षण करावेंस, तें न करितां सभेमध्यें दुरात्मे जे तुझे पुत्र व सौ-
बलेय यांणीं कपट अक्षद्यूत उत्पन्न करून धर्मराजास त्या द्यूतामध्यें जिंकि-
लें, ह्मणून तुझ्या पुत्रांपासून मोठा अधर्म झाला. कपटें करून द्यूतामध्यें जिंक-
णें हें योग्य नव्हे या पातकाच्या उपशमाचें प्रायश्चित्त सांगतों तें केलें असतां तु-
झे पुत्र या पातकापासून मुक्त होतील, तुह्मीं कपटानें द्यूतामध्यें जें पांडवांचें स-
र्वस्व हरण केलें असेल तें सर्व त्यांस माघारें द्यावें ह्मणजे धर्मराजास फार संतो-
ष होईल. तो संतुष्ट झाला असतां त्याचे भ्राते व स्वकीय तेही संतुष्ट होतील.

यशाची हांनी होणार नाहीं, परद्रव्याचा अभिलाष केला असतां आपलाच हुत नाश होईल यास्तव पांडवांचें सर्वस्व हरण केलेलें त्यांस माघारें दे, तेणें करून धर्मानें संरक्षण होऊन तुला जो पश्चात्ताप झाला त्याची शांती होईल व शकुनीचा ही अवमान झाल्यानें धर्मराजास बहुत संतोष वाटेल. माझ्या वाक्या प्रमाणें न करशील तर सर्व कौरवांचा निश्चयें करून विनाश होईल, असें मला खचित् वाटतें. भीमसेन व अर्जुन क्रुद्ध झाले असतां युद्धामध्यें तुझ्या पुत्रांचा तत्काल नाश करितील, त्यांच्याशीं युद्ध करण्यास या मृत्युलोकीं तर कोणी नाहीं. हें पूर्वी मी तुला सांगितलें असून तूं माझें वाक्य ऐकिलें नाहींस. दुर्योधन ज्याकाळीं उत्पन्न झाला त्या कालींच यांच्या विनाशाचा निश्चय तुला सांगिला होता, तो समय याणें आपले हातानें सहजच आणिला. दुसरा उपाय सांगतों. सर्व कुलाचा नाशक दुर्योधन आहे यास्तव तूं त्याचा त्याग कर ह्मणजे सर्व कुल तुझें संरक्षित होईल. धर्मशास्त्रांत असें सांगितलें आहे कीं, एकाकरितां बहुतांचा नाश होत असल्यास एकाचा त्याग करावा. एक गृह दग्ध झाल्यानें सर्व ग्रामाचा नाश होईल तर एक गृह काढून टाकावें. एक पुत्राचा त्याग केल्यानें तुझें अहित होणार नाहीं, हितच होईल. सर्वांस तूं मान्य होऊन तुझी प्रशंसा करितील. अतःपर दुर्योधनाचा नियोग न करशील तर दुःख सागरांत निमग्न होऊन तुझा उद्धार करण्यास कोणी समर्थ होणार नाहीं. आणखीं तिसरा उपाय सांगतों श्रवण कर, दुर्योधनास निगृहित करून धर्मराजास अर्धराज्य अर्पण कर ह्मणजे तो पृथ्वीचें शासन व प्रजेचें पोषण उत्तम प्रकारें करून सर्व राजे वश करील. दुर्योधन व सूतपुत्र व शकुनी याणीं धर्मराजाच्या आज्ञेत असावें. दुःशासनानें द्रुपदाच्या सभेंत जाऊन द्रौपदीच्या व त्यांच्या अपराधाची क्षमा मागावी आणि बहुत प्रकारें धर्मराजाचें शांतवन करावें, या तीन गोष्टी घडल्या असतां हे राजा, तूं विपुल शांती पावशील, नाहीं तर तुझा समूल नाश होईल. तूं मला निस्पृह पणानें प्रश्न केलास म्हणोन मी निस्पृहानें त्याचें उत्तर दिलें, नाहींतर हें भाषण करण्याचें मला कारण नव्हतें. असें विदुराचें भाषण ऐकून धृतराष्ट्र भाषण करितो हे विदुरा पूर्वी सभेमध्यें व आतां जें बोललास तें सर्व पांडवांच्या हिताचें व आम-

च्या अहितानें आहे यास्तव मला अगदीं रुचत नाहीं. दुसऱ्याच्या पुत्राच्या हिता करितां आपल्या पुत्राचा कोण बरें त्याग करील. दुर्योधन माझ्या देहा पासून उत्पन्न झाला. तेव्हां जसा मी तसाच दुर्योधन, जसें आपल्या देहाचें संरक्षण करणें तसेंच पुत्राचें संरक्षण करणें आहे. असें असतां तूं पुत्राचा त्याग करावा ह्मणोन कसें कुटिल भाषण करितोस, तुझें वाक्य कोपाचा सूड श्रवण करून त्या प्रमाणें वर्तेल बरें? आज पर्यंत मी ह्मणत होतों कीं, विदुर मोठा निष्पक्षपाती आहे; परंतु तुजविषयीं आज खात्री झाली. तूं पांडवां विषयीं मोठा अभिमानी आहेस. जशी जारिणी स्त्री आपल्या पतीच्या वाक्याची अमर्यादा करिते तशी तूं माझ्या वाक्याची अमर्यादा करितोस; तुझा इच्छेस वाटेल तर येथें बैस नाहींतर गृहास जा. असें भाषण करून धृतराष्ट्र एकाएकीं उठोन अंतर गृहांत गेला. आतां हें कुल राहात नाहीं असें बोलून विदुर जिकडे पांडव होते तिकडे गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

५ अध्याय पांचवा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडव भागीरथीतीरा पासून निघून पुढें सरस्वती, दृषद्वती व यमुना इत्यादि तीर्थें सेवन करीत करीत व नानाप्रकारचीं वनें, उपवनें अवलोकन करीत करीत कांहीं दिवस पर्यंत सरस्वती तीरीं राहून पुढें काम्यक वनांत गेले.- नाना प्रकारच्या चित्रविचित्र मृगानीं व्यास व महान् महान् ऋषींच्या-आश्रमानीं सुशोभित जें काम्यक वन त्यामध्यें ब्राह्मणा सहवर्तमान वास करीत असतां त्यांचें दर्शन घ्यावें ह्मणोन विदुर आला. त्यास दुरून पाहून धर्मराज भीमसेनास बोलतो हे भीमसेना, महा भाक्त जो विदुर तो रथामध्यें बसून आपलेकडे येत आहे यास पाहून मला असें वाटतें कीं, शकुनीनें पुनः आह्मांस द्यूत खेळावयास आव्हान करावें आणि आमचीं आयुधें हरण करावीं याज करितां त्यास बोलाऊं पाठविलें असेल. हे भीमसेना, माझा तर असा नेम आहे कीं, द्यूत क्रीडेस कोणी बोलाविलें असतां नाहीं ह्मणावयाचें नाहीं, आतां पुनः जर गेलों तर प्रथम आपलें गांडीव धनुष्य हरण करतील, तें हरण केल्या नंतर आपला सर्वस्व

स नाश होईल. मग जयाची आशा कोठून. असें धर्मराज भीमसेनाशीं भाषण करीत आहे तों विदुर धर्मराजाच्या संन्निध येऊन पोहोंचला. नंतर धर्मराजानें विदुरानें उत्तम प्रकारें स्वागत करून येण्याचें कारण विचारलें असतां महा प्राज्ञ विदुर पूर्वोक्त झालेला वृत्तांत सांगून बोलतो हे राजा, तुह्मीं वनांत प्रवेश केल्यानंतर धृतराष्ट्रानें मला प्रश्न केला कीं, आमचें हित कोण त्या प्रकारें होईल, आमच्या राज्यांतील प्रजा आमची आज्ञा कशी मान्य करतील. त्या कालीं मी त्यांस तीन प्रकारचीं हितवाक्यें सांगितलीं त्यांत तुमचें व कौरवांचें कल्याण होतें; परंतु धृतराष्ट्रानें श्रवण न करितां तत्काल माझ्या वाक्याचें प्रत्याख्यान करून भाषण केलें कीं, सर्वदां तूं पांडवांचा हितवादी आहेस, जशी अग्निहोत्र्यास जारिणी स्त्री त्याच्या कर्मांची विघातुक होत्ये अथवा साठ वर्षांच्या पतीवर दाहा वर्षांच्या कन्येची अरुची असत्ये तशी माझ्या वाक्यावर धृतराष्ट्राची अरुची झाली. तेव्हां मी निश्चय केला कीं, कौरवांचा विनाशकाळ सन्निध आला आहे. जसे पद्मपत्रावर जलाचे विंदु ठरत नाहींत तसें धृतराष्ट्रास बहुत प्रकारें हितवाक्याचा बोध केला; परंतु रुचला नाहीं. नंतर धृतराष्ट्र परमक्रुद्ध होऊन मला ह्मणाला कीं, अतः पर राज्याच्या हित किंवा अहिता विषयीं तुला मी प्रश्न करणार नाहीं. तुझी इच्छा असेल तर येथें बैस अथवा गृहीं जा. असें त्यानें भाषण ऐकतांच तुझ्या दर्शनाच्या इच्छेनें येथें आलों, तुह्मीं शत्रू पासून सर्व क्लेश सहन करून वनामध्यें आलांत आणि कालावर दृष्ट ठेऊन यथान्याय कर्माचरणानें सत्काल क्षेप करून आहांत यास्तव लौकरच तुह्मीं या पृथ्वीचा निष्कंटक उपभोग कराल. अग्नीजसा लहान असतां काष्ठ, तृण इत्यादिकानें एका एकीं वृद्धी प्रत पावतो तसे तुह्मीं आपल्या सदाचरणानें सत्वरच वृद्धी पावाल. जे बंधु आपल्या द्रव्याचा विभाग न करितां एकमतानें चालतात. एकास दुःख झालें असतां सर्वांस दुःख झालें असें मानितात. त्यांचा नाश व्हावयाचा नाहीं त्यांचे जे साहाय्य असतील ते ही सुखदुःखाचे विभागी होतात. आपल्यास साहाय्य सुज्ञ असले ह्मणजे राज्य प्राप्ती होण्यास फार विघ्न होत नाहीं अशी नीती आहे; हे युधिष्ठिरा, तुह्मीं असे आहांत ह्मणोन तुमच्याशीं सहवास करावा अशी मनातून फार इच्छा आहे. सह भोजन, एकत्र आसन व तुमचा संवाद निरंतर घडावा ह्मणजे त्यां

न माझें बहुत कल्याण आहे, असें विदुराचें भाषण ऐकून धर्मराज बोलतो हे विदुरा, तुझ्या वाक्यानें मी फारच संतुष्ट झालों अतःपर तूं आह्मास जें सांगशील तें आह्मीं मान्य करूं. असा विषय या अध्यायांत आहे.

अध्याय सहा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, विदुर काम्यकवनीं पांडवांकडे गेल्यानंतर इकडे धृतराष्ट्र मनांत ह्मणतो कीं, विदुर नाना प्रकारें पांडवांस उपदेश करून माझ्या राज्यास अपाय करील, असें समजून अंतःपुरापासून सभेमध्यें आला आणि सर्व सभासद बसले असतां एकाएकीं मूर्च्छित होऊन कांहीं काळ अगदीं निश्चेतन पडला. पुनः सावध होऊन बोलतो हे संजया, माझा भ्राता विदुर साक्षात् धर्ममूर्ती याचें स्मरण होऊन माझें हृदय विदीर्ण झालें; यास्तव तो कोठें गेला असेल त्याचा शोध करून लौकर माझ्या भेटीस आण त्यासमी बहुत दुरवाक्यें बोललों त्याचा पश्चात्ताप आतां मला झाला. भ्रातृस्नेहामध्यें अशानें फार अंतर पडेल, त्याणें माझें आजपर्यंत कधींही अहित केलें नाहीं. जर त्यास न आणशील तर मी आपलें जीवित ठेवणार नाहीं. असें धृतराष्ट्रानें वाक्य ऐकून संजय बोलतो हे राजा, मी विदुरास लौकर घेऊन येतों, असें बोलून संजय तत्काल काम्यकवनीं गेला. आणि मृगचर्म धारण करून सर्व भ्रात्यांमध्यें इंद्रासारखा सुशोभित जो धर्मराजा विदुरासहित बसलेला पाहून त्याचे अग्रभागीं जाऊन उभा राहिला. त्या कालीं धर्मराजानें संजयास पाहून कुशलप्रश्नानें आगमनाचें कारण विचारिलें असतां संजय बोलतो हे राजा, विदुर इकडे आल्यापासून धृतराष्ट्रास परम चिंता उत्पन्न होऊन प्राण त्याग करण्याचा समय आला आहे यास्तव विदुरानें तिकडे जाऊन त्याची शांती करावी. असें संजयाचें भाषण ऐकून विदुर बोलतो; हे संजया, धर्मराजाची आज्ञा घेऊन मी लौकरच हस्तनापुरास येतों. नंतर विदुर तत्काल धर्मराजाची आज्ञा घेऊन धृतराष्ट्राकडे गेला तेव्हां विदुर आला हें ऐकतांच त्यास बोलतो हे विदुरा, तूं गेल्यापासून रात्रंदिवस माझ्या चित्तास समाधान नव्हतें. रात्रीं स्वप्नामध्यें राज्यनाशाविषयीं चित्रविचित्र वस्तु पाहिल्या तेव्हांपासून मला अतिशय चिंता उत्पन्न झाली. याचा उपाय सत्वर मला सांग. आणि माझ्या भाषणाची क्षमा कर. असें भाषण करू

न विदुराच्या शिरानें आघ्राण केलें. त्याकाळीं विदुर बोलतो हे राजा, तूं आ मचा गुरु आहेस. तुझें दर्शन घ्यावें याच बुद्धीनें लौकर काम्यकवनांतून येथें आलों, तुझ्या भाषणाचा शेषकिमपी मला नाहीं. जसे मला पांडव तसेच तुझे पुत्र आहेत, उभयतांवरही माझी प्रीति सारखीच आहे, पांडवांचा पक्षपात व तुझ्यापुत्रांशीं द्वेष मी कधींही करणार नाहीं; परंतु दीन निरपेक्ष जे पांडव यांजवर तुझी दृष्टी पूर्ण असावी हेंच मागणें आहे. असें भाषण करून धृतराष्ट्र व विदुर एकांतीं जाऊन आनंद पावले. असा विषय या अध्यायांत आहे

. . ७ अध्याय सातवा — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धृतराष्ट्र व विदुर यांचे भाषणानें दुर्योधन मनामध्यें खेद पाऊन शकुनी, कर्ण व दुःशासन यांस बोलतो कीं, विदुर काम्यकवनापासून धृतराष्ट्राच्या आज्ञेनें पुनः माघारा आला. आतां तो धृतराष्ट्रास पांडवां विषयीं नाना प्रकारचे हितोपदेश करून आपली मसलत बिघडून टाकील, आणि विदुर मोठा बुद्धिमान असून पांडवांचा पक्षपाती आहे, यास्तव येथून हा जाईल आणि धृतराष्ट्राची बुद्धी माघारी फिरेल अशी कांहीं मसलत योजाल तर माझें मन शांत होईल. नाहींतर पांडव पुनः माघारे आले असतां मी विषभक्षण करीन अथवा अग्नींत प्रवेश करीन; परंतु त्यांचें मुख पाहणार नाहीं. असें ऐकून शकुनी बोलतो हे राजा, पांडव हे सत्य प्रतिज्ञ आहेत, धृतराष्ट्राच्या आज्ञेनें आपणच प्रतिज्ञा करून वनवासास गेले, ते पुनः माघारे फिरतील कीं काय? कदाचित् प्रणास विरुद्ध करून माघारे आले तर पण भंग झाला. येविषयीं आह्मीं धृतराष्ट्रापाशीं साक्षी देऊन पुनः त्यांस वनामध्यें माघारे पाठवूं; आह्मीं ही पांडवांचीं छिद्रें अवलोकनाच्या उद्योगांत आहोंत तूं कांहीं चिंता करूं नको. असें शकुनीचें भाषण ऐकून दुःशासन बोलतो, वाः मामानीं फार चांगलें भाषण केलें. त्या प्रमाणें आह्मीं वर्तूं. असें ऐकून कर्ण बोलतो हे राजा, आह्मीं सर्व एकत्र होऊन पांडवांच्या नाशाविषयीं यत्न करूं. कदाचित् अज्ञानानें अथवा प्रमादानें पांडव हस्तनापुरास आले तर पुनः द्यूत खेळून त्यांस जिंकूं. असें ऐकून दुर्योधन संतुष्ट न होतां आपलें मुख कर्णाकडोन फिरवून कांहीं साक्रुद्ध झाला. हें कर्णानें पहातांच आपले भ्रुकुटि वनेत्र फिरवून दुःशासन, शकुनी व दु-

र्योधन यांस परम क्रोधानें बोलतो हे राजेहो, माझें मत ऐका. आह्मीं सर्व श-
त्रांचें प्रिय करूं व शस्त्रें घेऊन वनांत पांडवांस मारण्या करितां जाऊं, आणि ते
पांडव शांत झाल्यावर आपण सुख पावूं. असें कर्णाचें भाषण ऐकून दुःशास
न प्रभृति एका एकीं कर्णाची प्रशंसा करून बोलतात, कर्णानें फारचांगली म
सलत सांगितली ती आह्मांस मान्य आहे, त्या प्रमाणें करावें. असें भाषण-
करून ते आप आपले रथांत बसून पांडवांच्या नाशाच्या उद्देशानें काम्यक
वनीं निघणार हें दिव्य दृष्टीनें जाणोन व्यास एका एकीं धृतराष्ट्र गृहीं येऊन-
धृतराष्ट्राचा व दुर्योधनादिकांचा प्रतिषेध करून भाषण करूं लागले. असा
विषय या अध्यायांत आहे.

८ अध्याय आठवा:— व्यास बोलतात हे धृतराष्ट्रा, तुझें व तुझ्या पु
त्राचें हित करण्या करितां मी येथें आलों आहें. पांडवांचा छल करून त्यांस
वनांत पाठविलें तेणें करून ते अत्यंत दीन व दुःखित झाले आहेत, परंतु-
तुह्मीं असें समजा कीं, त्रयोदश वर्षानंतर ते क्रुद्ध होऊन तुमचा समुल नाश
करितील. यास्तव तुझा पुत्र दुरात्मा दुर्योधन राज्य लोभा करितां वना मध्यें
जाऊन अद्याप पांडवांस दुःख देण्याची इच्छा करितो याचें लौकर निवारण-
कर, नाहींतर पुढें जो नाश व्हावयाचा तो आतांच होऊन आपल्या जीविता-
स मात्र मुकेल. जसे विदुर, भीष्म, कृपाचार्य हे श्रेष्ठ आहेत तसाच तूंही श्रे-
ष्ठ व माझा परम सखा आहेस ह्मणोन तुजविषयीं मला फार वाईट वाटतें. त
शांतून स्वजनाशीं विरोध करणें हें अपकीर्तीचें व अधर्माचें कारण होय. हे
राजा, तुझ्या पुत्रानीं केवढा अधर्म केला. याचा तर तूं कांहींच विचार करीत
नाहींस; बरें आतां तरीं सावध होऊन आपल्या पुत्रास माघारें फिरीव. पांड
वांचा परम स्नेह केला असतां ते तुमच्या नाशा विषयीं कधींही प्रवृत्त होणार
नाहींत. असें केल्यानें राजा, तूं कृतकृत्य होशील. पुढें जो नाश व्हावयाचा त्या
च्या निवृत्तीचा उपाय सूज्ञ मनुष्यानीं पूर्वींच करावा विनाश काल समिप आ
ला असतां त्याच्या विनाशाची योजना तत्काल होत नाहीं याजकरितां हे धृ
तराष्ट्रा, मी सांगितल्या प्रमाणें आपल्या पुत्रांस माघारें फिरव, नाहीं तर पु
ढें महान् अनर्थ उत्पन्न होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

९ अध्याय नऊ. — धृतराष्ट्र बोलतो हे ऋषिवर्य, कपटें करून पांडवांस द्यूतामध्यें जिंकिलें ह्मणोन तुह्मीं ह्मणतां; परंतु कपट द्यूत खेळावें हें माझे मनांत नसून भीष्म, द्रोण, कृपाचार्य, विदुर, गांधारी यांचे ही मनांत नवतें; परंतु दुर्योधन त्या कर्मास प्रवृत्त झाला तेव्हां मला असें वाटतें कीं, हें सर्व कृत्य कांहीं एक दैवाच्या योगानें झालें. कर्ता करविता कोणी नाहीं. कदाचित् दुर्योधनानें करविलें असल्यास पुत्रस्नेहास्तव त्याचा त्याग करवत नाहीं. हें तुह्मीं जाणतच आहां. भूत, भविष्य, वर्तमान या तिन्ही कालांचें ज्ञान तुह्मांस पूर्ण आहे, मी सांगावें असें नाहीं. असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून व्यास बोलतात हे धृतराष्ट्रा, पुत्रापेक्षां दुसरा स्नेह त्रैलोक्यांत कोणाचा नाहीं हें मला समजतें. द्रव्य, वस्त्र, गृह, इत्यादि संपत्ती पुत्रलोभापेक्षां जास्ती नाहींत या विषयीं तुला पूर्वींचा एक इतिहास सांगतों. कोणे एके काळीं सर्व गाईंची माता सुरभी आकाशामध्यें रोदन करीत करीत इंद्रास शरण गेली. त्याकाळीं इंद्र सुरभीस बोलूं लागला कीं, हे धेनू, तूं रोदन कां करित्येस, तुझें क्षेम आहे ना. मनुष्य, नाग, यक्ष, राक्षस यांपासून तुला कांहीं भय आहे कीं काय? असें इंद्रवाक्य ऐकून सुरभी बोलत्ये हे इंद्रा, मला कोणी दुःख दिलें नाहीं, मी आपल्या पुत्रां करितां रोदन करित्यें. कोणी एक शेतकऱ्यानें नागरास दोन बैल लाविले आहेत त्यामध्यें एक शरीरानें पुष्ट व दुसरा कृश आहे; त्या त्यानें नागर ओढवत नाहीं ह्मणोन शेतकरी त्यास वारंवार मारितो, हें पाहून माझे मनास फारच दुःख होतें. एक वृषभ पुष्ट आहे तो नागराची धुरी पुढें ओढितो. दुसरा कृश झालेला त्याच्यानें ओढवत नाहीं या विषयीं त्याचा काय उपाय बरें! हें शेतकरी नजाणतां पुनःपुनः त्यास मारितो, हें पाहून मी परमदुःखानें तुजकडे आल्यें या दुःखाचें निवारण तुझा खेरीज व्हावयाचें नाहीं. असें सुरभीचें भाषण ऐकून इंद्र बोलतो हे सुरभी, तुला ही पुत्र हजारों आहेत; परंतु याच पुत्रावर तुझी इतकी विशेष प्रीती कां? असें ऐकून सुरभी बोलत्ये हे इंद्रा, मला पुत्र बहुत आहेत खरे; परंतु हा दुर्बल याच्यानें भार सहन होत नाहीं ह्मणोन या विषयीं इतकी दया उत्पन्न झाली. असें तिचें भाषण ऐकून इंद्रानें त्या शेतकऱ्याच्या शेतावर विपुल वृष्टी करून बहुत धान्य

उत्पन्न केलें त्या कालीं सुरभी पुनः बोलत्ये हे इंद्रा, जशी माझी कृपा दुर्बल दीन पुत्रावर आहे तशीच तुझी ही दीनावर निरंतर कृपा असावी. व्यास भाषण करितात हे धृतराष्ट्रा, मला पांडु, विदुर व तूं हे तिघे सारखेच आहांत; परंतु वनवासानें पांडव फारच दीन झाले आहेत ह्मणोन माझी कृपा त्यांजवर बहुत आहे; अतःपर तुझे पुत्र पांडवांशीं विरोध न करितील असा उपाय लौकर योजावा नाहींतर तुझे पुत्र प्राणास मुकतील. अ. वि. या अ. आहे.

१० अध्याय दहा — धृतराष्ट्र बोलतो हे ऋषिवर्य, तुह्मीं आमच्या हितानें भाषण केलेलें मी व या सर्व राजानीं जाणलें. विदुर, भीष्म, द्रोण व तुह्मीं आमच्या हिताचें भाषण करतां व आमचा अभ्युदय असावा ह्मणोन तुमची इच्छा बहुत आहे, आमच्यावर पूर्ण दया करावयाची अशी जर तुमची इच्छा आहे तर त्या दुरात्म्या दुर्योधनास कोणच्याही प्रकारें हितोपदेश करावा. असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून व्यास बोलतात हे धृतराष्ट्रा, पांचपांडवांस भेटून तुम्हास भेटण्या करितां मैत्रेय ऋषी येणार आहेत ते दुर्योधनास उपदेश करतील. जर मैत्रेयाच्या वचना प्रमाणें दुर्योधन न वर्तेल तर तुझ्या पुत्रांस तत्कालते शाप देतील. असें भाषण करून वेदव्यास तत्काल अदृश्य झाले. तों इतक्यांत मैत्रेयऋषी धृतराष्ट्रासन्निध येऊन पोंहोंचले असतां धृतराष्ट्रानें अर्घ्यपाद्य इत्यादिकें पूजा करून उत्तमासनावर बसविलें, नंतर पांडवांकडील कुशलतेचें वर्तमान विचारून आगमनाचें कारण विचारिलें त्या कालीं मैत्रेय भाषण करतात हे राजा, तीर्थयात्रा करीत करीत धर्मराजाचें दर्शन घ्यावें ह्मणोन काम्यकवनीं गेलों आणि तेथें सर्व ऋषींमध्यें जटा व कृष्णाजिन धारण करून धर्म, राजयोग समाधीमध्यें निमग्न झालेला पाहून मी ही त्याचे अग्रभागीं जाऊन बसलों. नंतर ग्राम व राज्य भ्रंशासंबंधीं गोष्टी निघाल्या त्यामध्यें तुझ्या पुत्रानीं पांडवांस कपट द्यूतामध्यें पराजित केलें आणि त्रयोदश वर्षें पर्यंत त्यांस बाहेर लाविलें; असें मी ऐकतांच तुजला उपदेश करावा या बुद्धीनें येथें आलों, आतां श्रवण कर. भीष्म जिवंत आहेत तों पर्यंत तुह्मांस हें करणें योग्य नाहीं. तशांत हे धृतराष्ट्रा, तूं ज्ञानी व सहृत असतां आपले पुत्रास कसें आ

वर्तीत नाहींस; दुर्योधनास निग्रहित करण्याची योग्यता तुला असतां ह्या अ-
र्थे कसा करूं दिलास अरण्यांत तस्कर जसे वाटसरांस लुटतात तसे तुम्हीं
सभेमध्यें पांडवांचें सर्वस्व हरण करून त्यांस वनवासास पाठविलें हें तुला
योग्य कीं काय? अशा तुझ्या कर्मानें महान् महान् ऋषिवर्य तुझा समागम
करण्यास इच्छित नाहींत. असें धृतराष्ट्रास बोलून दुर्योधनाकडे आपलें मु-
ख फिरवून मृदुवाणीनें बोलतात हे दुर्योधना, तूं बलें करून श्रेष्ठ आहेस, त-
साच सूज्ञ व ज्ञानी आहेस म्हणोन मी तुला उपदेश करण्यास प्रवृत्त झालों.
अरे, पांडवांचा द्रोह कशाकरितां करतोस? पांडु व धृतराष्ट्र यांचें सख्य पू-
र्वी किती होतें त्याचा आज नाश करून व्याघ्रासारखे शूर योद्धे गजासार-
खे बलाढ्य, वज्रासारखे शरीरी, सत्यव्रत धारण करणारे पुरुष,मानी-
जे पांडव यांस बहुत दुःख देऊन वनांत पाठविलेंस, हेडिंब, बक, किर्मी-
र इत्यादि राक्षसांचा वध करून जो भीमसेन विजयी झाला तोच कोपि-
ष्ट झाला असतां युद्धामध्यें तुझा शरीराचीं शकलें करून टाकील. असे
जे शुद्ध पराक्रमी पांडव यांसह वर्तमान तुझें सख्य असावें. हे दुर्योधना,
कोणच्या ही प्रकारें तुझा नाश नव्हावा म्हणोन मी पुनःपुनः तुला उपदेश
करतों क्रोधाच्या स्वाधीन होऊन व्यर्थ आपला नाश करवूं नकोस माझे वच-
नाचा अंगिकार केला असतां तुझें बहुत हित होईल. असें मैत्रेयाचें भाष-
ण ऐकून दुर्योधनानें किंचित् हास्य करून आपली मांडी थोपटली आ-
णि पायानें पृथ्वीवर रेघा काढून मैत्रेय ऋषी कडून आपलें मुख फिरविलें.
हें मैत्रेयानें पाहून तो क्रुद्ध झाला आणि दुर्योधनाचे सन्मुख होऊन बोलतो.
हे दुरात्म्या,अभिमानानें माझा वाक्याची अमर्यादा केलीस या कारणावरू-
न तुला मी शाप देतों कीं, तूं पांडवांशीं अतिशय द्रोह केलास या मुळें भीम-
सेन युद्धामध्यें तुझा मांडीवर गदेचा प्रहार करील तेणें करून तूं मरण पा-
वशील. असें मैत्रेयाचें भाषण धृतराष्ट्रानें ऐकतांच तत्काल मैत्रेय ऋषी-
स शरण जाऊन त्यास प्रसन्न केलें, त्या कालीं मैत्रेय बोलतो हे राजा, तुझे
पुत्र पांडवांस शरण जाऊन सख्य जर करितील तर माझा शापाची बा-
धा त्यास होणार नाहीं. नाहींतर माझें वाक्य सत्य होईल. असें मैत्रेय ऋ-

षीचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे ऋषिवर्य, भीमसेनानें किर्मीर- नामक राक्षसाचा कसा वध केला व त्याचें कारण काय तें मला सांग. असा प्रश्न ऐकून मैत्रेय बोलतात हे राजा, तुझा पुत्र ऐकत नाहीं ह्मणून किर्मीर आख्यान मी तुला सांगत नाहीं, मी गेल्यावर विदुर तुला सांगेल. असें बोलून मैत्रेय गेले. दुर्योधनही मैत्रेय ऋषीचें वाक्य ऐकून अतिशय दुःखानें सभेंतून गेला. असा वि॰ या अध्या॰ आहे.

११ अध्याय अकरा- धृतराष्ट्र बोलतो हे विदुरा, भीमसेनानें किर्मीर नामक राक्षसाचा कसा वध केला व त्याचा समागम कोठें झाला हें सर्व मला सांग. असें त्याचें वाक्य ऐकून विदुर बोलतो हे राजा, भीमसेनाचें अमानुषकर्म ब्राह्मण मुखापासून पूर्वी मी श्रवण केलेलें तुला सांगतों. पांडव द्यूतामध्यें पराजित झालेले हस्तनापुरांतून काम्यकवनीं जात असतां मार्गामध्यें मध्य रात्रीं अकस्मात् एक राक्षस नेत्र आरक्त व ओष्ठ चावून उर्ध्व केश, भक्राळ विक्राळ दाढा नियुक्त आपले बाहू प्रसृत करून मार्गांत उभा होता, त्या राक्षसाच्या भयानें तें अरण्य अगदींच शून्य पडलें होतें व नाना प्रकारच्या भयंकर शब्दानीं हजारों पक्षी त्रस्त होऊन व गजमृग इत्यादि श्वापदें भयाभीत होऊन पळालीं. त्या राक्षसास पाहून पांडव कांहींसे भयाभीत झाले, द्रौपदी त्याच्या भयानें आपले नेत्र मिटून पांचांमध्यें उभी राहिली. राक्षस ही वारंवार आपली माया उत्पन्न करून नाना प्रकारचे भयंकर शब्द करीत ओरडूं लागला असतां धौम्यानें राक्षोघ्न मंत्रानें त्याची माया नष्ट केली. त्यामुळें राक्षस क्रोधानें काम मूर्ती धरून यमासारखा इकडे तिकडे पाहूं लागला. इतक्यांत युधिष्ठिर त्यास बोलतो हे राक्षसा, तूं कोण कोठून कशाकरितां आलास, इतक्या रात्रीस येथें येण्याचें कारण काय; असें ऐकून राक्षस बोलतो मी बकासुराचा बंधु काम्यकवनामध्यें राहून मनुष्यांस भक्षितों हें माझें नित्यशः भोजन आहे, तुह्मी माझाजवळ अकस्मात् आलांत तर आतां तुह्मांस जिंकून यथेच्छ भक्षण करतों. असें राक्षसानें वाक्य ऐकून युधिष्ठिर बोलतो आह्मी कोण हें तूं जाणत नसल्यास श्रवण कर. मला पांडूचा पुत्र धर्मराज असें ह्मणतात भीम, अर्जुन, नकुल, सहदेव हे माझे भ्राते आहेत, आह्मीं राज्यापासून भ्रष्ट होऊन या वनीं आलों. असें ऐकून किर्मि

र बोलतो दैवयोगानें तुह्मीं येथें आलांत हें फार चांगलें झालें तुमचा मी आजप र्यंत शोध करीत होतों;परंतु आज माझा मनोदय दैवें करून सिद्ध झाला. भीम सेनास मारावें या बुद्धीनें पृथ्वीवर मी त्याचा शोध करीत करीत निर्भय पणें संचा र करितों. पूर्वी बकनामक माझा बंधु एकचक्री नगरांत ब्राह्मणाच्या रूपानें भीम सेनानें मारला. तसाच माझा मित्र जो हेडिंब यास मारून त्याची स्वसा हरण के- ली असा जो दुष्ट भीमसेन त्याच्या रुधिरानें बकासुरानें तर्पण केलें ह्मणजे भ्रा ता व सखा यांचें ऋणांतून मुक्त होईन. अगस्त्य ऋषीनीं वातापी नामक राक्ष सास भक्षण करून जिरविला तसा तुह्मी पहात असतां भीमसेनास मी भक्षण करितों. असें ऐकून युधिष्ठिर क्रोधानें राक्षसाची निर्भर्त्सना करूं लागला इत क्यांत भीमसेन दाहा वांव उंच वृक्ष उपटून त्यास निष्पत्र करून सिद्ध झाला, अर्जुन ही गांडीव धनुष्य घेऊन सिद्ध झाला त्यानें भीमानें निवारण करून तो राक्ष साच्या अंगावर वृक्ष घेऊन चालला आणि क्रुद्ध होऊन ओंष्ठानें ओष्ठ चावून व कंबर बांधून एकाएकीं यमासारखा त्यानें किर्मिराच्या मस्तकावर वृक्षाचा प्रहार- केला. तेणे करून राक्षस कांहीं काल पर्यंत निचेतन पडला नंतर सावध होऊ न राक्षसी मायेनें भीमसेनावर ज्वलितकाष्ठांची वृष्टी करूं लागला. भीमसेन पुनः पुनः राक्षसाचे अंगावर व राक्षस ही भीमसेनाच्या अंगावर वृक्ष प्रहार करी. असें नाना प्रकारें युद्ध बहुत काल पर्यंत झालें. शेवटीं भीमसेनानें- किर्मिराच्या कटि प्रदेशीं धरून तीन वेळ भ्रमण करून नंतर हे किर्मिरा, हेडिंब व बक तुझे दोन बंधु पूर्वी मी मारले त्यांच्या दुःखानें तुझा नेत्रास अ श्रु नयावे ह्मणोन त्यांच्या भेटीस तुला यमसदनास पाठवितों, असें भाष- ण करून एका एकीं त्यास पाडून त्याचा प्राण घेतला. हें भीमसेनानें क्रूर क र्म पाहून पांडव, सर्व ब्राह्मण व इतर जन भीमसेनाची फारच प्रशंसा करूं लागले. द्रौपदीनें ही हर्षानें आलिंगन दिलें. विदुर बोलतो हे धृतराष्ट्र राजा, या प्रकारें भीमसेनानें किरमीर राक्षसाचा वध करून काम्यकवन निर्भय केलें नंतर कांहीं दिवस ब्राह्मणा सह वर्तमान धर्मराज निर्भयानें तेथें राहि ले. ज्या काळीं धर्मराजास भेटण्या करितां काम्यकवनीं मी गेलों तेव्हां मार्गा म ध्यें राक्षसाचें कलेवर पाहिलें त्याचा वृत्तांत ब्राह्मणानीं मला सांगितला आ-

णि भीमसेनाची स्तुति केली. असें धृतराष्ट्रानें ऐकून कांहीं काल पर्यंत आर्त होऊन नंतर मुहूर्त मात्र ध्यानस्त बसून तो दीर्घ श्वासोच्छ्वास टाकूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२ अध्याय बारा:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडव वनांत गेले हें ऐकून भोज, वृष्णी, अंधक, पांचाल, धृष्टकेतु, कैकय इत्यादि पांडवांस भेटण्या करितां कृष्णास अग्रभागीं करून धृतराष्ट्रपुत्रांची निंदा करीत करीत धर्मराजास अभिवादन करून त्याच्या सन्निध बसले, त्याकालीं वासुदेव धर्मराजास बोलला कीं, हे राजा, दुर्योधन, कर्ण, दुःशासन व शकुनी यांस जे साहाय्य असतील त्यां सह युद्धामध्यें जिंकून लौकरच तुला संपूर्ण पृथ्वीचा राज्याभिषेक करूं, वैर्यांचें रक्त भूमी लौकरच प्राशन करील, यांत कांहीं संशय नाहीं. धर्मा पासून साधूचें रक्षण होतें हा अनादिसिद्ध धर्मच होय याप्रकारें केशवानें भाषण केलें असतां त्याच्या क्रोधाची शांती व्हावी म्हणोन अर्जुन श्रीकृष्णानें जन्मांतर कथन करूं लागला. हे श्रीकृष्णा, तूं अनादि अप्रमेय आहेस, तुझ्या तेजाची व पराक्रमाची गणना करतां येत नाहीं, साक्षात् प्रजापती जो ब्रह्मदेव याचा ही तूं उत्पादक आहेस सर्व जगाचा तूं नाथ आहेस पूर्वीं तूं दहा हजार वर्षें गंधमादन पर्वतावर तप केलेंस. अशीं नानातीर्थीं नाना प्रकारें तूं तपें केलीस. हें तुझें वृत्त व्यासानें मला सांगितलें. हे कृष्णा, सर्व भूतांचा आदिअंत तूं आहेस, यज्ञ व क्षेत्रज्ञ इत्यादि नावें ऋषींनीं तुझीं वर्णिलीं आहेत. नरकासुरानें हनन करून मणिमय कुंडलें हरण केलीस. अदितीच्या उदरा पासून जन्म घेऊन इंद्राचा कनिष्ठ बंधु जिष्णु असें नाम पावलास. वामन अवतारीं शिशूनें रूप धारण करून तीन पदानीं स्वर्ग, मृत्यु, पाताल हे तीन लोक तूं व्याप्त केलेस, आदित्य मंडळावर राहून स्वर्ग व आकाश याजवर स्वतेजें करून प्रकाश करतोस, शिशुपाल, जरासंध, शैब्य इत्यादिकांस मारून लोकांची पीडा निवारण केलीस, आपले विवाह कालीं रुक्मिणीचें हरण करून रुक्म प्रभृती जे तिचे बंधु यांचें हनन केलेंस. वीरामध्यें कार्तवीर्या सारखा पराक्रमी जो भोज, गोपती, तालकेतू इत्यादिकांस मारून द्वारका आपले स्वाधीन करून घेतलीस. युगाच्या आरंभीं ब्रह्मदेव तुझ्यापा

नाभिकमळा पासून उत्पन्न होऊन त्याणें हें चराचर जगत उत्पन्न केलें. तुझ्या च उलाटा पासून शूळपाणी उत्पन्न झाला; सर्व देव, दानव तुझ्या आज्ञेनें स्वर्ग, मृत्य, पाताळ यां मध्यें रहतात. बाल्यावस्थेमध्यें बळरामासहवर्तमान नाना प्रकारच्या क्रीडा केल्यास आदिकरून हा सर्व तुझा वृत्तांत नारदानें मला सांगितला. या प्रकारें अर्जुन भाषण करून स्वस्थ बसल्यानंतर श्रीकृष्ण बोलतात हे अर्जुना, जो मी तोच तूं, जे तुझे संबंधी तेच माझे संबंधी, तुझाशीं जे द्वेष करितात त्यांणीं माझाशींच द्वेषसंपादन केला असें समज, जे तुझें प्रियतें च माझें प्रिय. तुला नर अशी संज्ञा आणि मला नारायण अशी संज्ञा आहे. लोकउद्धारा करितां तूं व मी नरनारायण या संज्ञेनें या पृथ्वीवर आलों आहों त. हे अर्जुना, माझ्या वांचून तुला दुसरा कोणी नाहीं, तुझा वांचून मला दुसरा कोणी नाहीं. जे दोघां मध्यें भेद मानितील ते नरकामध्यें जातील. असें कृष्णाचें भाषण ऐकून द्रौपदी अतिशय क्रोधानें धृष्टद्युम्न प्रभृती भ्रातेजिचें निवारण करीत असतांही श्रीकृष्णास कठोर वाक्यांनीं बोलूं लागली. हे कृष्णा, सर्व जगताचा तूं स्रष्टा आहेस ह्मणोन तुला प्रजापती असें असित देवल ऋषि ह्मणतात; सर्व जगताचा तूं व्यापक आहेस ह्मणोन तुला विष्णु असें ह्मणतात. अशी नाना प्रकाराची स्तुती करून ह्मणाल्ये सर्व जगताचा आधारभूत देवा तूं आहेस ह्मणोन मी आपलें दुःख तुला सांगत्यें हे कृष्णा, पार्थांची भार्या तुझी सखी व धृष्टद्युम्नाची भगिनी असतां मला त्या दुष्ट कौरवांनीं बलात्कारानें सभेंत नेली; मी रजस्वला एकवस्त्रा असल्यामुळें जाण्यास अयोग्य असतांही बलात्कारानें तेथें मला नेऊन दुष्टांनीं माझी उपहास्यता केली आणि दासी भावें करून माझा उपभोग करण्याची इच्छा करूं लागले. हे मधुसूदना, सर्व पांडव, पांचाल, वृष्णी हे जिवंत असतां मी असें दुःख भोगावें काय? तशांतून भीष्म व धृतराष्ट्र यांची मी स्नुषा असतां मी दासी असें समजोन मजवर बलात्कार केला. हे कृष्णा, पांडव युद्धामध्यें पराक्रमी ह्मणवितात त्यांच्या समक्ष माझी विटंबणा कौरव करीत असतां त्यांचें निवारण करण्यास कोणी प्रवृत्त झाले नाहींत तस्मात् यांचे पौरुषास धिःकार असो. माझी वेणी आकर्षण करून दुष्टांनीं एकाए

कीं सभेंत नेली हें पाहून पार्थ उगीच राहिले. हा केवढा अधर्म, साधूनीं असा सन्मार्ग सांगितला आहे कीं, भर्ता अल्पबली जरी असला तथापि त्याणें कोणत्याही प्रकारें भार्येचें संरक्षण करावें. भार्या संरक्षित झाली असतां प्रजासंरक्षण केलें असें होतें, प्रजासंरक्षण केलें म्हणजे पुरुषानें आपला आत्माच संरक्षण केला असें होतें. स्त्रियांचे ठायीं पुरुष आपणच उत्पन्न होतो ह्मणोन स्त्रीचें नाव जाया असें शास्त्रकर्त्यानें ठेविलें आहे, भार्येनेंही उत्तम प्रकारें भर्त्याचें संरक्षण करावें हाही शाश्वत धर्मच आहे; परंतु पहा हे पांडव मला इतकें दुःख प्राप्त झालें असतांही निवारण्या करण्यास समर्थ झाले नाहींत हें मोठें आश्चर्य वाटतें. तशांतून मी अपुत्रा आहें असें नाहीं मला पांचां पासून ही पुत्र झाले असून ते तुझा पुत्रां सारखे महारथी धनुर्विद्येंत श्रेष्ठ व शत्रूनीं अजिंक्य आहेत त्या पुत्रांची मी जननी असतां पतीनीं या कालीं माझी उपेक्षा केली. कौरवानीं अधर्में करून सर्व राज्य हरण करून दासा सारखे दीन केले असतां ही त्याचीही उपेक्षा यांणी कशी केली? तुझा सारखा पराक्रमी त्रैलोक्यांत कोणी नाहीं. असें असतां पापी, दुरात्मा, दुष्टबुद्धी दुर्योधन माझा अपराध करून वांचला हें तुह्मी पाहातां तस्मात् तुला धिःकार असो. हे देवा, निष्कपटी जे पांडव याणीं वनवास करावा हें योग्य कीं काय? पूर्वीं बाल्यावस्थें मध्यें भीमसेनास कालाकूट नामक विष अन्नात मिश्र करून कौरवानीं कपटानें भक्षणास दिलें असतां तेंही बलें करून भीमसेनानें जीर्ण करून टाकिलें. प्रमाणकोटी नामक वृक्षाच्या अधोभागीं भीमसेन निजला असतां त्यास बंधन करून गंगेंत टाकावा असा कौरवानीं विचार केला. हें धर्मराजास समजतांच तत्काल त्याणें भीमसेनाची बंधनें सोडविलीं तसेंच भीमाच्या अंगावर महान् भयंकर सर्प कौरवानीं बांधिले होते तेंही धर्मराजास समजल्यावर त्याणें सोडवून भीमसेनास मुक्त केला. वारणावत नामक नगरामध्यें संपूर्ण पांडव आपले माते सहवर्तमान निद्रिस्थ असतां कौरवानीं त्या गृहास एका एकीं आग लाऊन दिली. नंतर अग्नी प्रज्वलित झाला हें कुंतीनें पाहून एका एकीं आक्रोश करून अग्नीची स्तुती केली.

हे देवा, दुष्टानीं मला मोठ्या व्यसनामध्यें गुंतविली या बालकां सह वर्तमा-
न आजमी यमलोकास जावें अशी तुझी इच्छा आहे कीं काय; असें कुंतीचें
भाषण ऐकतांच भीमसेन उठोन मातेस बोलला तूं इतकी दुःख सागरां-
त कां निमग्न झालीस, भिऊं नकोस मजसारिखा पुत्र असतां तूं कशा करि
तां भित्येस; असें भाषण करून नंतर मातेस सव्य अंकावर व धर्मराजास
वाम अंकावर बसवून नकुल सहदेवास बाजूस व अर्जुनास पृष्टभागीं बस
वून एका एकीं गरुडासारखे अग्नि गृहांतून उड्डाण करून हेडिंब नामक राक्ष
साच्या वनांत प्रवेश केल्यावर समग्र पांडवांनी दुःखानें श्रांत होऊन मातेसह
वर्तमान वनामध्यें रात्रौ शयन केलें. कांहीं कालानें हेडिंबी नामक राक्षसी-
पांडव निद्रिस्त असतां त्यांचे जवळ जाऊन कामानें संतप्त झालेली भीमसे
नाच्या पाद प्रदेशीं बसून त्याचा पाय आपले उत्संगावर ठेऊन मृदु हस्तानें
मर्दन करूं लागली. त्यायोगें भीमसेन जागृत होऊन स्त्रीस बोलतो हे स्त्रि
ये तूं कोण? येथें कशा करितां आलीस; तेव्हां ती राक्षशी बोलल्ये तुह्मीं येथू
न सत्वर पलायन करा, माझा बंधु हेडिंब नामक राक्षस येथें आला तर तुह्मां
स तत्काल भक्षण करील. असें राक्षसीचें भाषण ऐकून भीमसेन अभिमा-
नानें बोलतो हे स्त्रिये, आह्मां विषयीं तूं कांहीं चिंता करूं नको, तुझा भ्राता येथें
आला तर एक क्षणांत मारून टाकीन. असें उभयतांचें भाषण होत आहे तों
महान् भयंकर शरीर धारण करून हेडिंब राक्षस आपल्या भगिनी जवळ-
येऊन तिला बोलूं लागला. हे हेडिंबे, तूं कोणाशीं भाषण करीत होतीस;
असा दुष्ट प्राणी माझ्या वनांत कोण आला त्यास घेऊन माझा समोर ये. त-
त्काल त्यास मी भक्षण करितों. असें आपल्या बंधूचें भाषण ऐकून स्नेह-
भावानें हेडिंबी भीमसेनास त्या समोर घेऊन गेली नाहीं, हें हेडिंबानें जाणो
न आपणच मोठ्या वेगानें भयंकर शब्द करीत करीत भीमसेना जवळ येऊ
न एका हस्तानें त्याचा हात धरून दुसरे हातानें मुष्टी प्रहार केला. तेणें करून
भीमसेन अतिक्रुद्ध होऊन त्यानें हेडिंबास मुष्टी प्रहार केला. नंतर उभयतां
चें ही कांहीं काल पर्यंत वृत्र वासवा सारखें तुमुल युद्ध झालें. हेडिंबानें ना-
ना प्रकारच्या माया उत्पन्न करून भय दाखविलें; परंतु भीमसेनानें त्या रास

सी मायेचा नाश करून शेवटीं हेडिंबाचा प्राण घेतला. नंतर हेडिंबी नामक राक्षसीस आपली भार्या केली असतां तिजपासून घटोत्कच उत्पन्न झाला, पुढें समग्र पांडव तेथुन निघून माते सहवर्तमान एकचक्रानगरींत जाऊन ब्राह्मण वेषानें राहिले.तेथें बकनामक राक्षस हेडिंबा सारखा पराक्रमी होता,त्यासही भीमसेनानें मारला. नंतर भ्रात्यां सहवर्तमान द्रुपदाच्या नगरांत प्रवेश के ल्यावर द्रुपदराजाची प्रतिज्ञा अर्जुनानें सत्य करून मला वरिली. हे कृष्णा जशी तूं भीष्मक राजाची कन्या रुक्मिणी सर्व राजांचा पराभव करून वरिलीस तसी अर्जुनानें सर्व राजे युद्धांत पराजित करून मला वरल्यावर,तो मजसहवर्तमान माते जवळ माघारा आला.नंतर धौम्यासहवर्तमान त्या नगरांत पांडव बहुत दिवस राहिले. याप्रकारें पांडवांनीं बहुत पराक्रम केले असतां आतां दुःशासन प्रभृती कौरवानीं मला सभेंत नेऊन माझी विटंबणा केली हें पांडवानीं पाहून त्यांची उपेक्षा केली हें मोठें आश्चर्य आहे,दुष्टानीं माझे कच ग्रहण केले.हें प्रत्यक्ष पांच पती पहात असतां त्याणीं त्यांच्याशीं कांहींच भाषण केलें नाहीं. तेव्हां या मूर्खांसारखे जड पती दुसरे कोणाचे नसतील.मी द्रुपद राजाच्या उत्तम कुलांत प्रारब्धें करून उत्पन्न झालें. नंतर पांडुराजाच्या पुत्रानीं मलावरिली.उभयतांचीं कुलें तीन लोकांत विख्यात,असें असतां ही दशा मला प्राप्त व्हावी कीं काय? असें द्रौपदी कृष्णाजवळ भाषण करून उच्चस्वरें रोदन करूं लागली. नंतर आपले हस्तानें किंचित् मुख आच्छादित करून नेत्राच्या अश्रुधारा आपले स्तनावर सिंचन करीत स्वासोच्छ्वास टाकून गदगद् वाणीनें पुनः भाषण करिते हे कृष्णा, मला असें वाटतें कीं, आजच माझे पती,पुत्र,भ्राते नष्ट झाले,तसाच तूंही नष्ट झालास;या दुष्टानीं माझा इतका छल केला असतां तुह्मीं याचा कांहींच विचार करीत नाहीं. सभेमध्यें कर्णानें माझा बहुत उपहास केला तो माझे हृदयांत केवल शल्या सारखा सलतो,हे कृष्णा, तूं तर आमचा संबंधी सर्वां पेक्षां श्रेष्ठ पांडवांचें तुझें सख्य, सर्व जगताचा तूं शास्ता ह्मणोन मी आपलें दुःख तुला सांगितलें;अतःपर तुला जसें कर्तव्य असेल तसें कर.असें द्रौपदीचें कठोर भाषण श्रवण करून श्रीकृष्ण बोलतात हे द्रौपदी, तूं कांहीं चिंता करूं नको,जशी या कालीं तूं रुद-

न करत्येस नशाच या दुष्टांच्या स्त्रिया रोदन करतील, अर्जुनाच्या बाणें करून कर्ण, दुःशासन प्रभृति मरण पावून त्यांच्या स्त्रिया ज्याकालीं आक्रोश करिती ल त्या कालीं तुझ्या दुःखाची पारणा होईल. जें पांडवांस इष्ट तें कधीं करण्या स मी चुकणार नाहीं, शोक करूं नको माझ्या वाक्यावर पूर्ण भरवसा ठेव, कांहीं कालानें तूं पांडवांची पट्टराणी होशील, कदाचित् आकाश खालीं पडेल, हिमालय पर्वत छिन्न विच्छिन्न होईल, पृथ्वीचीं शकलें होतील, सागर ही शुष्क होईल; परंतु माझें वाक्य कधीं अनृत होणार नाहीं. तुला मी वारंवार बोध करितों यास्तव आतां आपला शोक दूर कर. असें कृष्णाचें व द्रौपदीनें भाषण ऐकून सर्वांच्या समक्ष अर्जुन पांचाली कडे मुख करून बोलतो हे सखे, आतां रोदन पुरे कर जी गोष्ट होणार ती झाली; कृष्णानें जें भाषण केलें तें घडल्या वांचून राहणार नाहीं. अतःपर तूं अगदीं शोक करूं नको. असें अर्जुनानें भाषण ऐकून द्रुपद पुत्र धृष्टद्युम्न सर्वां समक्ष भाषण करतो हे द्रौपदी, आतां तूं शोक करूं नको, तुझा हित करितां मी द्रोणाचार्यांचा वध करीन, भीष्माचार्यांचा वध शिखंडी करील, दुरात्मा दुष्टबुद्धी जो दुर्योधन याचा वध भीमसेन करील आणि कर्णाचा वध धनंजय करील. रामकृष्णा यांच्या साहाय्यानीं इंद्रास ही जिंकूं मग मंदबुद्धी जे धृतराष्ट्र पुत्र यांचा पाड किती; याप्रमाणें धृष्टद्युम्नानें भाषण केल्यावर सर्व वीर वासुदेवाच्या अग्रभागीं स्वस्थ बसले; त्या मध्यें श्रीकृष्ण बोलूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

१३ अध्याय तेरा:— श्रीकृष्ण धर्मराजास बोलतो हे राजा, तूं कौरवांशीं द्यूत प्रसंग केलास हें फार वाईट कर्म केलेंस. मला पूर्वींच हें वर्तमान समजतें तर तेथें येऊन द्यूताचा प्रसंग मोडून टाकिला असता; परंतु काय करूं तुमच्या द्यूत प्रसंगीं मी द्वारकेंत नव्हतो. धृतराष्ट्र व त्याच्या पुत्रानीं यद्यपि मला बोलाविलें नसतें तथापि मीच आलों असतों आणि धृतराष्ट्रास नाना प्रकारच्या कथा, दृष्टांत सांगून व द्यूताचे गुणदोष कथन करून द्यूत प्रसंग आणू दिला नसता. भीष्म, द्रोण, कृपाचार्य, बाल्हिक, धृतराष्ट्र इत्यादिकांस सांगितलें असतें कीं सर्व मिळून द्यूता पासून दुर्योधनाचें निवारण करा,

द्यूतांत बहुत दुःख व त्याचा परिणाम फार खोटा आहे. वीरसेन राजाचा पुत्र नल द्यूत खेळून राज्यापासून भ्रष्ट झाला हें तुह्मांस विदीतच आहे; द्यूत खेळून कोणी मोठ्या पदवीस आला नाहीं. स्त्रिया, अक्ष, मृगया, मद्यपान ह्रीं चार व्यसनें ज्यास लागलीं त्याचा नाश थोडक्याच दिवसांत होईल ह्मणोन समजावें; परंतु च्यार व्यसना मध्यें द्यूता सारखें दुःखदायक व्यसन दुसरें कोणतेंच नाहीं, त्यापासून राज्यभ्रष्ट होतो, वनवास प्राप्त होतो ह्मणोन मोठ्या लोकानीं द्यूताची बहुत निंदा केली आहे, थोर मनुष्य द्यूत क्रीडेछा कधीं ही करीत नाहींत, एक दिवस जर द्यूत क्रीडा केली तर द्रव्य नाश होतो. हे बोध मी धृतराष्ट्रास व त्याचे पुत्रास करून द्यूता पासून परावृत्त केलें असतें, शेवटीं असें ही बोललों असतों कीं मी सांगतों हें न ऐकाल तर सर्व कौरवांचा नाश निश्चयें करून लौकरच होईल. जे आपले मित्र असतात तेच द्यूत प्रसंगांत समय विशेषें करून शत्रु होतात यास्तव द्यूत करावयाचें नाहीं. असें धृतराष्ट्रास व भीष्मास साफ सांगितलें असतें; इतकें हि असून दुरात्मे जे कौरव यांणीं माझ्या वाक्याचा अवमान केला असता तर राजा, एक क्षणांत कौरवाच्या नाश करून तुला राज्याभिषेक केला असता. आतां गोष्ट झाली तो मा घारी येत नाहीं. तुमचें हें वर्तमान मी द्वारकेंत आल्या नंतर सात्यकीनें सांगितलें तें मी ऐकतांच राजा तुझ्या समाचारास आलों. तुह्मांस इतके क्लेश व्हावेत काय? द्यूता समयीं तुह्मीं मला अगदींच कळविलें नाहीं आपल्याच बुद्धीनें त्यास प्रवृत्त होऊन सर्व नाश करून घेतलात. असा विषय या अध्यायांत आहे.

१४ अध्याय चवदा.— युधिष्ठीर बोलतो हे कृष्णा, आमच्या द्यूत प्रसंगीं तुह्मीं द्वारकेंत नवतां तर कोठें गेलां होतां, द्वारकेंतून जाण्याचा असा समय तुह्मांवर काय पडला होता तें सर्व मला सांगा. असें युधिष्ठिराचें भाषण श्रवण करून वासुदेव बोलतो हे राजा, पूर्वीं तुह्मीं राजसूय यज्ञ केला त्या कालीं अग्रपूजे करितां दमघोषाचा पुत्र शिशुपाल यानें बहुत वल्गना करून माझी निंदा केली असतां मला बहुत कोप येऊन त्याचा मी शिरच्छेद केला. नंतर यज्ञ समाप्ती झाली, हें वर्तमान शिशुपालाचा भ्राता जो

शाल्व याणें श्रवण करून तो सुवर्ण, रौप्य इत्यादि धातूनीं निर्मित यथेच्छगामी जें सौभनामक पूर यामध्यें आरूढ होऊन मला मारण्या करितां द्वारकेंत येण्यास निघाला, तेव्हां मी तुझ्या सभेंतच होतों. मला हें वर्तमान अगदीं विदीत नव्हतें. इकडे शाल्वानें येऊन द्वारकेंत वृष्णी श्रेष्ठ कुमाराशीं युद्ध करून हजारों गृहें मोडून टाकिलीं. नाना प्रकारचे सुशोभित प्रासाद भग्न केले. वृष्णी व यादवांचा बहुत नाश केला. मुखानें भाषण करूं लागला कीं, तो वृष्णी कुलाधम वसुदेवाचा पुत्र वासुदेव कोठें गेला त्यास लौकर माझ्या अग्रभागीं आणा, त्याचा युद्धामध्यें पराभव करून प्राण घेतों माझा भ्राता बालक राज्यारूढ असतां वासुदेवाशीं युद्ध करण्यास समरामध्यें गेला होता; परंतु थोड्याच अपराधावरून त्याचा वध केला. यास्तव त्या दुष्टाचा प्राण घेतल्या वांचून आज राहणार नाहीं अशी त्याची बहुत वल्गना मी श्रवण करून त्याचा वध करावा म्हणोन पुनः माघारा द्वारकेंत गेलों. द्वारकेच्या भोंवताली शूरानीं वेढा घालून आंत जाण्यास मार्ग न ठेवितां तुमुल युद्ध चाललें होतें. बहुत प्रासाद मोडलेले व अनेक वृष्णी युद्धामध्यें मरण पावलेले पाहून मी भयंकर शंखाचा नाद केला आणि शाल्वास युद्धा करितां हांक मारली. ती ऐकून तो एका एकीं माझ्या अग्रभागीं येऊन युद्ध करूं लागला. एक मुहूर्त पर्यंत मोठें भयंकर युद्ध होऊन शेवटीं शाल्वास मी जिवें मारला असतां सर्व त्याचे योद्धे माझ्या हस्तगत झाले याजकरितां हे धर्मराजा, मी द्वारकेच्या बाहेर गेलों होतों. नंतर द्वारकेंत येतांच हें तुमचें वर्तमान सात्यकीनें मला सांगितलें. तें मी श्रवण करतांच हस्तनापुरास निघून आलों. अ. वि. या अ. आहे.

१५ अध्याय पंधरा.— युधिष्ठीर भाषण करतो हे वासुदेवा, सौभराजाचें व तुझें महत् युद्ध कसें झालें त्याचा वृत्तांत विस्तारानें मला सांग. असें भाषण ऐकून वासुदेव बोलतो हे राजा, शिशुपालाचा वध मी केला. हें शाल्वानें ऐकतांच आकाशगामी सुवर्ण व रौप्य इत्यादि धातूनीं निर्मित जें सौभ नामक नगर यामध्यें आरूढ होऊन द्वारकेस वेष्टिलें आणि चारी दिशेस सौभाचे योद्धे युद्ध करूं लागले. द्वारका सर्व पुराम

ध्यें श्रेष्ठ, सुशोभित, पताकानीं अलंकृत केली होती, तिच्या सभोंवते मोठ मोठे खंदक खणून बुर्जासहित तट बांधिले होते, त्या तटांवर युद्ध संबंधीं नाना प्रकारचीं शस्त्रें, तोफा, प्रास, तोमर इत्यादिक शस्त्रें युद्ध करण्या करितां ठेविलीं होतीं. पुरीच्या आसमंतात् भागीं सुरुंगाचे मार्ग ठेविले होते, ज्यास व्युह भेद-करण्याचें परिज्ञान तोच द्वारकेंत जाण्यास समर्थ होईल. शिल्प शास्त्रांत-दुर्ग सिद्ध करण्याचा प्रकार लिहिला आहे त्याप्रमाणें ही द्वारका कारागिरानीं सिद्ध केली आहे. इंद्रादिक देवानीं ही द्वारकेंत राहाणाऱ्या लोकांशीं युद्ध करणें कठीण अशी ती द्वारका उग्रसेन व उद्धव याणी संरक्षीत असतां एके एकीं शाल्वराजा पुरींत प्रवेश करूं लागला. त्याकाळीं गद, सांब, उद्धव व दुसरे कितीएक योद्धे मध्य गुल्मामध्यें उच्च प्रदेशावर उभे राहून शाल्वाशीं युद्ध करूं लागले. कांहीं वृष्णी व अंधक शाल्वाच्या भयानें किल्याच्या तटा बाहेर येऊन राहिले; कांहीं नौकारूढ होऊन अन्यत्र स्थानीं गेले. शाल्वानें नाना प्रकारचीं शस्त्रास्त्रें घेऊन शहरचे चारी दरवाजे रोखले. जिकडे तिकडे शाल्वाचें सैन्य पसरल्या मुळें नगर निवासी जनास बहुत त्रास उत्पन्न झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

१६ अध्याय सोळा:- वासुदेव भाषण करतात हे धर्मराजा, गज, अश्व, पदाती, रथ अशा चतुरंग सैन्या सह वर्तमान शाल्वानें द्वारकेमध्यें चारी द्वारानीं प्रवेश करून द्वारकेंतील चतुष्पथ मार्ग व्याप्त केले. सैन्याचे विभाग करून चारी दिशेस शाल्व युद्ध करूं लागले असतां माझे पुत्र, चारुदेष्ण, सांब प्रद्युम्न नाना प्रकारचीं चित्रविचित्र आभरणें धारण करून मोठमोठ्या रथांत बसून शाल्वाशीं युद्ध करूं लागले. शाल्वाचा सचीव जो क्षेमवृद्धी याचें व सांबाचें मोठें तुमुल युद्ध होऊं लागलें. सांबानें हजारों बाणांची क्षेमवृद्धी वर वृष्टी केली असतां क्षेमवृद्धी अचल पर्वता सारखा उभा राहून मायेचे शरजालानें सांबाशीं युद्ध करूं लागला. सांबानें मायीक शरजालाचा नाश करून पुनः त्याजवर हजारों बाणाची वृष्टी केली. तेणें करून क्षेमवृद्धी पराजित होऊन पळाला नंतर वेगवान् नामक दैत्य शाल्वाचा सेनापती पुढें येऊन युद्ध करूं लागला. शेवटीं सांबानें वेगवानाच्या मस्तकावर गदेचा प्रहार केला.

तेणें करून तो मूर्च्छित होऊन वायूच्या वेगानें जीर्णवृक्ष जसा एकाएकीं पृथ्वीवर पडतो तसा गदेच्या अघातानें पृथ्वीवर पडला.त्याकाळीं सांबास मोठें धैर्य उत्पन्न होऊन तो शाल्वाच्या योध्यांशीं मोठें तुमुल युद्ध करूं लागला. विविंध्यनामक राक्षसाचें व चारुदेष्णाचें मोठें तुमुल युद्ध झालें. नंतर चारुदेष्णानें सूर्या सारख्या तेजस्वी बाणावर मंत्र प्रयोग करून विविंध्यावर टाकिला, तेणें करून तो बहुत विव्हळ होऊन मरण पावला. हें पाहून शाल्व सर्व सैन्याचा नाश करूं लागला.त्या काळीं सेना त्रस्त झाली, हें प्रद्युम्नानें पाहून तो सर्व सैनिकांस अश्वासन युक्त बोलूं लागला. हे सैनिक हो, पळूं नका, उभे रहा मीं लौकरच शाल्वाचा पराभव करतों,माझा पराक्रम तुह्मीं थोडक्याच वेळांत पहाल. माझ्या वाक्यावर विश्वास ठेऊन उभे रहा. असें सैनिकांस अश्वासन देऊन युद्धास सिद्ध झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७ अध्याय सतरा.– श्रीकृष्ण भाषण करतात हे धर्मराजा, सुशिक्षित अश्वानीं युक्त जो सुवर्णाचा रथ त्या मध्यें प्रद्युम्न आरूढ होऊन शाल्व सेनेच्या अग्रभागीं जाऊन त्यानें बाण वर्षावानें सर्व त्याचें सैन्य एकमुहूर्तांत अदृश्य करून टाकिलें. वारंवार सिंहा सारखी गर्जना करून शत्रूस आपलें वीर्य प्रदर्शित करीत असतां शत्रूचें व प्रद्युम्नाचें अंतर अगदीं थोडें राहिलें, इतक्यांत शाल्वाचा सेनापती प्रद्युम्नाचे अग्रभागीं येऊन युद्धास उभा राहिला असतां प्रद्युम्न बाणवृष्टीनें सेनापतीस पराजित करून शाल्वावर धांवला. नंतर उभयतांचें अनेक प्रकारें महान् युद्ध होतां होतां शाल्वानें कालकूटा सारखा प्राण घातक एक बाण प्रद्युम्नावर टाकिला. तेणें करून प्रद्युम्न निचेष्ट होऊन युद्धा मध्यें मूर्छित पडला. असा विषय या अध्यायांत आहे.

१८ अध्याय अठरा.– श्रीकृष्ण भाषण करतात हे राजा, प्रद्युम्न शाल्व बाणानें मूर्च्छित झाला.हें वृष्णी अंधक इत्यादिकानीं पाहून ते दुःखानें हाहाःकार करूं लागले.हें दारुकाच्या पुत्रानें पाहून शीघ्रगमन करणारे सुशिक्षीत अश्व रथास जोडून रथ युद्धा पासून माघारा न्यावा असा तो विचार करीत होता.इतक्यांत प्रद्युम्न सावध होऊन धनुष्य बाण हातांत

येऊन सूत पुत्रास भाषण करितो हे सूतो, तूं भयाभीत होऊन माघारा कां-
जात होतास? युद्धामध्यें पलायन करणें हा आमचा धर्म नव्हे. तुला जें भय-
झालें त्याचा त्याग कर. या शाल्वाची कथा काय! एक क्षणांत यास पराजि-
त करून टाकीन. असें प्रद्युम्नाचें भाषण ऐकून सूतपुत्र बोलतो हे प्रद्युम्ना,
मला मोह नाहीं, भय नाहीं; परंतु शाल्वाचें सैन्य बहुत या सह वर्तमान तूं ए-
कटा युद्ध करतोस हा मला एक संशय झाला ह्मणोन तुझा रथ माघारा नेत हो
तों. सारथ्यानीं रथ्याचें संरक्षण करावें. रथ्यानीं सारथ्याचें रक्षण करावें हा प
रस्परांचा धर्म होय ह्मणोन या दानवां पासून तुझें संरक्षण व्हावें याज क-
रितां रथ माघारा नेत होतों, असें सूतपुत्राचें भाषण ऐकून मकरकेतु प्रद्यु
म्न बोलला कीं हे दारुकात्मजा, आज जें तुं केलेंस तें केलेंस पुनः कसेंही-
संकट आलें असतां रथ माघारा नेऊं नको. आमच्या वृष्णीची अशी प्रति
ज्ञा आहे कीं, युद्धांत मरावें; परंतु युद्धा पासून पराङ्मुख होऊं नये. जो व्य-
थित होऊन पृथ्वीवर पडला असेल त्यास मारूं नये. शत्रूनें मी तुझा आ
हें असें भाषण केल्यास त्यास मारूं नये. युद्धामध्यें स्त्रिया, बाल, वृद्ध, विर-
थी, रोगी, भग्न शस्त्र यांची हिंसा करूं नये. हे सूतपुत्रा, तूं ही उत्तम सूतकु
ळांत उत्पन्न झालास त्या पेक्षां तुलाही युद्ध कर्में ठाऊक असतील. वृष्णीचा
पराक्रम तुला विदित असतां माझा रथ तूं माघारा कसा नेत होतास हें वर्त-
मान श्रीकृष्ण, बलराम, सात्यकी, सांब, चारुदेष्ण, गद, सारण, अक्रूर यांस-
कळलें तर ते माझी बहुत प्रकारें निंदा करतील. सर्व वृष्णींच्या स्त्रिया ए-
कत्र जमून अशी थट्टा करूं लागतील कीं, पहा हा प्रद्युम्न शूर, संभावित,
शांत, पुरुष मानी असतां रणामध्यें शत्रूस भिऊन पळाला यास धिः
कार असो. हे सूतपुत्रा, या धिःकारा पेक्षां मला अथवा मज सारखे परा
क्रमी असतील त्यांस मृत्यु बरा. पूर्वी कृतवर्म्यास युद्धामध्यें बहुत वेळ-
पळविला तसा शाल्वासही आतां पळवीन. असा पराक्रमी मी असतां हे
सूतपुत्रा, माझा रथ तूं मागें नेत होतास हा मला बहुत खेद झाला. तस्मा
त् पुनः माझा रथ शत्रूकडे ने, युद्धामध्यें मी भयानें पीडित झालों असतां
ही भीत पुरुषा सारखा माझा रथ माघारा आणूं नको. युद्धार्थी जें शाल्वा

नें सैन्य, तें माझ्या अग्रभागीं आलें असतां मी सर्वांचा पराभव करीन. याविषयीं किमपी काळजी करूं नको व भयही बाळगूं नको. असा विषय या अध्यायांत आहे.

१९ अध्याय एकूणिस.— श्रीकृष्ण भाषण करितात हे राजा, प्रद्युम्नाचें भाषण ऐकून दारुकी मृदुवाणीनें पुनः बोलतो हे प्रद्युम्ना, तूं बलवानामध्यें श्रेष्ठ आहेस आणि शाल्वापासून मी भय मानीत नाहीं. आपलें सारथ्य कर्म तुला दाखवावें ह्मणोन मी रथ काहींसा मागें आणिला, तूं सावध झालास; आतां तुझा रथ शाल्वाच्या अग्रभागीं नेऊन उभा करितो आणि सारथ्य कर्मामध्यें माझें चातुर्य किती आहे हें तुला प्रदर्शित करीतों. असें बोलून एका एकीं हयांस प्रेरणा करून मार्गांत नानाप्रकारचीं सव्य अपसव्य मंडळें करीत करीत एकक्षणांत रथ पुढें नेला. वायूची गती कदाचित् कमी त्यापेक्षांही अश्व जास्त पळविले तेव्हां अश्वांचे पाय पृथ्वीस केव्हां लागतात हें कोणास कळेनासें झालें. अशा वेगानें रथ पुढें घेऊन गेला असतां शाल्वराजास कोप येऊन त्यानें तीन बाणानीं दारुकीस वेध केला. दारुकी त्या बाणाची किमपी व्यथा नमानितां पुनः शाल्वराजाची सेना अपसव्य करून रथासह वर्तमान पुनः पूर्वस्थानावर आला. हें शाल्वानें पाहून प्रद्युम्नावर पराकाष्ठेचा बाण वर्षाव केला. प्रद्युम्नानें हस्तलाघवें करून त्या बाणवृष्टीचा नाश केल्यानंतर शाल्वानें दारुण असूरी माया उत्पन्न करून पुनः प्रद्युम्नावर बाण वृष्टी केली. प्रद्युम्नानें ब्रह्मास्त्रें करून राक्षसी मायेचा तत्काल नाश करून पुनः शाल्वावर भयंकर बाणाची वृष्टी केली. त्या बाण वृष्टीनें शाल्व राजा अतिशय दुःखित होऊन पृथ्वीवर मूर्च्छित पडला. हें पाहून प्रद्युम्नानें भयंकर सर्पासारखा विषयुक्त व अग्नीसारखा देदीप्यमान बाण शाल्व राजाचा प्राण घ्यावा या बुद्धीनें धनुष्यास लाविला. तों आकाशामध्यें एका एकीं हाहाःकार होऊन इंद्र, कुबेर इत्यादि देवानीं नारद व वायु यांस प्रद्युम्नाकडे पाठविलें असतां उभयतां येऊन प्रद्युम्नास बोलतात हे रौक्मिणेया, शाल्वराजा तुला वध्य नाहीं, रणामध्यें अवध्य आहे तूं आपल्या बाणाचा उपसंहार कर, ब्रह्मदे-

वानें यानें मरण श्रीकृष्णाचे हातून योजिलें आहे तें मिथ्या न व्हावें.श्रीकृष्णां वांचून त्रैलोक्यांत याचा पराभव करून प्राण घेण्यास कोणी समर्थ नाहीं. असें उभयतांचें भाषण प्रद्युम्नानें श्रवण करितांच परम हर्षित अंतःकरणानें धनुष्याचा उपसंहार करून बाण भात्यामध्यें ठेविला. इतक्यांत शाल्व राजा सावध होऊन मनामध्यें दुःखानें आपल्या सैन्यासहवर्तमान द्वारकेचा त्याग करून सौभ नगरामध्यें बसून आकाश मार्गानें संचार-करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

२० अध्याय वीस:— वासुदेव भाषण करितात हे धर्मराजा, तुझा राजसूयज्ञ समाप्त झाल्यावर पुनः द्वारकेंत माघारा जाऊं लागलों. तों दुरून द्वारका निस्तेज दिसूं लागली, वेदघोष व यज्ञयागादि नष्ट-झाले, वनें उपवनें यांचा नाश झाला,उत्तम कुलीन स्त्रिया अलंकार रहित दिसूं लागल्या.अशीं दुश्चिन्हें पाहून कृतवर्म्यास विचारिलें कीं, मला द्वारका विशोभित दिसते याचें कारण काय? त्या कालीं कृतवर्म्यानें मला सांगितलें कीं, शाल्वानें येऊन द्वारकेंत बहुत नाश केला, सर्वांस बहुत दुःख दिलें,वनें उपवनें भंग केलीं, स्त्रियांस भूषण रहित केल्या, मोठमोठे प्रासाद मोडले हें वर्तमान मी ऐकतांच शाल्वास मारण्याची तत्काल प्रतिज्ञा करून द्वारकेंत गेलों. नंतर तेथील पुरवासी लोक,वसुदेव व वृद्ध वृद्ध यादव होते त्यांस सांगितलें कीं, तुह्मीं चिंता करूं नका. शाल्व राजाचा नाश करून तुह्मांस हर्षित करितों. असें अश्वासन युक्त भाषण करून दुंदुभीचे नाद करा अशी मी आज्ञा करतांच संपूर्ण यादव संतुष्ट झाले. नंतर शैब्य सुग्रीवादि चार अश्व रथास लाऊन मी त्यांत बसलों आणि पांचजन्याचा मोठा नाद करून शाल्व नाशा करितां चतुरंग सैन्या सहवर्तमान द्वारकेच्या बाहेर निघालों, पुढें वनें,उपवनें,सरोवरें,नद्या,झाड्या,नानाप्रकारचे विषम,दुर्घट देश,उल्लंघन केले;परंतु त्याचा शोध लागला नाहीं. नंतर तसाच पुढें चाललों तों समुद्राच्या समीप मार्ईक सौभनगरा मध्यें शाल्व राजा सैन्यासहवर्तमान निःशंक बसलेला मी पाहतांच तो नगरासहवर्तमान स-

मुद्रामध्यें जाऊन बसला. त्याकाळीं मीही समुद्रांत जाऊं लागलों तों शाल्वानें मला हांक मारून सांगितलें कीं, हे दुष्टा, तुझाच मी आजपर्यंत शोध करीत होतों आतां सहजच प्राप्त झालास तेव्हां तुजसह वर्तमान युद्ध करतों, असें ह्मणोन दैत्यांसहवर्तमान मजवर एका एकीं बाणांची वृष्टी करून अश्वरथ, सारथी यांसहवर्तमान मला अदृश्य करून टाकिला. नंतर मीही शाल्वावर असंख्यात बाणांची वृष्टी केली असतां शाल्वानें आपलें सौभनगर आकाशाचे समीप एक कोशावर नेऊन ठेविलें आणि तेथून तो युद्ध करूं लागला. हें युद्ध पाहण्यास यक्ष, गंधर्व इत्यादि विमानारूढ होऊन आले आणि हर्षित होऊन गीत गाऊं लागले. माझ्या बाणांनीं दानव व्याकुल होऊन शलभासारखे इकडे तिकडे पळूं लागले असतां सौभनगरामध्यें मोठा हाहाःकार झाला. कोणाचे बाहू, हस्त, पाय, शिरें छिन्न विछिन्न होऊन प्रेतासारखे पृथ्वीवर पडले असतांही माझे जे बाण जात त्यांस भक्षण करून टाकीत. याप्रकारें शाल्वाचे सैन्याची अवस्था झाल्यानंतर मीही शंखाचा शब्द केला, तो ऐकून शाल्व माझ्याशीं मायीक युद्ध करूं लागला. मीही त्याच्या मायेचा नाश केला. पुनः शाल्वानें माया उत्पन्न करून घटकेंत आकाश नाहींसें करावें, सूर्य लक्षावधी दिसावे, अग्नीचे वर्षाव करावे, शस्त्रास्त्रांचा वर्षाव करावा. असें होत असतां मीही मोह पावलों. नंतर प्रज्ञास्त्राची योजना केली असतां जसे कापसाचे ढीग वाऱ्यानें एका एकीं उडतात तशीं दानवांचीं अस्त्रें माझ्या अस्त्रानें नाहींशीं झालीं. असा विषय या अध्यायांत आहे.

२१ अध्याय एकवीस— श्रीकृष्ण भाषण करतात हे युधिष्ठिरा, पुरुषव्याघ्र जो शाल्व राजा याचें व माझें पराकाष्ठेचें युद्ध होत असतां पुनः शाल्वानें सौभपुरासहवर्तमान आकाशांत जाऊन शतघ्नी, गदा, खड्ग, यांची मजवर बहुत वृष्टी केली आणि असंख्यात बाणें करून रथाश्व, सारथी यांसहवर्तमान मला वेष्टीत करून टाकिलें. त्याकाळीं दारुकी अति दुःखित होऊन भाषण करितो हे श्रीकृष्णा, शाल्वबाणानीं मी बहुत पीडित झालों युद्धांत उभें राहाण्याची मला शक्ती नाहीं, माझी अवस्था फार कठिण आ

हे, तुझा मुर्वनीस्तव रथावर मात्र बसलों; परंतु माझ्यानें सारथ्य कर्म करवत नाहीं. असें दारुकाचें वाक्य ऐकून त्याजकडे पाहिलें तों पर्वतावर दृष्टी केली असतां गेरू आदी करून धातूंचे आरक्त प्रवाह जसे स्रवतात तसे दारुकाच्या अंगा पासून रक्ताचे प्रवाह चालले ले मी पाहून त्यास बहुत प्रकारें अश्वास न देऊन निर्भय केला. तों द्वारकेंत राहाणारा कोणी एक पुरुष आहुकाचा नि रोप सांगूं लागला कीं, हे श्रीकृष्णा तुझा पित्याचा मी अत्यंत मित्र आहें, या- ज करितां जें वर्तमान झालें तें तुला सांगण्या करितां आलों आहें. असें बालू न ह्मणाला कीं, हे कृष्णा, तुझा पिता वसुदेव शाल्व राजानें जिवें मारला. आ तां लौकर येऊन द्वारकेचें रक्षण करावें स युद्धाची समाप्ती कर. असें वर्तमान मी ऐकतांच चिंताग्रस्त होऊन पुढें काय करावें हें मनांत सुचेनासें झालें. नं- तर विचार करूं लागलों कीं, सात्यकी, बलराम व प्रद्युम्न यांस द्वारकेच्या व वसुदेवाच्या रक्षणा करितां ठेऊन मी शाल्वा कडे युद्धास आलों आणि हा- द्वारकेंतून आलेला पुरुष असें सांगतो. याजवरून सात्यकी, बलराम, प्रद्युम्न जिवंत आहेत किंवा कसें याविषयीं संशय उत्पन्न झाला. कारण सात्यकी; बलराम, चारुदेष्ण, रौक्मिणेय, सांब जिवंत आहेत तों पर्यंत वसुदेवास मा रण्यास इंद्र देखील समर्थ नाहीं मग इतरांची कथा काय; परंतु शाल्वानें वसुदेवास मारलें तेव्हां बलराम प्रभृती पूर्वींच मरण पावले असतील अ- सा विचार करून युद्ध करीतच होतों; इतक्यांत ययाती राजाचें कलेवर स्व र्गांतून पृथ्वीवर जसें पडलें तसेंच वसुदेवाचें कलेवर आकाश गामी सौभ नगरांतून अकस्मात् खालीं पडलेलें मी पहातांच माझे हातांतील शार्ङ्ग ध नुष्य खालीं पडलें. रथाच्या मध्य भागीं मी ही मूर्छित होऊन पडलों अस तां आमच्या कडील सर्व सैनिक एकाएकीं हाहाःकार करूं लागले. शाल्वा कडील योध्यानीं मी मूर्छित झालों हें पाहून एक मुहूर्त पर्यंत हजारों बा णाची व शूल पट्टीश इत्यादिक शस्त्रांची मजवर वृष्टी केली. नंतर कांहीं का ळानें मी सावध होऊन इकडे तिकडे आसमंतात् पाहूं लागलों तों सौभ न गर, शाल्वराजा आणि मरण पाव लेला माझा पिता वसुदेव कोठें दिसेना से झाले. तेव्हां अरे, ही मिथ्या माया मला मोह उत्पन्न करण्या करितां शा-

त्यानें उत्पन्न केली होती, असा मनामध्यें निश्चय करून पुनः मी शाल्वा वर असंख्याक बाणांचा वर्षाव केला. असा विषय या अध्यायांत आहे.

२२ अध्याय बावीस :- श्रीकृष्ण भाषण करितात हे धर्मराजा, असें युद्ध होत असतां शाल्वास मारण्या करितां एक चमत्कारिक धनुष्य धारण करून सूर्या सारखा तेजस्वी व सर्पासारखा विषयुक्त बाण शाल्वा वर टाकिला असतां त्यानें आपल्या पुरा सह वर्तमान एका एकीं गुप्त होऊन प्राग्‌जोतिष नामक समुद्र तीरीं एक नगर आहे तेथें तें पूर नेलें नंतर त्याणें शिला व पर्वतांचा मजवर वर्षाव केला तेणें करून आमचे सैन्यां त हाहाःकार झाला. नंतर पर्वताचें निवारण करण्या करितां पाषाण भेद- नामक अस्त्र अभिमंत्रण करून टाकिलें. यामुळें पर्वत, शिळा, यांचा नाश झाला. रथाचे अश्व त्या व्यथेनें कांपूं लागले. पाषाणास्त्रा पासून मी मुक्त झालों हें पाहून सर्व देव हर्षित झाले. रथाचे अश्व, पर्वत व शिलांच्या भारा नीं गती विषयीं अगदीं मंद झाले हें पाहून सारथी ह्मणतो हे श्रीकृष्णा, शाल्वाचा वध करण्या विषयीं विलंब लाऊं नका, या दुष्टानें आपल्यास ब- हुत त्रास दिला यास्तव एक क्षण न लागतां सत्वर याचा नाश करा. असें सारथ्याचें वाक्य ऐकून मी उत्तर केलें कीं, हे दारुका, एक मुहूर्त पर्यंत धी- र धरून उभा राहा शाल्वाच्या वधाची व सौभ नगराच्या नाशाची योजना लौकरच करतों. असें सांगून सुदर्शन चक्रावर आग्नेय अस्त्राचें अभिमंत्र ण करून त्यास आज्ञा दिली कीं, यक्ष, राक्षस, दानव, प्रतिलोम, अनुलो- म इत्यादि जे कोणी शाल्वा कडे असतील त्यांचे प्राण हरण करून व सौ भ नगराचा नाश करून शाल्वाचा नाश कर, अशी आज्ञा देऊन सुदर्शनच- क्र सौभ नगरावर टाकिलें. त्या कालीं प्रलय कालचा दुसरा सूर्यच काय ? - असें सुदर्शन सौभनगरावर जाऊन पडतांच त्याचीं दोन शकलें होऊन त्यां तील शाल्व राजाचे बहुत योद्धे मरण पावले. जसें पूर्वी महेश्वरानें बाणें करून त्रिपुराचा वध केला, तसें सुदर्शनानें सौभ नगर पाडलें असतां- शाल्व सेनेचा बहुत नाश झाला. कांहीं दानव मेले व कांहीं दानव पळाले. हें पाहून शाल्व महान् एक गदा घेऊन मजवर धांवला असतां पुनः मी सु

दर्शनास आज्ञा करून शाल्वाचा प्राण घेतला.त्या काळीं शाल्वा कडील कां हीं घोडे पळून गेले, कांहीं आक्रोश करूं लागले. शाल्वाच्या स्त्रिया मो ठ्यानें रोदन करून दीनासारख्या दाही दिशेस गेल्या. मीतर अतिहर्षानें पां चजन्याचा नाद केला असतां माझ्या मित्रांस बहुत आनंद झाला. या प्रका रें शाल्वाचा वध करून मी द्वारकेंत आलों.या कारणास्तव हे धर्मराजा, मला हस्तनापुरास येण्यास अवसर झाला नाहीं. कदाचित् आलों अस तों तर त्या प्रसंगीं सुयोधन जिवंत असता काय? परंतु काय करूं जसें न दीचें पाणी उतरून गेल्यावर पूल बांधण्याचा उद्योग करतात तसें आतां माझें आगमन निष्फल आहे. असें भाषण करून श्रीकृष्णानें द्वारकेस जाण्या करितां धर्मराज,भीमसेन व अर्जुन व धौम्य यांचा निरोप घेत ल्यानंतर शैब्य व सुग्रीव नामक अश्वांनीं युक्त जो रथ त्यामध्यें सुभद्रा- व अभिमन्यु यांस बसवून श्रीकृष्ण द्वारकेस गेले. धृष्टद्युम्न,द्रौपदीच्या पुत्रांस घेऊन आपल्या नगरास गेला. धृष्टकेतु ही नकुलाची भार्या करेणुम ती इजला घेऊन शुक्तिमती नगरास गेला. सहदेवाचे शालक कैकय पांडवां ची आज्ञा घेऊन आपले नगरास गेले. देशोदेशींचे आलेले ब्राह्मण धर्मरा जाचा त्याग न करितां त्याच्या समागमानें राहिले. असा वि०या अ० आहे.

२३ अध्याय तेवीस:– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, श्रीकृष्ण भगवान् रथारूढ होऊन अनर्त देशामध्यें गेल्यानंतर भीमसेन, अर्जुन, नकुल,सहदेव, द्रौपदी व धौम्य पुरोहित यां सहवर्तमान धर्मराज रथारू ढ होऊन गमन कालीं ब्राह्मणांस सुवर्ण, नानाप्रकारचीं वस्त्रें,गाई दान क रून द्वैत वनामध्यें जाण्या करितां निघाला,त्याच्या पृष्ठभागीं भृत्यजन गेले या प्रकारें धर्मराज वनामध्यें जाऊं लागला असतां मार्गामध्यें कुरुजांगल दे शचे ब्राह्मण व इतर जन दीन होऊन राजाच्या रथास प्रदक्षिणा करीत पु ढें उभे राहिले त्या कालीं धर्मराजा भ्रात्यां सहित रथारूढ असतां ब्राह्म णाचें उत्तम प्रकारें आगत स्वागत करून बोलतो हे पौरवहो, जसा पिता पुत्राचें रक्षण करितो अथवा साधूचे ठायीं जसा भाव असतो तसा धृतराष्ट्र तुमचें उत्तम प्रकारें संरक्षण करून साधूसारखा भाव ठेवितो किंवा नाहीं?

असें धर्मराजानें भाषण ऐकून ते भाषण करितात हे धर्मा, तूं कसा आमच्या त्याग केलास? सर्व दीनाचा नाथ तूं होतास आतां आमचें संरक्षण कोण करील, पुत्रापेक्षांही आमच्यावर विशेष प्रीती करीत होतास; परंतु आमच्यावर कठोर मन करून आतां कोठें जातोस? तूं धर्माचे ठायीं रत असतां- पापं बुद्धी दुर्योधन तसेच कर्ण, शकुनी, तुमच्या नाशा विषयीं उद्युक्त झाले त स्मात् यांसधिःकार असो. हे राजा, मयासुरानें उत्पन्न केलेली जी देवसभा त्या सारखी जी तुमची सभा तिचा त्याग करून तुह्मी आतां कोठें रहाल? असें पौरवांचें वाक्य ऐकून उच्चस्वरें करून अर्जुन भाषण करितो हे पौरव ह्रो, तुह्मी कांहीं चिंता करूं नका, धर्मराजाच्या सत्य प्रतिज्ञे प्रमाणें वनवास स्वीकारून नंतर आम्हीं ऐश्वर्यानें प्राप्त होऊन तुह्यांस लौकरच दर्शन देऊं. असें अर्जुनाचें वाक्य ऐकतांच सर्व नगर वासी एकत्र होऊन मोठ्या हर्षानें धर्मराजास प्रदक्षिणा करून राजा, तुझी अर्थ सिद्धी उत्तम प्रकारें होवो. असे नाना प्रकारचे आशीर्वाद देत देत पार्थ, वृकोदर, नकुल, सहदेव व द्रौपदी यांस विचारून धर्मराजाच्या अनुमतें आपले राष्ट्रांत गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

२४ अध्याय चोविस.– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कुरुजांगल निवासी पौरजन आपल्या नगरास गेल्यावर धर्मराज आपल्या भ्रात्यांस बोलतात हे बांधव हो, आपण बारावर्षें पर्यंत सुखानें वनामध्यें वास करूं. अती सुंदर सुशोभित मृग, पक्षी, पुष्पें, सरोवरें, इहीं करून रमणीय, द्वादशवर्षें पर्यंत आपल्यास कोण त्याही गोष्टीची न्यूनता व्हावयाची नाहीं असें एखादें वन तुह्मी पहा. असें धर्मराजाचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे राजा, महान् ऋषी व वृद्ध हे तुझा मोठा सत्कार करितात. या पृथ्वी मध्यें अज्ञान वस्तु तुला कोणाची नाहीं. सर्व ब्राह्मण, नारद, द्वैपायन प्रभृती मोठे मोठे तपस्वी तुझी मर्यादा बहुत प्रकारें ठेवितात, मोक्षाचें कारण तूं जाणतोस; देव, ब्रह्म, गंधर्व इत्यादिकांचे लोक तुला जाण्यास सुलभ आहेत. तपस्वी ब्राह्मण यांचा मनोगत भाव सर्वदा तूं जाणतोस. मोक्षास कारण काय हें तुला विदितच आहे; हे राजा, ज्या वनांत तुझी राहण्याची

इच्छा असेल तेथें सरवें करून निवास करावा; परंतु हें द्वैतनामक वन पुष्प, फलें, मूलें, सरोवरें, मृग, पक्षी इहीं करून सुशोभीत व अती सुंदर आहे येथें तुमचें मन असल्यास द्वादश वर्षें पर्यंत सुखें करून राहूं; आतां आपल्या इच्छेस वाटेल तसें करावें. असें अर्जुनानें भाषण ऐकून धर्मराज बोलतात हे अर्जुना, द्वैतवनीं निवास करावा असें तुला रुचत असल्यास तेथेंच राहूं. नंतर सर्व पांडव रथारूढ होऊन द्वैत वनीं गेले, मार्गामध्यें भिक्षूक, साग्नीक व निरग्नीक ब्राम्हणां सहवर्तमान धर्मराज जात असतां सुशोभित दिसूं लागला. साल तालादिक वृक्ष गगन चुंबित पुष्प फलानीं नम्र झालेले, मयुर, कोकिल इत्यादि पक्षी जेथें मधुर शब्द करितात, मदोन्मत्त गजांचे समुदाय ज्या अरण्यांत राहतात, सरस्वती नामक नदी ज्या वनांत निर्मल व सुशोभीत उदकानें वाहत्ये, मोठमोठे ऋषी, सिद्ध, चारण, गंधर्व यांचे समुदाय जेथें आहेत, असेंजें सुशोभित द्वैत वन त्या मध्यें भ्राते, ब्राह्मण व द्रौपदी यांसह वर्तमान धर्मराज गेला. नंतर रथांतून उतरून वनातील सिद्ध, तापस, ऋषी यांस नमस्कार करून धर्मराज कदंब वृक्षा खालीं जाऊन बसला असतां वन निवासी ऋषी व सिद्ध, चारण, गंधर्व यांणीं राजाची पूजा केली. त्या कालीं धर्मराज आपल्या भ्रात्यां सहवर्तमान द्वैत वनीं अतिशय शोभायमान दिसूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

२५ अध्याय पंचवीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, द्वैतवनामध्यें सरस्वती तीरीं पांडव रहात असतां यती, मुनी व मोठमोठे तपस्वी ब्राह्मण, यांस धर्मराज नाना प्रकारें फल मूलानीं संतुष्ट करून धौम्याच्या साह्याने नानाप्रकारच्या पितृ इष्टी करूं लागला. या प्रकारें पांडव वनामध्यें रहात असतां मार्कंडेय ऋषी, राजास भेटण्या करितां आले. त्यांस धर्मराजानें पाहतांच ऋषिवर्याची पूजा करून आसनावर बसविल्या नंतर मार्कंडेयानें धर्मराज व द्रौपदी व भीमार्जुन यांज कडे पाहून रामचंद्राचें स्मरण केलें. त्या कालीं धर्मराज मार्कंडेयाकडे पाहून बोलतो हे ऋषिवर्या, माझें ऐश्वर्य पाहून सर्व ऋषी मजपाशीं रा

हिले. तुह्मास तर मला पाहून आश्चर्य वाटलें याचें कारण काय तें सांगा.अ-
सें भाषण ऐकून मार्कंडेय बोलतात हे राजा, तुला पाहून हर्ष व विस्मय झाला
नाहीं; परंतु तुझी अशी अवस्था पाहून सत्यव्रत दाशरथी रामाचें स्मरण झालें.
तो लक्ष्मणा सहवर्तमान पित्याच्या आज्ञेनें धनुर्धारी असतांही ऋष्यमुखप
र्वतावर जाऊन राहिला. त्याची योग्यता काय सांगावी? इंद्रासारखा पराक्रमी,
शत्रूस यमासारखा दंड करणारा व युद्धामध्यें अजिंक्य होता; परंतु पित्या-
च्या आज्ञेनें राज्य संबंधी उत्तमोत्तम भोगांचा त्याग करून वनामध्यें संचार-
करीत असतां त्याणें आपल्या धर्माचा त्याग केला नाहीं. नाभाग व भगीरथ हे
मोठे मोठे पुण्यश्लोक राजे सर्व शत्रूंचा क्षय करून सागरांत पृथ्वीचें राज्य क
रीत असतां अधर्मे करून कधींही वर्तले नाहींत हे तुला ठाउकच असतील, अ
लर्क, सत्यव्रत, काशी, करुष इत्यादिकानीं सागरांत पृथ्वीचें राज्य करून व-
सर्व द्रव्याचें दान करून शेवटीं ते वनामध्यें तपश्चर्येस गेले; परंतु धर्मापासून
भ्रष्ट झाले नाहींत. पूर्वी सप्तऋषीनीं ब्रह्मदेवाच्या लिखितावर भरवसा ठेऊ-
न घोर तपश्चर्या केल्या; त्या योगानें आकाशामध्यें नक्षत्र शरीरी होऊन बस
ले आहेत, हें तूं पहात आहेस, इतर मोठे मोठे तपस्वी व राजे व ऋषिवर्य यांणीं
आपल्या बलप्रभावानें धर्माचें उल्लंघन कधींही केलें नाहीं. हे राजा, तूंही
धर्माचा त्याग न करितां उत्तम प्रकारें कालक्षेप करतोस तर आपल्या प्रतिज्ञे
प्रमाणें द्वादश वर्षे वनवास करून शेवटीं कौरवांपासून तुला राज्य प्राप्त होऊ
न पृथ्वीचें अनुशासन उत्तम प्रकारें करशील. असें धर्मराजास सांगून नंतर
धौम्य व अर्जुनादिकांबराबर भाषण करून मार्कंडेय ऋषी उत्तरदिशेकडे-
गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

२६ अध्याय सव्वीस:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, द्वैतव-
नामध्यें पांडव रहात असतां ब्राह्मणानीं वेद घोषें करून अरण्य नादित के
लें; तों बलादाल्भ्य ऋषी युधिष्ठिरास भेटण्या करितां आले आणि राजाचें
ऐश्वर्य पाहून दाल्भ्य ऋषी वर्णन करितात हे राजा, भृगु, अंगिरस, वासिष्ठ
काश्यप; अगस्त्य, आत्रेय इत्यादिक पुण्यश्लोक ब्राह्मण सायंकालीं अग्नी-
प्रज्वलीत करून होम करतात त्यामध्यें तूं तर फारच शोभतोस; आतां तुला

असें सांगतोंकीं, भ्यांत्यां सहवर्तमानब्राह्मणांची उपासना चागले रीतीनें कर. अग्नीस वायु साह्य झाला ह्मणजे वन, तृण, वृक्ष इत्यादिकांस दग्ध करितो तसा राजा, तूंही क्षत्रियधर्मानें युक्त असून सत्यवाक्, जितेंद्रिय आहेस; त्यामध्यें ब्राह्मणाचा सहवास तुला झाला ह्मणजे त्या मार्गानें तुझें कार्य लौकर होईल. ब्रह्मतेज, क्षत्रियतेज एकत्र मिळालें असतां काय सिद्ध होणार नाहीं. यास्तव ब्राह्मणाचें प्रतिपालन उत्तम प्रकारें कर ह्मणजे तुझी क्षत्रिय श्री वृद्धी पावून सागरांत पृथ्वीचा उपभोग तूं लौकरच करशील. जसें मदोन्मत्त कुंजर युद्ध करीत असतां कोणास ऐकत नाहींत; परंतु अंकुशाचा प्रहार केला असतां तत्काल वश होतात; तसें ब्रह्मतेजावांचून क्षात्रतेज स्वाधीन होत नाहीं, याजकरितां ब्रह्मतेजाचा क्षत्रियानें अवलंब करावा. ज्यास दोन्हीं बलें सम आहेत त्यास पृथ्वीवर कांहीं कमी नाहीं, शत्रू त्यास पाहून भय पावतात हे राजा, ब्राह्मणाचें मनोधारण तूं पराकाष्ठेचें केलें आहेस तसेंच पुढें कर, त्या योगें करून तुझी सकल इष्टसिद्धी लौकरच होईल. असें स्तुतियुक्त भाषण दाल्भ्यानीं केलेलें. द्वैपायन, जामदग्न्य, पृथुश्रवा, इंद्रद्युम्न, भालुकी, कृतचेता, सहस्रपात्, आदी करून अनेक ऋषीनीं ऐकून त्याची मोठी प्रशंसा व धर्मराजाची स्तुती केली. असा विषय या अध्यायांत आहे.

२७ अध्याय सत्तावीस— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कोणे एके दिवशीं सायंकाळीं सर्व पांडव एकत्र मिळून परस्पर सुखदुःखाच्या गोष्टी सांगत असतां सर्व स्त्रियांमध्यें श्रेष्ठ द्रौपदी धर्मराजास बोलली हे राजा, दुरात्मा धृतराष्ट्रपुत्र दुर्योधन, भ्याने व मज सहवर्तमान तुला वनामध्यें पाठवून आपण राज्याचा उपभोग करितो हें त्या मूर्खास कसें रुचतें. दुर्योधनाचें हृदय तर केवळ लोखंडासारखें आहे असें वाटतें. तो मूर्ख सभेमध्यें दुरात्तरानीं तुझी निंदा करून वन संबंधीं दुःखें सहन करण्यास अयोग्य असतां तींच दुःखें तुला देऊन आपण मोठा हर्ष पावला. राजा, जा कालीं तूं वनामध्यें निघालास त्या कालीं दुर्योधन, कर्ण, शकुनी, दुःशासन या चौघां खेरीज चारी वर्णांचे लोक तुज विषयीं रडूं लागले; परंतु त्या दुष्टांच्या नेत्रांतून अश्रूही आले नाहींत. हें पाहून

मला किती खेद होतो तो तुला काय सांगूं! पहाकीं,उत्तमोत्तम शय्येवर तूं निद्रा करीत असतां या वनामध्यें दर्भाच्या शय्येवर निद्रा करितोस, राज्यसिंहासनावर तूं नित्यशः बसत होतास,परंतु दर्भाचें आसन तुला प्राप्त होऊन त्याजवर तूं बसतोस.अशीं नानाप्रकारचीं दुःखें आठवून धर्मास बोलून पुनःह्मणाली हे राजा, तूं आपल्या क्रोधाची शांती कोणत्या रीतीनें केली असशील तें मी जाणत नाहीं, जा क्षत्रियांस क्रोध नाहीं तो क्षत्रिय कुलांत उत्पन्न होऊन काय उपयोग, आपला विनाशकाल आला असतां क्रोधाचें परिमार्जन करून काय उपयोग,आपल्या पराक्रमानें सर्वसंपत्ती मिळवावी , क्रोधाच्या शांती कालीं शांती करावी. क्रोधकालीं क्रोध करावा. तस्मात् हे राजा, शत्रू विषयीं तूं दया न धरितां त्यांचा नाश करण्यास आज उद्योग करावा. शत्रूंच्या क्षमा कालीं क्षमा करीत नाहीं व क्रोध समयीं क्रोध करीत नाहीं तो या लोकीं व परलोकीं नष्ट होतो. असा विषय या अध्यायांत आहे.

२८ अध्याय अठ्ठावीस:- द्रौपदी भाषण करत्ये हे राजा, मनुष्यानें क्षमा व क्रोध कोणत्या कालीं करावा याविषयीं पूर्वींचि विरोचनाचा पुत्र जो बली यानें प्रल्हादास प्रश्न केला, तो इतिहास तुला सांगत्यें.बली प्रल्हादास ह्मणाला हे असुरेंद्रा, क्षमा श्रेष्ठ किंवा तेज श्रेष्ठ हें मला सांग. असें भाषण ऐकून प्रल्हाद बोलतो. हे बली, निरंतर क्षमा ही न धारण करावी व क्रोधही निरंतर करूं नये,विचार पाहून समयानुसार उभयतांचा स्वीकार करावा. जो नित्य क्षमावान् आहे त्यापासून बहुत दोष घडतात,आपले भृत्यजन वेळचे वेळेस शुश्रुषा करीत नाहींत त्यामुळें शत्रूही वृद्धी पावतात. सेवकजन, पुत्र दारा हे कधींही त्या पुरुषाची आज्ञा मानीत नाहींत. मग स्त्रिया यथेच्छ आचरण करून त्या पुरुषास पापमार्गास लावितात. या प्रमाणें क्षमावान् पुरुषापासून बहुत दोष घडतात. आतां क्रोधही निरंतर धरूं नये. त्यापासून बहुत दोष घडतात. क्रोधी पुरुष चांगल्या वाईट कर्मांचा विचार न करितां दंड करण्यास प्रवृत्त होतो. प्रजेस विनाकारण दंड झाला असतां राजास यश प्राप्त होत नाहीं व त्याजवर प्रजा कधींही विश्वास ठेवीत नाहींत. क्रोधी पुरुष विद्वान् जरी असला तथापि त्याची प्रतिष्ठा लोक इच्छित नाहींत. स्वजन त्याचा द्वेष

करितात, परोपदीं मानहानीं व अर्थहानी होते. संताप, द्वेष, मोह इत्यादि ज्या मनुष्यानें धरिले तो ऐश्वर्यापासून लौकरच नष्ट होतो. उपकार करणारे व अनुपकार करणारे या उभयतांवर समदृष्टीनें सदां क्रोध बाळगलानर मनुष्याची तेजोहानी होऊन लोकांत दुष्टता होते. तस्मात् सार्वकाळ क्रौर्य किंवा शांती धरून उपयोग नाहीं. जाजा कालीं जसजसें वर्तणें प्राप्त पडेल तसन सें वर्तावें ह्मणजे त्या लोकीं व परलोकीं सुख होतें. आतां क्षमा काल कोणता तों सांगतो, ज्याणें आपल्यावर पूर्वी उपकार केला असेल आणि तोच कदाचित आपल्या अपराधांत सांपडला तर त्याच्या अपराधाचा उपकार करून क्षमा करावी. क्रोध धारण करून त्याच्या नाशास प्रवृत्त होऊं नये. मूर्खत्वानें कोणी अपराध केलानर त्याच्या अपराधाची क्षमा करावी. बुद्धीपूर्वक अपराध करून अज्ञानानें मी केला असें कदाचित् कोणी ह्मणेल तर तेथें स्वल्प दंड करावा. एक वेळ अपराध झाला असतां क्षमा करावी त्याणेंच दुसरा अपराध केलानर मोठा दंड करावा. न जाणोन कोणापासून अपराध झाला असेल त्याचा चांगल्या प्रकारें विचार करून क्षमेकडे लक्ष द्यावें. क्रौर्य धारण करून अथवा क्षमेनेंही कार्य होतें. यास्तव पुरुषानें काल देश वर्तमान बलाबल विचार पाहून क्षमा व क्रौर्य याचें धारण करावें. हे धर्मराजा, या कालीं धृतराष्ट्र पुत्राचा अपराध क्षमा करण्याचा काल नव्हे, क्रौर्य धारण करून त्या मूर्खांचा नाश करावा असाच समय आहे; ह्मणोन तूं त्याचा नाश करण्यास प्रवृत्त हो. क्रौर्य कोणाच्या कालीं कसकसें धारण करावें हें ज्यास समजतें तोच पृथ्वीपती जाणावा. अ० वि० या अ० आहे.

२९ अध्याय एकुणतीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, द्रौपदीचें भाषण ऐकून धर्मराज आश्चर्य पावून बोलतात हे द्रौपदी, तूं क्रोधाची प्रशंसा करत्येस; परंतु क्रोधापासून महान् महान् अनर्थ उत्पन्न होतात ते असे कीं, क्रोधी मनुष्य लौकरच नष्ट होतो. ज्याणें क्रोधाचा उपसंहार केला त्याज पासून पातकें घडत नाहींत; क्रोध मनुष्याच्या नाशास कारण आहे ह्मणोन आमच्या सारखे प्राज्ञ लोक क्रोधाचा अंगिकार करीत नाहींत. क्रोधी पुरुषाचें कल्याण कधींही व्हावयाचें नाहीं. क्रो

णाच्या कालीं काय बोलावें, काय न बोलावें. याचा विचार क्रोधी पुरुषास नसतो. ह्मणोन हे द्रौपदी मी क्रोधाचा त्याग केला याचें कारण हेंच आहे. दुर्बल मनुष्यानें बलाढ्य मनुष्या वर कोप केला असतां तत्काल तो नाश पावतो येव ढ्या करितां दुर्बल मनुष्यानें बलवंतावर क्रोध करूं नये, जित क्रोधी मनुष्यास या लोकीं व परलोकीं बहुत सुख आहे. साधूनीं असें सांगितलें आहे कीं, मन्युचा निरंतर क्षय करावा, क्षमावान् पुरुष सर्वत्र पूज्य आहेत, क्षमे सारखा थोर पदार्थ त्रैलोक्यांत दुर्मिल आहे. म्हणोन हे द्रौपदी, दुर्योधन माझा प्राण घेण्यास जरी उद्युक्त झाला तथापि मी त्याची क्षमा करीन, त्याच्या नाशास कधीं मी प्रवृत्त होणार नाहीं. निरंतर मनुष्यानें सत्य व दया धारण करावी यांत बहुत कल्याण आहे, म्हणोन साधु जगतास उपदेश करितात कीं, क्षमे पासून जितकें कल्याण होईल तितकें क्रोधापासून होणार नाहीं. तूंच आपले मनांत विचार करून पहा कीं, ज्याचे अंतर्यामीं क्रोध निरंतर रहातो त्यास कधींही चैन पडत नाहीं, दुसऱ्याच्या नाशा विषयीं सर्वदा प्रवृत्ती असते, मर्यादेचें उल्लंघन करतो, लोकांमध्यें महत्व कधींही मिळत नाहीं, लोक त्याची थट्टा करतात, पुत्र, दारा व भृत्य जनास तो कधींही आवडत नाहीं. काश्यपऋषीचें असें मत आहे कीं, धर्म, यज्ञ, वेदशास्त्र, ब्रह्म, सत्य, भूत, भविष्य, वर्तमान, तप, शौच यांचा क्षमावान पुरुषास अनुभव आहे. क्षमेनें आजपर्यंत हें जगत् चाललें आहे. याजकरितां क्षमाच धारण करणें योग्य आहे. यास्तव हे द्रौपदी, तूं शांती धर आणि क्रोधाचा त्याग करून सदा सर्वदा संतोषयुक्त अंतःकरणानें ऐस. आपला पिता महाभीष्म, श्रीकृष्ण, आचार्य, विदुर, कृपाचार्य, संजय, सोमदत्त, व्यास हे रात्रंदिवस क्षमेची प्रशंसा करितात. मनुष्यानीं शांती धरावी हाच त्यांचा सिद्धांत आहे ह्मणोन हे द्रौपदी, मी क्षमेचा अवलंब केला. कांहीं दिवसानीं तूंच असें पहाशील कीं, क्रोधानें कोण नाश पावला व क्षमेनें कोण तरला; हा दुरात्मा दुष्टबुद्धी दुर्योधन लौकरच नष्ट होऊन आपल्यास राज्यप्राप्ती होईल असा माझा पक्का निश्चय आ

हे, याःभरत कुलाचा विनाश काल थोड्याच दिवसांत येईल आणि ह्या दुरात्मा दुर्योधन क्रोधानें शेवटीं नाश पावेल हें तूं लौकरच पाहाशील. हे द्रौपदी, साधूनीं वर्णित अनादि पुरातन जी क्षमा इचा अंगिकार मी करितों, क्रोधाचा करणार नाहीं, या पासून माझी हानी किंवा उदय होवो, परंतु एकदां जें स्वीकारलें त्याचा त्याग कधींही करणार नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

३० अध्याय तीस.— द्रौपदी बोलली हे धर्मराजा, तुझ्या वडिलानीं अनादि राज्य संपादन केलेलें दुर्योधनानें तुह्मां पासून कपटानें घेतलें. तें राज्य पुनः त्याजपासून घेण्या विषयीं तुझी मती होत नाहीं. तस्मात् जें कांहीं जन्मांतरीं केलेलें तेंच तुझ्या बुद्धीस मोह उत्पन्न करून प्रतिबद्धक झालें, असें मला खचित वाटतें, त्या कर्मास नमस्कार असो, तें कर्म करण्यास बुद्धी देणारा ईश्वर त्यास नमस्कार असो. सुख दुःखें कर्मापासून होतात. उत्तम, मध्यम, कनिष्ठ ज्या योनी त्यामध्यें जीं जीं फळें प्राप्त होतात तीं तीं कर्मानेंच होतात, धर्म, दया, शांती, आर्जव यां पासून होत नाहींत; मनुष्यास संपत्ती व दारिद्र्य पूर्वार्जित कर्मानेंच येतें. या विषयीं राजा तूंच दृष्टांत आहेस. पहा बरें इतक्याही दुःख सागरामध्यें निमग्न होऊन वनवास संबंधीं पीडा सहन करतोस; परंतु दुर्योधनास मारण्याचा हेतु धरीत नाहींस हें तुझे भ्राते मोठे पराक्रमी असतां त्यांस ही दुर्योधनास मारण्याची बुद्धी होत नाहीं. त्याज वरून मला खचित दिसतें कीं, तुझें जन्मांतरचें कर्म प्रतिबद्धक आहे. अरण्यामध्यें राहून सर्व दुःखें सहन करून धर्माचा त्याग करीत नाहींस धर्मा पेक्षां प्रिय पदार्थ तुला कोणताच नाहीं; असें समजून स्वस्थ बसला आहेस. तुझें राज्य, जीवित, शरीर उपभोगा करितां नाहीं तर धर्मा करितांच आहे ह्मणोन ब्राह्मण, गुरु, देवता तुझी प्रशंसा करितात. हे राजा, धर्मा करितां माझा व भ्रात्यांचा ही तूं त्याग करशील, परंतु धर्म त्याग करणार नाहींस. धार्मिक राजास धर्मच संरक्षण करितो असें मी मोठ्याच्या मुखानें ऐकिलें आहे. पुरुषानीं निरंतर धर्म केला असतां जशी छाया आपणास सोडून कोठें जात नाहीं तसा धर्म आपल्यास सोडून कोठें जात नाहीं. हे राजा, तूं समुद्र वलयांकीत पृथ्वीचें राज्य करीत होतास, परंतु तुला कधीं ग

र्व झाला नाहीं. ब्राह्मणाचा सत्कार चांगले रीतीनें केलास, सुवर्णाच्या पा-
त्रांत ब्राह्मणास तृप्ती होई पर्यंत भोजन घातलेंस; तुझ्या अन्नयज्ञामध्यें मी
केवळ परिचारिके सारखी होत्यें. हजारों अग्निहोत्री, यती, वानप्रस्थ तुझ्या
गृहीं भोजन करून तुला आशीर्वाद देत होते. ब्राह्मणास काय द्यावें काय
न द्यावें हा विचार तुझ्या गृहीं कधीं नवता; अतिथीस भोजन घालून शेवटीं
शेषान्न भक्षण करितोस. नानाप्रकारच्या पशुबंध इष्टी व पाकयज्ञादिक
इष्टी तूं केल्यास. आतां ही याघोर अरण्यांत नसेंच तूं करतोस. अश्वमेध,
राजसूय, पुंडरीक इत्यादिक यज्ञ तूं बहुत केलेस. सुवर्ण, रत्नें इत्यादिक ब्रा
ह्मणास देऊन त्यांस बहुत संतुष्ट केलेस. असा तूं राजा बुद्धिमान व धार्मि-
क असतां दुष्टबुद्धी प्रेरित झाल्यामुळें अक्षक्रीडा करून या दुःख सागरांत
निमग्न झालास; हें माझ्या मनांत वारंवार येऊन चित्ताची शांती होत नाहीं;
परंतु या विषयीं मी पूर्वीचा इतिहास ऐकिला आहे तो तुला सांगत्यें. हें
सर्व जगत् ईश्वराधीन आहे आपल्या स्वाधीन नाहीं; जसजशी ईश्वर प्रेर
णा करतो तस तसें चालतें. जशी काष्ठाची बाहुली सूत्रधार फिरवितो तस
तशी फिरते तशी ही प्रजा ईश्वराधीन होऊन त्याच्या आज्ञे प्रमाणें चाल-
ते. आकाश जसें सर्व पदार्थांनीं व्यापून राहिलें तसा ईश्वर सर्वांतर्यामी-
व्यापक आहे, सुख दुःखाचा दाता तोच आहे, त्याच्या आज्ञे वांचून ब्रह्मां
डांत कांहीं नाहीं. जसें वृषभास वेसण घालून पाहिजे तिकडे नेतात तसें
ईश्वरानें जगत् आपल्या माया पाशांत बांधून टाकिलें आहे. शेवटीं जग-
ताचा असा परिणाम होतो कीं, मृत्तिकेचा घट जरी फुटला तरी तो जसा मृ
त्तिकेंतच मिळून जातो तसें हें जगत प्रलय कालीं ईश्वरांत मिळून जातें. ज
सा महान् वारा सुटला म्हणजे तृणादिक वायूचे स्वाधीन होऊन पाहिजे-
तिकडे जाण्यास समर्थ होतात तसें हें जगत् ईश्वरानें प्रेरित कर्मांच्या स्वा-
धीन होऊन कोठें जाण्यास प्रतिबंधक होत नाहीं. करता, करविता, उपभो
क्ता, कर्म द्वारा ईश्वर आपणच आहे. जगताचे हृदयांत शिरून चांगलें
वाईट करण्यास बुद्धी देतो, सर्व भूतांस मायेनें वेष्टित करून नाना प्र
कारच्या बुद्धी देतो, असा प्रभु ईश्वर, जगताचा नाश कर्म द्वारा करवितो.

परस्पर एकमेकां कडून एकमेकांची हिंसा करवितो आणि आपण कमल पत्रासारखा निर्लिप्त राहातो आणि वट पत्रावर प्रलयकाळीं समुद्रामध्यें क्रीडा करतो; याच्या कृती मध्यें न्याय अगदीं नाहीं. कीर्तिमान, शुची, कुलीन, धार्मिक यांस तो दुःख देतो व पापी दुराचारी यांस सुख देतो. मातापित र जसे पुत्रावर लोभ ठेवितात तसा ईश्वर जगतावर निष्पक्ष पाती लोभ ठेवीत नाहीं हे धर्मराजा, हा दुर्योधन पापी, दुराचारी निंदक यास ईश्वरानें अति दुःख द्यावें तें न देतां यास राज्यारूढ करून अति सुख सागरांत निमग्न ठेविला आहे. तूं तर निरंतर धर्मास भिऊन चालणारा व क्षमावान् असतां तुझी अशी दशा केली याज वरून हे धर्मराजा, मला असें वाटतें कीं, ईश्वरानें हें कर्म ह्मणोन उत्पन्न केलें हें ईश्वरानें कृत्रिम आहे. केल्या कर्माचें फल प्राण्यास प्राप्त होतें तर बुद्धी देणारा जो ईश्वर यास परंपरा-संबंधानें कर्मफल कां प्राप्त होत नाहीं. ईश्वर हा मोठा निर्घृण आहे याजव र भरवसा ठेऊं नये. आपल्या शौर्यानें वागावें. हा उपदेश धर्मराजा तुला मी करित्यें; ईश्वर व कर्म हे दोन्ही पदार्थ मिथ्या आहेत. असा विषय या अध्यायांत आहे.

३१ अध्याय एकतीस:— धर्मराज बोलतो हे याज्ञसेनी, तुझें भाषण ऐकून मी संतुष्ट झालों; परंतु तूं आतां नास्तीक वादाचा त्याग कर, एतावत् काल पर्यंत तूं नास्तिक मतानें भाषण केलेंस तें ऐकिलें. तूं मला ह्मणत्येस कीं, धर्मावर संपूर्ण भरवसा ठेवून वर्ततोस आणि शत्रूंच्या प्रतिकारा विषयीं कांहींच यत्न करीत नाहींस तर हे राजपुत्री, मी जो धर्म करतों तो केवळ फलाच्या आशेनें करीत नाहीं. तीन वर्णांनीं अवश्य कर्म करावयाचें तेंच करतों; न केलें असतां पापाचा अधिकारी होईन. ग्रहस्ताश्रमी यांस जे धर्म सांगितले आहेत ते त्याणीं न केले तर नरक प्राप्ती त्यांस होते. वेदानीं कथित व साधूनीं आचरित जीं कर्में असतील तीं सर्वानीं अवश्य करावीं, परंतु त्या कर्मापासून फल होण्याची इच्छा ठेवूं नये यथोक्त कर्म न करणारा नीच योनीस जातो, नास्तीकपणानें अथवा लोकापवादानें जो धर्माचरण करीत नाहीं तो जन्मजन्मांतरीं नरकांत पडतो. धर्मा-

विषयीं शंका पावणारा मनुष्य पश्वादि योनीस जातो. धर्माचा द्वेष करणार पापी तस्कर होऊन नीच कुलांत उत्पन्न होतो. वेदाध्यायी, धर्मकर्माभि मानी उत्तम कुलांत उत्पन्न होतो, धर्मनिंदक मंदबुद्धी होतो, त्याची कोण वर आस्था राहात नाहीं. महत्व व मोक्ष हे दोन पदार्थ धार्मिक पुरुषा स प्राप्त होतात. मार्कंडेय ऋषी धर्माचरणें करूनच चिरंजिवी झाले. व्यास, वशिष्ठ, नारद, मैत्रेय, लोमेश इत्यादि ऋषी धर्मे करून महत्व पद्वी पावून शाप देण्यास व अनुग्रह करण्याविषयीं देवां पेक्षां श्रेष्ठ झाले व आपणास केवल वेदानें समजणारा जो अर्थ त्यास ते प्रत्यक्ष प हातात ह्मणोन हे याज्ञसेनी, धर्माची निंदा करण्यास तूं योग्य नाहीं- स. उन्मत्त व मूर्ख जे असतील त्याणीं करावी. इंद्रियांस जे सुख कार क व प्रत्यक्ष पदार्थ दिसतात तेच खरे ह्मणोन मूर्खलोक वाद करितात. आणि परोक्ष, अदृश्य जो धर्म याची निंदा करितात, त्यास प्रायश्चित्त शा- स्त्रांत कोठें सांगितलें नाहीं. असा जो धर्म निंदक असेल त्याची संगती सा धूनीं करूं नये, त्या मूर्खास भयंकर नरक अनेक जन्म पर्यंत प्राप्त होतो. वे द शास्त्राची निंदा करून प्रत्यक्ष प्रमाण वादी, दृष्ट पदार्थास सत्य मानून इं द्रिय सुखा करितां यथेष्ट आचरण करतोतें पाहून धार्मिकानीं तसें करूं न ये. संसार सागरास तरून स्वर्गास जाण्या विषयी धर्मच नौका होय, असें- जाणोन देवऋषी, गंधर्व इत्यादि धर्माचरण करतात. आतां धर्माविषयीं- प्रत्यक्ष दृष्टांत सांगतों. द्रुपद राजानें त्या कालीं धर्मे करून अग्नीमध्यें हव न केलें त्या कालीं आदित्यादि देवता अग्नीमध्यें प्रविष्ट होऊन त्यानीं द्रोणा चार्याचा पराभव करण्या करितां पराक्रमी वीर धृष्टद्युम्न उत्पन्न केला. हें ध- र्माचें किंवा अधर्माचें फल हें सूक्ष्म दृष्टीनें पहा. तात्पर्य असें आहे कीं, मंद बुद्धी व मूर्ख धर्माची अवहेलना करतात. धर्मानें ईश्वर प्रसाद होतो. आ- णि त्यायोगें भक्तिमान् नर अमरत्व पावतो. यास्तव त्या ईश्वराची निंदा न- करितां त्यास नमस्कार कर. असा विषय या अध्यायांत आहे.

३२ अध्याय बत्तीस- द्रौपदी बोलते हे धर्मराजा, धर्म, कर्म व ई श्वर यांची मी निंदा करीत नाहीं; दुःखानें पीडित होऊन दीनासारखा विला

प करत्यें माझें भाषण नास्तीक आहे असें तूं समजूं नको, कर्माची व ईश्वरा-
ची मी कांनिंदा करीन; स्थावर जंगमात्मक जगत सर्व कर्माच्या स्वाधीन आ
हे. शृष्टी उत्पन्न होण्याचे पूर्वीं अनादि कर्म आहे, यास दृष्टांत पहाकीं, वत्सा
ची स्तनावर प्रवृत्ती उत्पत्ती काळीं होते यास अनादिसिद्ध कर्म कारण होय.
कर्माधीन सर्व जगत आहे ह्मणोन यथायोग्य व्यापार त्याज पासून घडता
त; जगतांत अनादि सिद्ध कर्म आहे ह्मणोन या लोकीं व परलोकीं कर्माचीं
फलें प्राणी यथा योग्य भोगतात. जसा बक उदकांत बसून पूर्व कर्माच्या अ-
नुरोधानें जीविके करितां मत्स्य भक्षणाची इच्छा करितो तसा हा ईश्वर जी-
वाच्या अनादि संस्कारानें तशी तशी सृष्टी निर्माण करतो. धर्म आणि कर्म एक
मेकांस साह्य होऊन ईश्वरास सृष्टी करण्यास कारण होतात. मनुष्यास इछा
कोणी एक पदार्थाविषयीं झाल्ये ती पूर्वजन्मार्जित कर्मानेंच होते ह्मणोन-
त्या विषयीं अहंकार कोणी मानुनये. सर्व कर्मानें ग्रस्त आहेत. मी केलें, मी
घेतलें किंवा मी टाकिलें इत्यादि जो मनुष्याचा अहंभाव हा सर्वव्यर्थ आहे;-
याचा पुर्तेपणी शोध केलातर कर्म मूळ सांपडतें, जसा प्राणी अन्न भक्षण के
लें असतां पुष्ट होतो, त्याग केला असतां क्षीण होतो, तशा त्या प्रजा कर्म न क
रतील तर कर्म भ्रष्ट होऊन स्वार्था पासून भ्रंशता पावतील. कर्मा पासून फ
ळ उत्पन्न होत नाहीं असें कोणी ह्मणूनये, कारण आब्रह्म स्तंभ पर्यंत स्था
वर जंगमात्मक शृष्टी आपल्या कृतकर्मा पुढें अणुमात्र जाऊं सकत नाहीं, जे
कोणी वादी दृष्टच फल आहे अदृष्ट फल नाहीं ह्मणोन भाषण करणारे ते मू
र्ख जाणावे. जे कोणी दैवानेंच उत्पन्न होतें व नष्ट होतें ह्मणोन ह्मणतात ते दु
र्बुद्धी जाणावे. अकस्मात् वस्तु लाभ होतो त्यास कोणी दैव ह्मणतात, कोणी
प्राक्तन कर्म ह्मणतात कोणी प्रयत्न केला ह्मणोन ह्मणतात; परंतु लोकां मध्यें
शुभा शुभ प्राप्त होणें हें पूर्व कर्मार्जित दैवावांचून नाहीं. इतर वाद्यांचीं म
तें ही सर्वव्यर्थ आहेत. ईश्वरासही जन्मार्जित कर्म आहे, कर्मा वांचून को-
णी सुटला नाहीं, जे लोकांत ह्मणतात कीं, हें कार्य मी आपले पौरुषानें के-
लें तें जन्मांतरीय कर्मानेंच झालें. मनुष्याचा पराक्रम त्या कर्मास अनुकूल-
मात्र झाला. त्या त्या कृत्या विषयीं नियोग करणारा अंतरबाह्य व्यापक जग

तास वेष्टून राहिलेला परमेश्वर हा कारण होय. पूर्वी मनामध्यें कार्य करण्याची देण्याची किंवा घेण्याची इच्छा उत्पन्न होते. पश्चात् तें कर्म करण्यास पुरुष यत्न करतो ती इच्छा ईश्वराधीन, ईश्वर कर्माधीन व कर्म ईश्वराधीन असा एकमेकांचा आश्रय अनादिसिद्ध चालत आला आहे. सूज्ञ, ज्ञानी, पंडित व साधू कर्मावर पूर्ण विश्वास ठेऊन कोणत्या ही कार्यास प्रवृत्त होतात, लोकांमध्यें दोन्ही दृष्टांत बराबर आहेत. कांहीं कार्य करण्यास प्रयत्न करीत असतां सिद्धीस जात नाहीं; कांहीं कार्या विषयीं प्रयत्न करीत नसतां साध्य होतें तेव्हां याजवरून प्राण्यास पराकाष्ठेचा भ्रंश उत्पन्न होतो, परंतु तेथें ही जीवानीं असाच निश्चय करावा कीं, कार्य झालें नाहीं हें आपलें प्राक्तन कर्म व कार्य झालें तरी आपलें प्राक्तन कर्म आहे. पौरुषा वर दृष्टी देऊं नये. कार्य होणें किंवा नाश होणें या विषयीं तीन मतें आहेत. कोणी असें ह्मणतात कीं, उत्पत्ती, स्थिती आणि लय आपले स्वभावानेंच होतात. कोणी प्रारब्धानें. कोणी पौरुषानें होतात, असें ह्मणतात. तेव्हां या तिन्ही मध्यें तारतम्य विचार पहातां दैवानें निर्मित होतें व नष्ट होतें असें स्पष्ट दिसतें. या विषयीं पौरुष किंवा अनादिसिद्ध स्वभाव कारण दिसत नाहीं. तत्ववेत्ते याणीं ही असाच सिद्धांत केला आहे, संपत्ती किंवा विपत्ती ईश्वर मनुष्यास देतो; ती तरी स्व इच्छेनें देत नाहीं प्राक्तन कर्म पाहून तसतसा विनियोग करतो. जो कोणी अर्थ साधन करण्यास उद्युक्त होतो त्यास फल जन्मांतरचे कर्मा प्रमाणेंच होतें. तात्पर्य, मनुष्यानें आपण कुटिल स्वभाव न धरितां कामक्रोधादि विवर्जित होऊन नित्य जीं अवश्य कर्मे कर्तव्य आहेत तीं वर्णाश्रम धर्माचारा प्रमाणें करीत असावीं. मग जन्मांतरीं त्या पासून इष्ट किंवा अनिष्ट कांहीं तरीं फल उत्पन्न होवो; परंतु आपले अवश्य कर्मांचा आळसानें, मोहानें किंवा द्वेषानें त्याग करूं नये. जो निरंतर आलस्य किंवा संशय अथवा कामक्रोध यांस धारण करतो तो महान संकट पावतो. अलक्ष्मी त्याचे गृहांत प्रवेश करते ह्मणोन गंभीर बुद्धीनें धर्मावर व कर्मावर पुर्तेपणें विश्वास ठेऊन जो कर्म करील तो दुःखाचा अनुभव न घेतां कदाचित् संकट आलें असतां त्यांतून ही तो तरून जाईल. पंचमहा भौतिक जो वा

सनामय शरीर पिंड याजवर अनेक प्रकारचे कालें करून गुण राह-
तात; तसाच त्याचा नाश कालें करून होतो. जशीं पृथ्वी पासून अनेक
प्रकारचीं बीजें पेरलेलीं उत्पन्न होतात, परंतु त्यास कारण नांगर, पे
रणारा व पर्जन्य इतक्यांचा संबंध झाला ह्मणजे धान्य उत्पन्न होतें. तसें
हें शरीर उत्पन्न होण्यास कारण वासना, पंचमहाभूतें आणि जन्मांतरी
य कर्म संस्कार इतकीं एकत्र झालीं ह्मणजे हा शरीर पिंड उत्पन्न होतो.
तेव्हां या सर्व समुदाया मध्यें कर्मास प्राबल्य स्पष्ट दिसून येतें. हे धर्मराजा,
मला असें वाटतें कीं, देश, काल, वर्तमान, शक्ती, बलाबल पाहून सर्वांनीं य
थायोग्यते प्रमाणें वर्तावें. तशांतून एखादा नाश उत्पन्न झाला तर तेथें, ज-
न्मांतर कर्मा खेरीज दुसरें समाधान नाहीं, साम, दान, दंड, भेद यांचा ही-
सर्वांनीं अवलंब करावा. ही नीती क्षत्रियांस उत्तम आहे; परंतु ज्याच्या-
शीं जसा उपाय योजावयाचा तसाच योजावा त्यांत विपर्यास अगदीं हो
ऊं देऊं नये. हा दुराचारी दुर्योधन अहंकारानें मत्त झालेला त्यास चतुर्थ
उपाय योग्य आहे हेंच माझ्या भाषणाचें तात्पर्य. तर या वाक्याचा अ-
नादर न करितां हे राजा, दुर्योधनावर दंड उपाय योजून आपल्या अ-
र्थ सिद्धीस लौकर प्राप्त हो. पुरुषानें आपला आत्मा निरंतर संरक्षित
करावा हा त्याचा धर्म होय. असें न केलें असतां त्यास आत्महत्येचा दोष
लागेल. ही नीती बृहस्पतीनें सांगितलेली कोणी एक पंडितानें माझ्या
पित्यास सांगितली. नंतर पिता आपले पुत्रास सांगत होता इतक्यांत-
मीही कांहीं कार्याकरितां जाऊन त्याचे मांडीवर बसल्ये आणि ही नीती
ऐकिली होती. असा विषय या अध्यायांत आहे.

३३ अध्याय तेतीस.— वैशंपायन सांगतात, हे जनमेजया,
द्रौपदीचें भाषण ऐकतांच भीमसेन क्रोधानें बोलतो हे धर्मराजा, द्रौप
दीचें वाक्य अन्यथा नाहीं सत्य आहे. धर्म व पौरुषें करून संपादन केले
ली जी राज्य पदवी इचा त्याग करून वनामध्यें दुःखानें वास करतो हें आ
पल्यास योग्य कीं काय? दुष्ट दुर्योधन याणें आपलें राज्य कपटानें हरण
करून आपणास वनवासास पाठविलें. तें राज्य आपण पराक्रमानें घे-

ण्यास कांहीं चिंता नाहीं. आर्जवानें राज्य कोणी कोणास देत नाहीं या वि षयीं पराक्रमच केला पाहिजे. सिंहानें आमीष जसें जंबुकानें भक्षण करावें तसें आपण पराक्रमी असतां दुर्योधनानें आपलें राज्य हरण केलें, हें पाहून तुला कसें दुःख वाटत नाहीं. निरंतर धर्मकर्मामध्यें निमग्न होऊन बसलास आणि राज्या विषयीं कांहींच उद्योग करीत नाहींस. जें राज्य अर्जुनानें संरक्षित असतां इद्रानें ही हरण करण्यास अशक्य- तें राज्य तुझ्या प्रमादामुळें दुर्योधन हरण करून ऐश्वर्य भोगतो हें दुः- ख, धर्मराजा आह्मीं. तुझ्या करितां सोसतों. जर तूं आज्ञा देशील तर एक क्षणांत आह्मीं दुर्योधनाचा नाश करूं. अशा दुःखसागरांत तूं निमग्न झाला- स; हें तुला कसें बरें दिसतें. निरंतर तुझ्या धर्माचरणानें मित्रास दुःख व शत्रूस आनंद मात्र होतो; तेव्हां असा आत्मघाती धर्म, पंडितानि तुच्छ मानि- ला आहे. जसें एखादे दीन, पंगू दरिद्री, ज्यांस पौरुष नाहीं असे प्राणी व- नांत फिरून फलमूला वर उपजीविका करतात तसें राजा असून आपल्यास प्राप्त झालें आहे. ही तुझी दीक्षा व चर्या पाहून आह्मांस फार दुःख होतें आपल्या कुलामध्यें कृष्णा, अर्जुन, अभिमन्यु, माद्रीसुत याणीं अशी दी- क्षा धारण करून कधींही उपजीविका केली नसेल, तुझी हीजीविका नपुंसकानीं धारण करण्यास योग्य तीच तूं धारण केलीस. दुर्बल मनुष्य आपल्यास संपत्ती असावी ह्मणोन मनांत विचार करतो, परंतु त्यास जशी मिळत नाहीं तशी राजा तुझी अवस्था झाली. तुझे भ्राते आह्मीं शक्तिमान व पराक्रमी असतां तुझ्या धर्मापुढें आमचे पराक्रम व्यर्थ झाले. धृतराष्ट्राचे पुत्र तर आह्मांस केवळ क्लीबा सारिखे मानितात. हे धर्मराजा, युद्धामध्यें शत्रूनें वध जरी केला तरी त्याचें दुःख नाहीं, परंतु कपटानें राज्य गेलें असतां त्या सारखें दुःख दुसरें नाहीं व त्या मनुष्यास या लोकीं व परलोकीं सुख नाहीं. याज करितां आह्मीं सर्व मिळून दुर्योधनाशीं युद्ध करून राज्य घेतों, नंतर तुला देणें असेल तर दे, परंतु जें तूं करतोस या मध्यें तुझी फार निंदा करतात, ती आमच्यानें ऐकवत नाहीं. यास्तव तूं धर्मावरील मतीचा त्याग करून शत्रूचा नाश करण्याची मती धर. धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे पुरु

षानीं निरंतर साधावे; परंतु एकमेकास विरोध न येतां साधले नर लोकांत बहुतच कीर्ती होत्ये. तूं तर केवळ धर्मावर दृष्ट देऊन अर्थाचा नाश करून घेत ठास. अर्थार्थी पुरुषानें धर्मकाम यांचें ही सेवन करावें, परंतु केवल धर्माकडेच दृष्ट देऊन आत्म नाश करून घेऊं नये. धर्म दृष्टी निरंतर ठेवणाऱ्या पुरुषाचे अर्थ नाश होतात, मित्रास दुःख होतें. शेवटीं मरण कालींही सुख होत नाहीं. जसा मीन जलामध्यें असतां सुख पावतो व जला बाहेर निघाला असतां मरण पावतो. तसा धर्मार्थ काम मोक्षामध्यें निपुण मनुष्य सुखास अनुभवतो त्याचा त्याग केला असतां दुःखांत निमग्न होतो. मेघ आणि उदक यांचा परस्पर जसा नित्य संबंध आहे तसा धर्मार्थ यांचा संबंध परस्पर एकमेकाशीं नित्य आहे ह्मणोन धर्म आणि अर्थ या उभयतांची सिद्धी होईल तसा यत्न करावा. कोणी धर्मा करितां अर्थ संपादन करतात, कोणी कामा करितां करितात. परंतु कामा करितां अर्थ साध्य करणें हें मूर्खाचें लक्षण होय. जसा विषय लुब्ध झालेला पक्षी पारध्याच्या फाशांत सांपडून नाश पावतो तसा कामोपभोगा करितां द्रव्य साधन करणारा पुरुष शेवटीं नाश पावतो. काम किंवा लोभ हे ज्यास उत्पन्न होतात त्याचा सर्वस्व नाश होतो हा सिद्धांत आहे तेव्हां धृतराष्ट्र पुत्रानीं असा आपला अनादर करून काम लोभाची प्रकृती जी द्रौपदी इजला दुःख देऊन धर्मार्थ काम संपादिला असतां आमचा राज्यच्युतीमुळें नाश केला, तो नाश आपण होऊं देऊं नये. याज करितां यत्न केला तर आपली हानी काय? जेणें करून धर्मास अविरुद्ध स्वार्थ सिद्ध होत असल्यास तो अवश्य साधावा. तूं केवल धर्मावर विश्वास ठेऊन बसलास आणि इतर व्यापार कांहींच करीत नाहींस तर असें नसावें. कदाचित् धर्म, कदाचित् अर्थ, कदाचित् काम याचा यथा कालीं संग्रह करावा ह्मणजे मनुष्यास अति दुःख होत नाहीं. हे राजा, सर्वांस मोक्षाची इच्छा आहे खरी, परंतु धर्मार्थकाम यांनि घांचें यथा कालीं सेवन केल्या वांचून एका एकीं मोक्ष मिळत नाहीं म्हणोन क्रमानें केवल या धर्मबुद्धीचा निरास करून राज्य मिळण्याच्या उपाया विषयीं बुद्धीची योजना कर ह्मणजे तुला अरण्य संबंधीं दुःख झालें

याच्या लौकर नाश होईल. दान, धर्म, साधूचीपूजा हे धर्म इहलोकींव परलोकीं उपयोगीं पडतात; परंतु हे साध्य होण्यास द्रव्य पाहिजे. धर्मापासून सर्व उत्पन्न होतें तो धर्म अर्थमूलक आहे ह्मणोन अर्थसाध्य करण्याकरितां द्रव्य प्राप्ती करावी. तेव्हां दुर्योधनाशीं युद्ध केल्यावांचून अर्थप्राप्ती होत नाहीं. भैक्ष्यचर्या किंवा क्लीबपणा याणें शत्रू साध्य होत नाहीं या विषयीं शौर्यच धरिलें पाहिजे. क्षत्रियांस याञ्चा करणें हें अति निंद्य आहे; पराक्रमानें क्षत्रियांनीं उपजीविका करावी. वैश्य वृत्ती अथवा शूद्र वृत्ती किंवा भिक्षाचरण येणें करून क्षत्रियांस जीवन करणें हें अयोग्य आहे ह्मणोन हे धर्मराजा, अर्जुन व मजसारखे भ्राते तुला अनुकूल असतां तुच्छ वृत्ती धारण करणें योग्य नाहीं. उदार बुद्धीनें धृतराष्ट्र पुत्रांचा नाश करीन अशी उमेद धर आणि आमच्या साह्यानें धार्तराष्ट्रांचा नाश कर. वडिलोपार्जित पृथ्वीचें राज्य संपादन करून उत्तम प्रकारें प्रजेचें पालण कर. हाच धर्म क्षत्रियांस ब्रह्मदेवानें उत्तम सांगितला आहे. असें न करशील तर सर्व लोकांमध्यें तुझी उपहास्यता होईल. क्षत्रियानीं कठोर हृदय धारण करावें; शिथिलमन धारण केलें असतां तत्काल नाश पावतात. व्याध जसा मृग धरण्या करितां कांहीं भक्षणाची लालूच दाखवून कपटानें मृगजाळ्यामध्यें धरतो तशी दुर्योधनास कांहीं तरीं राज्य संबंधीं लालूच दाखवून शेवटीं युद्ध करून राज्य घेऊं. पूर्वीं देवांनीं आपले भ्राते जे असुर यांस कपटानें व बुद्धिकौशल्यानें पराजित करून स्वर्गाचा जसा उपभोग केला तसा मी गदायुद्धामध्यें व अर्जुन धनुर्विद्येमध्यें प्रवीण आहों त्यास तूं आह्मां दोघांच्या साहाय्यानें अनेक प्रकारच्या कल्पना करून तूं दुर्योधनापासून राज्य घेण्याची उमेद धर. जसा सूर्य आपल्या किरण द्वारा अंधःकाराचा नाश करून सर्व प्रजेस सुख देतो तसा तूं राजा पृथ्वीचें राज्य संपादन करून सर्व प्रजेस अतिशय सुख दे, हाच तुझा पुरुषार्थ आहे. मोह, कार्पण्य किंवा लोभ इत्यादिकें करून व्याप्त होऊन प्रजा पालनरूप कार्य जर न करशील तर परलोकीं मोठें संकट पावशील आणि राजसूय यज्ञामध्यें ब्राह्मणानीं जी तुझी पराक्रमाची पूर्वीं स्तुती केली होती ती सर्व व्यर्थ हो

स्य. राजसूय यज्ञामध्यें ब्राह्मणांस ग्राम, गाई, व द्रव्य देऊन तूं परम संतुष्ट केलेंस तो तूं आज मोठ्या संकटा मध्यें निमग्न झालास; याचें कारण तूं दुर्योधनाशीं युद्ध करण्यास दृढ मन करीत नाहींस हेंच होय. जसें कुत्र्याच्या चर्मा मध्यें दूध ठेवणें, शूद्रास वेद अर्पण करणें, चोराचें भाषण सत्य मानणें अथवा स्त्रीच्यािठायीं बल असणें तसें दुर्योधनास राज्य असणें निरर्थक होय. हे राजा, आतां माझी एवढीच प्रार्थना आहे कीं, शस्त्रास्त्रां सहित उत्तम रथामध्यें आरूढ होऊन ब्राह्मणांचा आशीर्वाद घेत घेत आह्मां सहवर्तमान दुर्योधनाशीं युद्ध करण्यास हस्तनापुराकडे चल. अर्जुनाच्या गांडिव धनुष्या पुढें देवां सहवर्तमान इंद्र स्पर्द्धा-पराभव पावेल. माझी गदा शत्रूनीं पाहिली असतां ते तत्काल भिऊन मरण पावतील. शत्रू पासून पराजयाची शंका किमपी न बाळगतां रथारूढ होऊन लौकर हस्तनापुरा कडे चल आणि धनंजय, केकय, रुष्णी यांच्या मनाचा उत्तम प्रकारें संतोष ठेव हाच उपाय तूं आतां योजावा. याहून दुर्योधनाच्या शासना विषयीं दुसरा उपाय नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

३४ अध्याय चवतीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीमसेनाचें भाषण ऐकून युधिष्ठीर मोठ्या धैर्यानें भाषण करितो हे भीमा, तूं निरंतर वाक्शल्यानें माझी निर्भर्त्सना करितोस येणे करून माझे मनास दुःख होतें. कपट द्यूता मध्यें हा दुष्ट शकुनी मला पराजित करील हें पूर्वी मी जाणलें नाहीं. मायावी शकुनीनें कपटाक्ष निर्माण करून सभे मध्यें आह्मांस जिंकून दासा सारखें दीन केलें आणि पुनः द्यूत खेळून तेरावर्षें पर्यंत वनवास करावा ह्मणोन ठरवून घेतलें. ज्याकाळीं द्यूतामध्यें विपरीत भाव दृष्टीस पडला तें ह्मांच मी पुरे करावें; परंतु पुरें न करितां द्यूत पराजयाच्या क्रोधानें पुनः खेळण्यास प्रवृत्त झालों. नंतर पुनः तेरा वर्षें पर्यंत वनवास करण्याची प्रतिज्ञा करून खेळण्यास आरंभ केला असतां त्यांतही पराजित झालों तेव्हां आपल्या वाक्यास अप्रमाण्य न यावें व धर्माची ग्लानी नव्हावी ह्मणोन आपली प्रतिज्ञा सत्य करण्या करितां तुह्मां सहवर्तमान वनाम-

ध्यें आलों. नाहींतर इतकें ज्ञान नाहीं काय? राज्य परित्याग करून वनवास संबंधीं दुःखें भोगावीं, परंतु काय करूं, पौरुष मान किंवा शौर्य येणे करून ती प्रतिज्ञा व्यर्थ करण्यास मी योग्य नाहीं. हे भीमसेना, येणे करून मी तुझ्या वाक्याची निंदा करितों असें नाहीं, परंतु एकदां ज्याचा अंगिकार केला त्याचा त्याग करणें हें आमच्यासारख्यास योग्य नाहीं. यानंच काय होईल तें होवो. जें भवितव्य होणार तें चुकत नाहीं असें माझ्या बोलण्याचें तात्पर्य आहे, माझ्या करितां तूं, अर्जुन, नकूल, सहदेव, व द्रौपदी यांस वनवास दुःख सोसणें प्राप्त झालें हें खरें; परंतु तुमचा व माझा भ्रातृस्नेह आहे ह्मणोन माझा परीत्याग करणें तुह्मास योग्य नाहीं. जेव्हां मी द्यूतास प्रवृत्त झालों तेव्हांच तूं मला प्रति बद्धक कां झाला नाहींस? तें न करितां आतां व्यर्थ वाक् शरानें कां माझी निर्भत्सना करतोस बरें! आतां मी आपली प्रतिज्ञा सत्य करून शेवटीं आपल्या पौरुषानें दुर्योधनास युद्धामध्यें पराजित करून तुह्मां सहवर्तमान निष्कंटक पृथ्वीचें राज्य करीन, याविषयीं तुह्मीं कांहीं मनांत शंका धारण करूं नका; परंतु तें करण्यास आतांच मी समर्थ नाहीं; कालप्रतीक्षा अवश्य केली पाहिजे. सांप्रत आपला न्यून काल आहे ह्मणोन आपलें पौरुष कोठेंच चालणार नाहीं. जसा शेतकरी पृथ्वी मध्यें बीजारोपण करून धान्य उगवण्याची मार्ग प्रतीक्षा करीत असतां शेवटीं तें बीज त्यास मिळून कृतकार्य होतो तसें भीमसेना, आपल्यास काल अनुकूल होई पर्यंत आपण तशीच मार्ग प्रतीक्षा करून वना मध्यें स्वधर्मानें कालक्षेप करूं आणि विजय काल आला ह्मणजे दुर्योधना पासून राज्य घेण्यास आपल्यास कांहीं विलंब लागणार नाहीं. हें सर्व जगत कालानें व्याप्त आहे, कालें करून सर्वांचा नाश व अभ्युदय होतो. कालच सर्वांचा जनक व मारक आहे यास्तव सर्वांनीं कालाची मार्ग प्रतीक्षा करावी काल प्रतीकूल जर आहे तर आपलें पौरुष कितीही असो चालणार नाहीं; तोच अनुकूल झाला ह्मणजे स्वल्प आयासानें महत्कार्यसिद्धीस जातें, आपले मित्र आपल्यास साह्य होतात, शत्रू सर्व नम्र होतात देवासुरांस देखील कालानें सोडिलें नाहीं. ह्मणोन हे भीमसेना, तुझी मी प्रार्थना करितों कीं धैर्य धारण कर, उत्सुकल पणा सोड. आपल्या अभ्युद

ये झाली सर्व आपलें यथास्थित होईल. राज्यश्रीचा उपभोग उत्तम प्रकारें क रूं. लोकांमध्यें आपलें यश व कीर्ती प्रसिद्ध होईल सर्व शत्रू क्षय पावतील. असा विषय या अध्यायांत आहे.

३५ अध्याय पस्तीस.– भीमसेन भाषण करितो हे धर्मराजा, काल प्रतीक्षा करावी ह्मणजे आपलें कल्याण होईल. सर्व मनोरथ सिद्ध होतील. असें तूं भाषण करतोस तेव्हां कालाची गती फार सूक्ष्म आहे प्रतिक्षणी काल विचित्र येतो. गेलेला काळ पुनः माघारा येत नाहीं, आयुष्याची मर्यादा कोणाची किती आहे हें कोणी जाणत नाहीं. कार्याची वेळ जवळ आली असतां तिचें उल्लंघन करूं नये. निमिषमात्रानें मनुष्याचें आयुष्य कमी कमी होत जातें. तेव्हां पुरुषानें आज कर्तव्य कार्य तें मी उद्यां करीन असें ह्मणून व्यर्थ काल घालऊं नये. कार्य कर्तव्य असेल तें मनामध्यें आलें ह्मणजे तात्काल त्याचा उद्योग करावा. आतां तूं ह्मणतोस कीं, काल प्रतीक्षा करावी, परंतु ज्यास आयुष्याचें ज्ञान तो कदाचित असें भाषण करील, दुसरा कोणी तुझ्या सारखें भाषण करणार नाहीं. हे युधिष्ठिरा, उगीच व्यर्थ आयुष्य घालवून कालाची मार्ग प्रतीक्षा करतोस तुला काय ह्मणावें. प्राण्यास मरण हें नित्य आहे, केव्हां प्राप्त होईल याचा भरवसा नाहीं, यास्तव दुर्योधना पासून आपलें राज्य घेण्यास सर्वांनीं लौकर सिद्धता करावी, जो मनुष्य आपला पराक्रम लोकांस दाखवून प्रसिद्धीस येत नाहीं त्याचें जीवित्व व्यर्थ होय. स्वल्प बलवान असतांही जो आपल्या पराक्रमानें वर्ततो त्याची ख्याती लोकांमध्यें बहुत होते. हे धर्मराजा, तूं तर बाहुबलानें लोकांत विख्यात, कीर्तीमान असतां आपलें राज्य दुष्टाचे हातीं गेलेलें तें माघारें घेण्यास इच्छित नाहींस त्यापेक्षां या लोकीं व परलोकीं तुझी कशी गती होईल हें मी कांहीं जाणत नाहीं. मला तर तुझी ही वृत्ती पाहून पराकाष्ठेचा संताप झाला तेणे करून रात्रं दिवस निद्रा येत नाहीं. तसाच हा पार्थ युद्ध विषयीं कुशल असतां ही तुझें सौख्य पाहून परम संतप्त झाला आहे. महान् डोहामध्यें सिंह पडला असतां जसें त्याचें पौरुष चालत नाहीं तसें तुझ्या मूर्खता मुळें अर्जुनाचें पौरुष हीन झालें. तसेच नकुल सहदेव व द्रौपदी तुझी मूर्ख वृत्ती पाहून प

नामध्यें संतप्त होऊन जडमुक्का सारखीं उगीच बसलीं आहेत. हे सर्व बांधव तुझ्या जयाची व प्रिय होण्याची इच्छा करितात आणि मी मात्र भाषणें करून तुला दुष्टा सारखा दिसतों, परंतु हें माझें वाक्य कधींही व्यर्थ होणार नाहीं; तुझ्या करितां आह्मीं सर्व दुःखसागरांत निमग्न झालों. नीचानीं तुझें राज्य हरण केलें तेणे करून तुला ही पापी वृत्ती स्वीकारावी लागली; परंतु तूं तर स्वस्थभावानें व क्षांतीनें दुर्योधनाचा प्रतीकार करण्यास इच्छित नसून त्याणें दिलेल्या दुःखाचा अंगिकार करतोस तेव्हां तुझ्या सारखा जडबुद्धी कोण आहे बरें? वैदिक ब्राह्मण व मूर्ख यांची बुद्धी जशी जड असते तशी तुझी बुद्धी जड झाली. मला वाटतें तूं क्षत्रिय कुलांत उत्पन्न झाला नाहींस ब्रह्मकुलाधंम प्राणी उत्पन्न झाला असशील. जो क्षत्रिय कुलांत उत्पन्न झाला त्याच्यानें अशी क्षमा कधींव्हावयाची नाहीं. मनुस्मृती अशी आहे कीं, क्षत्रियानीं निरंतर क्रूर असावें आणि आपले घातकी व दुराचारी शत्रू असतील त्यांचा तत्काल नाश करावा हें तुला ठाऊक असतां दुष्ट जो दुर्योधन याचे अपराध क्षमा करून अजगरासारखा उगीच कां बसलास? द्वादश वर्षें पर्यंत वनवास व एक वर्ष अज्ञात वास करूं ह्मणोन जी दुर्योधना पाशीं प्रतिज्ञा केलीस ही कशी सिद्धीस जाईल. आपण पराक्रमी व सर्वलोकांत विख्यात असतां आपल्याच्यानें अज्ञात वास कसा होईल; हिमाचल पर्वत तृणमुष्टीनें आच्छादन करण्यास जसा असमर्थ तसे आपण अज्ञात वास करण्यास असमर्थ आहोंत. तस्मात् ही प्रतिज्ञा तुला सत्य करणें असल्यास दुर्योधना पासून राज्य घेणें हें तुझे हातून कधींही घडणार नाहीं. मी सांगतों या विचारानें वागलास तर राज्यश्रीतें लौकरच प्राप्त होशील. मी अनृत भाषण केलें अशी सर्व लोकांमध्यें प्रसिद्धी होईल ही तुझ्या मना मध्यें शंका येत असल्यास त्याचे प्रायश्चित्तार्थ मोठ मोठ्या साधूंस अन्नदान कर अथवा वृषभास तृणदान कर तेणें करून अनृतजन्य पातका पासून मुक्त होशील. असें धर्मशास्त्र आहे ह्मणोन हे धर्मराजा, शत्रूचा प्रतीकार करण्याची आतां इच्छा धारण कर; क्षत्रियांचा धर्म युद्ध करावें हाच होय. हीन वृत्तीतर क्षत्रियानीं कधींच धरूं नये. असा विषय

त्या अध्यायांत आहे.

३६ अध्याय छत्तीस— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीमसेनाचें भाषण ऐकून धर्मराज श्वासोच्छ्वास टाकीत मनांत ह्मणतो कीं, वर्णाश्रम धर्म व सर्व धर्मांचा ज्ञाता मी आहें. मेरुपर्वत जसा पायानें मर्दन करण्यास अशक्य तसा धर्मत्याग करणें हें मला अशक्य असतां भीमसेन मला धर्म त्याग करण्या विषयीं उपदेश करतो हें मोठें आश्चर्य आहे. असा मनांत विचार करून गंभीर वाणीनें भाषण करतो हे भीमसेना, मी तुला एक गोष्ट सांगतों तेणें करून तुझ्या संशयाची निवृत्ती होईल. पहा बरें, पापाचीं फलें येण्यास कधीं चुकत नाहींत असा निश्चय आहे. त्याचा अनुभव ही सर्वांस आहेच. सर्व अनर्थ पापा पासून उत्पन्न होतात जो कोणी विचार केल्या वांचून एका एकीं साहास कर्म करण्यास प्रवृत्त होतो त्याचा तत्काल नाश होतो, विचार पूर्वक धैर्यानें व मसलतीनें ज्या कार्यास आरंभ केला असेल तें कार्य निरविघ्न सिद्धीस जातें. त्यास दैवही अनुकूल झालें पाहिजे. जो कोणी त्वरेनें, मोहानें अथवा मदोन्मत्त पणानें कार्य करण्यास उद्युक्त होतो त्याचें कार्य सिद्ध होत नाहीं. येवढ्या करितां कोणतें ही कार्य विचारा वांचून करूं नये. सूक्ष्म विचारानें तूं पहा कीं, भूरीश्रवा, शल्य, जलसंध, भीष्म, द्रोण, कृपाचार्य, कर्ण, अश्वत्थामा व दुसरे ही कितीएक आपले विरोधी राजे महान् पराक्रमी व युद्ध कुशल धृतराष्ट्र पुत्रांस साह्य झाले आहेत तेव्हां या कालीं आपण धृतराष्ट्र पुत्रांशीं युद्धास प्रवृत्त झालों तर तत्काल ते आपला पराभव करतील. धृतराष्ट्र पुत्र तर साहाय्यानें, द्रव्यानें व गुणानें युक्त आहेत; आपणा जवळ कांहींच सामग्री सिद्ध नाहीं तेव्हां आपण एकाकी त्याच्यांशीं संग्राम केला तर कसा जय होईल. यद्यपी भीष्म, द्रोण, कृपाचार्य, यांचा आपल्याशीं द्वेष नाहीं, परंतु दुर्योधनाचें अन्न भक्षण करतात त्यापेक्षां आमच्याशीं ते युद्ध करण्यास कधींही अनमान करणार नाहींत, असें स्पष्ट दिसतें. भीष्म प्रभृती दिव्यास्त्र जाणणारे, धर्मपरायण, इंद्रादि देवांनीं ही पराभव करण्यास अशक्य त्यांचा पराजय आपल्याच्यानें कसा होईल. तसाच हा सूतपुत्र कर्ण, सर्वास्त्र जाणणारा, अभेद्य, कवचधारी संग्रामा

मध्यें शत्रूनीं जिंकण्यास अशक्य, हस्तचापल्यानें सर्व धनुर्धऱ्यांमध्ये श्रेष्ठ व मोठा विख्यात तो दुर्योधनास साह्य झाला आहे तेव्हां त्याचा पराभव आपण यत्किंचित कसा करूं हा विचार तूं मनामध्यें कसा करीत नाहींस? या योध्यांचा पराक्रम व अधिकार पाहून मला मोठी चिंता उत्पन्न झाली तेणेंकरून निद्राही कधीं येत नाहीं. असें धर्मराजाचें भाषण ऐकून भीमसेन धर्मराजाच्या वाक्याचा तिरस्कार करून उगीच स्तब्ध बसला. इतक्यांत महायोगी सत्यवतीसुत व्यास, अकस्मात् प्राप्त झाले. हें धर्मराजानें पहातांच तत्काल यथाविधी त्याची पूजा करून आसनावर बसविलें. त्याकालीं व्यास, धर्मराजास बोलतात हे महाबाहो धर्मराजा तुझ्या हृदयांतील गोष्ट जाणोन मी एकाएकीं येथें आलों. भीष्म, द्रोण, कृपाचार्य, कर्ण, अश्वत्थामा, दुर्योधन व दुःशासन यां पासून तुला जें भय प्राप्त झालें त्याचा त्याग कर आणि धैर्य धरून तुझ्या मनामध्यें संताप ज्वर उत्पन्न झाला त्याचा नाश कर, दैवानें सर्व तुझें यथास्थित होईल. तूं कशाविषयींही चिंता करूं नको. असें भाषण करून एकांतीं धर्मराजास नेऊन पुनः बोलतात हे राजा, तुला प्रतिस्मृती नामक विद्या सांगतों त्या विद्येच्या योगें तुझें बहुत कल्याण होईल. शत्रूचा तूं पराभव करशील. ज्या विद्येच्या योगानें पार्थ राज्यसंपादन करील. तो अस्त्रांकरितां इंद्र, रुद्र, वरुण, कुबेर यांजकडे जावो-ह्मणजे ते सर्वविद्येचा त्यास उपदेश करतील. तो साक्षात् नराचा अवतार आहे, भगवान् श्रीकृष्ण त्याला साह्य होऊन तो सर्वांचा नाश करील. आणि रुद्र, इंद्र व लोकपाळां पासून शस्त्रास्त्र विद्या प्राप्त होऊन मोठें अघटित कर्म करील, असें व्यासानीं धर्मराजास सांगून ते पुनः बोलतात; तुह्मीं एकाच वनामध्यें बहुत दिवस वास करूं नका. ऋषी, मृग व पक्षी इत्यादिकांस अतिवास केल्यानें बहुत दुःख होतें. तुह्मांस बहुत दिवस वनांत कालक्षेप करावयाचा येव ह्या करितां दुसरें वन पाहून तेथें तुह्मीं राहा. असें धर्मराजास सांगोन व प्रतिस्मृती नामक विद्यासांगून व अर्जुनास विचारून वेदव्यास तेथेंच अंतर

पावले. नंतर धर्मराजानें ती विद्या स्वीकारून निरंतर तिचा अभ्यास करीत करीत द्वैत वनांतून निघून सरस्वतीतीरीं काम्यकवनीं येऊन राहिला. समागमें ब्रह्मविद्याविशारद तपस्वी ब्राह्मण हजारों होते. तेथें निरंतर वेदशास्त्र व धनुर्विद्या इत्यादिकांचा घोष चालत असे. संपूर्ण पांडव निरंतर मृगवध करून देव, पितर व ब्राह्मण यांचा यथाविधी संतोष करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

३७ अध्याय सदतीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धर्मराज भ्रात्यां सहवर्तमान काम्यक वनीं रहात असतां एके दिवशीं व्यासानीं दिलेल्या मंत्राची राजास स्मृती होतांच हा मंत्रोपदेश अर्जुनास करावा हें योग्य असा मनामध्यें निश्चय करून एकांत स्थलीं त्यास नेऊन भाषण करितात हे अर्जुना, व्यासानें मला ब्रह्मविद्येचा उपदेश केला, तो मी तुला करितों कारण भीष्म, द्रोण, कृपाचार्य, कर्ण, अश्वत्थामा हे योद्धे धनुर्विद्येंत परम निपुण दुर्योधनास साह्य झाले आहेत तेव्हां यां सहवर्तमान तूं युद्ध करण्यास अल्पविद्वान् कसा समर्थ होशील? धृतराष्ट्र पुत्रानीं तर त्यांचा पराकाष्ठेचा संतोष ठेवून आपल्यास वश करून घेतलें आहे, दुसरेही संपूर्ण राजे दुर्योधनास वश होऊन आपल्या नाशास प्रवृत्त आहेत तेव्हां आपण या योध्यांचा कसा पराभव करूं? आपल्यास संपूर्ण विद्या ज्ञात नाहींत याजकरितां व्यासानीं मला दिलेल्या ब्रह्मविद्येचा तुला उपदेश करतों ह्मणजे तिच्या योगानें तूं इंद्रलोकास जाऊन इंद्र, वरुण, कुबेर इत्यादि अष्टदिक्पालांचें ही मन संतुष्ट करून त्यांजपासून नाना प्रकारच्या विद्या ग्रहण कर. कारण आमचा सर्व भरवसा तुझ्यावर आहे, आह्मां सर्वांस तूं अत्यंत प्रिय आहेस ह्मणोन ही विद्या तूं ग्रहण केली असतां या संकटापासून तूं आह्मांस मुक्त करशील. आतां तपयोगें करून युक्त होऊन धनुष्य, कवच व खड्ग धारण करून मौनव्रत धारण कर आणि विद्या ग्रहण करण्या करितां उत्तर दिशेस मुख कर. असें ह्मणोन व्यासानीं शिक्षित जी विद्या ती धर्मानें अर्जुनास दिली आणि सांगितलें कीं, पूर्वी वृत्रासुराच्या भयानें सर्व देव भयाभीत होऊन आपलें बल इंद्रापाशीं ठेऊन पळून गेले. इंद्रानें त्या देवबलाचें एक अस्त्र निर्माण करून वृत्रासुराचा व-

ध केला तें अस्त्र इंद्रा पाशीं आहे तें तूं इंद्रा पासून घे. तुला तें देण्यास इंद्र आळस करणार नाहीं असा त्या ब्रह्मविद्येचा प्रभाव आहे. असें धर्मराजानें भाषण ऐकून अर्जुनानें धनुष्यबाण व कवच धारण करून मौनव्रत धारण केलें आणि ब्राह्मणासहवर्तमान अग्नीमध्यें हवन करून ब्राह्मणास सुवर्णदान केलें असतां संपूर्ण ब्राह्मणानीं अर्जुनास आशिर्वाद दिला. अर्जुनानें ब्राह्मणाचा आशीर्वाद ऐकून तो श्वासोच्छ्वास टाकीत धृतराष्ट्र पुत्रांच्या वधाची मनामध्यें चिंता करून चोंहीं कडे पाहूं लागला असतां त्या कालीं अर्जुनास धर्मराज भाषण करितात हे अर्जुना, तुझें मनेच्छीत कार्य लौकरच सिद्ध होऊन तूं माघारा येशील कांहीं चिंता करूं नको. तुला माझा पूर्ण आशीर्वाद आहे, आकाशामध्यें गंधर्व, यक्ष, किन्नर याणीही अर्जुनास आशीर्वाद दिला. नंतर अर्जुनानें द्रौपदीकडे पाहिलें असतां त्या कालीं सर्व पांडवांच्या मनातील अभिप्राय जाणोन द्रौपदी बोलली हे कौंतेया, ब्राह्मणाच्या भैक्षीक जीविकेनें क्षत्रियानीं कधींही उपजीविका करूं नये. आमच्या कुलांत भिक्षेनें जीविका करणारा असा क्षत्रिय कधींही उत्पन्न झाला नसेल ती जीविका अर्जुना, आपल्यास प्राप्त झाली. येणें करून माझें मन फार दुःखीत आहे, असो तें कदाचित् मी सहन करीन, परंतु हा कुरुकुलाधम धृतराष्ट्र पुत्र दुर्योधन सभेमध्यें मला तूं दासी आहेस म्हणोन भाषण करून त्यानें माझा बहुत प्रकारें छल केला, आणि तुह्मी पराक्रमी युद्धनिपुण असतां तुमचीही बहुत प्रकारें निंदा करून सभेमध्यें तुह्मांस दासा सारखे केलें. हें दुःख अर्जुना मला फारच झालें आहे. या दुःखाची शांती तुझ्या वांचून दुसरा कोणी करणारा नाहीं. आतां तूं प्रवास करण्याचा उपक्रम काढिलास तेव्हां आमचें रक्षण कोण करील. सर्व भरवसा तुझ्यावर आहे तो तूं आज आमचा त्याग करून चाललास. बरें असो ज्या कार्यास जातोस तें कार्य लौकर संपादन करून माघारा ये. तुझें कल्याण असो. राज्य, द्रव्य, अलंकार याचा उपभोग करावा. अशी इच्छा मनांतून माझी नाहीं; परंतु ज्या दुष्ट धृतराष्ट्र पुत्रानें वाक् निर्भत्सना करून आपल्यास अगदीं अधम करून टाकिलें त्या दुष्टाचा नाश झाला ह्मणजे मी सर्व ऐश्वर्य उपभोग

लक्ष्मीनें पावन्वें. आतां तूं लौकर जा, मार्गांत जे बलवान् असतील त्यां च्या शीं स्पर्धा करून को विजयी हो. ब्रह्मदेव सृष्टीकर्ता तुझें कल्याण क- रो. ऱ्ही, श्री, कीर्ती, धृती आदिकरून सर्व देव व देवता तुझें रक्षण करोत. असा द्रौपदीनें आशीर्वाद देऊन ती उगीच स्तब्ध बसली नंतर अर्जुनानें आपल्या भ्रात्यांस व धौम्यास प्रदक्षिणा करून ऐंद्र योगावर गमन केलें. नाना प्रकारचे देश, वनें व उपवनें यांस उल्लंघन करून वायु सारख्या वेगा नें एक दिवसांत हिमालयावर गेला. तेथून गंधमादन पर्वतावर जाऊन ते थून इंद्रकिल नामक पर्वतीं गेला. तेथें कांहीं काल विश्रांती केली तों अशी- आकाशवाणी ऐकिली कीं, अरे तूं कोण कोठें जातोस? उभा राहा इतके शब्द- ऐकतांच अर्जुन चोहींकडे पाहूं लागला तों एक वृक्षाखालीं एक तपस्वी, ब्राह्मी श्रीनें सुशोभित, जटा वलकलें धारण केलेला दृष्टीस पडला. नंतर तो त- पस्वी अर्जुनास बोलतो अरे धनुष्य बाण, कवच इत्यादिक धारण करू- न क्षत्रिय धर्माभिमानी तूं कोण? येथें कशाकरितां आलास? हें स्थान शां- त, दांत, तपस्वी यांचें होय येथें धनुष्य बाणाचा काय उपयोग आतां या ध- नुष्याचा त्याग करून योग युक्त होऊन उत्तम गतीस जा. हा क्रूर धर्म धरूं नको ब्रह्मतेज धरून मोठ्या धैर्यानें या पर्वतावर राहा. असें त्या तप स्व्याचें वाक्य ऐकून धनंजय नम्र होऊन हस्त जोडून भाषण करतो हे- ब्रह्मन्, मी पांडुपुत्र अर्जुन नामक क्षत्रिय आहें, इंद्रलोकास जाऊन शस्त्र विद्या संपादन करून पुनः आपले स्थानीं जावें असा निश्चय करून येथें आलों. इतकें अर्जुनाचें वाक्य ऐकतांच तपस्वी किंचित् हास्य करून भा षण करतो अरे अर्जुना, इंद्र तो मीच जो तुला इच्छित वर मागणें असेल- तो माग मी देण्यास सिद्ध आहें. असें तपस्व्याचें भाषण ऐकून अर्जुन- बोलतो हे सहस्राक्षा, मी लोभें करून, कामें करून अथवा ऐश्वर्या करितां मी शस्त्रास्त्र विद्या संपादन करतों असें नाहीं; माझे भ्राते अरण्यामध्यें मोठ्या संकटांत पडले आहेत तें संकट निवारण होण्या करितां या अस्त्र विद्येचें मी ग्रहण करितों ही माझी इच्छा पूर्ण झाली ह्मणजे मी सर्व ऐश्व र्य, इंद्रलोक, गंधर्व लोक मिळविले. हें कार्य मी संपादन न केलें तर सर्व लो

कांमध्यें माझी बहुत अपकीर्ती होईल. असें अर्जुनाचें भाषण ऐकून मधुर वाणी नें इंद्र भाषण करतो हे अर्जुना, भूतेश शूल धारी जो शिव याचें दर्शन कर ह्मणजे तुलामी शस्त्रास्त्र विद्येचा उपदेश करीन. शिवाच्या दर्शनाचा तूं उद्योग कर त्याच्या दर्शनें करून तूं स्वर्गास येण्यास समर्थ होशील. असें अर्जुनास सांगून इंद्र तत्काल तेथेंच अंतरधान पावल्यानंतर अर्जुनही त्याच पर्वतावर योग समाधी करून शिवाचें ध्यान करीत बसला. असा विषय या अध्यायांत आहे.

३८ अध्याय अडतीस.— जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायन ऋषे, दीर्घबाहू अर्जुन अस्त्रविद्या संपादन करण्या करितां हिमालयं पर्वतीं जाऊन किती दिवस राहिला? शस्त्रास्त्र विद्या कोणत्या प्रकारें साध्य करून भगवान् शिवाचा त्याणें कसा संतोष केला; हें पार्थाचें अद्भुत चरित्र मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन बोलतात हे जनमेजया; महात्म्या पार्थाचें अद्भुत चरित्र तुला सांगतों, स्वस्थ अंतःकरणानें ऐक. महात्मा पार्थ इंद्र व शंकर यांचें दर्शन करण्या करितां धर्मराजाची आज्ञा घेऊन दिव्य धनुष्य बाण व खड्ग धारण करून उत्तर दिशेस हिमालय पर्वताच्या शिखरावर मोठ्या त्वरेनें जाऊन नाना प्रकारच्या लता, पुष्प, फलें ईहीं करून सुशोभीत, पक्षी गणानीं नादित व मृग समुदायानीं व्याप्त असें पर्वताचें शिखर पहात पहात पुढें चालला. तों आकाशांत शंख, भेरी व मृदंग यांचे शब्द होऊं लागले. अर्जुनाच्या मस्तकावर पुष्पांचा वर्षाव झाला. मेघानीं आच्छादित आकाश सुशोभित दिसूं लागलें. असे चमत्कार अर्जुन पहात पहात हिमालय पर्वताच्या पृष्ठभागीं गेला आणि तेथें गगनचुंबित वृक्षें करून व्याप्त, वैडूर्य मण्या सारख्या स्वच्छ जलाशयें करून सुशोभित, हंस, कारंड व कोकिल, सारस, क्रौंच, मयुर इत्यादिकांच्या मंजुळ शब्दें करून नादित व सुशोभित वन पाहून त्यामध्यें एक रमणीय सरोवर पाहून पृथ्वीवर शुष्क पर्णाची शय्या करून ब्रह्मचर्य व्रत धारण करीत होत्साता मनामध्यें भगवान् शिवाच्या दर्शनाची इच्छा धरून पर्णशय्येवर बसला आणि त्यानें तप आरंभिलें. तीन दिवस अतिक्रमण करून एके दिवशीं

क पणे भक्षण करावीं याप्रमाणें दोनमास अतिक्रमण करून तिसरे मासीं एक दिवस अतिक्रांत करून आहार करावा. चौथेमासीं वायुभक्षण करीत उर्ध्व बाहू पादांगुष्टानें पृथ्वीस स्पर्शकरून ध्यानस्थ उभें राहावें. याप्रकारें अर्जुनाचें उग्रतप पाहून हिमाचल पर्वतनिवासी ऋषी श्रीशंकराच्या अग्रभागीं गेले आणि पार्थानें दुष्कर कर्म सांगण्याच्या हेतूनें बोलूं लागले. हे शंकरा,- अर्जुनानें हिमालयाच्या पृष्ठ भागीं घोरतप आरंभिलें आहे त्याच्या प्रभावें- करून च्यारीदिशा धूम्रवर्ण झाल्या आहेत, असें घोरतप पाहून आह्मांसमोठा त्रास उत्पन्न झाला आहे. हा कशाकरितां तपकरितो याचें कारण आह्मांस कांहीं कळत नाहीं. असें त्या ऋषीचें वाक्य ऐकून श्रीशंकर बोलतात हे ऋषी हो, तुह्मीं अर्जुनाविषयीं विषाद धरूंनका निर्भयपणें आपल्या आश्रमीजा. अर्जुन कशाकरितां तप करितो त्याचे मनातील संकल्प मीजाणिला. त्यास- स्वर्गाची, ऐश्वर्याची व आयुष्याची इच्छानाहीं. अ. वि. या अ. आहे.

३९ अध्याय एकुणचाळीस- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सर्व ऋषी मंडळी श्रीशंकराची आज्ञा घेऊन आप आपले आश्रमीं गेली असतां भगवान् शिव सर्वपापाचें हरण करणारे यांणीं कांचनासारखा सुशोभित दुसरा मेरुपर्वतच्च काय असा किरात वेष धरून हस्तामध्यें महान धनुष्य व सर्प विषासारखे भयंकर बाणही घेतले त्या कालीं मूर्तिमंत साक्षात् देह धरून अग्नीच आलाकाय! असा शिव दिसूं लागला. तशीच उमा पार्वती शंकरा सारखाच्च किरात वेष धरून शिवा बरोबर होती. नाना प्रकारचे भयंकर वेष धरून प्रमथादिगण शिवाचे आसमंतात भागीं भयंकर शब्द करीत होते, पार्वती बराबर ही किरातांच्या बहुत स्त्रिया होत्या त्यां सहवर्तमान शंकर पार्वती वनांत संचार करीत असतां इकडे दनूचा पुत्र मुकनामा कपटानें सूकराचा वेष धरून अर्जुनास मारण्यास प्रवृत्त झाला. हें अर्जुनानें जाणोन तत्काळ सर्पविषासारखा एक बाण भात्यांतून काढून गांडीव धनुष्यास लाऊन टाकते वेळेस तो सूकरास बोलतो अरे मूर्खा सूकरा, तूं मला मारण्याची इच्छा धरून येथें आलास तर आजच तुला मारून यमाचे गृहीं पाठवितो. असें भाषण करून तत्काळ तो बाण सूकरावर टाकिला. इतक्यांत किरात ही तेथें

येऊन भाषण करूं लागला कीं, अरे हा सूकर मी मारीन अशी प्रतिज्ञा पू-
र्वीच मी करून त्याजवर बाण टाकीत असतां माझी आज्ञा भंग करून तूं-
कां पूर्वी बाण टाकितोस? असें भाषण करून किरातानें ही सूकरावर बाणप्र
हार केला. तेव्हां उभयतांचे प्रहार एकदा होतांच सूकर विदीर्ण शरीर होऊन
तत्काल मरण पावला आणि उभयतांच्या बाणाचे मोठे भयंकर शब्द हो
ऊं लागले. कांचनासारखा देदीप्यमान किरात वेष धारण केलेला पुरुष -
स्त्री सहवर्तमान पाहून अर्जुन किंचित् हास्ययुक्त होऊन भाषण करूं लाग
ला कीं, अरे तूं कोण या शून्यवनांत स्त्रीसहित किरातवेषानें फिरतोस, अ
शा भयंकर अरण्यांत तूं कसा भय पावत नाहींस? या वराहास मी पूर्वी प्रहार
केला असतां नंतर तूं कसा केलास? हा कामरूपी राक्षस माझा प्राण घेण्या
करितां आला होता. याजकरितां मी त्यास मारला. असें असतां तूंही त्याजव
र प्रहार केलास तर हा मृगया धर्म नव्हे; असें जर करशील तर तूं आपले प्रा
णास मुकशील. असें अर्जुनाचें भाषण ऐकून किरात किंचित् हास्य युक्त होऊ
न मृदुवाणीनें भाषण करतो हे पुरुषा, तूं माझ्या विषयीं संदेह धरूं नको. हें
वन आमचें आहे या वनांत आह्मी निरंतर रहातों; परंतु तूं कोण या घोर अ
रण्यांत आलास. येथें रहाण्याची तुला कां इच्छा झाली? तुझें शरीर तर सकु
मार सुशोभित दिसतें; कशा करितां शून्य वनांत आलास हें सांग? त्या का
लीं अर्जुन बोलतो गांडिव धनुष्याच्या आश्रयें करूनच या अरण्यांत मी सं
चार करण्यास समर्थ आहें, हा राक्षस वनांतील वराहाचें रूप धरून मला
मारण्या करितां आला होता ह्मणोन त्यास मी बाणप्रहार करून मारलें. अ
सें अर्जुनाचें भाषण ऐकून किरात भाषण करतो. अरे या सूकरास तर मी
तुझ्या पूर्वी बाण मारला त्या योगानें हा मरण पावला, नंतर तूं बाण प्रहार के
लास. असें असतां माझ्या बाणानें सूकर मरण पावला ह्मणोन तूं कसें बोलतो
स? दुसऱ्याच्या बलाची उपहास्यता करून बल दर्पित होऊन आपली प्रशंसा-
वर्णन करितोस त्यापेक्षां तूं मूर्ख आहेस आतां तुजवर बाणाचे प्रहार करितों.
तूं स्थीर हो व तूंही प्रहार कर. असें किरातानें भाषण ऐकून अर्जुन बोलतो माझ्या अग्र
भागीं तूं उभा मात्र रहा. असें अर्जुनानें भाषण करून नंतर भात्यांतील बाण

टून किरातावर वृष्टी केली असतां तित केही अर्जुनाचे बाण निःफल करू
न किरात बोलला हे मूर्खा,टाक आणखीं टाक हाच तुझा पराक्रम, तुझ्या बाणा
नीं तर मला कांहींच व्यथा होत नाहीं.असें किरातानें भाषण ऐकून पुनः अ
र्जुनानें मोठ्या निकरानें बाण वर्षाव केला असतां तोही व्यर्थ झाला. नंतर-
किरातानें अर्जुनावर बाणवृष्टी केली. अर्जुनानें पुनः किरातावर बाण-
वृष्टी केली.याप्रमाणें उभयतांनीं एकमेकावर पर्जन्य वृष्टीप्रमाणें बाण वर्षा
व केला; परंतु कोणी कोणास पराजित होईनात; शेवटीं मोठ्या निकरानें पु-
नः अर्जुनानें शंकरावर पराकाष्ठेची बाण वृष्टी केली तिचें सहन शंकरा-
नें पुष्पा सारखें केलें,तो कांहीं व्यथा पावला नाहीं.याप्रमाणें अर्जुनानें दोन
घटका पर्यंत शंकरा वर बाण वर्षाव केला; परंतु शंकराचे,अंगास एकक्षतन
पडतां पर्वता सारखा अचल उभा होता. हें पाहून अर्जुन मोठा विस्मय पा
वला. आणि मुखानें वाहावा वाहावा असें ह्मणोन मनांत विचार करूं लाग
ला कीं, माझ्या गांडीवाचे बाण सहन करणारा या भूमंडळीं कोणी नाहीं.हा
कोणी तरी देव,रुद्र,यक्ष,सुर अथवा असुर भिल्लाच्या रूपानें या हिमाल
य पर्वतीं राहात आहे यांत संशय नाहीं. माझ्या बाणाचा वेग सहन करणा-
रा एक श्रीशंकरा खेरीज त्रैलोक्यांत इतर कोणी नाहीं,बरें असो,शंकरा वांचू
न दुसरा कोणी जर असेल तर याच क्षणी गांडीव निर्मुक्त बाणें करून त्यास-
यमलोकीं पाठवितों.असें ह्मणोन मर्म भेदी बाण गांडीवास लाऊन पुनःअ
र्जुनानें किरातावर बाणजालाची वृष्टी केली.सूर्याचे किरण जसे दाट अस
तात तशी अर्जुनानें किरातावर बाण वृष्टी केली. ते बाण शंकरानीं स्वस्थ अं
तःकरणानीं ग्रहण करून ते अचल पर्वता सारखे अर्जुनाच्या अग्रभागीं उभे रा
हिले. त्याकाळीं अर्जुनाच्या भात्यांतील बाण अगदीं सरले.हें अर्जुनानें पहा
तांच मनांत मोठें भय उत्पन्न होऊन अग्नीची प्रार्थना केली कीं, हे भगवन् खां
डव वनामध्यें तूं संतुष्ट होऊन मला अक्षय्य भाते दिलेस ते भाते आज.स
र्व रिक्त झाले,असा हा कोण कालपुरुष माझे बाण ग्रासावयास उत्पन्न झा
ला.अशी अग्नीची प्रार्थना करून गजास जसा अंकुशाचा प्रहार करितात
तसा अर्जुनानें शंकराचे मस्तकावर धनुष्य कोटीचा प्रहार केला असतां शं

करानें ते ही धनुष्य आपले शरीरांत ग्रस्त करून टाकिलें. हें अर्जुनानें पा-
हून विस्मय करीत हस्तामध्यें खड्ग घेऊन पुनः शंकराचे मूर्ध्यावर प्रहार
केला तेणें करून तो खड्ग गळून पडल्यानंतर अर्जुनानें शंकराचे शिरावर शि-
ला व वृक्ष यांची बहुत वृष्टी केली. शंकरानेंही पार्थावर शिला व वृक्षांची बहु
त वृष्टी केली. पार्थानें वज्रा सारख्या मुष्टी करून शंकरावर प्रहार केला. शं-
करानेंही पार्थावर बहुत मुष्टि प्रहार केले. असें परस्परांचें मुष्टियुद्ध एक
मुहूर्त पर्यंत झालें. नंतर उभयतांचें पराकाष्ठेचें बाहुयुद्ध झालें त्यांत किरा
तानें अर्जुनास पृथ्वीवर पाडलें, तेव्हां अर्जुन प्राणांत दुःखित झाला. त्या
काळीं अर्जुनाच्या अंगांतून रुधिराच्या धारा चालल्या. नंतर किंचित् सावा
ध होऊन मनामध्यें भगवान् पिनाकपाणी याचें ध्यान करीत पार्थिव लिंग
करून त्यावर पुष्प अर्पण केलें तें किराताच्या शिरावर पाहिलें. हा चमत्कार
अर्जुनानें पाहून मोठ्या प्रीतीनें शिवाचे पाय धरिले, शिवानें अर्जुन बहु
तक्षीण झाला व दुःखानें अतिशय व्याप्त झाला हें पाहून ते मेघगंभीर वा-
णीनें बोलतात हे अर्जुना, तुझ्या कर्मानें व पराक्रमानें मी अतिशय संतुष्ट झा
लों. तुझ्या सारखा पराक्रमी सर्व क्षत्रियां मध्यें कोणी नाहीं. तूं रणामध्यें श
त्रूस जिंकशील. देवही तुजसहवर्तमान युद्धास आले असतां त्यांसही तूं
जिंकशील असें एक अस्त्र मी तुला देतों, तें अस्त्र शत्रूनीं पाहिलें असतां
ते तत्काल पलायन करतील हें अस्त्र धारण करण्यास तुझ्या खेरीज क्षत्रि
य कुलामध्यें दुसरा कोणी योग्य नाहीं. असें शिवाचें भाषण ऐकून अर्जु
न पार्वती सहित शिवास साष्टांग नमस्कार करून भाषण करतो हे शिवा,
सर्व देवांचा देव तूं तुला भगनेत्र असें ह्मणतात. तसेच नीलग्रीव, जटाधर,
त्र्यंबक इत्यादि नामें करून सर्व देव तुझी स्तुती करितात. सर्व जगता-
ची उत्पत्ती, स्थिती, लय तुजपासूनच आहे, तीन लोकांमध्यें देवांस व
मनुष्यांस तूं अजय्य आहेस. तुझ्यांत व विष्णूचा अगदीं भेद नाहीं. दक्षाचा
यज्ञ विध्वंस करून हविर्भाग ग्रहण केलास. नंतर हस्ताचे ठायीं शूल
धारण करून दुष्टांचा संहार करण्यास प्रवृत्त झालास. किरात वेषें क-
रून वनांतील प्राण्यांचा संहार व संरक्षण तूं करतोस ह्मणोन हे भगवन् शं

मजपासून जे अपराध झाले असतील त्यांची क्षमा करावी. तुमच्या दर्शना करितां हिमालय गिरीवर आलों. दैववशात् तुमचें दर्शन झालें. ते णें करून मी फारच संतुष्ट झालों. तुह्मीं शरणांगत जे प्राणी यांचें संरक्षण करतां व दुष्टांचा संहार करतां ह्मणोन हे देवा, माझी हीच प्रार्थना आहे कीं, प्रमादानें जे अपराध मजपासून झाले असतील त्यांची क्षमा करावी. असें अर्जुनाचें भाषण ऐकून शिव अर्जुनास आलिंगन देऊन संतुष्ट अंतःकरणा नें बोलूं लागले हे अर्जुना, सर्व तुझे अपराध मी क्षमा केले तूं कोणत्याही गोष्टी विषयीं मनांत विषाद धरूं नको. असा वि. या अ. आहे. . .

४० अध्याय चाळीस:-- शिव भाषण करितात हे अर्जुना. पूर्व देहा- च्या वार्यी श्रीकृष्णाच्या साह्यें करून तूं बद्रिकाश्रमीं हजार वर्षें तपश्चर्या केलीस तुझें व कृष्णाचें तेज एकत्र होऊन हें सर्व जगत तुह्मीं धारण केलें त; इंद्रास अभिषेक कालीं असंख्यात दानवांचा पराभव तूं कृष्णाच्या सा ह्यानें केलास; हें तुझें गांडीव धनुष्य मी आपल्या मायें करून ग्रस्त के- लें होतें तें तुला देतों. तुझे अक्षय्य भाते आहेत ते पूर्वी सारखेच बाणानीं परिपूर्ण होतील. तुझें शरीर क्षतें करून व्याप्त झालें आहे तें सुंदर होईल. हे अर्जुना, तुझा सारखा पराक्रमी स्वर्गांत ही कोणी नाहीं. मी संतुष्ट झालें इच्छित वर असेल तो मजपाशीं माग या कालीं मी देण्यास सिद्ध आहें. अ सें शिवाचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे भगवन्, हे वृषभध्वज, ज र मला कांहीं द्यावयाची इच्छा असेल तर भयंकर दिव्य पाशुपत अस्त्र मला दे ह्मणजे त्यांच्या योगानें भीष्म, द्रोण, कृप, सूतपुत्र, यांचा संग्राम मध्यें पराभव करीन व यक्ष, राक्षस, गंधर्व, पिशाच, पन्नग इत्यादिकांचें भ य लोकांस झालें तर या अस्त्राच्या योगें करून त्याचें निवारण करीन. भी ष्म, द्रोण, कृपाचार्य, व नित्य कटु भाषण करणारा सूतपुत्र यांचा नाश व्ह वा अशी मनांतून इच्छा आहे ह्मणोन तुझा दर्शनार्थ येथें आलों. दैवें करून तुझें दर्शन झालें आतां माझे भयाचा नाश झाला असें मी समज- तों. हे भगवन्, तुह्मी जगाचे नियंते आहांत मला जें इच्छित तें तुमच्या खेरीज देणारा या त्रैलोक्यांत कोणी नाहीं. युगांत कालीं सर्व जगताचें-

संहार करणारें मोठें भयंकर पाशुपत नामक अस्त्र मला द्यावें. असें अ-
र्जुनाचें भाषण ऐकून शिव बोलतात हे अर्जुना, हें अस्त्र मी तुला देतों. का
रण याचें धारण, मोक्ष (सोडणें) संहार (मागें फिरविणें) या विषयीं तूं स-
मर्थ आहेस. यम, इंद्र, वरुण अथवा वायु इत्यादि या अस्त्रास कोणी जाण
त नाहींत. मग मानवास तर कोठून ठाऊक असणार, हें अस्त्र अल्प तेजस्वी
पुरुषावर कधींही सोडूं नये, सोडलें असतां तत्काल जगत भस्म होईल. जो
कोणी त्रैलोक्यांत अवध्य असेल त्याजवर टाक ह्मणजे तत्काल भस्म-
होईल. असें शिवाचें भाषण ऐकून पार्थ शुचिर्भूत होऊन शिवाचे अग्र
भागीं एकाग्र चित्तानें उभा राहिला असतां शिवानीं सरहस्य अस्त्रविद्ये
चा अर्जुनास उपदेश केला. अर्जुनानें त्या विद्येचें ग्रहण केल्यानंतर तेजो-
मय साक्षात् मूर्तिमंत अग्नी सारखें तेजस्वी, दिव्यदेह धारण करून तें अ
स्त्र अर्जुनाच्या पार्श्वभागीं उभें राहिलें. त्या कालीं भूमी एकाएकीं कंपाय
मान झाली, पर्वत व वनें यांचे कडकडाट शब्द होऊं लागले, समुद्रांत मोठे
मोठे शब्द झाले, आकाशांत शंख, दुंदुभि व भेरी यांचे शब्द होऊं लागले,
उल्कापात झाले, जाज्वल्यमान तेजस्वी शिवानीं दिलेलें अस्त्र अर्जुनाच्या
पार्श्वभागीं उभें राहिलेलें पाहण्यास देव, दानव, यक्ष, राक्षस, गंधर्व यां-
चे समुदाय येऊन त्यांणीं अर्जुनाची मोठी प्रशंसा केली. त्या कालीं शि-
व अर्जुनास बोलतात हे अर्जुना, तुला अशुभ अथवा विघ्न या देहांत
प्राप्त झालें तर त्याचा तत्काल मी नाश करीन आतां तूं स्वर्गास निरभय-
पणें जा. कांहीं काळजी करूं नको. असें शिव भाषण करून तत्काल
अंतरधान पावले. असा विषय या अध्यायांत आहे.

४१ अध्याय एकेचाळीस:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, अ
र्जुन शिवास पहात असतां एकाएकीं सूर्य जसा अस्तास जातो तसे श्रीशंक
र अदृश्य झालेले पाहून मोठें आश्चर्य करीत मनांत ह्मणतो मी धन्य आहें,
साक्षात् शिवाचें दर्शन मला झालें व त्यांनीं मला हस्तस्पर्श करून अभय दि
लें तस्मात् कृतकृत्य झालों. शत्रूचा पराभव करण्यास मला उमेद आली,
मला इच्छित होतें तें सिद्ध झालें. या प्रकारें अर्जुन मनामध्यें विचार करी

ते आहे तों सुवर्णासारिखी कांती ज्याची असा वरुण विमानारूढ होऊन अर्जुनाच्या दर्शना करितां हिमालयावर आला. तसाच यक्षगणासहवर्तमान कुबेर, साक्षात् मृत्युस्वरूपी पितृलोकाचा अधिपती सूर्याचा पुत्र यम, ऐरावतावर आरोहण करून इंद्राणीसहित इंद्र, ऋषी, गंधर्व इत्यादिकांचे समुदाय अर्जुनाचें दर्शन करण्यास हिमालयावर आले. अशा समाजामध्यें यमधर्म भाषण करतो हे अर्जुना, आह्मीं लोकपाल तुझें दर्शन करण्यास प्राप्त झालों आहोंत. तूं मोठा पराक्रमी व अमोघवीर्य होस. तूं पूर्वी नरयानामें करून महा पराक्रमी व महाबली ऋषी होतास तो तूं ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें दुष्टाचा संहार करण्या करितां पृथ्वीवर मनुष्यरूप धारण केलेंस. वसूचा अंशभूत जो तुमचा पितामह भीष्म याचा तूं रणामध्यें पराभव करशील. अग्नी सारखा स्पर्श ज्याचा व भारद्वाजानें रक्षित अशा क्षत्रिय कुळाचा तूं पराभव करशील. माझ्या पित्याचा अंशभूत सर्वलोकामध्यें प्रतापी महावीर्य जो कर्ण याचा तूं वध करशील. दुसरेही कितीएक दानव युद्धामध्यें मनुष्यदेहानें आले असतां त्या सर्वांचा तूं पराभव करशील. साक्षात् महादेवाशीं युद्ध करून त्यास तूं प्रसन्न केलेंस येणेकरून तुझी अक्षय्य कीर्ती राहील. आतां कृष्णाच्या साह्यें करून त्या पृथ्वीचा भार तूं उतरून टाक. याजकरितां हें कालदंड नामक अस्त्र मी तुला देतों या अस्त्राच्या योगानें तूं मोठमोठीं कर्मे करशील. या अस्त्रानें निवारण करणारा त्रैलोक्यांत कोणी नाहीं. असें यमधर्माचें वाक्य ऐकून अर्जुनानें यथाविधी मोक्ष व संहारासहित यमापासून अस्त्र घेतलें. नंतर मेघासारखा श्यामवर्ण, जलजंतूंचा अधिपती वरुण पश्चिम दिशेस उभा राहून उच्चवाणीनें पार्थास बोलतो हे पार्था, तूं क्षात्रधर्मामध्यें मोठा निपुण आहेस तुझ्या दर्शना करितां मी वरुण आलों. माझें पाशनामक अस्त्र तुला देतों. पूर्वी तारकामय संग्रामांत मी सहस्त्रावधी दैत्यांचा संहार केला, हें अस्त्र घेऊन तूं संग्रामांत गेलास तर तत्काल निःक्षत्रिय पृथ्वी होईल. तुझे दुष्ट क्षय पावतील. या अस्त्राचा पराभव करण्यास साक्षात् यमही समर्थ होणार नाही. असें भाषण करून वरुणानें अस्त्र दिलें असतां अर्जुनानें तें घेतलें. वरुण व यम याणीं अस्त्रें दिल्यानंतर कैलास पर्वतावर राहणा

राञ्यंबक सखा कुबेर बोलतो हे अर्जुना, मी संतुष्ट होऊन हें अस्त्र तुला देतों या अस्त्र योगानें युद्धांत जे अजय्य असतील त्यांस तूं जिंकशील व सैन्या सहवर्तमान धृतराष्ट्र पुत्रांचा नाश करशील. हें अस्त्र माझें मोठें प्रिय आहे. पूर्वी शंकरानीं याच अस्त्रानें त्रिपुरासुराचा वध केला. मोठे मोठे पराक्रमी दैत्य याच अस्त्रानें मारिले, तेंच हें अस्त्र तूं घेण्यास योग्य आहेस ह्मणोन तुला मी देतों. असें भाषण करून कुबेरानें अस्त्र दिलें असतां अर्जुनानें यथाविधि मोक्ष व संहारा सहित कौबेर नामक अस्त्र घेतलें. नंतर सर्व देवांचा स्वामी इंद्र मृदुवाणीनें अर्जुनाचें शांतवन करीत भाषण करितो हे महाबाहो कुंतीपुत्रा, साक्षात् देवांची गती आज तुला प्राप्त झाली, देवांचें कार्य आज तूं केलेंस तुला स्वर्ग ह्या पदार्थ अतिसुलभ झाला तुझावर मी संतुष्ट होऊन वर देतों कीं, माझा रथ मातली नामक सारथी व दिव्यास्त्रें यां सहित तुला प्राप्त होऊन तूं स्वर्गास येशील. असें लोकपालांचें भाषण ऐकून अर्जुन विस्मय पावला. आणि यथा विधी फळमूलें इत्यादिकानीं त्यानें लोकपालांचें आगतस्वागत करून संतुष्ट केलें. नंतर शक्रादि दिक्पाल अर्जुनास आशीर्वाद देत देत मनोवेगानें आपले स्थानीं गेले. अर्जुन ही संतुष्ट होऊन संपूर्ण शस्त्रास्त्र विद्यानीं आज मी कृतार्थ झालों असें मानून स्वस्थ अंतःकरणानें हिमालय शिखरावर राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

४२ अध्याय बेचाळीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सर्व लोकपाल आप आपले स्थानीं गेले असतां पार्थ शक्ररथाची मार्गप्रतीक्षा करीत चिंताग्रस्त बसला आहे इतक्यांत इंद्राच्या आज्ञेनें मातली रथारूढ होऊन स्वर्गांतून भूमंडळीं येण्यास निघाला. त्या काळीं एकाएकीं आकाश स्वच्छ दिसूं लागलें. मेघ शब्दासारखे शब्द होऊन चारी दिशा शब्दानीं पूर्ण झाल्या. असी, शक्ती, भयंकर गदा, प्रास इत्यादि शस्त्रांनीं रथ परिपूर्ण होता. दाहा हजार अश्वानीं रथ ओढून न्यावा इतका त्याचा वेग. निमेषांत हजारों कोश गमन करणारा, मनाची गती कमी असेल त्याजपेक्षां ही रथाची गती ज्यास्त होती. वैजयंत नामक नीलवर्ण ध्वज रत्नदंडानें यु-

क असा तो रथ शोभत होता. हेमदंडयुक्त श्वेत छत्रही त्या रथावर होतें अ-
सा रथ आकाशांतून खालीं येतेसमयीं पार्थानें पाहून मनांत विचार के-
ला कीं, कोणी तरी देव स्वर्गातून भूमंडळीं येत आहे, इतक्यांत तो रथ अ
र्जुनाच्या अग्रभागीं येऊन उतरला आणि मातली नामक सारथी हस्त जोडू
न पार्थाचे अग्रभागीं उभा राहून भाषण करतो हे पार्था, इंद्र तुझ्या दर्शनाची
बहुत इच्छा करीत आहे तुज करितां त्याणें हा रथ पाठविला आहे त्यांत तूं
बसून स्वर्गी इंद्राकडे चल. देव, गंधर्व, ऋषीगण व इतर स्वर्ग निवासी तुझ्या द
र्शनाची इच्छा करीत बसले आहेत त्या सर्वांस तूं दर्शन दे आणि अस्त्रें घेऊ
न माघारा ये. असें मातलीचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे मातली, राज
सूय अश्वमेध इत्यादिक याग ज्यांणीं बहुत केले असतील त्यांस ही हा
रथ आरोहण करण्यास अशक्य. नाना प्रकारचीं देवतार्चनें ज्यांणीं केलीं
असतील त्यांस ही हा रथ दुर्लभ, अल्प पुण्यानें हा कधीं प्राप्त व्हावयाचा ना
हीं. फार तर काय सांगूं हा रथ स्वल्प पुण्यवान् याणीं दर्शन करण्यास ही यो
ग्य नाहीं मग त्यांस आरोहण कोठून घडेल; आम्हीं तर अल्प पुण्यवान या र
थांत कसें आरोहण करावें; परंतु इंद्राची आज्ञा आहे तर बसतों पूर्वी तुह्मीं
बसावें. त्या कालीं अर्जुनाच्या आज्ञे वरून मातली पूर्वीच रथावर जाऊन ब
सला. नंतर अर्जुनानें गंगेंत स्नान करून जप केल्यावर यथान्याय पितरां
नें तर्पण केलें नंतर शैलराज जो हिमालय याची प्रार्थना केली हे पर्वत श्रे
ष्ठ, साधू, पुण्यशील, सत्कर्मी, स्वर्गाची इच्छा करणारे, यांस आश्रय तूं आहे-
स, तुझ्या प्रसादें करून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे स्वर्गांत जाऊन देवां सह वर्त-
मान आनंद पावतात ह्मणोन हे अद्रीराज, तुझी आज्ञा घेऊन मी येथून जा
तों. आज पर्यंत सुखें करून तुझे पृष्ठ भागावर वास केला आतां मला स्वर्गा
स जाण्याची आज्ञा द्यावी. तुझीं नाना प्रकारचीं रत्नखचित शृंगें व तीर्थें
नाना प्रकारचे देव ऋषींचे आश्रम व आराम पाहून बहुत आनंद झाला.
अशी नाना प्रकारें पर्वतराजाची स्तुती करून अर्जुन रथांत बसला अ
सतां त्या काळीं तो सूर्यासारखा देदीप्यमान दिसूं लागला. नंतर मातली
नें रथाचे ह्यांस प्रेरणा करतांच तो रथ दिव्य मार्गानें स्वर्गाकडे चालला.

तेथें चर्मचक्षु लोकांची कशी दृष्ट पोंचेल? जातां जातां मार्गांत दिव्य वि-मानें आपल्या तेजें करून चालणारीं अर्जुनानें बहुत पाहिलीं.सूर्य,चंद्र, अग्नि यांच्या प्रकाशाची गरज नाहीं पुण्यवान लोक आपल्या तेजें करून संचार करितात असा लोक पाहिला.पुढें जातां जातां तारांचा लोक पाहिला. तेथें लक्षावधी तारागण आपल्या प्रकाशानेंच राहतात सूर्यचंद्राची गरज नाहीं.पुढें जातां जातां मोठे मोठे राजऋषी व महान् योद्धे-युद्धामध्यें मरण पावलेले यांचा लोक पाहिला.तसेंच गंधर्व,गुह्यक-ऋषीं व अप्सरा यांचे लोक पहात चालला असतां अर्जुन मातलीस बोलतो हे मातली,संपूर्ण लोक मी पाहिले हे आप आपल्या तपोबलानें येथें आले आहेत किंवा कसें?त्याकाळीं मातली भाषण करितो हे अर्जुना,तूं भूमंडळीं असतां ज्या तारा पाहिल्यास त्यांचा हा लोक आहे,महत् तपश्चर्या करावी ह्मणजे या लोकीं प्राप्ति येते आणि आपल्या तेजानें वर्ततो.ज्यास चंद्र,सूर्य,अग्नीची गरज लागत नाहीं.असें उभयतां भाषण करीत चालले आहेत इतक्यांत इंद्रलोकीं च्यार दंतांचा शुभ्र हत्ती द्वारीं बांधलेला अर्जुनानें पाहून मनांत विचार केला कीं,ही पुरी इंद्राची अमरावती आहे यांत संशय नाहीं,तों पुरीजवळ अर्जुन येऊन पोहोंचला. असा विषय या अध्यायांत आहे.

४३ अध्याय त्रेचाळीस:-वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सिद्धचारण इत्यादिकांनीं सेवित व नाना प्रकारच्या सुगंधि मनोहर पुष्पानीं सुवासित अशी जी इंद्राची अमरावती नामक पुरी जीमध्यें सुगंधिक पुष्पांच्या वेली बहुत आहेत व सुगंधिक वायू निरंतर वाहतो हें पाहून अर्जुन मोठा आनंद पावला. त्या पुरीमध्यें नंदननामक वन अप्सरागणानीं उपसेवित व नाना प्रकारच्या कुसुमानीं व द्रुमानीं व्याप्त असें पाहून अर्जुनानें मनांत विचार केला कीं, ज्याणीं तपें व मोठमोठीं पुण्यें केलीं असतील त्यांच्याही दृष्टीस हीं पुरें वनें पडणार नाहींत मग इतरांची कथा काय?तस्मात् हें अद्भुत चरित्र आपले दृष्टीस पडलें येणें करून आज मी कृतकृत्य झालों. इतक्यांत अमरावती प्राप्त होतांच तींत अर्जुनानें प्रवेश केला. आणि हजारों विमानें आपल्या प्रभेंकरून,देदिप्यमान जिकडे तिकडे

पाहिलीं. गंधर्व व अप्सरा अर्जुनापुढें नृत्य करूं लागल्या. मंद सुगंध शीतल वायूच्या स्पर्शानें व देव, गंधर्व, सिद्ध व मोठमोठे तपस्वी, ऋषी यांच्या स्तुतीनें अर्जुन परम आनंद पावला. नाना प्रकारचीं वाद्यें व शंख, दुंदुभीं चे नाद कर्णास सुखकारक होऊं लागले. अमरावतींतील राहणारे जन अर्जुनास वारंवार आशीर्वाद देऊं लागले. सुरवीथी नामक अमरावतींतील मार्गानें अर्जुन जात असतां साध्य, विश्वेदेव, मरुद्गण, अश्विनीकुमार, आदित्य, वसु, रुद्र, ब्रह्मर्षि, राजर्षि, स्वर्गनिवासी दिलीपादि राजे, तुंबरु, नारद, हाहा हूहू नामक गंधर्व इत्यादि इंद्रपुत्राचें अद्भुत दर्शन करण्यास येऊन नाना प्रकारें स्तुती करूं लागले. छत्र, चामरें इत्यादिकांसह वर्तमान इंद्र सिंहासनीं बसलेला पार्थानें पाहून तत्काल रथाखालीं उतरून इंद्रास साष्टांग नमस्कार केला. इंद्रानें अर्जुनास आलिंगन देऊन आपले अर्धासनीं बसविलें आणि मूर्ध्याचें अवघ्राण केलें, त्या कालीं पार्थ फार शोभला. नारद, तुंबरु, गंधर्व इत्यादिकानीं त्याचे आसमंतात भागीं उभें राहून नाना प्रकारच्या स्तुतीनीं त्यास संतुष्ट केला. जसा अमावास्येस एक नक्षत्र व एक राशीवर चंद्रसूर्याचा उदय होतो, तसा इंद्र व अर्जुनाचा उदय एकासनीं झालेला देव, गंधर्व इत्यादिकानीं पाहून ते वारंवार धन्य हा अर्जुन असें ह्मणो लागले. घृताची, मेनिका, पूर्वचित्ती, स्वयंप्रभा, उर्वशी इत्यादि अप्सरा मधुर स्वरानें गायन करीत करीत नाना प्रकारचे हाव भाव, नेत्र कटाक्ष व मधुर स्वर भाषणें करून अर्जुनाच्या बुद्धीस मोह पडावा या बुद्धीनें सर्व अप्सरा त्याजपुढे पराकाष्ठेचें मनोहर नृत्य करूं लागल्या. असा विषय या अध्यायांत आहे.

४४ अध्याय चवेचाळीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, इंद्राची आज्ञा घेऊन देव गंधर्वानीं अर्घ्य पाद्यादिकें करून अर्जुनाची पूजा केली नंतर अर्जुनानें आपल्या पित्याचे गृहीं कांहीं दिवस राहून मोक्ष उपसंहारा सहित आपल्या पित्या पासून अस्त्र विद्येचा उपदेश घेतला व दुष्टांचा संहार करणारें, परम तेजस्वी जें वज्र नामक अस्त्र त्याचा ही उपदेश घेतला. या प्रकारें अर्जुन अस्त्र विद्ये मध्यें परम नि

पुण होऊन इंद्राच्या आज्ञेनें पांच संवत्सर पर्यंत स्वर्गामध्यें रहात असतां-आपल्या बंधुजनाचें मनांत निरंतर स्मरण करून चिंताग्रस्त होत असे. अर्जुन कृतास्त्र झालेला पाहून इंद्र भाषण करतो हे अर्जुना, तूं शस्त्रास्त्र विद्येमध्यें परम निपुण झालास आतां गीत, वाद्य, नृत्य, त्या विद्या भूलोकामध्यें दुर्लभ आहेत यास्तव या विद्येचा अभ्यास कर. माझा परमसखा चित्रसेन गंधर्व याविद्येचा तुला उपदेश करील. असें भाषण करून इंद्रानें चित्रसेनास गीत वाद्यादि विद्या शिकविण्या विषयीं आज्ञा केली असतां अर्जुनानें गंधर्वा पासून गीत, वाद्य, नृत्य हीं तत्काळ घेतलीं, परंतु मनामध्यें दुःशासन, शकुनी इत्यादिकांचा केव्हां मी वध करीन अशी तो चिंता करीत असे. असा विषय या अध्यायांत आहे.

४५ अध्याय पंचेचाळीस:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कोणे एके काळीं चित्रसेनगंधर्वास इंद्र बोलतो हे चित्रसेना, अर्जुनाची इच्छा उर्वशीवर फार आहे. असें त्याच्या नेत्रकटाक्षा वरून मी जाणलें; यास्तव तूं उर्वशी कडे जाऊन तिजला सांगावें कीं, अर्जुनाची इच्छा तुजवर फार आहे तर त्यास तूं साह्य व्हावेंस कारण शस्त्रास्त्र विद्येमध्यें मी अर्जुनास उपदेश करून तयार केला. तूं ही गीत, वाद्य विद्येमध्यें त्यास निपुण केलेंस, स्त्री संग विद्येमध्यें त्याणें निपुण असावें अशी माझी इच्छा आहे; यास्तव ही विद्या अर्जुनास उत्तम रीतीनें साध्य होण्या करितां उर्वशीस त्याजकडे जाण्यास मी तुला आज्ञा करितों याप्रमाणें तूं उर्वशीकडे जाऊन तिला अर्जुनाकडे जाण्यास आज्ञा कर. असें इंद्राचें वाक्य ऐकून गंधर्वराज उर्वशीकडे गेला. त्या काळीं चित्रसेन आपले गृहीं आला हें उर्वशीनें पाहून हर्षानें चित्रसेनास-येण्याचें कारण विचारिलें. त्या काळीं चित्रसेन हांस्य पूर्वक उर्वशीस बोलतो हे सुश्रोणी, देव व मनुष्यां मध्यें गुण व शीलें करून युक्त जो पार्थ तो आपल्या पित्यास भेटण्या करितां आला आहे त्याचें सौंदर्य व गुण हे तुला माहितच आहेत सांगोपांग उपनिषद् भागावर ज्याणें मोठा परिश्रम करून ब्रह्म विद्या साध्य केली, ज्याणें ब्रह्मचर्य व्रत धारण करून गुरुगृहीं आस्थापूर्वक धनुर्विद्येचा अभ्यास केला. येकाग्र असतां स्वर्गीचें राज्य करण्याचें

शक्राप्रमाणें सामर्थ्य आज त्यास आहे.शत्रूशीं स्पर्धा न करितां आपल्या स्वसंतोषानें प्रियवाक्यें करून सर्वांस आनंद करतो. ज्याची वाणी कधींही असत्य न होतां आपलें कार्य सिद्धीस नेण्यास कधीं चुकत नाहीं आपल्यासे वक जनांचा निरंतर संतोष ठेऊन त्यांजपासून आपलें कार्य करून घेणें हा त्याजमध्यें मोठा गुण आहे. इंद्र,वरुण इत्यादिक दिक्‌पाळ ज्याचे गुण घेण्या विषयीं निरंतर इच्छा करतात असा प्रिय जो अर्जुन त्यास स्वर्गसुखासार खें जें तुझे अंगसंगाचें सुख तें दे. अशी आज्ञा इंद्रानें तुला केली आहे तर हे कल्याणी उर्वशी, तुज सह वर्तमान रती करावी ह्मणोन अर्जुनाची उत्कंठा आहे ती आज परिपूर्ण करावीस.असें गंधर्वाचें भाषण ऐकून व त्याच्यावा क्याचा मोठा आदर करून उर्वशी भाषण करिती, हे गंधर्वराज, तुह्मीं मला फार चांगली इंद्राची आज्ञा सांगितली तेणें करून मी अतिशय संतुष्ट झालें ज्या काळीं मी अर्जुनाचें सौंदर्य पाहिलें त्या काळींच मला रतीची इच्छा उत्पन्न झाली; परंतु इंद्राची आज्ञा नव्हती ती आज मिळाली आतां मी अर्जुनाकडे जाण्याची सिद्धता करत्यें.तुह्मीं येथून इंद्राकडे जाऊन त्यास माझा निरोप सांगावा कीं, तुमच्या आज्ञे वरून व चित्रसेनाच्या वाक्यावरून मी अर्जुनाकडे जाण्यास अतिशय उत्कंठित आहें. असा विषय या अध्यायांत आहे.

४६ अध्याय शेचाळीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, उर्वशीचें वाक्य ऐकून गंधर्वराज आपले गृहीं गेल्यावर उर्वशीनें उत्तम प्रकारच्या सुवासिक द्रव्यानीं स्नान करून हर्षानें नाना प्रकारचीं हिरण्म[illegible] आभरणें व सुवासिक माल्यें धारण केलीं व सूक्ष्म वस्त्रें परिधान करून [illegible] नांत अर्जुनाच्या स्वरूपाचें चिंतन करीत ती रात्रीं चंद्रोदया नंतर मंदगतीनें अर्जुनाच्या गृहाकडे चालली असतां मेघाच्छादित चंद्ररेखा जशी सुशोभित दिसते तशी उर्वशी दिसूं लागली. मनासारख्या वेगानें एकाएकीं पांडुपुत्र जो अर्जुन याचे गृहीं गेली असतां द्वारपालानीं उर्वशी आली ह्मणोन अर्जुनास सांगितलें नंतर तो द्वारामध्यें उर्वशीस सामोरा आला आणि चकित होऊन शंकितमनानें उर्वशीस बोलतो हे अप्सरे, मी अर्जु

न तुला साष्टांग नमस्कार करतों आपले मनांत काय आज्ञा करावयाची असेल ती करावी; परंतु इतक्या रात्रीस येथें आपलें आगमन किमर्थ झालें तें सांगावें. असें अर्जुनाचें वाक्य ऐकतांच उर्वशी विरस होऊन चित्रसेनानें आपल्यास जो वृत्तांत सांगितला तो त्यास सांगण्याच्या हेतूनें बोलली हे नरश्रेष्ठ अर्जुना, जा कालीं तूं इंद्राच्या अर्धासनीं बसला होतास त्या कालीं रुद्र, आदित्य, अश्विनी कुमार, वसू, महानूऋषी, राजऋषी, सिद्ध, चारण, यक्ष, उरग, गंधर्व त्या सभेमध्यें तुझ्या व इंद्राच्या आसमंताद्भागीं बसले असतां अप्सरा ही बहुत नृत्य करीत होत्या, त्यामध्यें मीही नृत्यास आल्यें होत्यें त्या कालीं तूं मजकडे नेत्र कटाक्षें करून पाहिलेंस हें इंद्रानें पाहून तुझी इच्छा मज सह वर्तमान संग करण्याची आहे असें जाणोन सर्व देव, ऋषी, गंधर्व अप्सरा आप आपले स्थानीं गेल्या वर इंद्रानें चित्रसेनास सांगितलें कीं, तूं उर्वशी कडे जाऊन सांग कीं, मजसारखा पराक्रमी व निरंतर औदार्य गुणें करून युक्त जो माझा पुत्र या सह वर्तमान तूं रममाण हो. तुझावर त्याची अतिशय प्रीती दिसली ह्यणोन त्याजकडे जाण्याची तुला मी आज्ञा दिली. अशी इंद्राची आज्ञा चित्रसेनानें मला सांगितली असतां त्या कालीं मी चित्रसेनास भाषण केलें कीं, इंद्राची आज्ञा मला शिरसा वंद्य आहे माझे ही मनांत अर्जुनाशीं संग करावा असें होतें तेंच मला प्राप्त होऊन मी आपले मनोरथ पूर्ण करून घेईन, असें चित्र सेनास सांगून मी तुजकडे आल्यें. असें उर्वशीचें भाषण ऐकून अर्जुन आपले कर्णावर हस्त ठेऊन भाषण करतो हे सुश्रोणी, हें वाक्य तुझा मुखापासून ऐकतांच मला फार दुःख झालें. तूं मला केवळ गुरुपत्नी सारखी दिसतेस. जशी कुंती, माद्री, इंद्राणी मला पूज्य तशी तूंही मला पूज्य आहेस. हें भाषण तूं मजसहवर्तमान केलेंस येणें करूनमी अतिशय पातकी झालों. हे वरानने, असें भाषण अतःपर पुनः करूंनको. इंद्रसभेमध्यें मी तुजकडे नेत्रकटाक्षें करून पाहिलें याचें कारण सांगतों, सर्व अप्सरा नृत्य करीत असतां त्यामध्यें हीच पौरव वंशाची माता तुं काय असें मला वाटून तुज कडे, मी पाहिलें. याचें कारण हेंच होय दुसरें कांहीं नाहीं. तस्मात् हे अप्सरे

अशीं दुष्ट वासना मजविषयीं तूं धरूंनकोस, तुज सह वर्तमान मी गमन-
केलें असतां मला गुरुदारेशीं गमन केल्याचें पातक लागेल. असें अर्जु-
नाचें वाक्य ऐकून उर्वशी भाषण करिती हे इंद्रपुत्रा, गुरुपत्नी स्थानीं मा-
झी योजना करूंनको कारण पुरुवंशामध्यें उत्पन्न झालेले राजे आपआ
पल्या तपाच्या योगें सांप्रत स्वर्गामध्यें राहतात आणि आह्मांस रमवि-
तात यांत त्यांचा अपराध कांहीं नाहीं. आतां काम बाणें करून मी अति
शय पीडित आहें याजकरितां माझा त्याग करूंनको, मजवर प्रसन्न हो
ऊन माझा अंगिकार कर. असें उर्वशीचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो
हे अप्सरे, माझे हातून असें दुष्कर कर्म कधीं व्हावयाचें नाहीं याविषयीं
दिशा व पृथ्वीवरील राहणाऱ्या देवता साक्षीभूत असोत. जशीं माझी
माता कुंती व माद्री त्याहून ही तूं मला श्रेष्ठ आहेस. आतां तुला मी सा
ष्टांग नमस्कार करितों तूं माझें व्रत सिद्धीस न्यावेंस. असें भाषण करून
वारंवार तिची प्रार्थना करूं लागला. तेणें करून उर्वशी अतिशय क्रुद्ध हो
ऊन थरथर कांपूं लागली. आणि भ्रुकुटी चढवून तिणें अर्जुनास शाप दि
ला हे अर्जुना, तुझा पित्याच्या आज्ञेवरून मी कामवश होऊन तुझा सं
तोष करण्याकरितां आल्यें असतां तूं माझा त्याग करतोस त्यापेक्षां तूं
माझा शापें करून नट होशील, सर्व स्त्रियांमध्यें तुला षंढ षंढ या प्रका
रें ह्मणतील हा माझा शाप कधींही व्यर्थ होणार नाहीं. असा अर्जुना-
स शाप देऊन श्वासोच्छ्वास टाकीत म्लान वदन करून ती आपले गृहीं
आली. अर्जुनही शापानें भयाभीत होऊन त्यानें दुसरे दिवशीं चित्रसे
न गंधर्वाचे गृहीं जाऊन रात्रीं झालेला संपूर्ण वृत्तांत त्यास सांगितला.
नंतर चित्रसेनानें तत्काल अर्जुनाचें झालेलें वृत्त इंद्रास सांगितलें त्या-
कालीं इंद्र आपले पुत्रास जवळ घेऊन आश्चर्यानें प्रशंसा करूं लाग-
ला. हे पुत्रा, तुझा मध्यें जसें धैर्य आहे तसें ऋषीमध्येंही नसेल. तुझी
परिक्षा पाहण्याकरितां येवढें कृत्य मी केलें आतां तूं अप्सरेच्या शापा
ची भीती धरूंनको. तो शाप तुझा बहुत उपयोगाचा आहे. तेराव्ये वर्षी
अज्ञात वासामध्यें नर्तन वेष धरून तूं एक वर्ष नृत्यशाळेमध्यें गम-

वास करशील नंतर चौदावे वर्षीं तुला पुरुषत्व येईल. असें शक्राचें भा
ष्यं ऐकून अर्जुन मोठा हर्षपावोन चित्रसेन गंधर्वा सहवर्तमान स्वर्गा-
मध्यें सुखें करून राहिला. हें अर्जुनाचें आख्यान जो कोणी ऐकील-
त्याचें चित्त कामामध्यें रत न होतां शुद्ध राहील आणि इहलोकीं किंवा-
परलोकीं त्यास बहुत सुख होईल. असा विषय या अ० आहे.

४७ अध्याय सत्तेचाळीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया,
कोणे एके कालीं ऋषी मध्ये श्रेष्ठ लोमश ऋषी तीर्थयात्रा करीत करीत इंद्राचें
दर्शन करण्या करितां स्वर्गलोकींगेले आणि इंद्राचे अर्धासनीं पार्थास ब-
सलेला पाहून मनांत विचार करूं लागले कीं हा तर क्षत्रिय असतां यास-
इंद्राचें अर्धासन कसें मिळालें आणि सर्वदेव यास नमस्कार करितात ते
व्हां असें काय त्याणें मोठें तप केलें असेल. इतक्यांत इंद्र, ऋषिश्रेष्ठ जो
लोमशऋषी याची उत्तम प्रकारें पूजा करून उत्तमासनीं बसवून भाषण
करतो हे ब्रह्मऋषे, तुमचे मनांत पार्था विषयीं जें आलें आहे त्याचें उ
त्तर तुम्हांस सांगतों. हा अर्जुन मनुष्य आहे असें तुम्हीं समजूं नका. कुं
तीचे ठायीं माझ्या तेजोबळें करून उत्पन्न झाला हा माझा पुत्र होय. कां-
हीं कारणास्तव अस्त्रविद्या ग्रहणकरण्या करितां येथें आला आहे,
याचें जन्मांतर असें आहे कीं, बदरिकाश्रमामध्यें नर नारायण याना
में करून कृष्णार्जुन तपस्या करीत होते पुढें निवात कवचादि असुरा-
नीं बहुत लोकांस पीडा केली व आमच्याच वरानें मदोन्मत्त होऊन सर्व-
जगतासतेबहुत त्रास देऊं लागले. त्याकालीं आम्हीं बदरिकाश्रमीं जाऊ
न नर नारायणास सांगितलें कीं, पृथ्वीवर आपण अवतार घेतल्या-
वांचून या दुष्टदैत्यांचा नाश व्हावयाचा नाहीं तस्मात् मनुष्यरूपानें तु
म्हीं पृथ्वीवर देह धरून असुरांचा नाशकरावा. अशी आम्हीं विनंती के-
ल्या वरून सर्वजगताचें कल्याण करण्या करितां नरानें अर्जुनाचा अव-
तार पांडु कुलामध्यें व नारायणानें वसुदेव कुलामध्यें देवकीच्याउदरीं-
श्रीकृष्णाचा अवतार घेतला. हे लोमशा, तो हा अर्जुन मनुष्यरूपें क-
रून दैत्यांच्या संहारा करितां पृथ्वीवर उत्पन्न झाला. त्याणेंच पातालु

निवासी जे दनूचे पुत्र यांचा नाश केला. कपिलनामक ऋषी जे पाताळांत रहात होते ते विष्णूचा अवतार. त्याणीं कोपे एके काळीं सगर राजाचे सर्व पुत्र आपल्या दृष्टीनें दग्ध केले त्याणींच कृष्णाचा अवतार धारण केला तो कृष्ण व हा अर्जुन हे उभयतां देवानींही युद्धांत पराजित करण्यास अशक्य असे ज्यानीं मोठे असुर रणामध्यें जिंकून त्यांचा नाश केला. तस्मात् हा अर्जुन साक्षात् नराचा अवतार होय. पृथ्वीवर आपलें कार्य जें कर्तव्य आहे तें करून मनुष्य देह त्याग करील आणि आपलें निजस्वरूप धरून बद्रिकाश्रमीं राहील. अशी ही अर्जुनाची जन्मांतर कथा तुह्मांस सांगितली. आतां आपण माझ्या आज्ञेनें काम्यक वनीं जाऊन युधिष्ठिरास भेटून सांगावें कीं, अर्जुना विषयीं कांहीं चिंता करूं नको. ज्या कार्याकरितां अर्जुन येथें आला तें कार्य त्याणें संपादन केलें. आतां लौकरच तुह्मांस भेटण्या करितां माघारा येईल. भीष्म, द्रोण, कृपाचार्य, कर्ण इत्यादिक अर्जुनाशीं युद्ध करण्यास अतःपर कधींही समर्थ होणार नाहींत अशा विद्या अर्जुनानें संपादन केल्या आहेत. नृत्य, गीत, वाद्य या विद्येमध्यें तो मोठा निपुण झाला आहे. लौकरच तुला भेटेल. या पृथ्वीवर तीर्थें, महान् महान् नद्या पुण्य कारक आहेत तेथें तूं भ्रात्यां सहवर्तमान जाऊन यथा योग्य स्नानदान करून निष्पाप व्हावेंस ह्मणजे निष्कंटक राज्य भोगण्यास योग्य होशील. इंद्रानें मलाही तुज बरोबर येण्यास सांगितलें आहे त्याप्रमाणें मीही तीर्थयात्रा पर्यटण करण्यास तुज बराबर येईन. मार्गामध्यें राक्षस पिशाच्चादि कांचा उपद्रव झाला असतां त्यांचें निवारण, मंत्र सामर्थ्यें करून मी करीन असें तुह्मीं धर्म राजास सांगावें. असें इंद्रानें लोमशास सांगतांच लोमश ऋषी तेक्षणीं काम्यक वनीं धर्मराजा कडे जाण्या करितां स्वर्गांतून निघाले. त्याकालीं अर्जुन लोमशास भाषण करितो हे ऋषे, आमच्या भ्रात्यांचें तुह्मीं उत्तम प्रकारें संरक्षण करावें जींजीं तीर्थें प्राप्त होतील तेथें यथाशक्ती दानधर्म करवावा. असें अर्जुनानें सांगतांच लोमश ऋषी अर्जुनाच्या वाक्याचें अभिवंदन करून काम्यक वनीं भ्रात्यां सह वर्तमान राहणारा जो धर्मराजा यास येऊन भेटले. असा विषय या अध्यायांत आहे.

४८ अध्याय अठ्ठेचाळीस:— जनमेजय भाषण करितात हे वैशंपायन ऋषे, पार्थानें अत्यद्भुत घोर कर्म धृतराष्ट्रानें ऐकून पुढें काय केलें हें सविस्तर मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, इंद्रलोकास पार्थ गेला हें धृतराष्ट्रानें ऋषिश्रेष्ठ द्वैपायना पासून ऐकून तो संजयास बोलतो हे संजया, पार्थानें अद्भुत कर्म तुला सांगतों श्रवणकर. माझा पुत्र दुरात्मा मंदबुद्धी दुर्योधन विषय सुखामध्यें अतिशय निमग्न झाला आहे, हा आपल्या राज्याचा कधींतरीं नाश करून घेईल. जो निरंतर सत्यवादी, ज्याचे भाषणांत कधींही मिथ्या प्रलाप ठाऊक नाहीं, धर्मशील, दांत, शुची ज्यांचा योद्धा साक्षात् धनंजय अर्जुन अशा पांडवांचा युद्धामध्यें पराजय होणें कठीण दिसतें. अर्जुनाच्या गांडीव धनुष्या पासून बाण वृष्टी चालली असतां कोण योद्धा सहन करण्यास समर्थ होईल? मला असें वाटतें कीं, हे सर्व दुरात्मे माझे पुत्र पांडवांशीं स्पर्धा केल्या मुळें लौकरच कालमुखांत सांपडतील. वारंवार मी आपले मनांत विचार करतों कीं, आमच्या कडील योद्धा अर्जुना बराबर युद्ध करण्यास कोण समर्थ आहे. माझ्या दृष्टीनें एकही समर्थ दिसत नाहीं. कर्णतर भीरू व दयाळू आहे, द्रोणाचार्य अतिशय वृद्धत्वा मुळें बलें करून युद्ध करण्यास असमर्थ, भीष्म तेही तसेच तेव्हां या तिघां खेरीज बलवान् समर विजयी पार्थाशीं युद्ध करण्यास आपले सैन्यांत कोणी दिसत नाहीं. पार्थतर संपूर्ण शस्त्रास्त्र विद्ये मध्यें निपुण, संपूर्ण पांडव महान् शूर, अभिमानी, यशाची इच्छा करणारे व बलाढ्य असे आहेत. संपूर्ण पृथ्वीचें राज्य करावें ही त्यांस अतिशय उत्कंठा आहे तेव्हां सर्व प्रयत्नें करून ते आमच्याशीं युद्ध करतील युद्धा खेरीज त्यांची शांती होत नाहीं, अर्जुनास अतिशय कोप झाला आहे त्याची शांती कोणत्या प्रकारें करावी? ज्याणे खांडव वनामध्यें इंद्रा सारखा पराक्रम करून अग्नीस शांत केलें, राजसूय यज्ञामध्यें एकाकी सर्व पार्थिवांस पराजित केलें त्या अर्जुनाचे बाण युद्धा मध्यें आले असतां आमचा निःशेष घात करतील पर्वतावर वज्राचा प्रहार झाला असतां कांहीं तरीं पर्वताचा शेष पृथ्वी वर राहील; परंतु अर्जुनाच्या बाणानें किंचित् ही शत्रूचा शेष राहाणा

र नाहीं, सूर्यकिरणासारखे लोकांस संताप करणारे जे अर्जुनाचे बाण ते माझे पुत्र कसे सहन करतील. अर्जुनाच्या रथाचा घोष ऐकतांच त्यांचीं हृदयें विदीर्ण होतील मग युद्ध करण्याचें सामर्थ्य कोठून? अर्जुन युद्धामध्यें यमासारखा क्रुद्ध होऊन उभा राहिला असतां सर्व शत्रूंस रुधिर वमन करण्यास लावील आणि शत्रूचें सैन्य निःशेष करून आपण जयपावेल. असा विषय या अध्यायांत आहे.

४९ अध्याय एकुणपन्नास:— संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, दुर्योधना विषयीं जें तूं सांगितलेंस तें सर्व खरें आहे, द्रौपदीस दुःशासनानें सभेमध्यें आणून पांडवांचे समक्ष दुर्वाक्यानें तिची बहुत विटंबणा केली, तेणें करून पांडव पराकाष्ठेनें क्रुद्ध झाले आहेत तुमच्या भाषा विषयीं ते लौकरच मार्गप्रतीक्षा करतात. पार्थाचें दुष्कर कर्म जें मी ऐकिलें तें तुला सांगतों. एकादश तनू जो शिव साक्षात् भगवान् त्याणें किराताचा वेष धरून अर्जुनाशीं युद्ध केलें असतां त्या युद्धांत अर्जुनानें शिवाचा बहुत संतोष केला. नंतर शिवानें प्रसन्न होऊन अर्जुनास पाशुपत अस्त्र देऊन अभय दिलें असें ऐकिलें आहे. नंतर अर्जुन अस्त्रविद्येच्या अभ्यासा करितां इंद्रलोकास गेला त्या कालीं सर्व दिक्‌पाल अर्जुनाच्या दर्शना करितां येऊन त्याची बहुत प्रकारें स्तुती करून त्यांणीं आपआपलीं अस्त्रें अर्जुनास दिलीं. अशी अर्जुनाची कथा राजा मी ऐकिली ती तुला सांगितली. साक्षात् शिवापासूनही अर्जुन पराभव पावला नाहीं त्या अर्जुनाच्या समोर मृत्युलोकचा योद्धा उभा राहण्यास कोण समर्थ होईल व त्याच्या बाणाचा वेग कोण सहन करील. ज्या कालीं दुःशासनानें द्रौपदीस सभेंत आणून दुर्योधन तिचे उरु (मांड्या) पाहण्याची इच्छा करूं लागला त्या कालीं भीमसेनानें प्रतिज्ञा केली कीं, हे दुष्टा, द्रौपदीचे उरु पाहण्याची तूं इच्छा धरिलीस त्यापेक्षां त्रयोदश वर्षांचे अंतीं युद्धामध्यें तुझे उरु भेद करून तुला मी यमलोकास पाठवीन असें भीमसेनानें त्या कालीं भाषण केलें आहे, तो कोपी भीमसेन आपलें भाषण सत्य करण्यास कधीं चुकणार नाहीं. पांचही पांडव मोठे पराक्रमी, तेजस्वी, वीर्यवान शस्त्रास्त्र वेत्ते आहेत ते भार्येची हेलना केल्यामुळें प-

राकाष्ठेचे क्रुद्ध होऊन तुमचे कुलाचा नाश करतील असें मला खचित् समजलें आहे. असें संजयानें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र बोलतो हे- संजया, कर्णानें पांडवांची बहुत प्रकारें निंदा केली व दुःशासनानें द्रौपदी- स सभेंत आणून तिची बहुत प्रकारें विटंबणा केली येणें करून पांडव त र फारच कोप पावले आहेत. आतां संजया मी काय करूं! हे मंद बुद्धी- दुरात्मे माझे पुत्र माझ्या वाक्याचा अनादर करतात. ज्येष्ठ पुत्र दुर्योधन तर माझें कांहींच ऐकत नाहीं, मी अंध आहें ह्मणोन माझें कांहींचालत ना- हीं; परोक्ष माझी थट्टा ही करतात बरें असो. त्यांचे सचीव कर्ण, सौबल ते ही चांगली बुद्धी न शिकवितां त्यांचेच दोषयुक्त मतास अनुसरतात तेणें करून दुर्योधन पराकाष्ठेचा निर्भय होऊन मनामध्यें आपलें स्व- हित विसरला. पुढें काय होईल याचा विचार करीत नाहीं. अद्याप- ही ते पांडवांस शरण गेले असतां पांडव आपल्या नाशास प्रवृत्त होणार ना- हींत, परंतु तसेंही करीत नाहींत याजवरून मला असें वाटतें कीं, पांडवांच्या हातूनच आमच्या कुलाचा नाश ईश्वरानें योजिला आहे. ज्या पांडवांचा मंत्री सर्व जगत् रक्षण करणारा त्रैलोक्यनाथ श्रीकृष्ण आहे तेथें अपजय कोठू न असणार? पहा कीं, खांडव वन दाह कालीं प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्ण साह्य होऊन त्याणें अर्जुनास मुक्त केलें. दुसरेंही अर्जुनानें महत् कृत्य असें ऐकि लें आहे कीं, कैलास पर्वतावर जाऊन शिवाशीं बहुत युद्ध करून त्यास संतु ष्ट केला. तेव्हां असा जो पार्थ पराक्रमी व बलाढ्य भीमसेन व सर्वजगत रक्ष ण करता जनार्दन हे तिन्ही एकत्र मिळाले असतां त्यांस कांहीं या त्रैलोक्याम ध्यें दुःसाध्य वस्तु नाहीं. तात्पर्य त्यांचे हातून सौबल, कर्ण इत्यादिकांसह व र्तमान माझे पुत्र जिवंत राहात नाहींत. असें मला आज खचित समजतें.

असा विषय या अध्यायांत आहे.

५० अध्याय पन्नास.— जनमेजय भाषण करितो हे वैशंपायन- ऋषे, पांडव वनामध्यें गेले. हें ऐकून नंतर धृतराष्ट्र ही शोकयुक्त भाषणें- करतो, परंतु आतां या भाषणांचा काय उपयोग हें सर्व निरर्थक आहे. दुरा त्म्या दुर्योधनानें पांडवांस बहुत छळिलें त्याचा प्रतीकार त्या कालींच धृतराष्ट्र

नें करावयाचा तो न करितां आतां तो भाषण करितो कीं, मंद बुद्धी दुर्यो धनें माझें ऐकत नाहीं हें त्याचें भाषण या कालीं व्यर्थ होय. असो झालें तें झा लें माघारें येत नाहीं. हे ऋषे, पांडव वनामध्यें रहात असतां वनधान्य- किंवा पेरलेलीं धान्यें भक्षण करून कालातिक्रमण करीत होते किंवा फलमू ल भक्षण करून होते हें मला सांग. असें ऐकून वैशंपायन सांगतात हे रा जा, पांडव वनामध्यें रहात असतां वनसंबंधीं धान्यें व पवित्र मृगांचीं मां सें पूर्वी ब्राह्मणास अर्पण करून अवशिष्ट राहिलेलीं आपण भक्षण करी त. पंच महायज्ञ केल्यावांचून राजानें एकही दिवस भोजन केलें नाहीं. ह्या राजाचा उत्तम नियम पाहून साग्नीक व निरग्नीक ब्राह्मण काम्यकवनीं येऊन रा हिले असतां तिनत्यांचा ही राजानें प्रीती करून सत्कार करावा. कोणी भोज न केलें, कोणी न केलें याची निरंतर चौकशी करावी जास जें इच्छित तें त्यास द्यावें. हजारो कृष्ण मृग मारून त्यांचीं उत्तम उत्तम मांसें पक्क करून ब्राह्मणां स समर्पण करावीं; ब्राह्मणास व्याधी, पीडा अथवा रोग काम्यकवनीं झाले ना- हींत. सुखें करून वनामध्यें रहात होते आणि राजाचें निरंतर अभीष्ट चिंत न करून आशीर्वाद देत. पिता जसा पुत्राचें पोषण करतो त्याप्रमाणें धर्मरा जानें ब्राह्मणाचें उत्तम प्रकारें पोषण केलें. माता जशी मोठ्या आनंदानें बा लकांस भोजनास घालते तशी द्रौपदी ब्राह्मणांस मोठ्या आनंदानें भोज नास देऊन आपण शेवटीं अवशेष भक्षण करी. मृग हिंसा करण्याच्या दि शा चारी बंधूनीं वांटून घेतल्या होत्या. पूर्वेस धर्मराजानें जाऊन तेथील मृ ग मारावे, दक्षिणेस भीमसेनानें, पश्चिमेस नकुलानें व उत्तरेस सहदेवानें जाऊन नाना प्रकारचे पवित्र मृग मारून काम्यकवनीं आणावे आणि ब्राह्म णांस भोजना करितां अर्पण करावे. असें धर्मशील पांडव काम्यकवनीं- उत्तम प्रकारें ब्राह्मणाचें पोषण करून व यज्ञ यागादि क्रतु आणि नाना प्रकारच्या पवित्र इष्टी करून वनामध्यें कालक्षेप करीत असतां आपला भ्राता अर्जुन अस्त्र प्राप्ती करितां स्वर्गास गेला तो कधीं आपल्यास भेटे ल अशी निरंतर मनामध्यें चिंता बाळगीत. याप्रमाणें त्यानीं त्या वनामध्यें पांच वर्षें घालविलीं. असा विषय या अध्यायांत आहे.

५१ अध्याय एकावन्न.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडवांचें वन संबंधींचरित्र धृतराष्ट्रानें ऐकून शोकानें बहुत काल पर्यंत श्वासोच्छ्वास टाकून तो संजयास ह्मणतो हे सूता, द्यूता पासून हा घोर अनर्थ उत्पन्न झाला येणेकरून मला रात्रंदिवस चैन पडत नाहीं; आणि वारंवार असें मनांत येतें कीं, हें आह्मीं बहुत अशुद्ध कर्म केलें हें केवळ अनर्थाचें कारण होय. पराक्रमी, शौर्यवान, धैर्यवान, परस्पर एकमेकांवर प्रीती करणारे व शस्त्रास्त्र विद्येमध्यें पराकाष्ठेचे निपुण जे पांडव ते आतां बहुत क्रुद्ध झाले आहेत ते आमच्या कुलाचा समुल नाश करतील तेव्हां मला माझ्यामित्रांच्या वाणीचें स्मरण होईल. ज्याकालीं भीष्मादिक आमचे सुहृदजन पांडवांशीं द्वेष करूंनको ह्मणोन मला सांगत होते त्या कालीं मी तें त्यांचें वाक्य श्रवण केलें असतें तर हा माझा कुलाचा नाशरूप अनर्थ कधींही उत्पन्न झाला नसता. असें धृतराष्ट्रानें भाषण श्रवण करून संजय बोलतो हे राजा, तुला दुर्योधनाचा निग्रह करण्यास सामर्थ्य असतां त्याकालीं तूं उपेक्षा केलीस आतां व्यर्थ शोक करून काय उपयोग? मी दूताच्या मुखा पासून काम्यकवनीं पांडव व श्रीकृष्ण यांचें भाषण झालेलें ऐकिलें तें तुला सांगतों ऐक. पांडवांस तुह्मीं द्यूतामध्यें पराजित करून चिरवलकलें देऊन वनांत घालविलें हें कृष्णानें श्रवण करतांच ते पांडवांस भेटण्या करितां तत्काल काम्यकवनीं गेले आणि तेथें पांडवांचा वेष पाहून नेत्रांतून अश्रुपात करून अर्जुनास बोलले हे अर्जुना, तूं कांहीं चिंता करूं नको, युद्धामध्यें तुझें सारथ्य मी करून सर्व शत्रूंचा क्षय करीन, हे अर्जुना, ही तुमची दशा पाहून वारंवार मला खेद होतो. अरे इंद्रप्रस्थीं ज्या कालीं तुह्मीं अश्वमेध केला त्या कालीं तुमची संपत्ती काय होती तिचें वर्णन आतां करवत नाहीं. अंग, वंग, कलिंग, पौंड्र, सिंहल, बरबर, म्लेंच्छ, लंकानिवासी, पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, राहाणारे यांस पादाक्रांत करून राजसूय यज्ञामध्यें धर्मराजास केवढी शोभा आली होती तें ऐश्वर्य मी पाहिलें होतें. आतां हें तुमचें विलक्षण ऐश्वर्य पाहून माझे चक्षु पराकाष्ठेचे संतप्त झाले आहेत बरें असो. ज्या दुष्टानीं राज्य हरण करून तुमची दशा केली

त्यांचा घात करून पृथ्वीची राज्य संपत्ती तुह्मांस देईन. अक्रूर, गद, सांब, राम, भीम, अर्जुन, नकुल, सहदेव, प्रद्युम्न, धृष्टकेतु, शिशुपालाचा पुत्र हे योद्धे रणामध्यें कर्ण, दुःशासन, व शकुनी यांचे प्राण हरण करून यमलोकास पाठवितील आणि धृतराष्ट्राची संपत्ती व पृथ्वीचें राज्य तुह्मांस लौकर प्राप्त होऊन तुह्मी त्याचा अखंड उपभोग कराल. हें कृष्णाचें वाक्य धृष्टद्युम्न प्रमुख योध्यांचे समक्ष धर्मराजानें ऐकून त्याणें भाषण केलें कीं, हे जनार्दना, ही तुझी वाणी सत्य असो माझ्या दुष्टांचा कुला सहवर्तमान लौकर नाश होवो. कौरव सभेमध्यें सर्वांच्या समक्ष मी भाषण केलें कीं, त्रयोदश वर्षें वनवास करीन यांत अन्यथा करणार नाहीं ही माझी प्रतिज्ञा सत्य होवो. त्रयोदश वर्षांच्या अंतीं सर्व शत्रूंचा नाश करून, पृथ्वीच्या संपत्तीचा मी उपभोग करीन असा तुझा आशीर्वाद मला पूर्ण असो. असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून धृष्टद्युम्न प्रमुख योद्धे श्रीकृष्णाच्या वाक्याचा मोठा आदर करून पांचालीस ह्मणतात हे पांचाली, तुझा क्रोधें करून दुर्योधन लौकरच आपला प्राणत्याग करील. तूं आतां शोक करूं नको ज्या कालीं पांडवांस अक्षक्रीडेमध्यें कौरवानीं जिंकिलें त्या कालीं ज्या सभासदानीं तुझी व पांडवांची थट्टा केली त्या दुष्टांचीं मांसें कोल्हे, कुत्रे व वायसादि पक्षी भक्षण करतील आणि गृध्र, गोमायु त्या दुष्टांचीं रुधिरें रणभूमीमध्यें प्राशन करतील. ज्या दुष्टानीं तुला हस्तस्पर्श केला असेल त्यांचे हात बाणानीं छेदिले जातील. तुला दुःख दिलेलें पाहून ज्या ज्या दुष्टानीं उपेक्षा केली त्यांचीं शिरें बाणानीं कृंतन होऊन पृथ्वीवर पडतील आणि त्यांचें रुधिर पृथ्वी शोषण करील. याप्रकारें धृष्टद्युम्नादिक योध्यानीं धर्मराज आणि द्रौपदी यांचें शांतवन केलें. संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, रामकृष्ण, धनंजय, प्रद्युम्न, सांब, आदी करून योद्धे आपल्या सैन्या सहवर्तमान रणामध्यें उभे राहिले असतां त्यांच्या पुढें कोण उभा राहून युद्ध करील? असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, द्यूतक्रीडाकालीं विदुरानें मला बहुतप्रकारें बोध केला कीं, तुह्मी पांडवांस द्यूतांत पराजित करून छळूं नका. यापासून पुढें विलक्षण एकादा अनर्थ होईल हें माझें वाक्य तु

ह्यीं ग्रहण करा. अनादर करूंनका विनाश कालीं या माझ्या वाक्याचें तुह्यां स स्मरण होईल. तोच समय संजया प्रस्तुत कालीं आला आहे असें म ला वाटतें. असा विषय या अध्यायांत आहे.

५२ अध्याय बावन्न:— जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायन ऋषे, अर्जुन अस्त्र विद्येच्या अभ्यासा करितां इंद्रलोकीं गेला असतां धर्मराज प्रभृती पांडव वनामध्यें काय करीत होते तें मला सांग. नंतर वैशंपायन सांगतात हे राजा, अर्जुन इंद्रलोकीं गेल्यावर पांडव वनामध्यें दुःखानें बहुत पीडित होऊन द्रौपदी सहवर्तमान काम्यकवनीं रहात असतां अर्जुनाचें निरंतर स्मरण करून शोक समुद्रांत निमग्न झाले होते. एके दिवशीं भीमसेनास अर्जुनाच्या वियोगामुळें पराकाष्ठेचें दुःख होऊन एकांतीं तो धर्मराजास बोलतो हे धर्मा, तुझी आज्ञा घेऊन अर्जुन स्वर्गास गेला तो अद्यापि कां येत नाहीं? अर्जुन हा आमच्या सर्व भ्रात्यांचा प्राण आहे त्या अर्जुनास स्वर्गीं किती दुःख होत असेल हें आपल्यास कशानें कळेल? जर अर्जुनाचा कांहीं घात झाला तर आपले प्राण राहणार नाहींत सात्यकी व वासुदेव हे ही आमचा व अर्जुनाचा नाश पाहून प्राण त्याग करितील. अर्जुनाच्या आश्रयें करून आह्मीं युद्धामध्यें सर्वांस जिंकून पृथ्वीचें राज्य करूं; परंतु हे धर्मराजा, तूं अज्ञानें करून हा द्यूत प्रसंग केलास आणि अर्जुनास स्वर्गास पाठविलास तेणें करून आह्मीं पराक्रमी असतां ही त्या दुष्टानीं आह्मांस बलहीना सारखें करून आपण राज्य श्रीचा उपभोग करतात. हे धर्मराजा, तूं तर सर्व धर्म जाणणारा व सर्वांमध्यें श्रेष्ठ आहेस. तुला मी सांगावें असें नाहीं. पहा बरें क्षत्रियानीं स्वबाहु बळें करून शत्रूंस जिंकून राज्यादिकांचा उपभोग करावा किंवा वनामध्यें जाऊन भिक्षा मागावी? या विषयीं तूं पूर्ण विचार कर. मला जर आज्ञा देशील तर श्रीकृष्णाच्या साह्यानें त्रयोदश वर्षांचे पूर्वीच सर्व धार्तराष्ट्रांचा नाश करून हें पृथ्वीचें राज्य तुला देतों. हे राजा, इतकें ही असून तुला आपली प्रतिज्ञा सत्य करणें असेल तर पुनः बारा वर्षें वनवास कर अथवा तुझी प्रतिज्ञा भंग होईल असें वाटत असलें त

र पूर्वी धृतराष्ट्र पुत्रांचा क्षय करून नंतर त्याचे प्रायश्चित्ता करितां नानाप्रकार चे यज्ञ याग करून पातकाचें आह्मीं क्षालन करूं आणि आपण उत्तम लोकांस जाऊं;परंतु हा विचार जो समंजस राजा असून दीर्घ सूत्री नसेल त्याच्या मनांत येईल. तूं तर धार्मिक व सत्यशील आहेस तुझ्या मनांत हा विचार येणारनाहीं; परंतु असें आहे कीं, कपटानें आपला कोणी घात केला असल्यास आपण त्या चा कपटानें घात केला तरीं दोष नाहीं. याविषयीं तुला एक धर्मशास्त्राची युक्ती सांगतों. तुला त्रयोदशवर्षे वनवास करावा ही प्रतिज्ञा सिद्ध करावयाची आहे-तर वेदांत असें लिहिलें आहे कीं, एकवर्षामध्यें जें काय पुण्य करावयाचें तें-एक दिवसांत बहुत कष्टें करून साध्य केलें तर त्याला एक संवत्सरांत केल्याचें पुण्य प्राप्त होतें. या दुष्ट दुर्योधनानें आपणास तेरा वर्षे वनवास करण्याचें ठर-विलें आहे तें दुःख तेरावर्षांचें आपल्यास बहुत करून एकदिवसांतच अनु-भूत होऊन बहुत कष्ट झाले. अतःपर असें वनसंबंधीं दुःख आपल्याच्यानें सोसवणार नाहीं. आपला एकदिवस दुःखाचा एक वर्षासारखा चालला आ हे, तेव्हां जितके आपले दिवस दुःखाचे गेले असतील तितकीं आपलीं वर्षे गेलीं. असें समजून तुझी प्रतिज्ञा सिद्ध झाली, अनृत भाषणाचा दोष तुझ्याक डे अगदीं नाहीं असें मला खचित वाटतें. अथवा दुसरी युक्ती सांगतों. पूर्वी वि श्वसृत नामक राजानें सहस्र संवत्सर पर्यंत याग केला तेथें संवत्सर शब्दा चा अर्थ अहोरात्र मिळोन एक दिवसास ह्मटलें आहे, तेव्हां वर्ष शब्द एक दि वसाचा ही वाचक शास्त्रांत प्रसिद्ध आहे, तेव्हां त्रयोदश संवत्सर ह्मणजे तेरा दिवस असा ही त्याचा अर्थ होतो तो अर्थ तूं समजून आपली प्रतिज्ञा सि द्ध झाली असें समज आणि मला या दुष्टाचा संहार करण्या विषयीं आज्ञा दे. जर न देशील तर पुढें तुझा विनाश होईल असें वाटतें. कदाचित् बारा वर्षे आ पण कसा तरीं वन वास करूं;परंतु तेरावे वर्षी अज्ञात वास आपल्याच्यानें क धींही व्हावयाचा नाहीं. आपण शूर,तसेच गुणवान, रूपवान्, आपल्यास पहा. तांच सहज कोणी तरी ओळखील आणि दुर्योधनास सांगेल. त्याचे ही दूत आ पला शोध करण्या करितां फिरतच आहेत त्यांच्या मुखापासून आपलें परिज्ञा न दुर्योधनास झालें ह्मणजे पुनः बारावर्षे वनवास व एकवर्ष अज्ञातवास करावा

लागेल. तेव्हां अज्ञात परंपरेमध्यें आपला जन्म जाईल आणि आपलें पौरुष नष्ट होईल. कदाचित् अज्ञात वासामध्यें ही न ओळखलें तर चौदावे वर्षी दुर्येधन व शकुनी तुला द्यूत क्रीडेस पुनः बोलावतील आणि तुझी तर प्रतिज्ञा आहे कीं, कोणी द्यूतास बोलाविलें असतां नाहीं ह्मणावयाचें नाहीं. शकुनी अक्षक्रीडे मध्यें निपुण आहे तेव्हां तो पुनः तुला जिंकिल आणि वनवासास पाठवील ह्मणोन ह्मणतों कीं, दुष्टानें आपल्यास कपटानें जिंकिलें तर आमपास त्यांच्याशीं कपट करण्यास कांहीं दोष नाहीं. तूं मला धृतराष्ट्राच्या पुत्रांचा वध करण्याची आज्ञा देशील तर अग्नी जसा वायूच्या साह्यानें तृणाचा समुदाय दग्ध करून टाकतो तसा मी त्या दुष्टांचा वासुदेवाच्या साह्यानें नाश करीन मला आज्ञामात्र दे. असें भीमसेनाचें भाषण श्रवण करून धर्मराजानें त्याच्या वाक्याचा बहुत आदर केला. आणि मूर्ध्याचें अवघ्राण करून तो धर्मार्थयुक्त असें भाषण करितो कीं, हे भीमसेना, त्रयोदश वर्षाच्या अंतीं माझी प्रतिज्ञा सत्य झाल्यावर तूं गांडीव धन्वा जो अर्जुन या सहवर्तमान कर्ण, शकुनी व दुःशासन आणि धृतराष्ट्र पुत्र यांचा नाश करशील हें माझें वाक्य तूं सत्य जाण; परंतु आतां त्यांच्या नाशाचा काल नाहीं प्रस्तुत तुझें हें भाषण व्यर्थ आहे. माझे प्रतिज्ञेस मात्र अनृतपणा येईल. तेरावें वर्ष झाल्यानंतर तूं ह्मणतोस ही गोष्ट खचित सिद्ध होईल. असा धर्मराज व भीमसेन यांचा संवाद चालला आहे तों धर्मराजाचे भेटी करितां काम्यक वनीं बृहदश्व ऋषी येऊन पोंहोंचले. हें धर्मराजानें पाहतांच मधुपर्के करून उत्तमप्रकारें ऋषीची पूजा करून नंतर उत्तमासनीं बसवून तो आपला वृत्तांत निवेदन करण्याच्या हेतूनें भाषण करूं लागला हे ऋषिवर्य, अक्षक्रीडेनें मी राज्यापासून भ्रष्ट झालों. दुष्ट कौरवानीं कपटें करून मला जिंकिलें आणि नानाप्रकारचे पण करून माझें सर्वस्व हरण केलें शेवटीं सभेमध्यें आमची भार्या जी द्रौपदी इजला नेऊन नाना प्रकारचीं दुर्भाषणें केलीं आणि कृष्णाजिन वल्कलें परिधान करवून आह्मांस वनवासास पाठविलें तीं वनवास संबंधीं दुःखें आमच्यानें सहन करवत नाहींत. क्लेशानें बहुत व्याप्त झालों. द्यूतक्रीडा कालीं मी आपल्या अमात्यांच्या व मित्रांच्या हित वाणी श्रवण केल्या-

नाहींत त्याचें फल हें मला प्राप्त झालें, नशांन अर्जुन शस्त्रास्त्र विद्या-संपादन करण्या करितां स्वर्गास गेला तो अद्यापि येत नाहीं तेणें करून मी तर फारच दुःखित आहें, माझ्या सारखा भाग्यहीन या भूमंडळावर कोणी नसेल; हे ऋषिवर्य, मजसारखा भाग्यहीन पृथ्वीवर तुमच्या कोणी पाहण्यात आला असेल किंवा ऐकण्यांत आला असेल तर मला सांगा. असें ऐकून बृहदश्व भाषण करतात हे धर्मराजा, तुजपेक्षां ही अल्पभाग्याचा राजा मी पाहिला आहे त्याचें वृत्त तुला निवेदन करतों स्वस्थ अंतःकरणें करून श्रवण कर ह्मणजे तुझा शोक दूर होईल. वीरसेन नामक नैषध देशाचा राजा होता त्याचा पुत्र नल धर्मार्थकामामध्यें परिपूर्ण व ज्ञाता असतां त्यास एके दिवशीं पुष्करानें कपटें करून द्यूतामध्यें पराजित करून वनवासास पाठविला असतां तो एकटाच वनवासास गेला. रथाश्व, बांधव यांपैकीं कोणी बरोबर नवते, एकट्यानेंच वनवास संबंधी दुःखें बहुत सहन केलीं, तूं नर इंद्रा सारखे पराक्रमी भ्राते, वेदवेत्ते ब्राह्मण व भार्या यां सहवर्तमान वनामध्यें रहातोस तेव्हां तूं शोक करूं नको. असें ऋषीचें वाक्य ऐकून धर्मराज बोलतो हे ऋषे, नलाख्यान विस्तारें करून मला सांगा मी ऐकण्यास फारच उत्कंठित आहें. असा विषय या अध्यायांत आहे.

५३ अध्याय त्रेपन्न — बृहदश्व भाषण करतात हे राजा, वीरसेन नामक राजाचा पुत्र नल, रूपसौंदर्य व गुण इहीं करून युक्त होता तसाच अश्वविद्येमध्यें मोठा निपुण, सूर्यासारखा तेजस्वी शूर, सर्व शस्त्रास्त्र विद्या निपुण व सत्यवादी असून अक्षविद्या त्यास फार प्रिय असे, त्याचें सौंदर्य पाहिलें असतां स्त्रियानीं तत्काल मोहित व्हावें, धनुर्धरांमध्यें पराक्रमें करून साक्षात् वैवस्वत मनू सारखा क्रूर असे. या प्रकारचा नलराजा नैषध देशामध्यें राज्य करीत असतां इकडे विदर्भ देशामध्यें भीमक राजा सर्व गुणानीं युक्त, शूर, पराक्रमी व सर्व प्रजेस मोठा प्रिय होता त्या राजास संतान नवतें ह्मणोन त्यानें यज्ञ, याग, तप व अनुष्ठानें करून ब्राह्मणांस व देवांस तृप्त केलें. कोणे एके दिवशीं दमनंनामक ऋषी भीमक राजाचे गृहीं आले असतां राजानें स्त्री सहवर्तमान ऋषीचा मोठा सत्कार करून बहुत प्रकारें संतोष केला, तेणें करून ऋषीनें संतुष्ट होऊन

राजास वर दिला कीं, या भार्येच्याठायीं तुजपासून रूप, सौंदर्य व गुणेकरून यु क्त अशी दमयंती नामक कन्या आणि दम, दांत व दमन असे तीन पुत्र होतील. दमयंती कन्या आपल्या रूपेंकरून व कीर्तीकरून सर्व स्त्रियांस जिंकिल आ णि सौभाग्यानें सर्व लोकांमध्यें इची ख्याती होईल. याप्रकारें वर देऊन ऋषी गेल्यानंतर कांहीं दिवसानीं भीमक राजाची स्त्री गर्भिणी होऊन ऋषीनें सां- गितल्या प्रमाणें एक कन्या व तीन पुत्र झाले. कोणे एके दिवशीं दमयंतीसख्यां मध्यें दासी सहवर्तमान क्रीडा करीत असतां सर्व आभरणानीं सुशोभित त्या सखिजनां मध्यें विद्युल्लते सारखी शोभत असे व रूप गुण इहीं करून सा- क्षात् लक्ष्मीच काय! असें लोकांस भासे. देव, यक्ष यांमध्यें ही अशी रूपवती स्त्री कोणीही पाहिली नवती मग मनुष्यांत तर कोठून असणार! जीस पाहिलें असतां नेत्रास बहुत सुख होणार तसाच नलराजा ही या भूमंडळीं रूपें करून मदना- सारखा अप्रतीम असे, त्यास पाहिलें ह्मणजे साक्षात् कामच काय! असा लोक- तर्क करीत. दमयंती जवळ नलाच्या रूपाचें वर्णन लोक बहुत करीत तेणें करू न दमयंतीच्या मनामध्यें कामाचा वारंवार संचार होत असे. इकडे नलानें दमयं तीच्या रूपाचें वर्णन श्रवण केलें ह्मणजे तत्काल शरीरांत कामाचा आविर्भाव हो ई; एकमेकांनीं परस्परांस कधीं अवलोकन केलें नवतें; परंतु दूताच्या मुखें करून प रस्पर एकमेकांचें सौंदर्य व गुण श्रवण करून एकमेक अशी इच्छा करीत कीं, उ- भयतांचा विवाह संबंध व्हावा. याप्रकारें नल व दमयंती बहुत दिवस एकमेकां ची इच्छा करून मनामध्यें झुरत असत. नलराजा एके दिवशीं दमयंतीच्या स्मर- णें करून मनामध्यें अत्यंत काम पीडित होऊन अंतःपुर समीप एक आराम हो ता तेथें उभा असतां सुवर्णा सारखें शरीर व पंख ज्याचे असा सुशोभित हंस पाहून नलानें त्यास धरलें; तेव्हां हंस ह्मणतो हे राजा, तूं मला सोड मारूं नको, तुझें कांहीं तरी मी हित करीन. दमयंतीजवळ जाऊन तुझ्या गुणाचें पराकाष्ठेचें व र्णन करून तुला ती लौकरच प्राप्त होईल असा यत्न करतों. असें हंसानें भाषण केल्यावर राजानें त्यास सोडून दिलें. नंतर ते संपूर्ण हंस विदर्भनगरामध्यें दमयं- तीच्या बागेंत जाऊन क्रीडा करूं लागले तों दमयंती ही आपल्या सख्यां सहवर्तमा न बागे मध्यें क्रीडा करण्यास आली होती त्या स्त्रियांस पाहून दूर पळारें तों तों त्या

सख्या हंसाचें सौंदर्य पाहून त्यास धरण्यास त्यांणीं उद्युक्त व्हावें असें होत असतां नलाचे हातांत सांपडलेला हंस दमयंतीच्या अग्रभागीं आला त्यास धरण्यास दमयंती पुढें झाली, इतक्यांत हंस मनुष्यवाणीनें दमयंतीस बोलतो हे दमयंती, नैषध देशामध्यें नलराजा अश्विनीकुमारासारखा रूपवान साक्षात मदन मूर्तीच काय! असा मी पाहिला. तेव्हां पासून मला असें वाटतें कीं, या राजासारखा रूपवान, गुणवान, औदार्येंकरून व पराक्रमेंकरून या भूमंडळीं कोणी नाहीं, त्या राजाची भार्या होण्यास तूंच स्त्री या भूमंडळीं योग्य आहेस. तुझा सारखें ही सौंदर्य देव, गंधर्व, मनुष्य, उरग व राक्षस यांमध्यें नाहीं, मींही बहुत उत्तमोत्तम स्त्रिया पाहिल्या असतील, परंतु तुझ्या सारखी रूपवती स्त्री त्रैलोक्यांत पाहिली नाहीं. पुरुषांमध्यें नलराजा हा एक रत्न व स्त्रियांमध्यें तूं अद्वितीय रत्न होस, येवढ्या करितां तुह्मां उभयतांचा दांपत्य भाव होणें हें यथा योग्य आहे, गुणवानानें गुणवानाशीं स्नेह संबंध करावा असें मला वाटतें. असें ऐकून दमयंती भाषण करत्ये हे हंसा, तुझें भाषण ऐकून मी अत्यंत संतुष्ट झाल्यें. नलाच्या स्वरूपाचें वर्णन तूं मजपाशीं करून त्याचें हृद्य मला जसें सांगितलेंस तसेंच माझें स्वरूप व हृद्य राजा जवळ जाऊन सांग. असें ऐकून तो तत्काल नैषध देशीं येऊन त्यानें दमयंतीचें वर्तमान नलराजास सांगितलें. असा विषय या अध्यायांत आहे.

५४ अध्याय चौपन्न:— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, हंसाचे मुखा पासून नलराजाचे गुण व सौंदर्य दमयंतीनें ऐकल्या पासून ती मनामध्यें निरंतर नलराजाची चिंता करूं लागली असतां तिचें तेज कृश होऊन शरीरावर पांडुरपणा आला, निरंतर ऊर्ध्व दृष्टी करून मदोन्मत्ता सारखी कोणाशीं भाषण न करितां हृदया मध्यें नलाचें चिंतन करीत बसे, घटके घटकेस श्वासोच्छ्वास टाकी. शय्या, आसन, भक्षण इत्यादि भोगांचा तिनें परित्याग केला, रात्रं दिवस स्वप्नामध्यें हे नला, हे नला, ह्मणोन भाषण करी. अशी दमयंतीची अवस्था झालेली सख्यानीं पाहून व तिच्या मनांतील इंगित जाणोन विदर्भ राजा जवळ सर्व वृत्त सांगितलें. राजानें ही दमयंतीची मुखचर्या व शरीराचा पांढरेपणा आणि अस्वस्थपणा पाहून तो मनाम

ध्यें चिंता करूं लागला कीं, माझ्या कन्येची अशी अवस्था होण्याचें काय कारण असेल? नंतर ही प्राप्त यौवना आहे इचा स्वयंवर करून विवाह करावा. राजानें असा निश्चय करून देशोदेशींचे राजांस पत्रें पाठवून सर्वांस आमंत्रणें केलीं कीं, दमयंतीचा विवाह आहे याजकरितां या समारंभास सर्वांनीं यावें. असें भीमक राजानें पत्र देशोदेशींचे राजांस पावतांच सर्वांनीं स्वयंवराकरितां जाण्यास सिद्ध होऊन गजाश्व रथासहवर्तमान प्रस्थान केलें. नाना प्रकारचीं विचित्र माल्यें, आभरणें व वस्त्रें इहीं करून आपलें शरीर सुशोभित करून सर्व पार्थिव भीमक राजाचे गृहीं स्वयंवराकरितां आले. राजानें त्या सर्वांची यथायोग्य पूजा करून मोठमोठ्या सिंहासनावर बसविलें तों इकडे ऋषीमध्यें श्रेष्ठ नारद व पर्वत ऋषी फिरतां फिरतां इंद्राकडे गेले. इंद्रानें त्यांची उत्तम प्रकारें पूजा करून आसनीं बसवून उभयतांस कुशल प्रश्न केल्यावर नारद बोलतात हे अमरेश्वरा, तुह्मी कुशल असून पृथ्वीवरील संपूर्ण राजे कुशल आहेतना? असें नारदानें भाषण ऐकून इंद्र बोलतो हे ऋषे, धर्मज्ञ युद्धामध्यें पराङ्मुख न होतां शस्त्रें करून यथाकालीं मरण पावलेले जे क्षत्रिय त्यांचें हें राहण्याचें स्थान होय; परंतु आलीकडे ते क्षत्रिय कोठें गेले हें मला विदित नाहीं आपल्यास विदित असल्यास निवेदन करावें. असें इंद्रानें वाक्य ऐकून नारद बोलतात हे अमरेश्वरा, मला असें वाटतें कीं, विदर्भ देशीं भीमक राजा आहे त्याची दमयंती नामक कन्या रूपें करून या पृथ्वीवर ज्या स्त्रिया आहेत त्यांमध्यें अतिलावण्यवती आहे, अशी स्त्री त्रैलोक्यांत. यक्ष, राक्षस, गंधर्व, किन्नर, अमर यांमध्यें ही पाहण्यांत आली नाहीं तिचा स्वयंवर लौकरच व्हावयाचा आहे. त्या समारंभाकरितां देशोदेशींचे राजे तेथें आले आहेत, त्यांमध्यें तुह्मी ह्मणतां हे राजे गेले असतील असें मला वाटतें. असें नारद व इंद्र यांचें भाषण चाललें आहे तों सर्व लोकपाल व देव इंद्रसभेस येऊन नारदाचें वचन ऐकून आपण ही दमयंतीच्या स्वयंवरास जावें अशा निश्चयानें आपआपले गण व वाहनें यां सहवर्तमान विदर्भनगराकडे चालले, तों नलराजा ही विदर्भ नगराकडे चालला असतां साक्षात् मनमथा सारखा रूपवान, सूर्या

आरखा तेजस्वी, असा नल यास मार्गामध्यें देवानीं पाहून आप आपलीं वि-
मानें अंतरिक्षांतच उभीं करून गुणवान् व रूपवान् जो नल यास टाकून दमयं
ती आह्मांस कशास वरील. असा विस्मय करून नंतर विमानांतून उतरून त
त्याच्या समीप येऊन देव बोलतात हे राजा, तूं सत्यव्रत आहेस ह्मणोन तुज
ला आमचें ह्मणणें असें आहे कीं, दौत्य कर्म करून तूं आह्मांस साह्य व्हावें
स. असा विषय या अध्यायांत आहे.

५५ अध्याय पंचावन्न.— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, देवांचें भा
षण ऐकून नलराजा हस्त जोडून बोलतो तुह्मीं जी मला आज्ञा कराल ती मा-
न्य करीन. परंतु तुह्मीं कोण कोठून आलांत आणि मला दौत्य कर्म करण्यास
कशाकरितां सांगतां? याचें कारण संपूर्ण सांगा. असें ऐकून इंद्र बोलतो हे रा-
जा, मी इंद्र व हे यम, अग्नि, वरुण होत विदर्भ नगरीं दमयंतीचा विवाह समा
रंभ आहे असें ऐकून आह्मीं दमयंतीच्या विवाह समारंभार्थ चाललों आहों
त तर आह्मां चौघांतून कोणास तरीं दमयंतीनें वरावें अशी इच्छा आहे या
विषयीं दूतरूपें दमयंती जवळ तूं आमची मध्यस्ती करावी हेंच तुला सांगणें
आहे. असें ऐकून नलराजा बोलतो मी ही दमयंतीच्या स्वयंवरा करितां चाल
लों आहें, दमयंती मिळावी ही मलाही इच्छा आहे तेव्हां आपल्यास वस्तु मि
ळावयाची असतां ती वस्तु दुसऱ्यास मिळण्या विषयीं कोण उद्योग करील ते-
व्हां या दूतकर्मा विषयीं मला पाठवूं नका इतकें तुमच्या जवळ मागणें मागतों.
दूत कर्मा विषयीं मी नाहीं ह्मटलें ह्मणोन आपणास कोप येऊं नये. असें ऐकू
न इंद्र बोलतो हे राजा, पूर्वीं मी दूत कर्म करीन असें आमचे जवळ कबूल के-
लेंस आणि आतां नाहीं ह्मणतोस नसात् हें अनृत भाषण तुला योग्य नाहीं
लौकर जा आणि आमचें कार्य सिद्धी कर. असें ऐकून नल पुनः बोलतो हे
अमरेश्वरा, दमयंती, राजाच्या अंतःपुरामध्यें एकांतीं भृत्य जनानीं संरक्षि
त आहे तेथें दूत वेषानें माझी गती कशी होईल? असें ऐकून इंद्र बोलतो जा
तूं चिंता करूं नको तुला मी अदर्शन शक्ती दिली त्या योगें तूं कोणाचे दृष्टी
स न पडतां दमयंतीच्या अंतःपुरामध्यें जाशील. असें ऐकतांच नलराजा त
त्काल विदर्भ नगरामध्यें जाऊन अदृश्य होऊन दमयंतीच्या अंतःपुरांत गे-

त्यानंतर शरीराच्या कांतीनें चंद्रास देखील जिणें लांछन उत्पन्न केलें अशी ती दमयंती, सकुमार अंगी, सूक्ष्मकटी, सुलोचना सख्यां सह वर्तमान क्रीडा करीत असतां तीस पाहतांच त्याचे शरीरांत कामाचा आविर भाव उत्पन्न झाला; परंतु बलात्कारानें त्यानी शांती केली. सख्यानीं त्या देदीप्य मान तेजस्वी पुरुषास पाहिलें आणि मनामध्यें हा नलराजाच काय. असा विस्मय करीत नलाच्या गोष्टी काढून परस्परांजवळ त्याच्या रूपाची प्रशंसा करून त्या पुरुषास पाहून बोलतात अहो, ह्या मदना सारखा रूपवान कांतीनें चंद्रासारखा नसाच धैर्यवान हा कोण असेल बरें; देव, गंधर्व, यक्ष यांतून नरीं कोणी नसेलना. असें भाषण करीत त्याच्या तेजानें चकित होऊन त्याजपाशीं त्यास बोलण्याचें सामर्थ्य होईना. नंतर दमयंती त्या दूतास पाहून मंदमंदहास्य करीत बोलत्ये हे पुरुषा, तूं कोण येथें कशास आलास; तुला पहातांच माझे शरिरांत कामाचा आविरभाव झाला तेव्हां तूं कोण हें मला समजत नाहीं. भृत्य जनानीं माझें अंतःपुर संरक्षित असतां त्यांनें उल्लंघन करून तूं आंत येण्यास कसा समर्थ झालास. असें ऐकून नल बोलतो हे कल्याणी, मी नलनामक देवांचा दूत होऊन तुझा कडे आलों आहें. इंद्र, यम, वरुण, अग्नि हे तुला वरण्या विषयीं उद्युक्त आहेत त्यांचा निरोप सांगण्याकरितां मी दूत कर्म स्वीकारून तुज कडे आलों आहें आणि त्यांच्याच प्रभावें करून मला अदर्शन शक्ती मिळाली ह्मणोन कोणाच्या दृष्टीस नपडतां तुझ्या अंतःपुरांत येण्यास मी समर्थ झालों; तस्मात् हे दमयंती, इंद्रादि देवांस वरण्याविषयीं तूं मनःपूर्वक बुद्धी धर. असा विषय या अध्यायांत आहे.

५६ अध्याय छपन्न:— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, नलाचें वाक्य ऐकून दमयंती बोलत्ये हे नलराजा, संपूर्ण देवांस माझा नमस्कार असो. जें मजपाशीं द्रव्य आहे तें सर्व मी तुला अर्पण करून तुझ्या वर विश्वास ठेवून बसल्यें आहें. हंसाचें वचन ऐकल्या पासून येवढा स्वयंवराचा समारंभ हे राजा, तुझ्या करितांच केला जर तूं या काळीं माझें प्रत्याख्यान करून स्वीकार न करशील तर विषभक्षण करीन, जलामध्यें प्राण त्याग करीन, अथवा आपले कंठास फांस लावून तुझ्या करितां देहत्याग करीन. असें ऐकून नलराजा बोलतो हे दमयंती,

हे लोकपाल संपूर्ण तुझी इच्छा करीत असतां तूं त्यांचा त्याग करून मलाच वर ण्याची इच्छा करतेस हें काय? त्या संपूर्ण लोकपालांच्या पादरजाची साम्यंता म- ला येणार नाहीं. मी मनुष्य व ते देव आहेत तेव्हां त्याचा परित्याग करून मनु- ष्यावर तुझी इतकी प्रीती कां? कदाचित् तूं मला वरिलेंस तर देवांशीं मी विरुद्ध झालों असें होईल आणि देवांशीं विरोध झाला ह्मणजे अनर्थाचें कारण होय. याजकरितां माझें संरक्षण व्हावें अशी तुझी इच्छा असेल तर इंद्रादि लोक- पालांस वर व उत्तम वस्त्रें व अलंकार इत्यादिकांचा उपभोग कर. जो अग्नि यास र्व पृथ्वीस हुत करितो तो सर्व देवांत श्रेष्ठ असतां त्याचा तूं कां अनादर करतेस? ज्याच्या दंड भयें करून सर्व प्राणि भयपावतात अशा यमाचा तूं कां अनादर कर त्येस? दैत्य दानवांचें मर्दन करणारा जो धर्मात्मा इंद्र सर्व देवांचा राजा त्याचा क- शाकरितां अनादर करत्येस? सर्व जलाचा पती जो वरुण त्याचाही अनादर कां करत्येस? मी तुला दूतभावानें उपदेश केला अतःपर तुला इच्छित असेल त सें कर. असें नैषधाचें वचन ऐकून दमयंतीच्या नेत्रांतून अश्रुपात होऊं लाग ले असतां मजूळ वाणीनें बोलत्ये हे राजा, मनें करून मी तुला पूर्वीच वरला - आहे, आतां हे दिक्पाल मजविषयीं प्रयत्न करतात तर करोत त्यांस नमस्का र करत्यें; परंतु माझा निश्चय फिरणार नाहीं. असें भाषण करून दमयंतीच्या- शरीरास कंप सुटला. हें नलराजानें पाहून तो बोलतो हे कल्याणी, मी दूतकर्म- स्वीकारून आलों आहें त्यापेक्षां तत् संबंधीं भाषण त्यांच्या उपयोगीं मला बो लणें अवश्य आहे; परंतु आपला स्वार्थ सोडून परार्थ कोण साधन करील? ज्यां त तुझा स्वार्थ असेल तें तूं कर माझें कर्म होतें तें मी केलें. त्या कालीं दमयंती ने त्रांतून अश्रुपात करीत किंचित् हास्य करून राजास बोलत्ये हे राजा, याविष यीं एक उपाय आहे तो मी तुला सांगत्यें ह्मणजे तूं कोणत्याही प्रकारें बद्ध न हो तां तुझें कार्यसाधन होईल आणि लोकपालांसह या स्वयंवरांत तूं ये आणि स र्व बसले असतां त्या सर्वांसमक्ष मी तुला वरीन ह्मणजे लोकपालांच्या मनांत तु झें कापट्य आहे असें न येतां दमयंतीनें स्वसंतोषानें नलास वरिलें असें त्यां स वाटेल. असें दमयंतीचें भाषण नलराजानें ऐकतांच त्याचा अंगिकार करू न तेथून प्रसन्नचित्त होऊन तो इंद्रादि लोकपाल जेथें बसले होते तेथें आला आणि

भार्या हें कधीं चुकत नाहीं त्या राजानीं पराकाष्ठेचा कोलाहल केला तसाच क
रीत, यावत्काळ पर्यंत या देहांत प्राण आहेत तावत्काल पर्यंत मी तुझा आहें
असें समज. असें ऐकून दमयंतीनें त्याच्या वाक्याचा बहुत सत्कार केला. नल
दमयंतीची परस्परांवर प्रीती होऊन तीं देवांस शरण जाऊन त्यानीं त्यांची ब-
हुत स्तुति केली तेणें करून इंद्रादिक देव संतुष्ट होऊन बोलले हे राजा, आह्मीं
तुला वरदान देतों. प्रथम इंद्र बोलला हे नला, यज्ञामध्यें आह्मीं प्रत्यक्ष तु
झ्या दृष्टीस पडूं व उत्तम प्रकारची तुला गती होईल. नंतर अग्नि वर देतो हे न-
ला, जेथें तूं माझी इच्छा करशील तेथें मी प्रगट होईन व तुला तेजस्वी लो-
क प्राप्त होतील. असे अग्नीनें दोन वर दिले. नंतर यम वर देतो हे राजा, अ-
न्नाचा जो वास्तविक रस आहे त्याचें संपूर्ण परिज्ञान तुला होईल व धर्माचे ठा
यीं तुझी मती निरंतर असेल. नंतर वरुण वर देतो हे नला, जेथें तुला उदका
ची इच्छा असेल तेथें तुला उदक मिळेल व तुझ्याजवळ जीं पुष्पें असतील.
तीं निरंतर सुगंध युक्त राहतील. असे लोकपाळ नळराजास आठ वर देऊन
स्वर्गास गेले इकडे देशो देशचे राजे ही आप आपल्या देशीं निघोन गेले. नंत-
र भीमक राजानें स्वस्थानः करणें करून यथाविधि कन्येचा विवाह करून न
ळास अर्पण केल्यावर नळ राजा कांहीं दिवस श्वशुर गृहीं राहून भार्येसहव
र्तमान नैषध देशीं गेला असतां दमयंती सहवर्तमान शची व इंद्र यां सारखा
आपले गृहीं शोभूं लागला. त्यानें धर्म पराक्रम ईहीं करून उत्तम प्रकारें प्र-
जेचें पोषण केलें. ययाति व नहुष यां सारखे मोठ मोठे यज्ञ याग करून ब्रा
ह्मणास सुवर्ण दक्षिणा देऊन संतुष्ट केलें; तो नाना प्रकारचीं वनें उपवनें व सरो
वरें यांचे ठायीं दमयंती सहवर्तमान क्रीडा करीत असे, कांहीं कालानें दमयंती
स इंद्रसेन नामक पुत्र व चंद्रसेनानामक कन्या अशीं दोन अपत्यें झालीं. पुत्र
व कन्या यांचें लालन पोषण राजानें उत्तम प्रकारें करावें, अग्नि तस्करादिकां-
चें भय न होतां संपूर्ण वसुंधरा उत्तम रीतीनें संरक्षित केली. या प्रकारें नलरा
जानें दमयंती सहवर्तमान नैषध देशचें राज्य निष्कंटक केलें. असा विष
य या अध्यायांत आहे.

५८ अध्याय प्रारंभः— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, दमयं

तीचा स्वयंवर होऊन नळराजा दमयंती सहवर्तमान आपले देशीं निघून गेला. इतर राजेही निराश होऊन आपआपले देशीं निघून गेले. इंद्रादिक लोकपाल ही विमानारूढ होऊन आप आपले स्थानीं जात असतां मार्गामध्यें द्वापरासहवर्तमान कली चालला होता त्यास पाहून इंद्र बोलतो हे कली, तूं कोठें जातोस? असें ऐकून कली बोलतो विदर्भदेशीं दमयंतीचा स्वयंवर आहे तेथें जातों दमयंतीस वरून माघारा येईन. असें ऐकून इंद्र किंचित् हास्य करून बोलतो हे कली, दमयंतीचा स्वयंवर होऊन नळराजास तिणें वरिलें आणि नळराजा भार्येसहवर्तमान नैषधदेशीं निघून गेला. हें आह्मीं आपले दृष्टीनें पाहिलें आणि तूं तर स्वयंवरास जातों ह्मणतोस हें ऐकून मला आश्चर्य वाटतें इतकें ऐकतांच कली बहुत क्रुद्ध होऊन इंद्रास बोलतो तुह्मीं दिक्पाल देव स्वयंवरामध्यें असतां तुह्मांस टाकून मनुष्य जो नळराजा यास दमयंतीनें वरिलें हें मोठें अनुचित कर्म केलें. त्या कालीं इंद्र बोलतो हे कली, आमचे समक्ष नळराजास दमयंतीनें वरिलें याचा आह्मांस विषाद नाहीं, कारण हा राजा सर्वगुणानीं संपन्न, सर्वधर्म सांगोपांग जाणणारा, ज्याचे गृहीं देव, मनुष्यें अन्नें करून तृप्त होतात. हिंसा ज्यास विदित नाहीं, सत्यवादी जितेंद्रिय, धैर्यवान्, ज्ञानवान् निरंतर शमदम यांस धारण करणारा ज्ञानी आहे तो आमच्यापेक्षां ही श्रेष्ठ होय, ज्याच्या सौंदर्यासारखें सौंदर्य त्रैलोक्यांत कोणाचें नसेल. त्या नळराजास जो शाप देईल तो केवळ आत्मघाती-असें समजून सर्वांमध्यें तो मूर्ख होय. गुणानें, रूपानें व पराक्रमानें प्रसिद्ध जो नळराजा यास जो शाप देईल तो अनंत वर्षें नरकांत वास करील. असें इंद्रादिक लोकपाल कली बरोबर बोलून आप आपले लोकास गेले. इकडे कली द्वापारास बोलतो मला माझा कोप आंवरत नाहीं याजकरितां नळराजाच्या शरीरांत प्रवेश करून राज्यापासून त्यास भ्रंशित करून दमयंती सहवर्तमान एकत्र कधीं राहणार नाहीं असें करीन, तूंही अक्षांत प्रवेश करून माझें साह्य कर. असा वि० अ० आहे.

५९ अध्याय एकुणसाठ— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, अशी कलि प्रतिज्ञा करून नैषध देशीं नळराजाचे गृहीं गेला आणि राजास

बहुत शुचि, ज्ञानी, सत्यवादी, पुत्रासारखी प्रजा संरक्षण करणारा, शांत व दांत पाहून याचे शरीरांत आपला कसा प्रवेश होतो अशी चिंता करित असतां द्वादश वर्षे गेलीं कोणे एके दिवशीं नळराजानें मूत्रोत्सर्ग करून विस्मृतीनें पाद प्रक्षालन केले नाहींत तितका अवकाश कलीनें पाहून आज नळराजा अशुची दृष्टीस पडला तर आतां पाद द्वारानें याचे शरीरांत प्रवेश करावा असा विचार करून पाद द्वारानें नळाचे शरीरांत प्रवेश केला आणि दुसरें रूप धरून नळाचा भ्राता जो पुष्कर दूर देशीं रहात होता तेथें जाऊन त्यास भाषण केलें कीं, तूं नळराजासमागमें अक्षक्रीडा कर. मी अक्षाचें रूप धरून तुला साह्य होतों. हे अक्ष घेऊन नळराजाचे गृहीं जाऊन त्यासमागमें क्रीडा करण्यास आरंभ कर मी त्याचे शरीरांत प्रवेश केला आहे त्यापेक्षां तो नाहीं ह्मणणार नाहीं; द्यूत कालीं सर्वस्व धनपणास लाऊन हरण कर. असें कलीनें पुष्करास सांगतांच तो कलीस्वरूपी, कृत्रिम फांसे हस्तामध्यें घेऊन नळराजाचे गृहीं गेला आणि त्यास बोलतो हे राजा, आपण बहुत दिवस अक्षक्रीडा केली नाहीं त्यापेक्षां तुह्मीं व आम्हीं उभयतां अक्षक्रीडा करूं. इतकें पुष्करानें भाषण करतांच राजानें उत्तर दिलें कीं, हे पुष्करा, फार चांगलें आहे द्यूतक्रीडेमध्यें जर मी हरलों तर तुलाही संपत्ति व राज्य अर्पण करीन, तूं हरलास तर तुझें राज्य मी घेईन. अशी उभयतांची प्रतिज्ञा दमयंतीनें ऐकून बहुत प्रकारें पतीचा निषेध केला. परंतु नळराजानें त्या कालीं कोणाचें न ऐकतां द्यूतास आरंभ केला. खेळतां खेळतां पुष्करानें नळराजाचें द्रव्य, अश्व, गज, रथ इत्यादि सर्व हरण केलें. हें वर्तमान गावांतील प्रजेस व वृद्ध वृद्ध अमात्यांस कळतांच ते संपूर्ण नळराजाचे सन्निध येऊन त्याणी सूता बरोबर दमयंतीस सांगून पाठविलें. हे दमयंती, राजानें द्यूत प्रसंग करून सर्वस्व हरविलें ह्मणोन ऐकिलें तर आपण जाऊन राजास आमचा निरोप सांगावा कीं, आपली संपूर्ण प्रजा व अमात्य आपल्या भेटीची इच्छा करीत आहेत आह्मीं जावें तर आमचें ऐकणार नाहीं. द्यूतामध्यें राजा अगदीं निमग्न झाला आहे याजकरितां आह्मीं तुला सांगतों तूं जाऊन राजास सांग. सारथ्यानें प्रजेचा व अमात्यांचा निरोप दमयंतीस सांगतांच दमयंती रुदन करूं लागली आणि दुःख सागरांत पराकाष्ठेची निमग्न होऊन तत्काल नळराजाकडे जाऊन राजास बो-

लत्ये हे राजा, व्यसनांत गुंतून आपलें सर्वस्व हरण करून घेतलेंस आतां तरीं जागृत हो आणि तुझ्या भेटीस सर्वलोक व अमात्य आले आहेत त्यांच्याशीं भाषण कर; परंतु तिचें भाषण श्रवण न करितां राजा द्यूतामध्यें पराकाष्ठेचा निमग्न झाला. राजा व्यसनामध्यें निमग्न झाला त्यापेक्षां याचा लौकरच नाश होणार आपण तरीं कशा करितां येथें व्यर्थ उभे राहावें, आपली दाद लागत नाहीं-असा मंत्र्यानीं व ग्रामनिवासी जनानीं विचार करून ते लज्जित होऊन आपआपले गृहीं गेले. दमयंतीनें राजाचें चरित्र पाहून पुनःपुनः श्वासोच्छ्वास टाकून विलाप करूं लागली. या प्रकारें नलराजानें बहुत दिवस पुष्करा बरोबर द्यूत केलें असतां शेवटीं पुष्करानें राजाचें सर्वस्व हरण केलें. अ॰ वि॰ अ॰ आहे.

६० अध्याय साठ— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, नलराजा द्यूत-खेळतां खेळतां उन्मत्ता सारखा भ्रांत झाला हें दमयंतीनें पाहून ती शोकानें संतप्त झाली. राजा द्यूतव्यसना पासून कसा परावृत्त होईल! याविषयीं काय उपाय करावा! बहुत करून सर्व द्रव्य पुष्करानें हरण केलें. बाकी थोडें राहिलें इतक्यांनतरीं हा सावध होऊन हें व्यसन टाकील अशी काय युक्ती करावी. अशी ती वारंवार मनामध्यें चिंतन करीत असतां हितकारिणी, समयोचित भाषण करणारी जी बृहनसेना नामक दासी इला दमयंती बोलल्ये हे बृहत्सेने, राजाचे जे वृद्ध वृद्ध अमात्य आहेत त्यांज कडे जाऊन सांगावें कीं, मी तुह्मांस नलराजाकडे जाण्यास सांगते तर तुह्मीं सर्व मिळून राजा कडे जाऊन द्रव्याचा अवशेष काय-राहिला याचा शोध करून राजास बहुत प्रकारें बोध करावा आणि इतःपर द्यूत न खेळेल असें करावें; नाहीं तर सर्वस्वी राजाचा नाश होऊन पुढें काय होईल याचा अंत लागणार नाहीं. असें ऐकतांच बृहतसेने ने तेव्हां वृद्ध वृद्ध अमात्यांकडे जाऊन त्यांस दमयंतीचा निरोप सांगितला. तो ऐकतांच ग्रामनिवासी जनासहवर्तमान वृद्ध वृद्ध अमात्य राजाचे गृहीं येऊन त्याणीं बहुत प्रकारें राजास बोध केला. परंतु त्यांचीं हितवाक्यें कांहीं श्रवण न करितां द्यूतामध्यें पराकाष्ठेचा निमग्न झाला हें दमयंतीनें पाहून कोणाचेंच हितवाक्य राजा ऐकत नाहीं तस्मात् याचा खचित नाश होणार असा विचार करून पुनः बृहतसेनेस बोलल्ये हे बृहत्सेने, राजाचा सारथी जो वार्ष्णेय यास माझा निरोप सांग-

वा कीं, रथ सत्वर सिद्ध करून आणावा ही दमयंतीची आज्ञा ब्रुहन् सेनेनें वार्ष्णे यास सांगतांच सारथ्यानें रथ सिद्ध करून आणिला असतां दमयंती वार्ष्णेया स मृदु वाणीनें बोलली हे सूता, देशकाल राजास कठिण आला आहे हें तूं जाण तच आहेस याज करितां राजाचें साह्य या समयीं जितकें होईल तितकें कर. ज सजसा राजा द्यूतामध्यें पराजित होतो तसतसा अधीक क्रुद्ध होऊन पुनः पुनः पुष्कराशीं द्यूत खेळण्यास प्रवृत्त होतो व्यसन सोडीत नाहीं, याजवरून म ला असें वाटतें कीं, नलराजाचा विनाशकाळ जवळ आला. सुहृद, स्वजन व अ मात्य यांचीं हित वाक्यें कांहींच ऐकत नाहीं तस्मात ह्या राजाचा दोष नाहीं, त्याचें प्रा रब्ध फिरलें म्हणोन त्यास अशी दुष्ट वासना उत्पन्न होऊन द्यूत क्रीडेस आस क्त झाला. तूं आतां नलाचे उत्तम अश्व असतील ते रथास लाऊन ही कन्या व हा पुत्र या उभयतांस रथामध्यें बसवून कुंडिन नगरांत जाऊन माझा पिता जो भीमक राजा याचे स्वाधीन कर म्हणजे तो तरी आपले ज्ञानींत स्वस्थ राहातील. नंतर तुला इकडे येण्याची इच्छा असल्यास ये अथवा तेथें राहा. असें ऐकून वार्ष्णेय सर्व अमात्यांच्या अनुमतानें उभयतां कुमारांस रथामध्यें घालून कुंडिन नगरीं गेला आणि उभयतां कुमारांस भीमक राजाचे स्वाधीन करून व रथाश्व तेथें ठेऊन आपण अयोध्या नगरी मध्यें रुतुपर्ण राजाचे गृहीं जाऊन अश्वशाळेवर राहून सारथ्य कर्म करूं लागला. असा विषय या अ॰ आहे.

६१ अध्याय एकसष्ट — बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, इकडे पुष्करानें नलराजाचें सर्वस्व हरण केल्यावर तो नलराजास बोलतो हे नला, पुनः द्यूत खेळण्याचीइच्छा असेल तर खेळ; परंतु तूं आतां निर्द्रव्य झाला स तेव्हां पणास काय लावशील? एकटी भार्या राहिली आहे ती पणास ला वून द्यूत खेळणें असेल तर खेळ. असें ऐकतांच नलास परम कोप येऊन त्याचें हृदय विदीर्ण झालें. आणि पुष्करा कडे क्रूर दृष्टीनें पाहून सर्व अंगाव रील भूषणांचा त्याग करून एकवस्त्र परिधान करून तत्काल नगरा बाहे र पडला. दमयंतीही एकवस्त्रा होऊन नला बरोबर नगराचे बाहेर आली. इकडे पुष्करानें नलराजा बरोबर कोणी जाईल अथवा त्याच्या शीं भाषण करील तर त्यास मी मोठा दंड करीन अशी नगरामध्यें आज्ञा केली असतां ग्रा

पुरनिवासी जन कोणीही राजाचे भीतीनें गेले नाहींत. नलानें तीनरात्री जलप्राशन करून नगराच्यासमीप मार्गी घालविल्या पुढें तो क्षुधेनें पीडित होऊन फलमूलाचा शोध करण्या करितां वनामध्यें चालला असतां दमयंती ही नलराजाच्या मागून चालली. राजा बहुत दिवस क्षुधेनें पीडित झाला ह्मणोन त्यास कांहीं सुचेनासें झालें तो चालतो चालतां वृक्षावर सुवर्णपक्षी नलराजानें पाहिले तो मनामध्यें विचार करूं लागला कीं, बहुत दिवस आपल्यास भक्ष्य मिळालें नाहीं याज करितां हे सुवर्णपक्षी धरावे ह्मणजे आपल्यास भक्ष्य होईल व सुवर्ण ही सांपडेल असा विचार करून ते पक्षी धरून आपले परिधानवस्त्रांत बांधून ठेविले तों ते पक्षी वस्त्रा सहवर्तमान आकाशमार्गें उडून गेले तेव्हां ते बोलले कीं, हे नला, आह्मी द्यूतांतले अक्ष आहोंत. पक्षीरूप धारण करून तुझें वस्त्र हरण करण्यास आलों होतों तुझे अंगावर एक वस्त्र होतें तें आमच्यानें पाहवेना ह्मणोन तुझें वस्त्र हरण करून दिगंबर केलें. आतां तुला जिकडे रुचेल तिकडे जा. असें ऐकून नलराजा परम विस्मय पावोन दमयंतीस बोलतो हे स्त्रिये, ज्याच्या कोपानें मी ऐश्वर्या पासून भ्रष्ट झालों द्यूतक्रीडा करण्यास मी बहुत आसक्त झालों ह्मणोन माझ्या अमात्य, ज्ञाती आणि प्रजा यानीं परित्याग केला. तेच हे अक्ष पक्ष्यां चें रूप धरून अशा आपत्ति कालांत यानीं माझें वस्त्र हरण केलें. तस्मात् माझ्या दुःखाचा काल पराकाष्ठेचा आला आहे. हे दमयंती, माझें हित व्हावें अशी जर तुझी मनःपूर्वक इच्छा असेल तर माझ्या वाक्याचा तूं अनादर करूं नको. हे बहुत लोक दक्षिण मार्गास जातात व नाना प्रकारचे देश, पर्वत, नद्या यांचें ही उल्लंघन करून किती एक लोक चालले आहेत, तसाच सर्व पर्वतां मध्यें श्रेष्ठ हा विंध्याद्रि पर्वत, ही पयोष्णी नामक नदी समुद्र गामिनी आहे इला हाच मार्ग जातो, हे ऋषींचे आश्रम पुष्प फल मूलानीं पूर्ण आहेत, तसाच हा विदर्भ देशाचा मार्ग, या मार्गानें बहुत लोक विदर्भ नगरीं जातात. तसेच कोशल देश हे ही इकडेसच आहेत त्या सर्वांस पहा. अशीं भाषणें नलराजा करीत असतां दमयंती दुःखानें त्रस्त होऊन अश्रुपात करीत राजास बोलत्ये हे राजा, तुझ्या भाषणें करून माझ्या चित्तास तर बहुत उद्वेग झाला तूं मनामध्यें जो संकल्प केला आहेस तो मी जाणला, तूं तरीं आ

पले राज्यापासून भ्रष्ट होऊन अशा दुर्गम अरण्यामध्यें आलास तर मी नरी अशा अरण्यांत तुझा त्याग करून कशी जाऊं, तूं क्षुधेनें व तृषेनें व्यास झालास. अशा संकट कालीं माझा त्याग करून तूं अन्यत्रस्थलीं गमन करण्यास इच्छा करूं नको. कितीही पतीस संकट आलें असतां त्या संकटाच्या नाशाचा उपाय भार्येनें करावा असें शास्त्र आहे. पुरुषास भार्येसारखें औषध शरीरास हितोपयोगीं दुसरें कोणचें होनाहीं असा वैद्य शास्त्रांत ज्ञात्याचा निश्चय आहे. पुरुषास-कितीही दुःखें झालीं असतां भार्येचें मुख पहातांच तो समाधान पावतो असें प्रत्यक्ष सिद्ध आहे. असें ऐकून नलराजा बोलतो हे स्त्रिये, तुझा त्याग मी करणार ह्मणोन तुला कशावरून कळलें? भार्या ही पतीचा अत्यंत मित्र आहे, असा मित्र दुसरा कोणी नाहीं व शरीरास औषधही होय तस्मात् अशी जी भार्या रत्न जर मी त्याग करीन तर आत्मघात केल्याचें पातक मला लागेल. असें ऐकून दमयंती बोलत्से. हे राजा, माझा त्याग करावयाचा जर तुझ्या मनामध्यें नाहीं तर-विदर्भ देशाच्या मार्गाचें कांबरें कथन केलेंस? याजवरून मी निश्चय केला कीं, तूं माझा त्याग करणार यांत संदेह नाहीं; परंतु या संकट कालीं तूं माझा त्याग करूं नको जर तुझी इच्छा असेल तर तूं व मी विदर्भनगरीं तुझा श्वशुर जो भीमक राजा याचे गृहीं जाऊन राहूं, तूं तेथें गेला असतां भीमकराजा तुझा उत्तम प्रकारें बहुत सत्कार करील तेणें करून तुझ्याही शरीरास सुख होईल. असा विषय-या अध्यायांत आहे.

६२ अध्याय बासष्ट— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, दमयंतीनें भाषण ऐकून नलराजा बोलला हे दमयंती, जसें तुझ्या पित्याचें स्वतंत्र राज्य आहे तसेंच माझें होतें, मी राज्यारूढ असतां तुझ्या गृहीं येऊन तुझें पाणिग्रहण केलें आणि मातापितरांसही हर्षित केलें तो मी आज गत राज्य होऊन-श्वशुर गृहीं कसा राहूं. असें दमयंतीचें शांतवन करून तेथून राजा अरण्यांत चालला. दमयंती व नल एक वस्त्र परिधान करून उभयतां चालली असतां च्यार घटिका आराम करावा अशा हेतूनें अरण्यांत एके धर्मशाळेंत जाऊन बसलीं, दमयंती मार्गामध्यें फिरतां फिरतां बहुत श्रांत झाली तेणे करून तिजला गाढ निद्रा लागली, राजा तर आपलें राज्य गेलें, सुहृद मित्रांचा वियो-

म झाला. अशी वारंवार मनामध्यें चिंता करी तेणें करून त्यास निद्रा येईना. नंतर मनांत विचार करूं लागला कीं, माझ्या करितां या स्त्रियेस अद्वितीय दुःख झालें तेणें करून माझ्या मनास द्विगुणित व्यथा होते ही भार्यानर माझा त्याग करून कोठें जात नाहीं तेव्हां आतां यास उपाय असा योजावा कीं, इचा निद्रा कालीं त्याग करून नसमजतां एकाकीं अरण्यांत जावें नंतर ती माझा शोध करून आपले पित्याचे घरीं जाईल. पतिव्रता तपस्विनी आहे ह्मणोनइ च्यावर कोणी बलात्कार करूं इच्छिणार नाहीं कदाचित् कोणी केल्यास तत्काल नाश पावेल तस्मात् आतां इचा त्याग करावा हेंच योग्य. असा विचार करून एक वस्त्र होतें त्याचीं दोन खंडें करण्या करितां कांहीं शस्त्र पाहूं लागला असतां एक खड्ग दृष्टीस पडतांच तो घेऊन मध्यभागीं वस्त्र फाडलें आणि एक भाग आपण परिधान करून तत्काल दमयंतीस निद्रिस्त ठेऊन बाहेर निघाला. पुनः धर्मशाळेंत माघारा येऊन दमयंतीस पाहातांच रोदन करून भाषण करूं लागला, ज्या स्त्रियेस जन्मामध्यें सूर्य दर्शन नाहीं व वायूचा स्पर्श ही नाहीं अशा स्त्रियेस निद्रिस्त असतां अनाथा सारखी टाकून जातों आतां ही जागृत होऊन काय करील हे ईश्वरा, असा संकट काल तूं मला आणिलास- असो आदित्य, वसु, रुद्र, अश्विनीकुमार, मरुद्गण, वनदेवता माझ्या पतिव्रता स्त्रियेस याघोर अरण्यांत रक्षण करोत. असें बोलून तो कलीनें नष्टबुद्धी झाल्यामुळें निघाला तो शाले पासून दूरगेला आणि एक अरण्य पाहून तिकडे- जाण्यास निघाला. असा विषय या अध्यायांत आहे.

६३ अध्याय त्रेसष्ट- बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, नलराजा दमयंतीचा त्याग करून भयंकर अरण्यांत गेला असतां इकडे दमयंती कांहीं- कालानें जागृत होऊन इकडे तिकडे पाहूं लागली तों आपला पती कोठें दिसेना ह्मणोन एका एकीं आक्रोश करून विलाप करूं लागली कीं, हे स्वामी, माझा त्याग करून आपण कोठें गेलां आतां तुमच्यावांचून या अरण्यांत मी काय करूं, विवाह कालीं इंद्रादि दिक्पालां समक्ष जें तूं भाषण केलेंस तें सत्य कर. तुझ्या वियोगा मुळें मी प्राण त्याग करावा अशीजर तुझी इच्छा असेल तर ईश्वरानें ज्या दिवशीं मृत्यु नेमला असेल त्या दिवसा शिवाय इच्छा केली तर

यावयाचा नाहीं, कदाचित् माझी थट्टा करण्याकरितां अथवा परिक्षा पहाण्या करितां तूं घटकाभर अदृश्य झाला असल्यास चिंता नाहीं; परंतु आतां परिहास करण्याची वेळ नाहीं आतां माझ्या दृष्टीस पडून मला हर्षित कर. असा बहुत प्रकारें विलाप करून दमयंती शालेच्या बाहेर राजास शोधूं लागली.- घटकेंत शोकें करून विव्हल होत्साती पृथ्वीवर पडे, घटकेंत धांवे, घटकेंत स्तब्ध बसे, घटकेंत रोदन करीत करीत श्वासोच्छ्वास टाकून असा विलाप करी कीं, हे राजा, तूं निष्पाप असतां द्यूत क्रीडेमुळें अशा संकटांत पडलास आतां तुझें जीवन कोणाच्या प्रकारें होईल आणि अशा संकटापासून कधीं पार पडशील. असा शोक करीत घोर अरण्यांत चालली तों एक अजगर दमयंतीजवळ येऊन तिजला भक्षण करूं लागला. त्या कालीं दमयंती नाना प्रकारचे विलाप करूं लागली कीं, हे नलराजा, या घोर अरण्यांत हा सर्प मला भक्षण करतो त्याजपासून तुझ्यावांचून मला कोण सोडवील. असें बहुत प्रकारचे विलाप ऐकून एका व्याधानें एकाएकीं तिजपाशीं येऊन त्यास पसि मारिलें आणि त्याचे मुखापासून दमयंतीस सोडवून तिचें अंग धुवून बोलला हे स्त्रिये, तूं कोण कोठून आलीस? अशा भयंकर वनांत तुजला येण्याचें कारण काय? असें व्याधाचें भाषण ऐकून दमयंतीनें आपला संपूर्ण वृत्तांत व्याधास-सांगितल्यावर तो व्याध कामबाणानें मोहित होऊन मृदुवाणीनें तिला बोलला हे स्त्रिये, तुझें भाषण ऐकून कामबाणानीं मी बहुत पीडित झालों आहें, बरें तूं जा कांहीं काळजी करूंनको तुझी जशी इच्छा असेल त्याप्रमाणें होईल. असें व्याधाचें कुटिल भाषण ऐकतांच दमयंतीस बहुत कोप आला आणि हा दुष्ट माझा उपभोग करण्याची इच्छा करतो तस्मात् याचा नाश करावा असा विचार करून ईश्वराची प्रार्थना करूं लागली कीं हे भगवन् नलराजा खेरीज कायावाच्यामने करून दुसरा पती करण्याची अगदीं इच्छा नाहीं हें जर सत्य आहे तर त्या पुण्याच्या योगानें हा क्षुद्र व्याध जिवापासून मुक्त होवो. असें तिणें ह्मणतांच तत्काल तो पृथ्वीवर पडला. असा विषय या अध्यायांत आहे.

६४ अध्याय चौसष्ट—बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, दमयंती आपल्या कोपानें व्याधाचा नाश करून नंतर नलाचा शोध करीत करीत पुढें घोर अ

रण्यांत चालली आणि महान् महान् हत्ती, व्याघ्र व विशाल सर्प ज्या वनांत राहातात. अशा भयंकर वनांत पतीचा शोध करीत चालली असतां वृक्षांस विचारी कीं, माझा पती तुह्मीं पाहिला असल्यास सांगा. आणखी असें ही ह्मणावें कीं, हे राजा, अश्वमेधादि नाना प्रकारचे याग करून व सुवर्ण दक्षणा देऊन ब्राह्मण संतुष्ट केलेस. असा तूं पुण्यश्लोक सत्यवादी असतां माझाविषयींच तूं मिथ्या भाषण करून मला कां फसविलेंस? असा अपराध मजपासून काय झाला? हा दुष्ट व्याघ्र दुरून मला दिसतो तो मला या कालीं भक्षण करील त्याचें निवारण करण्यास तुजवांचून दुसरा कोणी नाहीं. असा विलाप करीत पुढें चालली तों त्या अरण्यांत एक व्याघ्र पहातांच त्यास ही बोलली कीं, हे व्याघ्रा, तूंही वनाचा राजा आहेस ह्मणोन तुला मी विचारत्यें कीं, माझा पती नलराजा अरण्या मध्यें माझा त्याग करून नाहींसा झाला तो तुला कोठें भेटला कीं काय? जर भेटला असला तर सांग नाहींतर त्या त्या शोकें करून मी दीन झाल्यें आहें माझें भक्षण कर ह्मणजे शोक सागरापासून मुक्त होईन. असा विलाप करीत करीत दमयंती पुढें चालली तों एक मोठी नदी दृष्टीस पडली, तीसही तिनें असाच प्रश्न केला कीं, हे नदी, तूं माझा पती पाहिला असल्यास सांग आणि माझ्या शोकाचा नाश कर. असें बोलत पुढें चालतां चालतां वृक्ष, पाषाण व मृग ईहीं करून सुशोभित असा एक पर्वत पाहून त्यास बोलली हे गिरिराज, विदर्भ देशींचा राजा भीमक त्याची मी दमयंती नामक कन्या व नैषध देशींचा राजा जो नल त्याची भार्या होय यास्तव हे गिरिराज, तो तुझ्या द्रिष्टीस आला असेल तर मला सांग. आणि माझी इच्छा पूर्ण कर मी एका एकीं घोर अरण्यांत विलाप करत्यें हें तुला चांगलें वाटतें काय? असें पर्वतास बोलून पुढें चालतां चालतां हे राजा. गंभीर वाणीनें एकवार मला हांक मार ह्मणजे सर्व दुःखाचें मी विस्मरण करून एका एकीं हर्ष पावेन! हे पती, आशा विलाप कालीं माझा त्याग तूं कसा केलास! असा विलाप करीत उत्तर दिशेस गेली आणि तेथें एक रम्य जागा पाहून तेथें तीन दिवस राहिली, पुढें चालतां चालतां एक ऋषीचें अरण्य पाहून त्यामध्यें वशिष्ठ, भृगु, अत्रि यां सारखे तपोबलें करून तेजस्वी व योगें करून आपल्या इंद्रियांचा ज्यांणीं निग्रह केला असा तापसांचे आश्रम पाहून दमयंती त्यांच्या आश्रमीं गेली. ऋषी ही दमयंतीस

पाहतांच ही कोणी वन देवता, गंधर्वी अथवा नागकन्या आली काय असें परस्पर भाषण करूंलागले. इतक्यांत दमयंती त्यांच्या अग्रभागीं येऊन बोलली हे तपोधन हो, संपूर्ण त्रैलोक्यांत काय आहे याचें ज्ञान तुह्मांस आहे आपल्या- तपोबलें करून तुह्मांस अज्ञानपदार्थ कांहीं नाहीं तुह्मी सर्वांवर परोपकार करणारे आहां तर माझ्या प्रश्नाचें उत्तर देऊन मला शोकसागरा पासून मुक्त करा. असें दमयंतीचें भाषण ऐकून तापस बोलले हे देवी, तूं कोण आहेस, तुला पहातांच आह्मांस बहुत विस्मय झाला अशा घोर अरण्यांत एकाकीं आमचे आश्रमीं येण्याचें कारण काय तें आह्मांस सांग. त्याकाळीं दमयंती आपला व उभय कुलांचा संपूर्ण वृत्तांत सांगून पुनः ऋषींची प्रार्थना करूंलागली हे महाराज, माझा पती कोठें गेला इतकें सांगावें. पतीचा शोध न लागला तर प्राण त्याग करीन, भर्त्याचे पाठी मागें स्त्रियानीं आपलें जीवित्व ठेवणें ही मोठी अनुचित गोष्ट आहे असें ऋषींस बोलून नंतर पुनः पतीचें स्मरण करून विलाप करूंलागली हे राजा, दुःखें करून मी बहुत व्याकूल झालें तर आपला मुखचंद्र दाखवून माझें शांतवन करावें. असा दमयंतीचा विलाप ऐकून संपूर्ण ऋषी बोलले हे स्त्रिये तूं काळजी करूंनको तुझा पती लौकरच भेटेल आणि संपूर्ण पृथ्वीचें राज्य प्राप्त होऊन पती सहवर्तमान आनंद करशील; तूं मह्या पतिव्रता आहेस तुझें पातिव्रत्य पाहून आह्मीं बहुत संतुष्ट झालों. आतां तूं शोकाचा त्याग करून मनामध्यें धैर्य धर आणि आमच्या वाक्यावर पूर्ण विश्वास ठेव; असें दमयंतीस आशीर्वाद देऊन एकाएकीं आश्रमा सद्धां संपूर्ण ऋषी अदृश्य जाहाले. हें पाहून- दमयंती मनांत विचार करूं लागली कीं, ऋषि आश्रम व उत्तम प्रकारचें वन एका एकीं कोठें दिसेनासें झालें व मोठी नदी दिसत होती तीही दिसत नाहीं तर मला हें स्वप्नच पडलें असें खिचित दिसतें! पुनः दमयंतीच्या मनांत द्विगुणीत भय उत्पन्न होऊन पूर्वी पेक्षां फारच विलाप करूंलागली. वृक्ष पाषाण संपूर्ण तिला नला सारखे दृष्टीस पडून सर्वांस बोलले कीं, माझा पती नलराजा तुह्मीं पाहिलात काय? असें भाषण करित मार्गांत चालली तों एक अशोक वृक्ष पाहून त्यास बोलले हे वृक्षा तुझें नांव अशोक आहे त्याचें सार्थक कर आणि माझा पती नलराजा पाहिला असल्या-

स सांग.असें भाषण करून पुढें पतीचा शोध करीत करीत चालली असतां स्व च्छ एका नदीचे उत्तर तीरास एक मोठा मनुष्यांचा समुदाय पाहातांच तिनें मनांत विचार केला कीं, आतां नदी पलीकडे जाऊन त्यांस विचारावें कीं, अर्ध वस्त्र परिधान केलेला मनुष्य मार्गांत तुम्हांस जातांना आढळला काय असें त्यांस विचारावें. असा विचार करून नंतर ती जनसमुदाया मध्यें प्रवेश करूं लागली असतां ही कोणी वन देवता अथवा यक्ष,राक्षस, गंधर्वी, पिशाची तर नसेल ना असे नाना प्रकारचे तर्क करून त्यांतील कांहीं लोक तीस भिऊन दूर पळाले,कांहीं लोकांस दया येऊन मोठ्या धैर्यानें तिच्याशीं बोलूं लागले कीं, हे स्त्रिये, या घोर अरण्यांत तूं कशा करितां आलीस? तूं कोण कोणाची भार्या तुजला असें संकट कोणतें आलें?असें त्यांचें भाषण ऐकून नंतर दमयंती आपला संपूर्ण वृत्तांत त्यांस सांगून बोलली कीं, तुम्हीं कोण,कोठील राहाणार,कोठें जातां तुमचें नांव काय?माझा पती तुम्हीं कोठें पाहिला असल्यास सांगावें म्हणजे तुम्हींच मला दुःख सागरांतून काढिल्यासारखें होईल.असें ऐकून संपूर्ण मनुष्यें बोललीं हे स्त्रिये, आम्हीं वणिज आहोंत देशांतरीं माल खरेदी करण्या करितां गेलों होतों आमच्या स्वामीचें नाव सार्थवाह होय त्याज बरोबर आम्हीं संपूर्ण चाललों आहोंत तुला येणें असल्यास आमचे बरोबर चल. असा विषय या अध्यायांत आहे.

६५ अध्याय पांसष्ट- बृहदश्वसांगतात हे धर्मराजा, चेदी देशचा सार्थवाह नामक जो वैश्य त्याज बराबर दमयंती पतीचा शोध करीत चालली. मार्गामध्यें जातांजातां मोठीनदी पाहून सायंकाळीं भृत्यां सहवर्तमान सार्थवाह नदी तीरीं राहिला. रात्रौ संपूर्ण लोक निद्रिस्त असतां मध्यरात्रीचे सुमारास वनांतील गज यांचा समुदाय जल प्राशनास नदी तीरीं आला आणि सार्थवाहाचे गज पहातांच उभयतांचें मोठें युद्ध होऊं लागलें. उभयतांच्या पादसंमर्दें करून बहुत लोक मृत्यु पावले. कोणी पळूं लागले. दमयंतीही निद्रिस्त होती ती जागृत् होऊन पहाते तों गजांच्या युद्धामुळें संपूर्ण लोक पळतात हें पाहून खिन्न म्लान वदन झाली आणि मनांत विचार करूं लागली कीं, अकस्मात् हें विघ्न कोठून आलें, तस्मात् माझें दैवफारच खोटें आहे ज्याचा आश्रय करावा त्यास वकां

हीं तरीं दुःख उत्पन्न होतें, कांहीं कालानें गजांचा समुदाय भयंकर युद्ध करून वनां त गेल्यानंतर आंधेरी रात्र होती त्यामुळें कोण राहिले, कोण गेले, कोण मेले याचें ज्ञान कोणास झालें नाहीं. प्रातःकाल होतांच जागेवर जे शिल्लक लोक होते ते आप ले यजमानास बोलले कीं, हे महाराज, येवढा अनर्थ उत्पन्न होण्याचें कारण काय? ग्रामांतून निघालों त्याकालीं आपली मणिभद्रनामक देवता अथवा वैश्रवणा याची पूजा केली नाहीं असें वाटतें त्यायोगें हा अनर्थ उत्पन्न झाला. कोणी बोलले अहो महाराज, तुह्मीं वनांतील एक स्त्री समागमें घेतली आहे तिचें रूप तर फा रच सुशोभित दिसतें; कदाचित राक्षसी, गंधर्वी अथवा पिशाची मनुष्याचें रूप- धरून आपल्या समुदायांत आल्यामुळें हा अनर्थ झाला यांत संशय नाहीं, जर इतःपर तिला समागमें घ्याल तर आह्मी मारून टाकूं. असें भाषण ऐकून दमयं ती मनांत विचार करत्ये कीं माझी गती आतां काय होईल सार्थवाहाचे मनांत- या दुष्टानीं पक्कें भासविलें कीं, येवढा अनर्थ या स्त्री पासून झाला; परंतु मी का य करावें! वनांतील गजांचें जलप्राशन करण्याचें हें स्थान असतां तेथें यांणीं वास केला ह्मणोन वनांतील गजानीं यांचा नाश केला असें असतां दैवें करून हा मिथ्या आरोप माझे शिरावर आला त्यास उपाय काय! भर्तातर राज्या पा सून भ्रष्ट होऊन वनांत कोठें गेला त्याचा ठिकाण नाहीं, माझे स्वकीय जन हो- ते त्याणींही माझा त्याग केला व बालकानींही मला सोडिलें आतां या घोर अ रण्यांत रात्रीं माझें कोण रक्षण करील. असा शोक करीत दमयंती बसली अस- तां सार्थवाह आपल्या शेष राहिलेल्या भृत्य जनासहित दमयंतीचा त्याग करू न गेला नंतर वैदर्भी पुनः शोक करूं लागली हे ईश्वरा, जन्मांतरीं काय पातक के लें असेल तें असो आतां प्राण त्याग केला तर अकालीं मृत्यू येणार नाहीं स्वयं वर कालीं इंद्रादि दिक्पालांचा अवमान करून मी नलराजास वरिलें त्यायोगें करून ते दिग्पाल माझें अनिष्ट चिंतन करून दुःखें देत असतील! असो प्रार ब्ध कोणाचे स्वाधीन नाहीं असा विलाप करीत दमयंती नदीचे तीरीं बसली अ- सतां सार्थवाहाचे समुदायांत कांहीं ब्राह्मण होते त्यांस आपला स्वामी रात्रीं के व्हां गेला हें विदित नव्हतें ह्मणोन प्रातःकाल पर्यंत नदीच्या तीरीं निद्रिस्त होते नंतर प्रातःकाल होतांच जागृत होऊन दमयंतीचीं दीनवाक्यें ऐकून तिला-

बोलले कीं, हे स्त्रिये, आमचे बरोबर तूं चल चेदी देशास तुला नेऊन पोंच वि तों तूं मनामध्यें भय बाळगूं नको. असें ब्राह्मणानीं भाषण करतांच दमयंतीस- कांहींसा भरवसा येऊन अर्धवस्त्रा, वनवास संबंधी दुःखानें कृश झालेली- सुबाहू राजाचे नगरांत गेली. त्याकाळीं नगर निवासी बालक तिचे आसमंता त मार्गी उभे राहून कोणी तिचें वस्त्र ओढूं लागले, कोणी थट्टा करूं लागले अ- शी दमयंतीची अवस्था पाहून राजमातेनें आपल्या परिचारिकेस आज्ञा दि- ली कीं, हे धात्री, ह्या स्त्रीला माझे समीप घेऊन ये. असें राजमातेचें भाषण ऐक तांच धात्री दमयंतीस घेऊन अंतःपुरांत आली. नंतर विद्युल्लते सारखी दमयं तीची कांती व सौंदर्य पाहून राजमाता तिला बोलूं लागली हे स्त्रिये, तूं कोण को णाची स्त्री एकाएकीं कशाकरितां यानगरांत आलीस हें मला सांग. त्या काळीं दम यंती बोलली हे माते, मी मनुष्याची स्त्री, दुसऱ्याची सेवा करून उदर पोषण कर- त्यें मला सैरंध्री ह्मणतात फलमूलें भक्षण करून जेथें सायंकाळ होईल ते- थें रहावें. माझा भर्ता गुणवान् सूज्ञ असून माझे ठायीं नित्य अनुराग करीत प्र से, मीही त्याजवर बहुत प्रीती करीत असें कोणे एके दिवशीं पती द्यूत व्यसना मध्यें निमग्न होऊन द्यूत खेळत असतां दुसऱ्यानीं त्यास जिंकिलें तेव्हां पासून त्यास विषाद उत्पन्न होऊन एकवस्त्र परिधान करून मज सहवर्तमान वनांत निघाला. चालतां चालतां एक धर्मशाळेंत निद्रिस्त झालों त्याकाळीं पतीनें मा- झें अर्ध वस्त्र कापून परिधान केलें आणि कोठें तो गेला त्याचा ठिकाण नाहीं नंत र मी जागृत होऊन इकडे तिकडे पाहूं लागलें तों पती कोठें दृष्टीस पडेना त्याचा- शोध करीत करीत दैवयोगानें या नगरांत आल्यें तूं माझी माता असें जाणोन- माझा संपूर्ण वृत्तांत तुला सांगितला पुढें मी काय करावें तें मला सांग. असें ऐ कून राजमाता बोलली हे कन्ये, तूं कांहीं चिंता करूं नको माझे घरीं सुखें करून र- हा मी आपले भृत्यजन चारी दिशांस पाठवून तुझ्या पतीचा शोध करत्यें, तूं स्व स्थ रहा कांहीं काळजी करूं नको. असें राजमातेचें वाक्य ऐकून दमयंती बोलली हे माते, तुझें भाषण ऐकून मी संतुष्ट झाल्यें; परंतु माझा एक असा निश्चय आहे कीं, कोणाचें उच्छीष्ट भक्षण करणार नाहीं व पाद प्रक्षालन करणार नाहीं कदाचि त् कोणी परपुरुष माझा अभिलाष करील त्यास तूं दंड करावास. कोणी ब्राह्मण

देशांत राहून तुझे गृहीं येतील त्यांस मी आपल्या भर्त्याचा शोध विचारीत जा ईन इतके माझे नेम आहेत, याचें पालन तुझे हातून होत असल्यास तूं मला आपले गृहीं राहाण्याचा आग्रह कर. असें ऐकून राजमाता बोलली हे स्त्रिये, तुझे इतके नियम मी पालन करीन दैवें करून तुझे संकल्प सर्व सिद्धीस जाऊन आपले पतीस भेटशील. असें दमयंतीस बोलून परिचारिकेस बोलली हे धात्री, माझी कन्या जी सुनंदा इजला सांग कीं, ही स्त्री तुझी सखी आहे, इजसह वर्तमान भोजन, शयन, भाषण व क्रीडा करीत जा. तुझाच वयाची रूप व गुणें करून संपन्न आहे. हा राजमातेचा निरोप परिचारिकेनें येऊन सुनंदेस सांगितला असतां ती दमयंतीची सखी झाली आणि आपल्या सारखें अन्न आच्छादन व उत्तम प्रकारचे अलंकार वस्त्रें भूषणें देऊन तिचें समाधान करूं लागली. असा विषय या अध्यायांत आहे.

६६ अध्याय सासष्ट — बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, इकडे नलराजा घोर अरण्यांत जात असतां मार्गामध्यें दावानल लागून त्यांत एक मोठा प्राणी होता त्याणें असा शब्द केला कीं, हे नलराजा, लौकर इकडे ये आणि या संकटापासून मला मुक्त कर. असा आर्तस्वर ऐकतांच नलराजानें उत्तर दिलें कीं, तूं कोण आहेस भिऊं नको मी तुला संकटापासून मुक्त करतों, असें उत्तर देऊन नंतर सत्वरतो दावाग्नीचे जवळ गेला असतां त्यानें मोठा भयंकर सर्प वेटोळे घालून पडलेला पाहिला. सर्पानें नलराजास पहातांच तो भाषण करूं लागला हे नलराजा, मी कर्कोटक नामक सर्प आहे, कांहीं कारणास्तव पूर्वीं मी नारदाची वंचना केली तेणें करून ऋषीस परमक्रोध येऊन त्याणीं मला असा शाप दिला किं हे सर्पा, तूं मोठें शरीर धारण करून याच अरण्यांत पडशील, तुला एकही पाऊल पुढें जाण्याची शक्ती राहणार नाहीं ज्या काळीं नलराजा तुला आपले हातांत धारण करून येथून दुसरे ठिकाणीं घेऊन जाईल त्या काळीं तूं स्वर्गास जाशील. असा शाप नारदऋषीनीं मला दिला आहे तर हे राजेंद्रा माझा उद्धार कर तुझें मी कल्याण करीन आणि तुला जें संकट येईल त्याच्या नाशाचा मी उपाय करिन. असें सर्पाचें भाषण ऐकून नलराजानें मोठ्या धैर्यें करून दावाग्नी मध्यें प्रवेश करतांच नागानें अंगुष्ठमात्र स्वरूप धारण केलेलें

राजानें पाहून त्यास पृथ्वीवर ठेविलें. त्याकाळीं कर्कोटक नामक सर्प शापापासून मुक्त होऊन निर्भय पणें नलराजास बोलला कीं, हे राजा, तूं येथून दहा पावलें पुढें जा, पाठीमागें पाहूं नको तुझ्या कल्याणाचा उपाय मी योजिला आहे. असें नाग राजाचें भाषण ऐकून नलराजा आपले मुखानें एक दोन अशी संख्या गणना करीत दश ह्मणतांच कर्कोटकानें दंश केला. कारण नागाचा स्वभावच असा आहे कीं, आज्ञा झाल्या शिवाय तो दंश करीत नाहीं तेव्हां राजाच्या पूर्व स्वरूपाचा नाश होऊन तो कुरूप झाला. त्याकाळीं सर्प राजास बोलला कीं हे राजा, तूं मनामध्यें खिन्न होऊं नको तुझें स्वरूप ज्ञान कोणास न व्हावें ह्मणोन तुझें विरूप मी बुध्यानच केलें ज्या कलीनें तुला विनापराध इतके दुःख दिलें. तो कली जों पर्यंत तुझ्या शरीरांत असेल तों पर्यंत या विष दुःखाचा उपभोग तो करील. संग्रामामध्यें तुझा निरंतर जय होईल. सर्वलोक तुला ब्रह्मवेत्ता ह्मणतील तूं आतां येथून अयोध्या नगरीमध्यें ऋतुपर्ण राजाच्या गृहीं जाऊन त्यास सांग कीं,- मी बाहुक नामा सूत आहें ह्मणजे तो तुला आपले अश्व शाळेवर स्थापन करील. नंतर तुझा त्याचा अत्यंत सहवास झाला ह्मणजे तो तुला आपली अक्षविद्या देईल तूंही अश्वविद्येमध्यें परम निपुण आहेस यास्तव तुह्मीं उभयतां एकमेकांची विद्या संपादन करा. तूं अक्ष विद्येमध्यें निपुण झालास ह्मणजे तुझें कल्याण लौकरच होऊन आपले स्त्री सहवर्तमान राज्याचा उपभोग करशील. हें तुलामी सत्य सांगतों. तुला आपले पूर्व स्वरूपाची जेव्हां इच्छा उत्पन्न होईल तेव्हां माझें स्मरण कर आतां हीं मी तुला दोन वस्त्रें देतों तीं घे असें भाषण करून कर्कोटक नामक सर्प तत्काल तेथेंच अदृश्य झाला. असा वि० या अ० आहे.

६७ अध्याय सदसष्ट- बृहदश्व सांगतात हे धर्म राजा, कर्कोटक नाग नलराजास दोन वस्त्रें देऊन तत्काल अदृश्य झाल्यानंतर नलराजा तेथून निघोन दहावे दिवशीं अयोध्येस पोहोंचला आणि ऋतुपर्ण राजास भेटून बोलला हे राजा, मी बाहुक नामें सूत आहें तुझे पाशीं राहण्यास इच्छितों त्यास आपले सारथ्य पणावर माझी योजना करावी कारण अश्व परिक्षा, शिल्पशास्त्र, कोणतेही संकट काळीं विचार सांगणें व पाक कर्म आणि सर्व दुष्कर कर्में याविषयीं मी प्रवीण आहें. असें नलाचें वाक्य ऐकून ऋतुपर्ण राजा बोलला हे बाहुका, जं

र अश्वविद्येमध्यें निपुण असशील तर अश्वशालेवर तुला ठेवितों, जेणेंकरून माझ्या . . . चे घोडे शीघ्र जातील अशी त्यांस शिक्षा करावीस. वार्ष्णेय व जिवल हे उभयतां सूत तुझे आज्ञेंत राहतील; सर्वांचा नायक तुलामी योजिला आतां लौकर अश्वशाळेंत जाऊन उत्तम, मध्यम, कनिष्ठ हय किती आहेत ते पहा; तुला वेतन एक मासाचे दाहा हजार रुपये देत जाईन. असें ऐकून बाहुक अश्वशाळेंत गेल्या नंतर वार्ष्णेय व जिवल हे उभयतां ऋतुपर्णाच्या आज्ञेनें नलराजाच्या आज्ञेंत वर्तुं लागले. कोणे एके दिवशीं रात्रौ नलराजा निद्रिस्त असतां दमयंतीच्याशोकानें निद्रेंत एक श्लोक बोलला हे स्त्रिये, तूं क्षुधा व तृषें करून बहुत श्रांत जाह्ली असशील आणि कुत्सित वस्त्र परिधान करून आतां कोठें गमन केलें असशील, हें नलाचें निद्रेंतील भाषण ऐकून जिवल याणें बाहुकास विचारिलें कीं, तूं रात्रौ कोणाचे स्त्री करितां शोक करीत होतास? या प्रमाणें तुझा शोक पूर्वीं दोनतीन वेळां ऐकिला तेव्हां ती स्त्री कोणाची तूं कशाकरितां शोक करतोस हे मला सांग. असें त्याचें वाक्य ऐकून बाहुकानें उत्तर दिलें अरे जिवला कोणे एके पुरुषाची स्त्री परम पतिव्रता होती त्या उभयतांची प्रीती बहुत असे. कोणे कालीं तो पुरुष कांहीं व्यसनांत गुंतून स्त्रीचा रात्रौ त्याग करून वनामध्यें गेला. त्या कालीं ती स्त्री पती विषयीं बहुत शोक करीत असे. इकडे पुरुष ही स्त्रीचें दुःखस्मरण करून रात्रंदिवस शोक करीत असे. तें स्त्रीचें भाषण कोणे एके काळीं मी ऐकिलें तेंच रात्रीं निद्रे मध्यें मी बोललों ही गोष्ट माझी नव्हे. पहा बरें जीवला, अशा स्त्रीचा त्याग करणारा पुरुष केवल अल्पभाग्याचा व मंदमती होय. असें जीवन नामक सारथ्यास सांगून राजा दुसऱ्यास न कळतां दमयंतीच्या गुणाचा शोक करीत रुतुपर्ण राजाचे घरीं बाहुक या नामें सूताचा वेष धारण करून बहुत दिवस राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

६८ अध्याय अडसष्ट— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, नलराजा राज्या पासून भ्रष्ट होऊन भार्ये सहवर्तमान एकवस्त्र नेसून अरण्यांत गेला. हें ऐकून भीमक राजानें ब्राह्मणांस आज्ञा दिली कीं, हे विप्रहो तुह्मीं देशोदेशीं जाऊन दमयंतीचा व नलराजाचा शोध करावा, जो त्यांचा शोध लावील किंवा त्यास घेऊन येईल त्यास सहस्र गाई व वंश परंपरेनें भूमीही देईन.

अशीं राजाची आज्ञा होतांच शेंकडों ब्राह्मण दाही दिशेस शोधाकरितां निघाले. पुरें, राष्ट्रें, दुर्ग, प्रासाद व मोठमोठीं अगम्य स्थलें येथें ब्राह्मणानीं नलदमयंती यांचा बहुत शोध केला, परंतु ठिकाण लागला नाहीं. सुदेव नामक ब्राह्मण शोध करीत करीत चेदी पुरांत आला आणि सुनंदा नामक राजकन्ये सह वर्तमान दमयंती अंतःपुरामध्यें प्रासादावर बसलेली पाहून सुदेवब्राह्मणानें निश्चय केला कीं, हीच दमयंती यांत संशय नाहीं. वस्त्रें अलंकार इत्यादिकें करून हीन असतां आपल्या तेजें करून बहुत सुशोभित दिसते. पतीच्या शोकें करून शरीरावर कालिमा आली आहे, भर्ता हें स्त्रियांचें भूषण होय. या भूषणा रहित स्त्री झाली असतां कितीही अलंकार धारण केले तरीं सुशोभित दिसत नाहीं. चंद्रासहवर्तमान रोहिणी जशी सुशोभित दिसते तशी ही आपल्या भर्त्यासहित कधीं सुशोभित दिसेल, नलराजासआपलें राज्य प्राप्त होऊन स्त्रीसहवर्तमान राजा राज्योपभोग कधीं करील असा बहुत प्रकारें सुदेव ब्राह्मण शोक करून दमयंतीच्या अंतःपुरांत गेला आणि एकांतीं दमयंतीची भेट घेऊन तिला बोलला कीं, हे दमयंती, तुझ्या भ्रात्याचा अत्यंत प्रियसखा सुदेव तो मी भीमकराजानें तुझा शोध करण्या करितां शेंकडों ब्राह्मण देशोदेशीं पाठविले आहेत त्यांत मी इकडे-आलों, तुझा पिता आदीकरून सर्व खुशाल आहेत, या गृहीं ज्याकालीं मी राजाचें दर्शन घेतलें त्या कालीं तुला प्रासादावर पाहून निश्चय केला कीं, हीच दमयंती यांत संशय नाहीं. संपूर्ण तुझीं चिन्हें दुरून मी जाणोन नंतर येथें आलों. तुझ्या करितां तुझे मातापितर दुःखित झाले आहेत. असें सुदेवाचें भाषण दमयंतीनें ऐकतांच हाच सुदेव असा निश्चय करून सर्व वृत्तांत विचारला आणि नेत्रांतून अश्रुधारांचे प्रवाह चालले, मोठ्यानें रोदन करीत करीत आपलें संपूर्ण वृत्त सुदेवास सांगून पुनः पुनः त्याजकडे पाहूं लागली. हें सुनंदेनें पाहून परिचारिकेस आज्ञा केली कीं, हे धात्री, मातेस जाऊन सांग कीं, कोठून एक ब्राह्मण आला त्याशीं भाषण करून सैरंध्री बहुत रोदन करते. धात्रीनें सुनंदेचा निरोप राजमातेस सांगतांच तत्काल राजमाता सैरंध्रीकडे येऊन ब्राह्मणास पाहून त्यास बोलली हे विप्रा, ही कोण कोणाची पत्नी व कोणाची कन्या आहे त्याचा

त्याग इणें कशाकरितां केला, तें सर्व मला सांग. असें राजमातेचें भाषण ऐकून ब्राह्मण दमयंतीचा वृत्तांत सांगूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

६९ अध्याय एकुणसत्तर.— सुदेव ब्राह्मण भाषण करतो हे माते, विदर्भ देशींचा राजा जो भीमक त्याची कन्या ही दमयंती, नैषध देशाचा राजा जो पुण्यश्लोक नल त्याची ही भार्या होय. नलराजा द्यूत व्यसनामध्यें निमग्न झाल्यामुळें भ्रात्यानें त्याचें राज्य हरण केलें. नंतर राजा परम दुःखित होऊन सर्व वस्त्रपरित्याग करून भार्येसह वर्तमान वनामध्यें गेला हें वर्तमान भीमक राजास श्रुत होतांच त्यानें त्यांच्या शोधा करितां देशोदेशीं ब्राह्मण पाठविले त्यांतील मी सुदेव नामक ब्राह्मण दैववशात् सहज तुमच्या गृहीं आलों आणि राजास आशीर्वाद करून नंतर सहज बसलों असतां ही दमयंती माझ्या दृष्टीस पडतांच ईच्या रूप गुणावरून व ललाटावर पिपलू ( तीळ ) ह्मणोन एक चिन्ह आहे तें धुलीनें आच्छादित असतां दुरून मी पाहून हीच दमयंती, असा निश्चय केला आणि तिच्या भेटी करितां आंत गेलों. नंतर तिजला विचारितां सर्व वृत्तांत तिणें मला सांगितला. असें सुदेवाचें भाषण ऐकून सुनंदा व राजमाता दमयंतीचा पिपलु पाहण्या करितां तिजजवळ आल्या आणि पहातात तों तो दृष्टीस पडला. त्याकाळीं राजमाता व सुनंदा दमयंतीस आलिंगन देऊन रोदन करूं लागल्या नंतर राजमाता दमयंतीस बोलली हे दमयंती, तुझी माता व मी या दशार्णव देशाच्या राजाच्या कन्या आहोंत. मला वीरबाहू नामक चेदी देशाचे राजास दिली व तुझ्या मातेस भीमक राजास दिली. तूं ज्याकाळीं झालीस त्याकाळीं मी तुझा पिताच्या घरींच होत्यें तेव्हांच तुझ्या ललाटाचें चिन्ह मी पाहिलें होतें. हे दमयंती, तूं कांहीं चिंता करूं नको. आज पर्यंत तूं कोण हें मला कळलें नवतें असें राजमातेचें भाषण ऐकून दमयंती मातृभगिनीस बोलली हे माते, यद्यपि मी कोण हें तुला ज्ञान नवतें तथापि तुझ्या घरीं मी बहुत आनंदानें राहिल्यें कोणाच्या ही गोष्टी विषयीं न्यूनता मला झाली नाहीं, माझें रक्षण तूं उत्तम प्रकारें केलेंस आतां भर्त्यावांचून बहुत दिवस इतर ठिकाणीं वास करणें योग्य नाहीं याज करितां मला मातृगृहीं लौकर पाठीव, माझे लहान बालक तेही मजविषयीं बहुत शोक करीत असतील. असें ऐकतांच राजमातेनें दमयंतीचे बराबर कांहीं सैन्य देऊन व

तिजला शिबिकेंत बसवून पितृगृहीं धाडिली. नंतर भीमकराजा दमयंतीस पाहून बहुत आनंद पावला व दमयंतीच्या बंधूनीं तिचा बहुत सत्कार केला. दमयंती ही आपले माता पितर, बंधु व बालक यांस सुखी पाहून देवता व ब्राह्मण यांचें उत्तम प्रकारें पूजन अर्चन करून गृहांत गेली. भीमकराजानें सुदेवनामक ब्राह्मणास सहस्र गाई, ग्राम व विपुल धन देऊन संतुष्ट केला. एक रात्र दमयंतीनें आपल्या गृहीं आनंदांत घालवून दुसरे दिवशीं मातेस बोलली हे माते मी जिवंत राहावें अशी तुझी इच्छा असेल तर नलराजाचा शोध लौकर कर. नंतर दमयंतीच्या मातेनें पतीजवळ येऊन विनंती केली कीं; दमयंतीच्या पतीचा शोध लौकर करावा नाहींतर ती आपला प्राणत्याग करील. असें भार्येचें भाषण ऐकून भीमकराजानें बहुत ब्राह्मण देशोदेशीं नलराजाच्या शोधास पाठविण्याची तयारी केली त्या कालीं दमयंती ब्राह्मणांस बोलली हे विप्रहो, नलाचें ज्ञान तुह्मांस होण्याचा उपाय मी सांगत्यें त्या प्रमाणें तुह्मीं शोध करा ह्मणजे त्याचा शोध लागेल. तुह्मीं ज्या गावांत अथवा राष्ट्रांत जाल तेथें बहुत लोकांचा समुदाय पाहून असें भाषण करा कीं, हे विश्वास घातका, माझ्या अर्धवस्त्राचा छेद करून मी निद्रिस्त असतां अरण्यांत गेलास मी तुझ्या प्राणापेक्षां अधिक असतां तूं माझा त्याग करण्यास कसा समर्थ झालास बरें? त्याग कालीं जशी तूं मला पाहलीस तशीच प्रतिक्षणी तुझा मी शोध करत्यें. तुझा दुःखानें मी व्यास होऊन वारंवार रोदन करत्यें यास्तव हे राजा मजवर प्रसन्न होऊन माझ्या वाक्याचा आदर कर आणि अशा घोर अरण्यांत माझा त्याग करून को. भार्येचें रक्षण भर्त्यानें करावें हा त्याचा धर्म होय असें असतां त्या प्रतिज्ञेची नष्टता तुजपासून झाली, तशांतून तूं कुलीन, विद्वान्, सर्व राजांस मान्य, सत्यवक्ता असतां धर्मापासून भ्रष्ट होत्साता असा घातुकपणाचा धर्म कधीं अंगिकार केलास. याजवर जो प्रत्योत्तर देईल तो नलराजा समजून त्यास इकडे आणण्याचा यत्न करा. कदाचित् असें प्रत्योत्तर देऊन तो मनुष्य इकडे येण्याची इच्छा न करील तर तुह्मीं तसेच माघारी येऊन मला सांगा. असें दमयंतीचें वाक्य ऐकून ते ब्राह्मण भीमकराजाचा आज्ञेनें देशोदेशीं गेले. आणि मोठमोठीं पुरें, ग्राम, आश्रम यांजमध्यें जाऊन बहुत जनांचा समुदाय पाहून दम.

यंतीनें सांगितल्या प्रमाणें मोठ्या स्वरें करून बोलले असाबि० या अ० आहे.

७० अध्याय सत्तर— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, भीमकराजानें नलाचा शोध करण्या करितां देशोदेशीं ब्राह्मण पाठविले होते त्यांतील पर्णाद नामक ब्राह्मण कांहीं कालानें परत येऊन बोलला कीं, हे दमयंती, मी नलाचा शोध केला व तूं सांगितल्या प्रमाणें बहुत जनसमुदाय पाहून वाक्यें ही बोललों; परंतु कोठें ठिकाण लागत नाहीं तेव्हां अयोध्या नामक नगरीमध्यें रुतुपर्ण राजाच्या गृहा समीप तुह्मीं सांगितलेलीं वाक्यें बोलत असतां रुतुपर्ण राजानें व त्याचे भृत्यानीं ही उत्तर दिलें नाहीं; परंतु राजा पाशीं बाहुक नामें एक सारथी केवल रूपानें विरूप, ह्रस्व बाहू, अश्व याना मध्यें बहुत कुशल व उत्तम प्रकारें अन्नपाक करणारा असा आहे; त्याणें हें माझें भाषण ऐकतांच नेत्रांतून अश्रुपात केला- आणि एकांतीं मला घेऊन तूं कोण कोठून आलास कुशल आहेसना? असें विचारून श्वासोच्छ्वास टाकीत अतिशय रोदन करूं लागला. त्या कालीं मी त्यानें बहुत प्रकारें शांतवन केलें आणि विचारलें कीं, तूं माझें भाषण ऐकतांच- रोदनास आरंभ केलास याचें कारण काय? परंतु त्याचें उत्तर न देतां बोलला कीं, स्त्रियांवर किती जरी संकट आलें तरीं त्याणीं आपल्या आत्म्याचें संरक्षण उत्तम प्रकारें करावें त्यांसच पतिव्रता असें ह्मणतात; आपला पती व्यसनीं अथवा विषम कालामुळें सुखरहित झाला असतां कदाचित् स्त्रियांवर रोष करून त्यांना त्याग करतो त्याचा खेद कुलस्त्रियानीं मानूं नये. पक्ष्यानीं वस्त्र हरण केलें तेणें करून ज्यास बहुत दुःख जाहालें असेल अशा पतीनें स्त्रीचा त्याग केला असेल तर त्याजवर उत्तम कुलोत्पन्न कामिनी जी असेल ती कधीं कोप करणार नाहीं. निरुपाय जेथें गोष्ट झाली तेथें कोणाचा उपाय नाहीं. अशा संकट कालीं ज्यानें त्याणें आपल्या तपोबलें करून रक्षण करणें हा उत्तम मार्ग आहे. असें भाषण करून बाहुक दुसरे कडे गेल्यानंतर मी त्याचें वाक्य ऐकून तुह्मांस सांगण्याकरितां तत्काल अयोध्या नगरीहून निघालों तो आज येथें येऊन पोहोंचलों. असें पर्णाद नामक ब्राह्मणाचें वाक्य ऐकतांच दमयंतीचे नेत्र अश्रूनें भरून आले नंतर दमयंती मातेस बोलली हे माते, हा वृत्तांत राजास समजूं न देतां परभारें नल राजाचें पूर्ण ज्ञान होईल असा कांहीं उद्योग करावा. या ब्राह्मणाचे भाषणावरून

ह्या नलराजा खचित दिसतो; परंतु त्याचें स्वरूप मात्र याचे सांगण्या वरून मिळत-नाहीं. असो सुदेव नामक ब्राह्मण माझे शोधास जो तुह्मीं पूर्वी पाठविला होता-त्या ब्राह्मणासच अयोध्या नगरीं ऋतुपर्णाचे घरीं नलाचे शोधास पाठवावा असें मातेस भाषण करून नंतर दमयंतीनें पर्णाद नामक ब्राह्मणाचा बहुत सत्कार करून त्यास सांगितलें कीं, तूं आमचें कार्य उत्तम केलेंस आतां राजा येथें येऊन आमचे दृष्टीस पडला ह्मणजे तुला बहुत द्रव्य, गाई, गृह, क्षेत्रें इत्यादिक देऊन संतुष्ट करूं. असें दमयंतीचें वाक्य ऐकतांच पर्णाद ब्राह्मण तिजला मंगल कारक आशीर्वाद देऊन आपले घरीं गेला, नंतर दमयंती सुदेव ब्राह्मणास बोलली कीं, हे विप्रा, तूं अयोध्या नगरी मध्यें जाऊन ऋतुपर्ण राजास सांगावें कीं, भीमक नामक राजाची कन्या जी दमयंती इचा भर्ता नलराजा कोठें वनांतरीं गेला त्याचा ठिकाण लागत नाहीं, बहुत दिवस त्याची मार्ग प्रतीक्षा केली कोठें ठिकाण नाहीं ह्मणोन दमयंती पुनः स्वयंवर करून दुसरा पती करत्ये याज करितां बहुत देशोदशींचे राजे व राजपुत्र मिळाले आहेत त्यास उदईक तुह्मीं ही भीमक राजाचे घरीं जावें, ज्योतिष्यानीं उद्यांचा मुहूर्त सांगितला आहे, उद्यांचा दिवस अतिक्रांत झालातर राजपुत्री दुसरा पती वरील याज करितां आज आपण तेथें जाऊन पोंचावें असें सांगतांच तत्काल सुदेव नामक ब्राम्हणानें अयोध्यानगरीं जाऊन दमयंतीनें-सांगितल्या प्रमाणें ऋतुपर्ण राजास सांगितलें. असा वि॰ या अ॰ आहे.

७१ अध्याय एकाहात्तर.— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, सुदेव नामक विप्राचें भाषण ऐकून ऋतुपर्ण राजा मृदुवाणीनें बाहुकास बोलला हे बाहुका, विदर्भनगरामध्यें दमयंतीचा स्वयंवर पुनः होतो याजकरितां एक दिवसांत आपण जाऊन पोहोंचूं असे अश्व परिक्षेनें चांगले पाहून रथास जोड. असें ऋतुपर्णाचें भाषण ऐकतांच बाहुकाचें मन अगदीं विदीर्ण झालें-आणि मोठ्या शोक सागरांत निमग्न होऊन विचार करूं लागला. कीं, दमयंती-पुनः स्वयंवर करील काय कोण जाणें; कदाचित् मी कोठें आहें याचें परिज्ञान-होण्या करितां तर हा उपाय नसेल ना! तिचा तरीं काय उपाय आहे मी दुष्टानें अरण्यांत स्त्रीचा त्याग केला हें मला तरी योग्य आहे काय, परंतु मला असें वाटतें.

कीं, ती स्वयंवर पुनः करणार नाहीं कारण स्त्रियांस पुत्राची इच्छा बहुन असते; परंतु दमयंतीस तर दोन अपत्यें आहेत तेव्हां हें काय याचा पक्का निश्चय कोणाला करतां येत नाहीं. सत्य किंवा असत्य याचें ज्ञान राजा बरोबर मी गेलों ह्मणजे होईल. असा विचार बाहुक मनामध्यें करून राजास बोलला हे महाराज, आपल्या आज्ञे प्रमाणें विदर्भ नगरीं एक दिवसांत जाण्यास योग्य- असे हय रथास युक्त करतों. असें भाषण करून बाहुक अश्व शाळेंत गेला आणि तेथें सुलक्षण, रूपवान, पुष्ट, शीघ्र गामी असे त्यानें अश्व पाहिले, परंतु हे अश्व एकदिवसांत विदर्भ देशीं जातील असा त्याचा निश्चय होईना नंतर मनांत वारंवार तो विचार करतो कीं, उत्तम अश्व कोठून आणावे इतक्यांत पहांतां नात्यानें अश्वशाळेंत च्यार अश्व पाहिले ते शरीरानें कृश होते, परंतु उत्तम जातींतील, तेजस्वी, बलवान्, सुताच्या स्वाधीन राहणारे, भोंवरे जसे असावे तसे होते. वाऱ्या सारखा ज्यांचा वेग असे च्यार अश्व आपण पसंत करून ऋतुपर्ण राजास दाखविण्या करितां आणिले ते अश्व पाहून ऋतुपर्ण राजा बाहुकास बोलला हे बाहुका हे अश्व एक दिवसांत विदर्भ नगरीं कसे जातील हे तर अगदीं दुर्बल दिसतात माझी वंचना करण्या करितां हे अश्व दाखविण्यास तूं आणले आहेस असें मला वाटतें. असें राजाचें भाषण ऐकून बाहुक बोलला हे राजा, अश्वांची परिक्षा रूपावर नाहीं, भवऱ्यांवर आहे. ज्या अश्वांच्या ललाटावर एक, मस्तकावर दोन, पार्श्व उपपार्श्व- मिळोन चार, दोन दोन उरस्थळीं व पृष्ठ भागावर एक एकूण बारा भोंवरे ज्या अश्वांस असतील ते अश्व शीघ्रगामी व उत्तम वायू सारखे असें समजून हे अश्वरथास जाडितों हे एक दिवसांत विदर्भ नगरीं जातील. आपल्यास दुसरे लावावयाची इच्छा असेल तर लावतों. असें बाहुकाचें भाषण ऐकतांच ऋतुपर्ण राजा बोलला हे बाहुका, तूं हयतत्वज्ञ आहेस तुझ्या इच्छेस येईल ते अश्व रथास जोड. असें भाषण ऐकून बाहुकानें ते कुलिन अश्व रथास जोडले, नंतर वार्ष्णेय सारथ्या सहवर्तमान ऋतुपर्ण राजा मोठ्या त्वरेनें रथांत बसला, त्या कालीं अश्वानीं आपले ज्यानु पृथ्वीवर टेंकले. एक क्षण झाल्यावर बाहुकानें हयांस प्रेरणा करतांच रथ. आकाश मार्गांतून

वायू सारख्या वेगानें ते अश्व नेऊं लागले त्याकाळीं राजाचे व वार्ष्णेयाचे डोळे फिरूं लागले रथाचा वेग सहन होईना इतका रथ त्वरेनें चालला. हें पाहून ऋतुपर्ण बहुत विस्मय करूं लागला. वार्ष्णेय सारथी रथाचा घोष व हय संग्रहण पाहून मनांत विचार करतो कीं, हा काय इंद्राचा सारथी मातली अथवा होत्र नामक अश्वविद्येचा आचार्य अथवा नलराजा तर नसेलना, नलाचें व या बाहुकाचें कांहींसें वयानें सारूप्य दिसतें; परंतु रूप तर फार भिन्न आहे, अथवा बाहुकानें तरी नलराजापाशीं विद्याभ्यास केला नसेलना, देवही कपट रूपानें पृथ्वीवर फिरत असतात त्यांतील हा कोणी तरीं नसेलना, परंतु फार करून तर हा नलराजा असावा असें वाटतें. त्यासारखें याचें वय व रूप दिसतें, अश्वपरिक्षे वरून तर हाच नलराजा असावा. बाहुकाची अश्व विद्या पाहून राजा तर मनामध्यें अतिशय हर्षित झाला. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

७२ अध्याय बहात्तर.— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, वायू सारख्या वेगानें ऋतुपर्ण राजाचा रथ चालला असतां मोठ मोठ्या नद्या, पर्वत, वनें, उपवनें, सरोवरें बहुत अतिक्रांत झालीं. तों राजाचें उत्तरीय वस्त्र रथाखालीं पडलें. तेव्हां ऋतुपर्ण बोलतो हे बाहुका, माझें वस्त्र खालीं पडलें तें वार्ष्णेय घेऊन येई तों पर्यंत रथ उभा कर. इतका संवाद होत आहे तों रथ च्यार कोश पुढें गेला. नंतर नलराजा ऋतुपर्णास उत्तर देतो कीं, तुझें उत्तरीय वस्त्र एकयोजन पाठिमागें राहिलें तें पुनः आणण्यास कसें जावेल. असें ऐकून राजा अत्यंत विस्मित झाला. याप्रकारें वेगानें रथ चालला असतां मार्गामध्यें एक बिब्याचा वृक्ष पाहून ऋतुपर्णराजा बाहुकास बोलतो, सर्वज्ञता ईश्वरानें कोणास दिली नाहीं एकास एक विद्येचें ज्ञान असेल तर दुसऱ्यास दुसरे विद्येचें ज्ञान असतें. पहा मला अशी एक विद्या ठाऊक आहे कीं, या बिभीतक वृक्षास पर्णे व फलें किती आहेत हें मला वृक्ष पहातांच समजलें. या वृक्षाचीं पर्णे एकशें एक गळून पडलीं आहेत व एक फल ही गळून पडलें आहे व दोन शाखांस पांच कोट पत्रें व दोन हजार पंच्याण्णव फलें आहेत, हें ऐकून बाहुक रथ उभा करून राजास बोलतो हे राजा, तूं सर्व हें भाषण केलेंस त्याचा अनुभव आह्मांस कसा यावा; तुझें भाषण केवल परोक्ष आहे याचा अनुभव घेण्या करितां मी-

हा वृक्ष तोडून याचीं पर्णें व फळें मोजितो तूं सांगितल्या प्रमाणें भरलीं ह्मण जे तुझी विद्या खरी आहे असें मी ह्मणेन. एक मुहूर्त पर्यंत वार्ष्णेय रथ हां कील नंतर मागून मी विदर्भनगरीं येईन. हा मार्ग मोठा चालला आहे तस्करादिकांचें भय अगदीं नाहीं. असें ऐकून ऋतुपर्ण बोलतो हे बाहुका, तूं सारथी आहेस ह्मणोन एक दिवसा मध्यें विदर्भनगरीं जाण्याची मी उमेद धरली मध्यें विघ्न न करितां लौकर चल. दुसरा दिवस आला ह्मणजे आपला हा प्रयास सर्व व्यर्थ होईल, येवढ्या करितां मध्यें विघ्न करूं नको. तुझ्या सारखे वार्ष्णेय याच्यानें हय चालवणार नाहींत. असें ऐकून बाहुक बोलतो हे राजा, तूं कां हीं चिंता करूं नको मध्यें विलंब झाला तरीं आजचे दिवसांत तुला विदर्भनगरीं पोंचवीन. असें ऐकून ऋतुपर्ण बोलतो बरें तर तूं आतां संपूर्ण वृक्षाचीं फळें व पर्णें मोजूं नको एक शाखेचीं मोजलीं असतां सर्व वृक्षाचीं किती आहेत याचें ज्ञान अर्थात होईल. असें बोलतांच तो रथा खालीं उतरला आणि बिभीतक वृक्षाची एक खांदी तोडून त्याचीं फळें व पर्णें मोजलीं तों ऋतुपर्णानें सांगितल्या प्रमाणें तितकींच भरलीं. हें पाहून बाहुक राजास बोलला, तुमची ही विद्या फार उत्तम आहे, अशी विद्या मी कोठें पाहिली नाहीं व ऐकिली ही नाहीं; ही विद्या तुह्मांपासून घ्यावी अशी माझी फार इच्छा आहे. असें ऐकून राजा बोलला हे बाहुका, ही विद्या तुला सांगितली असती, परंतु आतां जाण्यास बहुत विलंब होईल याजकरितां सांगत नाहीं व मी आणखी अक्षविद्या ही जाणतों. तेव्हां बाहुक बोलला हे राजा, अक्षविद्या मला दे आणि मजपासून हयविद्या तूं घे. असें ऐकतांच हयविद्येच्या लोभानें ज्या काळीं आपल्या अक्षविद्येचा उपदेश राजानें बाहुकास केला त्या काळीं विद्यासामर्थ्यें करून बाहुकाच्या शरीरांतून कली बाहेर निघाला. कली बाहेर येतांच त्याच्या मुखांतून कर्कोटकानें दंश केलेलें विष बाहेर निघूं लागलें. हें पहातांच नल कलीस शाप देऊं लागला असतां कली पुनः बोलला हे राजा, तूं मला शाप देऊं नको तुझी भार्या दमयंती इंद्रसेनाची माता इचा व तुझा वियोग झाल्यापासून तिणें मला बहुत शाप दिले. पुढें कर्कोटकानें तुझ्या शरीरास दंश केला याचें विष आज पर्यंत मला बहुत प्रकारें बाधलें तेणें करून मी बहु

त दुःखित झालो, आतां तुला सोडावें अशी मला इच्छा उत्पन्न होऊन मी तुला सोडिलें, मज गरिबावर दया करून शाप देऊं नको. तुला मी आशीर्वाद देतों कीं, या पृथ्वीवर जे तुझें कीर्तन करितील त्यांस मजपासून कधींही भय होणार नाहीं. असें बोलून कलीनें बिभीतक वृक्षांत प्रवेश केला. त्याकाळीं नल राजा विगतज्वर होऊन मोठा आनंद पावला. फलें व पर्णे यांची संख्या करण्याची विद्या सहज राजास मिळाली. नंतर राजा रथावर बसून विदर्भनगराजवळ ऋतुपर्ण राजास घेऊन गेला. अ० वि० या अ० आहे.

७३ अध्याय त्र्याहात्तर:— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, सूर्यास्तसमयीं ऋतुपर्णराजा विदर्भ नगराचे द्वारास सुख येऊन पोहोंचला असतां त्याच्या रथाचा शब्द ऐकतांच दमयंतीनें मनांत निश्चय केला कीं, नल राजा खचीत आला यांत संशय नाहीं; कारण नलाखेरीज दुसरे कोणाच्या रथाचा असा शब्द व्हावयाचा नाहीं. तेव्हां दमयंती हर्षित होऊन मनांत विचार करूं लागली कीं, आज पतीचें मुख पाहून कृतकृत्य होईन; चंद्रासारखें आल्हादकारक जें नलराजाचें मुख तें पहाण्याकरितां प्रतीक्षा करीत बसल्यें आहे, आज पर्यंत मनामध्यें नलाखेरीज दुसऱ्या पतीचें स्मरण केलें नाहीं हें माझें सत्य आहे तर माझा पती लौकरच मला भेटेल नाहीं तर अग्नी मध्यें प्रवेश करीन. ज्या राजास परपत्नी कधींही ज्ञान नाहीं, ज्याचें ब्रह्मचर्य व एकपत्नी व्रत साक्षात् रामचंद्रासारखें होय तो राजा आज माझे नयन गोचर केव्हां होईल. असे नलराजाचे गुण वर्णन करीत दमयंती मोठ्या मोहांधःकारांत निमग्न जाहाली. ऋतुपर्ण राजा नगराचे मध्यकक्षेंत आला त्यास पाहण्यास दमयंती उंच मासादावर बसली आणि दुरून नल कोठें आहे याचें चिंतन करूं लागली तों वार्ष्णेया सह वर्तमान ऋतुपर्णराजा रथाखालीं उतरला आणि आंतले कक्षेंत गेला. इकडे बाहुक ही रथ घेऊन अश्वशालेंत गेला आणि अश्वांचें बंधन करून रथाचे उपस्थांत स्वस्थ बसला. इकडे भीमक राजास भृत्य जनानीं ऋतुपर्णराजा आपली भेटीस आला हें वर्तमान सांगितलें असतां भीमक राजानें ऋतुपर्णराजास उच्चासनीं नेऊन बसविलें आणि आगत स्वागत विचारिलें. इकडे

नगरा मध्यें स्वयंवराचा समारंभ कोठें दिसेना ह्मणोन ऋतुपर्ण राजा व हुन चकित झाला. पूर्वीचा वृत्तांत भीमक राजास श्रुत नवता ह्मणोन राजा ऋतुपर्ण राजास बोलला कीं, पर्वत, नद्या, वनें, उपवनें, यांचें उल्लंघन करून इतकें शीघ्र गमन केलें याचें कारण काय? ऋतुपर्णानें उत्तर केलें कीं, बहुत दिवस आपले भेटीस झाले ह्मणोन आलों. असें राजानें उत्तर देऊन तोमना मध्यें परम दुःखित होऊन चिंता करूं लागला कीं, हें काय आश्चर्य कोठें स्वयंवराची सिद्धता दिसत नाहीं. पुनः भीमकराजा ऋतुपर्णास बोलतो; आपण फार दुरून आलांत यास्तव च्यार दिवस आमचे घरीं राहून नंतर जावें. असें ऐकून ऋतुपर्ण भीमकाचे गृहीं राहिला. इकडे भैमी मनांत विचार करूं लागली कीं, ऋतुपर्णा बराबर दोन मनुष्यें आहेत एक तर वार्ष्णेय तो तर आपले परिचित आहे, दुसरा बाहुक तोच अश्व विद्ये मध्यें परम निपुण आहे त्याणेंच राजाचा रथ एक दिवसांत अयोध्येहून येथें आणिला. याची विद्या नलराजा सारखी दिसते, परंतु स्वरूप कांहीं भिन्न वाटतें तेव्हां हाच नलराजा ह्मणोन तरीं कशावरून निश्चय करावा. मला तर असें वाटतें कीं, नलराजा शिवाय एक दिवसांत इतकें दूर कोणी ही येण्यास समर्थ नाहीं. असा बहुत प्रकारें दमयंती विचार करून दूतीस बोलूं लागली. असा विषय या अध्यायांत आहे.

७४ अध्याय चवऱ्याहात्तरः— दमयंती भाषण करते हे केशिनी, ऋतुपर्ण राजा बरोबर बाहूक यानामें सारथी आला आहे त्याज कडे तूं जा-आणि त्यास विचार कीं, तूं कोण कोठील राहणार? ऋतुपर्णा पाशीं राहून तुला-किती दिवस झाले तूं नलराजा सारखा दिसतोस. असें ह्मणून नंतर असें ह्मणावें कीं, पर्णाद नामक ब्राह्मण अयोध्येंत येऊन सर्व जनसमुदाया मध्यें जें बोल-ला त्या भाषणाचें उत्तर तूं काय दिलेंस. तोच तूं ना, तें भाषण पुनः तुझ्या मुखांतून ऐकावें ह्मणोन दमयंतीची बहुत इच्छा आहे, असें त्यास भाषण करून त्याजवर बाहुक काय उत्तर देतो व त्याचे हृदयास कांहीं आरद्रता उत्पन्न होते किंवा नाहीं. हें सर्व त्याचें चरित्र पाहून मला सांग. अशी आज्ञा होतांच दासीनें जेथें बाहुक होता तेथें जाऊन दमयंतीनें सांगितल्या प्रमाणें त्यास प्रश्न केला.

तो ऐकून बाहूक भाषण करतो, कोशल देशींचा राजा जो भीमसेन त्याची दमयं ती ह्मणोन कन्या आहे तिचा द्वितीय स्वयंवर राजा करतो तो आज होयार ह्मणो न कोणी एक ब्राह्मणानें ऋतुपर्णास येऊन सांगितलें. याजकरितां उत्तम प्रकारचे अश्वरथास जोडून न्यारशें कोस लांब एक दिवसांत येथें येऊन पोहोंचलों हें आमचें येण्याचें कारण होय. असें ऐकून केशिनी बोलत्ये हा तिसरा मनुष्य तुमच्या बरोबर आहे हा कोण? असें ऐकून बाहूक बोलतो हे केशिनी, पुण्यश्लोक नल राजा ह्मणोन कोणी एक होता त्याचा हा सारथी यास वार्ष्णेय ह्मणतात, नलरा जा कांहीं कारणास्तव राज्यच्युत झाला ह्मणोन हा सारथी अयोध्येंत ऋतुपर्णा पाशीं सारथ्य कर्मावर राहिला. मीही अश्वविद्ये मध्यें बहुत कुशल आहें-ह्मणोन ऋतुपर्णानें आपले रथावर सारथ्यपणाची माझी योजना केली. असें-ऐकून केशिनी बोलत्ये नलराजा कोठें गेला हें वार्ष्णेय जाणतो काय? असें ऐकू न बाहुक बोलतो वार्ष्णेयानें मला इतकेंच सांगितलें कीं, मी नल राजाचीं उभ यतां बालकें येथें ठेऊन गेलों राजा कोठें गेला याचा ठिकाण मला नाहीं व आज पर्यंत दुसऱ्या मनुष्यासही कोठें भेटला असेंही झालें नाहीं. गुप्त रूपानें या पृथ्वी वर संचार करीत असेल असें वाटतें व मीच नलराजा आहें ह्मणोन तो तरी क-शास दुसऱ्यास सांगेल. असें ऐकून केशिनी बोलत्ये, कोणी एक पर्णाद नामक ब्राह्मण अयोध्ये मध्यें येऊन मोठ्या जन समुदाया मध्यें कोणी एक स्त्रीनेंसां गितलेलं भाषण बोलला कीं, कोणी एक कपटी मनुष्य आपले स्त्रीचें अर्धव-स्त्र छेदन करून घोर अरण्यांत ती स्त्री सुप्त असतां तिचा त्याग करून गेला ते व्हां पासून ती स्त्री पतीची मार्ग प्रतीक्षा करीत अर्धवस्त्र परिधान करून रात्रं दिवस त्या अरण्यांत शोकाग्नीनें दह्यमान होऊन बहुत कृश झाली. याजकरितां तिजवर दया करून या वाक्यानें उत्तर दे आणि तिजला दुःख सागरापासून मु-क्त कर. त्या वाक्याचें उत्तर तूं काय दिलेंस तें उत्तर पुनः वैदर्भी ऐकण्यास इच्छि ते. इतकें ऐकतांच बाहुकाचें हृदय अगदीं विदीर्ण झालें आणि नेत्रांतून अश्रु पात होऊं लागले, गहिंवर येऊन बोलला कीं, हे केशिनी कुलवंत स्त्रियांस कितीं जरी संकट आलें तरीं आत्म्याचा निग्रह करून शरीराचें रक्षण करतात, असें के लें असतां त्या स्त्रियानीं स्वर्ग जिंकिला असें जाणावें. राज्या पासून भ्रष्ट, लक्ष्मी

हीन, क्षुधित व व्यसनी असा जो त्यानें पत्नीचा परित्याग केला तरी तीं त्याज-वर रागें भरण्यास योग्य नाहीं; असें बाहुक भाषण करून वारंवार अश्रु पात करूं लागला. हें वर्तमान केशिनीनें दमयंतीस सांगितलें. असा विषय या अध्यायांत आहे.

७५ अध्याय पंचाहात्तर.– बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, केशिनीचें भाषण ऐकून पुनः दमयंती बोलली, तूं बाहुकाकडे जा आणि त्याचीं कांहीं आणखी चिन्हें असतील तीं पहा व तो काय बोलतो त्याचें ही इंगित मनांत आणोन यथास्थित मला सांग. हे केशिनी, हाच नलराजा असेल यानें ज्ञान होण्याची परिक्षा तुला सांगत्यें, बाहुकास पाका करितां अग्नि व उदक कोठें मिळणार नाहीं असा प्रतिबंध कर ह्मणजे नलराजा असेलतर आपल्या प्रभावें करून अग्नि व जल उत्पन्न करून पाक करील. अशी दमयंतीची आज्ञा होतांच केशिनी दासी अश्वशाळेंत गेली आणि तीं सर्व बाहुकाचीं चिन्हें पाहून दमयंतीस सांगूं लागली कीं, हे दमयंती असा मनुष्य माझे पाहण्यांत आला नाहीं याचा आचार तर बहुत शद्ध आहे दुसरें असें एक आश्चिर्य पाहिलें कीं, घराचीं द्वारें लहान, जाण्यास अयोग्य असलीं तरी हा बाहुक त्या द्वारानें आंत जातो ह्मणजे तीं आपो आप मोठीं होतात, नंतर लहान ही होतात व पृथ्वी लहान असली तरी कांहीं कारणा स्तव याच्या योगानें कदाचित् मोठी होत्ये. दुसरें एक कृत्य फारच आश्चर्य कारक आहे तें असें कीं, भीमकराजानें ऋतुपर्णा करितां पशूचीं मांसें अपक्क पाठविलीं होतीं त्यांचें प्रक्षालना करितां बाहुकानें कुंभाकडे पाहातांच कुंभ जलानें पूर्ण झाला नंतर मांस प्रक्षालन करून-चुलीवर ठेविलें आणि हस्तामध्यें तृणमुष्टी घेऊन सवित्याचें ध्यान करून चुलीकडे पाहातांच अकस्मात् अग्नी उत्पन्न झाला तेणेंकरून मांस यथास्थित पचन झालें जितकें पाणी पाहिजे तितकेंच भांड्या मध्यें उत्पन्न होतें. अशीं बाहुकाचीं अद्भुत चिन्हें पाहिलीं तीं तुला सांगितलीं. असें ऐकतांच हाच पुण्यश्लोक नलराजा आहे यांत संशय नाहीं, असा दमयंतीनिश्चय करून पुनः बोलली हे दूती, बाहुकानें जें मांस पचन केलें असेल त्यांतून स्वल्प मला भक्षण करण्या करितां घेऊन ये. अशी दमयंतीची आज्ञा

होतांच पुनः केशिनीनें अश्वशाळेंत जाऊन तें मांस आणोन दमयंतीस दिलें, दमयंतीनें तें भक्षण करतांच असें मांस नलाखेरीज इतराचे हस्तें पचन व्हावयाचें नाहीं असा निश्चय करून तिनें इंद्रसेना कन्या व इंद्रसेन पुत्र यांस केशिनी बराबर बाहुकाकडे पाठविलें. तीं बालकें पाहतांच बाहुक धांवत येऊन उभयतांस आपले अंकावर बसवून नंतर त्यांचें मुख पाहून रोदन करूं लागला. हें केशिनीनें पाहतांच बाहुक तिजला बोलला हे केशिनी, या बालकां सारखीं माझीं दोन बालकें आहेत यांस पाहतांच मला त्यांचें स्मरण झालें ह्मणोन मी रोदन केलें. असो आह्मीं प्रवासी आह्मांस पुत्र भार्या कशास पाहिजे, या पुत्रास तूं आतां घेऊन जा कारण तुझें व माझें एकांतीं भाषण झालें येणें करून इतरांचे मनांत अन्यथा शंका उत्पन्न होईल. असें ऐकून नंतर उभयतां बालकांस घेऊन केशिनी दासी दमयंतीकडे गेली आणि तिनें जाहालेला वृत्तांत सांगितला. असा विषय या अध्यायांत आहे.

७६ अध्याय शाहात्तर:— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, पुण्यश्लोक जो नलराजा याचें चरित्र व इंगित दासीनें दमयंतीस सांगितल्या नंतर दमयंती पुनः केशिनीस बोलली हे दूती, माते कडे जाऊन माझा निरोप सांग कीं, फार करून बाहुकाचीं चिन्हें नलराजा सारखीं दिसतात; परंतु रूपा विषयीं मात्र संशय येतो याजकरितां स्वतः दमयंती बाहुकाकडे जाण्यास इच्छिते याविषयीं तुझी व पित्याची आज्ञा असावी. असें दूतीस सांगतांच दूतीनें येऊन दमयंतीचा निरोप मातेस सांगितला. नंतर मातेनें भीमकास तें वर्तमान सांगितलें तेव्हां भीमकराजा बोलला फार चांगलें आहे तिकडे जाण्यास दमयंतीस आज्ञा द्यावी. असें भीमकराजानें भाषण करतांच मातेनें ही बाहुकाकडे जाण्यास दमयंतीस दूती समागमें आज्ञा दिली. नंतर दमयंती मातेची आज्ञा घेऊन बाहुकाकडे गेली. हें पाहून बाहुकही मनांत फार खिन्न झाला. नंतर दमयंती बाहुकास बोलली कीं, हे बाहुका, कोणी एक पुरुषानें घोर अरण्यांत आपली स्त्री निद्रिस्त असतां तिचा त्याग केला. असा धर्मशील तुझ्या दृष्टीस कोणी पडला आहे काय? इंद्रादि दिक्पालांचा त्याग करून मी नलास वरिलें तथांपून त्याची आज्ञा

परिपालन करणारी मी असतां माझा त्याग करण्याविषयीं त्यास कशी बुद्धी झाली! पाणिग्रहण कालीं पती व भार्या यांचें ऐक्य अग्निसान्निध्य होतें त्या अग्नीची अमर्यादा करून भार्येचा त्याग पतीनें करावा काय? असें दमयंतीचें शोकयुक्त भाषण बाहुकानें ऐकून दमयंतीस प्रत्युत्तर दिलें कीं, हे भीरू, मीराज्या पासून भ्रष्ट झालों हा माझा दोष नाहीं. हा सर्व अनर्थ कलीनें उत्पन्न केला, त्या योगें मी तुझा त्याग करून वनास गेलों त्या शोकें करून तूं वारंवार कलीस शाप देत होतीस ह्मणोन त्या क्लेशानें कली बहुत पीडित झाला आणि माझे अंगांतून बाहेर निघून मला बोलला कीं, हे राजा, तुझ्या स्त्रीच्या शापें करून व तुझ्या तपें करून मी बहुत दुःखित झालों आतां मी तुझा त्याग करून जातों तूं पूर्ववत् राज्यारूढ होऊन स्त्री व पुत्र यांसह वर्तमान उत्तम रीतीनें राज्यश्रीचा उपभोग कर. असें भाषण करून तो शापरूपी पुरुष गेला. तुझी करुणा त्याजला बहुत आली ह्मणोन माझ्या शरीरांतून बाहेर निघून गेला. हे दमयंती, आपल्या प्रीतीस अनुरूप जो पती याचा त्याग करून दुसरा पती वरावा हें तुला योग्य आहे कीं काय? हें मला कशावरून कळलें ह्मणशील तर भीमक राजाच्या आज्ञेनें ब्राह्मण देशोदेशींचे राजांस आमंत्रणें करीत होते कीं, भीमकराजाची कन्या दमयंती आपल्या गुणास व रूपास योग्य असा पती पाहून पुनः दुसरें स्वयंवर करणार हें वृत्त मी अयोध्येंत ऋतुपर्णराजा याचे गृहीं ऐकिलें तेव्हां पासून माझे मनास उद्विग्नता उत्पन्न झाली. असें विनययुक्त नलाचें भाषण ऐकून दमयंती बोलली हे राजा, दोषदृष्टीनें मजकडे पाहूं नको कारण तुझ्या करितां इंद्रादि दिक्पालांचाही त्याग केला असतां नला खेरीज दुसरा पती कसा वरीन! ही मजविषयीं मिथ्या शंका बाळगूं नको. देशोदेशीं ब्राह्मण पाठविण्याचें कारण दुसरा स्वयंवर करावा हें नव्हे, तूं कोठें गुप्त रूपानें वास करीत असशील तेथें हें वर्तमान तुला कळून तूं माझा शोध करीत लौकर यावेंस या बुद्धीनें ब्राह्मणांस पाठविलें. माझ्या मनाचा पक्का निश्चय होता कीं, त्यारशें कोस लांब तुज खेरीज दुसऱ्याचें येणें व्हावयाचें नाहीं. असें समजूनच ब्राह्मण मुखें ऋतुपर्णास एक दिवसांत येण्याचें सांगितलें. हे राजा, या खेरीज माझे मनातील अभिप्राय दुसरा नाहीं असेल तर तुझ्या पायांची

शपथ वाहात्यें. असें दमयंतीनें भाषण करतांच अंतरिक्षा मध्यें वाणी झा-ली कीं, हे पुण्यश्लोक नलराजा, आज पर्यंत या दमयंतीनें कांहीं पाप केलें ना-हीं याविषयीं आह्मीं साक्षी आहोंत. अशी आकाशवाणी झाल्यावर एकाएकीं नल दमयंतीवर पुष्प वृष्टी झाली, देवानीं दुंदुभीचे नाद करून कल्याण असो कल्याण असो असे आशीर्वाद दिले. हें अद्भुत चरित्र पाहून नलराजा दम-यंतीची शंका निवारण होण्या करितां कर्कोटकानें स्मरण करून त्याणें दिले-लीं वस्त्रें परिधान केलीं असतां नलराजा आपलें देदीप्य मान सुंदर रूप पा-वला. हें पाहतांच दमयंतीनें नलराजास आलिंगन दिलें नंतर नलराजानें ही भैमीस आलिंगन दिलें नंतर उभयतां भीमकराजाकडे येऊन नलाचें वर्तमान दमयंतीनें राजास सांगितलें असतां उभयतां माता पितर परम-आनंद पावले. याप्रकारें भीमकाचे गृहीं उभयतां रहात असतां चतुर्थ व-र्षीं राजा आपले देशास जाण्याची इच्छा करूं लागला. असा विषय या-अध्यायांत आहे.

७७ अध्याय सत्याहात्तर— बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, ती रात्र अतिक्रांत जाहाल्यानंतर दुसरे दिवशीं नलराजानें उत्तम प्रकारच्या सुगंधिक द्रव्यानें स्नान करून व उत्तम प्रकारचे अलंकार घालून वैदर्भी सहवर्तमान आपला श्वशुर जो भीमक राजा त्यास प्रातःकालीं अभिवादन केलें. भीमक राजानें ही उभयतांचा परम सत्कार करून बहुत प्रकारें शांतवन केलें. ग्रामनिवासी लोकांस नलराजा आला हें कळतांच संपूर्ण लोक वाद्यांचा गजर करूं लागले. मोठमोठे राजमार्ग सिंचन करून सुशोभित केले. नगरांतील संपूर्ण देवालयां मध्यें देवांचे उत्साह केले. याप्रकारें संपूर्ण कुंडिन नगर तेथील राहाणारे लोकांनीं सुशोभित केल्यानंतर नलराजा दमयंती सहवर्तमान त्या त्या ठिकाणीं गेला. ऋतुपर्ण राजा हें पाहून नलराजास बोलतो हे राजा, तुझे अपराध मजपासून जाणोन अथवा नजाणोन झाले असतील त्यांची क्षमा करावी. असें ऋतुपर्ण राजानें भाषण ऐकून नलराजा बोलतो हे राजन्, तुझ्या गृहीं मी सुखें करून अज्ञात वास उत्तम प्रकारें केला त्या आज पासून जें मला सुख जाहालें असें सुख कधींही घरीं झालें नसेल. आतां मला आ.

पला आशीर्वाद असावा, पूर्वीप्रमाणें सख्यत्व पुढें ठेवावें, माझे ठायीं जी हयविद्या आहे ती तुला देऊन तुझ्या उपकाराचें निवारण करावें अशी माझी इच्छा आहे असें भाषण करून नैषधानें यथोक्त अश्वविद्या ऋतुपर्णास दिली असतां ऋतुपर्णानें त्या विद्येचा परम आदरें स्वीकार करून नंतर नलराजास आशीर्वाद देऊन तो दुसरा सारथी समागमें घेऊन स्वपुरीं गेला. असा विषय या अध्या० आहे.

७८ अध्याय अनुव्याहारः- बृहदश्व सांगतात हे राजा, इकडे भैमी-सहवर्तमान नलराजा कुंडिण्य नगरीं एक महिना राहून नैषध देशीं जाण्यास-निघाला असतां भीमक राजानें नलराजा समागमें एक रथ, शरभ्रदंतानीं सुशोभीत असे सोळा गज, पन्नास अश्व, साहाशें पायदळ दिले. अशा सैन्या सहवर्तमान राजा आपले देशीं गेला. नंतर एके दिवशीं आपला भ्राता जो पुष्कर त्यास नलराजा बोलला कीं, हे पुष्करा, मी आजपर्यंत बहुत द्रव्य संपादन केलें आहे, तेव्हां मनातून अशी इच्छा आहे कीं, या द्रव्याचा क्षय होईतों पर्यंत हें द्रव्य पणास लाऊन अक्षक्रीडा करावी, हें द्रव्य क्षयास गेल्यावर शेवटीं दमयंती पणांत हरवावी हें ही झाल्यावर तूं मला पराजित केलेंस तर संपूर्णप्राण पणास लाऊन जीव द्यावा अशी इच्छा उत्पन्न झाली आहे, कदाचित् द्यूतक्रीडा करण्याची इच्छा-नसेल तर युद्धास सिद्ध हो या उभयतांतून तुला काय अपेक्षित आहे तें लौकर सांग. असें नैषधाचें भाषण ऐकून पुष्कर किंचित् हास्य करीत नलराजा आपणास अक्षक्रीडेंत काय जिंकणार. आपलाच जय होईल? असा निश्चय करून बोलला कीं, हे नला, तूं असें समज कीं, आजपर्यंत जें द्रव्य संपादन केलें तें पणांत क्षय जाहलें व दमयंतीही पणांत हरविली, आज भार्ये सहवर्तमान माझें दास्यत्व करून गृहीं वास करावास. आजपर्यंत हीच माझी इच्छा होती कीं, पणामध्यें दमयंतीचें हरण करून तिणे माझें दास्यत्व करावें ह्मणजे मी कृत कृत्य झालों. तूं सहज तो क्षण प्राप्त होण्याचा उपाय योजिला आहेस, फार चांगलें मी अक्षक्रीडेस सिद्ध आहें. असें पुष्कराचें वाक्य ऐकतांच नलराजा आरक्त नेत्र करून पुष्कराचा तत्काल शिरच्छेद करावा अशा तात्पर्यानें त्यास बोलला कीं, अरे मूर्खा तुझाच जय पणांत होईल आणि माझा होणार नाहीं काय? जय किंवा पराजय ईश्वराचे स्वाधीन आहे मनुष्याचे स्वाधीन नाहीं. असें बोलणें झाल्यावर त्याणीं क्रीडेस-

आरंभ केला आणि पहिल्याच पणांत नलानें पुष्करास पराजित करून, रत्नें, माणिकें, हिरे, पाच, मोती इत्यादि द्रव्यें हरण केलीं नंतर तो पुष्कराकडे पाहून हास्य युक्त बोलला कीं हे पुष्करा, आतां हें संपूर्ण राज्य, धन, कोश व द्रव्य माझें झालें-आतां तूं दमयंतीचा दास झालास पूर्वी जो तूं मला जिंकिलास हें तुझें सामर्थ्य नव्हे तर कलीचें आहे, हें मूर्खा तूं जाणत नाहींस आणि दुसऱ्यानें केलेला दोष मी तुजवर ठेवीत नाहीं. तुला हें द्रव्य अर्पण करून राज्याचा कारभार देतों तूं माझा सहोदर भ्राता आहेस ह्मणोन मजपासून तुला कांहीं भीती नाहीं; तूं आतां या सैन्या सहवर्तमान नगरांत जाऊन सर्वजनांस सांगकीं, नलराजा पुनः माघारा आला. असें नैषधानें भाषण ऐकून पुष्कर बोलला हे राजा, तुझ्यां सारिखा धन्य पुरुष त्रैलोक्यांत अवलोकिला नाहीं, तुला दहा हजार वर्षे आयुष्य असो तुझी कीर्ती अक्षय्य या भूमंडळीं असो आज तूं मला प्राणदान केलेंस तेव्हां-तुझा सत्य विक्रम मुखानें किती वर्णन करूं. असें भाषण करून नंतर अंजली पुट जोडून नलराजास साष्टांग नमस्कार घालून सैन्या सहवर्तमान पुष्कर नगरांत गेला आणि संपूर्णांस बोलला कीं, पुण्यश्लोक नलराजा पुनः आपले राज्यावर आला. असें भाषण ऐकतांच संपूर्ण लोक मोठ्या समारंभानें राजास-नगरांत घेऊन गेले. राजानें ही नगरांत गेल्या नंतर बहुत प्रकारें लोकांनें सांत्वन केलें. त्याकाळीं राजाची दया पाहून नागरीक जनांचे अंगावर रोमांच उभे राहिले. हे राजा, तूं आलास येणें करून आह्मी कृतकृत्य झालों संपूर्ण ह्मणाले-कीं, हे राजा, दमयंती सहवर्तमान राज्याचा उपभोग तूंच करावास अशी आमची इच्छा आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

७९ अध्याय एकुण ऐशीं:- बृहदश्व सांगतात हे धर्मराजा, नलराजा राज्या रूढ झाला असतां भीमकराजा बालकां सहवर्तमान वैदर्भीस घेऊन नैषध देशीं आला आणि त्यांस नलराजाने स्वाधीन करून पुनः स्वदेशीं-माघारा गेला. नलराजा भार्येसहवर्तमान बहुत दिवस सुख पावून नंतर नाना प्रकारचे यज्ञयाग करून राज्य करूं लागला. तसा धर्मराजा तूं आपले सुहृद व बंधू यां सहवर्तमान वनांत राहतोस; परंतु नलासारखें दुःख तुला नसतां कां व्यर्थ शोक करतोस! अरण्यात तुझे भ्राते व भार्या व आप्तजन, प्रि

त्र हे सर्व सन्निध आहेत नाना प्रकारचे यज्ञ याग करून ब्राह्मण संतर्पण तूं करतोस तेव्हां तुझ्या सारिखा स्मरवी कोणी नाहीं. हे राजा, पुनः भार्या व बंधु यां सह वर्तमान राज्याचा उपभोग थोडक्याच दिवसांत तूं करशील. सर्व क्षत्रियां मध्यें कीर्तीमान् व पुण्यश्लोक जो नलराजा व कर्कोटक नाग तसेच दमयंतीचें व राजऋषी जो ऋतुपर्ण राजा यांचें नित्यशाह्या जो कीर्तन करील त्यास कलीची बाधा कधींही व्हावयाची नाहीं, हे धर्मराजा, हें नलाख्यान मी तुला सांगितलें त्या च्या योगें तुझी लक्ष्मी सदा सर्वकाळ स्थिर राहील व धर्म, अर्थ, काम या पुरुषार्थांची वृद्धी होईल. हें नलाख्यान जो श्रवण करील अथवा पठण करील त्याचा निरंतर उदय असावा असें जाणोन हें नलाख्यान मी तुला सांगितलें. हे धर्मराजा, तुला असें वाटत असेल कीं, दुर्योधन पुनः अक्षक्रीडेस बोलाऊन पुनः सर्वस्व माझें हरण करील तर ही भीती तूं मनामध्यें अगदीं धरूं नको. नलराजास ऋतुपर्णानें अक्षहृदय विद्या दिली त्या विद्येनें नलराजा आपले भ्रात्यास जिंकून जसा राजलक्ष्मी पावला तीच अक्षविद्या मी तुला सांगतों म्हणजे पुनः त्या दुष्टा पासून अक्ष संबंधीं किमपिही भय होणार नाहीं. असें बृहदश्वाचें वाक्य ऐकून धर्मराज बोलला हे ऋषे, तुमचें भाषण ऐकून मी अतिशय संतुष्ट झालों आतां अक्ष विद्येचें स्वरूप व प्रभाव मला सांगावा. असें ऐकतांच ऋषी धर्मराजास अक्ष विद्येच्या मंत्राचा उपदेश करून गेले. नंतर धर्मराज भ्राते व भार्या यां सह वर्तमान काम्यक वनीं असतां कोणी ऋषींनीं धर्मराजास सांगितलें कीं, अर्जुन स्वर्गीं वायू भक्षण करून व तशींच शीर्ण पत्रें भक्षण करून महान उग्र तप करीत बसला आहे. असें ब्राह्मणाचें वाक्य ऐकून धर्मराज मोठ्या शोक सागरांत निमग्न झाला असतां धर्मराजानें अर्जुनाच्या शोकें करून कांहीं दिवस काम्यक वनीं घालविले. असा विषय या अध्यायांत आहे.

८० अध्याय ऐशीं.— जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायन ऋषे, आमचा प्रपितामह जो अर्जुन तो काम्यक वनांतून स्वर्गास गेल्यानंतर धर्मराज प्रभृती पांडव पाठिमागें कसे राहिले हें मला सांग. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, ज्याकाळीं पार्थ स्वर्गास गेला त्याकाळीं संपूर्ण पांडव

दुःख शोकांत निमग्न झाले. अर्जुन असतां वनांत राहण्यास जितकी उत्कं ठा धर्मराजाची असे तितकी अर्जुन गेल्यापासून नाहींशी झाली. पांचाली उद्विग्न होऊन भाषण करी कीं, जो अर्जुन सहस्रार्जुना सारखा पराक्रमी व दोनबाहू असतां ज्यास सहस्रबाहूचें बल त्या अर्जुना वांचून मला हें विपिन शून्य दिसतें. असें नाना प्रकारें द्रौपदीचें वाक्य ऐकून भीमसेन बोलला कीं, हे सुमध्यमे पांचाली, तुझें भाषण केवळ अमृता सारखें मी पान करून परम संतुष्ट झालों ज्याचे दीर्घ बाहू तसाच खड्ग, धनुष्य इहीं करून युक्त व सुवर्णाच्या भूषणानीं सुशोभित व ज्यास संपूर्ण इंद्रादि दिग्पाल पाहातांच भयपावतात तो अर्जुन गेल्या पासून आमचीं मनें अगदीं शून्य जाहलीं आहेत. असें नाना प्रकारें भीमसेनाचें वाक्य ऐकून नकुल बोलला ज्याणें उत्तर दिशेस जाऊन गंधर्वांचा पराभव करून परम सुशोभित शत अश्व आणिले त्या अर्जुना वांचून माझें मन काम्यकवनीं राहाण्यास इच्छित नाहीं. असें ऐकून सहदेव बोलला पूर्वीं राजसूययज्ञामध्यें ज्याणें संपूर्ण राजांस युद्धा मध्यें जिंकून नाना प्रकारचीं द्रव्यें व राजांच्या कन्या हरण करून धर्मराजास अर्पण केल्या. तसेंच सुभद्राहरण कालीं वासुदेवाच्या अनुमतानें मोठमोठ्या यादवांचा पराभव केला त्या-अर्जुनाचें हें आसन पाहून माझें अंतःकरण बहुत दुःखित झालें ह्मणोन मी काम्यक वनीं राहाण्याची अतःपर इच्छा करीत नाहीं, यावनांतून दुसरे वनीं जाऊन तेथें राहावें अशी माझी इच्छा आहे. अ. वि. या. अ. आहे.

८१ अध्याय एक्यायशीं— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, अर्जुन दर्शनाच्या शोकानें संतप्त जे त्रिवर्ग पांडव व द्रौपदी यांचीं वाक्यें ऐकून धर्मराजाचें ही मन तत्काल तसेंच उद्विग्न झालें. तों ब्रह्मश्रीनें सुशोभित व अग्नी सारखा देदिप्यमान् असा जो नारद त्यास धर्मराजानें पाहून-भ्रात्यां सहवर्तमान उत्तम प्रकारें त्याची पूजा करून उत्तमासनीं त्यास बसविलें. नंतर नारद ऋषी धर्मराजाच्या पूजेनें संतुष्ट होऊन बोलले कीं, हे भरतेंद्रा तुला जें कांहीं इच्छित असेल तें माग मी देण्यास सिद्ध आहें. असें ऐकून धर्मराज भ्रात्यां सहवर्तमान नारद ऋषींस साष्टांग नमस्कार करून बोलतो हे ब्रह्मऋषे, तुह्मीं सर्वलोकांत पूज्य आहांत कोणत्याही प्रक्रा

रें तुह्मीं संतुष्ट झालां ह्मणजे आह्मीं कृतकृत्य झालों जर तुमची इच्छा मजवरअ नुग्रह करण्याची असेलतर मला संदेह उत्पन्न झाला आहे कीं, पृथ्वी प्रदक्षणा- जे करतात त्यांस फलकाय प्राप्त होतें याचें निरूपण यथास्थित करावें. असें ऐकू न नारद ऋषी भाषण करतात हे राजा, पूर्वी भीष्मानें पुलस्त्य ऋषीस या विषयीं प्र श्न केला होता त्या कालीं त्याणीं ही पृथ्वी प्रदक्षणेच्या फलाचें निरूपण केलेलें मी तुला सांगतों. पूर्वी भीष्म संपूर्ण मुनींसह वर्तमान भागीरथीस स्नानास गेले कां हीं दिवस तेथें वास करून नंतर गंगा द्वारीं आले आणि तेथेंही स्नानदान क्रि या व पितरांचें तर्पण करून स्वस्थ बसले आहेत तों पुलस्त्य ऋषीस पाहून भी- ष्म आनंद पावला. नंतरत्यास शिर साष्टांग नमस्कार करून मी भीष्म तुमचा दास दर्शनाच्या इच्छेनें उभा आहें दासावर कृपा असावी. असें बोलून पुलस्त्य ऋषी- कडे पहात तटस्त उभा राहिला असतां विनयें करून नम्र व अध्ययन, यज्ञ या- गादि क्रियें करून कृश जाहलेला कुरु श्रेष्ठ जो भीष्म यास पाहून पुलस्त्य ऋषी बोलूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

८२ अध्याय त्यायशीं:– पुलस्त्य भाषण करतात हे भीष्मा, तूं सर्वध र्मजाणतोस. तुझें सत्य, विनय व इंद्रिय निग्रह मी ऐकून संतुष्ट आहें. तुझा सारखा ज्ञानी व पराक्रमी कोणी ही नसेल, देव व पितर यांजवर तुझी परम प्रीती आहे या स्तव मला विचारण्या विषयीं जी तुझी इच्छा असेलतें विचार. असें ऐकून भी- ष्म बोलतात हे ऋषे, सर्वलोकांस तुह्मीं पूजित आहांत तुमचे दर्शनानें मी कृतकृ त्य झालों मला असा एक संदेह उत्पन्न झाला आहे कीं, पृथ्वीची प्रदक्षणा जे क रतात त्यांस काय फल प्राप्त होतें तें सांगण्यास आपण योग्य आहांत असा प्र- श्न ऐकून पुलस्त्य भाषण करतात हे भीष्मा, तीर्थाचें जें फल तें एकाग्र मनानें ऐक. हस्त, पाद, मन हीं ज्याचीं पवित्र आहेत व विद्या, तप, कीर्ती ज्याची बहुत आहे तो व जो प्रतिग्रह करीत नाहीं व जें कांहीं दिलें त्यांतच संतुष्ट असतो, अहंकारा चा लेश बाळगीत नाहीं, दंभहीन, पाप कर्म न करणारा, जितेंद्रिय, अक्रोधी, सत्य- शील, दृढव्रत, संपूर्ण भूतांस आत्मसमदृष्टी त्यासही संपूर्ण तीर्थाचीं फलें प्राप्त होतात. दरिद्री पुरुषास विपुल द्रव्य साध्य होऊन यज्ञ यागादि क्रिया होत नाहीं या स्तव त्यासही होण्यास योग्य हा विधी ज्ञात्यानीं सांगितला आहे. तीर्थयात्रा

करणाऱ्या पुरुषानें तीर्थास गमन केलें असतां तेथें त्रिरात्र उपोषणें करून यथाशक्ती सुवर्ण व गाई दान कराव्या ह्मणजे यज्ञ यागादि क्रियेचें फल त्यास प्राप्त होतें. हे भीष्मा, या पृथ्वीवर नृलोकीं पुष्कर नामक तीर्थ तीन लोकांमध्यें विख्यात परम पवित्र असें आहे, त्यामध्यें दहा कोट सहस्त्र तीर्थें वास करतात. आदित्य, वसु, रुद्र, साध्य, मरुद्गण, गंधर्व, अप्सरा, सिद्ध, चारण हे संपूर्ण या तीर्थीं निरंतर वास करतात तसेच ब्रह्मऋषी व देवऋषी या तीर्थीं निरंतर पुण्ययोग समाधी करितात त्या तीर्थाचें कोणी ही मनामध्यें स्मरण केलें असतां सर्व पातका पासून मुक्त होऊन स्वर्गीं वास करतो. असें जें पुष्कर तीर्थ याचें ब्रह्मदेव निरंतर सेवन करतो. तेथें स्नान करून देवाचें अर्चन व पितरांचें तर्पण जो करील तो अश्वमेधा पेक्षांही दशगुणित पुण्यवान होईल. पुष्कर तीर्थीं श्राद्धें करून जो एक ब्राह्मणास भोजन घालील त्यास इहलोकीं व परलोकीं आनंद प्राप्त होईल. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र जे कोणी पुष्कर तीर्थीं स्नान करतील त्यांस पुनः जन्म प्राप्त होणार नाहीं, विशेषें करून कार्तिकी पौर्णिमेचे दिवशीं या तीर्थीं जो कोणी स्नान करील त्यास उत्तम लोक प्राप्त होईल. प्रातःकालीं व सायंकालीं जो स्मरण करील त्यास तीर्थ स्नान केल्याचें पुण्य लागेल. जन्म प्रभृती जें पातक केलें असेल त्याचा पुष्कर तीर्थीं स्नानानें नाश होतो. जसा संपूर्ण देवांमध्यें आदि मधुसूदन तसें हें संपूर्ण तीर्थांमध्यें आदितीर्थ होय. द्वादश वर्षे पर्यंत शुद्ध अंतःकरणानें जो कोणी पुष्कर तीर्थीं वास करील त्यास ब्रह्मदेवाचें सायुज्य पद प्राप्त होईल. कार्तिक पौर्णिमेस जो या तीर्थीं राहील त्यास शंभर वर्षे अग्नि होत्र केल्याचें फल प्राप्त होतें. पुष्कर तीर्थीं जाण्याची इच्छा होण्यास जन्मांतरींचें बहुत पुण्य पाहिजे असा या पुष्कर तीर्थाचा महिमा होय. नंतर जंबुमार्ग नामक क्षेत्रीं जावें, तेथें देवऋषी, पितर निरंतर वास करतात त्या क्षेत्रीं पांच रात्री वास केला असतां अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होतें, व जन्मांतरीं दुर्गती प्राप्त होत नाहीं. या जन्मीं मन इच्छित कामना पूर्ण होतात. जंबुमार्गा पासून तंदुलिकाश्रमीं जावें ह्मणजे मनुष्यास दुर्गती न होतां ब्रह्मलोक प्राप्त होतो. तेथून अगस्त्य नामक सरोवर आहे तेथें जावें तेथें त्रिरात्र उपोषणें करून पितर, देव यांचें पूजन केलें ह्मणजे अग्निष्टोमाचें पुण्य प्राप्त होतें. तेथून कण्वऋषी

ऱ्या आश्रमीं जाऊन धर्मारण्याचे ठायीं जावें. तेथें गेलें ह्मणजे सर्व पापा पार
न प्राणी मुक्त होतो. देव, पितर यांचें पूजन, परमित भक्षणें करून केलें असत
सर्व काम प्राप्ती होऊन यज्ञाचें पुण्य प्राप्त होतें. त्या आश्रमास प्रदक्षणा क
रून ययातीराजाचे स्थानीं जावें ह्मणजे अश्वमेधाचें फल प्राप्त होतें. तेथूनम
हा.कालास जावें तेथें कोटितीर्थ नामक एक तीर्थ आहे त्यास स्पर्श केला असतां
अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होतें. तेथून स्थाणूनामक तीर्थी जाऊन भद्रवटनामक
शिवलिंग जगत्रयामध्यें विख्यात आहे त्याचें दर्शन केलें असतां सहस्र गो
प्रदानें केल्याचें पुण्य प्राप्त होतें व महादेवाच्या प्रसादानें गणाचें आधिपत्य ही
मिळतें तेथून नर्मदा नामक महानदी त्रैलोक्यांत विख्यात आहे तेथें स्नानदा
नादि क्रिया करून देव व पितर यांचें तर्पण करावें ह्मणजे अग्निष्टोमाचें फ-
ल प्राप्त होतें नंतर दक्षणसिंधु नामक तीर्थी जाऊन ब्रह्मचर्यव्रतानें तेथें वा
स केला असतां अग्निष्टोमाचें फल प्राप्त होऊन अंतीं स्वर्गास जातो. तेथून-
चर्मण्वती नामक तीर्थी जाऊन नियताशन व्रत धारण केलें असतां रंतिदेवा
च्या आज्ञेनें अग्निष्टोम यागाचें फल प्राप्त होतें. हे भीष्मा, प्रभास नामक ती
र्थ जगत् विख्यात आहे तेथें अग्नि वास करतो, तेथें स्नान केलें असतां अ
ग्निष्टोम व अतिरात्र यागाचें पुण्य प्राप्त होतें. तेथून सरस्वती नदी समुद्रास
मिळाली आहे, तेथें स्नान व दान केलें असतां गोसहस्र दानाचें पुण्य प्राप्त-
होऊन स्वर्गलोकीं अग्नीसारखा प्रदीप्त होऊन राहातो. नंतर पंचनद नाम
क तीर्थ आहे तेथें नियताशन व्रत करून पंचमहायज्ञ नित्यशः करावे ह्म
णजे बहुत पुण्य प्राप्त होतें. तेथून भीमेचें स्थान बहुत उत्तम आहे तेथें स्ना
न केलें असतां दुसरे जन्मीं सुवर्ण कांती युक्त असा देवीचा पुत्र होतो आ
णि शतसहस्र गोप्रदान केल्याचें पुण्य प्राप्त होतें. अ. वि. अ. आहे.

८३ अध्याय त्र्यायशीं:— पुलस्त्य भाषण करतात हे भीष्मा, ती-
नलोकीं विख्यात कुरुक्षेत्र आहे त्याच्या दर्शनानें संपूर्ण प्राणी मुक्त होता
त. कुरुक्षेत्रीं मी जाईन, तेथें वास करीन असें जो बोलतो तो संपूर्ण पात-
का पासून मुक्त होतो. कुरुक्षेत्र संबंधी धूळ वायूनें जरी आपले अंगावर-
आली तथापि त्या योगें पातकी जन उद्धरून जातील. त्याच्या दक्षिणेस

सरस्वती आहे व उत्तरेस दृषद्वती आहे. असें जें कुरुक्षेत्र तेथें वास केला असतां स्वर्गीं वास होतो. सरस्वती तीरीं एकमास राहिलें असतां उत्तम लोक प्राप्त होतो. ज्या नदी तीरीं ब्रह्मादिदेव, ऋषि, सिद्ध, चारण, गंधर्व, अप्सरा, यक्ष, राक्षस बहुत दिवस पर्यंत रहात होते, या क्षेत्राचें मनामध्यें ही स्मरण केलें असतां पापापासून मुक्त होऊन ब्रह्मलोकीं जातो श्रद्धेनें कुरुक्षेत्रीं गेलें असतां राजसूय अश्वमेधाचें फल प्राप्त होतें असा कुरुक्षेत्राचा महिमा आहे. तेथून मचक्रुक नामक द्वारपालाचें महानगन आहे, तेथें यक्षास नमस्कार करावा. ह्मणजे गोसहस्त्र दानाचें फळ मिळतें. तेथून पंचनद तीर्थी गेलें असतां कोठि तीर्थ स्नानाचें फल प्राप्त होऊन हयमेध यागाचे फलाचा लाभ होतो. राजहंस तीर्थी स्नान केलें असतां गोसहस्त्र दानाचें पुण्य होतें. मुंजवटीं शिवाचें स्थान आहे तेथें एकरात्र वास केला असतां गाणपत्य लोक मिळतो. यक्षिणी तीर्थी स्नान केलें असतां मनेप्सित कामना सिद्ध होते, हें तीर्थ कुरुक्षेत्रीं जाण्याचें द्वार आहे ह्मणोन यास प्रदक्षिणा करून स्नानादि क्रिया कराव्या ह्मणजे अश्वमेध यागाचें फल आहे. तेथून रामव्हद तीर्थी जावें. तेथें परशुरामानीं संपूर्ण क्षत्रियांचा नाश करून बहुत दिवस वास केला आणि पांच व्हद उत्पन्न करून रुधिरानें पितरांचें तर्पण केलें ह्मणोन या तीर्थाचें नाव रामव्हद असें विख्यात झालें. परशुरामाचे पितर रक्ताच्या तर्पणानें संतुष्ट होऊन बोलले रामा, आह्मीं संतुष्ट झालों इच्छित वर माग. असें ऐकून परशुराम आकाशस्थ जे पितर यांस हात जोडून बोलला कीं, जर तुह्मांस अनुग्रह करावा अशी इच्छा आहे तर जें मी मागतों तें द्या. कोपें करून संपूर्ण क्षत्रियांचा मी नाश केला त्याचें पाप बहुत झालें. त्याचें निवारण तुमच्या प्रभावानें होवो आणि हे पांच व्हद मी केलेले तीर्थरूपी होऊन या पृथ्वीवर त्यांची ख्याती व्हावी. असें ऐकून परम कौतुकानें पितर बोलले हे रामा, तुझ्या तपाची वृद्धी असो. तूं क्षत्रियांचा नाश केलास त्या पापापासून मुक्त झालास. पापाचा स्पर्श तुला होणार नाहीं. हे संपूर्ण व्हद तीर्थत्व पावतील. जो यांत स्नान करून पितृतर्पण करील त्याचे पितर संतुष्ट होऊन ईप्सित वर देती

ल असें बोलून अंतरधान पावले. असें हें रामन्हद नामक तीर्थ परम वि-
ख्यात होय. या तीर्थीं परशुरामाचें पूजन करावें ह्मणजे बहुत सुवर्ण मि
ळतें व वंश मूलक तीर्थीं गेलें असतां स्ववंशाचा उद्धार ही होतो. तेथून काय
शोधन तीर्थीं स्नान केलें असतां शुद्ध शरीर होऊन उत्तम लोकीं वास होतो
लोकोद्धार नामक तीर्थीं गेल्यानें संपूर्ण लोकांचा उद्धार होतो, हें तीर्थ त्रैलो
क्यांत परम मान्य आहे व पूर्वी विष्णूनीं संपूर्ण जगताचा उद्धार या तीर्थीं
केला ह्मणोन या तीर्थाचें नाव लोकोद्धार असें पडलें. काशीश्वर तीर्थीं स्ना
न केलें असतां व्याधि निर्मुक्त होत्साता ब्रह्मलोकीं गमन होतें. मातृतीर्थीं
स्नान केलें असतां प्रजेची वृद्धी होऊन श्री प्राप्ती होते. शुक्लपक्षीं दशमीचे
दिवशीं पुंडरीक नामक तीर्थीं स्नान केलें असतां पुंडरीकनामक यागाचें पु-
ण्य प्राप्त होतें. सोमतीर्थीं स्नानानें सोमलोक प्राप्त होतो. सप्त सारस्वत ती
र्थ आहे तेथें मकण नामक एक परम विख्यात ऋषी वास करीत असतां कु-
शाग्र नामक ब्राह्मणानें येऊन ऋषीच्या हातास एक क्षत केलें व तो निघू
न गेला. नंतर या क्षता पासून शाकरसस्रवूं लागला हें पाहून मुनी हर्षानें
नृत्य करूं लागला. ब्रह्मादिदेव, ऋषी, गंधर्व तें नृत्य पाहून श्रीसांबास बो
लले कीं, हे भगवन्, ऋषीचे हस्तास क्षत झालें असतां त्याचें दुःख तो नमा
नितां नृत्य करतो तरीं त्याचा नृत्याची शांती होईल असें करावें. या प्रकारें
संपूर्णानीं श्री शंकराची प्रार्थना केली असतां श्री शंकर तत्काल ऋषीच्या-
सन्निध गेले आणि भाषण करूं लागले कीं, हे ऋषे, असा तुह्मांस काय हर्ष-
झाला? तुह्मी कशा करितां नृत्य करितां? असें ऐकून ऋषी बोलला आ-
ह्मीं तपस्वी धर्ममार्गामध्यें वास करणारे आह्मांस निरंतर आनंदच आ
हे. हें माझ्या हस्तास क्षत पडलें, त्यांतून शाकरस निरंतर स्रवतो हें पाहू
न आनंद झाला आहे. असें ऐकून शिव बोलले कीं, हे ऋषे, तुझें क्षत पाहू
न आह्मांस दुःख होतें, तुलाच हर्ष झाला हें काय? असें बोलून शिवानीं आ-
पल्या अंगुलीनें आपल्या अंगुष्ठास ताडण केलें तों शुभ्र भस्म निघालें तें-
असें कीं, त्याची खंड शर्करा झाली हें मुनीनें पाहतांच शिवास साष्टांग न-
मस्कार करून तो बोलला कीं, हे रुद्रा तुमच्या पेक्षां उत्तम देव मी कोणास

समजत नाहीं. संपूर्ण ब्रह्मादिदेव तुमच्या प्रसादें करून आनंद पावतात अशी स्तुती करून प्रार्थना करितो कीं, माझें तप क्षय न पावेल असें करा. हें ऐकून शिव बोलले हे विप्र, तुझ्या तपाची वृद्धी असो. तुझ्या आश्रमीं निरंतर मी वास करीन या सत्य सारस्वत तीर्थी माझें पूजन जे करतील त्यांस या लोकीं व परलोकीं दुर्लभ राहणार नाहीं असें ह्मणून शिव अंतर्धान पावले. हें तीर्थ तिन्हीं लोकांत विख्यात असून ब्रह्मादिदेव त्या तीर्थी निरंतर वास करतात. शिवाचा पुत्र कार्तिकेय तिन्हीकाल त्याच तीर्थी वास करतो त्या तीर्थी स्नान केलें असतां उत्तम लोक प्राप्त होतो. कपालमोचन तीर्थी स्नान केलें असतां सर्वपापा पासून मुक्त होतो. अग्नितीर्थी स्नान केलें असतां अग्निलोक प्राप्त होऊन संपूर्ण कुलाचा उद्धार होतो. तेथेंच विश्वामित्राचें तीर्थ आहे तेथें स्नान करावें ह्मणजे ब्राह्मण्य प्राप्त होतें, ब्रह्मयोनी नामक तीर्थी स्नान केलें असतां ब्रह्मलोक प्राप्त होऊन सप्त कुलाचा उद्धार होतो. सरस्वती आणि अरुणा या उभय नद्यांचा संगम त्रैलोक्यांत विख्यात आहे तेथें त्रिरात्र उपोषण केलें असतां ब्रह्महत्ये पासून मुक्त होतो आणि अग्निष्टोम व अतिरात्र ऋतूचें फल प्राप्त होऊन सप्त कुलाचा उद्धार होतो. रेणुका तीर्थी स्नान करून देवाचें अर्चन केलें असतां सर्वपापा पासून मुक्त होऊन अग्निष्टोम यागाचें फल प्राप्त होतें. पंचवटी तीर्थी ब्रह्मचारी व्रतानें वास करावा आणि शिवाची पूजा करावी ह्मणजे उत्तम लोक प्राप्त होतो. तैजस व वारुणी नामक दोन तीर्थे फार सर्वोत्तम आहेत तेथें ब्रह्मादि देवांनीं कार्तिकस्वामीस सेनापत्या भिषेक केला. त्या तीर्थी स्नान केलें असतां बहुत पुण्य प्राप्त होतें. कुरुतीर्थी स्नान केलें असतां ब्रह्मलोक प्राप्त होतो. स्वर्गद्वार तीर्थी नियताशन व्रतानें वास केला असतां ब्रह्मलोक प्राप्ती होते. गंगाह्रद कूप आहे तेथें तीन कोट तीर्थे आहेत ह्मणोन त्या तीर्थी स्नान केलें असतां स्वर्गलोक प्राप्त होतो. आपगे मध्यें स्नान करून महेश्वराची पूजा केली असतां गाणपत्य लोक प्राप्त होऊन संपूर्ण कुलाचा उद्धार होतो. सोमतीर्थी स्नान केलें असतां सोमलोक प्राप्त होतो. दधीची नामक ऋषीचें एक तीर्थ आहे तेथें पूर्वी सारस्वत, अंगिरा तप करीत होते ह्मणोन त्या तीर्थी स्नान केलें असतां अश्वमेधाचें फल प्राप्त होतें व सारस्वती गती त्या मनुष्यास प्राप्त होते. पृथ्वीवर नैमिष्यारण्य तीर्थ व-

आकाशांत पुष्कर तीर्थ हीं दोन तीर्थें संपूर्ण तीर्थांमध्यें श्रेष्ठ आहेत खरीं; परंतु याजपेक्षांही कुरुक्षेत्राचा महिमा बहुत आहे. ज्या क्षेत्र संबंधीं वायूनें धूळ उडून आपले अंगावर तिचा कण पडला असतां मोठमोठ्या दुःष्कृत्याच्या राशी नाशपावतात आणि अंत्यकालीं उत्तम गती होत्ये. दृषद्वतीच्या उत्तरेस आणि सरस्वतीच्या दक्षणेस हें कुरुक्षेत्र आहे. येथें जे निरंतर वास करतील त्याणी केवल स्वर्गांतच वास केल्या प्रमाणें आहे. कुरुक्षेत्रीं मी जाईन अथवा तेथें वास करीन असे जे आपल्या वाणीनें उच्चार करितात त्यांचीं संपूर्ण पातकें नष्ट होतात, या कुरुक्षेत्रास ब्रह्मवेदी असें ही ह्मणतात तेथें ब्रह्मऋषी निरंतर वास करतात मनुष्यानीं तेथें वास केला असतां शोक मोह इत्यादि दुःखें कधींही त्यास प्राप्त व्हावयाचीं नाहींत. आदिकरून अनेक तीर्थें पुलस्त्यानीं भीष्मास सांगितलीं. असा विषय या अध्यायांत आहे.

८४ अध्याय चवऱ्यायशीं.— पुलस्त्य भाषण करतात हे भीष्मा, यमधर्मानें तपश्चर्या करून धर्मतीर्थ ह्मणोन उत्पन्न केलें त्या तीर्थीं स्नान केलें असतां सप्त कुलाचा उद्धार होतो. धारातीर्थीं स्नान केलें असतां परम गती प्राप्त होऊन शोक प्राप्त होत नाहीं. तेथून महागिरीस नमस्कार करून स्वर्गद्वारा प्रमाणें गंगाद्वार ह्मणोन विख्यात आहे तेथें स्नान केलें असतां कोटितीर्थाचें पुण्य प्राप्त होतें आणि पुंडरीक यज्ञाचें फल प्राप्त होऊन कुलाचाउद्धार होतो. त्याच तीर्थीं एकरात्र वास केला असतां गोसहस्र दानाचें फल प्राप्त होतें. सप्त गंगा, त्रिगंगा व शक्रावर्त या तीन तीर्थीं देव व पितर यांचें तर्पण केलें असतां उत्तम लोक प्राप्त होतो. कनखल तीर्थीं तीन दिवस उपोषण केलें असतां अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होऊन स्वर्गलोकीं गमन होतें. तेथून कपिलावट तीर्थीं एक उपोषण केलें असतां सहस्र गोप्रदानाचें फल प्राप्त होतें. कपिल तीर्थीं स्नान केलें ह्मणजे सहस्र कपिला गाई दान केल्याचें पुण्य प्राप्त होतें. गंगा व यमुना यांचे संगमीं स्नान केलें असतां दाहा अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होऊन कुलोद्धार होतो. सुगंधी तीर्थीं स्नान केलें असतां पातकाचा नाश होऊन ब्रह्मलोकीं जातो. रुद्रावर्त तीर्थीं स्नान केलें असतां स्वर्ग लोक मिळतो. गंगा व सरस्वती यांच्या संगमीं स्नान केलें असतां अश्वमे-

धाचें फल मिळून स्वर्गलोकीं जातो. भद्र कर्णेश्वर महादेवाचें पूजन केलें असतां स्वर्गीं वास होतो. कुब्जाम्रक तीर्थीं स्नान केलें असतां सहस्त्रगोप्रदानांचें पुण्य प्राप्त होऊन स्वर्गलोक प्राप्त होतो. ब्रह्मावर्तीं गेलें ह्मणजे अश्वमेध यागाचें पुण्य प्राप्त होऊन सोमलोक प्राप्त होतो. नैमिष्यारण्या मध्यें जावें ह्मणजे सर्व पाप नष्ट होतें एकमास पर्यंत तेथें वास केला असतां पृथ्वी स्नानाचें फल त्यास प्राप्त होतें. त्या तीर्थीं स्नान केलें असतां यज्ञाचें फल प्राप्त होऊन सप्त कुलाचा उद्धार होतो तेथेंच उपोषणानें प्राणत्याग केलानर स्वर्गलोक प्राप्त होतो. सरस्वती तीर्थीं देव पितर यांचें तर्पण केलें असतां सारस्वत लोकांत गमन होतें, शरयू नामक नदी मध्यें गोप्रतार ह्मणोन तीर्थीं रामचंद्र भ्रात्यां सह वर्तमान देहत्याग करून स्वर्गास गेले यास्तव त्यातीर्थीं स्नान केलें असतां रामचंद्राच्या प्रसादानें स्वर्गलोकीं चिरकाल वास करतो. गोमती मध्यें रामतीर्थ आहे तेथें स्नान केलें असतां अश्वमेधयागाचें फल प्राप्त होऊन संपूर्ण कुलोद्धार होतो. कोटितीर्थीं कार्तिक स्वामीचे अर्चनानें गोसहस्त्र दानाचें फलप्राप्त होतें. वाराणशीस रुद्राचें अर्चन करावें व कपिलन्हदामध्यें स्नान करावें ह्मणजे राजसूयागाचें फलप्राप्त होतें. अविमुक्त तीर्थीं शंकराचें अर्चन केलें ह्मणजे ब्रह्महत्ये पासून मुक्त होतो, या तीर्थीं प्राणत्याग केला असतां मोक्ष प्राप्त होतो. गोमती व गंगा यांच्या संगमीं मार्कंडेय ऋषीचें तीर्थ परम दुर्लभ संपूर्णलोकांत विख्यात आहे तेथें गेल्यानें अग्निष्टोम यागाचें फलप्राप्त होऊन संपूर्ण कुलाचा उद्धार होतो. गयेस जाऊन ब्रह्मचारी व्रतानें वास केला असतां अश्वमेधयागाचें फल प्राप्त होतें, तेथेंच अक्षय्य वट तीन लोकांत विख्यात असा एक वृक्ष आहे तेथें पितरांच्या उद्देशानें जें दिलें तें अक्षय्य होतें व महानदीचे स्पर्शनानें देव, पितर यांचें तर्पण केलें असतां अक्षय्य लोक प्राप्त होऊन संपूर्ण कुलाचा उद्धार होतो. योनि द्वार नामक तीर्थ परम विख्यात आहे तेथें स्त्री अथवा पुमान कोणी गेलें असतां योनिसंकटा पासून मुक्त होतो. गयेस कृष्णपक्षीं व शुक्लपक्षीं जो वास करील त्याच्या सप्तकुलाचा उद्धार होईल. गौतम ऋषीच्या वनीं अहिल्यान्हद आहे तेथें स्नान केलें

असतां आत्मस्वरूप ज्ञान होतें. उदयान तीर्थ तीनलोकांत विख्यात आहे ते- थें स्नानानें राजमेध यागाचें फल प्राप्त होतें. गंडकीतीर्थीं स्नान केलें असतां वाजपेय यागाचें फल प्राप्त होऊन सूर्यलोकीं गमन होतें. पुष्करणी नामक एक देवाचें तीर्थ आहे तेथें स्नान केलें असतां अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होतें. सोमपदतीर्थीं जाऊन ब्रह्मचारीव्रतानें महेश्वरतीर्थीं स्नान करावें ह्मणजे वाजिमेधाचें फल प्राप्त होतें. नारायण ह्मणोन एक स्थान आहे तेथें निरंतर विष्णू वास करितात तेथें संपूर्ण देव, ऋषी, आदित्य, वसू व रुद्र नारायणाची पूजा करितात. यास्तव तेथें विष्णुचें अर्चन केलें असतां अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होईन विष्णुलोकीं वास होतो. वामन तीर्थीं जाऊन हरीचें पूजन केलें असतां दुर्गती प्राप्त होत नाहीं. धर्मतीर्थीं स्नान केलें असतां वाजपेय यागाचें पुण्य प्राप्त होतें. चंपा नामक तीर्थीं स्नान करून भागीरथीस येऊन स्नान करावें ह्मणजे संपूर्ण पातकांच्या दंडापासून मुक्त होऊन गोसहस्र दानानें फल त्यास प्राप्त होतें. आदिकरून अनेक तीर्थें या अध्यायांत सांगितलीं आहेत. असा विषय या अध्यायांत आहे.

८५ अध्याय पंचायशीं:- पुलस्त्य भाषण करतात हे भीष्मा, नंतर संवेद्यनामक तीर्थांत संध्याकालीं आचमन केल्यानें विद्यालाभ होतो. पूर्वीं रामचंद्राच्या प्रभावें करून लौहित्य नामक तीर्थ उत्पन्न जाहालें त्या तीर्थीं वास केला असतां बहुत सुवर्ण प्राप्त होतें. करतोया नामक नदी तीरीं तीन दिवस उपोषण केलें असतां अश्वमेधयागाचें पुण्य प्राप्त होतें, असें ब्रह्मदेवानीं कथिलें आहे. गंगा सागर संगमीं स्नान केलें असतां एक अश्वमेधाच्या दशगुणीत पुण्य लागतें असें ऋषीनीं कथिलें आहे. गंगेच्या परतीरीं जाऊन त्रिरात्र वास करून स्नान करतो तो सर्व पापापासून मुक्त होतो. वैतरणी नामक नदी सर्वपापाचा क्षय करणारी आहे तेथें स्नान करून नंतर वीरज नामक तीर्थामध्यें स्नान केल्यानें चंद्रासारखी कांती होते व सप्तकुलाचा उद्धारही होतो. शोण आणि ज्योतिरथ्या नामक नदीच्या संगमी स्नान करून देव व पितर यांचें तर्पण केलें असतां अग्निष्टोमाचें फल प्राप्त होतें. शोण आणि नर्मदा या दोन नद्यामध्यें वंशगुल्म नामक तीर्थ आहे त्या तीर्थास स्पर्श केला असतां वाजपेय यागाचें पुण्य प्रा

स होतें. पुष्पवती नामक तीर्थ आहे, तेथें त्रिरात्र उपोषण केलें ह्मणजे गोसहस्र दानाचें पुण्य प्राप्त होऊन आपलें स्वकुल पवित्र होतें. बद्रिकातीर्थी स्नान केलें असतां आयुष्याची वृद्धी होऊन स्वर्गलोकीं जातो. चंपावनीस जाऊन भागीरथीस जावें आणि भागीरथीहून दंडारव्य नामक तीर्थी जावें ह्मणजे गोसहस्र दानाचें पुण्य प्राप्त होऊन स्वर्गलोक प्राप्त होतो. गोकर्ण नामक तीर्थ तीन लोकांत परम विख्यात समुद्राच्या मध्यभागीं आहे त्या तीर्थी ब्रह्मादिक देव, तपोधन, ऋषि, भूत, यक्ष, पिशाच, गंधर्व, सरिता इत्यादि उमापतीची उपासना करितात ह्मणोन त्या तीर्थी त्रिरात्र उपोषण करून शिवाचें पूजन केलें असतां अश्वमेध यागाचें पुण्य प्राप्त होऊन गाणपत्य लोक प्राप्त होतो व द्वादशवर्षे तेथें वास केला असतां आत्मा शुद्ध होतो. तेथेंच एक गायत्रीचें स्थान आहे तेथें त्रिरात्र वास केल्यानें गोसहस्र दानाचें फल प्राप्त होतें. वेण्णा नामक तीर्थी त्रिरात्र उपोषण करून वास केला असतां हंसयुक्त विमानारूढ होऊन स्वर्गास जातो. गोदावरीमध्यें स्नान केलें असतां शंभर गोप्रदान केल्याचें पुण्य लागून शेवटीं वासुकीचा लोक त्यास प्राप्त होतो. वेण्णेच्या संगमीं स्नान केलें असतां वाजीमेध यागाचें फल प्राप्त होतें. वरदा संगमीं स्नान केलें असतां गोसहस्र दानाचें फल प्राप्त होतें. ब्रह्मस्थानीं त्रिरात्र उपोषण केलें असतां गोसहस्र दानाचें फल प्राप्त होऊन स्वर्गलोकीं वास होतो. कुशप्लवन तीर्थी ब्रह्मचर्य व्रत धारण करून त्रिरात्र वास केला असतां अश्वमेध यागाचें फल प्राप्त होतें सर्वन्हद नामक तीर्थी स्नान केलें असतां गोसहस्र दानाचें पुण्य प्राप्त होऊन स्वर्गलोक प्राप्त होतो. दंडकारण्यांत स्नान केलें असतां गोसहस्र दानाचें फल प्राप्त होतें. परशुरामानीं सेवित शूर्पार नामक तीर्थ आहे तेथें स्नान केलें असतां बहुत सुवर्ण प्राप्त होतें. सप्तगोदावरी तीर्थी नियताशन व्रतें करून स्नान केलें असतां बहुत पुण्य प्राप्त होऊन देवलोकीं वास होतो. देवपथीं नियताशनें करून वास केला असतां देवसत्र यागाचें पुण्य प्राप्त होतें. संपूर्ण गिरींमध्यें श्रेष्ठ जो चित्रकूट नामक पर्वत तेथें जाऊन मंदाकिनी नामक नदीमध्यें स्नान करून देव व पितर यांचें तर्पण केलें असतां अश्वमेध यागाचें फल प्राप्त होऊन उत्तम गती प्राप्त होत्ये. तेथून शृंगवेर नामक मोठें नगर आहे त्यां

नगरा मध्यें पूर्वी दाशरथी रामानी वास केला होता त्या पुरांतील तीर्थांत स्नान केलें असतां पापा पासून मुक्त होतो. शृंगवेर पुरा पासून पुढें गंगा आहे तेथें ब्रह्मचर्यव्रत धारण करून स्नान केलें असतां वाजपेय यागाचें फल प्राप्त होतें. मुंजवटीं शिवाचें स्थान आहे तेथें जाऊन शिवास प्रदक्षिणा केल्या असतां गाणपत्य लोक प्राप्त होतो. प्रयाग तीर्थी जेथें संपूर्ण ऋषी, ब्रह्मादिदेव, लोकपाल, पितर, सन्नतकुमार, अंगिराप्रभृति ब्रह्मऋषी, नाग,सूपर्ण, अप्सरा, गंधर्व, हे संपूर्ण वास करितात आणि भगवान् हरीही रहातात. तेथें तीन कुंडें आहेत त्यांमध्यें एक कुंडांत जान्हवी, एक कुंडांत यमुना व एक कुंडांत जान्हवीचा व यमुनेचा संगम होऊन मध्यें जी पृथ्वी राहिली त्यास पृथ्वीचें जघन असें ह्मणतात; हेंच प्रयाग स्थान असें संपूर्ण ऋषीनीं वर्णिलें आहे येथें संपूर्णमूर्तीमंत च्यारी वेद ब्रह्मदेवाची उपासना करतात निरंतर ब्रह्मवेत्ते ऋषि व इतर राजे यज्ञयागादि क्रिया करतात ह्मणोन हें प्रयागतीर्थ सर्व तीर्था मध्यें अति उत्तम आहे येथें गमन केल्यास अथवा नाम उच्चारण केल्यास तो प्राणी मृत्यूच्या भया पासून मुक्त होतो. संगमीं स्नान केलें तर राजसू अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होतें ही सर्व देवांची यज्ञभूमी येथें किंचित् ही दान केलें असतां बहुत दान केलें असें होतें, येथें प्राण त्याग केला असतां मोक्ष प्राप्त होतो. येविषयीं वेदवाक्यादि प्रमाणें आहेत. भोगावती नामक वासुकीचें तीर्थ आहे तेथें स्नान केलें असतां अश्वमेध यागाचें फल प्राप्त होतें. तेथेंच हंस प्रपतन तीर्थ विख्यात तसेंच दशाश्वमेधिक ह्मणोन तीर्थ परम विख्यात आहे तेथें स्नान केलें असतां बहुत पुण्य प्राप्त होतें. कृतयुगीं सर्व तीर्थें, त्रेतायुगीं पुष्कर तीर्थ, द्वापारीं कुरुक्षेत्र हीं पुण्यकारक होतील. कलियुगीं गंगेची फारख्याती होईल. आतां पुष्कर, कुरुक्षेत्र, गंगा, मगध देश इत्यादिकांच्या ठायीं गंगेमध्यें स्नान केलें असतां सप्त कुलाचा उद्धार होऊन बहुत पुण्य प्राप्त होतें; ज्या प्राण्याच्या अस्थि जोंपर्यंत गंगे मध्यें राहतात तों पर्यंत तो प्राणी स्वर्गलोकीं वास करतो जितकीं पुण्यस्थानें आहेत त्यांचें सेवन करून जें पुण्यप्राप्त होतें तितकेंच फल गंगास्नानानें प्राप्त होतें. गंगे सारखें तीर्थ नाहीं. केशवा सारखा देव ना

हीं व ब्राह्मणा पेक्षां दुसरा कोणी श्रेष्ठ नाहीं असें ब्रह्मदेव ह्मणतात. जेथें गंगा आहे त्यास तपोवन असें ह्मणतात गंगेच्या कांठीं जी जागा त्यास सिद्धिक्षेत्र असें ह्मणतात; ब्राह्मण, साधु, पुत्र, मित्र व शिष्य त्यांस जप सांगावा तो असाकीं, हें धन्य, हेंच पवित्र, हेंच स्वर्गप्रद असें या महात्म्याचें पठण केल्यानें स्वर्ग प्राप्त होतो. हे भीष्मा, पुण्यकारक, धर्मकारक महर्षींचें गुह्य, सर्वपापाचें नाश करणारें, स्वर्गकारक, शत्रूचें नाश करणारें, असें हें तीर्थ वंशानु कीर्तन अपुत्री जो याणें श्रवण केलें असतां त्यास पुत्र प्राप्त होतो. अधनिकास धन प्राप्त होतें. राजानें पठण केलें असतां तो सर्व पृथ्वी जिंकितो. वैश्यानें पठण केलें असतां द्रव्य प्राप्ती होते. शूद्रानीं श्रवण केलें असतां इच्छित कामना पूर्ण होतात. जो श्रवण करतो तो आपल्या जातीस स्मरून उत्तम लोकीं जातो आतां जीं तीर्थें गमना सारखीं आहेत तेथें गमन करावें व जीं गमन करण्यास अयोग्य त्यांचें मनें करून स्मरण करावें. अष्टवसु, आदित्य, साध्य, देव, मरुत् व अश्विनी कुमार इत्यादिकानीं यातीर्थी स्नानें केलीं आहेत. तूं त्यां प्रमाणें तीर्थयात्रा करून स्नानें कर ह्मणजे बहुत पुण्य तुला प्राप्त होईल. ज्याचें भावित अंतःकरण आस्तिक बुद्धी व तीर्थ दर्शनाची इच्छा असे तीन हेतु असलेतर तीर्थफलाची प्राप्ती होते, नाहींतर होतनाहीं. व्रतावांचून व आत्म नियमा वांचून जर स्नानें केलीं तर व्यर्थ होतात याकरितव तूं तीर्थस्नानें करण्यास योग्य आहेस. मी जीं तुला तीर्थें कथन केलीं त्या तीर्थी जाऊन स्नानदानादि केलें असतां तुझ्या धर्मे करून सकल पितर तृप्त होतील व तुला कीर्तीही प्राप्त होईल. नारद भाषण करतात हे धर्मराजा, अशी कथा पुलस्त्यऋषीनीं भीष्मास सांगून ते तेथेंच अंतरधान पावलेनंतर भीष्मानीं आपल्या स्थानीं जाऊन पुलस्त्यऋषीनीं सांगितल्या प्रमाणें तीर्थयात्रा केली. भीष्मा पेक्षां हे राजा तुला अष्टगुणित तीर्थयात्रेचें फल प्राप्त होईल याचें कारण प्रस्तुत सर्व तीर्थें राक्षसानीं व्याप्त झाह्लीं आहेत, तूं गमन केलें असतां तुजसमागमें जे ऋषी येतील त्यांचें संरक्षण तूं केलेंस ह्मणजे पुण्य प्राप्त होईल. वाल्मिक, कश्यप, अत्रेय, कुंड, जठर, विश्वामित्र, गौतम, असित, देवल, मार्कंडेय, गालव, भरद्वाज, वसिष्ठ, उद्दालक,

शौनक, पुत्रांसहवर्तमान व्यास, दुर्वास, जाबालि, तुझी वाट पहात आहेत. त्यांसहवर्तमान तूं गमन कर. तुला मार्ग दाखविण्याकरितां लोमेश ऋषी येतात. मीही बराबर येईन येणें करून पूर्वी शांतनु, ययाती, पुरूरवा, भगीरथ, रामचंद्र, मनु, इक्ष्वाकु, पुरु, वैनय, हे जसे परम ख्यातीनें पावले तसा तूंही होशील. इंद्रानें तीर्थ यात्रा करून तीर्थांच्या पुण्य प्रभावानें सर्वशत्रूंचा क्षय करून जसें त्रैलोक्याचें रक्षण केलें तसें तूंही तीर्थांच्या पुण्यप्रभावानें सर्वशत्रूंचा क्षय करून उत्तम प्रकारें प्रजेचें पालन करशील. या प्रकारें नारद धर्मराजास सांगून व त्याचें शांतवन करून गेले असतां आपण केव्हां तीर्थ यात्रेस जाऊं- याचें चिंतन करीत धर्मराज स्वस्त बसला. असा विषय या अध्यायांत आहे.

८६ अध्याय शायशीं:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, नंतर युधिष्ठिर धौम्यास बोलतात हे धौम्य, अस्त्र प्राप्ती करितां अर्जुनास स्वर्गी पाठविला तो अद्याप कां येतनाहीं? अर्जुन मोठा पराक्रमी व तपस्वी युद्धामध्यें वासुदेवा समान आहे, कृष्णा व अर्जुन या उभयतांमध्यें कांहीं भेदनाहीं. असें व्यासानीं पूर्वींच मला सांगितलें. कृतयुगीं जे नरनारायण ते द्वापारीं कृष्णार्जुन हे नाम पावतील असें नारदानीं मला सांगिलें आहे. अर्जुनाच्या पराक्रमावरून मी जाणिलें कीं; कृष्णार्जुन यांमध्यें कांहीं भेदनाहीं; परंतु धृतराष्ट्र पुत्रानीं भीष्म, द्रोण प्रभृति योद्धे आपल्यास वश करून घेतले आहेत त्यांसह वर्तमान अर्जुनाच्यानें युद्ध व्हावयानें नाहीं असें समजून मीत्यास अस्त्रविद्या संपादन करण्या करितां इंद्रलोकीं पाठविला तो अद्याप कां येत नाहीं? संपूर्ण धृतराष्ट्राकडील योद्धे शूर व शस्त्रास्त्र विद्येमध्यें निपुण आहेत त्यांच्याशीं अर्जुना वांचून आमच्यानें युद्ध करवणार नाहीं. तो कर्ण, दिव्यास्त्रें जाणणारा त्याच्या बाणापासून अग्नि उत्पन्न होऊन आमच्या सैन्याचा नाश होईल. त्या अग्नीचें शांतवन करण्या करितां श्वेत वाजी युक्त जो रथ त्यामध्यें आरोहण करणारा पार्थ पाहिजे त्या शिवाय कर्ण बाणाची शांती व्हावयाची नाहीं. ज्या- अर्जुनाच्या जीवितानें आह्मी संपूर्ण जीवित पावतों तो अर्जुन आह्मांस अद्याप कां भेटत नाहीं! स्वर्ग लोकीं इतके दिवस त्यास कां लागले याचें कारण काय हें आह्मांस कळत नाहीं. हे धौम्या, आतां या काम्यक वनीं नर अर्जुना वांचू

न राहण्यास मी इच्छित नाहीं याजकरितां फलमूलांनीं युक्त, सुंदर ज्यां मध्यें सरोवरें नाना प्रकारचे वृक्ष, महान् ऋषींचे आश्रम व मोठ मोठे पर्वत, असें एखादें चमत्कारिक वन शोधून काढा ह्मणजे त्या वनांत जाऊन यथेच्छ वास करूं लोक जसे पर्जन्याची इच्छा करितात तशी आह्मीं अर्जुनाची इच्छा करतों, त्यावांचून आतां मला दुसरें कांहींच सुचत नाहीं. असा विषय या अ. आहे.

८७ अध्याय सत्यायशीं.— वैशंपायान सांगतात हे जनमेजया, काम्यकवनाचा त्याग करून इतर वनीं वास करण्या विषयीं पांडवांची उत्कंठा अवलोकून धौम्य बोलला हे महाराज, ब्राह्मणाच्या अनुमतें पुण्यकारक, गमन करण्यास योग्य, असे आश्रम, तीर्थें, दिशा व पर्वत यांचें निरूपण करतों कारण त्यांचे श्रवणानें तूं विशोक होशील, ही प्राची दिशा परम पवित्र व ऋषींस सेवित आहे याच दिशेस नैमिषारण्य, गोमती, देवांची यज्ञ भूमी ह्मणोन एक स्थान, गयपर्वत, ब्रह्मदेवाचें सरोवर, गंगा आणि यमुना यांचा संगम, अगस्त्य ऋषीचा आश्रम, हिरण्य बिंदु नामक सरोवर, कुरुक्षेत्र, कुंडोदपर्वत, जेथें पूर्वी नल राजा तृषेनें श्रांत झाला असतां जल प्राशन करून तुष्ट झाला. देव वन या नामें करून एक अरण्य याच पर्वतावर आहे. बाहुदा नदी, हीं संपूर्ण तीर्थें व पर्वत पूर्व दिशेकडील सांगितले. असा विषय या अध्यायांत आहे.

८८ अध्याय अठ्यायशीं.— धौम्य भाषण करतात हे राजा, दक्षिण दिशेस जीं पुण्य कारक तीर्थें आहेत त्यांचें यथामती कथन करतों. गोदावरी, वेण्णा, भीमा, पयोष्णी, विषाण नामें करून स्थान, माठर नामक सूर्याचा पारिषद त्याचें एक उत्तम वन, श्रोतस पर्वतीं वरुणाचा यज्ञयूप, अगस्त्य व वारुण तीर्थ, ताम्रपर्णी नदी, गोकर्ण क्षेत्र, चामसोद्भेदन व प्रभास क्षेत्र, पिंडार तीर्थ, उज्जयंत पर्वत, द्वारका क्षेत्र इत्यादि तीर्थें, क्षेत्रें, स्थानें, पर्वत हीं परम विख्यात आहेत. असा विषय या अध्यायांत आहेत.

८९ अध्याय एकुणनव्वद.— धौम्य भाषण करतात हे धर्मराजा, पश्चिम दिशेस अवंती देशामध्यें तीर्थें, देवाल्यें, नद्या, पर्वत, ऋषींचे आश्रम आहेत ते तुला सांगतों. पश्चिम वाहिनी नर्मदा नदी, विश्रवा ऋषीचें स्थान आहे तेथेंच पूर्वी कुबेर उत्पन्न झाला, वैडूर्य शिखर, ह्रदिनी नदी;

विश्वामित्री नदी तिच्या तीरीं ययाती देहपात करून स्वर्गलोकीं गेला, त्याच नदीच्या तीरीं पुण्य-ह्रद, मैनाक पर्वत, असित पर्वत, कक्षसेन व च्यवन यांचे आश्रम, जंबुमार्ग यानामें करून ऋषीचा पथ आहे. केतुमाला, मेध्या, गंगाद्वार स्थानद्वया, सैंधवारण्य, पुष्करतीर्थ हीं सर्व पश्चिम दिशेस आहेत. असा विषय या अध्यायांत आहे.

९० अध्याय नव्वद.— धौम्य भाषण करतात हे धर्मराजा, उत्तर दिशेस जीं पुण्य कारक तीर्थें आहेत तीं सांगतों. सरस्वती, यमुना तिच्या तीरीं प्लक्षावतरण एक तीर्थ आहे तेथें सारस्वत नामक ब्राह्मणानें यज्ञामध्यें पूर्वी अवभृत स्नान केलें होतें. अग्निशीर तीर्थ आहे तेथेंच सृंजयाचा पुत्र जो सहदेव याणें अग्नीची उपासना बहुत केली. याच तीर्थी भारत राजानें तीनशें हयमेध पूर्वी केले होते. शरभंग नामक ऋषीचा आश्रम, सरस्वती यानामें करून नदी, दृषद्वती नदी तिच्या तीरीं नर नारायणाचा आश्रम, जमदग्नि नामें ऋषीचा आश्रम त्या दिशेसच आहे त्या आश्रमीं पूर्वी जमदग्नि ऋषीनीं याग केला त्याकाळीं संपूर्ण नद्या आप आपलीं जलें घेऊन ऋषीस स्नान घालण्या करितां शरीरासहवर्तमान आल्या होत्या, किरात किन्नरावास पर्वत, गंगाद्वार, कनखल तीर्थ, पुरुनामा पर्वत आहे तेथें पुरुरव्यास दुसरा जन्म झाला. भृगुतुंग, बदरी आश्रम त्याच्या समीप भागीं गंगा पूर्वी शीततोया होती; परंतु सांप्रत उष्ण तोया वाहाते त्या नदींत सुवर्ण वालुका आहे, हजारों ऋषी, मोठमोठे तपस्वी, भगवान् नारायण यांचें ध्यान करून कालक्रमण करतात. ज्या स्थळीं परमात्मा आदि नारायण वास करतो तेथें संपूर्ण तीर्थें निरंतर वास करतात. ज्या भगवंताचें ज्ञान झालें असतां विद्वान् शोक पावत नाहींत, संपूर्ण ऋषी ज्या भगवंताच्या सन्निद्ध वास करतात तो भगवान् या बद्रिकाश्रमीं आहे; हे राजा, संपूर्णतीर्थें मी तुला सांगितलीं त्यांच्या कीर्तनें करून सर्वपाप मुक्त होशील. हीं तीर्थें वसु, साध्य, आदित्य, मरुद्गण व ऋषि यानीं निरंतर सेवित आहेत ह्मणोन राजा तूंही आतां ब्राह्मण, भ्राते व द्रौपदी यांसह वर्तमान तीर्थ पर्यटन कर ह्मणजे निष्पाप होऊन तुझी कार्यसिद्धी लौकरच होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

९१ अध्याय एक्यांणव.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धौम्याचें व धर्मराजाचें तीर्थ यात्रे विषयीं संभाषण चाललें आहे तों लोमश ऋषि राजास भेटण्या करितां काम्यक वनीं आले त्यांस धर्मराजानें पहातांच तत्काल अग्रभागीं जाऊन ऋषीस आपले सन्निध आणिलें आणि पूजा करून येण्याचें कारण विचारिलें. त्याकालीं लोमश हर्षित होऊन बोलले हे राजा, स्व इच्छे करून मी फिरतां फिरतां शक्रलोकीं गेलों तेथें तुझा भ्राता जो अर्जुन यास इंद्राच्या अर्धासनीं बसलेला पाहून परम विस्मय पावलों; तेव्हां इंद्र बोलला कीं, हे ऋषे, अर्जुनाचा वृत्तांत तुह्मीं धर्मराजास जाऊन संपूर्ण सांगा ह्मणून तुझ्या दर्शना करितां येथें आलों. हे संपूर्ण ऋषी बसले आहेत यांचे समक्ष अर्जुनाचा वृत्तांत तुला सांगतों. ज्या कार्यास अर्जुनास स्वर्गी पाठविलास तें कार्य अर्जुनानें संपादन केलें. ब्रह्मशर अस्त्र अमृता पासून उत्पन्न झालेलें प्रयोग व संहार यांचे मंत्रा सहित शिवानीं त्यास दिलें. दुसरीं ही बहुत अस्त्रें इंद्र, कुबेर, वरुण याणीं दिलीं. संपूर्ण शस्त्रास्त्र विद्ये मध्यें अर्जुन पराकाष्ठेचा निपुण झाला. तशीच गीत, वाद्य, नृत्य विद्या चित्र सेना पासून-अर्जुनास मिळाली. अर्जुन संपूर्ण शस्त्रास्त्र विद्येमध्यें निपुण होऊन स्वर्गलोकीं सुखानें वास करतो असें इंद्रानें मला तुला सांगण्यास सांगितलें आहे. नंतर अर्जुन ही बोलला कीं, तुमचें मनुष्य लोकीं गमन होईल त्यापेक्षां तुह्मीं माझा निरोप राजास सांगावा कीं, तुझा भ्राता अर्जुन कृतास्त्र होऊन लौकरच भूमंडळीं येईल. तूंही आतां मोठें तप कर तपासारखें पुण्य या पृथ्वीवर दुसरें कोणतें नाहीं, तुला कर्णा पासून बहुत भय झालें होतें तें आतां टाकून दे. कर्ण जरी सत्य पराक्रमी, बलवान, अप्रतीम धनुष्य धारण करणारा व युद्धविशारद आहे तथापि मी समरामध्यें उभा राहिलों असतां माझ्या पुढें त्याचें कांहीं चालणार नाहीं त्यानें हनन युद्धामध्यें मीच निश्चयें करून करीन. तुझा मनांत तीर्थ यात्रा करण्याची इच्छा उत्पन्न झाली आहे त्यास हे लोमश ऋषी आले आहेत ते संपूर्ण तीर्थांचें फल तुला सांगतील त्यांजवर श्रद्धा ठेव. असा विषय या अध्यायांत आहे.

९२. अध्याय ब्याण्णव.- लोमश भाषण करितात हे धर्मराजा,

असा निरोप धनंजयाचा सांगितला पुढें त्याणें मला सांगितलें कीं, हे ऋषे, संपूर्ण धर्म तुह्मीं जाणतां व राजधर्मही तुह्मांस ज्ञात आहेत यास्तव भ्रात्यां सहवर्तमान धर्मराज संपूर्ण तीर्थयात्रा करून ब्राह्मणांस बहुत गोप्रदानें देईल अशी योजना करून मार्गामध्यें मोठमोठीं संकटें आलीं असतां त्यां चें निवारण करीतजा. जसें पूर्वी दधीची नामक ऋषीनीं इंद्राचें संरक्षण केलें व अंगिरा ऋषीनीं रवीचें संरक्षण केलें तसें तूं लोमशा, तीर्थयात्रेच्या-मार्गामध्यें पर्वतासारखे जे भयंकर राक्षस यांजपासून धर्मराजाचें संरक्षण कर. असें सांगितल्यानंतर इंद्राच्या व अर्जुनाच्या आज्ञेंवरून येथें आलों. संपूर्ण भयापासून मी तुझें रक्षण करीन. पूर्वी दोनवेळ संपूर्ण-पृथ्वीवरील मी तीर्थयात्रा केल्या आतां तिसऱ्यानें तुजसह वर्तमान तीर्थ-यात्रेस येतों. मनवादिकानीं तीर्थयात्रेचें वर्णन बहुत केलें आहे, तीर्थयात्रा केल्या असतां अनंत पुण्य प्राप्त होतें. जो कुटिल, मूर्ख, पापी, अविवेकी आहे त्याणें तीर्थामध्यें स्नान केलें असतां त्यास तीर्थाचें फलप्राप्त होत नाहीं. तूं तर राजा, धर्ममती, धर्मज्ञ, सर्वसंग परित्यागी आहेस. संपूर्ण तीर्थांचें फल तुला प्राप्त होईल. असें ऐकून धर्मराज भाषण करतो हे ऋषे, तुमचें भाषण ऐकून मी परम हर्षित झालों तुमच्या भाषणावर आतां कांहीं उत्तर देण्याचें मला सूचतनाहीं. माझा भ्राता इंद्रलोकीं वास करतोव इंद्राची कृपा त्याजवर पूर्ण आहे, इंद्रानें वारंवार माझें स्मरण करून अर्जुनाविषयीं मलानिरोप सांगण्यास सांगितला तेव्हां मजपेक्षां भाग्यशाली कोण आहे. आतां तुजसहवर्तमान मी तीर्थयात्रा करण्यास सिद्ध आहें. पूर्वी धौम्याचे वचनावरून तीर्थास जाण्याविषयीं बुद्धी धारण केलीच होती तों तुह्मीं येऊन मला तीर्थयात्रेस जाण्याविषयीं अर्जुनाचा निरोप सांगितला, आतां तर माझी बुद्धी तीर्थयात्रेस जाण्याविषयीं निश्चित झाली. असें ऐकून लोमश बोलतात राजा, इतका परिवार समागमें घेऊंनको. असें ऐकून धर्म बोलतो हे ऋषी, जे क्षुधा, तृषा न सहन करणारे असतील त्याणीं द्रुपदाचे अथवा धृतराष्ट्राचे गृहीं वास करावा, ते तुमचें उत्तम प्रकारें पोषण करितील. असें ऐकून ते ब्राह्मण हस्तनापुरीं गेले.

व त्यांचा धृतराष्ट्रानें सांभाळ केला. नंतर कांहीं ब्राह्मण व लोमश यां सहवर्तमान त्रिरात्र धर्मराज काम्यकवनीं राहिला. अ॰ वि॰ या अ॰ आहे:

९३ अध्याय त्यांत:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुसरे दिवशीं प्रातःकाळीं धर्मराज यात्रेस निघाला तों कांहीं ब्राह्मण बोलले हे राजा, या पृथ्वीवर उत्तम प्रकारचीं पुण्यकारक तीर्थें, आयतनें, क्षेत्रें, पर्वत आहेत त्यांचें दर्शन तुझ्या योगानें आह्मांस घडेल तस्मात् आमचा त्याग तूं करूं नको, तुझे भ्राते धनुर्धारी व पराक्रमी समागमें आहेत तेव्हां श्वापदांचें भय आह्मांस किमपि होणार नाहीं व अगम्य जे देश आहेत त्यांचें दर्शन तुमच्या योगें करून आह्मांस सहज होईल. जर तुझी ब्राह्मणावर भक्ती आहे तर आमचा त्याग करूं नको. आमच्या वचनाचा अंगिकार केलास तर संपूर्ण विघ्नांचें निवारण होऊन मोठ्या कीर्तीस पावशील. असें ऐकतांच त्यानें बरें म्हटलें तेव्हां राजाच्या नेत्रांतून अश्रुपात होऊं लागले. नंतर भीमसेनादि भ्राते यां सहवर्तमान धर्मराज तीर्थयात्रेस जाण्याची सिद्धता करून लोमश ऋषीस बोलला हे ऋषे, आह्मीं जाण्याची सिद्धता केली आतां सत्वर चलावें. इतक्यांत काम्यकवनीं व्यास, नारद, पर्वत व ऋषी राजाच्या भेटी करितां आले असतां धर्मराजानें यथाविधी त्यांची पूजा केली. नंतर व्यासादि ऋषी भाषण करूं लागले कीं, हे राजा, भ्राते व द्रौपदी यां सहवर्तमान मन शुद्ध करून नंतर जाण्याची सिद्धता करावी ह्मणजे तीर्थांचें समग्र फल प्राप्त होईल. शरीर नियम व मन बुद्धियांची शुद्धता करावी यासच दैव असें ह्मणतात. अदुष्ट मन असून बुद्धीची मैत्री की असावी ह्मणजे लौकर तीर्थ फलाची प्राप्ती होते. असें ऐकतांच द्रौपदी सहवर्तमान राजानें ब्राह्मणांची पूजा करून त्यांजपासून आशीर्वाद घेतले आणि व्यास व नारद यांचें पादाभिवंदन केलें नंतर मार्गशीर्ष पौर्णिमा झाल्यावर धौम्य पुरोहित, लोमश ऋषी, इतर ब्राह्मण, भ्राते व द्रौपदी यां सहवर्तमान धर्मराज जटा अजिनें व कवचें धारण करून पुष्य नक्षत्र योगीं काम्यकवनापासून पूर्वेस मुख करून तीर्थ यात्रेस निघाला असतां इंद्रसेनादि भृत्य तसेच आचारी व पाणके समागमें बहुत निघाले. असा विषय या अध्यायांत आहे.

९४ अध्याय चवऱ्यांणव.— धर्मराज लोमशास बोलतात हे ऋषे, उत्तम प्रकारचे गुण व तप ईहीं करून युक्त असतां जसें मला दुःख झालें तसें कोणास ही झालें नसेल. अधर्मानें चालणारे गुणहीन व क्रियाहीन धृतराष्ट्र पुत्र बहुत सुखाचा अनुभव घेतात याचें कारण काय? असें ऐकून लोमश बोलतात हे. धर्मराजा, याविषयीं तूं कांहीं खेद मानूं नको. अधर्मानें जे वृद्धी पावले ते तुला वर्तमान कालीं सुखी असे वाटतात, परंतु अधर्म वृद्धीनें लौकरच नष्ट होतील. मी ही बहुत दैत्य दानव अधर्मानें वृद्धिंगत होऊन क्षयास गेलेले पाहिले. पूर्वी देव युगीं असुरानीं अधर्माचा अवलंब करून तीर्थें व देव यांचा त्रास केला. देवानीं तीर्थें व सरोवरें यांजवर विश्वास ठेविला ह्मणजे कालें करून युद्धां मध्यें देवांचा जय झाला व असुरांचा पराजय झाला. असुरांस अधर्मकृत दर्प उत्पन्न होऊन त्याज पासून क्रोध उत्पन्न झाला तो क्रोध उत्पन्न होतांच हीन वृत्ती दैत्य होऊन दुर्भाग्यातें लौकरच पावले आणि लक्ष्मीनें देवांस वरिलें. दैत्यांमध्यें अधर्म संग्रहानें कलीनें लौकरच प्रवेश केला तेणें करून संपूर्ण दानवांची लक्ष्मी नष्ट झाली. यास्तव हे धर्मराजा, दर्प, क्रोध, मद मत्सर यांचा त्याग करून तीर्थें, देवालयें, सरोवरें यांचें स्नान कर ह्मणजे पुनः तुला पूर्व संपत्ती लौकरच मिळेल. जे मूर्ख तीर्थाचें सेवन करित नाहींत ते या पृथ्वीवर पशुतुल्य जाणावे. हे राजा, तीर्थ यात्रे विषयीं तूं मन धारण केलेंस हें फार उत्तम आहे. नृग, शिबि, भगीरथ, सुमना व पुरुरवा इत्यादि राजे तीर्थ यात्रेनें यश, कीर्ती व पुण्य संपादन करून उत्तम लोकीं गेले. तसा तूंही राजा विपुल श्रीचा उपभोग करून उत्तम लोकास जा. इक्ष्वाकु, मांधाता, मुचकुंद व मरुत हे राजे आपल्या बांधवां सह वर्तमान तीर्थ यात्रेनें स्वर्ग लोकीं गेले तसा तूंही जाशील. धृतराष्ट्राचे पुत्र अधर्मानें मोहित झाले आहेत यास्तव त्यांचा नाश लौकरच होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

९५ अध्याय पंच्यांणव.— वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, भ्रातें व ब्राह्मण यां सह वर्तमान धर्मराजानें यात्रेस निघाल्यावर रहात रहात नैमिष्यारण्यांत गोमती नामक तीर्थीं स्नान दान व पितृ तर्पण क

रून ब्राह्मणांस बहुत द्रव्य दिलें. तेथून कन्या तीर्थ, अश्वतीर्थ, गोतीर्थ, कालकोटी, विषप्रस्थ नामक गिरी वर राहून बाहुदा नदीमध्यें स्नानें केलीं नंतर प्रयागीं गंगा यमुनेच्या संगमीं जाऊन ब्रह्मदेवानीं स्थापित एक देवीचें स्थान आहे, तेथें कांहीं दिवस तपाचरण करून ब्राह्मण संतर्पण केलें. तेथून गयपर्वतीं वानीर मालिनी ह्मणोन नदी आहे, तेथें पवित्र कूट आणि धरणीधर यानामें करून दोन सरोवरें महान् ऋषीनीं सेवित आहेत तेथें पूर्वी अगस्त्य आणि यमधर्म वास करीत होते. त्या पर्वतीं पांडवानीं चातुर्मास्य वास करून उत्तम प्रकारें ब्राह्मण भोजन व आर्ष विधीनें चातुर्मास्यादिक याग बहुत केले. धर्मराज तेथें वास करीत असतां त्याजवळ हजारों ऋषी येऊन नाना प्रकारच्या पुण्यकारक कथा सांगून राजाचें चित्त रमवीत असत. धर्मराजाच्या दर्शना करितां बहुत तपस्वी ब्राह्मण आले होते. त्यांमध्यें शमठ ब्राह्मण धर्मराजास बोलतो हे धर्मराजा, अमूर्तरयाचा पुत्र जो गय परम विख्यात त्याच्या पुण्यकारक गोष्टी तुला सांगतों. गय नामक राजानें हजारों यज्ञ याग करून ब्राह्मणांस आतृप्त भोजन व दक्षिणा दिल्या. तेथें अन्नाचे पर्वत हजारों पडले होते. घृत, दधि दुग्ध यांच्या नद्या चालल्या होत्या. त्या राजाच्या गृहीं आह्मीं अन्न भक्षण करून व दक्षिणा ग्रहण करून संतुष्ट झालों. कोणीही प्राण्यानीं गय राजाच्या यज्ञांत अन्न भक्षण केलें असतां पुनः त्यास भोजन करण्याची इच्छा होत नसे. संपूर्ण देव, ऋषि व पितर गय राजाच्या हविर्दानानें पराकाष्ठेचे तृप्त झाले. नदींतील वालुका आकाशांतील तारका अथवा मेघांच्या जलधारा यांची गणना कदाचित् कोणी करील; परंतु राजाच्या यज्ञामध्यें ब्राह्मणांस मिळालेल्या दक्षिणांची गणना करितां येत नसे. असे त्या राजाचे यज्ञ बहुत झाले. असा विषय या अ० आहे.

९६ अध्याय शांणव:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धर्मराजानें दुर्जया नगरींत अगस्त्य ऋषींच्या आश्रमीं येऊन लोमश ऋषीस प्रश्न केला कीं, हे ऋषे, अगस्त्य ऋषीनीं वातापीस नाहींसा केला याचें कारण काय? वातापी दैत्यानें ब्राह्मणांचा नाश कशा करितां केला? ह्म

सर्व वृत्तांत मला सांगा. असा प्रश्न ऐकून लोमश बोलतात हे पांडुपुत्रा, इलवल नामक दितीचा पुत्र पूर्वी या मणिमती पुरी मध्यें वास करीत होता. कोणे एके काळीं त्याणें महान् तपस्वी ब्राह्मणाची अशी प्रार्थना केली कीं, हे ब्रह्मन्, इंद्रासारिखा एक पराक्रमी पुत्र मला द्यावा. त्याकालीं ब्राह्मणानीं त्यास अपेक्षित पुत्र दिला नाहीं, तेणें करून इलवलास बहुत क्रोध येऊन अतःपर संपूर्ण ब्राम्हणांचा वध करावा. असा निश्चय करून आपला कनिष्ठ भ्राता वातापी यास त्यानें कपटानें मेषाचें रूप देऊन घरीं ठेविला आणि अतिथी कोणी आपले घरीं आला ह्मणजे त्यास कपटी मेषाचें मांस पचन करून भक्षणास घालावें. नंतर ब्राह्मण संतुष्ट झाला ह्मणजे वातापीस हांक मारावी, तो शब्द वातापीनें श्रवण करितांच ब्राह्मणाची कुक्षी फोडून मेष वेषानें बाहेर यावें ह्मणजे ब्राह्मण मृत्यु पावत. याप्रमाणें कपटें करून हजारों ब्राह्मण इलवलानें मारिले. कोणे एके कालीं अगस्त्य ऋषी त्या पुरी मध्यें आले आणि आपले पितर एक गर्तेमध्यें लोंबतात असें पाहून त्यांस बोलला हे महाराज, तुह्मीं कोण आहांत त्याकालीं ते बोलले हे अगस्त्य, आह्मीं तुझे पितर आहोंत तूं पितरांच्या उद्धारा करितां पुत्रोत्पत्ति करीत नाहींस त्या योगानें आह्मीं संपूर्ण पितर अधोगतीस प्राप्त होऊन येथें राहिलों. यास्तव तूं विवाह करून पुत्र उत्पन्न करावा ह्मणजे या गर्तीतून आह्मीं मुक्त होऊं. असें अगस्तीनीं ऐकून विवाह करितों ह्मणोन प्रतिज्ञा केली. नंतर संपूर्ण वननिवासी सिंह, मृग इत्यादि प्राणी यांच्या अंग संमंधीं थोड थोडा भाग काढून एक उत्तम स्त्री निर्माण करून विदर्भराजा पुत्रा करितां तप करीत होता त्याचे घरीं त्या कन्येस जन्म दिला असतां अगस्त्य ऋषीच्या कृपेनें ती कन्या विद्युल्लते सारखी शरीरें करून सुशोभित विदर्भराजाच्या घरीं उत्पन्न झाली. ती कन्या पाहून विदर्भराजा ब्राह्मणास बोलला हे ब्राह्मण हो, या कन्येचें नाम करण करा. त्याकालीं संपूर्ण ब्राह्मणानीं त्या कन्येनें संपूर्ण मृग पक्षी यांच्या कांहीं कांहीं अंगाचा आपल्या सौंदर्यें करून लोप केला असें जाणोन इचें नाव लोपामुद्रा असें ठेविलें. ती कन्या राजाच्या गृहीं चंद्रा सारखी वृद्धी पावली. कांहीं दिवसानीं ती कन्या

यौवनावस्थेंत आली असतां तिचें रूप, सौंदर्य, शील व आचार पाहून ति
च्याशीं विवाह करण्यास कोणी उद्युक्त होईना. अशी ती रूपवती कन्या आ
पले माता पितरांस आनंद देत असतां उभयतां माता पितर ही कन्या कोणा
स द्यावी व इच्या रूप व गुणासमान भर्ता कसा मिळेल अशी चिंता करीत शो
क सागरांत निमग्न झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

९७ अध्याय सत्यांणव:- लोमश सांगतात हे राजा, एके दिवशीं
अगस्त्य ऋषींनीं विदर्भ राजाजवळ येऊन असें भाषण केलें कीं, हे राजा,
मला तुझी कन्या द्यावी. राजानें तें ऐकून न दिली तर शाप देईल द्यावी त
र दुःख आहे. असा मनांत विचार करून भार्येस विच्यार ण्या करितां अंत:
पुरांत गेला. ही बातमी लोपामुद्रेस लागल्यानंतर आपल्या करितां मां-
ता पितर संकटांत पडले हें जाणोन लोपामुद्रा पित्यास बोलली हे महारा
ज, माझ्या करितां आपण दुःखी होऊं नका मजला अगस्त्य ऋषीस अर्प
ण करावें. असें ऐकून विदर्भ राजानें विधि पूर्वक कन्येचा विवाह केला.-
विवाहानंतर अगस्त्य ऋषीनीं लोपामुद्रेस भाषण केलें कीं, हे स्त्रिये, आ
तां या महान् वस्त्राचा व आभरणाचा त्याग करून चिरवलकलें धारण-
करावीं. असें ऐकतांच लोपामुद्रेनें चिरवलकलें परिधान केलीं. नंतर उ-
भयतांनीं गंगाद्वारीं येऊन अनुष्ठान केलें. कांहीं दिवसानीं आपली भा
र्या ऋतुस्नात आहे असें मनांत आणोन प्रसन्न अंत:करणानें तिच्या
शीं समागम करण्यास हांक मारिली असतां त्या कालीं लोपामुद्रा लज्जा
यमान होऊन बोलली हे ऋषे, आपण ह्मणतां ही गोष्ट खरी, परंतु माझे
मनांत असें आहे कीं, जशी मी पूर्वी पित्याचे घरीं शयन करीत होत्यें
तशी शय्या असावी ह्मणजे काम पूर्ण होईल आपण ही वस्त्रालंकार
धारण करावे. कृष्णाजिन व चिरवलकलें या कार्यास उपयोगीं नाहींत असें ऐ
कून अगस्त्य ऋषी भाषण करितात हे स्त्रिये, मजवळ कांहीं द्रव्य नाहीं व तुझ्या
पित्यासारखा मी श्रीमान नाहीं. असें ऐकून लोपामुद्रा भाषण करत्ये हे ऋषे, आ
पण पाहिजे तें उत्पन्न कराल. असें ऐकून अगस्त्य ऋषी बोलतात हे स्त्रिये, तु
झ्या मनांतून तपाचा नाश करावा असें आहे; परंतु तपाचा नाश न होतां जसें

सांगशील त्या प्रमाणें करीन.असें ऐकून लोपामुद्रा बोलत्ये माझ्या ऋतूचा का
ल थोडाच राहिला याजकरितां आपल्या स्वधर्मानें कोणाजवळ ही याच्ञा के
ली असतां तप नष्ट होणार नाहीं व अलंकारा शिवाय मी तुमच्याशीं समागमक
रण्यास येणार नाहीं.असें ऐकून ऋषी भाषण करतो हे स्त्रिये, तुझी ज्यापेक्षां
द्रव्या वांचून इच्छा पूर्ण होत नाहीं तस्मात् मी द्रव्य आणतों तूं येथें स्वस्थ रा
हा.असें बोलून ऋषी द्रव्य आणण्या करितां गेले. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

९८ अध्याय अठ्यांणव.- लोमश भाषण करतात हे धर्मराजा, द्रव्य
भिक्षेच्या इच्छेनें ऋषी श्रुतवा नामक राजाच्या देशीं आले असें राजानें जा-
णून व सामोरें जाऊन अर्घ्यपाद्य इत्यादिकें करून पूजा केली आणि हातजोडू
न आगमनाचें कारण विचारिलें.त्या काळीं अगस्त्य ऋषी बोलतात हे राजा,
द्रव्या करितां मी तुझे गृहीं आलों आहें. अन्याय व हिंसा इत्यादिकें करून उ-
पार्जित जें द्रव्य नसेल त्या पैकीं यथा वि भाग मला अर्पण कर. असें ऐकतांच
राजानें आपलीं आय व्यय पत्रें ऋषीस दाखवून प्रार्थना केली कीं, हे महारा
ज या पैकीं जें पवित्र द्रव्य दिसेल तें घ्यावें.त्या काळीं अगस्त्य ऋषीनीं राजास
सांगितलें कीं, हें संपूर्ण तुझें द्रव्य प्राण्यास पीडा देऊन मिळवलेलें आहे यास्त
व हें मी घेण्यास इच्छित नाहीं.असें भाषण करून ऋषी राजास ही बराबर घे-
ऊन ब्रध्नश्व राजाचे गृहीं द्रव्य भिक्षे करितां गेले. ब्रधनश्व राजानें यथा यो-
ग्य ऋषीची पूजा करून आगमनाचें कारण विचारिलें तेव्हां ऋषी बोलले कीं,
हे राजा, द्रव्याच्या भिक्षे करितां आह्मीं तुझे गृहीं आलों, अन्याय व हिंसारहि
त उपार्जित जें द्रव्य असेल त्या पैकीं कांहीं मला अर्पण कर.असें ऐकतांच राजा
नें आपलीं आयव्यय पत्रें ऋषीस दाखवून प्रार्थना केली कीं, या पैकीं इच्छि-
त द्रव्य पाहिजे तितकें घ्यावें.त्या काळीं अगस्त्य ऋषीनीं राजास सांगितलें कीं,
हे राजा, जिवांस पीडा देऊन हें संपूर्ण द्रव्य तुम्हीं संपादन केलें त्यापैकीं आ-
मच्या उपयोगीं नाहीं.असें बोलून त्यासही बराबर घेऊन त्रसदस्यु नामक रा
जाचे गृहीं त्रिवर्ग आले, त्रसदस्यु राजानें अगस्त्य ऋषीची पूजा करून संपूर्णो
स आगमनाचें कारण विचारिलें असतां अगस्त्य ऋषी बोलले कीं, हे राजा,कां-
हीं द्रव्याची गरज आहे याजकरितां अहिंसित द्रव्य जें तुज पाशीं असेल त्या

पैकीं कांहीं दे असें ऐकतांच त्यानें आपलें आय व्यय पत्र ऋषीस दाखविलें असतां ऋषीनें तें पाहून राजास सांगितलें कीं, हें संपूर्ण द्रव्य जीवांस दुःख देऊन तूं संपादन केलेंस त्यांतून मी कांहीं घेण्यास इच्छित नाहीं. असें ऋषीनीं भाषण केलें असतां समागमें जे राजे होते त्यांणीं या पृथ्वीवर इल्वलनामक दानव बहुत द्रव्यवान आहे तेव्हां ऋषीस त्याजकडे घेऊन जावें ह्मणजे त्या दानवास शिक्षा होऊन संपूर्ण द्रव्य ऋषीस मिळेल. असें मनांत आणून ते त्याजकडे गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

९९ अध्याय नव्यांणव.— लोमश सांगतात हे युधिष्ठिरा, त्या राजांसह वर्तमान अगस्त्य ऋषी इल्वलाचे देशांत पोहोंचतांच त्यानें ऋषीचें व राजांचें उत्तम प्रकारें आतिथ्य करून वातापीस मेषाचें कृत्रिम स्वरूप देऊन भोजनाकरितां मांस सिद्ध केलें. हें कृत्रिम अगस्त्य ऋषी बराबर जे राजे होते त्यांणीं तें जाणोन अंतःकरणांत ते बहुत खिन्न झाले असतां अगस्त्य ऋषी बोलले तुह्मीं खिन्न होऊं नका इल्वलाचें कपट माझ्या ध्यानांत आलें ह्या मेषाचें भक्षण करून जीर्ण करतों. असें बोलून भोजन पात्राच्या क्रमांत अगस्त्य ऋषी पहिले पात्रावर बसले नंतर कृत्रिमानें पाचित केलेलें मांस संपूर्णांस परिवेषित केलें असतां इल्वलास बहुतच हर्ष झाला. परिवेषित केलेलें मांस अगस्ती नीं परम प्रीतीनें भक्षण करून शेवटीं अपान वायू सोडतांच त्याची गर्जना मोठी झाली. अगस्त्य ऋषी तृप्त झाल्यावर इल्वल पूर्ववत प्रमाणें वातापीस बोलला हे वातापी, लौकर ये हें अगस्ती नीं श्रवण करतांच किंचित् हास्य करून ते इल्वलास ह्मणो लागले कीं, आतां वातापी कोठून येणार तो माझ्या उदरांत जिरून गेला. इतकें ऐकतांच इल्वल पराकाष्टेचा खिन्न होऊन अगस्त्य ऋषीस बोलला हे महाराज, आपण इकडे कशा करितां आलां तें मला सांगावें. तेव्हां ऋषी बोलले कीं, आह्मीं सर्व धनार्थी आहोंत तूं या पृथ्वीवर मोठा धनिक आहेस असें समजून तुझे गृहीं आलों, अहिंसित धन जें तुजपाशीं असेल तें आह्मांस दे. असें ऐकून इल्वल बोलला हे ऋषे, आपणास द्रव्याची अपेक्षा आहे त्यापेक्षां कोणतें द्रव्य देऊं ये विषयीं मला आज्ञा करावी ह्मणजे त्याप्रमाणें मी देतों. अ-

सें ऐकून अगस्त्य बोलला हे इल्वला, एक एक राजास दहा दहा सहस्र गाई व दहा दहा सहस्र भार सुवर्ण दे आणि इतक्यांचे दुप्पट गाई व सुवर्ण मला देऊन उत्तम प्रकारचा सुवर्ण खचित रथ, मनोज व अश्वत्यास जोडलेले असा दे. इतकें अगस्त्य ऋषीनीं सांगतांच इल्वलानें त्या प्रमाणें दिलें नंतर राजांसहवर्तमान अगस्त्य ऋषी रथांत बसून आपले पूर्वाश्रमीं गेले. अगस्त्य ऋषीनीं लोपामुद्रेची इच्छा तृप्त केल्यानंतर लोपामुद्रा बोलली हे भगवन्, जें मला इच्छित होतें तें संपूर्ण मिळालें आतां मजपासून एक अपत्य बलवत्तर पराक्रमी असें उत्पन्न करावें. असें ऐकून अगस्त्य बोलतात हे कल्याणी, तुझें वृत्त पाहून मी संतुष्ट झालों. तुला पुत्रा विषयीं कांहीं प्रश्न कर्तव्य आहे त्याचें उत्तर दे. तुला सहस्र पुत्र पाहिजेत अथवा सहस्र पुत्रा इतके पराक्रमी शंभर पुत्र पाहिजेत अथवा शंभर पुत्रांच्या पराक्रमा तुल्य दहा पाहिजेत अथवा सहस्र पुत्रांच्या पराक्रमा तुल्य एक पुत्र पाहिजे यांतून जशी तुला इच्छा असेल तसें सांग. त्या कालीं लोपामुद्रा बोलली हे महाराज, हजार पुत्र घेऊन काय कर्तव्य. एक पुत्र गुणानीं, पराक्रमानीं सहस्र पुत्रांच्या बलतुल्य, साधूनीं मान्य असा द्यावा. असें ऐकून अगस्त्य बोलले बरें तर तुझ्या इच्छे प्रमाणें तसाच पुत्र देतों असें ह्मणोन एके दिवशीं उत्तम कालीं, सुसमयीं श्रद्धा भक्तीनें समशील जाहालेली जी भार्या इच्या सहवर्तमान रममाण होऊन वनिचे ठिकाणीं गर्भ स्थापन करून वनामध्यें गेले. इकडे लोपामुद्रेनें गर्भ धारण करून सातवे वर्षी ती प्रसूत झाली असतां अग्नी सारखा तेजस्वी दैदीप्यमान पुत्र झाला. तो होतांच सांगो पांग वेद, उपनिषद, शास्त्र, पुराणें त्यास मुखोद्गत येऊं लागलीं. असा तो अगस्त्य ऋषीचा पुत्र दृदस्यु संपूर्ण विद्या विशारद एके दिवशीं अरण्यांत जाऊन समिधांचा भारा आणित असतां त्यास ऋषीनीं परम प्रीतीनें पाहून त्याचें नांव इध्मवाह असें ठेविलें. त्या पुत्राच्या योगानें संपूर्ण ऋषींचे पूर्वज उद्धरले; तेव्हां पासून हा अगस्त्याचा आश्रम प्रख्यात झाला. येथेंच वातापि नामक दैत्याचा अगस्त्य ऋषीनीं उपशम केला यास्तव येथें कांहीं दिवस वास करून नंतर मैलो

स्थ पावनी भागीरथी दक्षिणदिशेस दिसते. ही पाहून तीमध्यें यथेच्छ स्नान क
र. नंतर भृगूचें तीर्थ आहे, तेथें परशुरामाचें तेज दाशरथी रामानीं हरण के
लें होतें तें पुनः प्राप्त झालें म्हणून तूंही राजा, भ्राते व कृष्णा यांसह वर्तमान
त्या तीर्थी स्नान कर म्हणजे दुर्योधनानें जें तुझें तेज हरण केलें तें तुला मिळेल.
असें लोमशानीं सांगतांच धर्मराजानें भृगुतीर्थी स्नान करून देव, पितर यांचें
तर्पण केलें असतां धर्मराज मोठा देदीप्यमान होऊन शत्रूस दुःसह झाला. नं
तर धर्मराज लोमशऋषीस प्रश्न करितो हे ऋषे, दाशरथी रामानें परशुरामा
चें तेज कशा करितां हरण केलें व पुनः त्यास कसें मिळालें तें सांगा? असा प्र
श्न ऐकून ऋषि बोलले हे राजा, पूर्वी दशरथ राजाच्या गृहीं साक्षात् भगवान्
आपल्या स्वशरीरें करून रावणाच्या वधा करितां अयोध्ये मध्यें पुत्रभावें क
रून उत्पन्न झाले. हा वृत्तांत रेणुकानंदन जो भार्गवराम याणीं ऐकून मोठे
भयंकर शत्रूचें नाश करणारें असें धनुष्य घेऊन रामचंद्राच्या वीर्याची परी
क्षा पाहण्या करितां मोठ्या कौतुकानें ते अयोध्येस आले. हें दशरथ राज्यास स
मजतांच त्यांनीं आपला पुत्र जो रामचंद्र यास भार्गवाच्या भेटी करितां पाठ
विलें. तेव्हां भार्गवराम बोलला हे राजा, जर तुझी शक्ति असेल तर या धनु
ष्यास प्रत्यंच्या लाऊन बाण लाव. हें ऐकून दाशरथी राम बोलला हे भार्ग
वा, तूं आमची निंदा करण्यास योग्य नाहींस; कारण इक्ष्वाकु कुलांत जे उत्पन्न
जाहले त्यांची रीत वल्गना करण्याची तर अगदींच नाहीं. आपल्या स्वपराक्रमें क
रून व बाहुवीर्यें करून लोकांस त्रास द्यावा ही रीति उत्तम कुलांत जे उत्पन्न हो
तात त्यांची नव्हे. असें ऐकून भार्गवराम बोलतो हे रामा, असें कपटी भाषण कर
ण्याचें कारण नाहीं. तुला सामर्थ्य असेल तर हें धनुष्य घे असें ऐकतांच दाशर
थी रामानें क्षत्रिय कुलांतक जें भार्गवरामाचें धनुष्य तें घेतलें आणि प्रत्यंचा
चढवून एका एकीं धनुष्याचा टणत्कार केला तेणें करून बहुत लोकांस वि
स्मय झाला. पक्षी व पशु यांस त्या धनुष्याच्या टणत्कारें करून पराकाष्ठेचा
त्रास झाला. नंतर दाशरथीराम भार्गवास बोलतो. रामा, तुझ्या धनुष्यास गु
णारोप केला. आतां पुढें काय कर्तव्य असेल तें सांग. असें ऐकतांच भार्गव रा
मानें एक लोहमय प्रचंड बाण दाशरथी रामाचे स्वाधीन करून सांगितलें कीं,

हा बाण धनुष्यास लाव त्या काळीं दाशरथी राम तो बाण घेऊन बोलला हे भार्गवा ब्रह्मदेवाच्या प्रसादें करून तूं फारच गर्विष्ठ झालास. हें पूर्ण क्षत्रियांचें तेजआपले बळें करून तूं हरण केलेंस; परंतु तुला या काळीं मी आपलें स्वरूप दाखवितों. व्यर्थ माझ्याशीं स्पर्धा करूं नको. माझ्या शरीराकडे एकवेळ अवलोकन कर म्हणजे तुझे डोळे उघडतील. असें ऐकतांच भार्गवरामानें दाशरथी रामाच्या शरीराकडे पाहिलें तों त्याचे शरीरांत आदित्य, वसु, रुद्र, साध्य, मरुत्गण, पितर, अग्नि, नक्षत्रें, ग्रह, गंधर्व, अप्सरा, नद्या, तीर्थें, ऋषि, वालखिल्य, समुद्र, पर्वत, सांगोपांग शरीर धारण केलेले वेद व मेघांचे समुदाय दृष्टीस पडले तेणें करून तो परमकाष्ठेचा मोहयुक्त होऊन दोन घटिका मूर्छित झाला. रामचंद्रानीं तो बाण धनुष्यास लाविला असतां अशनिपात, भूमीकंप व विद्युल्लतेचे कडकडाट होऊं लागले. हें भार्गवरामानें पाहून हा साक्षात् विष्णु आहे या पुढें आपलें वीर्य कांहीं चालणार नाहीं. असें जाणून रामचंद्राची आज्ञा घेऊन तो महेंद्र पर्वतावर गेला. एक वर्षा नंतर परशुरामाचे पितर आपला पुत्र दीन व भयभीत, लज्जित व निस्तेज जाहलेला पाहून बोलले हे पुत्रा, त्रैलोक्यनाथाशीं तूं स्पर्धा केलीस हें चांगलें केलें नाहींस तो संपूर्णास परम पूज्य व तिन्ही लोकांत विख्यात असा आहे आतां तूं निस्तेज जाहलास म्हणून तेज प्राप्त होण्याचा तुला पुनः उपाय सांगतों. वधूसर या नामें नदी आहे तेथें जाऊन तिजमध्यें स्नान कर म्हणजे पुनः पूर्ववत् शरीर व तेज तुला प्राप्त होईल. या तीर्थाचें नाम दीप्तोद असें आहे. तुझा प्रपितामह भृगु याच तीर्थीं तपाचरण करून उत्तमलोक पावला. लोमश भाषण करितात हे कौंतेया, भार्गवरामानें पित्याचें वाक्य ऐकून दीप्तोद तीर्थीं स्नान करितांच पुनः त्यास तेज प्राप्त झालें. याजकरितां हे राजा, तुलाही त्या प्रमाणें तुझें वित्त मिळेल. असा विषय या अध्यायांत आहे.

१०१ अध्यायशंभर:- धर्म बोलतो हे लोमशा, अगस्त्य ऋषीचा पराक्रम विस्तारानें सांग. असें ऐकून लोमश भाषण करितात हे राजा, पूर्वीं कृतयुगीं कालकेय नावाचे दानव मदें करून गर्विष्ठ झालेले अगणित होते. पुढें वृत्रासुर नामक देत्यास ते साह्य होऊन इंद्रादि संपूर्ण देवांस त्यानीं स्थाना पासून भ्रष्ट केलें. नंतर शक्रप्रभृति देवा. वृत्रासुराचा वध करण्या विषयीं मसलत करून ब्रह्म

देवाकडे गेले आणि हात जोडून प्रार्थना करूं लागले तों ब्रह्मदेव बोलले कीं, देव हो, तुह्मीं येथें कशा करितां आलां हें मी जाणलें. वृत्रासुराचा वध कसा होईल. म्हणून तुह्मांस परम चिंता प्राप्त झाली. यास्तव त्याच्या वधाची योजना तुह्मांस सांगतों. दधीच ऋषि धर्मात्मा उदार बुद्धीचा व तिन्ही लोकांत परम विख्यात आहे त्याज कडे संपूर्णांनीं जाऊन आपलें दुःख त्यास सांगावें. म्हणजे तुमच्या दुःखाच्या निवारणार्थ आपल्या शरीरांतून अस्थी काढून तुह्मांस देईल. त्या अस्थी तुह्मीं घेऊन एक परम दृढ तत्काल नाश करणारें असें एक उत्तम वज्र करा. त्या वज्रानें वृत्रासुराचा वध इंद्र करील. असें सांगतांच तत्काल संपूर्ण देव ब्रह्मदेवाची आज्ञा घेऊन नंतर भगवान् नारायण यास पुढें करून सरस्वतीच्या परतीरीं स्वर्गतुल्य दधीच ऋषीचे आश्रमीं गेले आणि साष्टांग नमस्कार घालून ब्रह्मदेवानीं सांगितल्या प्रमाणें आपल्या दुःखाचा वृत्तांत त्यानीं ऋषीस सांगितला तो दधीची ऋषीनीं श्रवण करितांचतेबोलले हे देव हो, तुमच्या कार्यास्तव मी आपले देहाचा त्याग करीन. दधीच्यानें आपल्या प्राणांचा उत्सर्ग केला. नंतर संपूर्ण देवानीं ऋषीच्या शरीरा पासून आपल्यास पर्युक्त अस्थी पाहिजेत त्या त्या काढून घेतल्या व ते त्वष्टयाकडे पुनः जाऊनबोलले हे ब्रह्मदेवा, या अस्थींनें आह्मांस एक वज्र करून द्यावें. असें ऐकून त्वष्ट्यानें वज्र करून देऊनतोबोलला कीं या वज्रानें वृत्रासुराचा वध तूं कर. आणि संपूर्ण देवांचें भय निवारण करून त्यांस सुख दे म्हणजे ते स्वर्गामध्यें वास करतील. असें ऐकून इंद्रानें तें वज्र घेतलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१०१. अध्याय एकशें एक — लोमश सांगतात हे धर्मराजा, इंद्रानें तें वज्र घेऊन संपूर्ण देवांसहवर्तमान आकाश व पृथ्वी यांस त्रास देणाराजो वृत्रासुर या समागमें युद्धास आरंभ केला असतां कालकेय दैत्य वृत्रासुरास साह्य होऊन देवांवर पर्वतप्राय अस्त्रांची वृष्टि करूं लागला. तें देवदानवांचेंयुद्ध एक मुहूर्त पर्यंत लोकांस त्रास देणारें असें होत असतां अंतरिक्षा पासून नवीरांचीं धडें व शिरें हजारों पृथ्वीवर पडूं लागलीं. संपूर्ण कालिकेय देवांवर धांवले. तेव्हां देव पळाले हें इंद्रानें पाहून आपल्यास या प्रसंगीं आतां कोणी साह्य नाहीं. असें जाणून कालकेयाच्या भयानें तोही मोह पावला. नंतर जगतत्राण क

रणारा जो नारायण याणें इंद्रास मोह करून पाहून आपलें तेज शक्रावर स्थापित के लें, त्या युद्धप्रसंगीं दानवांपासून सहस्राक्षाचें रक्षण केलें असतां संपूर्ण देव व ऋषि परावृत्त जाहले होतेते माघारे आले. वृत्रासूर दैत्य पुनः संतप्त होऊन एकाएकीं इंद्रावर धांवला. हें पाहून इंद्रानें अस्थिनिर्मित वज्र वृत्रासुराचेशि रावर टाकतांच तो मृत्यु पावला. हें इंद्रास सत्य न वाटून त्यानें सरोवरामध्यें प्रवेश केला. नंतर वृत्रासुर मरण पावला असा संपूर्ण देवांचा निश्चय होऊन इंद्राची परम स्तुति करूं लागले. इकडे संपूर्ण कालकेय पळाले. नंतर संपूर्ण कालकेय समुद्रामध्यें गुप्त रूपें राहून संपूर्ण देव व ऋषि यांचा नाश कसा होईल? या विषयीं विचार करीत असतां कांहीं त्यांत मतिमान होते त्याणीं नि श्चय केला कीं, सत्य, ज्ञान, तप, या पृथ्वीवर आहे ह्मणून ही पृथ्वी चालली. त स्मात् महान् महान् तपस्वी व ऋषी यांचा प्रथम वध करावा ह्मणजे संपूर्ण पृथ्वी लौकरच रसातलास जाईल. असा विषय या अध्यायांत आहे.

१०२. अध्याय एकशेंदोन.— लोमश सांगतात हे धर्मराजा, कश्यपाचे पु त्र समुद्रामध्यें प्रवेश करून त्रैलोक्याच्या विनाशा विषयीं यत्न करूं लागले असतां रात्रीं समुद्रांतून जेथें ऋषीचे आश्रम व देवालयें असतील तेथें जाऊ न ऋषींचें भक्षण करून देवालयें भग्न करूं लागले. कोणे एके दिवशीं वसिष्ठ ऋषीच्या आश्रमीं जाऊन फळें व मुळें भक्षण करणारे आठ हजार आठशें नऊ तपस्वी होते त्यांस व च्यवन ऋषीच्या आश्रमीं शंभर ऋषींस, भरद्वाज ऋषीचे आश्रमीं वीस या प्रमाणें ऋषित्यानीं भक्षिले असे कालकेयाचे पुत्र हजारों ऋषि व ब्राह्मण व ब्रह्मचारी यांस रात्रीं भक्षण करून दिवसास गुप्त रूपें समुद्राम ध्यें वास करीत असतां हजारों दिवस असेच गेले. हजारों ऋषि व ब्रह्मचा री कालकेयाचे भयानें त्रस्त झाले. दैत्यानीं ऋषींचीं मांसें भक्षण करून हजा रों प्रेतांचे व अस्थींचे ढीग पृथ्वीवर टाकिलेले शंखाच्या राशी जशा दुरून- शुभ्र दिसतात तसे दिसूं लागले. दैत्यानीं ऋषींचे कलश तसेच स्रुक् स्रुवे इत्यादि पात्रें भग्न केलीं. स्वाहास्वधा वषट्कार इत्यादि शब्द पृथ्वीवरील बंद झाले. संपूर्ण ऋषि भयाभीत होऊन आत्मत्राणा करितां दाही दिशांस पळूं ला गले. कित्येकानीं गुहेंत प्रवेश केला. कित्येक नदीचे प्रवाहांत लपून बसले. कि

त्येकानीं आपला प्राणत्याग करण्याचा निश्चय केला. कित्येक जे शूर होते त्यां णीं जेथें दैत्य सांपडतील तेथें त्यांचा नाश करावा असा निश्चय केला. अग्निहो त्रादि क्रिया तसेच यज्ञादि हविर्भाग संपूर्ण पृथ्वीवरील बंद झाले. तेणेंकरू न संपूर्ण देवांस मोठी काळजी उत्पन्न होऊन इंद्रासहवर्तमान ते वैकुंठीं श्रीना रायणास शरण जाऊन भगवंताची अशी स्तुति करूं लागले कीं, हे भगवन्, तूं संपूर्ण देवांत श्रेष्ठ होस. संपूर्ण जगत् तुझ्या पासून उत्पन्न झालें. तुझ्या- च आश्रयें करून जगताची स्थिति चालली आहे. पूर्वी पापाच्या योगानें पृ थ्वी समुद्रांत निमग्न झाली असतां वराहरूप धारण करून तूंच तिचा उद्धार केलास. तसाच आदिदैत्य महान् पराक्रमी जो हिरण्यकश्यपु याचा वध ना रसिंहरूप धारण करून तूंच केलास. तसाच सर्व भूतांस जो अवध्य बलि- नामक दैत्य याचाही नाश वामन अवतार धारण करून तूंच केलास. तसाच यज्ञ विध्वंस करणारा जो जंभासूर याचा नाशही तूंच केलास. हे देवाधिदेवा, अ शींच तूं पुष्कळ कर्मे जगताच्या संरक्षणा करितां केलीस. या काळीं आह्मीं ब हुतच त्रस्त जाहलों. यास्तव आमचें व इंद्राचें या महत् भया पासून निवारण करून आमच्या शत्रूंचा नाश कर. तुझ्या वांचून आह्मांस दुसरी गति नाहीं. अ सा विषय या अध्यायांत आहे.

१०३. अध्याय एकशें तीन.– देव भाषण करितात हे ईश्वरा तुझ्या प्रसादा नें चतुर्विध प्रजा वृद्धि पावतात व ब्राह्मणांच्या हव्यकव्यादि दानें करून देव वृ द्धी पावतात. अशा परस्परांच्या आश्रयानें देव व प्रज्या आहेत. हे ईश्वरा, रात्री कोणी दैत्य येऊन ब्राह्मणांचें व ऋषींचें भक्षण करतात. असेंच दैत्यानीं ब्रा ह्मणांचें भक्षण केलें असतां तद्द्वारा जीं हव्यकव्यें होतात त्यांचा नाश होऊन आ मचाही नाश होईल. नंतर आकाश व पृथ्वी एका एकीं लयास पावेल यास्त व हे भगवन् जेणें करून ब्राह्मणांचें त्राण होईल असें करा. असें ऐकून विष्णु भाषण करितात हे देव हो, तुमच्या क्षयाचें कारण संपूर्ण मी जाणिलें. का लकेय दैत्यानीं पूर्वी वृत्रासुराचा आश्रय केला होता. इंद्रानें वृत्रासुराचा व ध केल्यावर ते दैत्य परम त्रस्त होऊन आपल्या जीविताचें रक्षण व्हावें ह्मणून समुद्रांत गेले. तेच दैत्य रात्रौ ऋषि व ब्राह्मणांस भक्षून दिवसास गुप्तरूपानें

समुद्रामध्यें वास करितात. यांचा वध करण्यास परम अशक्य आहे. ज्या कालीं समुद्र क्षय पावेल त्या कालीं यांचा नाश होईल. यास्तव समुद्राचा क्षय होण्याचा उपाय सांगतों. अगस्त्य या नामें करून परम विख्यात ऋषि आहेत त्यांची संपूर्णांनीं जाऊन स्तुति करावी ह्मणजे ते सागराचें शोषण करतील. असें सांगतांच संपूर्ण देव अगस्तीच्या आश्रमीं गेले आणि बोलले हे ऋषे, संपूर्णऋषींमध्यें तुह्मी श्रेष्ठ, परमज्ञानी, लोकांवर उपकार करणारे असे आहांत पूर्वी नहुष राजास स्वर्गापासून तुह्मींच भ्रष्ट करून संपूर्ण ऐश्वर्यापासून च्युत केलें त, तसाच विंध्याचल पर्वत उन्नत होऊन चंद्रसूर्यांची गति त्याणें बंद केली तेणें करून संपूर्ण जगताच्या यज्ञयागादि क्रिया राहून संपूर्ण प्रजा बहुत पीडित झाल्या, त्या कालीं तुह्मींच विंध्याचलास नम्र केलेंत. असे तुमचे लोकांवर बहुत उपकार आहेत ह्मणून आह्मीं आपल्यास शरण आलों आहोंत. आह्मीं तुह्मांपाशीं एक वर मागतों तो आम्हांस द्यावा. असा विषय या अध्यायांत आहे.

१०४. अध्याय एकशें चार.– युधिष्ठिर प्रश्न करितो हे ऋषे, विंध्याचल वृद्धि कशा करितां पावला? असा प्रश्न ऐकून लोमश सांगतात हे राजा, संपूर्ण पर्वतां मध्यें श्रेष्ठ जो मेरुपर्वत यास सूर्य नित्यशः प्रदक्षिणा करितो हें कोणे एके दिवशीं विंध्याचल पर्वतानें पाहून तो सूर्यास बोलला, तूं नित्यशः मेरुपर्वतास जशा प्रदक्षिणा करितोस तशा मला करीत जा. असें ऐकून सूर्य बोलला मी आपल्या इच्छेनें यास प्रदक्षिणा करीत नाहीं. ज्या कालीं ईश्वरानें हें जगत उत्पन्न केलें त्या कालीं हा मार्ग मला निर्मित केला. इतकें ऐकतांच विंध्याचल पर्वत एका एकीं क्रुद्ध होऊन चंद्र आणि सूर्य यांच्या मार्गाचा अवरोध करण्या करितां मेरु पर्वताहूनही अधिक उंच झाला. त्या कालीं संपूर्ण देव पर्वतापाशीं येऊन त्याचें निवारण करण्या विषयीं उद्युक्त झाले असतां त्यांचें वाक्य विंध्याचलानें श्रवण केलें नाहीं. नंतर संपूर्ण देव, अगस्त्य ऋषीची स्तुति करून बोलले हे ऋषे, संपूर्ण धर्मवेत्त्यांमध्यें तुह्मी श्रेष्ठ असून तुमचा पराक्रम अद्भुत आहे ह्मणून विंध्याचल पर्वताचा वृत्तांत तुह्मांस सांगतों. सूर्यचंद्र नक्षत्रें यांच्या गति विंध्याचलानें बंद केल्या त्यांचें निवारण करण्यास हे

ऋषिवर्य तुमच्याशिवाय या भूमंडलीं कोणी नाहीं. असें ऐकून तत्काल देव कार्या करितां अगस्त्यऋषि विंध्याचलाच्या समीप गेले. त्या कालीं आपल्यास्त्री सह वर्तमान विंध्याचल अगस्त्य ऋषीस प्रेरण्या करितां आला. हें ऋषीनीं पाहून ते बोलले, हे विंध्याचला, मला दक्षिणदिशेस जाण्याची इच्छा आहे याजकरितां मार्ग दे आणि पुनः मी इकडे माघारा येईं तों पर्यंत तसाच रहा. असें ऐकून विंध्याचलानें नम्र होऊन अगस्त्यऋषीस मार्ग दिला असतां अगस्त्यऋषि दक्षिणेस गेले. ते अद्याप तसेच तेथें आहेत. ह्मणोन विंध्याचल वृद्धि पावला नाहीं. हा अगस्त्य ऋषीचा प्रभाव तूं विचारलास ह्मणून सांगितला. नंतर पुनः भाषण करितात हे राजा, संपूर्ण कालकेय देवांच्या भयानें समुद्रामध्यें वास करितात हें देवांस समजल्यावर त्यानीं अगस्त्य ऋषीची प्रार्थना केली हे ऋषे, हा समुद्र तुह्मीं शोषून टाका ह्मणजे कालकेय दैत्यांचा वध करण्यास आह्मीं समर्थ होऊं. असें श्रवण करितांच तुमचें कार्या करितां सरीतपतीचें मी शोषण करितों. असें बोलून अगस्त्य ऋषि, देव, गंधर्व, किन्नर यां सहवर्तमान समुद्र तीरीं गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१०५. अध्याय एकशें पांचवाः— लोमश भाषण करितात हे धर्मराजा, संपूर्ण देवांसहवर्तमान अगस्त्य ऋषीनीं येऊन त्यानीं समुद्राचें शोषण केलें. हें पाहूनदेवांसव आह्मांस परम आश्चर्य जाहलें. या प्रकारें संपूर्ण ऋषीनीं स्तव केला तों आकाश मध्यें देव, गंधर्व, अप्सरा नृत्य करून वाद्यांचे गजर करूं लागले. समुद्र निरुदक झाला हें पाहून संपूर्ण देव कालकेयांशीं युद्ध करूं लागले. एक मुहूर्त पर्यंत उभयतांचें युद्ध परम भयंकर झालें. देवांचा युद्ध वेग-दानवांच्यानें सहन होईना. पूर्वी मुनीच्या शापानें संपूर्ण दैत्य दग्धझालेच होते. नंतर देवानीं आपल्या शस्त्रास्त्रानीं त्यांस निःशक्त करून हजारों दैत्यांचा वध केला. शेष राहिलेले दैत्य पृथ्वीचें विदारण करून पातालामध्यें गेले. एकही कालकेयां पैकीं दैत्य पृथ्वीवर राहिला नाहीं. असें झाल्या नंतर संपूर्ण देव पुनः अगस्त्यऋषीची स्तुति करूं लागले. हे ऋषे तुझ्या प्रसादें करून हें महत्सुख आह्मांस प्राप्त झालें. तुझ्याच तेजानें क्रूर विक्रम जे कालकेय दैत्य यांचें हनन केलें. आतां हे ऋषे, तुह्मीं समुद्र तोयाचें प्राशन केलेंत. आतां पूर्ववत् तो तोयानें

पूर्ण करा. एवढी आमची प्रार्थना आहे. इतकें ऐकून अगस्त्य बोलले देवहो, संपूर्ण समुद्राचें तोय माझे उदरीं जिरलें आतां कोठून निर्माण करूं? समुद्र उत्पन्न होण्या विषयीं तुह्मीं दुसरा यत्न करा. असें ऐकून देव गेले आणि हस्त जोडून प्रार्थना करूं लागले कीं, हे पितामह, सागर पुनः पूर्ण होण्या विषयीं यत्न काय करावा? असा विषय या अध्यायांत आहे.

१०६. अध्याय एकशें सहा:- लोमश सांगतात हे धर्मराजा, संपूर्ण देवांचें भाषण ऐकून ब्रह्मदेव बोलले हे देवहो, तुह्मीं आपले स्वस्थानीं जा. कांहीं कालानें भगीरथापासून स्वज्ञाति करितां हा समुद्र पूर्ण होईल. असें श्रवण करितांच संपूर्ण देव आपआपले स्थानीं जाऊन समुद्र कधीं पूर्ण होईल ये विषयीं काल प्रतीक्षा करीत बसले. असें ऐकून युधिष्ठिर बोलला हे ऋषे, स्वज्ञाती करितां भगिरथानें समुद्र पूर्ण केला ही कथा मला सांगा. असें वाक्य श्रवण करून लोमश भाषण करितात हे राजा, इक्ष्वाकु कुलामध्यें रूप, धैर्य व बल ईहीं करून युक्त, सगर राजा अपुत्र होता त्याणें इतर देशाचे हैहय व तालजंघ इत्यादि राजांस वश करून उत्तम प्रकारचें राज्य केलें. राजास वैदर्भी व शैब्य या सौंदर्यें करून युक्त अशा दोन भार्या होत्या. कोणे एके कालीं सगर राजा दोन भार्यांसह वर्तमान पुत्रप्राप्ती करितां कैलास पर्वतावर तप करण्या करितां गेला आणि बहुत दिवस तेथें तप करून त्यानें श्रीशंकरास संतुष्ट केलें. आणि पत्न्यांसह वर्तमान शिवास साष्टांग नमस्कार करून पुत्रांची याञ्चा करितांच श्रीशंकर संतुष्ट होऊन राजास बोलले कीं, तुझ्या एका भार्येस साठ हजार पुत्र शूर व पराक्रमी होऊन कांहीं दिवसानीं संपूर्ण क्षय पावतील. एक स्त्रीस एकच पुत्र वंशोध्दारक असा होईल. असा श्रीशंकर वर देऊन तत्काल अंतर्धान पावल्या नंतर राजाही परम संतुष्ट होऊन भार्यांसह वर्तमान स्वस्थानीं गेला. कांहीं कालानंतर राजाच्या दोन्ही भार्या गर्भिणी होऊन वैदर्भीस एक अलांबु (भोंपळा) जाहला व शैब्येस देवा सारखा रूपवान् असा एक पुत्र झाला. वैदर्भीच्या उदरा पासून जाहलेला जो अलांबु यास राजानें पाहून त्याचा त्याग करावा अशी मनांत इच्छा केली. तों आकाशामध्यें वाणी झाली हे राजा, साहस करूं नको. शिवाच्या प्रसादें करून या पासून साठ

हजार पुत्र उत्पन्न होतील. त्यांचें घृतपात्रामध्यें संरक्षण कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१०७. लोमश सांगतात हे धर्मराजा, अंतरिक्षा पासून वाणी जाहलेली राजानें श्रवण करितांच एक एक बीज एक एक घृतकुंभांत ठेऊन एक एक दासिकुंभाच्या रक्षणा करितां ठेविली. कालें करून महा क्रूर कर्म करणारे असे साठ हजार पुत्र उत्पन्न होऊन देवांस पीडा करूं लागले. त्या काळीं संपूर्ण देव व गंधर्व ब्रह्मदेवास शरण गेले असतां ब्रह्मदेव बोलले हे देव हो, तुह्मी कांहीं चिंता करूं नका. हे संपूर्ण सगर लौकरच नाश पावतील. असें ऐकून संपूर्ण आप आपले स्थानीं गेले. बहुत दिवस जाहल्या नंतर सगर राजानें अश्वमेधाची दीक्षा धारण केली. आणि संपूर्ण आपले पुत्र समागमें देऊन अश्व पृथ्वी जिंकण्यास सोडला असतां तो अश्व फिरतां फिरतां समुद्राच्या कांठीं येऊन एकाएकीं अंतरधान पावला. हें वर्तमान साठ हजार सगरपुत्रानीं येऊन आपल्या पित्यास निवेदन केलें असतां पित्यानें सांगितलें कीं, अश्वाचा शोध सर्व ठिकाणीं करा. अश्वा खेरीज यज्ञसमाप्ति कशी होईल? असें ऐकतांच सगरपुत्रानीं शोध बहुत केला; परंतु कोठें ठिकाण लागला नाही. नंतर अश्वही सांपडत नाहीं व अश्वाचा हरण कर्ताही सांपडत नाहीं हें पित्यास जाऊन सांगितलें. नंतर बोलला कीं, हे पुत्र हो, पुनः तुह्मीं जाऊन अश्व शोधून आणा. अश्व आणल्या खेरीज परत येऊं नये, असें ऐकून ते अश्वशोधार्थ गेले. सर्व ठिकाणें त्यानीं शोधिलीं, परंतु कोठें ठिकाण लागेना ह्मणून पृथ्वी खणावया करितां लागले. खणतां खणतां पृथ्वींतील वास करणारे जे प्राणी, असुर, राक्षस, सर्प, यांस बहुत पीडा होऊं लागली. बहुत दिवस झाले तथापि अश्व कोठें दिसेना. नंतर समुद्राच्या ईशान्येस पृथ्वी विदारण करून पातालांत जात असतां तेथें कपिलनामक ऋषीस पाहून ते संतुष्ट अंतःकरणानें कपिलाचा अनादर करून अश्व धरण्यास धांवले. तेव्हां ऋषीस परम कोप येऊन त्याणीं नेत्र उघडले असतां कपिल महामुनीच्या कोपाग्नीनें साठ हजार सगरपुत्र मरण पावले. हें वर्तमान नारदानीं सगरास सांगितलें. तें ऐकतांच मुहूर्तमात्र दुःखित होऊन नंतर त्यानें श्रीशंकराच्या वाक्याचें स्मरण क-

रून चित्ताचें समाधान केलें. आणि आपला नातू जो अंशुमान यास सांगित लें कीं, हे पुत्रा, तुझे साठ हजार चुलते मजकरितां कपिलाच्या तेजानें मरण पावले. तुझा पिताही धर्मसंरक्षणाकरितां मी हांकून दिला; यास्तव तूं आतां जेथें अश्व असेल तेथें जाऊन तो घेऊन ये. असें ऐकून धर्मराज प्रश्न कर्तो हे ऋषे, सगरानें आपला पुत्र कशा करितां हांकूनदिला? असें ऐकून लोम श सांगतात हे राजा शैब्या नामें करून जी सगराची स्त्री इजला असमंजस या नामें करून एक पुत्र होता. त्याणें क्रीडे मध्यें गांवांतील लोकांची मुलें नित्यशः नदींत बुडवावीं. असें कांहीं दिवस तो करीत असतां सर्व लोक त्याच्याभया नें राजास बोलले कीं, हे राजा, तूं आमचें परचक्रादिकापासून संरक्षण कर्ता असून तुझा पुत्र असमंजस आह्मांस बहुत पीडा देतो, त्याजपासून तूं आ मचें संरक्षण कर. असें संपूर्ण प्रजेचें भाषण श्रवण करून मुहूर्तमात्र रा जा दुःखित होऊन आपले प्रधानास बोलला हे मंत्रिहो, माझी आज्ञा तुह्मां स मान्य आहे तर त्या असमंजास नगरा बाहेर घालवून द्यावा. अशी आज्ञा होतांच प्रधानानीं त्यास घालवून दिलें. नंतर अंशुमानास बोलला कीं, हे पुत्रा, सर्व लोकांच्या हिता करितां तुझ्या पित्याचा मी त्याग केला व माझे दुसरे पु त्र मरण पावले. यज्ञाचा अश्वही सांपडत नाहीं, या कारणावरून मी परा काष्ठेचा मोहित झालों, ह्मणोन मी तुला सांगतों कीं, अश्वाचा शोध करून माझा नरकापासून उद्धार कर. असें ऐकून अंशुमान अश्वशोधार्थ निघा ला. फिरतां फिरतां कांहीं दिवसानीं जेथें पृथ्वी विदारण केली होती तेथें जाऊ न त्याच मार्गानें समुद्रांत प्रवेश करितांच कपिल मुनी दृष्टीस पडून घोडा- ही दृष्टीस पडला. नंतर अंशुमानानें ऋषीस नमस्कार करून आपलें संपूर्ण वृत्त निवेदन केलें असतां कपिल बोलले मी प्रसन्न जाहलों, इच्छित असेल तो वर माग. असें ऐकून अंशुमान बोलला हे ऋषे, आपण यज्ञसमाप्तीकरि तां अश्व द्यावा आणि पितरांचा उद्धार होईल या विषयीं उपाय सांगावा. असें ऐकतांच कपिल बोलतो तूं सत्यवाक्य व क्षमाशील आहेस. तुझ्या प्र सादानें हे सागर स्वर्गलोकास जातील. तुझा नातु महादेवास संतुष्ट करून सागरांस पावन करण्या करितां स्वर्गापासून गंगेस भूमंडळीं आणील;

तू हा अश्व घे आणि राजाचा यज्ञ समाप्त कर. असें ऐकतांच अंशुमान तो अश्व घेऊन सगराचे मंडपांत आला आणि राजास साष्टांग नमस्कार करून नंतर साठ हजार सगर पुत्रांच्या मरणाचा वृत्तांत सांगून त्यानें राजाचे स्वाधीन अश्व केला. त्या कालीं पुत्र मरणजन्य दुःख राजानें टाकून अंशुमानाचा परम सत्कार करून यज्ञसमाप्ति केली आणि समुद्रास पुत्रत्वाची कल्पना करून कांहीं दिवस उत्तम प्रकारें पृथ्वीचें राज्य केलें. नंतर संपूर्ण राज्य आपले पौत्राचे स्वाधीन करून आपण स्वर्गलोकीं गेला. अंशुमानानेंही सगराचे पाठिमागें उत्तमप्रकारें समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य केलें. कांहीं कालानें आपला पुत्र जो दिलीप यास संपूर्ण राज्य देऊन अंशुमान तपश्चर्या करितां वनांत गेला. दिलीपानेंही आपल्या पितरांचें मरण श्रवण करून गंगेस आणण्या विषयीं बहुत प्रयत्न केला; परंतु गंगा आली नाहीं. नंतर दिलीपानेंही आपला पुत्र भगीरथ धर्मपरायण व सत्यवाक् आहे, असें जाणून त्यास राज्याभिषेक करून आपण वनांत गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

१०८. अध्याय एकशें आठ:- लोमश भाषण करितात हे धर्मराजा, भगीरथ राजानें आपले पितरांस कपिल महामुनीपासून मरण प्राप्त झालें, हें श्रवण करून आपले पितरांस स्वर्ग प्राप्त होईल तो यत्न करावा, असा निश्चय करून संपूर्ण राज्याधिकार आपले सचिवांस अर्पण करून तो तपस्ये करितां हिमालयाच्या पृष्ठभागीं गेला. फलें, मूलें भक्षण करून व जलप्राशन करून सहस्र संवत्सर पर्यंत राजानें तपस्या केली असतां गंगा ती तपस्या पाहून मूर्तिमान् शरीर धारण करून राज्याच्या अग्रभागीं येऊन बोलली हे राजा, अशी घोर तपस्या करून कशाची इच्छा करितोस? असें ऐकून भगीरथ बोलला हे देवि, कपिल महामुनीच्या नेत्राग्नीनें माझे संपूर्ण पितर दग्ध झाले, त्यांचा उद्धार होऊन त्यांस स्वर्ग प्राप्त व्हावा या इच्छेनें येथें तप करण्यास मी आलों. तुझें जल त्यांच्या रक्षेवर सिंचन केलें असतां त्यांचा उद्धार होऊन ते स्वर्गी जातील. जर तुझी कृपा नसेल तर त्यांचें स्वर्गलोकीं गमन कधींही होणार नाहीं; यास्तव हे गंगे, माझ्या पितरांचा तूं उद्धार करावास. हे धर्मराजा, असें भगीरथानें भाषण ऐकून गंगेनें प्रतिज्ञा केली कीं, हे राजा, तुझ्या वचना प्रमा-

णें मी पृथ्वीवर गमन करेन; परंतु माझा वेग सहन करण्यास एक शिवावांचू न कोणी समर्थ नाहीं. यास्तव शिवाचें आराधन करून त्यास प्रसन्न कर म्हणजे तो माझा वेग सहन करील आणि तुझे पितर स्वर्गास जातील. असें ऐकून भगीरथश्री शंकरास प्रसन्न करण्या करितां कैलास [illegible] जाऊन संपूर्ण पितरांचा उद्धार झाला तरच राज्यावर गमन करीन अशी प्रतिज्ञा करून त्यानें तीव्र तपस्येस आरंभ केला. असा विषय या अध्यायांत आहे.

१०९. अध्याय एकशें नऊ.- लोमश सांगतात हे धर्मराजा, भगीरथाचे तीव्र तपानें शंकर प्रसन्न झाल्यावर बोलले हे भगीरथा, आतां गंगेची प्रार्थना कर मी तिचा वेग सहन करितों. असें सांगतांच भगीरथानें गंगेची स्तुति केली. तेव्हां गंगा विद्युल्लते सारखा शब्द करीत शिवाच्या ललाटभागीं पडली. हें कौतुक पाहण्या करितां सर्व देव, महान् महान् ऋषि, गंधर्व, यक्ष, राक्षस आले. शिवानीं ललाटभागीं गंगेचा वेग सहन केला असतां तिचे तीन भाग होऊन शिवाच्या कंठभागीं मुक्ताफला सारखे शोभूं लागले. नंतर ती गंगा भगीरथाचें प्रिय होण्यास्तव पृथ्वीवर अवतरून भगीरथास बोलली हे राजा, तुझे पितर कोठें आहेत ते मला दाखीव म्हणजे त्या मार्गानें मी गमन करीन. असें ऐकून जिकडे सगरपुत्र मरण पावले होते तिकडे समुद्रमार्गानें गंगेस घेऊन गेला असतां त्या कालीं भगीरथाच्या योगानें संपूर्ण समुद्र अगस्तीच्या प्राशनें करून रिक्त झाला होता तो पूर्ववत भरून गेला. इकडे शिव आपले गणांसह वर्तमान स्वस्थानीं गेले. नंतर तो भागीरथीचा ओघ राजानें आपल्या पितरांची जेथें रक्षा होती तेथें आणून सोडला. आणि संपूर्णांच्या नामानें गंगाजलांत तिलांजली देऊन संपूर्णांचा उद्धार केला. लोमश म्हणतात हे धर्मराजा, गंगा पृथ्वीवर येण्याचें कारण, समुद्राचें पूरण कसें झालें व अगस्त्य ऋषीनीं वातापि नामक राक्षस कसा मारिला? हा वृत्तांत तुला मी सांगितला. असा विषय या अध्यायांत आहे.

११०. अध्याय एकशें दहा.- वैशंपायन बोलतात हे जनमेजया, नंतर धर्मराज नंदा, अपरनंदा त्या नद्या हेमकूटनामक पर्वताच्या अधोभागीं आहेत तेथें गेला आणि पर्वताची शोभा पहात ज्या पर्वतावर बहुत पाषाण

व वातबंध मेघ निरंतर असतात, वेदांचा घोष श्रवणांत येतो व रात्रंदिवस-तेथें वास करणारे जे ऋषी व देव यांस अग्नीचें मूर्तिमंत दर्शन होतें व ज्याचें दर्शन जाहलें असतां मनुष्यास स्त्रिया, गृहें इत्यादिकांची इच्छा होत नाहीं. असा जो हेम कूट पर्वत त्याजवरील नाना प्रकारचे चमत्कार पाहून लोमशा स बोलतात. हे ऋषे, हा काय चमत्कार याचा वृत्तांत मला सांगावा. असा प्रश्न ऐकून लोमश बोलतात हे राजा, या हेमकूट पर्वतावर पूर्वी ऋषभनामक तापसी अनेक वर्षे पर्यंत तप करीत होता. कोणे एके दिवशीं त्यास दुसऱ्यानें विघ्न केलें तेव्हां त्यानें क्रुद्ध होऊन पर्वतास शाप दिला कीं, येथें पाषाणाची वृद्धि होईल. वायूस सांगितलें कीं, तूं निरंतर या पर्वतावर वास कर; परंतु शब्द करूं नको. मेघास सांगितलें कीं, व्यर्थ या पर्वतावर जो वास करील त्यास तूं आपल्या शब्दानें दुःख दे. असे ऋषभानीं पर्वतास शाप दिले; तेव्हां पासून या पर्वताचें नांव ऋषभ असें झालें. कोणे एके दिवशीं नंदा नदीमध्यें संपूर्ण देव स्नाना करितां आले होते त्यांचें दर्शन घेण्या करितां हजारों लोक त्या नदीतीरीं आले. हें पाहून देव त्यांस आपलें दर्शन न व्हावें या बुद्धीनें त्या पर्वताचा दुर्ग करून त्यांत राहिले. आणि संपूर्ण लोकांच्या दृष्टि त्यानीं बंद केल्या. त्या दिवसा पासून कोणीही त्या पर्वताकडे पाहण्यास समर्थ होत नाहींत. मग वास कोठून होणार? तपावांचून या गिरीचें दर्शन होणें अशक्य मग आरोहण होणें कोठून? तस्मात् हे धर्मराजा तूं मौन धर. पूर्वी देवानीं या पर्वतावर यज्ञ केला होता त्याचें चिन्ह असें आहे कीं, या पर्वतावर दूर्वा कुशां सारख्या उत्पन्न होतात. भूमी वेदी सारखी दिसते. सर्ववृक्ष यज्ञयूपा सारखे दिसतात. ऋषींस साक्षात् अग्नीचें दर्शन होतें. यास्तव हे राजा, तूं या पर्वताचें दर्शन करून नंदानदींत स्नान कर, तेणें करून निष्पाप होशील. नंतर कौशिकी नदी आहे तेथें पूर्वी विश्वामित्र ऋषीनीं तप केलें. त्या नदीमध्यें भ्राते, भार्या व ब्राह्मणांचा समुदाय यांसहवर्तमान तूं स्नान कर. या कौशिकी नदीच्या तीरीं पूर्वी विश्वामित्रानीं तपस्ये करितां आश्रमही बांधिला आहे त्याचें दर्शन कर. विभांडकनामक ऋषीचा आश्रमही याच कौशिकीतीरीं मह्मन् पुण्यकारक आहे. तेथें पूर्वी विभांडकापासून मृगीच्या ठायीं उत्पन्न झालेला

जो ऋष्यशृंग याणें संपूर्ण इंद्रियांचा निग्रह करून याच आश्रमीं मोठें तप केलें. नंतर लोमपाद या नामें करून परम विख्यात एक राजा होता त्याचे देशांत आवर्षण झालें ह्मणून त्याणें ऋष्यशृंगास आपले देशांत आणून शांता नामक आपली कन्या त्या ऋषीस दिली. नंतर ऋष्यशृंगानीं संतुष्ट होऊन इंद्रास पर्जन्याविषयीं आज्ञा देतांच राजाचे देशांत उत्तम प्रकारची सुवृष्टि झाली. कांहीं काला नंतर भार्येसहवर्तमान ऋष्यशृंग आपले आश्रमीं येऊन रममाण झाला. असें भाषण ऐकून धर्मराज प्रश्न करतात हे ऋषे, विरुद्ध योनी जी मृगी इचे ठायीं ऋष्यशृंग कसा उत्पन्न जाहला? लोमपाद राजाचे देशांत इंद्रानें अनावृष्टि केली असतां ऋष्यशृंगाच्या भयानें पुनः इंद्रानें सुवृष्टि केली याचें कारण काय? शांता आपली कन्या राजानें ऋषीस दिल्या नंतर त्या कन्येनें ऋषीचें उत्तम प्रकारें मनोधारण कसें केलें? हें संपूर्ण वृत्त मला निवेदन कर. लोमश सांगतात हे धर्मराजा, कोणे एके कालीं महान् डोहामध्यें विभांडक ऋषि तपस्या करीत असतां उर्वशी अप्सरा त्या डोहांत स्नानास आली होती. तीस विभांडकानें पाहून तो कामातुर झाला असतां त्या डोहामध्यें त्याचें रेत विसर्जन झालें. तें कोणी एके हरणीनें प्राशन केलें तेव्हां ती गर्भिणी झाली. ही हरणी पूर्वीं देवकन्या होती. कांहीं कारणास्तव ब्रह्मदेवानीं शाप दिला कीं, तूं मृगी होशील आणि तुझ्या उदरापासून एक मुनीचा पुत्र झाल्यावर तूं मुक्त होऊन पूर्वपदास जाशील. तेव्हां ब्रह्मदेवाच्या शापानें देवकन्या मृगी झाली. तिजपासून हा ऋष्यशृंग उत्पन्न झाला. त्याच्या मस्तकीं एक शृंग होतें ह्मणून पृथ्वीवर याचें नाव ऋष्यशृंग असें प्रसिद्ध झालें. त्या ऋषीनें पित्याशिवाय कोणीही पाहिला नाहीं, यास्तव तो सर्वदां ब्रह्मचर्यानें राहत असे. कोणे एके दिवशीं अंगदेशाचा राजा दशरथाचा सखा जो लोमपाद याणें कोणे एके ब्राह्मणास दान देण्याचें कबूल करून नंतर पुरोहिताचे वचना वरून त्यास दिलें नाहीं त्यामुळें तो ब्राह्मण दुःखी होऊन राजाच्या गृहापासून गेला. त्या दिवसा पासून संपूर्ण ब्राह्मणानीं राजाचा त्याग केला. त्या पातकाच्या योगानें इंद्रानें त्याचे राज्यांत आवर्षण केलें, तेणें करून प्रजा पीडित झाल्या. कोणे एके दिवशीं महान् तपस्वी ब्राह्मणास राजानें प्रश्न केला कीं, हे ब्राह्मण हो, माझे देशांत

आवर्षण पडण्याचें कारण काय? व आतां उत्तम प्रकारें करून देशांत पर्जन्य पडेल या विषयीं उपाय सांगावा असें ऐकून कोणी ब्राह्मणानीं बहुत प्रकारचे उपाय सांगितले. त्यामध्यें कोणी एक ऋषीनें सांगितलें कीं, हे राजा, तुझ्यावर ब्राह्मणांचा कोप झाला. त्या योगानें तुझ्या देशांत आवर्षणपडलें. आतां तूं याचें प्रायश्चित्त करून नंतर विभांडकाचा पुत्र जो ऋष्यशृंग यास आपले गृहीं आणावा ह्मणजे इंद्र तुझ्या देशांत पर्जन्य वृष्टि करील. असें ऐकून तत्काल राजा यथोक्त प्रायश्चित्त करून पुनः ब्राह्मणाकडे गेला. त्याकालीं संपूर्ण प्रजा संतुष्ट झाल्या. नंतर राजानें आपले वृद्ध वृद्ध अमात्यांस आज्ञा केली कीं, ऋष्यशृंग आपले गृहीं येईल, असा यत्न करावा तेव्हां अमात्यानीं राजास सांगितलें कीं, हे महाराज, आमच्यानें हें कार्य व्हावयाचें नाहीं. ऋषी तर केवल वनचर आहे, याजकरितां उत्तम स्त्रिया तेथें पाठवाव्या ह्मणजे त्यांस पाहून तो इकडे येण्या विषयीं मति धारण करील. असें भाषण ऐकून राजानें उत्तमोत्तम ज्या वारांगना यांस ऋष्यशृंगास आणण्या विषयीं आज्ञा दिली असतां संपूर्ण वारांगना राजास बोलल्या हे महाराज, तो तपस्वी आहे तेव्हां त्याचें येणें आमच्यानें व्हावयाचें नाहीं. तेव्हां एक वृद्ध वारांगना बोलली हे महाराज, मी त्या ऋषीस इकडे येण्या विषयीं यत्न करितें; परंतु माझ्या इच्छे प्रमाणें सामुग्री देण्या विषयीं आज्ञा असावी. असें ऐकतांच राजानें तिजला आणण्या विषयीं आज्ञा दिली असतां आपल्या बराबर उत्तमरूपवंत स्त्रिया घेऊन ऋष्यशृंगास मोहन करण्या करितां ती वृद्ध वारांगना गेली. असा विषय या अध्यायांत आहे.

१११. अध्याय एकशें अकरा:– लोमश सांगतात हे धर्मराजा, लोमपाद राजाची कार्यसिद्धि होण्या करितां रंभेनें वनामध्यें गमन करून विभांडक ऋषीच्या आश्रमा जवळ एक नौकेचा आश्रम करून त्याचे आसमंतात भागीं नानाप्रकारचे फलें मूलें ईहीं करून कृत्रिमरूप वृक्ष उत्पन्न केले. असा उत्तम प्रकारचा रमणीय नौकाश्रम करून कोणे एके दिवशीं त्यांत आपण बसली, आणि दूतांस बोलली विभांडक ऋषि आपले आश्रमीं आहेत किंवा दुसरे कोठें गेले याचा शोध करून मला निवेदन करा. अशी तिची आज्ञा हो

तांच कोणी एक दूत ऋष्याश्रमीं गेला आणि त्यानें पुनः वेश्येस येऊन सांगित लें कीं विभांडकऋषि वनांत गेले आहेत आणि ऋष्यशृंगमात्र एकटाच आश्रमां त आहे. इतकें ऐकतांच ती वेश्या ऋषीच्या आश्रमीं गेली. आणि ऋष्यशृंगास पाहून बोलली हे ऋषे, तुह्मीं व तुमचे संपूर्ण ऋषि कुशल आहेतना? वनामध्यें फलमूलें तुह्मांस भक्षण करण्या करितां मिळतात किंवा नाहीं? याच आश्रमाम ध्यें तुह्मीं निरंतर वेदाध्ययन करून कालक्षेप करताना? तुमचा पिता जो विभां डक त्याच्या तपाची उत्तरोत्तर वृद्धि आहे ना? तुह्मीं महान् तपस्वी असें जाणू न तुमच्या दर्शना करितां मी येथें आल्यें. असा वेश्येचा कुशल प्रश्न ऐकून ऋ ष्य शृंग भाषण करितो. तुमचें तेज अतिशय सुंदर दिसतें. तुह्मीं साक्षात् ऋषि आमचे आश्रमीं आला ह्मणून तुह्मांस मी नमस्कार करितों. हें कुशास न कृष्णाजिनानें संवृत केलेलें याजवर सुखें करून उपवेशन करा. तुमचा आश्रम येथून किती दूर आहे? तुमचें नांव काय? तुमचें रूप तर देवां सार- खें दिसतें. तस्मात् तुह्मीं संपूर्ण आपला वृत्तांत सांगा. असें ऐकून वेश्या भा षण करते हे काश्यपपुत्रा, तुझ्या आश्रमा पासून माझा आश्रम तीन योजनें लांब आहे तेथें आह्मीं निरंतर वास करितों. आमचा धर्म असा आहे कीं, आ ह्मीं कोणाचा नमस्कार घेत नाहीं. असें ऐकून ऋष्यशृंग बोलतो हे ऋषे, आ मच्या आश्रमीं नानाप्रकारचीं आमलकादि फलें आहेत तीं मी देतों. तीं प्री तीनें भक्षण करा. वेश्येनें त्या संपूर्ण फलांचा त्याग करून आपल्या जवळ चीं उत्तमप्रकारचीं पक्वान्नें ऋष्यशृंगास भक्षणास दिलीं. सुगंधी द्रव्यें व चित्र विचित्र वस्त्रें व उत्तम प्रकारचीं पान करण्याचीं द्रव्यें हीं ऋषीस दिलीं. तीं ऋष्यशृंगानें घेऊन तो परम संतुष्ट जाहला. नंतर वेश्येनें ऋषीबरोबर हास्य क्रीडा इत्यादिकांस आरंभ केला. वारंवार आलिंगन देऊन ती अंगस्पर्श क रूं लागली. तेणें करून ऋष्यशृंगाच्या इंद्रियास कांहींसा विकार झाला. हें त्या वेश्येनें पाहतांच अग्निहोत्राचे मिषानें ती आपले आश्रमीं गेली. इकडे ऋष्य शृंगाच्या शरीरांत कामाचा आविर्भाव होऊन श्वासोच्छ्वास टाकीत तो उगी च बसला. इतक्यांत विभांडक वनांतून आश्रमीं आला आणि पुत्रास पा हतो तों नित्यासारखी पुत्राची चर्या दिसली नाहीं हें पाहून विभांडक ऋषि

बोलला हे पुत्रा, होमाकरितां समिधा सिद्ध केल्यास किंवा नाहीं व गाईचें दुग्ध दोहन केलेंस किंवा नाहींस, होम पात्राचें प्रक्षालन केलें किंवा नाहीं हे पुत्रा, आज तूं दीन कां झालास नित्या प्रमाणें तुझी मुखश्री दिसत नाहीं. आश्रमांत कोणी आला होता कीं काय? असा विषय या अध्यायांत आहे.

११२ अध्याय एकशें बारा.— ऋष्यशृंग भाषण करतो हे तात, तुम्ही वनांत गेल्यानंतर कोणी एक जटिल ऋषि आपले आश्रमीं आला होता त्याच्या रूपाचें काय वर्णन करूं? तो सूर्या सारखा तेजस्वी होता त्याचे नेत्र तर केवल कमळ पत्रा सारखे मला दिसले, जटा तर बहुत नीलवर्ण असून सुवर्णाच्या रज्जूनीं ग्रंथित केल्या होत्या अशा जटा पाहून मला तर फारच हर्ष झाला. गळ्यामध्यें विद्युल्लते सारखी तेजस्वी एक माला आणि कंठाच्या अधोभागीं दोन मांसपिंड अति सुशोभित होते, कटि प्रदेश सिंह कटी सारखा होता, पायांमध्यें जीं भूषणें होतीं त्यांच्या शब्दानें मी मोहित झालों, जशा आपल्या हस्ता मध्यें रुद्राक्षाच्या माला असतात तशा त्या ऋषीच्या हस्तांत रत्नखचित सुवर्णाचीं वलयें मी पाहिलीं त्याचे गमन तर केवल हंसासारखें चमत्कारिक होतें त्याचे शरीरावर जीं सूक्ष्म व तेजस्वी वस्त्रें होतीं तीं तर मी पाहून फारच दिपुन गेलों. त्याचें मुख आपल्या सारखें भस्मानीं चर्चित नसून चंद्रा सारखें आल्हादकारक व दुसऱ्याचे मनास मोह करणारें होतें. वाणी तर जशी काय साक्षात् अरण्यांतील कोकिलाच काय अशी होती. चैत्र वैशाख मध्यें उत्तम प्रकारच्या पुष्पादिकें करून युक्त जें वन त्यांतील वायूच्या आघ्राणें करून मनुष्यास जसा आनंद होतो तसा हा ऋषी जेव्हां आपले आश्रमीं आला तेव्हां सुगंध सुटला त्याच्या जटा आपल्या सारख्या मृत्तिकेनें संसक्त झाल्या नसून निरनिराळे केश सुगंधी द्रव्यानें चर्चित केले होते. हाता मध्यें एक वाटोळा चेंडू घेऊन माझ्या पुढें त्याणें ज्या कालीं बहुत क्रीडा केली त्या कालीं हा कोणी तरी देवाचा पुत्र आकाशांतून मला भेटण्या करितां आला. असें मी समजून त्याच्यावर माझी पराकाष्ठेची प्रीती उत्पन्न झाली, त्याणें वारंवार आलिंगन देऊन व माझे मुखावर त्याणें आपलें मुख ठेवून एक चमत्कारिक शब्द केला तेणें करून तर मला फारच हर्ष झाला. पाद्य, अर्घ्य व आचमनादिकें करून मी त्याची पू-

जा करण्यास उद्युक्त झालों आणि आपल्या आश्रमांत जीं फलमूलें होतीं तीं भ
क्षण्या करितां दिलीं; परंतु त्याणें मला असें भाषण केलें कीं, दुसऱ्याचें पाद्यअ
र्घ्य आह्मीं ग्रहण करीत नाहीं हें आमचें व्रत होय. असें बोलून त्या ऋषीनीं उ
त्तम प्रकारचीं मधुर फलें मला दिलीं तशीं फलें मी जन्मांत कधीं पाहिलीं नवतीं
नाना प्रकारचीं मधुर पान द्रव्यें जीं त्याणें मला दिलीं तेणें करून मी अगदींमो
हित होऊन ही पृथ्वी फिरते असें मला वाटूं लागलें. हीं सुगंधिक पुष्पें त्या ऋ
षीनें आपले जटेंतून काढून मला दिलीं तीं हीं पहा. ऋषि आपल्या आश्रमां
त येतांच सूर्यासारखी त्याची प्रभा पडली. हे तात, इतकें झाल्यानंतर तो ऋ-
षि येथून आपले आश्रमीं निघून गेला. तेव्हांपासून त्याची केव्हां भेट होई
ल अशी मला इच्छा उत्पन्न होऊन संपूर्ण शरीरास विभ्रम झाला. मनामध्यें
असें येतें कीं, त्याचे आश्रमीं जाऊन त्या सारखी दीक्षा धरावी त्याचें दर्शन पु-
नः जेव्हां होईल तेव्हां माझ्या चित्ताचें समाधान होईल. असा विषय या
अध्यायांत आहे.

११३ अध्याय एकशें तेरा.— लोमश ह्मणतात हे धर्मराजा, असें ऋष्यशृंगाचें भाषण ऐकून विभांडक ऋषी बोलला हे पुत्रा, वनामध्यें राक्षस नानाप्रकारचीं स्वरूपें धरून ऋषींच्या तपास विघ्न करण्याकरितां फिरत-असतात; परंतु जितेंद्रिय जे ऋषी त्याणीं त्यांच्याशीं संबंध ठेवूंनये आपल्या इंद्रियांचा निग्रह करून पापाच्यारी व दुष्ट जे असतील त्यांजकडे अवलोकन करूंनये, तसेंच मधुर रसपान करूंनये. सुगंधी पुष्पें व द्रव्यें यांचें सेवन करूं नये, या पदार्थांचा अंगिकार जे मूर्ख व कामी असतील त्याणीं करावा. हे पुत्रा; ज्या ऋषीनीं तुला कृत्रिम स्वरूप धरून मोह उत्पन्न केला असेल त्यांचा शोध मी करतों तूं आश्रमीं स्वस्थ वास कर. असें ह्मणोन विभांडक ऋषीनें वनांत जाऊन तीन दिवस पर्यंत शोध केला; परंतु शोध लागला नाहीं. नंतर विभांडक ऋषी पुनः फलमूलें आणण्याकरितां अरण्यांत गेले हें वर्तमान दूत द्वारा वेश्येनें श्रवण करतांच ती ऋष्यशृंगाचे आश्रमास आली, हें ऋष्यशृंगानें पाहून तो तिला बोलतो जों पर्यंत माझा पिता वनांतून आला नाहीं तों पर्यंत मी-तुझ्या आश्रमीं येतों. असें ऐकतांच तत्काल वेश्येनें त्यास आपले आश्रमींने

ऊन बहुत प्रकार त्यास मोह उत्पन्न केला आणि शेवटीं लोमपाद राजाचे गृ हीं नेला. राजानें ऋष्यशृंगास एका एकीं देवा सारखा पाहून त्याची पूजा केली आणि आपले अंतःपुरांत नेऊन ठेविला तों संपूर्ण देशामध्यें सुवृष्टी होऊन सर्व प्रजा सुखी झाल्या. राजानें ही आपल्या शांता नामक कन्येशीं ऋष्यशृंगाचा विवाह केला. ऋष्यशृंग आपले गृहीं आल्यानंतर लोमपाद राजानें आपल्या देशामध्यें संपूर्ण लोकांस आज्ञा केली कीं, पुत्रशोकें करून विभांडक ऋषी आपले देशीं पुत्र शोधास्तव येईल, याज करितां संपूर्णांनीं अशी सिद्धता ठेवावी कीं, ज्याचे ग्रामांत विभांडक ऋषि येतील त्याणीं ऋषीचें उत्तम प्रकारें आतिथ्य करून मर्जी संतुष्ट ठेवावी. ऋषि विचारतील कीं, हा देश कोणाचा तेव्हां ग्रामनिवासी लोकानीं सांगावें कीं, हे महाराज संपूर्ण ग्रामातील गाई, ह्मशी, गोंळी, शेनकरी व द्रव्य संपूर्ण ऋष्यशृंग नामक ऋषीचें आहे आह्मीं संपूर्ण त्याचे दास आहोंत त्याणींच आह्मांस अशी आज्ञा दिली त्याज वरून आह्मीं सिद्धता ठेविली. याप्रमाणें अंगराजाची आज्ञा होतांच संपूर्ण लोकानीं तशी सिद्धता ठेविली. इकडे विभांडक ऋषि आपले आश्रमीं आले तों आश्रमांत पुत्र नाहीं असें पाहून ऋषीस पराकाष्ठेचा क्रोध आला आणि त्यानीं पुत्राचा शोध बहुत केला, परंतु कोठें ठिकाण लागला नाहीं. ऋषीस वाटलें कीं, हें कृत्य अंगराजाचें आहे तस्मात् त्या नगरीं जाऊन राज्या सहित पुराचा दाह करून टाकावा. असा विचार करून ऋषि अंगदेशीं जाण्यास निघाला. जातां जातां मार्गामध्यें ऋषि सायंकाळीं एक ग्रामामध्यें गेला असतां ग्रामनिवाशी लोकांनीं राज आज्ञे प्रमाणें ऋषीचा उत्तम प्रकारें सत्कार केला तेव्हां ऋषीनें विचारलें कीं, हें राज्य कोणाचें आहे? तेव्हां सर्वांनीं उत्तर दिलें कीं, हें सर्व तुझ्या मुलाचें आहे. याप्रमाणें चंपानगरी पर्यंत प्रतिगावीं ऋषीचा पराकाष्ठेचा सत्कार केला असतां विभांडक ऋषी संतुष्ट झाला. नंतर चंपानगरी मध्यें प्रवेश करून शांता स्नुषेसह वर्तमान ऋष्यशृंगास पाहून अंगाधिपती जो लोमपाद राजा यास बोलला हे राजा, संपूर्ण तुझ्या देशामध्यें मी बहुत सुख पावलों तुझें कार्य आहे तों पर्यंत ऋष्यशृंगास आपले गृहीं ठेव. असें बोलून पुत्रास ही सौ

गितलें कीं, हे पुत्रा, अंगाधिपतीची इच्छा असेल तों पर्यंत त्याचें प्रिय करून व तुला पुत्र झाल्यावर आश्रमीं यावेंस. असें सांगोन विभांडक- ऋषि आश्रमीं गेले. कांहीं दिवसांनंतर ऋष्यशृंग ही शांने सहवर्तमान- आपले आश्रमीं येऊन सुखानें राहिला. चंद्राची भार्या रोहिणी, वसिष्ठा ची अरुंधती, अगस्त्याची लोपामुद्रा, नलाची दमयंती, इंद्राची इंद्राणी त्या आपल्या पतीस जशा अनुकूल होत्या तशी शांता ऋष्यशृंगास मनोभा- वें अनकूल होती त्या ऋष्यशृंगाचा हा पुण्य कारक आश्रम व जेथें विभां डकानें तप केलें तो हा न्हद येथें स्नान करून एक दिवस या आश्रमीं वा- स कर ह्मणजे राजा तूं रुत कार्य होशील. अ. वि. या अ. आहे.

११४ अध्याय एकशेंचवदा.- वैशंपायन सांगतात जनमेजया, कौ शिकी नदी पासून पांडव गंगासागर संगमास जाण्या करितां निघाले ते जा तां जातां कलिंग देशीं आले त्या कालीं लोमश बोलतो हे राजा, कलिंग नाम- क हा देश, त्या नदीस वैतरणी असें ह्मणतात पूर्वी येथें महान् ऋषींसहव र्तमान यमधर्म याग करून देवांस शरण गेला तो हा वैतरणीच्या उत्तरती रीं पुण्य कारक पर्वत अवलोकून याच स्थलीं पूर्वी ऋषींनीं याग केला त्या याग संबंधीं पशू रुद्रानें हरण करून सर्व देवांस सांगितलें कीं, हा भाग- आमचा आहे तुह्मांस मिळणार नाहीं. असें बोलल्यावर संपूर्ण देव रु- द्रास बोलले हे भगवन्, आमच्या भागाचा तूं नाश करूं नको, कारण यापा सून अनेक अधर्म उत्पन्न होतील. असें बोलून संपूर्ण देवानीं बहुत प्र- कारच्या स्तुतीनीं त्यास तृप्त केला असतां श्री महादेव देवांचे भाग देऊन आपण स्वस्थानीं गेले. तेव्हां पासून संपूर्ण देव रुद्राच्या भयास्तव यज्ञा मध्यें हविरभागा विषयीं कलह करीत नाहींत. असें जाहाल्या नंतर संपू र्ण देवानीं असें वर्णन केलें आहे कीं, या वैतरणीचें जो जल स्पर्श करील त्याच्या दृष्टीस देवांचे मार्ग व देवांचे लोक पडतील. असें ऐकून भ्रात्यांस ह वर्तमान धर्मराजानें वैतरणी नदी मध्यें स्नान करून देव व पितरांचें तर्पण करतांच त्यास संपूर्ण देवांचे लोक दिसूं लागले. तेव्हां धर्मराज भा षण करतो हे ऋषे, वैतरणी नदींत स्नान करतांच संपूर्ण अज्ञानाचा नाश

झालां आणि संपूर्ण देवलोक मला दिसूं लागले व वैखानस नामक ऋषीच्या जपाचा शब्द माझे श्रवणांत येतो हें मोठें आश्चर्य आहे. असें ऐकून लोमश बोलतात हे राजा, तीनसहस्त्र योजनें येथून वैखानसाचें स्थल आहे तेथून तुला जपशब्द श्रवणांत आला अशी तुझी स्नानमात्रें करून पुण्याची वृद्धी झाली आतां स्वस्थ बैस भाषण करूंनको. हे राजा, हें स्वयंभूचें वन पहा कसें सुशोभित दिसतें, या वनांत पूर्वी विश्वकर्म्यानें यज्ञ केला त्यांत पर्वत, नद्या, वृक्ष व सरोवरें यां सहवर्तमान संपूर्ण पृथ्वी स्वयंभूनें कश्यपास दान दिली. त्याकालीं पृथ्वी स्वयंभूस बोलली, हे लोकेश्वरा, मला-या मनुष्यास दान करूंनको जर दान करशीलतर तुझें दान व्यर्थ होईल आणि मि रसातळास जाईन. असें पृथ्वीनें लोकेश्वराशीं भाषण केलेलें कश्यपानें ऐकून तिजला संतुष्ट केली आणि सलिला पासून काढिली, तेव्हां पासून संपूर्ण सागरांत पृथ्वी वेदीरूप झाली ह्मणोन या पृथ्वीवर राजा तूं कांहीं दिवस वास कर म्हणजे महावीर्यशाली होशील, नंतर यासमुद्रामध्यें स्नान कर तेणें करून तुला बहुत पुण्य प्राप्त होईल. स्नानकालीं ईश्वराची अशी स्तुती करावी कीं, हे देवा, तूं विश्वाचें रक्षण करणारा व दुःख हरण करणारा आहेस ह्मणोन समुद्रामध्यें स्नान करते समयीं तूं सान्निध्यकर अशी-स्तुती करून समुद्रामध्यें स्नान केलें असतां सफल होतें नाहीं तर निष्फल होतें. या मंत्राचा जप नकेला असतां कुशाग्रें करूनही समुद्रास स्पर्श करूं नये असें लोमशानीं सांगतांच धर्मराजानें भ्रात्यां सह वर्तमान समंत्रक स्नान करून महेंद्र नामक पर्वतीं एक दिवस वास केला. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

११५ अध्याय एकशें पंधरा.– वैशंपायन भाषण करतात हे जनमेजया, धर्मराजानें महेंद्र पर्वतीं एक दिवस वास करून तेथील ऋषींचा सत्कार केल्यानंतर भृगु, अंगिरा, वसिष्ठ, काश्यप प्रभृती ऋषींचा प्रत्येक नाम निर्देश लोमशानीं करतांच राजानें हस्त जोडून पुनः त्यास साष्टांग नमस्कार करून अकृतव्रण नामक परशुरामाचा एक अनुचर होता त्यास विचारलें कीं, ह्या संपूर्ण ऋषींस परशुरामानें दर्शन कधीं होतें या प्रसंगें करून मला ही परशुरामाचें दर्शन होईल, असें ऐकून अकृतव्रण भाषण करतो:

हे राजा, परशुरामाचें आगमन येथें अष्टमी, चतुर्दशीस होत असतें त्याका लीं संपूर्णऋषी भार्गव रामाचें दर्शन करतात. हे धर्मराजा, तुझ्यावर परशु- रामाची प्रीती आहे. उदईक चतुर्दशी आहे याज करितां भार्गवराम येथें आ ले ह्मणजे तुला सहज दर्शन होईल. असें ऐकून युधिष्ठीर भाषण करतो हे अकृत व्रणा, परशुरामानें संपूर्ण क्षत्रियांचा पराभव कसा केला? हें करण्या चें कारण काय तें मला सांग. असा प्रश्न ऐकून अकृतव्रण बोलतो हे राजा, हय हय देशींचा जो अधिपती सहस्त्रार्जुन याचें आणि परशुरामाचें मो- ठें तुमुल युद्ध झालें. सहस्त्रार्जुन महान् पराक्रमी व सहस्त्रबाहूनीं गर्वि ष्ट असतां दत्तात्रयाच्या प्रसादानें त्यास यथेच्छ गमन करणारें असें एक स्व र्णाचें विमान मिळालें होतें त्या विमाना मध्यें त्याणें बसून संपूर्ण देवांचें मर्दन केलें, ऋषींस बहुत त्रास दिला आणि संपूर्ण भूतांस बहुत प्रकारें पिडा दि ली. कोणे एके दिवशीं संपूर्ण देव व ऋषी एकत्र होऊन श्री विष्णूस शरण जाऊन बोलले हे भगवन्, आमच्या संरक्षणा करितां कार्तिवीर्याचा नाश क रावा, इतक्यांत इंद्राणी सहवर्तमान इंद्र आपल्या अमरावती मध्यें क्री- डा करीत होता त्याचें धर्षण करण्या करितां कार्तिवीर्य इंद्रलोकीं गेला अ सतां इंद्रानें तत्काल पलायन केलें आणि विष्णु लोकीं येऊन आपला संपू- र्ण वृत्तांत विष्णूस निवेदन केला तो श्री विष्णूनें ऐकतांच ते बद्रिकाश्रमीं गे ले तों कान्यकुब्ज देशीं गाधि यानामें करून कोणी एक राजा महान् परा- क्रमी वनामध्यें वास करित असतां त्यास अप्सरे सारखी एक कन्या जा हाली ती कन्या भार्गव कुलोद्भव जो ऋचिक याणें पाहून तो गाधीस बोलतो हे राजा, या कन्येशीं मी विवाह करतों ही कन्या मला द्यावी त्याकालीं गा- धि राजानें त्यास सांगितलें कीं, ही माझी कन्या व्यर्थ द्यावयाची नाहीं इचें मौल्य एक हजार शामकर्ण अश्व, महान् वेगवान् असून त्यांचा एक कर्ण पां ढुर वर्णाचा असावा, असे शाम कर्ण जो आणून देईल त्यास ही मी देणार तेव्हां तूं या कन्ये विषयीं कशा करितां याच्ना करितोस? जर तुझी शक्ती अ सेल तर मी सांगितल्या प्रमाणें दे ह्मणजे तुला मी कन्या देईन असें ऐकून ऋचीक भाषण करतो हे राजा, सहस्त्र शामकर्ण तुला अर्पण करीन तं-

तर ही कन्या मला द्यावी. असें बोलून वरुणा कडे गेला आणि बोलला हे वरुणा, मला सहस्त्र शाम कर्ण अश्व द्यावे ह्मणजे ते मी गाधीस देईन आणि त्याची कन्या वरीन असें ऐकतांच वरुणानें सहस्त्र शामकर्ण अश्व दिले त्या दिवसा पासून हे धर्मराजा, त्या तीर्थास अश्वतीर्थ असें संपूर्ण लोक ह्मणतात नंतर ऋचिकानें ते अश्व घेऊन गाधी राजास दिले आणि त्याच्या कन्येशीं विवाह केला. त्याकाळीं संपूर्ण देवांस पराकाष्ठेचा आनंद झाला. एक काळीं आपल्या पुत्राचा विवाह झाला हें भृगुऋषीस समजल्यानंतर ते पुत्रास भेटण्या करितां आले आणि भार्येसहित पुत्रास पाहून हर्षित झाले नंतर ऋचिकानें स्त्रीसहित गुरूची उत्तम प्रकारें पूजा करून त्यास प्रसन्न केला असतां भृगुऋषी स्नुषेस बोलला हे स्नुषे, तूं कांहीं मजजवळ इच्छित वर माग मी देण्यास सिद्ध आहे. असें ऐकून स्नुषा बोलली हे महाराज, मला व माझे मातेस पुत्र असावा. असें ऐकून भृगुऋषी बोलले हे स्नुषे, तुझ्या मातेनें अश्वत्थास आलिंगन करावें व तूं उदुंबरास आलिंगन कर आणि हे चरुद्रव्याचे दोन पिंड भक्षण करण्या करितां देतों त्यां पैकीं एक पिंड तुझी माता भक्षण करील व एक तूं भक्षण कर ह्मणजे तुह्मां उभयतांस उत्तम प्रकारचे दोन पुत्र होतील; असें बोलून ऋषी अंतरधान पावले. नंतर स्नुषेनें ते पिंड मातेचे स्वाधीन केले असतां मातेनें ऋतुकाळीं पिंडाचा व्यतिक्रम करून कपटानें स्नुषेचा पिंड आपण भक्षण केला व आपला स्नुषेस दिला आणि वृक्षाच्या आलिंगनाचा तसाच व्यतिक्रम केला हें भृगूनीं दिव्य ज्ञानानें जाणोन कांहीं काळा नंतर स्नुषे कडे येऊन ते सत्यवतीस बोलले तुझ्या मातेनें वंचना करून चरूचा व वृक्षआलिंगनाचा व्यतिक्रम केला यास्तव तुला जो पुत्र होईल तो ब्राह्मण होईल, परंतु क्षात्रवृत्ती होईल आणि तुझ्या मातेस ब्राह्मणा सारखा आचरण करता महान् पराक्रमी, साधुमार्गांत निष्णात असा क्षत्रियपुत्र होईल. असें ऐकून स्नुषा बोलली हे महाराज, मला असा पुत्र द्यावा. असें ऐकून भृगुऋषी बोलले हे कल्याणी मी सांगितल्या प्रमाणें तुला पुत्राची इच्छा नसेल तर त्याप्रमाणें तुझा नातु होईल; परंतु मी सांगितलें हें कधीं असत्य होणार नाहीं. असें ऐकून स्नुषेनें तथास्तु असें ह्मटलें. पुढें कांहीं काळानीं सत्यवतीस जमदग्नी नामक एक पुत्र तप,

बल इहीं करून युक्त व वेदाध्ययनांत तत्पर असा झाला. जमदग्नी उत्पन्न होतांच संपूर्ण धनुर्वेद चच्यार प्रकारच्या अस्त्रविद्या ईहीं करून दिव्य वसूर्या सारखा तेजस्वी असा झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

११६ अध्याय एकशें सोळा.— अकृतव्रण ह्मणतो हे धर्मराजा, जमदग्नीनें वेदाभ्यास करून संपूर्ण वेद आपले स्वाधीन करून घेतल्या नंतर तो कांहीं दिवस तप करीत असतां एके दिवशीं प्रसेनजित यानामें एक राजा होता त्याची रेणुका नामक कन्या होती तिच्याशीं जमदग्नीनें विवाह केला कांहीं कालानें रेणुकेस पांच पुत्र झाले त्यांमध्यें परशुराम हा कनिष्ठ झाला, एके दिवशीं संपूर्ण जमदग्नीचे पुत्र अरण्यांत फलमूलें आणण्या करितां गेले असतां रेणुका ही स्नानास नदी तीरीं गेली तेथें चित्ररथ यानामें राजा भार्येसह वर्तमान क्रीडा करीत होता ती जल क्रीडा पाहतांच रेणुकेस कामाची इच्छा झाली. नंतर ती स्नान करून आश्रमांत गेल्यावर जमदग्नीनें तिला पाहतांच स्त्रीची ब्रह्मश्री नष्ट झाली असा मनामध्यें निश्चय करून रेणुकेचा धिःकार करून बहुत निंदा केली इतक्यांत ऋषीचे पांच पुत्र रुमण्वान्, सुषेण, वसु, विश्वावसु व परशुराम हे वनांतून आश्रमीं आले. हें जमदग्नीनें पहातांच रुमण्वाना स व दुसरे तिघे यांस या दुष्टेचा वध करावा अशी आज्ञा केली, परंतु मातृस्नेहास्तव त्यानीं पितृ आज्ञा पालन केली नाहीं तेव्हां जमदग्नीस परा काष्टेचा क्रोध येऊन त्यानें पुत्रांस शाप दिला कीं, तुह्मीं गतजीव होऊन जडासारखे या पृथ्वीवर पडाल असा ऋषीनीं शाप देतांच तत्काल तेचौघे पाषाणवत पृथ्वीवर पडले. नंतर जमदग्नीनें परशुरामास आज्ञा केली कीं, तूं इचा वध कर तेव्हां परशुरामानें परशु घेऊन मातेचा शिरच्छेद केला. हें पाहून जमदग्नी बोलला हे पुत्रा, मीं सांगितल्या प्रमाणें तूं महान् दुष्कर कर्म केलेंस तें पाहून मी संतुष्ट झालों आतां कांहीं वर मागणें असेल तो माग, तेव्हां परशुरामानें वर मागितले कीं, माझी माता मृत झालेली जिवंत व्हावी व मला वधजन्य पातक नसावें, तिला वधाची विस्मृती असावी हे संपूर्ण माझे भ्राते जिवंत व्हावे आणि युद्धामध्यें मला कोणी जिंकूं नये व दीर्घायुष्य मला असावें याप्रमाणें परशुरामानें वर मागतांच जमदग्नीनें तथास्तु ह्मणोन भाषण केलें. कांहीं दिवसानीं ऋषीचे संपूर्ण पुत्र आ

श्रमांतून वनांत गेले असतां अनुप देशींचा राजा कार्तिवीर्य जमदग्नीच्या आश्रमीं आला त्या कालीं ऋषिपत्नी राजाचें पूजन करण्यास प्रसक्त झाली; परंतु युद्ध व द्रव्य येणें करून उन्मत्त झालेला तो राजा ऋषिपत्नीची पूजा न घेतां बलात्कारें करून घरांत शिरला आणि वत्सासहित होमधेनु घेऊन चालला. त्या कालीं गाईनें बहुत रोदन केलें तों परशुराम वनातून येतांच गाईचें रोदन श्रवण करून बहुत क्रुद्ध झाला असतां पित्यानें ही झालेलें वृत्त त्यास सांगतांच तत्काल परशुराम, मृत्युवश झालेला जो सहस्रार्जुन, त्याच्या सन्मुख गेला असतां उभयतांचें युद्ध परम दारुण झालें. त्या युद्धामध्यें परशुरामानें सहस्रार्जुनाचे परिघा सारखे हट बाहू छेदून शेवटीं प्राण घेतला आणि आपली होमधेनु माघारी आणिली. हा वृत्तांत सहस्रार्जुनाच्या पुत्रांस कांहीं दिवसांनीं समजला असतां तेही युद्धार्थ आले आणि परशुराम आश्रमीं नाहीं असें पाहून अर्जुन पुत्र जमदग्नीस प्रहार करून ते वारंवार हे रामा, हे रामा, असें ह्मणत असतां त्यास मारून स्वस्थानीं गेले. इतक्यांत परशुरामानें वनांतून येऊन समिधा दर्भ आणिलेले ठेविले आणि पिता मरण पावला तणें करून दुःखित होऊन तो विलाप करूं लागला. असा विषय या-अध्यायांत आहे.

११७ अध्याय एकशें सत्रा :- अकृतव्रण भाषण करतो हे धर्मराजा, पित्याचें कलेवर पाहून परशुराम ह्मणतो हे तात, मी सहस्रार्जुनास मारिला हा अपराध झाला, ह्मणोन या दुष्टानीं तुझा घात केला, तूं धर्म मार्गामध्यें उत्तम प्रकारें कालक्षेप करणारा तेव्हां तुझ्या सारख्याचा प्राण घात करणें ही गोष्ट अयुक्त आहे. असे नाना प्रकारचे विलाप करतां करतां बहुत दुःखित झाल्यानंतर पित्याचीं दाहादि प्रेत कार्यें करून पित्रोद्देशें त्यानें पिंड दिले आणि क्रोधानें प्रतिज्ञा केली कीं, आज पासून पृथ्वीवर जितके क्षत्रिय असतील त्यांचा प्राण घेईन एकही क्षत्रिय पृथ्वीवर राहूं देणार नाहीं. अशी परशुरामानें घोर प्रतिज्ञा करून सहस्रार्जुनाचे समग्र पुत्र मारिले आणि त्यास जे साह्यभूत इतर क्षत्रिय देशांतराहून आले होते त्यांचाही संहार करून टाकिला. या प्रमाणें परशुरामानें एकवीस वेळा निःक्षत्रिय पृथ्वी करून रक्ताचे पांच ह्

द उत्पन्न केले आणि त्या रक्तानें तर्पण करून आपल्या पित्याची तृप्ती के
ली त्या रक्त ह्रदास समंत पंचक अशी संज्ञा आहे. कांहीं दिवसानीं त्या समं
त पंचकीं साक्षात् ऋचीकानें दर्शन देऊन पूर्वीचा संपूर्ण वृत्तांत परशुरामा-
स सांगितला. कांहीं काला नंतर परशुरामानें मोठा यज्ञ करून त्या यज्ञाम-
ध्यें सुवर्णाची वेदी करून ब्राह्मणास दान दिली आणि कश्यप ऋषीस य-
ज्ञ दक्षिणा ह्मणोन संपूर्ण पृथ्वी दान दिली त्यामध्यें कांहीं ऋषींनीं पृथ्वी
चीं खंडें खंडें करून वांटून घेतलीं ह्मणोन त्या ऋषींचीं नावें खांडवायन अ-
शीं प्रख्यात झालीं. अकृतव्रण भाषण करतो हे धर्मराजा, असें परशुरा
मानें क्षत्रियांशीं महत् वैर उत्पन्न करून पृथ्वी हरण केली आणि मोठा-
यज्ञ करून ती ब्राह्मणास यज्ञामध्यें दिली, त्या दिवसापासून तो महेंद्र
पर्वतीं राहूं लागला व ऋषींस दर्शन देण्या करितां अष्टमी चतुरदशीस येथें
येतो. इतकें अकृतव्रण धर्मराजास सांगतो तों दुसरे दिवशीं चतुर्दशीस प
रशुराम महेंद्र पर्वतीं आले आणि भ्रात्यां सहित धर्मराजास पाहतांच उ
त्तम प्रकारें राजाची पूजा करून नंतर ब्राह्मणांची पूजा करूं लागले. धर्म
राज ही परशुरामाची उत्तम प्रकारें पूजा करून एक रात्र महेंद्र पर्वतीं रा
हून दुसरे दिवशीं दक्षिणेस गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

११८ अध्याय एकशें अठरा:- वैशंपायन सांगतात हे जनमे-
जया, नंतर पांडव नाना प्रकारचीं पुण्य कारक व ब्राह्मणादिकानीं सेवित-
अशीं जीं समुद्राच्या सन्निध तीर्थें त्यांस अनुक्रमें जात असतां प्रथम-
प्रशस्ता नामक समुद्रगामिनी नदी आहे, ती मध्यें भ्राते व भार्या यांस ह वर्त
मान धर्मराजानें स्नान करून देव व पितर यांचें तर्पण केलें आणि महान् म-
हान् तपस्वी ब्राह्मणांस बहुत द्रव्य देऊन नंतर गोदावरीस स्नान करण्या करि
तां गमन केलें तेथें स्नान दान व पितरांचें तर्पण करून नंतर द्रविड देशीं सा
गर तीरीं महान् पवित्र अगस्त्य नामक तीर्थ आहे तेथें धर्मराज गेला, त्या ती-
र्थीं स्नान दान व पितरांचें तर्पण करून नारी नामक तीर्थीं गेला. या तीर्थाम
ध्यें पांच अप्सरा मुनीच्या शापानें नक्रांचें रूप धरून रहात होत्या. कालांत
रें करून अर्जुन या तीर्थीं आला होता त्या कालीं अर्जुनानें अप्सरांस शापा

पासून मुक्त केलें त्या दिवसा पासून या तीर्थाचें नाव नारी तीर्थ असें विख्यात-
झालें. हा वृत्तांत तीर्थ निवासी लोकांनीं धर्मराजास सांगितला असतां राजा
बहुत आनंद पावला. नंतर भ्रात्यां सहवर्तमान नारी तीर्थी स्नान करून त्या
नें सहस्त्र गाई ब्राह्मणांस दिल्या आणि अर्जुनाचें पोरुष वर्णन करीत कां-
हीं दिवस तेथें राहून नंतर सागर तीरीं जितकीं तीर्थे आहेत तिकडे जाण्याची
इच्छा केली. समुद्राच्या सन्निध परम विख्यात व पुण्य कारक, शूरपारक या-
नामें तीर्थ आहे तेथें जाऊन कांहीं दिवस वास केला नंतर ऋचीक पुत्रानीं पू
र्वीं यज्ञ केला होता तत् संबंधीं पुण्यकारक सुवर्णमय वेदी आहे तेथें जाऊ
न वसु, मरुद्गण, अश्विनी कुमार, हीं तीर्थे तशींच आदित्य, धनेश्वर, रुद्र, उमा
पती, रमापती, धाता व पितर इत्यादिकांच्या नामानें प्रख्यात जीं तीर्थे त्या तीर्थी
र्थी अनुक्रमें जाऊन स्नान दान व पितरांचें तर्पण केलें आणि हिरण्य, रत्नें व-
भूमी इत्यादि बहुत ब्राह्मणांस दान देऊन तो पुनः शूरपारक तीर्थी आला, ते
थें कांहीं दिवस राहून नंतर प्रभासनामक तीर्थी गेला तेथें स्नानादिकानें श
चिरभूत होऊन देव व पितर यांचें तर्पण करून व द्वादश दिवस पर्यंत जलाहा
र व वायु भक्षण करून राहिला आणि मोठा अग्नि प्रदीप्त करून त्यानें तपास
आरंभ केला. हें वर्तमान द्वारकेमध्यें समजतांच संपूर्ण वृष्णी, प्रद्युम्न, सांब
सात्यकी यां सहवर्तमान श्रीकृष्ण व बलराम धर्मराजास भेटण्या करितां
प्रभास तीर्थी आले आणि पांडव तपानें कृश झालेले पाहून बहुत कष्टी झाले
त्या कालीं पांडवांनीं अनुक्रमानें संपूर्णांचा सत्कार केला असतां श्रीकृष्ण, बल
राम यांनीं पांडवांचा सत्कार केला. नंतर धर्मराजानें अर्जुन स्वर्गास गेल्याचा वृ
त्तांत श्रीकृष्णास सांगतांच श्रीकृष्ण खिन्न अंतःकरण होऊन पुनः पांडवांचें-
दुःख स्मरण करीत शोक सागरामध्यें निमग्न झाला. बलराम प्रभृतिही खिन्न
होऊन त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या. असा विषय या अध्यायांत आहे.

११९ अध्याय एकशें एकुणीस.— जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपा
यन ऋषे, प्रभास तीर्थी पांडव व वृष्णी एकत्र मिळाले असतां परस्पर एकमेक
काय बोलले हें मला सांग. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया,
प्रभास तीर्थी वृष्णी आल्यानंतर पांडव व ते एकत्र राहात असतां बलराम,

श्रीकृष्णास भाषण करतो हे कृष्णा, धर्माचरण केलें असतां कोणाचा अभ्युदय होत नाहीं व अधर्माचरण केलें असतां कोणास दुःख होत नाहीं हें कसें? पहा कीं, जो धर्मराज सत्यप्रतिज्ञ असतां चिर वल्कलें परिधान करून त्यास वनवास प्राप्त झाला आणि दुर्योधन दुष्ट असतां संपूर्ण पृथ्वीचें राज्यसुख भोगतो तस्मात् धर्मापेक्षां अधर्म हा श्रेष्ठ होय. असे जे अल्पबुद्धी भाषण करितात तें खरें आहे, असें मला वाटतें, तेव्हां हे कृष्णा, हा संशय मला आला याचें निवारण कर. दुर्योधन व धर्मराज यांचे ठायीं धर्माधर्म व्यस्त्या सांचें फल पाहिलें यावरून संपूर्ण प्रजांनीं धर्म करावा किंवा अधर्म करावा? पहा, हा धर्मराज निरंतर धर्माविषयीं रत, सत्यवाक्, दानशूर आहे, कदाचित् राज्यसुखाचा तो त्याग करील; परंतु धर्माचा त्याग तो कधीं करणार नाहीं असें असतां त्याची वृद्धी कधीं होईल? भीष्म, द्रोण, कृप इत्यादि महान् महान् वृद्ध योध्यांस पांडव वनांत गेल्यामुळें कसें दुःख होत नाहीं? तस्मात हे पापी, दुराचारी यांस धिःकार असो! हा धृतराष्ट्र अंधमरण पावल्यावर स्वर्गलोकीं आपले पितरांस असें सांगेल कीं, अधर्ममार्गानें संचार करणारे-जे माझे पुत्र यांस राज्य मिळालें आणि सद्धर्माचरण करणारे जे पांडव यांस वनवास प्राप्त झाला असा जो दुष्ट घातकी धृतराष्ट्र यास लौकर मरण कसें येत नाहीं? हे श्रीकृष्णा, मला असें वाटतें कीं, भीमसेन ज्याकालीं कोपित होईल त्याकालीं संपूर्ण कौरवकुल निःशेष होईल, याच्या वीर्यासमान दुसरा योद्धा या पृथ्वीवर दुसरा कोणी नाहीं; परंतु भस्मत तो चिर वल्कलें परिधान करून सर्व दुःखें सहन करतो तस्मात् प्रारब्धाची गती विचित्र आहे. समुद्रतीरीं राहणारे जे राजे यांचा सहदेवानें नाश केला तोच सहदेव आज वनामध्यें तापस वेष धरून संचार करतो. द्रुपदाच्या यज्ञसत्रामध्यें वेदीपासून जिची उत्पत्ती साक्षात् देवता काय? अशी द्रौपदी पती सह वर्तमान वन संबंधीं दुःखें सहन करून कशी अरण्यामध्यें राहात्ये. हे पांडव साक्षात देवांचे अंशभूत असतां दुर्योधनानें सभेमध्यें भार्येसहित त्यांस जिंकून वनवासास पाठविलें आणि आपण संपूर्ण पृथ्वीचें राज्य करतो असा अन्याय असतां पृथ्वी कां दुःख पावत नाहीं? अ. वि. या अ. आहे.

१२० अध्याय एकशेंवीस.— सात्यकी भाषण करतो हे रामा, तुझ्या भाषणाचें प्रत्युत्तर धर्मराज देत नाहीं; परंतु मी देतों ऐक. जे सांप्रत नाथवंत धृतराष्ट्राचे पुत्र आहेत त्यांस असें वाटत असेल कीं, आह्मीं यद्यपि जरी पापाचरण केलें तथापि संपूर्ण पृथ्वीच्या राज्याचा उपभोग करतों आणि धर्मराज जरी सत्यप्रतिज्ञ आहे तथापि वनवाससंबंधीं दुःखें भोगतो तस्मात् सुख दुःखा विषयीं धर्माधर्म कारण आहेत असा कोणी निश्चय करूंनये. असें जर दुर्योधनाचें भाषण असेल तर हे बलरामा, तूं निश्चयें करून असें समज कीं, आह्मीं संपूर्ण कालाची मार्गप्रतीक्षा करीत बसलों आहोंत तो आमचा काल आह्मांस वश झाला ह्मणजे धृतराष्ट्राचे पुत्र संपूर्ण सैन्यासहवर्तमान यमसदनास जातील. हा साक्षात् भगवान् श्रीकृष्ण, त्रैलोक्याचा नाथ यास कौरवांनीं पांडवांस दुःख दिल्यामुळें किती कोप आला आहे याचा अजमास माझ्यानें सांगवत नाहीं; परंतु श्रीकृष्णाच्या कोपाग्नीनें ही पृथ्वी कौरवांसहित दग्ध होईल आणि कंटकरूपी जो दुर्योधन याचा प्राण घेऊन लौकरच धर्मराज पृथ्वीचें राज्य करील. वृष्णी, भोज, अंधक यांसहवर्तमान श्रीकृष्ण, मी व पांडव इत्यादिज्या कालीं रणामध्यें उभे राहूं त्याकालीं द्रोण, भीष्म, कृप व सोमदत्त प्रभृतियोध्यांस पळावें लागेल आणि संपूर्ण धृतराष्ट्र वनांतील तृणासारखे आमच्या अग्निकल्पबाणांनीं दग्ध होतील. नंतर अभिमन्यु अखंड समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य करील. असें सात्यकीचें भाषण ऐकून श्रीकृष्ण बोलतात हे सात्यकी, तूंजें भाषण केलेंस तें संपूर्ण खरें आहे. धर्मराज, वृकोदर, धनंजय व माद्रीपुत्र हे आपल्या बाहुबलानें तृणरूप कौरवांचा कोपाग्नीनें दाह करून लौकरच निष्कंटक राज्यश्रीचा उपभोग करतील असें मला खचित वाटतें. हे सात्यके, अधर्मानें मिळालेली वस्तु बहुतदिवस राहात नाहीं; भिकिचणारास मात्र वाटतें कीं, हें माझें चिरकाल राहील; परंतु शास्त्रास जी प्रतिकूल गोष्ट आहे तिचा सूज्ञ मनुष्यानें स्वीकार करूंनये. असें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलतो हे कृष्णा, तूं व सात्यकीनें जें भाषण केलें तें मला मान्य आहे. माझा अभिप्राय ऐ

घ्या तुलाच ज्ञात आहे व तुझा अभिप्राय मला ज्ञात आहे ज्या काळीं तूं आह्मांस साह्य होशील त्या काळीं कोणची ही गोष्ट आह्मांस कठिण आहे असें नाहीं. तुमचा कृपा कटाक्ष आमच्यावर झाला ह्मणजे हेंच आमचें तप, हीच आमची नीती, हेंच आमचें राज्य, हे श्रीकृष्णा, आह्मीं अनाथा सारखे या वनांत संचार करतों यास्तव आह्मांस लोकरच सनाथ कर ह्मणजे द्रौपदीच्या चित्ताची शांती होईल तेणें करून आह्मींही सुखी होऊं. असें परस्परांचें भाषण होऊन नंतर परस्परांनीं एकमेकांचा सत्कार केल्यावर कृष्ण राम प्रभृति आपआपले गृहीं गेले. इकडे धर्मराज भ्राते, भार्या व लोमश यांसहवर्तमान पयोष्णी नामक नदी तीरीं जाऊन राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२१ अध्याय एकशें एकवीस.– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पयोष्णीच्या तीरीं पांडव रहात असतां लोमश ऋषी बोलले हे धर्मराजा, नृगानें सोमयाग करून इंद्रास येथेंच तृप्त केलें, त्याच तीर्थाचे ठायीं इंद्रासहवर्तमान देवानीं व प्रजापतीनीं बहुत यज्ञ केले व अमूर्त या राजानें सात अश्वमेध करून इंद्रास तृप्त केलें त्याच्या यज्ञांत स्तंभादि संपूर्ण पात्रें सुवर्णाचीं होतीं त्या यज्ञांत हविर्भाग घेण्या करितां प्रत्यक्ष देवता आल्या होत्या. जितक्या पृथ्वीच्या ठायीं वालुका, आकाशाच्या ठायीं पर्जन्यधारा तितक्या गाई त्या राजानें ब्राह्मणांस दिल्या. गाई देतां देतां ज्या काळीं मिळेनाशा झाल्या त्या काळीं विश्वकर्म्यानें सुवर्णाच्या गाई करून ब्राह्मणांस दिल्या. त्या राजाचा यज्ञ पाहण्या करितां सर्व देशो देशींचे राजे, ब्राह्मण व इतर लोक आले होते. याप्रकारें यज्ञ करून तो राजा स्वर्गास गेला यास्तव या पयोष्णीमध्यें जो स्नान करील त्यास हा लोक प्राप्त होईल. हे धर्मराजा, आतां भ्राते व भार्या यां सहवर्तमान या नदीमध्यें स्नान कर ह्मणजे तूं निःपाप होशील. असें लोमश ऋषीनीं भाषण करतांच भ्राते व भार्या यांसहवर्तमान धर्मराज त्या नदी मध्यें स्नान करून वैडूर्य पर्वतावर गेला तेथून फिरतां फिरतां भ्रात्यां सहवर्तमान नर्मदा तीरीं आल्यानंतर तेथील पुण्यकारक जींजीं तीर्थें यांचा महिमा लोमश ऋषीनीं सांगितला असतां राजानें भ्रात्यां सहवर्त-

मान त्यात्या तीर्थीं स्नान दान व पितरांचें तर्पण करून ब्राह्मणांस बहुत दक्षिणा दिल्या. नंतर लोमश ऋषी बोलले हे धर्मराजा, सर्व देवांची सलोकता येथें प्राप्त होते. वैडूर्य पर्वत पाहून नर्मदा उतरल्यानंतर त्या जाग्यास त्रेतायुग व द्वापार यांची संधी जागा असें ह्मणतात त्या जागेंत आलें असतां सर्व पापापासून प्राणी मुक्त होतो. ही शर्यातीची यज्ञजागा होय त्या स्थानीं अश्विनी कुमारांसहवर्तमान इंद्रानें अमृत प्राशन केलें. येथेंच च्यवन भार्गव याणीं इंद्रानें स्तंभन केलें आणि सुकन्या राजपुत्री च्यवन भार्गवास मिळाली. असें लोमशाचें भाषण ऐकून युधिष्ठिर प्रश्न करतो हे ऋषे, च्यवन भार्गव याणीं इंद्राचें स्तंभन कसें केलें व इंद्रावर क्रोध करण्याचें कारण काय, अश्विनी कुमारास अमृत कसें मिळालें? हा संपूर्ण वृत्तांत विस्तारें करून मला सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

१२२ अध्याय एकशें बावीस:— लोमश ह्मणतात हे धर्मराजा, भृगु ऋषीचा पुत्र च्यवन भार्गव कांहीं दिवस सरोवराच्या ठायीं तपस्या करीत असतां त्याचे अंगावर वारुळ वाढलें अनेक प्रकारच्या लता उत्पन्न झाल्या, आणि कालें करून मुंग्यानीं व्याप्त झाला. याप्रमाणें तपस्येस बहुत दिवस झाले असतां एके दिवशीं शर्याती राजा त्या स्थानीं क्रीडा करण्यास आला. राजासमागमें त्याच्या चार हजार स्त्रिया व सुकन्या या नामें करून कन्या होती ती कन्या सखीसहवर्तमान दिव्य अलंकार घालून त्या वारुळाजवळ आली असतां ऋषीनीं वारुळांतून बारीक स्वरानें कांहीं भाषण केलें; परंतु तें वाक्य तिणें न ऐकतां त्या वारुळांत डोंकाऊन पाहून आंत ऋषीचे दोन्ही डोळे दृष्टीस पडतांच त्यांत कांहींतरीं चमत्कारिक वस्तु आहे असें समजून तिनें वारुळाचें छिद्रांत कंटक घातला त्या योगें ऋषीचे दोन्ही डोळे फुटले असतां ती आपले स्थानास गेली. नंतर ऋषीस परम कोप येऊन त्याणीं सर्व सैन्याचें मलमूत्र बंद केलें हें वर्तमान राजास कळतांच त्याणें सर्व सैन्यास विचारलें कीं, येथें कोणी ऋषीस उपद्रव केला असल्यास मला सांगावें. त्याकाळीं सर्व लोकांनीं सांगितलें कीं, हे महाराज, आह्मीं कोणी या ऋषीस उपद्रव दिला नाहीं. असें ऐकून राजा परम दुःखित झाला. हें पाहून सुकन्या आपल्या पित्या

स बोलली हे महाराज, या वनामध्यें मी फिरतां फिरतां एक काजव्या सारखा जीव या वारुळा मध्यें पाहून अज्ञान पणें त्यास कांट्यानें टोचिलें. असें ऐकून शर्याती राजा तत्काल च्यवन भार्गवा जवळ जाऊन प्रार्थना करूं लागला कीं, हे महाराज, माझ्या कन्येनें न कळतां आपला अपराध केला याची क्षमा करावी. असें ऐकून च्यवन ऋषी बोलले हे राजा, रूप व मदें करून गर्वित जी तुझी कन्या ती मला देशील तर तुझ्या सैन्यास मलमूत्रा दिकाची जी पीडा उत्पन्न झाली इचें निवारण होईल. असें ऐकून शर्याती राजानें सुकन्या च्यवन भार्गवास दिल्यानंतर ऋषीच्या प्रसादानें सर्व सैन्य स्वस्थ झालें. सुकन्येस तो अंधपती मिळाल्यानंतर त्या विषयीं मनामध्यें किमपीही दुःखित न होतां ती उत्तम प्रकारें च्यवन ऋषीची सुश्रूषा करून राहिली. अ. वि. या अ. आहे.

१२३ अध्याय एकशें तेवीस— लोमश भाषण करतात हे धर्मराजा, कोणे एके कालीं अश्विनी कुमारानीं सुकन्या न्हालेली पाहून तिचे जवळ जाऊन भाषण केलें कीं, तूं कोण आहेस येथें काय इच्छा करतेस? हें आह्मांस सांग. असें ऐकून सुकन्या किंचित् लज्जित होऊन बोलली हे महाराज, शर्याती राजाची कन्या व च्यवन भार्गव ऋषीची भार्या मी आहें. हें तिचें भाषण ऐकून अश्विनी कुमार हांस्य करून भाषण करतात हे कल्याणी, तुझ्या पित्यानें तुला वृद्धास कशा करितां दिली? तुझें तेज तर केवल विद्युल्लते प्रमाणें दिसतें, तुझ्या सारखी स्त्री देव स्त्रियांत ही पाहिली नाहीं, कांहीं वस्त्रें व आभरणें नसतां तूं परम सुशोभित दिसतेस, त्या शरीरास आभरणें व उत्तम प्रकारचीं वस्त्रें मिळालीं असतां बहुतच रूपवान दिसशील, हा नवरा तुझे संरक्षणा विषयीं व पोट भरण्या विषयीं असमर्थ आहे तस्मात् त्याचा त्याग करून आह्मां उभयतां तून कोणासही स्वीकार, व्यर्थ यौवन घालवूं नको. असें ऐकून सुकन्या भाषण करती हे महाराज, मी पतीच्या ठायीं रत असतां मला असा प्रश्न कां करतां? असें ऐकून अश्विनी कुमार बोलतात हे स्त्रिये, आह्मीं देवांचे वैद्य आहोंत तुझ्या नवऱ्यास तरुण करून आमच्या सारखा रूपवान् करतों नंतर आह्मीं तिघे रूपानें सारखे झालों ह्मणजे आह्मां उभयतां तून एक पती करावा. असें ऐकून सुकन्येनें त्यांचें वाक्य पतीस सांगितलें,

च्यवनानें तिचें भाषण ऐकून प्रत्युत्तर दिलें कीं, ते ह्मणतात त्याप्रमाणें करा वें. नंतर तिणें येऊन आपल्या भर्त्याची आज्ञा अश्विनी कुमारांस सांगितली असतां अश्विनी कुमार तिला बोलले कीं, ह्या सरोवरा मध्यें च्यवनानें प्रवेश करावा. असें ऐकून च्यवन ऋषीनीं अश्विनी कुमारांसह वर्तमान सरोवरा मध्यें प्रवेश केला नंतर तिघेही सरोवरांतून बाहेर येतांच एकसारखे तरु ण व दिव्य रूप धारण केलेले दिसूं लागले आणि तिघेही बोलले कीं, यां तून पाहिजे तो पती करावा. सुकन्येनें तिघेही रूपानें एकसारखे पाहतां च यांतून पती कोणचा करावा असा मनांत विचार करून ती अश्विनी कु मारांस शरण गेली असतां अश्विनी कुमारांनीं प्रसन्न होऊन पूर्ववत् शरी र धारण केल्यानंतर सुकन्या बुद्धीच्या निश्चयानें हाच आपला पती असा निश्चय करून त्यासह रमली. च्यवन ऋषी संतुष्ट होऊन अश्विनी कुमारांस बोलले कीं, तुह्मीं मला तरुण केलेंत हा मजवर मोठा उपकार के लात, तस्मात इंद्र पहात असतां यज्ञांत तुह्मांस मी यज्ञभाग देईन. असें च्यवन भार्गवाचें भाषण ऐकून अश्विनी कुमार हर्षित होऊन स्वर्गलोकीं गे ले. इकडे सुकन्या व च्यवन ऋषी आपले आश्रमीं सुखानें राहिले. असा वि षय या अध्यायांत आहे.

१२४ अध्याय एकशें चोवीस.— लोमश सांगतात हे धर्मराजा, अश्वि नी कुमारांच्या प्रसादानें च्यवन ऋषी वृद्धाचा तरुण झाला हें वर्तमान ऐक तांच शर्याति राजा हर्षित होऊन सैन्यासह वर्तमान भार्गवाच्या आश्रमीं आला आणि उभयतां स्त्रीपुरुषांस पाहून पराकाष्ठेचा हर्षित झाला. नंत र च्यवनाश्रमीं सुखें करून बसला असतां ऋषीनीं राजास नाना प्रकारच्या कथा सांगून शांतवन केलें आणि सांगितलें कीं, हे राजा, तुझ्याकडून मी य ज्ञ करवितों. संपूर्ण यज्ञाचें साहित्य सिद्ध करावें. असें च्यवनाचें वाक्य ऐकतां च राजानें संतुष्ट अंतःकरणानें ऋषीच्या वाक्याचा सत्कार केला आणि य ज्ञसाहित्याची सिद्धता केली. नंतर शुभ दिवशीं च्यवन ऋषीनें राजास यज्ञ दीक्षा देऊन यज्ञास आरंभ केला असतां त्या यज्ञसमारंभामध्यें असा एक अद्भुत चमत्कार झाला कीं, च्यवन ऋषीनीं अश्विनी कुमारांस हविर्भाग-

देण्या करितां धारण केला असतां इंद्र च्यवन ऋषीचें निवारण करून बोलला हे ऋषे, हे अश्विनी कुमार देवांचे वैद्य आहेत तेव्हां त्यांस सोमदान योग्य नाहीं असें ऐकून च्यवन ऋषी बोलले हे इंद्रा, अश्विनी कुमार मोठे गुण संपन्न वरूप वान आहेत त्याणीं मला देवासारखें अजरामर केलें तेव्हां त्यांस मी हविरभाग कां न द्यावा? असें ऐकून इंद्र बोलतो हे ऋषे, हे अश्विनी कुमार रूप व गुणें करून संपन्न खरे; परंतु हे चिकित्सा रूप निंद्य कर्म करतात तेव्हां यांस देवां मध्यें मृत्युलोकीं हविरभाग नसावा. असें पुनः पुनः इंद्रानें च्यवनास निषिद्ध केलें असतां च्यवन ऋषी अश्विनी कुमारांस सोम देण्यास सिद्ध झाले. हें पाहून इंद्र बोलतो हे ऋषे, जर अश्विनी कुमारांस सोमदान देशील तर या घोर वज्राचा तुजवर प्रहार करीन. असें इंद्रानें कठोर भाषण केलें असतां पुनः च्यवन भार्गव अश्विनी कुमारां करितां सोम ग्रहण करून हविर भाग देऊं लागला तों इंद्र हस्तामध्यें महा भयंकर वज्र घेऊन टाकूं लागला. हें भार्गवानें पाहतांच त्याच्या तपाच्या योगें इंद्राचे बाहु वज्रासहित स्तंभित झाले नंतर यथाविधी भार्गवानें हवन करून तपाच्या सामर्थ्यानें मद नामक राक्षस उत्पन्न केला, त्या राक्षसाचें भयंकर शरीर पाहून हा आतांच जगत् भक्षण करतो काय असा संपूर्णांस भास झाला. असा भयंकर तो मद राक्षस आपल्या घोर शब्दानें पृथ्वी व आकाश व्याप्त करून एका एकीं इंद्रास भक्षण्या करितां धांवला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२५ अध्याय एकशें पंचवीस:— लोमश सांगतात हे धर्मराजा, तें भयानक राक्षसाचें शरीर आपल्यास भक्षणा करितां आलेलें पाहून इंद्र च्यवनास बोलला हे भार्गवा, अश्विनी कुमार सोम ग्रहण करण्यास योग्य होतील, हें माझें वचन सत्य जाणोन माझ्यावर प्रसन्न हो आणि सुकन्येचा पिता जो शर्याती याची ही कीर्ती या यागाच्या योगानें प्रसिद्ध होईल. हे ऋषे, तुझ्या तपानें हें माझें अरिष्ट निवारण होवो. असें इंद्राचें करुणा वाक्य ऐकून भार्गवानें आपल्या मन्यूचा उपसंहार करून बाहुस्तंभनादि दुःखां पासून इंद्रास मुक्त केलें आणि अश्विनी कुमारां सहित संपूर्ण देवांस यज्ञ हविर्भाग देऊन यज्ञ समाप्ती केली. त्या दिवसा पासून शर्यातीराजा विख्यात झा-

ला. नंतर च्यवन ऋषी सुकन्ये सहवर्तमान यथेच्छ विहार करूं लागला. हे धर्म राजा, तें हें भार्गवाचें सरोवर या सरोवरीं भ्रात्यां सहवर्तमान तूं स्नान करून देव व पितर यांचें तर्पण कर ह्मणजे तुला कलीचा स्पर्श होणार नाहीं. असें लोमशाचें वाक्य ऐकतांच धर्मराजानें भ्रात्यां सहवर्तमान भार्गव सरोवरांत स्नान करून देव व पितर यांचें तर्पण केलें नंतर सिकताख्य नामक सैंधवारण्यांत जाऊन संपूर्ण नद्यांचें दर्शन केलें. पुढें पुष्कर तीर्थी कांहीं-दिवस राहून शिवमंत्राचा जप केला. नंतर अर्चिक यानामें करून पर्वतावर-ऋषीचें निवास स्थान आहे तेथें जाऊन संपूर्ण देवांच्या प्रसादास अभिवादन केलें. तेथून वालखिल्यादि ऋषीनीं सेवित चंद्रमस नामक तीर्थ. आहे तेथें जाऊन तो वाराणशी व प्रयाग या तीर्थी यथानुक्रमें गेला. पूर्वी या क्षेत्रीं शांतनु, शुनक इत्यादि क्षत्रिय राहून उत्तम लोकीं गेले. नरनारायण ही काशी मध्यें राहून सनातन पद पावले. निरंतर देव व पितर येथें राहातात, अशीं हीं परम विख्यात तीर्थें होय. प्रयाग तीर्था पासून समग्र पांडव पुढें जात असतां लोमश ऋषि बोलले हे राजा, अर्चिक नामक पर्वतीं ऋषी तपाचरण करतात ह्मणोन तूं तेथें जाऊन त्यांचें पूजन कर. ही यमुना नामक नदी तुझ्या अग्र भागीं आहे तेथें पूर्वी श्रीकृष्णानीं तप केलें यास्तव भीमसेनादि भ्रात्यांसह वर्तमान तूं व मी तेथें जाऊन स्नान करूं. हें इंद्राचें प्रश्रवण नामक तीर्थ पहा या तीर्थी धाता, विधाता व वरुण इत्यादि तपस्या करून शेवटीं ऊर्ध्व लोकीं गेले असतां ही येथें वास करतात, हा पर्वत दुरून दिसतो तेथें पूर्वी महान् महान् ऋषीनीं व देवानीं तपस्या केली, याच्याच अधोभागीं महान् महान् ऋषीनीं सेवित नाना प्रकारच्या यज्ञाच्या भूमी आहेत, तेथें पूर्वी मांधाता-याणें यज्ञ केला व शृंजयाचा नातु जो सोमक याणें ही येथेंच यज्ञ केला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२६ अध्याय एकशें सव्वीस.– युधिष्ठिर प्रश्न करतो हे लोमशा, मांधाता नामक राजा तीन लोकांचे ठायीं परम विख्यात कसा झाला, याचें नाव यौवनाश्व असतां मांधाता असें नांव पडण्याचें कारण काय? जिन्हीं लोक विष्णू सारखे आपले वीर्यानें त्याणें वश केले असें याचें पूर्वचिं काय तप हें

तें ? हें संपूर्ण मला सांग. असा प्रश्न ऐकून लोमश भाषण करतात हे राजा, यौवनाश्व राजास मांधाता असें नांव पडण्याचें कारण तुला सांगतों. इक्ष्वाकु कुलांत यौवनाश्व या नामें करून राजा होता त्याणें संपूर्ण पृथ्वी आपल्या बाहुबलानें जिंकिली व नाना प्रकारच्या यज्ञ यागादि क्रिया करून ब्राह्मण संतुष्ट केले. कोणे एके दिवशीं आपल्यास पुत्र नाहीं या दुःखानें राजा प्रधानाचे स्वाधीन राज्य करून वनांत गेला आणि यथा शास्त्र आत्म्याच्या ठायीं चित्त समर्पण करून त्यानें तपास आरंभ केला. एके दिवशीं राजा क्षुधा व तृषा ईहीं करून पीडित होऊन वनांत फिरत फिरत भृगु ऋषीच्या आश्रमीं गेला आणि आपलें पुत्र संबंधी दुःख त्यानें ऋषीस सांगितलें. त्या काळीं ऋषीस परम दया उत्पन्न होऊन त्यानीं पुत्रेष्टी करितां जलानें भरलेला घट रात्रौ वेदी मध्यें ठेऊन सांगितलें कीं, हे राजा, हें जल उदक तूं आपले स्त्रीस प्राशनास दे ह्मणजे तुझ्या पत्नीस इंद्रास ही युद्धामध्यें पराजित करणारा असा एक पुत्र होईल. असें सांगोन भृगुपुत्र व मठ निवासी इतर ऋषी निद्रिस्त जाहाले असतां राजास बहुत तृषा लागून तृषेनें शुष्क कंठ झाल्या मुळें तो आश्रमस्त ऋषींस हांक मारून बोलला हे ऋषी हो, मी बहुत श्रांत झालों यास्तव मला जल द्या; परंतु गाढ निद्रे मुळें त्याचें भाषण कोणी ऐकिलें नाहीं. नंतर कांहीं वेळानें राजानें वेदी मध्यें जो घट स्थापित केलेला होता तो घेऊन त्यांतील जल प्राशन करून तो पुनः वेदी मध्यें ठेऊन ठेविला आणि तृषा शांत करून तो सुखी झाला. दुसरे दिवशीं प्रातःकालीं संपूर्ण ऋषी उठले आणि कलशाकडे पाहातात तों आंत जल नाहीं. असें समजून परस्पर एकमेकांस विचारूं लागले कीं, हें कर्म कोणाचें? तेव्हां राजानें सांगितलें कीं, मी यांतील जल प्राशन केलें. असें ऐकून भृगुनंदनानें राजास भाषण केलें कीं, हे राजा, इंद्रास ही पराजित करणारा असा तुला पुत्र व्हावा ह्मणोन तपोबलानें हा घट जलानें पूर्ण करून वेदी मध्यें स्थापन केला होता तें जल तूं प्राशन केलेंस हें कर्म सर्वथा अयोग्य झालें. तुझ्या दैवानेंच तुला पुत्र न व्हावा ह्मणोन ही बुद्धी तुला उत्पन्न झाली असो; परंतु माझें समंत्रित जल कधींही व्यर्थ व्हावयाचें नाहीं. तुझ्या उद-

रा पासून वीर्यवान्, पराक्रमी पुत्र होईल. गर्भधारण संबंधीं किमपि खे
द बाळगूं नको. असें भृगु नंदनानें सांगितल्यावर राजा आपले घरीं गेला.
शंभर वर्षें पूर्ण झाल्यावर राजाचा वाम पार्श्व भाग भेद करून सूर्या सार
खा तेजस्वी व इंद्रा सारखा पराक्रमी पुत्र उत्पन्न झाला त्या पुत्रास पाहून
यौवनाश्व बहुत हर्षित झाला. पुत्राचे दर्शनास इंद्रादि देव आले होते, ते
हें अद्भुत कृत्य पाहून बहुत हर्षित झाले. देवांनीं इंद्रास विचारिलें कीं, हा
पुत्र काय प्राशन करील, त्या कालीं इंद्रानें उत्तर केलें कीं, माझी तर्जनी प्राशन क-
रील. असें बोलून नंतर इंद्रानें आपली तर्जनी प्राशना करितां त्या पुत्रास दि-
ली तेव्हां पासून यौवनाश्वाच्या पुत्राचें नांव मांधाता असें विख्यात झालें. इंद्रा-
ची प्रदेशीनी पान करून मांधाता वृद्धी पावला. संपूर्ण सांगवेद व धनुर्वेद अ-
जगव नामक धनुष्य, स्वर्गातील बाण व अभेद्य कवच त्यास प्राप्त झालें. इंद्रा
नें त्यास राज्याभिषेक करून आसनीं बसविल्या नंतर मांधात्यानें तिन्ही लोक
आपले पराक्रमानें जिंकिले. त्याचें अस्त्र कधींच व्यर्थ गेलें नाहीं, एक दिवसां
त त्यानें समग्र पृथ्वी पादाक्रांत केली, पृथ्वी वरील रत्नें, मौक्तिक व सुवर्णहीं
हरण करून आपले घरीं आणिलीं. असंख्यात यज्ञ यागादि क्रिया करून सं
पूर्णांचें संतर्पण केलें. धर्में करून राज्य परिपालन करित असतां संपूर्ण प्रजेस
किमपि दुःख दिलें नाहीं, बारा वर्षें पर्यंत राज्यांत पर्जन्य नव्हता; परंतु आपल्या
स्वतपोबलानें इंद्राची अपेक्षा न धरितां वृष्टी केली. तपोबलें करून इंद्राचें अ-
र्धासन राजास प्राप्त झालें, त्या राजानें हें देवयजन नामक स्थान होय हें स्थान
पुण्यकारक जो कुरुदेश, याचे मध्यभागीं आहे. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

१२७ अध्याय एकशें सत्तावीस — युधिष्ठिर प्रश्न करतो हे लोमशा
सोमक नामक राजाचा पराक्रम व कर्म कशीं होतीं तीं मला सांग, असा प्रश्न
ऐकून लोमश सांगतात कीं, हे युधिष्ठिरा, पूर्वीं सोमक या नामें एक राजा परम
धार्मिक व विख्यात होता त्यास रूपवती व समान वयाच्या अशा शंभर भा
र्या होत्या त्यांतून एक भार्येस राजाच्या वृद्धाप कालीं जंतु या नामें एक पुत्र झा-
ला, त्या पुत्राचें संपूर्ण मातांनीं उत्तम प्रकारें लालन पालन करावें. एके दिवशीं
जंतूच्या कटि प्रदेशीं मुंगीनें दंश केला असतां त्या दुःखाच्या वेधनें मुखें बाल-

कानें बहुत आक्रोश केला.तो शब्द ऐकून सर्वमाता एका एकीं आक्रोश करूं लागल्या तेणेंकरून संपूर्ण राजाचें गृह व्याप्त झालें. राजा,अमात्य,ऋत्विज यांसह वर्तमान सभेंत बसला होता तेथें स्त्रियांचा आक्रोश शब्द ऐकतांच तत्काल तो मंत्र्यांसह वर्तमान अंतःपुरांत जाऊं लागला, तेव्हां द्वारपालानीं सूताचा वृत्तांत सांगितला तेणें करून राजा किंचित् दुःखित होऊन ऋत्विज व मंत्री यांसहव र्तमान अंतःपुरांत गेला आणि संपूर्ण स्त्रियांचें व पुत्राचें शांतवन करून पुनः सभेंत आल्यानंतर ऋत्विजांस भाषण करूं लागला हे ऋत्विज हो, ज्या पुरुषा स एक पुत्र आहे त्यास धिःकार असो.पहाकीं एक पुत्रास दुःख होतांच आ-ह्मांसंपूर्णांस त्या योगें दुःख झालें.मला शंभर भार्या एकसारख्या रूपवती आहेत त्यांस पूर्वीं पुत्र होण्याचीं लक्षणें पाहून नंतर त्यांशीं मी विवाह केला,प रंतु नसें न होतां शंभरांमध्यें एकीस पुत्र झाला, ह्मणोन शंभरांचे प्राण एक पुत्रावर आहेत, एकीस दुःख झालें ह्मणजे समग्रांस दुःख होतें,हा एक पुत्र नसता तरीं बरें होतें. हे ऋत्विजा,जेणें करून आतां एकेक भार्येस एकएकपु त्र होईल असा लहान मोठा उपाय मला सांग.असें ऐकून ऋत्विज बोलला हे महाराज,आपला जंतु नामक जो पुत्र यास पशूची कल्पना करून याचा याग कर ह्मणजे याजपासून महान् पराक्रमी शंभरपुत्र लौकरच होतील,जंतूच्या वपेचा होम झाला ह्मणजे त्या पासून उत्पन्न झालेल्या अग्नीस तुझ्या स्त्रि यांनीं आघ्राण केलें असतां तत्काल गर्भधारण होऊन वीर्यशाली व पराक्रमी असे शंभर पुत्र होतील आणि हा तुझा पुत्र जंतु पुन्हां करून पुनः उत्पन्न होईल.त्या कालीं त्याचे उत्तर पार्श्वभागीं सुवर्णा सारखें कांहीं चिन्ह असेल. असा विषय या अध्यायांत आहे.

१२८ अध्याय एकशें अठावीस.— लोमश सांगतात हे धर्मराजा, असें ऋत्विजाचें भाषण ऐकून राजा बोलला हे ऋत्विजा,जसें कर्तव्य असे-ल तसें कर.तुझ्या वचनास मी अनुकूल आहें.असें ऐकतांच ऋत्विज यज्ञाची सिद्धता करून जंतूंस यज्ञ मंडपांत होमा करितां आणूं लागला. त्याकालीं सं पूर्ण राजस्त्रिया एका एकीं आक्रोश करून जंतूस ऋत्विजाचे स्वाधीन करी नात त्या बालकाचा एक हात ऋत्विजानें धरला असतां स्त्रियांनीं दुसरा हा

त धरून आपले कडे ओगावा. असें बहुत वेळ केलें शेवटीं ऋत्विजानें बला त्कारानें पुत्रास घेऊन त्याची वपा काढिली आणि अग्नी मध्यें विधियुक्त वपा होम केला असतां अग्नी पासून बहुत धूम्र उत्पन्न झाला त्यानें आघ्राण राजस्त्रियांनीं केलें; पण त्या पुत्रमरण शोकानें पीडित झालेल्या एका एकीं पृथ्वी वर पडल्या. ऋत्विजाच्या भाषणा प्रमाणें धूम्राच्या आघ्राणें करून संपूर्ण राजस्त्रिया गर्भिणी झाल्या. दशम माशीं शंभर स्त्रियांस शंभर पुत्र झाले त्या मध्यें जेष्ठ स्त्रीस जंतु हा झाला. ऋत्विजानें सांगितल्या प्रमाणें त्याचे पृष्ठभागीं सुवर्णाचें चिन्ह होतें. संपूर्ण पुत्रां मध्यें जंतु हा सर्वांस प्रिय असें. कोणे एके दिवशीं राजाचा ऋत्विज भृगु हा मरण पावला. नंतर कांहीं दिवसांनीं सोमक राजाही मरण पावून स्वर्गलोकीं गेला आणि आपला उपाध्याय नरक कुंडांत पडलेला पाहून ऋत्विजास भाषण करूं लागला कीं, हे गुरो, तुझी अशी अवस्था कां जाहाली ? रवरव कुंडांत तूं कोणते कारणास्तव पडलास तें सांग. असें ऐकून गुरु बोलला हे राजा, तुझ्या गृहीं मी पुत्रयाग केला त्या कर्माचें हें फल मला प्राप्त झालें. असें ऐकून सोमक राजा तत्क्षणीं यमधर्माकडे गेला आणि त्यास बोलला हे धर्मा, माझ्या करतां तूं भृगु ऋषीस नरकांत घातलास. असो आतां याचा उद्धार कर आणि मला या नरक कुंडांत टाक याचें दुःख मी भोगीन. असें ऐकून यमधर्म भाषण करतो हे राजा, ज्यानें जें कर्म केलें असेल तें त्याणें भोगावें दुसऱ्यास भोगण्याचा अधिकार नाहीं. तुझ्या कर्माचीं फलें तर उत्तम व पुण्य कारक आहेत. असें ऐकून सोमक भाषण करतो हे धर्मा, ऋत्विजाशिवाय मी आपल्या पुण्याचीं फलें भोगण्यास इच्छित नाहीं, या सहवर्तमान स्वर्गीं राहाण्यास इच्छितो. रवरव अथवा स्वर्ग यां मध्यें जर मला ठेवणें असेल तर या ऋत्विजा सहवर्तमान ठेवावें, एकटा राहात नाहीं. असा राजाचा निग्रह पाहून यमधर्म ह्मणतो हे राजा, जर तुझी अशी इच्छा असेल तर ब्राह्मणा सहवर्तमान पूर्वी पापाचीं फलें भोग, नंतर या सहवर्तमान उत्तम गतीतें पाव. हे धर्मराजा, यमधर्मानें सांगितल्या प्रमाणें राजानें पूर्वी नरकादि पापफलें भोगून नंतर क्षीणपाप होऊन तो गुरुसह वर्तमान उत्तमोत्तम पुण्यकारक लोकीं राहिला. असा जो पुण्यशील सोमक

राजा याचा हा आश्रम येथें साहारात्री राहा ह्मणजे तुझीं संपूर्ण दुःखें हरण होऊन सोमक राजा सारखी तुला उत्तम गती होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

१२९ अध्याय एकशें एकूणतीस:– लोमश ह्मणतात हे धर्मराजा, यास्थलीं पूर्वी प्रजापतीनें इष्टीकृतनामें याग सहस्त्रवर्षे पर्यंत केला होता व अंबरिष व नाभाग यांणीं या यमुनेच्या उत्तर भागीं यज्ञ करून दशपद्मगाई ब्राह्मणांस दिल्या, नाना प्रकारचे महान् महान् ऋषी या स्थलीं यज्ञ यागादि क्रिया करून सिद्ध झाले, या देशास नहुष देश असें ह्मणतात. इंद्राशीं स्पर्धा करणारा जो ययातिराजा याणें येथें यज्ञ केला यास्थलीं नाना प्रकारच्या यज्ञ भूमी व स्थंडिलें, तशींच राजानीं व ऋषीनीं यज्ञा करितां आणलेला शमीचा वृक्ष व पान पात्रें हीं पहा. रामन्हद व नारायणाश्रम हे ही याचस्थलीं आहेत. योग बलें करून फिरणारा जो ऋचीक पुत्र याचा हा जाण्या येण्याचा मार्ग यास रौप्य असें ह्मणतात. या तीर्थाचें नाव प्रस्त्रवण असें प्रसिद्ध आहे. येथें पूर्वी एक राक्षसी हाता मध्यें उखळा सारखीं आभरणें धारण करून बसली होती. कोणे एके काळीं येथें पुत्रा सह वर्तमान एक ब्राह्मणाची स्त्री स्नाना करितां आली तिला पिशाची बोलली कीं, तूं युगंधर देशामध्यें दधिप्राशन केलेंस, अच्युत स्थलीं कांहीं दिवस राहिलीस व भूतिलय ग्रामा मध्यें स्नान केलेंस येणें करून तूं बहुत दोषी आहेस ह्मणून तूं या तीर्थी स्नान करण्यास योग्य नाहींस. असें ऐकून ब्राह्मणस्त्रीनें त्या तीर्थी स्नान केलें. हें पाहतांच पिशाची ब्राह्मण स्त्रीच्या सर्व वस्त्रादिकांचा नाश करून पुनः बोलली कीं, एकरात्र येथें राहिलीस त्याचें हें फल. दुसऱ्या रात्रीं तुझें काय होईल तें खरें. हा राक्षसीचा वृत्तांत धर्मराजास सांगून पुनः लोमश भाषण करतो कीं, हे राजा, एकरात्र तूं येथें राहा हेंच कुरुक्षेत्राचें द्वार येथेंच नहुषराजानें हजारों यज्ञयाग केले व रत्नाचे समुदाय येथेंच ब्राह्मणांस देऊन संतुष्ट केलें तेणें करून इंद्रही संतुष्ट झाला. याच यमुना तीर्थास प्लक्षावतरण ह्मणतात संपूर्ण ऋषीनीं यास स्वर्गाचें द्वार असें नाव ठेविलें आहे. येथें सारस्वत ब्राह्मणानें यज्ञ क

रून अवभृत स्नान केलें. भरत राजानें याच स्थलीं हयमेध केले, मरुन राजानें सत्र केलें. असें हें पुण्यकारक व पवित्र तीर्थ आहे, येथें तूं स्नान करश्या णजे सर्व पापापासून मुक्त होशील. असें सांगतांच भ्रात्यांसह वर्तमान धर्मराज त्या तीर्थीं स्नान करून पुनः लोमशास बोलला हे ऋषे, येथें स्नान करतांच तपोबल योगानें संपूर्ण लोक माझे दृष्टीस पडले आणि श्वेत वाहन जो अर्जुन तोही येथून दृष्टीस पडला हें आश्चर्य काय? असें ऐकून लोमश भाषण करतात कीं, हे राजा, या तीर्थाचें असेंच माहात्म्य आहे.ही सरस्वती नदी पहा येथें हजारों ऋषीनीं यज्ञ यागादि क्रिया केल्या:पांच योजनें पर्यंत प्रजापतीची वेदी आहे इचें दर्शन कर. यज्ञशील जो पुरुराजा याचें हें क्षेत्र होय. असा विषय या अध्यायांत आहे.

१३० अध्याय एकशें तीस.— लोमश भाषण करतात हे धर्मराजा, या स्थलीं जीं मनुष्यें स्व शरिराचा त्याग करतात त्यांचा स्वर्ग लोकीं वास होतो, असें या स्थलास वरप्रदान पूर्वी दक्षानें यज्ञ कालीं दिलें आहे, ही सरस्वती नामक नदी तुझ्या अग्रभागीं आहे ती पहा. येथें सरस्वती गुप्त झाली, या स्थलाचें नांव विनशन तें हें पहा. हेंच निषद राष्ट्राचें द्वार होय. निषादानीं आपल्यास न जाणावें या हेतूनें सरस्वती या स्थलीं गुप्त झाली आहे, जेथें सरस्वती नदी दृश्य आहे तेथें चमसोद्भेद असें ह्मणतात. या नदीस संपूर्ण नद्या एकत्र मिळून समुद्रास गेल्या. हें सिंधु तीर्थ पहा या स्थलीं अगस्त्य ऋषीनीं लोपामुद्रेस वरिलें. हें प्रभास नामक तीर्थ उत्तम प्रकारें सुशोभित, सूर्या सारिखें कांतीमान, इंद्रास परम प्रिय व संपूर्णांचें पापनाश करणारें असें आहे यास पहा. नंतर त्या विष्णुपद नामक तीर्थीं जाऊन पुढें संपूर्णांस पावन करणारी अशी विपाशा नामें नदी आहे तेथें जा. पूर्वी वसिष्ठास पुत्रशोक झाला ह्मणोन आपल्या गळ्यास फांस लाऊन ते प्राण त्याग करावा या बुद्धीनें या नदी तीरीं आले असतां तपोबलानें वसिष्ठाचे संपूर्ण पाश तुटले त्या दिवसापासून त्या नदीचें नांव विपाशा असें प्रसिद्ध झालें. त्या काश्मीर मंडल नामक तीर्थीं भ्रात्यांसह वर्तमान कांहीं दिवस राहा. पूर्वी महान् महान् ऋषी त्या तीर्थीं राहात होते. हें मानस सरोवराचें द्वार पहा या गिरी-

चे मध्य भागीं पूर्वी रामचंद्र कांहीं दिवस राहिले होते ह्मणोन येथें वायूचीही गती होत नाहीं मग इतराची कोठून होणार? अद्याप पावेतों त्या स्थानीं रामचंद्रा चें सामर्थ्य दृष्टीस पडतें. त्या देशांत प्रवेश करणाऱ्या लोकांस शिवाचें दर्शन-होतें. त्या सरोवरीं चैत्र मासीं आपल्या परिवारांच्या शुभाकरितां संपूर्ण ऋषी शिवाच्या उद्देशानें याग करतात यास्तव हे धर्मराजा, बंधू सहवर्तमान या सरोवरा मध्यें तूं स्नान कर ह्मणजे निःपाप होऊन उत्तम लोकीं तुझा वास होईल. हा उज्जानक नामक देश पहा. या देशांत पूर्वी कार्तिकस्वामी व अरुंधती सहवर्तमान वसिष्ठ ऋषि कोपाचा त्याग करून शांत झाले. हा कुशावान नामक ह्रद त्यांत कुशेशय ह्मणोन एक कमलाची जाती आहे ती उत्पन्न होत्ये हा रुक्मिणीचा आश्रम येथें रुक्मिणीनें क्रोधाचा त्याग केला. त्या भृगुतुंग नामक गीरीस पहा, ह्मणजे तुला संपूर्ण समाधीचें फलप्राप्त होईल, ही वितस्ता नामक नदी इज मध्यें स्नान कर त्या नदीच्या सन्निध यमुना नामें नदी आहे तेथें पूर्वी उसीनर राजानें मोठा याग केला त्या यागांत राजाचें सत्व पाहण्या करितां इंद्र व अग्नी, श्येन कपोताचें रूप धरून यज्ञ सभेस आले आणि कपोत भयाभीत होऊन राजाच्या आश्रयानें लपून राहिला इतक्यांत कपोतास मारण्या करितां श्येन पक्षी ही त्या सभेंत येऊन भाषण करूं लागला. असा विषय या अ० आहे.

१३१ अध्याय एकशें एकतीस– श्येन भाषण करतो हे राजा, संपूर्णां मध्यें तूं परम धार्मिक असें संपूर्ण धर्म वेत्ते तुला ह्मणतात तेव्हां क्षुधेनें मी पीडित होऊन या कपोतास भक्षण्या करितां आलों असतां याला तूं आश्रय देऊन आपले जवळ ठेविलास तेव्हां मला असें वाटतें कीं, धर्माच्या लोभानें हा तूं अधर्म करतोस. असें ऐकून राजा बोलतो हे श्येना, जो प्राणी दुसऱ्या पासून त्रस्त झाला त्याणें आपल्या प्राणाचें रक्षण व्हावें ह्मणोन माझा आश्रय केला, तेव्हां याचा कधीं मी त्याग करणार नाहीं. असें ऐकून श्येन भाषण करतो कीं, हे राजा, संपूर्ण प्राणि मात्र आहाराच्या योगानें उत्पन्न होतात, आहारानें वाढतात त्यांचें जीवित्व आहाराच्या योगानें होतें तेव्हां संपूर्ण कार्याचा त्याग करून भोजनाची सिद्धता प्रथम असावी; कारण सर्वांस आश्रयभूत आहार आहे तो आहार माझा तूं नष्ट केलास तेणें करून मी या काळीं वांचणार नाहीं मी मरण पा

वलों असतां माझ्या दुःखानें संपूर्ण माझ्या स्त्रिया मरण पावतील. असें श्येनानें भाषण ऐकून राजा बोलतो हे पक्षिश्रेष्ठा, तूं उत्तम प्रकारचें कल्याणकारक भाषण केलेंस येणें करून तूं संपूर्ण पक्ष्यांचा राजा गरुड आहेस असा मला संशय उत्पन्न होतो; परंतु मी तुला असें विचारतों कीं, शरणागत जो आला त्याचा त्याग करावा ह्मणोन तूं भाषण केलेंस हें तुला चांगलें वाटलें; तुझा समारंभ आहारा करितांच जर आहे तर असूं दे परंतु वाईट कर्म करून आहार संपादन करणें हें उत्तम नव्हे जर तुझी आहारावर प्रीती आहे तर भक्षणा करितां मृग, वराह, वृषभ व महिष इत्यादिक तुला समर्पण करतों. असें ऐकून श्येन भाषण करतो हे राजा, वृषभ, मृग अथवा वराह इत्यादि नाना प्रकारचे जीव मी भक्षण करण्यास इच्छा करित नाहीं जो ईश्वरानें मला जीव भक्षण्यास दिला तोंच मी भक्षीन. श्येन पक्षी कपोतास भक्षण करतात अशी प्रसिद्धि अनादिसिद्ध संपूर्णांस ज्ञात आहे ह्मणोन हे राजा, हा कपोत मला समर्पण कर आणि निःसार जो धर्म याचा त्याग कर. असें ऐकून राजा बोलतो हे द्विजा, सिबीचें संपूर्ण समृद्ध झालेलें राज्य तुला या कपोता करितां देतों अथवा तूं जें मागशील तें या कालीं मी देण्यास सिद्ध आहें; परंतु शरणार्थी कपोतास मागूं नको. असें ऐकून श्येन ह्मणतो हे राजा, तुझी एवढी प्रीती या कपोतावर आहे तर मला तुझें मांस या कपोत पक्ष्याचे भारंभार तुलेमध्यें घालून दे ह्मणजे मी संतुष्ट होऊन कपोतास मागणार नाहीं. असें ऐकून राजा बोलतो हे श्येना, तुझ्या भाषणानें मजवर बहुत अनुग्रह झाला. बरें तूं ह्मणतोस त्या प्रमाणें मी आपले शरीराचें मांस कपोताचे भारंभार तुला देतों. असें बोलून राजानें आपलें मांस स्वहस्तानें कापून तुलेमध्यें घातलें आणि एक बाजूस कपोतास घालून भारंभार मांस देण्यास तो प्रवृत्त झाला. तों यत्किंचित् मांस कमी झालें ह्मणोन पुनः आपलें शरीर कृंतन करूं लागला; परंतु कपोताचे भारंभार मांस होईना त्याकालीं राजा आपण स्वतः तुलेमध्यें जाऊन बसला. असें राजाचें धारिष्ट पाहातांच श्येन पक्षी तत्काल संतुष्ट होऊन बोलला हे राजा, तूं धन्य आहेस भिऊं नको तुझें सत्व पाहण्या करितां मी इंद्र व हा अग्नि उभयतां श्येन कपोताचें रूप धरून यज्ञमंडपांत आलों. हें तुझें अलोकीक

कृत्य पाहून आह्मीं संतुष्ट झालों. ही तुझी कीर्ती लोकांचेठायीं अखंड राहील. असें इंद्र व अग्नि भाषण करून स्वर्गी गेले. धर्मात्मा उशीनर राजाही मरण कालीं सूर्या सारखें तेजस्वी शरीर होऊन स्वर्गलोकीं राहिला. हें उशीनर राजाचें सदन यास पाहून कांहीं दिवस येथें राहा. मोठे मोठे तपस्वी ऋषि व देव यांचें येथें दर्शन होतें. असा विषय या अध्यायांत आहे.

१३२ अध्याय एकशें बत्तीस.— लोमश ह्मणतात हे धर्मराजा, उद्दालक नामक ऋषीचा पुत्र श्वेतकेतु ह्मणोन कोणी एक ऋषि होता त्याचा हा आश्रम निरंतर फल मूलें व नाना प्रकारचे वृक्ष ईहीं करून समृद्ध झालेला पहा. येथें श्वेत केतूनें साक्षात् मनुष्य देह धारण केलेली जी सरस्वती इला पाहून भाषण केलें. श्वेतकेतूचा भगिनेय कहोडाचा पुत्र अष्टावक्र यानामें होता त्याणें बाल्या वस्थे मध्यें संपूर्ण शास्त्र अवगत करून कोणे एके कालीं मातुला सह वर्तमान जनक राजाच्या सभेंत प्रवेश केला आणि बंदीसंवादा मध्यें जिंकून नदींत बुडविला. असें लोमशाचें वाक्य ऐकून युधिष्ठीर प्रश्न करतो हे लोमशा, अष्टावक्र बाल असतां त्याणें बंदि, संवादा मध्यें पराजित केला ह्मणोन सांगतोस तस्मात् असा प्रभाव त्यास कसा प्राप्त झाला? हा अष्टावक्र कोण कोणाचा पुत्र हें संपूर्ण मला सांग. असा प्रश्न ऐकून लोमश सांगतात हे राजा, उद्दालक नामक कोणी एक ऋषी होता—त्याचा शिष्य कहोड यानामें करून गुरूच्या शुश्रुषे मध्यें तत्पर असून बहुत दिवस वेदाध्ययन करीत असतां गुरूची आज्ञा कधींही शिष्यानें भंग केली नाहीं. असें शिष्याचें उत्तम प्रकारचें आचरण पाहून उद्दालकानें आपल्या कन्येशीं कहोडाचा विवाह केला. कांहीं दिवसानीं उद्दालकाची कन्या गर्भिणी असतां कहोड रात्रीं वेदाध्ययन करीत होता त्यास भार्येचा उदरस्थ गर्भ बोलला हे तात, रात्रंदिवस तूं वेदाभ्यास करतोस; परंतु—अद्याप तुझा अभ्यास संपूर्ण होत नाहीं. तुझा अभ्यास ऐकून गर्भामध्यें सांग वेदाभ्यास मला झाला आणि तूं जन्म पर्यंत अध्ययन करतोस; परंतु तुला कसें उपतिष्ठत नाहीं. अशी वाणी कहोडानीं ऐकून भार्येच्या कुक्षिस्थ गर्भास असा शाप दिला कीं, तूं कुक्षिस्थ असतां माझी अशी निंदाके-

लीस त्याज पेक्षां तूं आठ ठिकाणीं वक्र होशील. नंतर भार्येस दहा मास झाले असतां गर्भाच्या व्यथेनें व्याकुल होऊन ती एकांतीं पतीस बोलली कीं, माझा प्रसूत काल दिवस जवळ आला, तुजपाशीं तर द्रव्य नाहीं, द्रव्यावांचून तर आपत्ती दूर होणें कठीण, तेव्हां द्रव्य संपादन होईल असा यत्न करावा. असें ऐकून कहोड ऋषी द्रव्याकरितां जनकाच्या सभेंत गेला असतां तेथें बंदीनें कहोडास वादामध्यें जिंकून नदींत बुडविला. हें वर्तमान इकडे उद्दालकानें ऐकून तो बहुत दुःखित झाला नंतर त्यानें आपले पुत्रास व कन्येस सांगितलें कीं, ही गोष्ट, पुढें जो पुत्र होईल त्यास सांगूनका. कांहीं दिवसानीं कहोडाची भार्या प्रसूत झाली असतां शापाप्रमाणें आठ ठिकाणीं वक्र असा पुत्र झाला त्याचें नांव अष्टावक्र असें ठेविलें. पुत्रानें बारावर्षांचें वय होई पर्यंत मातेनें पित्याची मरण वार्ता त्यास सांगितली नाहीं. अष्टावक्र उद्दालकासंच पिता व श्वेतकेतूस भ्राता असें ह्मणत असे. कोणे एके दिवशीं उद्दालकाचे मांडीवर अष्टावक्र बसला होता इतक्यांत श्वेतकेतु येऊन बोलला हे अष्टावक्रा, तूं याचे मांडीवर कां बसलास? हा तुझा पिता नव्हे. असें ऐकतांच अष्टावक्र आपले घरीं जाऊन मातेस बोलला हे माते, माझा तात कोठें आहे? असें ऐकून मातेनें पुत्रास झालेला वृत्तांत सांगितला. तो ऐकून अष्टावक्र दुसरे दिवशीं आपला मातुल जो श्वेतकेतु यास बोलला कीं, हे मातुला, जनकराजाचे गृहीं मोठा यज्ञ चालला आहे तेथें महान् महान् ब्राह्मणाचे वादविवाद बहुत होतात असें मी ऐकिलें यास्तव ती सभा पाहण्याकरितां तूं व मी उभयतां जाऊं. तेथें गेलें असतां ब्रह्मघोष श्रवणांत येईल व पंडित वादविवाद करतात तोही श्रवणांत येईल. त्या योगानें आपल्यास किंचित् दान प्राप्ती होऊन कल्याण होईल. असें अष्टावक्रानें भाषण केल्यानंतर श्वेतकेतूनें जाण्याचा निश्चय करून उभयतां जनकाचे गृहीं यज्ञमंडपाचे अग्रभागीं गेले; तों जनकानें अष्टावक्राकडे पाहिलें पुढें अष्टावक्र यज्ञसभेंत जाऊं लागला असतां द्वारपालानीं त्यास प्रतिबंध केला. असा विषय या अध्यायांत आहे.

१३३ अध्याय एकशें तेतीस:- अष्टावक्र भाषण करतो हे द्वारपालहो, अंध, बधिर, स्त्रिया, भारवाहक व राजा इतक्यांस मार्ग द्यावा आणि ब्रा

म्हण आला असतां त्यास तर प्रथम मार्ग द्यावा. असें ऐकून राजा यज्ञसभें तून भाषण करतो हे ब्राह्मणा, हा तुला मी मार्ग दाखविला, तुझ्या इच्छेस वाटे ल त्या मार्गानें जा. ब्राह्मणास लाहान असें समजूं नये अल्प ही पावक अ- सतां संपूर्ण पदार्थांचें दहन करतो. इंद्र ही साक्षात् ब्राह्मणास नमस्कार कर- तो तेव्हां ब्राह्मणास अल्प कसें ह्मणावें? असें ऐकून अष्टावक्र भाषण करतो- हे राजा, तुझा यज्ञ पाहण्या करितां तुझ्या द्वारीं आह्मीं अतिथी सारखे आलों तस्मात, आह्मास आंत येण्या विषयीं मार्ग दे, द्वारपाळ आह्मांस जाण्या विष यीं मार्ग देत नाहींत. असें अष्टावक्रानें भाषण केलें असतां द्वार पाल भाषण करतो हे ब्राह्मण हो, आह्मींतर दुसऱ्याचे भृत्य व बंदीची आज्ञा परिपालन करणारे आहोंत खरें; परंतु आमचें एक वाक्य तुह्मीं ऐका. या यज्ञसभेंत बा- लजे असतील त्यांचें प्रयोजन नाहीं महान् महान् वृद्ध पंडित व ज्ञानेकरू न परिपूर्ण झालेल्या ब्राह्मणानीं यासभेंत प्रवेश करावा. असें ऐकून अष्टा वक्र भाषण करतो जर त्या सभेंत वृद्धाचा प्रवेश आहे तर आह्मीं ही व्रत व वेद पठणें करून वृद्ध आहोंत, आह्मीं इंद्रियांचा बहुत निग्रह केल्यामु- ळें आह्मांस ज्ञान मिळालें, तेव्हां आह्मांस तुह्मीं बाल असें समजूं नका. लघु जरीं अग्नी असला तथापि त्याच्या स्पर्शानें जसें संपूर्ण दग्ध होतें तसे आ ह्मीं लहान असतां ही मोठें कार्य करण्यास समर्थ आहोंत. असें अष्टवक्रा चें भाषण ऐकून द्वारपाल बोलतो हे ब्राह्मण हो, जर तुह्मीं विद्वान आहांत तर वेदानीं सेवित एकाक्षरा व बहुरूपा जी ब्रह्मविद्या सरस्वती इचें उच्चा रण करा. असें ऐकून अष्टावक्र बोलतो हे द्वारपाल हो, शरिरानें अल्प अ सतां ही ज्याचें ज्ञान मोठें त्यासच पंडित ह्मणावें. पंडित पदवी प्राप्त होण्या स बृहत् शरीर कारण नाहीं यास्तव हे द्वारपालहो, जनक राजास जाऊन सांगा कीं बंदीचें दर्शन घ्यावें ह्मणोन हे ब्राह्मण येथें आले आहेत. हे संपूर्ण ऋषी यज्ञ मंडपांत बसले आहेत त्यांच्या समक्ष मी बंदीस वादामध्यें जिंकू न पराजित करतों. नंतर ऋषीनीं निश्चय करावा कीं मी महान् आहें अथवा बंदी महान आहे. असें ऐकून द्वारपाल भाषण करतो अरे ब्राह्मणा, तुझें वय दहा वर्षांचें आहे ह्मणोन विद्वानाच्या सभेंस तूं जाण्यास योग्य नाहींस,

राजाचें दर्शन करणें असल्यास तुला दुसरें द्वार दाखवितो त्या द्वारानें आं
त जा आणि राजास आपल्या ज्ञानाचा प्रकाश दाखीव. असें ऐकून अ-
ष्टावक्र राजाकडे पाहून बोलतो हे राजा, जसा पूर्वी ययाति राजा होता त
सा तूं या पृथ्वीचा सार्वभौम व याज्ञिक कर्मामध्यें बहुत निपुण आहेस-
तुज पाशीं बंदी या नामें एक पंडित आहे त्याणें बहुत विद्वान वादामध्यें
जिंकून ते संपूर्ण जलामध्यें बुडविले. हें ऐकून मी त्या बंदीशीं अद्वैत ब्रह्मा
चा वाद करण्यास आलों आहें. बंदीस माझ्या अग्रभागीं सत्वर आणा म्ह-
णजे मी त्याचा वादामध्यें पराभव करतों. असें ऐकून राजा प्रश्न करतो हे
ब्राह्मणा, दुसऱ्याचें भाषण बल कसें आहे हें नजाणतां बंदीस मी जिंकीन
अशी तूं कशी इच्छा करतोस? ज्यानीं बंदीचें वीर्य जाणलें आहे ते कदाचि
त् बोलण्यास शक्य होतील, वेदांत जाणणाऱ्या ब्राह्मणानीं बंदीचें बल पा-
हिलें आहे तस्मात् तूं बंदीचें बल नजाणतां त्याचा पराजय करण्याची क-
शी इच्छा करतोस? सूर्याच्या अग्रभागीं ताऱ्यांचें तेज जसें नष्ट होतें तसें
पूर्वी ज्या ब्राह्मणांचा बंदीशीं वादसमागम झाला ते ब्राह्मण त्यापुढें हीन ते
ज झाले जे बंदीचा पराजय करण्यास त्याचे जवळ आले त्यांच्या शोभा बं
दीपुढें नाहींशा झाल्या ते ब्राह्मण ब्रह्मज्ञान अनुभवानें जरी मत्त होते त-
री बंदीनें त्यांचा पराजय केल्यामुळें सभासदानीं त्या ब्राह्मणांस सभेतून
घालवून दिलें तो प्रकार ते ब्राह्मण तुला सर्व सांगतील. अष्टावक्र भाषण
करतो हे राजा, माझ्या सारख्या ब्राह्मणाशीं बंदीचा वाद न झाल्यामुळें तुह्मीं
त्यास सिंहा सारखा मानून तो कांहीं भय नपावतां वाक्‌जल्पना करित असे
ल; परंतु आज माझ्याशीं जर त्याचा समागम होईल तर भग्नाक्ष झालेला
शकट मार्गामध्यें जसा पडतो तसा बंदी माझ्या पासून पराजित होऊन-
निद्रिस्थ पुरुषा सारखा जड होईल. राजा भाषण करतो हे अष्टावक्रा,
अद्वैत ब्रह्म प्रतिपादन करण्यास मी आलों ह्मणोन प्रतिज्ञा करतोस त्या
पेक्षां तुला असा प्रश्न करतों कीं, तीस ज्यास अग्रें आहेत, बारा आरा
नीं युक्त असून चोवीस ज्यास पर्वें आहेत आणि तीनशें साठ वेळ एक व
र्षांत ज्याचें परिभ्रमण होतें अशा पदार्थाचें ज्यास ज्ञान आहे तो विद्वान्.

ह्मणावा तो पदार्थ कोणता? अष्टावक्र उत्तर देतो हे राजा, दोन बाजूनें ज्याचीं अग्रें तीक्ष्ण केलीं आहेत अशा स हा शलाका एक शंकूमध्यें घातलेल्या असून त्यांचीं बारा अग्रें पृथक् पृथक् आहेत अशा एक वस्तूस नाभीचक्र असें ह्मणतात त्या नाभीचक्राच्या द्वादश आरा ह्मणोन ह्मटल्या आहेत त्या बारा राशी होत, साहा ऋतू हे त्या चक्राच्या नाभी आहेत, एक एक राशीचे तीस तीस अंश आहेत. इतक्या समुदायास भचक्र ह्मणतात त्या भचक्राचें साठ घटका भ्रमण झालें ह्मणजे एक दिवस रात्र होतो. असें त्या चक्राचें तीनशें साठ दिवस भ्रमण झालें ह्मणजे त्या कालास सावन संवत्सर असें ह्मटलें आहे. हें भचक्र कुलालचक्रासारखें फिरत असतां पिपीलिका पंक्ती सारखे सूर्यचंद्र या चक्रावर उलटे फिरत असतात त्या चक्रांत सत्तावीस अहोरात्र भ्रमणानीं चंद्राचा एक भगण भोग होतो. तीनशें सवा पांसष्ट दिवसानीं सूर्याची एक प्रदक्षणा त्या चक्रावर झाली असतां त्या कालास सौर संवत्सर असें ह्मटलें आहे. या प्रमाणें या चक्रावर आप आपल्या गतीनें प्रदक्षणा करणाऱ्या सूर्यचंद्राचें फार अंतर पडलें ह्मणजे तीतक्या कालास पौर्णिमा असें ह्मणतात आणि त्यांचे अति सान्निध्य झालें ह्मणजे त्या कालास अमावास्या ह्मणतात. त्या पौर्णिमा अमावास्यांस पर्व अशी संज्ञा आहे. तीं चोवीस पर्वें झालीं असतां तीनशें चौपन् दिवस होतात त्यास चांद्र संवत्सर ह्मटलें आहे. या प्रमाणें संवत्सराचीं तीन मानें आहेत आणि पृथक् पृथक् कर्मा विषयीं या तिन्ही कालांचा विनियोग केला आहे. व्रतादिक ग्रहण करण्यास चांद्र संवत्सराचा विनियोग करतात. जन्मादिक व्रतामध्यें सौर संवत्सराचा व गो सत्रादि-यागा विषयीं सावन संवत्सराचा विनियोग करतात. या कालचक्राचें सर्वांस अवश्य ज्ञान असलें पाहिजे हें कालज्ञान सर्वांस साधनी भूत आहे याचें ज्ञान नसल्यास केलेलीं सर्व कर्में व्यर्थ होतात. राजा प्रश्न करतो हे ब्राह्मणा, रथास जोडलेल्या अश्वां सारखे निरंतर बरोबर असतात आणि श्येन पक्ष्या सारखे अकस्मात् ते उत्पन्न होतात असे ते दोन पदार्थ आकाशांत संचार करणाऱ्यां मध्यें कोणाचे गर्भांत उत्पन्न होतात तें सांग.

असें ऐकून अष्टावक्र उत्तर देतो हे राजा, ज्यां विषयीं तूं प्रश्न केलास तें दोन पदार्थ अतिशय अमंगल कारक असल्या मुळें त्यांचें नावही घेऊं नये व ते पदार्थ तुझ्या व तुझ्या शत्रूंच्या ही घरीं नसोत असें मला वाटतें. ते पदार्थ जेव्हां आकाशामध्यें वृष्टी करितां वात सारथी ह्मणजे मेघाचा उदय होतो तेव्हां त्या पासून विद्युत (दुःख) अशनी (मृत्यु) हे दोन रथास जोडलेल्या अश्वासारिखे सहजच उत्पन्न होतात आणि त्या पासून जगाचा नाश होतो अथवा वात सारथी ह्मणजे मन या पासून निद्रेच्या कारणानें कर्मफल भोगार्थ दुःख मृत्यु हे रथास जोडलेल्या अश्वां सारखे बरा बर उत्पन्न होतात, त्यां पासून सर्व जगाचा नाश होतो तेव्हां मना पासून उत्पन्न झालेलें दुःख मृत्यु स्ववासनारूपानें मनास कारण होतात. याज करितां बीजांकुर न्यायें करून मन दुःखमृत्यूस कारण अथवा दुःख मृत्यु मनास कारण आहेत. राजा प्रश्न करितो हे ब्राह्मणा, निद्रावस्थे मध्यें ज्यांचे नेत्र मिटत नाहींत असे कोण व उत्पन्न असतां ही ज्यास चलन वलन नाहीं असा पदार्थ कोण? ज्यास त्हदय नाहीं अशी वस्तु कोणती व वेगानें वृद्धी पावतो असा पदार्थ कोणता? अशा या चार प्रश्नाचें उत्तर मला सांग. असा राजाचा प्रश्न ऐकून अष्टावक्र भाषण करतो हे राजा, मत्स्य निद्रिस्थ असतां ही नेत्र मिटत नाहींत अथवा मत्स्य ह्मणजे मत्स्य सदृश ज्ञानरूपी पुरुष जागृत स्वप्न अवस्थेमध्यें इहलोकीं व परलोकीं संचार करित असतां श्रांत झाल्यामुळें सुषुप्ति प्रलया मध्यें निद्रा घेत असतां ही त्याचे नेत्र उघडे असतात मिटत नाहींत. अंड उत्पन्न जरीं झाले तथापि त्यास चलन वलन नाहीं अथवा भूत भौतिकात्मक जें ब्रह्मांड तें उत्पन्न असतां ही त्यास चेष्टा नसून तेंच अन्याकडून चलन वलन करितें. पाषाणास त्हदय नसतें अथवा अशरीरी ह्मणजे जो जीवन मुक्त त्यास त्हदय नसतें ह्मणजे सर्व शोका पासून तो तरून देहादिकानीं असंयुक्त होतो. नदी वेगानें वाढते अथवा योग्याची चित्तरूप नदी समाधी विसर्जन झाल्यावर तत्काल प्रपंच रूपानें वाढते, ह्मणजे व्यवहारीक प्रपंच योग्याच्या दृष्टीस जों पर्यंत पडतो तों पर्यंत आहे. असें सिद्ध होतें. राजा भाषण करतो हे ब्राह्मणा, तूं मनुष्य नव्हेस तूं कोणी तरी देव आहेस तूं बाला सारखा दिसतोस परंतु वृद्ध आहेस, वक्तृत्वता विषयीं तुझ्या

सारखा दुसरा कोणी नाहीं यास्तव तुला जर बंदीशीं संभाषण कर्तव्य असेल तर या द्वारांतून तो बंदी पहा. असा विषय या अध्यायांत आहे.

१३४ अध्याय एकशें चवतीस– अष्टावक्र ह्मणतो हे जनक राजा, यासभेमध्यें उग्रसेना सारखे अप्रतीम मोठमोठे राजे आले आहेत त्या सभेंत वादी श्रेष्ठ जो बंदी तो कोणता हें मला कळत नाहीं यास्तव तो मला कळला ह्मणजे महान जला मध्यें हंस जसा महान मत्स्यास धरतो तसा मी त्या बंदीस तत्काल ग्रहण करतों, अरे अभिमानी बंदी, वादांत जो पराजित होईल त्यास जलामध्यें बुडविण्याची तूंच प्रतिज्ञा केली आहेस, आज माझ्या प्रश्नाचें प्रत्युत्तर न देशील तर प्रलय कालीं पेटलेल्या हुताशनानें नदी जशी शुष्क होऊन जाते तसा तूं आज माझ्या तेजानें शुष्क होऊन जाशील यास्तव स्थिर होऊन माझ्या प्रश्नाचें प्रत्योत्तर दे, निद्रिस्थ व्याघ्रास आज तूं जागृत करूं नको. अथवा आपले ओष्ठ-जिव्हेनें चाटणारा जो सर्प याचे शिरावर पाद प्रहार तूं केला आहेस त्यापेक्षां या सर्पा कडून तूं दंशित झाल्या वांचून सुटणार नाहींस असें खचित समज. जो मनुष्य दर्पानें युक्त होऊन पर्वत आपले नखानें उकरण्यास उद्युक्त होतो, तें दुर्लभ कृत्य त्याच्यानें न होतां त्याचीं नखें मात्र विदीर्ण होतात, पर्वतास कांहीं विकार होत नाहीं. हा जनक राजा मैनाक पर्वता सारखा सर्व राजां मध्यें श्रेष्ठ आहे आणि सर्व राजे याज पेक्षां जसें बैला पुढें वत्स बलहीन तसे. देवांमध्यें इंद्र श्रेष्ठ, नद्यां मध्यें गंगा जशी श्रेष्ठ तसा सर्व राजां मध्यें हे राजा तूं श्रेष्ठ आहेस यास्तव बंदीस माझ्या अग्रभागीं आण. लोमश ह्मणतात हे राजा, या प्रकारें त्या राजाच्या सभेमध्यें क्रोधानें अष्टावक्र बंदीस असें गर्जना पूर्वक बोलला कीं, हे पंडिता तूं मला प्रश्न केला असतां मी तुझ्या प्रश्नाचें उत्तर देतों मी तुला प्रश्न केला असतां माझ्या प्रश्नाचें उत्तर तूं दे. बंदी प्रश्न करतो जसा एकच सूर्य इतरांस प्रकाशक असून त्यास दुसरा कोणी प्रकाशित करणारा पदार्थ नाहीं तसा संपूर्ण इंद्रियांचा प्रधानभूत राजा इदं ( हें सर्व माझें ) अहं ( ह्मी ) इत्यादि आकारानें प्रकाशमान बुद्धीच आहे आणि तीच विषयांचा पालन करणारा असल्या मुळें त्यास ईश्वर भोक्ता व कर्ता असें ह्मटलें आहे. सर्व इंद्रियांचें नियमन करण्याची शक्ती बुद्धीस असल्यामुळें तिला यम

असेंही ह्मटलें आहे. स्वप्नामध्यें सर्वक्रिया करणें इत्यादिक बुद्धीच्यांठायीं आहे ह्मणोन सर्वजगामध्यें बुद्धी तत्वाहून अन्यतत्व पृथक् नाहीं, सर्वांस कारणीभूत एक बुद्धीच आहे, असा बौद्ध ( बुद्धि पासूनच सर्व असें ह्मणणारे ) मतानें बंदीनें प्रश्न केला असतां अष्टावक्र उत्तर देतो हे बंदी, ब्रह्मदेवानें इंद्र,अग्नी हे परस्पर साह्यानें संचार करणारे तसेच देव,ऋषी,नारद व पर्वत, अश्विनी कुमार, भार्या आणि पती व रथाचीं चक्रें असे दोन पदार्थ सहचर उत्पन्न केले आहेत-त्या प्रमाणेंच सर्वजगास कारणीभूत मित्रासारखे आत्मा आणि बुद्धी हे आहेत हे दोन असल्यावांचून एकानेंच जगाचा कार्य कारण भाव सिद्ध होत नाहीं. जी वस्तू आपण पाहातों ती कोणासही पहात नाहीं दोन्ही वस्तु निरनिराळ्या आहेत त्यांमध्यें आत्म्यास प्राधान्य असून बुद्धीस अप्रधानत्व आहे इतकाच त्या दोन वस्तूमध्यें भेद मानला आहे. ह्या सुपर्णीयावेद मंत्रांत ही असेंच प्रतिपादन केलें आहे ह्मणोन बुद्धी व चैतन्य या दोन सहचर मित्रां वांचून जगाची उत्पत्ती,लय,स्थित्यादि कार्यें किमपिसिद्ध होत नाहींत यास्तव अन्योन्यापेक्षक बुद्धी चैतन्य हे दोन पदार्थ मानले पाहिजेत. बंदी भाषण करतो हे अष्टावक्रा, उत्तम पुण्यकर्मानें देव,स्थावर,मनुष्य असे तीन जन्म प्राप्त होतात.पाप कर्मानें नरक,स्थावर, तिर्यक रूप असे तीन प्रकारचे जन्म प्राप्त होतात. स्वर्गापासून अथवा नरकापासून-जो प्राणी मुक्त होतो तो ओषधी द्वारानें रेतांत मिश्र होऊन तद्द्वारा मनुष्य पशू पक्षादिकांत जन्म घेतो अशी श्रौत प्रसिद्धी आहे.तसेच वेदत्रय युक्त ब्राह्मण,आश्रम त्रयास युक्त अशीं कर्मे करतात. सकल वेदांत कर्मास प्राधान्य सांगितलें आहे यज्ञांतील अध्वर्यु ( यज्ञाचे योजक ) प्रातः सवनादि तीन कर्मांचा योग करतात. यथा कालीं केलेल्या कर्मांच्या फलाचा अनुभव सर्वांस येतो असें ह्मटलें आहे. स्वर्गलोक,भूलोक व नरकलोक ह्या तीन भोगभूमी कर्मानेंच प्राप्त होतात. जागृत,स्वप्न,निद्रा ह्या तीन अवस्था सुखमार्ग प्रकाशक सांगितल्या आहेत याच अवस्थेस तीन अवस्था ह्मणजे तीन-स्थलें पुण्य कर्त्यांचीं होत अशी श्रुती आहे.या प्रकारें कर्म प्रधान मानणाऱ्या मिमांसकाचे मतानें बंदीनें प्रश्न केला असतां अष्टावक्र भाषण करतो.

ब्राह्मणांस ज्ञान प्राप्तीचीं स्थानें च्यार आहेत, ब्रह्मचर्य, ग्रहस्थाश्रम, वानप्रस्थ हीं तीन स्थानें जशीं ब्राह्मणास ज्ञान साधनीभूत सांगितली आहेत तसा सन्यासाश्रम हाही मोक्षाश्रयीं भूत ज्ञानास कारणीभूत मुख्य सांगितला आहे. संन्यासाश्रमास पूर्वोक्त तीन आश्रमा सारखी कर्मांची अपेक्षा नाहीं ज्या कालीं आपल्यास वैराग्य होईल त्या कालीं संन्यासाश्रम ग्रहण करावा असा मार्ग श्रुतिप्रसिद्ध आहे तेव्हां ब्रह्म व त्या ब्राह्मणास ज्ञानप्राप्तीचीं स्थानें च्यार आहेत असें सिद्ध होतें. असेच ज्ञानाधिकार ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चारी वर्णांस आहे. शूद्रवर्णास कर्माधिकार नाहीं; परंतु ज्ञानाधिकार त्यास मुख्यत्वें करून सांगितला आहे तशाच विराट सूत्रांतरयामी, तुर्य्र, साक्षात्कार रूप, अशा उपदेशाच्या च्यार अवस्था सर्व प्राण्यांस प्रसिद्ध सांगितल्या आहेत आणि त्या अवस्थांचे वाचक आकार, उकार, मकार आणि अर्धमात्रा रूप असे चार वर्ण ओंकार रूपानें उपनिषदांत सांगितले आहेत. तशीच परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी अशी वाणीचीं स्थानें चार सांगितलीं आहेत. असा अष्टावक्रानें पदार्थत्रयास निषेध करून चार पदार्थ मुख्य असावे असें सिद्ध केलें असतां बंदी चार पदार्थांचा निषेध करून प्रश्न करतो. गार्हपत्य, दक्षिण, आहवनीय, सभ्य, आवसथ्य हे पांच अग्नीजसे आहेत तसा अष्टाक्षर पादयुक्त जो पंचपदा पंक्ती छंद, शब्दादि पंचविषयांचीं ग्राहक पंचेंद्रियें आहेत. अग्निहोत्र, दर्श पौर्णमास, च्यातुरमास्य, पशु, सोम, असे पांच यज्ञ सांगितले आहेत त्या प्रमाणें व शरिराकारानें परिणत झालेली पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, रूप जीं पंचतत्वें त्यांस अनुसरून चिती ह्मणजे ज्ञान, ती ज्ञानरूप अपसरा त्या त्या विषयाकारानें प्रमाण, विपरयय, विकल्प, निद्रा, स्मृती, या पंच वृत्तीनीं युक्त आहे. जसे नद्यांचे पांच प्रवाह पृथक् दिसतात तशी प्रमाणादिकानीं सारूप्य पावलेली चिती पांच प्रकारानें अनुभवास येते. तात्पर्य चितीरूप शक्तीस लाच कर्तृत्व भोग वृत्तमानलें आहे. अष्टावक्र प्रश्न करतो, दक्षिणा पूर्वक साहा आग्याधानें आहेत असें कोणी ह्मणतात तसेच साहा ऋतु कालचक्रानें वाहन करतात. साहा कृत्तिका यानावाचीं साहा नक्षत्रें आहेत, साह्रा यज्ञाचे प्रकार आ

हेत ते प्रकार सर्व वेदांत प्रसिद्ध आहेत यां प्रमाणेंच साहा इंद्रियें आहेत, आतां ज्ञानेंद्रियें पांच आहेत; परंतु मनास इंद्रियत्व मानलें ह्मणजे त्यासुद्धां साहा इंद्रियें होतात आणि मनास इंद्रियत्व मानणें अवश्यक आहे. निद्राकालीं-इतरांच्या लया प्रमाणें मनाचाही लय होतो. मनाला कर्तृत्व इतर इंद्रियांच्यासाहाय्यानें आहे आणि चित्त भावाचा साक्षी जो आत्मा तो सातवा मानला आहे. बंदी प्रश्न करितो, ह्या पुरुषरूपी पशू, साहा इंद्रियें व बुद्धी या सात पदार्थांच्या योगानें ऐहिक व पारलौकिक सुख भोगीत असतां आपल्या सुखांत निमग्न होऊन परमेश्वरास विसरतो तथापि शेवटीं परमेश्वराची प्राप्ती त्या नृपशूस होते. सातताराांनीं युक्त जसा वीणा मधुर शब्द उत्पन्न करतो तसे सप्त प्राणरूपी ऋषि यांशीं सहवर्तमान आत्मा मन प्रभृति इंद्रियांच्या संयोगानीं सुखाचा अनुभव घेतो तथापि त्या आत्म्याच्या कर्तृत्व शक्तीचा नाश होत नाहीं. असें ऐकून-अष्टावक्र सप्त पदार्थांचा निरास करून भाषण करतो, जसें सणाच्या दोऱ्यानें विणलेलें गोणी नावाच्या वस्त्रासारखें इंद्रिय प्रवेशास योग्य जे विषय ते संक्षेपानें आठ जरी सांगितले आहेत तरीं ते अनंत संख्याक विषय आहेत आठ इंद्रियें विषय रूप देशास जाण्यास साधन आहेत ज्यास आत इंद्रियें-असा जो परमात्मा त्याचें ज्ञान झालें असतां द्वैत भय नष्ट होतें. तशाच देवता-रूपी त्या त्या इंद्रियांच्या अधिष्ठानभूत देवतांच्याठायीं आठ वासना राहतात जसे सर्व यज्ञांत पशू वधनाचे आठ खांब असतात तसे नृरूपी पशूचें बंधनस्थान जे अष्ट धारांनीं युक्त अज्ञान तें ग्रह अतिग्रह संज्ञक जे विषयेंद्रिय संयोग त्यांचे ठायीं राहातें. बंदी ह्मणतो हे अष्टावक्रा, पितृ इष्टी विषयीं अग्नि प्रदीप्त करण्यास उक्त ज्या तीन ऋच्या त्या तीन वेळ ह्मटल्या ह्मणजे नऊ सामिधेनी होतात तशीच एक प्रकृती तीन गुणानीं युक्त असतांही ती आप आपल्या इतर गुण संबंधानें नऊ प्रकारची सृष्टी उत्पत्ति करिते. तशाच नऊ अक्षरानीं व चार पादानीं युक्त असा बृहती छंद होतो. तशीच अंकाची संख्या नऊ आहे तथापि त्यापासून अनंत अंक संख्या उत्पन्न होते तसेच गुण नऊ जरीं आहेत तथापि त्यापासून अनेक संख्यांक गुण उत्पन्न होतात. अष्टावक्र भाषण करतो हे बंदी, दशेंद्रियानीं युक्त देहरूप पुरी मध्यें वास करणाऱ्या जीवास मायेच्या योगानें अ-

नंत रूपें भास होतात. वस्तुतः पाहिलें असतां जीव तोच ब्रह्म आहे; परंतु रज्जूवर उरगाची भ्रांती जशी होते तसाच जीव मायाजन्य अज्ञानामुळें जीवदशेस प्राप्त होतो. सोहं ह्मणजे तोमी असें ज्ञान तीव्र वैराग्याभ्यासानें ज्याकालीं जीवास होतें त्याकालीं तो ब्रह्मदशेस येतो. काम क्रोधादिक जे असुर त्यांचा पराभव करून शम दमादिक जे देव यांचें अत्यादरानें सख्य केलें असतां जीवास अज्ञान दशेहून मुक्तता होऊन परब्रह्म प्राप्ती होते असें श्रुतींत प्रसिद्ध आहे. देहादिकांच्या अभिमानानें अनंत जन्मांच्या वासनेमुळें जीवास अज्ञानदशा येते त्यामुळें मी जीव सुखदुःखादि भोक्ता आहे असें ज्ञान त्यास होऊं लागतें जेव्हां तो आत्मतत्व वेत्ता विद्वान होऊन मी जीव नव्हे मी ईश्वरच आहें असा दृढ अभ्यास ज्याकालीं होतो त्याकालीं त्याचे बाधिता (पुढें नष्ट होणारे) वृत्तीनें आलेलें अज्ञान नष्ट होऊन मीच परमेश्वर असें तत्काल त्या जीवास ज्ञान होतें. जशा स्त्रिया दाहा महिने पर्यंत गर्भास धारण करून पुढें बीजाचा व कोठाराचा जसा संबंध घडतो तसा चिदात्म्याचा अहंकाराशीं संबंध आहे. दशेंद्रियानीं युक्त देहामध्यें वास करणाऱ्या कितीएक जीवांस ज्ञानोपदेश करणारे ब्रह्मविद्याधिकारी मुक्त करतात व कितीएक अज्ञानानें अतिशय त्रास असल्यामुळें तसेच राहतात. तात्पर्य जीवात्मा आणि परमात्मा यामध्यें वास्तविक भेद नाहीं असें ज्ञान्यास अनुभवसिद्ध आहे. मूढास तर हा मार्ग केवळ द्वेष्य आहे. चित्तशुद्धी ज्या पुरुषाची जाली आहे त्यास हा मार्ग विश्वास ठेवण्यास योग्य आहे. एखादा सुमनुष्य वाईट कर्मानें त्रास असल्यामुळें बंधना प्रत पावून पुढें राजाज्ञेनें जसा मुक्त होतो तसा जीव अज्ञानाच्या अत्यभ्यासामुळें मायेनें बद्ध होऊन ज्ञानाच्या अति अभ्यासानें त्यापासून मुक्त होतो असा लौकीक दृष्टांत ही अनुभवसिद्ध आहे. बंदी भाषण करतो हे अष्टावक्रा, प्राण धारण करणारे जीवरूपी पशु यांनीं एका दशेंद्रियें व त्यांचे एकादश संख्याक शब्दादिक विषय हे सर्व प्रत्येक या पशूचे बंधन रूपी आहेत या विषयां पासून कोणी ही पशु मुक्त जाहालेला दिसत नाहीं असे हे एकादश विषय दृढतर बंधन करणारे आहेत तसेच या प्राणधारण करणाऱ्या जीवास एकादश शब्दादिक ग्रह जन्य हर्ष विषादादिक विकार स्वर्गामध्यें ही दुःख

देणारे आहेत मग भूमीवर दुःख देतील यानें आश्चर्य काय व देवांसही ते विकार दुःखप्रद आहेत मग मनुष्यास तें दुःख कारक असल्यानें आश्चर्य नाहीं. अष्टावक्र भाषण करतो; ध्यानवंत योगी असें ह्मणतात कीं, संवत्सराचे मास द्वादश आहेत जगती रूप छंदाचे द्वादश अक्षरात्मक पाद आहेत व प्राकृत यज्ञ द्वादशदिवसात्मक आहे तसेच जीवास आपआपले इंद्रियां पासून फिरून मोठ्या तत्वज्ञानाप्रत नजाणारीं अशीं धर्म, सत्य, दम, तप, अमात्सर्य, ह्री, तितीक्षा ह्मणजे क्षमा, अनुसूया ह्मणजे कोणाशीं स्पर्धा न करणें, यज्ञ, दान, धृती ह्मणजे धैर्य, यम ह्मणजे इंद्रिय निग्रह हीं बारा व्रतें आहेत. जसा आदित्य आपल्या तेजानें पुरुषाच्या तमाचा नाश करतो तशीं हीं द्वादश व्रतें पुरुषाच्या इंद्रिय जन्य विषयांचा नाश करणारीं आहेत ह्मणून या व्रतांस द्वादशादित्य अशी तत्ववेत्ते उपमा देतात. ब्रह्मलोकास जे प्राणी जातात त्यांसच ज्ञानाची प्राप्ती होत्ये अथवा कृत त्रेत द्वापार युगांत जे उत्पन्न होतात त्यांसच ज्ञानाची प्राप्ती होत्ये. कलियुगांत उत्पन्न होणाऱ्यांस ज्ञानाची प्राप्ती नाहीं असा किती एक मतांचा सिद्धांत आहे त्या मताचा निरास करण्या करितां बंदी प्रश्न करितो हे अष्टावक्रा, चित्त शुद्धीला देश कालाची अपेक्षा पाहिजे ती चित्तशुद्धी केवळ पुरुष यत्नानें साध्य नाहीं. त्रयोदशी तिथी सर्व कार्यास प्रशस्त आहे व तेरा द्वीपांची पृथ्वी सर्व कर्मास अति प्रशस्त सांगितली आहे. लोमश ह्मणतात हे राजा, अर्ध श्लोक बोलून बंदी विराम पावला असतां उत्तरार्ध श्लोकानें अष्टावक्र भाषण करतो हे बंदी, दहा इंद्रियें, बुद्धि, मन व अहंकार अशा त्रयोदश पदार्थांनीं आत्मा युक्त असल्यामुळें असंगी जरी आत्मा आहे तरी या त्रयोदश पदार्थांच्या संगतीमुळें तो संगी होऊन सर्व दुःखें भोगतो ह्मणून बुध्यादिक तीन पदार्थ व दशेंद्रियें मिळोन त्रयोदश पदार्थांचें शोधन केलेंच पाहिजे या विषयीं उदासीन राहूं नये. या त्रयोदश पदार्थांची धर्मादिक जीं पूर्वीं द्वादश व्रतें सांगितलीं त्यांच्या बळानें ज्ञान उत्पन्न झालें असतां अर्थात त्रयोदश पदार्थांचा नाश होतो नंतर आत्म्यास मी ब्रह्मच आहें असें ज्ञान होऊन याच देशीं व याच कालीं त्यास मुक्ती होते. असा श्रुतीचा सिद्धांत आहे. आत्म्या-

पासून बुध्यादिकांची निवृत्ती झाली ह्मणजे स्वतःच तो प्रकाशक होतो. असें अष्टावक्रानें त्या सभेंत भाषण केल्यावर एकाएकीं सभेमध्यें सभासदांचा मोठा नाद शब्द झाला आणि वरुण पुत्र बंदी स्तब्ध बसलेला पाहून अष्टावक्रही अधोमुख करून ध्यानस्थित झाला. त्या काळीं जनकाच्या यज्ञसभेंत बसलेले विद्वान ब्राह्मण हात जोडून अष्टावक्राची पूजा करूं लागले त्याकाळीं अष्टावक्र सकलब्राह्मणांस भाषण करतो हे विप्रहो, या-बंदीनें मोठमोठे विद्वान् ब्राह्मण वादामध्यें जिंकून जलामध्यें बुडविले ते ब्राह्मण आज याणें आणून द्यावे नाहींतर यास राजानें जलांत बुडवावा. असें ऐकून बंदी भाषण करतो मी वरुण राजाचा पुत्र आहें. जनकाच्या सत्रासारखें माझ्या पित्याचे गृहीं ही द्वादश वार्षिक सत्र आहे त्या सत्राकरितां हे मोठे विद्वान ब्राह्मण तेथें पाठविले आहेत ते सकल, वरुणाचें सत्र समाप्त झालें ह्मणजे पुनः येथें येतील. अष्टावक्र भाषण करतो बंदीनें-उच्च वाणी करून अथवा आपल्या बुद्धिकौशल्यानें समुद्रजलांत जे ब्राह्मण बुडविले त्या बंदीच्या कुलकाचा आज नाश करून सकलांचा उद्धार केला. या मध्यें सदसद् विचार काय असेल तो सकल सभाजनानीं करून उभयतांची परीक्षा करावी. अग्नीत दाहक शक्ती आहे परंतु तो सत्य-प्रतिज्ञ, धीमान, ज्ञानी पुरुष यांच्या शरीरास दाहन करतां अनृत बोल-णाराचा दाह करतो. जाती, वय, विद्या इत्यादिकांचा पक्षपाती नसून जसा तो सत्य पक्षपाती आहे तसे तुह्मीं सभासद मी बाल आहें असें जाणोन माझा अवमान न करितां वास्तविक जें आहे याचा तुह्मीं विचार करावा. हे जनकराजा, गजा सारखा तूं असल्या मुळें सकलांच्या स्तुती तुला हर्ष उत्पन्न करतील. याजमुळें तूं माझ्या भाषणा कडे लक्ष देणार-नाहींस हें खरें; परंतु भोकरीच्या पत्रावर भोजन करणें अथवा त्याचें फल भक्षण करणें हीं बुद्धि नाशक व दोषकारक जशीं आहेत तशी तुह्मी स्तुती आहे तीस तूं भुलूं नकोस. जनक भाषण करतो हे अष्टावक्रा, तुझी दिव्यरूप अमानुष वाणी मी श्रवण केली, तूं साक्षात् दिव्य स्वरूपच आहेस बंदीला तूं वादामध्यें खचित पराजित केलास आपेक्षा या बंदी-

स बुडवितों हा महा. अष्टावक्र भाषण करतो हे राजा, हा बंदी जिवंत राहावा अशी माझी इच्छा नाहीं याचा पिता वरुण जर आहे तर यास जलांत नेऊन बुडीव ह्मणजे माझी अर्थ सिद्धी झाली. बंदी भाषण करितो हे अष्टावक्रा, मी वरुण राजाचा पुत्र आहें त्या पेक्षां जलांत मला बुडविलें तथापि मला भय नाहीं. परंतु आतां एक मुहूर्तानें तुझ्या कहोड नामक पित्यास तूं पहाशील. लोमश ह्मणतात हे राजा, याप्रकारें बंदीनें भाषण केल्यावर इकडे माहात्म्या वरुणानें सकल ब्राह्मणांची पूजा व सत्कार केला असतां ते ब्राह्मण अकस्मात जनकाच्या समीप भागीं आले. त्याकालीं कहोड जनकास भाषण करतो हे राजा, जें कृत्य मी करण्यास समर्थ झालों नाहीं-तें कृत्य माझ्या पुत्रानें केलें. याजकरितांच सकल जन, पुत्र होण्याची इच्छा करतात. निर्बलास कदाचित बलवान पुत्र होतो, अपंडितास कदाचित पंडित पुत्र होतो अथवा अविद्वानास विद्वान पुत्र होतो असें दिसतें हे राजा, तुझें कल्याण असो. साक्षात् यम तीक्ष्ण धार परशु हस्तामध्यें घेऊन तुझ्या रिपूंच्या शिरांचा नाश करो. तुझ्या यज्ञामध्यें ब्राह्मणानीं औक्थ्य नामक सामानें गायन केलें व सोमपान केलें. व देवानीं संतुष्ट होऊन तुझ्या यज्ञांत प्रत्यक्ष हविर्भाग घेतले अशी कहोडानें राजाची स्तुती केल्यावर जनकाच्या सभेंत बसलेले मोठमोठे तेजस्वी राजे व ब्राह्मण-हे एका एकीं उठून उभे राहिले. नंतर राजाची आज्ञा घेऊन सागरामध्यें बंदीनें प्रवेश केला. राजानें अष्टावक्राच्या पित्याची पूजा केली असतां अष्टावक्र आपला पिता, मातुल व सकल ब्राह्मण यां सह वर्तमान तेथून निघून आपले आश्रमास येऊन मातेच्या सन्निध बसला नंतर पित्यानें अष्टावक्रास सांगितलें कीं, ही समंगा नामक नदी आहे यामध्यें स्नान कर-ह्मणजे तुझीं सकल अंगें सरळ होतील. त्याप्रमाणें अष्टावक्रानें स्नान करतांच त्याचीं सर्वांगें तत्काळ सरळ झालीं. लोमश ह्मणतात हे राजा, तीही पुण्यकारक समंगा नामक नदी इजमध्यें स्नान केलें असतां सकल पातकां पासून नर मुक्त होतात याजकरितां तूं ही सकल भ्राते व भार्यां सह वर्तमान स्नान करून नदीचें जलपान कर ह्मणजे सकल पातकां

पासून मुक्त होशील. माझ्या वाक्यावर विश्वास ठेऊन कांहीं दिवस या नदी तीरीं ब्राह्मण व भ्राते यां सहवर्तमान राहा आणि मज सहवर्तमान कांहीं पुण्य कर्मे परम भक्तीनें या नदी तीरीं कर. असा विषय या अध्यायांत आं

१३५ अध्याय एकशें पसतीस.– लोमश ह्मणतात हे धर्मराजा, या नदीचें नाव पूर्वी मधुविला असें प्रसिद्ध होतें. तंतर अष्टावक्रानें या नदींत स्नान करतांच त्याचीं अंगें सरळ झालीं त्या दिवसा पासून इचें नाव समंगा असें प्रसिद्ध झालें. हें कर्दमील नामक तीर्थ येथेंच पूर्वी भरथ नामक राजास अभिषेक झाला. पूर्वी इंद्रानें वृत्रासुराचा वध केला तेणें करून इंद्राची बहुत अपकीर्ती झाली ह्मणोन तिच्या परिहारार्थ समंगे मध्यें इंद्रानें स्नान केलें तेणें करून तो निरदोषी झाला मैनाक पर्वताच्या पार्श्व भागीं हें विनशन तीर्थ पाहा येथें पूर्वी अदितीनें पुत्रा करितां ब्रह्मोदनाचा (यज्ञांत ऋत्विजांस जें अन्न देतात तें) पाक केला होता. या मैनाक पर्वतावर पूर्वीं भरतानें वास केला ह्मणोन त्याच्या अपकीर्तीचा नाश होऊन तो कीर्तीमान झाला. हें कनखल नामक ऋषीचे प्रिय पर्वत, ही महानदी गंगा पहा. पूर्वीं सनत्कुमार ऋषीस त्या गंगेच्या तीरीं सिद्धी मिळाली या स्तव तूंही राजा भ्राते व भार्या यां सहवर्तमान या नदी मध्यें स्नान कर तेणें करून सर्वपाप मुक्त होशील. अपां ह्रद या नामें तीर्थ आहे यास स्पर्श करून नंतर भृगुतुंग नामक पर्वताचें दर्शन कर येथेंच उष्णी गंग नामक तीर्थ व स्थूलशिराचा आश्रम आहे तेथें जा आणि काम, क्रोध, मान इत्यादिकांचा त्याग करून कांहीं दिवस राहा. हा रैभ्य नामक ऋषीचा आश्रम पूर्वी भरद्वाजाचा पुत्र यवक्रीत येथेंच नष्ट झाला. असें लोमशानें भाषण ऐकून युधिष्ठिर प्रश्न करतो हे ऋषे, भरद्वाज नामक ऋषी कोण होते व त्यांचा यवक्रीत नामक पुत्र कसा नष्ट झाला? हा संपूर्ण वृतांत मला सांगावा. असा प्रश्न ऐकून लोमश सांगतात हे धर्मराजा, भरद्वाज आणि रैभ्य हे दोन ऋषी स्नेही होते. रैभ्यास अर्वावसु व परावसु असे दोन पुत्र होते, त्यांणीं बाल्यत्वा पासून बहुत तपस्या करून कीर्ती संपादन केली. भरद्वाजास यवक्रीत या नामें एक पुत्र होता तो एके दिवशीं ब्राह्मण व पुत्र यानीं संतुष्ट

न जो रैभ्यऋषी त्यास पाहून मनामध्यें खिन्न होऊन ह्मणतो कीं, माझा पिता तपस्वी आहे खरा; परंतु विद्वान् नाहीं ह्मणोन याचा ब्राह्मण सत्कार करीत नाहींत तस्मात् आतां विद्या संपादन होईल तो उपाय करावा. असा विचार करून यवक्रीतानें आपल्यास संपूर्ण वेदांचें ज्ञान होण्या करितां महान् तपास आरंभ केला. अग्नीमध्यें हवन करतां करतां संपूर्ण ज्याचें शरीर संतप्त झालें अशी त्याची घोर तपस्या पाहून सहस्राक्ष यवक्रीताजवळ येऊन बोलला तूं कोणाच्या कारणास्तव हें येवढें घोर तप आरंभिलेंस याचें कारण मला सांग. असें ऐकून यवक्रीत भाषण करतो कीं, हे इंद्रा, वेदाचें अध्ययन केल्या वांचून एका एकीं ब्राह्मणांस वेद याचे अध्ययन करण्याची गरज नसावी अशा तात्पर्यानें संपूर्ण ब्राह्मणांवर उपकार व्हावा ह्मणोन हें घोर तप मी आरंभिलें. गुरुमुखा पासून श्रवण करून वेदाध्ययन होण्यास फारच यत्न लागतो. अध्ययन करतां करतां संपूर्ण- आयुष्य क्षीण होतें तथापि साध्य होत नाहीं. असें यवक्रीतानें भाषण ऐकून इंद्र बोलतो हे ऋषे, हा तूं तपें करून अमार्ग संपादन करतोस, तप करून वेदसाध्य होत नाहींत यास्तव तूं गुरुपाशीं जाऊन वेदाध्ययन कर. असें इंद्र भाषण करून अंतरधान पावला असतां यवक्रीतानें त्याचें वाक्य न ऐकतां पुनः घोरतप आरंभिलें. पुनः इंद्र क्रुद्ध होऊन यवक्रीताचे सन्निध येऊन बोलला हे ऋषे, तुला मी पूर्वी एकवार सांगितलें असतां तूं हा व्यर्थ यत्न कशा करितां करतोस? तुझी अर्थ सिद्धी होणार नाहीं. तूं व तुझा पिता या उभयतांनीं गुरु मुखा पासून वेद शिकावे. असें इंद्रानें भाषण केल्यानंतर यवक्रीत बोलतो कीं हे देवराज, मोठ्या नियमें करून व तपें करून मी आपली अर्थ सिद्धि करीन या कार्याकरितां अंगाचा होम करीन. परंतु तसाच माघारा जाणार नाहीं; असा यवक्रीताचा दृढनिश्चय पाहून इंद्रानें मनांत विचार केला कीं, याचें निवारण करण्यास दुसरा कांहीं प्रयत्न करावा. अशा हेतूनें कांहीं दिवसांनंतर इंद्र. वृद्ध ब्राह्मणाचें रूप धरून भागीरथीच्या तीरीं यवक्रीताची स्नान संध्येची जेथें जागा होती तेथें येऊन भागीरथींत मूठ मूठ वाळू टाकूं लागला;

एके दिवशीं यवक्रीतानें पाहून वृद्ध ब्राह्मणास विचारिलें कीं, हें तूं काय करतोस? तेव्हां इंद्र बोलला मी या नदीस पूल बांधितों. असें ऐकून यवक्रीत बोलतो हे ब्राह्मणा, हा गंगेचा ओघ मोठा आहे यास तुझ्या अशा कर्मानें पूल कसा सिद्ध होईल? असें ऐकून वृद्ध ब्राह्मण किंचित् हास्य करून यवक्रीतास ह्मणतो कीं, हे ब्राह्मणा, जसा माझा वाळुकेच्या पुला विषयीं यत्न व्यर्थ तशी तुझी तपश्या वेदप्राप्त होण्याची व्यर्थ आहे हें तुला कसें समजत नाहीं. असें ऐकून हा साक्षात् इंद्र असें यवक्रीतास ज्ञान होऊन तो पुनः भाषण करतो कीं हे इंद्रा, तुला मी जाणिलें आतां मला जसें वरप्रदान देणें असेल तें दे अतः पर याविषयींमी तप करण्याचें सोडून देतों. असें ऐकतांच इंद्रानें सांगितलें कीं, हे ऋषे, तुला व तुझ्या पित्यास अध्ययन केल्यां वांचून सांग वेद प्राप्त होतील. हा वर मी तुला दिला दुसरी कांहीं इच्छा असल्यास वर माग नाहींतर येथून आपले गृहीं जा. इतकें इंद्रानें सांगतांच यवक्रीत पूर्णकाम होऊन आपले घरीं गेला आणि पित्यास बोलला हे तात, इंद्रापासून तुला व मला अध्ययन केल्यावांचून सांगवेद प्राप्त होण्याचा वर मिळाला तूं आतां कांहीं चिंता करूंनको. असें पुत्राचें दर्पयुक्त भाषण ऐकून पिता बोलला हे पुत्रा, इंद्राच्या वर प्रसादानें तूं बहुत गर्विष्ट झालास असें मला वाटतें त्यापेक्षां तूं लौकरच नाश पावशील याविषयीं तुला एक गोष्ट सांगतों, बालधि या नामें पूर्वीं एक ऋषी होता त्याणें पुत्राकरितां असें कठिण तप केलें कीं, माझे पुत्रास मरण नसावें. एके दिवशीं सर्व देवांनीं प्रसन्न होऊन ऋषीस असा वर दिला कीं, तुला पुत्र होईल; परंतु कांहीं कारणानें मरेल. त्या काळीं बालधि ऋषि देवांस ह्मणो लागला कीं, जसे पर्वत निरंतर अचल असतात तसा माझा पुत्र असो. कांहीं दिवसानीं ऋषीस मेधाविया नामें पुत्र झाला, त्या पुत्रास कांहीं दिवसांनीं पित्याचा वरस मजतांच त्या दिवसा पासून तो संपूर्ण ऋषींची स्पर्धा करून पृथ्वीवर फिरूं लागला. कोणे एके दिवशीं धनुषाक्ष यानामें एक ऋषी होता त्याचा त्याणें अपमान केला तेव्हां धनुषाक्षानें शाप दिला कीं, तुझें भस्म होईल; परंतु मेधावीचें भस्म झालें नाहीं नंतर धनुषाक्षानें मनांत विचार केला कीं; याचें प्र-

स्य कां होत नाहीं, माझा शापतर व्यर्थ व्हावयाचा नाहीं तस्मात् याचें आयुष्यास कारण पर्वत आहे त्याचा महिषाकडून भेद करवावा ह्मणजे हा क्षीण होईल. असा विचार करून महिषाकडून पर्वताचा भेद करवितांच तत्काल बालधीचा पुत्र मरण पावला त्याकालीं बालधी ऋषी बहुत विलाप करूं लागला असतां संपूर्ण ऋषी त्याजकडे येऊन समाधान करूं लागले कीं, हे ऋषे, दैवांत जें लिखित असतें त्याचें अतिक्रमण मनुष्य कधीं करण्यास समर्थ होत नाहीं तर आतां या विषयीं शोक करूं नको. हे यवक्रिता, जसा बालधी ऋषीचा पुत्र दर्पानें नष्ट झाला तसा तूं होऊं नको. महान् तपस्वी वर मदान मिळालेले दर्प करून नष्ट झाले तसा तूंही होशील परंतु तुला असें न होण्याचा उपाय सांगतों. रैभ्य व त्याचे उभयतां पुत्र यांची स्पर्धा करूं नको. असें ऐकून यवक्रीत बोलला हे तात, जसें तूं सांगशील तसें मी आचरण करीन जसा तूं मला मान्य तसाच रैभ्यही मला मान्य आहे असें बोलून यवक्रीत पित्याच्या वाक्याप्रमाणें रैभ्यास व त्याचे पुत्रांस पीडा न करितां इतर मुनीस पीडा करीत वनामध्यें संचार करूं लागला. अ. वि. या अध्या. आहे.

१३६ अध्याय एकशें छत्तीस:- लोमश भाषण करतात हे धर्मराजा कोणे एके दिवशीं यवक्रीत निर्भयपणें फिरतां फिरतां वैशाख माशीं रैभ्याच्या आश्रमीं आला आणि लता वद्रुम इहीं करून सुशोभित जो आश्रम त्यामध्यें किन्नरी सारखी रैभ्याची स्नुषा फिरत होती तिला पाहून निर्लज्जपणें बोलला कीं, तूं मला वश हो. असें ऐकून स्नुषेनें विचार केला कीं, यास न वश व्हावें तर हा शाप देईल बरें वश झाल्यें नर रैभ्यास कळलें असतां तोही शाप देईल. असा विचार करून शेवटीं ती यवक्रीतास वश झाली आणि तिनें एकांतीं जाऊन विषय केला. नंतर यवक्रीत तेथून गेला असतां स्नुषाही आश्रमांत जाऊन एकीकडे रुदन करीत बसली इतक्यांत रैभ्य ऋषि आश्रमीं आले आणि परावसूची स्त्री आर्त झालेली पाहून तिला बोलले कीं, तूं रोदन करीत कां बसलीस? त्याकालीं स्नुषेनें यवक्रीताचा संपूर्ण वृत्तांत रैभ्यास सांगतांच त्या कोपानें रैभ्य ऋषीच्या संपूर्ण शरीराचा दाह झाला नंतर ऋषीनीं आपले शिखेचा एक केश उपटून अग्नीमध्यें हवन करतांच अक-

स्मात् एक नारी रूप व यौवनें करून उत्पन्न झाली. दुसरा केश उपटून अ ग्नी मध्यें हवन करतांच भयंकर एक राक्षस उत्पन्न झाला नंतर तीं उभय तां रैभ्यऋषीच्या अग्रभागीं उभीं राहून ऋषींस बोललीं कीं, काय आज्ञा आहे? त्या काळीं ऋषी बोलले तुह्मीं उभयतां यवक्रीताचा वध करा. अशी त्यांस आज्ञा होतांच स्त्री व राक्षस यवक्रीताकडे जाऊन प्रथम स्त्रीनें त्या समोहित करून त्याचा कमंडलू हरण केला. नंतर राक्षस हातीं शूल घे उन त्यास मारण्यास पाठीस लागला. त्याकाळीं यवक्रीत तेथून पळून एक सरोवर होतें त्यांत उडी टाकण्या करितां जवळ गेला तों सरोवर आटू न गेलें. नंतर संपूर्ण नद्यां मध्यें उडी टाकावी या बुद्धीनें ज्याज्या नदी पुढें य वक्रीतानें जावें तीती नदी शुष्क व्हावी. हा अद्भुत चमत्कार पाहून यवक्रीत पित्याच्या अग्निहोत्र शाळेंत जाऊं लागला असतां शाळेच्या बाहेर एक अं ध झालेला शूद्र उभा होता त्याणें आंत जाण्यास प्रतिबंध केला तों राक्षसा नें हृदयांत शूल मारून यवक्रीतास पृथ्वीवर पाडला आणि स्त्री सहव र्तमान पुनः तो राक्षस रैभ्याकडे आला. असा विषय या अध्यायांत आहे.

१३७ अध्याय एकशें सदतीस:— लोमश सांगतात हे धर्मराजा, इतक्यांत भरद्वाज ऋषी माध्यान्हिक कर्म करून हस्तांत समिधांचा भारा घेऊन अग्निहोत्र शाळेंत जाऊं लागले तेव्हां पूर्ववत प्रमाणें अग्नीनीं साक्षा त देह धरून भरद्वाजास अभ्युत्थान दिलें नाहीं तेव्हां भरद्वाजाच्या मनां त कांहीं संशय उत्पन्न होऊन तो मनांत विचार करूं लागला कीं, माझ्या अ ग्निहोत्रामध्यें कांहीं वैगुण्य झालें किं काय? असें मनांत आणून त्या अंधशू द्रास ऋषीनीं विचारिलें कीं, अरे शूद्रा, आज अग्नी साक्षात् मला उत्थापन देऊन दर्शन कां देत नाहींत याचें कारण काय व तुझी स्थिती पूर्ववत प्रमाणें दिसत नाहीं. अल्पबुद्धी माझा पुत्र रैभ्याकडे तर गेला नाहीं ना? हें मला सां ग कारण माझें मन संशय पावलें. असें ऐकून शूद्र बोलतो हे ऋषे, तुझा पु त्र रैभ्यऋषीकडे गेला होता तेथें त्याणें त्याचा काय अपराध केला असेल तो असो, परंतु शूलधर राक्षस तुझ्या पुत्राच्या पाठी मागें लागला होता त्याच्या भयानें तुझा पुत्र अग्निशाळेंत जाऊं लागला तेव्हां मी त्यानें निवारण केलें.

तक्यांत राक्षसानें शूलें करून तुझ्या पुत्राचा प्राण घेतला. तें कलेवर कोठें तरीं पडलें असेल असें ऐकून भरद्वाज इकडे तिकडे पाहूं लागला तों इत क्यांत पुत्राचें कलेवर दृष्टीस पडलें. तें पाहातांच अरे शूद्रानें घात केला असें बोलून विलाप युक्त भाषण करूं लागला कीं, अरे पुत्रा, संपूर्ण ब्राह्मणांस अध्ययन केल्या वांचून वेदाची प्राप्ती व्हावी ह्मणोन तूं ब्राह्मणोपकारार्थ बहुत तप केलेंस, कोणाचा तूं अपराध केला नसतां अशी तुझी अवस्था कोणी केली या रैभ्याच्या कर्मानें मला पुत्र शोक झाला, तुझ्या वांचून मी आपले प्राण ठेवणार नाहीं. या पापाच्या योगानें रैभ्याचा जेष्ठ पुत्र निरपराधी असतांही पित्याचा वध करील. हे पुत्रा, तूं मेलास ह्मणोन मी आपले मित्रास असा शाप दिला, अशी आपत्ती कोणासही प्राप्त न होवो. असे बहुत विलाप करून त्यानें पुत्राचा दाहा केला नंतर आपल्या करितां मोठा अग्नि प्रज्वलित करून त्यांत त्यानें ही प्रवेश केला. असा विषय या अध्यायांत आहे.

१३८ अध्याय एकशें अडतीस — लोमश सांगतात हे धर्मराजा, कोणे एके दिवशीं बृहद्युम्न नामक राजानें सत्रामध्यें ऋत्विजकर्म करण्या करितां रैभ्याचे पुत्र अर्वावसु व परावसु यांस बोलाविलें असतां आश्रमीं रैभ्य व परावसूची भार्या यांस ठेऊन उभयतां ऋषिपुत्र सभा करितां गेले. कांहीं दिवसांनीं परावसु आपले भार्येस भेटण्या करितां येत असतां तमयुक्त रात्रीचे ठायीं कृष्णाजीन धारण करून रैभ्य ऋषी अरण्यांत फिरत होता त्यास हा कोणी तरी मृग आहे असें वाटून त्या रात्रीस त्याणें त्याचा वध केला नंतर हा पिता असें कळल्यानंतर दाहादि प्रेतकार्य करून तो बृहद्युम्न राजाचे समारंभास गेला. आणि झालेला वृत्तांत भ्रात्यास सांगून बोलला कीं, हें सत्र करण्याचें कठीण आहे, एकाकी तुझ्यानें व्हावयाचें नाहीं तेव्हां तूं वनामध्यें जाऊन मी केलेली पितृहत्या इच्या दोष परिहारार्थ तप कर मी राजाचें सत्र कर्म चालवितों. असें ऐकून अर्वावसु बोलला कीं ठीक आहे, तूं राजाचे घरीं सत्र चालीव मी तुझ्या ब्रह्महत्येच्या निवारणार्थ जितेंद्रिय होऊन तप करितों, असें भाषण करून अर्वावसु सत्र त्याग करून वनामध्यें तपस्येस गेला. कांहीं दिवस तप करून पुनः अर्वावसु राज

त्या सत्रीं गेला. हें परावसूनें पाहून बृहद्युम्नास हळूच सांगितलें कीं, अर्वावसूनें ब्रह्महत्या केली यास्तव त्यास यज्ञांत येऊं देऊं नका ब्रह्मघ्नानें हें सत्र पाहिलें असतां यजमानास बहुत पीडा होईल. इतकें परावसूनें राजास सांगतांच राजानें तत्काल दूतास हांक मारून सांगितलें कीं, अर्वावसूनें ब्रह्महत्या केली यास्तव त्यास बाहेर घालवून द्या तेव्हां अर्वावसु बोलला हे राजा, मी ब्रह्महत्या केली नाहीं माझ्या भ्रात्यानें केली होती त्या पापाच्या परिहारार्थ मी वनांत तपश्चर्या करून भ्रात्यास निरदोषी केलें असें असतां मला ब्रह्मघ्न कसें ह्मणतोस? असें ऐकून राजा पराकाष्ठेचा क्रुद्ध होऊन पुनः दूतास बोलला कीं. यास लौकर घालवून द्या. असें ऐकतांच अर्वावसूनें वनामध्यें आऊन सूर्याची बहुत उपासना केली तेणें करून सूर्यनारायण संतुष्ट होऊन अर्वावसूचे अग्रभागीं उभा राहिला व संपूर्ण देवही आपआपलीं रूपें धारण करून अर्वावसूस बोलले कीं, जे इच्छित वर मागणें असतील ते माग, आह्मीं देण्यास सिद्ध आहोंत. त्या कालीं अर्वावसूनें देवांपाशीं वर मागितले कीं, मृत झालेला माझा पिता पुनः जिवंत व्हावा. ब्रह्महत्येचें पातक माझ्या भ्रात्यास नसावें, पिता मारण्याचें विस्मरण व्हावें व भारद्वाज आणि यवक्रीत हे पुनः जिवंत होऊन त्यांस वेद ही प्राप्त व्हावे. असे वर मागतांच देवांनीं तथास्तु ह्मटलें नंतर अर्वावसूचा पिता रैभ्य, भरद्वाज व यवक्रीत हे जिवंत झाले. यवक्रीत संपूर्णांस बोलला कीं, हे देवहो, मी संपूर्ण वेदाभ्यास केला व उत्तम प्रकारचीं व्रतें आचरलीं असें असतां रैभ्यऋषीनीं माझा कसा प्राण घेतला? असें ऐकून देव बोलले हे मुनी, तूं असें भाषण करूं नको कारण गुरूनें उपदेश केल्यावांचून अनायासानें तुला वेद प्राप्त झाले रैभ्यानें गुरुमुखापासून यथाविधि बहुत कालें करून वेद ग्रहण केले तेव्हां वेद ग्रहण करण्यास रैभ्य ऋषीला बहुत दुःख सोसावें लागलें. असें यवक्रीतास सांगून इंद्रादि देव स्वर्गीं गेले असतां भरद्वाजादि ऋषी आपआपले स्थानीं गेले. तो हा रैभ्य ऋषीचा आश्रम, पुष्प, फल, मूलें इहीं करून निरंतर स्पर्शोभीत असतो येथें तूं भार्या व भ्राते यांसह वर्तमान कांहीं दिवस राहा ह्मणजे सर्व पापांपासून मुक्त होशील. अ. बि. या अ. आहे.

१३९ अध्याय एकशें एकूणचाळीस.– लोमश भाषण करितात हे धर्मराजा, उशीरबीज, मैनाक, श्वेतगिरी व कालशैल या पर्वतांचें अतिक्रमण केलेंस आतां हे गंगेचे सात ओघ व विरजनामक स्थान येथें निरंतर अग्नि प्रदीप्त आहे हें मनुष्यानीं पाहण्यास मोठें दुर्घट यास्तव तूं चित्ताचा निरोध करून संपूर्ण तीर्थें यथानुक्रमें पहा. हें देवांचें क्रीडा करण्याचें स्थान पाहा हा कालशैल पर्वत येथें जाऊन श्वेतगिरी व मंदराचल येथें जावें. यास्थळीं संपूर्ण यक्षांचा राजा माणिभद्र अठ्यायशीं हजार गंधर्वांसह वर्तमान राहातो तसेच किंपुरुष, गंधर्व इत्यादि माणिभद्राची उपासना करून अनेक रूपें व नाना प्रकारचीं शस्त्रें घेऊन त्याचस्थळीं राहातात. या स्थळीं वायूही जाण्यास समर्थ होत नाहीं हे संपूर्ण यक्ष व गंधर्व इंद्रासही स्थानापासून भ्रष्ट करतील. असे हे पराक्रमी यांणीं हें संपूर्ण पर्वत रक्षित आहेत. कुबेराचे भयंकर मंत्र संज्ञक सचीव येथेंच राहतात ह्मणोन हें स्थल मोठें कठिण येथें तूं समाधी कर ह्मणजे तुला भय मात्र होणार नाहीं. हा कैलास पर्वत साहा योजनें उंच आहे येथें संपूर्ण देव येतात, असंख्याक यक्षराक्षस किन्नर, नाग, सुपर्ण, गंधर्व हे कुबेर सदनास येतात. येथें हे धर्मराजा, तूं शमदमादि धारण कर मी व भीमसेन तुझें रक्षण करतों. असें धर्मराजास सांगून नंतर लोमश ऋषी संपूर्ण देवांची व दिक्पालांची प्रार्थना करूं लागले कीं, हे वरुणा, हे यमा, या घोर अरण्यांत राजाचें उत्तम प्रकारें तुह्मीं संरक्षण करा. हे देवी, हे गंगे, ज्यांबुनद पर्वतापासून तुझा आह्मीं मोठा शब्द ऐकिला अशी तूं परम पावनी राजास पावन कर आणि अशा घोर अरण्यांत राजा जातो त्याचें कल्याण कर. अशी लोमश ऋषी देवांची प्रार्थना करीत असतां धर्मराज बोलतात हे ऋषे, पूर्वी द्रौपदीचें उत्तम प्रकारें संरक्षण करा. हा देश परम दुर्घट येथें जाण्यास बहुत कष्ट होतात ह्मणोन संपूर्णांनीं वाङ्मन इत्यादिकांची शुद्धी करावी संपूर्णांनीं जितेंद्रिय असावें असें लोमशास भाषण करून भीमसेनास बोलतो हे भीमसेना, अर्जुनाच्या मागें आह्मांस व द्रौपदीस भयापासून संरक्षण करणारा तूंच आहेस. असें ऐकून भीमसेन ह्मणतो हे राजा, मी असतां कोणापासून

तुला भय नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१४० अध्याय एकशेंचाळीस:- धर्मराज बोलतो हे भीमसेना, या स्थलीं गुप्त अथवा प्रत्यक्ष बहुत बलवान प्राणी आहेत, त्यांच्या भयानें या देशांत जाणें कठीण. जो तपस्वी असेल त्याचेंच येथें गमन होईल यास्तव तूं आपल्या क्षुधेचा व तृषेचा त्याग करून बल व धैर्य धर. कैलास पर्वतीं लोमशऋषीनीं ह्या देश बहुत कठिण आहे ह्मणोन पूर्वींच सांगितलें येथें गजाश्वरथ यांचें गमन होत नाहीं यास्तव द्रौपदी, सहदेव, धौम्य इतर परिचारकजन व ज्यांस या पर्वतावर येण्याचें सामर्थ्य नाहीं असे जे ब्राह्मण त्यां सहवर्तमान तूं येथें गंगाद्वारीं राहा मी, नकुल व लोमश आह्मीं त्रिवर्ग यात्रा करून लौकरच माघारी येतों. असें ऐकून भीमसेन बोलतो हे धर्मराजा, द्रौपदी श्रमानें व दुःखानें बहुत आर्त आहे खरी, परंतु अर्जुनाची भेट बहुत दिवस झाली नाहीं तेव्हां यासमयीं तरीं होईल अशा इच्छेनें पुढें जाण्याची द्रौपदीची बहुत इच्छा आहे, आह्मी ही बहुत दिवस अर्जुनास भेटलों नाहीं तेव्हां आमचा त्याग करून तूं जाऊं नको. हे ब्राह्मण व परिचारिक यांची इच्छा असल्यास त्याणीं हरिद्वारीं राहावें, परंतु तुझा त्याग करून आह्मीं कधीं ही राहाणार नाहीं. या पर्वतावर रथ, तुरंग, गज यांस जाण्यास जर मार्ग नसला तर आपण संपूर्ण पादचारी जाऊं पांचालीस मी आपले स्कंदावर घेऊन माद्रीपुत्र ही मार्गामध्यें श्रांत जाहाले असतां त्यांस ही घेईन. असें भीमसेनाचें भाषण ऐकून धर्मराज बोलतात हे भीमा बरें तर तुझ्या बाहुबलाची व कीर्तीची वृद्धी असो. असें धर्मराजानीं भाषण केल्यानंतर पांचाली बोलली कीं हे राजा, मजवर संताप करूं नको तुज सहवर्तमान मला कांहीं क्लेश होणार नाहींत असें ऐकून लोमश बोलले हे राजा, हा गंधमादन पर्वत तपा खेरीज चढण्यास बहुत अशक्य आहे, तपस्वी जे असतील ते यावर जातात याजकरितां संपूर्णांनीं इंद्रियांचा निग्रह करून समाधी धरा ह्मणजे नकुल, सहदेव, भीमसेन, तूं व मी संपूर्ण अर्जुनास पाहूं. असें बोलत चालले आहेत तों सामोरा सुबाहुनामक किरात राजाचा देश गजाश्व इत्यादिकानीं युक्त व हजारों किरात कुलिंद ज्यामध्यें राहातात असा लागला, तेथें धर्मराज-

गेला असतां सुबाहूनें धर्मराजाची उत्तम प्रकारें पूजा केली. राजानें ही सुबाहूचा उत्तम प्रकारें सत्कार केला. नंतर सुबाहू बहुत संतुष्ट झाला असतां त्या दिवशीं राजानें सुबाहूच्या देशांत वास केला. दुसरे दिवशीं प्रातःकालीं सूर्योदयीं इंद्रसेनादिभृत्य बराबर घेऊन राजा पादचारीच निघाला. तेव्हां एकमेकास भेटी देऊन सुबाहूनें आपले कांहीं भृत्य राजाच्या संरक्षणा करितां बराबर दिले असतां धर्मराज प्रभृति संपूर्ण पांडव हळू हळू हिमालयापासून धनंजयाच्या भेटी करितां गंधमादन पर्वतीं गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१४१ अध्याय एकशें एकेचाळीस.— धर्मराज भाषण करतो कीं, हे भीमसेना, अर्जुनाच्या भेटी करितां इतके दुःख सोसून आपण या गंधमादन पर्वतीं जाण्यास आलों येथें नाना प्रकारचीं तीर्थें, सरोवरें व वनें पहात आपलीं पांच वर्षें गत झालीं अद्याप अर्जुन भेटत नाहीं तेणेंकरून मला परा काष्ठेचा खेद उत्पन्न झाला. समग्र शस्त्रास्त्र विद्येमध्यें परिपूर्ण युद्धामध्यें शत्रूंस कधीं ज्यानें पृष्ठभाग दाखविला नाहीं असा जो पार्थ याचें बहुत दिवस दर्शन झालें नाहीं तेणें करून भीमा, मला अगदीं चैन पडत नाहीं. आतां संपूर्ण आपण नर नारायणाश्रमीं मोठी विशाल बदरि आहे तेथें जाऊं नंतर तेथेंच एक कुबेराचें सरोवर यक्षराक्षसानें सेवित असें आहे तें पाहून पुढें पादचारीच गंधमादन पर्वतीं जाऊं. या पर्वतावर जे दुष्ट घातकी व पापी असतील त्यांचें गमन होत नाहीं यास्तव आपण शमदमादि इंद्रियांचा निग्रह करून शस्त्रास्त्रें घेऊन आणि व्याघ्र, सर्प, यक्ष, राक्षस यांचें भय आपणास व ब्राह्मणांस न होतां एकत्र मिळून अर्जुनाच्या भेटी करितां जाऊं. असा विषय या अध्यायांत आहे.

१४२ अध्याय एकशें बेचाळीस.— लोमश ह्मणतात हे धर्मराजा तुह्मीं महान् महान् पर्वत, नद्या, पुरें व अरण्यें पाहिलींत तशींच पुण्य कारक तीर्थें पाहून स्नान दानादि विधि केलेत आतां हा मंदराचल पाहा, ह्याच मार्गें या पर्वतावर जातो आतां सावध होऊन एकत्र मिळून चला, हा पर्वत देव व संपूर्ण ऋषी यांचें स्थान आहे ही अलकनंदा नामक महानदी, बदरिकाश्रं

मीं इचा प्रवाह आहे. देव व ऋषी यांचे समुदाय इच्या तीरीं निरंतर राहतात. सामगायन करणारे पुण्यशील ऋषी निरंतर इच्या तीरीं सामगायन करतात. साध्य तसेच अश्विनीकुमार इच्या तीरीं निरंतर संचार करीत असतात, सूर्यादि ग्रह व तारकां सहवर्तमान चंद्रमा अहोरात्र इच्याच तीरीं असतो, शिवानीं इचें जल आपले मस्तकीं धारण केलें आहे. अशी ही महानदी पापोद्धारिणी भगवती देवी इला आत्मनिग्रह करून अभिवादन कर. असें लोमशानीं सांगतांच पांडव आकाश गंगेस अभिवादन करून हर्षित अंतःकरणानें संपूर्ण ऋषिगणां सहवर्तमान पुढें चालले असतां दुरून स्वच्छ पांडूर वर्ण मेरू पर्वता सारखा एक पर्वत पाहून पुढें प्रश्न करणार हा पांडवांचा अभिप्राय पूर्वीं जाणोन लोमश ऋषी भाषण करतात हे पांडव हो, हा श्रीमान् कैलास पर्वताच्या शिखरा सारखा श्वेत पर्वत पाहा हा नरकासुराच्या अस्थीचा पर्वत होय. हा कसा चोहीं कडून प्रकाशित दिसतो? भगवान् विष्णु याणीं इंद्रहितार्थ नरकासुराचा वध केला. कारण या असुरानें पूर्वीं दहा हजार वर्षे तपश्चर्या करून इंद्राचें स्थान प्राप्त होण्या करितां यत्न केला होता आणि दुसरें एक विष्णूचें महत् कृत्य सांगतो. कोणे एके कालीं संपूर्ण पृथ्वी नष्ट होऊन पाताल लोकीं गेली तीचा उद्धार एकशृंग वराह अवतार धरून श्रीविष्णूनें केला. असें लोमशाचें वाक्य ऐकून युधिष्ठिर प्रश्न करतात कीं, हे ऋषे, ही पृथ्वी शतयोजनें विस्तृत असतां कशी बुडाली आणि तिचा उद्धार कोणत्या प्रकारानें झाला हें सांगा. असा प्रश्न ऐकून लोमश भाषण करतात हे राजा, पूर्वीं कृतयुगाच्या आरंभीं भगवान् आपणच यमाचें कार्य करूं लागले असतां उत्पन्न झालेले प्राणी मरण विरहित झाले ह्मणोन पशु, पक्षी, गवे, येडके, गाई व व्याघ्र इत्यादि श्वापदें व मनुष्यें यांच्या निरंतर उत्पत्तीची वृद्धी होऊन संपूर्ण पृथ्वी व्याप्त झाली, पृथ्वीवर राहण्यास स्थल नाहींसें झालें. त्या कालीं पृथ्वी भाराक्रांत होऊन भगवान नारायण यांस शरण गेली आणि त्यांस बोलली कीं, हे ईश्वरा, मी आतां लौकरच नष्ट होईन हा संपूर्ण भार माझ्यानें सहन करवत नाहीं ह्मणोन तुला मी शरण आल्यें. असें ऐकून भगवान् बोलले हे धरणी, तुझा भा

र लौकरच मी हरण करीन, भिऊंनको आंपले स्वस्थानीं जा. अशी आज्ञा होतांच पृथ्वी स्वस्थानीं गेली पुढें भगवंतानीं एकशृंग वराहाचें रूप धरून आरक्त नेत्रानें संपूर्ण प्राण्यांस भय उत्पन्न केलें आणि स्वतेजानें अग्नि सारखा दैदीप्य होऊन पातालांत प्रवेश केला आणि एकाएकीं पृथ्वी शृंगावर घेऊन वर काढिली. त्या कालीं संपूर्ण देव तसेच तपोधन यांस क्षोभ उत्पन्न होऊन ते एकाएकीं हाहाकार करूंलागले. पृथ्वीचा वेग सहन करण्यास देव व मनुष्यें यांतून कोणास सामर्थ्य राहिलें नाहीं, संपूर्ण भय पावून एकत्र मिळाले आणि ब्रह्मदेवाच्या सन्मुख जाऊन उच्चस्वरानें बोलले कीं, हे ब्रह्मदेवा, संपूर्ण लोक व चराचर जगत् तसेच समुद्र एकाएकीं क्षोभित कशानें झाले? ही पृथ्वी एकाएकीं कोणी उधृत केली? असें ऐकून ब्रह्मदेव ह्मणतात हे देवहो, तुह्मीं असुरांच्या भयाची शंका धरूं नका, जो सर्वांतरयामी भगवान् ज्याच्या योगें हें संपूर्ण जगत प्रकाशित झालें आहे त्या परमात्म्याविष्णूनें ही पृथ्वी शंभर योजनें रसातलापासून उधृत केली ह्मणोन या संपूर्ण लोकांचा एकाएकीं क्षोभ झाला-असें जाणा. असें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून देव ह्मणतात हे ब्रह्मदेवा, ज्या देवानें हें वराहरूप धरून या पृथ्वीचा उद्धार केला तें स्थळ आह्मांस दाखवा ह्मणजे आम्हीं तेथें जाऊं. असें देवांचें भाषण ऐकून ब्रह्मदेव ह्मणतात हे देवहो, हें इंद्राचें नंदन नामक वन सुशोभित दिसतें त्यास्थलीं तो आहे, त्याचे उरस्थलावर श्रीवत्समणी प्रकाशमान तुह्मांस दिसेल, लौकर जाऊन त्या अपूर्व प्राण्याचें दर्शन घ्या. असें पितामहाचें भाषण ऐकून देव त्यासह वर्तमान तेथें गेले. अशी कथा लोमश मुखापासून ऐकून पांडव हर्षित अंतःकरणानें यथा मार्गें पुढें गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१४३ अध्याय एकशें त्रेचाळीस:– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडव हस्तामध्यें खड्ग तसेच धनुष्य बाण घेऊन भार्या व ब्राह्मण यांसहवर्तमान गंधमादन पर्वतीं जात असतां मार्गामध्यें नाना प्रकारचीं सरोवरें, नद्या, पर्वत, वनें, उपवनें व वृक्षांच्या शीतळ छाया पहात.

चालले. नाना प्रकारच्या मृगानीं सुशोभित व ऋषि, सिद्ध, चारण, गंधर्व, व अमर यांणी सेवित जो गंधमादन पर्वत याच्या एक भागांत पांडवांनी प्रवेश केला असतां एकाएकीं मोठा वायु सुटून पर्वत संबंधीं धुळीनें संपूर्ण दिशा, आकाश व पृथ्वी व्याप्त झाली. नितक्यांत पर्जन्याचा ही वर्षाव बहुत झाला त्या योगें संपूर्णांचे डोळे दिपून गेले, एकमेकांस पाहण्यास कोणास शक्ती राहिलीनाहीं. वृक्षांचीं खंडें होऊन कित्येक वृक्ष पृथ्वीवर पडले त्यांचा शब्द मोठा भयंकर होऊं लागला. त्या कालीं संपूर्णांस असें वाटलें कीं, आकाश कोसळतें अथवा पृथ्वी विदारण होते किंवा काय? वाऱ्याच्या योगानें संपूर्णांचे अंगावर वृक्ष पडले तेणें करून संपूर्ण पांडव व ब्राह्मण आच्छादित झाले नंतर त्याचें निवारण करण्या करितां भीमसेन धनुष्य बाण व द्रौपदीस घेऊन वृक्षाच्या आश्रयानें उभा राहिला. धर्मराज व धौम्य एका सरोवराचे कांठीं लपले. अग्निहोत्राच्या अरणी घेऊन सहदेव पर्वताच्या अग्रभागीं गेला, नकुल व लोमशादि ब्राह्मण वृक्षास कवटाळून राहिले. अशी वायूच्या योगानें पांडवांची अवस्था झाली पुढें कांहीं वेळानीं थोडा वायू शांत झाला असतां पर्जन्य पडला त्यायोगानें पर्वत संबंधीं संपूर्ण नद्यांस पाणी येऊन मार्ग बंद झाला आणि नदीच्या वेगानें वृक्ष ही बहुत पडले. कांहीं कालानें पर्जन्याची व वायूची शांती झाली नद्यांचें जलही स्वल्प झालें. सूर्याच्या आच्छादनाचा नाश होऊन व्यक्तप्रभा झाली. त्या कालीं संपूर्ण पांडव, द्रौपदी व ब्राह्मण एकत्र होऊन गंधमादन पर्वतीं जाण्याचे इच्छेनें निघाले. असा विषय या अध्यायांत आहे.

१४४ अध्याय एकशें चवेचाळीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पुढें एक कोश पर्यंत पांडवांनीं गमन केलें असतां मार्गामध्यें द्रौपदी पर्जन्य व वायूच्या स्पर्शानें बहुत दुःखित होऊन भूमीवर बसली. हें पाहून नकुल तिला उठविण्या करितां जवळ येऊन धर्मराजास बोलतो हे राजा, द्रौपदीस मार्ग संबंधीं बहुत दुःखें होऊन ती पृथ्वीवर पडली. जन्मा मध्यें राज पुत्रीस मार्ग संबंधीं दुःख ठाऊक नाहीं तें एकाएकीं तिला प्राप्त झालें यास्तव राजा, पांचालीस अश्वासन दे आणि मार्ग

सबधी दुःखाचें निवारण कर. असें ऐकतांच धर्मराज, भीमसेन व सहदेव हे द्रौपदीच्या सन्निध आले. त्या काळीं द्रौपदीचें मुख विवर्ण झालेलें पाहून धर्मराज आपले अंकावर तिचें शिर ठेवून बोलला हे राजपुत्री, उत्तमोत्तम मृदु जी शय्या इच्चे ठायीं तूं शयन करण्यास योग्य, असें असतां आतां एका एकीं पृथ्वीवर पडून शयन करतेस, कोमल तुझे पाद व कमलासारखें मुख यांस माझ्या करितां शामवर्णता आली. आमच्या पासून उत्तम सुख प्राप्त व्हावें ह्मणोन द्रुपदराजानें तुला आह्मांस समर्पण केली परंतु सुख प्राप्त न होतां उलटी दुःखानें व्याप्त होऊन पृथ्वी वर पडलीस. हे द्रौपदी, हें संपूर्ण दुःख माझ्या योगानें तुला घडलें. असा धर्मराजानें त्यावेळीं बहुत विलाप केला असतां धौम्यादि संपूर्ण ऋषी द्रौपदीच्या सन्निध येऊन राक्षोघ्न मंत्राचा जप करून त्यानीं आशीर्वाद दिला. पांडवांनीं आपले करानें जल स्पर्श करून द्रौपदीचे वक्ष सींचन केल्या नंतर द्रौपदी सावध झाली. नकुल सहदेव यांनीं द्रौपदीचे पादसंवाहन केलें. धर्मराज बहुत प्रकारें द्रौपदीचें शांतवन करून भीमास बोलला कीं, हे भीमसेना, आतां दुर्घट अगम्य मार्ग तसेच महान् महान् पर्वत व नद्या आल्या आहेत तेव्हां अशा दुःखकारक मार्गातून द्रौपदी कशी जाईल? असें ऐकून भीमसेन बोलतो हे राजा, कृष्णा व नकुल सहदेव यांस दुःख न होतां मी नेईन अथवा माझा एक पुत्र मोठा पराक्रमी हेडंबी पासून उत्पन्न झालेला घटोत्कच आहे तुझी आज्ञा असल्यास मी त्यास येथें आणतों. असें ऐकून धर्मराज ह्मणतो हे भीमसेना. असें जर असेल तर पुत्रास येथें आण. नंतर भीमसेनानें घटोत्कचाचें स्मरण केलें असतां तत्काल घटोत्कच येऊन पांडवांस व ब्राह्मणांस नमस्कार करून भीमसेनास ह्मणतो हे तात, कशा करितां माझें स्मरण केलें. असें ऐकून भीमसेनानें त्यास आलिंगन दिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१४५ अध्याय एकशें पंचेचाळीस — युधिष्ठिर ह्मणतो हे भीमसेना, हा घटोत्कच धर्मज्ञ, बलवान्, शूर तसाच निरंतर आमच्यावर प्रीती करणारा आहे हा तुझा साक्षात् पुत्र ह्मणोन पांचालीस घेऊन गंध-

मादन पर्वतीं जाण्यास याला आज्ञा कर. असें ऐकून भीमसेन घटोत्कजास भाषण करतो हे हेडिंब पुत्रा, तूं यथेच्छ गमन करणारा असा पक्षी आहेस, यास्तव अधोगतीचा अवलंब करून स्कंदावर द्रौपदीस बशीव व मध्य प्रदेशीं आह्मांस बसवून गंधमादन पर्वतीं चल. असें ऐकून घटोत्कज भाषण करतो हे तात, धर्मराज, नकुल, सहदेव, तूं व कृष्णा या सर्वांस मी एकदा घेऊन गंधमादन पर्वतीं जाण्यास समर्थ आहें, दुसरे माझे भृत्य आकाश गामीं राक्षस स्वइच्छा जाणारे आहेत त्यांस आज्ञा करतों ह्मणजे ते संपूर्ण ब्राह्मणांस स्कंदावर घेऊन गंधमादन पर्वतीं येतील. असें भाषण करून घटोत्कजानें आपले भृत्यांस आज्ञा करतांच संपूर्ण भृत्य घटोत्कजाच्या सन्निध आले नंतर घटोत्कज द्रौपदीस व पांडवांस घेऊन गंधमादन पर्वतीं जाण्यास निघाला. लोमश ऋषि आपल्या योगबलें सूर्यासारखी कांती धारण करून आकाशमार्गें गेले. अवशिष्ट संपूर्ण ब्राह्मणांस घटोत्कजाचे भृत्य घेऊन गंधमादन पर्वतीं जाण्यास निघाले. ते सर्व मार्गामध्यें उत्तम प्रकारचीं रमणीय वनें, उपवनें, म्लेंछादि देश तसेच नाना प्रकारच्या धातूनीं सुशोभित विद्याधर, किन्नर, गंधर्व यानीं सेवित मयुर हंस कारंड, इत्यादिकांच्या शब्दानीं नादित व महान् महान् सरोवरानीं व्याप्त जे गिरी यांस पहात कैलास पर्वताच्या सन्निध भागीं नरनारायणाश्रमीं उतरले, तेथें त्यानीं मोठा एक विस्तृत, स्वादु फलानीं युक्त असा एक बदरी वृक्ष पाहिला. ज्या वृक्षाच्या छाया श्रयें करून सहस्त्रावधी महर्षी यांचे समुदाय तप करीत बसले आहेत. कोमल कोमल तृणानीं भूमी परम सुशोभित जाहलेली असा जो बदरिकाश्रम यामध्यें नरनारायणाचें स्थान ब्राह्मणां सहवर्तमान पांडवानीं पाहिलें. या स्थानीं क्षुधा व तृषा यांची बाधा होत नाहीं व शोकही प्राप्त होत नाहीं निरंतर सूर्याच्या किरणाचा प्रकाश असतो, मोठमोठे ऋषि सर्वकाल वेदाचे घोष करतात. बली, होम इत्यादि क्रिया जेथें ऋषि निरंतर करतात, तपस्वी लोकांचें हें केवल स्थान होय. त्या तपस्व्यांनीं भ्राते व ब्राह्मण यां सहवर्तमान धर्मराजास पाहून आशीर्वाद देण्याकरितां वेदाचा घोष करीत करीत हस्तामध्यें फलमूलें घेऊन धर्मराजास आशीर्वाद दिला. हें बदरिकावन केवल इंद्राचे भुवना सारखें रमणीय व भागिरथीनें उपसेवित जें नरनाराय

ण यांचें स्थान यास पाहून नंतर धर्मराज मैनाकपर्वत व बिंदु सरोवर यांची शो भा पहात मणि प्रवाल व नाना प्रकारचे वृक्ष ईहीं करून व्याप्त जी भागीरथी इचें नीर पाहून भ्रात्यां सहवर्तमान तिजमध्यें स्नान करून त्यानीं देव व पित र यांची तृप्ती केली नंतर ते ब्राह्मणां सहवर्तमान आराम व उपवनें यांचे ठायीं देवा सारिखे क्रीडा करीत करीत बदरिकाश्रमीं राहिले. अ. वि. या अ. आहे.

१४६ अध्याय एकशें शेचाळीस.— वैशंपायन ह्मणतात हे जनमें जया, पुरुषश्रेष्ठ पांडव धनंजयाच्या भेटी करितां बदरिकाश्रमीं साहा दिव स पर्यंत राहात असतां एके दिवशीं ईशान्य दिशेकडून वायूच्या योगें सूर्या सारखें तेजस्वी, सहस्र पत्रानीं युक्त, परम सुशोभित एक कमल एकाएकीं गं धमादन पर्वतीं वाऱ्यानें उडून आलें. तें पाहून पांचाली बहुत हर्षित होऊन भीमसेनास ह्मणाली हें उत्तम प्रकारचें दिव्य, सुशोभीत, गंधयुक्त पद्म कोठू न येथें आलें हें तूं घेऊन मला दे ह्मणजे मी परम प्रीतीनें धर्मराजास देईन. अशा जातीचीं कमलें परम सुगंधीक व मनास आनंद करणारीं आहेत या स्तव अशा जातीचीं कमलें जर मला आणून देशील तर आपण तीं काम्यक वनीं घेऊन जाऊं. असा भार्येचा अभिप्राय जाणोन भीमसेनानें तें कमल पु ष्प धर्मराजास देण्या करितां द्रौपदी जवळ दिलें. नंतर तिची इच्छा तृप्त करण्या करितां जिकडून वायू आला तिकडे मुख करून दुसऱ्या पुष्पांचा शोध लावण्या करितां रुक्म पृष्ट धनुष्य व सर्पाकृती बाण घेऊन तो ईशान्य दिशेस गेला.- असतां त्यानें नाना प्रकारचे द्रुम लता यांची शोभा, किन्नरानीं सेवित व नानाप्र कारच्या धातूनीं चित्रविचित्र अशा गिरीच्या शोभा बहुत पाहिल्या नंतर भी मसेन श्वापदें, पशू, पक्षी, पिशाच्च, यक्ष, राक्षस व गंधर्व यांचें भय न बाळग तां ज्या दिशेपासून पुष्प आलें तिकडे एकसारखी दृष्ट देऊन मोठ्या हर्षानें- चालला. ज्या ज्या स्थलीं सुपुष्पित द्रुम दिसेल त्या त्या स्थलीं भीमसेनानें क मलाचा शोध केला, कांहीं कांहीं स्थलीं अपसरांच्या नूपुरांचा शब्द ऐकिला. भीमसेन चालला असतां त्याच्या भयंकर शब्दानें गुहे मध्यें राहणारीं सिंह व्या घ्रादि श्वापदें भयाभीत होऊन पळालीं. दुर्योधनानें द्रौपदीस जें दुःख दिलें त्या ची विस्मृती सौगंधिक पुष्पांच्या योगानें व्हावी ह्मणोन तीं पुष्पें आणण्या क

रितां भीमसेन मोठ्या त्वरेनें जात असतां मनांत विचार करूं लागला कीं, अर्जुन तर स्वर्गास गेला, पुष्पा करितां मीही वनांत चाललों धर्मराजा सन्निध नकुल सहदेव मात्र राहिले. त्यांच्यानीं राजाचें संरक्षण नीट होणार नाहीं धर्मराज नर वारंवार माझी स्मृती करील याजकरितां कृतकार्य होऊन लौकर माघारा जावें. असा निश्चय करून भीमसेन गंधमादन पर्वतावर जितकीं सरोवरें होतीं त्यांमध्यें सौगंधिक पुष्पें पहात चालला असतां त्याच्या पादघातानें मार्गांतील हजारों वृक्ष मोडून पडले, मोठमोठ्या शिला चूर्ण झाल्या, मृग, खग, ऋक्ष इत्यादि भीमसेनाचें भयंकर रूप पाहून दुसरे वनीं गेले. पुढें जातां जातां सुरम्य व बहुत योजनें लांब रुंद कदलीचा समुदाय पाहून भीमसेनानें त्यांतील हजारों कदली स्तंभाचें उत्पाटण करून भयंकर शब्द केले. इतक्यांत कदली वनामध्यें मारुती निद्रिस्त होता तोभीमाच्या भयंकर शब्दानें जागृत होऊन जांभया देत देत च्यारी दिशेस पाहून आपलें पुच्छ पृथ्वीवर आपटूं लागला. त्या योगें संपूर्ण पर्वत, समुद्र व पृथ्वी कंपायमान झाली. भीमसेनानें पुच्छाचा शब्द ऐकून कदली वनांत पाहिलें तों एक वानर बहु दिवसांचा वृद्ध मोठ्या शिलेवर बसलेला शरीराच्या तेजानें परम सुशोभित असा दृष्टीस पडतांच पुनः एका एकीं भयंकर वज्राशनी समस्पर्शी शब्द केला. तेणें करून संपूर्ण वननिवासी श्वापदें त्रस्त झालीं. हनुमंत यत् किंचित् नेत्र उघडून भीमसेनाकडे पहात बोलला अरे मी रोगी सुखानें निद्रिस्त असतां आपले भयंकर शब्दानें मला कशा करितां जागृत केलेंस? सर्व भूतांवर मनुष्य मात्रानीं दया करावी तें न करितां मला उलटा त्रास मात्र दिलास आह्मीं नरतिरियक योनीच्या ठायीं उत्पन्न झालों तेव्हां आह्मांस धर्म कोठून, ईश्वरानें संपूर्ण योनी मध्यें मनुष्यांस ज्ञान दिलें आहे ह्मणोन त्याणीं जंतुमात्रांवर दया करावी त्यांतून तुझ्या सारिखे बुद्धिमान् जे असतील त्याणी तर अवश्य करावीच, तूं केवल अल्प बुद्धी आहेस, बाल्यत्वा पासून धर्माचा त्याग करून संपूर्ण मृग पक्षांस त्रास देत वनामध्यें फिरतोस असें वाटतें. तूं कोण कशाकरितां या घोर भयंकर वनामध्यें आलास? मनुष्याचें चिन्ह तुझ्या वर दिसत नाहीं. अरे अतःपर हा पर्वत अगम्य आहे, सिद्धीवांचून अथवा तपावांचून पुढें कोणाची गती होणार नाहीं हा देवांचा मार्ग या मार्गानें मनुष्याचें गमन होत नाहीं म्हणोन दयाळू पणें मी तुजसां-

गता का, तू पुढें जाऊं नका, तुझें गमन एथ पर्यंतच, ही अमृता सारखीं फलमूलें भक्षण करून येथून माघारा फीर पुढें गेला असतां तुझा वधहोईल हें माझें वचन हित कारक सत्य जाण. असा वि॰ या अध्यायांत आहे.

१४७ अध्याय एकशें सत्तेचाळीस.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, वानराचें भाषण ऐकून भीमसेन बोलतो हे वानरा, तूं कोण आहेस? कोणते कारणानें वानराचें शरीर धरून येथें बसलास? मी नर क्षत्रियांमध्यें कुरुकुलांत सोमवंशीं कुंतीच्या गर्भापासून उत्पन्न झालों. पांडूचा पुत्र भीम असें मला ह्मणतात. असें ऐकून वायूतनय भाषण करतो मी कोणी एक वानर आहे तुला इच्छित मार्गीचा प्रति बंध करतों येथून माघारा जा पुढें जाशील तर तुझा माझा कलह होईल. असें ऐकून भीमसेन बोलतो हे वानरा, कलह झाला तरीं चिंता नाहीं मार्गांत बसून तूं मला अवरोध करणारा कोण? मार्गा पासून ऊठ नाहींतर माझे पासून तुला कांहींतरी पीडा होईल. असें ऐकून हनुमान भाषण करतो हे भीमा, मी रोगानें बहुत पीडित झालों आहें मला उठण्याचें सामर्थ्य नाहीं जरं तुला पुढें जाण्याची अवश्यकता आहे तर माझें उल्लंघन करून जा. असें ऐकून भीमसेन बोलतो हे वानरा, निरगुण जो परमात्मा तो संपूर्णांच्या देहांत आहे तो ज्ञानानें समजतो त्याचा अवमान होईल यास्तव तुझ्यादेहाचें मी उल्लंघन करित नाहीं, जर वेदादिकें करून अशा ईश्वराचें मला ज्ञान नसतें तर जसें मारुतीनें सागराचें उल्लंघन केलें तसें मी तुझें उल्लंघन करून जातों. असें भीमसेनाचें भाषण ऐकून हनुमान ह्मणतो हे भीमसेना, ज्यानें सागराचें उल्लंघन केलें तो हनुमान कोण? जर त्याची कथा तुला ठाऊक असेल तर मला सांग. असें ऐकून भीमसेन बोलतो हे वानरा, वायूचा पुत्र हनुमान यानामें वानरांमध्यें श्रेष्ठ, महान् बली, सत्वशील व बुद्धिमान आहे त्याची प्रसिद्धी रामायणामध्यें बहुत आहे तोमाझा भ्राता होय. रामचंद्राच्या पत्नीच्या शोधाकरितां त्याणें शतयोजनें विस्तीर्ण जो सागर याचें उल्लंघन करून लंकेमध्यें प्रवेश केला. त्या सारखाच मी बलवान, पराक्रमी व युद्धामध्यें कुशल आहें तेव्हां तुझा निग्रह करण्यास मला सामर्थ्य नाहीं असें तूं समजूंनको. तूं मार्ग दिलास तर बरें नाहींतर मी आपल्या पौरुषानें यमाचें ग्रह तुला दाखवीन. असें भीमसेनाचें वाक्य ऐकून हा बलानें उन्मत्त •

झाला आहे, असें जाणून मारुति किंचित् हांस्य करीन बोलतो, अरे येथून मला उठण्याची किमपीही शक्ती नाहीं यास्तव हें माझें पुच्छ मार्गामध्यें पडलें आहे तें एकीकडे ठेऊन तूं जा. असें ऐकून भीमसेनानें वानराचें पुच्छ डावे हातानें उचलण्यास आरंभ केला, परंतु तें जाग्या वरून हालले नाहीं शेवटीं भृकुटी चढवून व नेत्र प्रसन्न करून परम यत्नानें पुनः पुच्छ उचलण्यास आरंभ केला असतां संपूर्ण शरीरास घर्म आला; परंतु तें उचलें नाहीं. असें झाल्यावर भीमसेन बहुत लज्जित झाला आणि वानरास साष्टांग नमस्कार करून बोलला हे कपीशार्दूला, माझ्या दुर्भाषणाची क्षमा करावी! तूं सिद्ध, गंधर्व अथवा गुह्यक असून वानराचें स्वरूप घेऊन येथें आलास असें मला वाटतें. आतां मी तुझा शिष्य झालों. तूं कोण? येथें कशाकरितां आलास? हा संपूर्ण वृत्तांत मला सांग. असें ऐकून हनुमान बोलतो हे भीमसेना, केशरी नामक वानराच्या स्त्रीचे गर्भीं मी वायूच्या वीर्यानें उत्पन्न झालों मला हनुमान ह्मणतात. सूर्याचा पुत्र जो सुग्रीव, इंद्राचा पुत्र जो वाली व इतर मोठे मोठे बलाढ्य वानर हे आह्मी संपूर्ण किष्किंधेंत राहात होतों, जशी अग्नीची व वायूची मैत्री परस्पर जाहाली तशी सुग्रीवाची व माझी मैत्री झाली. याचें कारण असें आहे कीं, पूर्वी वालीनें सुग्रीवास कांहीं निमित्ता वरून राज्यांतून काढून दिलें असतां ऋष्यमुख पर्वतीं मी व सुग्रीव राहात होतों पुढें कांहीं दिवसा नंतर साक्षात् विष्णु याणीं दशरथाचे गृहीं राम या नामें करून अवतार घेतला नंतर पित्याच्या आज्ञे वरून भ्राता लक्ष्मण व भार्या जानकी यां सहवर्तमान वनवासास निघून दंडकारण्यांत कांहीं दिवस राहात असतां एके दिवशीं मारीच नामक राक्षस रावणाच्या आज्ञेनें सीतेचे मनास मोह उत्पन्न करण्या करितां सुवर्ण मृगाचा वेष घेऊन त्या वनीं संचार करूं लागला. त्यास धरण्यास सीतेस आश्रमीं ठेऊन रामचंद्र अरण्यांत गेल्या नंतर पाठीमागें रावणानें कपट स्वरूप धरून रामचंद्राची भार्या हरण करून नेली. असा विषय या अध्यायांत आहे.

१४८ अध्याय एकशें अठेचाळीस— हनुमान भाषण करतो हे भीमसेना, नंतर रामचंद्र भ्रात्या सहवर्तमान संपूर्ण वनें उपवनें व गिरी यांचे ठायीं भार्येचा शोध करीत करीत ऋष्यमुख पर्वताचे सन्निध गेल्यानंतर सुग्रीवाचेंव

रामचंद्राचें सख्य होऊन रामचंद्रानीं वालीचा वध केला आणि किष्किंधेचें राज्य सुग्रीवास दिलें. नंतर सुग्रीवानें रामचंद्राचें प्रिय होण्या करितां कोटिश हा वानर च्यारी दिशेस सीतेचे शुद्धी करितां पाठविले त्यामध्यें मी व अंगदादि वानर दक्षिण दिशेस गेलों. तेथें संपाती नामक गृध्रानें सीता रावणाचे गृहीं आहे ह्मणोन सांगितल्यावरून रामचंद्राच्या कार्यसिद्धी करितां शतयोजनें विस्तीर्ण जो समुद्र याचें उल्लंघन केलें आणि लंकेंत प्रवेश करून सीतेशीं संवाद केला. नंतर सुवर्ण प्रासाद व तोरणें इत्यादिकानें सुशोभित जी लंका इचा दाह करून मी आपलें नाव लंकेंत प्रसिद्ध केलें आणि पुनः माघारा येऊन तिकडील संपूर्ण वृत्तांत रामचंद्रास निवेदन केल्यावर कोटिश हा वानरांसहवर्तमान रामचंद्रानीं समुद्रांत सेतु बांधून लंकेंत प्रवेश केला. नंतर राक्षस समुदायासहवर्तमान रावणाचा वध करून लंकेचें राज्य आपला भक्त जो बिभीषण यास देऊन भार्येसहित रामचंद्र पुनः माघारे अयोध्येंत आले. रामचंद्र राज्यारूढ असतां मी असा वर मागितला कीं, हे देवा, ज्यावत्काल पर्यंत या लोकांत तुझी कथा राहील तावत्काल पर्यंत मी या पृथ्वीवर जिवंत असावें इतकाच वर मागतों. असा वर मी मागतांच रामचंद्रानीं तथास्तु ह्मणोन मला आशीर्वाद दिला. नंतर सीतेच्या कृपेनें मी या वनामध्यें असतां मला जें जें अपेक्षित तें तें संपूर्ण यथास्थीत प्राप्त होतें. रामचंद्रानीं या पृथ्वीवर अकरा हजार वर्षें राज्य करून नंतर वैकुंठास गमन केलें त्या दिवसापासून संपूर्ण अपसरा व गंधर्व रामचंद्राच्या कथेचें याबनीं गायन करतात त्यायोगें मी येथें राहातों हा मार्ग मनुष्याचा जाण्याचा नव्हे ह्मणोन त्याचे अवरोधा करतां येथें बसलों आहें. मला धरण्यास अथवा शापदेण्यास येथें कोणी समर्थ होत नाहीं. हा देवांचा दिव्य मार्ग होय. मनुष्यें इकडे कधीं येत नाहींत तेव्हां तूं इकडे कशा करितां आलास हें मला सांग. अ. वि. या अ. आहे.

१४९ अध्याय एकशें एकूणपन्नास.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, हनुमंताचें भाषण ऐकून भीमसेन भ्रात्यास नमस्कार करून मृदुवाणीनें भाषण करतो हे कपीश्वरा, तुझ्या दर्शनानें मी आज धन्य झालों माझ्यावर मोठा अनुग्रह केलास, ज्या कालीं तूं सागराचें उल्लंघन केलेंस त्या कालचें स्वरूप कसें होतें तें पहावें ह्मणोन माझी बहुत इच्छा आहे तर तें स्वरूप मला दाखीव. अ.

सें ऐकूनेमारुती भाषण करतो हे भीमसेना, तें रूप तुझ्यानें पाहावणारनाहीं का
रण नी कालकृत अवस्था भिन्न होती सांप्रतची अवस्था भिन्न आहे. कृत व द्वापा
र या संपूर्ण कालाच्या क्रिया भिन्न आहेत तेव्हां या काळीं माझें रूप तसें नाहीं.
युगाप्रमाणें मी शरीर धारण करितों काल दुरातिक्रम आहे यामुळें पूर्वीचें स्वरू
प प्रदर्शन करण्यास मी समर्थ नाहीं. असें हनुमंताचें भाषण ऐकून भीमसेन ह्म
णतो हे हनुमान, संपूर्ण युगें किती आहेत? तत्व, कर्म व वीर्य यांची ऱ्हास वृद्धी
युग युगाच्या ठायीं कशी होते व कोणाचे कसकसे धर्म आहेत? हें संपूर्ण मलासां
ग. असें ऐकून हनुमान भाषण करतो हे भीमसेना, पूर्वी संपूर्ण युगांचे आदीं
कृतयुग ह्मणोन आहे, त्या युगीं धर्म साक्षात् सनातन राहतो त्या युगांत सर्व
लोक कृतकृत्य होते. धर्माची वृद्धी असे. प्रजेचा कधीं क्षय होत नाहीं ह्मणोन
याचें नाव कृतयुग होय. देव, दानव, यक्ष, राक्षस, पन्नग हे कृतयुगीं समवीर्य
असतात, क्रय विक्रय याचा अंगिकार कोणी करीत नाहीं. ऋग, यजु, साम,
अथर्वण इत्यादि वेदांचा भेद नाहीं. या युगीं मनुष्यास व्याधी, इंद्रिय क्षय,
असूया, कपट, कलह व दर्प इत्यादिक धीं उत्पन्न होत नाहींत, भय, संताप, मा
त्सर्य इत्यादिकांचा क्षय असतो परमानंदात्मक जें ब्रह्म याची प्राप्ती होणें हें
च तप, सर्वांतर यामीं आत्मत्वें करून व्यापक जो नारायण भगवान् याचें रूप
श्वेत असतें, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या वर्णांचीं समान रूपें असून ते आप
आपल्या कर्मामध्यें रत असतां संपूर्ण जनाची उपास्य देवता एकच, समान-
ज्ञान, धर्माश्रम वर्णें करून समान, योग, मंत्र, विधि व क्रिया यांचें ऐक्य अस
तें. संपूर्ण वेदांचा अवलंब करून प्रणवाख्य देवतेची उपासना करतात, संपूर्ण
ज्ञाननिष्ट असून प्रत्यगात्मा जो एक ईश्वर याचे ठायीं योगी समाधी करून निरं
तर तत्पर असतात. इच्छा केल्या वांचून साहाजिक ब्रह्माची प्राप्ती होते, धर्म
साक्षात् चतुष्पाद पूर्ण असून कृतयुगीं सत्व, रज, तम, इत्यादिक गुणें करून
निर्लिप्त राहातो हें कृतयुगाचें लक्षण होय. त्रेतायुगीं संपूर्ण प्रजेस यज्ञादिस
त्रें करूनच फलाची प्राप्ती होते. एक पादानें न्यून त्रिपाद धर्म राहतो. त्रेतायु
गीं संकल्प पूर्वक दान क्रिया केल्या वांचून फल येत नाहीं. धर्म, तप, शांती यां
चा त्याग न करितां स्वधर्मानें निरंतर रत असतात यास त्रेतायुग असें ह्मण

तात. भगवान ईश्वर रक्तरूप धरून त्रेतायुगीं जगतांत राहतो. आतां द्वापा र युगाचे धर्म सांगतों. धर्माची मूर्ती द्वापांत असते. भगवान विष्णु पीतरूप धरून राहतो. पूर्वी वेद संपूर्ण एक होता द्वापारामध्यें त्याचे च्यार विभाग झाले व त्याच्या शाखाही ऋषीपरत्वें बहुत झाल्या. तशीच शास्त्रें ही ऋषी भेदें करून बहुत झालीं. तप व दान यांच्या भेदानें राजसी प्रजा झाली. एक वेदाचे ज्ञानानें परिपूर्ती होईना ह्मणोन वेदाचे चार भाग झाले, सत्याचा कांहीं भ्रंश झाला ह्मणोन नाना प्रकारचे आधिव्याधी व उपद्रव उत्पन्न झाले. संपूर्ण लोक फलाची इच्छा धरून तप करूं लागले ह्मणोन त्यांची इच्छा पूर्ण न होतां उलटे दुःख समुद्रांत मात्र निमग्न होऊं लागले. द्वापारामध्यें कांहीं अधर्माचा संचार झाला ह्मणोन प्रजांचा क्षयही होऊं लागला. असे द्वापाराचे धर्म संकल्पें करून तुला सांगितले. आतां कलियुगाचे धर्म सांगतों. एकपाद धर्म कलियुगांत राहिला. हें युग तामस असें जाणोन केशवानें कृष्णवर्ण रूप धारण केलें. धर्म, यज्ञ क्रिया त्या संपूर्ण बहिष्कृत झाल्या याजमुळें काम, क्रोध इत्यादि नाना प्रकारचे उपद्रव तसेच क्षुधा तृषा व भय यांनें प्राबल्य झालें. योगादि तपस्येचा व धर्माचा क्षय झाला ह्मणोन संपूर्ण लोकही क्षय पावत चालले. अनाचारामुळें कांहीं एक कामनिक व्रत केलें असतां त्याजपासून तें कर्म होईनासें झालें. असा अनर्थ कलियुगामध्यें बहुत झाला. चिरंजीवी आहेत ते युगानुसारें वर्तणूक करतात. हे भीमसेना, संपूर्ण युगाचे धर्म जे माझ्या दृष्टीस पडले ते मी तुला सांगितले. तुझें कल्याण असो आतां तूं येथून माघारा जा. अ. वि. या अ. आहे.

१५० अध्याय एकशें पन्नास:- भीमसेन भाषण करतो हे हनुमान्, तुझें भाषण ऐकून मी संतुष्ट झालों माझ्यावर कृपा करून पूर्वीचें आपलें रूप एक वेळ मला प्रदर्शित करा. असें ऐकून भ्रात्याची इच्छा तृप्त करण्याकरितां समुद्राचे उल्लंघन कालीं जें भयंकर रूप धारण केलें होतें तें दाखविण्यास मारुती उद्युक्त झाला. एकाएकीं आपले शरीराची वृद्धी करून संपूर्ण कदलीखंड त्यानें व्याप्त करून टाकिलें. गिरी सारखें उंच शरीर, ताम्र दृष्टी, तीक्ष्ण वज्रा सारख्या दंष्ट्रा, वक्र भृकुटी, इहीं करून अति भयंकर मारुती दिसूं लागला. असें तें मारुतीचें भयंकर स्वरूप पाहून भीमसेन बोलला. हे मारुं.

ती, तुझें सूर्या सारखें तेज, सुवर्णा सारखी कांती व आकाश परिमित उंची पाहू-
न माझे डोळे अगदीं झांकून गेले. असें ऐकून हनुमान ह्मणतो हे भीमसेना, हें मा
झें इतकेंच रूप तुझ्या दर्शनास योग्य मी आपलें पूर्वीचें रूप जर धारण करीन तर
तुझे हे चक्षु तें रूप पाहाण्यास समर्थ नाहींत. शत्रूंच्या नाशा करितां जें मी रूप
धारण करतों तें याजपेक्षां बहुत भिन्न आहे. असें ऐकून भीमसेन बोलतो हे-
मारुती, हें तुझें विंध्याचल पर्वता सारखें शरीर पाहण्यास मी समर्थ नाहीं यास्त
व आतां याचा उपसंहार कर. हे हनुमान, आपले पृष्ठभागावर रामचंद्रास घेऊ
न लंके मध्यें गमन केलेंस याचें कारण नवतें, ह्या शरीरानें व स्व बाहु बलानें से-
न्याशीं सहूवर्तमान रावणाचा वध करण्यास तूं समर्थ होतास उगीच रामचंद्रास
रावण वधाचें दुःख दिलेंस. असें ऐकून मारुती बोलतो हे भीमसेना, रावणाचा व
ध करण्यास मी समर्थ होतों; परंतु यामध्यें रामचंद्राची अपकीर्ती झाली असती,
माझ्या साह्यानें रामचंद्रानें रावणास मारून सीतेस ग्रहण केली ही मोठी त्रै-
लोक्या मध्यें ख्याती झाली. हा संपूर्ण वृत्तांत मी आपला तुला सांगितला आ-
तां तुझी इच्छा असेल तर पुढें जा. हा मार्ग सौगंधिक वनाचा होय. हें कुबेराचें
उद्यान यक्ष राक्षसांनीं सेवित आहे तें पहा तेथें गेल्यावर अतिशय त्वरेनें पु
ष्पें घेऊं नको कारण तेथें नाना प्रकारचीं उग्र देवतें आहेत त्यांची होम व बली
इत्यादिकें करून शांती केली असतां तीं प्रसन्न होऊन आपले कार्यास साह्य
होतात ह्मणोन हे तात, तेथें गेल्यावर साहस कर्म करूं नको. स्वधर्माचा त्याग
न होतां परधर्मावर दृष्टी ठेऊन ज्या लोकां मध्यें अधर्म धर्मा सारखा दिसतो
व जो धर्म असतो तो अधर्मा सारखा दिसतो ह्मणोन बुद्धिमान जे आहेत त्या
नीं धर्म व अधर्म यांचा पूर्ण विचार करावा. धर्म संरक्षित झाला असतां संपू
र्ण देव तेथें राहतात. नंतर यज्ञादि क्रियाद्वारा संपूर्ण देवतांचा संतोष होतो.
वेद, आचार व विधानोक्त जे यज्ञमंत्र ईहीं करून देवता बहुत संतुष्ट होता-
त. त्या धर्माचें ज्ञान होण्या करितां बृहस्पती व उशाना याणीं केलेली स्मृती
पहा. संपूर्ण द्विजातीय हे सेवाकर, वाणिज्य, कृषी इत्यादि स्वीकारून धर्मा
चें संरक्षण करतात. साधारण द्विजातीचा धर्म असा आहे कीं, त्यानीं यज्ञ, अ
ध्ययन व दान यांचा स्वीकार करावा त्यांत ब्राह्मणानीं याजन, अध्ययन व प

निग्रह यातीन गोष्टी उपजीविकार्थ विशेषं स्वीकाराव्या, क्षत्रियानीं प्रजापलन व वैश्यानीं पोषण हे धर्म स्वीकारावे. तिन्हीं वर्णांचा सेवरूप धर्म शूद्रानीं स्वीकारावा; परंतु भिक्षा, होम, व्रत, गुरुगृहीं निवास हे त्याणीं स्वीकारूं नये. असें केलें असतां च्यारी वर्णांचा धर्म संरक्षित होतो ह्मणोन हे भीमसेना, तूं क्षत्रिय आहेस प्राण्यानें संरक्षण करणें हा तुझा धर्म होय. वृद्धांसह वर्तमान राजानीं मसलत करून एकादा दंड प्रजेवर ठेवावा अशास्त्रोक्त दंड ठेऊं नये. क्षत्रियानीं देशाची व्यवस्था, किल्याचा बंदोबस्त, शत्रूंच्या राज्याचीं छेकशी, आपल्यास मित्र बल व दूत द्वारा संपूर्ण देशांतील वर्तमान यांची सिद्धता ठेविली असतां राज्यास एकाएकीं अपाय होत नाहीं. तात्पर्य देशांतरचें ज्ञान होण्या करितां दूत निरंतर पाठवीत असावे. चांगले मनुष्याशीं निरंतर मसलत करावी. आपला पराक्रम शत्रूस दाखवीत असावा. साम, दान, दंड, भेद यांच्या योजना कालपरत्वें हिताहित जाणोन कराव्या. स्त्रिया, मूढ, बाल, लुब्धक व नीच यांच्याशीं कोणची मसलत कधींही करूं नये केली असतां तो राजा तत्काल नाश पावतो. आपला हितेच्छु असून जर तो मूर्ख आहे तर त्याच्याशीं मसलत कधीं करूं नये. कारण वाच्यावाच्य विचार त्यास अगदीं नसतो. धर्माचे कामावर धार्मिकास, द्रव्याचे कामावर पंडितास, स्त्रियांचे कार्यावर नपुंसकास, क्रूर कर्माकडे क्रूरास नेमावें. निरमर्याद जे चालणारे असतील त्यांस निग्रह करावा, जे स्वधर्मानें चालणारे असतील त्यांजवर निरंतर अनुग्रह करावा. अशा धर्मा प्रमाणें च्यारी वर्णांनीं वर्तणूक ठेविली असतां ते आपल्या पदापासून च्युत होणार नाहींत ह्मणोन हे भीमसेना, तूंही क्षत्रिय आहेस उतावळा होऊं नको स्वधर्म करून आपलें कार्य करून घे. धर्म, तप, दम, पूजा, यज्ञयागादि क्रिया इत्यादिकांच्या योगानें ब्राह्मणास स्वर्गवास होतो. दान व आतिथ्य क्रिया इत्यादिकांच्या योगानें वैश्यांस सद्गती होते. निग्रह व अनुग्रह यांच्या पूर्ण विचारानें क्षत्रियांस स्वर्गप्राप्ती होते. तात्पर्य यथा शास्त्रोक्त काम, क्रोध, द्वेष, लुब्धकपणा इत्यादिक जे दुष्ट यांचें परिमार्जन केलें असतां संपूर्ण प्राणिमात्रांस उत्तमलोक प्राप्त होतो ही नीती मी तुला कथिली याचा विचार करून जें करणें तें कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१५१ अध्याय एकशें एकावन:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया मारुतीनें आपले भयंकर स्वरूपाचा उपसंहार करून भीमसेनास आलिंगन दिलें असतां भीमसेनाचा संपूर्ण श्रम नाश पावून त्यास बलाचा जो गर्व होता त्याचा ही परिहार झाला. नंतर मारुती आपले नेत्रांतून जल काढून गद्गदीत वाणीनें बोलला हे भीमसेना, आपले गृहीं जाशील तेव्हां माझें निरंतर कथेमध्यें स्मरण करीत जा आणि या स्थलीं मी आहें असें कोणास सांगू नको. सांगितलें असतां संपूर्ण देव, गंधर्वांच्या स्त्रिया या मार्गानें माझ्या दर्शना करितां येतील. तुझ्या दर्शनानें माझे नेत्र आज सफल होऊन मला रामचंद्राचें स्मरण झालें. आतां माझें दर्शन तुला झालें हें व्यर्थ न हो. भ्रातृत्वाची स्मृती राहण्या करितां मजपाशीं एक वर माग अथवा हस्तना पुरीं राहणारे जे दुष्ट दुर्योधनादि तुमचे द्वेष्टे यांस बंधन करून तुझ्या अग्रभागीं मी आणितों, संपूर्ण हस्तना पुराचा नाश करतों. येणें करून तुझें हित आहे किंवा अहित आहे तें सांग. असें ऐकून भीमसेन बोलतो हे कपीश्वरा, तुझ्या भाषणानें मी बहुत संतुष्ट झालों या भाषणें करून तूं माझें बहुत साह्य केलेंस आतां कोणचें ही कार्य करण्यास मी समर्थ झालों. हे महाबाहो, तुझें कल्याण असो निरंतर माझ्यावर प्रीती ठेव व संपूर्ण माझे भ्राते अनाथ होते ते तुझ्या योगानें सनाथ झाले तुझ्या तेजानें आह्मीं संपूर्ण शत्रूंचा क्षय करूं. असें ऐकून मारुती बोलतो हे भीमसेना, भ्रातृत्व व मित्रत्व यांच्या संबंधानें तुझें उत्तम प्रकारें प्रिय करण्या करितां अर्जुनाच्या विजय रथाच्या ध्वजावर युद्धामध्यें मी निरंतर राहून सिंहा सारख्या भयंकर फःफःकार शब्दानें हजारों शत्रुंचा नाश करीन. असें बोलून व भीमसेनास सौगंधिक वनाचा मार्ग दाखवून मारुती त्या स्थलीं गुप्त झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

१५२ अध्याय एकशें बावन:— वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, कपीश्वर गुप्त झाल्यावर त्याणें दाखविलेल्या मार्गानें भीमसेन गंधमादन पर्वतीं जात असतां निरंतर मनामध्यें मारुतीच्या तेजानें व शरीराचें ध्यान करीत असे व दाशरथी जो श्री रामचंद्र याच्या पराक्रमानें सं

रण करीत असे. सौगंधिकवनामध्यें जातांजातां नानाप्रकारचीं सरोवरें व पुष्पित झालेले वृक्ष तसेंच मत्त झालेले जे वारण यांचे बहुत समुदाय पहात गंधमादन पर्वतीं फिरूं लागला. इतक्यांत हंस,कारंडव व चक्रवाक इत्यादि पक्ष्यांनीं सुशोभित एक सरोवर त्याच्या दृष्टीस पडलें. त्यामध्यें सुवर्णासारखीं पुष्पें स्वच्छ,सूर्याच्या कांतीसारखीं देदीप्यमान पाहून व सरोवराच्या आसमंतात भागीं सौगंधीकनामक कुबेरानें वन नाना प्रकारच्या चित्रविचित्र पुष्प,फल,मूलें करून सुशोभित झालेलें पाहून भीमसेन बहुत संतुष्ट झाला आणि वनवास संबंधीं दुःखाची विस्मृती होऊन द्रौपदीचें प्रिय कार्य केलें असें त्या काळीं मानूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

१५३ अध्याय एकशें त्रेपन्न:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, राक्षसांनीं संरक्षीत जें कुबेराचें सरोवर त्यास कैलासाच्या शिखरासन्निध भीमसेनानें पाहून एक उत्तम प्रकारचें सुंदर गृह ही पाहिलें. कैलासाच्या शिखरापासून हजारों जलाचे प्रवाह ज्या सरोवरांत गेले आहेत, चित्र विचित्र द्रुमाची छाया जेथें निबिड आहे, सरोवराचें उदक केवल अमृता सारखें स्वच्छ, असें सरोवर पाहून भीमसेनानें त्यांतील जल प्राशन केलें आणि सुवर्ण व रौप्य यांचीं हजारों पद्में घेण्याची इच्छा धरिली. सौगंधिक वनाचे संरक्षणास हजारों यक्ष,राक्षस व किन्नर हस्तामध्यें चित्रविचित्र शस्त्रास्त्रें घेऊन बसले होते त्यांणीं अकस्मात कृष्णाजिन घेऊन मुनी सारखा वेष धरिला नंतर हस्तामध्यें धनुष्यबाण घेतलेल्या भीमसेनास पाहातांच ते एकाएकीं आक्रोश करून एकमेकांस ह्मणो लागले कीं, हा कोणी ऋषी आला,त्यास तूं कोण आहेस,येथें कशा करितां आलास हें विचारण्यास जाऊं असा निश्चय करून शतशः राक्षस भीमसेनाचे सन्निध जाऊन बोलले कीं, तूं मुनी सारखा दिसतोस तुझ्या अंगावर तपस्व्येची कांती ही बहुत दिसते व हातामध्यें आयुधें ही घेतलीं आहेस तेव्हां तूं कोणची इच्छा धरून या भयंकर वनांत आलास तें आह्मांस विस्तारें करून सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

१५४ अध्याय एकशें चोपन्न:- भीमसेन भाषण करतो हे राक्षस हो, मी धर्मराजाचा कनिष्ठ बंधु मला भीमसेन ह्मणतात. आह्मीं संपूर्ण भ्राते वद्रि-

काश्रमीं आलों आहों त तेथें वायूच्या योगानें त्या सरोवरांतलें सुवर्ण कमळ उडून आलेंनें पाहून द्रौपदी त्याच्या गंधानें बहुत संतुष्ट झाली आणि अशा पुष्पाचा बहुत संग्रह करावा ह्मणोन तिला इच्छा उत्पन्न होऊन तिनें मला पुष्पें-आणण्या करितां सांगितलें यास्तव या वनीं मी आलों. असें ऐकून राक्षस बोलतात हें वन कुबेराचें अत्यंत प्रिय क्रीडास्थल होय, येथें मनुष्याचें आगमन-होत नाहीं, यक्षगंधर्व व अपसरा यां सहवर्तमान कुबेर यावनीं क्रीडा करतो अन्यायें करून या वनांत विहार करण्यास जो इच्छा करील त्याचा नाश होईल. तूं-तर धर्मराजाचा भ्राता ह्मणोन ह्मणतोस आणि कुबेराची आज्ञा भंग करून-या सरोवरांत क्रीडा करण्याची इच्छा करतोस हें परम विरुद्ध आहे. आह्मीं कुबेरास जाऊन सांगतों आणि त्याणीं आज्ञा दिल्यास तूं या सरोवराचें जल प्राशन कर अथवा क्रीडा कर; परंतु कुबेराची आज्ञा झाल्या वांचून आह्मीं तुला त्या सरोवरांत जाऊं देणार नाहीं. असें राक्षसाचें भाषण ऐकून भीमसेन बोलतो हे राक्षसहो, तुमच्या कुबेर कोण आहे तोमी जाणत नाहीं अथवा तो जरीं यद्यपि येथें आला तथापि त्याजपाशीं मी पुष्पांची याञ्चा करणार नाहीं. हें सरोवर पर्वताच्या प्रवाहानें भरलेलें तेव्हां हें कुबेराचेंच कशावरून आमचें कां नव्हे? आणि माचा करितां भगवंतानीं हे सर्व पदार्थ उत्पन्न केले आहेत ह्मणोन त्यासरोवरांत जे पदार्थ उत्पन्न होतील ते सर्वांनीं घ्यावे. असें संपूर्ण राक्षसां सहवर्तमान भाषण करून भीमसेन बलात्कारानें पुष्पें घेण्या करितां सरोवरांत प्रवेश करूं लागला. त्याकालीं राक्षसानीं पुनः पुनः क्रोधयुक्त भाषणें करून भीमसेनास निर्भर्त्सित केला असतां त्या संपूर्णास तृणप्राय मानून पुष्पें घेऊं लागला. हें पाहून राक्षस ह्मणोंलागले कीं, त्या भीमसेनास बांधा, कोणी ह्मणाले कीं, त्या दुष्टाचें शीर कापून पचन करा. अशा नाना प्रकारच्या वल्गना करीत शतशा राक्षस शस्त्रास्त्रें घेऊन भीमसेनावर धांवले असतां भीमसेन सुवर्णानें मढविलेली यमदंडा सारखी गदा घेऊन राक्षसांस बोलला हे राक्षसहो, या आतां मज सहवर्तमान युद्ध करण्यास भिडं नका. असें भीमसेनानें भाषण करतांच शतशः राक्षस असी, पट्टीश, तोमर इत्यादि नाना प्रकारचीं शस्त्रास्त्रें घेऊन-भीमसेनाचे अंगावर धांवले असतां भीमसेनानें गदेच्या प्रहारानें संपूर्ण राक्ष

सांचीं शस्त्रास्त्रें चूर्ण करून व संपूर्णांस जरजर करून शंभर राक्षस मारिले. त्याकालीं भीमसेनाचा पराक्रम पाहून राक्षस भयानें आकाशमार्गे कैलासपर्वताच्या शृंगावर पळाले. इकडे भीमसेनानें शक्रासारखा पराक्रम करून राक्षस पराजित केल्यावर पुष्करणी मध्यें यथेच्छक्रीडा केली व जल प्राशन करून पाहिजे तितकीं सौगंधिक पुष्पें घेतलीं. नंतर राक्षसानीं भीमसेनाचा संपूर्ण वृत्तांत कुबेरास सांगितला असतां कुबेर बोलतो हे राक्षसहो, द्रौपदीची इच्छा पूर्ण करण्या करितां भीमसेन आपले वनांत आला आहे त्यास तुह्मीं प्रतिबंध करूं नका, पाहिजे तितकीं पुष्पें घेऊन भीमसेन जावो. असें ऐकून संपूर्ण राक्षस पुनः सरोवरीं आले. असा विषय या अध्यायांत आहे.

१५५ अध्याय एकशें पंचावन. — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, बद्रिकाश्रमीं धर्मराज प्रभृती पांडव राहात असतां अकस्मात् मोठवारा सुटून धूळ उडूं लागली, विजेचे कडकडाट शब्द होऊं लागले, सूर्याची कांती नष्ट होऊन अंधार पडला, पृथ्वी कंपायमान झाली, मृगपक्षी घोर भयंकर शब्द करूं लागले. असे नाना प्रकारचे उत्पाद पाहून धर्मराजानें भ्रात्यांस सांगितलें कीं, असे उत्पात एकाएकीं झाले त्यापेक्षां कांहीं तरीं दुःश्चिन्ह आहे शस्त्रास्त्रें घेऊन तुह्मीं सिद्ध असा. असें बोलून धर्मराज इकडे तिकडे पाहातो तों द्रौपदी दृष्टीस पडली, परंतु भीमसेन कोठें दृष्टीस पडला नाहीं त्याकालीं धर्मराज द्रौपदीस विचारतो कीं, हे पांचाली, भीमसेन कोठें आहे? अथवा कोणचे कार्यास गेला आहे किंकाय? एकाएकीं हे अनर्थकारक उत्पाद झाले याजवरून भीमाविषयीं कांहीं संशय उत्पन्न होतो. असें ऐकून द्रौपदी बोलली हे राजा, वायूच्या योगानें येथें एक सुवर्णासारखें चमत्कारिक कमल आलें होतें तें मी पाहून भीमसेनास ह्मटलें कीं, अशीं सौगंधिक कमलें बहुत मिळतील तर मज करितां घेऊन यावीं. असें ऐकून माझें प्रिय व्हावें ह्मणोन ज्या दिशेकडून हें सौगंधिक कमल आलें त्या दिशेस भीमसेन पुष्पाच्या उद्देशानें गेला. इतकें द्रौपदीचें भाषण ऐकतांच धर्मराज संपूर्ण ब्राह्मणांस बोलला कीं, अहो जेथें भीमसेन गेला तिकडे आपण जाऊं तो देश जाण्यास जरी अशक्य असला तथापि हे संपूर्ण राक्षस आपल्यास घेऊन जातील. घटोत्कच द्रौपदीस घेऊ.

न जाईल. भीमसेन येथून बहुत दूर गेला असें मला वाटतें, कारण गरुडासा रखा वेगवान् जो भीमसेन त्यास या भूमी वरून कोणाच्या ही प्रदेशीं जाण्यास अशक्य नाहीं. असें ब्राह्मणांस भाषण करून पुनः राक्षसांस बोलला कीं, हे राक्षस हो, जिकडे भीमसेन गेला असेल तिकडे आह्मांस घेऊन चला. असें ऐकून घटोत्कचादि संपूर्ण राक्षसांस कुबेराचें वन ज्ञान होतें तिकडे ब्राह्मण, भ्राते, द्रौपदी व लोमश यांसह वर्तमान ते धर्मराजास घेऊन गेले. पांडवांनीं कुबेर वनीं गेल्या नंतर सरोवराची व सुवर्णाची शोभा पाहून भीमसेनास सरोवरामध्यें पाहिलें आणि कोणाचीं शिरें, कोणाचे हात, कोणाचे पाय तुटलेले असे हजारों राक्षस मृत होऊन पडलेले पाहिले. संपूर्ण प्रजाच्या क्षय कालीं हस्तां मध्यें दंड घेऊन यम जसें क्रूर स्वरूप धरतो तसें भीमसेनाचें क्रोधानें व्याप्त झालेलें शरीर धर्मराजानें पाहून भीमसेनास आलिंगन दिलें आणि मृदु वाणीनें भाषण केलें कीं, हे कौंतेया, देवादिकानीं ही जें कृत्य करण्यास अशक्य तें तूं केलेंस हें काय? जर माझें प्रिय कर्तव्य तुझ्या मनांत असेल तर पुनः असें साहस कर्म करण्याची इच्छा धरूं नको. असें भाषण करून नंतर धर्मराज प्रभृति पांडव कमलें घेण्याच्या इच्छेनें सरोवरांत शिरले इतक्यांत पुनः कुबेराचे वन संरक्षक राक्षस शिला व आयुधें घेऊन मारण्यास आले. आणि धर्मराज, लोमश, नकुल, सहदेव व इतर ब्राह्मण यांस पाहून त्यानीं नमस्कार केला. धर्मराजानें ही हे राक्षस कुबेरा कडून आले असें जाणोन त्यांचें बहुत शांतवन केलें आणि अर्जुनाच्या दर्शनाची बहुत इच्छा होती ह्मणोन कुबेराचे वनीं बहुत काल पर्यंत राहाण्याची इच्छा न धरितां तो पुनः बद्रिकाश्रमीं येण्यास निघाला. असा विषय या अध्यायांत आहे.

१५६ अध्याय एकशें छपन्न- वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया मार्गांत धर्मराज, द्रौपदी, भ्राते व ब्राह्मण यांस बोलला कीं, आपण पुण्यकारक तीर्थें बहुत पाहिलीं. त्यांत पूर्वीं देवानीं व राजऋषीनीं स्नानें केलीं, ऋषी व राजऋषि यांच्या कथा पूर्वीं झालेल्या त्या त्या तीर्थीं आह्मी ऐकून त्यांचे आश्रमीं राहिलों. नाना प्रकारच्या पुष्पानीं त्या त्या ठिकाणीं देवतांचें अर्चन केलें, मनास आल्हाद करणारे असे पर्वत, सरोवरें, समुद्र, संगम,

सरस्वती, सिंधु, यमुना, नर्मदा इत्यादि तीर्थांमध्यें यथाशास्त्र ब्राह्मणासहव र्तमान स्नान करून व गंगाद्वारीं जाऊन पुढें हिमवान पर्वतीं विशालनामक बदरी आहे तेथें नरनारायणाश्रमीं वास केला. नंतर हें दिव्य सरोवर देव गंधर्वांनीं पूजित पाहिलें; परंतु कुबेराचें वसतीस्थान आपण पाहिलें नाहीं तेव्हां हे भीमसेना, तेथें जाण्याचा कसा उपाय करावा. असें धर्मराज भीमसेनाशीं भाषण करीत आहे तों अशी आकाशवाणी झाली कीं, येथून पुढें जाण्यास मार्ग अशक्य आहे, ज्या मार्गानें तुह्मीं अलांत त्याच मार्गानें पुनः बदरिका वनांत नरनारायणाश्रमीं जा. मार्गांत जातां जातां बहुत फलमूलें करून रम्य वृषपर्वानामक ऋषीचा आश्रम लागेल त्याचें उल्लंघन करून पुढें आर्ष्टिषेण नामक ऋषीचा आश्रम लागेल तेथून कुबेराचें गृह पहा. अशी आकाशवाणी ऐकून संपूर्ण ब्राह्मण परम आश्चर्य पावले. नंतर सुगंध, सुशीतल असा वायू सुटून आकाशांतून पुष्पवृष्टी झाली. त्या काळीं धौम्यानीं धर्मराजास सांगितलें कीं, हे राजा, आकाशवाणीचें उल्लंघन न करितां त्याप्रमाणें करावें. असें ऐकून आकाश वाणी प्रमाणें आर्ष्टिषेणाच्या आश्रमीं जाऊन व कुबेराचें भवन पाहून द्रौपदी भ्राते व ब्राह्मण यां सहवर्तमान धर्मराज नरनारायणाश्रमीं येऊन राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

१५७ अध्याय एकशें सत्तावन — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, गंधमादन पर्वतीं अर्जुनाची भेट होण्या करितां पांडव ब्राह्मणां सहवर्तमान रहात असतां एके दिवशीं जटासुर नामक राक्षस तपस्वी ब्राह्मणाचा वेषधरून धर्मराजाजवळ आला आणि आपल्ये विद्येची बहुत प्रशंसा करून बोलला हे राजा, मंत्र, तंत्र व धनुर्विद्या हीं निरंतर माझे ठाईं राहातात, तुझ्या दर्शनाची इच्छा धरून मी येथें आलों. असें ऐकून धर्मराज, नकुल, सहदेव व द्रौपदी यांचा विश्वास ब्राह्मणावर पूर्ण बसला. ब्राह्मणाचे मनांत असें कपट होतें कीं, भीमसेन कोठें तरीं अन्यत्र कार्यास गुंतला ह्मणजे पांडवांस व द्रौपदीस घेऊन पळावें. अशा अवकाशाची तो मार्ग प्रतीक्षा बहुत दिवस करीत असतां कोणे एके दिवशीं भीमसेन मृगये करितां वनांत गेला, घटोत्कच ही आपल्या भृत्यां सहवर्तमान बाहेर गेला व लोमशादि ऋषीही स्नाना करितां गेले हें त्या

ब्राह्मणानें पाहून एका एकीं भयंकर रूप धरून शस्त्रास्त्रें घेतलीं आणि ती न पांडव व द्रौपदी यांस घेऊन तो जाण्या विषयीं उद्युक्त झाला इतक्यांत सहदेवानें क्रोधानें शांतून खड्ग काढून भीमसेनास मोठ्यानें हांक मारली त्या कालीं धर्मराज राक्षसास बोलला कीं, हे मूढा, तूं धर्माधर्म विचार कांहींच जाणत नाहींस, पशु पक्ष्यांमध्यें हे ही धर्म आहेत, विशेषें करून तुमच्या मध्यें ही धर्म असतो; परंतु या कालीं धर्म त्याग करून आह्मांस धरण्यास कसा प्रवृत्त झालास? मनामध्यें पक्का विचार करून आह्मांस धर. पशु व पक्षी यांस मनुष्यां पासून अन्न मिळतें, मनुष्यें जिवंत राहातील तर देवादिकांस हव्य कव्य मिळेल, मनुष्यें जिवंत न राहातील तर देव ही लयास पावतील. मनुष्यांस शोक उत्पन्न झाला असतां संपूर्ण देवता शोक करतात, मनुष्यांचा सत्कार झाला असतां देवता वृद्धी पावतात. मनुष्यांनीं हव्य कव्यें केलीं असतां त्यां द्वारा संपूर्ण देवांची तृप्ती होत्ये तेव्हां संपूर्ण प्राणिमात्राचे उपजीवक जे मनुष्य यांचा घात करूं नये. त शांतून आह्मीं नर पृथ्वीचें संरक्षण करणारे राजे आहोंत, आमचा नाश झाला असतां राष्ट्राचें रक्षण करण्यास कोणी नसून संपूर्ण प्राणिमात्रांस दुःख होईल ह्मणोन निरपराधी जो राजा याच्या नाशाची इच्छा कोणी करूं नये. हे राक्षसा, मज पासून अणुमात्र ही अपराध झाला नसतां माझा नाश करण्यास तूं कसा प्रवृत्त झालास? ब्राह्मणानीं भोजन केल्यावर शेषान्न जें राहील तें मी भोजन करतों. गुरु, यती, ब्रह्मचारी इत्यादिकांचें निरंतर सेवन करतों, मित्रावर विश्वास ठेवितों, तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास उत्पन्न होऊन तुझें मी आजपर्यंत तपस्वी ब्राह्मणासारखें उत्तम प्रकारें रक्षण केलें त्याचें फल तूं लोकरच आह्मांस दिलेंस. ज्याचें अन्न भक्षण केलें, ज्याच्या आश्रयें करून आपण राहिलों ज्यानीं आपला उत्तम प्रकारें सत्कार केला, अथवा सुखें करून राहण्यास स्थल दिलें त्याच्या नाशा विषयीं कधीं ही प्रवृत्त होऊं नये. सुखें करून तूं आमचे गृहीं राहिलास आणि शेवटीं आह्मांस धरतोस हें तुला योग्य कीं काय? जर हें दुष्ट कर्म करशील तर तुझा आचार, तुझें वय व मोठेपणा हे संपूर्ण व्यर्थ होतील. जर तुझ्या मनांत आह्मांस धरणें असेल तर आमचीं शस्त्रें आह्मांस देऊन युद्ध करून नंतर द्रौपदीस हरण कर. अज्ञानें करून असें न करशील तर लोकां

न अपकीर्ती होऊन अधर्म घडेल व आज तूं इला स्पर्श केलास याजवरून तूं विषाचा कुंभ प्राशन केलास असें मला वाटतें. असें युधिष्ठिरानें भाषण करून आपलें शरीर बहुत जड करून राक्षसाचा पृष्ठभाग भारानें व्यास केल्यामुळें राक्षस त्वरेनें जाण्यास अशक्य झाला. पुनः धर्मराज, द्रौपदी व नकुल यांस बोलला कीं, तुह्मीं भिऊं नका याची गती मी हरण केली. आतां भीमसेन लौकर न येईल फार लांब गेला नाहीं, राक्षसाचा मरण काल सन्निधच आला आहे. राक्षसाची गती मंद झालेली पाहून सहदेव बोलला; हे राजा, युद्धामध्यें शत्रूचा पराभव करावा किंवा आपला तरीं प्राण द्यावा. याजपेक्षां अधिक क्षत्रियांस कर्तव्य नाहीं. आज सूर्यास्ता पूर्वीं या राक्षसास जर मी न मारीन तर आपल्यास पुनः क्षत्रिय ह्मणणार नाहीं असें बोलून राक्षसास बोलला हे दुष्टा, क्षणभर उभा राहा मी सहदेव आहें मला मारून मग द्रौपदीस नें अथवा तूं तरीं यास्थानीं मृत होशील. असें बोलत आहे तों एकाएकीं भीमसेन तेथें आला आणि राक्षसास बोलला हे दुष्टा, शस्त्र परिक्षेचे वेळेस मी तुला जाणला होता; परंतु त्याकाळीं तूं ब्राह्मणानें रूप धरून आह्मांस प्रियकारक भाषणें करीत होतास ह्मणोन तुला मारलें नाहीं, आतां अतिथीच्या रूपानें तूं आमचे गृहीं राहिलास तेव्हां निरापराधी तुझा वध कसा करावा; परंतु तुझा आतां वधकालच आला ह्मणोन तुला द्रौपदी हरणाची बुद्धी झाली. आतां ज्या ज्या दिशेस जाण्याचें तुझ्या मनांत आहे तें न घडतां बक हेडिंबाच्या गतीस पावशील. असें ऐकून राक्षस द्रौपदीस व धर्मराजास खालीं उतरून बोलला हे भीमसेना, तुझीच मार्गप्रतीक्षा मी करीत बसलों आहें, भारानें व्यास झालों ह्मणोन माझी गती बंद झाली असें तूं समजूं नको. आजपर्यंत तूं हजारों राक्षस मारिलेस ह्मणोन ऐकिलें त्याचा सूड घेण्याकरितां मी येथें आलों. तुझा वध करून त्या संपूर्ण राक्षसांची मी क्रिया करीन. असें ऐकून भीमसेन यमासारखा दंड घेऊन राक्षसावर धांवला. त्याकाळीं उभयतांचें बाहुयुद्ध बहुत झालें. हें पाहून माद्रीपुत्र राक्षसाचे अंगावर धावूं लागले; परंतु भीमसेनानें त्यांस उत्तर केलें कीं, मी या राक्षसास मारण्यास समर्थ आहें, मी युद्ध कसें करतों हें तुह्मीं पहा. असें भाषण

रून धर्मराजास बोलला हे राजा, आजमी यारात्रसास नमारीन तर तु झी व इष्टमित्रांची मला शपत आहे, नंतर तेंच बाहू युद्ध पराकाष्ठेचें होत असतां एकमेकांनीं वृक्ष व पाषाण यांचा एकमेकांवर प्रहार केला. शे वटीं भीमसेनानें जटासुरावर मुष्टिप्रहार केला. तेणेंकरून असुरास कांहींशी मूर्च्छा आली. पुनः भीमसेनानें राक्षसावर नल प्रहार केला. त्याये गानें त्याचीं संपूर्ण गात्रें एकाएकीं गळित झालीं आणि शरिरापासून शी र पृथ्वीवर पडलेलें पाहून भीमसेन पुनः युधिष्टिराजवळ आला त्याकालीं सं पूर्ण ब्राह्मणानीं भीमसेनाची बहुत स्तुती केली. असा विषय या अ ध्यायांत आहे.

१५८ अध्याय एकशें अठ्ठावन:- वैशंपायन सांगतात हे जनमे जया, जटासूर नामक राक्षसाचा भीमसेनानें वध केल्यानंतर धर्मराज प्रभृती समग्र पांडव नरनारायणाश्रमीं सुखानें राहात असतां एकेदिव शीं धर्मराज, भ्राते व द्रौपदी यांस बोलला कीं, अर्जुनास स्वर्गलोकीं जाऊ न च्यार वर्षे झालीं व आपण वनांत च्यार वर्षें घालविलीं. परंतु पंचम वर्षास आरंभ झाला. अर्जुनानें जातेसमयीं असें सांगितलें कीं, पांचवे वर्षी येऊ न मी तुह्मांस भेटेन तो काल आतां आला आहे, तेव्हां चला आतां आपण अर्जुना च्या दर्शना करितां हिमालयाच्या पृष्ठभागीं उत्तर दिशेस जाऊं. असें बोलू न धर्मराज, भ्राते, द्रौपदी व संपूर्ण ब्राह्मण यां सहवर्तमान कैलास पर्वताची शोभा पहात चालला असतां मार्गांत संपूर्ण ब्राह्मणांस प्रदक्षिणा करून बो लला कीं, हे ब्राह्मण हो पांच वर्षे झालीं अर्जुन विद्याभ्यास करण्याकरितां गेला त्याचें आगमन लौकर होऊन मला दर्शन व्हावें असा आशीर्वाद द्या. त्याकालीं ब्राह्मणानीं धर्मराजाच्या वाक्याचा सत्कार करून आशीर्वाद दिला कीं, हे रा जा, तुझीं संपूर्ण दुःखें लौकरच नष्ट होतील आणि अर्जुनाचें दर्शन होऊन क्षात्र धर्मानें संपूर्ण पृथ्वीचें पालन तूं लौकरच करशील. असें ऐकून धर्म राज उत्तर दिशेस चालला असतां जेथें जेथें कठिणमार्ग आला तेथें राक्ष साच्या स्कंदारूढ होऊन जाई, सुलभ मार्ग आला असतां पायांनीच जाई. अशीं बहुत दुःखें सहन करीत कैलासपर्वताजवळ तसाच गंधमादन यापर्व

तांचें अतिक्रमण करून हिमालयाच्या पृष्ठभागीं ब्राह्मणांसह वर्तमान धर्मराज सत्राचे दिवशीं गेला.तेथें उत्तमोत्तम प्रकारच्या नद्या,सलिलाचे डोह, पुष्करणी, वनें,उपवनें व वृषपर्वानामक ऋषीचा आश्रम पाहून त्या ऋषीची भेट घेण्या करितां आश्रमीं गेला. राजऋषीनें ही पांडवांचा बहुत सत्कार केला. सात रात्री त्या आश्रमीं राहून आठवे दिवशीं राजानें संपूर्ण ब्राह्मण, ऋषीस भेटविले नंतर यज्ञपात्रें व रत्नाचीं आभरणें ऋषीस दिलीं आणि पुढें जाण्या करितां ऋषीस आमंत्रण करून व आशीर्वाद घेऊन तो निघाला.मार्ग दाखविण्या करितां ऋषी धर्मराजा बराबर आले आणि उत्तर दिशेस राजास मार्ग दाखवून पुनः आपले आश्रमीं गेले. धर्मराजानें मार्गांत नाना प्रकारचे द्रुम व सरोवरें यांची शोभा पाहून मणिकांचन व रौप्य यांचे समुदाय बहुत पाहिले. वृषपर्व्यानें जो मार्ग दाखविला त्याच मार्गानें धौम्य,लोमश, द्रौपदी, भ्राते व ब्राह्मण यां सहवर्तमान धर्मराज जात असतां पुढें माल्यवान पर्वताच्या शिखरावर जाऊन किंपुरुष व सिद्ध चारण इत्यादिकांचीं स्थलें त्यानें पाहिलीं. नंतर पादचारी गंधमादन पर्वताच्या वनामध्यें एक एक क्रमानें जात असतां वनाची शोभा पाहून राजास बहुत आनंद झाला. नंतर धर्मराज भीमसेनास बोलला हे वृकोदरा, हें गंधमादन पर्वताचें शिखर फार उत्तम मनोहर आहे,येथें संपूर्ण वनाची शोभा,भ्रमरांचें गीत व सरोवराची शोभा पाहून माझें मन रममाण झालें.पर्वताच्या नाना प्रकारच्या गुहा व मनशीलादि धातूचीं स्थलें यांची शोभा फार रम्य दिसते. पूर्वीं वृषपर्व्यानें या पर्वताची शोभा जशी सांगितली तशी समग्र यथास्थित आहे या प्रमाणें भाषण करीत करीत व समग्र वनाची शोभा पहात पुढें आर्ष्टिषेण नामक राजऋषीचा आश्रम पाहून त्यांत गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

१५९ अध्याय एकशें एकूणसाठ.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, युधिष्ठिरानें आर्ष्टिषेणास साष्टांग नमस्कार करून आपलें नाम कथन केल्या नंतर कृष्णा, भीमसेन, नकुल, सहदेव व धौम्य यथानुक्रमें राजऋषीस साष्टांग नमस्कार करून सर्वांनीं आपलीं नामें सांगि,

तली. ऋषीनें दिव्यचक्षूनें धर्मराजा कडे पाहून बसण्यास आज्ञा दिली आणि यथान्याय पूजा करून व कुशलप्रश्न विचारून ते बोलले हे राजा, तूं अनृत भाषण कधीं करीत नाहींस ना, धर्मावर मती ठेवितोस किंवा नाहींस, माता पितरांची सेवा व गुरु, वृद्ध व विद्वान यांचा सत्कार करतोस ना? वनामध्यें निरंतर राहतोस ह्मणोन धर्माच्या वृद्धीची इच्छा धरिली आहेस ना? वडिलोपार्जित जे आचार, कुलाचार व वृद्धाचार यांचें संरक्षण करतोस ना? असे आर्ष्टिषेणाचे प्रश्न ऐकून युधिष्ठिर बोलतो हे ऋषे, यथाशक्ती जें शास्त्रानें होतें त्यामध्यें मी कांहीं आळस करीत नाहीं. असें ऐकून आर्ष्टिषेण भाषण करतात हे राजा, त्या पर्वतावर उदक वायू भक्षण करून आकाश मार्गें जाणारे ऋषि बहुत आहेत व स्त्रियांशीं सहवर्तमान क्रीडा करणारे असे किंपुरुष बहुत राहतात. येथें निरंतर भेरी व मृदंग यांचे सुस्वर शब्द होत असतात ते येथून ऐक. याजपुढें ह्या पर्वत जाण्यास परम अशक्य आहे, देवांचीं विहार स्थानें या पर्वतावर बहुत आहेत ह्मणोन मनुष्याची गती येथें नाहीं. जर बुद्धिचापल्यें करून राजा, पुढें जाशील तर नाना प्रकारचे प्राणी व राक्षस तुला दुःख देतील. या कैलास पर्वताच्यापुढें देवांचे मार्ग आहेत तेथें शूलादि शस्त्रें घेऊन कुबेराचे आज्ञेनें हजारों राक्षस बसले आहेत, पुढें अपसरांसहवर्तमान वैश्रवण निरंतर राहातो. या शिखराचे अग्रभागीं उभें राहिलें असतां सूर्यासारखा तेजस्वी जो यक्ष याचें दर्शन होतें. तुंबरु नामक गंधर्व सर्वकाल गीत, साम याचें गायन या गंधमादन पर्वतीं करीत असतो यास्तव तुझा भ्राता जो अर्जुन याची भेट होई तों पावेतों तूं येथेंच रहा. तुझें समग्र संकट निवारण होऊन समग्र पृथ्वीचें राज्य परिपालन तूं लौकरच करशील. असा विषय या अध्यायांत आहे.

१६० अध्याय एकशें साठ.– जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायन ऋषे, आमचे पितामह जे पांडव यांणीं आर्ष्टिषेणाच्या आश्रमीं गंधमादन पर्वतीं किती दिवस वास केला व तेथें राहून ते काय भक्षण करित होते? भीमसेनानें गिरीच्या पृष्ठभागीं कसकसे पराक्रम केले? पुनः

यक्षानें व भीमसेनाचें युद्ध झालें किंवा नाहीं? कुबेरानें व आर्ष्टिषेणानें भाष
ण काय झालें? हा संपूर्ण वृत्तांत मला सांगा. असे प्रश्न ऐकून वैशंपायन भा-
षण करतात हे जनमेजया, गंधमादन पर्वतीं आर्ष्टिषेणाच्या आश्रमीं तुमचे
पितामह पांडव उत्तमोत्तम प्रकारचीं स्वादु व मृदु फळें व मृगाचीं मांसें भक्ष
ण करीत रहात असतां लोमशऋषी नाना प्रकारच्या कथा सांगत, तेणेंक-
रून पांडवांचीं च्यार वर्षे झालीं. पूर्वी घटोत्कच धर्मराजाची आज्ञा घेऊन आ
पले अनुचरांसहवर्तमान तेथें गेलाच होता, पांडवांचें दर्शन करण्याकरितां मो
ठे मोठे ऋषि, सिद्ध, चारण इत्यादि येऊन त्यांच्याशीं भाषण करीत असत. को-
णे एके दिवशीं महाह्रद निवासी एक सर्प होता तो मारण्याकरितां गरुड ज्या
कालीं आला त्या कालीं गरुडाच्या पक्षसंबंधीं वायू बहुत सुटला त्यायोगें पां
च रंगाचीं चमत्कारिक पुष्पें आलेलीं पाहून पांचाळी भाषण करूं लागलीकीं,
हे भीमसेना, या पर्वतावर बहुत चमत्कार आहेत, त्या अश्वरथ नामक नदी-
मध्यें चमत्कारिक पांच रंगाचीं पुष्पें पडलीं आहेत यास्तव हे तुझे संपूर्ण सुह
द व मी या आह्मांस पर्वत संबंधी समग्र शोभा दाखीव. असें ऐकून द्रौपदी
ची इच्छा तृप्त होण्याच्या आशेनें हस्तामध्यें गदा घेऊन भीमसेन निघाला अ
सतां मार्गातील पशुपक्षी त्रस्त होऊन पळाले. भीमसेनानें गिरीची समग्र शो-
भा पाहून पुढें कुबेराचें गृह पाहिलें. त्या गृहाच्या आसमंतात भागीं कांचन-
व स्फटिकांचीं बहुत गृहें होतीं. तीं पाहून सर्व रत्नांनीं खचित केलेलीं उद्यानें
व माड्या यांची शोभा पाहिली. विलासिनी स्त्रियांचीं नृत्यें पाहून गायनांचे व
वाद्यांचे शब्द ऐकिले. नंतर वैश्रवणाच्या आराम संबंधी सुगंध वायू सुट-
ला होता त्याचें आघ्राण करून भीमसेन बहुत संतुष्ट झाला. चित्रविचित्र सु
वर्णाचे द्रुम पाहून भीमसेनानें एकाएकीं शंखाचा नाद करून धनुष्याच्या दो
रीचाही भयंकर नाद केला. तो नाद ऐकून वैश्रवणाचे आराम संरक्षक यक्ष व
राक्षस होते ते एकाएकीं हस्तांत गदा, तोमर व पट्टिश इत्यादि आयुधें
घेऊन भीमसेनावर धांवले त्या कालीं राक्षसांचें व भीमसेनाचें बहुत तुमुल
युद्ध झालें, राक्षसांनीं जितकीं शस्त्रास्त्रें भीमसेनावर टाकिलीं तितक्यांचाही
भीमसेनानें गदेच्या योगें नाश करून नंतर कांहीं राक्षसांचीं शिरें, कोणाचेंही

त, कोणांचे पाय कृंतन करून एका एकीं रक्ताची नदी उत्पन्न केली. त्याक्षणीं समग्र राक्षस भीमसेनाच्या बलानें त्रस्त होऊन गदा शूल इत्यादिकांचा त्याग करून दक्षिण दिशेस पळाले. हें समग्र कृत्य पाहून कुबेराचा सखा मणिमान समग्र राक्षसांस बोलला कीं अरे तुह्मी पळतां कां? एकट्या मनुष्यानें येथें येऊन तुह्मां सर्वांचा पराभव केला हें कुबेरास जर कळलें तर तुह्मांस तो काय ह्मणेल व तुह्मी तरी त्यास काय सांगाल? असें भाषण केल्यावर मणिमान पलायन करणाऱ्या राक्षसां सहवर्तमान हस्तांत गदा घेऊन भीमसेनावर धांवला. तेव्हां उभयतांचें घोरयुद्ध होत असतां भीमसेनानें गदेचा प्रहार करून मणिमानास मारून पृथ्वीवर पाडला. हें पाहून समग्र राक्षस प्राची दिशेस पळाले. असा विषय या अध्यायांत आहे.

१६१ अध्याय एकशें एकसष्ट:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, नाना प्रकारच्या राक्षसांच्या शब्दानें गिरीची गुहा नादित झाली व भीमसेन कोठें दृष्टीस न पडल्या मुळें धर्मराज, नकुल, सहदेव, धौम्य, द्रौपदी व सर्व ब्राह्मण खिन्न झाले नंतर पांडव द्रौपदीस आर्ष्टिषेणाचे स्वाधीन करून ब्राह्मणां सहवर्तमान पर्वतावर गेले. तेथें भीमसेनानें हजारों राक्षस पाडलेले पाहून भीमास आलिंगन देऊन बसले. नंतर तेथून कुबेराचें गृह पाहून धर्मराज भीमसेनास बोलतो हे भीमा, हें जें तूं साहस कर्म केलेंस हें तुला योग्य नाहीं. आपण राजाचा द्वेष करूं नये. धर्मशास्त्रांत असें वाक्य आहे कीं, जो धर्म टाकून पापाचे ठायीं रत होतो तो तें फल भोगतो. हे तूं राक्षस व्यर्थ मारिलेस, माझें ऐकणें असेल तर पुन: असें कर्म करूं नको. असें भाषण करून धर्मराज स्तब्ध बसला, इकडे भीमानें जे राक्षस मारिले त्यांतून कांहीं पळून कुबेराजवळ जाऊन बोलले कीं, हे महाराज, कोणी एका मनुष्यानें आपले हजारों सेवक मारिले. मणिमानही मरण पावला त्यांतून आह्मी वांचून आपल्यास सांगण्यास येथें आलों असें ऐकतांच धनदेश्वर क्रोधायमान होऊन बोलला कीं, हे सेवक हो, रथाची सिद्धता करा, भीमसेनानें माझा दोन वेळ अन्याय केला त्याज करितां त्याच्या शीं आपण युद्ध करूं, अशी आज्ञा होतांच गंधर्वांनीं नाना प्रकारच्या रत्नांनीं विभूषित रथ शीघ्र गमन करणाऱ्या अश्वांनीं युक्त के

ला. नंतर कुबेर, शस्त्रास्त्रें घेऊन रथारूढ होत असतां रथाच्या अश्वांनीं ना ना प्रकारचे जयावह शब्द केले. देव, गंधर्व त्याची स्तुती करूं लागले. त्याज बरोबर सुवर्णा सारखे कांतीमान शस्त्रास्त्रां सहवर्तमान सहस्त्र यक्ष गेले. आकाश मार्गें वायूच्या वेगें यक्षगणां सहवर्तमान कुबेर गंधमादन पर्वतीं जेथें पांडव होते तेथें गेला आणि धर्मराज प्रभृती पांडवांस पाहातांच यक्ष गंधर्व अगदीं निरविकार झाले, युद्ध करण्याची इच्छा कोणास राहिली नाहीं. धर्मराज प्रभृती पांडवांनीं आपण कुबेराचे अपराधी आहों असें जाणोन हस्त जोडून बहुत प्रकारें त्यांची स्तुती केली. त्याकालीं धनदेश्वर आसनारूढ होता इतक्यांत भीमसेन हस्तांत पाश खड्ग व धनुष्य बाण घेऊन कुबेरास पाहातांच मनामध्यें किमपीही भीती न बाळगतां निर्भयपणें त्याचे अग्रभागीं बसला. तेव्हां कुबेरास असें वाटलें कीं, शस्त्रास्त्रें घेऊन भीमसेन बसला त्यापेक्षां मज सहवर्तमान युद्ध करण्याची याची इच्छा आहे. असें जाणोन धनदेश्वर धर्मराजास बोलला हे राजा, संपूर्ण प्राणिमात्र तूं धर्माचा पुत्र आहेस असें जाणतात, भ्रात्यां सहवर्तमान या शैलाग्रीं तूं निर्भयपणें राहा. या भीमसेना करितां जर तुला क्रोध उत्पन्न झाला असेल तर त्याची शांती कर माझे यक्ष राक्षस भीमसेनानें मारिले असें मी समजत नाहीं, हे कालें करूनच मरण पावले, भीमसेन निमित्तमात्र झाला. याविषयीं तूं लज्जा न धरितां भीमावर कोप करूं नकोस. असें धर्मराजास भाषण करून नंतर भीमसेनास बोलतो हे भीमसेना, तूं द्रौपदी करितां येवढें साहस कर्म केलेंस, माझा अनादर करून यक्षराक्षसांचा आपल्या बाहुबलानें विनाश केलास येणें करून मी बहुतच संतुष्ट झालों आणि या घोर शापापासून माझी मुक्तताही जाहाली. असें बोलून पुनः धर्मराजास बोलतो हे राजा, अगस्त्य ऋषीनीं पूर्वीं कोपें करून जो मला शाप दिला त्या शापाची निष्कृती भीमसेनानें केली. माझ्यावर त्याचा हा उपकारच झाला. असें ऐकून धर्मराज बोलती हे भगवन्, अगस्त्य ऋषीनीं तुम्हांस शाप कशाकरितां दिला, हे मला सांग. असा प्रश्न ऐकून धनदेश्वर बोलतो हे राजा, कुशवती नामक एक स्थळ होतें तेथें संपूर्ण देव एकत्र होऊन कांहीं एक गोष्टीचा विचार करीत होते

त्याकरितां मीही तेथें शंभर पद्म यक्षां सहवर्तमान आकाश मार्गें जात अस तां मार्गांत यमुना तीरीं अगस्त्य ऋषि उर्ध्वबाहू करून तपस्या करीत असतां त्याचें शरीर केवळ देदीप्यमान, हुताशना सारखें तेजोमय झालेलें होतें इतक्यांत संपूर्ण यक्षांचा अधिपती जो मणिमान नामक यक्ष माझा परम सखा यास हे अगस्त्य ऋषी असें माहीत नवतें. तो आकाश मार्गें जातां जातां थुकला तें उच्छिष्ट अगस्त्य ऋषीच्या शिरावर पडलें. त्या योगें अगस्त्य ऋषी बहुत क्रुद्ध होऊन दाही दिशेस पहात मजला बोलले कीं, हे दुष्टा, माझी अवज्ञा करून, तुझ्या सख्यानें माझ्या शिरावर उच्छिष्टपात केला या कारणानें संपूर्ण यक्ष पहात असतां कोणी एक मनुष्या पासून या सैन्या सहवर्तमान तुझा सखा मरण पावेल त्या योगें तुलाही बहुत दुःख होईल. ज्या काळीं त्या मनुष्यानें तुला दर्शन होईल त्याकाळीं तूं या शापा पासून मुक्त होऊन संपूर्ण दुःखानें तुला विस्मरण होईल. अशा शापाच्या योगें मी दुःखित झालों होतों तुझ्या भ्रात्यानें मला आज शापा पासून मुक्त केला हा मजवर मोठा उपकार झाला असें मानितों. असा विषय या अध्यायांत आहे.

१६२ अध्याय एकशें बासष्ट — धनदेश्वर भाषण करतो हे धर्मराजा, धैर्य, दक्षता, देशकाल व पराक्रम इत्यादिक विधि सर्वांनीं अवश्य स्वीकारिले पाहिजेत, कृतयुगीं धैर्यवान, दक्ष, आपल्या कर्मामध्यें निपुण, पराक्रमी व कार्य विधान जाणणारे असे मनुष्य होते. धैर्यवान असून देशकाल जो क्षत्रिय जाणतो तो निरंतर पृथ्वीचें राज्य करतो, लोकांमध्यें त्याची ख्याती होते व उत्तम प्रकारची गतीही होते. जो कोपें करून आपण काय कर्तव्य हें जाणत नाहीं तो पापबुद्धी होय. कर्माचे विभाग व कालाचे नियम जो जाणत नाहीं तो जिवंत असतां नरका सारखें दुःख भोगितो. वृथाचरण करणारा व साहस कर्म करणारा आपले ऐश्वर्या पासून नष्ट होतो, आपल्यास सामर्थ्य नसतां एखादें साहसकर्म करणारा जो मनुष्य याजवर विश्वास ठेवूं नये म्हणोन राजा तुला सांगतों कीं, हा भीमसेन अधर्मज्ञ, बालबुद्धि व निर्भय आहे हा एकादें साहस कर्म करतो यास्तव त्याचा बंदोबस्त ठेऊन यास सुमार्गास लाव आणि आर्ष्टिषेणाच्या आश्रमीं जा. माझे आज्ञाधारक यक्ष, गंधर्व व किन्नर अलकापुरीमध्यें

राहातात ते तुमचें उत्तम प्रकारें संरक्षण करतील आणि नानाप्रकारचीं स्वादु व मृदु फळें तुह्मांस अर्पण करतील. तुमचा कनिष्ठ बंधु अर्जुन स्वर्गांत सुखरूप आहे, स्वर्गामध्यें ज्या संपत्ती आहेत त्या अर्जुनास मिळाल्या. दम, दान, बळ, बुद्धी, तेज हे गुण अर्जुनामध्यें निरंतर राहातात. लोकांमध्यें जें निंदितकर्म आहे तें पार्थ कधीं करीत नाहीं व पार्थानें आज पर्यंत मिथ्यावाद केला असें कोणी मनुष्य ह्मणत नाहीं. देव, पितर, गंधर्व व यक्ष याणीं अर्जुनाचा बहुत सत्कार ठेविला आहे, इंद्राचे गृहीं शस्त्रविद्या अर्जुनानें संपादन केली व शांतनु राजा निरंतर पार्थावर प्रीती ठेवितो व तुमचें कुशल विचारित असतो. असें धनदेश्वराचें भाषण ऐकून सर्व पांडव बहुत हर्षित झाले. नंतर वृकोदरानें शक्ती, गदा, खड्ग व धनुष्य बाण यांचा त्याग करून धनदेश्वरास साष्टांग नमस्कार केला. त्याकाळीं धनदेश्वरानें वृकोदरास असा आशीर्वाद दिला कीं, हे महाबाहो, तूं संपूर्ण शत्रूंचा क्षय करशील आणि अर्जुन कृतास्त्र होऊन इंद्राच्या आज्ञेनें तुह्मांस लौकरच भेटेल. असें धनदेश्वरानें भाषण करून संपूर्ण गुह्यकांसहवर्तमान आकाशमार्गें गमन केलें. नंतर पांडवांनीं ती रात्र ब्राह्मणांसहवर्तमान तेथेंच घालविली. असा विषय या अध्यायांत आहे.

१६३ अध्याय एकशें त्रेसष्ट.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुसरे दिवशीं सूर्योदयीं धौम्य पुरोहित आन्हिक कर्म करून आर्ष्टिषेणासहवर्तमान पांडवां जवळ आले. हें पाहून पांडवांनीं साष्टांग नमस्कार केला. नंतर धौम्य, राजाचा हस्त धरून प्राची दिशेकडे पहात बोलला हे राजा, हा मंदराचल पर्वत सर्व भूमीस व्याप्त करून कसा शोभतो पहा, इंद्र व कुबेर त्या पर्वतावर राहातात या प्राची दिशेस जेव्हां सूर्योदय होतो तेव्हां संपूर्ण ऋषि सूर्यास नमस्कार करतात, तसाच दक्षिण दिशेस यमधर्म व पश्चिम दिशेस वरुण हे राहातात. त्या पर्वतास अस्ताचल ह्मणतात. महा मेरूच्या उत्तरेस ब्रह्मादिकांचीं स्थानें आहेत त्यांच्या पलीकडेस महाविष्णुचें स्थान आहे असें ऋषी सांगतात. या पर्वताच्या दक्षिणेस यमाचें संयमन नामक एक अद्भुत स्थान आहे या मार्गानें सूर्य अस्तास जातो या पर्वताच्या सन्निध भागीं जो समुद्र आहे तेथें संपूर्णांचा रक्षक वरूण व या मेरूच्या उत्तरेस भगवान् शिव हे राहातात व ब्रह्मदेव

नें ही स्थान तेथेंच आहे, दक्षादि जे ब्रह्मदेवाचे मानस पुत्र आहेत त्यांचीं स्थानें या पर्वतावर आहेत, वसिष्ठ प्रभृति जे सप्तऋषी यांचे उदयास्त याच पर्वतीं होतात. आत्म ध्यानानें तृप्त जे देव त्यां सहित ब्रह्मदेव या स्थानीं राहातात, त्या ब्रह्मस्थानाच्या पलीकडे तेजोमय विष्णूचें स्थान आहे त्या स्थानास पाहाण्यास देवादिक ही समर्थ होत नाहींत. या स्थानास ईश्वरानें अक्षय्य ध्रुवस्थान ह्मणतात. रात्रंदिवस या मेरु पर्वतास चंद्र सूर्य प्रदक्षिणा करितात. सूर्य पूर्व दिशेपासून कदाचित् दक्षिणेस कदाचित् उत्तरेस जातो त्यास दक्षिणायन व उत्तरायण अशा संज्ञा आहे. सूर्याचें मुख निरंतर पूर्वेस असतें सूर्य किरण द्वारानें पृथ्वीचें जल ग्रहण करतो त्या पासून गर्भधारण होऊन प्रजेची उत्पत्ती होत्ये. वृष्टी, वायु व उष्ण यांच्या क्षय वृद्धीच्या तारतम्यानें प्रजेची क्षय वृद्धी होत्ये असें हें कालचक्र ईश्वरानें निर्मित केलेलें याची गती धर्मराजा तुला सांगितली. असा विषय या अध्यायांत आहे.

१६४ अध्याय एकशें चौसष्ट.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया अर्जुनास पाहाण्याच्या इच्छेनें समग्र पांडव त्या पर्वतावर राहात असतां तेथें हजारों गंधर्व व महर्षींचे समुदाय येत असत. अर्जुन स्वर्गलोकीं गेला त्या दिवसा पासून युधिष्ठिर बहुत खिन्न असे; परंतु त्या दुःखाच्या समाप्तीचे दिवस लौकरच आले आहेत असें मानूं लागला. याप्रमाणें समग्र पांडव चिंताग्रस्त होऊन एकमास गंधमादन पर्वतीं मोठ्या कष्टें करून राहिले. इकडे स्वर्गलोकीं अर्जुनानें पांच वर्षामध्यें इंद्रा पासून आग्नेय, वारुण, सौम्य, वायव्य, पाशुपत इत्यादि अस्त्रांचा अभ्यास करून भूमंडळीं येण्याकरितां इंद्रास अभिवादन केलें आणि हर्षानें तो गंधमादन पर्वतीं येण्याकरितां स्वर्गाहून निघाला. असा विषय या अध्यायांत आहे.

१६५ अध्याय एकशें पांसष्ट.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, गंधमादन पर्वतीं पांडव रहात असतां आकाशा पासून इंद्राचा रथ खालीं येतो असें पाहून अर्जुनाच्या आगमनाची चिंता करूं लागले, इतक्यांत रथाच्या तेजानें अंतरिक्ष प्रकाशित झालें, त्या रथांत किरीट माला व नाना प्रकारचीं उत्तमोत्तम आभरणें धारण करून अर्जुन गंधमादन पर्वतीं आला नंतर

त्यानें धौम्य, धर्मराज व वृकोदर यांस नमस्कार केल्यावर नकुल, सहदेव यानीं अर्जुनास नमस्कार केला नंतर अर्जुनानें द्रौपदीचें शांतवन केलें. त्या काळीं अर्जुनास पाहातांच पांडवांस परा काष्ठेचा आनंद झाला. नंतर धर्मराज प्रभृती पांडवांनीं इंद्राच्या रथास प्रदक्षिणा करून मातली नामक सारथ्याचा बहुत सत्कार केला नंतर मातली रथारूढ होऊन स्वर्गलोकीं गेला. नंतर अर्जुनानें इंद्रानें दिलेलीं अमोलिक भूषणें द्रौपदीच्या स्वाधीन केलीं व स्वर्गांतकोणा पासून कोणतीं अस्त्रें घेतलीं तें सांगून नकुल सहदेवा सहित शयन केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१६६ अध्याय एकशें सासष्ट- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुसरे दिवशीं प्रातःकाळीं धनंजय भ्रात्यां सहित धर्मराजास साष्टांग नमस्कार करून उभा आहे इतक्यांत आकाशा मध्यें वाद्यें, रथ व घंटा यांचे शब्द श्रवणांत येऊं लागले तों गंधर्व अपसरा यां सहित इंद्र दिव्य रथांत आरूढ होऊन पांडवां कडे आला. तेव्हां धर्मराजानें त्यास पाहून यथा शास्त्र त्याची पूजा केली. अर्जुन ही मोठ्या प्रीतीनें इंद्रास साष्टांग नमस्कार करून सेवका सारखा अग्रभागीं उभा राहिला. तें पाहून पुरंदर भाषण करूं लागला कीं, हे धर्मराजा, तूं लौकरच पृथ्वीचें राज्य करून कल्याण पावशील. आतां लौकरच काम्यकवनीं गमन कर. तुमचें सर्वांचें कल्याण असो. जी अस्त्र विद्या प्राप्त झाली त्यायोगें हा अर्जुन त्रैलोक्यांत अजिंक होईल. असें धर्मराजास बोलून इंद्र, ऋषिस्तवन करित असतां स्वर्गलोकीं गेला. वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, पांडव, कुबेर, इंद्र यांचा गंधमादन पर्वतीं समागम झाला. हें आख्यान एक संवत्सर पर्यंत ब्रह्मचर्य व्रतानें नित्यशः जे पठण करतील ते शत वर्षे पर्यंत सुखानें पृथ्वीवर वास करतील. असा विषय या अध्यायांत आहे.

१६७ अध्याय एकशें सदुसष्ट- वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, इंद्र गेल्यावर अर्जुन द्रौपदीसहित धर्मराजाची पूजा करून अग्रभागीं बसला तेव्हां धर्मराज त्याच्या मूर्ध्याचें आघ्राण करून हर्षयुक्त सदगदित वाणीनें भाषण करूं लागला, कीं, हे अर्जुना, इतका काल स्वर्गामध्यें तुला कसा गेला? अस्त्राची प्राप्ती कशी झाली? इंद्राचा संतोष तूं कसा केलास? भगवान रुद्र सं

तुष्ट होऊन त्याची व तुझी भेट होऊन त्याचा संतोष कसा केलास आणि तुला त्यानें अस्त्र कसें दिलें हें संपूर्ण विस्तारानें मला सांग. असें ऐकून अर्जुन भाषण करतो हे राजा, तुझी आज्ञा घेऊन पूर्वीं मी भृगुतुंग नामक पर्वतीं जाऊन तप करीत एक रात्र बसलों असतां एक ब्राह्मण मार्गांत मी पाहिला त्यानें मला असा प्रश्न केला कीं, तूं कोण कोठून आलास? कोठें जाण्याची इच्छा आहे? त्याकालीं मी आपला संपूर्ण वृत्तांत त्यास सांगितला तो ऐकून ब्राह्मणानें माझा सत्कार करून भाषण केलें कीं, तूं येथें तप कर ह्मणजे तुला लौकरच इंद्र भेटेल. असें ऐकून मी हिमालय पर्वतीं फलमूलांनें भक्षण करून एक मास अतिक्रांत केला, दुसरे माशीं जल भक्षण, तिसरे माशीं निराहार, चतुर्थ माशीं ऊर्ध्व बाहू करून उभा राहिलों; परंतु माझे प्राणास कांहीं एक व्यथा झाली नाहीं. पांचवे माशीं पहिले दिवशीं एक वराह पृथ्वीचें विदारण करीत माझ्या समीप आला त्याचे पाठीमागून स्त्रियां सहित मोठा एक भयंकर किरात हस्तामध्यें धनुष्य बाण घेऊन आला. मी तो वराह अवलोकन करतांच त्याजवर बाण टाकितों तों इतक्यांत किरात ही त्या वराहावर बाण टाकून मला भाषण करूं लागला कीं, ही मृगया माझी आहे याजवर तूं बाण टाकणार कोण? पूर्वीं या वराहास मी येथें आणिला जर दर्प करून याजवर बाण टाकण्यास उद्युक्त असशील तर माझ्या अग्रभागीं युद्धास सिद्ध हो. असें भाषण करून किरातानें एकाएकीं मजवर शरांची वृष्टी केली असतां मी ही त्याजवर शरांचा वर्षाव केला. किरातानें एक क्षणांत पर्वतासारखें रूप धारण करतांच मी त्यास बाणानीं वेध करतांच त्याचीं सहस्त्रावधी शरीरें झालीं त्यांस ताडन करतांच तीं सर्व मिळून एक पुरुष झाला. पुनः मी त्यास बाणें करून ताडित केलें. याप्रमाणें बहुत वेळ युद्ध करतां करतां मला आटोपेना तंतर मी वायव्य अस्त्राचा प्रयोग केला तें ही अस्त्र माझें व्यर्थ गेलें त्याकालीं मला फार विस्मय होऊन स्थुणा कर्णानीं दिलेलें अस्त्र व जलास्त्र व शलभास्त्र इत्यादिकांची वृष्टी केली. किरातानें तीं संपूर्ण अस्त्रें भक्षण करून टाकिलीं. पुनः मी बाणजालें करून त्यास वेष्टित केला असतां संपूर्ण लोक बाणांच्या तेजानें संभ्रम झाले एक क्षणांत आकाश व दिशा तेजें करून व्याप्त झाल्यानंतर मी ब्रह्मास्त्रा

प्रयोग केला तेंही किरातानें भक्षण केलें, पुनः माझे अक्षय्य बाण होते ते कि-
रातावर टाकिले तेही त्याणें भक्षण केले असतां त्याचें व माझें बाहु युद्ध झालें.ते
व्हां मी निचेष्ट पृथ्वीवर पडल्यावर किरात हास्य करून स्त्रियांसहवर्तमान अं
तरधान पावला तों दिव्यरूप धारण करून पार्वती सहित शिव माझ्यापुढें ये
ऊन मला भाषण करूं लागले कीं, हे पार्था, मी संतुष्ट झालों हे आपले अक्ष-
य्य भाते ग्रहण कर. अमरत्वाशिवाय तुला जें पाहिजे असेल तें माग,त्याकालीं
मी शिवास साष्टांग नमस्कार करून भाषण केलें कीं, हे शूलपाणे, जर इच्छा-
असेल तर मला अस्त्रविद्या द्यावी. असें माझें वाक्य श्रवण करून शिव बोलले
कीं, पाशुपत नामक अस्त्र मी तुला देतों; परंतु हें अस्त्र व्यर्थ कोणावर टाकूंन
को कारण आज पासून मोठा अनर्थ उत्पन्न होईल. ज्याकालीं तुझ्यावर मोठें सं-
कट येईल तेव्हांच या अस्त्राचा प्रयोग कर. देव,दानव, गंधर्व, राक्षस व उरग
यांस हें अस्त्र परम दुःसह आहे.असें बोलून शिव अंतरधान पावले तेव्हां मी
तेथेंच राहिलों. असा विषय या अध्यायांत आहे.

१६८ अध्याय एकशें अडसष्ट:- अर्जुन भाषण करतो हे धर्मराज,
श्रीशिव अंतरधान पावल्यानंतर मी एकरात्र तेथेंच राहिलों दुसरे दिवशीं स्ना
न संध्यादि क्रिया करून बसलों. इतक्यांत पूर्वी ज्या ब्राह्मणास पाहिलें होतें तो-
च ब्राह्मण पुनः माझ्या दृष्टीस पडला तेव्हां झालेलें संपूर्ण वृत्त त्यास मी सांगित
लें नंतर तो ब्राह्मण मला बोलला कीं, हे अर्जुना, तूं जसें ईश्वरास पाहिलेंस अ-
सें पूर्वी कधींच कोणी पाहिलें नसेल. आतां समग्र लोकपालांसहित इंद्र तुझ्या-
दर्शना करितां येईल आणि तुला अस्त्रें देईल.असें बोलून तो ब्राह्मण अदृश्य-
झाला नंतर देव व मरुद्गण यांसहवर्तमान इंद्र माझ्या अग्रभागीं आला तेव्हां
कुबेरानें माझे सन्निध येऊन ज्या ज्या प्रदेशीं दिक्पाल उभे होते ते मला दाख-
विले त्याकालीं समग्र लोकपाल मला बोलले हे सव्यसाची, आम्ही लोकपाल
आहोंत देवांचे कार्या करितां तुला श्रीशंकराचें दर्शन जाहालें आतां आम्हीं ही-
तुला शस्त्रास्त्रें समर्पण करतों असें म्हणून त्यानीं मला आपली समग्र अस्त्र
विद्या दिली आणि ते स्वर्गलोकीं गेले.पुढें इंद्र रथारूढ होऊन मला बोलला
कीं. हे अर्जुना. तूं स्वर्गास चल पूर्वींच मी तुला येथें पाहिला तूं तीर्थामध्यें स्ना-

न करून तप केलेंस येणें करून स्वर्ग लोकीं येण्यास योग्य आहेस. माझे आज्ञे वरून मातली तुला स्वर्गास आणील. त्या काळीं मी भाषण केलें कीं, हे इंद्रा, अस्त्रविद्ये विषयीं मी तुला आचार्य केला यास्तव मला अस्त्र विद्या द्या. असें ऐकून इंद्र बोलला हे अर्जुना, मजपासून तुला अस्त्र ज्ञान झालें ह्मणजे तूं क्रूर कर्मा होशील. त्याकाळीं मी भाषण केलें कीं, मला दिव्य अस्त्रें द्या. मनुष्यांमध्यें माझ्यावर अस्त्र टाकील्या वांचून हीं अस्त्रें मी त्याजवर टाकणार नाहीं. असें ऐकून इंद्र बोलला हे अर्जुना, तुझे परिक्षे करितां मी तुला असें भाषण केलें तूं माझा साक्षात पुत्र नेव्हां तुला अस्त्रें देण्या विषयीं अनुमान करीत नाहीं. स्वर्ग लोकीं माझे गृहीं चल ह्मणजे मी तुला अस्त्रें देतों. अग्नि, वरुण, वायु, इत्यादिकानीं जीं तुला अस्त्रें दिलीं तीं त्याणीं माझेच आज्ञे वरून दिलीं व मजपासूनच त्यांस प्राप्त जाहालीं. असें बोलून इंद्र तेथेंच अंतरधान पावला नंतर कांहीं वेळानें इंद्राचा मायारथ, अश्व व मातली यां सहीत आकाशापासून आला, त्या रथाबरोबर जे लोक आले ते मला बोलले हे अर्जुना, या रथामध्यें बसून स्वर्गलोकीं सत्वर चल. इंद्र तुझ्या दर्शनाची इच्छा करीत बसला आहे यास्तव तेथें जाऊन आपले कार्याची सिद्धी करून घे. असें ऐकून मी हिमालय पर्वतास नमन करून रथांत आरूट झालों नंतर मातलीनें तत्काल अश्वांस प्रेरणा करतांच ते अश्व एका एकीं आकाश मार्गे गेले. मार्गांत मातली माझ्या मुखाकडे पाहून बोलला हे अर्जुना, इंद्राचें आसन या रथामध्यें दाचित् टळतें; परंतु तुझें आसन अगदीं टळत नाहीं तस्मात् इंद्रा पेक्षां तूं मोठा धैर्यवान आहेस, असें भाषण करून त्यानें रथ आकाशांत नेला. त्या काळीं देव, गंधर्व व ऋषी याणी मला पाहतांच हा इंद्राचा पुत्र असें समजून माझी पूजा केली. पुढें रथ जातां जातां मातलीनें मला सुर, ऋषि, गंधर्व व अपसरा यांचे लोक तशींच नाना प्रकारचीं नंदनादिक वनें व उपवनें दाखविलीं नंतर इंद्राची अमरावती नगरी मी पाहिली. त्या नगरींत सूर्याचा संताप, शीत व ऊष्ण यांची बाधा, जरामरण यांचें भय अगदीं नाहीं. शोक, दैन्य व दौर्बल्य या पदार्थांचा तर प्रवेशच नाहीं. तेथील राहणाऱ्यांस

ग्लानी व क्रोध हे कधींच ठाऊक नाहींत. वृक्ष निरंतर फलपुष्पानीं युक्त अ सतात तेथें सर्व रत्नानीं चित्रविचित्र जाहलेली भूमी आहे, मृग व द्विज यांचे मधुरशब्द ऐकिले. नंतर विमानारूढ झालेले जे देव गंधर्व यांचेस मुदाय बहुत पाहिले. पुढें वसु, रुद्र, साध्य, मरुत् गण व अश्विनीकुमार यां स पाहून त्यांची मी उत्तम प्रकारें पूजा केली तेही मजकडे पाहून हर्षितझा ले. पुढें अमरावती मध्यें प्रवेश करून देवराजाच्या अग्रभागीं उभा राहि लों त्याकालीं इंद्रानें समग्र देव पहात असतां आपले अर्धासनीं मला ब सवून आपले हस्तानें माझ्या शरीरास स्पर्श केला. पुढें देव व गंधर्व यांसहि त तेथें राहून संपूर्ण शस्त्रास्त्र विद्यांचा मी अभ्यास केला. नंतर चित्रसेन गं धर्व हा माझा परममित्र होऊन त्याणें मला गायन विद्या शिकविली. अपस रा, गंधर्व यांचीं नृत्यें बहुत मी पाहिलीं. समग्र शस्त्रास्त्र विद्या; इंद्र, मरुद्गण व दिक्पाल यांजपासून प्राप्त झाल्यावर इंद्र मला बोलला हे अर्जुना, तुझा युद्धामध्यें शूरही पराभव करण्यास अशक्य मग मनुष्य कोठून करतील! तूं मोठा दक्ष, सत्यवादी व जितेंद्रिय आहेस उपक्रम उपसंहारासहित शस्त्रास्त्र विद्या तूं मजपासून ग्रहण केल्यास आतां मला गुरुदक्षिणा दे. ती अशी कीं, मा झे शत्रू निवातकवच नामक दानव तीन कोटी मोठे पराक्रमी व बलवान समु द्राचा आश्रय करून राहिले आहेत त्यांचा तूं पराभव कर ह्मणजे मला गुरुदक्ष णा तूं दिलीस असें होईल. असें भाषण करून इंद्रानें मातलीनामक सारथ्या स अश्वांसहित दिव्य रथ आणण्यास आज्ञा दिली. नंतर आपल्या करानें मा झ्या मस्तकावर किरीट बांधून अभेद्य कवच ही आंगांत घातलें आणि गांडी व धनुष्यास एक उत्तम प्रकारची रज्जु बांधिली नंतर रथामध्यें मी आरूढ होतांच इंद्र रथारूढ होऊन कोणीकडे जातो असा संपूर्ण देवांस भास होऊ न तेमाझ्या रथाच्या अग्रभागीं आले आणि मला बोलले हे अर्जुना, तूं को ठें जातोस? तेव्हां त्यांस मी भाषण केलें कीं, निवातकवच्यांच्या वधाकरितां मी जातों. असें ऐकून ते बोलले हे अर्जुना, याच रथानें शंबरासुर, नमुचि, ब ली, वृत्रासुर, नरकासुर इत्यादि हजारों दैत्यांचा इंद्रानें पराभव केला त्याच रथाच्या योगें तूं निवातकवचांचा पराभव करशील. असा संपूर्ण देवानीं आ

शीर्वाद दिल्यानंतर इंद्रानें देवदत्त नामक शंख मला देऊन सांगितलें कीं, त्या शंखाच्या नादानें तूं तिन्ही लोकांचा पराभव करशील नंतर त्या शंखाच्या नाद करून दानवांचा पराभव करण्या करितां मी तिकडे गेलों. असा विषय या अध्यायांत आहे.

१६९ अध्याय एकशें एकुण सत्तर:- अर्जुन भाषण करतो हे धर्मराजा, मी समुद्र तीरीं गेल्यानंतर तेथें हजारों पर्वतप्राय लहरी, रत्नानीं पूर्ण झालेल्या नौका, मोठमोठे मत्स्य, कच्छ व हजारों शंखांच्या राशी पाहून दानवांचें पुर पाहिलें. रथाचा शब्द ऐकतांच संपूर्ण दानव हा इंद्रच आला काय अशी कल्पना करून शूल, परशु, गदा इत्यादि आयुधें घेऊन आपलें पुरद्वार संरक्षण करण्यास आले तेव्हां मी देवदत्त नामक शंखाचा भयंकर नाद केला, तेणेंकरून आकाशांतील भूतें त्रस्त झालीं. निवातकवच नामक दानव गदा, मुसळ, पट्टिश इत्यादि घेऊन माझ्यावर वर्षाव करण्यास उद्युक्त झाले असतां मातलीनें हयांस पुढें पुढें चालविलें, त्या कालीं निवातकवचानीं एकाएकीं हजारों वाद्यांचा गजर केला इकडे माझ्याही रथाचे भयंकर शब्द होऊं लागले त्या योगानें संपूर्ण समुद्र व्यास होऊन सहस्रावधी मत्स्य पळूं लागले. नंतर निवातकवच्यानीं माझ्यावर बाणांची वृष्टी केली असतां मीही त्यांजवर बहुत बाणांचा वर्षाव केला. त्याकालीं उभयतांचा संग्राम पाहाण्यास देवऋषी व ब्रह्मऋषी येऊन माझी स्तुती करूं लागले. अ. वि. या अ. आहे

१७० अध्याय एकशें सत्तर:- अर्जुन भाषण करतो हे धर्मराजा, निवातकवच नामक दानवानीं मजवर आयुधांची वृष्टी करून माझ्या रथाचा मार्ग बंद करतांच मी बाणांचा वर्षाव करून त्यांस बहुत त्रास उत्पन्न केला. पुनः त्यांणी गदा शूल, पट्टिश इत्यादिकांचा जो मजवर वर्षाव केला त्याचें तर मला वर्णनच करतां येत नाहीं. पुनः मी दहा दहा बाणें करून निवातकवचांस वेध केला असतां कांहीं दानव युद्धापासून पराङ्मुख जाहाले तित क्यांत मातलीनें हयांस प्रेरणा करून त्वरेनें रथ पुढें नेला त्या कालीं अश्वांच्या चरण संमर्दानें, माझ्या बाणाच्या अघातानें व रथाच्या शब्दानें हजारों दानव मरण पावले, कांहीं दाही दिशांस पळाले. त्या युद्धप्रसंगीं मी मातलीचें शौर्य व हस्त कौश

ल्य पाहून संतुष्ट झाला, मात्रें ही हस्त कौशल्य पाहून तो हर्ष पावला. निवात कव
च्यानीं क्षणांत पळावें क्षणांत अस्त्रांची वृष्टी करावी. ज्या काळीं ते माझ्या दृ-
ष्टीसमोर येत त्याकाळीं मी त्यांस पीडीत करीं शेवटीं युद्ध होतां होतां आ-
तां यांजवर परम विख्यात एक अस्त्राची योजना करावी तेणें करून हे स
मग्र नाश पावतील असा मनामध्यें मी निश्चय करून पूर्वी मधुनामा दैत्य-
वधाकरितां विष्णूनीं जें अस्त्र टाकिलें होतें तेंच अस्त्र त्याजवर टाकिलें आ-
णि खड्ग त्रिशूल दिकानीं त्याचीं आयुधें तोडून त्यांचीं शरीरें ही भिन्न केलीं
तेव्हां ते मारक युद्ध करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

१७१ अध्याय एकशें एकाहत्तर— अर्जुन भाषण करतो हे धर्मरा-
जा, निवात कवच नामक दानवानीं शिलांची वृष्टी करून मला बहुत पीडित
केलें असतां मी इंद्रानें दिलेल्या अस्त्रानीं त्याशिलांचें चूर्ण करतांच अग्नी उ-
त्पन्न झाला. पुढें दानवानीं पर्जन्यास्त्र सोडून संपूर्ण स्थलें जलमय करून टा
किलीं नंतर इंद्रानें मला शोषणास्त्राचा उपदेश केला होता त्याच अस्त्राचा प्र-
योग करून जलाचा शोष केला, तेव्हां दानवानीं पुनः मायेनें अग्नि व वायुया
अस्त्रांचा वर्षाव केला त्याचें मी वारुणास्त्र व शैलास्त्र यानीं निवारण केलें. नं-
तर दैत्यानीं अंधःकार उत्पन्न केल्यामुळें रथाचे अश्व स्खलित झाले, हिरण्मय
चाबुक मातलीचे हातून पृथ्वीवर पडतांच तो घाबरा होऊन मला बोलला;
हे अर्जुना, हा अनर्थ काय? त्या काळीं मलाही तीव्र भय उत्पन्न होऊन माझें
अंतःकरण त्रस्त झालें आणि मी रथामध्यें अगदीं निचेष्ट पडलों, मातलीही
अगदीं निचेष्ट झाला असतां तो मला बोलला हे पार्था, अमृता करितां देवा-
सुरांचा संग्राम झालेला मी पाहिला. शंबरासुर व वृत्रासुर यांच्या वध कालीं
मीच इंद्रानें सारथ्य केलें, परंतु सुद्धांत कधींही मी निचेतन झालों नवतो तेव्हां म-
ला असें वाटतें कीं, ब्रह्मदेवानीं जगताचा संहार करण्याची वेळ आयली आहे,
त्या काळीं मी मातलीस बोललों हे मातली, तूं भिऊं नको आज मी आपल्या बा
णें करून संपूर्णांस मोहित करतो, आज माझे भुज, बाण, गांडीव धनुष्य यां
चें बल पहा यांच्या योगें यातमाचा मी नाश करतों, स्थिर हो चंचल चित्त क-
रूं नको. असें मी त्याचें शांतवन करून नंतर मायामय अस्त्रांच्या योगें स-

मग्न नगांचा नाश केला. नंतर ते माझ्या अग्रभागीं मोठें एक विवर खणून त्यां
न अदृश्य झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

१७२ अध्याय एकशें बहात्तर.- अर्जुन भाषण करतो हे धर्मराजा, निवात कवच अदृश्य होऊन युद्ध करीत असतां मी ही अदृश्य अस्त्रवीर्यानेंच युद्ध करीत त्यांच्या मस्तकांचा च्छेद करूं लागलों, तेव्हां ते दानव आपल्या नगरांत जाऊन पुनः एकाकीं आले आणि आकाशांत जाऊन पर्वतांचा वर्षाव करूं लागले व भूमींत शिरून माझ्या अश्वांस व रथास ओढूं लागले तेव्हां मलाही मोठें भय उत्पन्न झालें. हें पाहून मातली बोलला हे धनंजया, इंद्रानें दिलेलें वज्रास्त्र सोड. असें ऐकून तत्काल मी त्या अस्त्राची योजना करतांच संपूर्ण दानव पृथ्वीवर पडले. नंतर मी मातली सहवर्तमान रथारूढ होऊन निवात कवच्यांच्या नगरांत गेलों आणि नाना प्रकारचीं रत्नें वसुवर्णाचे कलश यांची समृद्धी पाहून मातलीस बोललों कीं, हें पुर इंद्राच्याही नगरापेक्षां बहुतचमत्कारिक दिसतें हें काय आश्चर्य त्याकालीं मातली बोलला कीं, हें पूर पूर्वीं इंद्रानें होतें. नंतर यानिवात कवच नामक दैत्यानीं ब्रह्मदेवाची आराधना केल्यामुळें ब्रह्मदेवानीं त्यांस देवांपासून अभय व हें नगर दिलें. पुढें इंद्र प्रभृति देव ब्रह्मदेवास शरण गेले असतां ब्रह्मदेवानीं इंद्रास सांगितलें कीं, तूंच अन्य देहानें यांचा नाश करशील यास्तव हे अर्जुना, तूं इंद्राचा अवतार ह्मणोन त्याणें तुला अस्त्रविद्या दिली. त्या असुरांचा पराभव करण्यास देवही अशक्य तो तूं केलास याजकरितांच तुझा अवतार या पृथ्वीवर झाला. असें मातली बोलल्यावर त्यासह वर्तमान मी नगरांत गेलों आणि समग्र लोकांचें शांतवन करून इंद्रलोकीं जाण्यास निघालों. असा विषय या अध्यायांत आहे.

१७३ अध्याय एकशें त्र्याहात्तर.- अर्जुन भाषण करतो हे धर्मराजा, इंद्र लोकीं आह्मीं जात असतां इच्छेप्रमाणें संचार करणारें सूर्यासारखें तेजस्वी व रत्नमय असें एक पूर आकाशांत पाहिलें पुढें खड्गादि आयुधें धारण केलेले पौलोम व कालखंज नामक दैत्य पाहून मी मातलीस विचारिलें कीं, हें पूर फारच चमत्कारिक दिसतें त्याकालीं मातलीनें त्याप्रमा

त्या इतिहास मला असा सांगितला कीं, पुलोमा आणि कालका ह्मणोन देत्या च्या दोन कन्या होत्या त्याणीं देवांचीं सहस्त्र वर्षे तप केलें त्या कालीं ब्रह्मदेवांनीं त्यांस वरदान दिलें कीं, तुह्मांस देव गंधर्वांनीं समरामध्यें अजय असे दोन पुत्र होतील आणि त्या पुत्रांस राहाण्यास सर्व गुणें करून युक्त आकाशगामी हें पूर देतों याचें नांव हिरण्यपूर अशी मरव्याती होईल. तेंहें कालिकेय आणि पौलोम याणीं स्वीकृत केलेलें पुर आहे. या असुरांस मनुष्यापासून मृत्यु आहे ह्मणोन ब्रह्मदेवानीं सांगितलें यास्तव अर्जुना, वज्रास्त्राची योजना करून यांचा नाश कर. त्याकालीं मी मातलीस भाषण केलें कीं, असें जर असेल तर आपला रथ पुढें ने. असें ऐकून तत्काल मातलीनें रथ पुढें नेतांच कालिकेय व पौलोम याणीं मजवर शक्ती, यष्टी व तोमर इत्यादिकांची वृष्टी केली, त्या वृष्टीचें मी निवारण करून संपूर्णांस मोह उत्पन्न केला. असें युद्ध होत असतां तें आकाशगामी पूर क्षणांत पृथ्वीवर, क्षणांत अंतरिक्षांत, क्षणांत उदकांत स्थापन करीत त्याकालीं मी दिव्यास्त्र शरजालें करून पूराची गती बंद केली आणि सूर्या साररव्या तेजस्वी बाणानीं बहुत राक्षसांचा वध केला नंतर साठ हजार रथ्यांसह वर्तमान कालकेय व पौलोम युद्धास येतांच मी त्यांचा पराभव करावा या हेतूनें रौद्र अस्त्राचा प्रयोग करण्यासाठीं मंत्राचा उच्चार करतांच साक्षात शिवाची मूर्त्ती दृष्टीस पडली तेव्हां त्यास नमस्कार करून अस्त्राची मुक्तता केली आणि एका मुहूर्तांत सर्व दानवांचा वध करतांच मातली हर्षानें बोलला हे अर्जुना, सुरासुर, शक्र याणि अवध्य जे दैत्य त्यांचा तूं नाश केलास तेव्हां तूं वीर्यशाली व संग्रामामध्यें श्रेष्ठ होस. दैत्य मरण पावले हें ऐकतांच त्यांच्या सर्व स्त्रिया नगराबाहेर येऊन शोक करूं लागल्या. अशी दानवांची अवस्था होतांच मातलीनें मला इंद्रलोकीं सत्वर नेऊन झालेला वृत्तांत इंद्रास सांगितला. तो ऐकून इंद्र संतुष्ट झाला आणि संपूर्ण देवांसह वर्तमान माझी प्रशंसा करून बोलला हे अर्जुना, देवानीं जें कार्य करणें अशक्य तें तूं केलेंस तुझ्या प्रभावानें मी संतुष्ट झालों असाच युद्धामध्यें तूं स्थिर हो, मोह पावूं नको, तुझ्या बाहूबलानें संपूर्ण पृथ्वी धर्मराजापा

ळून करील. असा विषय या अध्यायांत आहे.

१७४ अध्याय एकशें चवऱ्याहात्तर.- अर्जुन बोलतो हे राजा, निवात कवच्यांचा वध करून मी इंद्रलोकीं आल्यावर इंद्र बोलला हे अर्जुना, संपूर्ण दिव्य शस्त्रास्त्रें तुझ्या ठायीं रहातात यास्तव या पृथ्वीवर कोणीही तुझा पराभव करण्यास समर्थ होणार नाहीं. भीष्म, द्रोण, कृपाचार्य, कर्ण, शकुनी हे इतर राजां सहवर्तमान संग्रामामध्यें तुझी सोळावी कळा ही पावणार नाहींत असें ह्मणोन त्यानें मला हें अभेद्य कवच, सुवर्णाची माला, देवदत्तनामक शंख व दिव्य किरीट देऊन नाना प्रकारचीं भूषणें व उत्तम प्रकारचीं वस्त्रें दिलीं. अशा आनंदानें गंधर्वांच्या पुत्रां सहवर्तमान पांच वर्षे इंद्रलोकीं राहिलों. एके दिवशीं इंद्रानें मला सांगितलें कीं, तुझे भ्राते वारंवार तुझें स्मरण करतात यास्तव त्यांच्या भेटी करितां तूं भूमंडळीं जा. असें ऐकून मी तुझ्या दर्शनाच्या इच्छेनें या गंधमादन पर्वतीं आलों. असा वृत्तांत ऐकून धर्मराज भाषण करतात हे अर्जुना, दैवानें तूं अस्त्र विद्या संपादन केलीस व स्थाणु भगवान जो शिव याचें साक्षात दर्शन होऊन तुझ्या युद्धानें तो संतुष्ट झाला आणि लोकपालांस भेटून मला भेटलास या योगें आज मी समग्र पृथ्वी जिंकिली व धृतराष्ट्राचे पुत्र मला वश झाले, असें मी मानितों. हे अर्जुना, ज्या अस्त्रानीं तूं निवात कवच्यांचा वध केलास तीं अस्त्रें पाहण्यास मी इच्छितों. असें ऐकून अर्जुन बोलतो हे राजा, समग्र शस्त्रास्त्रें उदईक प्रातःकालीं मी तुला दाखवीन. असें बोलत अर्जुन बंधूसहवर्तमान त्या रात्रीं तेथेंच राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७५ अध्याय एकशें पंचाहात्तर.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुसरे दिवशीं भ्रात्यांसहित धर्मराज अवश्य कार्यें करून अर्जुनास बोलला हे पार्था, ज्या अस्त्रानीं तूं निवात कवच्यांचा पराभव केलास तीं अस्त्रें मला दाखीव. असें ऐकून समग्र शस्त्रास्त्रें राजास दाखविण्या करितां अर्जुनानें यथा शास्त्र आचमन करून गंधमादन पर्वताला रथ अशी कल्पना केली आणि त्याजवर आरूढ होऊन व दिव्य कवच धारण करून गांडिव धनुष्य दोन्ही हातांत धरलें असतां पार्थ फारच शोभायमान दिसूं ला-

गला धर्मराजास दिव्यास्त्रें प्रदर्शित करण्या करितां त्या त्या मंत्राचा अर्जुनानें उच्चार करतांच पृथ्वी द्रुमासहित कंपायमान झाली. सरित व सागर क्षोभित झाले, शैल विदीर्ण झाले, अकस्मात मोठा वायु सुटला, सूर्य व अग्नि यांची प्रभा नष्ट झाली, सर्व प्राणी पीडित होऊन अर्जुनास ह्मणो लागले कीं, हे अर्जुना, तुझ्या अस्त्रानीं आह्मीं दग्ध झालों आमचें संरक्षण कर. असें बोलतात तों ब्रह्मऋषि, देव, गंधर्व, यक्ष, राक्षस, ब्रह्मदेव, लोकपाल, आपल्या गणांसह वर्तमान भगवान् महादेव आले. गंधर्व व किन्नर गायन करूं लागले इतक्यामध्यें नारद ऋषी येऊन ह्मणाले हे अर्जुना, व्यर्थ त्या अस्त्रांचा प्रयोग करूं नको हीं अस्त्रें व्यर्थ कोणावर टाकिलीं असतां अनर्थास कारण होतील. असें अर्जुनास सांगोन धर्मराजास ह्मणतात हे राजा, जर तुला पार्थाचीं अस्त्रें पाहण्याचीं असतील तर युद्धकालीं पहा. असें बोलून पार्थास परावृत्त केलें. नंतर समग्र देव आप आपल्या स्थानीं गेले. अर्जुन, द्रौपदी व भीमसेन यांसह वर्तमान धर्मराज सुखें करून गंधमादन पर्वतीं राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७६ अध्याय एकशें शाहात्तर.– वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, अर्जुना सह वर्तमान समग्र पांडव गंधमादन पर्वताच्या शिखरीं राहात असतां नाना प्रकारचे प्रासाद व वन संबंधीं शोभा पाहून बहुत संतुष्ट झाले आणि पार्था सह वर्तमान जसें एकरात्र राहावें तशीं मागील साहा व पुढील च्यार एकून दाहा वर्षें पांडवांनीं सुखें करून वनांत घालविलीं. एके दिवशीं भीमसेन, अर्जुन, नकुल, सहदेव एकांतीं धर्मराजास बोलले हे राजा, तूं आपली प्रतिज्ञा लौकर सिद्ध कर तुझें प्रिय करण्या साठीं आह्मीं वन सोडून कोठें जात नाहीं हें आपलें अकरावें वर्ष चाललें आज पर्यंत सुयोधनानें सुखें करून राज्य केलें आतां त्याच्याशीं वंचना करून आपण राज्य करूं. एक संवत्सर पर्यंत अज्ञात वास कर्तव्य तो झाल्यावर दुर्मती जो दुर्योधन यावें राज्य लौकर घ्यावें अशी आमची इच्छा आहे. हे धर्मराजा, किती दिवस पर्यंत असा आपण वनामध्यें वास करावा. जर राज्य घेण्याचा उपाय तूं न करशील तर तुझी अपकीर्ती देशोदेशीं जाईल एवढ्या करितां जे आपले अपराधी असतील

व ज्यानीं आपल्यास बहुत पीडा दिली असेल त्यांच्या वधाविषयीं लौकर इ-
च्छा कर. तुझें तेज साक्षात् वज्रपाणी ही धारण करण्यास समर्थ होणार ना-
हीं मग या पामराची कथा काय? तुला श्रीकृष्ण व सात्यकी हे महान दोन यो
द्धे साहाय्य असतां तूं अगदीं उपेक्षा करूं नको, तुझी अर्थसिद्धी आमच्या
साह्यें करून लौकरच समास होईल. तुला साहाय्य होणारे राजे निरंतर अ
शीच इच्छा करतात. असें झाल्यांचें वाक्य ऐकून धर्मराज कुबेराच्या गृहास
एक प्रदक्षिणा करून नद्या, सरोवरें व संपूर्ण वननिवासी प्राणी यांची प्रार्थ
ना करून ह्मणों लागला कीं, आह्मीं तुमच्या आश्रयें करून आज पर्यंत ये
थें वास केला, आतां येथून जातों. असें भाषण करून नंतर पर्वताची प्रार्थ
ना केली. नंतर संपूर्ण ब्राह्मणां सहवर्तमान धर्मराज तेथून जाण्यास सि-
द्ध होतांच घटोत्कच गणांसहवर्तमान धर्मराजास घेऊन पूर्वी आलेल्या मा
र्गानें गेला. लोमश ऋषी ही अतिहर्षानें आकाश मार्गें गेले. धर्मराज मार्गी
मध्यें आर्ष्टिषेण प्रभृति ऋषीनीं दाखविलेलीं तीर्थें पहात गेला. असा विष
य या अध्यायांत आहे.

१७७ अध्याय एकशें सत्याहात्तर:- वैशंपायन सांगतात हे जन
मेजया, धर्मराज प्रभृति पांडव गंधमादन पर्वताचा त्याग करून जात अ
सतां पर्वत वियोगजन्य दुःखाचें वारंवार स्मरण करित कैलास पर्वतीं ये
ऊन कुबेराचें वन पहातांच पूर्वंवत प्रमाणें सुखी झाले. नंतर कैलास पर्व-
ताचा त्याग करून वृषपर्वा नामक ऋषीच्या आश्रमीं आले. तेथें ऋषीनें रा
जाचा बहुत सत्कार करून प्रवासा विषयीं प्रश्न केला असतां झालेलें वर्त-
मान धर्मराजानीं ऋषीस सांगून एकरात्र ऋषीच्या आश्रमीं वास केला नं
तर दुसरे दिवशीं ते सर्व बद्रिकाश्रमीं येऊन एकमास पर्यंत तेथें राहून
चीन, तुषार, दरद, कुलिंद इत्यादि देश पहात सुबाहू नामक राजाच्या नग-
रीं गेले. सुबाहूनें पांडवांचा उत्तम प्रकारें सत्कार केला असतां इंद्रसेन प्रभृ
ति अमात्यां सहवर्तमान एकरात्र धर्मराज सुबाहूचे घरीं राहिला दुसरे दि
वशीं. घटोत्कचास अनुचरां सहवर्तमान स्वस्थानीं जाण्यास आज्ञा देऊ-
न नंतर समग्र पांडव यामुन नामक गिरीच्या वाटीं गेले. तेथें ऋक्ष, वराह र

त्यादि पशु पक्ष्यां ची शोभा पाहून एक संवत्सर पर्यंत त्यानीं तेथें वास केला. कोणेएके दिवशीं एकक्षुधार्थी भुजंगानें गिरीच्या गुहेंत भीमसेनास वेष्टित केला होता त्यांची मुक्तता धर्मराजानें करून पुढें तो मरुधन्व देशीं-सरस्वती तीरीं येऊन भ्रात्यां सहवर्तमान द्वैतवनीं गेला. हें समग्र ऋषींस कळतांच हजारों ऋषी धर्मराजाच्या भेटी करितां तेथें आले. असा विषय या अध्यायांत आहे.

१७८ अध्याय एकशें अठ्याहात्तर— जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायन, दहा सहस्र नागांचें बल भीमसेनास असून व तो मोठा पराक्रमी असतां अजगरानें त्यास कसें ग्रासलें हें मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धनुर्धारी पांडव वृषपर्वानामक ऋषीच्या आश्रमीं आले. नंतर भीमसेन हिमालय पर्वताची शोभा पहात वनामध्यें संचार करीत असतां त्यानें देव ऋषी व सिद्ध चारण यांचे समुदाय पाहिले. चकोर, चक्रवाक, कोकिल व भृंगराज यांचे नानाप्रकारचे सुस्वर शब्द ऐकून पुष्पें व फलें इहीं करून नम्र झालेले जे वृक्ष यांची निबिड छाया पाहिली. अशा वनांत धनुष्य बाण घेऊन भीमसेन मृगया करीत फिरत असतां त्याच्या भयानें सिंह, शार्दूल, वनाचा त्याग करून इतरवनें सेवन करण्याची इच्छा करूं लागले. भीमसेनाच्या नादानें समग्र गुहानिवासी सिंह, व्याघ्र व सर्पादि मोठे मोठे प्राणी त्रस्त होऊन पळाले. भीमसेनाच्या पादाच्या अघातानें पर्वताचीं शृंगें नष्ट होऊन हजारों वृक्षांचें चूर्ण झालें. इतक्या काळांत गुहेसारखें ज्याचें मुख, पर्वता सारखें उच्च ज्याचें शरीर, सर्व भूतांस त्रासदायक असा एक अजगर पाहून त्यास धरण्यास भीमसेन पुढें जातांच अजगरानें भीमसेनाचे दोन्ही भुज आपल्या मुखांत ग्रस्त केले. त्याकाळीं भीमसेन त्यापासून सुटण्या विषयीं यत्न करीत असतां भुजंगास वरप्रदान होतें यामुळें त्याचे स्वाधीन झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७९ अध्याय एकशेंएकुणऐशीं— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीमसेन सर्पाच्या स्वाधीन झाल्या वर बहुत चिंताग्रस्त होऊन बोलला हे सर्पराज, तूं कोण तुला येवढें बल कोठून आलें. अतः पर तूं माझें काय करणार?

मीतर धर्मराजाचा कनिष्ठ बंधु मला भीमसेन ह्मणतात. दहा सहस्र नागांचें मला बळ असतां तूं मला वश केलेंस तस्मात् तुज पाशीं कांहीं विद्या आहे अथवा कोणाचें तरी वरप्रदान आहे असें मला वाटतें. असें ऐकून सर्पानें भीमसेनाचें भुज सोडून संपूर्ण शरीरास वेष्टन करून मुखमात्र रिकामें ठेविलें आणि भाषण केलें हे भीमसेना, मला फार क्षुधा लागली आहे. प्रारब्ध योगें तूं आज मला भक्षणास मिळालास. ही सर्पाची अवस्था मला प्राप्त जाहाली याचें कारण तुला सांगतों. मी पूर्वी तुमच्याच वंशांतील नहुष नामक राजा होतों. कोणे एके काळीं अगस्त्य ऋषीचा मी अवमान केला ह्मणोन त्याच्या शापाच्या योगानें ह्या अवस्थेंत मी आलों. क्षुधें करून मी बहुत पीडित आहें. जरं तूं भीमच असशील तर आमच्याच वंशांतला दायाद आहेस तेव्हां तुझें भक्षण अवश्य केलें पाहिजे. हे भीमसेना, यज्ञ यागादि क्रिया करून मला शक्रासन प्राप्त जाहालें होतें; परंतु मुनीच्या कोपानें तेथून भ्रष्ट होऊन या योनींत आलों. नंतर मी संपूर्ण ऋषींची प्रार्थना केली कीं, या योनी पासून माझी मुक्तता कधीं होईल? त्या काळीं मुनींनीं सांगितलें कीं, तुझ्या प्रश्नाचें उत्तर देणारा कधीं कोणी भेटेल त्या काळीं तुझी या योनी पासून मुक्तता होईल. ह्मणोन त्या काळाची अपेक्षा करीत या वना मध्यें मी बसलों आहे. जर तूं प्रश्नाचें उत्तर देशील तर मुक्त होशील. असें ऐकून भीमसेन बोलतो हे सर्पराज, जर तुला ऋषीनीं शाप दिला असेल तर मला कांहीं राग नाहीं व आपल्या शरीराची निंदा करण्याचें ही कारण नाहीं. जीं मनुष्यास सुखदुःखें झालीं व होणार यांची प्राप्ती किंवा अपाय झाला असतां मनास खेद करूं नये. पहा बरें! मी एवढा महान पराक्रमी असतां माझा पराक्रम व्यर्थ झाला. यास्तव मी आतां शोक करीत नाहीं ह्या अरण्यांत माझे बंधु राज्यापासून भ्रष्ट होऊन आले आहेत त्यांच्या वियोगाचें दुःख जसें मला झालें तसें दुःख आत्म्याचा नाश जरीं झाला तथापि होणार नाहीं. कारण कीं, माझा घात झाला असें कदाचित धर्मराज, अर्जुन, नकुळ, सहदेव व माझी माता यांस कळलें तर तीं विह्वल होऊन पृथ्वीवर पडतील. या प्रमाणें भीमसेनानें मुक्त होण्या विषयीं बहुत विलाप केले असतां तो मुक्त झाला नाहीं. इकडे धर्मरा

जाच्या आश्रमीं अनेक अनिष्ट उत्पात होऊं लागले. एकपक्ष व एकनेत्र असे पक्षी सूर्याकडे पाहून वमन करूं लागले. मृगपक्षी अपसव्य जाऊं लागले. धर्मराजाचा डावा डोळा व डावा हात कंपायमान होऊं लागला. असे- नाना प्रकारचे भयंकर उत्पात झालेले पाहून धर्मराज पांचालीस बोलला हे पांचाली, भीमसेन कोठें आहे? त्याकालीं पांचाली बोलली हे महाराज,- त्यास बाहेर गेल्यास बहुत काल झाला तो अद्यापि आला नाहीं. असें ऐकून अर्जुनास द्रौपदीचें व नकुल सहदेवास ब्राह्मणांचें संरक्षण करण्या विषयीं सांगून धौम्या सहवर्तमान धर्मराज, भीमसेनाच्या शोधाकरितां पूर्वेस गेला. मार्गांत भीमसेनानें श्वापदें मारलेलीं पाहून त्याच मार्गानें पर्वताच्या गुहे जवळ आला आणि पाहूं लागला तों सर्पानें वेष्टित केल्यांमुळें भीमसेन निचेष्ट झाला आहे. असा विषय या अध्यायांत आहे

१८० अध्याय एकशें ऐशीं.- वैशंपायन भाषण करतात हे जनमेजया, सर्प वेष्टित भीमसेनास पाहून धर्मराज बोलतो हे भीमा, ही आपत्ती तुला कशी प्राप्त जाहाली? हा पर्वत प्राय सर्प कोण आहे. असें ऐकून भीम बोलतो हे आर्य, हा मोठा प्राणी नहुष नामक राजऋषी होय. हा माझें भक्षण करण्यास उद्युक्त झाला आहे. असें ऐकून युधिष्ठीर बोलतो हे सर्पराज, हा भीमसेन माझा भ्राता होय याचा तूं त्याग कर आणि तुझी क्षुधा निवारण होण्याकरितां मी तुला दुसरे भक्ष देतों ते भक्षण कर. असें ऐकून सर्प बोलतो हे युधिष्ठिरा, हा मला आहार मिळाला. याचा त्याग मी करणार नाहीं. माझे प्रदेशांत जो प्राणी येईल त्याचें मी भक्षण करतों. हें माझें व्रत होय. असें- ऐकून युधिष्ठिर भाषण करतो हे सर्पा, तूं देव दैत्य अथवा उरग किंवा कोण आहेस? तुला कोणतें ज्ञान झालें असतां तूं यास सोडशील व भीमसेनाचा आहार कशाकरितां करतोस याचें कारण काय तें मला सांग. असें ऐकून सर्प बोलतो हे युधिष्ठिरा, सोमवंशांतील जो आयु त्याचा मी पुत्र होय. यज्ञ यागादि क्रिया करून स्वर्गाचेंही ऐश्वर्य मला प्राप्त झालें असतां त्या योगानें मी गर्विष्ट होऊन, कोणे एके दिवशीं सहस्र ब्राह्मण शिबिकेस लाविले- त्याकालीं अगस्त्यऋषीनीं तूं सर्प होशील असा मला शाप दिला. त्या योगानें

तत्काल मी सर्प योनीं पाऊन यां वनांत आलों. दिवसाचा जो षष्टकाल या- मध्यें जो प्राणी येईल त्यास तूं भक्षण कर असें ऋषीनीं मला सांगितलें. ह्मणोन ह्या तुझ्या भ्राता षष्ट कालीं मी भक्षण करतों जर माझ्या कांहीं प्रश्नां चीं उत्तरें देशील तर तुझ्या भ्राता जो भीमसेन यास सोडीन. असें ऐकून- युधिष्ठीर भाषण करतो हे सर्पराज, जे तुझे प्रश्न असतील ते मला सांग. य थाशक्ती मी त्यांचें उत्तर देतों. असें ऐकून सर्प प्रश्न करतो हे युधिष्ठिरा, ब्रा ह्मण कोणास ह्मणावें व वेद्य (जाणण्यास योग्य) कोण तें याचें उत्तर दे? असा प्रश्न ऐकून युधिष्ठिर उत्तर देतो हे सर्पा, सत्य, दान, क्षमा शील, अहिं सा, तप, दया हे गूण ज्यामध्यें असतील त्यास ब्राह्मण ह्मणावें. ज्यास सुख दुःख नाहीं व जेथें गेल्यावर प्राणी शोक पावत नाहीं तें वेद्य होय. हें उत्तर तुला दिलें पुढें तुझी इच्छा काय आहे? सर्प प्रश्न करतो हे युधिष्ठिरा, चार वर्ण जर खरे आहेत तर जे शूद्र असतील त्यांचे ठायीं सत्य, दान, अक्रोध अ घातुकपणा, अहिंसा, दया हीं जर असतील तर ते ब्राह्मण होतील किंवा ना हीं व सुख दुःख विरहित जें स्थान तेंच अप्रसिद्ध आहे तेव्हां तें जाणण्या स योग्य कसें होईल? युधिष्ठिर उत्तर देतो हे सर्पा, जीं शूद्राच्या ठायीं लक्षणें असावीं तीं नसून सत्यादिक लक्षणें जर असतील तर तो ब्राह्मण समजावा. व ब्राह्मण असून शूद्राचीं काम क्रोधादिक चिन्हें असतील तर तो शूद्र सम- जावा. सुखदुःख हीं दोन्हीं जेथें राहात नाहींत असें तें वेद्य (ब्रह्म) ह्मणो न मी पूर्वी सांगितलें त्याजवर तूं भाषण केलेंस कीं, जेथें सुखदुःख नाहीं तें वेद्य कसें होईल? तर तें वेद्य होतें या विषयीं दृष्टांत सांगतों. शीत आणि ऊष्ण हीं एकत्र मिळालीं असतां त्यां मध्यें शीताचें व ऊष्णाचें ज्ञान होत नाहीं तिसरेंच एक अपूर्व ज्ञान उत्पन्न होतें, तसेंच ब्रह्माचे ठायीं सुख दुःख विरहि त एक विलक्षण ज्ञान उत्पन्न होतें. सर्प प्रश्न करितो हे युधिष्ठिरा, एकून तुझें मन असें आहे कीं, जातीनें ब्राह्मणत्व नाहीं तर कर्मानेंच ब्राह्मण, क्ष त्रिय, वैश्य, शूद्र इत्यादि वर्ण जाणावे. याजवरून ईश्वरानें उत्पन्न केले ल्या ज्या जाती यांस व्यर्थता आली. युधिष्ठीर उत्तर देतो हे सर्पा, ईश्वरानें उत्पन्न केलेल्या ज्याती मनुष्य, पशु पक्षी या समजाव्या; परंतु सकल व-

र्णांचा संकर झाला होता यामुळे ब्राह्मणत्वादि जातीची परिक्षा होत नाहीं-सर्व सर्वांच्या ठायीं आपत्यें उत्पन्न करतात या विषयीं श्रुतीही आहे. यास्तव सर्ववर्णांस कारण कर्मच होय ह्मणोनच मी पूर्वी उत्तर दिलें कीं, शमदमादि उपाय युक्त जो असेल तोच ब्राह्मण त्या विरुद्ध जो वर्तेल तो शूद्र हें माझें मत आहे. असें ऐकून सर्प भाषण करतो हे युधिष्ठिरा, तूं जें सांगितलेंस तें मी ऐकून फारच संतुष्ट झालों आतां तुझा भ्राता जो वृकोदर यास कसें भक्षण करूं. असा विषय या अध्यायांत आहे.

१८१ अध्याय एकशें एक्यायशी— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पूर्वाध्यायीं ब्राह्मण व ज्ञेय पदार्थ या विषयीं सर्पानें प्रश्न केल्यावर त्याचें उत्तर युधिष्ठिरानें दिलें आतां या अध्यायीं आत्मज्ञान द्वारा ब्रह्म प्राप्तीचे उपाय कोणचे व कोणच्या प्रकारें स्वर्गाची गती होते ये विषयीं युधिष्ठिर प्रश्न करतो हे सर्पराज, या लोकीं तुझ्या सारखे वेद वेदांग पारग जे प्राणी यांस कोणच्या प्रकारें उत्तम गती होईल? असा प्रश्न ऐकून सर्प उत्तर देतो हे राजा, पात्राचे ठायीं दान, उत्तम प्रकारें प्रिय भाषण, सत्यता, अहिंसा यांचा अंगिकार केला-असतां आमच्या सारख्या प्राण्यांना स्वर्गी वास होईल. असा माझा निश्चय-आहे. असें ऐकून युधिष्ठिर बोलतो हे सर्पा, दान अथवा सत्य, अहिंसा अथवा प्रिय भाषण इतक्यांमध्यें उत्तम कोणतें? सर्प उत्तर देतो हे युधिष्ठिरा, ज्या ज्या काळीं जसजसें प्राप्त होईल तसतसा त्याचा विनियोग करावा. दान काळी दानास प्राधान्य व अहिंसेचे समयीं अहिंसेचें श्रेष्ठत्व असतें तारतम्यानें गुरुत्व किंवा लघुत्व जाणावें हें तुला उत्तर दिलें आतां दुसरा कांहीं तुला प्रश्न कर्तव्य असेल तो कर. युधिष्ठिर प्रश्न करतो हे सर्पा, ज्यास शरीर नाहीं त्यास स्वर्गगती कशी होते? विषयोपभोग त्यास कसे घडतात व कर्माचें फल त्यास काय प्राप्त होतें. सर्प उत्तर देतो हे राजा, प्राणिमात्रांस स्वकर्मानें मनुष्य योनी, स्वर्गीवास व तिर्यक् योनी. असे तीन जन्म मिळतात त्यांमध्यें दानादिक व इंद्रियांचा-निग्रह इत्यादिक कर्मे ज्या मनुष्यापासून घडतात तो स्वर्गीं वास करतो याविरुद्ध ज्याचें कर्म असतें ते मनुष्य देहांतच राहातात. काम, क्रोध, हिंसा इत्यादिकांचा अंगिकार केला असतां पशुयोनी मनुष्यास प्राप्त होते त्यामध्यें हीं पापपु

ण्याच्या तारतम्यें करून गो, अश्व इत्यादिक पवित्र पशुयोनी प्राप्त होतात. तात्पर्य पुण्य पापाचें साम्य झालें ह्मणजे मनुष्य योनी प्राप्त होते, पुण्याधिक्य झालें ह्मणजे स्वर्ग प्राप्ती होते, पापाधिक्य असेल तर नरकप्राप्ती होत्ये आणि पुण्य व पापयांत जें अधिक असेल त्याच्या भोगानें नाश होऊन तीं पुण्य पापें समान झालीं असतां पुनः मनुष्यत्व प्राप्त होतें. युधिष्ठिर भाषण करतो हे सर्पा, कर्माच्या तारतम्यानें जंतूस या योनी प्राप्त होतात हें संपूर्ण तुला विदितच असतां मला संशयधरून कां प्रश्न केलास याचें तात्पर्य काय? असें ऐकून सर्प भाषण करतो हे धर्मराजा, जरी उत्तम प्रकारचा ज्ञानी व सर्व वेत्ता असला तरी जे आपल्यास संशय उत्पन्न होतील त्याविषयीं लोकांस प्रश्न करावे आणि आपले अज्ञानाची भ्रांती दूरकरून घ्यावी, असें माझें मत आहे. पूर्वीं मी ऐश्वर्याच्या मदानें गर्विष्ट झालों त्या पापाच्या योगानें ही दशा मला प्राप्त झाली त्यांतून माझी मुक्तता तूं केलीस हा मजवर मोठा उपकार झाला. आतां मी आपलें सर्व वर्तमान तुला सांगतों. एके दिवशीं मी विमाना मध्यें बसून संचार करीत होतों. देव, ऋषी, गंधर्व, यक्ष, राक्षस, हे मला करभार देत असत, ज्याकडे मी पहात असें त्याचें संपूर्ण तेज व बल मला प्राप्त होत असे. हजारों ब्राह्मण शिबिकेस लाऊन मी जात असतां कोणे एके दिवशीं अगस्त्य ऋषीस शिबिकेस लाऊन पादस्पर्श करीत भाषण केलें कीं, सर्प सर्प ह्मणजे लोकर चला. असें ऐकून महर्षीनीं मला शाप दिला त्या योगानें तत्काल मला सर्प योनी प्राप्त झाली आणि विमाना पासून पृथ्वीवर पडत आहें तों- शापा पासून मुक्त होण्याची प्रार्थना केली तेव्हां मुनी बोलले कीं, युधिष्ठिर तुला या शापा पासून मुक्त करील तेणें करून तूं निःपाप होऊन स्वर्गीं वास करशील. असें ऋषीनें भाषण ऐकून मला बहुत विस्मय जाहला आणि तुझी मार्गप्रतीक्षा करीत यावनीं बसलों इतक्यांत तूं येऊन ब्रम्ह व ब्राह्मण यां विषयीं यथार्थ ज्ञान मला सांगोन सत्य, तप, दम, दान, अहिंसा, धर्म हींच पुरुषास साधक आहेत असा उपदेश केलास तेव्हां पासून माझ्या संशयाची निवृत्ति जाहली. आतां मी भीमसेनास सोडितों आणि स्वर्गास जातों. असें सर्प भाषण करून नंतर पूर्वींचें नहुषाचें दिव्यरूप धरून विमानांत बसला आणि स्वर्गीं गेला. इकडे भीमसेना सहवर्तमान युधिष्ठिरानें आपल्या आश्रमीं येऊन संपूर्ण ब्राह्मणांस-

झालेलें वर्तमान सांगितलें, त्याकालीं संपूर्ण द्विजानीं व अर्जुनानें भीमसेनास सांगितलें कीं, असें पुनः क्रूरकर्म करूं नको. हा चमत्कार धर्मराजाचे मुखापासून श्रवण करतांच संपूर्णांस परम हर्ष झाला. अ. वि. या अ. आहे.

१८२ अध्याय एकशें ब्यायशीं:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, ग्रीष्मऋतु अतिक्रांत झाल्यानंतर वर्षाऋतु आला असतां आकाशामध्यें मेघाच्या गर्जना होऊन त्याच्या छायेनें आकाश व दिशा आच्छादित झाल्या, रात्रंदिवस पर्जन्याच्या धारा सतत पडूं लागल्या, आकाशांत सूर्याची कांती कमी होऊन विद्युत प्रभेचें प्राबल्य झालें, समग्र पृथ्वी कोमल तृणानीं अंकुरित होऊन जिकडे तिकडे बेडुक व सर्प यांचा उद्भव झाला. तृण व जल यांच्या योगानें पृथ्वीच्या उच्च निच स्थलाविषयीं भ्रांती होऊं लागली, संपूर्ण नद्या जलानें परिपूरित होऊन जिकडे तिकडे पाणी फुटल्यामुळें संपूर्ण वन व्याप्त जाहालें. अशा सुशोभीत वनामध्यें कोकिल व मयुर यांचे नाना प्रकारचे मंजुल शब्द श्रवणांत येऊं लागले. नंतर शरदृतु आला तेव्हां संपूर्ण सरोवरें क्रौंच व हंस इत्यादि पक्ष्यानीं व्याप्त जाहालीं. सरस्वती नदी पुण्य जलाच्या योगानें बहुतच सुशोभित जाहाली. या प्रकारें समग्र पांडव द्वैत वनीं रहात असतां कार्तिकमास आला तेव्हां ऋषीं सहवर्तमान त्या वनाचा त्याग करून काम्यक वनीं गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१८३ अध्याय एकशें त्र्यायशीं:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पुरोहित, ऋषी, भ्राते व कृष्णा यां सहवर्तमान धर्मराज काम्यक वनीं जात असतां शतशः ब्राह्मण धर्मराजाच्या दर्शनाकरितां येऊन त्याचा सत्कार करूं लागले, त्यांतील कोणी एक ब्राह्मण अर्जुनाचा जो परम सखा तो धर्मराजास बोलला हे युधिष्ठिर राजा, भगवान् श्रीकृष्ण तुझ्या दर्शनाची आकांक्षा करीत बसला आहे तो लौकरच तेथें येईल व चिरंजीवी महातपस्वी जो मार्कंडेय ऋषी तोही तुमच्या दर्शनाकरितां लौकर येईल. इतकें भाषण चाललें आहे तों अकस्मात् शैब्य व सुग्रीव नामक अश्वानीं युक्त जो रथ त्यामध्यें स्थित होऊन श्रीकृष्ण सत्यभामे सहवर्तमान धर्मराजाच्या दर्शनाकरितां आले. हें पाहून धर्मराजानें कृष्णाची पूजा केली, श्रीकृष्णानें धर्मराज

भीमसेन यांस नमस्कार करून अर्जुनास आलिंगन दिलें आणि द्रौपदी
चें शांतवन केलें. नंतर सत्यभामा व द्रौपदी आलिंगन देऊन परस्पर बहु
त हर्षित झाल्या. कृष्ण व पार्थ एकत्र बसून मागील गाथा एकमेकास सांग
त असतां अर्जुनानें वनाच्या ठायीं झालेली वर्तमानें कृष्णास सांगून अ
भिमन्यु सह वर्तमान सुभद्रा कुशल आहेना ह्मणोन प्रश्न केला तेव्हां श्री-
कृष्ण सुभद्रेचें कुशलवर्तमान अर्जुनास सांगून धर्मराजास बोलतात हे पां
डवा, राज्याच्या प्राप्ती करितां तूं तप आचरलेंस, सत्य आर्जव व स्वधर्म यांच्या यो
गें परलोक ही जिंकिलास. धनुर्विद्या अधित केलीस, क्षात्रविधीनें द्रव्यें व नाना-
प्रकारचे क्रतु संपादन केलेस, ग्राम्य धर्माच्या ठायीं रति धरिली नाहींस, अर्थ
लोभास्तव स्वधर्माचा त्यागही केला नाहींस. दानादिकांचे ठायीं निरंतर प्री-
ती करतोस. ज्याकाळीं कौरवांनीं सकल जन समुदाय सभेच्या ठायीं स्थित-
असतां द्रौपदीस धरून वस्त्रादिकांचें हरण केलें, तें दुष्कर कर्म पाहून तूं क्ष
मा केलीस तस्मात् असा क्षमावान पुरुष कोणी पाहिला नाहीं. आतां मला अ
सें वाटतें कीं, लौकरच तुझे मनोरथ पूर्ण होऊन तूं पृथ्वीचें पालन करशील, आ
पल्या प्रतिज्ञेचा काल ही समाप्त दर्शास आला आहे. असें बोलून युधिष्ठिर;
भीमसेन, नकुल, सहदेव, धौम्य व द्रौपदी यांजकडे पाहून बोलले कीं, दैवयो
गें अर्जुन कृतास्त्र होऊन लौकर तुह्मांस भेटला ही गोष्ट फार उत्तम झाली.
असें प्रथम भाषण करून पुनः द्रौपदीस बोलले हे याज्ञसेनी, तुझे संपूर्ण-
शिशु सुहृदांसह वर्तमान कुशल आहेत. यज्ञसेन व मातुल याणी आपले
गृहीं तुझ्या मुलांस बोलाविलें असतां तेथें जाण्याची इच्छा न करितां विद्या-
भ्यासाच्या उद्देशानें ते सुखें करून द्वारकेंत राहातात. ते आपल्या तेजानें दे-
वांशींही स्पर्धा करण्यास समर्थ आहेत. जसें यापुत्राचें वर्तमान व गुण ऐकि-
ण्यास तूं इच्छितेस तशीच कुंती व सुभद्रा त्या इच्छितात. तुझ्या प्रत्येक पुत्रा-
स क्रीडे करितां रथाश्व, गज यांची योजना केली आहे. असें वर्तमान द्रौपदीस
सांगून पुनः धर्मराजास बोलले हे कौंतेया, दशार्ह देशामध्यें कुकुर, अंधक
इत्यादि राजे तुमच्या आज्ञेंत निरंतर राहातात यास्तव तुमची इच्छा असेल तर
त्या देशांत रहा. पापबुद्धी दुर्योधन तुमचा छल करण्याकरितां सैन्य घेऊन

येणार आहे तर तूं त्या सहवर्तमान कांहीं कलह करूं नको. सभेच्या गायीं जी प्रतिज्ञा केलीस ती सिद्ध झाल्यावर त्या सहवर्तमान पश्चात कलह करण्यास चिंता नाहीं. असें ऐकून धर्मराज भाषण करतो हे देवा, आमचीं सर्वकार्यें तुह्मीं च करणारे आहांत. असें नाना प्रकारें धर्मराज व कृष्ण यांचें संभाषण चाललें आहे इतक्यांत मार्कंडेय ऋषी तेथें आले. त्याकालीं संपूर्ण ब्राह्मणानीं मार्कंडेय ऋषी बहुत वृद्ध असतां पंचवीस वर्षांचा पाहून यथानुक्रमें पूजा केली नंतर ब्राह्मणांच्या अनुमतानें धर्मराज व कृष्ण याणी ऋषीची उत्तम प्रकारें पूजा करून श्रीकृष्ण ऋषीस बोलले हे ऋषे, हे पांडव, समग्र ब्राह्मण, द्रौपदी, सत्यभामा, व मी तुमच्या मुखा पासून पुरातन अनादि राजे, स्त्रिया व ऋषी यांच्या कथा ऐकण्याची इच्छा करितों यास्तव त्या सांगाव्या. असें कृष्णानें भाषण केलें असतां त्रिलोकीं पर्यटन करणारे नारदऋषी धर्मराजाच्या सन्निध येतांच राजानें पाद्य अर्घ्य समर्पण करून त्यांस आसनीं बसविलें. नंतर नारद मार्कंडेय ऋषीस पाहून बोलले हे ऋषे उपयुक्त ज्या कथा असतील त्या ऐकण्यास धर्मराज व ब्राह्मण उत्सुक आहेत यास्तव कृपाकरून सांगा. असें ऐकून मार्कंडेय ऋषी समग्र ऋषींची प्रार्थना करून पश्चात् कथा सांगण्यास प्रवृत्त जाहले. हें पाहून धर्मराज बोलले हे ऋषे, तुह्मीं दैत्य, ऋषी व राजऋषि इत्यादिकांचें भवितव्य जाणणारे अहांत ह्मणोन तुह्मांस मी प्रश्न करितों कीं, मी धर्मानें चालत असून सुख भ्रष्ट झालों व हे धार्तराष्ट्र अधर्माचरणी सुख पावतात यास्तव या जन्मीं केलेल्या शुभाशुभ कर्मांचें फल येथें प्राप्त होतें किंवा परलोकीं प्राप्त होतें हें मला सांग. असें ऐकून मार्कंडेय भाषण करतात हे राजा, ब्रह्मदेवानें ज्या प्राण्यांस निर्मल शुद्ध शरीरें प्रथम उत्पन्न केलीं त्यानीं केलेल्या फलाचे संकल्प व्यर्थ होत नाहींत व ते सत्यवादी व्रती असल्यामुळें देवां सहित स्वच्छंदानें आकाशीं मार्गें संचार करतात. मग तेच या पृथ्वीवर संसर्गदोषानें काम क्रोधादिकानीं तिरस्कृत होऊन पाप कर्म करतात त्या योगानें, पशुपक्ष्यादि तिर्यक योनी त्यांस प्राप्त होऊन ते नरकास पात्र होतात. हे राजा, आयुष्याच्या समाप्ती अंतीं त्या शरीराचा त्याग करून एक कालींच दुसऱ्या शरीरामध्यें तो प्राणी जातो त्याचें कर्म छाये प्रमाणें त्याच्या पा

ठीं मागें जातें. तें कर्म सुखकारक अथवा दुःखकारक असो भोगणें प्राप्त आहे. तस्मात् प्रारब्धें करून केल्या कर्माचें फल भोगणें प्राप्त होतें हे राजा, ही ज्ञानहीनाची गती तुला सांगितली. पुढें ज्ञान्याची गती सांगतों. जे तपादिकानीं संपन्न असून गुरूची सेवा करितात ते शुद्ध योनींत जाऊन निरुपद्रव असतात आणि गर्भांत असतांही ज्ञान दृष्टीनें जीव व ईश्वर यांचें स्वरूप जाणतात आणि कर्मभूमीस येऊन पुनः स्वर्गलोकीं जातात. याविषयीं एक उदाहरण सांगतों. ज्यास इहलोकीं सुख नाहीं त्यास परलोकीं सुख असतें ज्यास इहलोकीं सुख असतें त्यास परलोकीं सुख नसतें. जे धन व अलंकार यानीं आपला देह भूषित करून निरंतर संपत्तीमध्यें रममाण असतात त्यांस इहलोकीं मात्र सुख असतें परलोकीं सुख नाहीं. जे कोणी योगी, तपस्वी दानशील, अध्ययन करणारे असे असतात, त्यांस इहलोकीं दुःख असतें, परंतु परलोकीं बहुत सुख प्राप्त होतें. जे कोणी धर्माचरण करून द्रव्य संपादन करतात तसेंच संसार करून यज्ञयागादि क्रिया करतात त्यांस इहलोकीं व परलोकीं सुख प्राप्त होतें. ज्यांस विद्या तप कांहींच नाहीं जे केवल सुखामध्यें राहातात त्यांस इहलोक नाहीं आणि परलोकही नाहीं. जे तपस्या व लोकांवर दया करतात, देव, ऋषि यांस तृप्त करतात त्यांस स्वर्ग प्राप्त होतो. हे धर्मराजा, यांतील सारांश पाहून जें तुला प्रस्तुत दुःख होतें याविषयीं मनांत कांहीं दुःख वाळगूं नको. असा विषय या अध्यायांत आहे.

१८४ अध्याय एकशें चवऱ्यायशीं:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, असें मार्कंडेय ऋषीचें वाक्य ऐकून धर्मराज बोलतो हे ऋषे, आतां ब्राह्मणाचें माहात्म्य सांगावें. असें ऐकून मार्कंडेय ऋषी ह्मणतात हे राजा, हयांची कुलवृद्धी करणारा, कुमारअवस्थेमध्यें कोणे एके दिवशीं मृगया करण्याकरितां वनांत गेला असतां त्या वनीं कृष्णाजिन धारण करून एक मुनी बसला होता. राजास हा कोणी एक मृग आहे अशी भ्रांती होऊन बाण योगें करून त्यानें त्याचा प्राण घेतला. पुढें शोध करतां करतां हा ऋषी आहे असें समजतांच राजास शोक उत्पन्न होऊन तो स्वदेशीं माघारा आला आणि

आपल्या कुलोद्भव जे वृद्ध पुरूष होते यांस त्यानें आपलें दुष्टकर्म सांगित लें. नंतर हा मुनि कोणीकोडें राहातो याचा शोध करण्या करितां हय हय कुलां तले समग्र लोक निघाले. जातां जातां तार्क्ष्यनामक ऋषीच्या आश्रमीं जाऊ न हय हयानीं ब्राह्मणां हिंसा रूप अपराध ऋषीस सांगतांच ऋषी बोलले कीं. तुह्मीं ज्या ब्राह्मणाची हिंसा केली त तो कोण त्याचें स्थल कोणतें त्याचा पुनः शोध करा. असें ऐकून हय हयानीं त्याचा बहुत शोध केला असतां कोठें ठि काण लागला नाहीं ह्मणोन ते लज्जित होऊन पुनः ऋषीच्या आश्रमीं आ ले तेव्हां तार्क्ष्य ऋषी ह्मणोलागले कीं, हे क्षत्रिय हो ज्याची तुह्मीं हिंसा के ली न तोच हाका? हा तर माझा पुत्र आहे. असें ह्मणोन त्याजकडे ऋषीनीं हा त दारवविला तेव्हां राजा ह्मणतो कीं, याचीच मी हिंसा केली होती, परंतु पुनः हा जिवंत होऊन आश्रमीं आला. हें राजास आश्चर्य वाटून तो तार्क्ष्यास ह्म णाला हे ऋषे, ज्याचा वध मी केला तोच हा मुनी ओळखला, परंतु हा सजीव हो ऊन यास्थलीं कसा आला? असें याचें तपोबल विलक्षण काय आहे तें आह्मां स सांगा. असें ऐकून ऋषी बोलतात हे नृपहो, आह्मांस मृत्यूचें भय नाहीं या चें कारण आह्मीं निरंतर सत्यानें वागतों, अनृता विषयीं आमचें मन तिकडे अ गदीं जात नाहीं, स्वधर्मानुष्टान निरंतर करून कालक्षेप करतों. आमचे हातून दुष्ट कर्म कधींही घडत नाहीं. अतिथी आला असतां यथा शक्त्य त्यास संतुष्ट क रतों, आपल्या पुत्र दारा दिकांस अन्न वस्त्रा करितां कधींही दुःख देत नाहीं, स मग्रांचें भोजन झाल्यावर शेवटीं आह्मीं शेषान्न भक्षण करतों आणि क्षमादि क धारण करून पुण्य देशांत राहातों यास्तव मृत्यूचें भय आह्मांस कोठून हो णार, तुह्मांस हें जें दुःख झालें त्याचा निर्भय पणें तुह्मीं त्याग करून स्वस्त आ पले देशीं जा. पापाचा लेश तुह्मांकडे अगदीं नाहीं. हा मरण पावला अशी भ्रां ती व्यर्थ तुह्मास जाहाली होती तिचा त्याग करा. असें ऐकून सर्व ऋषींची उत्त म प्रकारें पूजा करून हर्षानें स्वदेशीं आले. असा विषय या अध्यायांत आहे.

१८५ अध्याय एकशें पंच्यायशी— वैशंपायन सांगतात हे जनमे जया, मार्कंडेय ऋषी पुनः धर्म राजास ब्राह्मण माहात्म्य वर्णन करण्या विष यीं एक कथा सांगतात हे धर्मराजा, वैन्य नामक राज ऋषी अश्वमेधाक

रितां दिक्षित झाला होता. त्या राजाकडे अत्रिनामक ऋषीनीं द्रव्याच्या याञ्चे करितां येण्या विषयीं बुद्धी धरिली होती; परंतु पुढें ऋषीनीं विचार केला कीं, द्रव्याची याञ्चा न करितां वनामध्यें जावें. अशा तात्पर्यानें आपले पुत्रास व भार्येस हांक मारून सांगितलें कीं, मी आतां अरण्यांत जातों हें मला चांगलें वाटतें. असें ऐकून भार्या बोलली हे ऋषे, तुह्मीं वैन्य नामक राजाकडे जाऊन बहुत द्रव्याची याञ्चा करा, याचकास तो धन देत असतो तें धन तुह्मीं घेऊन भृत्यदारा व पुत्र यांस वांटून देऊन नंतर इच्छा असेल तर यथेच्छ वनीं जा. असें ऐकून ऋषी बोलले हे स्त्रिये, धर्मार्थ युक्त सत्यव्रती जाणणारा वैन्य राजा आहे खरा असें मला गौतमानी ही सांगितलें होतें, परंतु माझ्याशीं द्वेष करणारे ब्राह्मण त्या राजं सभेंत पुष्कळ आहेत मी तेथें जाऊन द्रव्याची याञ्चा केली असतां ते कार्य सिद्धी होऊं देणार नाहींत; परंतु जर तुझी इच्छा असेल तर राजसभेंत जातों आणि द्रव्याची याञ्चा करतों. असें भार्येशीं भाषण करून अत्रिऋषी राजसभेस गेला आणि तेथें जाऊन मंगल कारक वाक्यानीं राजाचा असा स्तव करूं लागकीं, हे राजा तूं धन्य आहेस. ह्या पृथ्वीवर तुझी कीर्ती बहुत ऋषी गायन करितात. इतकें अत्रीचें भाषण ऐकून गौतम ऋषी बोलला हे ऋषे, तूं या राजाची अशी प्रशंसा करूं नको कारण संपूर्णाच्या अगोदर प्रजापती ब्रह्मदेव व महेंद्र आहेत, तूं तर राजाचें वर्णन करतोस कीं समग्रांचा आदि तूं आहेस ते व्हां हें तुझें भाषण केवल अज्ञाना सारखें दिसतें. असें ऐकून अत्रि भाषण करतो हे गौतमा, हाच राजा आमचा विधाता, इंद्र व प्रजापती होय. तूंच अज्ञाना सारखें भाषण करतोस, तुला मोह उत्पन्न झाला आहे. असें ऐकून गौतम बोलतो हे ऋषे, संपूर्ण मी जाणतों मला मोह अगदीं नाहीं तूं राज दर्शनेच्छु आहेस ह्मणोन या सभेंत राजाची पाहिजे तशी स्तुती करितोस; परंतु धर्म कांहीं जाणत नाहींस असा वाद त्या सभेंत गौतम व अत्रि यांचा होत असतां संपूर्ण सभासद, ऋषी उच्चस्वरें ह्मणो लागले कीं, हे भांडणारे कोण आहेत ? यांस सभेंत कोणी येऊं दिलें इतक्यांत काश्यप ऋषीनीं ही असेंच भाषण केलें असतां गौतम ऋषी बोलला हे सभासद हो, आमचा एक तुह्मांस प्रश्न आहे ह्या

अत्रिऋषि वैन्यास ब्रह्मदेव ह्मणतो आणि मी नाहीं ह्मणतों तेव्हां हा संशय कोणास झाला याचा न्याय तुह्मीं करा.असें ऐकून संपूर्ण ऋषी सनत्कुमाराकडे गेले आणि त्यानीं त्यांस हा प्रश्न केला असतां सनत्कुमार बोलले हे ऋषी हो, जसे अग्नि आणि वायु एकत्र होऊन संपूर्ण वनाचा दाह करतात तसें ब्रह्मतेज आणि क्षत्रिय तेज एकत्र होऊन शत्रूचा नाश करतें.संपूर्ण प्रजेचा संरक्षक व धर्मोत्पादक राजा आहे,राजाजर नसेल तर प्रजा आप आपल्या कर्माचा त्याग करून यथेच्छाचार करतील यास्तव संपूर्णांस आदिकारण राजा होय ह्मणोन त्याची धाता विधाता इत्यादि शब्दानें स्तुती करणें योग्य आहे.अशी स्तुती केली असतां राजा संतुष्ट होऊन कोणाची पूजा करणार नाहीं? धर्मार्थी पुरुषानें निर्गुणीजरी राजा आहे तथापि गुणाचा आरोप करून स्तुती करावी आणि आपलें कार्य साधून घ्यावें याविषयीं माझें मत पूर्ण आहे.पूर्वीं साक्षात् विष्णूनीं धर्माची वृद्धी व्हावी ह्मणोन क्षत्रियत्वाचा अंगिकार केला.व संपूर्ण ऋषीनीं ही अधर्माच्या भयानें क्षत्रिय बलाचा अंगिकार केला.तात्पर्य राजाला संपूर्ण लोकापेक्षां प्राधान्य वर्णिलें आहे याविषयीं अत्रीचें मत सप्रमाण दिसतें.असें ऐकून राजा संतुष्ट झाला आणि अत्रीस ह्मणतो हे ऋषे, संपूर्ण जगतामध्यें तूं वेद प्रमाणानें मला श्रेष्ठ वर्णिलें स तेणेंकरून मी संतुष्ट झालों यास्तव तुला नाना प्रकारचीं द्रव्यें,सहस्र धेनु,सुवर्णानीं अलंकृत केलेल्या सहस्र दासी व दाहा कोटी हिरण्य इतकें द्रव्य देतों ग्रहण कर.असें ह्मणोन राजानें ऋषीस त्या प्रमाणें समर्पण केलें.ऋषीनींही सत्कार करून वैन्यराजाचें द्रव्य घेतलें आणि स्वगृहीं जाऊन पुत्रदारा इत्यादिकांस तें द्रव्य देऊन तपाचरण करण्याकरितां वनांत गमन केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१८६ अध्याय एकशें शायशीं— मार्कंडेय भाषण करतात हे धर्मराजा,पूर्वीं तार्क्ष्य ऋषीनीं सरस्वतीस कांहीं एक प्रश्न केला त्याचें उत्तर सरस्वतीनें दिलें तो संवाद तुला मी सांगतो श्रवण कर.तार्क्ष्यऋषीप्रश्न करितात हे सरस्वती,कोणतें कर्म आचरण केलें असतां स्वधर्मापासून पुरुष

भ्रष्ट होणार नाहीं? अग्नीचे ठायीं हवन कसें करावें? पूजा कोणचे काळीं क
शी करावी व स्वधर्माचरणानें फल काय हें संपूर्ण मला सांग. असा प्रश्न ऐ
कून सरस्वती उत्तर देते. जो निरंतर वेदाध्ययन करीत शुची होऊन सावध
पणानें ब्रह्म ज्ञानास पाऊन दान करतो तो पुरुष उत्तम लोकीं देवांसह वर्त
मान सुखानें राहातो. ज्या लोकीं असे पुण्यशील पुरुष राहातात तो लोक
फार उत्तम वर्णनीय आहे, तेथें सुपुष्पीत जाहलेल्या कर्दम रहित पुष्क
रणी हजारों आहेत त्यामध्यें हिरण्यमय कमलाची शोभा फारच उत्तम री
तीची आहे. त्या तीरीं पुण्यशील पुरुष आसनीं बसले असतां नूतन तरु
णी अपसरा नाना प्रकारचे अलंकार धारण करून अग्रभागीं निरंतर-
गायनानें पुरुषास अखंडित सुख उत्पन्न करतात. वृषभ दान करणारे सू
र्यलोकीं, वस्त्र दान करणारे चंद्रलोकीं वास करतात, सुवर्ण दान करणारे
साक्षात अमरच होतात, सवत्छा धेनु नूतन वयाची, बहु दुग्ध देणारी, अ
लंकारा सहित जे दान करतात त्यांस जितके गाईचे अंगावर रोमांच असती
ल तितके वर्षे पर्यंत देव लोकीं वास घडतो. दृढतर नांगर ओढणारा तरुण
असा एक बैल दान केला असतां त्यास दाहा धेनु दान करणाराचा जो लोक तो
प्राप्त होतो. जो कपिला धेनु वस्त्रालंकार व कांस्य पात्रा सहित दान करतो
त्यास ती धेनु पाहिजे तें देते व पुत्र पौत्रादि सप्तपिढ्यांचा उद्धार करते. तिल
धेनु दक्षणा सहित जो देतो त्यास वसु लोकाची प्राप्ती होते. जो कामक्रोधादि
कानें तीव्र अंधःकार रूप नरकाचे ठायीं पतीत जरी असला तथापि तो गोदा
नानें मुक्त होतो. जो कोणी सालंकृत कन्यादान व भूमी दान ब्राह्मणा कार-
णें करतो व नाना प्रकारचीं दुसरीं अनेक दानें विधि पूर्वक करतो त्यास पुरं
दर लोकाची प्राप्ती होते. जो सात वर्षे पर्यंत नियमें करून साधु वृत्ती व अ
ग्निहोत्र धारण करून अग्नीचे ठायीं होम द्रव्याचा होम करतो तो आपलेस
प्त वंश पूर्वीचे व सप्त वंश उत्तरचे पवित्र करतो. असें सरस्वतीचें भाषण ऐ-
कून तार्क्ष्य बोलतात हे देवी, अनादि जो अग्निहोत्र विधि याचा कोणत्या री
तीनें स्वीकार करावा व आपल्या शरीराची शुद्धता करून होमादि विधि क
से करावे? असें ऐकून सरस्वती बोलते हे ऋषे, अशुची अधम अज्ञानी

असतां जो अग्निहोत्र धारण करून होमादिक्रिया करील त्याजपासून फल उत्पन्न होणार नाहीं, कारण अग्नीचे ठायीं होमद्रव्य अर्पण केलें असतां त्याजपासून अमृत उत्पन्न होतें आणि त्याचें भक्षण देव करून स्वर्गी राहातात जर अशक्ती व मूर्ख याणी अग्नीचे ठायीं होमद्रव्याचा त्याग केला असतां त्याजपासून अमृत उत्पन्न होत नाहीं आणि देव नाही संतुष्ट होत-नाहींत येवढ्या करितां देवादिकांस हव्यदान कर्तव्य असेल तेथें अश्रोत्री याची योजना करूं नये केली असतां संपूर्ण कर्म व्यर्थ होतें. हे तार्क्ष्या, असा त्या अग्निहोत्राचा महिमा होय. जो निर्द्रव्य असतां श्रद्धेनें अग्निहोत्र धारण करून होमादिक्रिया करतो त्यास पवित्र पुण्यकारक जो गोलोक तो प्राप्त होतो. असें सरस्वतीचें भाषण ऐकून तार्क्ष्य बोलतो हे देवी, संपूर्णांचीं अंतःकरणें जाणणारी अशी तूं कोण आहेस व तुझा वास निरंतर कोठें असतो हें संपूर्ण मला सांग. असें ऐकून सरस्वती बोलत्ये हे ऋषे, जे जे ब्राह्मणास कर्माविषयीं संशय आले आहेत त्यांचें छेदन करण्याकरितां अग्निहोत्ररूप कर्मापासून विद्यारूप सरस्वती मी उत्पन्न झाल्यें आणि सगुण ब्रह्मविद्येची उपासना करावी ह्मणोन मी सांगत्यें. कारण श्रद्धावान जो अग्नीचा उपासक अग्निहोत्री, यास देवतेचा प्रसाद होऊन ज्ञान प्राप्ती द्वारा मोक्ष होतो असें माझें मत आहे. असें ऐकून तार्क्ष्य भाषण करतो हे देवी, तुझ्यासारखी मी कधीं पाहिली नाहीं माझी साक्षात् तूंच आहेस, रूप, दिव्य कांती व प्रज्ञा यानें तूं निरंतर धारण करतेस. असें ऐकून सरस्वती बोलत्ये हे ऋषे, मी यज्ञाच्या ठायीं निरंतर असतें. स्वाहा, स्वधा, क्रतु, औषधी, मंत्र, आज्य, अग्नि, हीं सर्व माझींच स्वरूपें आहेत यज्ञाच्या ठायीं समिधा पात्रें इत्यादि जे पदार्थ तेही मीच आहें, प्रज्ञा द्वारा संपूर्णांस मीच मुक्ती देतें असें जाण. असें ऐकून तार्क्ष्य ह्मणतो हे देवी, स्वप्रज्ञा द्वारा संपूर्ण ऋषीनीं पूर्वोक्त तुझें स्वरूप जाणलें असतां त्यांस काय प्राप्त होतें? असें ऐकून सरस्वती भाषण करते हे ऋषे,- जे वेदवेत्ते ईश्वरास अनन्यभावें शरण गेले ते पुण्यकारक ज्यानें तप, धनाविषयीं जे निःस्पृह, वेद पठण करणारे त्यांसच या स्वरूपाचें ज्ञान

होऊन ते जन्म मरणापासून मुक्त होतात. जो चिदात्मा, ह्यानें बीजरूप ब्रह्मांड याजपासून नाना प्रकारच्या वासनारूप नद्या उत्पन्न होतात, मग ज्यांतर कर्म संबंधाच्या योगानें नदी प्रवाहांत शरीर प्राप्त झालें असतां पुण्य पापाच्या तारतम्यें करून तसतशा योनी सुख दुःखात्मक प्राप्त होतात अशी अनादि सरणी आहे. हे ऋषे, माझ्या भाषणाचें तात्पर्य इतकेंच कीं, मरुद्गणां सह वर्तमान इंद्रादि देव अग्नीचे ठायीं हविर्भाग समर्पण करून ज्या श्रेष्ठ पदास प्राप्त जाहाले तें माझें स्थान असें जाण. असा विषय या अध्यायांत आहे.

१८७ अध्याय एकशें सत्यायशी.— वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, पुनः धर्मराज मार्कंडेय ऋषीस बोलतो हे ऋषे, वैवस्वत मनूचें चरित्र मला सांग. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय ऋषी सांगतात हे राजा, सूर्याचा पुत्र मनु मोठा प्रतापी व महान तेजस्वी असा होता. आपल्या तेजें व लक्ष्मीच्या भाषणें करून ब्रह्मादि देवांची अवगणना करीत त्यानें बद्रिकावनीं एक पायावर उभें राहून परम तीव्र तप केलें. चीर वल्कलें व जटा इत्यादिकानें धारण करून दहा हजार वर्षे पर्यंत चीरिणी नामक नदीच्या तीरीं तो तपस्या करीत असतां एके दिवशीं मत्स्य, जलांत असतां मनूस बोलला हे राजा, महान् महान् बलवान् मत्स्या पासून मला भय फार झालें माझें भक्षण करण्यास ते येतात यास्तव त्यांज पासून माझें संरक्षण कर. असें ऐकून राजानें मत्स्यास धरून अलिंजर नामक पात्रामध्यें ठेविलें असतां तो मत्स्य वृद्धी प्रत पावला आणि मनूस बोलला हे राजा, हें पात्र मला स्थिती करितां लहान जाहालें यांतून काढून दुसऱ्या स्थळीं ठेव. असें ऐकून राजानें त्या मत्स्यास दोन योजनें लांब एक कूप होता त्यामध्यें नेऊन ठेविलें. तेथें ही मत्स्य वृद्धी प्रत पाऊन समग्र कूप भरून गेला. त्याकालीं पुनः मत्स्य, राजास बोलला कीं, या कूपांतून काढून मला गंगेंत नेऊन ठेव. असें ऐकून राजानें मत्स्यास गंगेंत नेऊन ठेविला. कांहीं दिवसानीं तेथें ही तो वृद्धीस पावून मनूस ह्मणो लागला कीं, हे राजा, ज्यास्थळीं यथेच्छ आहार व यथेच्छ राहण्यास स्थळ मिळेल असा जो

समुद्र यामध्यें नेऊन माझा प्रक्षेप कर ह्मणजे सुखानें मी तेथें राहीन अ
सें एकून राजानें तत्काल मत्स्यास नेऊन समुद्रांत ठेवितांच मत्स्यास बहुत
आनंद होऊन तो राजास ह्मणाला कीं, हे राजा, तूं माझें उत्तम प्रकारें यथाका
लीं संरक्षण केलेंस आतां तुझें कांहीं तरी हित केलें पाहिजे यास्तव तुला अ
सें सूचवितों कीं, लौकरच या स्थावर जंगम सृष्टीचा संव्हार काल येणार-
आहे. स्थावर जंगम प्राणी लौकरच नाश पावणार. असा भयंकर काल-
येण्याचे पूर्वीं तूं मोठी एक नौका कर आणि तीस बांधण्या करितां मोठमो
ठ्या दोऱ्या आंत ठेव. नंतर सप्तऋषीं सहवर्तमान तूं या नौकेमध्यें आरो
हण करून नौका समुद्रामध्यें स्थापन कर. त्याकालीं तुला प्रलय येण्याक
रितां मी आपलें हें महत स्वरूप दाखवीन आणि मला एक शृंग तूं पहा
शील अशा प्रलय कालीं माझ्या वांचून तुला तारणारा कोणी नाहीं असें-
तूं पूर्ण जाण. असें परस्पर भाषण करून आप आपले स्थलीं गेले. पु
ढें कांहीं कालानंतर प्रलय समय येणार असें जाणोन राजा एक नौ-
का सिद्ध करून समुद्रांत गेला आणि ज्या शृंगी मत्स्यानें आपल्याशीं सं
भाषण केलें त्याची मार्गप्रतीक्षा सप्तऋषीं सहवर्तमान करीत बसला इ
तक्यांत संपूर्ण पृथ्वींतील स्थावर जंगमात्मक प्राण्यांचा नाश होऊन-
चोहीं कडे जलमय जाहालें त्याकालीं समुद्रास मोठमोठ्या लहरी येऊ
न नौका बुडते असें मनूस वाटूं लागलें. इतक्यांत शृंग धारण केलेला
पूर्वींचा एक मत्स्य समुद्रांतून मनूस ह्मणाला हे राजा, हे रज्जू आपले-
हस्तांत धरून माझ्या शृंगास ही नौका बांध ह्मणजे बुडणार नाहीं. असें
ऐकून राजानें तसें केलें नंतर तशा त्या भयंकर सागरांतून मोठा धायूस
टला असतां तो मत्स्य निर्भयपणें नौका घेऊन चालला त्याकालीं आ
काश व दिशा यांचा नाश होऊन सप्तऋषी, मनु व मत्स्य इतके मात्र समु
द्रांत राहिले होते. अशीं हजारों वर्षें मनु राजाचीं त्या नौकेमध्यें अतिक्रां
त जाहालीं. कोणे एके कालीं मत्स्यानें नौका हिमालय पर्वताच्या सन्निध
नेली आणि ऋषीस सांगितलें कीं, आतां माझ्या शृंगाची रज्जू सोडून हि
मालयाच्या शृंगास बांधा. ऋषींनीं मत्स्याच्या भाषणा प्रमाणें तसें केलें.

त्या दिवसापासून हिमाचल पर्वताच्या एका शृंगाचें नाव नौबंधन झाहलें अद्याप आहे. पुढें मत्स्य, मनूस बोलला ज्यास प्रजापती ब्रह्मदेव ह्मणतात तेंच माझें स्वरूप. आतां हे राजा, स्थावर जंगमात्मक जें जगत नष्ट झालें त्याची उत्पत्ती तूं आपल्या तपयोगें कर, असा मी तुलां वर देतों. पूर्ववत प्रमाणें सृष्टी तुझ्या तपाच्या योगानें उत्पन्न होईल. असें मत्स्य भाषण करून तत्काल समुद्रांत अदृश्य झाला. नंतर मनुराजानें मोठें तप करून मत्स्याच्या आज्ञे प्रमाणें पूर्ववत समग्र सृष्टी उत्पन्न केली. मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, ही मत्स्याची पुरातन कथा तुला सांगितली त्याच्या योगानें संपूर्ण तुझें पाप हरण होईल. हें आख्यान जो श्रवण करील तो निरंतर सुखी होईल व त्याचे संपूर्ण मनोरथ पूर्ण होऊन शेवटीं तो स्वर्गलोकीं वास करील. असा विषय या अध्यायांत आहे.

१८८ अध्याय एकशें अठ्यायशी — धर्मराज ह्मणतात हे मार्कंडेय ऋषे, तुह्मीं एकट्यानें हजारों युगें पाहिलीं तुमच्या सारखा दीर्घायुषी ब्रह्मदेवाशिवाय दुसरा कोणी नसेल. अंतरिक्ष, पृथ्वी व स्थूल सूक्ष्म पदार्थ यांचा प्रलय कालीं नाश झाला असतां तुह्मींच एकाकीं अवशेष भूत होऊन राहातां. ब्रह्मदेव प्रबुद्ध होऊन पुनः सृष्टी करण्यास आरंभ करतो तेव्हां सर्वांच्या अनादि तुमची स्थिती आहेच वासनामय अंडज, जारज, स्वेदज, उद्भिज, इत्यादि च्यार प्रकारच्या सृष्टी यांचा प्रलयकालीं नाश होऊन जलाचा प्रादुर्भाव झाला असतां लोकगुरु जो ब्रह्मदेव याची उपासना तुह्मीं तप व समाधीच्या योगानें करतां हें ब्रह्मांड तुह्मीं ज्ञानाच्या व तपाच्या योगानें वश करून ब्रह्मदेवास अगदीं स्वाधीन केलांत अशा प्रलयकालीं भगवान नारायणाचें जें प्रसिद्ध स्थान याचे ठायीं तुह्मीं राहातां आणि आपल्या सुवर्णाकाररख्या दृष्टीनें संपूर्ण जगतोद्धारक जो भगवान यास निरंतर पाहातां ह्मणोन हे ऋषे, तुमचे ठायीं जरा आणि मृत्यु यांचा प्रवेश होत नाहीं ज्याकालीं सूर्य, अग्नी, वायु, चंद्र, अंतरिक्ष, स्थावर, जंगम, देव, असुर व उरग यांचा नाश होतो त्याकालीं एकार्णवी पृथ्वी होऊन भगवान् शेषावर शयन करतात तेव्हां नाभी कमलापासून उत्पन्न झालेला जो ब्रह्मदेव याचें दर्शन प्र-

थमता तुह्मांस होतें यास्तव हे ऋषे, ह्या संपूर्ण पदार्थांचा उत्पत्ती लय तुह्मां स ठाऊक आहे. अज्ञानाचा लेशही तुमचे गयीं राहात नाहीं ह्मणोन तुह्मां स असा प्रश्न करतों कीं, हें ब्रह्मांड कसें उत्पन्न होतें व याचा करता कोण? हें मला सांगा. असें धर्मराजाचें वाक्य ऐकून मार्कंडेय भाषण करतात हे राजा, अनादि पुराण शाश्वत सूक्ष्म निर्गुण असतां सगुण असा पितां बरधारी भगवान हाच संपूर्णांचा कर्ता, पोषक आणि संपूर्णांच्या अंतरया मीं राहणारा होय याचें अचिंत्य ऐश्वर्य पवित्र कारक आहे, यास जन्ममरण नाहीं व याचे आदि कोणी पुरुष झाला नाहीं हाच संपूर्णांचा आदी ह्मणोन याचें नांव अनादि असें आहे. समग्र जगत आपल्या इच्छा मात्रेंकरून उत्पन्न करतो; परंतु त्याचा संसर्गी होत नाहीं या पुरुषाचें ज्ञान साक्षात् आनादि जे वेद यांसही नाहीं. मग आपल्या सारख्यां शरीर धारणकरणाऱ्यास कोठून, असा ईश्वराचा अगाध महिमा आहे तेव्हां याचे उत्पत्तीचा व स्थितीचा ठिकाण आपल्या सारख्या प्राण्यास यथास्थित लागणें कठीण; परंतु स्थूल दृष्टीनें यत्किंचित् तुला जगत दृष्टीचा उपाय सांगतों. संपूर्ण जगत क्षीण झालें असतां कांहीं एक आधार परमाणु ह्मणोन गुप्त रूपें करून राहातो तो आधार कोणाचे दृष्टीस येत नाहीं मग ते परमाणु एकत्र मिळाले असतां त्यांच्या समूहा पासून पृथ्वीचा उद्भव होतो. नंतर पंचमहाभूतें एकत्र होऊन महत् अहंकार इत्यादिक साहा अनादि पदार्थांच्या योगानें शरीराची उत्पत्ती होते आणि त्यांत प्रविष्ट झालेला जो जीवात्मा तो नाना प्रकारचीं कर्में करूं लागतो. या उत्पत्तीच्या प्रारंभीं कृत, त्रेता, द्वापार आणि कली हीं च्यार युगें सत्व, रज, तम यांच्या न्यूनाधिकभावें करून ईश्वरानें कल्पिलीं आहेत. ज्या ज्या युगीं ज्या ज्या गुणाचें प्राबल्य असतें त्या त्या युगीं संपूर्ण लोक तसतशीं कर्में आचरण करतात- हीं युगें चार सहस्र झालीं असतां हिरण्यगर्भ जो ब्रह्मदेव याचा रात्र आणि दिवस एक काल होतो अशी ब्रह्मदेवाचीं शत वर्षे अतिक्रांत झालीं असतां पुनः ब्रह्मप्रलय होऊन पूर्वीं मी सांगितल्या प्रमाणें सृष्टीचा क्रम होतो. या च्यार युगांतलें जें शेवटील कलियुग याचा चरम काल प्राप्त जाहा

ला असतां दुराचार बहुत होतील. प्रायशः संपूर्ण लोक अनृतवादी हो-
तात. आपण कर्म करण्याची इच्छा न धरून दुसऱ्या पासून कर्म करवितील,
शूद्र ब्राह्मणाचें आचरण करणारे व ब्राह्मण शूद्राचें आचरण करणारे
असे होतील. ब्राह्मण क्षात्र वृत्ती आचरण करून यज्ञ स्वाध्याय दंड, अ-
जिन इत्यादिकांचा त्याग करून अभक्ष भक्षण्या विषयीं निरंतर इच्छाधा
रण करतील. कोणाच्याही मंत्राचा जप करणार नाहींत. शूद्र जप परायण हो
तील. असें संपूर्ण जगत् विपरीत आचरण करूं लागलें असतां हजारों म्ले
च्छादि राजे उत्पन्न होऊन संपूर्ण पृथ्वी व्याप्त करून धर्माचा उच्छेद कर
तील. आंध्र, शक, पुलिंद, यवन इत्यादिकांचें दिवसें दिवस बहुत प्राब
ल्य होईल. खोटें शासन, पाप कर्म व मिथ्या वाद यांची बहुत वृद्धी होई
ल, कोणी ही ब्राह्मण स्वधर्मानें उपजीवन करणार नाहींत. संपूर्ण प्राणी
अल्पायुषी व अल्पबल होऊन त्यांचीं शरीरेंही फार लहान होतील, व-
नामध्यें व्याघ्र व सर्प यांची वृद्धी होऊन संपूर्ण ग्राम व नगरें शून्य हो-
तील. संपूर्ण पदार्थमात्राची रुची व गंध यांचा नाश होईल. संपूर्ण प्रजे
ची वृद्धी होईल, प्राणिमात्रास अन्नाची चिंता बहुत होईल, विक्रय क-
रण्यास अयोग्य पदार्थ जे असतील त्यांचा विक्रय बहुत होईल. पती म-
रणोत्तर स्त्रिया केशांचें वपन न करितां दुष्ट कर्मानें उपजीविका करती-
ल आणि स्त्रियास भर्ता विद्यमान असतां त्याचा द्वेष करून मरणाचा
प्रयोग करतील संपूर्ण मार्गव्यभिचारिणी स्त्रियांनीं व्याप्त होतील, गाई-
स दुग्ध व वृक्षास फळ मूळें यांची न्यूनता होईल, वायस पक्ष्यांची वृद्धी व इत
र पक्ष्यांचा अभाव होईल. ब्राह्मण भिक्षेकरितां स्वधर्मत्याग करून देशोदे-
शीं फिरतील, राजाच्या करभार भयानें संपूर्ण प्रजा आप आपली वृत्ती टाकून
चौर्यकर्म करितील, कित्येक ब्राह्मण वाहेरून कपटयुक्त मुनीचें वेषधारण करू
न वाणिज्य इत्यादिक वृत्तीचा स्वीकार करतील, गुरुस्त्रीशीं गमन व सुरापा-
नादि पंचमहापातकें यांची वृद्धी होईल. ज्या ऋतु मध्यें ज्या पदार्थांची उत्पत्ती
व्हावयाची ती न होतां विपरीत काळीं होईल. यथा काळीं पर्जन्य न पडून धा
न्या दिकांचा अभाव होईल, हिंसा वृत्तीनें समग्र आप आपली उपजीविका

करतील. या प्रमाणें धर्माचा नाश होऊन अधर्माची वृद्धी उत्तरोत्तर वाढून जाईल. स्वल्प द्रव्य असलें तरी तितक्याच धनानें गर्विष्ठ होऊन यथेच्छ वर्ततील. ज्यावर विश्वास ठेवावा तोच घात करील. प्राणी मात्र लज्जेचा त्याग करून यथेच्छ विहार करतील. सात वर्षांच्या स्त्रियेचे ठायीं द्वादश वर्षांच्या पुरुषा पासून प्रजेची उत्पत्ती होईल. सोळा वर्षांमध्यें संपूर्ण केश पांढरे होतील. तरुण असतां वृद्धा सारखें सामर्थ्य त्या मनुष्यास होईल. पुरुष तरुण असल्यानंतर स्त्री वृद्ध व स्त्री तरुण असल्यानंतर पुरुष वृद्ध अशी विपरीत अवस्था होईल. स्व पतींचा त्याग करून इच्छिल्या पुरुषाशीं स्त्रिया रत होतील. हे धर्मराजा, अशा भयंकर कलियुगाच्या अंतीं सर्व प्राणि मात्राचें आयुष्य क्षीण जाहालें असतां वहुत वर्षें पर्यंत एका एकीं अनावृष्टी होईल आणि प्राणिमात्र क्षुधेनें पीडित होऊन मरण पावतील. नंतर थोडा पर्जन्य येऊन संपूर्ण पृथ्वी जलमय होईल. पुढें कांहीं दिवसांनीं सूर्याचे रश्मी वहुत संतप्त होऊन पृथ्वीचें जल शोषण करून राहिलेलें तृणकाष्ठादि भस्म करून टाकील. तदनंतर संवर्तक नामक अग्नि वायूच्या साह्यें करून पृथ्वीचा भेद करीत रसातलास भेद करून देव दानव गंधर्व यांचा नाश करील. हे देवासुर संपूर्ण लोक संवर्त नामक अग्नी त्या योगानें दग्ध झाले असतां पुढें राजा हे ती मेघ मोठे भयंकर कांहीं नील श्याम वर्णाचे. कांहीं पीत वर्णाचे आकाशांत उत्पन्न होऊन एकाएकीं घोर वृष्टी करून संपूर्ण लोक जलानें पूर्ण करून टाकतील, त्या योगानें भयंकर अग्नीचा नाश होईल. त्या कालीं समुद्र आपले मर्यादेचा त्याग करून पर्वत व वृक्ष यांतून जे अवशेष राहिले असतील ते हीन करील नंतर महान घोर वायु सुटेल. अग्नि, वायु व जल या तिघांचें एकीकरण जाहालें असतां प्रलय काल पूर्ण जाहला असें समजावें. अशा प्रलयांत पूर्वीं मी संचार करीत असतां मी आर्त झालों आणि कोठें ही राहाण्यास स्थल नाहीं, असें पाहून त्या जलांतच इकडे तिकडे पाहूं लागलों. तों इतक्यांत एक मोठा विस्तृत सहरुणा वधी ज्यास शाखा असा वट वृक्ष पाहिला आणि त्याचे एका पर्णावर दिव्यास्तर्ण शय्या पाहिली त्या शय्येवर प्रफुल्लित पद्मा सारखें ज्याचें मुख असा एक बालनिद्रिस्त झालेला पाहू,

न मला बहुत आश्चर्य वाटलें आणि मनांत विचार केला कीं, अशा प्रलय-कालीं हा शशु वटपत्रावर शयन केलेला कोठून आला, आतसी (अवस )पु ष्पा सारखी कांती, श्रीवत्स भूषणें करून युक्त साक्षात लक्ष्मीचेंच केवल स्थानभूत असा अनादि भगवान् बालस्वरूपी होऊन मला बोलला अरे तुला मी जाणिलें तूं भृगूचा पुत्र मार्कंडेय विश्राम होण्या करितां स्थलाची अपेक्षा करतोस. जर तुला उत्तम स्थलांत राहाण्याची इच्छा असेल तर यामुख द्वारें माझ्या हृदयांत प्रवेश कर हें शरीर तुझ्या सारखे जे असतील त्यांसच राहण्या करितां धारण केलें आहे. असें बालानें भाषण करतांच मलाही त्या कालीं असें वैराग्य उत्पन्न झालें कीं, माझ्या जीवित्वास, दीर्घायुष्यास व मनुष्यत्वास धिःकार असो. असा खेद करून नंतर मी त्याचे मुखांत प्रवेश करतांच कुक्षी मध्यें मोठीं मोठीं राष्ट्रें यां सहित पृथ्वी पाहिली. गंगा, शतद्रु, यमुना, सरस्वती चर्मण्वती, गोदावरी, नर्मदा, ताम्रपर्णी, कृष्णा, वेण्णा, इरावती इत्यादि हजारों नद्या जलानें पूरित झालेल्या पहात आंत मी फिरत होतों, पुढें मत्स्य, कच्छ, नक्र इत्यादिकें करून व्याप्त जो समुद्र यास पाहून चंद्र, सूर्य, तारा, नक्षत्रें, ग्रह इत्यादिकें करून सुशोभित आकाश पाहिलें. तशींच वृक्ष, वनें, उपवनें इत्यादिकांनीं युक्त पृथ्वी पाहून हजारों ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे आपणास उचित जीं कर्में तीं करीत आहेत, असें भगवंताच्या कुक्षी मध्यें पाहिलें. पुढें फिरतां फिरतां हिमाचल, कैलास इत्यादि पर्वत, हजारों सिंह, व्याघ्र, वराह, स्वर्गादि लोकांत इंद्र प्रभृति देवगण, नाग, गंधर्व, अपसरा, ऋषी, यक्ष, दैत्य व दानव यांचे समुदाय पाहून प्रतिसृष्टी भगवंताच्या उदरीं मी पाहिली. अशा अवस्थेंत माझीं शतशः वर्षे अतिक्रांत झालीं, परंतु या बालाच्या देहाचा अंत लागला नाहीं. नंतर भगवंतास यथा विधीनें शरण जातांच त्याच्या मुखांतून वायू वेगानें बाहेर पडलों तों पुनः वटशाखेवर निद्रिस्त झालेला बालक श्रीवत्स लक्षणें करून युक्त शयन केलेला पाहिला. बालानें मज कडे पाहून भाषण केलें कीं, हे ऋषे, माझ्या शरीरांत बहुत दिवस वास केलास तेणें करून तूं बहुतच श्रांत झाला असशील असें भाषण करतांच

एक मुहूर्त पर्यंत मी दृष्टीचा निरोध केला आणि उदरस्थ असतां ज्या भगवंताचें स्मरण केलें होतें तोच हा बालक संपूर्ण लक्षणानीं युक्त पाहातांच त्या ईश्वराच्या चरणावर मस्तक ठेऊन भाषण केलें कीं, हे कमललोचना ईश्वरा, ज्याचें मी पूर्वीं स्मरण केलें होतें तोच तूं असें समजून तुला साष्टांग नमस्कार करून प्रश्न करतो कीं, तूं हें स्वरूप कशा करितां धारण केलेंस ही संपूर्ण तुझी माया चोहीं कडे पसरली आहे. मी मुख द्वारानें तुझे शरीरांत प्रविष्ट होऊन जठरा मध्यें संपूर्ण देव, दानव, यक्ष, राक्षस स्थावर जंगमात्मक सृष्टी पाहिली, तुझ्या प्रसादानें माझी स्मृति नष्ट जाहली नाहीं. नंतर हे पुंडरीकाक्ष, तुझ्याच इच्छें करून मुख द्वारानें बाहेर आलों आणि चिंतित स्वरूप तेंच मी तुझें पुनः पाहिलें तेव्हां हें संपूर्ण जगताचें जला सारखें पान करून शब्द केलें करून अवशेष राहिला आहेस ह्मच तूं कोण? हें जगत तुझ्या शरीरांत किती काल पर्यंत राहणार याचें वृत्त मला सांगा. असा प्रश्न ऐकून बालरूपी भगवान् बोलूं लागतात. असा वि. या अ. आहे.

१८९ अध्याय एकशें एकूण नवद:— भगवान बोलतात, हे ऋषे, माझें तत्व स्वरूप देवही जाणत नाहींत, परंतु तुझ्या प्रीती करितां मी आपल्या शरीरा पासून या सृष्टीचें पुनः विसर्जन कसें करतों हें वृत्त तुला सांगतों कारण तूं पित्याचा परम भक्त असतां मला शरण आलास तुझें ब्रह्मचर्य पाहून मी बहुत संतुष्ट झालों. नारा ह्मणोन उदकाला संज्ञा आहे त्यामध्यें माझें अयन ह्मणजे स्थान ह्मणोन माझें नारायण असें नाव विख्यात जाहलें. माझा व्यय नाहीं निरंतर माझें शरीर असेंच असतें, संपूर्णांचा उत्पन्न करता व हरण करता मीच आहें. ब्रह्मा, विष्णु, शंकर, शक्र, वैश्रवण व यम इत्यादि जे कांहीं प्रसिद्ध आहेत तो मीच माझ्या व्यतिरिक्त त्या व्यक्ती दुसऱ्या कोणी नव्हेत, अग्नी माझें मुख, पृथ्वी हे पाद, चंद्रादित्य हे लोचनें, आकाश हें मूर्धी, दिशा हे कर्ण, त्या पृथ्वीच्या ठायीं जितकीं उदकें तो माझा घर्म, मनाच्या ठायीं वायु निरंतर राहातो असें माझें स्वरूप होय. विद्वान यज्ञ यागादि क्रियें करून माझाच संतोष करतात. पृथ्वीच्या ठायीं क्षत्रिय व वैश्य स्वर्गाची इच्छा करणारे माझेंच यजन करतात. चार समुद्रां पर्यं

त मेरु मंदार पर्वतांनीं भूषित जी पृथ्वी इचें मी शेषरूपें करून धारण कर तों. पूर्वी ही पृथ्वी जलांत निमग्न झाली असतां वराहरूप घेऊन तिचा मी उद्धार केला. वाडव नामक अग्नि होऊन संपूर्ण उदकास मी शोषण करतों ब्राह्मण हें मुख, क्षत्रिय हे बाहू, वैश्य हे उरू आणि शूद्र हे माझे चरण होत, ऋक्, साम, यजु, अथर्व हे चार वेद मजपासूनच उत्पन्न होऊन शेवटीं माझ्याच शरीरांत लय पावतात. काम, क्रोध, लोभ, मद इत्यादिकांचा त्याग करून सत्वस्थ निरहंकारी व आत्म तत्व जाणणारे निरंतर माझीच उपासना करतात. संवर्तनामक अग्नि, सूर्य व अनिल मीच आहें, आकाशामध्यें ज्या तारा दिसतात तीं माझीं रोमें आहेत, चार समुद्र व दिशा हें माझें वस्त्र शयनस्थान होय. हें संपूर्ण विभाग पृथ्वीच्या अर्थ सिद्धी करितां कल्पिले आहेत. काम क्रोध हर्ष मोह लोभ हें ही माझीं रोम रंध्रे होत. सत्य दान, तप, शौच अहिंसा इत्यादिकांच्या साधनें करून ज्ञान्यास जें उत्तम पद प्राप्त होतें तें मीच, दुष्ट कर्म करणारे, कृपण, घातकी जे नर असतील त्यांस हें माझें स्वरूप जाणणें फार अशक्य आहे. ज्या कालीं धर्माचा अगदीं नाश होऊन अधर्माची वृद्धी बहुत होईल त्या कालीं संपूर्ण साधूंचें संरक्षण करण्या करितां आणि दुष्टांस दंड करण्या करितां मी उत्पन्न होतों. दैत्य, राक्षस यांचें ज्या कालीं प्राबल्य होऊन ते देवांस अवध्य होतील तेव्हां उत्तम कर्म करणारे जे मनुष्य यांचे गृहीं मी अवतार घेतों आणि दैत्यादिकांचा नाश करतों. देव, मनुष्य, गंधर्व इत्यादि जे स्थावर जंगमात्मक प्राणी यांस मी उत्पन्न करून लय ही करतों. पुनः धर्माची ग्लानी झाली असतां मनुष्यदेह घेऊन मर्यादा बंधनें करून धर्माचें संरक्षण ही करतों. कृतयुगीं माझा वर्ण श्वेत, त्रेतायुगीं पीत, द्वापार युगीं रक्त आणि कलियुगीं कृष्ण असतो. संपूर्ण लोक या पृथ्वीच्या ठायीं माझेंच भजन करतात. हे विप्र, माझे उदरांत ठायीं जें तूं पाहिलेंस तें संपूर्ण मी इच्छामात्रें करून उत्पन्न करतों हें सत्य सत्य जाण. ब्रह्मदेव हा माझें अर्ध शरीर आहे. संपूर्ण भूतांस मोहन करून मी शंख, चक्र, गदा धारण करणारा जो नारायण तो हजारों युगें जलाचे ठायीं शयन करतों आणि मी शिशु नसतां शिशूचें रूप घेऊन वटपत्रीं

राहातो. आता जो पर्यंत माझे नाभिकमला पासून ब्रह्मदेव उत्पन्न झाला नाहीं तों पर्यंत तूं येथेंच राहा ज्याकालीं पितामह उत्पन्न होऊन आंकाश, पृथ्वी, तेज, वायु, स्थावर जंगमात्मक लोक यातें उत्पन्न करील त्याकालीं तूं त्या लोकीं सुखानें राहा. असें भगवंत भाषण करून तत्काल अंतरधान पावले. हे धर्मराजा, भगवान अंतरहीत जाहाल्यानंतर त्यानीं सांगितल्या प्रमाणें ब्रह्मदेव उत्पन्न होऊन त्यानें पूर्वी नाना प्रकारची प्रजा श्वेतवर्ण उत्पन्न केली. ज्या ईश्वरानें मला अनुग्रह केला तोच हा जनार्दन तुझा संबंधी झाला आहे याच्याच वर प्रसादानें पूर्वी जाहालेल्या वृत्तांताची स्मृती मला आहे, दीर्घायुष्य व स्वच्छंद मरण या भगवंतानें मला दिलें तो-ह्मा पुराण पुरूष वार्ष्णेय तुझ्या अग्रभागीं बसला आहे यास पाहातांच मला पूर्वींची संपूर्ण स्मृति झाली. यालाच धाता, विधाता, गोविंद, प्रजापती असें ह्मणतात संपूर्ण जगताचा उत्पन्न कर्ता हाच ह्मणूनच हे धर्मराजा, यास अनन्य भावें शरण जा, ह्मणजे संपूर्ण तुझें विघ्न आणि दुरित याचें निवारण होईल. असें मार्कंडेय ऋषीनीं धर्मराजास सांगतांच भीमसेन, अर्जुन, नकुल, सहदेव व द्रौपदी यां सहवर्तमान धर्मराजानें जनार्दनास साष्टांग नमस्कार केला. कृष्णानेही सुंदर भाषणानें धर्मराजाचा सत्कार करून भाषण केलें कीं, हे राजा, तूंही परम मान्य आहेस. असा विषय या अध्यायांत आहे.

१९० अध्याय एकशें नवद:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पुनः धर्मराज मार्कंडेयास प्रश्न करतो हे ऋषे, या जगताची स्थिती युगांतीं कशी होईल? समग्र जातींचे वर्ण काय भक्षण करितील? याचा परिणाम कसा होईल? यांचें आयुष्य किती? कलि युगाच्या समाप्तीचा कसा प्रकार होऊन पुनः कृत युगास कसा आरंभ होणार हें विस्तारें करून सांगा. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय बोलतात हे राजा, जें पूर्वी मी ऐकिलें व पाहिलें आहे तें तुला सांगतो. कृतयुगीं साक्षात् धर्म चतुष्पाद पूर्ण होता त्रेतायुगीं कांहीं पापवशें करून एक पाद न्यून झाला, द्वापारीं दोन पाद न्यून होऊन द्विपाद धर्म अवशेष राहिला, तामस कलियुगाच्या आरंभीं धर्माचे तीनपाद भ्रष्ट होऊन अवशेष एक

पार राहिला ह्मणोन संपूर्ण प्रजा पापी झाली. आयुष्य, बल, बुद्धी यांचा उत्त रोत्तर क्षय होत चालला. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांणीं आपलीं स्वरूपें क्रमानें धरून परधर्मावर इच्छा ठेविली आणि आपणच पंडित अशी लोकांमध्यें ते प्रसिद्धी करूं लागले. हे राजा, असें घोर कलियुग संपूर्ण पदार्थांचें क्षय करणारें ज्याकालीं प्राप्त होईल त्याकालीं जगताची अवस्था फारच कठिण होईल ती मुखानें मला सांगतां येत नाहीं; परंतु तूं प्रश्न केलास त्यापेक्षां संक्षेपें कथा सांगतों. तामस कलियुगाची प्राप्ती झाली असतां सत्य नष्ट होईल, प्राणिमात्राचें आयुष्य अगदी स्वल्प होईल, स्वविद्येनें मनुष्य उपजीविका करणार नाहींत. विद्या ज्ञान हीन, लोभिष्ट काम, क्रोध, लोभ यांच्या संसर्गानें कामासक्त निरंतर होतील. मूर्ख परस्पर एकमेकांशीं वैरभाव धरून एकमेकांचा प्राण घेतील. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, हे शूद्राच्या वृत्तीनें उपजीविका करतील. अंत्य वर्ण जे जे असतील ते उत्तम वर्णांची उपजीविका करतील. तागाचीं वस्त्रें संपूर्ण लोक धारण करतील. हरीक धान्य भक्षण करतील, भार्या हाच आपला मित्र असें समजून दुसऱ्या मित्रावर प्रीती ठेवणार नाहींत, मत्स्य भक्षण करणारे होतील, मेंढ्याचें दूध भक्षण करण्याचा प्रचार होईल. गाई दुग्ध देणार नाहींत, एकमेकानें घर बुडवावें आणि लोकांमध्यें आपण प्रतिष्ठित व्हावें असा हेतु धरतील, कोणाची कोणावर निष्ठा राहणार नाहीं. नास्तिक व परनिंदक असे लोक बहुत होतील, ज्या स्थलीं नद्या व वापी असतील तेथें लोक जाऊन बीजें रोपून धान्य उत्पन्न करतील, श्राद्ध व देव कार्य करण्या विषयीं संपूर्णांस तिरस्कार होईल, पित्याचें द्रव्य पुत्र व पुत्राचें द्रव्य पिता हरण करील, होम, स्नान, दान इत्यादि क्रियेपासून ब्राह्मण नष्ट होऊन व्रतादिकांचा त्याग करून वेदाची निंदा करूं लागतील व हीन कर्माच्या ठायीं बुद्धी धरून तंत्रमत स्थापन करतील. नागरास गाईची योजना करतील, निरुद्योगी होऊन उद्योगाची चर्चा मात्र करतील ज्या आपल्या कुलांतील विधवा असतील त्यांचें धन घेण्या विषयीं इच्छा बाळगतील, वेश्यांच्या कथां विषयीं रूची संपूर्णांची उत्पन्न होईल. आह्मीच पंडित आहों दुसरा आह्मांस कोण उपदेश करणार असा अभिमानानें कालक्षेप करतील, साधूंचें धन व दारा यांचें हरण करण्या विषयीं इच्छा धरतील, पित्यानें आपली कन्या

पतीस दिल्या वांचून कन्या आपणस्वतः इच्छिल्या पुरुषाशीं स्वयंवर करील, राजे असंतुष्ट होऊन कोणत्याही प्रकारें प्रजेपासून द्रव्य हरण करतील, एका पासून दुसऱ्यानें कांहीं एक घेतलें असतां हें तुझें नव्हे असें ह्मणोन तत्काल त्याचा निषेध करतील, वृद्धाची बुद्धी केवल बालासारखी होईल व बाल वृद्धा सारखी आपली बुद्धी प्रगट करून दाखवितील, भित्रा असून शूरासारखा अभिमान धरील, एकमेकावर विश्वास कधीं कोणी ठेवणार नाहीं. भार्या पतींची शुश्रुषा न करून यथेच्छ आहार विहार करूं लागतील, संपूर्ण जगत एक भक्ष एक वर्ण एकाच्यार होईल; भेद राहणार नाहीं, स्त्रीपुरुष इतकाच मात्र भेद राहील. कोणी कोणाचा गुरु नाहीं व कोणी कोणाचा शिष्य नाहीं, सयुक्तिक भाषण केलें असतां त्याची थट्टा करतील, हे राजा, असें कलियुग घोर पुढें प्राप्त होऊन अधर्म मूलक पापानें सर्व प्रजा ग्रस्त होईल, मनुष्याचें आयुष्य-पराकाष्ठा सोळा वर्षें पर्यंत असेल, पांचवें अथवा साहावे वर्षीं कन्या प्रसूत-होतील, स्त्री पुरुष एकमेकांचा संतोष ठेवणार नाहींत, समग्र प्रजा निर्धनिक व शठ होतील, संपूर्ण लोक आत्मछंदें करून वर्ततील, शास्त्र पाहणार नाहींत, स्वाभाविकच क्रूर कर्में होतील, बागा व वृक्ष यांचा व्यर्थ नाश करितील, द्रव्य लोभानें तपस्वी ब्राह्मणाचाही नाश करितील. चोहींकडे एकाएकीं चोरांच्या भयानें हाहाकार होईल कोणाचें संरक्षण करण्यास उद्युक्त होणार नाहींत, नदी अथवा वापी यांचा आश्रय करून निरंतर लोक राहतील, शूद्र धर्मकथन करणारे होतील. त्यानें श्रवण करणार ब्राह्मण होतील, देवांचा त्याग करून भिंतीवर चित्रें काढून त्याची पूजा करूं लागतील, मांस व मद्य यांजवर भक्ती पूर्ण ठेवतील, पुष्पावर पुष्पें व फळावर फळें उत्पन्न होतील, ब्राह्मण शूद्राचा कलह निरंतर होईल, राजाच्या करभार भयानें प्रजा स्वदेश त्याग करून दाही दिशेस फिरतील, सूर्यचंद्र व नक्षत्रें यांचीं तेजें हीन होतील, उल्कापात प्रतिदिवशीं होऊन संपूर्णांस भय उत्पन्न होईल, विजेच्या कडकडाट शब्दानें प्राणिमात्रास त्रास होईल, अमावास्या व पौर्णिमा नसतां मध्यंतरीं तिथीस राहु चंद्र व सूर्य यांचा ग्रास करील, पांथस्त कोणी आला असतां जल, भोजन आसन इत्यादिकें करून सत्कार करण्याची इच्छा कोणास राहणार नाहीं, वायस, नाग, शकुनी व मृग हे निरंतर रात्रंदिव

स भयंकर शब्द करतील. या प्रमाणें युगांत कालीं नाना प्रकारचीं दुश्चिन्हें होऊन पुढें युगाची समाप्ती होईल. नंतर दैववशें करून पुनः कृतयुगास आरंभ झाला असतां सूर्य, चंद्र, गुरु हे पुष्यनक्षत्रीं एकाराशीस येतील त्याकालीं असें समजावें कीं, कृतयुगास आरंभ झाला. पर्जन्य कालीं सुवृष्टी होईल, नक्षत्रांची शोभा आकाशाचे ठायीं चांगली दिसेल, ग्रह सव्य जातील त्या कालीं संभल ग्रामीं कोणी एक ब्राह्मणाचे गृहीं विष्णुयशा नामक कलकी अवतार होऊन धर्म संस्थापना करील. हा अवतारी पुरुष जो उत्पन्न होणार याचे आज्ञेंत वाहनें, आयुधें, शस्त्रास्त्रें, कवचें निरंतर राहतील. स्वधर्मे करून विजयातें पावेल, संपूर्ण वर्णांवर कृपा करून आपआपले धर्माचा स्वीकार करवील, या पृथ्वीवर बलाढ्य झालेले म्लेंछ समुदाय असतील त्यांचा तो नाश करील, या प्रमाणें धर्म व्यवस्थापक कलकी अवतार होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

१९१ अध्याय एकशें एक्यांणवा— मार्कंडेय भाषण करतात हे धर्मराज्या नंतर तो अवतारी पुरुष सर्व चोरांचा क्षय करून अश्वमेधा मध्यें पृथ्वी-ब्राह्मणास देईल, ब्रह्मदेवानीं ज्या मर्यादा केल्या आहेत त्या स्थापन करून वनांत जाईल, त्या कालीं संपूर्ण प्राणिमात्र त्याच्या शिक्षा प्रमाणें वर्तणुक करतील. ब्राह्मणानीं चोरांचा नाश केला असतां त्यांचें कल्याण होईल. धर्म देशो देशाच्या ठायीं स्थापन करील. ब्राह्मणानीं त्याची स्तुती केली असतां ब्राह्मणांचा तो संतोष ठेवील. असा तो कलकी अवतार चोरांच्या वधा करितां उत्पन्न झाला असतां संपूर्ण लोक दुष्टां पासून त्रस्त होऊन हे तात, हे पुत्र, अशी भयंकर वाणी करीत असतां त्यांचें शांतवन करील. याप्रमाणें अधर्माचा नाश करून धर्माची वृद्धी करील त्या कालीं ब्राह्मण स्वकर्मास प्रवृत्त होऊन सर्व जन आप आपले कर्मास प्रवृत्त होतील, सर्व ऋतु आप आपले स्थानीं प्राप्त होतील, राजे स्व धर्मानें प्रजा पालन करूं लागतील, च्यारी वर्ण आप आपले धर्मास प्रवृत्त होतील. असें कृतत्रेत द्वापर, कली यांचे धर्म वायु पुराणांत सांगितले ते व मी पाहिलेले तुला सांगितले आणखी धर्म संरक्षणा विषयीं उपयुक्त गोष्टी तुला सांगतों. धर्माच्या ठायीं आत्मा योजावा तेणें करून इहलोकीं व परलोकीं सुख प्राप्त होतें. ब्राह्मणाचा पराभव कधीं करूं नये केला असतां त्या योगानें ब्रा-

ह्मण क्रुद्ध होऊन शापास प्रवृत्त होतो. असें मार्कंडेय ऋषीचें वाक्य ऐकून धर्मराज पुनः प्रश्न करतो कीं, हे ऋषे, कोणत्या धर्माच्या ठायीं प्रजा संरक्षण केल्या असतां धर्म भ्रष्ट होत नाहीं तें मला सांगा. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय सांगतात हे राजा, सर्वांवर दया करावी. निरंतर सत्यभाषण करावें. दान्त असावें, प्रजासंरक्षणाविषयीं दक्ष असावें, अधर्माचा त्याग करावा. इतर देवांचें पूजन करावें. मानाचा त्याग करावा. दुसऱ्याची गोष्ट ऐकावी या प्रमाणें जो वर्तणूक करतो तो सुखी होऊन संपूर्ण पृथ्वीचें राज्य करतो असा तुला भूत भविष्य वर्तमान धर्म सांगितला. आतां तुला जें दुःख प्राप्त झालें याविषयीं दुःखी होऊं नको; कारण जे प्राज्ञ आहेत ते कालानें व्याप्त झाले असतां मोह पावत नाहींत सर्व देवांस ही असा काल प्राप्त होतो याविषयीं शोक करूं नको आणि धर्मलोप न होय असें कर. तूं उत्तम वंशांत उत्पन्न झालास ह्मणोन तुला हेंच सांगणें आहे कीं, निरंतर उत्तम आचरण कर. असें ऋषीचें भाषण ऐकून धर्मराज बोलतो हे ऋषे, आपलें वाक्य ऐकून मला आनंद झाला त्याप्रमाणें वर्तणुक करतों. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, मार्कंडेय ऋषीचें वाक्य ऐकून सर्व पांडव हर्षित झाले व ब्राह्मण विस्मय पावले. असा विषय या अध्यायांत आहे.

१९२ अध्याय एकशें ब्याणव — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धर्मराज पुनः मार्कंडेयास प्रश्न करितात कीं, हे ऋषे, पुनः ब्राह्मणाचें चरित्र मला सांगा. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय ऋषी सांगतात हे राजा, अयोध्या नगरींत इक्ष्वाकु कुलांत उत्पन्न जाहलेला परिक्षीत नामक राजा कोणे एके दिवशीं अश्वारूढ होऊन वनांत मृगया करितां जात असतां मृगाच्या मागें धांवतां धांवतां क्षुधा व तृषा इहीं करून पीडित होऊन एका सरोवराच्या तिरीं स्वस्थ बसला इतक्यांत मधुर मधुर गीत ऐकून मनांत विचार करूं लागला कीं, ह्या अरण्यांत तर मनुष्याचें दर्शन कोठें होत नाहीं; परंतु मधुर गीत शब्द कोठून श्रवणांत येतात. असा विचार करतां करतां परम सुंदर एक कन्या पुष्पें घेऊन गायन करीत राजाच्या समीप भागीं आली तिला पाहून राजानें प्रश्न केला कीं, हे भद्रे, तूं कोण, कोणाची, कशा करितां येथें आलीस

कन्या बोलत्ये मी कोणाची तरी कन्या आहे; परंतु तूं कोण? राजा ह्मणतो मी कन्यार्थी आहें. कन्या ह्मणत्ये मी कन्या खरी परंतु तुला प्राप्त होण्यास अशक्य आहे. राजा ह्मणतो अशी काय तुझी प्रतिज्ञा आहे ती मला सांग. कन्या बोलते मला तूं ग्रहण कर; परंतु मला उदक दाखवूं नको. असें ऐकून राजानें ती प्रतिज्ञा स्वीकृत केली आणि तिज सहवर्तमान विवाह करून क्रीडा केली. कोणे एके दिवशीं तीं उभयतां क्रीडा करीत असतां राजाची सेनाही त्याच वनीं आली. नंतर भार्येस शिबिकेमध्यें बसवून सेनें सहवर्तमान राजा आपले नगरीं गेला आणि भार्येस अंतःपुरामध्यें ठेऊन तिशीं क्रीडा करूं लागला. कांहीं दिवसानीं राजाच्या प्रधानानीं अंतःपुरच्या स्त्रियांस प्रश्न केला कीं, राजानें प्रस्तुत काय आरंभिलें? स्त्रिया बोलल्या आह्मीं एक अपूर्व गोष्ट अशी ऐकिली आहे कीं, या स्त्रीस जलसन्निध भागीं राजा कधीं नेत नाहीं, इतकें प्रधानानीं ऐकतांच एक वन बहुत वृक्ष व फलमूलें इहीं करून युक्त निर्जल उत्पन्न करून त्यामध्यें गुप्त एक वापी मुक्ता मण्यानीं सुशोभीत केली आणि ती कृत्रिमानें आच्छादित ठेऊन राजास सांगितलें कीं हे महाराज, एक वन फार सुशोभित रमणीय आहे आणि त्या वनामध्यें जलही कोठें नाहीं अशा ठिकाणीं मृगया करणें योग्य आहे. असें ऐकतांच राजा एके दिवशीं स्त्री सहवर्तमान त्या रम्य वनांत मृगये करितां गेला त्या वनीं क्षुधा व तृषें करून राजा बहुत श्रांत झाला असतां स्त्री सहवर्तमान जलाच्या इच्छेनें इकडे तिकडे पाहूं लागला तों कृत्रिम केलेली जी वापी इला पाहून भार्येसहवर्तमान श्रांत गेला आणि भार्येस ह्मणाला या वापींत जाऊन मला जल प्राशना करितां आणून दे. असें ऐकून स्त्री जलांत उडी टाकून अदृश्य झाली. राजानें बहुत काल पर्यंत स्त्रीची मार्ग प्रतीक्षा करून जलाकडे पाहिलें तों एक मंडुक विवरांत दृष्टीस पडला, त्यास पहातांच राजा बहुत क्रुद्ध होऊन ह्या मंडुकानेंच आपली भार्या भक्षण केली त्यापेक्षां संपूर्ण मंडूकांचा वध करून टाकावा. असा निश्चय करून राजानें हजारों मंडुकांचा प्राण घेतला. त्याकालीं अवशेष राहिलेल्या मंडुकांस भय उत्पन्न होऊन त्यानीं आपला जो मंडुक राजा यास समग्र दुःख सांगितलें. नंतर मंडुक राजा स्वज्ञातीच्या उपकाराक

रितां तापस वेष. धरून राजाचे अग्रभागीं मनुष्यरूपानें येऊन बोध करूं ला गला हे राजा, क्रोधाचे स्वाधीन होऊन निरपराधी मंडुकांचा वध करण्यास तूं योग्य नाहींस. धनें करून अथवा बलें करून गर्वित होणारा लोकर क्षय पावतो, स्त्रीच्या शोकानें तुला क्रोध उत्पन्न होऊन अधर्मास प्रवृत्त झालास ही गोष्ट तुला योग्य नव्हे. मंडूकांचा वध केला असतां तुझी भार्या तुला प्राप्त होते असें नाहीं मग व्यर्थ हिंसा कशाकरितां करतोस? असें ऐकून राजा बोलतो मी कधींही मंडुकांची क्षमा करणार नाहीं. या दुष्टानीं माझी प्रिय भार्या भक्षण केली त्या पेक्षां हे मला वध्य आहेत. असें ऐकून मंडूक बोलला हे राजा ती माझी दुहिता मी ग्रहण केली. या कन्येनें आज पर्यंत वंचना करून असे-च राजे वंचित केले हा इचामोठा दुःस्वभाव होय. असें ऐकून राजा बोलतो. जर तुझी ती कन्या असेल तर माझी मला माघारी दे. असें ऐकून मंडूक राजानें तत्काल आपली कन्या त्या राजास देऊन कन्येस शाप दिला कीं, हे दुष्टे आज पर्यंत तूं बहुत राजांशीं अशीच वंचना केलीस तस्मात् ब्राह्मणानें हित न करणारे असे तुला पुत्र होतील. असें भाषण ऐकून राजा भाषण करतो हे मंडूक राज, जो तूं आपल्या कन्येस अनुग्रह केलास तो मला ग्राहित आहे आतां मी आपले नगरास जातों असें भाषण करून भार्येसहवर्तमान राजा अयोध्येस गेला आणि बहुत दिवस त्या स्त्रीशीं रममाण असतां शल, बल, दल असे तीन पुत्र झाले. कांहीं दिवसानीं ज्येष्ठ पुत्र जो शल यास राज्यावर बसवून परिक्षिती राजा तप करण्याकरितां वनांत गेला. एके दिवशीं शलनामक राजा मृगये करितां रथारूढ होऊन जात असतां मार्गांत सारथ्यास बोलला कीं, माझा रथ लौकर ने. असें ऐकून सूत बोलतो हे महाराज, हे अश्व चालतां चालतां अगदीं मंद झाले तेव्हां हा मृग सांपडणार नाहीं, हे अश्व वामदेवाचे तर, हे जर त्याचे असते तर त्यांस प्रेरणा करून शीघ्र नेलें असतें असें ऐकून राजा बोलतो हे सूता, तो वामदेव कोण आहे तो मला सांग नाहींतर मी तुझा प्राण घेईन. वामदेवाच्या शापानें सूत भयाभीत होऊन कांहीं बोलेना, असें जाणोन राजा खड्ग घेऊन सूतास बोलला हे सूता, वामदेवाचे अश्व जर तूं दाखविशील तर याच तरवारीनें तुझा शिरच्छेद करीन, त्याकालीं सूतानें रा

ज्याचा रथ वामदेवाचे आश्रमीं नेला तेव्हां राजा बोलला हे ऋषे, माझ्या बाणानें विद्ध जाहालेला मृग पळाला त्यास धरण्या करितां तुझे मनोजव गामी अश्व आहेत ते दे म्हणजे रथास जोडून त्या मृगास मी मारीन. असें ऐकून ऋषी बोलतो हे राजा, मी अश्व देतों, परंतु तुझें कार्य झालें म्हणजे माझे अश्व मला परत आणून दे तेव्हां राजानें ऋषीचें वाक्य स्वीकृत करून अश्व घेतले आणि ते आपले नगरांत नेऊन सूतास भाषण केलें कीं, हे अश्व ब्राह्मणास अयोग्य, राजानीं याचा स्वीकार करावा यास्तव यांस अंतःपुरांत नेऊन ठेव. इकडे वामदेव ऋषींनीं एकमास पर्यंत अश्वांची मार्गप्रतीक्षा करून नंतर आपला उपाध्याय जो अत्रेय यास सांगितलें कीं, शल नामक राजाचे घरीं जाऊन अश्व घेऊन ये. असें ऐकून अत्रेयानीं राज्याचे घरीं येऊन अश्व मागितले तेव्हां राजानें उत्तर केलें कीं, ब्राह्मणास अशीं रत्नें अयोग्य असें जाऊन वामदेवास सांग. नंतर अत्रेयानीं राजाचें प्रत्योत्तर वामदेवास सांगितलें तें ऐकून वामदेव क्रोधानें राजाच्या घरीं जाऊन बोलले हे राजा, माझ्या अश्वांपासून तुझें कार्य झालें आतां माझे अश्व मला परत दे. न देशील तर वरुण दूतांचे हातून मी तुझा नाश करीन, हे अश्व वरुणाचे आहेत, असें ऐकून राजा बोलतो हे ब्राह्मणा, जर तुझी इच्छा असेल तर चांगले सुशिक्षीत गरीब असे दोन बैल अथवा चार खर देतों यांपासून संपूर्ण तुझें कार्य होईल. असें ऐकून वामदेव बोलतात हे राजा, हे अश्व माझ्या भीतींतले आहेत, संपूर्ण जगतांत जीं वाहनें आहेत त्यापेक्षां हें माझें श्रेष्ठ वाहन याज पासून माझी त्या लोकीं व परलोकीं मोठी कीर्ती आहे आणि आमच्या सारख्या थोर मनुष्यास तूं देतोस हीं वाहनें युक्त नाहींत, जर तुला या पृथ्वीवर जिवंत राहण्याची इच्छा असेल तर माझे अश्व लौकर मला दे नाहींतर माझे आज्ञा धारक चार राक्षस भयंकर शूल घेऊन येतील आणि तुझा वध करतील. असें ऐकून राजा बोलतो हे ब्राह्मणा, माझ्या वधाकरितां जे राक्षस येतील ते शिष्या सह वर्तमान तुझाच वध करतील, असें ऐकून वामदेव बोलतात हे राजा, या गोष्टीची परिक्षा पाहूं नको लौकर माझे अश्व दे. असें ऐकून राजा बोलतो हे ऋषे, ब्राह्मणास मृगया शास्त्र विहित नाहीं तेव्हां हे अश्व घेऊन कर्तव्य काय? आतां तुझीच आज्ञा घेऊन

मी हे अश्व आपले जवळ ठेवितों येणें करून तुला ही उत्तम लोक होईल. असें ऐकून वामदेव बोलतात. हे राजा, ब्राह्मणाची आज्ञा मनानें अथवा वाणीनें जो उल्लंघन करितो तो बहुत दिवस या पृथ्वीवर वांचत नाहीं असें ब्राह्मणाच्या तपाचें विलक्षण सामर्थ्य होय. असा उभयतांचा बहुत संवाद झाला, परंतु राजानें अश्व दिले नाहींत. नंतर वामदेवाच्या क्रोधानें चार राक्षस उत्पन्न होऊन राजाचा वध करण्या करितां उद्युक्त झाले ते पाहातांच राजा उच्च स्वरानें बोलला कीं, माझ्या इक्ष्वाकु वंशांत जे उत्पन्न झाले असतील त्यांस व माझा कनिष्ठ भ्राता दल यास अथवा जे माझे आज्ञा धारक असतील त्यांस माझी अशी आज्ञा आहे कीं, आपल्या वंशाचा नाश झाला तरीं चिंता नाहीं; परंतु हे वामदेवाचे अश्व देऊं नका. इतकें बोलतांच राक्षसानीं तत्काल राजाचा प्राण घेतला पुढें कांहीं दिवसानीं दल नामक भ्रात्यास राज्याभिषेक झाला हें ऐकतांच वामदेव अश्व मागण्या करितां राज गृहीं येऊन बोलला हे नरेंद्रा, लौकर माझे अश्व दे. असें ऐकून राजानें सारथ्यास भाषण केलें कीं, माझा एक बाण विषदिग्ध आहे तो घेऊन ये ह्मणजे या वामदेवाचा प्राण घेतों. असें ऐकून वामदेव बोलतात हे राजा, तुझा सेनजीत नामक दाहा वर्षांचा पुत्र अंत:पुरांत आहे तो बाणानें नष्ट होवो. असा शाप होतांच दलानें जो वामदेवाच्या वधा करितां बाण सोडिला तो राजपुत्रास लागून पुत्र मरण पावला. हें ऐकतांच राजा आपल्या इक्ष्वाकु वंश ज्यांस पुन: बोलला हे नर हो, माझा एक तेजस्वी बाण आहे तो मज पाशीं घेऊन या आणि माझा पराक्रम पाहा. असें ऐकून वामदेव भाषण करतात हे राजा, तुझा बाण माझ्या वर कधीं चालू होणार नाहीं, माझ्याजी विलाचा घात तूं करण्याची इच्छा करतोस याजपेक्षां तुझ्या शरीराचें स्तंभन होईल. असें ऐकून राजानें हस्तांत शस्त्र घेतला; परंतु टाकण्यास त्यास शक्ती राहिली नाहीं. हें पाहून राजानें भाषण केलें कीं, हे क्षत्रिय हो, वामदेवाच्या शापानें माझी शक्ती क्षीण झाली याचा नाश माझ्या बाणानें न होतां. ह्मऋषी चिरकाल वांचेल अशी मी इच्छा करितों. अशी राजाची अवस्था पाहून वामदेव बोलले हे राजा, हें मी आपलें तपोबल तुला दाखविलें, आतां या बाणानें आपले भार्येस स्पर्श कर ह्मणजे माझ्या अपराधा पासून जें

तुला पातक जाहालें त्याज पासून तूं मुक्त होशील.नंतर राजानें त्याप्रमाणें करतांच तो मुक्त झाला त्या कालीं राजपत्नी बोलली हे ऋषे,मी निरंतर ब्राह्मणांची सेवा करण्यास इच्छितें व या भर्त्यास क्रूरकर्म न करण्या विषयींउपदेश करीत असत्यें,परंतु माझ्या वाक्याचा अनादर करून हा आपलें दुष्ट कर्म सोडीत नाहीं तस्मात् जेणें करून यास उत्तम लोक प्राप्त होईल असा एखादा उपदेश करा. असें ऐकून वामदेव भाषण करतात हे राजपुत्री, हें संपूर्ण कुल तुझ्या योगें आजपर्यंत तरलें, तुझ्यावर मी प्रसन्न झालों जो तुला इच्छित वर असेल तो माग.असें ऐकून राजपत्नी भाषण करत्ये हे ऋषे,ब्रह्महत्येपासून जें माझ्या पतीस पातक जाहालें याज पासून त्यास मुक्त कर आणि पुत्र बांधवांसहवर्तमान माझ्या कुलाचें कल्याण कर. मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, असें राजपत्नीचें भाषण ऐकून ऋषीनीं तिच्या इच्छे प्रमाणें केलें.त्या योगें राजा बहुत संतुष्ट होऊन त्यानें अश्व, ऋषीस दिले. असा विषय या अध्यायांत आहे.

१९३ अध्याय एकशें त्र्यांणव- वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, ब्राह्मण,भ्राते यांसहवर्तमान धर्मराज प्रश्न करतो हे मार्कंडेयऋषे, बक व दाल्भ्य हे ऋषी दीर्घायु कोणाच्या कारणानें झाले व बकाचा आणि इंद्राचा समागम कसा झाला हें मला सांगा. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय सांगतात हे राजा, इंद्र संपूर्ण दैत्यांचा पराभव करून तिन्हीं लोकांचें राज्य करीत असतां यथा कालीं पर्जन्य पडून धान्याची उत्पत्ती झाली, संपूर्ण प्रजा निरोगी होऊन धर्मावर भक्ती करूं लागल्या.तेव्हां इंद्र ऐरावतारूढ होऊन पृथ्वीवरील नाना प्रकारचे आश्रम,नद्या,चित्र विचित्र नगरें,सरोवरें व ग्राम इत्यादिकांची शोभा पाहाण्या करितां निघाला असतां पूर्वदिशेस समुद्राच्या कांठीं मृग द्विजानीं सेवित असा एक आश्रम पाहून तेथें उतरला आणि त्यानें बक नामक ऋषीस पाहिलें, बकानें ही पुष्पफलमूलें व पाद्य अर्घ्य इत्यादिकें इंद्राचा सत्कार करून सुखानें आसनावर बसविलें तेव्हां इंद्रानें बक ऋषीस प्रश्न केला कीं, हे ऋषे, हजारों वर्षें तुला झालीं यास्तव चिरंजीवी जे आहेत त्यांस दुःख कोणतें हें मला सांग. अ-

सें ऐकून ऋषी भाषण करतात हे राजा, कालें करून प्रियांचा वियोग होऊन अप्रिय व दुष्ट यांचा समागम होतो व आपल्या समस्त पुत्र, स्त्रिया, ज्ञाती व सुहृद् यांचें मरण पहावें लागतें, जे मोठ मोठे कुलिन असतात त्यांचा कुलक्षय होतो, जे नीच असंतान ते कालांतरें करून मोठ्या पदवीस जातात. अज्ञानीं यांस सुख व ज्ञानी यांस दुःख असा व्यत्यास झाला असतां केवढें दुःख बरें! तेव्हां चिरंजीवी असेल त्यास ही मनुष्य संबंधीं क्लेश पाहाणें प्राप्त होतें यास्तव चिरंजीवी असणें हें मोठें दुःख होय. असें ऐकून इंद्र बोलतो हे ऋषे, आतां चिरंजीवीस सुख कोणतें तें मला सांग. असें ऐकून बक भाषण करतात हे इंद्रा, चिरंजीवी असून जो पुरुष अष्टम अथवा द्वादश कालामध्यें स्वगृहीं पाक करून मित्रा सहवर्तमान भोजन करतो तो सुखी, आपले गृहीं स्वसत्तेने मिळविलेलें कुधान्य जरी आहे तथापि तेंच श्रेष्ठ तेंच सुख जो कुत्र्या सारखा परान्न भोजन करण्या विषयीं इच्छा करतो त्यास निरंतर धिःकार असो. स्व पराक्रमानें संपादन केलेलें अन्न अतिथी, पितर, देवता, ब्राह्मण यांस देऊन अवशिष्ट अन्न भोजन करतो तो फारच सुखी त्याच्या सुखानें काय वर्णन करूं, अतिथी ब्राह्मण यास अन्न दाना सारखें पुण्य दुसरें कोणचें नाहीं जितके अन्नाचे ग्रास अतिथी व ब्राह्मण भोजन करतील तितके गो सहस्र दानानाचें फल अन्न देणारास प्राप्त होतें आणि त्यानें जन्मांत जींजीं पातकें केलीं असतील त्यांचा तत्काल नाश होतो. ब्राह्मणास भोजन देऊन जी दक्षणा द्यावी त्या संबंधीं जें उदक तें उदकानें सिंचित करावें म्हणजे संपूर्ण पातकाचें क्षालन होतें हे राजा, बक ऋषीनीं अशा नाना प्रकारच्या बहुत कथा इंद्रास सांगितल्या नंतर बकासहवर्तमान इंद्र तत्काल स्वर्गी गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

१९४ अध्याय एकशें चवऱ्यांणवा— धर्मराज प्रश्न करतो हे ऋषे, ब्राह्मणाचें महा भाग्य आपण वर्णन केलेंत आतां राजाचें महाभाग्य सांगा. असें ऐकून मार्कंडेय भाषण करतात हे राजा, क्षत्रियांचें महा भाग्य ऐक. कुरुवंशांतील कोणी एक सुहोत्र नामक राजा ऋषीस नमस्कार करून रथारूढ झाला आणि मार्गांत जात असतां शिबीची गांठ पडली तेव्हां परस्परांनीं एकमेकां

ची पूजा केली आणि उभयतां आपण समान आहोंत असें समजून एक-
मेकांस मार्ग देईनात इतक्यांत नारद ऋषी तेथें येऊन त्यांस विचारतात कीं,
तुह्मीं एकमेकांचा मार्ग अडवूनकां उभे राहिलांत? असें ऐकून ते उभयतां बो
लतात हे नारदा, कोणी कोणास मार्ग द्यावा, कारण आह्मीं उभयतां सकलगु
णानीं सम आहोंत. असा प्रश्न ऐकून नारदानीं तीन श्लोक ह्मटले त्यांत असा-
अर्थ कीं, हे सुहोत्रा, जो क्रूराशीं मृदुपणानें वागतो त्यानें मृदूशीं मृदुत्वानें कां
न वागावें जो असाधूशीं साधुत्वानें वागतो त्यानें साधूशीं साधूत्वानें कां न वा
गावें? दुसरा आपल्याशीं चांगले रीतीनें एकपट वागला तर आपण त्याच्याशीं
शंभरपट चांगले रीतीनें वागावें. हा शिबिराजा उत्तम स्वभावाचा आहे, दाना
नें कृपणास, सत्यानें अनृत बोलणारास, क्षमेनें क्रूर कर्म्यास व असाधूस सा
धुत्वानें जिंकावें तस्मात् तुह्मीं उभयतां उदार आहांत त्यापेक्षां कोणी तरीं मा
र्ग द्यावा. असें ऐकून सुहोत्रानें शिबीची प्रशंसा करीत त्यास मार्ग दिला. असें
राजानें महा भाग्य नारदानें सांगितलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१९५ अध्याय एकशें पंच्यांणव— मार्कंडेय भाषण करितात हे राजा,
नहुष राजाचा पुत्र जो ययाती याची एक कथा तुला सांगतों. हा राज्यारूढ अ
सतां कोणी एक ब्राह्मण गुरुदक्षणा मागण्याकरितां येऊन बोलला कीं, हे रा
ज्या, गुरूस दक्षिणा देण्याकरितां कांहीं तरीं तुजपाशीं मी मागण्यास आलों
आहें, असें ऐकून राजा बोलतो हे ब्राह्मणा, समयच आहे इच्छित असेल तें
माग. असें ऐकून ब्राह्मण बोलतो हे राजा, आतां मला जें प्रिय आहे तें तूं प्रीती
नें देशील? असें ऐकून राजा भाषण करतो हे याचका, जो तुला इच्छित पदा
र्थ पाहिजे असेल तो माग. ह्मणजे मी तो तुला दिला असतां सुखी होईन, हे
ब्राह्मणा, कोणीही याचक मजपाशीं मागण्यास आला असतां माझें मन क
धींही कोप पावत नाहीं व शोकही मी कधीं करीत नाहीं. सहस्त्र गाई मी तुला
आपल्या इच्छेनें देतों तुझी इच्छा असल्यास घे असें भाषण करून राजानें
गो सहस्त्र ब्राह्मणास अर्पण केलें. ब्राह्मणानें ही स्वसंतोषानें घेतलें. असा वि
षय या अध्यायांत आहे.

१९६ अध्याय एकशें शाहांणव— वैशंपायन सांगतात हे जनमे

जया, पुनः धर्मराज मार्कंडेयास बोलतो हे ऋषे, महाभाग्य वर्णन करावें अ
सा प्रश्न ऐकून मार्कंडेय सांगतात हे राजा, वृषदर्भ आणि सेदुक हे दोन रा
जे नीती मार्ग व शस्त्रास्त्र विद्या यां मध्यें परम निपुण असे होते. सेदुकानें वृ
षदर्भास उपदेश केला होता कीं, सुवर्ण व रौप्य यांवांचून अन्य दान ब्राह्मणा-
स करूं नये. कोणे एके दिवशीं वेदाध्ययन संपन्न एका ब्राह्मणानें सेदुका
स आशीर्वाद देऊन गुरुकरितां भिक्षेची याञ्चा केली कीं, हे राजा, सहस्र
अश्व मला दे. असें ऐकून सेदुक बोलला हे ब्राह्मणा, मजपाशीं अश्व नाहीं
त, वृषदर्भ नामक राजा परम धार्मिक आहे त्याजपाशीं जाऊन तूं माग ह्मण
जे तो तुला देईल. असें ऐकून ब्राह्मणानें तत्काल वृषदर्भा पाशीं जाऊन
सहस्र अश्व मागितले तेव्हां राजानें अश्व बंधन रज्जूनें तत्काळ त्यास ता
डण केलें, त्याकालीं ब्राह्मण बोलला हे राजा, विनापराध माझें ताडण कां के
लेंस आतां मी तुला शाप देतों. असें ऐकून राजा बोलला कीं, हे ब्राह्मणा
जें तूं मजपाशीं मागितलेंस तें मी तुला दिलें नाहीं ह्मणोन शाप देतोस ह्या
ब्राह्मणाचा धर्म कीं काय? असें ऐकून ब्राह्मण बोलतो हे राजा, सेदुकानें
तुजकडे मला अश्व भिक्षेकरितां पाठविलें ह्मणोन मी येथें आलों, नाहींत
र मला येण्याचें काय कारण होतें. असें ऐकतांच राजा बोलतो हे ब्राह्मणा,
उद्यां प्रहर दिवसास माझे गृहीं ये. असें सांगितल्या वरून त्या प्रमाणें तो ब्रा
ह्मण आला असतां वृषदर्भ राजानें एक दिवसांत आपल्यास जें द्रव्य उ
त्पन्न होतें तें ब्राह्मणास दिलें. हें द्रव्य सहस्र अश्वां पेक्षांही अधिक जाहलें.
तात्पर्य असेही राजे या पृथ्वीवर समर्थ आहेत. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

१९७ अध्याय एकशें सत्यांणव:— मार्कंडेय बोलतात हे धर्मराजा,
कोणे एके दिवशीं देव सभेमध्यें अशी गोष्ट निघाली कीं, शिबिराजा कसा आ
हे हें जाणावें. नंतर इंद्र व अग्नि श्येन कपोतांचें रूप धरून राजगृहीं आले.
पुढें कपोत शिबीच्या मांडीवर बसला तेव्हां पुरोहित बोलला हे राजा, ह्या
कपोत प्राणरक्षणार्थ तुझे मांडीवर बसला हें मृत्यु सूचक चिन्ह असल्या
मुळें राजानें याचें प्रायश्चित्त करावें. असें ऐकून कपोत राजास ह्मणाला श्ये
ना पासून प्राणरक्षणार्थ मी तुला शरण आलों, मी वेदाध्ययनानें कृश झालों.

ला ब्रह्मचारी तुझ्या पुरोहिताशीं विरुद्ध बोलणारा निष्पाप आहें मी कपोत नव्हे. असें ऐकून श्येन राजास बोलतो हा कपोत तुझा जन्मांतरींचा पिता ह्मणून याचें रक्षण करून माझे भक्षणास विघ्न करूनको. असें ऐकून राजा विचार करूंलागला कीं, या उभयतांनीं ही संस्कृत वाणी उच्चारिली यास्तव या उभयतांचें स्वरूप जाणून मी पुढें कसें करावें! शरणांगताचें जो रक्षण न करील त्याजवर इंद्र वज्र प्रहार करितो यास्तव हे श्येना, वृषभाचें मांस तूं घे. असें ऐकून श्येन बोलतो हे राजा, या कपोताचे भारंभार आपलें मांस दे ह्मणजे मी तृप्त होईन. असें ऐकतांच राजा आपण कपोता बरोबर तुलेंत बसला हें कर्म पाहून श्येन बोलतो हे राजा, तूं कपोत रक्षिलास असें बोलून गुप्त झाला तेव्हां राजा कपोतास ह्मणतो हा श्येन कोण हें मला सांग. असें ऐकून कपोत बोलतो मी अग्नि व श्येन इंद्र असे आह्मीं उभयतां तुझ्या साधुत्वाच्या परिक्षे करितां आलों. हे राजा, माझ्या रक्षणार्थ खड्गानें आपलें मांस छेदून दिलेंस यास्तव याचें चिन्ह तुझ्या शरीरास सुवर्णासमान कांती व सुगंध प्राप्त होईल. या तुझ्या शरीरा पासून जो पुत्र होईल त्यास कपोत रोमा असें नांव प्राप्त होऊन तो यशानें शोभेल. असा विषय या अध्यायांत आहे.

१९८ अध्याय एकशें अठ्यांणव.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धर्मराज मार्कंडेयास बोलतो कीं, राजाचें महा भाग्य सांगा. असें ऐकून ऋषी सांगतात हे राजा, अष्टक यानामें राजा होता त्याचे गृहीं अश्वमेध करितां संपूर्ण राजे आले होते. यज्ञ समारंभ जाहाल्या नंतर कोणे एके दिवशीं अष्टक आपले भ्राते प्रतर्दन व सुमना व शिबी यां सह वर्तमान रथारूढ होऊन परिभ्रमण करीत असतां मार्गामध्यें नारद भेटले. त्यांस अष्टक प्रभृति रथांत मोठ्या आग्रहानें बसवून जात असतां अष्टक प्रश्न करितो हे नारदा, आह्मीं संपूर्ण आयुष्यानें व गुणानें सम आहोंत. आह्मीं स्वर्गी गेल्यानंतर भूलोकीं प्रथमता कोण येईल. नारदानीं उत्तर केलें कीं, अष्टका तूं येशील. अष्टक ह्मणतो याचें कारण काय! नारद सांगतात तुझ्या गृहीं मी पूर्वीं कांहीं दिवस राहिलों होतों. एके दिवशीं तूं व मी रथारूढ होऊन बाहेर जात असतां नानाप्रकारच्या चित्रविचित्र हजारों गा

ई मी पाहून तुला विचारिलें त्या गाई कोणाच्या तेव्हां तूं उत्तर केलेंस कीं, ब्रा ह्मणांस मी दान केलेल्या त्या त्या गाई. असें तूं ईर्षेनें भाषण केलेंस याच- कारणास्तव या चौघां मध्यें प्रथमता तूं भूलोकीं येशील. पश्चात तिघानीं प्रश्न केला कीं, आह्मां मध्यें प्रथमता कोण येईल? नारदानीं त्यांस उत्तर के लें कीं, प्रथमता प्रतर्दन येईल याचें कारण प्रतर्दनाचे घरीं पूर्वीं मी कांहीं दिवस राहिलों होतों. एके दिवशीं हा व मी रथारूढ होऊन संचार करीत अ- सतां एका ब्राह्मणानें याजपाशीं अश्वाची भिक्षा केली, याणें उत्तर केलें कीं, मी घरीं जाऊन देईन; ब्राह्मणानें पुनः भाषण केलें कीं, लोकर दे घरीं जा- ण्याचा अवकाश नाहीं. असें भाषण करतांच याणें तत्काल आपल्या रथा चा दक्षण बाजूचा अश्व दिला. याप्रमाणेंच आणखी तीन ब्राह्मण मार्गाम ध्यें त्वरित अश्व भिक्षेकरितां आले असतां त्यांसही त्यानें तत्काल आप- ल्या रथाचे अश्व दान केले, च्यारी अश्व गेल्यानंतर प्रतर्दन आपले हस्तांत- र थाची धुरी घेऊन गृहीं जात असतां असें बोलला कीं, ब्राह्मणास कोणा- चे वेळेस काय मागावें याचें ज्ञान नाहीं याणें तर दान केलें; परंतु संतोष न ठेवि ल्या मुळें हा प्रथमता स्वर्गांतून पृथ्वीवर येईल. पुनः दोघानीं प्रश्न केला कीं आह्मां उभयतांतून प्रथमतः कोण येईल? नारदानीं उत्तर केलें कीं, वसुम- ना येईल. याचें कारण हा व मी रथांत बसून परिभ्रमण करीत याचे गृहीं- आलों त्या कालीं हजारों ब्राह्मण आशीर्वाद करितां येऊन वसुमनाच्या र थाची स्तुती करूं लागले तेव्हां मी ही स्तुती केली असतां राजा मला ह्मणाला हा माझा रथ नव्हे तुह्मां संपूर्णांचा आहे. तेव्हां पुनः मी भाषण केलें कीं, हे राजा, तुझ्या रथास आयुष्य पुष्कळ असो. पुनः राजानें उत्तर केलें तुम- च्या आशीर्वादानें माझा रथ कल्याण दायक असो; परंतु राजाचे मनांत- आलें कीं, ह्या रथावर ब्राह्मणाची इच्छा गेली. असें जाणून ही यानें मला रथ दिला नाहीं यास्तव प्रथमता स्वर्गा पासून वसुमना येईल. असें ऐकू न ते सर्व बोलले कीं, आतां एकच शिबि राहिला तो येईल किंवा नाहीं? ना रद बोलतात शिबि स्वर्गांतच राहील मी मात्र येईन कारण मी या शिबि समान नाहीं. कोणे एके दिवशीं याचे गृहीं अन्नार्थी ब्राह्मण येऊन त्याणें

याञ्चा केली त्याकालीं यानें भाषण केलें कीं, जें इच्छित असेल त्याची या
च्ञा कर. ब्राह्मणानें सांगितलें कीं, तुझा पुत्र बृहतगर्भ नामक आहे त्याचा
छेद करून त्याचें मांस पक्क मला भक्षणास दे. असें सांगतांच त्यानें ब्रा
ह्मणाचें भाषण मान्य करून तसें केलें. इतक्यांत तो ब्राह्मण अदृश्य झा
ला याचा शोध करण्यास्तव हा मस्तकावर पुत्राचें मांस घेऊन फिरत अ
सतां कोणी येऊन सांगितलें कीं, हे राजा, तूं ज्यास शोधितोस त्याणें तुझें
गृह, कोशागार, आयुधागार, स्त्रियांचें मंदिर, अश्वशाळा, हत्तीशाला सं
पूर्ण जाळून टाकिल्या. असें ऐकून यास ब्राह्मणाविषयीं पश्चात्ताप न होतां
त्या ब्राह्मणाचा शोध करून हा त्यास बोलला हे ब्राह्मणा, तुझ्या करितां
हें अन्न सिद्ध केलें भक्षण कर; पुनः ब्राह्मणानें उत्तर केलें मी भोजन करी-
त नाहीं तूं भक्षण कर. असें ऐकून यानें तें मांस भक्षण करण्यास आरंभ के
ला तें ब्राह्मणानें पाहून याचा हात धरला आणि भाषण केलें कीं, हे राजा,
तूं आपला क्रोध फार जिंकलास, ब्राह्मणास न द्यावा असा एकही पदार्थ
तुझ्या गृहीं नाहीं. असें भाषण करतांच देवासारखा पुत्र गंधालंकारें करू
न युक्त झालेला याच्या दृष्टीस पडला. नंतर ब्राह्मण संपूर्ण त्याचें ऐश्वर्य त्या
चे स्वाधीन करून अंतरधान पावला. याच्या परिक्षे करितां ब्रह्मदेव ब्राह्म
णाच्या वेषानें आला होता तेव्हां राजाच्या अमात्यानीं प्रश्न केला कीं, हें जाणो
न तूं केलेंस किंवा अजाणोन केलेंस? राजानें उत्तर दिलें कीं, माझा हाच नि
श्चय आहे जो साधूनीं मार्ग आचरित तो मी करितों. मार्कंडेय सांगतात हे
धर्मराजा, असा तो भाग्यशाली शिबि राजा होता. असा विषय या अ-
ध्यायांत आहे.

१९९ अध्याय एकशें नव्याणव.– वैशंपायन सांगतात हे ज-
नमेजया, समग्र ऋषी व पांडव मार्कंडेयास बोलले कीं, तुह्मां पेक्षां चिरं
जीवी फार दिवसाचा उत्पन्न झालेला कोणी आहे किंवा नाहीं हें आह्मा
स सांगा. असें ऐकून मार्कंडेय सांगतात कोणी एक इंद्रद्युम्न नामक
राजा होता तो क्षीणपुण्य होऊन पृथ्वीवर पडला आणि मजकडे येऊ
न बोलला कीं, हे ऋषे तुह्मी मला जाणता किंवा नाहीं? मी उत्तर केलें

कीं, आह्मी शरीरास कृच्छ्र चांद्रायणादिकें करून कृश करणारे त्या आंह्मांस भू
त भविष्य वर्तमान ज्ञान कोठून; परंतु हिमालयाच्या पृष्ठभागीं प्रावार कर्ण नाम
क उलुक माझ्या पूर्वीचा आहे तो संपूर्ण तुझें वृत्त जाणत असेल. याच मार्गानें तूं
तेथें जा. असें ऐकतांच तो इंद्रद्युम्न अश्वरूपानें मला घेऊन उलूक होता तेथें गे
ला आणि राजानें उलूकास प्रश्न करतांच एक मुहूर्त पर्यंत उलूक ध्यान करून
बोलला हे राजा, तुझें वृत्त मी जाणत नाहीं; परंतु तुझ्याच स्थला मध्यें उपजी-
विका करणारा इंद्रद्युम्न सरोवरीं नाडिजंघ नामक राहातो तो मजपेक्षां फार
जुना आहे तो तुझें वृत्त सांगेल. असें सांगतांच त्या सह वर्तमान आह्मीं त्या स
रोवरीं गेलों आणि बकास विचारिलें कीं. या इंद्रद्युम्न राजास तूं जाणतोस? बका
नें मुहूर्त पर्यंत ध्यान करून उत्तर केलें कीं, मी यास जाणत नाहीं; परंतु माझ्या
पेक्षांही बहुत वृद्ध याच सरोवरामध्यें अकुपार नामक कूर्म आहे तेथें जाऊन
त्यास विचार नंतर त्यासह आह्मी तेथें जाऊन अकुपारास प्रश्न केला कीं, तूं या
राजास जाणतोस? असें ऐकतांच त्याचे शरीरास कंप उत्पन्न होऊन तो हात जो-
डून बोलला त्या राजाची काय कीर्ती सांगावी यानें हजारों अग्निष्टोमादि याग के
ले. त्या यागांतील हे हजारों स्तंभ पहा. ब्राह्मणांस लक्षावधी गोप्रदानें करून
उदकें सोडलीं त्या उदकाचें सरोवर जाहलेलें यांत असोभ्यजल आहे ह्मणो-
न आह्मीं सहस्रावधी कल्प राहातों. अशी कच्छानीं त्या राजाची दान की-
र्ती वर्णितांच आकाशा पासून एकाएकीं विमान आलें आणि स्वर्गांत राजा-
च्या कीर्तीचा शब्द होऊन राजा, तूं या विमाना मध्यें बसून लौकर ये असें ह्मणो
लागले. तात्पर्य स्वर्ग व पृथ्वी यांमध्यें ज्याचा पुण्य कर्म शब्द यावत पर्यंत राहातो
तावत पर्यंत त्यास स्वर्गवास घडतो. जों पर्यंत पुरुषाची अपकीर्ती असते तों
पर्यंत तो नरकांत राहातो. यास्तव सर्वांनीं पापा पासून चित्ताची निवृत्ती करावी
आणि धर्माचा आश्रय करावा ह्मणजे अखंड स्वर्गवास घडतो. नंतर इंद्रद्युम्न
स्वर्गी गेल्यावर आह्मी संपूर्ण आप आपले स्थानीं गेलों असे मजपेक्षां चिरंजी
वी व पुण्यशाली या पृथ्वीवर राहातात. असें ऋषीचें वाक्य ऐकून पांडव भाष
ण करतात हे ऋषे. तुह्मीं जसें इंद्रद्युम्न राजास पुनः स्वर्गी पोंचविलें तसेंच
कृष्णानें नृगराजास पुनः स्वर्गी पोंचविलें. असा विषय या अध्यायांत आहे.

२०० अध्याय दोनशें:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धर्मराजानें मार्कंडेयास प्रश्न केला कीं, हे ऋषे, गृहस्थाश्रम्यानीं कोणत्या अवस्थेंत कोणतें दान केलें असतां ते इंद्रलोकीं जातात व त्यांस फळ कसें प्राप्त होतें हें मला सांगा. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय सांगतात हे राजा, जो धर्म बहिष्कृत त्याचें जन्म व्यर्थ, त्यानें सोळा प्रकारचीं दानें केलीं असतील तीं व्यर्थ, जो अपुत्रिक असेल त्याचें ही जन्म तसेंच व्यर्थ होय. जे निरंतर लोकांचे गृहीं राहून परान्न भक्षण करतात व देवता, गुरु यांस अर्पण न करितां पचन झालेलें अन्न आपणच भक्षण करतात हे संपूर्ण असत्य जाणावे. एकादा नियम पूर्वी करून त्याचा त्याग करणें; अन्यायानें द्रव्य मिळविणें, पतीत जो ब्राह्मण अथवा तस्कर यास दान देणें हें सर्व व्यर्थ होय. ~~असत्य~~ बोलणारा गुरु, पापी, कृतघ्न, ग्राम उपाध्याय, वेदविक्रय करणारा व शूद्र गृहीं यजन करणारा, नावाचा मात्र ब्राह्मण, शूद्री बाळगणारा, स्त्रिया, परिचारक, गारोडी इत्यादिकांस दान केलेलें व्यर्थ होतें. तमोगुण धरून क्रोधानें अथवा भयानें दान केलें तर तें व्यर्थ होतें ह्मणोन सर्व अवस्थेमध्यें असें दान करावें कीं, जेणें करून त्या दानानें फल वृद्धिंगत होऊन आपल्यास स्वर्गलोक होईल. असें मार्कंडेयाचें भाषण ऐकून युधिष्ठीर बोलतो हे ऋषे, चारी वर्णांपासून प्रतिग्रह घेत असून ब्राह्मण कोणत्या योगें आपण तरून दान करणारास तारतात हें सांगावें. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय सांगतात हे राजा, जप, मंत्र, होम, वेदाध्ययन, यांची वेदमय नौका करून ब्राह्मण, दान करणारास तारून आपण तरतात. ब्राह्मणांचा संतोष केला असतां संपूर्ण देवता तुष्ट होतात. ब्राह्मण वचनानें उत्तम लोक प्राप्त होतो. श्लेष्मादिक रोगानें तनुव्याप्त झाली असतां ही स्वर्गाच्या इच्छेनें त्यानें ब्राह्मणाची पूजा करावी. श्राद्ध कालीं यत्नानें अनिंद्य ब्राह्मणास भोजन द्यावें, जो वर्णहीन, कुनखी, कुष्टी, मायावी, कुंड, गोलक, धनुष्य बाण घेऊन क्षत्रिय वृत्ती करणारा यांस श्राद्ध कालीं भोजन दिलें असतां तें श्राद्ध नष्ट होऊन कर्त्यास जाळतें. मुक, अंध, बधीर हे श्राद्ध कालीं निषिद्ध सांगितले आहेत; परंतु त्यांची वेद वेदांग पारग ब्राह्मणांत योजना करावी. जो ब्राह्मण आपल्यास व दात्यास तारील त्यासच दान करावें. अतिथी भोजन केला असतां जसा अग्नि संतुष्ट होतो तसा हविर दानादिकानीं संतुष्ट होत नाहीं यास्तव हे

राजा, कोणत्या ही यत्नानें तूं अतिथी भोजन कर. ब्राह्मणास पाद प्रक्षाल णार्थ उदक व पायांना लावण्यास घृत, दीप, अन्न इत्यादि जो ब्राह्मणास देतो तो यमाचें गृह कधीं पाहात नाहीं. जे देवांचा निर्माल्य व ब्राह्मणानें उच्छिष्ट काढतात व ब्राह्मणास गंधमाल्यादि समर्पण करून पाद संवाहन करतात-यांचें फल गोप्रदाना पेक्षां ही अधिक आहे. कपिला गाय अलंकृत करून श्रोत्रिय, दरिद्री गृहस्त, अग्निहोत्री अथवा कुटुंबी यास दान केली असतां अनंत पुण्य प्राप्त होतें. धनवान जो असेल यास पूर्वोक्त दान कधीं करूं नये. एकास एकच गोप्रदान द्यावें. घेणारानें ती विकली असतां आपलीं तीन कुळें नष्ट होतात व घेणारा ही तत्काल नष्ट होतो. मार्गा मध्यें श्रमी झालेल्या ब्राह्मणास अन्न दान कर असा जो उपदेश करतो तो अन्न दात्या समान कीर्ती पावतो. याकरितां हे राजा, तूं अन्नदान कर. अन्नदान करणारे प्रथम स्वर्गी जातात नंतर सत्य भाषण करणारे, त्यानंतर नमागणारास दान करणारे स्वर्गी जातात. यातिघांची योग्यता सम होय. असें मार्कंडेयाचें भाषण ऐकून पुनः धर्मराज बोलतो हे ऋषे, यमलोक व मनुष्य लोक यामध्यें अंतर किती आहे. यम लोकाचा परिघ किती व त्या भयंकर यमलोका पासून कोणत्या उपायानें मनुष्य तरतात हें सांगा. असें ऐकून मार्कंडेय भाषण करतात हे धर्मराजा मनुष्य लोका पासून यमलोक श्यायशी हजार योजनें लांब आहे, मध्यें भयंकर वन आहे त्यांत वृक्षाची छाया व जल अगदीं नाहीं. सूर्याच्या किरणें करून वालुका निरंतर संतप्त झालेली असते, मार्गा मध्यें श्रम पावलेल्या प्राण्यास विश्रांती करण्यास स्थल अगदीं नाहीं तशा मार्गातून यमाचे किंकर मृत झालेल्या स्त्रिया अथवा पुरुष यांस नेतात. जिवंत पणीं ब्राह्मणास दानें केलेलीं तीं मार्गात बहुत उपयोगी पडतात. हयदान करणाऱ्यास त्या दुःख मार्गात हय मिळतो, छत्र दिलें असतां तें त्यास प्राप्त होतें, अन्न दान करणाऱ्यास आतृप्त अन्न मिळतें, वस्त्र दान करणाऱ्यास त्या दुःख दायक मार्गा मध्यें वस्त्रें मिळतात, हिरण्य देणाऱ्यास बहुत सुख होतें तसेंच भूमी दान करणाऱ्यास बहुत सुख होतें. धान्य दान करणाऱ्यास क्लेश होत नाहींत, गृह दान करणारे विमानारूढ होतात. जल दान करणारे जलें करून तृप्त होतात, दीप दान करणाऱ्यास-

त्या घोर अंधःकार मार्गामध्यें प्रकाश प्राप्त होतो. गोदान करणारे सर्व पापा-पासून मुक्त होऊन हंस युक्त विमानामध्यें जातात, तसेंच एक मास, षड रात्र, त्रिरात्र व एक अन्न भक्षण करणारे यमाचा मार्ग न पाहातां उत्तमलोकीं जातात. पुष्पोदक नामक नदी त्याच वनामध्यें आहे तेथें जल फार सीतल व आसमंतात् वृक्षही बहुत आहेत तें स्थल जलदान करणाऱ्यास प्राप्त होतें. यास्तव ब्राह्मणास अन्न दे. ते भुक्त झाले असतां इंद्रा सह वर्तमान संपूर्ण देव संतुष्ट होऊन अन्नदात्यास आशीर्वाद देतात आणि त्याच्या हिताची चिंता करतात. असें ऐकून धर्मराज प्रश्न करितात हे ऋषे, ज्या योगें ब्राह्मण सर्वदां शुद्ध होतो त्या शुद्धिचा प्रकार मला सांगा. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय सांगतात हे राजा, वाक्, कर्म व जल या तीन योगानीं जी शुद्धी होते तिच्या योगें पुरुष स्वर्गी जातो. सायंकालीं व प्रातःकालीं जो संध्या करून गायत्रीचा जप करतो तो समुद्रा सहित पृथ्वीच्या प्रतिग्रह दोषा पासून ही मुक्त होतो व त्यास ग्रहादिक पीडा करीत नाहींत कारण ब्राह्मण अग्नीसारखा प्रज्वलित असतो. असे ब्राह्मण ज्या नगरांत नसतात तें नगर अनेक प्राकारा दिकानीं युक्त असलें तरी शोभत नाहीं. असे ब्राह्मण ज्या स्थानीं राहतात त्यासच नगर व तीर्थ ह्मणावें-प्रजेचें उत्तम प्रकारें रक्षण करणारा राजा व तपस्वी ब्राह्मण यांस सामोरें-जाऊन यांचें जो पूजन करतो तो तत्काल पापा पासून मुक्त होतो. पुण्य कारक तीर्था मध्यें स्नान व त्रिसुपर्णादि मंत्रांचें पठण व साधूशीं संभाषणहीं अवश्य घडावीं. त्रिदंड धारण, मौन, जटाभार, मुंडण, वल्कल, अजिन धारण, व्रताचरण, तीर्थीस्नान, अग्निहोत्र, वनवास, शरीर पोषण हीं संपूर्ण-ज्याचा भाव शुद्ध नाहीं त्याचीं व्यर्थ होतात, संपूर्णास विकार करणारें मन-आहे ह्मणोन प्रथमतः मनाचा निग्रह करावा. कर्म, बुद्धी ई हीं करून निरंतर जे पाप करणारे प्राणी तपें करून आपलें शरीर जरीं शोषण केलें तथापि तें व्यर्थ होय. पुत्रा दिकांवर दया ठेवूं नये, भिक्षेनें आपलें व कुटुंबाचें पोषण करावें, हिंसेचा त्याग असावा, यासच तप ह्मणतात. हजारों उपोषणें केलीं असतां त्यास तप ह्मणो नये. आपल्या गृहीं राहून निरंतर वेदांताचें मनन करावें निरंतर शुची असावें आणि यावत् जीव पर्यंत दुसऱ्यावर दयावे

वाची ह्मणजे संपूर्ण पापा पासून तो पुरुष मुक्त होतो. तपानें स्वर्गाची प्राप्ती होते, दानानीं भोगाची प्राप्ती होते. ज्ञानानें मोक्ष प्राप्त होतो आणि तीर्थ स्नानें करून पापाचें क्षालण होतें. वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, असें मार्कंडेयाचें भाषण ऐकून धर्मराज प्रश्न करतात हे ऋषे, दानविधी काय आहे हें मला सांगा. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय भाषण करतात हे राजा, श्रुति स्मृति यांत सांगितलेलीं दानाचीं रहस्यें ऐक. गजच्छाया नामक एक पर्व आहे त्या पर्वांत श्राद्ध, दान इत्यादि केलीं असतां दश कल्प अयुत काल पर्यंत उत्तम लोका पासून तो क्षीण होत नाहीं. लोकांचे उपजीवना करितां पक्व झालेलें अन्न ज्याणें स्वगृहीं दान केलें त्याणें संपूर्ण यज्ञयागादि क्रिया सांग केल्या असें जाणावें, पूर्व वाहिनी अथवा पश्चिम वाहिनी ज्या नद्या यांमध्यें स्थित होऊन जो अन्नाचें दान करतो तें दान अक्षय होऊन त्यास इंद्र अक्षय्य स्वर्ग देतो. धन, मीन, कन्या, मिथुन या संक्रांती मध्यें दध्यादि गोरस याचें दान केलें असतां इंद्र अतिथी रूपानें दात्याचे गृहीं येऊन अन्न भक्षणानें तृप्त होतो आणि त्या देशांत पर्जन्य वृष्टी उत्तम प्रकारें करून शेवटीं त्यास स्वर्ग प्राप्ती करतो. पर्व ह्मणजे अमावास्या पौर्णिमा त्या दिवशीं दान केलें असतां द्विगुणीत फल प्राप्त होतें. ऋतु संधी मध्यें दान केल्यानें दशगुणीत फल प्राप्त होतें. कोणास संकट कालीं दान केलें असतां अनंत फल मिळतें. अयन, विषुव, सूर्यचंद्र ग्रहण यां मध्यें दान केलें असतां अक्षय्य फल प्राप्त होतें. जन्मांत ज्यानें भूमी दान केलें नाहीं, त्यास भूमी मिळत नाहीं, ज्यानें यान दान केलें नाहीं त्यास आरोहण करण्या करितां यान मिळत नाहीं. ज्या ज्या उद्देशानें जीं जीं दानें ब्राह्मणास दिलीं असतील तीं तीं त्याच्या इच्छे प्रमाणें त्यास मिळतात. सुवर्ण हें अग्नीचें आपत्य, भूमी विष्णूची भार्या व गाई सूर्याची कन्या यास्तव यांचें दान केलें असतां त्रैलोक्य दान केल्याचें फल प्राप्त होतें. तस्मात हे राजा, ज्याणें मनुष्य देह धारण केला त्याणें प्रयत्नानें दान करावें हें च संपूर्ण कर्मांमध्यें श्रेष्ठ होय असें बुद्धिमान लोक ह्मणतात. असा विषय या अध्यायांत आहे.

२०१ अध्याय दोनशें एक— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, स्वर्गप्रतिपादन व इंद्रद्युम्न राजा यांचें आख्यान ऐकून धर्मराज पुनःप्र श्न करतो हे मार्कंडेय ऋषे, तुह्मांस सर्व ज्ञात आहे यास्तव इक्ष्वाकुवंशांतील कुवलाश्व नामक राजाचें धुंधुमार असें नांव कां झालें तें मला सांगा. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय बोलतात हे धर्मराजा, मरुधन्व देशाचे ठायीं उत्तंक ऋषि हजारों वर्षे विष्णूची आराधना करीत असतां एके दिवशीं भगवान् संतुष्ट होऊन उत्तंकाचें साक्षात् दर्शन घेण्या करितां आले हें पाहून उत्तंकस्तुती करून नम्रतेनें बोलला हे देवा, तूं संपूर्ण भूतें व्याप्त केलींस व योगी, महर्षी हे तुझें स्तवन करतात. हे देवा, तूं संतुष्ट झाला असतां संपूर्ण जगत स्वस्त होतें. तूं क्रुद्ध झाला असतां संपूर्णांस भय उत्पन्न होतें यास्तव संपूर्ण जगताचें भय हरण करणारा तूं आहेस तूं आपल्या तीन पादानें तिन्हीं लोक व्यापिलेस. मोठमोठे जे असुर यांच्या समुदायाचा नाश तूंच केलास, तुझ्याच आश्रयें करून देवांचा वास स्वर्गीं घडतो. अशी उत्तंकानें ईश्वराची नाना प्रकारें स्तुती केल्यावर भगवान् संतुष्ट होऊन ह्मणतात हे ऋषे, तुझ्या स्तवें करून मी संतुष्ट झालों वर माग. असें ऐकून उत्तंक भाषण करतो हे भगवन्, तुझें दर्शन मला झालें याजपेक्षां दुसरा वर कोणता तुझ्या दर्शनें करून मी तृप्त झालों. असें ऐकून विष्णू भाषण करतात हे ब्राह्मण सत्तमा, तुझ्या भक्तीनें मी बहुत संतुष्ट झालों माझा वरप्रसाद तूं अवश्य ग्रहण कर. असा ईश्वरानें आग्रह केल्यावर उत्तंकानें अंजली पुट जोडून भाषण केलें कीं, धर्म, सत्य, इंद्रिय निग्रह यांचे ठायीं माझी बुद्धी निरंतर असून तुझ्या चरणारविंदीं भक्ती असो. असें ऐकून भगवान् ह्मणतात हे द्विजा, माझ्या प्रसादानें ही तुझी संपूर्ण सिद्धी होईल. देवांस युक्त जो योग हाही तुला प्राप्त होईल आणि या तीन लोकांचें एक मोठें हित कार्य तूं करशील. संपूर्ण लोकांचा नाश करण्या करितां धुंधु या नामें एक असुर मोठी तपस्या करील त्याच्या वधा करितां इक्ष्वाकु कुलांत बृहदश्व नामक राजास कुवलाश्व नामक पुत्र महान् सुशील व दांत होईल आणि मी तुला योग कथन केलेला तो तूं राजास सांगशील आणि त्या योग बलें करून कुवलाश्व धुंधुचा वध करून धुंधुमार या नामें करून प्रसिद्ध होईल. असें सांगून भगवा

न् अंतरधान पावले. असा विषय या अध्यायांत आहे.

२०२ अध्याय दोनशें दोन.- मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, इक्ष्वाकुकुलांत शशाद नामक राजा उत्पन्न झाला आणि तो अयोध्येचे ठायीं रहात असतां संपूर्ण प्रजा पुत्रा सारखी पालन करी. पुढें त्यास अनेना नामक पुत्र झाला त्याज पासून पृथू, त्यास विष्वगश्व, त्याज पासून आर्द्री, त्यास युवनाश्व त्याला श्राव, त्याजपासून श्रावस्तक त्यानें श्रावस्ति नामक नगरी वसविली, त्यास बृहदश्व, त्याजपासून कुवलाश्व आणि कुवलाश्वास एकवीस हजार पुत्र महात्म बलवान विद्या विशारद झाले. हा कुवलाश्व पित्यापेक्षां गुणानीं अधिक असे. कोणे एके दिवशीं बृहदश्वानें आपला पुत्र कुवलाश्व यास शूर धार्मिक पाहून राज्यावर त्याची स्थापना केली आणि तप करण्या करितां आपण वनांत गेला. हें वर्तमान ऐकतांच उत्तंक ऋषि बृहदश्वा कडे जाऊन न्यस्त शस्त्र जो बृहदश्व यास बोलले कीं हे राजा, तुह्मीं पृथ्वीचें रक्षण करावें आणि आह्मीं तुझ्या प्रसादानें निर्भय वास करावा या स्तव तूं अरण्यांत जाऊन तप करण्यास योग्य नाहींस, पृथ्वीचें रक्षण करावें हें योग्य. मी मरुधन्व देशामध्यें राहातों तेथें उज्ज्वालक नामक एक समुद्र आहे त्याचे तीरीं वालुकामय माझा आश्रम आहे, तें वालुकामय स्थल बहुत विशाल आहे त्यांत एक महान् भयंकर पराक्रमी मधुकैटभ नामक दैत्याचा पुत्र धुंधु राहातो त्याणें आसमंतात् भागींचें वन अगदीं भयानें व्याप्त करून टाकिलें आहे. संपूर्णांस तो बहुत त्रास देतो वालूमध्यें निरंतर आच्छादित राहातो; देव, गंधर्व, दैत्य, यक्ष, राक्षस यांस जिंकण्यास अशक्य त्याणें आपल्या तपाच्या योगें ब्रह्मदेवास प्रसन्न करून वरप्रसाद घेतले आहेत. तो धुंधु नामक दैत्य परम दारुण याचा नाश हे राजा, तूं करावास ह्मणजे तुझी निरंतर कीर्ती यालोकामध्यें वाढेल आणि आह्मी ही सुखानें राहूं. हा धर्म तुझ्या तपापेक्षांही ज्यास्त होईल हे राजा, भगवान जो विष्णु याचें तेज तुझ्या राज तेजांत मिश्रित होऊन वृद्धी प्रत पावेल. पूर्वीं मी तप केलें तेव्हां मला विष्णूनें असावर दिला कीं, धुंधु नामक दैत्य परम भयंकर पराक्रमी उत्पन्न होईल याचा तूं वध करशील आणि मत्या विषानें तें-

घाव तेज दिलें तें मी तुला समर्पण करीन ह्मणोन हे राजा, ईश्वराच्या वरा प्रमाणें हें तेज मी तुला देतों ह्मणजे तूं त्या दैत्याचा वध करशील. अन्य तेजें करून तूं शेकडों वर्षें त्या सह वर्तमानं युद्ध केलेंस तरीं तो जिंकला जाणार नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

२०३ अध्याय दोनशें तीन.— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, असें उत्तंकाचें भाषण ऐकून राजा हस्त जोडून भाषण करतो हे ब्राह्मणा, तुझें आगमन व्यर्थ होणार नाहीं माझा पुत्र कुवलाश्व या नामें मोठा धैर्यवान शीघ्र कार्य करता आहे, या पृथ्वीवर त्याज सारखें वीर्य दुसरें कोणाचें नाहीं, त्यास हजारों पराक्रमी पुत्र आहेत तो तुझें कार्य करील. मी तर सांप्रत शस्त्रास्त्रांचा त्याग करून या वनांत तप करितां आलों यास्तव मला शस्त्र धरण्या विषयीं आग्रह करूं नको. असें ऐकून उत्तंकानें तथास्तु असें ह्मटलें आणि तप करण्या करितां राजास वनांत जाण्या विषयीं आज्ञा दिली. असें मार्कंडेयानें भाषण ऐकून युधिष्ठिर प्रश्न करतात हे ऋषे, धुंधु नामक दैत्य हा कोण? याचें वीर्य तप किती? हा कोणाचा पुत्र व कोणाचा नातु हें मला सांगा. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय सांगतात हे राजा, ज्या कालीं संपूर्ण पृथ्वी नष्ट होऊन पृथ्वी व आकाश समुद्राच्या जलानें व्याप्त झालें त्या कालीं स्थावर जंगमात्मक सृष्टी नाश पावली तेव्हां लोक कर्ता विष्णु भगवान नागाची शय्या करून निद्रा पावला. त्याच्या नाभि कमला पासून सूर्या सारखें तेजस्वी एक कमल उत्पन्न झालें त्याज पासून ब्रह्मदेव उत्पन्न झाला. पुढें कांहीं कालानें अकस्मात दोन दानव मधु आणि कैटभ उत्पन्न झाले आणि शेषशाई जो भगवान् नारायण यास पाहून चकित झाले. नंतर कांहीं कालानें चतुरमुख ब्रह्म देवास त्रास देऊं लागले त्यायोगें ब्रह्म देवाचें कमल कंपायमान होतांच भगवंताची निद्रा भग्न होऊन ते जागृत झाले आणि अकस्मात् दोन दैत्य पाहून त्यांचें आगत स्वागत करून बोलले कीं, तुमच्या वर माझी प्रीती आहे वर मागा त्या कालीं जे मधु कैटभ याणी केशवाच्या वाक्याची थट्टा करून भाषण केलें कीं, हे देवा, तूंच आमचे पाशीं वर माग आह्मीं इच्छिलावर लोकांस देणारे त्या आह्मांस तूं वर देतोस काय? असें ऐकून भगवान् ह्मणतात हे असुर हो, बरें तर तुह्मीं ही

मोठे शौर्य संपन्न आहां, तुमच्या सारखे मतापि दुसरे पुरुष कोणी नाहीं त यास्तव तुह्मीं हाचवर मला द्यावा कीं, माझे हातून तुह्मीं वध पावा. असें ऐकून मधु कैटभ बोलले हे ईश्वरा, तूं जो वर आमचे पाशीं मागीतलास तो आह्मीं तुला दिला. आमचा वध तूं करशील; परंतु एक आमचें असें भाषण आहे कीं, जलरहित जेथें स्थल असेल तेथें आमचा वध होईल. असें ऐकून भगवंतास चिंता पडली कीं, जला वांचून स्थल असें दुसरें कोठून आणावें, पृथ्वी व आकाश यानें अंतर जलानें अगदीं पूरित झालें. अशी परम चिंता भगवंतानीं करून नंतर आपले ऊरू हे जलानीं व्याप्त नाहींत तेव्हां यांजवरच यांचा वध करावा. असा निश्चय करून आपले अंकावर चक्रानें मधुकैटभांचा शिरच्छेद केला. असा विषय या अ॰ आहे.

२०४ अध्याय दोनशेंचार.– मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, मधुकैटभाचा पुत्र धुंधुनामा मोठा पराक्रमी होता त्यानें एक पादावर उभे राहून तपानें आपलें शरीर कृश केलें. असें तप करतां करतां ब्रह्मदेव यानीं प्रसन्न होऊन वरमाग असें त्यास सांगितलें असतां धुंधुनें वर मागीतला कीं, हे पितामह, देव, दानव, यक्ष, राक्षस, गंधर्व, सर्प यांज पासून मी अवध्य असावें. असें ऐकून ब्रह्मदेव बोलले कीं, तुझ्या इच्छेप्रमाणें होईल. नंतर दैत्यानें ब्रह्म देवाचे चरणा वर मस्तक ठेविल्या वर ब्रह्मदेव आपले स्थानीं गेले. धुंधूनें आपला पिता विष्णूनें मारला असें जाणोन त्याशीं वैर आरंभिलें, देव, गंधर्व, यांस युद्धामध्यें पराजित करून तो निर्भय झाला आणि पश्चिम दिशेस उज्वालक नामक जो वालुकामय समुद्र यामध्यें राहून संपूर्णांस त्रास देत असे. त्याचयोगें उत्तंक ही बहुत त्रासला. दैत्याच्या श्वासोच्छ्वास संबंधीं अग्नीनें संपूर्ण वनांतील वृक्ष दग्ध झाले त्यांत उत्तंकाचा आश्रमही दग्ध झाला. नंतर उत्तंकानें कुवलाश्वराजाकडे जाऊन हें दैत्याचें घोर कृत्य त्यास सांगतांच कुवलाश्वराजा एकवीस हजार पुत्रांसह वर्तमान धुंधूच्या वधाकरितां निघाला त्याच समयीं उत्तंकाच्या योगें विष्णूचें तेज कुवलाश्वाच्या शरीरांत प्रविष्ट झालें. कुवलाश्वाचे पुत्रही महान् पराक्रमी होते त्यांसह वर्तमान कुवलाश्व जात

असतां एका एकीं आकाशांत असा शब्द झाला कीं, हे राजा धुंधु नामक दै त्याचा वध करून तूं धुंधुमार असें नांव पावशील. अशी आकाशवाणी झाल्यानंतर देवांनीं पुष्पांची वृष्टी केली आणि दुंदुभी वाजविल्या, सीतवायू सुटला, पृथ्वीच्या रजांची शांती होण्याकरितां इंद्रानें वृष्टी केली. अंतरिक्षामध्यें विमानामध्यें बसून देव युद्ध पाहाण्यास आले. हे धर्मराजा, पुढें कुवलाश्वराजा आपले पुत्रांसह वर्तमान धुंधूचा शोध करण्याकरितां दाही दिशा फिरला; परंतु कोठें ही शोध लागेना. नंतर पश्चिम दिशेस वालुकामय जो समुद्र होता तेथें जाऊन सात दिवसांत तो समुद्र खणिला तों आंत सूर्यासारखा तेजस्वी शरीरें करून पुष्ट असा धुंधु निजला होता त्याजवर कुवलाश्व पुत्रानीं तीक्ष्ण शर, गदा, मुसळ, पट्टिश, परिघ, प्रास, खड्ग यांची एकाएकीं वृष्टी केली. धुंधूनें तीं संपूर्ण शस्त्रास्त्रें भक्षण केलीं आणि त्याच्या मुखापासून एकाएकीं संवर्तनामक कालाग्नीसारिखा क्रोधाग्नी उत्पन्न होऊन संपूर्ण कुवलाश्वराजाचे पुत्र दग्ध झाले. धुंधूच्या देहापासून एकाएकीं जलाचा श्राव झाला त्याचा राजानें वैष्णव तेज व योगबल येणें करून उत्पन्न झालेला जो अग्नि याणें शम केला आणि क्रूर ब्रह्मास्त्राची योजना करून तत्काल धुंधूचा प्राण घेतला. हें पाहून संपूर्ण महर्षि व देव याणीं हर्षानें राजाची स्तुती केली आणि वर माग अशी प्रार्थना केली असतां राजाही अंजलीपुट जोडून बोलला हे देव हो, मला असा वर द्यावा कीं, ब्राह्मणास मी वित्तदान करीन, विष्णूशीं सख्य ठेवीन, भूतद्रोह कधीं करणार नाहीं, धर्मावर प्रीती व स्वर्गाचे ठायीं अक्षय्य वास असावा. असें ऐकून संपूर्ण देव, ऋषी, गंधर्व व उत्तंक ऋषि याणीं तथास्तु असा आशीर्वाद देऊन ते आप आपल्या स्थानीं गेले.
त्या कालापासून कुवलाश्वाचें नाव धुंधुमार असें विख्यात झालें. राजाच्या दग्ध झालेल्या पुत्रांतून दृढाश्व, कपिलाश्व व चंद्राश्व असे तिघे पुत्र अवशिष्ट होते. पुढें त्यांजपासून इक्ष्वाकुकुलाच्या उत्पत्तीचा विस्तार झाला. हे धर्मराजा, मधुकैटभ जे दैत्य यांचा पुत्र जो धुंधु याचा वध करून कुवलाश्वराजा धुंधुमार अशा नावातें पावला. हें पुण्यकारक आ

ख्यान जो पठण करील अथवा श्रवण करील तो धर्मात्मा होऊन पुत्र संतती तें पावेल व पर्वकाळीं पठण केलें असतां आयुष्याची व ऐश्वर्याची वृद्धी होईल आणि विगत ज्वर होऊन व्याधीचें भय त्यास कधीं होणार नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

२०५ अध्याय दोनशें पांच— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, परम तेजस्वी जे मार्कंडेय ऋषी यांस धर्मराजानें प्रश्न केला हे ऋषे, गुरु इत्यादिक प्रत्यक्ष दृष्टीस पडणाऱ्या देवता जशा सर्वांस पूज्य आहेत तशाच पतिव्रता स्त्रिया आहेत यास्तव त्यांचें महात्म मला सांग कारण त्या इंद्रियें व मन यांचा निग्रह करून आपल्या पतीस देव असें मानितात हें कर्म केवढें दुस्तर होय! पतिव्रता स्त्रिया दशमास पर्यंत आपल्या कुक्षींत गर्भधारणाच्या वेधना सोसून शेवटीं प्रसवतात. नंतर उत्पन्न झालेल्या गर्भाचें उत्तम प्रकारें परम स्नेहानें पोषण करितात यास्तव त्या स्त्रियांचें माहात्म्य मला सांगा. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय सांगतात हे राजा, हा तुझा प्रश्न मोठा दुर्घट आहे; परंतु याचें परम तत्व तुला सांगतों. कोणी माता व कोणी पिता श्रेष्ठ ह्मणतात याचें कारण असें आहे कीं, माता गर्भाची पोषण करणारी आहे व पिता पुत्र होण्याकरितां देवता पूजन व यज्ञ यागादि उपाय करतो, बरें तो पुत्र प्राप्त झाल्यावर पुढें कसा होईल याविषयीं उभयतां चिंतन करितात. त्यांची आशा जो पुत्र सफल करतो तोच धर्मवेत्ता होय. ज्या स्त्रिया पतीच्या शुश्रुषेनें स्वर्गास जिंकितात त्यांचा धर्म सांगतों ऐक. असा विषय या अध्यायांत आहे.

२०६ अध्याय दोनशें साहा— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, कोणी एक द्विजश्रेष्ठ वेदाध्ययन करणारा, धर्मशील, सांगोपांग वेद, उपनिषदें यांचा ज्ञाता कौशिक या नामें ब्राह्मण एका वृक्षाचे अधोभागीं वेदाध्ययन करीत बसला असतां त्या वृक्षावर एक बगली अदृश्य होती तिनें वरून ब्राह्मणावर मलोत्सर्ग केला तेव्हां त्या ब्राह्मणानें तिजकडे क्रोधानें पहातांच ती गतप्राण होऊन भूमीवर पडली हें पाहून ब्राह्मण करुणेनें ह्मणतो हें काय मी अकृत्य केलें. असा शोक करून तो ग्रामांत जीजीं परम पवित्र गृहें होतीं तेथें भिक्षे करितां निघाला असतां त्या गृहीं पूर्वीं भिक्षेस जाण्याचा संप्रदाय होता त्या घरीं गेला.

तेव्हां आंतून स्त्रीनें सांगितलें कीं, उभाराहा मी पात्र शुद्ध करून तुला भिक्षा घालतें. इतक्यांत क्षुधेनें श्रांत झालेला तिचा पती बाहेरून आला तेव्हां तिणें पतीस पाद्य, आसन व भोजन देऊन संतुष्ट केलें. हे राजा, ती पतिव्रता स्त्री आपले भर्त्यास साक्षात देवच असें मानून जेणें करून त्याचें हित होईल तेंच करी, नंतर कुटुंबाचे हिताकडे लक्ष ठेवी. अशी ती स्त्री पतीची शुश्रुषा केल्यावर बाहेर पाहात्ये तों तो ब्राह्मण दृष्टीस पडला, तेव्हां तीचकित होऊन भिक्षा देण्या करितां बाहेर आली. तेव्हां ब्राह्मण बोलला हे वरांगने, मला उभाराहा असें सांगून भिक्षा न घालतां इतका काल पर्यंत उभा केलास. असें क्रोधयुक्त भाषण ऐकून पतिव्रता शांतवन पूर्वक बोलल्ये हे विद्वन्, क्षमा करावी माझें परम दैवत कायतें पती आहे, तो क्षुधित आला ह्मणून त्याची शुश्रुषा करीत होत्यें. असें ऐकून ब्राह्मण ह्मणतो हे स्त्रिये, तूं पतीला श्रेष्ठ मानून ब्राह्मणाचा अवमान करितेस काय? अगे या ब्राह्मणास इंद्रही नमस्कार करितो मग मनुष्याची कथा काय? ब्राह्मण अग्नी सारखे तेजस्वी आहेत. या पृथ्वीचा दाह तत्काल ते करतील. असें ऐकून स्त्री ह्मणाल्ये हे विप्रा, क्रोधाचा उपसंहार कर मी कांहीं बगळी नाहीं, या क्रूर दृष्टीनें तूं माझें काय करणार? मी ब्राह्मणाचें तेज समग्र जाणत्यें. पहा बरें येवढा सागर; परंतु ब्राह्मणानीं क्षारयुक्त करून प्राशन करण्यास योग्य नाहींसा केला, तसाच ब्राह्मणाचा क्रोधाग्नी अजून पर्यंत दंडकारण्यांत शांत होत नाहीं. वातापि नामक असुरानें ब्राह्मणांस त्रास दिला ह्मणोन अगस्ती ऋषीचे क्रोधाग्नीनें आपले उदरांत त्यास जीर्ण करून टाकिला. असे बहुत प्रभाव ब्राह्मणाचे मी ऐकिले आहेत, ते कोणावर प्रसाद करूं लागले असतां तोही विपुल कर्तात असत. हे ब्राह्मणा, पती शुश्रुषेचें फल पहा बरें! कीं रोषानें तूं बगळी दग्ध केलीस तें येथें मला कसें समजलें. हे द्विजोत्तमा, जो क्रोध, मोह व हिंसा यांचा त्याग करून सत्य भाषण व वेदाध्ययन कर्तो त्यास देव, ब्राह्मण असें ह्मणतात. कोणी ह्मणतात कीं, धर्म ह्मणून पदार्थ सत्या मध्यें आहे; परंतु मला असें वाटतें कीं, धर्म हा पदार्थ बहुत सूक्ष्म आहे. साक्षात् भगवान् ही धर्म जाणत नाहीं हे विप्रा, तुला धर्म जाणण्याची इच्छा असेल तर येथून मिथिला नगरींत जा आणि तेथें धर्मव्याध ह्मणोन आहे त्यास विचार

ह्मणाजे तो तुला धर्माचा उपदेशकरील. धर्मजाणणारे ह्मणतात कीं, स्त्रि-
या अवध्य आहेत. असें पतिव्रतेनें भाषण ऐकून ब्राह्मण ह्मणतो हे स्त्रिये,
तुझ्या भाषणानें मी बहुत संतुष्ट झालें, तुझा उपदेश मला यशस्कर आहे,
मी आपलें हित साधन करण्या करितां आतां जातों. असें भाषण करून
कौशिक नामक ब्राह्मण मनांत खिन्न होऊन आपली निंदा करीत गेला.
असा विषय या अध्यायांत आहे.

२०७ अध्याय दोनशें सात.– मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, पति
व्रता स्त्रियेनें ब्राह्मणाशीं भाषण केल्यावर मी या स्त्रीचा अपराध केला,
असें मानून तो ब्राह्मण त्या व्याधाचें दर्शन घेण्या करितां मिथिला नगरीस
मोठ्या कौतुकानें गेला असतां व्याध आपले आसमंतात् भागीं मृग, महि
ष इत्यादि पशूंचीं मांसें ठेऊन क्रय विक्रय करीत आहे. इतक्यांत ब्राह्मण
आला हें पाहून व्याध त्या जवळ आला आणि अभिवादन करून बोल
ला हे द्विजोत्तमा, मी व्याध आहें, पतिव्रता स्त्रीच्या भाषणा वरून आ
पण ज्या करितां येथें आलां तें मीं जाणलें. असें ऐकून ब्राह्मण मनांत ह्म-
णतो कीं, हें काय दुसरें आश्चर्य! व्याध ह्मणतो हे द्विजा, हें स्थान माझें मांस
क्रय विक्रयाचें होय. येथें तूं बसण्यास योग्य नाहींस, इच्छा असल्यास मा
झे गृहीं चल. असें ऐकून ब्राह्मणानें बरें ह्मणतांच त्यास घेऊन व्याध आप
ले गृहीं गेला. व्याधानें अर्घ्य, पाद्य, आचमन इत्यादिकें करून ब्राह्मणाची
उत्तम प्रकारें पूजा केली आणि सुखासनीं बसविलें. त्याकालीं ब्राह्मण ह्म-
णतो हे व्याधा, हें घोरकर्म करण्यास तूं योग्य नव्हेस, एवढा ज्ञानी ह्मणवितो-
स आणि मांस विक्रय करतोस हें काय? असें ऐकून व्याध ह्मणतो हे ब्राह्मणा,
माझे कुलास जें उचित कर्म तें मी करीत आहें यास्तव मजवर क्रोध करूं नकोस.
ब्रह्मदेवानें विहित जें कर्म त्याचें पालन करीत माता पितरांची सेवा करून यथाश
क्ती दान करीत देवता, अतिथी यांचा भाग देऊन अवशिष्ट अन्न भक्षण करतों
आणि या जनकाच्या नगरीं धर्म विरुद्ध वागणारा कोणी नाहीं, सकल वर्ण आ-
प आपल्या धर्मानेंच वर्तन करितात, आपला पुत्र जरी दुर्वृत्त असेल तरी रा-
जा त्यास यथाशास्त्र दंड करतो यामुळें या नगरींत अधर्म कोणीच करीत नाहीं

त. हे पशु मारून मी मांस आणिलें नाहीं विक्रय मात्र करितों. सारांष कोणताही अधर्म न करितां धर्मानेंच वर्तन करतों. ज्या नगरीचा राजा स्वच्छंदानें वागतो ते थें प्रजा अधर्म करितात हे ब्राह्मणा, कदाचित् कोणी पापकर्म केलें असतांही- साधूंच्या समागमानें मोक्ष प्राप्तीचा उपाय करण्याची इच्छा करील तर तो स र्व पातका पासून मुक्त होईल. मुख्य पापाचें अधिष्ठान लोभच होय. लोभी पु रुष पापकर्मेच आचरण करतात, कोणी दांभिक अधर्म करीत असून धर्मरू पानें प्रदर्शन करतात, त्यांच्या भाषणांत व वागणुकींत इंद्रियनिग्रहादिक कर्में- दृष्टी पडतात, परंतु वास्तविक शिष्टाचार अतिदुर्लभ आहे. असें ऐकून कौशि क ब्राह्मण प्रश्न करतो हे व्याधा, शिष्टाच्यार ह्मणोन काय आहे तो मला सांग. असें ऐकून व्याध सांगतो हे विप्रा, शिष्टाचारांत यज्ञ दान तप वेदाध्ययन, सत्य, हीं पांच कर्में पवित्र आहेत. काम क्रोध, दंभ, लोभ इत्यादिकांस जिंकून केव- ल धर्मच समजून संतोषानें यज्ञादिक कर्मे करतात तेच शिष्ट समजावे व ज्यां ची वर्तणूक स्वेच्छेनें नसून जे यज्ञादि कर्मे करीत आचार पालन, गुरुसेवा, सत्य, अक्रोध व दान हीं कर्में करतात त्यांस शिष्ट ह्मणावें. शिष्टाच्याराचे ठायीं मन ठे ऊन मनुष्य ज्या वृत्ती प्रत पावतो ती वृत्ति गुरुशुश्रुषणादिक न केल्यास प्राप्त हो त नाहीं. त्याग न केल्यास इंद्रिय निग्रह घडत नाहीं. इंद्रियनिग्रह न केल्यास ब्रह्म प्राप्ती होत नाहीं, ती न झाल्यास वेदाध्ययन निष्फळ होतें ह्मणून त्यागादिक सं पादन करणारास शिष्ट ह्मणावें. शिष्टाचार घडला असतां योग संपादन होतो यास्तव सर्व प्राणिमात्रांवर दया, अहिंसा, कठोर भाषण न करणें इत्यादिक शिष्टाचार आहेत यास्तव सत्पुरुष अहिंसादिकांचें सेवन करतात त्या योगें उ त्तम ज्ञान प्राप्त करून संसार भया पासून ते मुक्त होतात. व्याध ह्मणतो हे ब्राह्म णा, याप्रकारें शिष्टाचार तुला सांगितला. असा विषय या अध्यायांत आहे.

२०८ अध्याय दोनशें आठ— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, पुनःध र्मव्याध बोलला हे ब्राह्मणा, मी हें मांस विक्रयात्मक घोर कर्म करितों हें खचि त आहे; परंतु दैव बलवत्तर असल्यामुळें पूर्व कृत कर्मानें हा दोष घडतो. या दोषा च्या परिहारा विषयीं यत्न करीत असून तो घडत नाहीं. कारण दैव प्रबळ आहे. नष्ट झालेल्या मृगादिकांचें मांस मी विकत घेतों यास्तव त्या हिंसेस मी निमित्त आ

हें. बरें मांस विक्रय करणें ह्मनरी धर्म होय.कारण मांसा पासून देवता,अतिथी भृत्य,पितर यांचा संतोष होतो. कारण सर्व लोक पशु,पक्षी,मृग, औषधी यांजवर उपजीविका करतात. स्व शरीर मांस दानें करून शिबिराजा दुर्गम स्वर्गास गेला. रंतिदेव नामक राजास्व गृहीं देवता,अग्नी, ब्राह्मण यांच्या तुष्टी करितां दर रोज दोन हजार पशु व दोन हजार गाई यांनें हनन करीत होता.अशी त्या राजाची कीर्ती स्वर्ग व मृत्यु लोकीं होती.चातुरमास्य यागानें ठाई पशूचा वध केला असतां अग्नि संतुष्ट होतात. मांसानें अग्नी जसे तृप्त होतात तसे कोणाच्याही हविर भागें करून तृप्त होत नाहींत. यज्ञाच्या ठायीं पशूचा वध द्विजानीं समंत्रक केला असतां मरण पावलेले पशु तत्काल स्वर्गी जातात अशी श्रुती आहे. हे ब्राह्मणा, हे अग्नि मांसेच्छु जर नसते तर हें मांस फार अपवित्र असतें;परंतु देवतां,पितर, अग्नि यांनीं मांसाचा स्वीकार केला या पेक्षां मांसविक्रय तुच्छ आहे असें मला वाटत नाहीं, आपल्यास आवडतें ह्मणोन मांस भक्षण करूंनये.पैतृक अथवा यज्ञ यांच्या उद्देशानें मांस भक्षण केलें असतां विधिच होय. ऋतु कालीं भार्येच्या ठायीं गमन केलें असतां जसें ब्रह्मचर्य नष्ट होत नाहीं तसें विधियुक्त मांस भक्षण केलें असतां मांस भक्षी होत नाहीं.सौदास नामक राजानें अविधीनें मांस भक्षण केलें ह्मणोन तो दोषी झाला.तात्पर्य ज्ञान मार्ग आणि-कर्म मार्ग सांगितले आहेत त्यांमध्यें कर्ममार्ग आचरण करणारा त्याचे हे पूर्वोक्त विधी होत. हे ब्राह्मणा, पूर्वजन्म संस्कारानुरोधें हें कर्म मी करतों यास्तव हें प्रतिबंधक मला नाहीं. मनःपूर्वक या घोर कर्माची निवृत्ती होण्याकरितां सत्य,दान, गुरुशुश्रुषा, द्विजाती पूजन इत्यादि मी आचरितों. अभिमान व वाद यांचा त्याग केला आहे,बरें तूं मनांत विचार कर कीं,हें कर्म मी जर न केलें तर कृष्यादि कर्में करून उदर निर्वाह करावा असें कदाचित् ह्मणशील तरतेंही परम कठिण आहे. नांगराच्या आघातानें पृथ्वींतील जंतु बहुत मरतात यास्तव तीही हिंसा होते, धान्याच्या निक्षेप कालीं जंतुचा नाश होतो. धान्य वृक्ष, औषधी,वनस्पती यांचा च्छेद करणें यांतही प्राण्यांची हिंसा घडते.हे द्विजा, हें संपूर्ण जगत प्राण्यानीं व्याप्त आहे यास्तव कोणचाही उपाय उदरा करितां केला, असतां त्याजपासून हिंसा घ-

इत्ये. पहा बरें जलामध्यें मत्स्य, मत्स्याचें भक्षण करून उपजीविका करतात; मोठे प्राणी लहान प्राण्याचें भक्षण करून निरवाह करतात, आपण विना कारण पृथ्वीवर जरी फिरतों तरी आपल्या पादाच्या आघातानें जंतु मरतात, बसलों अथवा निजलों तरीं सूक्ष्म जंतु मरण पावतात, ज्ञानी अथवा विचारशील कोणी ही असोत त्यांस ही हिंसाकर्म चुकत नाहीं. दुसरें असें आहे कीं, मोठ्या कुलांत उत्पन्न झालेले पुरुष दुष्कर्में करतात, नीच कुलांत उत्पन्न झालेले पुरुष सुकर्में करून घोर पापा पासून मुक्त होतात. असाही कदाचित् व्यत्यास होतो. लोकामध्यें अधर्मास धर्म आणि धर्म असतांही अधर्म समजतात. असे नाना प्रकारचे धर्माधर्म व कर्माकर्म विचार तुला सांगितले. जो आपले कर्मांत रत असतो तो कीर्तीस पावतो. असा विषय या अध्यायांत आहे.

२०९ अध्याय दोनशें नऊ.– मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, धर्मव्याध बोलतो हे ब्राह्मणा, संपूर्ण धर्मास श्रुति प्रमाण आहे. असें वृद्ध ह्मणतात; त्या श्रुतीच्या शाखा अनंत आहेत ह्मणोन धर्माची गती ही सूक्ष्म आहे. पहा बरें प्राणांत समयीं अथवा विवाह कालीं अनृत भाषण केलें असतां दोष नाहीं तें भाषण सत्यच जाणावें, हा धर्माचा विपरयास किती सूक्ष्म आहे तो पहा, काल देश वर्तमान भेदें करून अशुभ कर्म असतांही शुभ सांगितलें आहे आणि शुभ असतां ही अशुभ सांगितलें आहे. आपल्यास विषम अवस्था प्राप्त झाली ह्मणजे मूर्ख दैवाची निंदा करतात, परंतु आपले प्राक्तन कर्माचा विचार करित नाहींत. मूर्ख, आळशी व बुद्धीनें चंचल जे असतात त्यांस सुख दुःखाचा विपरियास झाला-ह्मणजे ते ईश्वरास दोष लावितात, परंतु असें आहे कीं, कर्मकालीं आपण ज्याची जसजशी इच्छा करितो त्यातें तसतसें फळ पुढें येतें, इच्छे प्रमाणें लब्ध होण्यास प्रज्ञा, सुनिती अथवा पौरुष कारण नाहीं. दक्ष, मतिमंत, उद्योगी असतांही त्याचें कार्य सिद्धीस न जाऊन निष्फल होतें याचें कारण प्राक्तन कर्मानुसार होय. कदाचित असाही विपरियास दृष्टीस पडतो कीं, दुष्ट लोक, वंचक याणी सुखाची इच्छा न केली तथापि त्यांस सुख प्राप्त होतें व सुकर्मी, पापभीरु व तपस्वी याणी सुखाची इच्छा केली असतां दुःख प्राप्त होतें हीच धर्माची गती सूक्ष्म जाण. देवांचे यजन करो अथवा न करो जें प्राक्तन कर्म असेल त्या प्रमाणें फलप्राप्त होईल, याबि-

षयीं दृष्टांत असा आहे कीं, दाहा महिने पर्यंत उदरांत गर्भ असतो पुढें तो उत्पन्न होतांच जन्मतः दुष्ट असतो कोणी रोगी, कोणी धनवान असतो, असें उत्पत्तीकालीं होतात तेव्हां त्यापीं या देहांत चांगलीं वाईट कर्मे कधीं केलीं असतात तस्मात् जन्मांतरीं पित्रादि संचित जीं कर्मे यांचाच उपभोग होतो.मनुष्यास रोग तरीं जन्मांतरीय कर्मापासूनच होतात, आधि व्याधी हेच कोणी एक व्याध होऊन देहधारी जो मृग यास पलायन करविनात तेंच व्याधी कुशल वैद्य घालवितात.ग्रहपीडा इत्यादिकें करून ग्रस्त होऊन दुःख सागरांत हजारों लोक पडतात हें तरीं प्राक्तन कर्मच होय. हा जीव अनादि सनातन असें श्रुती ह्मणते, शरीरमात्र प्राण्याचें अनित्य आहे, शरीर नष्ट झालें असतां कर्मबद्ध जीव अन्यत्र देहांत जातो. असें ऐकून ब्राह्मण प्रश्न करतो हे व्याधा, जीव हा शाश्वत कसा याचें तत्व मला सांग. असा प्रश्न ऐकून व्याध सांगतो हे ब्राह्मणा, देहाचा भेद झाला असतांही जीवाचा नाश नाहीं असें असतां जीव मृत झाला असें मूढ बोलतात; परंतु तें मिथ्या आहे. जीव या शरीरास सोडून अन्य देह पावला ह्मणजे तेंच त्यास मरण होय. भोजनाच्या फला सारखें केलेल्या कर्माचें फल अपरिहार्य आहे. जेथें तत्काल फल दृष्टी पडत नाहीं तेथें जन्मांतरी फल प्राप्त होईल असें अनुमान करावें आणि उद्योग न करितां ही धनलाभ होतो त्या ठिकाणीं जन्मांतरीय साधन आहे असें मानावें. जसें पूर्वीचें पुण्य पापरूप कर्म असेल तसे प्राणी उत्पन्न होतात. असें ऐकून ब्राह्मण बोलतो हे व्याधा, पुण्यपाप योनीच्या ठायीं जीवाचा संभव कसा होतो व पुण्य पातकी जाती ह्याही कशानें होतात? असें ऐकून धर्मव्याध सांगतो हे ब्राह्मणा, गर्भोत्पत्ती प्रकाशक ग्रंथानें जें सांगितलें आहे तें संक्षेपानें सांगतो. जसा ज्याणें पूर्वी पुण्य पापाचा संग्रह केला असेल तसा तो त्या योनीस जातो, प्राण्यास शुभ कर्माच्या योगानें देव योनी, मिश्रित कर्मानें, मनुष्य व तामस कर्मानें तिर्यक या योनी प्राप्त होतात. जन्म, मृत्यु व जरा इत्यादिकानीं पीडित जो प्राणी तो आपल्या दोषानीं सहस्रावधी तिर्यक योनींचा व नरकाचा उपभोग करीत या संसारांत चक्रा सारखा भ्रमण पावतो तोच आपल्या तपोयोगादि कर्मानीं शुद्ध झाला असतां बंधापासून निवृत्त होऊन उत्तम लोकास जातो. तो असा कीं, असूया न करणें, उपकार जाणणें इत्यादि कर्मे केलीं असतां सुख

ची वृद्धी होऊन प्राणी स्वर्ग पावतो. जो जितेंद्रिय, नियतात्मा, योगादि संस्कारें क रून सिद्ध जाहालेला त्यास इहलोकीं. व परलोकीं सुख होतें साधूप्रमाणें शिष्टरीतीनें वागावें. विद्वानाची धर्मावर प्रीती असते ह्मणोन त्याच योगें त्याचें जीवन होतें व धनप्राप्ती ही त्याणेंच होते. चित्त वश होणें हें धर्माचें मूल होय. यास्तव चित्तस्वाधीन करून घेतलें असतां कर्मरूप वृक्ष सुफलित होण्यास अडचण पडणार नाहीं. शब्द, स्पर्श, रूप, गंध इत्यादि पदार्थ व स्वामित्व यांची प्राप्ती होणें यास धर्म मूल होय. धर्मे करून अतृप्त जो त्यास ज्ञानी ह्मणतात तो प्रज्ञाचक्षूनें संपूर्ण लोकांचें मन रंजन करीत असतां धर्माचा क्रमें करून त्याग करीत मोक्ष पावतो. तपाचें मूल इंद्रिय निग्रहादिक आहे त्या योगें ब्रह्मपद प्राप्त होतें. असें ऐकून ब्राह्मण प्रश्न करतो हे व्याधा, इंद्रियें तीं कोणतीं त्याचा निग्रह कसा करावा? व त्याजपासून फल काय हें मला सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

२१० अध्याय दोनशें दहा:— मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, विप्रानें भाषण केल्यावर धर्मव्याध बोलतो हे ब्राम्हणा, मनुष्याचें मन अंतःकारांतील पदार्थ ज्ञानार्थ पूर्वी प्रवृत्त झाल्यावर रूपादि ज्ञान होऊन कामादिकांचें सेवन करितें, त्याजपासून प्रीती उत्पन्न होते, प्रीती झाली असतां द्वेष उत्पन्न होतो नंतर लोभ पुढें मोह असे उत्पन्न झाल्यावर या संपूर्णांनीं आत्मा व्याप्त झाला ह्मणजे तो राग द्वेषाच्या स्वाधीन होतो आणि कपटें करून अधर्माची प्रवृत्ती होते. कपटानें धर्म व अर्थ यांची प्राप्ती झाली असतां तेथेंच बुद्धी रमून आपलें सुहृद पंडित ज्ञानी यांणीं निवारण केलें असतांही पाप करण्याची इच्छा करतो आणि ह्मणतो मी असंगी उदासीन आहें पाप कर्माचा लेश मला नाहीं; परंतु हें उत्तर श्रुतीशीं विरुद्ध आहे कारण श्रुतीच्या ठायीं असें सांगितलें आहे कीं, शांत्यादियोगें करून जितेंद्रिय होणारा त्याणें उदासीन असंगी असें भाषण करावें; परंतु तसें नसतां राग, द्वेष यांच्या स्वाधीन जाहलेला पुरुष उदासीना सारखें भाषण करतो हीं केवल त्याच्या मुखांतील अक्षरें मात्र ऐकावीं त्याजपासून कर्म सिद्ध नाहीं असा जो पुरुष यास रागादि दोषांच्या योगें कायिक, वाचिक, मानसिक असा तीन प्रकारचा अधर्म घडतो त्या योगें त्याचे शम दमादि गुण नष्ट होऊन तो समशीलांशीं मित्रत्व करतो आणि त्या योगें यालोकीं व परलोकीं दुःख पाव-

तो. जो मनुष्य नें सांगितलेल्या दोषाकडे पूर्वींच लक्ष ठेवितो तो सर्व दुःखावि षयीं कुशल होऊन साधूचें सेवन करितो त्यास धर्माचे ठायीं बुद्धी होते. असें ऐकून ब्राह्मण ह्मणतो हे धर्मव्याधा, तूं प्रिय असून धर्मयुक्त भाषण करतोस या जवरून तूं धर्मपंथा उत्तम प्रकारचा मला सांगितलास, तूं कोणीतरी ऋषी आहेस असें मला वाटतें. असें ऐकून धर्मव्याध भाषण करतो हे ब्राह्मणा, ब्र ह्मवेत्त्यास जें प्रिय तेंच यालोकीं बुद्धिमंतानें करावें यास्तव त्यास जे प्रिय तें- च माझ्या पासून ऐक. प्रथमतः ब्राह्मणास नमस्कार करून ब्रह्मविद्या जा- ण. हें सर्व जग सर्वप्रकारें कर्मानें अलभ्य आहे आणि पंचमहाभूतें, जीव, ई श्वर या तिहीनीं व्याप्त असल्यामुळें ब्रह्माहून श्रेष्ठ वस्तु प्राप्त करून घेण्या- स योग्य दुसरी नाहीं. पंचमहाभूतें, पंचेंद्रियें, मन, बुद्धी, मंतव्य, बोधव्य, श- ब्दादिक पांच विषय, आत्मा, अहंकार, सत्वादितीनगुण अशा व्यक्ता व्यक्त- रूप चोवीस भोग्य समुदायाहून भिन्न सर्वांतर्यामी भोग करणारें ब्रह्म आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

२११ अध्याय दोनशें अकरा:- मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, असें धर्मव्याधाचें भाषण ऐकून ब्राह्मण बोलतो हे व्याधा, पंचमहाभूतें को णतीं व प्रत्येकाचे गुण कोणते ते मला सांग. असा प्रश्न ऐकून व्याध बोलतो हे ब्राह्मणा, पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश हीं पंचमहाभूतें होत. या म- ध्यें एक एकापेक्षां एक एकांत गुण अधिक आहेत. भूमीचे पांच, उदकाचे- च्यार, तेजाचे तीन, वायूचे दोन व आकाशाचा एक असे गुण आहेत. त्यांत शब्द, स्पर्श, रस, रूप, गंध हे पृथ्वीचे गुण. शब्द, स्पर्श, रस, रूप हे उदकाचे. श ब्द, स्पर्श, रूप हे तेजाचे. शब्द, स्पर्श हे वायूचे. शब्द आकाशाचा याप्रमाणें यांचे गुण आहेत. या प्रकारें पंधरा गुण मनुष्याच्या देहांत असतात हे अ- न्योन्य गुण एकठिकाणीं जाहाले असतां देह उत्तम प्रकारें राहातो. पृथक्- पृथक् जाहाले असतां देहाचा नाश होतो. सर्व पंचमहाभूतें क्रमानें उत्पन्न हो ऊन लय पावतात. ह्या पंचमहाभूतानीं सर्वजगत व्याप्त आहे, हीं संपूर्ण म हाभूतें इंद्रियांसहित उत्पन्न होतात ह्मणून तीं दृष्टिगोचर होतात व इंद्रियें अगोचर आहेत हीं इंद्रियें आपापल्या विषयाचें ग्रहण करितात. सर्व लोकां

मध्यें आत्मा हा व्यापक आहे तो उपाधिरहित व उपाधियुक्त स्वरूपाचा ज्ञाता असून ही सर्व भूतांत राहातो, तो ब्रह्मविद्येच्या योगें पुण्य पापरूप कर्मानें लिप्त होत नाहीं. ज्ञानानें ब्रह्मभूत आत्म्यास जे पहातात त्यांचे क्लेश दूर होतात आणि त्या योगें मोक्ष प्राप्त होतो त्या ज्ञानास मूळ तप तें इंद्रियनियमना वांचून प्राप्त होत नाहीं, तें न केल्यास स्वर्ग, नरक प्राप्त होतात यास्तव इंद्रियनियमन केल्यानें सिद्धि प्राप्त होते. पुरुषास शरीर हाच रथ, बुद्धि हाच सारथी, इंद्रियें हे घोडे यास्तव इंद्रियांच्या नियमनानें पुरुष सुख पावतो. इंद्रियांच्या अनुरोधानें मन चाललें असतां तें बुद्धीचा नाश करितें. यास्तव मनाचें नियमन करावें ह्मणजे ध्यान फल प्राप्त होतें. अ. वि. या अ. आहे.

२१२ अध्याय दोनशें बारा.— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, ब्रह्मस्वरूप धर्म व्याधानें ब्राह्मणास सांगितल्यावर ब्राह्मण संतुष्ट होऊन पुनः बोलतो हे व्याधा, सत्व, रज, तम या तीन गुणांचें फल काय आहे तें मला सांग. असें ऐकून व्याध ह्मणतो हे विप्रा, मोहात्मक मन होण्यास कारण तमोगुण, कांहीं कार्याच्या उद्देशानें जें मन प्रवृत्त होतें त्यास कारण रजोगुण, आत्मबुद्धी प्रकाशक जें त्यास सत्वगुण ह्मणावें. अज्ञानी, निद्रा घेणारा, ज्याचीं इंद्रियें दुष्ट, क्रोधी, आळशी त्या पुरुषास तामस ह्मणावें. प्रवृत्ती वाक्या च्या-वार्यीं ज्याची निष्ठा; मंत्री, अनुसूयक, मानी यांस राजस ह्मणावें. ज्याची बुद्धि निरंतर प्रकाशित असते जो धीर, आशा रहित, असूया न करणारा, अक्रोधी, बुद्धिवान्, इंद्रियनिग्रह करणारा त्यास सात्विक ह्मणावें. रागहीन याचें रूप असें आहे कीं, तो मृदु, अहंकारहीन, आर्जवयुक्त असा असतो व त्यास मानापमान नसून संशय ही नसतो. शूद्र स्वधर्मानें वागला असतां वैश्य होतो, वैश्यास क्षत्रियत्व प्राप्त होतें, क्षत्रिय आपले धर्मानें वागला असतां ब्राह्मण होतो. हे ब्राह्मणा, तुला सत्व, रज, तम गुणांचे स्वभाव सांगितले पुनः काय ऐकण्याची इच्छा आहे? असा विषय या अध्यायांत आहे.

२१३ अध्याय दोनशें तेरा.— ब्राह्मण प्रश्न करतो हे व्याधा, प्रकाश, प्रवृत्ती, मोह इत्यादिकांस आश्रय जो विज्ञानाख्य अग्नि तो पार्थिव शरीराचा आश्रय करून शरीराभिमानी कसा होतो व वायू नाडी मार्गानें शरीरा

नें चलन वलन कसें करतो हें मला सांग? असें ऐकून व्याध सांगतो हे ब्राह्मणा, विज्ञानाख्य अग्नि मूर्ध्याचा (चिदात्म्याचा) आश्रय करून शरीराचें पालन करतो; प्राण वायू, मूर्धा व अग्नि यांत राहून शरीराचें चलन वलन करतो, प्राण वायूंत भूत, वर्तमान, भविष्य हें सर्व जग प्रतिष्ठित आहे यास्तव त्यास सर्व भूतांत श्रेष्ठ ब्रह्मयोनी असें ह्मणतात. चिदात्मा, विज्ञान, प्राण, या तिहींचा जो समुदाय तद्रूप जो जीव तो सर्व कार्य कारणाचा प्रवर्तक होय. तोच जीव उपाधीचा निरास झाला ह्मणजे परब्रह्मरूप होतो व उपाधीच्या आश्रयानें महत्तत्व बुद्धी, अहंकार, पंच महा भूतांचा जो शब्दादि विषय यांचें रूप पावतो. या प्रमाणें अंतर्बाह्य स्थित जें विज्ञान व देहेंद्रियादिक सर्व यांचें पालन प्राण वायूनें होतें. तो प्राण वायु जीव प्राप्त झाल्यानंतर आपापल्या पृथक् गतीनें प्राप्त होऊन समान वायू हें नाव पावतो आणि तो समान वायू अग्नीचा आश्रय करून पोटांतील अन्नोदकाचें पचन करून त्यास मलमूत्राच्या स्थानास नेतो त्या योगें तो वायू अपान नाव पावतो. गमनादिक कर्म व त्या कर्मास अनुकूल जीवचेष्टा व भार वाहण्याचें सामर्थ्य इत्यादिक त्या वायूच्या योगानें घडूं लागलीं ह्मणजे त्यास उदान ह्मणतात आणि तोच मनुष्याच्या शरीराच्या संधींत प्रविष्ट झाला ह्मणजे त्यास व्यान ह्मणतात. त्या वायूच्या योगें जठराग्नि, त्वगादि धातू, अन्नादि रस व पित्तादि दोष, यांचा परिपाक करतो. प्राणांच्या संघर्षणानें जठराग्नि प्रदीप्त होऊन प्राणिमात्रांनीं भक्षित अन्नाचें पचन करतो. समान व उदान यांमध्यें प्राणापान या वायूंच्या संघर्षणानें उत्पन्न जो अग्नि तो सप्त धातूमय शरीरास वृध्यादि परिणामास नेतो. या अग्नीचा गुदस्थानीं प्रवेश झाला ह्मणजे प्राणिमात्रांच्या सर्व प्राणांत नाडीमार्ग उत्पन्न होतात. तात्पर्य प्राणादिकां पासून अग्नि उत्पन्न होतो व त्या पासून प्राणादिक उत्पन्न होतात अग्नीच्या वेगानें चेंडूसमान उर्ध्व उडालेला प्राण गुदासमीप कुंठित होऊन पुनः ऊर्ध्व जाऊन अग्नीस प्रदीप्त करतो यास्तव प्राणाचा निरोध करावा ह्मणजे जठरांतील भय निवृत्त होतें. नाभीच्या अधोभागीं पक्व झालेल्या अन्नाचें स्थान आहे व उर्ध्व भागीं अपक्व अन्नाचें स्थान आहे. नाभीच्या मध्यभागीं शरीरसंबंधीं इंद्रियें लीन होतात, दशविध वायूनीं प्रेरित नाड्या हृदया पासून अन्न.

रसास चहूं कडे नेतात. याप्रमाणें योग्यांच्या मूर्ध्यादिकांपासून गुदा पर्यंत प्राण निरोध करण्याचा मार्ग आहे यास्तव जितश्रम, धीर असे योगी मूर्ध्यादिकांचीं प्राणाचा निरोध करतात. असे प्राण अपान हे सर्व प्राणीमात्रांत व्याप्त आहेत. पंच प्राण, मन, बुद्धी, दशेंद्रियें मिळून सप्तदशात्मक पंचीकरणानें पावलेल्या भूतांपासून उत्पन्न झालेलें जें सूक्ष्म लिंग शरीर त्याशीं ऐक्य पावलेला व प्राण श्रद्धादिक षोडश कला समुदायानीं युक्त जो त्यास सूक्ष्म स्थूल देहवान आत्मा असें जाणावें. हें योगानें, बुद्धि जप केल्यानें घडतें. पूर्वोक्त कला समूहांत अग्नी सारखा प्रकाशरूप आत्मा आहे त्यास जीव ह्मणतात तो जीव ईश्वराच्या सेवका सारखा निर्गुण जो ईश्वर तत्स्वरूपच आहे आत्मा त्या जड शरीरास जीवरूपानें वेष्टित करतो आणि ईश्वररूपानें वेष्टित करितो. त्या उभय स्वरूपाहून जें उत्तम तेंच ब्रह्मस्वरूप होय. त्यास सूक्ष्म बुद्धीनें ज्ञानी जाणतात. चित्त प्रसन्न केल्यानें शुभाशुभ कर्मांचा नाश होऊन सुख प्राप्त होतें. तें चित्त कामक्रोधादिकांचा निग्रह करून सत्यादिकांचा अंगिकार केल्याशिवाय प्रसन्न होत नाहीं. चित्त प्रसादावांचून निर्गुण ब्रह्मसुख प्राप्त होत नाहीं. हे ब्राह्मणा, असें तुझ्या प्रश्नाचें उत्तर संक्षेपानें सांगितलें. आणखी काय ऐकावयाचें असेल तें बोल? असा विषय या अध्यायांत आहे.

२१४ अध्याय दोनशें चवदा.— मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, व्याधानें मोक्षधर्म संपूर्ण सांगितला असतां ब्राह्मण संतुष्ट होऊन पुनः बोलला हे व्याधा, आपण मला उत्तम प्रकारचा धर्म सांगितला, आपल्यास धर्मा विषयीं कांहीं अविदीत आहे असें नाहीं. असें ऐकून व्याध ह्मणतो हे विप्रा, ज्या धर्मानें मला ही सिद्धी प्राप्त झाली तो धर्म पाहण्याकरितां गृहांत चल आणि माता पितरांस पहा. असें बोलून उभयतां गृहांत गेले आणि देवालया सारखी एक खोली होती तीमध्यें वृद्ध मातापितर बसलेले होते त्यांस धर्मव्याधानें नमस्कार केला, त्याकालीं मातापितर बोललीं हे पुत्रा, ऊठ धर्मरक्षण करोत दीर्घायुष्य तुला प्राप्त होवो. तूं आमची उत्तम प्रकारें सेवा केलीस त्या योगानें तिन्ही वंशांचा उद्धार केलास. असें ऐकून व्याध बोलला हा ब्राह्मण तुमच्या दर्शना करितां आला आहे. असें ऐकून उभयतांनीं त्या ब्राह्मणाची पूजा केली असतां धर्मव्याध बोलला हे वि

मा, हे शूद्र मातापितर माझें मुख्य दैवत होय. यांस मी आपले हस्तानें स्नान घा-
लून भोजनादि आपले हस्तानेंच घालतो. यांच्यांशीं कधीं अप्रिय भाषण करीत
नाहीं. गृहस्थाश्रमाचा धर्म असा आहे कीं, माता पितर यांची शुश्रुषा करावी. अ
सा विषय या अध्यायांत आहे.

२१५ अध्याय दोनशें पंधरा.— मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, व्याध-
आपले गुरु मातापितर ब्राह्मणास दाखवून बोलला हे ब्राह्मणा, यांच्या सेवेनें
प्रज्ञाचक्षु मी झालों, हेंच माझें तपाचें बल, पहा कीं, पतिव्रतेनें तुला सांगितलें कीं,
मिथिलेमध्यें जा, तेथें कोणी एक व्याध राहातो तो तुला धर्म सांगेल. असें ऐकून
ब्राह्मण भाषण करतो हे व्याधा, सत्यशील जी पतिव्रता इणें जें मला सांगितलें तें
संपूर्ण सत्य झालें, तूं मोठा ज्ञानी आहेस या विषयीं माझा निश्चय झाला. असें
ऐकून व्याध ह्मणतो हे द्विजश्रेष्ठा, ज्याकालीं मी तुला पाहिलें त्याच कालीं समज-
लों कीं, पतिव्रतेनें उपदेशाकरितां तुला मजकडे पाठविला. आतां मी तुझ्यावर अ
नुग्रह करून तुला हितोपदेश करतों कीं आपले मातापितर वृद्ध झालेले घरीं टाकू
न वेदाभ्यास करण्या करितां बाहेर निघालास हें तूं फार अयुक्त केलेंस. अंध झाले
ले मातापितर तुझ्या शोकानें फार पीडित झाले आहेत त्यांचा तूं लौकर जाऊन
शोक निवारण कर. असें ऐकून ब्राह्मण भाषण करतो हे व्याधा, प्रारब्धवशें-
करून मी येथें आलों आणि तुझा माझा भाषण संबंध झाला. तुझ्या सारखा
विद्वान सहस्त्रामध्यें एखादा. मी नरकामध्यें पडलेला तुझ्या उपदेश वाक्या वरू
न उद्धरलों. आतां तुझ्या उपदेशावरून माता पितरांची शुश्रुषा करीन तुझ्यासा
रिखा धार्मिक शूद्रा मध्यें मी कोणी पाहिला नाहीं; परंतु आतां माझा निश्चय झाला,
ज्ञानाविषयीं योनीत कारण आहे असें नाहीं. तुला मी आतां शूद्र असें जाणा-
त नाहीं; परंतु तूं कोणाच्या कर्मविपाकानें या योनींत आलास हें मला सांग. अ
सें ऐकून व्याध भाषण करतो हे ब्राह्मणा, मला ब्राह्मण पूज्य आहेत आतां पूर्व
देह वृत्तांत सांगतों. पूर्वी मी वेदाध्यायी, वेद वेदांग पारग ब्राह्मण होतों माझा ए-
क मित्र धनुर्वेद परायण राजा होता. कोणे एके दिवशीं तो राजा सुहृद मित्र व-
मज सह वर्तमान मृगये करितां वनांत गेला, तेथें राजानें बहुत मृग मारिले. रा-
जाच्या स्नेहास्तव मींही मृगाचें हनन केलें त्यामध्यें एक ऋषी होता त्यासही मी

मृग असें समजून बाण मारिला.त्या योगानें तो ऋषी विव्हल होऊन बोलला मी कोणाच्या अपराध केला नसतां कोणी दुष्टानें हें पाप कर्म केलें.असें बोलत आहे. इतक्यांत मीही तेथें गेलों आणि ऋषीस पाहून माझ्या मनांत बहुत व्यथा उत्पन्न झाली. हें पाप आपले हातून अज्ञाना मुळें घडलें.असें मनांतसमजूनमीऋषीसबोललों कीं, माझ्या अपराधाची क्षमाकर. त्याकालीं ऋषी क्रोधानें बोलला कीं, अतःपर तूं शूद्र योनी मध्यें व्याधाचे जन्मास जाशील. अ. वि. या अ. आहे.

२१६ अध्याय दोनशें सोळा — व्याध बोलतो हे ब्राह्मणा, असा ऋषीनें मला शाप दिला असतां मी विनंती केली कीं, हे ऋषे, अज्ञानानें हें कर्म मी केलें त्याची क्षमा करावी.असें ऐकून ऋषी बोलला कीं, माझा शाप अन्यथा व्हावयाचा नाहीं तूं माझा नाश करण्या करितां हें कर्म केलें नाहीं असें म्हणतोस तर तुला उश्शाप देतों कीं, तूं शूद्र योनीच्या ठायीं असतां महान् धर्मज्ञ होशील,माता पितरांची उत्तम प्रकारें शुश्रूषा करशील त्या योगानें तुला सिद्धी प्राप्त होईल आणि ज्याति स्मरण होऊन स्वर्गलोकीं जाशील, शाप संपूर्ण झाला म्हणजे ब्राह्मण होशील.या प्रमाणें ऋषीनीं मजवर प्रसाद केला असतां त्यांच्या शरीरापासून बाण काढून त्यांस आश्रमीं आणिला.हें संपूर्ण माझें वर्तमान तुला सांगितलें आतां मी स्वर्गलोकीं जातों. असें ऐकून ब्राह्मण भाषण करतो हे व्याधा, पुरुषास सुख दुःख दोन्ही प्राप्त होतात त्या विषयीं विषाद मानूनये,तूं हें बहुत दुष्कर कर्म करतोस आणि धर्माचें रक्षण करतोस हें मोठें आश्चिर्य वाटतें. आतां ज्याती विषयीं तूं खेद मानूनको.सांप्रत तूं मला ब्राह्मण आहेस असें वाटतें कारण ब्राह्मण असतां विकर्माच्या ठायीं जो युक्त होतो तो शूद्र समजावा, जो शूद्र असून धर्माचे ठायीं युक्त होतो तो ब्राह्मण समजावा. कर्मदोषानेंच उत्तम गती किंवा अधमगती प्राप्त होते.असें ऐकून व्याध भाषण करतो हे ब्राह्मणा, प्रज्ञेनें अंतःकरणाचें दुःख व औषधानें शरीर दुःख निवारण करावें. असें जाणलें असतां मूर्खत्व प्राप्त होत नाहीं. अनिष्टाची प्राप्ती इच्छांचा वियोग अल्प बुद्धी पुरुषास प्राप्त होतात. सत्व,रज,तम हे गुण मनुष्यास प्राप्त होतात. ज्या ज्या कालीं ते जसे प्राप्त होतील तस तसें होतें. ज्ञानानें जे तृप्त असतात ते सुखी समजावे.जे ज्ञानमार्गानें परम गतीस गेले ते कधीं-

शोक करीत नाहींत. हे ब्राह्मणा, अशा गुणानीं मी निरंतर युक्त आहें ह्मणो न मला कांहीं दुःख होत नाहीं. असें ऐकून ब्राह्मण ह्मणतो हे व्याधा, तूं बुद्धिमान् आहेस मी तुजकरितां शोक करीत नाहीं. आतां मी तुझी आज्ञा घेऊन गृहीं जातों, तुह्मी धर्मरक्षण करा. मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, असें ऐकून व्याधानें तथास्तु असें ह्मटलें असतां तो ब्राह्मण त्यास प्रदक्षणा करून आपले घरीं गेला आणि माता पितरांची शुश्रुषा करूं लागला. पतिव्रता व ब्राह्मण यांचें माहात्म्य व व्याधानें सांगितलेली मातापितरांची शुश्रुषा ही मी तुला सांगितली. असें ऐकून धर्मराज ह्मणतात हे ऋषे, तुमच्या मुखापासून हें अद्भुत आख्यान ऐकिलें येणें करून मला परम काष्ठेचा आनंद झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

२१७ अध्याय दोनशें सतरा— वैशंपायन ह्मणतात हे जनमजया, धर्मयुक्त कथा मार्कंडेय मुखापासून ऐकून धर्मराज प्रश्न करतो हे ऋषे, अग्नि वनाच्या ठायीं कां गेला आणि अंगिरानें अग्नीचें तेज घेऊन यज्ञांतील हविर्भाग कसा घेतला? अग्नि एक असतां कर्मभेदें करून बहुत नावां तें पावला हें कसें? कार्तिकस्वामी अग्नीचा पुत्र झाला व रुद्र, गंगा व कृत्तिका यांजपासून त्याची उत्पत्ति कशी झाली हें मला सांगा. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय भाषण करतात हे राजा, याविषयीं तुला पूर्वीचा इतिहास सांगतों. ज्याकालीं अग्नि तप्त होऊन वनाच्या ठायीं तप करण्याकरितां गेला त्याकालीं अंगिरा ऋषीनीं ही मोठें तप करून संपूर्ण प्रजेस संताप उत्पन्न करीत संपूर्ण अंधःकाराचा नाश केला. आपले आश्रमीं राहून अग्नीपेक्षांही अधिक तेज धारण करून सर्व जगत् प्रकाशित केलें. त्यापासून अग्नीसही संताप उत्पन्न होऊन तो मनांत चिंता करूं लागला कीं, ब्रह्मदेवानीं हा अग्नी दुसरा कोठून उत्पन्न केला? मी तप करीत असतां माझें अग्नित्व नष्ट झालें आतां मी आपल्या पहिले योग्यतेवर कसा जाईन अशी अग्नीस चिंता उत्पन्न होऊन तो अंगिराकडे गेला. ऋषी अग्नीकडे पाहातांच भयानें बोलले हे अग्नि, तूं तिन्हीं लोकांत विख्यात आहेस ब्रह्मदेवानीं प्रथमतः तुला अंधःकारनाशक असा उत्पन्न केला, यास्तव तूं आपले स्वस्थानी जा आणि आपला अधिकार पाव. असें ऐकून अग्नि

ह्मणतो हे ऋषे,मी आतां या लोकीं नष्टकीर्ती झालों लोकांत मला कोणी जाणत नाहीं.तुलाच संपूर्ण जाणतात यास्तव मी आपलें अग्नीत्व तुला देतों आणि तूं श्रेष्ठ अग्नि प्रथम हो मी दुसरा होईन.असें ऐकून अंगिरा भाषण करतो हे अग्ने, प्रजा स्वर्गप्राप्ती होण्या करितां जो हविरभाग देतात तो घेऊन तूं अंधःकार नाशक हो आणि मला आपला जेष्ठ पुत्र कर. असें ऐकून अग्नीनें तसेंच केलें तेव्हां त्या अंगिरास बृहस्पती नामक पुत्र झाला. हें देवांस ज्या कालीं समजलें त्या कालीं संपूर्ण देव अंगिरस पुत्रास बोलले हें आश्चिर्य काय झालें!तेव्हां अंगिरस पुत्रानें झालेला वृत्तांत सांगितल्यावर देवानीं सांगितलें कीं, तूं आमचा गुरु आह्मीं तुझा गुरुत्वें करून स्वीकार केला.पुढें अंगिरा देवास बोलला हे देवहो,कर्म भेदें करून नाना प्रकारचे अग्नि या लोकीं आहेत,परंतु त्यात्या कर्माच्या ठायीं त्याचीं नांवें भिन्न आहेत. असा विषय या अध्यायांत आहे.

२१८ अध्याय दोनशें अठरा.— मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, ब्रह्मदेवाचा द्वितीय पुत्र जो बृहस्पति याची प्रजा तुला सांगतों. बृहस्पतीची जो भार्या शुभा इजपासून भानुमती, रागा, सिनीवाली, अर्चिष्मति, हविष्मति, महामती आणि कुहु अशा आठ कन्या झाल्या. अ. वि. या अ. आहे.

२१९ अध्याय दोनशें एकूणीस.— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, बृहस्पतीची तारा नामक भार्या इजपासून सहा अग्नि व एक कन्या झाली त्यांत बृहस्पतीचा पुत्र शंयु नामक अग्नी होता.त्याची भार्या सत्या तिजपासून दोन पुत्र व तीन कन्या झाल्या त्यांत पहिला भरद्वाज दुसरा भरत त्या भरतापासून भरत नामक एक पुत्र व भरती नामक एक कन्या झाली. शंयूचा प्रथम पुत्र जो भरद्वाज याज पासून वीरा नामक भार्येच्या ठायीं रथप्रभ नामक पुत्र झाला त्यास रथ्याध्वान व कुंभरेता असें ह्मणतात. रथप्रभ पासून शरयु नामक भार्येच्या ठायीं एक पुत्र झाला. बृहस्पतीचा दुसरा पुत्र यश, श्री व तेज ईहीं करून कधीं भ्रष्ट न व्हता ह्मणोन त्याचें नांव निश्चवन होय. त्याज पासून विपाप्मा नामक एक पुत्र झाला. त्यासच सत्य ह्मणतात. बृहस्पतीचा तिसरा पुत्र संपूर्ण विश्वांच्या बुद्धी ग्रहण करून राहातो त्यास ज्ञान्यानीं विश्वजीत असें नांव ठेविलें आहे.चतुर्थ पुत्र ज्यानें स्मरण केलें असतां देहांत जें आहे त्याचा पाक होतो ह्मणोन त्यास

विश्वभक्षक असें ह्मणतात. हा अग्नि ब्रह्मचारी, नियतात्मा, निरंतर विपुलवृत्ती-ह्मणोन ब्राह्मणानीं पाकयज्ञाच्या ठायीं याचें पूजन केलें आहे यास गोमती-नामक नदी फार प्रिय आहे. बृहस्पतीचा पांचवा पुत्र जला मध्यें राहून जलाचें प्राशन करतो ह्मणोन त्यास वडवाग्नी असें ह्मणतात याचीच उर्ध्वगती आहे. ह्मणोन यास उदान व ब्राह्मण असें ह्मणतात. प्राणाचा आश्रय यानेंच केला आहे बृहस्पतीचा साहावा पुत्र हविर्भागाचा पूर्वार्ध व उत्तरार्ध होमांतीं भक्षण करतो ह्मणोन त्याचें नांव याज्ञिकानीं स्विष्टकृत असें ठेविलें आहे. बृहस्पति अग्नि ज्या कालीं क्रोधयुक्त झाला तेव्हां त्याच्या तेज प्रभावानें स्वेद उत्पन्न झाला. त्याज पासून स्वाहा नामक सातवी कन्या उत्पन्न झाली आणि तिनें बृहस्पतीच्या तेजाची शांती केली. ही स्वाहा नामक कन्या रजोवस्थेंत असतां इज पासून काम, तामस अवस्थेंत अमोघ व सात्विक अवस्थेंत उक्थ, असे तीन पुत्र झाले. हे सर्व अग्नीच होत. असा विषय या अध्यायांत आहे.

२२० अध्याय दोनशें वीस— मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, काश्यप, वाशिष्ठ, प्राण, च्यवन, त्रिसुवर्चक या पांच ऋषीनीं पुत्रा करितां बहुत वर्षे तीव्र तपश्चर्या करून महाव्याहृति पूर्वक ध्यान केलें तेणें करून पंच वर्णात्मक तेजस्वी पांचाही वंशांचा उद्धार करणारा पांचजन्य या नामें एक पुत्र-झाला. अग्नि सारखें शिर, सूर्या सारखे बाहू, सुवर्णा सारखे नेत्र व कृष्ण जंघ अशी त्याची अवयव स्थिती होती. तपानें हा पुत्र निर्माण झाला ह्मणोन यास तपोनामा कोणी ह्मणतात. त्याणें दहा हजार वर्षे तप करून पित्याच्या उद्धारा करितां प्रजा उत्पन्न केली त्यांचीं नावें मूर्ध्या पासून बृहत्, मुखा पासून रथंतर, ह्या दोन अहोरात्र देवता वेगानें आयुष्यातें हरण करणाऱ्या झाल्या. नाभी पासून शिव, बला पासून इंद्र, प्राणा पासून वायु व अग्नि, बाहू पासून अनुदात्त व विश्वेभूत कांहीं दिवसानीं वाशिष्ठा पासून प्राणधी, कश्यपा पासून मैत्रेय, अंगिरा पासून भानु, सुवर्च्या पासून सोभर, प्राणा पासून अनुदात्त असे पंचवीस देव झाले. पुढें सुभीम, अतिभीम, भीम, भीमबल, अबल, सुमित्र, मित्रवंत, मित्रज्ञ, मित्रवर्धन, मित्र धर्मा, सुरप्रवीर, वीर, सुरेश, सुवर्चस, सुरहंता, या पंधरा असुरांस यज्ञभाग न मिळावा व पंचवीस देवांस मिळा

वा याजकरितां पांचजन्यानें तपकरून राक्षसांच्या हविर्भागाचा नाश केला. त्या दिवसा पासून वेदीच्या बाहेर अथवा चिताग्नीचे ठायीं दानवांस हविरभाग कल्पिला आहे कदाचित दैत्य वेदींत प्रवेश करूं लागले असतां रक्षोघ्न सूक्तमंत्रें करून त्यांचा नाश होतो ह्मणोन दैत्य यज्ञ संबंधीं हविर्भाग घेण्यास समर्थ होत नाहींत. पांचजन्यास बृहदुक्थ नामक एक पुत्र झाला त्याची अग्निहोत्राच्या ठायीं ऋत्विजानीं मोठी कीर्ती वर्णिली आहे, त्याज पासून रथंतर नामक पुत्र झाला. त्याज पासून मित्रविंद झाला त्याला ही यज्ञ वेत्यानीं हविरभाग कल्पिले आहेत. असा विषय या अध्यायांत आहे.

२२१ अध्याय दोनशें एकवीस:— मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, आतां शत्रूच्या पौत्राचें स्तवन ऐक. शंयूस पौत्र भरत या नावाचा अग्नि झाला तीन लोकांस पुष्टी देतो ह्मणोन त्यास पुष्टिमति असें ह्मणतात. तोच प्रजेच्या दुःखाचें निवारण करतो ह्मणोन त्यास भरत ह्मणतात. तसाच पांचजन्याचा तृतीय पुत्र जो शिव नामक अग्नि त्यास कांहीं दिवसानीं पुरंदर, उष्मा, मनु, शंभु व अवसथ्य असे पांच पुत्र झाले. अस्त कालीं सूर्यास अग्नित्व प्राप्त होतें त्या अग्नीनें घोर असुर व नाना प्रकारचे मनुष्य उत्पन्न केले, तो सूर्य नामक अग्नि तपा पासून उत्पन्न झाला. तपाचा पुत्र मनु व भानु हे अंगिरा पासून उत्पन्न झाले त्या भानूस ब्राह्मण बृहद्भानु ह्मणतात. भानूस सुप्रजा व बृहद्भासा अशा दोन भार्या होत्या त्यांत सुप्रजेस बलद, मन्युमान व विष्णु असे तीन अग्नी रूप पुत्र झाले व बृहद्भासेस आग्रयण, विश्वेदेव व स्तुभ असे तीन अग्नि रूप पुत्र झाले. भानूस मनु असें ह्मणतात त्याची निशा नामक तिसरी भार्या होती तिला अग्नि, सोम, वैश्वानर, विश्वपति, सन्निहित, अकल्मष, कपिल, वीति, शुचि, सुमनी, सुरभिमती, उत्तराग्नि, पथिकृति, सूतिकाग्नी, अग्निमति व रोहिणी नामक एक कन्या अशीं सोळा आपत्यें झालीं. असा विषय या अध्यायांत आहे.

२२२ अध्याय दोनशें बावीस:— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, उदकांत विद्दिस अशा सह संज्ञक अग्नीला मुदिता नामक प्रिय भार्या होती तिला भू व भुव या उभय लोकांचा स्वामी असा अद्भुत नामक अग्नि झाला. त्यास गृहपती असें ह्मणतात, सर्व यज्ञाच्या ठायीं यास हविरभाग देतात उदकाचा तो

गर्भ ह्मणोन त्यास महत् असें ह्मणतात. सर्वभूतांचें दहन कर्ता ह्मणोनं त्यासभ
रत असें ह्मणतात. प्रथमता देव त्याचा शोध करीत असतां तो समुद्रांत जाऊ
न अंगिरा ऋषीस बोलला कीं, सर्व देवांचा हवि आपण ग्रहण करावा आप
ल्या पुढें माझें सामर्थ्य नाहीं. असें ऋषीस बोलून अन्यस्थलीं तपश्चर्येस गेला
इकडे देव त्याचा शोध करीत करीत समुद्र तिरीं आले असतां मत्स्यानीं त्यास
सांगितलें कीं, कोठें तरी तो तपश्या करीत आहे, अन्य ठिकाणीं त्याचा शोध क-
रा. असें ऐकून अग्नीनें मत्स्यांस शाप देऊन पुनः पूर्वी प्रमाणें अंगिरा ऋषी-
ची प्रार्थना करून भूमीत प्रवेश केला; तेव्हां त्याच्या पुवा पासून गंधक, अस्थी
पासून देवदार, कफा पासून स्फटिक, नखापासून अभ्रक, शिरां पासून प्र-
वाल उत्पन्न झाले. अशा नाना प्रकारच्या धातु त्याज पासून उत्पन्न होऊन अग्नि
नष्ट झाला असतां सर्व अंगिरसाची पूजा करूं लागले. नंतर अथर्वा नाम क-
ऋषी अग्नीस हांक मारून बोलला तूं आपले स्थानीं जा. अग्नीनें ऋषीस दे
दीप्यमान पाहून सिंधुनद, देविका, सरस्वती, गंगा, शरयु, गंडकी इत्यादि न
द्यां मध्यें प्रवेश केला त्या त्या ठिकाणांतून तितके अग्नि उत्पन्न झाले. जित
के अग्नि तितकेच सोम ह्मणोन अग्निसोमात्मक सर्व जगत आहे. हे सर्व अ-
ग्नि वंशांत उत्पन्न जाहाले यापेक्षां बहुत अग्नि उत्पन्न जाहाले त्यांचा महिमा
वेदांत सांगितला आहे. अंगिरा अग्नि मुख्य त्याज पासून इतर अग्नि उत्पन्न झा
ले हा तुला अग्निवंश सांगितला. असा विषय या अध्यायांत आहे.

२२३ अध्याय दोनशें तेवीस:— मार्कंडेय भाषण करतात हे धर्म-
राजा, नाना प्रकारच्या अग्नीचे वंश तुला सांगितले, आतां कार्तिक स्वामीची
उत्पत्ती सांगतों. ब्रह्म ऋषींच्या भार्यांच्या योगानें अद्भुत नामक अग्नीला अ
द्भुत नामक पुत्र झाला. याचें कारण पूर्वी देव, असुर यांचें परस्पर युद्ध हो
त असतां असुरांनीं देवांचा पराभव केला हें पाहून इंद्र आतां देवसेनेचें
कोण संरक्षण करील अशी चिंता करूं लागला आणि म्हणाला कीं, जो या
देवसेनेचें संरक्षण करील तो पुरुष मला मान्य आहे असें ह्मणोन मानसप
र्वतीं गेला. तेथें एक स्त्रीचा शब्द असा श्रवणांत आला कीं, माझ्या रक्षणा
करितां येथें ये आणि रक्षण करून मला पती दे अथवा स्वतः हो, तो आर्त,

शब्द ऐकून इंद्र, भिऊनको असें प्रत्योत्तर देऊन तेथें गेला आणि हातामध्यें गदा घेऊन केशी नामक दैत्य उभा होता त्यास बोलला हे दुष्टा, तूं कोण? येथें कशास आलास? ही कन्या कोणाची हरण केलीस? मी इंद्र इचें संरक्षणकरण्यास येथें आलों. असें ऐकून केशी दैत्य बोलला कीं, ही कन्या मी स्त्रीहून आहें इची इच्छा तूं धरूंनको जर वांचण्याची इच्छा असल्यास आलासतसा माघारी जा. नाहींतर तुझा वध करीन. असें बोलून त्यानें इंद्रावर गदा टाकिली असतां इंद्रानें ती गदा छिन्न करून टाकिली, तेव्हां केशीनें क्रुद्ध होऊन इंद्रावर शैलशिखराचा प्रहार केला असतां इंद्रानें वज्रें करून शैलशिखराचा नाश केला आणि केशीस त्याच शिखरानें पीडित केला असतां तो किंचित् पृथ्वीच्या ठायीं पडून अत्यंत दुःखी झाला आणि कन्येचा त्याग करून पळाला. नंतर इंद्र बोलला हे कन्ये, तूं कोण कोणाची कन्या? येथें कशाकरितां आलीस तें सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

२२४ अध्याय दोनशें चवीस:- कन्या भाषण करते मी देवसेना नामक प्रजापतीची कन्या होय. दैत्यसेना नामक माझी दुसरी भगिनी होती ती-केशीनें हरण केली. मानस पर्वतीं आह्मीं सखी सहवर्तमान निरंतर वास करतों तेथें हा केशी येऊन आमची प्रार्थना करीत असतां दैत्यसेना नामक माझी भगिनी त्यास वश झाली तो मलाही घेऊन जात होता, परंतु हे इंद्रा, त्याजपासून तूं माझें रक्षण केलेंस आतां तूं सांगशील तो पती करीन. इंद्र ह्मणतो तूं माझ्या मातेच्या भगिनीची कन्या तेव्हां तुला पती कसा पाहिजे तें मला सांग. कन्या बोलत्ये हे इंद्रा, मी अबला आहें पित्यानें मला असें सांगितलें आहे कीं, सुरासुर यांस नमस्कृत असा तुला पती प्राप्त होईल. इंद्र ह्मणतो हे देवी, तुझा पती सबल किती असावें हें सांग. कन्या भाषण करते देव, दानव, यक्ष, राक्षस, गंधर्व यांस जो जिंकील व तुज सहवर्तमान संपूर्ण भूतांचा जो पराभव करील तो माझा भर्ता होईल. असें ऐकून इंद्र अतिदुःखित होऊन बोलला असा पती मिळणें कठीण दिसतें नंतर उदयाचल पर्वताच्या ठायीं दृष्टी देऊन सूर्याकडे त्यानें पाहिलें तों अमावास्येच्या दिवशीं रौद्र वेळेस सूर्यानें चंद्रामध्यें प्रवेश केला नंतर देवासुरांचा संग्राम [illegible]

त धनें करून युक्त पूर्वदिशा पाहिली. संपूर्ण समुद्र आरक्त झालेला पाहून-भृगु, अंगिरा याणीं पृथक् पृथक् मंत्रांचे उच्चार करून हानामध्यें हव्यें घेतलीं आहेत असें पाहिलें. वन्ही सूर्यांत व सूर्य चंद्रांत प्रविष्ट झाला. अशा पर्वकाळीं सूर्य,चंद्र व अग्नि यांचें ऐक्य झालेलें पाहून तो मनांत विचार करूं लागला कीं, आज रात्रीस महान् कोणाचें युद्ध होईल हा काल मोठा भयंकर आला. या काळीं जो पुत्र होईल तो संपूर्ण गुणानीं युक्त होऊन या कन्येचा पती होईल असा विचार करून इंद्र त्या कन्येस घेऊन ब्रह्मलोकीं गेला आणि बोलला हे पितामह,या कन्येस साधुशूर असा पती कोण मिळेल;असें ऐकून ब्रह्मदेव बोलले हे इंद्रा, जशी तूं मनामध्यें चिंता केलीस त्याप्रमाणें महान् पराक्रमी एक गर्भ उत्पन्न होऊन तोच तुझ्या सेनेचा पती होईल आणि इचा स्वीकार करून भर्ता होईल. असें ऐकून पुरंदर ब्रह्मदेवास नमस्कार करून त्या कन्ये सह वर्तमान जेथें वशिष्ठ प्रमुख ऋषि होते तेथें गेला आणि ऋषींनीं अग्नीच्या ठायीं हविर्भाग समर्पण केलेले घेण्यास हजारों देव आलेले पाहून त्यास आश्चर्य वाटलें. ऋषींनीं समर्पण केलेल्या होम द्रव्यानें अग्नि संतुष्ट झाला आणि हव्य द्रव्यें घेऊन ऋषींस देण्याकरितां त्यांच्या अग्र भागीं आला तेव्हां ऋषिपत्न्या काम वश्य झाल्या,पुनः अग्नीनें मनांत विचार केला कीं, ही गोष्ट चांगली नाहीं कारण त्या ऋषिपत्न्या पतिव्रता अकामिनी असून यांविषयीं कामना कशी करावी,यांचें दर्शन करण्यास मी अशक्य मग स्पर्श कोठून असा विचार करून त्यानें गार्हपत्यांत प्रवेश केला आणि त्या पत्न्यांकडे पहात असतां त्यांचा लाभ होईना; तेव्हां तो वनामध्यें गेला. तेथें स्वाहा नामक दक्षाची कन्या होती तिणें अग्नीच्या संभोगाची इच्छा केली असतां अग्नीचें हृदय ऋषिपत्न्या कडे गेलें होतें ह्मणोन तो स्वाहे कडे पाहीना नंतर स्वाहेनें असा विचार केला कीं, सप्तऋषींच्या पत्न्यांचें रूप पृथक् पृथक् आपण धरून आपल्या रूपें करून यास मोहित करावा ह्मणजे आपल्यावर याची प्रीती होऊन कामाची शांती होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

२२५ अध्याय दोनशें पंचवीस:- स्वाहा नामक अग्नीची भार्या अंगिरस नामक ऋषीची जी पत्नी शिवा इचें रूप धरून अग्नी पाशीं गेली आणि-

बोलली हे अग्नि, मी कामें करू संतप्त आहें याची शांती तुह्मी करावी न केलीत र मी मरण पावेन. अंगिरस नामक ऋषीची मी शिवा भार्या होय दुसऱ्या ही ऋषि पत्न्या तुज सह वर्तमान विषय करण्यांची इच्छा करतात यास्तव मी प्रथम आले आहे. असें ऐकून अग्नि भाषण करतो मी कामार्त आहें ह्मणोन तुह्मीं सप्त ऋषीं- च्या पत्न्यानीं कसें जाणलें, असें ऐकून शिवा भाषण करते तुझें इंगीत जाणोन आह्मीं समजलों तूं आह्मांस फार प्रिय आहेस, परंतु तुझ्याशीं भाषण करण्या स आह्मांस भय झालें होतें मस्तुत निर्भय होऊन सर्वांनीं मिळोन आतां तुज कडे मला पाठविलें त्यास भोग देऊन लोकर माझ्या कामाची शांती कर. ऋषि पत्न्या पुनः माघारे येण्याची वाट पाहात असतील. असें ऐकून अग्नीनें शिवे- चा उपभोग केला. नंतर शिवेनें हे रूप धरून जावें तर संपूर्ण लोक ऋषीची पत्नी अग्नीकडे गेली होती असा अग्नीस व सर्व ऋषींस दोष लावितील, तेव्हां आपण गरुडीचें रूप धरून येथून जावें असा मनामध्यें निश्चय करून सुपर्णी रूपानें अग्नीचें रेत गळित झालेलें आपले हस्तांत घेऊन श्वेत पर्वतीं जाऊन त्या पर्वता च्या पृष्ठभागीं कांचन कुंड होतें तेथें तें रेत टाकिलें. याप्रमाणें साहा ऋषिपत्न्यां नें पृथक् पृथक रूप धरून गरुडीच्या वेषानें कांचन कुंडांत अग्नीचें रेत टाकि लें. अरुंधती परम पतिव्रता भर्त्याच्या शुश्रुषेंत तत्पर त्यायोगानें तिचें रूप स्वा हेस धारण करण्यास शक्ती झाली नाहीं. त्या कांचन कुंडांत पतित झालेलें जें अ ग्नीचें रेत याची ऋषींनीं नजाणतां पूजा केली तेणें करून तत्काल त्याजपासून एक बालक उत्पन्न झाला त्यास स्कंद हें नांव प्राप्त झालें. यास साहा शिरें, बारा कर्ण, बारा नेत्र, बारा हस्त, एक ग्रीवा, एक जठर, असा विचित्र बाल द्वितीये- स प्रगट, तृतीयेस काहींसा लहान, चतुर्थीस विद्युल्लते सारखें त्याचें तेज झालें. त्रिपुरासुराच्या वधाकरितां पूर्वीं शिवानीं जें धनुष्य धारण केलें होतें तेंच धनु ष्य स्कंदानें घेऊन एकाएकीं महान् नाद केला त्या योगानें चराचर जगत मोहि त झालें. नंतर चित्र व ऐरावत या नावांचे दोन गज प्राप्त झाले त्यांस दोन हातां त घेऊन एक हातांत शक्ति व एक हातांत कोंबडा व दोन हातानें शंख घेऊन मो ठा भयंकर नाद केला त्या नादानें संपूर्ण भूतें त्रास पावलीं, दोन हातानें आकाशा चें ताडण केलें. बालकाचा भयंकर शब्द ऐकून भयानें संपूर्ण जन त्यास शरण

आले त्यांस त्यानें आपले पारिषद् केले. पुनः धनुष्यास मस्तंच्या जाऊन हिमालयाचा पुत्र जो क्रौंच याचा बाणानें भेद केला तेणें करून पर्वत निवासी हंस मृग इत्यादि मेरू पर्वतीं पळाले. क्रौंच पर्वत विशीर्ण होऊन आर्तस्वर करीत एका एकीं पृथ्वीवर पडला हें पाहून पर्वतानीं भयंकर नाद केला. पुनः स्कंदानें आपले हस्तांत एक महान् अमोघ शक्ती घेऊन श्वेतगिरीच्या शिखराचा भेद केला असतां श्वेतगिरी भयाभीत होऊन इतर पर्वतां सहवर्तमान आकाशांत गेला, तशीच पृथ्वी ही भयानें विदीर्ण झाली. नंतर संपूर्ण पर्वतानीं स्कंदास नमस्कार करून पृथ्वींत प्रवेश केला. असा चराचर जगताचा चोहींकडे आक्रांत झाला असतां त्या दिवशीं पंचमी तिथी होती तेच दिवशीं संपूर्ण लोक त्या बालकाच्या आज्ञेंत राहिले. असा विषय या अध्यायांत आहे.

२२६ अध्याय दोनशें सव्वीस:— मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, ज्या कालीं स्कंद उत्पन्न झाला त्याकालीं मोठे मोठे उत्पाद झाले, स्त्री पुरुषांमध्यें वैरभव झाला. संपूर्ण दिशा. आकाश व पृथ्वी तेजानें व्याप्त झाली. चैत्ररथ वनामध्यें गहणारे लोक भाषण करीत कीं, ऋषीच्या साहा पत्न्याशीं अग्नीनें गमन केलें त्यामुळें हा अनर्थ उत्पन्न झाला, कोणी ह्मणत कीं, त्या गरुडीनें अनर्थ उत्पन्न केला. कोणी अग्नीचीभार्या जी स्वाहा इणें ऋषिपत्न्यांचें रूप धरून हें कर्म केलें असें गा नामकारचें लोक भाषण करीत असतां स्रुपर्णी पुत्राजवळ जाऊन बोलली हे स्कंदा, तूं माझा पुत्र होस इकडे सप्तऋषींस ही वार्ता समजतांच आपल्या पत्न्यानीं व्यभिचार केला असें जाणोन अरुंधती शिवाय सर्वांनीं आप आपल्या पत्न्यांना त्याग केला. त्या कालीं स्वाहा सप्तऋषीं कडे जाऊन बोलली कीं, तुमच्या स्त्रियां कडे दोष नाहीं यानें तात्पर्य संपूर्ण मला ठाऊक आहे. असें ऐकून विश्वामित्रानें सर्वांस सांगितलें कीं, मी याचा शोध करतों असें बोलून त्यानें क्रोधानें अग्नीकडे जाऊन शोध केला, अग्नीनें ही वास्तविक होतें तें सांगितलें तेव्हां विश्वमित्रानें प्रथम कुमारास शरण जाऊन त्याचा उत्तम प्रकारें स्तव केला आणि ज्यात कर्मादि मंगल कार्यें करून कुक्कुटाचें, शक्तीदेवीचें व पारिषदाचें साधन ठेविलें तेव्हां पासून स्कंदाची प्रीती विश्वामित्रावर बहुत जाहली. नंतर विश्वामित्रानें, स्वाहेनें हें कर्म केलें असें जाणोन सर्वऋषींस सांगितलें कीं, आपे स्त्रियां

स्त्रियांचा अपराध नाहीं. असें ऐकून ऋषीनीं लोकोपवादा करितां त्यक्त केलेल्या स्त्रिया घेतल्या नाहींत. मार्कंडेय ह्मणतात हे राजा, स्कंदाचा पराक्रम ऐकून संपूर्ण देव इंद्रास ह्मणो लागले कीं, तूं याचा लौकर पराभव कर न करशील तर-ह्मा इंद्र होऊन तुझा व आमचा नाश करील. असें ऐकून इंद्र बोलतो हे देव हो, हा बालक असतां संपूर्ण लोकाचा श्रेष्ठ होय यास्तव मी याचें हनन करीत नाहीं असें ऐकून देव ह्मणाले हे इंद्रा, तुला बल नाहीं ह्मणोन याप्रमाणें भाषण करतोस असें वाटतें. असें बोलून त्यानीं लोकांच्या मातांस सांगितलें कीं, या बालकाचा तुह्मीं जाऊन नाश करा. असें ऐकून माता त्या स्थलीं गेल्या आणि हा आपल्यास नाश करण्यास अयोग्य असें जाणोन त्यास शरण गेल्या आणि बोलल्या कीं तूं आमचा पुत्र हो आणि आमचें अभिवंदन कर. असें ऐकून स्कंदानें त्यांचा अंगिकार केला इतक्यांत अग्नि आपले दर्शना करितां आला हें पाहून-स्कंदानें अग्नीची पूजा करून संतुष्ट केला. पुढें शिवानीं कार्तिक स्वामीचें रक्षण केलें व कांहीं दिवस लोहित नामक समुद्राची लोहित भोजन करणारी क्रूरा नामक कन्या स्कंदास आलिंगन देऊन अरण्यांत त्याचें रक्षण करूं लागली. असा विषय या अध्यायांत आहे.

२२७ अध्याय दोनशें सत्ताविस :- मार्कंडेय भाषण करतात हे धर्मराजा, ग्रह, उपग्रह, ऋषी, माता, हुताशन याणीं मातृगणां सह वर्तमान स्कंदाचें पूजन केलें. नंतर इंद्राच्या मनांत ज्या विषयीं शंका येऊन तो ऐरावता रूढ झाला आणि कवच धारण करून संपूर्ण देवांसह वर्तमान कार्तिक स्वामीचा पराभव करण्या करितां आला. हें पाहून कुमार भयंकर नाद करीत शक्राचे सन्निध आला, त्या नादाच्या योगानें समुद्र क्षुब्ध झाले, देवसेनेस परम भय प्राप्त झालें नंतर कार्तिक स्वामीच्या मुखा पासून एका एकीं अग्नीच्या ज्वाला उत्पन्न होऊन संपूर्ण देवांचें सैन्य दग्ध झालें. तो तेजाचा समूह पाहून देव इंद्राचा त्याग करून कार्तिक स्वामीस शरण गेले नंतर सर्वांनीं आपला त्याग केला आतां वज्रें करून याचा नाश करावा असा विचार करून इंद्रानें तत्काल कुमाराच्या वधा करितां वज्र टाकतांच त्या वज्रानें इंद्राच्या दक्षण कुक्षींत भेद केला त्या योगानें दुसरा एक पुरुष उत्पन्न झाला तेव्हां इंद्र भयानें कार्तिकस्वामीस शरण गेला त्यानंतर स्कंदानें-

त्यास अभयदिलें त्याकालीं संपूर्ण देव तुष्ट होऊन वाद्यांचा गजर करूं लागले. त्यादिवसा पासून गुहानें नांव विशाख असें प्रसिद्ध झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

२२८ अध्याय दोनशें अठ्ठावीस— मार्कंडेय भाषण करतात हे धर्मराजा, ज्याकालीं स्कंदाच्या बाहूवर इंद्रानें वज्र प्रहार केला तेव्हां किती एक कुमार उत्पन्न झाले तेच गर्भस्त बालकाचें हरण करतात, ते यांचे भयंकर पारिषद जाणावे. तशाच वज्र प्रहार कालीं कन्या ही बहुत उत्पन्न झाल्या त्याणीं विशाख आमचा पिता अशी कल्पना केली. विशाखानें युद्धाच्या ठायीं बोकडाचें मुख धारण केलें होतें तो कार्तिक स्वामी पूर्वी सांगितलेल्या कन्या व पुत्र व माता यां सहवर्तमान असतां त्यास भद्रशाख असें ह्मणूं लागले. पुत्र कामार्थी पुरुष आहेत ते अग्नि, स्वाहा व रुद्र यांची पूजा करतात त्यादिवसा पासून या पृथ्वीवर स्कंदास कुमारपिता असें ह्मणूं लागले. ज्या कन्या उत्पन्न झाल्या त्या कार्तिक स्वामीस बोलल्या कीं, आतां आह्मीं काय करावें तें सांग; परंतु आमची इच्छा अशी आहे कीं, तुझ्या प्रसादानें संपूर्ण लोकांच्या आह्मीं माता व्हावें. असें ऐकून कार्तिक स्वामीनीं प्रत्योत्तर दिलें कीं, बरें आहे. नंतर क्रूर दुःख कारक अशा मातानीं स्कंदाचें पालन केलें असतां कार्तिक स्वामीची मातृगणांस आज्ञा होतांच त्या स्वस्थानीं गेल्या. काकी, हलिमा, मालिनी, बृंहिता, आर्या, पलाक व मित्रा या सातमाता शक्रकन्या होत. यांच्या वीर्येंकरून शक्र रक्षित असतात. स्कंदाच्या प्रसादानें लोहिताक्ष नामक पुत्र झाला त्यास वीराष्टक असें ह्मणतात. स्कंदाचें साहावें मुख बोकडाचें आहे, स्कंदानें दिव्य शक्ती उत्पन्न केली ह्मणून त्यास भद्रशाख असें ह्मणतात. अशी कार्तिक स्वामीची नाना प्रकारची उत्पत्ती शक्ल पंचमीस झाली ती तुला सांगितली पुनः षष्ठीच्या ठायीं मोठें भयंकर युद्ध झालें. अ. वि. या अ. आहे.

२२९ अध्याय दोनशें एकुणतीस— मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, हिरण्याचें कवच व मुकुट धारण करून स्कंद बसला असतां त्यास साक्षात् लक्ष्मी प्राप्त झाली. नंतर संपूर्ण ऋषि पूजा करून बोलले हे हिरण्यगर्भा, तूं संपूर्ण लोकांचें कल्याण कर, तुला उत्पन्न होऊन साहारात्री झाल्या

तस्यांत तूं संपूर्णलोकांस वशकरून समग्रांस अभय दिलेंस यास्तव त्रैलो क्यास अभय देणारा तूं आमचा इंद्रहो. असें ऐकून स्कंद बोलतो हे ऋषीहो, संपूर्ण लोकांचें इंद्र काय करतो व देवगणांचें रक्षण कसें करतो हें सांगा अ सें ऐकून ऋषी बोलतात हे स्कंदा, इंद्र प्रसन्न झाला असतां संपूर्ण भूतांचें ब ल, तेज, संतती व सुख इत्यादि सर्व मनोरथ पूर्ण करतो, संपूर्ण भूतातें शासन करतो, सूर्यचंद्रांचें तेज त्यामध्येंच आहे. पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, यां चा कारण भूत तोच होय यास्तव हे वीर, तूं संपूर्णांमध्यें बलवान आहेस ह्मणो न तूं इंद्र व्हावें अशी आमची इच्छा आहे. असें ऐकून इंद्र ह्मणतो हे महाबाहो, संपूर्णांस सुख देणारा तूं आहेस यास्तव तूं इंद्र व्हावेंस. असें ऐकून स्कंद बोल तो हे शक्रा, तूंच त्रैलोक्याचें शासन कर मी तुझा सेवक होतों, इंद्र होण्याची मीइ च्छा करीत नाहीं. असें ऐकून शक्र ह्मणतो हे महाबाहो, तूं अत्यंत बली आहेस यास्तव शत्रूंस जिंक तुझ्यावीर्य दर्शनें करून जन माझी थट्टा करतील, मजपेक्षां तूं बलवान आहेस आणि मी बलहीन आहें. असा हा भेद लोकांनीं पाहिला ह्मण जे द्वैत उत्पन्न होऊन आपल्यांत कलह उत्पन्न होईल मी तुझ्याशीं युद्ध करण्या स प्रवृत्त झालों असतां तूं माझा पराजय करशील यास्तव तूंच इंद्र व्हावें अशी माझी इच्छा आहे. असें ऐकून स्कंद बोलतो हे इंद्रा, तुझें कल्याण असो तूंच त्रै लोक्याचें शासन कर आणि तुझी आज्ञा मी मान्य करीन. असें ऐकून इंद्र भाषण करतो तुझें वाक्य हें जर सत्य आहे तर मी देवांचे सेनापत्याचा अभिषेक तुला क रतों. असें ऐकून स्कंद बोलतो हे इंद्रा, देवांची अर्थसिद्धी, दानवांचा नाश व गो ब्रा ह्मणांचें हित याकरितां सेनापत्याचा अभिषेक मला करा. मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, नंतर इंद्रानें कार्तिक स्वामीस सेनापत्याचा अभिषेक केला, ऋषींनीं स्कंदाची पूजा केली त्याकालीं स्कंद फारच शोभूंलागला. विश्वकर्म्यानें दिव्यहि रण्यमय माला अर्पण केली, ही पूर्वीं त्रिपुरासुर वधकालीं शिवानीं धारण केली होती. पार्वती सहवर्तमान शिवानें कार्तिक स्वामीचें अर्चन केलें, संपूर्ण द्विज त्या स च रुद्र व अग्नि असें ह्मणों लागले. रुद्रानें आपले वीर्याचा त्याग केला त्या- जपासून श्वेत पर्वत झाला त्या पर्वतीं अग्नीनें रेत पडलें तें कृत्तिकांनीं संरक्ष ण केलें व रुद्रानीं पूजित केलें यास्तव स्कंदास कोणी रुद्र व कोणी अग्नि

पुत्र ह्मणत, तो षडानन रक्तवस्त्र धारण करून शोभत असतां त्यास अग्नीनें कोंबडा दिला तो त्याच्या रथावर मलय कालच्या अग्नीसारखा शोभूं लागला. देवांस जयवर्धनी शक्ती होती ती स्कंदाच्या अग्रभागीं निरंतर असे. त्याच्या उत्पत्ती कालीं सहज कवच शरीरास उत्पन्न झालें. याप्रमाणें स्कंदास देवगणानीं अभिषिक्त केला असतां देवानीं वाद्यांचे गजर केले, अप्सरा व गंधर्व याणीं नृत्य केलें. संपूर्ण देव आसमंताद्भागीं उभेराहून बोलले कीं, स्कंदास या देवसेनेचा पति ब्रह्मदेवानींच केला. असें ते बोलत असतां इंद्र बोलतो हे स्कंदा, या देवसेनेस तूंच वर योग्य आहेस, असें ब्रह्मदेवानें सांगितलें आहे. असें ऐकून स्कंदानें तिचें पाणिग्रहण केलें, बृहस्पतीनें मंत्राचे जप व हवनें केलीं त्यादिवशीं संपूर्ण जन देवसेनेस स्कंदाची भार्या असें ह्मणों लागले. हा विवाह षष्ठीस ब्राह्मणानीं केला त्याकालीं साक्षात् लक्ष्मी तेथें वास करूं लागली. पंचमी तिथीस स्कंदानें पराक्रम केला ह्मणोन तिचें नाव श्री पंचमी, षष्ठीस स्कंद कृतार्थ झाला ह्मणोन त्या तिथीचें नाव स्कंद षष्ठी असें सर्वत्र प्रसिद्ध झालें. अ. वि. या भ. आहे.

२३० अध्याय दोनशें तीस— मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, स्कंदास देवसेनेचें आधिपत्य मिळाल्यावर सप्तऋषींच्या पत्न्या येऊन बोलल्या हे स्कंदा, तूं आमचे पासून उत्पन्न झालास असें कोणी आमचे पतीस येऊन सांगितलें त्यावरून त्यानीं आमचा त्याग केला, यास्तव तुला पुत्र असें मानून येथें आलों तर आह्मास स्वर्ग प्राप्त होईल असें करून आमचे ऋणापासून मुक्त हो. असें ऐकून कार्तिकस्वामी बोलतात तुह्मी माझ्या माता आहां यांत कांहीं संशय नाहीं. तुमचें इच्छित मी पूर्ण करीन काळजी करूंनये. इतकी कथा झाल्यावर स्कंद बोलतो हे इंद्रा, तुला काय कर्तव्य आहे तें लौकर मला सांग. असें ऐकून इंद्र बोलतो अभिजित नामक तारा, रोहिणीची कनिष्ठ भगिनी आपण ज्येष्ठ व्हावें ह्मणोन तप करण्या करितां वनांत गेली तेव्हां पासून ताऱ्यांमध्यें एक नक्षत्र कमी झालें. असें ऐकून स्कंदानें नक्षत्रांची संख्या भरण्या करितां कृत्तिकेस आकाशांत पाठविलें तें पाहून इंद्र संतोष पावला. पुढें विनता येऊन बोलली कीं, तूं माझा पिंड देणारा पुत्र आहेस यास्तव तुजसह वर्तमान राहण्याची इच्छा करतें, असें ऐकून स्कंद ह्मणतो हे माते, तुला नमस्कार असो स्नेहें करून तूं माझें रक्षण

ण कर माझी भार्या देवसेना तुझी स्नुषा आहे ती निरंतर तुझें रक्षण करील. नं तर मातृगण स्कंदा पाशीं येऊन बोलतात हे पुत्रा, आह्मीं संपूर्ण लोकांच्या माता असें आह्मांस कवी ह्मणतात आतां तुझ्याही आह्मीं माता असावें अशी आमची इच्छा आहे यास्तव मातृभावें करून आमचें पूजन कर. असें ऐकून स्कंद ह्मणतो मी तुमचा सुत झालों; आतां तुमचें कार्य मला काय कर्तव्य आहे तें सांगा. असें स्कंदाचें भाषण ऐकून माता बोलतात हे स्कंदा, संपूर्ण प्रजांच्या ब्राह्मी प्रभृति ज्या माता त्यांचें स्थान आह्मांस तूं दे. त्या समग्र प्रजा आमच्या असतां त्याणीं हरण करून आपणाच माता झाल्या येणें करून त्याणीं आमची प्रजा तुझ्या निमित्तें हरण केली यास्तव ही प्रजा आमचे स्वाधीन कर. असें ऐकून स्कंद बोलतो ज्या तुमच्या प्रजा हरण केल्या त्या माघाऱ्या तुह्मांस प्राप्त होणार नाहींत. दुसऱ्या प्रजा तुह्मांस इच्छित असल्यास देतों. असें ऐकून माता बोलतात हे पुत्रा, त्यामातांची प्रजा आह्मांस दे. असें ऐकून स्कंद ह्मणतो अहो माताहो, ज्या प्रजा तुह्मांस शरणांगत आल्या असतील त्यांचें भक्षण तुह्मीं करूं नका. ज्या न येतील त्यांचें तुह्मीं सुखें करून भक्षण करा. असें ऐकून माता ह्मणतात हे स्कंदा, तुझा ज्याण्यों निरंतर आश्रय केला असेल त्याचें आह्मीं भक्षण करणार नाहीं, तुझा आश्रय न करतील त्यांचें भक्षण आह्मीं यथेच्छ करूं. असें ऐकून स्कंद ह्मणतो प्रजेस सोळा वर्षे होईतों पर्यंत अनेकरूपानीं पीडा करा, मीही तुह्मांस आपला आत्मा देतों त्यासहीत सुखानें वास करा. असें बोलतांच त्याच्या शरीरापासून अग्नी सारखा तेजस्वी एक पुरुष उत्पन्न होऊन प्रजा भक्षण्यास उद्युक्त झाला आणि एकाएकीं क्षुधा दूर होऊन विसंज्ञ पृथ्वीवर पडला. या ग्रहास स्कंदापस्मार असें मंत्रवेत्ते ब्राह्मण ह्मणतात. विनतेस शकुनीग्रह, पूतना नामक राक्षसीस पूतनाग्रह, दुसरी एक पिशाची दारुण भयंकर आहे तीस शीतपूतना असें ह्मणतात ती मनुष्यांचा गर्भच हरण करते. अदिती ह्मणोन एक ग्रह आहे यास रैवत असें ह्मणतात तोही बालास ग्रहबाधा करतो. दैत्यांची दिती ह्मणोन माता आहे ती मुखमंडिका नामक ग्रह होऊन बालांचीं मांसें भक्षण करते. दुसरेही बहुत स्कंदापासून कुमार, कुमारी नामक ग्रह उत्पन्न जाहाले. ते सर्व स्त्रस बालांचीं मांसें भक्षण करून उपजीविका करतात. गाईची माता सु

रमी, शकुनी नामक ग्रह होऊन बालांचीं मांसें भक्षण करते. सरमा नामक जी श्वानाची माता तीही ग्रहरूप होऊन मनुष्याच्या गर्भाचें भक्षण करते. वृक्षाची माता वरदा नामक निरंतर करंज वृक्षांवर असते तीही भूतांस उपद्रव देते यास्तव करंजस्थ मातेस निरंतर प्रार्थना करावी. पुत्रार्थी नरानीं तीस नमस्कार करावा ह्मणजे ती बालकांचा नाश करणार नाहीं. हे अठरा ग्रह बालकांचे मांस भक्षक आहेत यास मांस व मधु अत्यंत प्रिय आहे. स्त्रिया प्रसूत झाल्या ह्मणजे दुसरे रात्रीस व पांचवे रात्रीस यांचा सूतिका ग्रहांत वास असतो. कद्रूनामक सर्पाची माता सूक्ष्म शरीर धरून गर्भिणीच्या उदरांत प्रवेश करून बालकाचें मांस भक्षण करते आणि त्याजपासून पुढें सर्पाची उत्पत्ती होते. गंधर्वाची माता ग्रहरूपी होऊन गर्भिणीच्या उदरीं प्रवेश करून गर्भ नाहींसा करते, ह्मणोन एकादे गर्भिणीचा गर्भ नाहींसा होतो याचें हेंच कारण होय. अप्सरांची माता गर्भिणी स्त्रीच्या उदरांत प्रवेश करून गर्भाचा नाश करते. लोहितनामक समुद्राची कन्या लोहिता यती ही स्कंदाची माता निरंतर कदंब वृक्षावर वास करते ह्मणोन कदंब वृक्षाची पूजा केली असतां या ग्रहाचा उपद्रव होत नाहीं, हे संपूर्ण कुमार ग्रह होत. सोळा वर्षे पर्यंत हे ग्रह मनुष्यास पीडा करतात. जे पूर्वीं मातृगण व संपूर्ण ग्रह सांगितले यांस स्कंद ग्रह असें ह्मणतात, हे मनुष्याच्या शरीरांत पीडा करून बहुत दुःख देतात. यास्तव यांचें शमन होण्याकरितां या ग्रहांस स्नान, धूपदीप, बली उपहार दिला असतां संतुष्ट होऊन ते आरोग्य करतात आणि आयुष्य, वीर्य यांची वृद्धी होते. सोळा वर्षांवर जे ग्रह मनुष्यास पीडा करतात ते सांगतों. मनुष्य जागृत अथवा निद्रिस्त असतां एखादे वेळेस त्यास उन्माद होऊन देवास पाहातो आणि उन्मत्त होतो यास कारण देवग्रह तसाच मनुष्य बसलेला अथवा निजलेला असतां त्यास उन्मत्तपणा प्राप्त होतो, त्यास कारण पितृ ग्रह, जे सिद्ध व कोपी यांचा अपमान करतात त्यांचा जो शाप होतो त्यास कारण सिद्धग्रह, गंध व रस यांचें सेवन केलें असतां मनुष्यास एकाएकीं उन्माद होतो यास कारण राक्षस ग्रह, ज्या मनुष्यांत दिव्य गंधर्व प्रवेश करतात तो मनुष्य उन्मत्त होतो यास कारण गंधर्व ग्रह, पिशाच्या सारखी चेष्टा एखादा मनुष्य करतो त्यास पिशाच ग्रह

बाधा आहे असें समजावें. जो भित्रा, नपुंसक व अघोर कर्मी यास याग्र-
हांची बाधा फार करून होते. ग्रहांच्या बाधेचें स्वरूप असें आहे कीं, कोणी
क्रीडा करतो, कोणी फार जेवतो, कोणी फार निजतो हे त्रिविध दोष ग्रहांचे
सत्तर वर्षें पर्यंत होतात पुढें मनुष्यास ज्वरनामक ग्रह्य सारखाच एक उप
द्रव होतो त्याणें मनुष्य आमरणांत व्याप्त होतो. ज्यांचीं इंद्रियें शांत व जोनि
रंतर शुची, आस्तिक, श्रद्धावान् असेल त्यास हे ग्रह बाधा करीत नाहींत-
हे राजा, तुला हे मनुष्य ग्रह सांगितले. जो महेश्वर भक्त असेल व ग्रहांची
पूजा करीत असेल त्यास हे स्पर्श करीत नाहींत. अ· वि· याअ· आहे.

२३१ अध्याय दोनशें एकतीस :- मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा,
स्कंदानें मातृगणांस इच्छित वरप्रसाद दिल्यावर स्वाहा बोलली हे स्कंदा,
तूं माझा औरस पुत्र आहेस यास्तव माझ्यावर तुझी प्रीती असावी हीच मी
इच्छा करत्यें. असें ऐकून स्कंद ह्मणतो ती प्रीती कशी असावी तें सांग. स्वाहा
बोलत्ये मी दक्षाची कन्या होय. बाल्यावस्थे पासून अग्नीवर माझी प्रीती हो
ती स्त्रियां मध्यें माझ्या सारखी रूपवती स्त्री एखादीच असेल, आतां मी-
तुज पाशीं इतकेंच मागत्यें कीं, अग्नीचा माझा वियोग नसावा, निरंतर एक
त्र वास घडो. असें ऐकून स्कंद भाषण करतो हे देवी, आज पासून स्वाहा असा उ
द्गार करून ब्राह्मण मंत्र पूर्वक अग्नीचे ठायीं हव्य कव्य देतील. हे शोभने, तुझ्या स
हवर्तमान अग्नि निरंतर राहील. असें ऐकून स्वाहेनें भर्त्यासहवर्तमान स्कंदाची
पूजा केली. नंतर ब्रह्मदेव ह्मणतो हे कार्तिकस्वामी, रुद्रानें अग्नींत व उमेनें स्वा
हेंत प्रवेश केला या दोघांच्या संबंधानें तूं पुत्र संपूर्ण लोकांच्या हिता करितां उत्पन्न
झालास यास्तव तूं आतां शिवाकडे जा. शिवानीं उमेच्या ठायीं वीर्य पात केला. का
हीं वीर्य श्वेतगिरी पर्वताच्या ठायीं पडलें त्या पासून मिंजिका मिंजिक असें मिथु
न झालें. त्या वीर्यानें शेष लोहितोदक, सूर्य, रश्मी, पृथ्वी, वृक्ष या पांच स्थानांत पड
लें, त्या स्थळीं नाना प्रकारचे भयंकर मांस भक्षक तुझे गण उत्पन्न झाले आहेत-
त्यां सहवर्तमान तूं शिवा कडे जा. असें ब्रह्मदेवानीं सांगतांच गणां सह वर्तमान स्कं
दानें श्वेत पर्वतीं जाऊन शिवाचें पूजन केलें. मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, जे-
[illegible] आत्तां सांगितले त्यांची पूजा धनार्थी असतील त्याणीं अवश्य ज्ञानें करा

वी तेणें करून व्याधीचाही नाश होतो. रुद्रा पासून उत्पन्न झालेल्या मिंजिकामिं
जिक नावाच्या मिथुनास नमस्कार करावा ह्मणजे आपल्या बलाचें हित होतें.प्रा
णरवीही दुसऱ्या स्त्रिया वृद्धीका प्रभृति मनुष्य मांस भक्षण करणाऱ्या वृक्षाच्या
ठायीं उत्पन्न जाहालेल्या यांस प्रजार्थी पुरुषानें नमस्कार करावे. असे अनी
असंख्याक, पिशाच्याचे गण आहेत. आतां कार्तिक स्वामीस घंटा व पताका
त्या कोणा पासून मिळाल्या याचा वृत्तांत सांगतो. इंद्रानें आपल्या ऐरावताच्या-
वैजयंती नामक दोन घंटा होत्या त्यांतील एक घंटा कार्तिकस्वामीस, व दुसरीवि
शाखास दिली. दोन पताकांतून एक पताक कार्तिक स्वामीस दिली व दुसरी
लोहित रंगाची विशाखास दिली व दुसरे ही क्रीडा पदार्थ देवांनी बहुत दिले
त्यांसहवर्तमान कार्तिकस्वामी फारच देदीप्यमान दिसूं लागला. पर्वताव
र नाना प्रकारचे करवीर पारिजातक अशोक, इत्यादि वृक्षांची छाया निबि
ड होती, मृगव पक्षी यांचे समुदाय तेथें बहुत होते, देवगण व ऋषिगण यां
चें केवळ तें स्थान होय. इंद्रादिक देव तेथें कार्तिक स्वामीच्या दर्शनाकरितां आ
ले होते. ज्याकाळीं स्कंदास देवांचें सेनापत्य मिळालें त्याकाळीं भगवान शिव
हर्षित अंतःकरणानें रथांत बसून भद्रवतीं जाण्यास निघाला तेव्हां कु-
बेरादिक सर्व दिक्पाळ तेथें आले. त्यांसहित शंकर जात असतां आपल्या
तेजानें सकल देव, ऋषि, नद्या, गंधर्व, समुद्र यांस हर्षित करीत चालले तेव्हां
त्यांच्या पाठी मागून अप्सरा पुष्पांचा वर्षाव करीत चालल्या. चंद्रानें छत्र,वा
यूव अग्नि याणीं चामरें शिवावर धरिलीं. इंद्र सकल राजऋषीं सहित शिवा-
चें स्तवन करीत चालला तेव्हां सावित्रीसहित गौरी, विद्यादिक स्त्रिया पार्वती
च्या पृष्ठभागीं चालल्या. या प्रमाणें शिव जात असतां सर्व मनुष्यें सत्कर्मानें शि
वाचें पूजन करूं लागलीं. तेसमयीं देवसेने सहित कार्तिकस्वामीही त्या शिवा
बरोबर चालला तेव्हां शिव ह्मणतात हे कार्तिकस्वामी, तूं साहाव्या मारुत-
स्कंदाचें पालन कर. असें ऐकून स्कंद भाषण करतो हे शिवा, मी मारुतस्कं
दाचें पालन करीन परंतु दुसरें कार्य मी काय करावें. असें ऐकून रुद्र ह्मणतो,
पुत्रा, कार्याच्या गर्यीं तूं सर्वदां भक्तीनें माझें दर्शन घ्यावेंस त्यायोगें तूं क
ल्याण पावशील. असें शिवानें स्कंदाशीं भाषण केलें आणि आलिंगन दें

ऊन विसरजन केलें. इतक्यांत मोठमोठे उत्पाद होऊं लागले. देवांस एका एकीं- मोह झाला, पृथ्वी कंपायमान होऊन संपूर्ण जगत् तमानीं व्याप्त झालें. शंकर ही उमेसह वर्तमान हें भयंकर अरिष्ट पाहून चकित झाले. इतक्यांत देवांच्या व शंकराच्या अंगावर नाना प्रकारच्या शक्ति, पर्वत, गदा इत्यादिकांची वृष्टी होऊं लागली तेणें करून देवांचें सैन्य क्षणांत भयाभीत होऊन पळालें. हें पाहून इंद्र देवांस अश्वासन देऊन बोलला कीं, तुह्मीं पळूंनका तुमचें लौकरच कल्याण होईल, आप आपलीं शस्त्रें घेऊन राक्षसांचा पराजय करा. असें ऐकून देवानीं शस्त्रास्त्रें घेऊन दानवांवर बाणांचा वर्षाव केला त्या योगें हजारों दैत्यांचीं शिरें- नासित झालीं. त्या कालीं देवांचे सैन्यांत वाद्यांचा गजर जाहाला पुनः दानवांनीं देवांचा पराभव करून भेरी, दुंदुभी इत्यादिकांचा नाद केला. नंतर महिषनामक दानवानें हस्तामध्यें गिरी घेऊन देवांवर टाकिला त्यामुळें देवांचे एक आयुत सैन्य पृथ्वीवर पडलें. नंतर महिषासुर रथ घेऊन शिवास मारण्यास प्रवृत्त जाहाला असतां शिवानीं कार्तिकस्वामीचें स्मरण करून मारण्याचा यत्न केला. इतक्यांत महासेन कार्तिकस्वामी रथाच्या ठायीं बसून महिषा सह वर्तमान एका एकीं युद्ध करण्यास आला आणि हस्तामध्यें महिष विदारणी शक्ती घेऊन दैत्य सैन्यास मोह करीत त्यानें महिषाचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें. त्याशिरानें षोडश योजनें पर्वताचा प्रदेश व्याप्त झला ती शक्ती पुनः स्कंदाचे हस्तांत आली बाकीचे शेष दैत्यगण राहिले होते ते स्कंदाच्या शक्तीस भिऊन पळाले. कांहीं स्कंदाच्या पारिषदानीं दैत्यांचे गण पराजित केले, कांहीं भक्षण केले. एक क्षणांत निर्दान व पृथ्वी स्कंदानें केली त्याकालीं देवानीं स्कंदाची बहुत प्रकारें पूजा केली व महेश्वरास अभिवादन केलें. पुरंदरानें कार्तिकस्वामीस आलिंगन देऊन भाषण केलें कीं, हे स्कंदा, ब्रह्मदेवानें वर दिलेला हा महिषासुर तूं मारिलास या मुळें तुझी तीन लोकांत कीर्ती झाली. समग्र सुर तुला वश झाले, असें भाषण केल्यावर त्र्यंबकानीं इंद्रास स्वस्थानीं जाण्यास आज्ञा दिली व समग्र देवही आप आपले स्थानीं गेले. शिवही गणां सह वर्तमान भद्रवटीं गेले. हें स्कंदाचें आख्यान जो पठण करील त्यास समग्र सिद्धी प्राप्त होऊन अंतीं स्कंदाचे लोकीं सुखी होईल असा विषय या अध्यायांत आहे.

२३२ अध्याय दोनशें बत्तीस– वैशंपायन ह्मणतात जनमेजया, पुनः धर्मराज मार्कंडेया प्रत प्रश्न करतोकीं, कार्तिक स्वामीचीं तीन लोकांत विख्यात नावें कोणतीं तीं सांगा. असें ऐकून मार्कंडेय सांगतात हे राजा, अग्नेय, स्कंद, दीप्त कीर्ती, अनामय, मयुरकेतु, धर्मात्मा, भूतेश इत्यादि त्रेपन्न नामें कार्तिकस्वामीचीं आहेत; या नावांनें जो पठण करतो त्यास स्वर्ग, कीर्ती, धन यांची प्राप्ती होते, ऋषी व देव षडाननाची अशी स्तुती करतात कीं, हे देवा, तूं ब्राह्मणांचा हित कर्ता आहेस ह्मणून तुला ब्रह्मण्य ह्मणतात व तुला ब्रह्म ज्ञान असल्यामुळें ब्रह्मवित ह्मणतात. स्वाहा, स्वधा इत्यादिक तूंच आहेस. संवत्सरादि रूप काल, दिशा यांचा नियंताही तूंच, सहस्त्र बाहू व गंगासुत असें तुला ह्मणतात. तूं निरंतर कुक्कुटा सहवर्तमान क्रीडा करतोस, सोम इत्यादिकांचा नियंता तूंच आहेस व तुझ्या तेजानें हें संपूर्ण जग व्याप्त आहे. नेत्र व बाहूंनीं तूं युक्त आहेस यास्तव तुला नमस्कार असो. असें देवांनीं केलेलें त्या स्कंदाचें स्तोत्र जो ब्राह्मण ब्राह्मणास सांगेल अथवा त्या पासून ऐकेल अथवा स्वतः पठण करील त्यास धन आयुष्यादिक प्राप्त होऊन स्कंदाचें सालोक्य प्राप्त होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

२३३ अध्याय दोनशें तेतीस– वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, कोणे एके काळीं विप्रांसहवर्तमान पांडव वनामध्यें बसले असतां कृष्णा प्रिया सत्यभामा एकांत स्थळीं द्रौपदीस बोलली कीं, तूं पांडवांशीं कशी वागतेस व ते तुला वश होऊन तुझ्या मुखाकडेच पहात असून तुजवर कधींच कोप करीत नाहींत– याचें कारण व्रत, तप, स्नान, मंत्र, औषधें, जप, होम यांतून कोणतें आहे तें मला सांग. ह्मणजे त्यायोगें मी आपला प्रियपती कृष्ण यास वश करीन. असें ऐकून– द्रौपदी बोलली कीं, तूं दुष्ट स्त्रियांचें आचरण विचारशील तर तें मी कसें सांगूं, परंतु तूं कृष्णाची स्त्री आहेस तेव्हां हा तुला प्रश्न योग्य नाहीं. आपली स्त्री आपणास मंत्रानें वश करणारी आहे असें ज्याकाळीं पतीस समजेल त्याकाळीं तिज पासून तो उद्वेग पावेल मग शांती कोठून? शांती नसल्यावर सुख होणार– नाहीं. हे सत्यभामे, मंत्रें करून भर्ता स्त्रियांस कधीं वश होणार नाहीं. तर आपल्या सुशील पणानेंच वश होतात. दुष्टस्त्रिया औषधादिकानीं पतीस रोग,

देह उत्पन्न करून वश करण्याची इच्छा करतात त्या योगें पतीचा नाश होऊन त्या स्त्रिया कल्याण पावत नाहींत यास्तव स्त्रीनें कधींही पतीचें अनिष्ट चिंतूं नये. आतां पांडवांचे ठायीं कोणत्या रीतीनें मी वागतें हें ऐक, प्रथम मी अहंकार व काम क्रोध यांचा त्याग करून माझ्यापतीं स जरी दुसऱ्या स्त्रिया आहेत तथापि त्यांचें मी विप्रिय कधीं करीत नाहीं आणि नम्र भावानें त्यांची सुश्रुषा करत्यें. आतां पतीच्या मनांत काय आलें असेल याविषयीं शोध ठेवित्यें, मजविषयीं कांहीं पतींस शंका आली अथवा त्यानीं क्रूर दृष्टीनें मजकडे पाहिलें असतां मी भय बाळगत्यें व या पेक्षां देव, मनुष्य अथवा अन्य पुरुषास मान्य करीत नाहीं. पतीनीं भोजनादिक कर्मे केल्या वांचून मी करीत नाहीं. वनांतून अथवा ग्रामांतराहून माझे पती आले असतां त्यांचा मी परमसत्कार करित्यें आणि घरांतील धान्या दिकांचें रक्षण करून त्यांस समयीं भोजनादिक देत्यें, नीच स्त्रियांचा सहवास ठेवीत नाहीं. तात्पर्य पतीस जे धर्म मान्य आहेत तेच स्त्रियांनीं स्वीकारावे, स्त्रियांचा देवपती होय त्या वांचून अन्य गती नाहीं. पती सासू, देव व ब्राह्मण यांची शुश्रुषा रात्रंदिवस केल्या वांचून माझा काल व्यर्थ कधीं गेला नाहीं. माझी सासू जी कोंती इचा स्वतः मी समाचार घेऊन यथा कालीं भोजनादि देत्यें. वैश्वदेव होतांच आठ हजार ब्राह्मण, अठ्यायशीं हजार स्नातक व ग्रहस्त, दहा हजार महान् यती व तपस्वी उत्तमोत्तम अन्नें भोजन करतात. यांस अन्न पानादिक देऊन यांचा यथा योग्य सत्कार ठेवित्यें. या प्रमाणें रात्रंदिवस मी वागत्यें या स्तव पती मजवर प्रेम ठेवितात. मला असत्स्त्रियांचा आचार ठाऊक नाहीं व तो समजण्या विषयीं मी इच्छित नाहीं. असें द्रौपदीचें भाषण ऐकून सत्य भामा बोलत्ये हे पांचाली, मी विनोदानें तुझ्याशीं भाषण केलें याची क्षमा कर. असा विषय या अध्यायांत आहे.

२३४ अध्याय दोनशें चवतीस— द्रौपदी भाषण करत्ये हे सत्यभामे, भर्त्यानें चित्त ग्रहण करण्या विषयीं मार्ग तुला मी सांगितला या मार्गानें तूं वागलीस असतां सर्व स्त्रिया पेक्षां तुजवर भर्तो अधिक प्रीति करील. या लोकांत पतीसारखें दैवत दुसरें नाहीं तो संतुष्ट झाला असतां अलभ्य पदार्थ प्राप्त होतात, तोच रुष्ट झाला असतां नाश होईल. त्या पती पासूनच आपल्यास आपले,

नाना प्रकारचे भोग, शय्या इत्यादिक प्राप्त होतात यास्तव तूं कृष्णाचेंच आराधन कर ह्मणजे तो निरंतर तुझ्यावर प्रीती करील आणि तूं पतीचें सांगितलेलें गुह्य प्रगट न करितां प्रद्युम्न सांबादिक कुमारांसही एकांतीं घेऊन बसूंनकोस व कुलिन, निर्दोषी पतिव्रता स्त्रियांशीं सख्य ठेऊन दुष्टस्त्रियांचा समागम वर्जकर आणिवस्त्रालंकारादिक धारण करून सौभाग्य कारक पतिरूप दैवताचें आराधन कर. असा विषय या अध्यायांत आहे.

२३५ अध्याय दोनशें पस्तीस– वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, मार्कंडेय प्रभृति विप्र यां सहवर्तमान धर्मराज जनार्दनास कथाभाग वर्णन करीत असतां एकमेकाचें परस्पर भाषण झाल्या नंतर श्रीकृष्णानें सत्यभामेस रथावर बसण्या करितां हांक मारिली त्या कालीं सत्यभामेनें द्रौपदीस आलिंगन देऊन प्रिय भाषण केलें कीं हे कृष्णे, तूं कांहीं चिंता करूंनको. तुझा संताप लौकर हरण होईल; कारण तुझ्या पती साररवे सील संपन्न व उत्तम लक्षणानीं युक्त जे पुरुष त्यांस फार दिवस दुःरव होत नाहीं यास्तव- धृतराष्ट्र पुत्रांच्या वधानें वैर दूर होऊन धर्मराज पृथ्वीचें राज्य करील. तुला-ज्याणी दुःखदिलें ते यमलोकास जाण्या करितां निघाले असें जाण आणि प्रतिविंध्यादिक तुझे पांच पुत्र द्वारकेंत अभिमन्यु सहित कुशल आहेत. अशा-भाषणानीं द्रौपदीचें सांत्वन करून सत्यभामा रथांत बसली. तेव्हां श्रीकृष्ण ही द्रौपदीचें समाधान करून तीव्रगतीनें स्वपुरीं गेला. अ. वि. अ. आहे.

२३६ अध्याय दोनशें छत्तीस– जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायन ऋषे, सित, ऊष्ण, वात इत्यादिकें करून कृश झालेले पांडव यानीं द्वैत वनातील पुण्य सरोवरीं येऊन काय केलें तें मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, पांडवांनीं द्वैतवननिवासी जन व वसती स्थान यांचा त्याग करून दुसऱ्यावनीं संचार करीत असतां वेदवेत्ते ब्राह्मण त्यांच्या दर्शना करितां बहुत आले. त्यांतील एक ब्राह्मण कौरवांकडे जाऊन त्यांस वन संबंधीं पांडवांचें वृत्त सांगून धृतराष्ट्रा कडे गेला आणि त्यानें पांडवांच्या वनसंबंधीं कथा सांगतांच धृतराष्ट्र श्वासोच्छ्वास टाकूं लागला आणि हें समग्र दुःरव पांडवांस आपल्या पासून झालें. असें समजून ब्राह्मणास बोलतो कीं,

अजातशत्रु धर्मराज पूर्वीं उत्तम शय्येवर शयन करीत होता तो सांप्रत हिम, वात, उष्ण यांस सहन करून द्रौपदी पहात असतां पृथ्वीवर शयन करतो ना, तसेच अर्जुन, नकुल, सहदेव, भीमसेन हेही पृथ्वीवर शयन करतातना! द्यूता मध्यें शकुनीनें धर्मराजास पराजित करून कठोर भाषणें केलीं तीं त्याचे मनांत वारंवार येत असतील. तसेच भीमसेन व अर्जुन हे माझ्या पुत्राचा वध करण्याची इच्छा करीत असतील, दुर्योधन, शकुनी, सूतपुत्र व दुःशासन या मंदबुद्धीनीं द्यूताचा अवलंब करून राज्याचा आश्रय केला, याचा परिणाम काय होईल तो होवो. शुभाशुभ कर्मे जो करतो तोच त्या कर्माचें फल भोगतो. पहा बरें माझ्या अनुमतें शकुनीनें खोटें द्यूत उत्पन्न करून धर्मराजास कपटानें जिंकिलें ही गोष्ट फार वाईट झाली. दुष्ट पुत्राच्या बुद्धीस मी अनुसरून हा कुरूंचा अंतकाल समीप आणिला. तात्पर्य यथा कालीं जें व्हावयाचें तें अवश्य होतेंच. पहा बरें हा अर्जुन स्वपराक्रमानें इंद्रलोकीं जाऊन दिव्यास्त्र विद्या संपादन करून पुनः या लोकीं आला. असा आजपर्यंत शरीरा सहवर्तमान स्वर्गाहून मनुष्य लोकीं पुनः माघारा आलेला मी कोणीही पाहिला नाहीं. असे जे पराक्रमी पांडव त्यांशीं कौरवांनीं द्वेष केला याजवरून मला खचित वाटतें कीं, हे संपूर्ण मृत्यु पावणार. असे नाना प्रकारचे विलाप धृतराष्ट्रानें केलेले शकुनीनें दुर्योधनास सांगून नंतर कर्णास सांगितले. तेव्हां कर्ण ह्मणतो कीं, पांडवांस युद्ध केल्या वांचून कांहींच देऊंनये असें माझें अनुमत आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

२३७ अध्याय दोनशें सदतीस — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धृतराष्ट्राचें वाक्य ऐकून शकुनी बोलतो हे दुर्योधना, स्ववीर्यें करून पांडवांस तूं वनामध्यें घालविलेंस आतां निष्कंटक पृथ्वीचें राज्य तूं एकटाच करीत असतां इंद्रा सारखा शोभतोस. जी पांडवांच्या गृहीं लक्ष्मी तीच तुला प्राप्त झाली तिचा तूं भ्रात्यां सहवर्तमान उपभोग घे. तुझे सर्व शत्रू तुला शरण आले आहेत, जे तुला वश नाहींत ते वनामध्यें विशोभित होऊन फिरतात ते पहा. हे राजा, द्वैतवनीं कोठे एके सरोवरीं ब्राह्मणां सहवर्तमान पांडव राहातात यास्तव या संपत्ती सहवर्तमान तूं तेथें जाऊन त्यांस संताप दे ह्मणजे तुझी संपत्ती पाहून श्रीहीन झा

लेल्या पांडवांस केवढें दुःख होईल बरें! तशांत तुमच्या स्त्रिया उत्तमोत्तम वस्त्रें व आभरणें धारण केलेल्या पाहून वल्कलें धारण करणारी द्रौपदी तत्काळ प्राणत्याग करील असें बोलून कर्ण व शकुनी हे स्तब्ध बसले. अ. वि. या अ. आहे.

२३८ अध्याय दोनशें अडतीस:– कर्णाचें भाषण ऐकून दुर्योधन बोलतो हे कर्णा, तूं जें बोलतोस हें संपूर्ण माझे मनांत आहे; परंतु धृतराष्ट्राची आज्ञा आपल्यास द्वैत वनीं जाण्यास कशी मिळेल, कारण त्याची आमच्यापेक्षां पांडवांवर प्रीती अधिक आहे. दुसऱ्या कांहीं कार्याची योजना करावी तर तेंही कांहीं दिसत नाहीं. काषाय वस्त्रें धारण केलेली जी द्रौपदी इला पाहिलें असतां मला हर्ष होईल यास्तव हे कर्णा, धृतराष्ट्राचे मनांत विपरीत न येतां तो आपल्यास द्वैतवनीं जाण्याविषयीं अनुमोदन देईल व भीष्मद्रोण हे आह्मां बराबर येतील असा कांहीं उपाय कर. असें बोलून दुर्योधन आपले गृहीं गेल्या नंतर कर्ण, शकुनी इत्यादि आप आपले गृहीं गेले. दुसरे दिवशीं कर्ण बोलला हे दुर्योधना, एक उपाय मजला सूचला आहे तो तुला सांगतों. द्वैत वनीं आपल्या गाईंच्या राहण्याच्या-जागा बहुत आहेत, आपले समग्र गोवत्स इत्यादि तेथेंच राहातात यास्तव ते-कसे काय आहेत त्यांची चौकशी करण्याचें मिष करून जाण्याचा उद्योग करावा ह्मणजे धृतराष्ट्राचे मनांत कांहीं कल्पना न येतां तो आपल्यास जाण्यास अनुमोदन देईल, तर हे राजा, घोषयात्रेचा उद्देश करून जावें हें मला फार युक्त दिसतें. असें ऐकून शकुनीनें ह्या गोष्ट मान्य केली. नंतर समग्र एकमेकांनीं हास्यकरीत एकमेकांचे हातावर टाळी दिली आणि निश्चय करून ते धृतराष्ट्राकडे गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

२३९ अध्याय दोनशें एकुणचाळीस:– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धृतराष्ट्रानें संपूर्णांस आगमनाचें कारण विच्यारिलें असतां संकेताप्रमाणें गाईचें रक्षण करणारा समंग नामक बल्लव बोलला कीं, आपलीं गोधनें पाहून बहुत दिवस झाले त्याजवर गाई शतशः प्रसूत झाल्या यास्तव कोणी येऊन गाईवत्स यांचीं नांवरूपें व वयाची चौकशी करून लिहून ठेवावीं. नंतर राधेय व शकुनी बोलले कीं, प्रतिसंवत्सरीं गाई, वत्स, बैल यांचीं रूपें व वयें पाहून लिहून ठेवावीं ही गोष्ट युक्त आहे नाहींतर बल्लव अव्यवस्था करून गोधनें चोरती-

स. त्याच्या चौकशी करितां दुर्योधनानें अवश्य जावें आणि वनांत मृगयाहि क रावी ह्मणजे दोन्हीं कार्यें झालीं. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो मृगया व गोधनें पा हणें ही गोष्ट युक्तच आहे व बल्लवावर विश्वास ठेवूं नये हें ही फक्तच आहे; परंतु ज्या वनीं तुह्मीं जाणार त्याच वनांत पांडव राहातात तेथें तुह्मीं जाऊन त्यांस दुःख द्याल ह्मणोन मी आज्ञा देत नाहीं. धर्मराज व याज्ञसेनी कोपित झाली असतां तुमचा नाश होईल. धनंजय इंद्रलोकीं जाऊन दिव्यास्त्र विद्या संपादन करून पु नः भूलोकीं आला तेव्हां याचा पराभव कोण करील. माझें भाषण जर ऐकाल तर आपला आप्त पुरुष असेल त्यास गोधनें पाहण्यास पाठवावें स्वतः आपण जाऊं नये. असें ऐकून शकुनी बोलतो हे धृतराष्ट्रा, सभेमध्यें धर्मराजानीं प्रति ज्ञा केली कीं, द्वादश वर्षं वनवास करीन ती प्रतिज्ञा तो सिद्ध करील आमच्यावर को प करणार नाहीं. मृगया करणें व पांडवांचें दर्शन घेणें ही आमची इच्छा नाहीं. गोधनें पाहण्याची मात्र इच्छा आहे जेथें पांडव राहात असतील तेथें आह्मीं जाणार नाहीं असें ऐकून धृतराष्ट्रानें अमात्यां सहवर्तमान दुर्योधनास द्वैतवनीं जाण्यास आज्ञा दिली तेव्हां शकुनी, सूतपुत्र, दुःशासन व दुसरे भ्राते व स्त्रिया त सेच पौरव नागरीक लोक, आठ हजार रथ, तीस हजार हत्ती, हजार पायदळ, न वद हजार अश्व तसेच शकट, बंदी, मागध व मृगये मध्यें बहुत कुशल हजारों लो क बरोबर घेऊन दुर्योधन द्वैतवनीं जाण्यास निघाला. अ. वि. अ. आहे.

२४० अध्याय दोनशें चाळीस — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुर्योधनानें गवळ्याच्या घरांच्या आसमंताद्भागीं आपल्या जाण्याच्या मार्गावर नाना प्रकारचीं सुंदर रमणीयस्थळें राहण्या करितां बांधलीं होतीं. नंतर द्वैतवनीं जाऊन आपल्या सर्व गाईंचीं चिन्हें, लक्षणें व वय पाहिलें, बाल वत्स व गाई यांची संख्या केली. नंतर गोपाल, पौरजन व नागरीक यां सहवर्तमान यथेच्छ क्रीडा क रण्या करितां वनांत जाऊन नृत्यांत कुशल जे गोप व गोपकन्या यांस नाना प्रकार चीं द्रव्यें समर्पण केलीं. नंतर सर्व वनाची शोभा पहात जेथें धर्मराज होता तेथें तो गेला. धर्मराज तर एका दिवसांत पूर्ण होणाऱ्या यज्ञाची दीक्षा धारण करून भ्राते द्रौपदी व ब्राह्मण यां सहवर्तमान दिक्षीत होऊन बसला आहे व नाना प्र कारचीं गृहें सरोवराचे तिरीं बांधून वन संबंधीं कुसुमें अलंकार इत्यादिकांनीं शो

भला. इतक्यांत दुर्योधनानें आपले दूत धर्मराज कोठें आहे तें पाहाण्या करि तां पाठवून त्यांस सांगितलें कीं, सरोवरामध्यें क्रीडा करण्यास चमत्कारिक स्थल लौकर निर्माण करा. असें ऐकून दूत द्वैतवनीं जाण्यास निघाले तों मार्गांमध्यें गंधर्वांनीं त्याचें निवारण केलें. कौरव द्वैतवनीं येण्याचे पूर्वींच गंधर्वांचा राजा अपसरा, गण व देव यां सहवर्तमान विहार करण्या करितां त्या सरोवरीं आला होता त्यानें दुर्योधनाच्या सेनापतीचें निवारण करतांच त्यानीं माघारी जाऊन दुर्योधनाजवळ झालेलें वर्तमान सांगितलें. नंतर राजानें दुसरे सैनिकांस आज्ञा केली कीं, सरोवरामध्यें जे कोणी क्रीडा करण्यास आले असतील त्यांस घालवून द्या. असें ऐकून ते सरोवरीं आले आणि गंधर्वांस बोलले कीं, दुर्योधन नामक धृतराष्ट्राचा पुत्र या सरोवरीं क्रीडा करण्या करितां येणार आहे यांजकरितां आपले समीप त्याणें तुह्मांस बोलाविलें आहे, असें ऐकून गंधर्व राजानें उत्तर दिलें कीं, तुमचा सुयोधन नामक राजा मंदबुद्धी आह्मांस अशी आज्ञा करतो काय? तुह्मी प्रज्ञाहीन मरणाचा उद्देश धरून आलां आहांत तर तुह्मी दुर्योधनाकडे जा नाहींतर यमलोकीं जाल. असें ऐकून ते दुर्योधनाकडे पळून गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

२४१ अध्याय दोनशें एकेचाळीस.— सैनिकानीं दुर्योधनास येऊन गंधर्वाचा निरोप सांगतांच दुर्योधन पराकाष्टेचा क्रुद्ध होऊन बोलला हे सैनिक हो, त्या गंधर्वांस जाऊन शासन करा. अशी आज्ञा होतांच संपूर्ण सैन्य सरोवराकडे जाण्यास निघाले तों मार्गांत गंधर्वांनीं सांगितलें कीं, आमचा चित्रसेन राजा सरोवरीं क्रीडा करतो यास्तव तुह्मी पुढें जाऊं नका. असें सांगितलें असतां ही सैनिक पुढें गेले तेव्हां गंधर्वांनीं येऊन चित्रसेनास सांगतांच गंधर्वांचें सैन्य शस्त्रास्त्रें घेऊन युद्धा करितां निघालें हें पाहून धार्तराष्ट्राचे सैनिक दाही दिशेस पळाले; परंतु राधेयानें मात्र गंधर्व सैन्यावर बाणांची वृष्टी केली. तेणेंकरून कित्येक गंधर्व भग्नांग जाहाले, कित्येकांचीं मस्तकें व कितेकांचे हात पाय तुटले तेव्हां चित्रसेनानें गंधर्व युद्धा करितां पाठविले नंतर दुर्योधन, शकुनी, दुःशासन व दुसरे ही हजारो कौरवांचे योद्धे कर्णास पुढें करून गंधर्वांवर शस्त्रवृष्टी करूं लागले असतां चित्रसेन मायास्त्र टाकून युद्ध करूं लागला- त्या योगा-

सें दुर्योधनाच्या प्रति योध्यांचे अग्रभागीं दहा दहा गंधर्व येऊन सहस्त्रा वधी बाणांची वृष्टी करूं लागले तेव्हां कौरव पीडित होऊन पळाले. कर्ण मात्र पळता सारखा अचल उभा होता तें पाहून दुर्योधनादिक तेथें येऊन असी, पट्टिश यानीं गंधर्वांस ताडण करूं लागले. गंधर्वांनीं कर्णाचा प्राण घ्यावा या उद्देशानें त्याच्या रथाचा सूत मारून रथाचे हजारों तुकडे केले. असा विषय या अध्यायांत आहे.

२४२ अध्याय दोनशें बेचाळीस:— वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, त्यां कालीं कर्ण विरथी होऊन आपला प्राण वांचवावा यास्तव विकर्णाचे रथांत बसून पळाला. तेव्हां गंधर्व दुर्योधनावर धांवले, दुर्योधनानेंही गंधर्व सैन्यावर बाणांचा वर्षाव केला तेव्हां संपूर्ण गंधर्वांनीं दुर्योधनाचा प्राण घेण्या करितां त्याचा सारथी व अश्व यांस मारून त्याचे रथाचे तिलप्राय तुकडे केले. तेव्हां दुर्योधन विरथी होऊन पृथ्वीवर पडला नंतर चित्रसेन त्याचा प्राण घेण्या करितां त्याच्या पाशीं धावून आला. इकडे दुःशासन, विविंशति, विंदानुविंद व राजस्त्रिया यांजवर गंधर्व बहुत बाणांचा वर्षाव करून त्यास धरण्यास धांवले इतक्यांत कौरवांचें भग्न झालेलें सैन्य पांडवांकडे जाऊन बोललें हे धर्मराजा, गंधर्वांनीं दुर्योधनास धरला आहे, तसेच त्याच्या दुःशासनादिक योध्यांस धरून त्यांच्या स्त्रिया जित केल्या आहेत या संकटापासून त्यांस मुक्त कर, आह्मीं आर्त होऊन तुला शरण आलों आहोंत. असें ऐकून भीमसेन बोलला कीं, आमचें कर्तव्य कर्म गंधर्वांनीं केलें ही गोष्ट फार चांगली झाली. जे दुष्टवासना धरून कुमार्गास प्रवृत्त झाले त्यांचा परिणाम असाच व्हावयाचा. हें प्रत्यक्षच पाहा कीं, अमानुषकर्म गंधर्वांनीं कसें केलें. मला असें वाटतें कीं, या लोकांत आमचें वाईट असावें अशी कोणाची इच्छा नाहीं. सितवान यांनें सहन करून आह्मीं विषम कालामध्यें असतां जो दुर्मती आमचा छल करण्यास इच्छून येथें आला व त्यास जे अनुकूल झाले असतील त्यांस पूर्णांचा पराभव झाला ही गोष्ट तर फार चांगली झाली. आह्मीं तर तपस्वी तेव्हां कोणाचें बरें हो अगर वाईट हो आह्मांस त्याची गरज नाहीं. असें ऐकून धर्मराज बोलतो हे भीमसेना, असें बोलण्याचा हा काळ नव्हे. अ. वि. अ. आ

२४३ अध्याय दोनशें त्रेचाळीस:— युधिष्ठिर पुनः भाषण करतो: हे भीमसेना, भयार्त शरण आलेले जे कौरव यांस तूं असें भाषण ह्या काळीं करूं नको. ज्ञातींत भेद, कलह किंवा वैर उत्पन्न झालें असतां कुलधर्म नष्ट होत नाहीं; परंतु परजातीचा येऊन कोणी आपले कुलांत त्रास देईल तर त्याचा निग्रह सर्वांनीं मिळोन करावा. गंधर्वांनीं दुर्योधनाचें बलात्कारें करून ग्रहण केलें व त्यांच्या स्त्रियांचें आकर्षण केलें असतां आपलें कुल नष्ट होईल. यास्तव तूं व अर्जुन, नकुल, सहदेव सिद्ध होऊन सुयोधनास सोडवा कारण वरप्रदान, राज्यप्राप्ती, पुत्रजन्म व शत्रूस संकटांतून सोडविणें हीं सारखीं आहेत आणि दुर्योधन सांप्रत विपत्तिग्रस्त होऊन तुझ्या बाहुबलानें जिवंत राहण्याची इच्छा करतो यास्तव गंधर्वांशीं साम करून त्यास सोडीव. असें ऐकून धनंजय बोलला हे गुरो, सामोपचारें करून धृतराष्ट्रपुत्रास गंधर्वांनीं न सोडलें तर गंधर्वांचें रक्त पृथ्वी लौकरच प्राशन करील. असें ऐकून कौरवांचे सैनिकांस बहुत हर्ष झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

२४४ अध्याय दोनशें चवेचाळीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, युधिष्ठिराचें भाषण ऐकून भीमसेन प्रभृति दिव्य शस्त्रास्त्रें घेऊन रथारूढ झाले आणि गंधर्वांकडे गेले असतां गंधर्व त्यांच्या अग्रभागीं आले तेव्हां अर्जुन सांत्वनपूर्वक बोलला हे गंधर्व हो आमच्या दुर्योधन बंधूस सोडा. असें ऐकून गंधर्व बोलतात आह्मी चित्रसेन गंधर्वाचीच आज्ञा पालन करतों यास्तव तूं आह्मांस आज्ञा करणारा कोण? असें ऐकून अर्जुन बोलतो दुसऱ्याच्या स्त्रिया हरण करणें हें राजास निंद्य आहे, यास्तव धर्मराजाचे आज्ञेनें धृतराष्ट्रपुत्र व त्यांच्या स्त्रिया यांस सोडा असें न कराल तर स्वतः मी दुर्योधनास सोडवीन असें बोलून अर्जुनानें त्यांवर बाणांचा वर्षाव केला गंधर्वही आकाशमार्गें जाऊन पांडवांवर शरांची वृष्टी करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

२४५ अध्याय दोनशें पंचेचाळीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, चार पांडुपुत्र व सहस्रावधी गंधर्व यांचें युद्ध होत असतां पांडुपुत्रांचे रथ छिन्न करण्यास गंधर्व उद्युक्त झाले तेव्हां पांडवांनीं स्वपराक्रमें करून आपल्या रथाचा भंग करूं न देतां बाणांच्या आघातानें गंधर्व दूर दूर पळविले: अर्जुन, भी

भीमसेन व नकुल सहदेव यांनीं हजारों गंधर्व मारून यमलोकीं पाठविले तेव्हां गं धर्व आकाशमार्गें कुंती पुत्रांवर बाणवृष्टी करीत असतां धनंजयानें शर जालें क रून त्यांचें बंधन केलें तेव्हां गंधर्वांनीं पाषाण वृष्टी करून भय उत्पन्न केलें. नं तर अर्जुनानें स्थूर्णा कर्ण, इंद्रज्याल इत्यादि अस्त्रांच्या योगें संपूर्ण गंधर्व दह्य मान करून कोणाचीं शिरें, कोणाचे बाहू, कोणाचे चरण भिन्न करून हजारों गंधर्व पृथ्वीवर पाडले असतां संपूर्ण गंधर्व बहुत भयाभीत होऊन पळाले. हें पाहून चि त्रसेन हस्तांत गदा घेऊन अर्जुनाचे शिरावर टाकण्यास उद्युक्त झाला असतां श रें करून अर्जुनानें गदेचे सात तुकडे केले. पुढें चित्रसेन मायीक रूप धरून आ काशांत गुप्त होऊन युद्ध करीत असतां अर्जुनानें शब्द वेधून चित्रसेनास शरजा लें करून बंधीन केला. नंतर चित्रसेन आपलें स्वरूप प्रसिद्ध करून आपला प्रिय- सखा जो अर्जुन यास बोलला हे महाबाहो, तुझा परमसखा जो चित्रसेन गंधर्व तो च मी. असें ह्मणतांच अर्जुन आपले अस्त्राचा उपसंहार करून स्तब्ध बसला. हें पाहून भीमसेन प्रभृतीनीं आप आपलीं शस्त्रें आकर्षण केलीं आणि रथाचे अश्व ही आकर्षण केल्यावर चित्रसेन गंधर्व, अर्जुन, भीमसेन नसेच माद्रीपुत्र- आप आपले रथांत बसून एकमेकांचें चरित्र विचारूं लागले. अ॰ वि॰ अ॰ आहे.

२४६ अध्याय दोनशें शेचाळीस— वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, नंतर अर्जुनानें हास्य करून संपूर्ण गंधर्वांमध्यें चित्रसेनास भाषण केलें कीं, हे वीरा, स्त्रियां सह वर्तमान तूं दुर्योधनास बंधन केलेंस याचें कारण काय? असें ऐकून चित्र सेन बोलतो हे अर्जुना, दुरात्मे जे दुर्योधन व कर्ण यांचा अभिप्राय मी जाणला, तुह्मी वनांत दुःखित होऊन संचार करितां तेव्हां आपली संपत्ती तुह्मांस दाखवून तुम- चा उपहास करावा आणि द्रौपदी सही बहुत दुःख द्यावें या बुद्धीनें हे दुरात्मे कौरव आपल्या सैन्या सहवर्तमान आले होते. हें इंद्रानें जाणोन मला आज्ञा केली कीं, त्या- त्यासहवर्तमान दुर्योधनास येथें बंधन करून घेऊन ये आणि धनंजय तुझा शि ष्य त्या सह पांडवांचें रक्षण कर. ह्मणोन मी तुझ्या पित्याच्या आज्ञे वरून या दुष्टास बंधन करून देवलोकीं घेऊन जातों. असें ऐकून अर्जुन बोलतो हे चित्रसेना, धर्मरा जाच्या आज्ञेस्तव सुयोधनास मुक्त कर. असें ऐकून चित्रसेन बोलतो हे धनंजया, हे पापी, धर्मराज व द्रौपदी यांची वंचना करण्यास आले यास्तव हे सोडण्यास-

योग्य नाहींत. या पुढें इच्छा असेल तसें कर. नंतर गंधर्व व पांडव धर्मराजाकडे जाऊन दुर्योधनानें केलेलें कृत्य चित्रसेनानें राजास सांगितलें तेव्हां धर्मराज त्यांची बहुत प्रशंसा करून बोलतो कीं, दैवें करून तुह्मीं दुर्योधनाचा प्राण घेतला नाहीं हा आमच्यावर मोठा उपकार केला, नाहींतर आमचे कुलास कलंक लाविला- असता. असो आतां तुह्मीं दुर्योधनास मुक्त करून आपले लोकीं जावें. अशी आज्ञा होतांच गंधर्वराज दुर्योधनास मुक्त करून अप्सरां सहवर्तमान आपले स्थानीं गेला. नंतर मुक्त झालेले कौरव पांडवांची प्रशंसा करूं लागले तेव्हां युधिष्ठिर बोलतो हे दुर्योधना, पुन: असें साहस कर्म करूं नको, साहस करणारे पुरुष कधींही सुख पावत नाहींत आतां भ्रात्यां सहवर्तमान तूं घरीं जा, तुझें कल्याण असो. नंतर दुर्योधन लज्जित होऊन स्वनगरीं गेला. इकडे भ्राते, द्रौपदी व ब्राह्मणयां सहवर्तमान द्वैतवनीं धर्मराज सुखानें राहिला. अ. वि. या अ. आहे.

२४७ अध्याय दोनशें सत्तेचाळीस:- जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायन ऋषे, अहंकारी दुर्योधन लज्जित होऊन हस्तनापुरीं कसा गेला हें मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धर्मराजानें दुर्योधनास सोडल्या वर तो लज्जित होऊन स्वपुरीं जात असतां मार्गांत एक उत्तम प्रकारचें सुरम्य स्थल पाहून सैन्यास पुढें जाण्यास आज्ञा देऊन तेथें स्तब्ध बसला. तेव्हां कर्ण त्याचें शांतवन करण्या करितां बोलला हे राजा, मी एवढेंच अद्भुत- मानितों कीं, तूं बंधू व स्त्रिया यांसहित गंधर्व युद्धा पासून मुक्त झालास, जें तूं बंधूसहित कर्म केलेंस तें कर्म करणारा या लोकीं कोणीही पुरुष नाहीं. असें ऐकून दुर्योधन सद्गदीत वाणीनें बोलतो. अ. वि. या अ. आहे.

२४८ अध्याय दोनशें अठ्ठेचाळीस:- दुर्योधन भाषण करतो हे कर्णा तुझ्या वचनाची मी असूया करीत नाहीं. कारण मी आपल्या तेजानें गंधर्वास जिंकिलें हें तूं जाणतोस; परंतु गंधर्वांनीं आह्मांस बांधून आकाशमार्गीं नेलें तेव्हां माझे अमात्य व सैनिक पांडवांस शरण जाऊन बोलले कीं, अनुज अमात्य व स्त्रिया यांसहित दुर्योधनास गंधर्व बांधून नेत आहेत यास्तव त्यांस तुह्मीं लौकर मुक्त करा. असें ऐकून भीमसेन प्रभृतींनीं गंधर्वांकडे येऊन आह्मांस सोडविण्या विषयीं बहुत प्रार्थना केली असतां ते सोडीनात तेव्हां पां

इत्यांनीं गंधर्वांवर बाणांचा वर्षाव करतांच गंधर्व पळून गेले नंतर शरजाला नीं वेष्टित असून अर्जुनानें अमानुष अस्त्रानीं सर्वदिशा व्याप्त केल्या.तें पाहू न चित्रसेनानें अर्जुनास आलिंगन दिल्यावर परस्पर कुशल विचारूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

२४९ अध्याय दोनशें एकूण पन्नास:— दुर्योधन बोलतो हे कर्णा, चित्रसेन गंधर्वाचा व अर्जुनाचा समागम झाल्यानंतर अर्जुनानें असें भाषण केलें कीं, हे वीर माझे भ्राते मुक्तकर आह्मी पांडुपुत्र जिवंत असतां यांस बंधन करणें योग्य नाहीं.हे राधेया, असें ऐकून गंधर्व राजानें उत्तर दिलें कीं, तुह्मी दुःखित भार्येसहवर्तमान वनांत फिरणारे यास्तव तुह्मांस दुःख द्यावें ह्मणोन हे आले तें दुःख तुह्मांस न व्हावें यास्तव आह्मीं हें कार्य केलें.असें ऐकून मला अशी लज्जा झाली कीं, आतां भूमीच्या विवरांतच प्रवेश करावा.पुढें युधिष्ठिराकडे पांडवांसहवर्तमान चित्रसेनानें मला नेऊन माझें संपूर्ण दुष्टवृत्त धर्मराजास सांगितलें.तेव्हां मला स्त्रियांसमक्ष बांधल्यामुळें मी दीन झालों.जे माझे रिपू ज्यांसमी प्रतिबंध केला होता त्याणीं मला शत्रूचे हातून जिवदान दिलें तो मी आतां जिवंत राहून मोठ्या योग्यतेस कसा पावेन!आतां मी असा विचार केला आहे कीं, प्राण त्याग करावा.तुह्मीं व माझे भ्राते याणीं दुःशासनास पुढें करून हस्तना पुरीं जावें.मी आतां शत्रूनीं निराकृत केलेला हस्तना पुरीं कसा जाऊं.भीष्मद्रोणादिक मला द्वैतवनाचा वृत्तांत विचारतील तेव्हां त्यांस मी काय सांगूं.मी मदें करून गर्वित झालों ह्मणोन मला एवढें दुःख झालें तस्मात् जीव द्यावा हेंच योग्य.असा दुर्योधन चिंता सागरांत निमग्न होऊन पुनः दुःशासनास बोलतो कीं, मी तुला संपूर्ण राज्याचा अभिषेक करतों, कर्ण,सौबल व भ्राते यां सहवर्तमान तूं संपूर्ण पृथ्वीचें राज्य कर, संपूर्ण सुहृद दासआनंद देऊन शत्रूची निर्भर्त्सना कर.असें ह्मणून दुर्योधनानें दुःशासनास आलिंगन दिलें.नंतर दुर्योधनाचें दीन वाक्य ऐकून दुःशासन नेत्रांतून अश्रुपात करीत बोलतो हे राजा, प्रसन्न हो आणि ह्या जो तूं मनांत विचार केलास त्याचा त्याग कर.कदाचित् पृथ्वी विदीर्ण होईल,आकाशाचीं शकलें होतील, रवीची प्रभा दीन होईल, परंतु तुझ्यावांचून मी पृथ्वीचें राज्य करणार नाहीं अ

सें बोलून रोदन करीत दुःशासनानें दुर्योधनाच्या चरणावर मस्तक स्थापन केलें. नंतर कर्ण बोलतो हे कौरवहो, विषाद पावून प्राकृत पुरुषासारखें रोदन काय करतां? शोक करणाऱ्या पुरुषास कधींही जय प्राप्त होत नाहीं. तुह्मांस शोक झालानर तुमचे शत्रूंस बहुत आनंद होईल पांडवांनीं तुह्मांस गंधर्वांपासून सोडविलें यांत आश्चर्य काय? तुह्मी पृथ्वीपती व पांडव ही तुमचे मांडलिक राजे आहेत, संपूर्ण पृथ्वीचें राज्य तूं करतोस एकवेळ शत्रूपासून पांडवांनीं तुला सोडविलें यांत त्याचा मोठा पुरुषार्थ आहे असें नाहीं. अ. वि. अ. आहे

२५० अध्याय दोनशें पन्नास— कर्ण बोलतो हे राजा, फार करून जे पराक्रमी असतात ते युद्धामध्यें शत्रूचे स्वाधीन झाले असतां सैनिकानीं व मांडलिक राजानीं त्यास सोडवावें, शूर बलवान् युद्धाच्या ठायीं गंभीर जे पांडव ते तुला साहाय्य असून पूर्वीं दास्यत्व पावले होते तथापि त्यानीं प्राण त्याग केला नाहीं यास्तव आतां लौकर ऊठ हें माझें वाक्य न ऐकशील तर तुझ्याच चरणापाशीं मी शुश्रुषा करून राहीन. तूं मरणोन्मुख होऊन बसशील तर राजलोकांत उपहास पावशील. असें ऐकून दुर्योधन मरणाविषयीं कृत निश्चय झाल्यामुळें तेथून उठला नाहीं. अ. वि. या अ. आहे.

२५१ अध्याय दोनशें एकावन्न— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, प्राणत्यागाची मती धरणाऱ्या दुर्योधनास शकुनी शांतवनपूर्वक बोलला हे राजा, कर्णानें जें भाषण केलें तें फार चांगलें केलें. पांडवांची संपत्ती मी युक्तीनें हरण करून तुला दिली तिचा आज त्याग करून प्राणाचें उत्क्रमण करण्याची मती तूं कां धरतोस? पांडवांनीं तुझा सत्कार केला असतां तूं शोक करतोस त्याचा त्याग कर आणि पांडवांनीं जें केलें तें योग्य असें मानून प्राणत्यागाची इच्छा धरूं नको. कदाचित् इच्छा धारण करशील तर त्याजपेक्षां पांडवांस संपूर्ण राज्य तरी अर्पण कर ह्मणजे तुझ्या यशाची कीर्ती होऊन धर्मही संरक्षित जाहला असें होईल. असें ऐकून दुःशासन दुर्योधनाच्या चरणावर मस्तक ठेऊन पृथ्वीवर दंडासारखा पडला तेव्हां दुर्योधनानें त्यास आलिंगन देऊन मूर्ध्याचें आघ्राण केलें. कर्ण व शकुनी यांचें वाक्य ऐकून दुर्योधन लज्जित होऊन स्तब्ध बसला आणि क्रोधानें बो

केला कीं, धर्म, धन, सौख्य, ऐश्वर्य, आज्ञा, उपभोग इहीं करून आतां मला कधीं सुख होणार नाहीं. आत्म्याचा घात करावा अशी इच्छा याकाळीं मला झाली आहे यास्तव तुह्मीं सर्व हस्तनापुरीं जा. असें बोलला असतां संपूर्ण राजे ह्मणाले कीं, हे दुर्योधना, जी तुझी गती तीच आमची, तुझ्या वांचून आह्मीं हस्तनापुरीं कसें जावें. याप्रमाणें सल्लदानीं बहुत प्रकारें बोध केला असतां त्यांचा अनादर करून दुर्योधनानें दर्भाची शय्या केली आणि चिरवस्त्रें धारण करून आत्मा व वाणी याचें नियमन केलें. नंतर एकाग्रतेची चिंता करून दुर्योधन देहसमर्पण करणार असा निश्चय जाणून पातालनिवासी दानवांनीं विचार केला कीं, पूर्वीं देवानीं आपला युद्धांत पराजय केला यास्तव आपण दुर्योधनाकडे जाऊन देवरूपी पांडवांचा नाश करूं. असा निश्चय करून अग्नीच्या ठायीं होम केला तेव्हां अग्नीपासून एक मोठी भयंकर कृत्या उत्पन्न होऊन संपूर्ण दैत्यांस बोलली कीं, मी आतां काय कार्य करावें? त्याकालीं दैत्य बोलले हे कृत्ये, प्राणत्याग करणाऱ्या दुर्योधनास येथें आण. अशी आज्ञा ऐकून कृत्या दुर्योधनास घेऊन पुनः पातालीं आली तेव्हां संपूर्ण दानव हर्षित होऊन दुर्योधनास बोलले. अ. वि. अ. आ.

२५२ अध्याय दोनशें बावन्न.— दानव भाषण करतात हे दुर्योधना, तूं शूरानीं निरंतर युक्त असतां प्राणत्याग करण्याची इच्छा कशी धरतोस? आत्मत्याग करणारा याची अपकीर्ती होऊन तो अधोभागीं जातो यास्तव त्या मतीचा तूं त्याग कर. तुझा हा देह पूर्वीं कसा उत्पन्न झाला याचें सामर्थ्य किती आहे यानें तत्वमी तुला सांगतों. पूर्वीं आह्मांसहवर्तमान तूं महेश्वरापाशीं तपस्या केलीस त्या योगें शिवानीं प्रसन्न होऊन तुझ्या शरीराचा पूर्वभाग वज्रासारखा दृढ व अधोभाग शस्त्रास्त्रें करून अभेद्य होईल ह्मणोन वर दिला, पार्वतीनें तूं रूपवान व स्त्री मनोहर होशील ह्मणोन वर दिला. या दोन वरें करून तुझा देह अभेद्य आहे तूं मनुष्य आहेस असें समजूं नको. देवाच्या वरप्रसादानें दिव्यदेही पराक्रमी झालास व दुसरेही कित्येक दैत्य क्षत्रियकुलाचे ठायीं भगदत्त प्रभृती झाले आहेत. संपूर्ण शस्त्रास्त्र वेत्ते तुला साह्य होऊन शत्रूचा नाश करितील. दुसरेही हजारों क्षत्रिय पूर्वीं दानव होते ते क्षत्रियकुलांत उत्पन्न झाले आहेत कांहीं

असुरांनीं भीष्म, द्रोण, कृप यांच्या शरीरांत प्रवेश केला आहे ते सर्व योद्धे संपूर्ण जनाचा क्षय करतील. पांडवांच्या शरीरांत देवता प्रवेश करून तुह्मांसह वर्तमान युद्ध करतां करतां दैत्यरूपी जे क्षत्रिय यांचा नाश करतील. आतां अर्जुनापासून तुला भय झालें, त्याच्या वधाचा उपाय आह्मीं योजिला आहे तो तुला सांगतों. पूर्वीं नरकासुराचा वध कृष्णानीं केला तोच नरकासुर कृष्णाचा द्वेष उगविण्या करितां मार्ग प्रतीक्षा करीत आहे आतां त्याणें अशी योजना केली आहे कीं, कर्णाच्या शरीरांत प्रवेश करून कृष्णार्जुनाशीं युद्ध करून त्याचा नाश करावा ह्मणोन संपूर्ण योध्यांमध्यें श्रेष्ठ जो कर्ण हा युद्धांत अर्जुनाचा नाश करील. इंद्रानें हेंच कपट जाणोन कर्णाचीं कुंडलें हरण केलीं आहेत. हे दुर्योधना, असे हजारों दैत्य क्षत्रिय कुलाचे गर्भीं उत्पन्न झालेले संसप्तकादि तुझें साह्य करून शत्रूचा नाश करतील मग शत्रुरहित पृथ्वी झाली ह्मणजे स्वस्थ करून तिचा उपभोग तूं कर. तूं नष्ट झाला असतां आमचा पक्ष हीन होईल आणि देवरूपी जे पांडव यांचा सूड उगविणें आमचे ह्मतून होणार नाहीं. यास्तव अन्यथा बुद्धी न धरितां लौकर हस्तनापुरीं जा. असें दैत्यांनीं भाषण करून दुर्योधनास आलिंगन दिलें नंतर कृत्येनें दुर्योधनास पूर्वस्थलावर नेऊन ठेविलें. नंतर राजानें कृत्येची पूजा करून जाण्या विषयीं आज्ञा देतांच तत्काळ कृत्या अंतरधान पावली. दुर्योधनानें हें संपूर्ण झालेलें वृत्त स्वप्नासारखें पाहून जागृत होतांच पांडुपुत्रांचा पराजय करण्याची मती धरिली आणि कर्ण व संशप्तक यांस सांगितलें कीं, तुह्मीं सिद्ध असा. पांडवांचा युद्धामध्यें पराजय करूं. इतक्यांत कर्णाच्याही शरीरांत नरकासुरानें प्रवेश करतांच त्यानेंही पांडवांच्या वधाची मती धरिली. संशप्तक, भीष्म, द्रोण, कृपाचार्य इत्यादिकांच्या शरीरांत तत्काळ राक्षसानीं प्रवेश करतांच संपूर्णांची मती एकदांच पांडवांच्या वधाविषयीं झाली. रात्रीं झालेलें वृत्त दुर्योधनानें कोणापाशीं न सांगतां प्रातःकाल होतांच कर्णानें दुर्योधनास भाषण केलें कीं, हे सुयोधना, मेल्यावर शत्रूचा पराजय कोण करील? जिवंत राहिलें असतां हजारों कल्याणाचे मार्ग पाहील यास्तव मरणाची मती तूं न धरितां शत्रूस ताप दे. हे राजा, मी सत्य प्रतिज्ञा करतों कीं, संग्रामामध्यें अर्जुनास मारीन, त्रयोदश वर्षांचें अतिक्रमण झाल्यावर पांडवांस वश करून तुझे स्वाधीन करीन, कर्णानें वा

केथ व रात्रीं दैत्यानीं भाषण केलेलें दुर्योधनानें ऐकून दोघांचे वाक्यावर विश्वास ठेविला आणि त्द्दयांत पांडवांच्या वधाची स्थिर बुद्धी धरून नगरीं जाण्याची सिद्धता केली. दुर्योधनाच्या अग्र भागीं जयलक्ष्मी त्याकाळीं सुशोभित दिसूं लागली. कर्ण, सौबल व दुःशासन, भूरिश्रवा व दुसरेही बहुत राजे व हय, गज, रथ यांसह वर्तमान दुर्योधन स्वल्प कालांत हस्तनापुरीं गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

२५३ अध्याय दोनशें त्रेपन्न.— जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायन ऋषे, वनाच्या ठायीं पांडव राहात असतां धृतराष्ट्र पुत्र व कर्ण, शकुनी, भीष्म, द्रोण यानीं कायकेलें तें मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडु पुत्र, सुयोधनास गंधर्वा पासून सोडवून आपण वनीं संचार करूं लागले. इकडे हस्तनापुरीं दुर्योधनानें प्रवेश केल्यावर भीष्माचार्य यानीं भाषण केलें कीं, हे दुर्योधना, तूं अद्दैत वनीं गेलास हें मला रुचलें नाहीं. पांडवांनीं शत्रू पासून तुला सोडविलें ही तुला लज्जा कशी वाटत नाहीं; युद्धामध्यें कर्णानें पलायन केलें हें तूं पाहिलेंसच आहेस. पांडवांचा पराक्रम किती आहे हा तुझ्या ध्यानांत आलाच असेल यास्तव त्यांशीं स्नेह कर. असें ऐकतांच दुर्योधन किंचित् हास्य करून शकुनी सह वर्तमान आपलें अंतःपुरांत गेला. कर्ण व दुःशासन प्रभृती हेही दुर्योधनाच्या मंदिरीं गेले. भीष्महीं दुर्योधनादि आपल्यास नविचारतां उठोन गेले हें जाणोन लज्जेनें स्वगृहीं गेला. हें दुर्योधनास समजल्यावर तो पुनः पूर्वस्थळीं येऊन मंत्र्यां सह वर्तमान विचार करूं लागला कीं,—आपलें कल्याण कोणत्या प्रकारें होईल! जेणें करून आपली ख्याती पृथ्वीवर होऊन पांडवांचा उपमर्द होईल याची योजना काय करावी! इतका विचार करीत असतां कर्ण बोलतो हे राजा, भीष्म आपली निरंतर निंदा व पांडवांची प्रशंसा करतो, तुझ्या द्वेषास्तव माझाही द्वेष करतो; परंतु हें भीष्माचें निंदा वाक्य कधीं मी ऐकणार नाहीं. आतां मी तुझ्या समक्ष प्रतिज्ञा करतों कीं, पांडवांस जिंकून सर्व पृथ्वी तुझ्या स्वाधीन करतों. कुरुकुलाधम भीष्म आतां माझें शौर्य पाहो. हे राजा, त्या मूर्खास अगदीं ज्ञान नाहीं ज्याची निंदा करावयाची त्याची स्तुती करतो आणि ज्याची स्तुती करावयाची त्याची निंदा करतो. हे राजा,

मी लौकरच शस्त्रास्त्रें घेऊन पृथ्वी जिंकण्यास निघतों आणि समग्र राजे वश करून तुझे स्वाधीन करतों. असें ऐकून दुर्योधन हर्षानें बोलला हे कर्णा, तूंच हा न् बलाढ्य मला कसा साह्य झालास आणि माझ्या हीतांचें चिंतन करतोस येणें करून मी धन्य आहें. शत्रूचें निरदलन करण्याची इच्छा तुला झाली असल्यास लौकर सिद्धता कर. तुझें कल्याण असो. असें ह्मणून दुर्योधनानें- सैन्यास दिग्विजयास जाण्या करितां आज्ञा केली. नंतर शुभ तिथी व मुहूर्त पाहून व मंगलवाद्यांचा गजर करून कर्णही दिग्विजया करितां गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

२५४ अध्याय दोनशें चौपन्न :- वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, पूर्वी कर्णानें सैन्या सह वर्तमान द्रुपदाशीं युद्ध करून करभार घेतला. तसेच द्रुपदाचे मांडलिक राजे, उत्तर दिशेस भग दत्त नामा राजा, हिमालयावर राहाणारे राजे यांस जिंकून कर भार घेतला. नंतर नेपाळ देशांतील राजे जिंकून अंग, वंग, कलिंग इत्यादि देशांच्या ठायीं जे महान् महान् राजे होते त्यांस युद्धानें स्ववश केले. पुढें दक्षिण दिशेस जे महान् महान् राजे यांस स्ववश करून रुक्मीशीं युद्ध केल्यावर रुक्मीनें भाषण केलें हे कर्णा, तुझा विक्रम व बल पाहून मी बहुत संतुष्ट झालों आतां तुझी आज्ञा निरंतर मी पालन करीन मी स्वसंतोषानें सुवर्ण देतों हें घे. नंतर कर्णानें रुक्मीचें द्रव्य घेऊन पुढें केरल देशाचा वेणुदारी सुत जो नील तसेच दक्षिण देशीय राजे यांस जिंकून कर भार घेतला, अवंती देशाच्या राजानीं युद्धांत साम केलें याशिवाय दुसऱ्या अनेक राजांस जिंकून कर्णानें वश केले. या प्रकारें कर्ण च्यारी दिशेचे राजे जिंकून हस्तना पुरीं गेला, तेव्हां दुर्योधन, कर्ण विजयी होऊन आला असें पाहून भ्रात्यां सह वर्तमान सामोरा गेला आणि पूजन करून त्याच्या कर्माची स्तुति करीत बोलला. हे कर्णा, जो तूं पराक्रम केलास हा भीष्म, द्रोण, कृपाचार्य, बाल्हिक यांच्यानें व्हावयाचा नाहीं. आज पर्यंत मी असें समजत होतों कीं, मी अनाथ आहें परंतु तुझ्या आश्रयें करून मी आज सनाथ झालों तुझी सोळावी कळाही पांडवांस नाहीं. आतां लौकर जाऊन गांधारी सह वर्तमान धृतराष्ट्रास आपला संपूर्ण वृत्तांत सांग. असें ऐकू

न धैर्य अंतरगृहीं जाऊन धृतराष्ट्राचे चरणावर मस्तक ठेविता झाला. त्या दिवसापासून दुर्योधन व शकुनी यांणीं जाणलें कीं, युद्धांत पार्थाचा पराभव करणारा एक कर्ण आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

२५५ अध्याय दोनशें पंचावन्न:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कर्ण समग्र पृथ्वी जिंकून दुर्योधनास बोलला कीं, आतां त्या शत्रूरहित पृथ्वीचें राज्य स्वस्थअंतःकरणें करून तूं कर. असें ऐकून दुर्योधन भाषण करतो हे कर्णा तूं मला साह्य असतां कांहीं दुर्लभ नाहीं. आतां माझ्या मनांत एक गोष्ट आली आहे ती तुला सांगतों. क्रतुश्रेष्ठ राजसूय नामक यज्ञ पूर्वी पांडवांनीं केला होता तो आपण करावा अशी इच्छा उत्पन्न झाली आहे इचा शेवट करणें तुजकडे आहे. असें ऐकून कर्ण बोलतो हे नृपोत्तमा, संपूर्ण पृथ्वीपाल तुला वश करून दिलेत आहेत तेव्हां ही गोष्ट घडण्यास कांहीं अशक्य नाहीं. असें ऐकून दुर्योधनानें तत्काल आपले पुरोहितास बोलाऊन आणांत सांगितलें कीं, राजसूय यज्ञाची सामोग्री सिद्ध करून महान् महान् मंत्रवेत्ते ब्राह्मण बोलवा. असें ऐकून पुरोहित बोलला हे दुर्योधना, युधिष्टीर धृतराष्ट्र हे जिवंत असतां तुला राजसूय यज्ञ करण्याचा अधिकार नाहीं. एक कुलांत एकानें राजसूय करून तो जिवंत असतां त्याच कुलांत दुसरा राजसूय करूंनये जर तुझी इच्छा असेलतर दुसरे क्रतु बहुत आहेत त्याक्रतूंत राजे येऊन तुला करभार देतील त्या द्रव्याचे अलंकार व सुवर्णाचा नांगर करून व यज्ञभूमी सिद्ध करून त्या भूमीवर वैष्णव नामक यज्ञ कर. हाच यज्ञ पूर्वी एकानें करून तो राजसूययज्ञ करणारापेक्षां ही श्रेष्ठ झाला होता हाच तूं कर. येणें करून तुझी इच्छा तृप्त व्हावी असें माझें मत आहे. असें ऐकून दुर्योधन; कर्ण, सौबल व इतर भ्राते यांस ह्मणतो कीं, हें ब्राह्मणाचें वाक्य तुह्मांस बरें वाटतें काय? तुमची इच्छा असेल तसें करीन. तेव्हां संपूर्णांनीं विष्णुयाग करण्याची संमती दिली. नंतर सामोग्री सिद्ध करण्यास आरंभ केला सुवर्णाचा नांगर सिद्ध करण्याकरितां मोठमोठ्या शिल्प्यांस बोलाविलें आणि दुर्योधनानें सांगितल्याप्रमाणें संपूर्ण यज्ञाची सिद्धता केली. अ. वि. या अ. आहे.

२५६ अध्याय दोनशें छपन्न:- नंतर मोठमोठे शिल्पी व अमात्यश्रेष्ठ व विदुर यांणी दुर्योधनास सांगितलें कीं, हे राजा, सुवर्णाचा नांगर व यज्ञाचे

ग्य द्रव्य सिद्ध आहे समयही लौकर आला आहे. आतां ऋतु आरंभ करण्याची आज्ञा व्हावी. असें विदुर व अमात्य यांचें वाक्य ऐकून दुर्योधनानें ऋतूस आरंभ करण्याची आज्ञा देऊन सांगितलें कीं, अन्न, द्रव्य व इतर पदार्थ यांची न्यूनता करूं नका. ज्यास जें पाहिजे तें यथेच्छ समर्पण करा असें सांगोन तो यज्ञदीक्षा धारण करून यज्ञमंडपीं बसला. त्याकालीं दुर्योधनास पाहून धृतराष्ट्र, विदुर भीष्म, द्रोण, कृपाचार्य, कर्ण हर्ष पावले. नंतर दुर्योधनानें ब्राह्मणांस निमंत्रण करण्या करितां दूत पाठविले असतां त्यांतील एका दूतास दुःशासन बोलला कीं, द्वैतवनीं जाऊन पापरूपी पांडव व इतर ब्राह्मण यांस ऋतूसमारंभ पाहण्यास आमंत्रण कर. अशी आज्ञा ऐकून दूतानें द्वैतवनीं जाऊन पांडवांस सांगितलें कीं दुर्योधन राजानें आपले स्वपराक्रमानें द्रव्य संपादन करून संपूर्ण राजे पादाक्रांत केले आणि संपूर्ण ऋतुमध्यें श्रेष्ठ जो विष्णुऋतु यास आरंभ केला आहे तो समारंभ पाहाण्यास मोठमोठे राजे व ब्राह्मण मिळाले आहेत यास्तव आपण सत्वर चलावें. असें ऐकून धर्मराजानें उत्तर दिलें कीं, फार चांगली गोष्ट आहे. दुर्योधनानें या ऋतूस आरंभ केला यास्तव त्याची व त्याच्या पूर्वजांची मोठी कीर्ती होईल. आह्मी ही यावें खरें परंतु आमचा काल नाहीं कारण त्रयोदश वर्षें पर्यंत आह्मीं वनामध्यें वास करूं अशी प्रतिज्ञा केली तिचें आतां उल्लंघन करवत नाहीं. नंतर भीमसेन बोलला हे दूता, शस्त्रास्त्रें करून संग्राम रूप सत्राच्या ठायीं प्रदीप्त झालेला जो अग्नि त्यामध्यें त्रयोदश वर्षांतीं दुर्योधनरूप जो हविर्भाग याचा त्याग करून पश्चात धर्मराज हस्तनापुरीं येईल. असें भीमसेनानें भाषण केल्यावर अर्जुन व नकुल सहदेव कांहीं भाषण न करितां उगीच बसले नंतर दूतानें पांडवांचा निरोप दुर्योधनास सांगितला तेव्हां दुर्योधनानें नाना देशांचे राजे व ब्राह्मण यांची यथाविधी पूजा करून त्यांस संतुष्ट केलें तेव्हां धृतराष्ट्र संतुष्ट होऊन बोलला हे विदुरा, यज्ञामध्यें अन्न, द्रव्य, वस्त्रें यांची न्यूनता न करितां समग्रांचा संतोष होईल असें करा. नंतर विदुरानें संपूर्ण वर्णांची यथाशास्त्र पूजा सत्कार करून भक्ष, पेय, माल्यें, वस्त्रें व नाना प्रकारचीं द्रव्यें इत्यादिकें करून त्यांस संतुष्ट केलें, संपूर्णांस राहण्या करितां उत्तमोत्तम गृहें निर्मित केलीं होतीं त्यामध्यें राहून राजे व ब्राह्मण बहुत आनंद पावले,

ये प्रकारें दुर्योधनानें उत्तम प्रकारचा यागकरून कर्ण सौबल यांसह वर्तमान तो हस्तनापुरीं आला. असा विषय या अध्यायांत आहे.

२५७ अध्याय दोनशें सत्तावन- दुर्योधन हस्तनापुरीं येत असतां-सूतानीं राजाची फारस्तुती केली. कोणी ह्मणो लागले कीं, युधिष्ठिराच्या यज्ञाच्या सोळाव्या कळेची ही उपमा नाहीं. कोणी ह्मणोलागले कीं, ययाती नहुष मांधाता, भरत हे या यज्ञानें स्वर्गासगेले असा हा श्रेष्ठ आहे. अशा नाना प्रकारच्या नागरिक जनांच्या शुभवाणी ऐकून दुर्योधन नगरांत जाऊन स्वगृहीं गेला आणि धृतराष्ट्र गांधारी, भीष्म, द्रोण, कृपाचार्य, विदुर यांस साष्टांग नमस्कार करून उत्तमासनीं जाऊन बसला ते व्हां सूतपुत्र बोलला हे राजा, तुझा क्रतु निरविघ्न समाप्त झाला, आतां युद्धामध्यें पार्थ तुला विघ्नकरणार नाहीं. राजसूय यज्ञ करण्यास तुला अधिकार झाला, कांहीं दिवसानीं राजसूय यागाची शोभा तूंच पाहाशील. असें ऐकून दुर्योधन बोलला हे सख्या, तूं भाषण केलेंस हें सत्य आहे. पांडव केवल मरणप्राय झाले ह्मणून या यज्ञास विघ्नकरण्यास आले नाहींत. असें बोलून संपूर्ण कौरव व राजे यांस बोलला कीं, पांडवांचा वध करून मी राजसूय यज्ञ करीन. नंतर कर्ण बोलला हे राजा, आतां माझी प्रतिज्ञा ऐक. युद्धाच्या ठायीं अर्जुनाचा वध केल्या वांचून दुसऱ्यापासून मी आपले पाय धुववणार नाहीं, सुरा कधींही पिणार नाहीं, मांस भक्षण करणार नाहीं, याचक कोणी आला असतां नाहीं असें ह्मणणार नाहीं. हीं माझी प्रतिज्ञा सत्य सत्यजाण. नंतर धृतराष्ट्र पुत्रानीं असा सिद्धांत केला कीं, आजच संपूर्ण पांडुपुत्र मरण पावले नंतर दुर्योधनानें संपूर्णांस निरोप दिला. पांडव हस्तनापुरीं आपले दूत पाठऊन कर्णानें काय प्रतिज्ञा केली त्याचा शोध आणवून चिंता ग्रस्त झाले आणि विचार करूं लागले कीं, कर्णास अभेद्य कवच मिळालें तेव्हां आपल्या पासून त्याचा पराभव कसा होईल. पुढें संपूर्णानीं असा विचार केला कीं, आतां द्वैत वन सोडून इतर वनीं राहावें. हस्तनापुरीं दुर्योधन, भ्राते व भीष्म, द्रोण, कृप कर्ण यांसह वर्तमान हर्षानें पृथ्वीचें शासन करूं लागला. कांहीं राजे व महान् महान् ब्राह्मण यज्ञातील राहिले होते त्यांस दुर्योधनानें द्रव्य देऊन स्वदेशीं जाण्यास आज्ञा दिली. असा विष

य या अध्यायांत आहे.

२५८ अध्याय दोनशें अठ्ठावन्न:- जनमेजय प्रश्न करितात हे वैशं पायन ऋषे, दुर्योधनास गंधर्वापासून पांडवांनीं मुक्त केल्यावर पुढें काय केलें तें मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, कोणे एके दिव- शीं धर्मराज द्वैतवनीं निद्रिस्त असतां स्वप्नामध्यें वनांत राहणारे मृग अंज- ली पुट जोडून धर्मराजाच्या अग्रभागीं उभे राहिले. तेव्हां धर्मराज प्रश्न करतो हे मृगहो, तुह्मीं कोण, काय तुमची इच्छा आहे? असें ऐकून मृग भाषण करता त हे राजा, तुह्मीं पांच बंधु शस्त्रधारी बलाढ्य अहांत वनीं राहून मृगये मध्यें आमचीं कुलें मारिलींत आतां अवशिष्ट आह्मीं थोडे राहिलों यास्तव आम ची प्रार्थना अशी आहे कीं, आपण दुसरे वनीं जाऊन राहावें ह्मणजे आम- च्या कुलाची वृद्धी होईल. असें ऐकून धर्मराजानें अभ्यासन देऊन सांगित लें कीं, तुमच्या हिता करितां आह्मीं दुसरे वनीं अतःपर वास करूं. असें ह्म णून जागृत झाला आणि भ्रात्यांस स्वप्नांतील झालेलें वर्तमान सांगून बो- लला आपण द्वैतवन सोडून मरुभूमीचें शिरस्थान जें काम्यकवन त्यामध्यें बिंदुसरोवर आहे तेथें राहूं ह्मणजे मृगाचा नाश न होतां कल्याण होईल आ तां आपलें एक वर्ष, आठ मास राहिले आहेत तावत् पर्यंत बिंदुसरोवरींच वास करावा असें बोलून ब्राह्मण व इंद्रसेन प्रभृति अमात्य यां सह वर्तमा न धर्मराज काम्यकवनीं गेला. त्या कालीं तत्काळ तें वन स्वर्गा सारखें शोभूं लागलें. असा विषय या अध्यायांत आहे.

२५९ अध्याय दोनशें एकुणसाठ:- वैशंपायन सांगतात हे जन- मेजया, काम्यकवनीं पांडव रहात असतां एकादश वर्षें परम दुःखानें गेलीं युधिष्ठीर असें चिंतन करी कीं, माझे अपराधानें भ्रात्यांस हें दुःख प्राप्त झालें व निरंतर कर्णाचीं भाषणें स्मरून युधिष्ठीर श्वासोच्छ्वास टाकी आ णि त्या दुःखाचा अंत कधीं होईल ह्मणोन काळजी करी. या प्रमाणें पांडवां- चा काल दुःखामध्यें काम्यक वनीं जात असतां कोणे एके दिवशीं व्यास- युधिष्ठिरास पाहण्यास आले आणि पांडव कृश झालेले पाहून बोलले- हे महाबाहो, तप केल्या वांचून उत्तम लोकाची प्राप्ती व सुख हीं होत ना-

होत सुख दुःखें हीं परयायें करून पुरुषास प्राप्त होतात ह्मणोन प्रज्ञावा-
न त्याविषयीं शोक करीत नाहींत. ज्याकालीं सुख प्राप्त होईल त्याकालीं-
सुख भागावें, ज्याकालीं दुःख प्राप्त होईल त्या कालीं दुःख भोगावें यास्तव
तप हें परम श्रेष्ठ होय. सत्य, आर्जव, क्रोध, शम इत्यादिक कर्में संपूर्ण पुण्य
कर्मांत श्रेष्ठ होय. अधर्मावर रुची ठेवणारे मूर्ख तिर्यक योनींत जातात आ
णि दुःखाचा अविच्छिन्न अनुभव घेतात. या लोकीं केलेल्या कर्माचा उप-
भोग परलोकीं होतो यास्तव आपलें शरीर तप व नियम यांजकडे ठेव:
यथा शक्ति ब्राह्मणाचें पूजन करून प्रणाम करीतजा. कालें करून जें प्राप्त होई
ल त्याचा त्याग करूंनको. जितेंद्रिय दुश्च्यसनांत गुंतत नाहींत. शुभाशुभ बुद्धी
कालें करून प्राप्त होत्ये परंतु शुभ बुद्धीस जो अनुसरला असेल त्याचें कल्याण
च होतें. असें व्यासाचें भाषण ऐकून युधिष्ठिर भाषण करतो हेमुने, दान व त
प यांमध्यें श्रेष्ठ कोणतें, बहुत गुण कशामध्यें आहेत, मरणानंतर कोणतें उपयो
ग पडतें? व्यास भाषण करतात हे तात, या पृथ्वीवर दानापेक्षां दुसराधर्म मो
ठा कोणता नाहीं. दानांत विशेष गुण इतकाच आहे कीं, न्यायानें संपादन केलेलें
द्रव्य देशकाल पात्र पाहून साधूस दान केलें असतां फारच पुण्याची वृद्धी होते;
अन्यायानें मिळविलेलें द्रव्य याचें दान जरी केलें तथापि दान कर्त्यास पापापा-
सून तारित नाहीं, पात्राच्या ठायीं स्वल्प जरी दिलें तरी तें अनंत फल देतें यावि-
षयींचा तुला पूर्वीचा इतिहास सांगतों. मुद्गल नामक ऋषी द्रोणपरिमित तांदू
ळ दान करून अनंत फलातें पावला. असा विषय या अध्यायांत आहे.

२६० अध्याय दोनशें साठ— युधिष्ठिर भाषण करतात हे मुने, द्रोणप
रिमित व्रीही (तांदूळ) मुद्गलानें कोणास दान करून कोणाच्या फलातें पावला.
असें ऐकून व्यास सांगतात हे राजा, कुरुक्षेत्रीं इंद्रिय निग्रही कोणी एक मुद्गल
या नामें करून ब्राह्मण शिलोंच्छवृत्तीनें वास करीत होता तो इष्टीकृत नामक स
त्र करून ब्राह्मणांस अन्न दान करीत असे. पुत्रस्त्रियां सहवर्तमान कपोतवृत्ती
करून पक्ष पक्षाच्या ठायीं व्रीही परिमित द्रोणाची उपार्जना करून दर्शपौर्णमा
स याग करीत असे. देवता व अतिथी याणीं भोजन केल्यावर शेषान्नें करून-
आपण भोजन करावें, त्याचे गृहीं साक्षात त्रिदशेश्वर इंद्र देवां सहवर्तमान येऊ

न पर्व पर्वांच्या ठायीं हविर्द्रव्य ग्रहण करीत असे. पर्वकालीं अतिथीस हर्षित अंतःकरणें करून द्रोणपरिमित व्रीहीचें अन्न दान द्यावें. मात्सर्य अतिथीच्या ठायीं कधीं करीत नसे, हजारों ब्राह्मणांनीं ज्याचे घरीं भोजन करावें, तेणें करून त्याच्या अन्नाची वृद्धी व्हावी, असा हा धर्मिष्ठ ब्राह्मण आहे. असें श्रवण करून दूर्वास ऋषि ब्राह्मणास बोलला कीं, मी अन्नार्थी आलों आहें. मुद्गलानें त्यास अन्न भक्षणास दिलें, त्याणें तें संपूर्ण भक्षण केलें. पुढें उच्छिष्ट अन्न राहिलें तें आपले अंगास लेपन करून तो गेला. तसाच द्वितीय पर्वीं दर्शकालीं दूर्वास मुद्गलाचे घरीं येऊन मी उपोषित आहें असें बोलला, तेव्हां मुद्गलानें संपादित द्रोण व्रीही परिमित अन्न समर्पण केलें. याप्रकारें दूर्वास त्याचे गृहीं साहा वेळ आला तितके वेळ त्यानें सर्व अन्न त्यास दिलें तथापि ऋषीचे मनास व्यथा झाली नाहीं, असें पाहून दूर्वास संतुष्ट झाला आणि बोलला कीं, तुझ्यासारखा मात्सर्यहीन दाता कधीं मीं पाहिला नाहीं. मोठ्या धैर्यें करून तूं मला अन्नानीं संतुष्ट केलेंस. श्रम व दुःख संपादित जें अन्न तें तूं मला शुद्ध अंतःकरणें करून दिलेंस तेणें करून मी बहुत संतुष्ट जाहलों. या शरिरा सहवर्तमान तूं स्वर्गास वास करशील. असें दूर्वास भाषण करतात तों एक विमान ग्रहण करून देवदूत-आकाशापासून मुद्गलाचे सन्निध आला. आणि ह्मणाला हे ब्राह्मणा, हें यथेच्छ गमन करणारें नाना प्रकारच्या सुगंधी द्रव्यानें युक्त विमान तुझ्या महत्कर्मानीं तुला प्राप्त झालें यामध्यें आरोहण करून स्वर्गलोकीं चल. असें ऐकून-ऋषी बोलतो हे दूता, स्वर्गांत विशेष काय आहे? तेथील राहाणारे काय करतात? सुख दुःख व दोष स्वर्गीं कसकसे आहेत तें मला सांग. ह्मणजे तुझ्यावर विश्वास ठेऊन बरें दिसेल तें मी करीन. असा विषय या अध्यायांत आहे.

२६१ अध्याय दोनशें एकसष्ट:— देवदूत भाषण करतो हे महर्षे, उत्तम स्वर्ग सुख प्राप्त झालें असतां त्यास बहुत मानावें असें असतां तूं अज्ञानासारखा विचार करतोस हें काय? पृथ्वीपासून उर्ध्वभागांत स्वर्ग आहे, तप व यज्ञ केल्या वांचून हा लोक प्राप्त होत नाहीं. धर्मात्मे, जितात्मे, शांत, दांत, मत्सर रहित जे पुरुष असतील ते या लोकीं राहातात. देव, साध्य, विश्वेदेव इत्यादिकांचीं गृहें पृथक् पृथक् या लोकीं आहेत. या लोकीं वास करणारे तेजो

मध्ये असतात. तेहेतीस हजार योजनें ज्याचा परीघ असा मेरूनामक सुवर्णा
चा पर्वत संपूर्ण पर्वतांचा राजा त्याजवरही संपूर्ण देवांचीं स्थानें आहेत. नंद-
नादि वनें यालोकांत विहार करण्यास उत्पन्न केलीं आहेत. क्षुधा, तृषा, ग्लानी,
सीत, उष्ण याचें भय नाहीं, भाषण केल्यावांचून एकमेकाचे अभिप्राय एकमे-
कांस दर्शनें करून कळतात, पुष्पांस म्लानता कधीं नसते असें स्वर्गामध्यें बहु
तसुख आहे परंतु स्वर्गाहून एकापेक्षा एक श्रेष्ठ लोक बहुत आहेत त्या लोकीं
देवही जाण्यास इच्छितात कारण त्या लोकीं स्त्रीकृत ताप नाहीं. जरा, मृत्यु, ह-
र्ष, प्रीती, सुखदुःख, राग, द्वेष यांचा संभव नाहीं तो लोक तुला प्राप्त होईल. असें
तूं दानरूप तप केलेंस यास्तव त्या लोकाचा तूं उपभोग कर. आतां स्वर्गलोकीं दो
ष किती आहेत ते तुला सांगतों. केलेल्या कर्माच्या फलाचा उपभोग स्वर्गीं होतो.
अधिक कर्म करण्याचा अधिकार नाहीं तेणें करून कर्माचा मुलछेद होऊन शे
वटीं या लोकीं तो पतन पावतो हा मोठा दोष होय. पूर्वीं ज्याणें सुखें भोगलीं त्या
स एकाएकीं असें दुःख झालें तर केवढा विषाद होईल बरें? स्वर्गात जींजीं अखं
ड सुखें आपण भोगलीं असतील त्यांचा एकाएकीं नाश होऊन प्राणी भूलोकीं
दुःखाचा अनुभव घेण्यास प्राप्त होईल हा एक स्वर्गागमनाचा दोष आहे. ब्रह्म
लोकपर्यंत जितके लोक आहेत तितक्यांची हीच अवस्था तस्मात् कर्में करून
हे सुखलोक प्राप्त होतात खरे परंतु कर्माचा अधिकार नसल्यामुळें पुढें पुण्या
चा मार्ग स्तब्ध होऊन दुःखभूमीस येणें घडतें हें मोठें भय आहे ह्मणोन ही कर्म
भूमी व स्वर्ग ही फलभूमी असें ह्मणतात. असें ऐकून मुद्गल भाषण करतो-
हे देवदूता, स्वर्गातील दोष तूं सांगितलेस तर निरदोष लोक कोणता? असें ऐ
कून देवदूत भाषण करतो हे ब्राह्मणा, ब्रह्मदेवाचे लोकापासून उर्ध्वभागीं वि-
ष्णूचें स्थान आहे त्या लोकीं विषयात्मक पुरुष जात नाहींत. हें सर्व आख्यान
मी तुला सांगितलें आतां इच्छा असेल तसें कर. व्यास ह्मणतात हे धर्मराजा,
देवदूताचें भाषण ऐकून मुद्गल भाषण करतो हे देवदूता, तुला नमस्कार असो
जसा आलास तसा माघारी जा. स्वर्गलोकीं मोठा एक दोष आहे ह्मणून त्यासु
खाची मी इच्छा करीत नाहीं कारण पतनांतीं पुनः दुःख होणार तस्मात् स्वर्गा-
चीं इच्छा मला नाहीं. ज्यास्थानीं गेलें असतां शोक व्यथा प्राप्त होत नाहींत तें

स्थान मी पाहीन.असें ऐकतांच देवदूत स्वस्थानीं गेला. इकडे मुद्गल ब्राह्मण शिलोंच्छवृत्तीनें वागत असून भगवद्ध्यानाच्या योगानें बल व उत्तम ज्ञान प्राप्त होऊन भगवंताचे स्थानास गेला ह्मणोन हे कौंतेया, राज्या पासून तूं भ्रष्ट झालास परंतु पुनः तें राज्य तुला तपोयोगानें तेरा वर्षांनंतर प्राप्त होईल यास्तव तूं संताप पावूं नकोस असें बोलून व्यास आपल्या आश्रमीं गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

२६२ अध्याय दोनशें बासष्ट:- जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायन ऋषे, पांडव ऋषींसहवर्तमान वनामध्यें रहात असतां सूर्यानें दिलेल्या अन्नानें ब्राह्मण तृप्त करून नंतर पांडव व द्रौपदी याणी भोजन केलें. नंतर दुःशासन,कर्ण व शकुनी यानीं प्रेरित जे ब्राह्मण यांची धर्मराजाचे घरीं काय अवस्था झाली? कौरवांनी पांडवांचे नाना प्रकारचे छल केले असतां पांडवांनीं त्यांच्या प्रतिकाराची काय योजना केली? हें मला सांगा.असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडवांचा वनांतील वृत्तांत ऐकून दुःशासन,कर्ण,शकुनी यांच्या अनुमतें दुर्योधनानें पांडवांचा बहुत छल केला. नाशाचे उपाय ही योजिले. एके दिवशीं अयुत शिष्यां सहवर्तमान दूर्वास ऋषी दुर्योधनाचे घरीं आला तेव्हां दुर्योधन भ्रात्यांसहवर्तमान ऋषींस निमंत्रण करून स्वतः त्यांची सेवा करूं लागला. ऋषीनें क्षुधा लागली असें भाषण केलें असतां तत्काल राजानें अन्न सिद्ध करावें नंतर मुनीनें स्नानास जातों असें ह्मणोन जावें आणि लौकर माघारें येऊं नये, एखादे वेळेस मला क्षुधा नाहीं असें सांगावें आणि तत्काल क्षुधा लागली असें ह्मणावें. असें ऋषीनीं दुर्योधनास बहु दिवस दुःख दिलें असतां दुर्योधन क्रोध न करितां संतुष्ट अंतःकरणें करून असे. हें पाहून ऋषी दुर्योधनास बोलला हे राजा, तुझी सेवा पाहून मी संतुष्ट झालों. आतां प्रियवर असेल तो माग. असें ऐकतांच दुर्योधन बोलला हे ऋषे, आपण शिष्यां सहवर्तमान युधिष्ठीर भ्रात्यां सहवर्तमान वनामध्यें राहातो तेथें द्रौपदी, सर्व ब्राह्मण व पांडव यांस भोजन घालून आपण भोजन केल्यावर सुखानें विश्रांती पावत असतां तुह्मीं तेथें जाऊन भोजन मागा. असें ऐकून ऋषीनीं भाषण केलें कीं, हे कुरोत्पन्ना तूं बोललास त्याप्रमाणें

मी करीन असें ह्मणून दुर्वास ऋषी आले तसे गेले. त्याकाळीं दुर्योधनानें कर्णा
सटाळी दिली तेव्हां हर्षानें कर्ण बोलला हे सुयोधना, तुझा मनोरथ सिद्ध झाला.
ऋषीच्या क्रोधरूप वन्हींत संपूर्ण पांडव दग्ध होतील मग अर्थातच तुझें रा-
ज्य वृद्धी पावेल. असें बोलून ते आप आपले गृहीं गेले. अ. वि. या अ. आहे.

२६३ अध्याय दोनशें त्रेसस्ट — कोणे एके कालीं पांच पांडव द्रौपदीचें
भोजन झाल्यावर वनीं स्वस्त बसले असतां तेथें दहाहजार शिष्यां सहवर्तमा
न दुर्वास ऋषी प्राप्त झाले. हें युधिष्ठिरानें पाहून त्याचें आतिथ्य व यथाविधी पू
जा करून सांगितलें कीं, हे ऋषे, आन्हिक क्रिया कर्तव्य असेल ती करून लौक
र भोजनास यावें. हें ऐकून मुनी शिष्यां सहवर्तमान स्नानास गेले असतां मा
र्गीत बोलूं लागले कीं, हे शिष्य हो, आह्मांस युधिष्टीर भोजनास कसें घालील?
इतक्यांत इकडे द्रौपदी विचार करूंलागली कीं आतां या ऋषीस अन्न कोठून द्या
वें धर्मराजानें तर भोजनास निमंत्रण केलें अशी चिंता करीत कृष्णाची प्रार्थ-
ना करते हे कृष्णा, गाई व प्रजा यांच्या पालना विषयीं तूं मोठा तत्पर आहेस,
संपूर्णांच्या चित्त वृत्तीस प्रेरणा करणारा तूं आहेस ह्मणोन तुला नमस्कार क
रत्यें. हे भक्त वत्सला, कृपा करून या कालीं दीनाचें संरक्षण कर. पूर्वीं दुःशासना
पासून सभेच्या ठायीं तूंच माझा उद्धार केलास तसाच आज प्राप्त झालेल्या सं
कटा पासून तूं माझा उद्धार कर. असें ऐकतांच श्रीकृष्ण शय्येवर रुक्मिणी-
चा त्याग करून तत्काल द्रौपदीजवळ आले तेव्हां द्रौपदीनें त्यांस नमस्कार क
रून दूर्वास आल्याचें वर्तमान सांगितलें. त्याकालीं श्रीकृष्ण बोलतात हे कृष्णे
मलातर फारच क्षुधा लागली आहे प्रथम कांहीं तरीं भोजनास दे पश्चात् मी
तुझें संपूर्ण कार्य करीन. असें ऐकून द्रौपदी लज्जित होऊन भाषण करते हे दे
वदेवा, सूर्यानें दिलेल्या स्थाली मध्यें अन्न माझ्या भोजना पर्यंत असतें मी
तर आतां भोजन केलें तेव्हां त्यामध्यें अन्न आतां कोठून असणार? नंतर कृ-
ष्ण ह्मणतात हे द्रौपदी, हा थट्टेचा काल नव्हे अन्न देशील तर बरें होईल. जा बरें
स्थाली मला आणोन दाखीव असें ह्मणोन ती पहातात तों एक शाखेचें पत्र नि
ला लागलें होतें तें कृष्णानीं दाखवून सांगितलें कीं, इतकेंच अन्न तुझ्या ह्मतखेंस
लापुरे. असें ह्मणोन तें शाख पत्र हस्तांत घेतलें आणि विश्वात्मा यज्ञभो

त्या या शाखपत्रें करून तृप्त असो असें ह्मणून शाखपत्र कृष्णानीं भक्षण केलें आणि ते द्रौपदीस बोलले कीं, आतां चिंता करूंनको. धर्मराजानें ऋषी अजून कांयेत नाहींत. ह्मणोन सहदेवास त्यांचे शोधाकरितां पाठविलें. सहदेवानें पाहिलें तों कोणी स्नानकरतात, कोणी केलें, कोणी अघमर्षण करतात आणि संपूर्णांचे उदरांतून अन्नाचे उद्गार येऊन ते भाषण करूं लागले कीं, हे ऋषे राजानें आपणास भोजना करितां निमंत्रण करून अन्न सिद्ध केलें असेल आह्मीं तर आकंठ तृप्त झालों आहों आमच्या करितां केलेला पाक राजाचा व्यर्थजाईल आतां काय करावें? असें ऐकून दूर्वास भाषण करतात हे ऋषी हो, असाच पूर्वी एक राजाचा अपराध केला आतां हा दुसरा अपराध पांडवांचा होतो कीं काय! अंबरीषराजाचा प्रभाव मी पाहून निरंतर मला भय वाटतें. भगवंताच्या चरणाचा आश्रय करणारे पांडव क्रुद्ध झालेतर आमचें दहनकरतील ह्मणोन हे शिष्य हो, आतां लौकर धर्मराजाचे घरीं नजातां पलायन करा. असें ऐकून ते दाही दिशांस पळाले व दूर्वासही गेला. नंतर सहदेवानें घरीं येऊन झालेला वृत्तांत सांगितला, परंतु धर्मराजानें असा निश्चय केला कीं, हा ऋषी कोणच्या काळीं येईल याचा नेम नाहीं अशी चिंता धरून संपूर्ण पांडव स्तब्ध बसले तों कृष्ण दृश्य होऊन पांडवांस भाषण करतो हा ऋषी तुह्मांस दुःख देण्या करितां आला होता. द्रौपदीनें माझी प्रार्थना केली ह्मणोन मी येथें आलों आतां तुह्मांस दूर्वासा पासून स्वल्पही भय नाहीं. तुमच्या तेजानें भिऊन ते ऋषी पळून गेले. जे धर्मपरायण आहेत त्यांस आपत्तीकाळ कधींही येत नाहीं. हे पांडव हो, तुमचें कल्याण असो आतां मी स्वस्थानीं जातों. असें ऐकून पांडव द्रौपदी सहवर्तमान ह्मणतात हे गोविंदा, दुस्तर जो आपत्ती समुद्र याच्या ठायीं तूं आह्मांस नौकारूप आहेस, तूं आमचा संरक्षण करणारा असतां दुसरा आमचा नाश करण्यास कोण समर्थ होईल. आतां असेंच आमचें कल्याण कर. असें ऐकून भगवान आपले पुरीं गेले. पांडव ही द्रौपदी सहवर्तमान वनामध्यें राहिले. असा विषय या अध्यायांत आहे.

२६४ अध्याय दोनशें चवसष्ट— वैशंपायन ह्मणतात हे ज-

नमेजया, काम्यक वनांत पांडव अमरासारखे वास करीत असतां नाना प्रकारचीं वनें, देश व पुष्पित सरोवरें पहात व मृगया करीत संपूर्ण अरण्या मध्यें कांहीं दिवस पर्यंत कालातिक्रमण करीत होते. कोणे एके कालीं संपूर्ण पांडव एक कालींच च्यारी दिशेस मृगये करितां वनांत गेले. तृणबिंदु व धौम्य यांचे आज्ञे वरून त्याणी द्रौपदीस आश्रमीं ठेविली असतां कांहीं कालानें सिंधु देशाचा राजा जो वृद्धक्षत्र याचा पुत्र जयद्रथ विवाहाच्या इच्छेनें शाल्व देशांत जात असतां अनेक राजां सहवर्तमान काम्यकवनीं आला. तेथें जयद्रथ रथारूढ असतां पांडवांची भार्या द्रौपदी निरंजन वनीं आश्रम द्वाराच्या ठायीं उभी होती तीस पाहून राजा बहुत चकित झाला आणि विचार करूं लागला कीं, ही देव कन्या अप्सरा किंवा माया आहे कीं काय, संपूर्ण लोकानीं द्रौपदी पुढें अंजली पुट जोडून नमस्कार केला. जयद्रथ अशा स्त्रीस पाहून कोटिकाख्य राजास बोलतो ही कोण आहे-ही सुंदरी आपल्यास प्राप्त झालीतर इजला घेऊन स्वदेशीं जाऊं शाल्वाकडे-जाण्याचे मग प्रयोजन काय तूं लौकर जाऊन तीस विचार कीं, तूं कोण कोणाची कन्या कशा करितां या कंटक वनीं आलीस. असें ऐकून कोटिकाख्य रथाखालीं उतरला आणि द्रौपदीस विचारूं लागला. असा वि० अध्या० आहे.

२६५ अध्याय दोनशें पांसष्ट— कोटिकाख्य भाषण करतो हे स्त्रिये, तूं अग्नि ज्वाले सारखी देदीप्यमान दिसतेस रूपें करूनतर फारच लावण्य आहेस या अरण्यांत तुला भय कसें वाटत नाहीं. तूं वरुण, यम, इत्यादि देवांच्या स्त्रियांपैकीं कोणी आहेस काय? तुझा नाथ कोण आहे तो मी जाणत नाहीं हे भद्रे, आह्मीं तर तुझ्या मानाची वृद्धी करणारे आहोंत यास्तव तुझे बंधु, पती, कूल, कस कसें आहे हें संपूर्ण मला सांग. मी सुरथ नामक राजाचा पुत्र कोटिकाख्य-असें मला ह्मणतात. हा कांचन रथाच्या ठायीं अग्निज्वाले सारखा बसला आहे हा त्रिगर्तांचा राजा होय याहून जो पली कडे बसून तुजकडे पहात आहे तो कुलिंद देशाच्या राजाचा पुत्र होय हा राजा निरंतर सुपुष्पीत पर्वताच्या ठायीं वास करितो. तो तरुण रूपवान शाम वर्ण असा पुष्करणी समीप बसला आहे तो इक्ष्वाकुकुलांतील सुभव नामक राजाचा पुत्र होय. याच्या ध्वजाच्या अग्रभागीं सेनें बरोबर अंगारक, कुंजर इत्यादिक सौवीर देशांतील राजांचे बारा पुत्र आहेत.

हा जयद्रथ नामक राजा पहा ज्याचे अग्रभागीं साहहजार रथी तसेच अश्वगज पदाती आहेत. पृष्ठभागीं मोठमोठे पराक्रमी भ्राते आहेत. सौवीर, वीर विदारण इत्यादि राजे बलवान तेही ज्याच्याबराबर आहे असा हा जयद्रथराजा सैन्यास हवर्तमान चालला आहे. हे सुकेशी तूं कोणाची भार्या व कोणाची कन्या आहेस हें आह्मांस सांग. असा विषय अध्यायांत आहे.

२६६ अध्याय दोनशें सासष्ट- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कोटिकारव्यानें प्रश्न केल्यावर द्रौपदी आपलें उत्तरीय वस्त्र धारण करून बोलली हे नरेंद्रा, बुद्धीनेमी तुला जाणलें माझ्यासारख्या स्त्रियां सहवर्तमान एकांतीं भाषण करण्यास तूं योग्य नाहींस. सुरथाचा पुत्र कोटिकारव्य असें तुला संपूर्ण ह्मणतात. तूं आपला वृत्तांत मला सांगितलास आतां मी आपला वृत्तांत तुला सांगत्यें. द्रुपदराजाची कन्या मला कृष्णा असें ह्मणतात, ज्या पांडवांनीं खांडव वन जाळिलें ते प्रसिद्ध तुला ठाऊक असतील त्यांस मी वरिलें आहे. माझे पांच पती मला आश्रमीं ठेऊन मृगये करितां गेले आहेत ते आतां लौकरच येऊन तुमचा सनमान करतील, वाहना वरून तुह्मी खालीं उतरा आणि स्वस्थ आश्रमीं विश्रांती घ्या. असें बोलून द्रौपदी, पर्णशालेंत गेली. अ० विषय या अ० आहे.

२६७ अध्याय दोनशें सदसष्ट- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, द्रौपदीनें भाषण केलेलें कोटिकारव्यानें जयद्रथास सांगतांच जयद्रथ बोलला कीं, तुज सहवर्तमान ती स्त्री भाषण करीत होती तें मी ऐकतांच माझें मन तिचे ठायीं गेलें, तिला पाहातांच मला असें वाटलें कीं. इतर स्त्रिया इच्या पुढें केवळ माकडां सारख्या आहेत. आतां तिला जाऊन सांग कीं. जर तूं मानुषी असलीस तर माझें प्रिय कर. असें ऐकून कोटिकारव्य बोलतो हे राजा, ही द्रुपद राजाची कन्या द्रौपदी पांडवांची स्त्री आहे यास्तव इला घेऊन तूं सौवीर देशीं जा. असें ऐकून साहाबंधु सहवर्तमान जयद्रथ द्रौपदीस ग्रहण करण्याच्या इच्छेनें पांडवांच्या पर्णशालेंत गेला आणि बोलला हे द्रौपदी, तुझे भर्ते कुशल आहेतना व तूंही कुशल आहेसना? असें ऐकून द्रौपदी बोलत्ये हे राजा, शिबि, सौवीर व सिंधु यां सहवर्तमान तूं कुशल आहेसना? कौरव राजा सुखरूप आहेना, माझ्या पतीचा तूं कुशल प्रश्न केलास ते संपूर्ण सुखरूप आहेत. हें पाद्य ग्रहण करू

ने आसनीं बैस आणि तुला पन्नास मृग भक्षणा करितां देतो. युधिष्ठीर वना-
तून आला ह्मणजे अनेक प्रकारचीं मांसें तुला भक्षणाकरितां देईन. असें ऐकू
न जयद्रथ बोलतो हे स्त्रिये, तूं मला भक्षण्याकरितां सर्व दिलेंस असें मी समज
तों. माझ्या रथांत तूं येऊन बैस ह्मणजे तुज सहवर्तमान स्वदेशीं जाऊन बहुत सुख
भोगूं हे अरण्यवासी पांडव राज्यापासून भ्रष्ट जाहालेले यांच्या अनुरोधानें रा
हण्यास तूं योग्य नाहींस यास्तव आतां माझी भार्या होऊन सुखपाव. असें ऐकू
न द्रौपदी जयद्रथ वाक्याचा अवमान करून तेथून मागें जाऊन बोलत्ये हे ज
यद्रथा, हें भाषण तुला योग्य नाहीं असें ह्मणोन आपल्या भर्त्यांची येण्याची-
मार्गप्रतीक्षा करीत पुनः जयद्रथासीं कांहीं लोभयुक्त वाक्यें बोलूं लागली.
असा विषय या अध्यायांत आहे.

२६८ अध्याय दोनशें अडसस्ट— वैशंपायन सांगतात हे जनमेज-
या, द्रौपदी बहुत क्रुद्ध होऊन जयद्रथास बोलली कीं, हे सैंधवा, पहा बरें माझे प
ती यशस्वी, इंद्रासारखे पराक्रमी, यक्षराक्षस यांचाही नाश करणारे असे अ
सतां हे मूढा त्यांची निंदा करतोस तुला लज्जा कशी वाटत नाहीं? मलातर असें
वाटतें कीं, तुझ्या सारखा क्षत्रियाधम कोणाच्याही क्षत्रिय कुलांत नसेल. तूं पां
डवां सहवर्तमान स्पर्धा करतोस; परंतु युद्धांत पांडवांचे हातून मरण पावशील.
तशीच मला ग्रहण करण्याची इच्छा करशील तर करकटी (खेंकडी) सारखा त
त्काल नाश पावशील. असें द्रौपदीनें भाषण ऐकून जयद्रथ बोलतो हे कृष्णे, सं
पूर्ण तुझें वृत्त व पांडुपुत्र यांचाही पराक्रम मला ज्ञात आहे. तुझ्या भयप्रदर्शक
वाक्यानें मी कधीं भीणार नाहीं हे कृष्णे, मीतर आठ कर्में व सहा शक्ती यां सहव
र्तमान युक्त होऊन आपले कुलांत राहातों व षड्गुणापेक्षां ही माझे गुण अधि
क असल्यामुळें पांडवांपेक्षां मी अधिक आहें यास्तव हे राजपुत्री, गज अथवा
रथ याजवर लौकर आरोहण करून चल आणि मला सुप्रसन्न कर. कदाचि-
त् पांडव पाठीमागोन आले असतां मी त्यांचें निवारण करीन. असें ऐकून द्रौपदी
भाषण करत्ये हे दुष्टा, मी या काळीं अनाथ जरी आहें तरी बलात्कारें करून तु
ला वश कधींही होणार नाहीं. ज्या काळीं तूं एकरथांत बसलेले कृष्णार्जुन पाह
शील त्या काळीं केलेल्या कर्माचा पश्चात्ताप पावशील. धनंजयाच्या गांडीवापा-

सून असिविषासारखे बाण सुटतील त्याकालीं तुझें हृदय अगदीं विदीर्ण होऊन जाईल. शंखाचे नाद करून गांडीव धन्वा तुझ्या हृदयावर शरांचा वर्षाव करील, तसाच भीमसेन भयंकर गदा घेऊन तुझ्या अंगावर येईल आणि गदेचा प्रहार तुझ्या शिरावर करील त्याकाळीं तूं काय करशील? हे अधमा, मी तुला खचित सांगत्यें कीं हे पार्थ तुला स्ववश करून मरणप्राय करतील. असें द्रौपदी नाना प्रकारें भाषण करीत असतां त्या दुष्ट कुलाधम जयद्रथानें बलात्कार करून द्रौपदीस धरिलें. त्या कालीं द्रौपदी बोलली हे मूर्खा, पाप्याचा हस्त स्पर्श मला नको असें ह्मणोन तिनें धौम्यास हांक मारिली. इतक्यांत जयद्रथानें उत्तर वस्त्र भाग हातांत धरून आपले कडे द्रौपदीस ओढली तितक्यांत राजपुत्रीनें जयद्रथास भूमीवर पाडला पुनः जयद्रथानें सावध होऊन द्रौपदीस आकर्षण केलें. त्याकालीं द्रौपदीचा उपाय चालेना तेव्हां ती श्वासोच्छ्वास टाकीत रोदन करूं लागली असतां ही जयद्रथानें रथांत नेऊन बैसविली. इतक्यांत धौम्य ऋषी येऊन ह्मणतात हे जयद्रथा, युद्धांत जिंकिल्यावांचून ही राजपुत्री तूं नेण्यास योग्य नाहींस. याचें फल तूं लौकरच पावशील. असें भाषण करून धौम्य, द्रौपदीच्या मागून जयद्रथाचे सैन्यांत गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

२६९ अध्याय दोनशें एकूणसत्तर:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, इकडे पांडव मृग, वराह, महिष यांस मारून एकत्र झाले आणि काम्यक वनीं प्रवेश करावा असा विचार करतात इतक्यांत युधिष्ठिर भ्रात्यांस बोलला कीं, अरण्यांतील मृग पूर्वदिशेस कठोर शब्द करतात तेव्हां शत्रूनीं काम्यक वनपीडीत केल्यामुळें आपल्यास श्रम होतील असें वाटतें. यास्तव आतां लौकर काम्यक वनीं जाऊं. असें नानाप्रकारें धर्मराजानें भाषण करतांच पांडवांनीं रथाचे ह्यांस प्रेरणा केली असतां ते तत्काल आश्रमासन्निध येऊन पोंहोंचले. मार्गांत गोमायु वामभागीं येऊन आपल्या वाणीनें राजास बोध करूं लागले कीं कौरवांनीं बलात्कारें करून तुमचा उपमर्द केला. अशी वाणी ऐकून धर्मराज, भीमसेन व धनंजय यांस बोलला कीं कांहीं तरीं दुःश्चिन्ह आहे असें भाषण करीत चालले असतां आश्रमाचे अग्र-

मार्गी द्रौपदीची एक दासी रोदन करीत बसली होती तिला इंद्रसेन रथाखालीं उतरून बोलला हे दासी तूं रोदन करीत पृथ्वीवर कां पडलीस? द्रौपदीस दुष्टानीं बलात्कारानें नेली नाहींना? अथवा तिणें पृथ्वी, समुद्र यां मध्यें प्रवेश केला काय? हे दासी द्रौपदी ज्या मार्गानें गेली असेल तो मार्ग सांग ह्मणजे त्या मार्गानें तिचा शोध करूं. तूं शोक करूंनको झालेलें वर्तमान सत्वर सांग ह्मणजे शत्रूचा याक्षणीं आह्मीं नाश करूं आणि याज्ञसेनीस घेऊन येऊं. असें इंद्रसेनाचें भाषण ऐकून दासी बोलली हे इंद्रसेना, पांच पांडवांस तुच्छ करून जयद्रथानें बलात्कारें करून द्रौपदी नेली. तो अद्याप फार लांब गेला नसेल यास्तव याच मार्गानें तुह्मीं लौकर जा आणि राज पुत्रीस घेऊन या. सोमयागांत श्वानानें पाहिलेलें हविर द्रव्य जसें व्यर्थ नसा त्या दुष्टानीं द्रौपदीचा उपभोग केला असतां तुमचे प्रयास संपूर्ण व्यर्थ होतील. यास्तव तिला घेऊन येण्याचा उपाय लौकर करा, विलंब लाविला असतां तुमची भार्या तुह्मांस मिळणार नाहीं. असें दासीचें कठोर भाषण ऐकून युधिष्ठीर ह्मणतो कीं, तूं अशीं कठोर अक्षरें मुखांतून काढूंनको. आह्मीं जिवंत असतां आमची भार्या हरण करण्याची इच्छा जे धारण करतील त्याणीं मृत्यु गृहांत प्रवेश केला असें समजावें. असें बोलून पांचही पांडु पुत्र धनुष्य बाण घेऊन वारंवार श्वासोच्छ्वास टाकीत दासीनें दाखविलेल्या मार्गानें जात असतां त्यानीं दुरून जयद्रथाचें सैन्य पाहिलें, त्या सैन्यांत धौम्य हे भीमसेना, लौकर ये असें भाषण करीत आहे, तें ऐकून पांडव जयद्रथाच्या सैन्याजवळ जाऊन धौम्यास ह्मणो लागले कीं, भिऊंनको आह्मीं आलों असें ह्मणत सैन्यांत जाऊन पोहोंचले आणि याज्ञसेनी व जयद्रथ रथांत बसलेलीं पाहातांच पांची पांडवांनीं मोठी गर्जना केली. असा विषय या अध्यायांत आहे.

२७० अध्याय दोनशें सत्तर.– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, जयद्रथ ज्या वनीं होता त्या वनांत पांडव गेले असतां एकाएकीं मोठा घोर शब्द झाला. भीमार्जुन यांच्या रथाचे ध्वज पाहून जयद्रथ रथामध्यें याज्ञसेनीस बोलला कीं, हे पांच रथी कोण आले आहेत फार करून मला वाटतें हे तुझे पतीच असतील. असें ऐकून द्रौपदी बोलली हे मूढा, हें तूं भयंकर कर्म आयुष्याचें नाश करणारें असें केलेंस हें जाणोन तुला शिक्षा करण्या करितां हे माझे पती आ

ले आहेत, युद्धामध्यें तुझ्या सैन्याचा नाश करून शकतील. पांडवांस पाहूनत
न आतां तुजपासून मी भयाची व्यथा पावत नाहीं आतां ज्याच्या ध्वजाग्रीं नं
दोपनंद नामक मृदंग निरंतर मधुर वाजत असतात तो युधिष्ठीर, तसाच
ज्यानें अधरोष्ठ चर्वण करून भृकुटी चढविल्या आहेत तो भीम, जो धनु
ष्य धारण करून रथांत बसला आहे तो अर्जुन, जो रूपवान दिसतो तो नकु
ल आणि ज्यानें हस्तांत तलवार घेतली आहे तो सहदेव असे माझे पांचप
ती आहेत आतां यांचे हातून जर कदाचित् तूं वांचलासतर तुझें पुनरजन्म
झालें असें समज. असें बोलत आहे तों पांडवांनीं सैंधवाच्या सैन्यावर चोहो
बाजूनें शरवर्षाव करून तत्काल अंधःकार उत्पन्न केला. अ. वि. या अ. आ.

२७१ अध्याय दोनशें एकाहात्तर:— वैशंपायन ह्मणतात हे जनमे
जया, जयद्रथाच्या सैन्यांत एकाएकीं हाहाकार उत्पन्न होऊन योद्धे पर-
स्पर भाषण करूं लागले कीं, उभे राहून युद्ध करा, पलायन करूं नका. जय
द्रथ ही पुनःपुनः आपले योध्यांस अशीच प्रेरणा करीत असे. भीमसेन,
अर्जुन, नकुल, सहदेव व धर्मराज यांस पाहून शिबि, सौवीर व सिंधु यां
स मोठा विषाद उत्पन्न झाला. नंतर भीमसेन गदा घेऊन सैंधवावर धांवला
तों मध्यें कोटिकाख्यानें त्याचें निवारण केलें आणि शक्ती बाण यांची बहु
त दृष्टी केली. परंतु भीमसेनास कांहीं ही भय न होतां त्यानें चौदा गज व चौ
दा अश्व गदेनें मारिले. पुढें अर्जुनानें पार्वतीय नामक सौवीराच्या पांचशें
योध्यांस सैन्याच्या अग्रभागीं मारिले. धर्मराजानें एक निमिषांत शंभर
याद्धे मारिले. नकुलानें जयद्रथाच्या पादरक्षकांचीं शिरें तोडून पाडिलीं.
सहदेवानें गजारूढ जे राजे यांसह वर्तमान युद्ध करून बहुतांस पृथ्वीवर पा
डलें तेव्हां त्रिगर्तराजानें रथाखालीं उतरून गदेनें धर्मराजाच्या रथाचे चारी
अश्व मारिले त्याकालीं धर्मराजानें अर्धचंद्राकार बाणांचा प्रहार सुशर्म्या
च्या हृदयावर केला. त्यायोगें तो भिन्नहृदय होऊन रक्त वमन करीत पृथ्वी
वर पडला असतां धर्मराज इंद्रसेनासहवर्तमान सहदेवाच्या रथांत जाऊ
न बसला नंतर नकुल सहदेव यांणी सुशर्म्यावर बाणांची दृष्टी केली. त्या
कालीं त्रिगर्तराज गजारूढ होऊन युद्ध करूं लागला त्याच्या अग्रभागीं म-

कुळ चर्म खड्ग घेऊन गिरी सारखा अचल उभा असतां क्षेमर्ष्यानें नकुलास मारण्या करितां आपले गजास प्रेरणा केली तो गज नकुलाचे समीप येतांचखड्गें करून नकुलानें त्याची दंतांसहित शुंडा तोडून गजास पृथ्वीवर पाडलें त्याघातानें बहुत महातांचा नाश झाला. हें नकुलाचें महत्कर्म पाहून भीमसेनानें कोटिकाख्याच्या रथाचे अश्व क्षुरबाणानें नाशित केले ते व्हां सूत रथाचे खालीं उतरून भीमाच्या अग्र भागीं युद्धा करितां आला त्याकालीं भीमसेनानें तलप्रहारानें त्याचा प्राण घेतला. पुढें धनंजय व सौवीर यांचें युद्ध तुमुल होऊन सौवीराचे द्वादश पुत्र, शिबी इक्ष्वाकु मुख्य सैंधव व दुसरे राजे यांस धनंजयानें मारिले. त्याकालीं संपूर्णांच्या रथाच्या पताका मोडल्या, मातंग भयाभीत होऊन पळाले. असा युद्ध प्रसंग पाहून सिंधुराजा कृष्णेस सोडून पळाला. नंतर धर्मराजानें धौम्यासह द्रौपदीस पाहून माद्री पुत्रास आज्ञा केली कीं, द्रौपदीस रथांत बसवून इकडे आण. जयद्रथ व त्याचें सैन्य पळत असतां वृकोदरानें बाणांचा वर्षाव बहुत केला तेव्हां धनंजय बोलला हे भीमसेना, पळालेल्या जयद्रथास सोडून तूं इकडे ये तूं कशा करितां युद्ध करतोस? असें ऐकून भीमसेन युधिष्ठिराकडे पाहून बोलला कीं, हा दुष्ट द्रौपदीस घेऊन पळाला त्यायोगें हे महान् महान् राजे आपले रिपू होऊन मरण पावले यास्तव यास मारावें हें योग्य. असें ऐकून युधिष्ठीर बोलतो हे भीमसेना, नकुल सहदेव यांस बरोबर घेऊन द्रौपदीस आश्रमींने आणि निज शोभवन कर. असें ऐकून भीमसेन भाषण करतो हे राजा जयद्रथ जरी पातालांत गेला तथापि त्याचा प्राण घेण्यास सोडणार नाहीं. असें ऐकून युधिष्ठीर भाषण करतो हे महाबाहो, जरी सैंधव दुरात्मा आहे तथापि त्यास मारूं नको कारण यास मारिला असतां दुःशला व गांधारी यांस बहुत दुःख होईल. असें ऐकून द्रौपदी भीमार्जुनास बोलली कीं, माझें प्रिय करावें अशी जर तुमची इच्छा आहे तर पुरुषाधम जो जयद्रथ याचा वध करा. नंतर भीमार्जुन तत्काल सैंधवास धरण्या करितां गेले इकडे धर्मराज पुरोहितास व द्रौपदीस घेऊन स्व आश्रमीं आले तेथें मार्कंडेय प्रभृती ऋषी द्रौपदी विषयीं शोक करीत बसले होते त्यांचें राजानें शांतवन केलें तसेंच भार्येस हव-

र्तमान युधिष्ठिरास पाहून ब्राह्मण आनंद पावले. इकडे भीमार्जुन जयद्र थाच्या पाठीमागें एक कोश पर्यंत गेले आणि पार्थानें दिव्यास्त्र योगें त्याच्या रथाचे घोडे मारले पुढें अर्जुन तेथें थांबून सैंधवास बोलला अरे अशा च पराक्रमें करून दुसऱ्याची स्त्री हरण करतोसना? अरे समग्र सैन्याचा त्याग करून पळतोस ही तुला लज्जा कशी वाटत नाहीं. नंतर भीमसेन भाषण कर तो हे क्षत्रिया थांब उभा राहा मी आलों असें बोलून भीमसेन त्वरेनें चालला. तेव्हां पार्थ बोलला हे भीमा, मारूंनको ग्रहणमात्र कर. अ. वि. अ. आहे.

२७२ अ. दोनशें बाहात्तर– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, नंतर भीमानें जयद्रथाचे केश धरून त्यास पृथ्वीवर पाडलें. पुनः मस्तक थ रून बहुत ताडन केलें तेणें करून सैंधव मरण प्राय झाला. तेव्हां अर्जुन-बोलतो हे भीमा, दुःशलेकरितां यास मारूंनको तिचें रक्षण करणें आपल्या स अवश्य आहे व धर्मराजानें ही असेंच सांगितलें आहे. असें ऐकून भी मसेन भाषण करतो हे पार्था, हा दुष्ट माझे हातून कधीं वांचणार नाहीं. अ- सें दुःख सोसण्यास द्रौपदी अशक्य असतां यानें कसें दिलें? नंतर अग दींच बाल बुद्धी धरून मला बोध करतोस. असें बोलून त्यानें जयद्रथाच्या-शिखेचे पांच भाग करून अर्धचंद्र बाणें त्याचें छेदन केलें आणि पुनः भा-षण केलें कीं, हे राजा, आतां जिवंत राहण्याची इच्छा असेल तर सभेच्या ठा यीं संपूर्ण बसले असतां मी तुमचा दास आहें असें ह्मण ह्मणजे तुला सो-डून देऊं. असें ऐकून जयद्रथ भाषण करतो हे भीमा, तुझ्या भाषणा प्रमा-णें मी कबूल आहें सभेंत तुमचा मी दास आहें असें ह्मणेन परंतु या कालीं मला जिवदान करा. नंतर रज्जूनें त्यास बंधन करून त्या सह वर्तमान भीम सेन व अर्जुन धर्मराजाच्या आश्रमीं आले तेव्हां धर्मराज ह्मणतो हे भीमा, अरे याला सोडा मारूंनका. असें ऐकून भीमसेन भाषण करतो हे धर्मरा जा, जर द्रौपदीनें या दासास सोडावें असें सांगितलें तर सोडीन. असें ऐकून धर्मराज ह्मणतो हे भीमा, हा पापाचारी जरी आहे तथापि आपण यास कधीं मारूंनये ही शिक्षा त्यास बहुत झाली. असें ऐकून द्रौपदी बोलत्ये हे भीमा, जर तो आपला दास ह्मणत असेल तर त्याचे पांच पाट काढून सोडून दे. असें

द्रौपदीनें भाषण करतांच भीमानें त्या शरणांगताकडून दास असें नक्की ह्मणवून पांच पाट काढविले आणि त्यास सोडून दिला. नंतर जयद्रथानें धर्मराजाचे चरणीं मस्तक ठेऊन संपूर्ण ऋषींस नमस्कार केला. तेव्हां युधिष्ठीर बोलला हे क्षुद्रा, स्त्री लंपट झालास ह्मणोन अशी अवस्था पावलास. आतां मात्र पुन: असें कर्म करूंनको. आतां अश्वरथ पदाति यांसहवर्तमान स्वस्थानें जा. असें धर्मराजानें भाषण केलें असतां जयद्रथ लज्जित होऊन गंगाद्वारीं विरूपाक्षजो भगवान याचे दर्शनाकरितां गेला. तेथें विपुल तप करून त्यानें वृषभध्वजास बलिप्रदान केलें, तेणें करून त्रिलोचन संतुष्ट होऊन जयद्रथास ह्मणाले कीं, तूं वरमाग. असें ऐकून जयद्रथ बोलला हे- प्रभो, युद्धामध्यें पांडव रथारूढ असतां त्यांचा मी पराभव करीन असा वरमला द्यावा. असें ऐकून शिव बोलले हे जयद्रथा, तूं ह्मणतोस असें व्हावयाचें नाहीं कारण पांडव अजय्य व अवध्य आहेत तुझी इच्छा असल्यास नरावतार जो अर्जुन हा जेव्हां नसेल तेव्हां तूं चार पांडवांचा पराभव करशील. या अर्जुनानें नारायणासहवर्तमान बदरीच्या ठायीं मोठी तपश्चर्या केली, दुरासद दिव्य असें एक पाशुपत नामक अस्त्र मी यास दिलें आहे, इंद्रादिलोकपालानीं ही वज्रादि अस्त्रें त्यास दिलीं आहेत. त्यास नारायण साह्य आहे तो नारायण असा कीं, चंद्रसूर्यादिकांस प्रकाश करणारा ज्याचें स्वरूप अनंत आहे व प्रलय कालीं कालाग्नीच्या योगें पर्वतादिकांसहीत सर्वलोकांचा नाश होऊन जग जलमय झालें असतां जो भगवान शेषावर शयन करितो. असा तो नारायण सृष्टी करावी असें जेव्हां मनांत आणितो तेव्हां त्याच्या नाभी कमला पासून ब्रह्मदेव उत्पन्न होतो. नंतर त्यापासून पुन: सर्व सृष्टी होते. तो भगवान् वराह, नारसिंह, वामन इत्यादिक अवतारधारण करून जगाचें वारंवार कल्याण करितो असाजो नारायण तोचहा कृष्ण होय. तो अर्जुनास सहाय्य असल्यामुळें अर्जुन देवादिकांनींही अजिंक्य आहे यास्तव त्या वांचून एकच दिवस चार पांडवांस जिंकशील असें जयद्रथाशीं बोलून शंकर अंतर्धान पावले. मंदबुद्धि जयद्रथ ही आपल्या गृहीं गेला आणि पांडव काम्यकवनीं राहिले. अ० ति० या अ० आहे.

२७३ अध्याय दोनशें त्र्याहात्तर:- जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायन ऋषे, जयद्रथानें पांडवांची भार्या हरण केली असतां पांडवांस बहुत दुःख होऊन त्यानीं काय केलें? असें ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, जयद्रथाचा पराजय करून पांडवांनीं द्रौपदीस मुक्त केल्यावर संपूर्ण ऋषी ऐकत्र असतां धर्मराज मार्कंडेय ऋषीस बोलतो हे ऋषे तूं देवऋषींमध्यें परम प्रसिद्ध आहेस. भूत भविष्य जाणतोस यास्तव मला एक संशय आला आहे तो असा की, ही द्रौपदी वेदीपासून उत्पन्न झाली असून द्रुपदाची कन्या, पांडुराजाची स्नुषा, धर्मचारिणी अशी असून तिला कवटें संकट प्राप्त जाहालें तस्मात् काल बलवत्तर आहे. पहा त्या मूढबुद्धि जयद्रथानें तिचें हरण करावें काय? तस्मात् आह्मीं कालाच्या योगानेंच जयद्रथाचें सैन्य मारून द्रौपदीस पुनः आणिलें असो आह्मीं वनवासांत असून आमच्या भार्येचें हरण, मृगयेनें उपजीवन करणें, स्वज्ञातीशीं आमचा वियोग तेव्हा हे ऋषे, माझ्यासारिखा भाग्यहीन कोणी नसेल असें मला वाटतें तूं तरी असा भाग्यहीन पूर्वीं पाहिला अथवा ऐकिला असल्यास सांग. अ. वि. अ. आहे.

२७४ अध्याय दोनशें चवऱ्याहात्तर:- मार्कंडेय भाषण करतात हे युधिष्ठिरा, पूर्वीं रामचंद्रानें अप्रतिम दुःख सोशिलें त्याची भार्या जानकी, रावणानें मायारूप धरून हरण केली तेव्हां रामचंद्रानीं सुग्रीवाच्या साहाय्यानें समुद्रांत सेतू बांधून निशित बाणानीं लंकेचा दाह करून जानकीस आणिलें असें ऐकून युधिष्ठीर प्रश्न करतो हे ऋषे, राम कोणाचे कुळांत उत्पन्न झाला त्याचें वीर्य काय? रावण कोणाचा पुत्र व त्याशीं वैर कशाकरितां झालें तें सांगा. असा प्रश्न ऐकून मार्कंडेय सांगतात हे राजा, इक्ष्वाकुकुळांत अजया नामें राजा झाला त्याचा पुत्र दशरथ या नामें स्वाध्यायवान परम शुची होता. कालें करून त्यास धर्मार्थ जाणणारे राम, लक्ष्मण, भरथ व शत्रुघ्न असे चार पुत्र झाले. रामचंद्राची माता कौशल्या, भरताची कैकयी, लक्ष्मण शत्रुघ्नाची सुमित्रा यांसहवर्तमान दशरथ राजा राज्य करीत असतां विदेहराज जनक याची कन्या सीता नामक स्वयंवरामध्यें रामचंद्राची भार्या झाली. असा रामचंद्र व सीता यांचा वृत्तांत तुला सांगितला. आतां रावणाचा जन्मवृत्तांत सांगतों. ब्रह्मदेवाचा मानस पुत्र पुलस्त्य

यानामें होता त्यापासून गोसंज्ञक भार्येच्याठायीं वैश्रवण यानामें एक पुत्र झाला तो पित्याचा त्याग करून पितामहास शरण गेला म्हणून पुलस्त्यास क्रोध येऊन त्यानें वैश्रवणाच्या अपकारार्थ विश्रवानामक रूप धारण केलें तेव्हां पितामह ब्रह्मदेव यांनीं संतुष्ट होऊन परमप्रीतीनें अमरत्व, धनेशत्व, तसेंच शिवाशीं सख्य व नलकूबर नामा पुत्र इत्यादि देऊन रक्षोगणांनीं सेवित लंकानामक नगरी तीही रहाण्याकरितां दिली. तसेंच पुष्पकनामक विमान यथेच्छ गमन करणारें तेंही दिलें. तसेंच यक्षाचें आधिपत्यही दिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

२७५ अध्याय दोनशें पंच्याहात्तर — मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, पुलस्त्य ऋषि क्रोधयुक्त असतां तो विश्रवारूप धरून क्रोधानें कुबेराकडे पाहूं लागला. तेव्हां पिता क्रोधयुक्त झाला असें पाहून कुबेरानें त्याच्या संतोषार्थ यत्न करून पित्याच्या शुश्रुषेकरितां तीन राक्षसी दासी दिल्या. त्यांनीं नृत्यगीत इत्यादिकें करून ऋषींचा बहुत संतोष ठेविला. त्या पुष्पोत्कटा, राका व मालिनी तीन परिचारिका एकमेकींची स्पर्धा करून निरंतर असत. कोणे एके दिवशीं ऋषि संतुष्ट होऊन तिन्हीं परिचारिकांस म्हणतो मी तुमच्यावर संतुष्ट झालों. लोकपालांसारखे तुह्मांस पुत्र होतील असा वर दिल्यावर कांहीं दिवसांनीं पुष्पोत्कटेला रावण कुंभकर्ण असे दोन पुत्र झाले. मालिनीस बिभीषण, राकेस खर व शूर्पनखा हीं दोन आपत्यें झालीं. बिभीषण सर्वांमध्यें रूपेंकरून अधिक असून धर्मरक्षण करणारा होता. संपूर्णांमध्यें दशग्रीव हा श्रेष्ठ होय. कुंभकर्ण सर्वांपेक्षां बलानें व पराक्रमानें अधिक असून मायावी होता. खर धनुर्विद्येंत निपुण असून ब्रह्मद्वेष्टा, नरमांस भक्षण करणारा असा होता. शूर्पणखा लोकांस विघ्न करणारी होती. हे संपूर्ण वेदवेत्ते शूर असतां पित्यासह वर्तमान गंधमादनपर्वतीं वास करीत एके दिवशीं वैश्रवण पित्यासह वर्तमान नरयानामध्यें बसून व संपूर्ण ऐश्वर्य बरोबर घेऊन फिरत असतां त्यास पाहून रावणप्रभृति क्रुद्ध झाले. आणि तपास आरंभ करून ब्रह्मदेवास संतुष्ट करावें, अशी बुद्धि त्यांनीं धारण केली. रावणानें हजारों वर्षेंपर्यंत एक पायावर उभें —

राहून वायु भक्षण करीत पंचाग्निसाधन केलें. कुंभकर्णानें भूमिशयन व नियत आहार असें तप केलें. बिभीषणानें वृक्षांपासून गलितपत्र एक भक्षण करावें, आणि निरंतर जप परायण असून उदार बुध्दि धारण करीत तीव्र तप केलें. शूर्पणखा व खर परम संतोषानें रावण कुंभकर्ण व बिभीषण यांची सेवा करीत असत. सहस्त्र वर्षे पूर्ण झाल्यावर रावणानें आपलीं शिरें तोडून अग्नींत हवन केलीं. तेणेंकरून ब्रह्मदेव संतुष्ट होऊन स्वतः आपण त्याचें निवारण करून बोलला हे मुलांनो, एक अमरत्वावांचून तुह्मांस इच्छित वर देतों तपस्या समाप्त करा. हे रावणा, तूं अग्नीमध्यें शिरांचा होम केलास. तीं शिरें पुनः तुला या देहास उत्पन्न होतील वैरूप्य होणार नाहीं. आणि रणाचेठायीं संपूर्ण शत्रूंचा पराभव करणारा होशील असें ऐकून रावण भाषण करतो हे पितामह, गंधर्व, देव, सूर्य, यक्ष, राक्षस, सर्प, किन्नर, उरग यांजपासून माझा पराभव नसावा हाच वर मी मागतों. असें ऐकून ब्रह्मदेव भाषण करतात. हे रावणा जें तूं ह्मटलेंस त्यापासून तुझा पराभव एक मनुष्यावांचून व्हावयाचा नाहीं. मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, दशग्रीवास ब्रह्मदेवाचें वरदान होतांच तत्काल तो संतुष्ट होऊन तेव्हांपासून मनुष्यास केवळ तृणप्राय मानूं लागला. नंतर ब्रह्मदेवानें कुंभकर्णास वर माग असें भाषण करतांच कुंभकर्ण तपस्येंकरून अगदीं त्रस्त असतां म्या बहुत निद्रा घ्यावी असा वर मागितला तो देऊन नंतर बिभीषणास वर माग असें भाषण केलें असतां बिभीषणानें संतुष्ट होऊन वर मागितला. हे पितामह पराकाष्ठेची मला जरी आपत्ति आली तथापी धर्मापासून माझी मति भ्रष्ट होऊं नये. व उपदेशावांचून ब्रह्मास्त्रविद्या मला प्राप्त व्हावी असें ऐकून ब्रह्मदेव भाषण करतात हे राक्षसा, राक्षसयोनींमध्यें उत्पन्न होऊन तुझी बुध्दि अधर्माचेठायीं प्रवृत्त होत नाहीं, यास्तव तुला अमरत्व देतों. नंतर ब्रह्मदेवापासून वर मिळतांच रावणानें लंकेंत जाऊन पुष्पकविमान हरण केलें. कुबेरास पराजित केलें तेव्हां कुबेरानें रावणास शाप दिला कीं मी गुरु असतां माझा अवमान त्वां केलास. यास्तव पुष्पक विमान हें तूं बसल्यावर यथेच्छ चालणार नाहीं.

समग्रांत जो कोणी युद्धा हंता होईल तो या पुष्पकविमानामध्यें बसून गमन करील त्याचेंच हें विमान वहन करील असें ह्मणून तो गंधमादन पर्वतीं गेला. तेव्हां बिभीषण साधूच्या मार्गास अनुसरून कुबेराकडे गेला. तेव्हां कुबेरानें संतुष्ट होऊन यक्ष राक्षस सेनेचें आधिपत्य बिभीषणास दिलें असतां संपूर्ण राक्षसांनीं लंकेमध्यें रावणास राज्याभिषेक केला. त्याकाळीं रावण, देव, दैत्य यांमध्यें परम बलि होऊन त्यानें संपूर्णांचीं रत्नें हरण करून आपले गृहीं आणिलीं. संपूर्ण लोकांस भयेंकरून अगदीं पीडित केलें ह्मणून त्याचें नांव रावण असें समग्रांनीं ठेविलें. असा विषय या अध्यायांत आहे.

२७६. अध्याय दोनशें शाहात्तर:—मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, नंतर महर्षि, सिध्द, देव, अग्नीस पुढें करून ब्रह्मदेवास शरण गेले असतां अग्नि ब्रह्मदेवास ह्मणतो हे पितामह, विश्रवाचा पुत्र दशग्रीव महाबलि तुमच्यावर दानेंकरून अवध्य झालेला यानें नाना प्रकारें संपूर्ण प्रजा पीडित केल्या. यास्तव हे भगवान् याज पासून आमचें त्राण करावें. असें ऐकून ब्रह्मदेव बोलतात हे हव्यवाहन देवासुर हे रावणाचा पराभव करण्यास समर्थ नाहींत. याजविषयीं मी निराळीच कार्याची योजना केली आहे ती तुला सांगतो. चतुर्भुज भगवान् विष्णु हा भूलोकीं अवतार धारण करून तुमचें कार्य करील असें अग्नीस सांगून शक्रास ह्मणूं लागले कीं, तुह्मीं देवगणांसह वर्तमान भूलोकीं विष्णूचें साह्य करण्याकरितां ऋक्ष, वानर, यांच्या योनीच्याठायीं जन्म घ्या. तुह्मी मोठे पराक्रमी व्हाल. असें ह्मणतांच संपूर्ण देव एकत्र होऊन पृथ्वीवर जन्म घेण्याकरितां गेले. दुंदुभी नामक गंधर्वीस ब्रह्मदेवानीं सांगितलें कीं, तूं पृथ्वीवर जाऊन मंथरानामक दासी हो. आणि सर्वांची कार्यसिध्दि कर. नंतर इंद्रप्रभृति सर्वदेवांनीं वानरादि योनींत जन्म घेऊन कोणीं दाहाहजार हत्तींचे बलि, कोणीं वायूसारखे गमन करणारे, व गिरीगुहांचे ठायीं राहाणारे झाले. तशीच मंथरानामक दासी मनासारख्या वेगानें पृथ्वीतलाचेठायीं वैर प्रदीप्त करण्याकरितां संचार करूं लागली. असा विषय या अध्यायांत आहे.

२७७ अध्याय दोनशेंसत्याहात्तर:—युधिष्ठिर भाषण करतात हे

ऋषे, रामचंद्र लक्ष्मण यांचें जन्मकारण पृथक् पृथक् सांगितलेंत. आतां जानकीसहवर्तमान रामचंद्र वनांत जाण्याचें कारण काय? तें सांगा. असें ऐकून मार्कंडेय सांगतात हे राजा, दशरथास ज्याकाळीं रामचंद्र लक्ष्मण झाले त्याकाळीं बहुतच आनंदयुक्त होऊन त्यानें चारी पुत्रांकडून वेद व धनुर्विद्या इत्यादिकांचा अभ्यास करविला. पुढें विवाह करावा अशी इच्छा करून क्रमानें विवाह केले. दशरथ राजाची ज्येष्ठ पुत्रावर अत्यंत प्रीति असे व रामचंद्रही पित्यास निरंतर आनंद करीत असे. रामचंद्र सर्वांपेक्षां स्वरूपानें उत्तम असून सर्व धर्मवेत्ता, बृहस्पतिसारखा बुद्धिमान, सर्व प्रजेवर समदृष्टि ठेवणारा, शत्रूस कधींही वश न होणारा असा होता. तेव्हां दशरथानें पुरोहितास भाषण केलें हे ब्रह्मन्, आज रात्रीस पुष्ययोग पुण्यकारक आहे, यास्तव राज्याभिषेकाची सामोग्री तयार करवून रामचंद्रास निमंत्रण करा. असें राजानें भाषण केलेलें ऐकून मंथरानामक दासी कैकेयीस बोलली कीं, हे दुर्भाग्ये तुझें दौर्भाग्य राजानें आज लोकांत प्रगट केलें. यापेक्षां सर्पदंशानें तूं मरण कां पावलीस नाहींस? कौशल्या परमभाग्यशालिआहे असें मला वाटतें. कारण रामचंद्रास राज्याभिषेक करण्याचा विचार राजानें केला आहे. असें ऐकतांच कैकेई राजापाशीं जाऊन बोलली हे राजा, तूं सत्यप्रतिज्ञ असें ह्मणवितोस त्यापेक्षां मला जो वर पूर्वी देऊं केला होतास तो आतां देऊन तूं संकटापासून मुक्त हो. असें ऐकून राजा भाषण करतो हे प्रिये, जो तुला इच्छित वर असेल तो माग. जो अवध्य असेल त्याचा वध करीन व ज्यास द्रव्य देणें असेल त्यास द्रव्य देईन, अथवा ज्याचें हरण करणें असेल त्याचें हरण करीन. असें ऐकतांच कैकेई भाषण करते हे राजा, माझें मागणें असें आहे कीं, रामचंद्रास अभिषेक न करतां भरथास राज्याभिषेक करून रामास वनवासास पाठवावें. असें ऐकतांच राजा परम दुःखित होऊन कांहीं उत्तर देण्यास समर्थ झाला नाहीं. रामानें हा वृत्तांत जाणून पित्यास सांगितलें कीं, तूं धर्मात्मा सत्यप्रतिज्ञ आहेस. तुझी प्रतिज्ञा भंग न होवो असें भाषण करून लक्ष्मण व सीता यांसहवर्तमान राम वनास गेला. हें ऐकून दशरथ त्या दुःखाच्यायोगें कांहीं काळानें मरण पावला. नंतर कैकेईनें —

भरतास सांगितलें कीं, तुझा पिता स्वर्गास गेला. आणि रामलक्ष्मण वनास गेले आतां निष्कंटक राज्य तूं कर. असें ऐकून भरथ भाषण करतो हे दुष्टे, पतीचा नाश करून धनाच्या प्राप्तीची इच्छा करतेस ही तुझी केव्हढि अपकीर्ति, हें अपयश तुझ्यासंबंधानें माझे शिरावर येईल यास्तव ज्या इच्छेनें तूं हें कर्म केलें असशील ती इच्छा तूं आपली तृप्त करून घे. माझी राज्य करण्याची इच्छा नाहीं असें बोलून रामचंद्रास अयोध्येस आणावें या इच्छेनें कौशल्या, सुमित्रा व कैकेयी यांस पुढें पाठवून शत्रुघ्नासहित वसिष्ठ वामदेवप्रभृति हजारों ऋषि व नागरिकलोक यांसहवर्तमान भरथ चित्रकूटपर्वतीं गेला. तेथें तापसवेषधारी रामचंद्र लक्ष्मणासह वर्तमान बसलेला पाहून उभयतांचें संभाषण झालें. नंतर रामचंद्रानीं भरथाचें विसर्जन करतांच भरत. पादुका पुरस्कर करून नंदिग्रामीं राहिला. इकडे रामचंद्र महारण्यांत प्रवेश करून शरभंगाचे आश्रमीं गेला. तेथें ऋषींचा सत्कार करून पुढें दंडकारण्यांत गोदावरी नदीचा आश्रय करून संचार करीत असतां कोणीएक शूर्पणखानामक राक्षसी खराची भगिनी कपटानें रामचंद्राचें कांहीं विपरीत करावें ह्मणून प्राप्त झाली. तिची नासिका व स्तन यांचा लक्ष्मणानें छेद केला. हा वृत्तांत खर दूषणांस कळतांच तेही रामचंद्राचा नाश करावा या बुध्दीनें चारहजार राक्षसांसहवर्तमान आले असतां युध्दांमध्यें रामचंद्रानीं त्या संपूर्ण राक्षसांचा नाश करून ब्राह्मणांचे रक्षणाकरितां दंडकारण्य निर्भय केलें. शूर्पणखा आपले भ्राते मरण पावले व आपलें रूप भग्न झालें असें समजून तत्काळ लंकेंत गेली. आणि दुःखानें रोदन करूं लागली. हें पाहून रावण ओष्ठ चर्वण करून भगिनीस बोलला हे भद्रे, तुझें रूप असें विछिन्न कोणीं केलें. माझा अवमान करणारा व माझे शूलाचे प्रहार सोसणारा असा कोण बलि आहे? असें बोलून तत्काळ रावणाच्या आंगांतून ज्वाला उत्पन्न झाल्या. नंतर भगिनीनें आपला व खरदूषणाचा वृत्तांत सांगतांच तत्काळ रावण पापमति धरून आकाशमार्गें त्रिकूटपर्वताचा त्याग करून गोकर्णीं आला. तेथें शूलपाणीचें दर्शन करून पूर्वींचा आपला अमात्य मारिच रामभयानें तापस वेष धारण

करून वनांत राहात होता. त्याच्या आश्रमीं गेला: असा विषय या अध्यायांत आहे.

२७८. अध्याय दोनशें अठ्याहत्तर:— मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, मारीचानें आपले आश्रमीं रावण आला असें पाहून त्याची सत्कार पूर्वक पूजा केली आणि विश्रांति करितां आसन देऊन प्रौढवाक्यांनीं भाषण केलें. हे रावणा, तुझी सुखश्री उतरलेली दिसते. तुझ्या पुरांमध्यें संपूर्ण लोक सुखी आहेत ना? प्रजा तुझें पूर्वीप्रमाणें सेवन करतात ना? तुझें येथें येण्याचें कारण जें असेल तें मला सांग ह्मणजे दुर्घट जरी असलें तरी तें सिध्दीस गेलें असें समज. असें मारीचाचें भाषण ऐकून रावणानें त्याची बहुत प्रशंसा केली. आणि रामचंद्राचा वृत्तांत संक्षेपानें सांगितला तो ऐकून मारीच बोलला हे रावणा, तूं जें भाषण केलेंस तें पुरे. त्याचा पराक्रम किती आहे तो मी जाणतों. त्याच्या बाणांचा वेग कोण बरें सहन करील. मी ह्या ऋषीचा वेष धारण केला, यास कारण तरी रामचंद्रच आहे. तुला हें विनाशाचें मुख कोणीं सांगितलें. असें ऐकून रावण त्याची निर्भर्त्सना करून भाषण करतो. हे मारीचा, जर माझें वाक्य न ऐकशील तर निश्चयेंकरून मरण पावशील. असें ऐकून मारीचानें मनांत विचार केला कीं याचें कार्य न केलें तर निश्चयेंकरून हा आपल्यास मारील. तेव्हां या दुष्टाच्या हातून मरण्यापेक्षां पुण्यशील जो रामचंद्र याचे हातून मरावें असा निश्चय करून बोलतो हे रावणा, तुला मी काय साह्य करूं. रावण बोलतो हे मारीचा, तूं रत्नमृग मृगाचा वेष धरून सीतेच्या आश्रमीं जा, आणि तिच्या मनास लोभ उत्पन्न कर, ह्मणजे सीता रामचंद्रास मृग आणण्याविषयीं सांगेल. नंतर तो मृग ग्रहण करण्याविषयीं रामचंद्र गेला ह्मणजे इकडे सीतेस वश करून मी घेऊन आईन. रामास भार्यावियोग झाला ह्मणजे माझें कार्य सिध्द झालें. असें ऐकून मारिचानें मरणाची सिध्दता केली आणि रावणाच्या भयानें मृगाचें रूप धारण करून सीतेच्या आश्रमीं जाऊन तिच्या मनास लोभ उत्पन्न केला. तेव्हां सीता रामचंद्रास भाषण करत्ये कीं, हा चमत्कारिक मृग आपले आश्रमीं आला आहे हा ग्रहण करून मला द्या. तेव्हां रामचं-

द्रानीं भार्येचें प्रिय करण्यास्तव तिचे संरक्षणास लक्ष्मणास ठेविलें आणि आपण धनुष्य बाण घेऊन मृगाचे पाठीस लागले. त्या मृगानें मध्यें दिसावें मध्यें न दिसावें अशा रूपानें गमन केलें त्यास धरण्याकरितां रामचंद्रही त्याच्यामागें लागून बहुत लांब गेले. पुढें रामचंद्रानीं हा कोणी तरी मायावी राक्षस आहे असें जाणून अमोघ शर टाकून मृगरूपी राक्षसाचा प्राण घेतला. त्याकाळीं मृगानें हे सीते! हे लक्ष्मणा! असा आर्त स्वर रामचंद्राच्या शब्दासारखा केला. तो ऐकतांच जानकी बोलली हे लक्ष्मणा, लौकर धांव तेव्हां लक्ष्मण भाषण करतो हे भीरु, रामचंद्रास कोण प्रहार करील बरें? व्यर्थ शंका मनांत धारण करूं नको. एक मुहुर्तांत रामचंद्र येऊन तुला भेटेल. असें ऐकून जानकी रोदन करीत अंतःकरणांत शंका धरून कठोर वाणीनें बोलल्ये हे लक्ष्मणा, जी तूं आपले हृदयांत इच्छा धारण केलीस ती चांगली नव्हे. रामचंद्रावेरीज दुसऱ्यास मी वश होणार नाहीं. असें कठोर भाषण ऐकून लक्ष्मणानें आपले कर्ण करांनीं आच्छादित केले. आणि सत्स्वभावेंकरून मनामध्यें रामचंद्राच्या पादारविंदास नमस्कार करून वैदेहीस न पाहतां ज्या मार्गानें रामचंद्र गेले त्याच मार्गानें लक्ष्मण गेला. इतक्या अवकाशांत रावण यतिवेषानें सीतेचें हरण करण्याकरितां आश्रमीं आला तेव्हां सीतेनें यतीचें प्रियातिथ्य करण्याकरितां त्यास निमंत्रण करून फलमुलें देऊन त्याचा परम सत्कार केला. रावणाही सीतेचें सांतवन करून बोलला हे सीते, राक्षसांचा राजा रावण ज्यास ह्मणतात तोच मी लंकेमध्यें वास करतों. ती लंका समुद्राच्या परतीरीं आहे. हे स्त्रिये माझी इच्छा अशी आहे कीं, तापसवेषधारी जो रामचंद्र याचा त्याग कर. आणि माझी भार्या होऊन संपूर्ण स्त्रियांमध्यें वरिष्ठ हो अशा नानाप्रकारच्या भाषणांनीं रावण जानकीचें मन लोभवीत असतां ती आपले कर्ण हातांनीं आच्छादित करून बोलल्ये हे दुष्टा, तूं असें भाषण करूं नको. नक्षत्रांसहवर्तमान आकाश खालीं पडेल, पृथ्वीचीं शकलें कदाचित् होतील. परंतु रघुनाथाचा त्याग मी कदापि करणार नाहीं. हे रावणा, मदोन्मत्त हस्तिनी वनगोचर जो दिग्गज याचा त्याग करून सूकरास स्पर्श करील काय? याप्रकारें सीता रावणाचा निषेध करून आश्रमांत गेली

असतां पुनः रावणानें रूक्ष भाषणें करून सीतेची निर्भर्त्सना केली. पुनः सीतेनें त्याचा प्रतिषेध केला. असें झाल्यावर कांहीं कालानें रावण परमक्रुध्द होऊन सीतेचा केशपाश धरून आकाशमार्गें गेला. मार्गांत जातांजातां मुखानें हे रामा हे रामा, असें रोदन करीत सीता चालली. तो आक्रोशयुक्त शब्द जटायु नामक गृध्रानें एका गिरीवर ऐकिला. असा विषय या अध्यायांत आहे.

२७९. अध्याय दोनशें एकूण ऐशी— मार्कंडेय सांगतात हे युधिष्ठिरा, जटायु पक्षी दशरथराजाचा परम मित्र व अरुणाचा पुत्र जो संपाती याचा भ्राता होय. तो रावणाच्या अंकगत सीता पाहून क्रोधानें राक्षसेश्वरावर धांवला. आणि बोलला, अरे मी जिवंत असतां मैथिलीस कसा घेऊन जातोस. सोडसोड लौकर. न सोडशील तर जिवंत राहाणार नाहींस. असें बोलून रावणास नखाचा व चोंचीचा प्रहार करून घाबरा केला. असतां रावणानें खड्ग घेऊन पक्ष्यास दोन्ही भुज तोडून पृथ्वीवर पाडला आणि सीतेस अंकावर घेऊन तो आकाशमार्गें चालला. जेथें जेथें ऋषींचे आश्रम, सरोवरें. नद्या, दृष्टीस पडत. तेथें तेथें सीता आपलीं भूषणें टाकीत गेली. पुढें तिनें एक महागिरी पाहून पांच वानर पाहिले. आणि तेथें आपलें पीतवस्त्र टाकिलें तें वस्त्र वायूच्या योगानें वानरांच्या मध्यभागीं जाऊन पडलें. नंतर रावणानें बहुद्वारांनीं युक्त, विश्वकर्म्यानें निर्मित अशी लंका केवळ या पृथ्वीवर अद्वितीयस्थान होय. तीमध्यें सीतेस नेली. इकडे रामचंद्र मृगाचें हनन करून मागें फिरतात तों लक्ष्मण दृष्टीस पडला तेव्हां त्यास बोलतात हे लक्ष्मणा, राक्षसानें सेवितवनामध्यें सीतेस टाकून इकडे कां आलास. हे लक्ष्मणा, एकाएकीं सीतेचा त्याग वनामध्यें निर्भयपणें केलास ही तुला कशी शंका वाटली नाहीं. मृगहिंसा करून मी लौकरच माघारा येत होतों आतां वैदेही जिवंत आहे किंवा कसें तें लौकर सांग. नंतर लक्ष्मणानें वैदेहीचें भाषण समग्र निवेदन केलें. आणि सीतेनें जे मागून वाक्बाण मारिले तेही सांगून भाषण केलें. महाराज माझा उपाय नाहीं अशी गोष्ट झाल्यावर मी आलों. माझा

अपराध नाहीं. असें ऐकून उभयतांही आश्रमाकडे चालले असतां पर्वतप्राय एक पक्षि मार्गांत पडलेला पाहून शंकित झाले नंतर हा कोणीतरी राक्षस आहे याचा वध करावा असा निश्चय करून उभयतांही धनुष्यबाण घेऊन त्याजवर धांवले. त्याकाळीं गृध्रराज भाषण करतो. अहो, मी जटायु नामक गृध्रराज दशरथ राजाचा परम मित्र आहें. असें ऐकतांच रामचंद्र धनुष्याचा उपसंहार करून त्याचेजवळ गेले तेव्हां खग बोलला हे रामा, सीतेकरितां रावणापासून मी हा वध पावलों. असें ऐकून रामचंद्र ह्मणतात. हे गृध्रा, रावण कोणत्या दिशेस गेला. गृध्रानें शिरकंप करून सांगितलें कीं, दक्षण दिशेस गेला. हें ऐकून रामचंद्र गृध्रास उत्तम गति देऊन ते आश्रमीं गेले. तों आश्रम शून्य होऊन गोमायु मृगपक्षि आंत वास करतात. असें पाहून शोक करीत दंडकारण्यांत गेले. जातां जातां त्यांनीं मृगांचे समुदाय पाहून नानाप्रकारच्या प्राण्यांचे भयंकर शब्द ऐकले. एक मुहूर्तानंतर कोणीएक कबंध नामक राक्षसानें लक्ष्मणास आपले करांत प्रतिबंध केला. त्यांतून बाहेर येण्यास लक्ष्मणास सामर्थ्य राहिलें नाहीं. तेव्हां लक्ष्मण दीनमुख होऊन रामचंद्रास बोलतो हे रामा, वैदेहीचें हरण राक्षसांनीं केलें. मी तर अशा प्रसंगांत सांपडलों. तूं राज्यापासून भ्रष्ट झालास. पिता तर मरण पावला तेव्हां सीतेसहवर्तमान पितृपैतामह प्राप्त राज्यावर बसलेला तुला मी कधीं पाहीन. असें लक्ष्मणानें प्रलाप केले असतां रामचंद्र भाषण करतात हे काकुत्स्था, विषाद पावूं नको. मी जिवंत असतां तुला आपत्ति येणार नाहीं. अरे पाहातोस काय याचा दक्षण बाहुचें छेदन कर. मी सव्य बाहु छेदितों. असें सांगून रामचंद्रांनीं सव्यबाहु प्रथम छेदतांच लक्ष्मणानें दक्षण बाहु छेदून पार्श्वभागाचेठायीं खड्ग प्रहार केला असतां तत्काळ कबंधासुर गतायु होऊन भूमीवर पडला त्याच्या शरिरापासून एक दिव्य पुरुष उत्पन्न होऊन सूर्यासारखा प्रज्वलित आकाशांत गमन करूं लागला. त्यास रामचंद्र ह्मणतात तूं कोण आहेस हें आश्चर्य काय? हें शरीर तूं कशाकरितां धारण केलेंस याचा वृत्तांत मला सांग. असें ऐकून दिव्यपुरुष भाषण करतो हे रामा, मी विश्वावसु नामक गंधर्व ब्राह्मणांच्या शापानें राक्षस योनींत गेलों होतों. तुझी भार्या लंकाधिपति जो रावण यानें

ने ली. याचा उपाय मी तुला सांगतों. तू सुग्रीवाचें सख्य कर. म्हणजे तो तुझें उत्तमप्रकारें साह्य करील. हें पंपानामकसरोवर हंस कारंडपक्ष्यांनीं सुशोभित आहे. याचे सन्निध ऋष्यमुखनामक पर्वत आहे. तेथेंच एक नदी आहे. त्यास्थळीं चार सचिवांसह वर्तमान वालीचा भ्राता सुग्रीव राहातो त्यास तू आपलें दुःख सांग म्हणजे तुझ्या दुःखाचा तो नाश करील. तोही तुझ्या सारखा दुःखी समानशील आहे. हे राजा मी सांगितलें असें केलें असतां जानकी तुला लौकरच प्राप्त होईल. या वानरांस रावणालय विदीत आहे असें भाषण करून तो गंधर्व अंतर्धान पावला. हें अद्भुत कृत्य पाहून रामचंद्र लक्ष्मण उभयतांही परम विस्मय पावले असा विषय या अध्या॰ आहे.

२८०. अध्याय दोनशें ऐंशी:— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, सीताहरण दुःखानें पीडित झालेला रामचंद्र तेथून पुढें पंपासरोवराकडे गेला तेथें सुगंधसुसीतल वायूनें युक्त अशा वनांत जानकीचें स्मरण करून विलाप करीत असतां लक्ष्मण भाषण करतो हे रामा, असा विलाप करणें तुमच्यासारख्या पुरुषांस योग्य नाहीं. तशांतून तुला जानकी व रावण यांचा शोध लागला यास्तव यत्न व बुध्दि यांच्यायोगें तो शोध सफल होईल असें कर. मी तुझा शिष्य व भृत्य असून तुला साह्य आहें यास्तव सुग्रिवाचें सख्य करण्याकरितां लौकर चल. अशा नानाप्रकारच्या वाक्यांनीं लक्ष्मणानें बोध केल्यानंतर रामचंद्र पूर्वप्रकृतीवर येऊन पंपासरोवरीं गेले. आणि पितरांच्या उपदेशानें तर्पण करूं लागले. पुढें ऋष्यमुखनामक पर्वत फळमूळेंकरून समृध्द झालेला तेथें जाऊन त्याच्या अग्रभागीं रामचंद्रांनीं पांच वानर पाहिले. तेव्हां सुग्रिवानें मारुतीस त्याकडे पाठवितांच ते मारुतीशीं बोलून सुग्रिवाकडे गेले आणि त्याशीं सख्य करतांच वानरांनीं सीतेनें टाकलेलें वस्त्र रामचंद्रास दाखवून विश्वास उत्पन्न केला. नंतर रामचंद्रांनीं सुग्रिवास वानरांच्या आधिपत्याचा अभिषेक करून प्रतिज्ञा केली कीं, युध्दामध्यें वालीचा वध मी करीन. सुग्रिवानें प्रतिज्ञा केली कीं, वैदेही मी तुम्हांस आणून देईन. याप्रकारें उभयतांच्या प्रतिज्ञा होऊन सर्व किष्किंधेंत युध्दाकरितां गेले. नंतर सुग्रिवानें मेघासारखा

एकाएकीं भयंकर शब्द करतांच वाली तत्काळ युध्दास सिध्द झाला तेव्हां ता-
रा त्याचा प्रतिषेध करूं लागली कीं, तूं याकाळीं जाऊं नको. हा नाद सुग्रीवाचा
आहे. या नादावरून असें वाटतें कीं, यास कोणी तरी मोठें साहाय्य झालें आहे.
यास्तव तूं जाऊं नको. असा तारेनें निषेध केला असतां वाली ह्मणतो हे तारे, सं-
पूर्ण प्राणिमात्रांचे शब्द तूं जाणतेस यास्तव ज्या साहाय्येंकरून सुग्रिवानें
ही अशी भयंकर गर्जना केली तो कोण? असें ऐकून तारेनें सांगितलें कीं, हे क-
पिश्वरा, रामचंद्र यानामेंकरून कोणी एक दशरथराजाचा पुत्र यास सहाय्य झा-
ला. दोघेही समदुःखी यास्तव उभयतांचें सख्य झालें. त्याचा भ्राता युध्दांमध्यें
परम निपुण लक्ष्मण यानामें समागमें आहे. तसेच सुग्रिवाचे मैंद, द्विविध,
हनुमान, जांबुवान हे च्यार सचीवही बरोबर आहेत. हे संपूर्ण बुध्दिमान व म-
हा बलि आहेत. तशांतून रामाश्रित यास्तव याकाळीं तूं सुग्रिवाशीं युध्द क-
रूं नको. तेव्हां वालीच्या मनांत शंका येऊन तो तारेस बोलला कीं, सुग्रिवावर
तुझें मन गेलें यास्तव तूं माझा प्रतिषेध करतेस असें कठोर भाषण करून नंत-
र तत्काळ वाली गुहेपासून निघाला. आणि माल्यवान् पर्वताच्या सन्निध येऊ-
न सुग्रिवास बोलला. अरे सहस्त्रवेळ युध्दांमध्यें तुला पराजित केला, व
ज्ञातींतून चालवून दिला. पुनः मरणाचे मुखांत कां प्रवेश करतोस? असें ऐकून
सुग्रीव भाषण करतो. हे दुष्टा, तूं माझें राज्य व स्त्री यांचें हरण केलेंस आतां मी
वांचून काय उपयोग? यास्तव मी आलों असें समज. असें भाषण करतांच उ-
भयतां शाल, ताल, शिला यांची वृष्टि करीत असतां भूमीवर पडले. पुनः सा-
वध होऊन परस्पर मुष्टींचे प्रहार करूं लागले. नख व दंतांच्या आघातानें दो-
घांचीही शिरें रक्तानें भरलीं असतां उभयतां पलाशवृक्षासारखे दिसूं लागले.
पुढें युध्द होतांहोतां हा वाली किंवा हा सुग्रीव असें रामास न समजल्यामुळें
मारुतीनें खुणेकरितां सुग्रिवाचे गळ्यांत माळ घातली. नंतर रामचंद्रानें ध-
नुष्याचा टणत्कार करून वालीचे हृदयावर बाणांचा प्रहार केला. तेव्हां वाली
भिन्नहृदय होऊन रक्तानें वमन करीत पृथ्वीवर पडला, आणि रामचंद्र व
लक्ष्मण यांची बहुत निंदा करूं लागला. वाली पडला हें पाहून ताराही दुः
खानें पृथ्वीवर पडली तेव्हां सुग्रीव तिला घेऊन किष्किंधेंत आला. तसेच

रामचंद्र माल्यवान पर्वताच्या पृष्ठभागीं चार महिने पर्यंत राहिला. इकडे लंकेमध्यें अशोकवनांत रावणानें सीतेस नेऊन ठेविली असतां ती भर्त्याच्या शोकानें बहुत कृश झाली आणि तापसवेष धरून उपवास करूं लागली. सीतेच्या संरक्षणाकरितां कोणास दोन नेत्र, कोणांस तीन नेत्र, कोणाच्या ललाटभागीं नेत्र, कोणी त्रिस्तनि, कोणी एक पाद, कोणी दीर्घजिव्हा अशा नानाप्रकारच्या भयंकर राक्षसी रावणानें ठेविल्या होत्या. त्यांनीं नानाप्रकारचीं उग्ररूपें धारण करून सीतेस भक्षणाचें भय दाखवावें. कोणी भयंकर शब्द करावे, कोणी जवळ येऊन मी तुला भक्षण करत्यें असें ह्मणावें. कोणीं उपदेश करावा कीं, तूं आपल्या भर्त्याचा त्याग करून रावणास वश हो. कोणी ह्मणावें कीं तापसी तुझा भर्ता जटाधारी मरण पावला असेल. आतां त्याजविषयीं तूं शोक करूं नको, रावणास वश हो. याप्रकारें वारंवार सीतेची निर्भर्त्सना करीत असतां सीता शोकसागरांत निमग्न होऊन श्वासोश्वास टाकीत बोलल्ये. हे राक्षसीहो, जर तुमची इच्छा असल्यास माझें भक्षण करा. जिवंत राहाण्याविषयीं माझी इच्छा अगदी नाहीं. परंतु पुंडरीकाक्ष जो रामचंद्र याजवांचून दुसऱ्यास स्पर्श करणार नाहीं. तें जानकीचें भाषण राक्षसी रावणास सांगण्याकरितां गेल्या. तेव्हां त्रिजटानामक राक्षसी सीतेचें सांतवन करूं लागली हे सीते, तुला कांहीं भय नाहीं. चिंता करूं नको. माझ्या भाषणावर विश्वास ठेव. रामाचा हित करणारा अविंध्य नामक राक्षस श्रेष्ठ आहे. त्यानें मला तुला सांगण्यास सांगितलें कीं, तुझा भर्ता लक्ष्मणासह कुशल आहे. तुझ्याकरितां त्यानें शक्रासारखा पराक्रमी जो वानरराज याच्याशीं सख्य करून तुला नेण्याविषयीं यत्न आरंभिला आहे. पूर्वी या रावणानें रंभेवर बलात्कार केला. तेव्हां नलकूबरांनीं यास शाप दिला कीं, परस्त्रीवर बलात्कार केलास तर तत्काल नष्ट होशील. यास्तव तूं चिंता करूं नको. लक्ष्मण व सुग्रीव यांसह वर्तमान रामचंद्र येऊन तुला लौकर या दुःखापासून सोडवील. तशींच स्वप्नांत विनाश चिन्हें अशीं मीं पाहिलीं कीं, रावणानें अंगास तेल लाविलें. तसेच कुंभकर्णादि नग्न होऊन केश सोडलेले रक्तचंदन अनुलेपन केलेले असे दक्षिण दिशेस चालले आहेत. एक बिभीष-

ण मात्र श्वेतवस्त्र शुक्लमाल्यें धारण करून श्वेतपर्वतारूढ झालेला पाहिला. रामचंद्रानें शस्त्र धारण करून संपूर्ण पृथ्वी यशानें पूरित केली. तसाच लक्ष्मण मधुपायस भक्षण करून अस्थिंच्या राशीवर चढलेला पाहिला. हे वैदेही, नानाप्रकारचीं शुचिन्हें मी स्वप्नांत पाहिलीं. याजवरून मला खचित वाटतें कीं, भ्रात्यासहवर्तमान रामचंद्र येथें येऊन लौकर तुजला हर्षित करील. असें त्रिजटेचें भाषण ऐकून सीता भर्त्याचा समागम होण्याविषयीं आशायुक्त झाली. इतक्यांत रावणास सांगण्याकरितां ज्या राक्षसी गेल्या होत्या त्या पुनः सीतेचे सन्निध येऊन पोंचल्या. नंतर त्रिजटा पूर्ववत् आपले जाग्यावर जाऊन बसली. असा विषय या अध्यायांत आहे.

२९१. अध्याय दोनशें एक्यायशी:—मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, भर्तृशोकानें संतप्त झालेली व राक्षसींनीं संरक्षित अशी जी सीता इजकडे कामबाणेंकरून पीडित झालेला रावण मणि कुंडलेंकरून सुशोभित, विचित्र माल्ययुक्त मुकुट धारण करून आला, आणि लोभयुक्त वाक्यें बोलूं लागला हे सीते, इतके दिवस भर्त्याची प्रीति तूं बहुत दाखविलीस हे वरारोहे, आतां संपूर्ण नारींमध्यें श्रेष्ठ होऊन माझें सेवन कर. तूं उत्तमोत्तमप्रकारचीं आभरणें धारण करण्यास योग्य आहेस. देवकन्या, गंधर्वस्त्रिया, दानवकन्या, व दैत्यस्त्रिया या माझे गृहीं असंख्यात आहेत. विश्रवा नामक ऋषीचा मी पुत्र होय. पांचव्या लोकपालांमध्यें माझी गणना आहे. जशीं देवांचीं भक्ष्यभोज्यें आहेत तशींच माझीं आहेत. आतां वनवाससंबंधीं तुझ्या दुःखाचा क्षय होऊन मंदोदरीसारखीनू माझी भार्या हो. असें रावण भाषण करीत असतां सीता मध्यें तृण धरून त्याचें वाक्य न ऐकतां नेत्राश्रूनें आपले स्तनांचें सिंचन करीत अधोदृष्टीनें पृथ्वीकडे पाहून ह्मणाली कीं, हे राक्षसेश्वरा, असें विषादयुक्त भाषण करण्यास तूं योग्य नाहींस. परदारासक्त झालेला लौकर नष्ट होतो. तशांतून मी पतिव्रता तुला मिळण्यास फार अशक्य. तुझ्याविषयास मी योग्य नाहीं. कारण मी मानुषी तशांतून कृपण आहें. तुला वश न होतां बलात्कारें तूं मला धरशील तर यामध्यें प्रीति नाहीं. हे दुष्टबुध्दे, ब्रह्मदेवासारखा तुझा पिता त्या कुलांत तूं उत्पन्न झालास असतां तुझा धर्म तर तसा कांहींच दिसत नाहीं.

आणि ह्मणतोस कीं, लोकपालांमध्यें माझी गणना हें कसें? साक्षात् महेश्वराचा सखा माझा भ्राता ह्मणवितोस त्याची लज्जा तुला कशी वाटत नाहीं. असें भाषण करून रोदन करीत करीत वस्त्रानें मुख आच्छादित करून पुनः अधोमुखी झाली. तथापि पुनः रावण कामबाण वश होऊन सीतेस बोलतो. हे चारुहासिनी, तूं आकामा असतां माझा संपत्तिदर्शनें करून सकामा होशील. या भूलोकीं मला अशक्य कांहीं नाहीं. रामचंद्र हा मनुष्यजातींतला माझा आहारभूत आहे. त्याचा तूं अनुरोध कशाकरितां करितेस. असें ह्मणून राक्षसेश्वर आपल्या स्थानीं गेला. इकडे सीता राक्षसींनीं वेष्टित शोककर्षित झालेली अशोकवनिकेंत राहिली. असा विषय या अध्यायांत आहे.

२८२. अध्याय दोनशें ब्यायशीं:— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, माल्यवान् पर्वताच्या पृष्ठभागीं लक्ष्मणासह रामचंद्र राहात असतां कोणे एके दिवशीं प्रभातकाळीं सीतेचें स्मरण होऊन रामचंद्र बोलतात हे लक्ष्मणा, ज्या सुग्रीवासाठीं तुजसहवर्तमान मी किष्किंधेच्या उपवनांत वाली मारला तो सुग्रीव कृतघ्न असें मी मानितों. कारण किष्किंधेंत गेल्यापासून तो मला कांहींच जाणत नाहीं. यास्तव त्यास वालीच्या मार्गास पाठवावा अथवा जर माझ्या कार्यास उद्युक्त झाला असेल तर त्यास घेऊन लौकर मजकडे यावें. असें ऐकून लक्ष्मण धनुष्य बाण घेऊन किष्किंधेंत गेला. तेव्हां सुग्रीव, स्त्रियांसहवर्तमान सामोरा येऊन लक्ष्मणाची पूजा करून अग्रभागीं उभा राहिला असतां लक्ष्मणानें संपूर्ण रामचंद्राचें भाषण निवेदन केलें. तें ऐकून सुग्रीव बोलला हे लक्ष्मणा, सीतेकरितां मी प्रयत्न करीतच आहे तो तुला सांगतों. संपूर्ण दिशांच्या ठायीं सीतेच्या शुद्धीकरितां वानरांस पाठवून एक मासाचे आंत यावें. असा कालनियम केला आहे. या गोष्टीस आज पंचवीस दिवस झाले. पांच दिवस बाकी राहिले आहेत. इतक्या कालांत संपूर्ण सागरांबरा पृथ्वी व पर्वत व ग्राम नगरें शोधून वानर आले ह्मणजे रामचंद्र प्रियवार्ता ऐकेल. असें ऐकून लक्ष्मणानें सुग्रीवाचा सत्कार केला. नंतर सुग्रीव, लक्ष्मण यांनीं माल्यवान् पर्वताच्या पृष्ठभागीं रामचंद्राकडे जाऊन झालेलें वर्तमान सांगितलें. इतक्यांत सीतेच्या शुध्दीकरितां गेलेले वानर तीन दिशांपासून येऊन बोलले हे रामा, सागरान्त पृथ्वी

आह्मीं पाहिली. परंतु सीतेचा शोध लागला नाहीं. व रावणही कोठें पाहिला नाहीं; परंतु दक्षिण दिशेस वानर गेले आहेत, ते मात्र अजून आले नाहींत. इतकीच आशा रामचंद्रानें धरून प्राणाचें रक्षण केलें. यास दोनमहिने अतिक्रांत झाले असतां एके दिवशीं सुग्रिवास वानरांनीं येऊन निरोप सांगितला कीं, महाराज, दक्षिण दिशेस जे तुह्मीं वानर सीताशुध्दीकरितां पाठविले होते ते संपूर्ण मधुवनीं आले आहेत. असें ऐकतांच सुग्रीव आपल्यास कृतकृत्य मानून रामचंद्रास बोलला. हे महाराज, मैथिली वानरांनीं पाहिली. इतक्यांत हनुमान प्रभृति वानर सुग्रीवाच्या सन्निध आले तेव्हां सुग्रिवानें हनुमंताचे मुखचर्येवरून निश्चय केला कीं, यानें सीता पाहिली. नंतर हनुमानप्रभृतिवानर, रामचंद्र, लक्ष्मण व सुग्रीव यांस नमस्कार करून अग्रभागीं स्थित असतां रामचंद्र धनुष्यबाण घेऊन बोलतात हे वानर हो, संपूर्ण शत्रूंचा नाश करून जनकात्मजेस आणून अयोध्येचें राज्य करीन तरच जिवंत राहीन. त्याकालींच तुमची कृतकृत्यता होईल. असें ऐकून वायुपुत्र भाषण करतो हे रामा, जानकी मी पाहिली. पर्वत, नद्या यांसहवर्तमान दक्षिण दिशा शोधून श्रांत होऊन पुढें जातां जातां मोठी एक गुहा होती तींत आह्मीं प्रवेश केला. त्या गुहेंत बहुत अंधःकार होता. आदित्याची प्रभा अगदीं नाहीं. त्या गुहेंत पुढें जातां जातां मयनामक दैत्यानें निर्मित केलेलें भवन पाहिलें. त्यामध्यें प्रभावती नामक तापसी होती तिणें आह्मांस भोज्यें व नानाप्रकारचीं फलें भक्षणाकरितां दिलीं. तेणेंकरून आह्मीं संतुष्ट होऊन गेलेल्या मार्गानें माघारे आलों. आणि समुद्राच्यासमीपभागीं सह्याद्रि, मलय व दर्दुर हे पर्वत पाहिले नंतर मलयाचलपर्वतीं जाऊन समुद्र पाहातांच आह्मीं जिविताविषयीं निराश होऊन समुद्रतीरीं बसलों. आणि गृध्रराज जो जटायु याची कथा सांगत असतां पर्वतप्राय घोररूपी वैनतेय पक्ष्यास आह्मीं पाहिलें. तो पक्षी आमचें भक्षण करावें या बुध्दीनें बोलला, अहो, माझा भ्राता जो जटायु याच्या कथा तुह्मीं सांगतां यास्तव तुह्मीं कोण आहां? जटायूचा भ्राता मी मला संपाती असें ह्मणतात. आह्मां दोघांमध्यें आदित्यमंडळाविषयीं स्पर्धा होऊन आह्मीं उड्डाण केलें. तेव्हां आदित्याच्या तेजानें माझे पक्ष नष्ट होऊन मी एथें पडलों

जटायूचे पक्ष दग्ध न होतां तो गेला. त्या दिवसापासून त्यास मी पाहिला नाहीं. तेव्हां आह्मी संपातीस सांगितलें कीं, तुझा भ्राता रामचंद्राच्या कार्याकरितां मरण पावला. हें ऐकतांच तो खिन्न होऊन बोलला कीं, हे वानर हो, राम व सीता कोण आहेत? त्यांजकरितां जटायू कां मरण पावला हें वर्तमान मला सांगा. नंतर आह्मीं सर्व वर्तमान सांगून समुद्रतीरीं प्राण त्याग करण्याचा निश्चय केला असतां पक्षी आह्मांस बोलला हे वानर हो, रावण मला विदीत आहे. समुद्राच्या परतीरीं त्रिकुटगिरीवर लंका आहे ती एथून मी पाहातों व जानकीही लंकेत आहे, याविषयीं कांहीं संशय नाहीं. असें ऐकून आह्मीं सागराचें उल्लंघन कसें करावें याविषयीं विचार करीत असतां कोणीही उल्लंघन करण्याविषयीं धैर्य धारण करीना नंतर मी पित्याच्या तनूंत प्रवेश करून लंकेंत गेलों. मध्यें विघ्नभूत एक जलराक्षसी होती तिचा नाश केला. आणि रावणगृहीं प्रवेश करून सीता पाहिली. उपवास व तप करून भर्त्याच्या दर्शनाची तिणें बहुत इच्छा धारण केली आहे. केशांच्या जटा व मळेंकरून अंग तिचें मलिन झालें आहे. नंतर अनेक निमित्तानीं हीच सीता असा निश्चय करून एकांतीं तीस भाषण केलें कीं, हे सीते रामचंद्राचा दूत मारुतात्मज मी तुझ्या दर्शनाची इच्छा धरून आकाशमार्गें एथें आलों. रामचंद्र लक्ष्मण उभयतां सुग्रिवाच्या आश्रयेंकरून राहिले आहेत. लौकरच तुझा भर्ता वानरसैन्यासह वर्तमान एथें येईल. मी रामदूतच आहें याविषयीं हा रामानें दिलेला मणि घे. मी राक्षस नव्हे, निश्चयेंकरून वानर आहे. नंतर एक मुहूर्तपर्यंत सीता ध्यानस्थ होऊन मला बोलली कीं, अविंध्यनामक राक्षसाच्या वाक्यावरून तूं हनुमंत आहेस असें मी जाणिलें. असें भाषण करून तिनें मला सांगितलें कीं, तू आतां जा. रामास प्रत्यय येण्याकरितां हा चूडामणि घेऊन तू रामचंद्रास दे. दुसरी खूण रामास प्रत्यय येण्याकरितां एकांतीं झालेली सांगत्यें तीही रामास सांग कीं तुह्मीं चित्रकूट पर्वतावर ईषिकेचा त्याग करून काकपक्ष्याचा एक नेत्र छेदन केलात. ही गोष्ट एकांतीं झालेली कोणास माहीत नाहीं. हें ऐकून मी लंकेचा दाह केला आणि हें वर्तमान सांगण्याकरितां आह्मीं येथें आलों. असें ऐकून रामचंद्रानीं त्याचा सत्कार केला. असा विषय या अध्यायांत आहे.

२८३. अध्याय दोनशें त्र्यायशीं:— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, मारुतीचें व रामाचें भाषण चाललें आहे तों कोट्यावधि वानर आपआपले स्थळांपासून रामचंद्रापाशीं आले तसेंच हजार कोटि वानरांसहवर्तमान सुषेणनामक वालीचा श्वशुर, प्रत्येकीं शंभर कोटि वानरांसहवर्तमान गज, गवय, साहा हजार कोटि वानरांसहवर्तमान गवाक्ष, तीन कोटि वानरांसहवर्तमान गंधमादन, दाहालक्ष बारा हजार तीनशें पांच कोटि वानरांसहवर्तमान पनस, एककोटि वानरांसहवर्तमान जांबुवान आला. याप्रमाणें सर्व वानर, सैन्यें घेऊन रामचंद्रापाशीं आले. तो वानरसमुदाय सुग्रिवाचे आज्ञेवरून तेथेंच राहिला. पुढें एके दिवशीं तिथी नक्षत्र सुमुहूर्त पाहून सैन्यासहवर्तमान रामचंद्र, लक्ष्मण व सुग्रीव यांनीं गमन केलें असतां नल, नील, अंगद, क्राथ, द्विविध व मैंद हेही राघवाच्या अर्थसिध्दीकरितां जाऊन तो सेनासमूह समुद्राच्या तीरीं गेला. त्या काळीं रामचंद्र भाषण करितात हे सुग्रिवा, आतां सागराच्या उल्लंघनाविषयीं उपाय कोणता करावा? असें ऐकून कोणी वानर ह्मणूं लागले कीं, सागराचें उल्लंघन करावें. कोणीं ह्मणूं लागले कीं नौकेंतून उतरून जावें. नंतर सर्वांचा निषेध करून रामचंद्र ह्मणतात हे वीरहो, आतां जलनिधीची प्रार्थना करून मी शयन करतों, ह्मणजे मार्गाचा उपाय तो दाखवील; नाहीं तर महा शस्त्रास्त्रें करून समुद्रास जाळून टाकीन. असें भाषण करून लक्ष्मणासहवर्तमान रामचंद्र जलनिधीस स्पर्श करून कुशास्तर्ण शय्येच्या ठायीं शयन करीत असतां स्वप्नांत सागर येऊन बोलला हे रामा, मी तुझें साहाय्य काय करूं तें सांग. असें ऐकून रामचंद्र भाषण करतात हे नदीपते, मी मार्गाची इच्छा करतों. कारण रावणाचा वध कर्तव्य आहे. जर मार्ग न देशील तर अप्रतिम दिव्यास्त्रयोगें तुझें शोषण करीन. असें ऐकून समुद्र भयानें बोलतो हे रामा, नलनामा वानर विश्वकर्म्याचा पुत्र संपूर्ण शिल्पीजनांस संमत मोठा बलवान असा आहे. त्यानें माझ्यावर शिला, काष्ठ, तृण, इत्यादिकांचा प्रक्षेप केला असतां संपूर्ण मी धारण करीन, बुडूं देणार नाहीं. मग तो तुला गमन करण्याविषयीं सेतु होईल, असा उपाय कर. असें भाषण करून तत्काल समुद्र अंतर्धान पावला. नंतर रामचंद्रानीं नलास आज्ञा केली कीं, तूं माझ्या आज्ञेवरून सेतु बांध.

अशी आज्ञा करतांच नलानें तत्काळ दहा योजनें रुंद व शंभर योजनें लांब असा सेतु बांधिला. त्यास अद्यापी नलसेतु असें ह्मणतात. नंतर रामचंद्राची आज्ञा होतांच संपूर्ण वानर लंकेंत जाण्यास सिध्द झाले असतां बिभीषण चार सचिवांसहवर्तमान रामचंद्राच्या अग्रभागीं येतांच रामचंद्रांनीं त्याचा स्वीकार केला. सुग्रिवास अशी शंका प्राप्त झाली कीं, हा कोणीतरी रावणाकडून आपला छल करण्याकरितां आला आहे. नंतर रामचंद्रानें सुग्रिवाच्या शंकेचें निवारण करून बिभीषणास राज्याचा अभिषेक केल्यावर तो लक्ष्मणाचा परम सखा झाला. पुढें बिभीषणासहवर्तमान रामचंद्र सैन्य घेऊन लंकेंतील उद्यानांचा भेद करीत चालले असतां शूकसारणनामक रावणाचे सचीव वानरांचा वेष धारण करून आले हें जाणून बिभीषणानें रामचंद्रास ते दाखविले. नंतर रामचंद्रांनीं त्या दुष्टांस आपलें सैन्य दाखवून सोडून दिलें. आणि पुनः सैन्यासहवर्तमान रावणाच्या उपवनांत अंगदास रावणास बोध करण्याकरितां दूतभावानें पाठविलें. असा विषय या अध्यायांत आहे.

२८४. अध्याय दोनशेंचौऱ्यायशीं:— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, फलमूलें व जलेंकरून समृध्द जें रावणाचें उपवन त्यामध्यें रामचंद्रानें आपली सेना ठेविली असतां रावणानें शस्त्रास्त्रांची सिध्दता करून प्राकार तोरणें यांची दृढता केली. लंकेच्या सभोंवती सात खंदक होते ते संपूर्ण जलानें पूरित करून व कपाट यंत्रें यांची बहुत दृढता केली. आणि संपूर्ण राक्षसांस आज्ञा केली कीं, मुसल, तोमर, नाराच्य इत्यादि शस्त्रास्त्रें घेऊन संपूर्ण पुर द्वारें, व गुल्में यांचें रक्षण करा, गजवाजी यांची सिध्दता करा. अशी रावणाची आज्ञा होत आहे तों अंगद लंकाद्वारीं आला. त्याकाळीं राक्षसेंद्र राक्षसांसहवर्तमान सभेमध्यें बसला होता इतक्यांत दूतानें अंगदाचा निरोप सांगितला. तेव्हां अंगदही तत्काळ सभेंत येऊन बोलला हे रावणा, रामचंद्रानें तुला सांगण्याकरितां मला जें सांगितलें तें मी सांगतों. कारण हा काल तसाच आला आहे. दुष्ट क्रूरकर्मा ज्यानें नीति सोडली तो राजा आपला देश, राष्ट्र, नगर यांसहवर्तमान विनाश पावतो. पाहा कीं तूं सीतेचा अपहार करून एकाकीं अपराधी झालास परंतु आतां तुझ्याकरितां संपूर्ण तुझें राष्ट्र

नाश पावेल. त्यांत जे अपराधी व निरपराधी ते संपूर्ण नष्ट होणार. हे दुष्टा तूं आपल्या गर्वानें पूर्वी वनांमध्यें मोठे मोठे ऋषि मारिलेस. देवांचा अवमान केलास. राजऋषींचा नाश केलास. यास्तव त्यांच्या संपूर्ण स्त्रिया तुझ्या दुःखानें रोदन करतात. हें जें तूं महत्पातक केलेंस त्याचा शासनकाल आज प्राप्त झाला असें वाटतें. हे पुरुषाधमा, रामचंद्र असें ह्मणतो कीं, आपल्या अमात्यांसहवर्तमान माझ्याशीं आज युध्द कर तुझा मी हंता आहें. जानकी जरी सोडलीस तथापी माझ्यापासून तुला मुक्तता कधीं मिळणार नाहीं. असें ऐकून रावण क्रोधानें मूर्छित झाला. आणि चार राक्षस त्याच्या चतुष्कोणीं उभे होते त्यांस संज्ञेनें बोलला कीं, या दूतास तुह्मी धरा. अशी आज्ञा होतांच ते धरण्यास गेले इतक्यांत अंगदानें भूमीवरून उड्डाण केलें. तो वेग राक्षसांस सहन न होतां ते पृथ्वीवर निचेष्ट पडले. नंतर अंगद त्यांचे हृदयावर प्रहार करून रामचंद्रासन्निध आला. आणि संपूर्ण वर्तमान सांगून विश्राम पावला तेव्हां राघवानें अंगदाच्या पराक्रमाचा मोठा सत्कार केला. नंतर समग्र वानरसैन्यासहवर्तमान रामचंद्रांनीं प्राकार भेद करून लंकेंत प्रवेश केला. आणि बिभीषण व जांबुवान यांस पुढें करून लक्ष्मण दक्षणद्वारीं गेला. दुसरेही नानाप्रकारचे कोट्यवधि वानर लंकेंत शिरले. तसेच तीन कोट ऋक्षही लंकेंत जाऊन कोणी उड्डाण करूं लागले. कोणीं हांसूं लागले. तेव्हां संपूर्ण वृध्द तरुण राक्षस स्त्रियांसहवर्तमान त्रस्त झाले. वानरांनीं लंकेचे मणियुक्त स्तंभ, माळ्या, शिखरें यांचा नाश करून शृंगें व यंत्रें यांचा प्रक्षेप केला. राक्षसांनीं शतघ्नी व पाषाण यांची वानरांवर बहुत दृष्टी केली. तेणेंकरून वानर भयानें पळूं लागले. व कांहीं नष्ट झाले. वानरांनींही राक्षसांची तशीच अव्यवस्था केली. नंतर रामचंद्रांनीं जलदासारखी पर्जन्यवृष्टी करून हजारों राक्षस नष्ट केले, लक्ष्मणानेंही बाणांच्यायोगें दृश्यादृश्य दुर्गस्थनिवासी राक्षस होते त्यांचा संहार केला. असा सैन्याचा परस्पर संमर्द होत असतां एकाएकीं वानरसैन्यांत जयाचा शब्द झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

२८५. अध्याय दोनशें पंचायशीं:— मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, पर्वण, पतन, जंभ, खर इत्यादि रावणाचे योध्दे अंतर्धान होऊन युध्द करीत

असतां अंतर्धानविद्या जाणणारा जो बिभीषण यानें त्यांच्या अंतर्धानशक्तीचा नाश केला. असें मोठें तुमुल युध्द होत असतां रावण क्रोधानें पिशाच्चें व राक्षस यांसह वर्तमान युध्दास आला. आणि उशना यानें उपदेशित जो व्यूह याची रचना करून त्यानें असंख्यात वानरांचा वध केला. रामचंद्रानें बृहस्पती मणीत व्यूहरचना करून असंख्यात राक्षसांचा प्राण घेतला. असें रामचंद्र व रावण यांचें युध्द झालें. इकडे इंद्रजित व लक्ष्मण, विरूपाक्ष व सुग्रीव, तार वनीरवर वट यांचा संग्राम होत असतां स्वबाहुबलानें एकमेकांचा भेद करण्यास सर्व सिध्द झाले. रावणानें शूल, असी, शक्ति यांच्या वृष्टीनें राघवास व्याप्त केलें. तसेंच रामानेंही निशित तीक्ष्ण बाणेंकरून रावणास व्याप्त केलें. लक्ष्मणानें मर्मभेदी बाणें करून इंद्रजितास जरजरीत केला. बिभीषण व प्रहस्त हे एकमेकावर खगपत्र तीक्ष्ण शरेंकरून निर्भयपणें वर्षाव करूं लागले. असा संग्राम चालला असतां तिन्ही चराचर लोक कंपायमान झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

२८६. अध्याय दोनशें शायशीं— प्रहस्तनामक रावणाच्या सचिवानें बिभीषणास ताडन केलें. परंतु बिभीषण मुर्छित न होतां शतघंटानाम महाशक्ति प्रहस्ताचे शिरावर टाकिली. तेणेंकरून प्रहस्त विव्हलित होऊन पडला. हें ऐकून धूम्राक्षनामक राक्षसानें बिभीषणावर जाऊन हजारों वानरांचें मर्दन केलें असतां धूम्राक्षाचा वध करण्याकरितां हनुमान त्याच्या अग्रभागीं आला. तेव्हां वानर मारुतीचा आश्रय करून धूम्राक्षावर धांवले. तसेंच राक्षसही रामसेन्यावर एकाएकीं धांवत असतां मोठा शब्द झाला, आणि रुधिराचे प्रवाह वाहूं लागले. धूम्राक्षानें बाणें करून वानरसैन्य बहुत मारिलें. हें पाहून हनुमानानें त्यासह वर्तमान युध्दप्रसंग केला. परस्पर एकमेकांचा प्राण घेण्याकरितां गदा, परिघ एकमेकांवर टाकीत असतां राक्षसांनीं वायुपुत्रावर गदा, परिघ, शूल यांची वृष्टि केली. मारुतीनें शाखांसहवर्तमान द्रुमांची वृष्टि धूम्राक्षावर करून इतर राक्षसांवरही बहुत वृष्टि केली. असा परस्पर दोघांचा संग्राम होत असतां हनुमंतानें अश्व, रथ यांसहवर्तमान धूम्राक्षाचा प्राण घेतला. हें पाहून संपूर्ण वानरांनीं इतर राक्षसांशीं युध्द केलें त्याकाळीं असंख्यात राक्ष-

सांनीं लंकेमध्यें जाऊन झालेला वृत्तांत रावणास सांगितला. प्रहस्त व धूम्राक्ष हे मरण पावले. असें ऐकतांच रावणानें कुंभकर्णास जागृत करून भाषण केलें. हे कुंभकर्णा तूं धन्य आहेस. अशी काय तुझी निद्रा? हें दारुण भय तूं कांहींच जाणत नाहींस. पाहा हा रामचंद्र याच्या सीता नामक भार्येचा मी अपहार केला. तिला नेण्याकरितां तो महार्णवास सेतुबंधन करून वानरसैन्यास ह वर्तमान एथें आला. आणि त्यानें प्रहस्तादि मोठेमोठे आपले योध्देजन यांचा नाश केला. तेव्हां हे बलिश्रेष्ठा, तुझ्यावांचून त्यांचा नाश व्हावयाचा नाहीं यास्तव दूषणाचे बंधु वज्रवेग, प्रमाथी यांस घेऊन युध्दास जा, आणि शत्रूंचा पराभव कर. अशी आज्ञा होतांच कुंभकर्ण दूषणाचे भ्राते घेऊन युध्दाकरितां निघाला. असा विषय या अध्यायांत आहे.

२८७. अध्याय दोनशेंसत्यायशीं:—मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, अनुचरां सह वर्तमान कुंभकर्ण निघून रामचंद्राचे दर्शनास आला तेव्हां त्यानें प्रथम वानरांचें सैन्य पाहून लक्ष्मणास पाहिलें तेव्हां वानरांनीं कुंभकर्णास पाहातांच त्यावर शिलांची वृष्टि केली. नंतर कुंभकर्णानें वानरांचे समुदाय भक्षण केले. इतक्यांत सुग्रिवानें शालवृक्षाचा कुंभकर्णाच्यामुखावर प्रहार केला असतां तो वृक्ष छिन्नविछिन्न झाला. नंतर कुंभकर्णानें सुग्रिवास हस्तांत धरिलें. त्याकाळीं सुग्रीव बहुत लज्जित होऊन इकडेतिकडे पाहूं लागला. तेव्हां लक्ष्मणानें कुंभकर्णासन्निध येऊन रुक्मपुरव बाणाचा प्रहार केला असतां तो बाण कुंभकर्णाच्या हृदयाचा भेद करून भूमींत गेला. तेव्हां कुंभकर्ण सुग्रिवास सोडून सौमित्रीवर धांवला. सौमित्रीनें निशिताग्रबाणें करून कुंभकर्णाचे दोन्ही हस्त छेदिले असतां कुंभकर्णास पुनः एकाएकीं चार भुज उत्पन्न होतांच पुनः चारी हातांनीं शिला घेऊन तो लक्ष्मणावर धांवला. पुनः लक्ष्मणानें क्षुरप्रबाणेंकरून चारी भुज छेदिले असतां कुंभकर्णानें मायावी बहुपाद, बहुशिर, बहुभुज असें भयंकर पर्वतासारखें रूप धारण केलें. तेव्हां लक्ष्मणानें ब्रह्मास्त्रयोगें कुंभकर्णास तत्काळ दग्ध करून पृथ्वीवर पाडला. हें पाहून इतर राक्षस पळाले. नंतर दूषणाचे अनुजक्रुध्द होऊन लक्ष्मणावर धांवले. तेव्हां लक्ष्मणानें असंख्याक बाणांचा वर्षाव

दूषणांच्या भ्रात्यावर केला. त्यांनींही लक्ष्मणावर बाण वर्षाव केला. नंतर मारुतीनें पर्वतशृंग घेऊन दूषणाचा एक बंधु मारिला. दुसरा भ्राता नीलनामक वानरांनीं मारिला. मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, वानरसैन्य व राक्षससैन्य यांचें अन्योन्य युध्द मोठें निकराचें होत असतां वानरांनीं असंख्यात राक्षस मारिले. राक्षसांनीही कांहीं वानर मारिले. परंतु राक्षससैन्यापेक्षां वानरसैन्य कमी नष्ट झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

२८८. अध्याय दोनशें अठ्यायशीं:— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, कुंभकर्ण, प्रहस्त, धूम्राक्षप्रभृति परम योध्दे मरण पावले हें ऐकून रावण बोलतो हे इंद्रजिता, कुंभकर्णप्रभृति सर्व मरण पावले यास्तव माझे रिपु रामचंद्र लक्ष्मण व सुग्रीव यांचा तूं लौकर नाश कर. असें ऐकून इंद्रजित तत्काळ रथारूढ होऊन संग्रामांत लक्ष्मणास हाक मारून बोलला हे लक्ष्मणा, मी इंद्रजित नामक रावणाचा पुत्र तुमचा प्राण घेण्यास आलों आहें. असें ऐकून लक्ष्मणानें तत्काळ धनुष्यबाण घेऊन प्रत्यंचेचा टणत्कार केला. त्यायोगें संपूर्ण राक्षस त्रस्त होऊन पळाले. नंतर लक्ष्मण व इंद्रजित यांच्या युध्दास आरंभ झाला. तेव्हां इंद्रजितानें तीक्ष्ण बाण व तोमर यांची लक्ष्मणावर वृष्टि केली असतां लक्ष्मणानें इंद्रजिताचे बाण छिन्न करून पृथ्वीवर पाडले. तेव्हां वालीसुत जो अंगद यानें शालवृक्ष घेऊन इंद्रजिताच्या मूर्ध्यावर प्रहार केला त्यायोगें इंद्रजित सज्ञान न होतां त्यानें अंगदाचे उरावर प्रासाचा प्रहार करतांच तो लक्ष्मणानें तोडला. पुनः इंद्रजितानें अंगदाच्या सव्य पार्श्वावर गदाप्रहार केला. तो वालिसुतानें सहन करून पुनः इंद्रजिताच्या स्कंधावर शालवृक्षाचा प्रहार केला. त्याकाळीं इंद्रजित बहुत रुष्ट होऊन अंगदास मारण्याचा उपाय करीत असतां अंगदानें इंद्रजित त्याचे रथाश्वसारथी यांचा नाश केला. त्याकालीं रावणात्मज हताश्व हतसारथी होऊन मायेच्यायोगें आकाशांत गुप्त होऊन वानरांस पीडा करूं लागला. हें इंद्रजिताचें कपट रामचंद्रानें जाणून सर्वसैन्य रक्षणाचा उपाय केला. इतक्यांत इंद्रजितानें रामलक्ष्मणाबरोबर युध्द करून त्यांस बाणांनीं व्याप्त करतांच ते पृथ्वीवर पडले. असा विषय या अध्यायांत आहे.

२८९. अध्याय दोनशें एकूणनव्वद:— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा,

इंद्रजिताने रामलक्ष्मणांस युध्दांमध्यें बंधन केलें असतां सुग्रीव वानरसैन्यासह-वर्तमान त्यांचें रक्षण करण्याकरितां आला. तसेच सुषेण, हनुमान आदिकरून मुख्य कपि रामचंद्राच्या सन्निध आले. बिभीषणानें रामलक्ष्मण मोहित झाले असें पाहून प्रज्ञास्त्राच्यायोगें त्यांस सावध केलें. सुग्रिवानें एक क्षणांत रामलक्ष्मणाच्या शरीरांतील बाणशल्यें दिव्य औषधांच्यायोगें काढिलीं असतां तत्काळ रामलक्ष्मण सावध झाले. तेव्हां बिभीषण करजोडून बोलतो हे महाराज, कुबेर जल घेऊन आला आहे हें ग्रहण करा याच्यायोगें अदृष्ट जी भूतें यांचें तत्काळ दर्शन होतें. यास्तव जलस्पर्श करून तुम्हांस दुःख देणारा जो इंद्रजित यास पहा. असें ऐकून रामलक्ष्मणांनीं त्या जलानें नेत्रस्पर्श करतांच सुग्रीव, हनुमान, जांबुवान, अंगद, मैंद, द्विविध हेही जलस्पर्श करून दिव्य चक्षु झाले. इकडे इंद्रजित लंकेंत जाऊन आपण रामचंद्रास बंधन केलें. असें वर्तमान पित्यास सांगून पुनः गुप्तरूपें युध्दभूमीवर आला इकडे बिभीषणानें लक्ष्मणास सांगितलें कीं, या इंद्रजितानें केलेलें अनुष्ठान शेवटास गेलें नाहीं. यास्तव याच्या वधाची यावकालीं योजना कर. त्याकालीं लक्ष्मणानें क्रुध्द होऊन इंद्रजितास शरानें वेधलें तेव्हां इंद्रजित क्रोधानें संतप्त होऊन अशीविषासारख्या आठ बाणांनीं लक्ष्मणास त्यानें वेधिलें. लक्ष्मणानें पावकस्पर्श तीन बाण इंद्रजितावर टाकून एका बाणानें धनुष्यासहित हस्त, व दुसऱ्याबाणानें शरासहित हस्त, तृतीयबाणानें कुंडलांनीं सुशोभित शिर पृथ्वीवर पाडलें. नंतर एकबाणानें सारथ्याचा वध केला. तेव्हां इंद्रजिताच्या अश्वांनीं रथ लंकेंत नेतांच पुत्रहीन रथास पाहून रावण शोकानें सीतेस मारण्याविषयीं उद्युक्त झाला. तेव्हां अविंध्यनामक राक्षस बोलतो हे रावणा, स्त्रियांचा वध करणें तुला योग्य नव्हे. राज्यारूढ जो असतो त्यानें अशा प्रकारची हिंसा करूं नये. तुझ्या बंधनांत सीता राहिली यास्तव ती वध केल्यासारखीच आहे. तिच्या पतीस मार म्हणजे ही तुला वश झाल्याप्रमाणेंच आहे. अशा नानाप्रकारच्या वाक्यांनीं अविंध्यनामक राक्षसानें रावणास बोध करून त्याच्या क्रोधाची शांति केली. नंतर रावण आपले सेवकांस रथ सिध्द करण्याविषयीं आज्ञा देऊन संग्रामांत जाण्याविषयीं सिध्द झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

२९०. अध्याय दोनशें नव्वद.— मार्केंडेय सांगतात हे धर्मराजा, इंद्रजित्मरण पावला असतां दशग्रीव हेमरत्नभूषित रथांमध्यें बसून शक्ति, यष्टि, तोमर इत्यादि शस्त्रें धारण केलेले राक्षस यांसहवर्तमान रामचंद्राशीं युध्द करण्याकरितां जात असतां मैंद, नील, अंगद, नल, जांबुवान यांनीं दशग्रीवसैन्याचें निवारण केलें. तेव्हां रावणानें एक माया उत्पन्न केली. त्यामायेच्यायोगें त्याच्या शरिरापासून सहस्त्रावधि राक्षस उत्पन्न होऊन रामसैन्याशीं युध्द करूं लागले असतां रामचंद्रांनीं त्या मायीक राक्षसांचा तत्काळ नाश केला. पुन दशग्रीवानें मायेच्यायोगें असंख्याक रामलक्ष्मण उत्पन्न करून परस्परें एकमेकांशीं युध्द करतात असें सर्वांस प्रदर्शित केलें. हे राक्षसांचें कपट जाणून लक्ष्मण ह्मणतो हे रामचंद्रा, हे संपूर्ण राक्षस आहेत. हे मायेनें आपल्यासारखीं रूपें धारण करून एकमेकांशीं युध्दें करतात. यास्तव तूं सत्वर यांचा वध कर. इतकें लक्ष्मण रामचंद्राशीं संभाषण करतो तों आकाशापासून सूर्यासारखा तेजस्वी इंद्राचा रथ घेऊन मातली नामक सारथी रामचंद्राच्या अग्रभागीं आला. आणि बोलला हे काकुत्स्था या रथांत बसून तूं रावणाचा वध कर. असें ऐकून रामचंद्रास ही राक्षसी माया आहे अशी शंका उत्पन्न झाली असतां बिभीषण भाषण करतो हे रामा, रावणाची ही माया नव्हे. हा रथ इंद्राचा होय. यास्तव यांत बसून लौकर राक्षसाचा वध कर. असें बिभीषणानें सांगतांच रामचंद्र रथांमध्यें बसून रावणाच्या अग्रभागीं आले त्याकाळीं सैन्यांत एकाएकीं मोठा हाहाकार झाला. आकाशांत सिंहासारखे नाद उठून वाद्यें वाजूं लागलीं. तेव्हां रावणानें अशनीसारखा ब्रह्मदंडोपम शूल रामावर टाकिला, त्याचा रामचंद्रानें निशित बाणें करून छेद केला असतां रावणानें क्रुध्द होऊन सहस्त्रावधि शूलादिक शस्त्रास्त्रांची रामचंद्रावर वृष्टी केली त्यायोगें वानर परम त्रस्त होऊन भयानें दाही दिशेस पळाले असतां रामचंद्रांनीं सुपत्र बाण भात्यापासून काढून ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रण केला, आणि रावणावर टाकण्याची योजना केली. त्याकाळीं शक्रप्रभृति देव व गंधर्व हर्षित होऊन भाषण करूं लागले कीं, रावणाचें आयुष्य अल्प उरलें. देव, गंधर्व, किन्नर हे परम आदरें करून पहात असतां तो अप्रतिम बाण ब्रह्मदंडासारखा

रामचंद्रांनीं टाकिला असतां त्या बाणाच्या योगें अश्व सारथी रथ यांसहवर्तमान रावण एकाएकीं दग्ध झाला. हें पाहातांच गंधर्व, देव, त्रिदशेश्वर बहुत हर्षित झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

२९१. अध्याय दोनशें एक्याण्णव.— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, रावणाचा वध करून रामचंद्र लक्ष्मणासहवर्तमान परम आनंद पावले. असतां संपूर्ण देव गंधर्व ऋषि यांनीं रामचंद्रास आशिर्वाद देऊन पूजा केली आणि स्तुति करून पुष्पांचा वर्षाव केला. त्याकाळीं आकाश परम शोभायमान दिसूं लागलें. रामचंद्रानें बिभीषणास परम हर्षेकरून लंकेचें राज्य समर्पण केलें असतां अविंध्यनामक राक्षस बिभीषणास पुढें करून सीतेस रामचंद्राच्या अग्रभागीं आणून भाषण करूं लागला. हे काकुत्स्था तुझी भार्या जानकीनामक सद्रत्न आहे इचा स्वीकार कर. असें ऐकून रामचंद्र रथाखालीं उतरले. आणि नेत्राश्रूंनीं परिपूर्ण झालेल्या सीतेस पाहून परम आश्चिर्य पावले. संपूर्ण अंगांनीं सीता सुंदर असतां शोकेंकरून बहुत कृश झालेली पाहातांच रामचंद्र बोलले हे वैदेही जें मला कार्य कर्तव्य तें मीं केलें. तूं आतां पुनः लंकेंत माघारी जा. तुझें ग्रहण मी करीत नाहीं. माझा त्याग करून आजपर्यंत राक्षसगृहीं निर्दोष कशी राहाशील. ज्या दुरात्म्याच्या गृहीं तुजसारखें स्त्रीरत्न गेलें असतां उपभुक्त झाल्यावांचून राहाणार नाहीं. तुझ्यावर जारत्व शंका माझी झाली. असें जाणूनच निशाचरांचा वध मीं केला. आतां तूं सुवृत्त अथवा दुर्वृत्त ऐस, परंतु आतां तुझें ग्रहण करण्यास मी इच्छीत नाहीं. असें रामचंद्राचें दारुण भाषण ऐकून सीता व्यथित होऊन एकाएकीं पडली. तसेंच वानरही लक्ष्मणासहवर्तमान पृथ्वीवर निचेष्ट पडले. इतक्यांत चतुर्मुख ब्रह्मदेव विमानारूढ होऊन रामचंद्राचे दर्शनास आले. तसेंच शक्र, अग्नि, वायु, यम, वरुण, कुबेर, सप्तऋषि हेही अंतरिक्ष विमानारूढ होऊन आले. हंसयुक्त विमानामध्यें दशरथराजाही आरूढ होऊन प्राप्त झाला. त्याकाळीं देवगंधर्व यांनीं आकाश फार शोभायमान दिसूं लागलें. तेव्हां परम यशस्वी जानकी संपूर्ण देव ऐकत असतां बोलली हे रामा, तुझा दोष मी कांहीं केला नाहीं. मी कशी आहे हें तुला विदितच आहे. स्त्रिया व पुरुष यांची गति विचित्र आहे ही खरी परंतु तशांतली मी नव्हे. हा अंतरिक्ष गमन करणारा वायु

संपूर्ण शरिरांत संचार करतो तो मी जर दोषी अथवा पापी असेंन तर माझ्या प्राणाचा त्याग करो. तसाच अग्नि, आप, पृथ्वी, आकाश हे ही मी पापी असेंन तर माझा त्याग करोत. तुझ्यावांचून स्वप्नामध्येंही अन्याची चिंता केली नाहीं. देवानें मला तूंच पति प्राप्त झालास यास्तव तुझेंच चिंतन करत्यें. इतके भाषण सीतेनें करतांच एकाएकीं अंतरिक्षांत वाणी झाली. त्या पुण्यकारकवाणीनें संपूर्ण वानरांस हर्ष झाला. वायु ह्मणतो हे राघवा, ही मैथिली निष्पाप आहे. यास्तव भार्यात्वबुद्धि न टाकून इच्याशीं संगत हो. इतक्यांत अग्नि ब्रह्मदेव इत्यादिकांनी सीता निष्पाप आहे, अशी साक्ष देऊन सीतेस ग्रहण करावें असें रामचंद्रास सांगितलें. नंतर दशरथराजा पुनः रामचंद्रास ह्मणतो हे वत्सा, तुझीं चौदावर्षें पूर्ण झालीं आतां अयोध्येमध्यें जाऊन प्रजेचें रक्षण कर. असें ऐकून रामचंद्र दशरथास नमस्कार करून ह्मणतो हे राजा, मी तुझ्या आज्ञेनें अयोध्येस सुहृदांसहवर्तमान जाण्यास निघालों. असें ह्मणून त्यांनीं अविंध्यनामक राक्षसास वर दिला व त्रिजटेस मान व अर्थ यांनीं संतुष्ट केलें. पुनः देवांसहवर्तमान ब्रह्मदेव भाषण करूं लागले कीं, हे रामा, तुला कांहीं इच्छित वर मागणें असेल तो माग. असें ऐकून रामचंद्र भाषण करतात हे पितामह, धर्माच्या ठायीं स्थीति, शत्रूपासून अपराजय व राक्षसांनीं मारलेले वानर सजीव व्हावेत हेंच मागणें आहे. असें ऐकून ब्रह्मदेवानें तथास्तु ह्मणतांच संपूर्ण वानर तत्काळ सजीव झाले. सीतेनें मारुतीस वर दिला कीं, हे पुत्रा, रामचंद्राचें कीर्तन जोंपर्यंत लोक या पृथ्वीवर करतील तावत्कालपर्यंत तूं जिवंत राहाशील. आणि दिव्य उपभोग तुला प्राप्त होतील. व जे तुझ्या दर्शनाची इच्छा करतील त्यांस तूं दिव्य उपभोग देण्यास समर्थ होशील. नंतर जानकीसहवर्तमान रामचंद्र संगत झाले. हें पाहून शक्रप्रभृति देव अंतर्धान पावले. तेव्हां शक्रसारथी मातली संपूर्णांमध्यें हर्षित होऊन बोलतो. हे रामा, देव, गंधर्व, यक्ष, मनुष्य, सुर यांचें दुःख दूर केलेंस यास्तव ही भूमि लोकांस जों कालपर्यंत धारण करील तोंपर्यंत देव, गंधर्व, राक्षस तुझी कथा गायन करतील. असें ह्मणून रामचंद्रास नमस्कार करून पूजा केली. आणि तो दिव्य रथारूढ होऊन इंद्रलोकीं गेला. नंतर लक्ष्मण सुग्रीव प्रमुख वानर व सीता यांसहवर्तमान रामचंद्रानें लंकेच्या रक्षणा-

करितां बिभीषणास स्थापित केलें. आणि त्यासह वर्तमान पुष्पक विमानारूढ होऊन समुद्राच्या परतीरीं पूर्वी ज्या स्थळीं शयन केलें होतें त्या स्थळीं येऊन वानरांस रत्नें दान करून स्वस्थळीं जाण्यास त्यांस आज्ञा दिली. आणि सुग्रिवासह वर्तमान आपण किष्किंधेंत गेल्यावर अंगदास यौवराज्याचा अभिषेक करून सीता व लक्ष्मण यांसह वर्तमान रामचंद्र अयोध्या नामक स्वपुरास आले. इकडे मारुतीनें नंदीग्रामीं जाऊन रामचंद्राचें प्रिय इंगित भरथास सांगितलें. नंतर शत्रुघ्नासह वर्तमान भरत अग्रभागीं पादुका करून अयोध्येस आला आणि रामचंद्र लक्ष्मण व सीता यांचें दर्शन करून बहुत आनंद पावला. भरथाच्या दर्शनानें रामचंद्रही परम हर्षित झाले. नंदिग्रामीं भरथ राज्य करीत असतां त्यानें न्यायोपार्जित जें द्रव्य तें समग्र रामचंद्रास समर्पण केलें. कोणेएके दिवशीं सुमुहूर्तीं श्रवणनक्षत्रीं वसिष्ठवामदेव प्रभृतींनीं रामचंद्र व सीता यांस राज्याभिषेक केला. नंतर रामचंद्रांनीं बिभीषण व सुग्रीव प्रभृति मित्रांस आप आपले स्थानीं जाण्यास आज्ञा दिली. आणि वनवाससंबंधीं दुःखाचा त्याग करून भार्या व भ्राते यांसह वर्तमान रामचंद्र सुखेंकरून अयोध्येंत राहिले. आणि त्यांनीं पुष्पक विमानाची पूजा करून परमप्रीतीनें तें कुबेरास पुनः समर्पित केलें. नंतर गोमती तीरीं देव ऋषि यांसह वर्तमान दाहा अश्वमेध केले असा विषय या अध्यायांत आहे.

२९१. अध्याय दोनशें ब्याण्णव:— मार्कंडेय भाषण करतात हे धर्मराजा, अशीं रामचंद्रानें पूर्वी वनांमध्यें दुःखें सहन केलीं, यास्तव तूं शोक करूं नको. तूं क्षत्रिय आहेस. बाहु वीर्येंकरून आपला मार्ग त्यक्त केला नाहींस. परमाणु इतकाही पातकाचा लेश तुला नाहीं. म्हणून तूं शत्रूचा नाश करशील. तूं तर सहायवान् आहेस. इंद्रासारखे पराक्रमी व बलाढ्य धनुर्विद्येंत निपुण असे तुझे भ्राते असतां तुला काय कमी आहे? पहा बरें दुष्ट जो सैंधव यानें द्रौपदीचें हरण वनांमध्यें केलें असतां जयद्रथाचा पराभव करून तिला अर्जुन व भीमसेन यांनीं आणिलें किंवा नाहीं? रामचंद्र सहाय हीन असतां दशग्रीवाचा पराभव करून त्यानें सीतेस आणिलें. वानर, गोपुच्छ, ऋक्ष यांच्या जाति काय? यांनीं रामचंद्राचें सहाय कसें केलें बरें! याचें चिंतन तूं आपले मनांत

कर. तात्पर्य हे राजा, तुझ्यासारखे महान् आहेत ते शोक करीत नाहींत. विचार करून मनाचा संतोष करतात. वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, याप्रमाणें मार्कंडेय ऋषीनीं धर्मराजास बहुत आश्वासन देऊन मनाची शांति केली असतां राजा मनाचा संतोष करून पुनः मार्कंडेय ऋषीस प्रश्न करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

२९३. अध्याय दोनशें त्र्याण्णव – युधिष्ठिर भाषण करतो हे मार्कंडेय, मी आपल्याकरितां अथवा भ्रात्यांकरितां शोक करीत नाहीं. परंतु ही द्रुपदात्मजा द्रौपदी इला दुष्टांनीं फार क्लेश दिले. हें दुःख मला फार होऊन मी शोक करतों तशीच वनामध्यें जयद्रथानें बलात्कारें करून हरण केली हें दुःख मला आणखी झालें आहे इच्यायोगें आजपर्यंत आह्मी तरलों हे ऋषे या द्रौपदीसारखी पतिव्रता तुह्मीं पाहिली अथवा ऐकिली असल्यास सांगा असें ऐकून मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, कोणीएक अश्वपति यानामें करून मद्रदेशाचे ठाईं राजा होता तो दानशील पौरजानपद यांस अत्यंत प्रिय असून क्षमाशील व सत्यवक्ता जितेंद्रिय असा होता. त्यास वार्धक्य प्राप्त झाल्यामुळें आपल्यास संतती नाहीं असें जाणून तो संताप पावला नंतर त्यानें तीव्र तपास आरंभ केला. तें तप असें कीं, सावित्रीच्या प्रीत्यर्थ त्यानें एक लक्ष होम केला. आणि नित्य दिवसाच्या सहाव्या कालांत परिमित भोजन करीत सावित्रीचें अठरा वर्षें आराधन केलें. तेव्हां सावित्री अग्निकुंडांतून प्रगट होऊन बोलत्ये. हे राजा, मी तुझ्या तपानें संतुष्ट झाल्यें यास्तव वर मांग. असें सावित्रीचें भाषण ऐकून अश्वपति बोलला हे सावित्री, आपल्याकरितां हा समारंभ धर्मेंकरून केला. यास्तव कुलीन पुत्र मला बहुत व्हावेत. असें ऐकून सावित्री बोलत्ये. हे राजा, तुझा अभिप्राय पूर्वींच जाणून मी पुत्राविषयीं ब्रह्मदेवाची प्रार्थना केली; परंतु ब्रह्मदेवानें सांगितलें यास पुत्र होणार नाहीं, एक कन्या होईल. हाच वर तुला मी दिला याजवर तूं प्रत्युत्तर करूं नको. मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, सावित्रीची आज्ञा ऐकून राजानें तिची पूजा केली असतां तत्काळ देवी अंतर्धान पावली. नंतर राजाही स्वपुरीं येऊन स्वकर्मानें प्रजापालन करूं लागला. कांहीं दिवसांनीं राजाची ज्येष्ठ भार्या गर्भिणी असतां तो गर्भ शुक्ल चंद्रासारखाच वृद्धि पावूं लागला. नंतर दशममासीं

राजपत्नी प्रसूत होऊन कन्या झाली, तिचें नांव राजानें सावित्री असें ठेविलें.ती कन्या साक्षात् श्रीरूपिणी श्रीसारखी राजगृहीं वृद्धि पावून कालेंकरून तिला यौवन अवस्था प्राप्त झाली. ती सुवर्णाचे प्रतिमेसारखी पृथुश्रोणि पाहून सर्व जनांनीं ही देवकन्याच आली काय? असें मानिलें.तिच्या तेजानें सर्व जन चकित होऊन कोणीं तिला वरीना. कोणे एकेकालीं ती कन्या ऋतुस्नात होऊन देवतेचें पूजन करून पित्याच्या पार्श्वभागीं बसली. तेव्हां तिला पाहून पिता भाषण करतो हे पुत्री, तुझा दान करण्याचा काल आला परंतु कोणी येऊन वरीत नाहींत. यास्तव तूंतरी आतां आपल्यास योग्य गुणवान् असा स्वतः भर्ता पाहा.नंतर मी त्याचा विचार करून तुला देईन. धर्मशास्त्रांत वचन आहे तें मी तुला सांगतों. कन्येचें दान न करणारा पिता, तसाच ऋतुकाळीं गमन न करणारा भर्ता, पिता मरण पावला असतां मातेचें रक्षण न करणारा पुत्र हे निंद्य होत. यास्तव तूं पतीचा शोध करून देवांत मी निंद्य न होईन असें कर. असें बोलून अश्वपति राजानें मंत्र्यांस आज्ञा केली कीं, तुह्मी वाहनादिक सैन्य सिध्द करून इच्याबरोबर जा. कन्येनें पित्यास नमस्कार केला आणि ती वृध्द प्रधानांसहवर्तमान सुवर्णरथांमध्यें बसून प्रथम राजर्षीच्या तपोवनांत गेली. आणि ऋषींस नमस्कार करून पुढें जातां जातां मार्गांत तीर्थांचेठायीं ब्राह्मणांस धनदान करीत गेली. असा विषय या अध्यायांत आहे.

२९४. अध्याय दोनशें चौऱ्याण्णव.— मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, कोणे एके दिवशीं नारदऋषि अश्वपतिराजाचे गृहीं येऊन सभेंत बसले. इतक्यांत सावित्री संपूर्ण तीर्थें व आश्रम यांस पाहून सचिवांसहवर्तमान पितृगृहीं आली. त्या काळीं नारद ह्मणतात हे राजा, ही तुझी कन्या कोठें गेली होती व कोठून आली? इला यौवनावस्था प्राप्त झाली असतां इचा विवाह कां करीत नाहींस? असें ऐकून अश्वपति भाषण करतो. हे नारदा, याच कार्याकरितां मी इजला पाठविली होती, ती आतांच आली. आतां झालेला वृत्तांत सांगेल. असें बोलून सावित्रीस बोलतो कीं, ज्या कार्याकरितां तूं गेली होतीस तें सविस्तर वर्तमान नारदास सांग. असें ऐकून सावित्री भाषण करते, शाल्वदेशांतील द्युमत्सेन या नांवें राजा होता तो सांप्रत राज्यभ्रष्ट व अंध होऊन भार्यापुत्रांसह-

वर्तमान अरण्यांत तप करीत आहे. त्याचा सत्यवान् नामक पुत्र मनानें मीप-तित्वें करून वरला. असें ऐकून नारद ह्मणतात हे राजा, सावित्रीनें मोठें दुःखकारक कर्म केलें तें असें कीं, सत्यवान परम गुणवान् आहे खरा. तो व याचीं मातापिता हीं निरंतर सत्यभाषण करतात ह्मणून ब्राह्मणांनीं याचें नांव सत्यवान असें ठेविलें. यानें बाल्य अवस्थेंत चित्रविचित्र मृन्मय अश्व करावे व भिंतीवर अश्वांचीं चित्रें काढावीं. ह्मणून संपूर्ण लोक यास चित्राश्व ह्मणतात. असें ऐकून राजा ह्मणतो हे नारदा, सत्यवान् तेजस्वी व बुद्धिमान्, शूर, पितृवत्सल असा आहे ना? नारद ह्मणतो हे राजा, सत्यवान् सूर्यासारखा तेजस्वी, बृहस्पतीसारखा बुद्धिमान, इंद्रासारखा पराक्रमी व पृथ्वीसारखा क्षमावान् आहे. असें ऐकून राजा ह्मणतो हे ऋषे, हा राजपुत्र ब्राह्मण्य, रूपवान्, उदार, प्रियदर्शन असा आहे ना? नारद ह्मणतो हे राजा, रंतीदेव नामक राजासारखा हा दानशील, शिबीसारखा सत्यवादी, ययाती राजासारखा उदार, सोमासारखा प्रियदर्शनी व अश्विनीकुमारांसारखा रूपवान आहे. दांत, शूर, जितेंद्रिय, न्ही मान, कांतिमान, निरंतर आर्जवस्थिती धारण करणारा असा आहे. अश्वपति भाषण करतो हे ब्रह्मऋषे, राजपुत्राचे गुण सांगितलेस. परंतु याचे दोष किती आहेत ते सांग. नारद ह्मणतो हे राजा, त्या राजपुत्रास एकच दोष आहे परंतु तो संपूर्ण गुणांचा नाश करून राहाणारा त्याचें परिमार्जन करणें बहुत अशक्य आहे. एक संवत्सरानंतर हा क्षीणायु होऊन देह त्याग करील, असें ऐकतांच राजा कन्येस ह्मणतो हे शोभने, दुसरा पति तू वर. सावित्री ह्मणते हे तात, कन्यादान झालें असतां माघारें परावृत्त होत नाहीं. व तुला देतों असें याचकास भाषण केलें असतां तें माघारें फिरत नाहीं. हा राजपुत्र दीर्घायु अथवा अल्पायु, गुणि अथवा निर्गुणी असो तो एकवार मनें करून वरला. आतां दुसरा वरणार नाहीं. असें ऐकून नारद ह्मणतात हे नरश्रेष्ठ, तुझ्या कन्येची स्थीर बुद्धि आहे. इचें निवारण करण्यास धर्मेंकरून कोणीं समर्थ नाहीं. सत्यवंतात जे गुण आहेत ते अन्यांत नाहीं त. यास्तव दुहितेचें दान त्यास च कर. असें ऐकून राजा भाषण करतो हे ऋषे, सावित्रीचें मन व तुझें

भाषण यांजवर विश्वस्थ होऊन मी तसेंच करतों. नारद ह्मणतो हे राजा, तुझ्या दुहितेचें दान अविघ्न असो. तुझ्या दुहितेचे कल्याणाविषयीं जितकें साधन होईल तितकें मी करीन. असें ह्मणून नारद तत्काल स्वर्गीं गेले. नंतर राजानें ही विवाहाची सामोग्री सिध्द केली. असा विषय या अध्यायांत आहे.

२९५. अध्याय दोनशें पंच्याण्णव:—मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, लग्नाची सामोग्री सिध्द करून अश्वपति राजा वृध्द ब्राह्मण समागमें घेऊन पुण्य दिवशीं कन्येसहवर्तमान अरण्यांत द्युमत्सेनाच्या आश्रमीं गेला तेव्हां शालवृक्षाच्या अधोभागीं कुशमय आसनावर बसलेल्या द्युमत्सेनास राजानें चक्षुहीन पाहून त्याची पूजा केली. नंतर मी अश्वपतिनामक राजा आलों ह्मणून सांगतांच द्युमत्सेनानें आगमनाचें कारण विचारलें. त्याकाळीं अश्वपति भाषण करतो हे राजर्षे, सावित्री नामक माझी कन्या परमशोभना आहे. ती तुझी स्नुषा व्हावी अशी माझी इच्छा आहे. द्युमत्सेन ह्मणतो हे राजा, आह्मीं राज्यापासून भ्रष्ट होऊन वनवास भोगतों. तेव्हां तुझी कन्या वनवास दुःखें कशीं सहन करील! अश्वपति ह्मणतो सुख दुःख व त्यांची उत्पत्ति नाश यांचा विचार करून आह्मीं येथें आलों आहोंत, आमची आशा भंग करूं नको. मी तुला नम्र झालों असें ऐकून द्युमत्सेन ह्मणतो जर माझ्या पुत्रास कन्या द्यावी अशी पूर्ण तुझी इच्छा आहे तर तिथि निश्चय कर. मीही या संबंधाविषयीं आकांक्षित आहें. असें ऐकतांच राजा सुमुहूर्त पाहून सावित्रीचें सालंकृत कन्यादान सत्यवतास करून हर्षानें स्वपुरीं आला. नंतर सावित्रीनें संपूर्ण आभरणें काढून ठेऊन वल्कलें व काषाय वस्त्रें धारण केलीं, आणि गुण, नम्रता, व शील इत्यादिकें करून सर्वांचा संतोष केला. याप्रकारें सावित्रीनें भर्ता, श्वसुर व श्वश्रु यांसहवर्तमान कांहीं दिवस कालातिक्रमण केले परंतु ती नारदांनीं जो दिवस सांगितला होता त्याचें रात्रदिवस चिंतन करीत असे. अ० वि० या अ० आ०

२९६. अध्याय दोनशें शाण्णव:—मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, सावित्री वनामध्यें भर्त्याच्या मरण दिवसाची गणना करीत राहात असतां आजपासून चतुर्थ दिवशीं आपला भर्ता मरणार असें जाणून—

तिनें त्रिरात्र व्रतास आरंभ केला. तेव्हां तिचें तें व्रत कठीण पाहून श्वशुर बोल-
ला हे नृपात्मजे, हा व्रतारंभ तूं फार कठिण केलास. तीन दिवस उपोषण कर-
णें परम दुर्घट होय. सावित्री ह्मणत्ये हे तात, संताप करूं नका. याची समा-
प्ति करीन. कांहीं संकटाकरितां हें व्रत मी आरंभिलें. असें ऐकून द्युमत्सेन
ह्मणतो व्रताचा त्याग कर असें भाषण करण्यास कसा मी समर्थ होईन?
परंतु व्रताची समाप्ति करावी असें ह्मणून तो स्तब्ध बसला. नंतर उद्यांचा प्र
त्यांचा मरण दिवस असें समजून सावित्रीची ती रात्र परम दुःखांत गेली.
द्वितीय दिवशीं प्रातःकाळीं सावित्रीनें अग्नीच्यागायीं होम देऊन चार घटका
दिवसापूर्वीं समग्र पूर्वाण्ह क्रिया समाप्त केली. नंतर अरण्य निवासी द्वि
ज व वृध्द श्वशुर श्वश्रू यांस यथानुक्रमें अंजली पुट जोडून अभिवादन
केलें असतां संपूर्ण तपस्वी व सासूसासरा यांनीं अवैधव्य असो ह्मणून आ-
शिर्वाद दिला. तो ग्रहण करून ती तो काल व तो मुहूर्त यांची प्रतीक्षा करीत
बसली असतां तिला सासूसासरे एकांत स्थळीं प्रीतीनें बोलले हे पुत्री, तु-
झा व्रताचा समाप्त काल जवळ आला यास्तव आतां पारणा कर विलंब क
रूंनको. सावित्री ह्मणत्ये सूर्य अस्त झाल्यावर या व्रताची पारणा मी करीन.
असा मी पूर्वीं ह्रदयांत संकल्प केला आहे. इतक्यांत सत्यवान् स्कंधावर कुऱ्हा-
ड घेऊन वनांत जाण्यास निघाला असतां सावित्री ह्मणते तूं एकाएकीं वनाम-
ध्यें जाऊं नको. मी तुझ्या समागमें वनांत येण्याची इच्छा करत्यें. सत्यवान्
ह्मणतो, वनाचा मार्ग कठिण आहे. तशांतून तूं उपवासें करून कृश झाली
आहेस यास्तव पायानें कशी येशील. सावित्री ह्मणत्ये उपवासानें मला ग्ला-
नि व श्रम नाहीं. मी तुजबरोबर वनांत येत्यें. सत्यवान ह्मणतो तुझ्या येण्यावि-
षयीं उत्साह असल्यास तुझें प्रिय मी करीन. परंतु श्वशुर व सासू यांची आ-
ज्ञा घे. असें ऐकून सावित्री सासूसासऱ्यास अभिवादन करून बोलली कीं, मा-
झा भर्ता फळें आणण्याकरितां वनांत जातो त्याबरोबर मी वनांत जाण्यास
इच्छितें असें ऐकून द्युमत्सेन पत्नीस बोलतो कीं, या सावित्रीनें कधींच आ-
पणास प्रार्थना केली नाहीं यास्तव इचें इच्छित पूर्ण करावें. असें बोलून
स्नुषेस बोलतो हे मुली, मार्गीं सत्यवानाविषयीं तूं सावधपणें वागावें. अशी

आज्ञा होतांच सावित्री मनामध्यें नारदाच्या भाषणाचें स्मरण करीत भर्त्या-
च्या पाठीमागें हळू हळू वनांत गेली. असा विषय या अध्यायांत आहे.

२९६. अध्याय दोनशें शाण्णव:— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, भार्येसह वर्तमान सत्यवान् वनांत संचार करीत असतां फलमूलें घेऊन काष्ठें तोडूं लागला तों त्याच्या शिरास वेधना उत्पन्न होऊन श्रमानें घर्म बहुत उत्पन्न झाला. त्या काळीं तो भार्येस भाषण करतो हे सावित्री, श्रमानें माझें शिर बहुत दुःखत आहे व आंगास बहुत कंप सुटला यामुळे निद्रा करावी असें वाटतें. असें ऐकून सावित्रीनें निद्रेकरितां पतीस आपली मांडी दिली. नंतर सत्यवान् सावित्रीचे उत्संगावर आपलें शिर ठेऊन निद्रित असतां सावित्रीनें नारदाच्या भाषणाचा समय हाच आहे. असा निश्चय केला नंतर एक मुहूर्त झाल्यावर एक पुरुष कृष्णवर्ण, आरक्त वस्त्र नेसलेला, सूर्यासारखा तेजस्वी, हातांत पाश घेऊन सत्यवताचे पार्श्वभागीं उभा राहिला. तेव्हां सावित्री भर्त्याचें शिर पृथ्वीवर ठेऊन त्यास बोलत्ये हे पुरुषा, तूं कोणीं तरी देव आहेस हें शरीर मनुष्याचें नव्हे. तूं कोणत्या इच्छेनें येथें आलास तें कार्य मला सांग. यम भाषण करतो हे सावित्री, ज्यास यम ह्मणतात तोच मी त्या तुझ्या सत्यवान् नामक भर्त्यास बंधन करून नेण्याकरितां आलों आहें. असें ऐकून सावित्री भाषण करत्ये हे भगवान्, मी असें ऐकलें आहे कीं, तुझे दूत येऊन मनुष्यास नेतात, असें असतां तूं स्वतः कां आलास? यम भाषण करतो हे सावित्री, तुझा भर्ता रूपवान् गुणसागर आहे, माझे दूतांनीं नेण्यास योग्य नाहीं, यास्तव स्वतः मीच आलों असें ह्मणून यमानें सत्यवानाचे शरिरापासून अंगुष्ठमात्र पुरुष काढिला, आणि त्यास पाशानें बांधून दक्षण दिशेस नेला. तेव्हां सावित्री दुःखानें युक्त होऊन यमाचे मागें चालली. हें पाहून यम भाषण करतो हे सावित्री, आतां माघारी फीर आणि याची क्रिया कर. असें ऐकून सावित्री भाषण करत्ये हे यमा, जेथें माझा भर्ता कोणी नेईल अथवा स्वतः जाईल तेथें मला जाणें प्राप्त आहे. तप, गुरुभक्ति, भर्त्याचा स्नेह व तुझा प्रसाद इत्यादिकें करून माझी अकुंठित गति आहे. ज्ञानी असें ह्मणतात कीं, साधुसमागमें सात पावलें गेलें असतां ते आपले मित्र हो-

ऊन कृपा करतात. यास्तव हे देवा, तू माझा मित्र झालास ह्मणून मी बोल-
त्ये कीं, ज्यांनीं इंद्रिय निग्रह केला नाहीं ते वन अथवा ग्राम यांमध्यें धर्मांच-
रण करीत नाहीत. इंद्रियनिग्रहवान जे आहेत ते धर्माचा त्याग न करितां उत्त-
ममार्गानें वनग्राम यांमध्यें राहातात, यास्तव धर्मश्रेष्ठ आहे. एक धर्माचा अ-
वलंब केला ह्मणजे त्यांत संपूर्ण गोष्टी सिध्द होतात. यास्तव हे यमा, ज्या
मार्गानें साधु गेले तो मार्ग मला प्राप्त व्हावा. यम ह्मणतो हे सावित्री, स्वराक्ष-
र व्यंजन नष्ट न होतां तूं जें धर्मयुक्त भाषण केलेंस तेणेंकरून मी बहुत संतु-
ष्ट झालों यास्तव याच्या जीवित्वावांचून जो वर मागणें असेल तो माग. सा-
वित्री ह्मणत्ये बरें आहे. माझा श्वशुर नष्टचक्षु राज्यापासून भ्रष्ट होऊन वनां-
त वास करतो त्यास तुझ्या प्रसादानें सूर्यासारखे तेजस्वी नेत्र प्राप्त व्हावे. असें
ऐकून यम ह्मणतो हे सावित्री, तुझ्या भाषणाप्रमाणें तुझ्या सासऱ्यास नेत्र
येतील. आतां माघारी जा. तू मार्गांत बहुत श्रमलीस. असें ऐकून सावित्री
भाषण करते हे यमा, भर्ता समीप असतां मला श्रम कोठून होईल. माझी
गति भर्ता आहे. ज्या स्थळीं तू त्यास नेशील तेथें मी येईन हें तू निश्चयें करू-
न जाण. असें ऐकून यम ह्मणतो हे सावित्री, तुझें भाषण ऐकून मी संतुष्ट
झालों. यास्तव पुनः सत्यवताचे जीवित्वावांचून वर माग. सावित्री भाष-
ण करत्ये, माझा श्वशुर धीमान् संपूर्ण पृथ्वीचें राज्य करीत होता. त्याचें
राज्य भ्रष्ट झालेलें स्वधर्म त्याग न करितां त्यास प्राप्त होवो. असें ऐकून य-
म भाषण करतो हे नृपकन्यके, तुझ्या श्वशुरास लौकरच राज्य प्राप्त होईल.
आतां तू माघारी फीर. सावित्री ह्मणते हे यमा, त्या संपूर्ण प्रजा यांचे धर्म व इ-
च्छा यांच्यायोगें त्यांस तू तसें तसें देतोस. सत्कर्म व दुष्कर्म या फल तारतम्येंक-
रून त्यांची स्थीति तू जाणतोस, ह्मणून तुला यम असें ह्मणतात. ह्मणून मला
एक भाषण कर्तव्य आहे तें असें कीं, भूतांच्याठायीं अद्रोह व संपूर्णांवर अ-
नुग्रह करावा हा साधूंचा सनातन धर्म आहे ते साधु शत्रु जरी शरण आले
तरी त्यांवर दया करतात, मग माझ्यासारख्या दीनावर दया करतील कां. अ-
सें ऐकून यम भाषण करतो, हे सावित्री, उदकानें तृषार्त पुरुष जसा संतुष्ट हो-
तो तसा तुझे भाषणानें मी संतुष्ट झालों, पुनः सत्यवानाचे जीवित्वावांचून

इच्छित वर माग. सावित्री भाषण करत्ये माझा पिता अनपत्य आहे त्यास औरस पुत्र कुलसंतान करणारे शंभर व्हावेत असें ऐकून यम ह्मणतो हे शुभे, तुझ्या पित्यास कुलसंतान करणारे मोठे पराक्रमी शंभर पुत्र होतील. आतां तू फार दूर आलीस यास्तव माघारी जा. सावित्री ह्मणते हे यमा, भर्ता सन्निध असतां दूर आल्यें असें मला वाटत नाहीं. आतां दुसरें एक माझें भाषण ऐक. तू विवस्वानाचा पुत्र ह्मणून तुला वैवस्वत असें ह्मणतात. तुझा पिता संपूर्ण जगताचा आत्मा असें श्रुति ह्मणत्ये त्याचाच साक्षात् तू पुत्र होस. जसें पित्याचें आचरण तसें पुत्राचें असावें व धर्मेंकरून प्रजेनें आचरण केलें असतां सूर्य संतुष्ट होतो तशीच तुझी वृत्ति आहे ह्मणून धर्मराज हें नांव तू पावलास. जसा आत्म्याच्याठायीं विश्वास असाच साधूंवर विश्वास ठेऊन आपलें गुह्य त्यांजपाशीं सांगितलें असतां आपले दुरिताचा नाश होतो. मित्रत्व अकृत्रिम झालें असतां विश्वास उत्पन्न होतो. यास्तव अकृत्रिम स्वभावें करून मी तुझ्यावर विश्वास ठेविला आहे. यम ह्मणतो हे शुभे, तुझें भाषण ऐकून मी संतुष्ट झालों. तर याचे जीवित्वावांचून चवथा वर माग. सावित्री भाषण करते माझेठायीं सत्यवानापासून औरस पुत्र उभय कुलउध्दारक, वीर्य बलशाली शंभर व्हावेत हा चवथा वर मागत्यें. यम भाषण करतो हे अबले, शंभर पुत्र बलवीर्यशाली तुला होतील, आतां तू फार लांब आलीस यास्तव माघारी जा. सावित्री ह्मणत्ये साधूंची शाश्वत धर्मावर भक्ति आहे त्यापासून ते कधीं भ्रष्ट होत नाहींत त्यांच्या समागमें करून भयाचा नाश ही होतो. संपूर्णांस साधु गति आहे. संपूर्ण गुण साधूंच्याठायीं राहातात, ह्मणून दुसऱ्याचें संरक्षण करण्याची शक्ति सहज त्यांस प्राप्त झाली. यम ह्मणतो जें जें तू भाषण केलेंस तें तें ऐकून माझी अप्रतिम भक्ति तुझ्यावर उत्पन्न झाली. यास्तव आणखी वर माग. सावित्री भाषण करत्ये, तूं मला सत्यवानापासून शंभर पुत्र होतील ह्मणून वर दिलास तो वर तूं आपला सत्य कर. कारण त्याचा माझा संबंध झाल्यावांचून पुत्र कसे होतील? पतीवांचून सुख अथवा स्वर्गसंबंधीं भोग किंवा श्री यांची इच्छा मी करीत नाहीं. मार्कंडेय ह्मणतात धर्मराजा, असें सावित्रीचें भाषण ऐकतांच यमानें पाश —

काढून हर्षानें बोलला हे सावित्री, तुझा भर्ता पाशापासून मुक्त केला. हा नि-
रोगी लोकांत स्तुत्य व संपूर्ण सिध्दार्थ यांनीं युक्त होऊन तुजसह वर्तमान चा-
रशें वर्षे या पृथ्वीवर जिवंत राहील आणि तुझ्यापासून शंभर पुत्र उत्पन्न करी-
ल. नंतर संपूर्ण पुत्रपौत्र सावित्र अशा नामाचे होतील. तसेच तुझ्या पित्यापा
सून मालवी नामक भार्येच्याठायीं शंभर पुत्र देवासारखे पराक्रमी होतील.
असा वर देऊन यमानें सावित्रीस माघारीं फिरविली, आणि आपण स्वस्थानीं
गेला. सावित्री ही भर्त्याकडे आली, आणि पृथ्वीवर पडलेलें कलेवर आप-
ले उच्छंकावर घेऊन बसली. इतक्यांत सत्यवान् जागृत होऊन बोलतो हे
भद्रे, बहुत कालपर्यंत मला निद्रा लागली असतां मध्यें जागृत कां केलें ना-
हींस? कोणीं एक शामवर्ण पुरुष मला घेऊन जात होता तो कोण? तूं पाहि-
लास? असें ऐकून सावित्री भाषण करत्ये हे पुरुषश्रेष्ठ, बहुत कालपर्यंत
तूं माझे अंकावर निजलास. तुझी निद्राभंग होईल म्हणून मीं तुला जागृत के-
लें नाहीं. तो शाम पुरुष संपूर्ण प्रजेचें संयमन करणारा यम होय. आतां लौ-
कर ऊठ. ही भयंकर रात्र पहा असें ह्मणतांच सत्यवान् उठून संपूर्ण दिशा पा-
हात भाषण करतो. हे सावित्री स्त्रिये तुझे उत्छंकावर शीर ठेऊन मी निद्रिस्त
झालों असतां मला गाढ निद्रा लागली. त्या निद्रेंत एक घोर पुरुष मी पाहिला.
तो तुला ठाऊक असल्यास मला सांग. हे स्वप्न असेल किंवा कांहीं खरेंच झा-
लें असेल याचा निश्चय होत नाहीं. असें ऐकून सावित्री भाषण करते. आ-
तां रात्र फार झाली याचा वृत्तांत सविस्तर उद्यां सांगेन. लौकर उठून आप-
ले मातापितर यांस पाहा, असें ऐकून सत्यवान् भाषण करतो हें घोर अर-
ण्य अंधःकारानें व्याप्त झालें आहे. आपणास जाण्यास मार्ग कसा सांपडेल
यास्तव आतां आश्रमीं जाण्यास आग्रह करूं नको. सावित्री भाषण करत्ये हें
वन दग्ध झालें यामध्यें एक वृक्ष दग्ध झालेला आहे तेथील मी अग्नि आ-
णितें, आणि काष्ठसंचय करून प्रकाश करितें, ह्मणजे जाण्यास मार्ग दि-
सेल. इतकेंही असून तुझी जाण्याची इच्छा नसेल तर मला असें वाटतें कीं,
तुझ्या शिरांत जी वेदना होत होती ती राहिली नाहीं. अथवा या वनाची शोभा पाहा
वी अशी तुझी इच्छा असेल तर उद्यां पुनः उभयतां येथें येऊन एक रात्र वास

करूं, परंतु आतां राहाण्याचा निश्चय करूनको. सत्यवान् भाषण करतो हे शो भने, माझें शिर दुखत नाहीं. परंतु माता पितरांची भेट तुझ्या प्रसादानें व्हा वी इतकीच मी इच्छा करतों. जर मी आश्रमीं न गेलों तर मातापितर बहुत रो दन करतील. दिवसासही मी कोठें बाहेर गेलों तर माझा शोध बहुत करतात आतां तर रात्रच झाली यास्तव त्यांस शोक होईल. माझेंही जीवित मातापि तरांवांचून व्हावयाचें नाहीं. हे सावित्री मी आपल्याकरितां शोक करीत नाहीं पितरांकरितां करतों. काया वाचा मनेंकरून पितरांचें कल्याण असावें अशी इच्छा बहुत आहे असें बोलून सत्यवान ऊर्ध्वबाहु करून रोदन करूं लागला. त्याकाळीं सावित्री, अश्रु पुसून बोलल्ये कीं मी तप अथवा निष्कृत्रिम अग्नी- च्याठायीं हवन केलें असलें तर ही रात्र माझे सासूसासऱ्यास व भर्त्यास पु- ण्यकारक असो. व, यमधर्म राजानें जें सांगितलें तें सत्य असेल तर माझे सा- सूसासरे प्राण धारण करून परम हर्षातें पावोत. सत्यवान् भाषण करतो हे प्रिये, माता पितरांचे दर्शनाची मला बुद्धि बहुत झाली. यास्तव लौकर चल. तुला शपथपुरःसर सांगतों, जर मातापितरांची माझी आज भेट न झालीत र ते जिवंत राहाणार नाहींत, व मीही देहत्याग करीन. असें ऐकतांच सावित्री- नें आपला केशपाश बांधून पतिस उठविलें. आणि त्याचे बाहु आपले स्कं- धावर ठेवून संपूर्ण अंगावरून हात फिरविला. तेव्हां सत्यवानानें चारी दिशां- स पाहिलें तों फलमूलांनीं भरलेलें पात्र दृष्टीस पडलें. त्या काळीं सावि- त्री ह्मणल्ये हे सत्यवान, फलाचें पात्र येथेंच ठेवूं. इतका भार नेण्यास शक्ति नाहीं. परशू मात्र मी आपले हातांत घेतें. असें भाषण करून सावित्रीनें पा- त्र एका वृक्षाच्या खांदीवर ठेविलें. आणि एक हातांत परशू व दक्षण हा- तांत पतीचे बाहु ग्रहण करून ती हळू हळू चालली त्याकाळीं सत्यवान् भा- षण करतो. हे स्त्रिये, रात्रंदिवस या वनांत येण्याचा अभ्यास मला बहुत आहे तेणेंकरून संपूर्ण मार्गही मला विदित आहेत. व स्थला स्थलाच्या ठायीं खुणेचे वृक्ष आहेत. ज्या मार्गानें आपण आलों त्याच मार्गानें चल. पुढें एक पलाश वृक्ष आहे तेथें दोन मार्ग आहेत. तेथून उत्तर मार्गानें चल हे स्त्रिये मला किंचित् शक्ति येत आहे. माता पितरांचें दर्शन होईल या

इच्छेनें मी बहुत हर्षित आहें असें मार्गांत भाषण करीत सत्यवान आश्रमासन्निध येऊन पोंचला. असाविषय या अध्यायांत आहे.

२९८. अध्याय दोनशें अठ्याण्णव.— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, द्युमत्सेन राजास दृष्टि प्राप्त होऊन तो शैब्या नामक भार्येसह वर्तमान पुत्राच्या शोधाकरितां वननिवासी ऋषींच्या आश्रमीं गेला. आणि पुत्राचा शोध करून दुसरे बहुत आश्रम, वनें, उपवनें, पर्वत, नद्या, सरोवरें यांच्या ठायीं शोध करूं लागला. तेव्हां मार्गांत कांहीं शब्द झाला ह्मणजे भार्येस राजा ह्मणे कीं, हा शब्द सत्यवानासारखा ऐकण्यांत येतो असें ह्मणून पुढें जावें तों मार्गसंबंधीं कंटकांनीं त्यांचीं शरीरें विध्द होत. तीं उभयतां पुत्राचा शोध करीत जात असतां आश्रम निवासी ऋषींनीं उभयतांचें शांतवन करण्याकरितां त्यांस आश्रमीं नेलें. आणि पूर्व राजांच्या चित्रविचित्र कथा सांगून त्यांचें मन संतुष्ट केलें. पुनः पुनः स्त्री पुरुषांनीं पुत्राच्या बाल्यसंबंधीं गुणांचें स्मरण करून हे पुत्रा, हे सावित्री, तुह्मी कोठें गेला? आमचा त्याग कसा केलात, असें करुणाभाषण करावें. अशी राजाची अवस्थापाहून स्रुवर्चा नामक ऋषि भाषण करतो हे राजा, सावित्री तप, इंद्रिय निग्रह व आचार यांनीं संपन्न असल्यामुळें तिचा पति स्वस्वरूप आहे. गौतम ऋषि ह्मणतात हे राजा, मी सांग वेदाध्ययन केलें. तपाचाही संचय बहुत केला. त्या तपाच्यायोगें मला सर्व ज्ञात आहे. तूं कांहीं चिंता करूंनको. तुझा पुत्र जिवंत आहे. भरद्वाज ऋषि ह्मणतात हे राजा, सत्यवानाची भार्या सावित्री तप, दम, व आचार इहींकरून युक्त आहे यास्तव तिच्या पुण्याच्या योगें सत्यवान् जिवंत आहे, चिंता करूंनको. दालभ्य ह्मणतात हे राजा, सावित्रीच्या व्रतानें तुलाही दृष्टि प्राप्त झाली. तसाच सत्यवान्ही तिच्याच पुण्यप्रभावेंकरून जिवंत आहे. अपस्तंभ ह्मणतात ही दिशा शांत होऊन इचेठायीं मृगपक्षि स्रस्वर शब्द करतात याजवरून खचित वाटतें कीं, तुझा पुत्र जिवंत आहे. धौम्य भाषण करतात हे राजा, संपूर्ण गुणांनीं तुझा पुत्र युक्त आहे. तसाच संपूर्णांस प्रिय व दीर्घायू आहे. यास्तव त्याच्या जिवित्वाविषयीं चिंता करूंनको. मार्कंडेय ह्मणतात हे धर्म,

राजा, संपूर्ण ऋषींनीं राजास अश्वासन दिलें. इतक्यांत सावित्री भर्त्या-
सह रात्रीं आश्रमीं आली. तेव्हां ब्राह्मणांनीं तात्काळ राजास सांगतांच
राजा पुत्रास भेटण्याकरितां येऊन संपूर्ण एकत्र मिळाले. त्याकाळीं संपू-
र्ण ब्राह्मण ह्मणतात हे राजा, आमचें वाक्य कधीं मिथ्या व्हावयाचें नाहीं. तु-
मचें कल्याण असो. आणि राज्याची वृध्दि असो. सावित्रीच्या योगें हे दिव्य
चक्षु तुला प्राप्त झाले असें तूं जाण. नंतर ब्राह्मणांनीं अग्नि प्रज्वलित करून हो-
म दिले. आणि सत्यवानास प्रश्न केला कीं, हे पुत्रा, वनांतून येण्यास इतका का-
ळ कां लागला? रात्र बहुत झाली असा तुला प्रतिबंध काय झाला होता. तुझी
माता, पिता व आह्मी हा कालपर्यंत तुझ्या येण्याची मार्ग प्रतीक्षा करीत बसलों
होतों, यास्तव तुला विलंब लागण्याचें कारण काय तें सांग. असें ऐकून सत्य-
वान् ह्मणतो मी पित्याच्या आज्ञेवरून सावित्रीसह वनीं गेलों आणि काष्ठां-
चा छेद करीत असतां अकस्मात् शिरांत व्याधि उत्पन्न झाला. ह्मणून त्या वेद-
नेनें मी ग्लान होऊन निद्रिस्त झालों. अशी निद्रा मला आजपर्यंत कधीं लाग-
ली नव्हती ह्मणून इतका विलंब लागला. असें ऐकून गौतम ऋषि बोलला. हे
सत्यवाना, तुझ्या पित्यास अकस्मात् नेत्र प्राप्त झाले याचें कारण तुला विदीत
नाहीं, सावित्री सांगेल असें बोलून सावित्रीस विचारतात. हे सावित्री, संपूर्ण
तूं जाणतेस, तेव्हां याचें वृत्त संपूर्ण आह्मांस सांग. तूंच राजाचे चक्षु येण्यास
कारण यांत संशय नाहीं. सावित्री भाषण करत्ये हे ब्राह्मण हो, जें तुह्मी अनु-
मान केलें तें सत्य आहे याचें कारण सांगत्यें पूर्वीं नारदानें माझ्या पतीचा मृत्यु-
काल सांगितला. तो आजचा दिवस असें समजून त्याचा त्याग न करितां समा-
गमें वनांत गेलें. आणि हा वनांत सुप्त झाला असतां यम येऊन यास दक्षिण
दिशेस नेत असतां मी सत्याच्या योगें त्याची बहुत स्तुति केली. त्या योगें यम
धर्मराज प्रसन्न होऊन त्यानें मला पांच वर मागण्यास सांगितलें असतां मी
हे वर मागितले कीं, माझे श्वशुरास नेत्र यावे, राज्य प्राप्ति व्हावी. माझे पित्या-
स शत पुत्र व मला शत पुत्र व्हावेत. चवथा वर माझे भर्त्यास चारशें वर्षें आ-
युष्य असावें याप्रमाणें यमधर्मानें पांच वर मला दिले. भर्त्याचे जीवितांकरि-
तां मी सावित्रीचें व्रत आचरण केलें हे संपूर्ण झालेलें आख्यान तुह्मांस सांगितलें

असें ऐकून ऋषि भाषण करतात हे राजकन्ये, संपूर्ण राजाचें कुल दुःखांत निमग्न झालेलें तूं पुण्याच्या योगें उध्दारलेंस. यास्तव तूं परम साध्वी आहेस. तुझें कल्याण असो. याप्रकारें ऋषि सावित्रीची प्रशंसा करून आपआपले आश्रमीं गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

२९९. अध्याय दोनशें नव्याण्णव— मार्कंडेय सांगतात हे धर्मराजा, ती रात्र अतिक्रांत झाल्यावर दुसरे दिवशीं सूर्योदयानंतर ऋषी प्रातःकाळचीं कर्में करून राजगृहीं आले. आणि सावित्रीचें वनांतील चरित्र समग्र राजांस सांगूं लागले. इतक्यांत शाल्व देशापासून राजाच्या प्रजा वनांत आल्या आणि राजाची प्रार्थना करूं लागल्या. हे पृथ्वीपते, ज्या दुष्ट सेनापतीनें तुला राज्यावरून भ्रष्ट केलें तो नष्ट झाला. त्याचे समग्र सहाय्य होते तेही नष्ट झाले. यास्तव तुझा पितामहापासून प्राप्त झालेल्या राज्याचा उपभोग तूं कर. आह्मी समग्र प्रजा तुला शरण आलों. आजपर्यंत त्या दुष्टानें तुला बहुत वनांमध्यें दुःख दिलें. बरें असो. झाली गोष्ट ती झाली आतां स्वदेशाचें रक्षण यथाशास्त्र कर. तुझ्या नांवाचा नगरांमध्यें जयजय शब्द झाला आहे. असें बोलून राजाचे चक्षु पाहातांच संपूर्ण प्रजा पुनःपुनः एकमेकांस ह्मणतात कीं, हा राजा परम पुण्यवान् आहे. ज्याचे चक्षु नष्ट झाले असतां पुनः प्राप्त झाले हें मोठें आश्चिर्य आहे. असें बोलून त्यांनीं राजास साष्टांग नमस्कार केला. नंतर प्रजेचें भाषण ऐकतांच राजा वननिवासी ऋषींस नमस्कार करून शैब्यानामक भार्या, सावित्री व सत्यवान नामक पुत्र यांस बरोबर घेऊन नगरांत गेला. नंतर नागरिक जनांनीं राजास राज्याभिषेक करून सत्यवानास यौवराज्याचा अभिषेक केला. कांहीं कालानें सत्यवानापासून सावित्रीस शंभर पुत्र परम कीर्तिमान शत्रूंचा पराभव करणारे झाले तसेच सावित्रीस शंभर भ्राते मद्राधिपास मालवीच्याठायीं झाले याप्रमाणें सावित्रीनें पिता माता, श्वशुर, श्वश्रु व भर्ता यांच्या कुलाचा उध्दार केला. मार्कंडेय ह्मणतात हे धर्मराजा, तशी ही तुझी भार्या द्रौपदी सत्यशील, पतिव्रता, असल्यामुळें तुह्मांसर्वांस तारील. अशी सावित्रीची कथा ऐकून धर्मराज आनंद पावला. हें सावित्री आख्यान भक्तीनें जो श्रवण करील तो सुखी होऊन त्यास इच्छित अर्थ प्राप्त होतील.

असा विषय या अध्यायांत आहे.

३००. अध्याय तीनशें:— जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायन ऋषे, धर्मराज भ्रात्यांसह वर्तमान वनांत राहात असतां लोमश ऋषि इंद्राचे वचनानें येऊन बोलतात हे धर्मराजा, अर्जुन स्वर्गास गेल्यावर कर्णापासून तुला तीव्रभय प्राप्त झालें तें तूं सांगत नाहींस; परंतु तें भय मी दूर करीन. तर हे मुने कर्णापासून युधिष्ठिरास असें महद्भय कोणतें झालें? व तें इतरांस धर्मानें सांगितलें कां नाहीं? असा प्रश्न ऐकून वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, तुला याविषयीं कथा सांगतों. पांडवांचें द्वादश वर्षे वनांत अतिक्रमण होऊन चिंताग्रस्त तेरावें वर्ष प्राप्त झालें तेव्हां पांडवांचें हित करण्याकरितां इंद्र कर्णाजवळ कवच कुंडलांची भिक्षा मागण्याकरितां उद्युक्त झाला. हें इंद्राचें कृत्रिम जाणून सूर्य ब्राह्मणवेषानें रात्रौ स्वप्नांत कर्णास बोलतो. हे कर्णा मी तुझा अत्यंत स्नेही व हितकर्ता आहें, यास्तव सांगतों ऐक. पांडवांच्या हिता करितां शक्र कपटानें ब्राह्मणाचा वेष धारण करून कवचकुंडलांची भिक्षा मागण्याकरितां येणार आहे, त्यांस तूं कवच कुंडलांची भिक्षा न देतां शक्तीप्रमाणें सत्कार कर. कदाचित् देशील तर तुझ्या आयुष्याचा नाश होऊन तूं मृत्यूच्या स्वाधीन होशील हीं कवचकुंडलें तुझ्या उत्पत्तिकालींच सहज तुला उत्पन्न झालीं. ईहींकरून तूं युक्त आहेस तावत्कालपर्यंत रणांमध्यें रिपूपासून किमपीही तुला भय नाहीं. हे तात अमृतापासून उत्पन्न झालेलीं रत्नमय कवच कुंडलें तुझ्या प्राणाचीं रक्षण करणारीं आहेत. यांचें संरक्षण केलें असतां तुझें रक्षण होईल. असें ऐकून कर्ण ह्मणतो अरे ब्राह्मणा, इतकी माझ्यावर प्रीति करणारा असा तूं कोण आहेस? असा वेष धारण करून कशाकरितां येथें आलास. एकदां आपलें नाम कथन कर. आणि इतकी प्रीती माझ्यावर तूं करतोस याचें कारण काय? तें मला सांग. ब्राह्मण ह्मणतो हे तात सहस्रांशू सूर्य ज्यास ह्मणतात तो मी माझी प्रीति तुझ्यावर अत्यंत आहे हें प्रदर्शित करण्याकरितां हा कल्याणकारक उपदेश तुला केला हा मिथ्या नव्हे. माझ्या वचनावर विश्वास ठेव. यांत तुझें परम हित आहे. कर्ण ह्मणतो हे ब्राह्मणा, मी सत्यरूप व्रतापासून कधीं भ्रष्ट होणार नाहीं. संपूर्ण लोकांस हें माझें व्रत विदित आहे. केवळ लोकांस

द्रव्यच दत्ता असे नाहीं. आपलें प्राण दान करण्याचा काल आला असतां त्याचे ही दान करीन. जर ब्राह्मणवेषानें पांडवांच्या हिताकरितां इंद्र माझे गृहीं भिक्षार्थ आला तर मी त्यास कवचकुंडलें निश्चयेंकरून दान करीन. यांत तरतिन्हीं लोकांचे ठायीं माझी कीर्ति होईल. अरे तूंच विचार करकीं, ज्यानें वृत्रासुराचा वध केला तोच माझे घरीं भिक्षेस आला असतां त्याचा मी निषेध केला तर माझी मोठी अपकीर्ति होईल. बरें यामध्यें पांडुपुत्रांचें हित होईना. परंतु मी आपली अपकीर्ति करून घेणार नाहीं. हे सूर्या मी कीर्तीच्या सहाय्यानें स्वर्गी नसतांही स्वर्गी आहे असें समजतों. ब्रह्मदेवानें पुराणांत कीर्तीची स्तुति केली आहे त्यांत असें आहे कीं, पुरुषाची कीर्ति हेंच आयुष्य हाच श्रेष्ठपणा व संपूर्ण लोकांस कीर्तीच परायण आहे. कीर्ति आयुष्याची वृध्दि करत्ये. यास्तव हे भानो, कवच कुंडलें दान केलीं असतां माझी या पृथ्वीवर शाश्वत कीर्ति होईल. मी जिवंत असतां कवच कुंडलें रक्षण करून राज्य पदी रक्षण करावी, ही माझी कीर्ती नाहीं. इंद्र कवच कुंडलें मागावयास आला असतां त्यास मी भिक्षा दिल्ही तर देवलोकांच्याठायीं माझी गति सहज आहे असा विषय या अध्या०

३०१. अध्याय तीनशें एक:— सूर्य ह्मणतो हे कर्णा, कवच कुंडलें इंद्रास दान करून आपलें व सुहृद, भार्या. माता पिता. यांचें अहित करून घेऊं नको. शरिराचें रक्षण करून प्राण्यांनीं कीर्ति मिळवावी. तूं तर आपले प्राण हरण करून कीर्तीची इच्छा करतोस हा इंद्र तुझे प्राण घेण्याकरितांच येईल. असें तूं समज. जिवंत असून पिता माता बांधव यांचें रक्षण केलें असतां केवढी कीर्ति होईल बरें? भस्मीभूत देह झाल्यावर जी पाठीमागें कीर्ति झाली इचा उपयोग त्यास काय? हे कर्णा, मृत पुरुषास माला धारण केली असतां भूषण होत नाहीं. यास्तव हे कर्णा तुला सांगतों. जिवंत राहून कीर्ति मिळीव. तूं माझा परमभक्त आहेस. यास्तव तुला परमभक्तीनें हितकारक मंत्रोपदेश केला याचा अनादर केला असतां तूं परम संकट पावशील. माझ्या भाषणांत फार गुह्य आहे तें मी तुला सांगत नाहीं. तूंच कांहीं कालानें जाणशील. वारंवार माझें सांगणें मिळून हेंच आहे कीं, इंद्रास कवच कुंडलाची भिक्षा देऊं नको. हे नरव्याघ्रा, तूं निरंतर अर्जुनाशीं स्पर्धा करतोस. ती स्पर्धा तुझीं कुंडलें गेल्यावर निर्जीव होईल. हीं कवच कुंडलें

आहेत तावत्पर्यंत अर्जुन समरांमध्यें तुला जिंकण्यास समर्थ होणार नाही. हीं कुंडलें गेल्यावर अर्जुन तुझा प्राण संग्रामांत तत्काळ घेईल. हें मी तुला सांगितलें. आतां पाहिजे तसें कर. असा विषय या अध्यायांत आहे.

३०२. अध्याय तीनशें दोन:— कर्णभाषण करतो हे गोपते, माझी भक्ति तुझेठायीं कशी आहे ती तूं जाणतच आहेस. माझें व्रत तुला विदितच आहे. आदेयपदार्थ या पृथ्वींत मला नाहीं. सर्व प्रकारें हें व्रत रक्षण करण्याची तुला चिंता असावी. माझ्यावर जर तुझी अत्यंत प्रीति आहे तर कवच कुंडलें इंद्रास न देण्याचा उपदेश मला करूंनको. मी मृत्यूसही भीत नाहीं परंतु अनृतभाषणास भितों. हे देवा माझें बलही तुला विदित आहे. अर्जुन पदार्थ काय आहे. एक अस्त्रप्रयोग करीन तर अर्जुनाचा प्राण घेईन. सूर्य भाषण करतो हे तात, मी तुला बहुत बोध केला, परंतु तुझी बुध्दि फिरत नाहीं. हीं कवच कुंडलें गेलीं तर समरांत अर्जुन तुझा प्राण घेईल यांत संशय नाहीं. आतां इंद्रास कुंडलें देतेसमयीं असें भाषण करकीं, तुजपाशीं अमोघ शक्ति आहे ती मला दे म्हणजे कवच कुंडलें मी तुला देईन. नाहींतर देणार नाहीं. असें तूं भाषण केलेंस तर तो तुला अमोघ शक्ति देईल ती तूं घे, मग कवच कुंडलें त्यास दे. हे कर्णा, वासवीशक्ति तुला प्राप्त झाली असतां तूं अर्जुनास मारण्याविषयीं समर्थ होशील. असें भाषण करून सूर्य अंतर्धान पावला. दुसरे दिवशीं कर्ण जागृत होऊन स्नानसंध्याकाळीं जप करीत असतां साक्षात् सूर्य अग्रभागीं गुप्तरूपें आल्यावर कर्णानें रात्रीचें स्वप्न त्यास सांगितलें. तें ऐकून सूर्य म्हणतो, हे राधेया, तें खरें आहे त्याप्रमाणें केलें असतां तूं दुःख पावणार नाहींस. असें ऐकून कर्ण इंद्रापासून शक्ति मागण्याची चिंता करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

३०३. अध्याय तीनशें तीन:— जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायन ऋषे, सूर्यानें कर्णास गुह्य काय सांगितलें. व कर्णास कवच कुंडलें कशीं प्राप्त झालीं? हें मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात. हे जनमेजया, कोणे एके दिवशीं तपस्वी, तेजेंकरून देदीप्यमान, अग्नीसारखी ज्याची प्रभा असा एक ब्राह्मण वेदाध्ययन करीत करीत कुंतीभोजराजाच्या घरीं येऊन बोलला. हे राजा, तुझ्या गृहीं कांहीं दिवस वास करावा, अशी माझी

इच्छा आहे. मी राहिलों असतां तूं व तुझ्या अनुचरांनीं माझें कांहीं अहित करूं नये मी आपल्या इच्छेप्रमाणें वर्तेन असें ऐकून कुंतिभोजराजा बोलला हे ब्राह्मणा, माझे गृहीं तूं सुखानें राहा. जें जें तूं भाषण केलेंस तें तें मी स्वीकारलें. परंतु माझें ह्मणणें असें आहे कीं, पृथानामक माझी कन्या शीलानें फार उत्तम साध्वी गुणवती आहे. ती निरंतर तुझ्यासन्निध राहून संपूर्ण सिध्दता करील. कधींही अवमान करणार नाहीं. असें भाषण करून राजानें ब्राह्मणाची पूजा केली नंतर कन्येस सांगितलें हे वत्से, कोणीएक ब्राह्मण आपले घरीं कांहीं दिवस राहाण्याची भिक्षा मागतो यास्तव तो ब्राह्मण आपल्ये घरीं राहिल्यास त्याची शुश्रुषा व आराधना चांगली कर. ब्राह्मण हे परम तेजस्वी व तपस्वी होत. कोणीएके ब्राह्मणानें वातापी नामक असुराचा नाश केला. कालजंघनामक दैत्यानें ब्राह्मणास दंड केला असतां तो ब्राह्मणाच्या शापानें तत्काळ नष्ट झाला. यास्तव या ब्राह्मणाचें निरंतर तूं आराधन कर. कदाचित् ब्राह्मणाचा तूं अवमान करशील तर ब्राह्मण नाश करील. हे बाले पूर्वीं तूं शूरकुलांत उत्पन्न झालेल्या वसुदेवाची भगिनी होतीस त्यानें मला दत्त दिल्ही. याचें कारण शूरानें मजपाशीं अशी प्रतिज्ञा केली होती कीं, जें प्रथम आपत्य मला होईल तें मी तुला देईन यास्तव ती प्रतिज्ञा सत्य करण्याकरितां तूं माझे कुलांत येऊन वृध्दि पावलीस. हे कन्ये तुझें रूप व गुण पाहून मी दंभमान विवर्जित झालों. आतां माझी तुला वारंवार हीच प्रार्थना आहे कीं, या ब्राह्मणाची सेवा कर ह्मणजे तुझें व माझें व कुलाचें उत्तम प्रकारें कल्याण होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

३०४. अध्याय तीनशें चार:— कुंती भाषण करते हे तात, आपले आज्ञेप्रमाणें मी सदासर्वकाळ ब्राह्मणाची पूजा करीन. व त्याचा सत्कारही ठेवीन जी तूं प्रतिज्ञा केली आहेस ती तुझी मिथ्या होऊं देणार नाहीं. हे राजा, हा मला एक लाभच झाला असें मी मानित्यें. द्विजाची पूजा प्राप्त होणें परम दुर्घट आहे. राजा, माझ्यावर तूं विश्वास ठेव. मी ब्राह्मणाचा कधीं कोप होऊं देणार नाहीं. हे राजा, ब्राह्मणास संतुष्ट केलें असतां त्याजपासून कुलाचा उध्दार होतो, आणि त्याचा रोष झाला असतां क्षय होतो. यास्तव जेणें करून त्याचा संतोष होईल

असेंच मी करीन. शुश्रूषा कन्येनें पूर्वी च्यवन ऋषीस जसें संतुष्ट केलें तसें मी निय-मेंकरून ब्राह्मणाचा सत्कार बहुत ठेवीन. असें नानाप्रकारें कुंतीनें भाषण करून राजास आलिंगन दिलें. नंतर राजा ब्राह्मणाची सेवा करण्याचा मार्ग यथास्थीत कन्येस सांगून बोलतो हे कन्ये, माझ्या तुझ्या व कुलाच्या हिताकरितां ब्राह्मणसेवेचा उपदेश मी तुला केला यांत किमपी आळस करूं नको. असें भाषण करून राजानें ती कन्या ब्राह्मणाचे स्वाधीन केली आणि सांगितलें हे ब्राह्मणा, ही पृथानामक माझी कन्या बाल आहे. इजपासून कांहीं अपराध झाला असतां क्षमा करावी. कोप करूं नये. हे ऋषे, यथाशक्ति पूजा कन्येचे हातून घ्यावी. आपण महान् आपला सत्कार आह्मीं काय करावा. जर क्षमा करून ग्रहण कराल तर यथास्थित होईल. असें ऐकून ब्राह्मणानें भाषण केलें फार चांगलें आहे. नंतर राजानें उत्तम प्रकारचें गृह, हंस व चंद्र यांच्या कांतिसारखें सुशोभित ब्राह्मणास राहाण्याकरितां देऊन तेथें समग्र सामोग्री ठेविली. आणि राजपुत्रीस ब्राह्मणाचे स्वाधीन केली तिनेंही निरंतर शुचि असून यथाविधि यथाशास्त्र ब्राह्मणाची पूजा करून त्याचा संतोष ठेविला. असा विषय या अध्यायांत आहे.

३०५. अध्याय तीनशें पांच.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया कुंतीनें शुध्दांतःकरणेंकरून तपस्वी ब्राह्मणाचा बहुत संतोष ठेविला. ब्राह्मणानें कन्येस सांगावें कीं, मी उदयीक प्रातःकाळीं येईन माझी सिध्दता ठेव. कन्येनें आज्ञेप्रमाणें सिध्दता ठेविली असतां ते दिवशीं सायंकाळींच यावें. एके दिवशीं रात्रींच यावें. ज्याकाळीं सिध्दता करावी त्या काळीं येऊंच नये. परंतु राजकन्या ते ते ब्राह्मणाचे काल साधून निरालस्यपणें त्याचा संतोष ठेवी. उत्तम प्रकारच्या अन्नाची सिध्दता ठेवी. शय्या, आसन यांची सिध्दता यथास्थीत करावी. कधीं न्यूनता पडूं देतनसे. यामुळें शिष्य पुत्र व स्वसा यांवर जितका लोभ असतो त्याजपेक्षांही अधिक लोभ ब्राह्मणाचा राजकन्येवर झाला. निरंतर कन्येची शुश्रूषा पाहून ब्राह्मण मनांत संतुष्ट असे. याप्रमाणें कन्येनें ब्राह्मणाची शुश्रूषा एक संवत्सर पर्यंत केली. एके दिवशीं ब्राह्मण राजकन्येस ह्मणतो हे भद्रे, तुझी सेवा निष्कृत्रिम पाहून मी

बहुत संतुष्ट झालों यास्तव जेणेंकरून तूं सर्वांमध्यें श्रेष्ठ होशील असा वर माग. असें ऋषीचें भाषण ऐकून कुंती बोलत्ये हे महाराज, तुझा व पित्याचा मीं आजपर्यंत संतोष ठेविला तेणेंकरून तुह्मी उभयतां संतुष्ट झालांत यांतच मी बहुत हर्ष पावल्यें हाच वर दुसरा वर मागण्याची मला इच्छा नाहीं. असें ऐकून ब्राह्मण बोलतो हे कन्ये, जर तूं वराची इच्छा करीत नाहींस तर हा मंत्र तुला देतों. या मंत्रानें तूं ज्या ज्या देवांचें आव्हान करशील ते ते देव तुझ्या अग्रभागीं उभे राहून कार्यसिध्दी करतील. तूं विसर्जन केलेंसह्मणजे ते आपले स्थळीं जातील. असें ऐकून कन्या विचार करूं लागली कीं, हा मंत्र ग्रहण न करावा तर ब्राह्मण शाप देईल. तस्मात् मंत्र ग्रहण करावा. असा निश्चय करून तिनें तो मंत्र ग्रहण केला. नंतर ब्राह्मणानें कुंती भोजास सांगितलें कीं. हे राजा, आजपर्यंत सुखानें तुझे घरीं मी वास केला व या कन्येनेंही माझा बहुत संतोष ठेविला. यास्तव तुझ्या घरीं मी निरंतर आहें ज्याकाळीं तूं माझें स्मरण करशील त्याकाळीं तुला दर्शन देऊन संकटाचा नाश करीन. असें भाषण करून तत्काळ ब्राह्मण अंतर्धान पावला. नंतर राजानें पृथेचा बहुत सत्कार केला. असा वि॰ या॰ अ॰ आहे.

३०६ अध्याय तीनशें साहा:— कोणे एके दिवशीं कुंतीस अशी इच्छा झाली कीं, आपणास ब्राह्मणानें मंत्रोपदेश केला तो सिध्द होईल किंवा नाहीं कोण जाणे. अशी शंका धरून ती आपले गृहांत शय्येवर स्थित असतां तिनें सूर्याकडे पाहिलें तथापि दृष्टीची तृप्तता होईना. नंतर पाहातां पाहातां तिची दिव्य दृष्टि झाली. आणि कवच कुंडलें धारण करून शोभिवंत झालेला एक पुरुष पाहातांच कन्या मनांत ह्मणत्ये आतां सूर्याचा मंत्र जप करून त्याचें आव्हान करावें असा निश्चय करून तिनें मंत्रानें दिवाकराचें आव्हान केलें असतां बाहुभूषणें व प्रज्वलित मुगुट धारण केलेला. ज्यानें आपला आत्मा योगेंकरून द्विधा केला. असा दिवाकर कुंतीच्या अग्रभागीं येऊन बोलला. हे राजकन्ये, तुझ्या मंत्रप्रभावानें मी सूर्य आलों. कशाकरितां माझें आव्हान केलेंस? तें सांग. असें ऐकून कुंती भाषण करते हे भगवन्, जसा आलास तसा मा

घारीं जा-कौतुकानें तुझें आव्हान केलें. कांहीं कारण नाहीं. माझ्यावर कृपा असावी-असें ऐकून सूर्य भाषण करतो हे कन्ये, हें भाषण तुला योग्य नव्हे. तुझी इच्छा काय आहे ती मी समजलों. सूर्यापासून अप्रतिम कवच कुंडलें धारण केलेला पुत्र व्हावा असा तुझा अभिप्राय आहे. अस्तु. माझ्याशीं गमन कर ह्मणजे तुझे इच्छेप्रमाणें उत्तम प्रकारचा तेजस्वी पुत्र होईल. हे भद्रे माझें आगमन व्यर्थ व्हावयाचें नाहीं. यास्तव माझ्याशीं संगत हो, आणि आपलें प्रिय कार्य करून घे. या माझ्या भाषणाचा भंग जर करशील तर मला बहुत क्रोध येईल. आणि तूं व ज्या ब्राह्मणानें तुला मंत्रोपदेश केला तो व तुझा पिता यांस तुज करितां दग्ध करून टाकीन. तुझा पिता महामूर्ख आहे व ज्या ब्राह्मणानें मंत्रोपदेश केला तोही मूर्ख आहे असें मी समजतों. कारण तुझा अधिकार व तुझें वय न पाहातां ब्राह्मणानें तुला मंत्राचा उपदेश केला. हे पुत्री तुझ्या मंत्राच्या तेजें करून हे इंद्रादि देव विमानारूढ होऊन सर्व तुझ्या आसमंताद्भागीं आले आहेत त्यांस पाहाण्याकरितां तुला दिव्य दृष्टि मी पूर्वींच दिल्ही आहे. त्या दृष्टीनें पाहा हा आकाशांत सुरांचा समुदाय जमला आहे. असें दिवाकराचें भाषण ऐकून कुंतीनें आकाशाकडे पाहिलें तों हजारों देवांचीं स्थानें दृष्टीस पडलीं. नंतर कन्या बोलत्ये हे सूर्या, बालस्वभावें करून मीं तुझें आव्हान केलें. माता, पिता गुरु हे ह्या देहाचे दानकर्ते, यांनीं हा देह तुला दिला नाहीं. तेव्हां तुझ्याशीं रत कशी होऊं. रत झाल्यें तर धर्माचा लोप होईल. हे सूर्या मंत्राचें बल किती आहे हें पाहाण्याकरितां बालबुध्दीनें आव्हान केलें. रतिबुध्दीनें आव्हान केलें नाहीं. क्षमा करावी. सूर्य ह्मणतो हे बाले, तूं बालस्वभावें करून मला आव्हान केलेंस तर तुला या बालवयामध्येंच उत्तम प्रकारचा पुत्र मजसारखाच पराक्रमी होईल. आपल्या आत्म्याचें दान मला कर आणि शांतीतें पाव. मी असाच माघारा गेलों असतां समग्र देवांमध्यें माझी उपहास्यता होईल यास्तव माझ्याशीं आतां संगत हो, ह्मणजे कीर्तिमान पुत्र माझ्यासारखाच तुला होईल. आणि तूं या लोकीं परमख्याति पावशील, हें माझें भाषण सत्य मान. असा विषय या अध्यां०

३०७. अध्याय तीनशें सात — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कुंतीनें नाना प्रकारच्या भाषणांनीं सूर्यास बोधित केलें असतां त्याची उपमाग-

बुध्दि परावृत्त होईना. तेव्हां आतां हा शापानें दग्ध करील असें मनांत भय वा-
ळगून राजकन्या विचार करूं लागली कीं, अपराधावांचून पिता व ब्राह्मण यां-
स मजकरितां हा सूर्य दग्ध करील. मी तर अल्पवयस्क. याच्या तेजानें सहन क-
सें करूं. असा मनांत विचार करून ह्मणत्ये हे सूर्या, मी या देहाचें दान करण्या
स स्वतंत्र नसतां कसें दान करूं. जी गोष्ट करण्याची नव्हे ती केली असें होईल.
असें सूर्यास भाषण करून पुनःपुनः शापानें हा दग्ध करील अशी चिंता वाळ
गून दुःखित झाली, आणि ह्मणाली हे देवा, पिता माता व अन्य बंधु यांनीं मला
आजपर्यंत संरक्षित केलें आतां मी स्वतंत्रपणें तुझ्याशीं रत झाल्यें तर विधि
लोप होऊन तो दोष मला लागेल. तो न लागावा असें जर होईल तर मी तुझ्याशीं
रत होईन. कन्या अवस्थेंत मी गर्भिणी झाल्येंतर माझ्याकरितां कुलाची अपकी-
र्ति होईल. बंधूनीं दान केल्यावांचून तुला मी वश झाल्यें हें अधमजन्य पातक म-
ला नसावें. हे देवा आतां कीर्ति, आयुष्य, देह, यश, धर्म, हे संपूर्ण तुझेठायीं मीं
ठेविले. असें तूं सांगशील तसें मी करीन. सूर्य भाषण करतो हे कन्ये, पिता, माता,
गुरू यांकडे देहाचें स्वामित्व नाहीं. ज्याचा तोच स्वतंत्र आहे. यास्तव हे स्त्रिये,
तुजपासून हा अधर्म झाला असें तूं समजूं नको. स्त्रियांचा विवाह झाल्यावर
तो पति असतो. तूं तर कन्या आहेस अन्याशीं संग करण्यास चिंता नाहीं. माझ्या
शीं रत हो, आणि गर्भ ग्रहण कर. तुझें कन्यत्व नष्ट होणार नाहीं. कुंती भाषण
करते तुजपासून मला पुत्र कवच कुंडलें धारण केलेला तुजसारखा पराक्रमी
शूर, महाबलि असा व्हावा. सूर्य ह्मणतो हे कुंती, असाच पुत्र होईल. अदीतीनें
दिल्लेलीं कवच कुंडलें त्या पुत्रास देईन. कुंती ह्मणते हे गोपते, जर संपूर्ण भा-
षण तुझें खरें आहे तर तुझ्याशीं संग मी करत्यें. असें भाषण ऐकतांच सूर्यानें
तिच्या नाभीस स्पर्श केला. त्याकाळीं सूर्याच्या असाह्य तेजानें कुंती बहुत
विह्वलित झाली. तेव्हां सूर्य तिच्याशीं रत होऊन भाषण करतो हे सुश्रोणी,
माझ्या भाषणाप्रमाणें तूं रत झालीस. आतां संपूर्ण शस्त्र धारण करणाऱ्यांम-
ध्यें श्रेष्ठ विजयी असा पुत्र तुला होईल. चिंता करूं नको. आणि जशी तूं पूर्वीं
अल्पवयस्क कन्या होतीस तशी होशील. वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया,
कुंती लज्जित होऊन सूर्याचें तेज अमोघ असतांही सहन करून रत झाली.

आणि त्याच्या तेजानें केवळ भभलतेसारखी पृथ्वीवर पडली. सूर्य संभोग करून आपल्या स्थानीं गेल्यानंतर कांहीं काळानें कुंतीची भ्रांती जाऊन ती सावध झाली. असा विषय या अध्यायांत आहे.

३०८. अध्याय तीनशें आठ :— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सूर्यापासून पृथेचे उदरांत गर्भ राहून तो शुक्लचंद्रासारखा वृध्दीस पावला असतां बांधवभयापासून कुंती त्रस्त होऊन निरंतर गर्भाची निंदा करी. आपल्यास गर्भसंबंधी वेदना झाली ती धात्रीखेरीज दुसऱ्यास तिनें सांगितली नाहीं. व मी गर्भिणी आहे असें इतर बंधुजनांस कधीं समजूं दिलें नाहीं. या प्रकारें नवमास पूर्ण झाल्यावर कुंती प्रसूत होऊन देवकांतीसारखा बध्द कवचकुंडलांसह वर्तमान साक्षात् सूर्यच काय असा पुत्र झाला तो धात्रीनें पाहून राजकन्येस सांगितलें असतां राजकन्या बोलली हे धात्री, माझी उपहास्यता लोकांमध्यें बहुत होईल. यास्तव याचा त्याग करावा. असें ऐकून धात्रीनें एक पेटी विस्तीर्ण परम सुंदर आणून त्यांत तो गर्भ घातला व आंत जल न जाई अशी ती पेटी दृढ करून तत्काळ अश्व नदीमध्यें सोडून दिल्ही. त्याकाळीं कुंतीनें बहुत आक्रोश करून संपूर्ण देवांची प्रार्थना केली. कीं, हे पुत्रा, अंतरिक्षस्थ व पार्थीव व दिव्यभूतें तुझें रक्षण करोत. हे पुत्रा, जलाचा राजा वरुण, वायु व सूर्य इत्यादिक सर्व देव तुझें रक्षण करोत. हे पुत्रा, तुझा जनक जो सूर्य तो धन्य होय. दिव्यचक्षूनें जे तुला पाहातील ते धन्य. हे पुत्रा जिला तूं सांपडशील ती तुला स्तनपान देईल तिनें आज कोणतें स्वप्न पाहिलें असेल! हे पुत्रा तूं यौवनस्थ होशील त्याकाळीं जे तुला पाहातील ते धन्य अशी कुंतीनें संपूर्ण देवांची प्रार्थना केल्यानंतर धात्रीनें ती पेटी अश्वनदींत सोडली. त्याकाळीं कुंती शोकानें आर्त होऊन धात्रीसह वर्तमान मध्यरात्रीच्या समयीं आपल्या गृहीं आली. परंतु हें वर्तमान तिनें पिता, बंधुजन, भृत्य यांस समजूं दिलें नाहीं. नंतर ती मंजुषा वाहात वाहात अश्वनदीपासून चरमणवती नदींत गेली. तेथून यमुनेंत गेली. यमुनेंतून गंगेंत जात असतां चंपा नामक एक सूताची नगरी होती, तथें लागली. असा विषय या अध्यायांत आहे.

३०९. अध्याय तीनशें नऊ :— वैशंपायन सांगतात हे जनमेजया,

ती पेटी लहरींच्या योगानें वाहात वाहात कडेस लागली असतां ते दिवशीं धृत-राष्ट्राचा सखा अधिरथ यानामें एक सूत भार्येसह वर्तमान जान्हवी तीरीं स्नाना करितां गेला. त्याची राधा नामक भार्या बहुत दिवस पुत्राकरितां यत्न करीत होती परंतु तिला पुत्र झाला नाहीं. तेव्हां तिनें ती पेटी घेऊन पतीस सांगितलें कीं, ही पेटी कशाची आहे? नंतर सूतानें ती पेटी उघडली, तों आंत तरुणादित्यासारखा तेजस्वी सुवर्णयुक्त कवच कुंडलें धारण केलेला पुत्र पाहून हर्षानें भार्येस भाषण केलें हे भामिनी, तुला आजपर्यंत पुत्र नव्हता तो सहज आज प्राप्त झाला हें काय बरें आश्चर्य! हा कोणाचा पुत्र असेल! देवासारखी तर याची कांति दिसते. ईश्वरानें आमच्याकरितांच तर पाठविला नसेल ना! असें बोलून अधिरथानें आपल्या भार्येस तो पुत्र समर्पण करून सांगितलें कीं, याचें यथाविधी पोषण कर. असें ऐकून राधेनें बालकाचें औरस पुत्रासारखें पोषण केलें. तो पुत्र दिवसें दिवस राधेच्या घरीं वृध्दि पावला नंतर आणखीही पुढें राधेस औरस पुत्र बहुत झाले. सुवर्णाचीं कवच कुंडलें धारण केलेला हा पुत्र ह्मणून याचें नांव ब्राह्मणांनीं वसुषेण असें ठेविलें. कोणी त्यास वृष असें ह्मणत तो पुत्र गोव्याचेगयीं वृध्दि पावला. हें संपूर्ण वर्तमान दूतांनीं जाऊन पृथेस सांगितलें. सूतानें आपल्या पुत्रास विद्याभ्यासाकरितां द्रोणाचार्यापाशीं हस्तनापुरीं एक गृह बांधून तेथें ठेविलें. पुढें दुर्योधनाचें व त्याचें बहुतच सख्य झालें. द्रोण, कृपाचार्य, परशुराम यांजपासून चतुर्विध विद्या ग्रहण करून सूतपुत्र परम ख्याती पावला. त्याचा धृतराष्ट्राच्या पुत्रांशीं अत्यंत सहवास झाला. त्यायोगें तो अर्जुनाशीं निरंतर स्पर्धा करून युध्द करण्याची इच्छा धरी. हे महाराज, अशी सूर्यापासून कुंतीचेगयीं कर्णाची उत्पत्ति होऊन तो सूत कुलांत गेला. हा तुला कर्णाचा इतिहास सांगितला. वर्जे गुह्य तुला सांगावयाचें तें सांगितलें. सुवर्णाचीं कवच कुंडलें धारण केलेला. समराच्यागयीं अवध्य असा वसुषेण नामक राधेचा पुत्र आहे हें ऐकून युधिष्ठिर निरंतर संपत असे. हे राजा, एके काळीं असा चमत्कार झाला कीं, दोनप्रहरीं सूर्य मध्यवर्ती आलेला पाहून कर्ण हातांत उदक घेऊन सूर्यास अर्घ्य देण्यास गंगातीरीं उद्युक्त होता. त्याकाळीं कोणी ब्राह्मण कांहीं वस्तूची याचना करण्याकरितां आले असतां कर्णानें नाहीं असें कधीं ह्मटलें नाहीं. तेव्हां

इंद्र कपटानें ब्राह्मणाचा वेष धरून कर्णाच्या अग्रभागीं आला असतां कर्ण त्या ब्राह्मणाचें आगत स्वागत करून बोलूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

३१०. अध्याय तीनशें दाहा :— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, इंद्र कपटानें कर्णाचे सन्निध आला असतां त्याचा मानस न जाणून कर्ण भाषण करतो हे ब्राह्मणा, कंठाच्याठायीं सुवर्ण धारण केलेल्या स्त्रिया अथवा ग्राम किंवा गाई यांतून तुला जें अपेक्षित असेल तें माग. ब्राह्मण बोलतो हे कर्णा, मला स्त्रियादिक कांहीं नको. तुझ्या शरिरावर सहज कवच कुंडलें उत्पन्न झालीं आहेत. तीं मला दे. असें ऐकून राधेय किंचित् हास्य करून बोलला हे विप्रा, अमृतोद्भव कवच कुंडलें हीं सहज मला मिळालीं. तेणेंकरून मी समग्र शत्रूंस अवध्य आहे. तीं तुला दिलीं तर शत्रु माझा पराभव सहज करतील. यास्तव कवच कुंडलांची याच्या करूं नको. अथवा दुसरा कांहीं वर माग. हे देवेशा तूं कोण हें मी जाणलें. हा व्यर्थ वर मागण्यास तूं समर्थ नाहींस. संपूर्ण देवांचा राजा तूं यास्तव तूं आह्मांस वर द्यावा तो न देतां आमच्याशींच छद्मरूपानें हा वर मागतोस हें काय? याशिवाय जें तुला दुसरें इच्छित असेल तें माग. शक्र ह्मणतो हे राधेया, सूर्यानें पूर्वींच तुला उपदेश केला तो मला विदित आहे. असो. हे सूतपुत्रा, जर तुझी इच्छा असेल तर माझें वज्र टाकून जी शक्ति तुला पाहिजे ती माग. असें ऐकतांच कर्ण हर्षानें ह्मणतो हे इंद्रा, तुझी वासवीनामक अमोघ शक्ति आहे. ती मला दे ह्मणजे माझा मानस पुर्ण होईल. असें ऐकून इंद्र बोलला हे कर्णा, तुझीं कवच कुंडलें मला समर्पण कर. ह्मणजे ही वासवी अमोघशक्ति तुला देतो. या शक्तीचा असा प्रकार आहे कीं, ही शत्रूवर टाकिली असतां त्याचा नाश करून पुनः माझे हातांत येते. परंतु तुला तसें होणार नाहीं. कारण महान् रिपु गर्जना करणारा याजवर तूं एकदां प्रक्षेप कर. परंतु ती तुझ्या हस्तगत न होतां माझ्याकडे येईल. कर्ण भाषण करतो हे इंद्रा, माझा रिपु एकच आहे त्याचा नाश झाला ह्मणजे पुरे. इंद्र भाषण करतो हे कर्णा, तूं ज्या रिपुचें हनन करण्याकरितां ही शक्ति घेतोस तो रिपु तर ज्या भगवंतानीं वराह स्वरूप घेऊन पृथ्वीचा उध्दार केला. त्या कृष्णानें रक्षित आहे. असें ऐकून कर्ण भाषण करतो हे इंद्रा, कांहीं असो. एकवीराचा वध व्हावा अशी अमोघ शक्ति मला दे. ह्मणजे हीं कवच कुंडलें कृंतन करून

तुला देतों परंतु शरिरापासून कवच कुंडलें कृंतन केलीं असतां माझें शरीर विगुण न होतां निंद्यही होऊं नये. इंद्र भाषण करतो हे कर्णा, तुझ्या शरिरास विगुणता व व्रण हीं व्हावयाचीं नाहींत. तूं अनृत भाषण करीत नाहींस या पुण्यानें तुझें शरीर तुझ्यापित्यासारखें तेजःपुंज पुनः होईल. हे कर्णा तुला दुसरें आणखी सांगतों कीं, अन्य शस्त्रें असूनही अमोघशक्ति प्राणांत संकट नसतां जर तूं टाकशील तर ती उलट तुझ्यावर पडेल. असें ऐकून कर्ण ह्मणतो हे इंद्रा, तुझ्या बोलण्याप्रमाणें मी करीन. असें भाषण करतांच इंद्रानें अमोघ वासवी शक्ति कर्णास दिल्ही. कर्णानेंही शस्त्रानें आपल्या शरिरावरचीं कवच कुंडलें कृंतन करून इंद्रास दिल्हीं. त्याकाळीं कर्णाचें अद्भुत कर्म पाहून देवदानवप्रभृति सिंहासारखी गर्जना करून ह्मणाले कीं, आहारे कर्णा, कवच कुंडलें दानकाळीं तुझी मुखश्रीदेखील पालटली नाहीं. असें ह्मणून त्यांनीं आकाशामध्यें दुंदुभी वाजविल्या व कर्णाच्या शिरावर पुष्पांचा वर्षाव केला. आणि पुनःतेआश्चिर्य करून ह्मणालेहे सूषेणा, तूं कवच कुंडलें कृंतन करून इंद्रास दिल्हींस. यास्तव तुझें कर्ण असें नांव योग्य आहे. इकडे इंद्र आपलें कार्य करून आकाशांत गेला. नंतर संपूर्ण लोकांनीं आजपांडव कृतकार्य झाले असें मानिलें. इकडे धृतराष्ट्रपुत्र ही वार्ता ऐकून दीन झाले व पांडव हर्षित झाले. जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायन, पांडव प्रिय वार्ता ऐकून कोणत्या वनांमध्यें कोठें होते व त्यांचीं द्वादश वर्षे अतिक्रांत झाल्यावर त्यानीं काय केलें. तें मला सांग. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, जयद्रथाचा पराभव करून कृष्णेस पांडवांनीं ग्रहण केली; आणि काम्यक वनापासूनतेमार्कंडेयादि ऋषींसह रथारूढ होऊन द्वैतवनीं आले. नंतर मार्कंडेयमुखापासून राजऋषि व देवर्षि यांच्या कथा ऐकून द्वैतवनीं सुखानें राहिले. असा विषय या अध्यायांत आहे.

३११. अध्याय तीनशें अकरा:— जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायनऋषे, द्वैतवनांत पांडवांनीं वनसंबंधीं दुःखें सहन करून काय केलें तें मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात. हे जनमेजया, पांडव द्रौपदीसहवर्तमान द्वैतवनीं फलमूलांचें भक्षण करून चित्रविचित्र वृक्षांची शोभा पाहात

राहात असतां एके दिवशीं तपस्वी ब्राह्मणाच्या अरणी वृक्षावर होत्या तेथें एक मृग वृक्षास घर्षण करीत होता इतक्यांत त्या अरणी त्याच्या शृंगांत अडकतांच तो पळून अरण्यांत गेला. ब्राह्मणानें विचार केला कीं, आपलें अग्निहोत्र अरणीवांचून नष्ट झालें. असें ह्मणून तो धर्मराजासन्निध आला. आणि अरणींचा राजास वृत्तांत सांगून बोलला. हे राजा, माझ्या अग्निहोत्राचा लोप होईल. यास्तव माझ्या अरणी मृगापासून माघारीं आणून द्याव्या. असें ऐकून धर्मराज भ्रात्यांसह वर्तमान कवच व शस्त्रास्त्रें धारण करून हस्ताचे ठायीं धनुष्य बाण घेऊन मृगाच्या शोधास चारी दिशांस निघाला. परंतु मृगाचा ठिकाण लागला नाहीं. नंतर पांडव फिरतां फिरतां क्षुधा व तृषा ईहींकरून दुःखित होऊन एका वराखालीं बसले. आणि चोंहींकडे पाहून ह्मणाले कीं, कोठें जल मिळेल तर फार चांगलें होईल. त्या काळीं नकुळ बोलतो हे धर्मराजा, आजपर्यंत आपले कुळांत धर्म नष्ट व अर्थलोप झाला नाहीं. असें असतां आपण पांचही भ्राते एकाएकीं मोहसागरांत निमग्न होऊन कोणास कांहीं सुचेना, आणि अर्थ सिध्दीही होईना हा मला संशय आला आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

३१२. अध्याय तीनशें बारा:— युधिष्ठिर भाषण करतो हे नकुला, आपत्ति प्राप्त होण्यास कारण पुण्यपापें आहेत. धर्मच अर्थाचा विभाग करतो. भीमसेन भाषण करतो हे नकुला, आपली भार्या जी कृष्णा इजला दासीसारखी कौरवांनीं ज्याकाळीं सभेमध्यें आणली त्याकाळींच त्या दुष्टांचा मी वध केला नाहीं. हें आमच्यापासून पातक झालें त्या योगानें हा संशय आपल्यास उत्पन्न झाला. अर्जुन भाषण करतो हे नकुला, राधेयानें आह्मांस सभेच्या ठायीं नानाप्रकारचीं दुर्भाषणें करून निंदा केली. तीं दुर्भाषणें आह्मीं सहन केलीं. त्याच्यायोगें आह्मांस हा संशय आला. सहदेव भाषण करतो हे नकुला, अक्षद्यूतामध्यें कौरवांनीं कपटानें धर्मराजास जिंकिलें. त्याकाळीं आह्मीं त्या दुष्टांचा वध करावा तो न केल्यामुळें हा आपल्यास संशय आला. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, संपूर्ण भ्रात्यांचें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलतो हे नकुळा, दाही दिशेस पाहून कोठें जल आहे किंवा

नाहीं याचा शोध कर असें ऐकून नकूळ तत्काळ वृक्षावर चढला. आणि इकडे तिकडे पाहून बोलला हे धर्मराजा, येथून दूर जलस्थानें आहेत व तेथें पक्षीही शब्द करतात असें ऐकून धर्मराज बोलला हे नकुळा, लौकर जाऊन जल घेऊन ये. असें ऐकतांच नकुल जल आणण्यास गेला, आणि सरोवरांतून जल घेऊं लागला तों आकाशांत यक्षाची वाणी झाली कीं हे तात साहस करूं नको मी असा निश्चय केला आहे कीं माझ्या प्रश्नाचें जो उत्तर देईल त्यानेंच जलप्राशन करावें. यास्तव मी प्रश्न करतों त्यांचीं उत्तरें दे नंतर जलप्राशन कर. जर माझ्या भाषणाचा अनादर करून जलप्राशन करशील तर तत्काळ यम लोकीं जाशील, हें भाषण नकुलानें न ऐकतां सरोवरांतील जल प्राशन केलें. आणि तो तत्काळ पृथ्वीवर पडला. इकडे युधिष्ठिर ह्मणतो हे सहदेवा, नकुलास जाऊन बहुत काळ झाला यास्तव त्यास घेऊन ये आणि जलही आण. मी तृषार्त बहुत झालों आहें. असें ऐकून सहदेव ज्या दिशेस नकुल गेला त्याच दिशेस सरोवराच्या तीरीं गेला. आणि भ्राता निचेष्ट भूमीवर पडलेला पाहून शोकसंतप्त झाला. आणि तृषेनें पीडित झाल्यामुळें सरोवरांत जलप्राशन करण्यास गेला. तों पूर्वीप्रमाणें आकाशवाणी झाली, तिचा अनादर करून सहदेवानें जलप्राशन केलें असतां तो तत्काळ पृथ्वीवर पडला. इकडे धर्मराज ह्मणतो हे अर्जुना, उभयतां भ्राते जल आणण्याकरितां गेले त्यांचा अद्याप ठिकाण नाहीं यास्तव लौकर जा आणि त्यांचा शोध करून जल लौकर आण. असें ऐकतांच अर्जुन सरोवरीं गेला आणि उभयतां भ्राते मृत झालेले पाहून त्यानें धनुष्यबाण सिद्ध केला आणि यांचा प्राण कोणीं घेतला त्याचा शोध करण्याकरितां संपूर्ण दिशा पाहिल्या असतां बहुत श्रांत होऊन तो सरोवरांत जलप्राशन करण्याकरितां गेला असें पाहून पूर्वीप्रमाणें यक्षानें भाषण केलें तें ऐकून पार्थ बोलतो हे पुरुषा, जर तूं दृश्यमान असतास तर बाणेंकरून तुला छिन्नविछिन्न केला असता असें भाषण करून पार्थानें शरास्त्रानें संपूर्ण दिशा पूरित करून जेथून आकाशवाणी झाली तें स्थलही बाणांनीं व्याप्त केलें. परंतु तृषेनें बहुत पीडित झाला तेव्हां यक्ष ह्मणतो हे पार्था, एवढा प्रयास कशाकरितां करतोस प्रश्नाचें उत्तर दे. आणि स्वरेंकरून जल पान कर. नंतर धनंजयाचें त्या भाष-

णाचा अवमान करून जलप्राशन केलें तों तत्काळ तो पृथ्वीवर पडला. इकडे धर्मराज ह्मणतो भीमसेना, नकुल, सहदेव, अर्जुन हे जल आणण्याकरितां गेले आहेत, त्यांची वार काय झाली? तूं लौकर जाऊन त्यांचा शोध कर, आणि जलही घेऊन ये. असें ऐकून भीमसेन सरोवरीं गेला. आणि तीन भ्राते निचेष्ट पडलेले पाहून मनांत ह्मणतो हें कर्म कोणीं तरी यक्षराक्षसांनीं केलें असेल यास्तव जलप्राशन करावें. नंतर यक्षराक्षसांचा शोध करून त्यांशीं युध्द करावें असा विचार करून सरोवरामध्यें जलप्राशनास गेला तों पूर्वीप्रमाणें यक्षाची वाणी झाली. त्यावाणीचा अवमान करून भीमानें जलपान केलें, आणि तो तत्काळ पृथ्वीवर पडला. इकडे धर्मराज विचार करूं लागला कीं आपल्या भ्रात्यांस जाऊन बहुत काळ झाला कोठें ठिकाण नाहीं, व जलही नाहीं. तेव्हां आपण त्यांच्या शोधाकरितां स्वतः जावें, असा विचार करून त्या सरोवरीं गेला. आणि हेमजालांनीं युक्त साक्षात् विश्वकर्म्यानें निर्मित केलेल्या त्या सरोवरास पाहून धर्मराज परम विस्मय पावला. असा विषय या अध्यायांत आहे.

३१३. अध्याय तीनशें तेरा.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, लोकपालांसारखे पराक्रमी, इंद्रासारखे विजयी अर्जुनप्रभृति चार भ्राते मृतासारखे पडलेले पाहून धर्मराज श्वासोश्वास टाकीत विलाप करूं लागला. नंतर भीमसेनाकडे पाहून ह्मणतो हे वृकोदरा, दुर्योधनाच्या ऊरूचा युध्दांमध्यें गदेनें भेद करीन ह्मणून जी प्रतिज्ञा केली होतीस ती प्रतिज्ञा आज तुझी कशी व्यर्थ झाली. कालानें तुला कसा ग्रासला. असें ह्मणून विलाप करतो. हे अर्जुना ज्याकाळीं तूं उत्पन्न झालास त्याकाळीं देवांच्या वाणी आकाशांत अशा झाल्या कीं, हा इंद्रपुत्र युध्दांमध्यें कौरव कुलाचा अंत करील. त्याची कीर्ती दिगंतरीं जाईल. त्या वाणी कशा अनृत झाल्या. हे अर्जुना, तूं मृत्युवश होऊन माझी आशाभंग केलीस, आणि पृथ्वीवर कसा निद्रित पावलास. हीं दुःखें सोसून मी तरी कशाकरितां पृथ्वीवर जिवंत राहूं. हे माद्रीपुत्र शत्रूचें हनन करणारे समग्र शस्त्रास्त्रविद्येमध्यें निपुण असतां मृत्यूस वश कसे झाले असें महान् दुःख पाहून मी वांचलों तस्मात् माझें हृदय केवळ लोखंडाचें आहे. असे नानाप्रकारचे विलाप धर्मराजानें करून मरणास हेतु काय आहे याचा

विचार करावा. अशी इच्छा धरून पुनः तो भाषण करतो कीं, हा मरण संभव भ्रात्यांस कसा झाला. देशकाल विचार पाहातां अशी अवस्था होऊं नये. शरिराबर शस्त्रांचीं क्षतें कोठें दिसत नाहींत. यास्तव कांहीं दैवीक मरणसंभव आहे यांत संशय नाहीं. बरें आतां तृषेनें श्रांत झालों आहें. या सरोवरांतील जल प्राशन करून पुढें सविस्तर याचा विचार करूं. कदाचित् दुर्योधनानें नसेल नाहें गुप्तरूपानें कर्म केलें अथवा गांधारराजानें हें दुष्ट कर्म केलें नसेल ना! पुढें धर्मराज सरोवरांत शिरला आणि जलपान करण्यास उद्युक्त झाला तों आकाशवाणी झाली कीं, हे धर्मपुत्रा, मी बक या सरोवरांत राहातों. एथें जे मच्छ आहेत त्यांचें भक्षण करतों. हे तुझे भ्राते मींच मारिले. तू आतां पांचवा मरणाची इच्छा धरून येथें आलास काय? हे राजा, माझे कांहीं प्रश्न आहेत यांचीं उत्तरें देऊन जल प्राशन कर. धर्मराज भाषण करतो, तू कोणी तरी रुद्र, वसू, मरुद्गण अथवा दुसरा कोणी तरी श्रेष्ठ देव असावास. ही वाणी केवळ बकाची नाहीं. तू कोण आहेस सांग. हिमाचल, पारियात्र, विंध्य, मलय या पर्वतां सारखे माझे चार भ्राते, महान् तेजस्वी यांस कोणत्या हेतूनें पृथ्वीवर पाडलेंस. हे बलिश्रेष्ठा, देव, गंधर्व, असुर, राक्षस यांच्यानें माझ्या भ्रात्यांचा पराभव करवणार नाहीं. असें असतां त्यांचे प्राण हरण तूं केलेस हें याहून मला परम कौतुक झालें खरें. परंतु भयही सुटलें. त्याच्यायोगें माझें हृदय उद्विग्न होऊन शिरोव्याधि उत्पन्न झाला. हे देवा, असा तू बाले कोण येथें राहातोस तें सांग. यक्ष भाषण करतो हे धर्मराजा, यक्ष ह्मणतात तो मी पक्षि किंवा जलचर नव्हे. हे संपूर्ण तुझे भ्राते मींच मारिले. तुझें कल्याण असो. वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, अशी वाणी ऐकतांच धर्मराज परम खिन्न झाला. तों तालमात्र उंच असा यक्ष धर्मराजानें पाहिला. तेव्हां तो बोलतो हे तुझे भ्राते जलपान करण्याकरितां प्रवृत्त झाले असतां त्यांचें निवारण वारंवार मीं केलें. परंतु तें न ऐकतां बलात्कारें करून त्यांनीं जल प्राशन केलें. यास्तव ही अवस्था त्यांस प्राप्त झाली. हे कौंतेया, तू माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दे, आणि जल प्राशन कर. असें ऐकून युधिष्ठिर भाषण करतो हे यक्षा, जर तुझी अशी प्रतिज्ञा आहे तर मी प्रश्नांचें उत्तर दिल्यावांचून जल प्राशन करीत नाहीं.

अस्तु काय तुझे प्रश्न असतील ते कर. यथामती त्यांचीं उत्तरें मी देतों. यक्ष भाषण करतो. हे धर्मा, सूर्यास कोण भ्रमण करवितो? त्याचे आसमंताद्भागीं कोण राहातात? त्यास अस्तास कोण नेतो? व हा राहातो कोठें? युधिष्ठिर उत्तर देतो ब्रह्मदेव आदित्यास भ्रमण करवितो. त्याचे आसमंताद्भागीं देव राहातात. सूर्यास धर्म अस्तास नेतो. व याचें स्थान सत्य आहे. यक्ष पुनः प्रश्न करतो श्रोत्रिय कशानें होतात ब्रह्माचें ज्ञान कशानें होतें? व बुध्दि कशानें वृध्दि पावत्ये? व द्वितीयवान् कशानें होतो? युधिष्ठिर उत्तर देतो. गुरूपासून वेदग्रहण यथासांग केलें ह्मणजे त्यास श्रोत्रिय असें ह्मणावें. श्रुतीच्या अर्थाचा विचार तपोबलें करून केला ह्मणजे ब्रह्माचें ज्ञान होतें. वृध्दांचें सेवन केलें ह्मणजे बुध्दीची वृध्दि होते. निदिध्यासनानें व विद्येनें प्राप्त होणारें जें द्वितीय रूप तें प्राप्त होतें. यक्ष प्रश्न करतो ब्राह्मणास दैवत कोण? त्यास धर्म कोणता? मनुष्यांस मनुष्यत्व काय? आणि त्यांनीं काय करूं नये? युधिष्ठिर उत्तर देतो. वेदाध्ययन हें ब्राह्मणाचें दैवत होय. तप ब्राह्मणाचा धर्म होय. मरण हें मनुष्यांचें मनुष्यत्व. देव ब्राह्मणांची निंदा आणि असदाचार हे त्यांनीं टाकावे. यक्ष प्रश्न करतो क्षत्रियांस दैवत कोणतें? त्यांचा धर्म काय? मानुष धर्म त्यांस काय? आणि त्यांनीं त्याज्य काय करावें? युधिष्ठिर उत्तर देतो, धनुष्य बाण हे क्षत्रियांचें दैवत्य, यज्ञयागादिक्रिया हा त्यांचा धर्म, युध्दांत भय पावणें हा त्यांचा मनुष्यभाव, त्यांनीं शरणागत व आर्त यांचा परित्याग करूं नये. यक्ष प्रश्न करतो, यज्ञसंबंधीं साम कोणतें? यज्ञसंबंधीं यजु कोणतें? कोणती ऋचा यज्ञाचा स्वीकार करते आणि कोणती ऋचा यज्ञावांचून अन्यत्र राहात नाहीं? युधिष्ठिर उत्तर देतो, प्राण हे यज्ञाचें साम आहे, मन हें यज्ञाचें यजु आहे. कोणी एक प्रजापति सृष्ट ऋचा यज्ञास स्वीकार करते, व तीच ऋचा यज्ञावांचून अन्यत्र राहात नाहीं. यक्ष प्रश्न करतो. तृप्त करणाऱ्या पदार्थीं तश्रेष्ठ कोण? पृथ्वींत पेरलेल्या पदार्थांत श्रेष्ठ कोण? पशूंत प्रतिष्ठित कोण? आणि प्रसव होणाऱ्या पदार्थांत श्रेष्ठ कोण? युधिष्ठिर उत्तर देतो, तृप्त करणाऱ्या पदार्थांत जल वृष्टि ही श्रेष्ठ आहे, पेरलेल्या पदार्थांत बीज हें श्रेष्ठ आहे, प्रतिष्ठावान पशूंत गाई श्रेष्ठ आहेत, प्रसवलेल्या पदार्थांत पुत्र श्रेष्ठ. यक्ष प्रश्न क-

रतो. इंद्रियार्थांचा अनुभव घेणारा बुद्धिमान लोकांत मान्य व संपूर्ण प्राणि मात्रांस संमत असून कोणत्या हेतूनें जिवंत असतांही मृतासारखा असतो तो कोण? युधिष्ठिर उत्तर देतो, अतिथि, भृत्य, पितर, देवता, व स्वतः संबंधी या पांचांचें पोषण न करितां जो जिवंत या पृथ्वीवर वास करतो तो जिवंत असतांही मृता सारखा जाणावा. यक्ष प्रश्न करतो भूमीपेक्षां श्रेष्ठ कोण? आकाशापेक्षां उंच कोण? वायूपेक्षां शीघ्र कोण? व तृणापेक्षांही तुच्छ कोण? युधिष्ठिर उत्तर देतो भूमीपेक्षां माता श्रेष्ठ, आकाशापेक्षां पिता उंच आहे, वायूपेक्षां मन शीघ्र आहे, तृणापेक्षां चिंता तुच्छ आहे. यक्ष प्रश्न करतो स्वप्न असतांही स्वप्नासारखा नसतो तो कोण? उत्पन्न असतां गमन करीत नाहीं तें काय? हृदय कोणास नाही? वेगानें वृध्दि कोण पावतो? युधिष्ठिर उत्तर देतो. मच्छ स्वप्न असतां ही निरंतर चंचल असतो. ब्रह्मांड उत्पन्न असतांही गमन करीत नाहीं पाषाणास हृदय नाहीं. नदी वेगानें वृध्दि पावते. यक्ष प्रश्न करतो, प्रवास करणारा, गृहीं वास करणारा, रोगी व मरणोन्मुख यांस मित्र कोण? युधिष्ठिर उत्तर देतो. प्रवाशास मित्र द्रव्य आहे. गृहीं वास करणाऱ्यास भार्या मित्र. रोग्यास मित्र औषध व मरणोन्मुखास मित्र, दान होय. यक्ष प्रश्न करतो समग्र भूतांस अतिथी कोण? अनादि धर्म कोणता? सर्व जगत् कोणत्या रूपानें आहे? धर्मराज उत्तर देतो. समग्र भूतांस अतिथि अग्नि आहे. मोक्षास कारणीभूत जो धर्म तो अनादि सनातन. गोक्षीर अमृत आहे. तसेंच समग्र जगत् वायुरूपी आहे. यक्ष प्रश्न करतो. एकाएकीं संचार कोण करतो? पुनःपुनः उत्पन्न होतो तो पदार्थ कोण? हिमास औषध कोण? पेरण्यास योग्य कोण? युधिष्ठिर उत्तर देतो. एकाकी संचार सूर्य करतो. चंद्र पुनःपुनः उत्पन्न होतो. थंडीस औषध अग्नि. पेरण्यास योग्य पृथ्वी. यक्ष प्रश्न करतो. धर्माचें अद्वितीय स्थान कोणतें? स्वर्गप्राप्तीविषयीं साधन काय? सुखाचें साधन कशानें होतें? युधिष्ठिर उत्तर देतो. समग्र कार्याविषयीं दक्षता ठेवणें हें धर्माचें स्थान होय. यशाचें स्थान दान धर्म. स्वर्गप्राप्ति सत्यानें होते. सुशीलतेनें सुख होतें. यक्ष प्रश्न करतो. मनुष्याचा आत्मा कोण? देवानें दिलेला सखा कोण? प्राण्यास उपजीवन काय? व यास परायण काय? युधिष्ठिर उत्तर देतो. पुत्र हा मनुष्याचा आत्मा आहे. भार्या हा देवानें दिलेला सखा

सर्वांस उपजीवन पर्जन्य आणि समग्रांस दान परायण आहे. यक्ष प्रश्न करतो ध-न्यांत उत्तम कोण? धनांत श्रेष्ठ कोण? लाभांत उत्तम लाभ कोणता? सुखांत उत्तम सुख कोणतें? युधिष्ठिर उत्तर देतो. धन्यांत उत्तम दाक्ष्य आहे. धनांत उत्तम शास्त्र. लाभांत उत्तम लाभ कल्याण, आणि आरोग्य सुखांत उत्तम सुख संतोष. यक्ष प्रश्न करतो परलोकीं उपयोगी पडणारा धर्म कोणचा? निरंतर फल देणारा धर्म कोणता? कोणता निग्रह केला असतां शोक होत नाहीं. आणि कोणाचा स्नेह केला असतां जीर्ण होत नाहीं. युधिष्ठिर उत्तर देतो. सत्य भाषण करणें हा मोठा धर्म आहे. प्रणवाश्रित जो धर्म आहे तो सदां फलित असतो. ज्याचें मन नियमित असतें त्यास शोक होत नाहीं. आणि साधूंचा स्नेह कमी होत नाहीं. यक्ष प्रश्न करतो संपूर्णांस प्रिय कशानें होतो? कोणाचा त्याग केला असतां शोकयुक्त होत नाहीं? काय टाकल्यानें कृतकृत्य होतो आणि काय टाकल्यानें सुखी होईल? युधिष्ठिर उत्तर देतो मान टाकल्यानें संपूर्णांस प्रिय होतो. क्रोध टाकल्यानें शोक पावत नाहीं. कामाचा त्याग केला असतां कृतकृत्य होतो. लोभाच्या त्यागानें सुखी होतो. यक्ष प्रश्न करतो कशाकरितां ब्राह्मणास दान करावें? नरनर्तक यांस दान कशाकरितां? भृत्यांस दान कशाकरितां आणि राजास कशाकरितां द्यावें? युधिष्ठिर उत्तर देतो, धर्मार्थाकरितां ब्राह्मणास दान करावें. कीर्ति व्हावी ह्मणून नरनर्तकांस द्यावें. आपलें सेवन करतो ह्मणून त्याचे पोषणास्तव भृत्यांस द्यावें व भयास्तव राजास द्यावें. यक्ष प्रश्न करतो हें जगत् कशानें वेष्टित आहे? हा लोक प्रकाशित कशानें होत नाहीं? मित्राचा त्याग कशास्तव होतो? स्वर्गीं कशानें गमन होणार नाहीं? युधिष्ठिर उत्तर देतो. हें जगत् अज्ञानानें आवृत आहे. तमानें वस्तु प्रकाशित होत नाहीं. लोभानें मित्राचा त्याग होतो. संग झाला असतां स्वर्गास प्रतिबंध होतो. यक्ष प्रश्न करतो जिवंत असतां मृत कोण? मेल्याप्रमाणें राष्ट्र कोणाचें? श्राध्द केलें असतांही न केल्यासारखें कोणाचें? यज्ञ केला असतांही निरर्थक कोणता? युधिष्ठिर उत्तर देतो. दरिद्री पुरुष जिवंत असतांही मृतासारखा. राज्यास स्वामी नाहीं तें राज्य मृतासारखें. ज्या श्राध्दांत श्रोत्रिय ब्राह्मण नाहींत तें न केल्यासारखेंच. दक्षणारहित यज्ञ केलेला मृतासारखा जाणावा. यक्ष प्रश्न करतो उपदेश करणारे कोण? उदक कोणतें? अन्न कोणतें? विष कोणतें? श्राध्दाचा काळ

कोणता? युधिष्ठिर उत्तर देतो. उपदेश करणारे ते संत, समग्रांस उदक आकाश आणि तेथेंच लय होतो. ह्मणून इंद्रिय हें अन्न आहे. समग्रांस याच्या हें विष. विद्वान ब्राह्मण आला असतां तोच श्राद्धाचा काल जाणावा. यक्षप्रश्न करतो. तपाचें लक्षण कोणतें? दमन कोणाच्या इंद्रियाचें करावें? क्षमा कोणाची आणि लज्जा कोणाची? युधिष्ठिर उत्तर देतो, स्वधर्म रक्षण करणें हेंच तप. दमन मनेंद्रियाचें करावें. द्वंद्वाचें सहन करणें हीच क्षमा. अकार्यापासून निवृत्त होणें हीच लज्जा. यक्ष प्रश्न करतो, ज्ञान कोणतें? शम कोणता? दया कोणती? आणि आर्जव कोणतें? युधिष्ठिर उत्तर देतो. ज्ञान ह्मणजे तत्वार्थ जाणणें चित्ताची शांतता हाच शम. संपूर्णांनीं सुखी असावें असी जी आमची इच्छा तीच दया. संपूर्णांस समान मानणें हेंच आर्जव. यक्ष प्रश्न करतो पुरुषास दुर्जय असा शत्रु कोणता? अखंडित व्याधि कोणता? साधु आणि असाधु कोणास ह्मणावें? धर्मसुत उत्तर देतो. क्रोधरूपी शत्रु दुर्जय. लोभ हा अखंड व्याधि, समग्र भूतांचें हितकर्ता तो साधु आणि जो निर्दय आहे त्यास असाधू ह्मणावें. यक्ष भाषण करतो. हे राजा, मोह, मान, आलस्य, शोक, हे कोणते? युधिष्ठिर उत्तर देतो. धर्माचा प्रमाद करणें हाच मोह. अभिमान हाच मान. क्रियारहित धर्म करणें हा आलस्य. अज्ञान हाच शोक. यक्ष प्रश्न करतो. ऋषींनीं स्थैर्य कोणतें सांगितलें? आणि धैर्य कोणचें सांगितलें? स्नान कोणचें आणि दान कोणचें. युधिष्ठिर उत्तर देतो. स्वधर्माची स्थिरता करणें हेंच स्थैर्य. इंद्रिय निग्रह करणें हें धैर्य, स्वच्छ मन असणें हेंच स्नान. भूतांचें रक्षण करण्याची इच्छा हेंच दान होय. यक्ष प्रश्न करतो कोणच्या पुरुषास पंडित म्हणावें? नास्तिक कोणास ह्मणावें? मूर्ख कोण? काम कोणचा? मत्सर कोणचा? युधिष्ठिर उत्तर देतो. धर्म जाणतो तो पंडित. मूर्खास नास्तिक ह्मणावें. संसाराचा जो हेतु त्यास काम ह्मणावें. परऐश्वर्याचें सहन न करणें त्यास मत्सर ह्मणावें. यक्ष प्रश्न करतो अहंकार कोणचा? दंभ कोणचा? दैव कोणचें व पैशून्य कोणचें? युधिष्ठिर उत्तर देतो मोठें अज्ञान तोच अहंकार. लोकांस कळण्याकरितां जो धर्म करणें तो दंभ. दानापासून फल होतें त्यास दैव ह्मणावें. दुसऱ्यास दोष देणें हेंच पैशून्य आहे. यक्ष प्रश्न करतो. धर्मार्थ काम हे परस्पर विरोधी असतां त्यांचा एकत्र संगम

कोठें होतो. युधिष्ठिर उत्तर देतो. धर्म आणि भार्या ज्यास वश झाल्या तेथें धर्म, अर्थ, काम या तिघांचाही संगम होतो. यक्षप्रश्न करतो हे राजा, अक्षय्य नरकाची प्राप्ति कशानें होते? युधिष्ठिर उत्तर देतो. दरिद्री ब्राह्मणानें याच्ञा केली असतां त्यास देतों म्हणून सांगून नंतर नाहीं देत म्हणतो. तो, वेद, धर्म शास्त्र, ब्राह्मण, देव पितृ धर्म, याचेगयीं निष्ठा ठेवीत नाहीं तो, धन जवळ असून जो लोभास्तव दान, भोग न करितां दुसऱ्यास सांगतो कीं, मजपाशीं कांहीं नाहीं तो हे अक्षय्य नरकीं वास करतात. यक्ष प्रश्न करतो हे राजा, कुल, वृत्त, स्वाध्याय आणि शास्त्र यांतून कोणाचा अंगिकार केला असतां ब्राह्मण्य प्राप्त होतें. युधिष्ठिर उत्तर देतो. स्वाध्याय अथवा शास्त्र हे ब्राह्मण्यास कारण नाहींत, तर व्रतच कारण आहेत. यास्तव ब्राह्मणानें आपलें व्रत अवश्य संरक्षित केलें पाहिजे. अक्षीण व्रत आहे त्याचा क्षय कधींही होत नाहीं. पढणारे व पढिवणारे तसेच शास्त्राची चिंता बाळगणारे हे समग्र व्यसनी यांस पंडित म्हणूं नये. अध्ययन करून तशी क्रिया करतो त्यासच पंडित म्हणावें. चारी वेदांनीं युक्त असून जो दुर्वृत्त झाला तो शूद्रापेक्षांही नीच. जो अग्निहोत्र धारण करून दांत असतो तोच ब्राह्मण म्हणावा. यक्ष प्रश्न करतो प्रियभाषण करणाऱ्यास काय प्राप्त होतें? विचार करून कार्य करण्यास प्रसक्त होणाऱ्यास काय लब्ध होतें? बहुत मित्र करण्यांत काय फळ? धर्मांमध्यें रत असणाऱ्यास काय फळ? युधिष्ठिर उत्तर देतो. प्रियवक्ता समग्रांस प्रिय. विचारपूर्वक कार्य करणाराचा अधिक उत्कर्ष होतो ज्याचे मित्र फार त्यास सुख बहुत होतें. धर्मामध्यें जो रत आहे त्यास उत्तम गति प्राप्त होते. यक्ष प्रश्न करतो. आनंद कोण पावतो? आश्चर्य काय? मार्ग कोणचा? वार्ता कोणती? त्या चार प्रश्नांचें उत्तर दे म्हणजे तुझे बंधु जिवंत करतों. युधिष्ठिर उत्तर देतो. ज्यास ऋण प्रवासही नसून जो पांचव्या दिवशीं अथवा साहाव्या दिवशीं आपल्या घरींच शाक पचन करून भक्षण करतो तोच आनंद पावतो. रात्रंदिवस यमाचे घरीं समग्र भूतें चाललीं आहेत हें पाहून जे राहिलेले ते आम्ही स्थावर आहों असें मानितात हेंच आश्चर्य. तर्क निर्णयशून्य आहेत, श्रुति परस्पर विरुद्ध आहेत, ऋषींचीं मतें नाना प्रकारचीं भिन्न आहेत, धर्माचें तत्त्व अदृश्य, ते व्हां ज्या मार्गानें महान्

महान्न लोक जातील तोच मार्ग जाणावा. हा माहांमायारूप भोग करांहा (कढ यी) इच्याखालीं रात्र आणि दिवस हीं इंधनें हीं सूर्याग्नीनें तप्त होऊन त्यांमध्यें मास व ऋतु हा पळा. यानें काळ जगताचा पाक नित्यशः करीत आहे. हीच वार्ता. यक्ष भाषण करतो, हे धर्मा धनानें संपन्न असा पुरुष कोण? युधिष्ठिर-उत्तर देतो हे यक्षा, यावत्कांळपर्यंत आकाश व भूमी यांमध्यें ज्या पुरुषाची पुण्य कारक कीर्ती आहे तोच पुरुष जरी मृत आहे तथापी पुण्य कीर्तीच्या प्रभावानें जिवंतच आहे असें समजावें. प्रिय व अप्रिय असे दोन पदार्थ तशींच सुखदुःखें यांजवर समता बुध्दि असून प्राप्तवस्तु व गतवस्तु यांविषयीं जो समानता ठेवितो तोच पुरुष सर्व धनि आहे असें समजावें. असें धर्मराजाचें भाषण ऐकून यक्ष भाषण करतो. हे राजा, सर्व धनी कोण हें तूं सांगितलेंस तेणें करून आतां मी संतुष्ट झालों या भ्रात्यांतून जो तुला प्रिय असेल तो सांग त्यास मी जिवंत करतों असें ऐकून युधिष्ठिर भाषण करतो हे यक्षा, शाम, रक्ताक्ष शाल वृक्षा सारखा महा बाहु जो नकुल यास जिवंत कर असें ऐकून यक्ष ह्मणतो हे राजा, भीमसेन व अर्जुन हे दोघे तुला अत्यंत प्रिय असतां त्यांचा त्याग करून सापत्न बंधु जो नकुल यास उठविण्याविषयीं कां इच्छितोस? असें ऐकून युधिष्ठिर भाषण करतो हे यक्षा, धर्माचा नाश केला असतां तो आपला नाश करतो. धर्मसंरक्षित केला असतां तो आपलें रक्षण करतो. यास्तव धर्माचा त्याग मनःपूर्वक कधीं मी करणार नाहीं. माझ्या मनांत किमपि वैषम्य नाहीं, ह्मणून मी नकुलास जिवंत कर असें वारंवार ह्मणतों. संपूर्ण लोक निरंतर धर्मशील असें मला ह्मणतात. तो मी आज धर्मापासून कधींही भ्रष्ट व्हावयाचा नाहीं. माझ्या पित्याच्या कुंती व माद्री त्या दोन भार्या त्या दोघींसही पुत्र असावे अशी माझी मति आहे. कुंतीस मी पुत्र आहें, माद्रीस मात्र नाहीं ह्मणून मी नकुलास जिवंत करण्याविषयीं वारंवार प्रार्थना करतों. कुंती आणि माद्री त्या उभयतां मला सम आहेत. असें ऐकून यक्ष भाषण करतो, हे धर्मराजा, तुझी मनःपूर्वक उभयतां मातांवर समता बुध्दि पाहून मी फारच संतुष्ट झालों. आतां भीमसेनादि तुझे भ्राते संपूर्ण जिवंत होवोत. असा विषय या अध्यायांत आहे.

३१४. अध्याय तीनशें चौदा:— वैशंपायन सांगतात. हे जनमेजया,

असें यक्षानें भाषण करतांच क्षुधा व तृषा ईहीं करून व्याप्त झालेले पांडव उ-
ठले असतां एक पाद सरोवरांत ठेऊन वृक्षस्थ जो यक्ष यास युधिष्ठिर भाषण
करतो. हे यक्षा तूं कोण आहेस? तूं कांहीं यक्ष नव्हेस. कोणी तरी वसु रुद्र,
अथवा इंद्र, असावास हें कशावरून ह्मणशील तर सहस्त्रावधि योध्यांचा ना-
श करणारे जे माझे भ्राते यांचा एकस्थानें तूं नाश केलास व हे पुनः जिवंतही
केलेस तस्मात् तूं आमचा मित्र अथवा पिता असावास. असें ऐकून यक्ष भा
षण करतो: हे धर्मराजा, तुझा मी पिता. तुला पाहाण्याकरितां मी एथें आलों. य-
श, सत्य, दम, अर्जव, न्ही, अचापल्य, दान, तप, ब्रह्मचर्य, ह्या माझ्या तनु आ
हेत. अहिंसा, समता, शांति, तप, शौच्य, आमाछर्य हीं माझीं द्वारें आहेत. हीं
संपूर्ण तूं जाणतोस. ह्मणून मी तुझ्यावर निरंतर संतुष्ट आहे. हे धर्मा, तुझ्या
कल्याणाकरितां मी यमधर्म येथें आलों. तुझें हें अक्रौर्य पाहून मी फारच सं
तुष्ट झालों. एकादा वर माग मी देण्यास सिध्द आहें. जे माझे भक्त आहेत त्यांस
दुर्गती कधीं होणार नाहीं. असें ऐकून युधिष्ठिर भाषण करतो हे यक्षा, अर
णी ग्रहण करून कोणी एक मृग गेला तेणें करून ब्राह्मणाचें अग्निहोत्र नष्ट झा
लें. तें न व्हावें हा वर मला द्यावा. असें ऐकून यक्ष भाषण करतो हे राजा, मी
च मृगाचा वेष घेऊन ब्राह्मणाच्या अरणी हरण केल्या. याचें कारण हेंच कीं,
तुझी परीक्षा करणें होती आतां त्या अरणी देतों. दुसरा वर माग. असें ऐ
कून युधिष्ठिर भाषण करतो हे यक्षा बारावर्षें आह्मीं अरण्यांत घालविलीं
आतां तेरावे वर्षीं आज्ञातवास कर्तव्य आहे. तेव्हां आह्मांस कोणी ओळ
खूं नये. हा वर द्यावा असें ऐकून यक्षानें तथास्तु ह्मणून भाषण करून पुनः
सत्य विक्रम जो कौंतेय यास अश्वासन दिल्हें कीं, तुह्मीं आपले स्वरूपें करू-
न जरी या पृथ्वीवर राहिलांत तथापी तुह्मांस कोणी ओळखणार नाहीं. आ-
तां तुह्मीं विराट नगरीं गुप्त रूपानें इतरांस न समजतां एक वर्ष आज्ञातवास करा.
माझ्या प्रसादानें तुह्मांस कांहीं दुःख होणार नाहीं. जसजसा संकल्प करून
रूपें धारण करण्याचा विचार कराल तसतशीं प्राप्त होतील. परंतु आपला
स्वभाव व कर्म शील पाहून धारण करा. त्या अरणी घे आणि ब्राह्मणास दे. अ-
सें भाषण करून यक्षानें ब्राह्मणाच्या अरणी राजाच्या स्वाधीन केल्या. आणि

पुनः भाषण केलें. हे धर्मा, तुला वर देऊन अजून मी तृप्त झालों नाहीं. तस्मात आणखी एक तिसरा वर माग. तू माझाच पुत्र आहेस. आणि विदुरही माझाच अंशभूत आहे. असें ऐकून युधिष्ठिर भाषण करतो. हे देवाधिदेवा, तुझ्या दर्शनानें संतुष्ट झालों. तूंच संतुष्ट होऊन जो वर देशील तो मी ग्रहण करीन परंतु तुजपाशीं इतकेंच मागणें आहे कीं, लोभ, मोह, क्रोध, यांचा जय निरंतर मजपासून असावा आणि दान, तप, सत्य यांचेठायीं माझें मन निरंतर रत असावें. असें ऐकून यमधर्म भाषण करतो हे धर्मा. संपूर्ण गुणानें तू युक्त आहेस. मी वर द्यावा असें नाहीं. परंतु तुला तिसरा वर असा देतों कीं, शेवटीं तुला माझें रूप प्राप्त होऊन माझ्यामध्येंच तू लीन होशील. असें भाषण करून यमधर्म तत्काळ अंतर्धान पावला. नंतर पांडव निद्रेपासून उत्थित झाल्यासारखे एकत्र मिळून श्रमरहित आपल्या आश्रमीं गेले. आणि त्यांनीं तपस्वी ब्राह्मणाच्या अरणी त्यास समर्पण केल्या. हें पितापुत्राचें आख्यान कीर्तीचें वर्धन करणारें आहे. हें जो कोणी जितेंद्रिय होऊन पठण करील त्याची पुत्रपौत्रादिकांची वृध्दि होऊन शतवर्षात्मक आयुष्यमान होईल. हें आख्यान जो जाणेल त्याची अधर्मावर कधींही मति होणार नाहीं. व त्याचें मन निरंतर संतुष्ट असेल. असें या आख्यानाचें फल आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

३१५. अध्याय तीनशें पंधरा:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धर्मराजाच्या आज्ञेनें पांडव छद्मरूपानें एकवर्ष अज्ञातवास करण्याचा विचार करून आपल्यासन्निध राहिलेले जे तपस्वी ब्राह्मण व स्वभक्त यांस अंजलीपुट जोडून प्रार्थना करूं लागले कीं, हे विप्र हो आतां आह्मांस आज्ञा असावी. या दुष्ट धृतराष्ट्र पुत्रांनीं छद्मरूपानें संपूर्ण आमचें राज्य हरण करून द्वादश वर्षे वनवासास पाठविलें असतां आह्मीं द्वादश वर्षे वनवास करून अवशिष्ट तेरावे वर्षी अज्ञातवास करण्याची इच्छा धारण केली. याविषयीं आपली आज्ञा असावी. दुष्ट जो दुर्योधन तसाच कर्ण व शकुनी हे जेणेंकरून एक वर्षांत आह्मांस जाणणार नाहींत असा वेष धारण करून कोठें तरी वास केला पाहिजे नाहींतर या दुष्टांनीं आह्मांस ओळखलें असतां आजपर्यंत वनवास केलेला व्यर्थ जाईल. छद्मरूपानें आह्मीं राहिलों असतां

आमचा शोध करण्याविषयीं ते बहुत उपाय करतील यांत संशय नाहीं. असो आतां आम्हांस आज्ञा असावी. एक वर्ष अज्ञातवासाचें निवृत्त झाल्यावर तुम्हीं संपूर्ण आपआपल्या राष्ट्रांतून मला भेटण्यास यावें हीच प्रार्थना आहे असें धर्मराज भाषण करून मूर्छित झाला असतां संपूर्ण ब्राह्मण, भ्राते व धौम्य यांनीं राजास सावध केल्यानंतर धौम्य भाषण करतो हे राजा, तूं मोठा विद्वान, दांत, सत्यप्रतिज्ञ व जितेंद्रिय असतां अशा मोह सागरांत निमग्न झालास हें काय? कितीही आपत्ति प्राप्त झाली तरी तुझ्यासारखे विद्वान् मोह पावत नाहींत. देवासही संकट काल आलें असतां त्यांनीं कपटरूपें धारण करून शत्रूचा निग्रह केला. पाहा बरें, विष्णूनें अश्वाचें शिर धारण करून देवांचें कल्याण केलें. भगवंतानें कपटानें वामनरूप धरून बलीचें राज्य हरण केलें. दशरथाचे घरीं विष्णूनें कपट रूप धारण करून दशग्रीवाचा नाश केला. तसा तूंही छद्मरूप धरून आपल्या शत्रूंस जिंकशील. अशी नानाप्रकारचीं युक्तीचीं भाषणें व दृष्टांत इहीं करून धौम्यानें धर्मराजास संतुष्ट केलें असतां भीमसेन भाषण करतो हे राजा, हा गांडीव धन्वा अर्जुन कोण आहे? तो पाहा. तसाच मी तुझी आज्ञा उल्लंघन करून कधींही गेलों नाहीं. नकुल सहदेव हेही तसेच तुझी आज्ञा परिपालन करीत असून शत्रूंचा विध्वंस करण्याविषयीं त्यांस सामर्थ्य आहे. ज्या ज्या कार्याविषयीं राजा तूं आम्ची योजना करशील तीं तीं कार्यें आम्हीं करून शत्रूचा नाश करूं असें भीमसेनाचें भाषण ऐकून ब्राह्मणांनीं पांडवांस आशिर्वाद दिल्हे. आणि समग्र यती, सन्यासी व ब्राह्मण आपआपल्या आश्रमीं गेले. नंतर पांडव धौम्य व द्रौपदी इतकेच एक कोशमात्र पूर्वींच्या आश्रमापासून पुढें जाऊन आतां छद्म रूपें कशीं धारण करावीं. कालदेश व वर्तमान पाहून काय तें केलें पाहिजे. असा विचार करीत बसले असा विषय या अध्यायांत आहे.



## वनपर्व समाप्त.

श्री

# विराटपर्व.

१ अध्याय पहिला.— जन्मेजय राजा प्रश्न करितो; हे वैशंपायन ऋषे, आमचे प्रपितामह दुर्योधनाच्या भयानें पीडित होऊन विराट नगरा मध्यें गुप्तरूपें कसे राहिले? तशीच पतिव्रता द्रौपदी अज्ञात कशी राहिली? हें मला सांगा असा प्रश्न करून वैशंपायन सांगतात, हे नराधिपा, धर्मश्रेष्ठ जो धर्मराजा यास यमधर्मापासून वर मिळाल्यानंतर ब्राह्मणांस तें वर्तमान सांगून अरणी त्या ब्राह्मणांस दिल्या. नंतर सर्व बंधूंस एकत्र करून त्यांस भाषण करितो तें असेंकीं, आपण राज्यभ्रष्ट होऊन बारा वर्षें झालीं. हें तेरावें वर्ष परम दुःखदायकपास झालें आहे, या वर्षी शत्रूंनीं आपणास नजाणतां वास करणें कठीण आहे. हे अर्जुना, शत्रू आपणास न जाणतील अशी योजना करून मला सांग. असें धर्माचें भाषण श्रवण करून अर्जुन बोलतो. हे मनुजाधिपा. यमधर्माच्या वरप्रदानें करून मनुष्यांमध्यें आपण कोठें ही राहिलों तरी आपल्यास कोणीं ओळखणार नाहीं; तथापि अज्ञातवास कोठें करावा याविषयीं मी कांहीं राष्ट्रें सांगतो. कुरुदेशाचे आसमंतात पांचाळ, चेदि, मत्स्य, शूरसेन, पटच्चर, दशार्णनवराष्ट्र, मल्ल, शाल्व, युगंधर, कुंतिराजाचें राष्ट्र व अवंती इत्यादिक परम रमणीय बहुत अन्नानें समृद्ध असे देश आहेत त्यांतून हे राजा, तुझ्या इच्छेस वाटेल तो सांग? ह्मणजे आपण तेथें एक संवत्सर पर्यंत वास करूं. असें अर्जुनाचें भाषण श्रवण करून युधिष्ठिर भाषण करितो कीं, हे महाबाहो, यम धर्माचे वरप्रदानानें आपल्यास कोणी ओळखणार नाहीं. ही गोष्ट सत्य आहे परंतु आपल्यास निर्भय, सर्वांस सुख होईल असें रमणीय स्थळ सर्वांनीं मिळोन चिंतित करावें. मला असें वाटतें कीं, मत्स्य देशाचा राजा विराट धर्मशील, दानशूर, वृद्ध, पांडवांचे ठाईं अनुरक्त व निरंतर प्रिय असा आहे. यास्तव हे अर्जुना, त्याचे नगरा मध्यें एक संवत्सर पर्यंत वास करून त्याचीं दास्य कर्में करीत कालातिक्रमण करूं. आतां विराट गृहीं कोण कोण कस कशीं दास्यकर्में करणार तीं पृथक् पृथक् सर्वांनीं निवेदन करावीं. असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून अर्जुन

बोलतो. हे राजा, तूं मृदु, दानशूर, धार्मिक, सत्य, पराक्रमी, बुद्धिमान् असा असून त्याचे राष्ट्रामध्यें काय कर्म करणार तें सांग? असें अर्जुनाचें भाषण श्रवण करून धर्मराजा भाषण करितो. हे कुरुनंदन हो मी विराट नगरीं जाऊन कंक या नामानें राजाचा सभासद होऊन राहीन. मला अक्ष ( फांसे ) यांची विद्या बृहदश्व ऋषी पासून प्राप्त जाहली आहे व द्यूत क्रीडा मला प्रिय आहे. मीं पूर्वी युधिष्ठिर राजाचा प्राणासम सखा होतों, असें राजानें मला कदाचित् पुसलें तर सांगेन. हें माझें कर्म मी सांगितलें, आतां हे वृकोदरा ( भीमा ) तूं विराट राजा जवळ कसा रहाशील तें सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

२ अध्याय दुसरा— भीमसेन भाषण करितो कीं, हे राजा, पौरोगव असें मीं आपलें नांव ठेवून विराटाचे गृहीं राहीन. मी स्वयंपाक गृहामध्यें राहून सुशिक्षीत पणें स्वयंपाक करून नाना प्रकारच्या व्यंजनादि पदार्थ करून राजाचें मनरंजन करीन व मोठ मोठे काष्ठाचे भारे आणीन हें माझें विपुल अमानुष कर्म पाहून राजा माझी योजना यथास्थीत करील. भक्ष्य, अन्न, पान, रस, इत्यादिकांचा स्वामी मी राज गृहीं होईन. तसेच बलवान् गज व वृषभ इतरांस आकर्षण करण्यास जे अशक्य असतील त्यांस राजानें आज्ञा केली असतां मी सहज आकर्षण करीन. तसेच मल्लक्रीडे करितां जे-जे कोणी माझे समोर आणून राजा उभे करील त्यांशीं राजाची प्रीती वाटावी ह्मणून त्या सर्वांचा पराभव करीन पूर्वी मी युधिष्ठिराचे गृहीं प्रकृतीचे गुण दोष सूचक किंवा हस्तीचा दमन कर्ता गद्य पद्यात्मक वाणीचा योजक स्वयंपाककर्ता मल्लयुद्ध करणारा होतों असें सांगेन आणि आपलें स्वरूप रक्षण करून विराटाचे गृहीं राहीन अशीमी प्रतिज्ञा करितों. या प्रकारें भीमसेनाची प्रतिज्ञा श्रवण करून धर्मराजा अर्जुनाकडे पाहून भाषण करितो. पूर्वी जो अग्नी ब्राह्मणाचें स्वरूप धारण करून खांडव वन दहन करण्या करितां शरण आला असतां ज्यानें कृष्णा सहवर्तमान अग्नीचे मनोरथ पूर्ण केले असा जो महाबलवान कुंती पुत्र धनंजय तो काय कर्म करील. आयुधामध्यें वज्र जसें श्रेष्ठ, ह्रदांमध्यें समुद्र जसा श्रेष्ठ, गजा मध्यें ऐरावत जसा श्रेष्ठ,

पक्ष्यांमध्यें जसा गरुड श्रेष्ठ आहे तसा योध्यांमध्यें अर्जुन श्रेष्ठ इत्यादि ना ना प्रकारें अर्जुनाची स्तुती करून हा आतां विराटाचे गृहीं काय कर्म करील, असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून अर्जुन भाषण करितो. प्रत्यंचेच्या ताडणें करून माझ्या हस्तास घट्टे पडलेले आहेत त्यांचें आच्छादन करण्यास अशक्य यास्तव कंकणें करून त्यांचें आच्छादन करीन. कर्णाचे ठायीं अग्नि समान कांतीचीं कुंडलें धारण करीन. आणि बृहन्नडा असें मी आपलें नांव सांगेन, मस्तकाचे ठाईं वेणी धारण करीन, मायें करून कपटानें आपले शरीराचें रक्षण करून विराट गृहीं पूर्व राजांचे वृत्तांत सांगून राजाचें व अंतःपुर संबंधीं जनाचें मनरंजन करीन. गीत, नृत्य व नाना प्रकारचीं वाद्यें वाजविणें इत्यादि विराटाच्या नगर संबंधीं स्त्रियांस शिकवीन. प्रजांमध्यें बहुत प्रकारचें असें मी कर्म केलें आहे ह्मणून सांगेन, कपटें करून मी आपला पुरुष वेष आच्छादन करीन आणि युधिष्ठिराचे गृहीं मी पूर्वीं द्रौपदीची दासी होत्यें असें राजा नें विचारिलें तर सांगेन, आच्छादित अग्नी जसा गुप्त राहातो तसा मी आच्छादित होऊन विराट राजाचे गृहीं स्वस्थ करून वास करीन. असा विषय या अध्यायांत आहे.

३ अध्याय तिसरा:— वैशंपायन सांगतात; हे जनमेजयराजा, याप्रकारें अर्जुनाचें भाषण श्रवण करून युधिष्ठिर पुनः बंधूस भाषण करितो; हे नकुला, तूं फार सकुमार, शूर, दर्शनीय, सुखवास उचित असा आहेस तर त्या विराटाचे राज्यांत गुप्त रूपें कसा वास करिशील? असें भाषण श्रवण करून नकुल बोलतो; हे राजा, मी विराटाचा अश्वबंधक (सूतांमध्यें मुख्य) तसाच मी अश्वाचें लक्षण जाणण्या विषयीं कुशल आहे यास्तव मी आपलें नांव ग्रंथिक असें प्रसिद्ध करीन. अश्वाचे परीक्षे विषयीं व शिक्षे विषयीं मी कुशल आहें, जे लोक मला विराट नगरा मध्यें बोलावतील त्यांस हें मी आपलें कर्म सांगून यथेच्छ क्रीडा करीन आणि पूर्वीं मला युधिष्ठिरानें अश्वांचा अधिकार दिला होता असें सांगून गुप्तरूपानें संचार करीन. असें नकुलाचें भाषण श्रवण करून युधिष्ठिर भाषण करितो; हे सहदेवा, तूं विराट गृहीं कसा वास करिशील व काय कर्म करिशील तें सांग? नंतर सहदेव भाषण करितो; हे

राज्ञा, मी विराटाचे गृहीं गोसंख्याता होईन व गो परिक्षेंत कुशल आहें, म्ह- णून तंतिपाल असें आपलें नांव प्रसिद्ध करीन. हे धर्मराजा, तूं मला पूर्वी गो समुदाय रुत्या विषयीं अधिकारी योजिला होतास तेव्हां पासून सर्व माझें कौशल्य तुला विदितच आहे. गायींचीं लक्षणें व मंगल चिन्हें व अन्यही सर्व मी जाणतों. तशीच लोकांमध्यें पूजित वृषभाची परीक्षा मला ज्ञात आहे. वृष भाच्या मूत्र आघ्राणें करून वंध्या गाय जरी असली तरी ती प्रसवत्ये हें सर्व- मी जाणतों. अशा प्रकारें करून विराट गृहीं राहावें अशी माझी इच्छा आहे. मी विराटराजाचे घरीं राहिलों असतां कोणी मला न जाणतां राजाच्या मना- चा संतोष करीन. असें सहदेवाचें भाषण श्रवण करून धर्मराजा भाषण करितो, ही आमची प्राणाहून प्रिय भार्या द्रौपदी सकुमार बाल्यावस्थे मध्यें निरंतर राहणारी, राजकन्या, यशस्विनी, पतिव्रता, महाभाग्यवान्, विलासव ती जाहल्या दिवसा पासून गंधमाल्यें, अलंकार व नाना प्रकारच्या वस्त्रादिकां चा उपभोग करणारी, ती गुप्तरूपें करून विराटाच्या गृहीं कशी वास करील. असें युधिष्ठिराचें भाषण श्रवण करून द्रौपदी बोलत्ये. हे राजा, लोकां- मध्यें सैरंध्री स्त्रिया रक्षण करण्यास जशा योग्य होतात तशा अन्य स्त्रिया होत नाहींत असें जाणोन मी सैरंध्री या नामानें प्रसिद्ध होऊन राहीन, राजा- नें मला विचारिलें असतां युधिष्ठिराचे घरीं द्रौपदीची मी परिचारिका होत्यें अ- सें सांगेन, वेणी घालण्याचे कामामध्यें मी कुशल आहें असें सुदेष्णेस सांगो- न तिजपाशीं राहिल्यें असतां ती माझें रक्षण करील. मजविषयीं तूं कांहीं दुः खी होऊं नको. असें सैरंध्रीचें भाषण श्रवण करून धर्मराज भाषण करितो कीं, हे कृष्णे तूं उत्तम कुलवती आहेस तुझें भाषण मला फार चांगलें रुचलें. साधू व्रताचे ठायीं तूं स्थित आहेस ह्मणोन हे साध्वी, तूं कांहीं पापकर्म जाणत ना हींस. जेणें करून ते दुष्ट पापी आपल्यास ओळखून सुखी होणार नाहींत - असें कर इतकेंच तुला सांगणें आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

४ अध्याय चवथा- युधिष्ठिर राजा आपले बंधूंस भाषण करितो, हे बांधव हो, जीं जीं कर्मे तुह्मी करणार तीं तीं मला निवेदन केलीत तीं माझ्या ही मनास आलीं आतां आपला पुरोहित धौम्य अग्निहोत्राचें रक्षण करून

पाक निष्पत्ती करणारे यां सहवर्तमान द्रुपद राजाचे गृहीं जाऊन वास करो. इंद्र-सेन प्रमुख आप आपले रथ घेऊन द्वारकेस जावोत. तशाच द्रौपदीच्या परि-चारिका पांचाल देशास जावोत. सर्वांनीं असें सांगावें कीं, पांडव कोठें गेले ते आह्मांस ठाऊक नाहींत. द्वैतवना पासून त्यांणीं आह्मांस सोडिलें. वैशंपाय न सांगतात; हे जनमेजया या प्रमाणें पांडवांनीं जीं जीं कर्में आपल्यास कर्त व्य त्याचा विचार करून तें सर्व वृत्त धौम्यास निवेदन केलें असतां धौम्य पांड-वांस बोलतो कीं, हे पांडवहो, ब्राह्मणाची सेवा तशीच विजय यात्रा. या विष यीं जें कर्तव्य तें तुह्मीं करीतच आहां; परंतु हे धर्मराजा, विशेषें करून तुह्मा प्रतकेंच सांगणें आहे कीं, तूं व फाल्गुन या उभयतांनीं कृष्णेचें अवश्य संर-क्षण करावें. लोक वृत्त सर्व तुह्मीं जाणतच आहां. तथापि सुहृदानीं परम प्री-तीनें तोच अर्थ सूचवीत असावा. हेच त्यांचे सनातन धर्म, अर्थ, काम, होय. हे राज पुत्र हो, राज गृहीं कसें रहावें या विषयीं तुह्मांस कांहीं एक नीती सांगतो ती श्रवण करा. राजाचे गृहांत प्रवेश करते वेळेस द्वारांत कोणी आहे किंवा ना-हीं असें पाहून दूत द्वारा राजास निवेदन करून नंतर आंत प्रवेश करावा. राजाची ममता माझ्यावर आहे असा भरवसा मानून राजा जरी अंतःपुरां त असला तथापि मी तेथें गमन करीन असा निश्चय करूं नये. कारण रा जाचा विश्वास नाहीं, जें आपल्यास बसावयास आसन नेमून दिलें असेल तेथें जाऊन बसावें. दुसऱ्याच्या आसना विषयीं इच्छा करूं नये. मी राजाचे म-र्जीतील आहें असें जाणोन वाहन, पलंग, पीठ, गज अथवा रथ यांजवर आ-रोहण करूं नये. हे पदार्थ राजानें दिले असल्यास मात्र आरोहण करण्यास चिंता नाहीं. अशा रीतीनें जो राहातो तो राज गृहीं वास करण्यास योग्य होईल. जा स्थळीं आपण बसल्यानें दुसरे लोक आपल्यावर दुष्ट शंका करितील त्या स्थळीं आपण बसूं नये. अशा रीतीनें जो वागेल तो राजगृहीं वास करण्यास-योग्य होईल. राजानें प्रश्न केल्या वांचून आपण उगीच भाषण करूं नये. मुग्ध-बसावें. प्रसंगो पात्त स्तुती करावी. अनृत वादी पुरुषाचा राजे अवमान करिता त. अनृत वादी मंत्री जरी असला तथापि त्याचा अवमान राजे करितात. रा-जस्त्रियांशीं मैत्री करूं नये. तसेच अंतःपुरांतील लोक व राजाचा जाजवरवजेरा

जाशीं द्वेष करितात त्यांच्यांशीं आपण मैत्री करूंनये. राजास जीं कार्यें आवडतात तीं केलीं असतां चिंता नाहीं. या प्रकारें विचार पूर्वक जो राजा पाशीं राहतो, त्याची मान हानि होत नाहीं, राजा पासून जरी उत्तम योग्यता आपल्यास मिळाली आहे तथापि राजा पाशीं गेलें असतां राजानें बैस अशी आज्ञा दिल्या वांचून बसूंनये, कारण आपला पुत्र, नातू अथवा बंधू असून तो आपली मर्यादा जर न ठेवील तर राजाही त्याची योग्यता ठेवित नाहीं. देव, अग्नी यांची उपासना जशी करावी तशीच सत्यतेनें राजाची सेवा करावी, कारण कपट जर राजाच्या नजरेस आलें तर राजा त्याचा नाश करितो. आपला पोषण करणारा जो कोणी त्याज पाशीं कोप, प्रमाद, गर्व यांचा निरंतर त्याग करून राहावें, कार्याकार्य परीक्षेची वेळा आली असतां प्रिय जसें असेल तसें भाषण करावें. तेथें अप्रिय भाषण केलें असतां आपलें अहित होतें, सर्व गोष्टी विषयीं राजास अनुकूल असावें. त्यास जें अप्रिय असेल व जेणें करून त्याचें अहीत होत असेल त्या गोष्टी वारंवार काढूंनयेत पंडितानें असें कधींही मानूंनये कीं, मी राजाचा मोठा प्रिय आहें, त्याणें अप्रमत्त होऊन राजाचें जेणें करून प्रिय व हीत होत असेल त्याविषयीं उद्युक्त असावें. राजास जें अनिष्ट असेल तें कधींही करूंनये, राजाचें अहीत करणाराशीं भाषण करूंनये. आपलें स्थान असेल त्याचा परित्याग करूंनये अशा रीतीनें जो राहील तो राजगृहीं वास करण्यास योग्य होईल. राजाचे दक्षण भागीं, वाम भागीं अथवा पार्श्व भागीं पंडितांनीं बसावें, पृष्ठ भागीं बसूंनये कारण राजाचे रक्षण करणारे जे शस्त्रधारी त्यांचें तें स्थान आहे. राजास पाहण्याची जरी इच्छा आहे तथापि जे सूज्ञ आहेत त्यांनीं राजाच्या अग्र भागीं आसनावर बसूंनये. कांहीं एक राजानें गुप्तरूपें स्वगृहीं कृत्य केलें असेल त्याची उगीच वाच्यता करूंनये, कारण असें जे करणारे त्यांचें राजा हनन करितो. आपल्यास पंडीत मानून घेणारे असतील त्यांचा अवमान राजा करितो, दरिद्री लोकांचें अनृत भाषण करणें हें केवळ गृह आहे; परंतु राजा विषयीं वारंवार अनृत बोलूंनये. मी महाशूर व परम बुद्धिमान् आहें असें मानूंनये. राजाचे जर मनानुरूप वागलें तर तो राजा पासून सत्कार पावून त्यास प्रिय होईल. आपल्यास दुष्प्राप

व प्रिय वस्तू राजा पासून कदाचित् प्राप्त झाली तथापि तेणें करून कृतकृत्य न होता राजास हित व प्रिय जें असेल तेंच करून राहावें, त्याचा कोप झाला असतां महान बाधक होतो, प्रसाद झाला असतां मोठें सुख होतें. त्याचे भनें करून ही अप्रिय इच्छील असा कोण आहे बरें? राजसभेंत बसलें असतां जेणें करून आपलें चापल्य लोकांस दिसेल असे ओंठ हालवूं नयेत अपान द्वारें वायूचें विसर्जन मोठ्यानें करूं नये. मोठ्यानें थुंकूं नये, तेणें करून राजास कोप येतो. राज सेवकांनीं कांहीं एक वस्तु हास्य करण्या जोगी धारण केली असतां ती पाहून एका एकीं हास्य करूं नये, सूचविणें असल्यास मृदु पूर्वक सूचवावें, ज्यास कांहीं एक लाभ झाला असतां. हर्ष मानीत नाहीं व अपमान झाला असतां खेद मानीत नाहीं आणि राज सेवे विषयीं एकाग्रता धारण करितो तो राजगृहीं वास करण्यास योग्य होतो. राजाचे व राजपुत्राचे गूण वर्णन करणारा पुरुष राजास प्रिय होऊन अमात्य अथवा पंडित होऊन राजापाशीं राहातो. कोणी एक राजाचा अमात्य अधिकारावर असून पुढें तो राजाची गैर मर्जी होऊन प्रतिबंदीत झाला तथापि त्याणें राजाची निंदा करूं नये न केली असतां पुनः तो राज कृपेनें अधिकारावर प्राप्त होतो. जो कोणी राजाचा देशांत राहाणारा अथवा राजा पासून उपजीविका करणारा त्याणें राजाचे अपरोक्ष व प्रत्यक्ष गूण वर्णन करीत असावें. जो कोणी राजाचा अमात्य असतां जर तो राजाचें पद घेण्या विषयीं इच्छील तर तो फार दिवस आपले स्थानावर न राहातां आपले प्राणासही मुकेल, आपल्या कल्याणाची एकादी गोष्ट राजापाशीं बोलावयाची असल्यास योग्य स्थानीं राजा असेल त्या वेळेस राजानें स्तवन करून बोलावी. आणि आपलें कार्य करून घ्यावें. निरंतर उत्साहशील, बलवान्, शूर, राजाच्या छाये प्रमाणें त्याज समागमें असणारा, सत्यवादी, मृदु, इंद्रिय निग्रहवान् असे गूण ज्यापाशीं असतील तो राजगृहीं वास करण्यास योग्य होतो. कांहीं एक कार्या करितां राजानें दुसरे कोणास हांक मारिली असतां आपण पुढें होऊन ह्मणतो काय महाराज काय कार्य आहे, असें जो करील तो राजगृहीं वास करण्यास योग्य होईल. ज्यास राजानें धन दारांचे संरक्षणास अथवा दुसरे कां

हीं एक कार्यास पाठविलें असतां, निःसंशय निर्धास्तपणें जो तें कार्य करि- तो तो राजगृहीं वास करण्यास योग्य होतो. राजाच्या वेषा सारिखा वेष जो करि तो तो राजास प्रियहोत नाहीं. आपण प्रवासास गृहाचे बाहेर पडलें असतां गृहांतील सुखाचें वारंवार स्मरण करूंनये. आणि जरी दुःख झालें तरीं सु- खा सारिखें मानून राहावें. असें जो करील तो राजगृहीं वास करण्यास योग्य होईल. कांहीं एक कामावर राजानें आपणास नेमिलें असतां त्या कामांत ध- न स्पर्श करूंनये. तें द्रव्य राजा हरण करून त्यामनुष्याचें बंधन अथवा वध ही करितो. पात्र, वस्त्रें, अलंकार व दुसरे इतर पदार्थ जे राजानें आपल्यास दिले असतील ते धारण केले असतां राजास प्रिय होतो. हे पंडु पुत्र हो, मी सांगि तल्या प्रमाणें एक संवत्सर पर्यंत मनाचें नियमन करून त्या प्रमाणें कालक्र- मण करा ह्मणजे तुह्मीं आपले पहिले अधिकारावर येऊन स्वकीय देशांत प्र- वेश कराल आणि ऐश्वर्य लौकरच पावाल. असें धौम्यानें नीति युक्त भाषण श्रवण करून धर्मराजा भाषण करितो. हे धौम्य, तुमचें कल्याण असो तुह्मीं मोठे वक्ते आहां. आमची माता कुंती व महामति विदुर यांवाचून आह्मास- असा उपदेश करणारा कोणी नाहीं. फारचांगला तुह्मीं आमचावर अनुग्रह केलात. इतोत्तर आह्मीं दुःखा पासून तरून जाण्या विषयीं प्रस्थान करण्या विषयीं, आमचा विजय होईल याविषयीं जें कर्तव्य तें तुह्मीं करण्यास समर्थ आहांच. वैशंपायन सांगतात; हे जनमेजया असें धर्मराजानें भाषण केल्या- वर द्विजश्रेष्ठ जो धौम्य ऋषी याणें पांडवांच्या प्रस्थान कालीं जें कर्तव्य तें य- था विधि केलें. पांडवांस समृद्धी व वृद्धि तसाच लाभ याचें प्राप्त्यर्थ व पृथिवी- जयार्थ धौम्यानीं अग्नि प्रदीप्त करून समंत्रक होम केला. नंतर द्रौपदी सहवर्त मान धर्मराज, भीमसेन, अर्जुन, नकुल व सहदेव हे अग्नीस व तपोधन असे जे ब्राह्मण यांस प्रदक्षिणा करून व धौम्याची आज्ञा घेऊन तेथून गमन के- लें. नंतर धौम्यानीं पांडवांचीं अग्निहोत्रें घेऊन पांचाल देशांत गमन केलें, त- सेंच इंद्रसेन प्रमुख पांडवांचे रथ घेऊन यादव गृहीं गेले आणि सुखानें ते थें वास करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

५ अध्याय पांचवा:— वैशंपायन सांगतात; हे जनमेजया, धौम्याची

आज्ञा ग्रहण केल्यावर पांडव पदाती होऊन खड्गादि शस्त्रें व चिलखतें धारण करून आपला वनवास पूर्ण झालेले लोकरच स्वराष्ट्राची प्राप्ती व्हावी अशा इच्छेनें जातां जातां यमुनानदीचे दक्षण तीरास गेले. आणि गिरिदुर्गत शीच नाना प्रकारचीं वनें यांच्या ठायीं वास करीत करीत दशार्णव देश उत्तरेस आणि पांचाल देश दक्षिणेस टाकून यकृल्लोम व शूरसेन यांच्या मधून चालले असतां मार्गांत आह्मीं मत्स्यराजाचे व्याध आहोंत असें भाषण करीत गेले. हे राजा, धनुष्य, बाण, व खड्ग धारण करून श्मश्रू वाटलेले व शरीर कांती नष्ट झालेले असे जे पांडव ते मत्स्य देशाचा सन्निध गेले असतां मार्गांत द्रौपदी धर्मराजास भाषण करिते, हे राजा, विराट नगराकडे गेलेली ही पाऊल वाट दिसत्ये, व नाना प्रकारचीं शेतें ही दृष्टीस पडतात, राजधानी अद्याप दूर आहे असें वाटतें यास्तव आजची रात्र येथेंच राहून उदईक राजधानींत प्रवेश करूं तथापि मलाही श्रम झाले आहेत. असें द्रौपदीचें भाषण श्रवण करून धर्मराज अर्जुनास भाषण करितो, हे अर्जुना, सत्वर सिद्ध होऊन या पांचालीस स्कंधावर घे. वनापासून मुक्त जे आपण ते पुनः वनांत कशाकरितां रहावें राजधानींत जाऊन वास करूं. वैशंपायन सांगतात; हे जनमेजया, असें धर्मराजाचें भाषण श्रवण करितांच अर्जुनानें द्रौपदीस घेऊन विराट राजाचे राजधानी सन्निध येऊन तिला खालीं उतरली आणि आपण राजधानींत प्रवेश करीत असतां धर्मराज धनंजयास भाषण करितो. हे धनंजया, आपलीं आयुधें कोठें तरी ठेऊन नगरांत प्रवेश करावा. आयुधां सह वर्तमान आपण पुरांत गेलों तर लोक उद्विग्न होतील. कारण तुझें गांडिव संपूर्ण लोकांस विदित आहे, तें जर कोणीं पाहिलें तर ते तत्काळ आपल्यास जाणतील आणि पुनः आपणास द्वादश वर्षें वनवास करावा लागेल. आपल्यांतून एकास जरी कोणी ओळखिलें तरी पुनः बारा वर्षें वनवास करावा लागेल. अशी आपली प्रतिज्ञाच आहे, असें राजाचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो, हा शमीचा वृक्ष परम गहन आहे, इकडे कोणी मनुष्यें ही जात नाहींत व कोणास विदीत ही नाहीं, इकडे आडमार्ग असून व्याघ्रादि प्राण्यांचा संचार आहे, यास्तव या शमीवर आपलीं आयुधें ठेवून नगरांत प्रवेश करूं. अ-

सें अर्जुनानें धर्मराजाशीं भाषण केल्यावर सर्वांनीं आपलीं शस्त्रें शमीवर ठेविण्याचा निश्चय केला. नंतर त्यांची एकत्र मोळी बांधोन त्याजवर आपलें देदीप्यमान खड्ग व विपाठ बाण त्याधनुष्याच्या मोळीवर बांधले. नंतर नकुलास सांगितलें कीं, हे वीर, या शमीवर जाऊन ही आयुधांची मोळी ठेव. असें धर्मराजाचें भाषणश्रवण करून त्यानें शमीवर चढून तिचा ढोलींत तीं ठेविलीं आणि पर्जन्य जरी आला तथापि त्यांस लागूं नये व तीं खालीं पडूं नये ह्मणोन चांगल्या बळकट पाशानें बंधन केलीं. या प्रदेशांत कोणी येऊं न ये अशा हेतूनें एक मृत जाहालेल्या प्राण्याचें कलेवर त्या मोळीवर बंधन करून तेथून निघाल्यानंतर ही आमची माता एकशें ऐंशी वर्षांची होती ती मृत झाली ती या वृक्षावर आह्मीं बांधली आहे. असें मार्गामध्यें गोपालादिकांस सांगत सांगत पंडुपुत्र विराटनगराजवळ गेले आणि जय, जयंत, विजय, जयत्सेन, आणि जयद्बल अशीं युधिष्ठिरानें गुप्त नामें ठेवून आपले प्रतिज्ञे प्रमाणें त्या महान् नगरामध्यें प्रवेश करून विराट गृहीं तेरावे वर्षीं अज्ञातवास करण्यास-प्रवृत्त झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

६ अध्याय सहावा:— वैशंपायन सांगतात, हे जनमेजया, विराटनगरामध्यें पांडव प्रवेश करीत असतां धर्मराज आपले मनामध्यें देवीचें स्तवन करितो; हे दुर्गे नारायणवरप्रिये नंदाच्या कुळांत उत्पन्न झालीस ह्मणून-तुला मंगल्या ह्मणतात. कंसाचें विदारण करून असुरांचा क्षय केलास इत्यादि नाना प्रकारें स्तुती करून ह्मणतो, हे देवि राज्यापासून परिभ्रष्ट जाहलेला जो मी तुला मस्तकें करून नमस्कार करतों. हे पद्मपत्राक्षि मला संरक्षण कर. हे सत्ये तूं मजकारणें सत्य हो, हे शरण्ये, हे भक्तावर वात्सल्य करणारी हे दुर्गे माझें संरक्षण कर असें बहुत प्रकारें धर्मराजानें देवीचें स्तवन केलें असतां श्रीदेवीनें राजास दर्शन देऊन भाषण करूं लागली, हे धर्मराजा विराटनगरीं व संग्रामामध्यें तुझा लौकरच विजय होईल माझ्या प्रसादानें कौरवसैन्याचा नाश करून निष्कंटक पृथ्वीच्या राज्याचा लौकरच तूं उपभोग करिशील जसें तूं आतां माझें स्तवन केलेंस तसें जो कोणी प्रवास, नगर, संग्राम, शत्रुसंकट, अटवी, दुर्ग, कांतार, सागर, गिरी इत्यादिकांचे

ठायीं माझें स्मरण करितील त्यास या लोकीं कांहीं दुर्लभ ह्मणोन राहणार नाहीं. हें स्तोत्र भक्ती करून जे श्रवण करितील अथवा पठण करितील त्यांचीं सर्व कार्यें सिद्धीस जातील. हे पांडव हो, माझ्या प्रसादें करून तुह्मी विराटनगरीं असतां कौरव अथवा इतर कोणी जन तुह्मास जाणणार नाहींत. या प्रकारें पांडवांस वर दान युक्त भाषण करून व कल्याणप्रद हस्तानें त्यांचे शरीरास स्पर्श करून आपण तेथेंच अंतरधान पावली. या अध्यायांत असा विषय आहे.

७ अध्याय सातवा.— वैशंपायन सांगतात; हे जनमेजया, विराट राजा सभेंत बसला असतां प्रथम कौरव वंशाची वृद्धि करणारा महा यशस्वी राजांनीं सत्कार करण्यास योग्य, महाभ्रामध्यें अथवा भस्मामध्यें जसा आच्छादित अग्नि तसा धर्मराज वैडूर्य मण्यांचीं सोंगटीं व सुवर्णमय फांसे वस्त्रामध्यें गुंडाळलेले कक्षेमध्यें ग्रहण करून महा यशस्वी जो विराट राजा याचे सन्मुख आला. तेव्हां राजा त्यास पाहून अभ्रामध्यें आच्छादित हा चंद्र काय! असा कांहीं काळ पर्यंत तर्क करीत सभेमध्यें जे द्विज व सूत बसले होते त्यांजकडे पाहून प्रश्न करितो हा माझ्या सभेकडे पहात कोण येत आहे तो पहा, राजासारिखा हा मला दिसतो, हा कांहीं द्विज नव्हे असें मला वाटतें. बरें हा राजा ह्मणावा तर याचे समागमें दास, रथ, गज, हे कांहींच नाहींत. हा इंद्रासारिखा केवळ भासतो, याचा शरीर चिन्हें करून तर हा राजा असें वाटतें. पहा हा निर्भयपणें आमच्या समीप येतो, असा विराट राजा सभासदांसीं भाषण करीत आहे तों इतक्यांत धर्मराज सभेमध्यें येऊन विराटराजास ह्मणतो; हे राजा मी ब्राह्मण आहे, माझी जी जीविका होती ती सर्व नष्ट झाली, यास्तव आतां तुझे सन्निध वास करावा अशी इच्छा करीत आहें, असें भाषण श्रवण करून विराटराजा हर्ष पावला आणि उत्तम आहे असें बोलून त्याचा स्विकार केला. नंतर प्रीतीकरून त्या राजसिंहास पुनः भाषण करितो; हे तात, कोणत्या राजाच्या देशांतून येथें आलास, तुझें गोत्र व नांव काय? आणि तुझ्या मध्यें काय कौशल्य आहे तें मला सांग? असें विराटानें भाषण श्रवण करून युधिष्ठिर भाषण करितो; हे राजा, पूर्वीं मी युधिष्ठिराचा सखा वैय्याघ्रपद्य या नामें करून ब्राह्मण होतों, मी द्यूत क्रीडेमध्यें बहूत कुशल आहें. माझें नांव कंक ही प्रसिद्ध आहे, असें ब्राह्मणानें भाषण श्रवण करून

राजा भाषण करितो, हे ब्राह्मणा तूं जो वर मागशील तो मीं तुला देतों. तूं मत्स्य देशींच जनांचें पालन करावेंस मी तुझ्यास्वाधीन आहें, माझ्या गृहीं द्यूत क्रीडा करणारे असे बहूत द्यूत कर्ते असून त्यामध्यें मला प्रिय असेही कांहीं आहेत त्यांमध्यें तूं क्रीडा करावीस. तूं केवळ देवासारिखा मला दिसतोस यास्तव मजपाशीं राहण्यास योग्य आहेस. असें विराटाचें भाषण श्रवण करून युधिष्ठीर भाषण करितो, हे राजा, द्यूतामध्येंतर प्रथम वाद प्रवृत्त होतो यास्तव जेणें करून वाद होणार नाहीं असें मीं द्यूत करण्यास इच्छित आहें, जे जे मी द्यूतांत जिंकीन त्याणीं कोणी ही माझें द्रव्य घेऊंनये, मी कलहास बहुत भितों हें तूं सत्य जाणोन माझें द्रव्य मला देववीत जावेंस, असें युधिष्ठिराचें भाषण श्रवण करून विराटराजा भाषण करितो, हे ब्राह्मणा, जर कोणी तुझें अप्रिय करील तर त्यास मी अवश्य मारीन अथवा ब्राह्मण असल्यास त्यास आपल्या देशांतून काढून देईन, हें माझें भाषण माझ्या देशांत राहणारे सर्व श्रवण करोत. जसा मी माझ्या देशाचा राजा आहें तसा हा कंक प्रभुस्थानींच आहे असें जाणावें. हे ब्राह्मणा, तुला माझ्या सारखीं बहूत वस्त्रें व अन्न पानें, मजपासून मिळतील, तूं अंतःपुरांत जाऊन स्त्रिया व द्रव्य इत्यादिकांची चौकशी घेवीत जा, तसेंच बाहेर भागीं जें सैन्य व आरामादिक जीं स्थळें आहेत त्यांची चौकशी करीत जा, तुला कोठें ही प्रतिबंद नाहीं, जो कोणास पूर्वीं क्षेत्रादीक दान करून पुनः त्याचीं क्षेत्रें हरण केलीं असतां ते नर तुला येऊन निवेदन करितील तर त्यांची तूं चौकशी करून त्याचें सर्व मला कळवीत जा. मज जवळ तूं रहात असतां इतरांपासून तुला कांहीं भय नाहीं. असें विराटा पासून आश्वासन झाल्यावर धर्मराज परम सुखानें युक्त होऊन धैर्यें करून विराट गृहीं रहात असतां तें चरित्र कोणाचा ही समजण्यांत आलें नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

८ अध्याय आठवा :— वैशंपायन सांगतात, हे जनमेजया, नंतर दुसरा भयंकर बलवान् सुशोभित व सिंहासारिखा पराक्रमी भीमसेन, हस्तामध्यें खजा ह्मणजे हस्ता सारिख्या आकाराचा अंगारक्षेपक दंड, दर्वी (पळी) हस्तामध्यें धरून परम तेजस्वी आचाऱ्याच्या रूपानें जसा सूर्य लोकांस प्रकाशित करतो तसा तो कृष्णवर्ण वस्त्र धारण केलेला मेरूपर्वता सारिखा कठीण-

देही, विराट राजा समोर येऊन उभा राहिला असतां त्यास पाहून, विराट राजा सभासद लोकांस ह्मणतो. हा कोण पुरुषश्रेष्ठ, रूपवान्, तरुण, सिंहासारिखा उच्च स्कंधाचा व काय कर्म करणारा आहे? तुह्मीं तरी त्यास लौकर पुसून मला कळवा, असें राजवाक्य श्रवण करतांच सभेंतून कोणी शीघ्रगामी मनुष्यें भीमसेना जवळ जाऊन त्यास पुसतात तों इतक्यांत भीमसेन, विराट राजाजवळ येऊन मोठ्या धैर्यानें भाषण करितो कीं, हे राजा, मी बल्लव या नामानें आचारी आहें मी उत्तम प्रकारचा पाक करितों, तूं माझा संग्रह कर, असें भीमसेनाचें भाषण श्रवण करून विराट राजा भाषण करितो; हे बल्लवा, तूं आचारी आहेस असें मला वाटत नाहीं, सहस्त्रनेत्र इंद्रा सारिखा तूं मला भासतोस. रूप, संपत्ती व पराक्रमेंकरून तूं मनुष्यां मध्यें श्रेष्ठ आहेस. असें विराटराजानें भाषण श्रवण करून भीमसेन भाषण करितो; हे राजा, माझें कर्म बल्लवाचें आहे. पूर्वीं मी जा कालीं युधिष्ठिराजवळ होतों त्या कालीं युधिष्ठिरानें माझ्या हातचा पाक भक्षण केला आहे, व माझा सारिखा बलवान् कोणी नाहीं, धर्मराज मजकडून गज व सिंहाशीं मल्लयुद्ध करवीत होता, असें भीमसेनाचें भाषण श्रवण करून- विराट राजा भाषण करितो. हे बल्लवा, तूं फार चांगलें भाषण केलेंस, माझा पाकशाळेमध्यें तूं मुख्य होशील, हा तुला मी वर देतों; परंतु हें कर्म तुझ्यायोग्य आहे असें मला वाटत नाहीं. कारण तूं समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य करण्यास- योग्य आहेस, परंतु जापेक्षां माझा महानसा (पाकगृहा) मध्यें तुझी राहण्याची इच्छा आहे त्या पेक्षां तूं माझ्या महानसा मध्यें मुख्य होऊन तेथें पूर्वींचीं जीं मनुष्यें आहेत तीं तुझे आज्ञेत राहतील, असें विराट राजानें भाषण श्रवण करून भीमसेन त्याचे महानसा मध्यें राहून राजास परम प्रिय झाला. तथापि कोणीही त्यास जाणिलें नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

९ अध्याय नववा.— वैशंपायन सांगतात; हे जनमेजया, नंतर द्रौपदी आपले कुरळ, कृष्णवर्ण, सूक्ष्म, मृदु, दीर्घ व आकुंचिताग्र केश गुंडाळून उजवे स्कंधावर टाकलेले व एक वस्त्र परिधान केलेल्या सैरंध्री चा वेषानें दुःखीत जाहल्या सारखी मार्गामध्यें चालली असतां तीस ग्रामवासी पुरुष व स्त्रिया यानीं- पाहतांच सन्निध जाऊन तिजला पुसूं लागल्या कीं, तूं कोण आहेस व, कशाची इ

च्छा करित्येस असें स्त्रियांचें व पुरुषांचें भाषण ऐकून द्रौपदी त्यांस ह्मणत्ये कीं, मी सैरंध्री आहें, जो मला कोणी कांहीं एक कार्य करण्याची योजना करून ठेवील तर मी त्याचे गृहीं राहून तें कार्य करण्याची इच्छा करीत आहें, इतक्यांत विराटराजाची स्त्री परम योग्य कैकेयी तिणें आपले वाड्यावरून द्रुपद राजाचे कन्येस पाहून व मधुर भाषण श्रवण करून लुब्ध झाली आणि ती एकवस्त्र नेसलेली अनाथ आहे असें जाणून तिला आपले जवळ बोलावून ह्मणत्ये; हे भद्रे, तूं कोण आहेस व कशाची इच्छा करित्येस असें कैकेयीचें भाषण ऐकून द्रौपदी बोलत्ये कीं, मी सैरंध्री आहें, कोणी मला कांहीं एक कार्य करण्याची योजना करून ठेवील तर त्याचे गृहीं राहून तें कार्य मी करीन असें तिचें बोलणें ऐकून सुदेष्णा भाषण करित्ये; हे भामिनी, तूं ह्मणत्येस कीं, मी सैरंध्री आहें; परंतु अशी सैरंध्री कोठें पाहिली नाहीं, तूं अन्यदास व दासी यांजकडून सेवा करविणारी दिसत्येस, जीं लक्षणें सामुद्रिक शास्त्रांमध्यें सांगितलीं आहेत त्या प्रमाणें तुझे ठायीं भासतात, तीं लक्षणें तुला सांगत्यें श्रवण कर. हात पायांचे तळवे, नेत्रांचा प्रांतभाग, ओष्ठ, जिव्हा व नखें हीं तुझीं पांच स्थानें आरक्त दिसतात; नासिका, नेत्र, कर्ण, नखे, स्तन व ललाट हीं तुझीं साहा स्थानें उच्च आहेत, तूं षोडश वार्षिकी स्त्री सारखी दिसत्येस शरत्कालीं प्रफुल्लित कमलें जशीं शोभतात तसे तुझे लोचन सुशोभित दिसतात, शरदोत्पल संबंधीं जसा गंध फार उत्तम असतो तसा तुझ्या शरीरास गंध आहे, शारदोत्पलानें सेवन करणारी अशी तूं साक्षात् लक्ष्मी सारखी आहेस. इत्यादि नानाप्रकारें तिचे लक्षणांचें वर्णन करून ह्मणत्ये हे भद्रे, तूं कांहीं दासी नव्हेस यक्षिणी, देवी, गंधर्वी अप्सरा, देव कन्या, इत्यादि वर्णन केलेल्या देवांदिकांच्या स्त्रियांत तूं कोण आहेस तें मला सांग, असें सुदेष्णेचें वाक्य ऐकून द्रौपदी बोलत्ये; हे सुदेष्णे, मी देवी, गंधर्वी, अप्सरी, राक्षसी यांतून कोणी नाहीं. सेवा करण्यास योग्य अशी सैरंध्री आहें, मी केश चांगले राखण्या विषयीं जाणत्यें, चंदन उत्तम प्रकारें उगाळित्यें व नाना प्रकारच्या उत्तम शोभायमान चित्र विचित्र माळा गुंफित्यें, पूर्वी कृष्णास्त्री सत्यभामा व पांडवांची स्त्री सुंदरी जी द्रौपदी, यांचें मी आराधन केलें होतें तेथें मला उत्तम भोजन व वस्त्रें मिळत होतीं माझें नांव मालिनी असें स्वतः द्रौपदीनें ठेविलें होतें.

हे सुदेष्णे आतां मी तुझ्यागृहीं आल्यें आहे, पूर्वी सांगितलेलीं तीन कर्में मी करीन असें द्रौपदीचें भाषण श्रवण करून सुदेष्णा बोलली, हे स्त्रिये राजानें तुजकडे पाहून तुझी इच्छा न केली तर मी तुझें रक्षण करीन, कारण त्या राजगृहीं ज्या स्त्रिया आहेत त्या तुला पाहून मोह पावतात. मग पुरुषां मध्यें कोण मोहित होणार नाहीं. हे सुश्रोणी, विराटराजा तुझें हे अमानुषरूप अवलोकन करतांच मला सोडून सर्व प्रकारें तुझी इच्छा करील, हे वरारोहे, तूं अति सुंदरांगी व अति विस्तीर्ण नेत्रा आहेस, जाकडे तूं अवलोकन करिशील तो कामाचे स्वाधीन होईल; हे चारुहासिनी, वृक्षारोहण जसें आपले वधाचें कारण आहे तसें राजगृहीं तुझें रक्षण करणें मला वाटतें. जशी खेकडी आपल्या मृत्यूस्तव गर्भ धारण करिते तसा तुझा वास माझ्या गृहीं जाण. असें सुदेष्णेचें वाक्य ऐकून द्रौपदी बोलली, हे सुदेष्णे. मी विराट राजाच्या अथवा अन्य पुरुषाच्या स्वाधीन होणार नाहीं. कारण माझे पती पांच गंधर्व राजाचे पुत्र तरूण व महा बलवान् असे आहेत ते माझें नित्य रक्षण करितात. जो माझ्यावर पाप दृष्टी ठेवील त्यास ते गंधर्व परम दुःख देतील. ज्याचा गृहीं मी वास करीन असतां जे मला उच्छिष्ट भक्षण करण्यास देणार नाहींत व माझ्याकडून पाय धुवविणार नाहींत त्याजवर ते संतुष्ट असतील, जो पुरुष अन्य स्त्री सारखी मला मानून धर्षण करील तर तो त्याच रात्रीस यमलोकास जाईल. ते गंधर्व परम बलवत्तर व माझे प्रिय आहेत ह्मणोन मी कोणाच्यानें ग्रहण केली जाणार नाहीं. ते गुप्त रूपें करून माझें रक्षण करितात. असें भाषण श्रवण करून सुदेष्णा बोलली, हे नंदिनी तुझी इच्छा आहे त्याप्रमाणें मी तुला आपले गृहीं ठेवितें असें तिचें बोलणें ऐकून द्रौपदी पती धर्में करून विराट गृहीं वास करीत असतां तिला तेथें कोणीही जाणलें नाहीं अशी कथा या अध्यायांत आहे.

१० अध्याय दाहावा— वैशंपायन सांगतात; हे जनमेजया, नंतर सहदेवही गोपांचा वेषधरून गोपांची भाषा बोलत बोलत विराटाकडे गमन करण्याच्या इच्छेनें प्रथमतः गाईंचा गोठा होता तेथें जाऊन उभा राहिला असतां राजा त्याजकडे पाहून आपलेकडे आणण्या करितां सेवकांस आज्ञा करितांच त्याणीं त्यास राजाजवळ आणिला. तो परम देदीप्यमान, राजानें पाहून त्यास पुसतो- तूं कोण आहेस, कोठून आलास, काय कर्म करण्याची तुझी इच्छा आहे? असा

मीं पूर्वीं कोणीही पाहिला नाहीं. असें राजवाक्य ऐकून मेघासारिख्या गंभीर वाणीनें सहदेव भाषण करितो, हे राजा मीं वैश्य आहें, माझें नांव अरिष्टनेमि, पूर्वी पांडवांचे गृहीं गाईंचा रक्षक होतों. आतां पांडव कोठें दृष्टीस पडत नाहीत. या स्तव तूं फार उत्तम नरपती आहेस असें जाणून तुझ्या गृहीं राहण्या करितां आलों आहें, पुरुषांनीं कांहीं कर्म केल्या वांचून प्रशस्त नाहीं आणि तुझ्या वांचून राहण्या सारखा अन्य नृपती कोठें ही नाहीं ह्मणून मी तुझ्या गृहीं आलों. असें सहदेवाचें भाषण श्रवण करून विराट राजा ह्मणतो, हे नरश्रेष्ठा, तूं ब्राह्मण किंवा क्षत्रिय आहेस, तुझ्या ठिकाणीं वैश्याचें कर्म संभवत नाहीं. तूं कोण त्या राजाच्या राष्ट्रा पासून येथें आलास? काय चातुर्य तुझ्यामध्यें आहे? आमचे गृहीं कोणत्या इच्छेनें आलास? आणि काय वेतनाची इच्छा करतोस? असे विराटानें भाषण श्रवण करून सहदेव बोलतो, हे राजा, पांच पंडुपुत्रांमध्यें ज्येष्ठ जो युधिष्ठिर त्याचे गृहीं अष्टशत गाईंचा एक कळप अशा संख्येचे दहा सहस्र कळप व अन्यही शत सहस्र कळप होते त्यांचा परीक्षक मी होतों, तंतीपाल असें मला ह्मणत होते. गाईंचें भूत, भव्य, भविष्य परिज्ञान मला आहे. दाहा योजनें आसमंतात भागीं जे गाईस गुण दोष होतील ते मी जाणतों. माझा असा गुण आहे कीं, गाई अल्प असतां शीघ्र कालांत बहुत होतात त्यांच्या ठिकाणीं रोगादिक कांहीं होऊं नये असे उपाय मी जाणतों, हें माझें शिल्पचातुर्य आहे. हें मी तुला सांगितलें, हे राजा, वृषभांचीही मला परीक्षा आहे, ज्या वृषभाच्या मूत्राचे आघ्राणें करून वंध्या गाय जरी आहे तरी ती प्रसवत्ये अशीं त्याचीं पूजित लक्षणें मी जाणतों, असें सहदेवाचें भाषण ऐकून विराट राजा बोलतो कीं, माझे गृहीं शतसहस्र एक वर्णाचे व मिश्रित वर्णाचे त्यात्या गुणें करून चिन्हित असे पशु आहेत, हे मी तुझ्या स्वाधीन करतों. ते तुझ्या आश्रयानें वृद्धी पावोत. असें राजानें त्याचें समाधान केल्यावर सहदेव सुखानें तेथें राहात असतां राजानें त्यास यथेच्छीत वेतन दिलें, याप्रकारें सहदेव तेथें वास करीत असतां त्यास कोणीही जाणलें नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

११ अध्याय अकरावा— वैशंपायन सांगतात, हे जनमेजया, नंतर अर्जुन रूपसंपत्ती करून संपन्न पुमान् असून स्त्रीयांचे अलंकार धारण

केलेला कर्णा मध्यें दीर्घ कुंडलें, हस्ता मध्यें सुवर्णमय शंखाच्यावलया सारिखीं कंकण भूषणें धारण करून राजसभेंत प्रवेश करीत असतां गजा सारिख्या गमनानें भूमीस कंपित करीत दीर्घ बाहू व केश मोकळे सोडून विराट राजाच्या सभे समीप आला. त्यास नागरिक लोकांनीं व राजानें पाहून राजा सर्वांस प्रश्न करितो, हा शत्रूचें मथन करणारा दिसतो परंतु असा वेष याणें कपटानें धरिला आहे असें वाटतें, इंद्राच्या गजा सारिखा पराक्रमी असा मला भासतो, हा इंद्रपुत्रच प्राप्त झाला काय ? पूर्वी असा पुरुष मी पाहिला नाहीं व श्रवण ही केला नाहीं असें राजाचें भाषण श्रवण करून सभासदांनीं कांहीं भाषण केलें नाहीं यामुळें राजा विस्मय पावून त्या पुरुषास बोलतो. तूं बळें करून संपन्न, देवा सारिखा षोडश वर्षात्मक, तारुण्य दशेनें युक्त, गजेंद्रा सारिखा भासतोस असें असून तूं हीं शंखवलयें आणि माला धारण करून आलास याजवरून हा वेष कपटानें धरिलास असें वाटतें. तूं तर धन्वी, कवची, शरी व रथारूढ होऊन धांवणारे जे वीर यां मध्यें गमन करण्यास योग्य दिसतोस, तुला माझी किंवा माझ्या पुत्राचीच योग्यता आहे. मीहि आतां वृद्ध झालों, हा राज्यभार कोणावर तरी स्थापित करावा अशी मी इच्छा करितों तर तूंच या मत्स्य देशाचें पालन कर. असा क्लीब कोठेंही पाहिला नाहीं, तो आज तुला पाहून माझें मन फार विस्मय पावतें. असें विराटाचें भाषण श्रवण करून अर्जुन बोलतो हे राजा, मी गायन व नृत्य करितों तशींच वाद्येंही वाजवितों, मी नृत्य गायना मध्यें परम कुशल आहें, हे राजा, तूं उत्तरेस शिकविण्या करितां मला आज्ञा कर. हा शोक वृद्धि करणारा माझा वेष तुला सांगोन काय फळ आहे, मला बृहन्नडा असें ह्मणतात. मला स्त्री, पुरुष, माता, पिता कोणी नाहींत. असें अर्जुनाचें भाषण श्रवण करून विराट ह्मणतो हे बृहन्नडे माझी कन्या उत्तरा व अन्यही कन्या यांस तूं गायन व नृत्य शिकीव परंतु तुला हें कर्म करणें योग्य दिसत नाहीं. तूं समुद्र वलयांकित पृथ्वीचा उपभोग करण्यास योग्य आहेस असें विराटराजानें भाषण करून नंतर आपले मंत्री व सभासद यांसह वर्तमान असा विचार केला कीं, स्त्रियांकडून याची परीक्षा करवून यास अंतःपुरा मध्यें ठेवा-

वा. पुढें स्त्रियां कडून त्याची परीक्षा करवून हा अपुमान ( क्लीब ) आहे असा निश्चय करवून व गीत, वाद्य, आणि नृत्य यां मध्यें कुशल आहे असें जाणून राजानें आपले कन्येच्या अंतःपुरांत त्यास ठेविल्यावर धनंजय, विराटकन्येस गीत, वाद्य, नृत्य, यांची शिक्षा करून राजकन्येचा सख्या आणि दासी यांस ही शिक्षा करूं लागला असतां त्यांस तो अति प्रिय झाला. अशा मसलतीनें अर्जुन विराटाचे अंतःपुरा मध्यें रहात असतां अंतःपुरांतील व बाहेरील जनानीं त्यास जाणिलें नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१२ अध्याय बारावा.— वैशंपायन सांगतात, हे जनमेजया, नंतर पंडुपुत्र नकुल वेगें करून विराटराजाकडे गमन करीत असतां अभ्रा पासून सूर्य मंडळ जसें दिसतें तसे समग्र लोक मार्गामध्यें नकुलास अवलोकन करूं लागले तो नगरं संबंधी अश्वांकडे पहात पहात येत असतां विराट राजानें त्यास पाहून आपले सेवक जनांस ह्मणतो कीं, हा नर कोठून येत आहे? हा केवळ देवासारिखा दिसतो. हा माझ्या अश्वां कडे पहात येत आहे त्यापेक्षां हा अश्वांचा जाणता आहे असें वाटतें. यास्तव यास सभेमध्यें माझ्या जवळ आणा, मला हा केवळ देवच आहे असें वाटतें, असें राजवाक्य ऐकतांच सेवकानीं त्यास राजा जवळ आणिलें तेव्हां तो राजास ह्मणतो हे राजा, तुझें कल्याण असो. तूं मला अश्वांचा अधिकार दिला असतां सर्व राजे मला मान्य करितील, असा मी तुझा सूत होण्यास इच्छित आहें. मी अश्वविद्ये मध्यें बहुत कुशल आहें, असें नकुलानें भाषण श्रवण करून विराट राजा बोलतो कीं, हे वीरा, तुला यानें, धन, व राहाण्यास गृह देतो. तूं माझ्या अश्वसूतन ह्मावयास योग्य आहेस, तूं कोठून आलास, कोण आहेस? व तुझ्या मध्यें काय चातुर्य आहे तें मला सांग असें विराटाचें वाक्य ऐकून नकुल भाषण करितो. हे राजा, पंडु पुत्रां मध्यें ज्येष्ठ भ्राता जो युधिष्ठिर त्याणें मला पूर्वी आपले अश्वांचा अधिकार दिला होता, मी अश्वांची प्रकृति जाणतों व जे दुष्ट अश्व असतील त्यांस शिक्षा करून मार्गावर आणितों सर्व परीक्षा मला आहे माझ्या हाता मध्यें वाहन आलें ह्मणजे तें कधींही दुष्ट व भययुक्त राहणार नाहीं. घोडी ही माझ्या शिक्षेनें उत्तम मार्गानें चालत्ये, मग नर चाळे-

ल यांत आश्चर्य काय? मी युधिष्ठिराचे गृहीं होतों तेव्हां त्याणें माझें नाव ग्रंथिक असें ठेविलें होतें ह्मणोन जनही मला त्याच नावानें हांका मारीत होते अ-सें नकुलाचें भाषण श्रवण करून विराट राजा भाषण करितो हे नरश्रेष्ठा, जे माझ्या गृहीं अश्वरंथ आहेत ते सर्व तुझ्या स्वाधीन रहातील. तसेच जे को-णी अश्व योजक सेवक व सारथी ही तुझ्या आज्ञेंत वागतील. हे सुरोपमा, जें तुला इच्छित द्रव्य असेल तें माग मी देईन परंतु मला वाटतें कीं, हें अश्व क-र्म तुला योग्य नाहीं. तूं योग मान्य राजा आहेस असें मीं मानितों, मला युधि ष्ठिराच्या दर्शना सारिखें तुझें दर्शन प्रिय वाटतें. युधिष्ठीर सेवकां वांचून अ-रण्या मध्यें निर्दोषपणें कसा वास करीत असेल? या प्रकारें गंधर्व श्रेष्ठा सा-रिखा रूपवान तरूण अशा नकूलाचा विराट राजानें सत्कार केला असतां तो तेथें वास करूं लागला परंतु त्यास कोणीही जाणिलें नाहीं. या प्रकारें समग्र पांडव समुद्रवलयांकित पृथ्वीचे पती असतां ही अति दुःखित होऊन आपले प्रतिज्ञे प्रमाणें मत्स्य गृहीं कपट वेष धारण करून अज्ञात वास करीत असतां तेथें कोणाच्याही समजण्यांत आले नाहींत असा विषय या अ. आहे.

१३ अध्याय तेरावा.— जनमेजय प्रश्न करितात, हे वैशंपायन ऋषे, महा पराक्रमी असे जे कुरुनंदन ते मत्स्य नगरीं गुप्तरूपें करून रहात असतां पुढें काय करिते झाले तें मला निवेदन करा, असा राजाचा प्रश्न श्रवण करून वैशंपायन सांगतात, हे राजा, कुरुनंदन गुप्तरूपानें विराट राजाचें आराधन करून काय करूं लागले तें सांगतों श्रवण कर. तृण बिंदु व यमधर्म यांचा प्र-सादें करून धर्म राजा विराट राजाचा सभासद होऊन राजाचें व राज पुत्राचें मन रंजन करूं लागला, सूत्रामध्यें बद्ध झालेले पक्षी जसे खेळतात तसे ध र्मराज विराट राजास अक्ष क्रीडे मध्यें खेळवून जें द्रव्य आपणास मेळवी तें द्रव्य यथा योग्यते प्रमाणें भ्रात्यांस देई, भीमसेनाकडे भक्षणास योग्य-अशीं नाना प्रकारचीं मांसें पचना करितां विराट राजानें पाठविलीं असतां त्यांतील कांहीं अवशिष्ट मांसें युधिष्ठिरास विक्रय करी, अर्जुनास अंतःपुरामध्यें जीं जीर्ण वस्त्रें मिळत तीं तो सर्वांस देई, सहदेव ही गोपांचा वेषधारण करून द-हीं, क्षीर, घृत पांडवांस देत असे. नकुलही आपल्या अश्व विद्येचा योगें राजास

संतुष्ट करी आणि ज्याजपासून आपल्यास बक्षीस मिळालेलें जें द्रव्य तें आपल्या भ्रातांस देत असे. तशीच परम पतिव्रता द्रौपदी आपल्या पतींस वारंवार अवलोकन करून आपण जेणें करून लोकांस परिज्ञान होऊं नये अशी रहात असे. या प्रकारे महारथी पांडव एकमेकांचें परस्पर साधन करीत पुनः गर्भांत असल्या सारिखे संचार करीत असतां व तशीच द्रौपदीही वारंवार धृतराष्ट्र पुत्रांच्या भयानें शंकित होऊन रहात असे त्यास कांहीं दिवस झाल्यावर चवथे मासीं त्या मत्स्य देशांत सकल लोकांत संमत असा ब्रह्मदेवाच्या वार्षिक उत्सवाचा समय आला. त्या करितां देशो देशाहून मोठ मोठे काळ खंजा सारिखे महाशरीरी, मोठे पराक्रमी, बलें करून मोठे उन्मत्त, वीर्यवान्. राजानीं सत्कार करण्यास योग्य, सिंहा सारिखा स्कंध, कटी, ग्रीवा, स्वच्छंदानें वर्तणारे असे मल्ल सहस्त्रशः आले होते, त्यांजकडे सर्वलोक वारंवार पहात असतां ते सभे मध्यें राजाच्या सन्निध येऊन उभे राहिले. त्या मल्लां मध्यें जीमूत नामक मल्ल मोठा विख्यात व पराक्रमी होता, तो सर्व मल्लांस युद्धा करितां हांका मारीत मारीत सभे मध्यें विराटाचे सन्मुख आला त्याची गर्जना इतर मल्लानीं श्रवण करून ते त्याच्याशीं युद्ध कर्ण्यास उद्युक्त झाले नाहींत, हें विराटराजानें पाहून आपले बल्लवास जीमूताशीं युद्ध करण्यास बोलाविलें त्याकाळीं भीमसेनानें राजाचें पूजन करून आपली कटी बांधून जीमूताच्या अग्रभागीं उभा राहिला तेव्हां उन्मत्त झालेले गजजसे लोकांत शोभतात तसे ते उभयतां शोभू लागले मोठ मोठीं ज्यांचीं शरीरें शार्दूल सम पराक्रमी बाहु युद्धांत कुशल परस्पर एकमेकाच्या जयाची आकांक्षा करणारे एकमेकांस पाहून परम संतोषानें युद्धास प्रवृत्त झाले.त्या उभयतांचें युद्ध होत असतां पर्वतावर वज्र पाताचे जसे शब्द होतात तसे शब्द होऊं लागले, एकमेकाच्या उरावर बसले, वज्रासारिखे हस्त तलाचे प्रहार करूं लागले, एकमेकास मुष्टि प्रहार केला, नखपात केले. मांड्यां मध्यें एकमेकास धरून शिराचे प्रहार केले, हें अस्त्र रहित बाहु युद्ध मोठें घोर झालेलें सकल जन समुदायानीं पाहून वाहावा वाहावा असा हर्षानें शब्द केला. जसें पूर्वीं वृत्रासुर आणि इंद्र यांचें युद्ध झालें तसें उभयतांचें हें मोठें युद्ध झालें, पुनः ते प्रकर्षण, आकर्षण, अभ्याकर्षण. विकर्षण,

इत्यादि बहून युद्धाचागती आहेत त्या करीत करीत एकमेकास हनन करून मोठ्या उच्च शब्दानें एकमेकाची निर्भर्त्सना करूं लागले. लोहमय अर्गल असतात तसे दीर्घ बाहूंच्या योगें एकमेकांस ओढूं लागले, शार्दूल (व्याघ्र) जसा गजास आकर्षण करितो तसे भीमसेनानें जीमूताचे बाहू धरून आपलेकडे आकर्षीत केला. आणि त्यास गरगरां फिरवूं लागला. हें चरित्र मत्स्यदेशांतील लोकांनीं पाहून सर्वांस विस्मय झाला, नंतर भीमसेनानें त्यास शंभर वेळ भोंवतीं फिरवून गतसत्व झाला असें पाहून भूमीवर आपटतांच तो तत्काळ मरण पावला. हा लोकप्रसिद्ध जीमूत नामक मल्ल मरण पावला हें विराट राजा बांधवां सहवर्तमान पाहून फार हर्षीत झाला. आणि कुबेरासारिखा उदार होऊन त्या सभेंत बल्लवास धन दिलें. या प्रकारें बल्लवानें बहुत मल्लांस मारून विराटाची मोठी प्रीति संपादन केली असतां या पुरुषा सारिखा दुसरा बलवान् कोणी नाहीं असें राजानें ठरवून सिंह, गज, व शार्दूल यांच्याशीं भीमाकडून युद्ध करवून नंतर अंतःपुरांत स्त्रियांस पहाण्या करितां पुनः सिंह व बलवान आणि उन्मत्त जाहलेल्या गजाशीं युद्ध करविलें. अर्जुनानें ही गीत नृत्यानें सर्व अंतःपुरवासि स्त्रियांस रंजन करून विराटराजानें ही रंजन केलें. नकुलानें ही वेगवान् नवीन अश्व आलेले यांस सुशिक्षित करून विराटाचा संतोष केला असतां राजानें तुष्ट होऊन त्यास बक्षिस दिलें. तसेंच सहदेवानें ही राजाचे घरचे वृषभ उत्तम प्रकारचे सुशिक्षित केलेले राजानें पाहून त्यास ही धन दिलें हें पांडवांचें चरित्र द्रौपदीनें पाहून पहा हे महारथी यांची अशी दशा असावी काय ? असें मनामध्यें ह्मणोन श्वासोच्छ्वास टाकून दुःखीत झाली, या प्रकारें पुरुषश्रेष्ठ पांडव विराट गृहीं आपलीं स्वरूपें आच्छादित करून जीं जीं कर्मे कर्तव्य तीं तीं करून वास करीत असतां ते तेथें कोणाच्या ही समजण्यांत आले नाहींत. असा विषय या अध्यायात आहे

१४ अध्याय-चवदावा:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, विराटनगरांत अज्ञात वासा मध्यें महारथी कुंती पुत्रांस दहा मास झाले द्रौपदी सेवा करण्यास योग्य नसून दुःखानें सुदेष्णेची सेवा करीत तिचा मंदिरामध्यें रहात असतां जशा अंतःपुरांतील स्त्रिया सुदेष्णेस संतुष्ट करीत

त्या सारिखी द्रौपदी सुदेष्णेस संतुष्ट करूं लागली. कोणे एके दिवशीं देवां गनें सारिखी जीची कांती देवते सारिखीनें संचार करणारी अशा द्रौपदीस- पाहून कीचकनामा विराटाचा सेनापति कामाग्नीनें संतप्त होऊन सुदेष्णेस हास्य करीत भाषण करितो, हे भामिनी, मी ही विराट राजाचे गृहीं पूर्वी कधींही पाहिली नाहीं. जशी मदिरा आपले गंधानें उन्मत करिते तशी ही आपल्या रूपें करून मला उन्मत्त करिते. हे शुभे, ही कोण माझे हृदयास प्रिय करणारी देवता स्वरूप कोणाची कोठून आली आहे हें मला सांग, माझा चित्ताचें मथन करून इणे मला आपले स्वाधीन केलें असतां अन्य औषध नाहीं. ही तुझी दासी होऊन राहिली परंतु ही दास्य करण्यास योग्य नसून तुझें दास्य कर्म करिते हें पाहून मला आश्चर्य वाटतें ही माझा गृहीं येऊन मला दासासारिखा वांगवो आणि गजाश्वरथ, माहाजन, इहीं करून समृद्ध बहुपान- भोजनानीं युक्त, मनोहर जीं कांचनमय चित्रविचित्र भूषणें तीं हीं करून- भूषित असें जें माझें गृह तें इच्छा योगानें शोभो असें सुदष्णेशीं भाषण करून जसा जंबूक वनामध्यें सिंह कन्येस मृत्यूच्या उद्देशानें भाषण करितो तसा कीचक स्वतः द्रौपदीस सांत्वन पूर्वक भाषण करितो, हे वरानने, हे कल्याणि तूं कोणाची कोण कोठून विराट राजाचे नगरांत आलीस हें मला सत्य सांग, तूं फार चांगली शोभत्येस तुझें रूप परम श्रेष्ठ आहे, कांतीही उत्तम आहे तसेंच सौंदर्य व सकुमारत्व ही अतिश्रेष्ठ आहे, कांती करून चंद्रासारिखें निर्लिप्त तुझें मुख शोभतें भृकुटी सहवर्तमान तुझे नेत्र पद्मपत्रा सारिखे शोभतात, तूं सर्वांगें करून सुंदर आहेस, आणि तुझें भाषण ही कोकिळ शब्दा सारिखें आहे मी पृथ्वीतलावर तुझे सारिखी स्त्री कोठें ही पाहिली नाहीं, तुझा श्रोणी ( कटी ) उत्तम असून तूं निर्दोष आहेस कमलांत राहाणारी लक्ष्मीच काय ? तुझी कटी फार कृश आहे ही, भूति, कीर्ति व कांति यांतून तूं कोण आहेस, फारच रूपिणी मदनाचा अंगावर क्रीडा करणारी रतीच आहेस काय ? तुझ्या पांपण्या निमिषोन्मेष झाल्या असतां कांतियुक्त मुखास- फार शोभवितात. दिव्य कर्णानें शोभित अनुपम शोभेचें चंद्रासारिखें मुख पाहून या सर्व लोकांमध्यें कोण कामाचा स्वाधीन होणार नाहीं, हे तुझे दोन-

स्तन तरी हारा लंकारास योग्य आहेत व फार शोभिवंत दिसतात. उच्च व स मान पुष्ट स्तन ह्मणजे वारोळे मध्यें अंतर रहित कमळाचा कळी सारखे अ सून कामाच्या प्रतोदा (चाबुका) सारिखेंच मला व्यथा करितात. हे चारुहा सिनी, त्रिवलीनें सुशोभित स्तनाच्या भारानीं नम्र झालेला मुष्टीमध्यें राहण्या सारिखा हा तुझा तनूमध्य आहे. तुझें जघन नदीच्या तटा सारिखें पाहून मीं असाध्य काम व्याधीनें उन्मथीत झालों. आणि तुझा संगमाच्या इच्छें करून तो कामाग्नी दावाग्नी सारिखा निर्दय माझे शरीरांत प्रज्वलीत झाला आहे, तो माझा अत्यंत दाह करितो यास्तव हे वरारोहे, आपल्या शरीराचें दान हें कोणी एक वृष्टी व संगम हा कोणी एक मेघ याणीं प्रज्वलीत झालेला जो माझा कामाग्नी याचें शीघ्र शांतवन कर. हे चंद्रानने, माझे चित्तास उन्माद करणारे तीव्र काम बाण तुझा संगमें करून जर शांत होतील तरं वांचेन नाहीं तर आतांच मरण पावतों, अति उन्माद करणारा जो कामबाण या पासून आत्म प्रदानें करून व संभोगें करून तूं माझा उद्धार करण्यास योग्य आहेस. तूं चित्र विचित्र पुष्पांच्या माळा, नाना प्रकारचीं वस्त्रें भूषणें धारण करून स्व इच्छेनें मज सहवर्तमान विलास कर. तूं सुखास योग्य असून येथें हा दास्यभाव सेवन करून दुःखा मध्यें राहाण्यास योग्य नाहींस. हे मत्त गजगामिनी, माझा पासून अति उत्तम सौख्य पावण्यास योग्य हो. स्वादु अमृता सारखीं अन्न पानें सेवन करून यथा सुखें क्रीडा कर. नाना प्रकारचे भोगोपचार अति उत्तम सौभाग्य व महा भाग्यवंतास प्राप्त होणारे भोगतीही करून तूं क्रीडा करावीस. हें तुझें रूप आणि तारुण्य हीं नूतन आज केवळ व्यर्थ घालविल्येस, जशी उत्तम प्रकारची शोभिवंत माळा धारण न केली ह्मणजे ती व्यर्थ होत्ये तशी तूं आपलें तारुण्य व्यर्थ घालवूं नको. तुझा करितां माझा पूर्वींच्या स्त्रिया मी सर्व टाकितों, त्या सर्व तुझा दासी होऊन तुझा आज्ञे मध्यें राहतील. हे सुंदरी, मीहि दासा सारिखा स्वाधीन होऊन तुझा पुढें निरंतर उभा राहीन, असें कीचकाचें भाषण श्रवण करून द्रौपदी भाषण करित्ये; हे सूत पुत्रा, सेवन करण्यास अयोग्य, हीनवर्णाची, परम निंद्य, सैरंध्री, केशप्रसाधनकर्म करणारी, अशी मी असतां कां माझी इच्छा करितोस, परस्त्रिया सेवन करणें

हें अकल्याण दायक आहे यास्तव हें कर्म तुला योग्य नाहीं. सर्व प्राणिमात्रांस आप आपल्या स्त्रिया प्रियच आहेत, यास्तव तूं आपला धर्म चिंतन कर. कधीही परस्त्रीचा ठायीं बुद्धी करूं नको. या अकर्माचें वर्जन करावें. हें पुरुषाचें व्रत आहे. जो पापात्मा मोहें करून परस्त्रीचा मिथ्या भिलाष करितो तो केवळ अपकीर्ति पावून मृत्यूचा स्वाधीन होतो. याप्रकारें द्रौपदीनें कीचकाचा निषेध केल्यावर परस्त्रीचा अभिलाष केला असतां प्राण हरण करणारे व सर्व लोकांनीं निंदा करण्यास पात्रभूत असे त्यांत बहुत दोष आहेत. असें जाणत असतां ही तो दुर्मती कीचक इंद्रियांच्या स्वाधीन होऊन पुनः द्रौपदीस भाषण करितो. हे वरारोहे, हे वरानने, तुझ्या मुळें कामें करून मी त्रास झाल्यानें तूं माझें निवारण करण्यास योग्य नाहींस. असा प्रिय बोलणारा मी तुझा स्वाधीन झालों यास्तव तूं माझा अंगिकार कर. नाहीं तर तूं निश्चयें करून पश्चात्ताप पावशील; हे सुभ्रु, हे सुमध्यमे, मी सर्व राज्याचा प्रभु स्थिती करणारा आहें, माझा सारिखा वीर्यवान, रूप व यौवन, सौभाग्य, अति उत्तम शुभ भोग, इहीं करून संपन्न असा अन्य पुरुष पृथ्वीवर नाहीं, सर्व काम समृद्ध अति उत्तम भोग भोगावयास प्राप्त झाले असतां ते टाकून दास्य कर्मा विषयीं कां रत झालीस हें मी दिलेलें राज्य ग्रहण कर, तूं माझी स्वामिणी आहेस. नाना प्रकारचे उपभोग सेवन करून माझा आश्रय कर. असें कीचकाचें अशुभ वाक्य श्रवण करून त्याच्या भाषणाची निंदा करीत सैरंध्री भाषण करित्ये हे सूत पुत्रा, तूं मोह पावून आपल्या जीविताचा त्याग करूं नकोस, हे कीचका माझे पंच पती गंधर्व महावीर आहेत ते माझें निरंतर रक्षण करितात, ते कोपले असतां तुला मारितील यास्तव मी तुला सांगत्यें कीं, साहस कर्म करून नाश पावूं नकोस पुरुष मात्रानीं गमन करण्यास अयोग्य अशा मार्गे करून कां जाण्याची इच्छा करितोस, जसा अचेतन बाल आली कडल्या कांठीं उभा राहून उत्तर तीरास जाण्याची इच्छा करितो. किंवा पृथ्वीच्या अंतर भागीं गमन, उर्ध्व उत्पतन समुद्राच्या परतीरीं गमन हीं कर्मे करण्यास जशीं असाध्य तसा तूं मंदात्मा असाध्य कर्म करण्याची इच्छा करितोस, परंतु हे कीचका, तुला एक निश्चय सांगत्यें ते देवपुत्र खेचर आहेत, तूं स्वर्ग मृ-

त्यूं पातालांत कोठें ही गेला असतां तुला सोडणार नाहींत, जसा एकादा आतुर होऊन कालरात्रीची इच्छा करितो अथवा जसा मातेच्या अंकावर निद्रिस्त झालेला बाल, चंद्र धारण करण्याची इच्छा करितो तसा तूं मला धरण्याची इच्छा करितोस. परंतु मी गंधर्वांची प्रियभार्या आहें. ते एकदां तुझ्या अंगावर आले ह्मणजे तूं आकाशांत किंवा पृथ्वींत कोठें ही गमन केलेंस तरी तुझें रक्षण करण्यास कोणीही त्या काळीं समर्थ होणार नाहींत. असा विषय या अध्यायांत आहे.

१५ अध्याय पंधरावा.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, द्रौपदीनें तिरस्कार केला असतां घोर अमर्याद कामानें व्याप्त होऊन पुनः कीचक सुदेष्णेस बोलतो हे सुदेष्णे, जेणें करून ही सैरंध्री माझें सेवन करील असें कर, ही जर मला प्राप्त झाली तर मी वांचेन नाहींतर प्राणाचा त्याग करीन. या प्रकारें कीचकाची विलाप वाणी ऐकून त्याच्या अर्थाचें चिंतन करून आपला अभिप्राय प्रकट होण्या करितां सुदेष्णा कृपा पूर्वक त्यास बोलत्ये हे सूता, तूं कांहीं एक पर्व दिवस पाहून आपले गृहीं सुरा आणि अन्न सिद्ध कर ह्मणजे सैरंध्रीस तें आणण्या करितां मी तुझ्या गृहीं पाठवीन, ती तुझ्या गृहीं आली असतां विजन स्थळीं तिला ग्रहण करून जेणें करून तुला ती प्राप्त होईल असा यत्न कर. असें भगिनीचें भाषण श्रवण करून कीचकानें पर्व काळीं स्वयं पाक करणारे जे कुशल बल्लव यांज पासून नाना प्रकारचीं भक्ष्य, भोज्यें, उत्तमसुरा व मांसें यांची सिद्धता करवून सुदेष्णेस निवेदन केलें असतां सुदेष्णेनें कीचकाचे आलईं जाण्या करितां सैरंध्रीस हांक मारून भाषण करित्ये. हे सैरंध्री, ऊठ आणि कीचकाचे गृहीं जाऊन मज करितां पान घेऊन ये, मला फार तृषा लागली आहे, असें सुदेष्णेचें भाषण श्रवण करून सैरंध्री भाषण करित्ये हे सुदेष्णे, हे राजपत्नी, कीचक निर्लज्ज आहे हें तुला ठाऊक असून तूं कां मला त्याचे गृहीं पाठवित्येस मी त्याचे गृहीं जाणार नाहीं, मी तुझे गृहीं स्वइच्छेनें संचार करीत असतां जेणें करून माझे पती मजवर व्यभिचारिणी अशी शंका न करितील असें मी आचरण करीन अशी प्रतिज्ञा जाकाळीं मी तुझ्या गृहीं राहिल्यें त्या काळीं केलेली तुला विदितच आहे, कीच-

क. तर कामलुब्ध होऊन परम मूर्ख झाला आहे तो माझा अवमान करील, याजकरितां तूं मला तेथें पाठवूं नको. हे राजकन्ये, तुझे गृहीं अन्य दास व दासी बहुत आहेत, त्यांतून कोणास तरी त्याचे गृहीं पाठीव. मी गेल्यें असतां तो माझा अवमान करील यांत संशय नाहीं, असें सैरंध्रीचें भाषण श्रवण करून सुदेष्णा भाषण करित्ये हे सैरंध्री, मी तुला पाठविली असतां तो कीचक तुला स्पर्श करणार नाहीं असें सांगून सुदेष्णेनें आच्छादना सह नेमान सुवर्ण पात्र सैरंध्रीचे हस्तांत दिलें असतां सैरंध्री तें ग्रहण करून सा शंकित होऊन रोदन करीत आपले देवास शरण जाऊन कीचकाचे गृहीं मद्य आणण्या करितां निघाली त्या समयीं देवाची प्रार्थना करित्ये. हे देवा, भर्त्यां खेरीज इतरांची मी उपासना करीत नाहीं हें जर माझें व्रत सत्य आहे तर त्यास त्यांच्या योगें कीचक मला वश न करो. अशी प्रार्थना करून एकमुहूर्त पर्यंत द्रौपदीनें सूर्याचें उपस्थान करितांच सूर्यनारायणानें द्रौपदीचा सर्व अभिप्राय जाणोन तीच्या रक्षणार्थ एक गुप्तरूपी राक्षस दिला असतां त्या राक्षसानें सर्व संकट काळीं द्रौपदीचा परित्याग न करितां सन्निधच होता. नंतर द्रौपदी त्रस्त मृगी सारखी कीचकाचे गृहीं गेली तेव्हां तिला पाहून जसा पार जाणारा मनुष्य नौका आली असतां आनंदानें उठोन उभा राहतो तसा कीचक हर्षानें उभा राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

१६ अध्याय सोळावा— कीचक भाषण करितो हे सुकेशांने, तुझें आगमन चांगलें झालें, आज मला रात्र फार उत्तम उदय पावली, तूं माझी स्वामिणी आलीस आतां तूं माझें प्रियकर, त्या सुवर्णांच्या माळा, शंखाचीं वलयें, सुवर्णमय नाना देशामध्यें उत्पन्न झालेलीं शुभ्र कुंडलें, सुशोभित मणी व रत्नें, नाना प्रकारचीं पीतांबरादि वस्त्रें व दागिने तुला प्राप्त होत. तुज करितां मीं आपलें शयन दिव्य पदार्थानीं उपकल्पीत केलें आहे, या शयनावर येऊन तूं मजसहवर्तमान क्रीडा कर. आणि मधुपुष्पा पासून झालेल्या मद्याचें पान कर. असें कीचकानें भाषण श्रवण करून द्रौपदी बोलत्ये हे कीचका, सुदेष्णेस अत्यंत तृषा लागली ह्मणोन तिणे तुजकडे मला सुरा आणण्या करितां पाठविलें आहे. असें द्रौपदीचें वाक्य ऐकून-

कीचक बोलतो. हे भद्रे, सुदेष्णेनें तुला सुरा आणण्या करितां पाठविलें आहे तर तिजपाशीं अन्य दास व दासी बहुत आहेत त्या येऊन सुरा घेऊन जातील. असें भाषण करून सूतपुत्र द्रौपदीचा दक्षिण हस्त ग्रहण करण्यास प्रवृत्त झाला असतां द्रौपदी बोलत्ये हे कीचका, मी उन्मत्त होऊन मनानें कधींही पतींची अवहेळणा केली नाहीं, हें माझें व्रत सत्य आहे तर तूं मला धरण्यास समर्थ होणार नाहींस. असें बोलून त्याची बहुत निर्भर्त्सना केली असतां पुनः पापमती कीचक विशाळ नेत्रा जी द्रौपदी तिचें उत्तरीय वस्त्र हरण करण्याच्या इच्छेनें सन्नीध आला असतां राजपुत्री द्रौपदीनें वारंवार श्वासोछ्वास टाकीत त्यास प्रक्षिप्त करतांच छिन्न मूल वृक्षासारिखा तो पृथ्वीवर पडला. त्यास पाहून द्रौपदी कंपित होऊन सभेंत जेथें युधिष्ठिर बसला होता तेथें आली, हें कीचकानें पाहून तिचा पाठीमागें धांवला आणि तिचा केशपाश ग्रहण करून विराटराजा पहात असतां तिला लत्ता प्रहार करून पृथ्वीवर पाडिली, त्या कालीं द्रौपदीचा रक्षणा करितां सूर्यानें जो राक्षस पाठविला होता त्याणें अदृश्य असतां वायू समान वेगानें कीचकास बलात्कारें करून पृथ्वीवर पाडतांच छिन्नमूल वृक्ष पृथ्वीवर पडतो तसा कीचक निचेष्ट पृथ्वीवर पडला. त्या समयीं राजसभेमध्यें धर्मराज व भीमसेन याणीं कीचकापासून द्रौपदी फार क्लिष्ट झाली असें पाहून त्या दुरात्म्याचा वध करण्यास भीमसेन इच्छिता झाला. त्या कालीं भीमसेन दंतें करून दंतांचें निष्पेषण करूं लागला. धूमच्छायेनें जसे नेत्र होतात तसे भीमसेनाचे सपक्ष्म नेत्र उच्छ्रीत झाले. भ्रुकुटी मध्य स्वेदें करून युक्त झाली असतां त्याचें हस्तानें मर्दन करूं लागला. वारंवार क्रुद्ध होऊन कीचकाचा वध करावा या इच्छेनें भीमसेन आसनावरून उत्थित होणार हें धर्मराजानें जाणून आपला बोध लोकांमध्यें होईल या भयास्तव पादांगुष्टानें भीमसेनाचा पादांगुष्ट दाबून त्याचें निवारण केलें असतांही तो मत्तमातंगासारिखा उन्मत्त होऊन वृक्षांकडे पाहूं लागला. हें धर्मराजानें पाहून तो त्यास बोलतो हे सूदा, तूं काष्ठा करितां वृक्षांकडे पाहतोस काय? जर तुल काष्ठांची अपेक्षा असली तर. बाहेर वृ-

स, बहूत आहेत तेथें जाऊन ग्रहण कर. इतक्यामध्यें द्रौपदी रोदन करीत सभा द्वारामध्यें येऊन दीन मनस्क झालेल्या पतीस अवलोकन करून आपल्या प्रतिज्ञा व आकार यांचें रक्षण करून विराट राजास बोलल्ये हे राजा, ज्यांचा वैरी रात्रंदिवस चिंतन करीत असतां तो निद्रापावत नाहीं त्याची मी मान्य स्त्री असतां त्या सूतपुत्रानें आपले पायानें मला ताडण केलें. जे ब्रह्मनिष्ठ, सत्यवादी, निरंतर याचकांस दान करणारे व कधींही ज्याणीं यांच्या केली नाहीं त्यांची मी मानची भार्या असून सूतपुत्र मला आपले पायांनें ताडण करितो. अशी नाना प्रकारें आपल्या पतींची स्तुती करून व कीचकाचा निषेध करून बोलल्ये कीं, आज मला निरापराध सूत पुत्रानें मारिलें हें पाहून धर्मदूषक जो विराट तो सहन करितो तेव्हां मी काय करावयाचें आहे. हा विराटराजा राज धर्मा प्रमांणें कांहींच आचरण नकरितां कीचकाचेंच अनुमतें चालतो तस्मात् येथें दस्यू (चोर) चा धर्मासारिखा हा राजधर्म असल्या मुळें राजा सभेमध्यें शोभत नाहीं, हे विराट राजा, तुझ्या समक्ष या कीचकानें हनन करण्यास योग्य नाहीं हा तुझा व्यतिक्रम सकल सभासद पहात असतां कांहींच भाषण करीत नाहींत तस्मात् हा कीचक धर्मज्ञ नव्हे व राजा तूंही धर्मज्ञ नाहींस तूं धर्मज्ञ नसतां हे सभासद तुझी उपासना करितात त्यापेक्षां तेही अधर्मज्ञ आहेत. असें द्रौपदी भाषण करून नेत्रांतून अश्रुपात करीत विराट राजाचे अग्रभागीं उभी राहिली तेव्हां विराट राजा बोलतो हे स्त्रिये, तुमचा दोघांचा कलह परोक्ष झालेला मला विदित नाहीं पूर्वीपासून तुमचें कांहीं एक कृत्य मला विदित नसल्या मुळें तें वाईट किंवा चांगलें माझ्यानें ह्मणवत नाहीं असें राजाचें वाक्य श्रवण करून सभासद भाषण करितात हे राजा, ही सर्वांगें करून सुंदर, दीर्घनेत्रा जाची स्त्री आहे त्याला हा मोठाच लाभ झाला, अशी स्त्री जास प्राप्त झाली असेल तो कां शोक पावणार नाहीं. असें भाषण करून साधु साधु अशा शब्दानीं कृष्णेचा सत्कार केला. नंतर कीचकाची निंदा करून ह्मणो लागले कीं, अशी वर्णनीय स्त्री मनुष्या मध्यें दुर्लभ, ही सर्वांगें करून निर्दोष आहे यास्तव ही कोणी देवताच आहे असें आह्मी मानितों, त्याकाळीं युधिष्ठिर राजास परम कोप येऊन ललाट

प्रदेशीं घर्म उत्पन्न झाला असतां द्रौपदीस भाषण करितो हे सैरंध्री! तूं सुदे
ष्णेचा मंदिरांत जा, नटी सारखी निर्लज्ज होऊन येथें उभी राहूं नको तुझ्या सा
रिख्या वीरपत्नी स्त्रिया भर्त्यास अनुरोधानें क्लेश पावतात आणि शुश्रूषे क-
रून क्लिष्ट होऊन पती लोकांस जिंकितात त्यांचा क्रोधाचा हा समय नाहीं ह्म-
णोन तुझे पती गंधर्व सूर्या सारिखे तेजस्वी आहेत तथापि तुझें दुःख निवा
रण करण्यास धांवून येत नाहींत तुला कालाचें ज्ञान नाहीं जशी नटी रोदन
करित्ये तसें तूं या राजसभेमध्यें रोदन करून मत्स्यराजाचा क्रीडेस मात्र वि
घ्न करित्येस यास्तव हे सैरंध्री तूं येथून गमन कर. ज्याणें तुला दुःख दिलें व
तुझें अप्रिय केलें त्यास गंधर्व शिक्षा करून तुझ्या दुःखाचा नाश करतील.
असें युधिष्ठिराचें भाषण ऐकून सैरंध्री बोलत्ये ज्या गंधर्वांचा ज्येष्ठ अक्षक्री
डा करणारा ते गंधर्व मोठे दयाळू आहेत त्यांची मी धर्मवती भार्या आहें या-
स्तव जो मला दुःख देईल त्याचा ते वध करतील असें भाषण करून ती मु-
क्त केशा कोपानें नेत्र आरक्त झालेली सुदेष्णेच्या मंदिरांत प्रवेश करीत अस-
तां आकाशामध्यें मेघ लेखा निर्मुक्त जसें शशिमंडळ शोभतें तसें तिचें मुख
शोभलें. सैरंध्री आपले मंदिरांत आलेली सुदेष्णेनें पाहून ती भाषण करि-
त्ये हे शोभने, तुला कोणी ताडण केलें? तूं कां रोदन करित्येस? ज्याणें तु-
झें विपरीत केलें असेल तो आज दुःख पावेल. असें सुदेष्णेचें भाषण श्रवण
करून द्रौपदी बोलत्ये हे सुदेष्णे, कीचक गृहीं तुझा करितां मद्य आणावया
स मी जातांच तो माझावर बलात्कार करूं लागला ह्मणोन मी आपल्या रक्ष
णा करितां राजसभेंत विराटा कडे गेल्यें, त्या कालीं विराट राजा कडे पहात अ
सतां कीचक माझामागें धांवत येऊन निर्जन वनामध्यें जसे दुरात्मे प्राण्यां-
चा घात करितात तसा त्याणें मला लत्ताप्रहार केला. असें सैरंध्रीचें भाषण-
श्रवण करून सुदेष्णा बोलत्ये हे सैरंध्री तुझ्या सारिख्या दुर्लभ स्त्रीचा जा-
दुष्टानें अवमान केला त्यास मी शिक्षा करीन, तूं कांहीं काळजी करूं नको. अ
सें सुदेष्णेचें भाषण श्रवण करून सैरंध्री बोलत्ये हे सुदेष्णे, ज्याणें माझा
अवमान केला त्यास शिक्षा करणारे अन्यत्र आहेत ते आज निश्चयें करून
या दुरात्म्यास यम गृहीं पाठवितील असें वाटतें. असा विषय या अध्या. आहे

१७ अध्याय सतरावा:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सूतपुत्र कीचकानें द्रौपदीस ताडण केलें असतां त्या दुरात्म्याचा वध कसा होईल अशी चिंता करीत करीत ती आपल्या वसतिस्थानीं जाऊन यथान्याय शोचादि कर्तव्य कर्मे करून व उदकानें आपलीं गात्रें वस्त्रें प्रक्षालन करून दुःखानें परम चिंताग्रस्त होऊन मनामध्यें ह्मणत्ये आतां या माझ्या दुःखाचें निवारण कोण करील मीं आतां कोठें जाऊं, कोठें गेल्यें असतां माझें कार्य होईल अशी चिंता करीत करीत माझें मनःप्रिय कार्य भीमा वांचून दुसरा कोणी करणार नाहीं असा निश्चय करून आपल्या आसना पासून उठून त्या रात्रीस ती कृष्णा, सनाथ असतां अनाथा सारिखी दीन होऊन शाले मध्यें जेथे भीमसेन निद्रिस्थ होता तेथें जाऊन दुःखें करून भीमास ह्मणत्ये हे भीमा, मृग राजा सारखा श्वासोछ्वास टाकीत कसा निद्रिस्त जाहलास पापिष्ठ विराटाचा सेना नायक जो कीचक माझा अत्यंत द्वेष्टा तो जिवंत असतां तुला कशी निद्रा येत्ये निद्रेचा कां त्याग करीत नाहींस. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, ज्याकाळीं द्रौपदीनें शाळेंत प्रवेश केला त्या काळीं द्रौपदीच्या व भीम सेनाच्या तेजें करून ती शाला अतिशोभायमान दिसूं लागली. त्याकाळीं जशी कामातूर धेनु वनामध्यें वृषभाचे सन्नीध उभी राहात्ये तशी द्रौपदी भीम सेना जवळ येऊन विण्या सारिख्या मधुर वाणीनें भाषण करित्ये हे भीमसेना, लौकर ऊठ मृता सारिखा काय निद्रिस्त झालास अरे तूं जिवंत असतां तुझी भार्या पाप्यानें हरण करून तो जिवंत राहिला हें काय? असें द्रौपदीचें भाषण श्रवण करतांच भीमसेन जागृत होऊन पर्यंकावर तत्काळ उठून बसला आणि राजपुत्रीस पाहून बोलतो हे स्त्रिये, कोणाच्या कारणास्तव या काळीं तूं माझा सन्निध आलीस तुझा वर्ण अगदीं पालटून गेला. तूं अत्यंत कृश झालीस, पांडूर वर्ण दिसूं लागलीस अशी अवस्था तुझी कशानें झाली तें साकल्य निवेदन कर तुला काय दुःख झालें, तुझा द्वेष्टा कोण आहे अथवा प्रिय काय आहे तें सांग जें तुझा मनामध्यें असेल तें मला कथन कर त्याची शांती मी करीन. हे कृष्णे, सर्व कर्मा विषयीं माझावर तुझा विश्वास आहेच यास्तव जें तुझें कार्य असेल तें लौकर मला सांगून कोणी

जाणल्याचे पूर्वी आपले शयन स्थानीं जा तुझें जें कार्य असेल तें सत्वर मीं करितों. असा विषय या अध्यायांत आहे.

१८ अध्याय अठरावा.- द्रौपदी भाषण करिते हे भीमा, जिचा भर्ता युधिष्ठिर आहे ती शोकरहित कोठून असणार हीं माझीं सर्व दुःखें तूं जाणत असतां मला काय प्रश्न करितोस बरें हे भारता, सभेमध्यें प्रातिकामी दूतानें दासी सारिखें जें माझाशीं संभाषण केलें तें माझा ह्रदयास फार जाळतें अरे मी राज कन्या असून अशा दुःखाचा अनुभव घेऊन वांचल्यें तेव्हां माझा सारखी दुसरी कोण जिवंत राहाणार! मी वनामध्यें असतां दुष्टात्म्या जयद्रथानें माझें आकर्षण केलें हें माझें दुसरें दुःख माझा वांचून सहन करणारी दुसरी कोण स्त्री आहे! विराट राजाचेसमक्ष तो धूर्त पहात असतां दुष्टात्म्या कीचकानें माझें आकर्षण केलें हे दुःख सोसून माझा सारखी दुसरी. स्त्री कोण जिवंत राहाणार! अशा बहुत दुःखें करून मी क्लिष्ट झालेली मला तूं जाणत नाहींस काय? मी जिवंत राहून काय फळ आहे विराट राजाचे गृहीं सैरंध्री वेषानें मी रहात असतां परम दुष्ट बुद्धी विराटाचा शालक तो-कीचक माझी भार्या हो असें मला नित्य बोलतो तेणें करून कालानें परिपक्व झालेलें फळ जसें आपल्या आपण गळतें तसें माझें ह्रदय विदीर्ण-होतें यास्तव हे भारता, दुष्टद्यूत करणारा जो तुझा ज्येष्ठ भ्राता त्यास विदीत कर. त्याच्या कर्मानें फळ हें मला दुःखरूप प्राप्त झालें. हा धर्मराज-आपले देहासह वर्तमान राज्यसूख सर्व टाकून व वनवासही भोगून अद्याप द्यूत करण्याची इच्छा करितो तस्मात् दुर्द्यूत करणाऱ्यास अशीं दुःखें होतात. अरे भीमसेना, धर्मराज जरी प्रति दिवशीं सहस्त्र निष्क सुवर्ण व-सार सार भूत धन लाऊन प्रातःकाळीं व सायंकाळीं द्यूत करिता तरी बहूत वर्षे पर्यंत द्रव्य परिपूर्ण झालें असतें. सुवर्ण, वस्त्रें, अलंकार, रौप्य, यानें, व गजाश्व, शेळ्या, मेंढ्या प्रभृति बहूत धन होतें तें जरी पणास-लाविलें असतें तथापि त्याचा कधीं ही क्षय न होता तो हा धर्मराज आज दुर्द्यूत क्रीडा केल्या मुळें आपल्या संपत्ती पासून भ्रष्ट होऊन मूर्ख जसा आपलीं कर्मे चिंतन करीत बसतो तसा स्वस्थ बसला आहे. सुवर्णमाला

नीं अलंकृत दहा सहस्र गज व दहा सहस्र अश्व धर्मराजा स्वारीस निघा-
ला ह्मणजे त्याच्या मागें पुढें चालत असत तोहा आज द्यूतावर उपजीवि-
का करून आहे हा भारत वंशांत उत्पन्न झालेला यास आपले जीविके क
रितां जें कर्म करण्यास अशक्य तें याचें कर्म पाहून कोणास दुःख होणार
नाहीं। याच्या सभेमध्यें सर्व पृथ्वी वरील जन सेवन करीत होते तो दुस-
ऱ्यांची सेवा करितो असें नाना प्रकारें धर्मराजाच्या ऐश्वर्याचें वर्णन व-
त्याचे दुःखाचें स्मरण करून ह्मणत्ये हे भीमा, अशा या बहुत दुःखानें
मी अनाथा सारिखी पीडित होऊन शोक समुद्रा मध्यें पडल्यें असतां
माझें दुःख तूं अवलोकन करीत नाहींस काय? असा वि० या अ० आहे.

१९ अध्याय एकूणीसावा.— द्रौपदी भाषण करित्ये हे भीमा, हें
जें मला अत्यंत दुःख झालें आहे तें तुला सांगत्यें श्रवण करून माझी अ
सूया करूं नको परम दुःखीत होऊन मी तुला सांगण्यास प्रवृत्त झाल्यें आहें
या विषम काळीं हीन कर्म बल्लव जातीय असें तूं स्वीकृत केलेंस ह्मणून तु-
ला बल्लव जातीय असें ह्मणतात हें भाषण ऐकून कोणास शोक होणार
नाहीं बरें, तुला अवलोकन करून विराटाच्या गृहीं स्वयंपाक करण्यास-
कोणी एक बल्लव चाकरीस राहिला आहे असें ज्या काळीं सकल लोक भा
षण करितात त्या काळीं मला फार दुःख होतें ज्या काळीं विराटराजा स्व-
यंपाक गृह्य मध्यें येऊन तुला विचारतो कीं, बल्लवा स्वयंपाक झाला-
किंवा नाहीं त्या काळीं माझे मनास बहूत दुःख होतें आणि तूं कुंजराशीं
उत्तम युद्ध करितोस त्या काळीं विराट राजास बहूत हर्ष होतो. अंतःपु-
रांतील स्त्रिया तुझें युद्ध पाहून हांस्य करीत असतां माझे मनास फार दुः
ख होतें. सुदेष्णेस अवलोकन करण्या करितां अंतःपुरामध्यें शार्दूल,
महिष व सिंह यांच्याशीं जेव्हां तूं युद्ध करतोस तेव्हां मला अत्यंत मो-
ह होतो तुझें युद्ध पाहून सुदेष्णा तेथून उठली ह्मणजे तिच्या दासी तिला
ह्मणतात कीं, बल्लव युद्ध करीत असतां सैरंध्रीस फार दुःख होतें याज-
वरून बल्लवाचा आणि सैरंध्रीचा स्नेह आहे असें वाटतें. त्याचें युद्ध पा
हून इला वारंवार शोक होतो याचें कारण काय? सैरंध्री रूपवान आहे व

बल्लव ही रूपानें सुंदर आहे, उभयतांचें ही रूप समान दिसतें. स्त्रियांचें चित्त कसें आहे याचा अंत नाहीं. सैरंध्रीची व बल्लवाची बहूत मोठी आहे. राजगृहीं या उभयतांचा ही निवास बरोबरच आहे, त्या पेक्षां उभयतांचा ही स्नेह असेल असें दासीचें भाषण श्रवण करून सुदेष्णा माझी निंदा करूं लागल्ये तें श्रवण करून मला बहूत क्रोध येतो तेणें करून तुजविषयीं फारच शंका धारण करितात हें दासीचें कुश्चित भाषण या प्रसंगीं मला ऐकणें प्राप्त होतें तेणें करून सकल माझें शरीर दग्ध होऊन गेलें आहे. हे भीमा, तूं महाबली व महापराक्रमी असतां ही तुझी अवस्था! युधिष्ठिर राजाकडे पहावें तर त्याची तशी अवस्था, तेव्हां जिवंत राहावें अशी माझी आतां इच्छा नाहीं. अरे एकरथानें, देव मनुष्यांस जिंकणारा युवा (तरुण) असा जो अर्जुन तो आज विराटाच्या गृहीं कन्यांस नृत्यशिक्षा करितो. जाणें खांडव वनामध्यें अग्नीस तृप्त केलें तो पार्थ आज कूपामध्यें निमग्न अग्नीसारिखा अंतःपुरांत राहिला आहे. ज्या पुरुषश्रेष्ठास शत्रु निरंतर भितात तो धनंजय आज वेषांतर करून राहिला आहे, ज्याचे बाहू धनुष्याच्या प्रत्यंचेनें कठीण जाहलेले व परिघासारिखे सुशोभित त्या धनंजयानें आपले हस्त शंख वलयानीं सुशोभित केले आहेत, ज्याच्या प्रत्यंचेचा टणत्कार जाहला असतां शत्रू कंपित होतात त्या अर्जुनाचें गीत श्रवण करून स्त्रिया त्याची उपासना करितात ज्याचा मूर्धा सूर्या सारिखा तेजस्वी व दैदीप्यमान किरीटानें सुशोभित होता तोच धनंजय आज वेणी धारण करून आपल्या मूर्धास सुशोभित करितो. हे भीमा, गांडीव धन्वा वेणी धारण करून ज्याकालीं स्त्री समुदायामध्यें बसतो त्या कालीं माझें मन अत्यंत दुःखीत होतें जो पार्थ सकल अस्त्रांचा वेत्ता व सर्व विद्येचा नाशक, तो आपल्या कर्णामध्यें कुंडलें धारण करून आहे. जसा महार्णव आपली मर्यादा उल्लंघन करीत नाहीं तसें अर्जुनाचें तेजपाहून युद्धामध्यें सहस्त्रावधी राजे त्याचें उल्लंघन करण्यास समर्थ होत नाहींत, तो अर्जुन आपला वेष आच्छादित करून विराट गृहीं कन्यांचा परिचारक होऊन राहिला आहे. या अर्जुनाच्या रथघोषें करून स्थावर जंगमासहवर्तमान पृथ्वी कंपित होत्ये. ज्याकालीं हा अर्जुन उत्पन्न जाहला त्याकालीं त्याणे कुं-

तीच्या शोक नष्ट केला तो अर्जुन मला अत्यंत शोक उत्पन्न करितो. ज्याचें शरीर नाना प्रकारच्या अलंकारानीं व कुंडलानीं सुशोभित होतें तो अर्जुन आज शंख वलयें धारण करून आपलें शरीर भूषित करितो तेणे करून माझें मन-अत्यंत व्यथेंत निमग्न झालें आहे. अरे या पृथ्वीवर ज्याचे समान वीर्यानें दुसरा कोणी नाहीं, तो धनंजय कन्यानीं वेष्टित होऊन आज बसला आहे. धर्म, सत्य व शौर्य हे ज्याचे गुण या जीवलोकीं सर्वांस संमत आहेत त्याणें स्त्रियांचा वेष धारण केला तेणे करून माझें मन व्यथा पावतें. जसा करेणु (हस्तिणी) समुदाया मध्यें मातंग शोभतो तसा हा अर्जुन देव रूपी कन्यानीं परिवृत्त असतां अकस्मात् ज्या कालीं विराट राजा तेथें प्राप्त होतो त्याकालीं मध्यदीन सूर्या-सारिखा मी अर्जुनास पाहून मला दिशाभ्रम होतो. अशा दुःखकारक अवस्थेंत प्राप्त झाहला जो धनंजय तसा दुर्द्यूत करणारा युधिष्ठिर हे उभयतां अजात शत्रु असतांही या उभयतांस आर्या (कुंती) जाणत नाहीं ह्मणून बरें आहें तुझा कनिष्ठबंधू सहदेव गाईचें रक्षण करणारा गुराख्याचा वेष धरून गाई मध्यें ज्या कालीं जातो त्या कालीं मी पांडुर वर्ण होत्यें. हे भीमसेना, सहदेवाचीं चरित्रें वारंवार चिंतन करून मला रात्रंदिवस निद्रा येत नाहीं मग रतीतर कोठून उत्पन्न होईल हे महाबाहो, सहदेवाचें दुःखप्राप्त होण्या सारिखें त्याचें दुष्टकर्म कधींही मी पाहिलें नाहीं. सहदेवास पाहून मला वारंवार बहूत दुःख होतें. सहदेव सकल गायी मध्यें जाऊन आपल्या वेषानें आच्छादन करून विराटराजास ज्या कालीं गो कौशल्यानें हर्षित करितो त्याकालीं मला ज्वर उत्पन्न होतो. कुंती, सहदेवाची वारंवार प्रशंसा करून मला सांगत होती कीं, हा योग उदार व सकल श्रेष्ठ जनांत पूजित आहे, शील व वृत्त यानें फार उत्तम, ह्रीनिषेवक, वाणी ज्याची मधुर, धार्मिक व मला अत्यंत प्रिय आहे. हा फार सुकुमार आहे यास्तव यास रात्रीं निद्रे करितां उत्तमनिद्रा सामग्री घेत जा, सकल राजांस हा मान्य असून आपले भ्रात्यांचा पूजन करिता आहे. हे पांचाली, यास तूं स्वतः भोजन घालीत जा. असें कुंतीनें सांगून ज्या काळीं सहदेव वनांत जाऊं लागला त्याकालीं पुत्र लोभास्तव अत्यंत रोदन करूं लागली. तो सहदेव गायीं मध्यें वास करून रात्रीं गोचर्मावर निद्रिस्त होतो त्यास अवलो

कन करून मी जिवंत रहावें काय? जो नकूल रूप असणें, मेधा (धारणा) यानिहीनीं संपन्न असणारा तो आज विराटाचे गृहीं अश्वबंधनं करून राहिला आहे हा काय काळाचा विपर्यास झाला आहे तो अवलोकन कर. ज्या काळीं नकुल, सकल अश्वसमुदाय बरोबर घेऊन विराटाच्या अग्रभागीं प्राप्त होऊन शिक्षित केलेले सकळ अश्व विराटास मोठ्या नम्रभावें करून दाखवितो त्याकाळीं मी पहात असतां मला सुख कसें होईल बरें आणि तूं तर ह्मणतोस तूं मोठी सुखी आहेस हें तुला कसें समजत नाहीं! हे भीमा, या प्रकारच्या दुःखानीं अत्यंत व्याप्त आहें, हीं सकल दुःखें युधिष्ठिरा निमित्त प्राप्त जाहलीं यांत संशय नाहीं. मी तुमचा पांचाचा आश्रय केला असतां हीं दुःखें माझें शरीर शोषून टाकितात या दुःखासारखें दुसरें दुःख कोणचें असावें. असा विषय या अध्यायांत आहे.

२० अध्याय विसावा.— द्रौपदी भाषण करित्ये हे भीमा, मी दासीवेषें करून विराटगृहीं संचार करीत असल्यामुळें मृज्जलादि शौच सामग्रीस देष्णोस मलाच द्यावी लागत्ये हें सर्व दुःख अक्षधूर्त जो धर्मराज याजपासून झालें आहे. मी राजपुत्री असतां माझ्या शरीराचा वर्ण पहा कसा झाला आहे. हें सर्व दुःख नाशवंत आहे असें जाणून मी उदयकालाची इच्छा करीत आहें, मनुष्यांस अर्थसिद्धि तसेंच जयपराजय हे सर्व अनित्य आहेत असें जाणून भर्त्यांच्या उदयाची मार्गप्रतीक्षा करित्यें अर्थ आणि दुःखें यांचें भ्रमण चक्रासारिखें आहे असें समजून भर्त्यांची पुनः उदय प्रतीक्षा करीत आहें पुरुषाचा जय होण्यास जो हेतु असतो तोच हेतू कांहीं कालांतरें करून पराजयास कारण होतो असें मी जाणत्यें. हे भीमा, हीं दुःखें मी सहन करीत आहें, तेव्हां तूं मला मृताप्रमाणें कसा जाणत नाहींस. असो, जे पूर्वी दाते असतात ते कालांतरें करून याचक होतात जे दुसऱ्याचा वध करितात त्यांचा वध करणारा दुसरा कोणी तरी असतो जो दुसऱ्यास पाडितो त्यास पाडणारा इतर कोणी तरी असतो असें मला खचीत ठाऊक आहे दैवास कांहीं दुष्कर आहे असें नाहीं दैवाचें अतिक्रमण कोणी करणार नाहीं असें जाणून दैवाचेंच चिंतन करीत आहें सर्व दैवाधीन आहे असें जाणून आतां मी शोक करीत नाहीं जसें

चीं रिक्त सरोवर असून कांहीं कालानें त्यांत जल येऊन परिपूर्ण होतें तशी आ-
मची संपत्ती जरी नष्ट झाली आहे तथापि दैवानें आह्मास प्राप्त होईल अशाका-
ल वैपरीत्याची मी इच्छा करीत आहें ज्याचें द्रव्य दैवयोगें करून नष्ट झालें आहे
त्याचें द्रव्य पुनः दैवाच्या योगें त्यास प्राप्त होतें दैवानुकूल्य होण्या विषयीं जप
होमादि उपाय सांगितले आहेत ते केले असतां दैव अनुकूल होऊन नष्टार्थसि-
द्धि होत्ये. हे भीमसेना, तुं आपल्या दुःखाचें कारण काय आहे ह्मणून प्रश्न के-
लास यास्तव मी आपल्या दुःखाचीं कारणें तुला निवेदन केलीं, पांडुपुत्रांची-
मी भार्या, द्रुपद राजाची कन्या अशी योग्यता माझी असतां ही अवस्था मला-
प्राप्त झाली तेव्हां ही अवस्था सोसून माझा सारिखीच स्त्री जिवंत राहील दु-
सरी रहाणार नाहीं. अरे दुष्ट दुःशासनानें सभेमध्यें माझ्या केशांचा परिग्रह केला
तेणेकरून मला जो क्लेश झाला आहे तो क्लेश भीष्मादि कुरुश्रेष्ठ पांचाल आणि तु-
ह्मीं कुंती पुत्र या सर्वांचा नाश करील. भ्राते, श्वशुर व बहू पुत्र इत्यादिकें करून-
मी युक्त असतां माझ्यासारखी दुःखीत नारी दुसरी कोणीच नसेल, प्रौढ अव
स्थेंत तर मी ईश्वराचें कांहीं विप्रीय केलें असें नाहीं परंतु कांहींतरी बाल्याव-
स्थेंत केलें असेल तें मला स्मरत नाहीं ह्मणून मला ईश्वरानें या दुःखीत अव-
स्थेमध्यें ठेविली आहे पूर्वी स्वतंत्र पणें मी तुमचा समागमें वनामध्यें संचार क-
रीत होत्यें तथापि माझ्या शरीरास विवर्णता आली नवती ती मी आतां परव
श होऊन दुसऱ्याचे गृहीं आहें यास्तव माझ्याशरीरास मालिन्य किती आलें-
आहे ते पहा. हे पार्था मला पूर्वी किती सुख होतें तें तूं जाणतच आहेस ती मी
आतां दुसऱ्याची दासी झाल्यें आहें तेणे करू माझ्या चित्ताची शांती होत नाहीं.
हे भीमा, मला असें आश्चर्य वाटतें कीं, हा भीम, धन्वा महा बाहू धनंजय इतका
अद्वितीय योद्धा असतां अग्नी सारिखा गुप्त होऊन राहिला आहे तेव्हां हें का
हीं तरी दैवीक कृत्य असावें. हे भीम सेना, प्राण्याची गती जाणण्यास कोणी स
मर्थ नाहीं, अचिंत्य प्राण्याची गती आहे यास्तव तुह्मांस इतका संकट काळ प्रा
प्त झाला या विषयीं तर्क करण्यास कोणी योग्य होत नाहींत. पहा बरें, तुह्मीं इं-
द्रा सारिखे पराक्रमी तुमचें सुख निरंतर मी पाहाण्यास योग्य व अशी श्रेष्ठ स्त्री
असतां अधम इतरांचें सुख मी पहात्यें तुह्मीं माझे पोषक असतां ही अवस्था-

माझी व्हावी काय? तेव्हां कालाची गती विचित्र आहे सागरांत पृथ्वी मला-
वश होती ती मी आज सुदेष्णेचीं दासी होऊन तिला वश जाहाल्यें पूर्वी माझ्या
अग्रभागीं पृष्ठ भागीं अनुचर गमन करीत होते ती मी आज सुदेष्णेच्या अ-
ग्रभागीं आणि पृष्ठभागीं गमन करित्यें हे भीमा, पूर्वी मी तुला बहूत दुःखें नि-
वेदन केलीं परंतु त्यांत जें हें एक मला फारच मोठें दुःख आहे तें मी तुला सांग
त्यें श्रवण कर पूर्वी कुंतीचे अंगास उद्वर्तन करण्या करितां मात्र मी चंदनादीक आ-
पले हातानें उगाळून देत असें ती मी आज विराटाचे गृहीं दासी होऊन प्रतिदि
वशीं राजास चंदन उगाळून देत्यें तेणे करून पहा किती माझे हातास घट्टे प-
डले आहेत असे घट्टे पूर्वी कधींही माझे हातास पडले नवते असें ह्मणून-
द्रौपदीनें आपले कर दोन्ही भीमसेनास दाखवून पुनः बोलत्ये हे भीमा, पू-
र्वी कुंती पासून मला कधीं भय नवतें तुमचें ही भय मला कधीं नाहीं ती मी आज.
विराट गृहीं भयाभीत किंकरी झाल्यें आहें. एकादे दिवशीं विराटराजा मला
रोषानें विचारितो कीं, सैरंध्री चंदन उगाळिलेंस किंवा नाहीं तेव्हां मला मरण-
प्राय वाटतें. मत्स्यराजाचा गृहा शिवाय कोठेंही आज पर्यंत चंदन उगाळलें ना
हीं याप्रकारें द्रौपदी आपलीं दुःखें भीमास सांगून त्याच्या मुखाकडे पहात रो
दन करूं लागली नेत्र बाष्पोदकानें परिपूर्ण होऊन सद्गदीत वाणीनें व वारंवार-
श्वासोच्छ्वास टाकण्यानें भीम सेनाचें त्दय विदीर्ण होऊन गेलें. भीमास कांहीं
च सुचेनासें झाले असतां पुनः द्रौपदी भाषण करित्ये हे भीमा, ज्यापेक्षां ईश्वरा
नें मला अभाग्य जीविकेंत ठेविली त्या पेक्षां मी पूर्वी देवाचे अपराध फारच मो
ठे केले आहेत लहान सान केले नाहींत असें वाटतें. अस्तु इतउत्तर तुला कर्तव्य
असेल तसें कर. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, असें द्रौपदीचें भाषण-
श्रवण करून वृकोदरानें तिचे ते सूक्ष्मकर आपले मुखाजवळ नेऊन वीर हंतात
री तो होता तथापि तो रोदन करूं लागला. नंतर कांहीं काल पर्यंत नेत्रांतून बा
ष्पोदकाचा त्याग करीत दुःखार्त होऊन आपली प्रिय भार्या जी द्रौपदी तिला.
ह्मणतो. असा विषय या अध्यायांत आहे.

२१ अध्याय एकविसावा— भीमसेन भाषण करितो हे द्रौपदी मा-
झ्या बाहुबलास व अर्जुनाच्या गांडीव धनुष्यास धिक्कार असो. जे तुझे हस्त-

पूर्वी आरक्त होते ते आतां किण युक्त झाले. अगे द्रौपदि ! विराट राजाच्या सभेमध्यें मीं सर्वांचेंच मर्दन करणार होतों परंतु आपलें प्राकट्य होईल याजकरितां कौंतेय धर्मराज माझ्याकडे अवलोकन करूं लागला म्हणून मीं तें कृत्य केलें नाहीं. हे कृष्णे, कीचकानें तुला पादताडण केलेलें ज्या काळीं मीं पाहिलें त्या काळीं गजासारिखी क्रीडा करीत त्या दुष्टाचें शरीर चूर्ण करून सकल मत्स्यांचें कदन करण्याची इच्छा केली होती परंतु कटाक्ष दृष्टीनें धर्मराज माझें निवारण करूं लागला. तेव्हां मीं स्तब्ध बसलों. ज्या काळीं कौरवानीं आम्हास कपटानें अक्ष द्यूतामध्यें पराजीत केलें त्याकाळीं सुयोधन, कर्ण, शकुनी, आणि दुःशासन यांचीं शिरें तोडून पाडलीं असती म्हणजे कौरवश्रीचा अंत होऊन आम्हास अरण्यांत न जावें लागतें. तें कृत्य त्या काळीं मीं न केल्यामुळें माझे हृदयांत शल्य मारल्यासारिखें होऊन सकल गात्रांचा दाह झाला. हे सुश्रोणि, तूं महामती आहेस यास्तव धर्माचा त्याग करूं नकोस, क्रोधाचें विसर्जन कर. ही तुझी अवस्था धर्मराजास जर समजली तर तो तात्काळ आपले जीविताचा त्याग करील अथवा धनंजय व नकूळ, सहदेव यांस समजलीतर तेही आपलें जीवित्व टाकून जातील मग माझें ही जीवित्व राहणार नाहीं. हे भामिनी, पूर्वी भृगुकुलोद्भव च्यवन नामक ऋषी वनामध्यें तप करीत असतां त्याजवर वारूळ वाढलें तथापि परम धैर्य करून त्याची भार्या सुकन्या पतीची सेवा करीत होती, इंद्रसेना नामक नारायणि, तूं श्रवण केलीच असशील, तिचा पती सहस्त्रवर्षांचा जरी होता तथापि त्याची सेवा करून राहिली होती. जनकराजाची कन्या सीता नामक तूं श्रवण केलीच असशील, तिचा पती अरण्यांत वास करीत असतां ती पतीचा अनुलसें करून आचरण करीत होती, ती रामाची महिषी रावणानें आपले निग्रहामध्यें ठेवून तिला अत्यंत क्लेश दिले तथापि ती पुनः रामचंद्रास प्राप्त झाली. हे भीरू, लोपामुद्रा नामक अगस्त्य ऋषीची भार्या वयें करून व रूपें करून अत्यंत सुंदर होती तथापि ती सर्व अमानुष भोगाचा त्याग करून आपल्या पतीसमागमेंच अरण्यांत गेली. तशीच

सावित्रीनामक अश्वपती राजाची कन्या ती आपला पती जो द्युमत्सेन राजाचा पुत्र सत्यवंत तो यमलोकांस जाऊं लागला असतां आपणही त्यासमागमें यमलोकीं जाण्यास सिध्द झाली. हे द्रौपदी, या प्रकारें करून तुला सांगितलेल्या स्त्रिया रूपवती असून महापतिव्रता होत्या तशीच हे कल्याणि तूंहीस र्व गुणानी युक्त व महापतिव्रता आहेस, आतां फार कालाचा अवकाश नाहीं अर्धमास राहिला आहे तों पर्यंत क्षमा कर. त्रयोदशवर्षे पूर्ण झालीं म्हणजे राजाची पट्टाभिषिक्त स्त्री होशील, असें भीमसेनाचें भाषण श्रवण करून द्रौपदी बोलल्ये हे भीमा, मला जें दुःख झालें त्याचा अंत लागेना म्हणोन आर्त होऊन नेत्रांतून बाष्पोदकाचें मोचन केलें, यांत धर्मराजास कांहीं दोष लावावा म्हणोन बोलल्यें नाहीं. प्रस्तुत जो काळ उपस्थीन झाला आहे त्या विषयीं जें तुला कर्तव्य असेल तें कर. हे भीमा, माझें रूप पाहून विराट राजा माझी इच्छा करील असें समजून सुदेष्णा नित्य उद्वेग पावल्ये. आणि मला कीचकानें हरण केली असतां विराटराजा अर्थातच माझी इच्छा करणार नाहीं या हेतूनें ती त्या कृत्यास अनुकूळ आहे हा सुदेष्णेचा अभिप्राय कीचकानें जाणून तो दुरात्मा वारंवार माझी प्रार्थना करितो, त्यास मी पुनः पुनः कोपित होऊन असें प्रतिबंध भाषण करित्यें कीं, हें काम मुदा कीचका, आपल्या आत्म्याचें रक्षण कर, पांच गंधर्वांची मीं महिषी प्रिया आहें, ते मोठे शूर आहेत ते कोपले तर तुझा नाश करतील असें मीं जरी त्या दुष्टास बोलल्यें तरी तो मला बोलतो कीं हे सैरंध्रि हे शुचिस्मिते, गंधर्वांस मीं भीत नाहीं. शतसहस्र गंधर्व जरी युध्दास आले तथापि मी त्यांचा वध करीन, तूं भिऊं नको माझा अंगिकार कर असें तो कामातूर झालेला कीचक मला बोलत असतां मीं पुनः त्यास सांगितलें कीं, अरे ते गंधर्व महा यशस्वी आहेत, त्यांच्या बलास तुझें बल साम्यता करणार नाहीं मीं आपला धर्म, कुल, व शील यांचे संरक्षण करून आहें, तुझ्या वधाची मीं इच्छा करीत नाहीं म्हणूनच तूं आजपर्यंत जिवंत राहिलास, असें जरी मीं भाषण केलें तथापि तें भाषण तो न श्रवण करितां हांस्य करूं लागतो, कीचकानें पूर्वीच सुदेष्णेस सांगून ठेविलें होतें कीं सैरंध्रीस माझे गृहीं सुरा आणण्या करितां पाठीव म्हणून सुदेष्णेने मला कीचक निवेशानीं जाण्यास आज्ञा केली, मीं तेथें

जातांच मला पाहून वश होण्या करितां माझें मोठें आर्जव केलें तर मीं वश झालें नाहीं असें जाणून क्रोध युक्त होऊन मला धरण्यास प्रवृत्त झाला हा त्या दुरात्याचा संकल्प मीं जाणून आपलें रक्षण व्हावें म्हणोन परम वेगानें राजसभेस आल्यें. राजा मला पाहत आहे तों इतक्यांत कीचकानें पाठी मागून येऊन मला लताप्रहार केला तेणें करून मी अत्यंत ताडित झालें, हें कीचकाचें कृत्य विराट राजा, कंक, इतर जन, रथी, राजाचे प्रियलोक, हस्तीवर आरोहण करणारे व नागरीक लोक यांणीं पाहिलें, त्या काळीं मीं किंचित पुढें होऊन राजास व इतर जनास जरी तिरस्काराचें भाषण केलें तथापि राजानें त्या दुष्टाचें निवारण करून शिक्षा केली नाहीं, हा कीचक विराट राजाचा सारथी, आपल्या धर्माचा त्याग करून घातुक कर्म करणारा, राजस्त्रीचा संबंधी, महाशूर, अभिमानी, व राजास सर्वार्थ साधून देणारा आहे असें जाणून राजानें त्याची उपेक्षा केली असें वाटते. हे भीमसेना असा हा दुष्टात्मा व अभिमानी कीचक परदारांची स्पृहा करणारा आहे, अशा दुष्टाची उपेक्षा राजानें केली असतां. विपुल अर्थ व स्त्रियांचा संग्रह करण्यास कांहीं अडचण पडणार नाहीं अशा पुरुषाचा जो संग्रह करील तो सन्मार्गानें न राहून धर्माकडें त्याचें लक्ष लागणार नाहीं. पापात्मा कीचक अशिक्षिता सारिखा कामबाणास वश होऊन माझी प्रार्थना करीत असतां वारंवार मी जरी त्याचा तिरस्कार केला तथापि ज्या ज्या काळीं तो मला अवलोकन करील त्या त्या काळीं मला ताडण करण्यास प्रवृत्त होईल, तर मीं जीवाचा त्याग करीन, मीं आपल्या जिवाचा त्याग केला असतां तुम्हीं धर्मा विषयीं मोठे यत्न करणारे असतांही तुमचा धर्म नष्ट होईल, कदाचित् सांप्रत आपला समय नाहीं त्रयोदश वर्षानंतर आपला समय येईल तेव्हां कार्य करणें तें करूं, अशी तुम्ही उपेक्षा करून स्वस्थ बसाल तर तुमची भार्या अतःपर मृत झाली असें समजा. अरे भीमसेना, भार्यारक्षण केली असतां सकल प्रजा रक्षण केल्या सारिख्या होतात प्रजा रक्षण केली असतां आपल्या आत्म्याचें रक्षण केलें असें होतें, नंतर तोच आत्मा भार्येच्या गर्भीं पुत्र रूपानें उत्पन्न होतो, म्हणून भार्येस जाया अशी संज्ञा आहे असें पंडित म्हणतात. भार्येनें भर्त्याचें अवश्य रक्षण करावें कारण तोच भर्ता

तिचे उदरांचे ठाई पुनः उत्पन्न होणार असें वर्णाश्रम धर्म कथन करणा त्या ब्राह्मणापासून श्रवण केलें आहे. अरे क्षत्रियांचा धर्म शत्रुनिबर्हणा खेरीज इतर नाहीं असें असतां धर्मराज व तूं असे समक्ष पहात अस तां कीचकानें मला लत्ताप्रहार केला. पूर्वी घोरजटासुरापासून तूंच मा झें रक्षण केलेंस आणि बंधूं सह वर्तमान तूंच जयद्रथास जिंकिलेंस, त साच हा पापीष्ट कीचक माझा अवमान करणारा यास यमलोकीं पाठी व. हा कीचक, राजास अत्यंत प्रीय आहे म्हणून मला याणें इतका शोक उत्पन्न केला यास्तव जसा कुंभ पाषाणावर हापटून फोडतात तसा हा कामी पुरुष भिन्न करून टाक. हे भीमसेना. या कीचकानें बहुत अनर्थ उत्प न्न केले आहेत यास्तव हा उदयीक सूर्योदय पर्यंत जर जिवंत राहीलतर मी विष भक्षण करून प्राणत्याग करीन; परंतु त्या दुष्टास वश होणार नाहीं. हे भीमसेना, या काळीं तुझ्या आग्रभागी मला मरण श्रेयस्कर आहे असें द्रौपदी सर्व वर्तमान भीमसेनास सांगून नंतर भीमसेनाचा ऊरस्थलस माश्रित होऊन रोदन करूं लागली असतां भीमसेनानें तीस आलिंगन देऊन बहुत प्रकारें तिचें सांतवन केलें. नंतर आपल्या हातांनीं तिच्या ने त्रांचे अश्रु परिमार्जित करून व कीचकाचें सर्व कृत्य मनामध्यें आणून महा बली भीमसेन आपल्या ओष्ठाचा प्रांतभाग जिव्हेनें चाटीत परम को पानें दुःखार्त झालेल्या द्रौपदीस भाषण करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

२२ अध्याय बाविसावा :- भीमसेन भाषण करितो हे भद्रे, जसें तूं सां गितलेंस त्या प्रमाणें आज मी करितो. बांधवांस ह वर्तमान आज मी की चकाचा वध करीन. हे चारु हासिनी, ही मत्स्यराजानें केलेली नृत्यशाळा आ हे तेथें दिवसास कन्या नृत्य विद्येचा अभ्यास करून रात्रीं स्वगृहीं जातात ते थें उत्तम सुप्रतिष्ठीत असें शयनस्थान आहे तेथें तूं ये म्हणजे मीं त्यास्थ ळीं येईन. असा आज सायंकाळीं कोणास न समजतां कीचकाशीं संकेत क रून त्यास नृत्यशाळेंत आण म्हणजे मीं तेथें येऊन त्याचे पूर्वी मृत जाह लेले पितामह त्यास दाखवितों. जा, कांहीं चिंता करूं नको दुःखशोकाचा त्या

गकर, हा संकेत किचकाशिवाय दुसरे कोणास न समजेल असा करजा प्रकारें तो माझ्या संन्निध येईल असें कर. असें उभयतांचें भाषण झाल्यावर तीं दुःखित होऊन नेत्रोदक टाकीत शेष रात्र केव्हां अतिक्रांत होईल अशी मार्ग प्रतीक्षा करीत बसलीं इतक्यांत ती रात्र गेल्यावर द्रौपदी, भीमसेन आपआपल्या स्थळीं गेलीं नंतर कीचक प्रातःकाळीं विराटगृहीं येऊन द्रौपदीस बोलतो हे सैरंध्री, विराट राजा पहात असतां मी सभेमध्यें लत्ताप्रहार करून तुला जरी पाडिली तथापि तुझें त्राण (रक्षण) झालें नाहीं हा कशाचा राजा, नावाचा मात्र आहे मत्स्य देशाचा राजा व सेनापतीही मीच आहें तो मीं आज तुझा दास होतों यास्तव स्वरवें करून माझें सेवन कर हे सुश्रोणि, तुझी इच्छा असल्यास तुला शंभर निष्क सुवर्ण शत संख्याक दासी व दास खेचरी युक्त रथ इतकीं तुला देतों परंतु तूं मला वश हो. असें कीचकाचें भाषण श्रवण करून द्रौपदी बोलत्ये हे कीचका आज मी तुझ्याशीं कांहीं संकेत करित्यें, तो संकेत तुझा भ्राता अथवा तुझा सखा कोणी न जाणतां माझ्याशीं संगत हो. महा यशस्वी जे गंधर्व यांचे अनुप्रवादास मी फार भित्यें, यास्तव मी सांगत्यें तेथें तूं कोणास न कळल्यावांचून आल्यास मी तुला वश होईन. असें सैरंध्रीचें भाषण श्रवण करून कीचक बोलतो हे सुश्रोणि, जसें तूं सांगशील तसें मी करीन शून्य स्थान जेथें असेल तेथें मी एकटाच येतों. हे रंभोरु, सूर्या सारिखे ते जस्वी गंधर्व जेथें तुला पहाणार नाहींत त्याच ठिकाणीं मी येऊन संभोग करीन मीं मदनानें अत्यंत मोहित झालों आहें. असें भाषण ऐकून द्रौपदी बोलत्ये हे कीचका, हें मत्स्य राजानें नर्तनागार केलें आहे तेथें कन्या नृत्याचा अभ्यास दिवसास करितात, आणि आपआपल्या गृहीं जातात त्या ठिकाणीं रात्रीं अंधःकार पडला म्हणजे ये. त्या स्थळीं गंधर्व न जाणतां तुझा माझा संगम निःसंशय होईल. असा कृष्णेचा आणि कीचकाचा संवाद होत आहे तों अर्ध दिवस अतिक्रांत झाला. कीचकास तो एक मास अतिक्रांत झाला असें वाटून हर्षानें परम त्वरित आपले गृहीं गेला परंतु त्या मूढानें सैरंध्रीरूप आपणास कोणी एक मृत्यूच आहे असें

न जाणतां काम मोहीत होऊन गंध, आभरणें, व माल्यादिकानीं आपला देह तत्काळ आलंकृत करून त्या वाम लोचनेचें चिंतन करीत करीत बहुत काळ अतिक्रांत करून निर्वाण काळीं जसा दीप वृद्धी पावतो तशी कीचकाची शोभा विनाश काळसमयीं वृद्धी पावली. द्रौपदीनें संकेत केल्यामुळें कीचक काम मोहीत होऊन दिवस गेला किंवा नाहीं याचें भान त्यास राहिलें नाहीं. इकडे द्रौपदी महानसांमध्यें भीमासन्निध येऊन भाषण करित्ये हे भीमा, नर्तनागारामध्यें किचक येण्याविषयीं संकेत कर म्हणून तूं मला सांगितलेंस त्याप्रमाणें आज तो शून्य नर्तनागार झालें म्हणजे एकटाच येणार आहे नंतर तूं त्यांत कीचकास निर्जीव कर. हा कीचक आपल्या गर्वें करून गंधर्वांचा अवमान करितो यास्तव यमुना ह्रदापासून श्रीकृष्णानें कालिया नामक नागाचा उद्धार केला तसा तूं कीचकाचा गर्व नाहींसा कर तेणें करून माझ्या दुःखाचें मार्जन होऊन तुझा व तुझ्या कुलाचा मान राहील असें कर. हे भीमा, तुझें कल्याण असो, असें द्रौपदीचें भाषण श्रवण करून भीमसेन बोलतो हे वरारोहे प्रिये, तुझ्या भाषणा प्रमाणेंच मी करितों मी आपल्याला इतरांच्या साहाय्याची इच्छा करीत नाहीं. पूर्वीं हिडिंबासुरास मारून जशी मी तुझी प्रीति संपादन केली तशीच आतां कीचकाचा वध करून तुझी प्रीति संपादन करीन हें माझें भाषण सत्य जाण. सत्यपणा, भ्रातेव धर्म यांचा पुरस्कार करून मी हें भाषण करितों, देवपतीनें वृत्रासुराचा जसा वध केला तसा मी कीचकाचा वध करीन अथवा गहनस्थळीं किंवा प्रकाशस्थळीं कीचकास नेऊन आपटीन या कीचका करितां मत्स्यपती जरी युध्दास माझ्या अग्रभागीं आला तथापि मी त्याचा वध करीन. नंतर दुर्योधनाचा वध करून सकल वसुंधरा आपल्यास मिळाल्यावर युधिष्टीर राजा स्वखें करून मत्स्य देशांत वास करो, असें भीमसेनाचें भाषण श्रवण करून द्रौपदी बोलत्ये हे विभो भीमसेना, माझ्या करितां गुप्त रूपानें तूं कीचकाचा वध करून आपलें सत्व रक्षण कर. परंतु प्रसिध्द होऊं नकोस, असें द्रौपदीचें भाषण श्रवण करून भीमसेन बोलतो हे भीरु, फार चांगलें आहे. जसें तूं म्हणशील

त्या प्रमाणेंकरीन.मी अदृश होऊन आज तुझ्या करितां कीचकाचा बांधवांसहव
र्तमान वध करितों जसा गज बिल्व फळास गृहण करून सहज हापटतो,
तशी तूं प्राप्त नहोणारी असून तुझी इच्छा करणारा दुरात्मा जो कीचक यास
सहज मी आपटीन. असें भाषण करून भीमसेन छंन्न रूपानें नृत्यशाळें
त जाऊन बसला आणि सिंह, मृग धरण्या करितां अदृश होऊन मृगाची
इच्छा करीत बसतो तशी कीचकाची आकांक्षा करीत बसला.इकडे कीचक
अलंकारानें सुशोभित होऊन पांचालीच्या संगमाशेनें अंधारयुक्त नर्त
नागारांत प्रविष्ट झाला द्रौपदीच्याधर्षण कोपें करून जाज्वल्य मानझा
लेला जो भीमसेन तो पूर्वींच शयनावर निद्रिस्त झाल्या सारिखा होता.
त्याचे सन्निध येऊन हर्षोन्मथित चित्तानें विस्मय पूर्वक हस्तस्पर्श करून
भाषण करूं लागला हे सुभ्रु, तुझ्या करितां फार चांगलीं, तेजस्वी, बहुतमो
लाचीं अशीं रत्नें आणिलीं आहेत आणि तुझ्या करितां रत्नांनीं परिपूर्णदा
सीदास परिछेदानीं युक्त, रूपलावण्य युक्त युवतीनीं अलंकृत व क्रीडा
रतिविराजितअसें अंतःपुरसिध्द करून मी तुझ्या कडे आलों आहें तुला घेऊन
मीं गृहीं गेलों असतां सकल गृहगत स्त्रिया तुजसहवर्तमान मला
पाहून म्हणतील कीं हे कीचका, तुझ्या सारिखा रूपवान पुरूष उत्तम
वस्त्र परिधान करणारा दुसरा या भूमंडळीं कोणी नाहीं असें कीचका
चें भाषण श्रवण करून भीमसेन द्रौपदी सारखें बोलतो हे सूता, तूं आपलीप्र
शंसा करणारा फारच सुंदर आहेस दैव योगें करून येथें तुझें आगमन
जाहलें, हा जो मला तूं हस्त स्पर्श केलास असा स्पर्श मला पूर्वी कोणीच
केला नव्हता तूं काम धर्म विचक्षण आहेस यास्तव स्पर्श सूख तूं जाण
तोस स्त्रियांस प्रीति करणारा असा तुझ्या सारिखा दुसरा पुरुष कोणी
नाहीं असें भाषण करून महा पराक्रमी भीमसेन, एकाएकीं उठून हांस्य
पूर्वक पुनः भाषण करितो अरे दुष्टा, अद्रिप्राय गज सिंहानें एथ्वीवर
पाडिला असतां जसा तो दिसतो तसा मीं आकर्षण केलेल्या पापी अशा
तुला तुझी बहिण पाहिल. तुझा प्राण गेला असतां सैरंध्री निर्भयप
णें संचार करील आणि तिचे पांच पती सुखें करून आनंद पावतील अ-

सें भाषण करून महाबली भीमसेनानें कीचकाच्या माल्यग्रथित केशांचें आकर्षण करून आपले सन्निध आकृष्ट करून त्याच्या दोनी बाहूंचें गृहण केलें. वसंतकाळीं हस्तिनी करितां जसें बलिष्ठ गजांचें युध्द होतें तसें उभयतां नरश्रेष्ठांचें युध्द झालें जसें पूर्वी कपिश्रेष्ठ भ्राते. वाली आणि सुग्रीव याणीं युध्द केलें तसें कीचक मुख्य आणि नर मुख्य या उभयतांनीं मोठें युध्द केलें. उभयतांही हस्तपुटें करून क्रोधानें पंच फणाच्या नागासारिखें दंष्ट्रा याणीं एकमेकांस दंश केल्या मुळें परम त्रस्त झाले इतक्या संधींत कीचकानें भीमास परम वेगानें प्रहार केला असतां भीमसेनाचा एक पादही स्थानापासून चलित झाला नाहीं, नंतर उभयतांही भुजताडण करूं लागले असतां वेणूस्फोट काळीं जसा शब्द होतो तसा परम भयंकर शब्द होऊं लागला. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या प्रकारें त्या बलाढ्यांचें निशीथ काळीं विजन स्थळीं युध्द होत असतां तें नर्तनागार कंपायमान होऊं लागलें उभयतांही मोठे बलाढ्य क्रोधें करून गर्जना करितां करितां भीमसेनानें कीचकास हस्ततलाचा प्रहार केला, इत्यादि नाना प्रकारे त्या उभयतांचें युध्द चाललें नंतर पुनः भीमसेन क्रोधानें आपले ओष्ठ दंतानीं चर्वण करीत कीचकाचे दोन हात, पाय आणि मूख पशू सारिखें एकत्र बांधोन मांस पींडा प्रमाणें त्याचा गोल करून योषित श्रेष्ठ जी द्रौपदी तिला बोलतो हे पांचाली, हा कामुक कोणत्या अवस्थेंत आहे हें पहा असें म्हणोन भीमसेनानें आपल्या पायांनीं त्या दुरात्म्याचे शरीराचें पीडन करून अग्नी प्रज्वलित करून उजेड केला आणि पांचालीस म्हणतो हे भीरु, हे सुकेशी, तूं अत्यंत शील व गुणांनीं युक्त आहेस यास्तव जे तुझी प्रार्थना करतील ते या कीचकाचे अवस्थेस जातील. पहा हा कीचक कसा आतां शोभतो आहे वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, या प्रकारें द्रौपदीचें प्रीय होण्या करितां भीमसेनानें दुष्कर कर्म करून कीचकाचा ज्या काळीं वध केला त्या काळीं भीमसेनाच्या रोषाची शांती झाली, हें सर्व कृत्य भीमसेनानें द्रौपदीस दाखवून पुनः तो आपले स्थानीं महानसामध्यें गेल्यावर इकडे स्त्री श्रेष्ठ द्रौपदी अत्यंत हर्षित होऊन सभासंर-

क्षण करणारे जे लोक होते त्यांस भाषण करित्ये हे जनहो माझे पती गं
धर्व आहेत त्याणीं या कीचकाचा वध केला असतां कीचक मृत होऊन
पडला आहे त्यास तुम्हीं लौकर पहा. परस्त्री विषयीं जो कामी होतो त्या
ची अशी अवस्था होत्ये या प्रकारें सैरंध्रीचें भाषण श्रवण करून नर्त-
नागार संरक्षण करणारे सहस्त्रावधी सेवक लोक हस्तामध्यें उल्का
(कोलत्या) घेऊन जेथें कीचक मृत होऊन पडला होता त्या ठिकाणीं गेले.
कीचकाच्यांसर्व शरीरांतून रुधिराचे प्रवाह चालले व पाणी म्हणजे हस्त,
पांद हीन झाले ले असा मृत होऊन पृथ्वीवर पडलेला पाहून परम वि-
स्मयानें एकमेकांस भाषण करूं लागले कीं हें मानुष कर्म नव्हे यांत संशय
नाहीं या कीचकाची ग्रीवा कोठें आहे, शीर कोठें आहे, चरण कोठें गेले हें मो-
ठें आश्चर्य होय. या कीचकास गंधर्वांनीं खचीत मारला असेल. या विषयीं
आम्हास किमपीहि आतां संशय नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे
२३. अध्याय तेविसावा :- वैशंपायन सांगतात हे जनमेजया
त्या काळीं कीचकाचे समग्र बांधव त्याचे संन्निध येऊन प्रेतभूत कीचकास
पाहून रोदन करूं लागले तेव्हां सर्वांचे शरीरावर रोमांच उभे राहिले. इंद्र
जसा दानवांचा पराजय करितो तसा भीमसेनानें पराजित संछिन्न की
चकास पाहून त्याचें दहन करण्याविषयीं बाहेर नेण्यास उपक्रम करीत
आहेत तों इतक्यांत स्तंभास आलिंगन करून उभी राहिलेल्या द्रौपदी
स दुरून पहातांच समग्र कीचक एकमेकांस भाषण करूं लागले कीं अहो
या सैरंध्री करितां कीचक मरण पावला तस्मात इलाच मारून टाकावी,
त्यांत कोणी कीचक म्हणूं लागले कीं सूत पुत्र इच्या करितांच मरण पाव
ला, यास्तव या मृताचें प्रीय करण्या करितां त्याच्या प्रेतास हवर्तमान
इचा दहा करावा. नंतर ते सर्व कीचक विराटराजाकडे जाऊन राजास भा
षण करूं लागले कीं हे राजन्, या सैरंध्री करितां कीचक मरण पावला,
यास्तव त्यास हवर्तमान आम्हीं सैरंध्रीचा दहा करितों या विषयीं तुझी
आज्ञा असावी. असें सूतांचे भाषण श्रवण करून राजानें हे महापरा
क्रमी आहेत असा मनामध्यें विचार करून कीचकास हवर्तमान सैरं-

धीचा दहा करण्या विषयीं अनुमोदन दिलें' तेव्हां सूत पुत्रांनीं तिच्या पाशीं जाऊन अतित्रस्त मोह पावलेल्या सैरंध्रीस घेऊन त्या प्रेतावर तिला बांधिली. स्मशानांत गमन करण्या विषयीं जा काळीं निघाले त्याकाळीं सूतांनीं दुःखित केलेली सैरंध्री अनाथा सारिखी लज्जित होऊन आक्रोशानें भाषण करित्ये, जय, जयंत, विजय, जयत्सेन, जयद्बल हे गंधर्व ही माझी दीन व आक्रोशा वाणी श्रवण करोत.मला सूत पुत्र नेतात हें तुम्हीं पहा. विजे सारिखा जांच्या धनुष्याच्या प्रत्यंचेचा टणत्कार होत असतो जे स्वतः महावेगवान असून जांचें युध्द महा भयंकर आहे,अशा गंधर्वांच्या धनुष्याचा टणत्कार कोठेंच मी श्रवण करीत नाहीं, ते गंधर्व ही माझी दीनवाणी श्रवण करून मुक्त ता करोत अशी द्रौपदीची दीनवाणी श्रवण करून भीमसेन बोलतो हे सैरंध्री, तुझी वाणी मी श्रवण केली. सूत पुत्रांपासून तुला कांहीं भय नाहीं, असें भाषण करून नंतर महा बाहू भीमसेन जांभया देत देत सूत पुत्रांच्या हिंसेच्या उद्देशानें, निरालस्य पणानें आपला वेष कांहीं विपरीत करून आउद्वारानें महानसा पासून बाहेर पडला आणि एक प्राकार उल्लंघन करून स्मशान प्रदेशीं कीचक कोणच्या मार्गानें जातात हें पाहण्या करितां एका वृक्षावर जाऊन बसला नंतर ते कीचक प्रेत घेऊन जात असतां त्यांच्या अग्रभागीं स्मशान समीप जाऊन एकताल मात्र उंच जाचा ऊर्ध्व प्रदेश शुष्क जाहलेल्या महान महान जाच्या शाखा असा एक वृक्ष गजा सारिखा हस्तांनीं उपटून दश वाव लंबायमान स्कंधासह वर्तमान आपले स्कंधावर घेऊन साक्षात दंडपाणी यमच काय असा मार्गानें जात असतां त्याच्या ऊरू वेगें करून, न्यग्रोध, अश्वत्थ, किंशुक इत्यादि वृक्ष समुदाय चूर्ण होऊन पृथ्वीवर पडले अशा भीमसेनास कीचकानीं पाहून ते भयानें कंपीत होऊन म्हणूं लागले कीं हा सिंहा सारिखा क्रुद्ध झालेला अंतका सारिखा दिसतो हा गंधर्व तर नसेल ना? नंतर सैरंध्रीसह वर्तमान आपले भ्रात्याचें दहन करण्याचा निश्चय केला होता तो टाकून हा गंधर्व स्कंधावर वृक्ष घेऊन आला तस्मात आतां सैरंध्रीस सोडा हें मोठें

आपणास भय उत्पन्न झालें आहे असें ह्मणाले. दानव इंद्रास पाहून जसे पलायन करितात तसे ते कीचक द्रौपदीचा त्याग करून पळूं लागले असतां भीमसेन त्यांच्या सन्निध येऊन एकशें पांच कीचकांस यमगृहीं पाठविले, नंतर द्रौपदीच्या सन्निध येऊन तिला प्रेतावर बंधन केली होती तीस सोडवून अश्रुपूर्ण दीन झालेली अशी जी द्रौपदी तीस तो महाबाहू भाषण करितो हे द्रौपदी तूं अनपराधि असतां त्या दुष्टानी तुला फार क्लेश दिले म्हणून त्या सर्वांचा मी वध केला आतां तुला सूतांपासून कांहीं भय नाहीं आतां निर्भयपणें नगरांत प्रवेश कर. मीही पाठिमागून आलेल्या मार्गानें महानसांत जाऊन बसतों. या प्रमाणें भीमसेनानें सैरंध्रीस भाषण केलें तेव्हां सैरंध्री नगरांत गेली, नंतर भीमसेनही महानसामध्यें गेला. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, महान् वन जसें छिन्न करावें तसे भीमसेनानें एकशें पांच कीचक व एक सेनापती मारला असे एकशें साहा कीचक मारिले हें वर्तमान नगरांतील लोकांनीं श्रवण करून ते आश्चर्ययुक्त होऊन एकमेकांस सांगण्याविषयीं संकोच करूं लागले. अ. वि. या अ. आहे.

२४. अध्याय चोविसावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सूतपुत्रांचा गंधर्वांनी वध केला हें वर्तमान सांगण्या करितां कांहीं लोक विराटराजाकडे जाऊन बोलतात हे राजा, महाबली सूतपुत्र गंधर्वांनीं मारिले. वज्रें करून पर्वतांचीं शिरें विदीर्ण केलीं असतां पर्वत जसे दिसतात तसे हे सूतपुत्र विदीर्ण होऊन पृथ्वीवर पडलेले सर्वांनीं पाहिले. सैरंध्री मुक्त होऊन पुन: तुझ्या गृहीं येणार या सैरंध्री विषयीं संपूर्ण नगर संशयित झालें आहे सैरंध्री अत्यंत रूपवती इचे पती गंधर्व महाबलाढ्य आणि पुरुषास तर विषय अत्यंत इष्ट यास्तव हे राजा, आतां सैरंध्रीच्या दोषें करून हें संपूर्ण तुझें नगर नाश पावणार नाहीं असा विचार कर ह्मणजे तुझें नगर संरक्षित होईल. असें नागरीक लोकांचें भाषण श्रवण करून विराटराजा त्यांस भाषण करितो आतां तुह्मीं सूतपुत्रांची लोकर उत्तरक्रिया करा. एकच अग्नी प्रदीप्त करून रत्नें व गंधयुक्त पदार्थांनीं त्यांचा दाह करा, असें सर्व लोकांस सांगून राजास भय उत्पन्न

झालें त्या काळीं आपल्या स्त्रियेस भाषण करितो हे स्त्रिये, आतां सैरंध्री येथें आली ह्मणजे तिला तूं असें ह्मण कीं, तुझा इच्छेस येईल तथें गमन कर, तुझा मुळें गंधर्वांपासून आपला परा भव होईल. या भयानें राजा तुझाशीं समक्ष बोलावयास समर्थ नाहीं. तूं गंधर्वांनीं संरक्षित असल्यामुळें तुझाशीं स्त्रियांनीं भाषण केल्यास दोष नाहीं असे जाणून राजा ज्ञेनें मी हें तुझाशीं संभाषण केलें. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीमसेनानें सूत पुत्रांचा नाश केल्यावर द्रौपदी त्यांपासून निर्भय होऊन व्याघ्रानें त्रस्त केलेल्या हरणी सारिखी त्रस्त होऊन आपलीं वस्त्रें व गात्रें जलानें संपूर्ण प्रक्षालित करून नगरांत येत असतां कांहीं पुरुष तिला पाहून दश दिशेस पलायन करूं लागले. कांहीं पुरुष, गंधर्वभयानें त्रस्त होऊन नेत्र झांकून बसले. द्रौपदी राजगृहीं प्रविष्ट होऊन महानस द्वारीं येतांच मत्त द्विपा सारखा अवस्थित झालेला जो भीमसेन यास पाहून विस्मय पूर्वक कांहींएक संज्ञेनें भाषण केलें कीं, ज्या गंधर्वराजानें मला मुक्त केली त्या गंधर्वराजास माझा नमस्कार असो, असें द्रौपदीचें भाषण श्रवण करून भीमसेन भाषण करितो, जे पुरुष तुला वश होऊन संचार करीत होते ते तुझें भाषण श्रवण करून अनृणी झाले. असें भाषण श्रवण करून द्रौपदी नर्तनागारामध्यें जाऊन विराट राजाचा कन्येस नर्तन शिक्षा करणारा जो महा बाहू धनंजय यास पाहून "सकल कन्यानीं सैरंध्री अनपराधी असतां दुःखित झालेली पाहून तिला बोलतात हे सैरंध्री, तूं आपल्या प्रारब्ध वशानें दुःखा पासून मुक्त होऊन येथें पुनः आलीस, ज्या सूतांनीं तूं अनपराधी असतां तुला दुःखविलें ते सूतही तुझा दैवें करून नष्ट झाले, असें कन्यानीं भाषण केल्यावर, बृहन्नला भाषण करित्ये हे सैरंध्री, तूं कशी मुक्त झालीस आणि ते दुष्ट पापी कसे मृत झाले या विषयीं यथा तथ्य जें वर्तमान झालें असेल तें श्रवण करण्या विषयीं मी इच्छित्यें, असें बृहन्नलेचें भाषण श्रवण करून सैरंध्री बोलत्ये हे बृहन्नले, तूं राज कन्येच्या अंतःपुरांत सुखें करून वास करित्येस. सैरंध्रीला दुःख झालें हें तूं कशानें जाणशील, मी फार दुःखित झाल्यें असतां मला हास्य पूर्वक दुःखाचें कारण विचारित्येस काय ?

मला जें दुःख झालें आहे तशा दुःखाचा अनुभव तुला कधींही नसेल. असें सैरंध्रीचें भाषण श्रवण करून बृहन्नला बोलल्ये. हे कल्याणि, बृहन्नलेलाही मोठें दुःख आहे. क्लीबयोनी प्रत मीं गेल्यें हें तुला विदीत नाहीं कीं काय? पूर्वीं तूं व मी एकस्थलीच वास करीत होतों, यास्तव तुला क्लेश झाले असतां मला दुःख कसें होणार नाहीं बरें? दुसऱ्याचे हृदयांत काय आहे हें आपल्यास कसें समजेल बरें? असें बृहन्नलेनें भाषण केल्यावर द्रौपदी राजकन्येसहवर्तमान सुदेष्णेचा सन्निध आली, तेव्हां सुदेष्णा तिला पाहून भाषण करित्ये हे सैरंध्री, जिकडे तुझी इच्छा असेल तिकडे जा. कारण तुझे पती गंधर्व येऊन कदाचित् राजाचा पराभव करितील. तूं तर अत्यंत रूपवती, तरुणी आहेस व पुरुषास विषय तर अत्यंत इष्ट आहे आणि तुझे पती गंधर्व तर फारच कोपिष्ट आहेत. असें सुदेष्णेचें भाषण श्रवण करून सैरंध्री बोलल्यें हे भामिनी, आतां तेरा दिवस पर्यंत राजा माझी क्षमा करी, तेरा दिवसांनंतर गंधर्व कृतकृत्य होऊन तुझें प्रिय करून मला घेऊन जातील, नंतर बांधवांसहवर्तमान राजाचें बहूत कल्याण होईल यांत संशय नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

२५ अ॰ वैशंपायन सांगतात हे जनमेजया, अनुजांसहवर्तमान कीचकाचा घात केला हें पुरामध्यें सकल लोकांस श्रुत होतांच त्यांस विस्मय होऊन एकमेकांस भाषण करूं लागले कीं, काय हो? राजाचा अत्यंत प्रिय, महापराक्रमी, सेनानायक, योध्यांमध्यें श्रेष्ठ, स्त्रियांचा अभिलाष करणारा, दुर्मती, पापात्मा कीचक गंधर्वांनीं मारला तशीच ही वार्ता देशोदेशीं प्रसिध्द झाली. इकडे दुर्योधनानें पांडवांच्या शोधा करितां बाहेर जे दूत पाठविले होते त्या दूतानीं ग्राम, राष्ट्रें, नगरें व इतर बहूत देश होते तेथें जाऊन त्याणीं पांडवांचा बहूत शोध केला परंतु ठिकाण लागला नाहीं, हे सांगण्या करितां पुनः ते हस्तनापुरीं येऊन द्रोणाचार्य, कर्ण, कृपाचार्य, भीष्म, सकल भ्राते, महारथी त्रिगर्त, यांसहवर्तमान दुर्योधनराजा सभेमध्यें बसला होता त्यास निवेदन केलें कीं हे राजा, पांडवांचा शोध लावण्या विषयीं आम्हीं बहूत यत्न केला, मोठीं मोठीं अरण्यें पाहिलीं, जा

वनामध्यें मनुष्यें संचार करीत नाहींत, मृगांनीं व्याप्त, नाना प्रकारचे द्रुम, लता, प्रताने व गुल्म इत्यादिकें करून व्याप्त अशा ठिकाणीं नाना प्रकारचे देशांत शोध केला परंतु दृढ विक्रम जे पार्थ यांचा शोध लागला नाहीं; परंतु आम्हांस असा ठिकाण लागला कीं, पांडवांचे इंद्रसेनादिक सूत द्वारकेस आहेत. पांडव कोठें गेले यांचा मात्र ठिकाण लागला नाहीं. व द्रौपदी कोठें आहे हें ही समजत नाहीं. तस्मात हे भरतश्रेष्ठा पांडव कोठें तरी नष्ट झाले, जर ते जिवंत असते तर त्यांचें राहण्याचें ठिकाण अथवा कोणीकडे गेले यांचा शोध लागला असता, परंतु ज्यापेक्षां ते समजण्यांत आले नाहींत त्यापेक्षां नष्ट झाले हेंच खचित आहे. इतःपर आम्हीं काय करावें या विषयीं आज्ञा दे. आम्ही पांडवांचा शोध करण्याकरितां फिरत असतां एक कल्याण कारक गोष्ट अवलोकन केलेली तुला सांगतों श्रवण कर. मत्स्यराजाचा सेनापती, महाबलाढ्य कीचक जाणें आपल्या बलें करून त्रिगर्तांस मारिलें होतें त्यास रात्रीस अदृश्यरूपानें गंधर्वांनीं येऊन सबांधव मारिला तो भूमीवर अद्याप पडला आहे, तो आम्हीं स्वतः पाहिला. ही प्रीय वार्ता आम्हीं तुला सांगितली, येणें करून तुझ्या शत्रूचा पराभव झाला असें समज. हे राजा, तूं आतां कृतकृत्य झालास, इतउत्तर काय कर्तव्य असेल तें कर. असा विषय अध्यायांत आहे.

२६ अध्याय सविसावा :- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दूतांनीं सांगितलेलें वर्तमान दुर्योधनानें श्रवण करून विमनस्क होऊन सभासदांस भाषण करितो दैवाची गती जाणण्यास फार कठीण आहे, ती कोणासही कळत नाहीं, असें सभासदांस बोलून पुनः दूतांस भाषण करितो अरे दूतहो, कोठें तरी जाऊन पांडवांचा शोध करा, त्यांचा अवशिष्ट काळ थोडा उरला आहे, हें तेरावें वर्ष चाललें आहे. या वर्षाचा अवशिष्ट भाग थोडा उरला आहे, तो अतिक्रांत झाला म्हणजे सत्यव्रत परायण उन्मत्त नागासारिखे पराक्रमी पांडव आशी विषसदृश असे आम्हां सकल कौरवांस फार दुःख देतील. सर्व पांडव कालवेत्ते आहेत, सर्वांनीं कपट वेष धरिला असेल, त्यांचा जर या वर्षांत शोध लागला तर त्यांणीं पुनः वनांत

प्रवेश करण्याची प्रतिज्ञा केली आहे, यास्तव हे दूतहो, तुह्मीं लोकर त्यांचा शोध करा, म्हणजे माझें राज्य निःसपत्न होऊन चिरकाल पर्यंत राहील असें दुर्योधनाचें भाषण श्रवण करून कर्ण भाषण करितो हे राजा, दुसरे उत्तम धूर्त, दौत्य कर्मांत फार दक्ष व उत्तम कार्य करणारे. असे दूत असतील त्यांस पाठवावे. त्या दुतानीं मोठ मोठे देश, गोष्ठस्थानें, सिध्दांचे आश्रम व नानाप्रकारचीं तीर्थें इत्यादि ठिकाणीं जाऊन शोध करावा. मोठमोठीं राजांचीं पुरें असतील तेथें जाऊन आचरण, स्वभाव इत्यादिकें करून त्यांचा तर्क करावा, ते कोठें तरी गुप्तरूपानें राहतील, आपला वेष पालटतील यास्तव बहूत धूर्ताईनें त्यांचा शोध लाविला पाहिजे. नद्या, तीर्थ, ग्राम, नगरें, आश्रम, रम्य पर्वत, गुहा, इत्यादि सर्व ठिकाणीं शोध करावा, याप्रकारें कर्णानें भाषण केल्यावर दुर्योधनाचा कनिष्ठभ्राता दुःशासन बोलतो हे राजा, जे दूत पूर्वीं पांडवांचा शोध करण्या करितां गेले होते त्यांस बक्षीस देऊन पुनः पांडवांचा शोधा करितां पाठवावे. आणि कर्ण म्हणतो त्याप्रमाणें दुसरेही दूत पांडवांचा शोध करण्याकरितां पाठविले असतां चिंता नाहीं, पूर्वीं जे दूत गेले होते त्याणीं व प्रस्तूत जे जातात याणीं पांडवांचा शोध सत्वर करावा; परंतु मला असें वाटतें कीं, ज्या पेक्षां त्यांचा कोठें ठिकाण लागत नाहीं, त्या पेक्षां ते फार गुप्तरूपानें राहिले असतील, किंवा समुद्रपार गेले असतील, ते आपल्यास शूर म्हणवितात, त्या बलावर ते कोठें तरी निबिड अरण्यांत गेले असतां सर्पदंश होऊन मृत झाले असतील अथवा विषप्राशन करून नष्ट झाले असतील यांत संशय नाहीं. यास्तव हे दुर्योधन राजा, तूं आतां आपलें अंतःकरण व्यग्र न करितां उत्साह कार्य जें कर्तव्य असेल तें कर. असा विषय या अध्यायांत आहे.

२७ अध्याय सत्ताविसावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कर्ण आणि दुःशासन या उभयतांचें भाषण झाल्यावर महा पराक्रमी तत्त्व दर्शी द्रोणाचार्य भाषण करितात हे राजा, पांडवांचा कोठें ही नाश अथवा पराभवही व्हावयाचा नाहीं ते महाशूर, कृतविद्य, बुद्धि-

मान्, जितेंद्रिय, धर्मज्ञ व कृतज्ञ असून आम्हला ज्येष्ठ भ्राता जो धर्मराज याचें मनोद्धारण करणारे आहेत. धर्मराज तर नीति धर्मार्थतत्ववेत्ता असून यमधर्मास जें व्रत प्रिय आहे तें व्रत करणारा आहे, यास्तव सर्व त्याचे भ्राते त्यास अत्यंत अनुकूल व जेणें करून त्याचें हित होईल तें च करणारे ते कोठें गेले नाहींत. तशांतून पार्थ मोठा नीतिमान् आहे, तो आपल्या भ्रात्यांच्या कल्याणाविषयीं बहूत यत्न करीत असेल म्हणून तुह्मांस त्यांचा ठिकाण लागणें कठीण आहे. यत्नें करून त्यांचा शोध लौकर करा. त्यांचा प्रसिध्द होण्याचा समय सन्निध आला आहे. त्यांचा नाश कोठें होणार नाहीं, असें मीं आपल्या बुद्धीनें जाणलें. आतां जो तुम्हीं उद्योग करितां तो अकालिक आहे, असो. पांडुव पुत्रांचा ठिकाण लागणें कठीण आहे. ते तपस्वी असल्यामुळें दुरापस्त आहेत, तसेच ते धृतात्मे असून मोठे शूर व तुम्हास अत्यंत दुर्ज्ञेय आहेत, त्यांत पार्थ तर शुध्दात्मा, सत्यमान्, नीतिमान्, अत्यंत शुचि, तेजाचा केवळ राशी असा असून तुम्हांस तो दुर्ज्ञेय आहे, तथापि त्याचा शोधाचा यत्न करा, जे कोणी चांगले, उत्तम, धूर्त ब्राह्मण असतील त्यांस त्यांचा शोध करण्या करितां पाठवा, अथवा या कामांत जे अत्यंत कुशल असतील व ज्यांस सर्व माहिती असेल त्यांस पाठवून लौकर शोध करा. असा विषय या अध्यायांत आहे.

२८. अध्याय अठाविसावा - वैशंपायन सांगतात हे जनमेजया, द्रोणाचार्य भाषण करून उपरम पावले असतां भारतांचा पितामह शंतनुपुत्र, शास्त्रवेत्ता, देशकाल तत्वज्ञ, सर्व धर्मार्थवेत्ता भीष्म, सकल कौरवांचा हितार्थ जें भाषण करितो तें भाषण युधिष्ठिराजास अत्यंत उपयुक्त असून जे धर्मज्ञ आहेत त्यांस धर्मोत्तेजन करणारें व असंतांस केवळ दुर्लभ असून साधूंस संमत असें आहे तें राजा तुला सांगतो. सर्वार्थ तत्ववेत्ता जो द्रोणाचार्य याणें जें भाषण केलें तें सर्व सत्य आहे, पांडवांची योग्यता काय सांगावी, सर्व लक्षण संपन्न, उत्तम व्रताचरण करणारे, नाना प्रकारच्या श्रुती ज्यांस विदीत, वृद्ध वाक्यांचा अनादर न करणारे, सत्य व्रत समय जाणून त्याचे पालन करणारे, क्षत्रधर्मा

ध्यें अत्यंत रत केशवानें निरंतर संरक्षित, पुरुषांमध्यें महावीर, साधूं चां धर्म चालविणारे असे जे पांडव ते तुम्हांस गोचर होणार नाहींत. धर्में करून स्ववीर्यानें कोठेंतरी ते गुप्त आहेत. त्यांचा नाश कधींही व्हावयाचा नाहीं असा माझा निश्चय आहे, जो उत्तम नीतिमान् आहे, त्याची नीति दुसऱ्याचे ध्यानांत कधींही येत नाहीं. तेव्हां माझा बुद्धीनें तर वाटत नाहीं, कीं, पांडव कोठें आहेत ते तुम्हांस समजतील, जे वास्तवीक पांडवांचे गूण आहेत, तें तुम्हास निवेदन केले, तुमचा द्रोहबुद्धीनें पांडवांचे गूण वर्णन करितों असें नाहीं. हें तुम्ही सत्य जाणा. तुम्ही जसे दुर्जन आहांत तसा माझा दुर्जन स्वभाव नाहीं. जें मीं भाषण करितों ती माझी नीतीच असें तुम्हीं समजा. सर्व लोक असें समजतात कीं पांडव कोठें गुप्त रूपानें असतील त्यांचा ठिकाणा लागण्यास काय कठीण आहे, तसें मीं म्हणत नाहीं, इतर लोकां सारिखे पांडव नव्हेत. हे राजा, वृद्धांची आज्ञा परिपालन करणारा सत्यशील जानें जें खरें असेल तें बोलावें म्हणून मीं बोललों तें खरें आहे. यास्तव त्यांचें प्रत्यभिज्ञान होण्यास साधारण लक्षणें सांगतों, जा जा पुरांमध्यें पांडव राहिले असतील त्या त्या पुरांतील राजाचें अकल्याण कधींही व्हावयाचें नाहीं, त्या देशांतील लोक दानशील, उदार, जितेंद्रिय, धर्माविषयीं अति उत्कंठित, प्रियवादी, इंद्रिय दमनशील, हृष्ट, पुष्ट, शुचि, दक्ष, लोकांशीं असूया न करणारे, अभिमान रहीत असे असतील. जेथें पांडव आहेत तेथें निरंतर वेदघोष असेल. ज्यास बहूत दक्षणा असे क्रतू पूर्णाहुतीं सहवर्तमान होत असतील, तेथें यथा कालीं पर्जन्य उत्तम प्रकारचा असेल, जा देशांत युधिष्टिर राजा आहे त्या देशांत कधींही भय उत्पन्न व्हावयाचें नाहीं, त्या देशांत गायी बहूत असतील, त्या गायी कृश व दुर्बल नसून बहूत दुग्ध देणाऱ्या व त्यांचे दुधापासून हितकारक रसवंत असें घृत बहूत उत्पन्न होत असेल. हे राजा, हें तेरावें वर्ष चाललें आहे, या वर्षांत मीं सांगितलेले गूण जा देशांत आढळतील त्या देशांत पांडवांचा वास आहे असें खचित समज. जा देशांत युधिष्टिर राजा आहे त्या देशांतील लोक निरंतर प्रीतिमान्, संतुष्ट, असे सकल लोक असतील, या प्रमाणें

जेथें गुण तुमचा दृष्टीस पडतील तेथें पांडवांचा शोध करावा, परंतु हे राजा, वेद-शास्त्रवेत्ते ब्राम्हण जरी पांडवांचा शोधा करितां पाठविलेस तथापि त्यांच्यानें शोध लागणें कठीण आहे मग दूतांस शोध कोठून लागेल अस्तु, यत्न कर जेथें सत्य, धैर्य, दान, उत्तम शांति, क्षमा, ही, श्री, कीर्ति, उत्तम तेज, अघातुक कर्म, आर्जव, हे गुण असतील तेथें धर्मराजाचा गुप्त वास आहे असें समज. मी सांगतों हेच पांडवांस ओळखण्याचे उपाय, दुसरे उपाय नाहींत. हे दुर्योधनराजा, मला जें तुला निवेदन कर्तव्य तें मीं निवेदन केलें, आतां तुला जें कर्तव्य असेल तें लोकर कर, जर माझ्या भाषणावर तुझी श्रद्धा आहे तर मी सांगतों या उपायांनीं पांडवांचा ठिकाण लावावा, या विषयीं निरालस्य होऊन उद्युक्त हो. दिवस फारच स्वल्प राहिले आहेत. असा विषय या अध्यायांत आहे.

२९ अध्याय एकुणतिसावा :- वैशंपायन सांगतात-हे जनमेजया, भीष्मादिकांनीं भाषण केल्यावर त्यांचे वचनास अनुमोदन देऊन कृपाचार्य म्हणतात हे दुर्योधना, पांडवांचा वास बहूत करून तीर्थीच असेल असें निश्चयें करून समज. त्यांचें ज्ञान होण्यास लोकर कांहीं तरी विचार कर, स्वल्प जरी रिपू आहे तथापि त्याची उपेक्षा करूं नये, तुझे रिपू तर सर्वास्त्र कुशल असे पांडव आहेत. त्यां विषयीं तूं किमपिही उपेक्षा करूं नको. ते महात्मे कपट वेषानेंच कोठें तरी वास करीत असतील. त्यांचा उदय होण्याचा समय जवळच आला आहे आतां स्व किंवा परराष्ट्रामध्यें बल किती आहे याचा विचार कर. त्यांणीं जा काळाचा नियम केला आहे तो अतिक्रांत झाला म्हणजे त्यांस मोठा उत्साह होईल, ते महातेजस्वी महा बळी आहेत. आतां आपलें बळ व कोश संचय याची गणणा कर. सेवक जनांस यथा कालीं वेतनादिक मिळतात किंवा नाहीं याची चौकशी कर. यथा कालीं सेवक जनास वेतन मिळत असलें म्हणजे समय विशेषीं ते आपल्या उपयोगीं पडतात. हे दुर्योधना, तुझें बळ किती आहे व तुझे मित्र असतील त्यांचें बळ किती आहे याची चौकशी कर, फार, मध्यम व कनिष्ठ बल कोणाचें आहे याचा विचार उत्तम रीतीनें कर, सहर्ष बळ व हर्षरहित बल कोणाचें आहे याचा

शोध सूक्ष्म दृष्टीनें ठेव.साम, दान, भेद (करघेणें) आणि दंड यांचा उपाय जेथें कर्तव्य असेल त्याची योजना यथान्याय करीत जा. दुर्बल जरी शत्रू असले तरी त्यांस बलात्कारानें नम्र करावे, सबल असती त्यांस करदान अथवा साम इत्यादिकांची योजना करावी, तुझे जे मित्र असतील त्यांचें शांतवन ठेवीत जा. सैन्य असेल त्याचाशीं सुखकारक शब्दानीं भाषण कर. कोश आणि बल यांची समृद्धी ठेव म्हणजे तुझी इष्टसिद्धी उत्तम प्रकारें सिद्धीस जाईल. महा बलिष्ट रिपू जरी तुला उत्पन्न झाले तथापि त्यांचा नाश करण्यास तूं समर्थ होशील. पांडव तर बल, कोश इत्यादिकें करून अत्यंत हीन आहेत त्यांचा नाश तूं सहज करशील. हे राजा मीं, हें सर्व तुला सांगितलें त्याचा धर्म पूर्वक विचार करून काय कर्तव्य असेल तें लौकर कर. कोणचीही गोष्ट यथाकालीं झाली असतां त्याजपासून अत्यंत सुख होतें. असा विषय या अध्यायांत आहे.

३०. अध्याय तिसावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, त्रिगर्त देशींचा महाबळी, असंख्याक रथांचा पालन करणारा सुशर्मानामक राजा होता त्यास मत्स्य व शाल्व यांनीं वारंवार जिंकल्यामुळें तो बहूत त्रस्त झाला होता, तसाच मत्स्य राजाचा सेनापती जो कीचक याणेंही सुशर्म्यास बहुत पीडित केलें होतें. पुढें कोणे एके काळीं सुशर्मा हस्तनापुरीं येऊन कर्णाकडे पाहून दुर्योधनास भाषण करितो हे राजा, मत्स्यराजाचा सेनापती कीचक महाबलवान् पराक्रमी होता त्याणें आम्हास बहुत त्रस्त केलें, तो दुष्टात्मा, क्रोधी, घातकी, त्यास गंधर्वांनीं मारला असें आम्हीं श्रवण केलें, आतां विराटराजा कीचकाचे मरणानें हतदर्प व निराश्रित झाल्या मुळें त्याचा उत्साह भग्न होऊन गेला असेल. आतां त्याजवर कांहीं सैन्य घेऊन स्वारी करावी. हें तुला रुचत असल्यास तुम्हीं व आम्हीं मिळोन विराटराजाचा राज्यांत प्रवेश करूं. धनधान्य समाकुल असा त्याचा देश बहूत उत्तम आहे, आपण तेथें गेल्या नंतर नाना प्रकारचीं रत्नें व द्रव्यें हरण करून

व कांही ग्राम व राष्ट्र यांचेंही ग्रहणकरून यथा विभागें वांटून घेऊं आणि विराटराजाचीं गोधनें चांगलीं, शुभकारक, नाना प्रकारचीं बहूत आहेतनीं ही बलात्कारानें हरण करून आणूं. तुम्हीं आणि आम्हीं एकत्र मिळालों असतां हें कृत्य घडण्यास कांहीं कठीण नाहीं, उभयतां आपण पराक्रमानें राजाची सेना मारूं आणि राजास वश करूनजें धन मिळेल तें यथा विभागें वांटून घेऊं. विराटराजा यथान्याय आम्हांस वश झाला असतां माझा वास स्वदेशीं सुखें करून होईल. असें सुशर्म्याचें भाषण श्रवण करून कर्ण दुर्योधनास बोलता हे राजा, सुशर्म्यानें भाषण केलें हें फार चांगलें आहे त्यास आपण अनुमोदन देऊन सेना सिद्ध करून लौकर जाण्याची तयारी करावी, सेना विभाग जितका अपेक्षित तितका बरोबर घ्यावा हे वर्तमानं पितामह भीष्म, द्रोणाचार्य व कृपाचार्य यांस सांगून त्यांचा अनुमतें लौकर सिद्धता करावी आणि जाण्याविषयीं सत्वर सर्वांनीं सिद्ध व्हावें यांत आपला बहुत स्वार्थ आहे. पांडव तर अर्थ, बल व पौरुष यानीं हीन झाल्यामुळें ते नष्ट झाले आहेत त्यांच्याशीं आम्हास काय कर्तव्य आहे, ते बहुत करून यम गृहीं गेले असतील. चला आपण लौकर सिद्धता करून विराट नगरीं प्रविष्ट होऊं आणि त्याच्या बहुत गायी व द्रव्य हरण करूं. असें कर्णाचें भाषण श्रवण करून दुर्योधन निरंतर आपले आज्ञांकित राहणारा जो दुःशासन यास आज्ञा करितो कीं हे दुःशासना, मोठमोठे वृद्ध आहेत त्यांचा विचार घेऊन लौकर सेनेची सिद्धता कर आणि सुशर्मा जा देशाकडे मार्ग दाखवील तिकडे सर्वांनीं मिळून गमन करावें. या प्रमाणें दुःशासनास सांगून पुनः दुर्योधन सुशर्म्यास भाषण करितो हे सुशर्मा, तुम्हीं जितके त्रिगर्ते वासी लोक आहांत, तितक्यानीं आपलीं सैन्यें व वाहनें घेऊन आमचा पूर्वींच मत्स्य देशास गमन करावें. कांहीं काळ अतिक्रांत झाल्यावर आम्हीं ही तुमच्यामागून तुम्हीं सांगितलेल्या स्थळीं सैन्यासह वर्तमान लौकरच येतों, तुम्हीं पुढें जाऊन विराटराजाच्या गायी संरक्षण करणारे जे गोप यांस आणून त्यांजपासून कांहीं द्रव्य घेण्याविषयीं आरंभ करा, तों आम्हीं सैन्याचे दोन विभाग करून येतों. असें दुर्योधनानें सुश-

र्म्यास सांगतांच सुशर्मा गजाश्व रथी, पदाती इत्यादि सैन्य प्रतिवैरसाधन करण्याचे बुद्धीनें समागमें घेऊन अग्नेय दिशेस जाऊन कृष्णपक्षसप्तमीस विराटराजाच्या गायी हरण केल्या. नंतर दुसरे दिवशीं कृष्णपक्षअष्टमीस सकल कौरव सैन्या सहवर्तमान विराट देशांत प्रविष्ट होऊन विराटराजाचे सहस्त्रावधी गोसमुदाय हरण केले. असा विषय या अध्यायांत आहे.

३१ अध्याय एकतिसावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सुशर्म्यानें विराटाचीं गोधनें हरण केल्यावर इकडे विराट गृहीं वर्तमान झालेलें निवेदन करितों श्रवण कर. महात्म्ये, महातेजस्वी पांडव, गुप्त रूपानें विराट गृहीं आप आपलीं कर्में करून वास करीत असतां त्यांचा नियमित काळ उत्तम रीतीनें अतिक्रांत झाला. जा दिवशीं कीचक मारिला त्या दिवसापासून विराटराजास युधिष्ठिरा विषयीं शंका उत्पन्न होऊं लागली. जा काळीं पांडवांचीं तेरा वर्षें समाप्त होण्याचा समय आला त्या काळीं सुशर्म्यानें विराट राजाचीं गोधनें हरण केलीं हें वर्तमान सांगण्या करितां गायींचा संरक्षण करणारा मुख्य गोप रथारूढ होऊन परम वेगानें नगरांत येऊन विराटराजा महान् महान् योद्धे कुंडलांगद धारण करणारे असे मंत्री व महात्मे पांडव यांसह वर्तमान सभेमध्यें बसला होता तेथें प्राप्त होऊन नम्रपणें त्यास भाषण करितो हे राजा, आम्हीं बांधवांसह वर्तमान तुमच्या गायींचें संरक्षण करीत असतां त्रिगर्तांचा राजा सुशर्मा येऊन आम्हांस युद्धामध्यें जिंकून शतसहस्त्र गायी घेऊन चालिला आहे, यास्तव त्या गायी सुशर्मा नेणार नाहीं असें सत्वर करावें. असें त्या गोपाचें भाषण श्रवण करून विराट राजानें आपली सेना सिध्द होण्या विषयीं आज्ञा दिली असतां रथ, गज, अश्व पदाती, ध्वज इत्यादि चिन्हित, राजाची सकल सेना सिद्ध झाली. राजा व राजपुत्र तेजस्वी, चित्र विचित्र शूरांनीं सेवन करण्यास योग्य अशीं आपलीं कवचें धारण करूं लागले. लोखंडाचें कांचनमय असें कवच विराटाचा प्रिय भ्राता शतानीकयाणें धारण केलें. शत्रूस पीडा करणारें, कल्याणाचें केवळ पटलच कायम

हा दृढ असे कवच शतानीकाचा कनिष्ठ भ्राता मदिराक्ष याणें धारण केलें. शत सूर्यासारिखे ज्याचे ठाईं आवर्त, शतशः बिंदूंनी व अक्षींनीं युक्त शत्रूंनीं अभेद्य असें कवच विराट राजानें धारण केलें ज्याचे ठाईं शतशः सौगंधिक पद्यांचीं चिन्हें, सुवर्णमय ज्याचा पृष्ठभाग असें कवच सूर्यदत्तनामक विराट भ्राता याणें धारण केलें. बहुत दृढ अयस गर्भ श्वेतवर्ण शतनेत्र युक्त असें कवच विराटाचा ज्येष्ठ पुत्र शंख याणें धारण केलें याप्रकारें ते महारथी आप आपलीं शतशः तनुत्राणें धारण करून युध्दाचा इच्छेनें सिद्ध झाले असतां देवां सारिखे शोभूं लागले. तसेच मोठमोठे रथ शुभ्र वर्णाचे असून सुवर्णासारिखे अश्व पृथक् पृथक् रथांस जोडलेले परम शोभायमान दिसूं लागले, सूर्यचंद्र सदृश ज्याची कांती असा सुशोभित जो विराट राजाचा हिरण्मय रथ त्याचे ठाईं आरोपित केलेला उच्च मान ध्वज दुरून सुशोभित दिसूं लागला. इतर योध्यांच्या रथाचे ठाईं चढविलेले सुवर्णानें युक्त, नाना प्रकारचे ध्वज तेही परम शोभायमान दिसूं लागले. या प्रकारें विराट राजाचे सकल योद्धे सिध्द झाले असतां विराट राजा आपला कनिष्ट भ्राता जो शतानीक यास भाषण करितो हे बंधो, कंक, बल्लव, गोपाल, अश्वपालक हेही मोठे वीर्यवान आहेत युद्ध उत्तम प्रकारें करतील असें वाटतें यास्तव पताकासह वर्तमान रथ, चित्र विचित्र, सुदृढ व मृदु अशीं कवचें, व आयुधें यांस द्या म्हणजे तीं धारण करून ते आपले समागमें युध्दास येतील, हे पुरुष मोठे वीर दिसतात नागराज करा सारिखे दृढ बाहू आहेत. हे युद्ध करणार नाहींत असे नाहींत, यांची लौकर सिध्दता करा. असें विराटाचें भाषण श्रवण करून शतानीकानें सहदेव, युधिष्टिर, भीमसेन आणि नकुल यांस उत्तम प्रकारचे रथ, आयुधें, कवचें दिलीं असतां शत्रु निबर्हण करणारे, युध्द विशारद, छन्मरूपी पांडव चित्रविचित्र मृदु आणि दृढ अशीं कवचें परिधान करून सुशिक्षित हयानीं संपन्न, हेम परिष्कृत असे जे रथ त्यां मध्यें आरूढ होऊन विराटाच्या पाठिमागून अत्यंत हर्षानें निघाले, त्यांच्या पाठिमागून

त्रीच्या अंधःकारानें व सैन्यांच्या रजःकणानें सर्व लोक व्याप्त झाले असतां, सकल योद्धे आपआपले सैन्याचा व्यूह करून उभे राहिले. नंतर कांहीं काळानें अंधःकारची निवृत्ती करणारा क्षत्रियांस युद्धांत आनंद देणारा असा चंद्रमा उदय पावून सकल तम नष्ट झालें असतां प्रकाश झालेला पाहून पुनः ते एकमेकांस पाहत घोर युध्दास प्रवृत्त झाले. सुशर्मा आपला कनिष्ट भ्राता व सैन्य यां सहवर्तमान विराट राजा वर धांऊन रथाखालीं उडी टाकिली आणि दोघांनीं हस्तांमध्यें गदा घेऊन आवेशानें त्याच्या रथा संन्निध आले, तसेंच त्याचें सैन्य मत्स्य सैन्यावर क्रोधानें धांवून गदादि आयुधें व तीक्ष्ण धारेचे बाण, इंहीं करून त्यास मारिलें या प्रकारें उभयतांचें युध्द होत असतां सुशर्मा आपल्या सैन्यास हवर्तमान विराटाचे सैन्याचें मथन करून रथ चक्रें संरक्षकांस व सारथ्यांस मारून विराटास विरथी करून जिवंत धरिला. त्याकाळीं कामुक पुरुष जसा तरूण स्त्रीचें हरण करितो तसा सुशर्मा विराट राजास ग्रहण करून आपले रथा मध्यें बसवून त्वरेनें जात असतां त्रिगर्तांनीं पीडित केलेले मत्स्याचे वीर, विराटास नेलेला पाहून पलायन करूं लागले. त्यांस महाबाहू कुंती पुत्र युधिष्ठिर पाहून भीमसेनास म्हणतो हे भीमसेना, सुशर्मा विराटास घेऊन जात आहे, यास्तव शत्रु वश झालेला जो मत्स्यराज यास तूं मुक्त करून आण असें धर्माचें भाषणश्रवण करून भीमसेन बोलतो हे राजा, तुझ्या आज्ञेनें मी आतां विराट राजाचें रक्षण करितों. शत्रुशीं मी युध्द करीत असतां माझें महत्कर्म आज तूं अवलोकन कर, आणि सर्व भ्रात्यांसहवर्तमान आपल्या बाहूबळाचा आश्रयानें स्वस्थ एकांत स्थळीं माझा पराक्रम पाहत उभा रहा, हा उत्तम स्कंदाचा मोठा वृक्ष आहे हा मला गदे सारिखा दिसतो, यास घेऊन शत्रुसैनिकांस पळवितों, असें बोलून उन्मत्त गजासारिखा त्या वृक्षाकडे पहात उभा राहिला असतां धर्मराज त्यास बोलतो हे भीमा, सहास कर्म करूं नकोस, येणें करून सर्व लोक तुला जाणतील हा वृक्ष ठिकाणींच राहूं दे, या वृक्षानें अतिमानुष कर्म करून शत्रूंचीं मर्में छेदन करूं नकोस. चाप, खड्ग, अथवा शक्ति, इत्यादिकांतून एकादें आयुध घेऊन राजाचें मोचन कर.

हे नकुल,सहदेव मोठे बलवान तुझे चक्ररक्षक होतील. संग्रामामध्यें तुह्मीं एकत्र जाऊन राजास सोडवा, असें धर्मराजाचें भाषण श्रवण करून महा बलवान भीमसेन श्रेष्ठ धनुष्य घेऊन मेघ जसे उदक वृष्टी करितात तशी बाणाची वृष्टी करीत करीत सुशर्म्यावर धांवून विराटास पाहून उभारा हा उभारा हा असें भाषण केलें. त्या काळीं सुशर्मा आपल्या पाठीमागें कालांतक यमासारिखा उभारा हा उभारा हा असें बोलत कोण येत आहे, हें पाहून बंधूसह वर्तमान धनुष्यबाण घेऊन माघारा फिरून युद्धाविषयीं प्रवृत्त झाला, त्या काळीं उभयतांचें युध्द होत असतां एक निमिषमात्रांत भीमसेनानें शत सहस्रशः उग्रधन्वे व महा शूर असे सुशर्म्याचे रथी विराटासन्मूख पाडून पुनः तो महात्मा गदेस घेऊन गजाश्व,रथ,पदाती यांचें कदन करूं लागला त्या काळीं युध्द दुर्मद जो सुशर्मा याणें भीमसेनाचें महत्कर्म पाहून आपलें सैन्य अवशिष्ट किती आहे याचें चिंतन करून आपला बंधू पूर्वी सैन्यामध्यें कोठें आच्छादित झाला होता तो अद्याप दिसत नाहीं असें समजून आकर्ण पूर्ण धनुष्य ओढून तीक्ष्ण बाणाची पुनः विराट सैन्यावर वृष्टी करूं लागला, तसेच त्रिगर्तांचे वीर अश्वांच्या लगामा उचलून त्यांस शत्रूवर जाण्यास प्रेरणा केली. दिव्यास्त्र वृष्टी करणारे जे त्रीगर्तांचे वीर ते पांडवांवर आलेले पाहून विराटाची सेनाही क्रुद्ध होऊन युद्ध करूं लागली. त्या काळीं कुंतीपुत्र युधिष्ठिरानें सहस्रशः वीरांस मारिले. भीमसेनानें, सात हजार योध्यांस यमलोकीं पाठविले नकुळानें संग्रामामध्यें सातशें वीर मारिले, तसाच प्रतापी सहदेवानें तीनशें वीरांस यमलोकीं पाठविले या प्रकारें सुशर्म्याचे सैनिक मारून महारथी पांडव सुशर्म्या सन्निध आले असतां महारथी युधिष्ठिर राजानें नऊ बाणांनीं त्रिगर्तराजास वेध करून चार बाणांनीं चारी अश्वांस मारून पुनः कांहीं बाणांनीं त्यास प्रहार केला तेणें करून सुशर्मा क्रुद्ध होऊन आवेशानें नऊ बाणांनीं धर्मराजास वेध करून चार बाणांनीं चारी अश्वांस वेध केला, नंतर वृकोदरानें तीक्ष्ण बाणांनीं सुशर्म्याच्या अश्वांस पृथ्वीवर पाडून त्यास विरथ केला हें पाहून विराटराजा रथाखालीं उतरला आणि सुशर्म्याची गदा घेऊन त्यास प्र-

हार करून नंतर गदापाणी सैन्यांत भ्रमण करीत असतां तरुणा सारिखा, लोक त्यास पाहूं लागले, इतक्यामध्यें सुशर्मा पलायन करितो हें पाहूनभीमसेन भाषण करितो अरे, या वीर्यानें तूं गाई ग्रहण करण्या विषयीं कसा यत्न करितोस. तूं राजपुत्र असतां संग्रामांतून पलायन करणें तुला योग्य नाहीं. शत्रूंचा मध्य भागीं आपले सेवकजनांस टाकून कां पलायन करितोस? असें भीमसेनानें भाषण केलें असतां सुशर्मा पादचारी एकाएकीं पळूं लागला. हें पाहून भीमसेन त्याचा प्राण घेण्याच्या इच्छेनें रथाखालीं उडी टाकून सिंह जसा क्षुद्र मृगावर धांवतो, तसा आपण अरे उभा राहा, असें भाषण करीत पादचारी धांऊन सुशर्म्यास केशाचे ठाईं आकृष्ट करून उचलला, आणि पृथ्वीवर आपटून मस्तकाचा ठाईं गदेचा प्रहार करून आपल्या जानूनीं, व कोंपरांनीं बहुत पीडित केला त्या प्रहारानीं सुशर्मा अत्यंत पीडित होऊन मूर्छीत झाला असतां त्रिगर्तांचें सैन्य आपला स्वामि विरथी होऊन शत्रू वश झालेला अवलोकन करून भयानें पळूं लागले, त्या काळीं आपल्या बाहुबळाचा आश्रयें करून संपन्न विराटाचे क्लेश नाश कर्ते महारथी पांडव सर्व गायीं माघाऱ्या फिरवून सुशर्म्यास जिंकून व त्याचें द्रव्य हरण करून सर्व एकत्र स्थित झाल्यावर सर्वांचा मध्यभागीं भीमसेनभाषण करितो, हा पापकर्मा माझ्या पासून जिवंत जाण्यास योग्य नाहीं परंतु काय करावें? आमचा राजा मोठा दयाळू यास्तव उपाय चालत नाहीं. आतां यास राजापुढें नेऊन स्वाधीन करितों, असें भाषण करून भीमसेनानें रजःकणानीं भरलेला व मूर्छा पावलेला असा जो सुशर्मा यास आपले रथामध्यें घेऊन युधिष्ठिराकडे जाऊन त्यास तो दाखविला, त्या काळीं युधिष्ठिर हास्य करून भीमसेनास भाषण करितो हे भीमा, हा नराधम आहे, यास तूं मुक्त कर, असें युधिष्ठिराचें भाषण श्रवण करून भीमसेन सुशर्म्यास बोलतो हे मूढा, तुला जिवंत राहवें अशी जर इच्छा आहे तर सभेमध्यें मी तुमचा दास आहें, असें भाषण कर म्हणजे मी तुला जिवदान देईन, हा युद्धांत जिंकिल्याचा विधी आहे. असें भीमसेनाचें भाषण श्रवण करून युधिष्ठिर परम नम्रतेनें भीमास बोलतो हे भीमा, आम्हीं

जर तुला मान्य आहोंत तर या अधमाचारास सोड, हा विराटाचा दास्य भाव पावला, असें भाषण करून नंतर युधिष्ठिर सुशर्म्यास बोलतो हे सुशर्मा, तूं दास आहेस तुला मुक्त केला, आतां तूं येथून गमन कर पुनः असें साहस कर्म करण्यास प्रवृत्त होऊं नकोस. असा विषय या अध्या० आहे.

३४ अध्याय चवतिसावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडवांनीं सुशर्म्यास मुक्त केल्यावर तो लज्जित झाल्यामुळें अधोमुख होऊन विराटराजास नमस्कार करून गेला असतां शत्रु हनन करणारे स्वबाहुबळ संपन्न व्रती नियेवक, असे जे पांडव याणीं ती रात्र सुखें करून रण भूमींत अतिक्रांत केली, नंतर विराटराजा अतिमानुष कर्म करणारे असे जे महारथी कुंतीपुत्र यांस धन देऊन व सत्कार करून भाषण करितो हे शत्रु निबर्हणहो, जशीं मजपाशीं रत्नें आहेत तशीं मीं तुम्हांस देईन. यथा इच्छेनें यथा सुखें करून जें करणें असेल तें तुम्हीं करावें. अलंकार धारण केलेल्या कन्या नाना प्रकारचीं वस्त्रें व युध्दा विषयीं तुम्हास अभिप्रेत ज्या वस्तु पाहिजेत त्या मीं तुम्हांस देतों, तुमचा पराक्रमानें आज मीं मुक्त होऊन माझें कल्याण झालें तस्मात् या मत्स्य देशाचे तुम्हीच स्वामी आहांत या प्रकारें विराट राजानें भाषण केलें असतां धर्मराजप्रभृती पांडव पृथक् पृथक् हात जोडून भाषण करितात. हे राजा, तूं आज शत्रू पासून मुक्त झालास येणें करून आम्हीं आनंद पावलों असें पांडवांचें भाषण श्रवण करून विराटराजा युधिष्ठिरास बोलतो हे विप्रा, तुलाच आज मीं या राज्याचा अभिषेक करितों, तूं मत्स्य देशाचा राजा आम्हास मान्य आहेस. जी वस्तु तुला इष्ट असून दुर्लभ असेल ती तुला देईन तूं मजपासून सर्व ग्रहण करण्यास योग्य आहेस. रत्नें, गायी, सुवर्ण, मणी व मौक्तिकें, मीं तुला देण्यास इच्छितों हे वैय्याघ्रपद्य, हे विप्रेंद्र, सर्व प्रकारें तुला नमस्कार असो तुझ्या प्रतापानें शत्रूस मी वश झालों नाहीं. हें राज्य संतान तुझाच प्रतापानें आज मीं पाहिलें असें विराटाचें भाषण ऐकून पुनः युधिष्ठिर बोलतो हे राजा, फार सुंदर भाषण केलेंस तेणें करून मीं संतुष्ट झालों, असाच नित्य सरल मार्गानें राहून निरंतर सुखी होहेस-

जा. आतां नगरामध्यें सत्वर दूत पाठवून आपला जय झाला म्हणून सक ळ सुहृज्जन, इष्ट, मित्र व नगर वासी लोकांसही प्रिय वार्ता निवेदन करण्य सम्भवण करून विराट राजा दूतांस आज्ञा करितो हे दूतहो, तुम्ही नगराम ध्यें गमन करून संग्रामामध्यें माझा विजय झाला असें सर्वांस सांगा. नग रांतील कुमारी अलंकार धारण करून मला सामोऱ्या येण्या विषयीं आज्ञा द्या तसेच नाना प्रकारच्या वाद्यांचा घोष करून अलंकार ग्रहण केलेल्या ग णिकांनीं सकल पूर वाशी लोकांसहित सामोरे यावें अशी आज्ञा शिरसा वंद्य करून हर्षानें सूर्योदय समयीं नगरामध्यें येऊन राजाचा जय घोष क रूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

३५. अध्याय पसतिसावा :- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, विराट राजा त्रिगर्तांशीं युध्द करून आपल्या गायी माघाऱ्या आणण्यास नगरांतून बाहेर गेला असतां दुर्योधन आपल्या अमात्यांसह विराटन गरांत येऊन भीष्म, द्रोण, कर्ण, कृपाचार्य, अश्वत्थामा, शकुनी, दुःशासन, विविंशति, विकर्ण, चित्रसेन, दुर्मुख, दुःशल हे व अन्य महारथी विराट नग रांत येऊन त्यांच्या साठ सहस्र गायी हरण करून गायींचे संरक्षकांस ताड ण केलें त्या काळीं कौरवांचा रथ घोष, गायींचा शब्द व गोपाळांचा आक्रोशध्व नि एकत्र होऊन मोठा भयंकर शब्द उत्पन्न झाला. तितक्यांत कोणी एक गो पालाध्यक्ष भयाभीत होऊन आक्रोश करीत नगरांत परम त्वरेनें येऊन विराट पुत्र भुमिंजय यास बोलतो हे राजपुत्रा, तुझ्या साठ सहस्र गायी कौरवांनीं हरण केल्या त्या जिंकून आणण्या करितां लोकर उठ. पृथ्वीप ती विराट तुला शून्य पाल म्हणजे स्व राज्याधिपती करून गेला आहे. सभेम ध्यें विराट राजा वारंवार तुझ्या गुणाची अशी श्लाघा करीत असतो कीं माझा पुत्र माझ्याच सारिखा शूर व कुलीन असून धनुर्विद्येमध्यें परम निपूण आहे. तें राजाचें भाषण सत्य करण्या विषयीं प्रसूत समय आ ला आहे. यास्तव हे बुद्धिमंता, कौरवांस जिंकून पशू माघारे फिरवून भ यंकर बाण जाल तेजानें त्यांची सेना दहन करून टाक. जसा गज स्वामी गजांचा भेद करितो तसा तूं शत्रूंची सेना भग्न कर, आणि शत्रूंच्यामध्यभा-

गीं जाऊन कोठिहू यांचे किलकादिकांनीं धनुर्वीणा वाजीव.तुझा रथ उत्तम प्रकारें सेवक तयार करोत. वज्रपाणी जसा असुरांस जिंकितो तसा तूं रणांगणीं सकल कौरवांस जिंकून महायश पावून नगरांत पुनः प्रवेश कर. तूं विराट राजाचा पुत्र राजाची परमगती आहेस, जसा पांडुपुत्रांमध्यें अर्जून तसा तूं या मत्स्यदेशामध्यें वास करणारे जनास गती देणारा आहेस, असें त्या गोपाळानें येऊन स्त्रियांच्या मध्यभागीं अति भयंकर भाषण केलेलें श्रवण करून विराटपुत्र आपल्या गुणाची अतिशय.श्लाघा करीत भाषण करितो.असा विषय या अध्यायांत आहे.

३६ अध्याय छत्तिसावा.— उत्तर बोलतो आज मी गायी माघाऱ्या आणण्या करितां दृढ धनुष्य धारण करून गेलों असतों परंतु अश्वविद्येमध्यें निपूण असा सारथी मला कोणी नाहीं त्यामुळें मीं जाण्यास समर्थ नाहीं. माझें सारथ्य करणारा जर कोणी पुरुष मिळेल तर त्याची शोध करून लौकर घेऊन या. पूर्वी मीं अठ्ठावीस रात्री युद्ध केलें, बहुधा एक मासही गेला असेल, त्या महान् युद्धामध्यें माझा सारथी मरण पावला. आज जर दुसरा सारथी मिळेल तर त्वरेनें मी सैन्यांत प्रवेश करून शस्त्र प्रतापानें कौरवांस जिंकून गायी घेऊन माघारा येईन वज्रपाणी इंद्र जसा संग्रामामध्यें दानवांस त्रास देतो, तसा मीं आजजर या मुहूर्तीं गमन केलें तर दुर्योधनादिक सर्वांचा पराभव करून गायींस माघाऱ्या घेऊन येईन. कौरव गोधनें घेऊन जातात तर मीं काय करावें, या वेळेस आज जर मीं तेथें असतों तर ते माझा पराक्रम पाहून कुंतीपुत्र अर्जुनच आम्हांस पीडित करितो असें ते मानिते, असें उत्तराचें भाषण श्रवण करून द्रुपद राजाची कन्या जी द्रौपदी, तिला सर्वार्थवेत्ता अर्जुन एकांती बोलतो हे कल्याणि, उत्तरास असें सांग कीं हा बृहन्नडा पूर्वीं पांडवांचा सारथी होता म्हणें पूर्वीं पांडवांचें सारथ्य केल्यामुळें तो अश्वयानामध्यें कुशल असून युध्दामध्यें ही दक्ष आहे तो तुझें सारथ्य करील. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, स्त्रियांच्यामध्य भागीं उत्तरानें भाषण केलेलें द्रौपदीनें श्रवण करून अर्जुनापुढें हा काय आपलें वर्णन करितो असें मनामध्यें आणून त्याच्यावाक्याचें सहन न करितां आपण

स्त्रियांतून उठून किंचित् लज्जित झालेली अशी उत्तरा जवळ जाऊन भाषण करित्ये हे उत्तरा, महान गजा सारिखा तरूण बृहन्नडा आहे तो पूर्वी अर्जुनाचा सारथी होता. धनुर्विद्येविषयीं हा अर्जुनाचा शिष्य आहे यास मी पांडवांचे गृहीं प्रत्यक्ष पाहिला आहे जा काळीं अग्निनें खांडव वनाचा दाहा केला त्या युध्द प्रसंगीं अर्जुनाचे अश्व याणेच धारण केले होते. या सारथ्याच्या योगें पार्थानें इंद्रप्रस्थामध्यें राहत असतां सर्व भूतें आपल्या स्वाधीन केलीं या सारखा सारथी दुसरा कोणी नाहीं असें द्रौपदीचें वाक्य श्रवण करून उत्तर भाषण करितो हे सैरंध्री, तूं या तरुणास जाणत्येस काय? परंतु मला असें वाटतें कीं तो नपुंसक आहे यास्तव त्याचे हातून हें कर्म घडावयाचें नाहीं. अस्तु हे शुभे, तुझ्या वाक्यावर मला विश्वास वाटून तो जर सारथ्य कर्मामध्यें समर्थ असेल तर तो माझ्या सभागमें येवो, परंतु हें भाषण मीं स्वतः बृहन्नडेशीं बोलण्यास समर्थ नाहीं असें भाषण ऐकून द्रौपदी भाषण करित्ये. हे उत्तरा. ही सुश्रोणी तुझी कनिष्ठ भगिनी उत्तरा ईचें वाक्य बृहन्नडा स्वीकारील आणि जर तो तुझा सारथी होऊन तूं कौरवांत गेलास तर त्यांस जिंकून सर्व गायी व गोप घेऊन माघारा येशील. असें सैरंध्रीचें भाषण श्रवण करून उत्तर आपले भगिनीस बोलतो हे भगिनी, तूं जाऊन बृहन्नडेस घेऊन ये, असें वाक्य श्रवण करितांच उत्तर तत्काळ बृहन्नलाहोती तेथें गेली. असा विषय या अध्यायांत आहे.

३७ अध्याय सदतिसावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, ज्येष्ठ बंधू जो उत्तर याणें आज्ञा केली असतां बंधुला अनुसरून चालणारी यशस्विनी सर्व अवयवांनीं सुंदर अशी जी विराट कन्या परम श्रियेनें सुशोभित उत्तरा, मेघांतून गमन करणाऱ्या विद्युल्लते सारिखी नर्तनागारामध्यें हास्य करीत करीत जाऊन गज वधू जशी गजाकडे जात्ये तशी ती अर्जुनासन्निध जाऊन भाषण करित्ये, तों इतक्यांत अर्जुन त्या कन्येस किंचित् हास्य करून बोलतो हे कांचनमालिनी, हे मृगाक्षि, तूं त्वरेनें येथें कशाकरितां आलीस. तुझें मुख प्रसन्न दिसत नाहीं

यास्तव जें सत्य असेल तें मलासांग, असें ऐकून राजकन्या नम्र होऊनस
र्वांच्यामध्य भागीं पुरुष श्रेष्ठ जो अर्जुन,त्यास बोलत्ये हे बृहन्नडे,आमच्या
राज्यांतील गायी कौरवानीं हरण करून नेल्या,त्या जिंकून माघाऱ्या आण
ण्या करितां माझा बंधू धनुर्धर जात आहे यास्तव तूं त्याचें सारथ्य कर-
ण्यास्तवसिद्ध होऊन चलावेंस,तूं सारथ्य करण्याविषयीं कुशल आहेस
असें सैरंध्रिनें मलासांगितलें आहे, यास्तव हे बृहन्नडे कौरवानीं गा
यी दूर नेल्या नाहींत तों पर्यंत माझ्या बंधूचें सारथ्य करावेंस.परमनम्र
तेनें मी सांगितलेलें वाक्य श्रवण करून हें कार्य तूं करणार नाहींस तरमीं
आपला जीव त्याग करीन असें उत्तरेचें वाक्य श्रवण करून बृहन्नडा परम
त्वरेनें उत्तराच्या संन्निध तत्काळ आली त्या काळीं गज वधू जशी आपल्या
शिशूचा सन्निध गमन करित्ये तशी विशालाक्षी बृहन्नडा आलेली दु.
रून पाहून राजपुत्र भाषण करितो हे बृहन्नडे, तूं सारथी असतां अर्जुना
नें खांडव वनामध्यें अग्नीस तृप्त केलें व सर्व पृथ्वी स्वाधीन केली,असेंसै
रंध्रीनें आम्हांस सांगितलें. ती सर्व पांडवांस जाणत्ये,यास्तव तूं माझेअ
श्व धारण करून कौरवयुध्दां मध्यें गोधना करितां सारथ्य करावेंसअसें
राजपुत्राचें भाषण श्रवण करून बृहन्नडा भाषण करित्ये. हे राजपुत्रा,
संग्रामामध्यें माझें सारथ्य करण्याची काय शक्ती आहे? गीत,नृत्य,व
नाना प्रकारचीं वाद्यें मला वाजविण्याविषयीं आज्ञा केली असतां मी
वाजवीन,मला सारथ्य कर्म कोठून येणार,असेंश्रवण करून उत्तर भाष
ण करितो हे बृहन्नडे,गायन किंवा नृत्य करण्यास पुनः सिध्द हो परंतुआ
तां माझ्या रथावर बसून अश्वांचे ग्रहण कर,असें धर्मार्थ संयुक्त राजपु
त्राचें भाषण श्रवण करून अर्जुन,उत्तरेचे समक्ष तत्काळ आपले हस्तऊ
र्ध्व करून शरीरावर कवच धारण करूं लागली असतां त्या काळीं दीर्घने-
त्रांच्या कुमारी तेथें होत्या त्या बृहन्नडेस पाहून हास्य करूं लागल्या,हे पा
हून स्वतः उत्तर तीस माहान् कवच धारण करवून नंतर आपण धा
रण केलें.सिंह चिन्हित ध्वज,रथावर उभा करून व महान् महान् धनुष्यें
व बाण रथावर स्थापन करून बृहन्नडा सारथ्या सह वर्तमान उत्तर,गमन

करण्यास उद्युक्त झाला त्या काळीं उत्तरा व तिच्या सख्या म्हणतात हे बृहन्न डे, आम्हांस बाहुल्यां करितां बारिक, मृदु, व चित्रविचित्र सुंदर वस्त्रें भीष्म द्रोण प्रमुख कौरवांस संग्रामामध्यें जिंकून घेऊन ये. अशा एकदांच भाषण करणाऱ्या ज्या कन्या त्यांचें भाषण श्रवण करून मेघा सारिख्या वाणीनें बृहन्नडा बोलत्ये जर हा उत्तर संग्रामामध्यें भीष्मादिक महारथ्यांस जिंकील तर दिव्य वस्त्रें घेऊन येईल. असें भाषण करून नंतर पार्थानें तत्काळ अश्वांस प्रेरणा केली असतां ध्वज, पताका सहवर्तमान प्राप्त झालेले जे कौरव त्यांचे सन्मूख उत्तराचा रथ नेला. प्रयाण काळीं बृहन्नडेसहवर्तमान रथारूढ झालेला जो उत्तर यास स्त्रिया, कन्या, सुव्रत ब्राम्हणयाणीं प्रदक्षिणा करून म्हणतात हे बृहन्नडे, पूर्वी अर्जुनानें सारथ्य करून जसें खांडव वन दाहकाळीं मंगल केलेंस तसें आतां रणामध्यें आलेले जे कौरव यांजकडे उत्तरा सहवर्तमान आज तूं गमन करून मंगल कर. असा विषय या अध्यायांत आहे.

३८ अध्याय अडतिसावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, विराटपुत्र उत्तर नगरापासून बाहेर निघून सूतास भाषण करितो. हे सूता, जा स्थळीं कौरव आले असतील तिकडे आपला रथ त्वरेनें ने, म्हणजे त्या सर्वांचा पराभव करून आपलीं गोधनें घेऊन स्वपुरीं येऊं. असें उत्तरानें भाषण केल्यावर अर्जुनानें तत्काल रथाचे अश्वांस प्रेरणा केली असतां अश्व, वायु समान वेगयुक्त होऊन आकाशातेंच लक्षन करितात काय अशा वेगेंकरून फार दूर गेले नाहींत तों इतक्यांत कौरव सैन्य उभयतांचे दृष्टीस पडलें असतां ते तसेच स्मशानाच्या सन्निध जाऊन शमी वृक्षास पाहून नंतर सागरा सारिखें अति विस्तृत परम शोभा पावलेलें कौरवांचें सैन्य पाहिलें. त्या सैन्याच्या संमर्दानें पृथ्वीपासून रज उत्पन्न होऊन आकाशांत गेलें असतां सकल प्राणिमात्रांच्या दृष्टीस अवरोध झाला. कर्ण, दुर्योधनादिक योध्यानीं संरक्षित व गजाश्व रथ इहींकरून संकुल झालेलें असें कौरवांचें सैन्य उत्तरानें पाहतांच भयाभीत होऊन बृहन्नडेस बोलतो हे बृहन्नडे, मी कौरवांशीं युध्द करण्यास इच्छित

नाहीं.पाहा!माझ्या सकल शरीरावर रोमांच उभे राहिले आहेत. हे मोठमो ठे योध्दे देवांनींही पराजय करण्यास अशक्य त्यांशीं मी काय युद्ध करूं तें सैन्य बहुत आहे, त्या सैन्यामध्यें योध्यांची कार्मुकें पहा कशीं भयंकर दिसतात, अशा भारती सैन्यांत मला जाण्याची इच्छा होत नाहीं. रथ,ना ग,अश्व,पदाती व रथध्वज इत्यादिकें करून प्रकीर्ण झालेली सेना पाहून माझे मनास अत्यंत व्यथा उत्पन्न झाली.जा सैन्यांत द्रोण भीष्मादिकरून महान योद्धे आहेत तेथें मी काय युध्द करावें? यांस पाहतांच माझा शरी रावर रोमांच उत्पन्न होऊन अत्यंत मोहही प्राप्त झाला आहे प्रस्तूतमा. झापाशीं सैन्य नाहीं माझा पिता मला गृह संरक्षण करण्या करितां ठेवून त्रिगर्ताशीं युद्धास गेला आहे तशांतून मी बाल,अस्त्रविद्ये मध्यें फारसा माझा परिश्रम नाहीं या मुळें हे ब्रुहन्नडे माझानें युद्ध होणार नाहीं. ये. थूनच आपण आतां माघारे फिरूं, पुढें जाणें योग्य नाहीं. असें उत्तराचें भाषण श्रवण करून ब्रहन्नडा बोलत्ये अरे उत्तरा,भयानें दीन होऊनआ पल्या शत्रूंस हर्ष उत्पन्न करितोस काय? मला असें वाटतें कीं,आजपर्यं त रणामध्यें जाऊन तूं कोठें क्षात्र कर्म केलें नाहींस. अरे,तूंच बोललास कीं मला कौरव सैन्याकडे ने, म्हणून मीं तुला कौरव सैन्याकडे आणिला,आ तां माघारा फिरतोस?तुला मीं आतां माघारा नेत नाहीं. युद्धाच्याइच्छेनें मांस भक्षणार्थ गृध्रा सारिखे आलेले जे आततायी कौरव यांचा अग्र भागीं मीं तुला नेईन तूं कांहीं भीऊं नकोस, स्त्रियांच्या मध्य भागीं तूंच ना आपल्या पौरुषाचें वर्णन करीत होतास आतां युध्द न करितां माघा रा जातोस,जाऊं नकोस तुला आतां युद्धच केलें पाहिजे. शत्रूंस पराजि त करून आपल्या गायी घेऊन जर तूं गृहीं न गेलास तर सकल नगर सं बंधी स्त्रिया व पुरुष तुझा अत्यंत उपहास करतील, मीं तुझें सारथ्य क रणार नवतों परंतु सैरंध्रीनें माझें सारथ्य कर्म तुझा पाशीं प्रगट केलें, यास्तव मी तुझा सारथी झालों. आतां मीं गायी घेतल्यावांचून पुनःमा घारा जाणार नाहीं. बरें तूं युद्ध न करिशील तर सैरंध्रीनें माझें स्तवन के लेंच आहे व तूं मला बराबर घेऊन आलास यास्तव मीच आतां कौरवांशीं

युध्द करून त्यांचा पराभव करितों, तूं स्वस्थतरी बैस. असें बृहन्नडचें भाषण श्रवण करून उत्तर बोलतो हे बृहन्नडे, कौरवांनीं आमचा मत्स्याचें धन हरण करून नेलें तरी चिंता नाहीं. आणखी यथेच्छ हरण करून नेवोत, मला नगर वासी स्त्रिया, पुरुष हांस्य करोत, माझ्या समग्र गायीजावोत, परंतु मी शत्रूंशीं संग्राम करणार नाहीं. मी एकटा युद्धास गेलोंअसतां माझा पिता मला रागें भरून असें म्हणेल कीं, तुला नगराचे संरक्षणा करितां ठेविला असतां तूं नगर शून्य टाकून कां युद्धास गेलास? असें उत्तर भाषण करून भयानें मान व दर्प यांचा त्याग करून धनुष्यबाण टाकून रथाखालीं उतरला, असतां बृहन्नडा भाषण करित्ये हे उत्तरा, रण भूमी पासून पलायन करणे असा क्षत्रियांचा धर्म नाहीं. क्षत्रियानें युध्द करून मरावें परंतु भिऊन पळूं नये, असें कौंतय भाषण करून रथाखालीं उतरला आणि उत्तर पुढें धांवत असतां त्यास धरण्या करितां आपणही त्याच्यापाठिमागें धांवला त्या काळीं अर्जुनाची दीर्घ वेणी गमनाचा योगें वारंवार कंपित झालेली व रक्त वस्त्र परिधान केलेलें असें अर्जुनाचें विलक्षणरूप पाहून सकल कौरवांचे सैनिकांस त्यांचे स्वरूपज्ञान न झाल्यामुळें हांस्य करून एकमेकास बोलतात हा कोण त्वरेनें धांवतो? अग्नी जसा भस्मामध्यें गुप्त राहतो तसा हा आपला वेष आच्छादित करून आला आहे याची कांहीं पुरुषाची आकृती व कांहीं स्त्रियांची आकृती असून कांहीं अर्जुनाचें सारूप्य या मध्यें दिसतें. त्याणेंच तर स्त्रि वेष धरिला नसेलना? याचें शिर, ग्रीवा, परिघा सारिखे बाहू व पराक्रम हे अर्जुना सारिखेच दिसतात तस्मात् धनंजया खेरीज हा दुसरा कोणी नाहीं. अमरांमध्यें इंद्र जसा, तसा मानुष्यांमध्यें अर्जुन आहे. शून्य जें विराट नगर त्याचे संरक्षणाकरितां एकटा विराटाचा पुत्र तेथें होता तोच येथें आला आहे, हा केवळ आपल्या पौरूष बुद्धीनें आला नाहीं बाल बुद्धीनें आला असावा. छिन्न वेषधारी अर्जुनास सारथी करून त्या सहवर्तमान नगरापासून बाहेर निघून येथें येतांच आमचें सैन्य पाहून भयानें मागें पळतो त्यास धरण्या करितां जो हा मागें जातो तो ध

नंजय आहे असें सकल कौरवांचे योध्दे. अर्जुनाविषयीं पृथक् पृथक् विचार करीत असतां त्याविषयीं निश्चय झाल्यामुळें ते एकमेकांस भाषण करण्यास समर्थ झाले नाहींत वैशंपायन सांगतात हे जनमेजया? छिन्न वेष धारण करणारा जो अर्जुन याणें पलायन करणारा जो उत्तर याचे पाठीमागें लागतां लागतां शंभर पाऊलें जाऊन त्याचा केश पाश धरला असतां उत्तर अती आर्त होऊन धनंजयास बोलतो, हे बृहन्नड, लौकर माझा रथ माघारा फिरीव जर मनुष्य वांचला तर सकल संपत्ती कधींतरी मिळवील. यास्तव जिवाचें रक्षण अवश्य करावें तुला मी नानाप्रकारें सुवर्णादिक वस्त्यादिक बक्षीस देईन परंतु या काळीं येथून मला सोड, या प्रकारें उत्तर विलापयुक्त भाषण करीत असतां अर्जुनें किंचित् हास्य करून उत्तरास रथा सन्निध आणून त्यास बोलतो हे उत्तरा तूं अत्यंत भयानें पीडित झाला असशील तर तूं शत्रूशीं युद्ध न करितां अश्व संरक्षण कर. मी रथारूढ होऊन आपल्या बाहूबळानें तुझें रक्षण करून शत्रुंशीं युद्ध करितों. कांहीं भय पावूं नकोस हे राजपुत्रा, तूं क्षत्रीय आहेस, महान् महान् वीरानीं संरक्षित अजिंक्य व महान् घोर असें जरी शत्रूंचें सैन्य आहे तथापि चिंता नाहीं हे पुरुषश्रेष्ठा शत्रूंचा सन्मुख जाऊन आतां तुला कसा विषाद उत्पन्न झाला बरें असो मीं कौरवांचा पराजय करून तुझे पशू आणून देतों तूं माझें सारथ्य कर म्हणजे मीं शत्रुसैन्यामध्यें प्रवेश करून कौरवांशीं मोठें युद्ध करितों या प्रकारें तो अपराजित बीभत्सू उत्तरास एक मुहूर्तपर्यंत आश्वासन वाक्यानीं बोध करून तो भयाभीत व निचेष्टित जरी होता तथापि आपलें सारथ्य करण्या करितां यास रथावर नेऊन बसविला असा विषय या अध्यायांत आहे.

३९. अध्याय एकुणचाळिसावा :- वैशंपायन सांगतात, हे जनमेजया, उत्तरास रथामध्यें बसवून पुरुषश्रेष्ठ अर्जुन क्लीबवेषानें त्याचा सारथी होऊन शमीच्या सन्मूख गेला, हे भीष्म, द्रोण प्रमुख रथी अवलोकन करून विमनस्क झाले त्या काळीं सर्व योध्दे हतोत्साह व अद्भूत उत्पात झालेले पाहून भरद्वाजपुत्र द्रोण भाषण करितात हे रूक्ष व प्रचंड वायू वाळुवर्षाव

करणारे वाहतात, भस्मवर्णासारिखें आकाश तमानें व्याप्त झालें इत्यादि बहुत नानाप्रकारचीं अशुभ चिन्हें दृष्टिगोचर होतात, याजवरून हे वीर हो? कांहीं तरी महान् भय उपस्थित झालें असें वाटतें. यास्तव सर्वांनीं एकत्र राहवें, सेनेचा व्यूह करून आपलें व सैन्याचें रक्षण करावें, म्हणजे अशुभा चें निवारण होऊन गोधनाचेंही रक्षण होईल. हा वीर महान् धनुर्धारी स र्व शस्त्रवानांमध्यें श्रेष्ठ क्लीब वेष धारण करून पार्थच येथें आला यांत संशय नाहीं असें साधारण सर्वांस भाषण करून भीष्मास बोलतो हे भीष्मा लंकेश जो रावण याचा वनाचा अरी जो हनुमान् तो आहे केतूचा ठाईं जा- चा, वृक्षाचें नामाभिधान धारण करणारा आणि नग म्हणजे पर्वत यां चा अरी जो इंद्र याचा हा सूनु म्हणजे पुत्र आहे, हा अंगनेचा वेष धारण करून प्राप्त झाला आहे, जास किरीटी म्हणतात तो हाच, हा आज तु- म्हांस जिंकून तुमच्या गायी नेईल यास्तव तुम्हीं दुर्योधनाचें रक्षण करा वें. हा पराक्रमी कुंतीपुत्र सव्यसाची जास पार्थ म्हणतात तोच हा. शत्रू स केवळ ताप उत्पन्न करणारा, सुरासुर जरी आले तथापि हा युध्द के- ल्यावांचून माघारा जाणार नाहीं, या पार्थास वनामध्यें बहुत क्लेश झाले आहेत, इंद्रानें यास अस्त्रविद्येमध्यें परम निपूण केला आहे, प्रस्तुत या स परम क्रोध आला आहे, युध्दाविषयीं केवळ यास इंद्राचीच उपमा आहे याचाशीं प्रतियुद्ध करणारा योद्धा आजपर्यंत हे कौरव हो कोणी ही पाहि- ला नाहीं, मीं असें ऐकतों कीं हिमवान् पर्वतीं किरात वेषानें प्राप्त झालेला जो श्रीमहादेव यास पार्थानें संतुष्ट केला असें द्रोणाचार्याचें भाषण श्रवण करून कर्ण बोलतो हे आचार्य तुम्हीं तर अर्जुनाचे गुण ग्रहण करून आम- ची निंदा करितां परंतु मी, दुर्योधन या उभयतांच्या एक कळेचीही अर्जु- नास साम्यता नाहीं असें कर्णाचें भाषण श्रवण करून दुर्योधन बोलतो हे राधेया जवर हा अर्जुन असेल तर माझें कार्य झालें. यास आम्हीं ओळ खला आतां याणीं पुनः बारावर्षे वनवास करावा अथवा क्लीबवेषानें अ र्जुना व्यतिरिक्त अन्य कोणी मानव आला असेल तर तीक्ष्ण बाणें करून आतांच यास भूतलावर पाडितों. यांत संशय नाहीं. असें दुर्योधन भाषण

करीत असतां भीष्म, द्रोण, कृपाचार्य व अश्वत्थामा याणीं त्याचें भाषण पूज्य केलें नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

४० अध्याय चाळिसावा.- वैशंपायन सांगतात हे जन्मेजया, अर्जुन शमी वृक्षा जवळ जाऊन उत्तरास बोलतो हे उत्तरा, संग्रामामध्यें तूं अति निपूण नाहींस, तसाच संकुमारही आहेस, यास्तव मी युद्ध करितों, तूं शमी वृक्षावर चढून पांडवांनीं जीं धनुष्यें ठेविलीं आहेत तीं खालीं उतर, तुझीं जीं आयुधें आहेत तीं माझें बल सहन करणार नाहींत. हे माझे बाहू कुंजरास मर्दन करणारे शत्रूंचा पराजय करून मोठा भारसहन करण्यास समर्थ आहेत यास्तव या शमीवर पांडवांचीं आयुधें व कवचें ठेविलीं आहेत, तीं मला आणून दे. असा विषय या अध्यायांत आहे.

४१. अध्याय एकेचाळिसावा.- उत्तर बोलतो हे बृहन्नडे. या वृक्षावर एक शरीर बांधलेलें आहे, असें आम्हीं श्रवण केलें तेव्हां मी राजपुत्र हस्तें करून कसा त्यास स्पर्श करूं? महान राजपुत्र व मंत्रयज्ञवेत्ता जो आहे त्याणें शवास कसा स्पर्श करावा, केला असतां शव वहन करणाऱ्या सारिखा अशुची होऊन लोकांमध्यें अव्यवहारी होईल, असें उत्तराचें भाषण श्रवण करून बृहन्नडा बोलत्ये हे राजश्रेष्ठा तूं व्यवहारास योग्य व शुचि आहेस भिऊं नकोस, या वृक्षावर हीं आयुधें आहेत शरीर नाहीं, तूं मत्स्य राजाचा पुत्र मोठ्या कुळांत झालेला: तुझ्याकडून हें निंदित कर्म कसे मीं करवीन? असें अर्जुनाचें भाषण श्रवण करून विराटपुत्र रथा खालीं उडी टाकून शमी वृक्षावर चढला असतां अर्जुन रथावर बसून त्याजला बोलतो अरे उत्तरा, हीं वृक्षाग्रापासून धनुष्यें लौकर खालीं उतरव त्यास वेष्टनें आहेत तीं सत्वर सोडून मजकडे घेऊन ये. त्याकाळीं उत्तरानें, अर्जुनानें सांगितल्या प्रमाणें आयुधें घेऊन खालीं आला आणि त्यांचीं परिवेष्टनें व रज्जु सोडल्यावर सूर्य चंद्रासारखी कांती उदय पावलेल्या ग्रहा सारखी शोभा व जृंभित झालेल्या सर्पासारिखें गांडीव प्रभृती आयुधांचें स्वरूप पाहून तो भयाभीत

होऊन अर्जुनास भाषण करितो. असा विषय या अध्यायांत आहे.

४२ अध्याय बेचाळिसावा :- हे बृहन्नडे, ही सकल आयुधें अप्रती म अवलोकन करून मला अत्यंत आश्चर्य झालें यास्तव याचें तत्व काय आहे तें निवेदन कर. असा विषय या अध्यायांत आहे.

४३ अध्याय त्रेचाळिसावा :- बृहन्नडा भाषण करित्ये हे उत्तरा, हें गांडीव नामक धनुष्य अर्जुनाचें आहे. तीन लोकांत या धनुष्यांची कीर्ती आहे सर्वायुधांमध्यें श्रेष्ठ व सुवर्णानें परिष्कृत केलेलें असून याचें बल लक्ष धनुष्यांसमान आहे या धनुष्याच्या योगें पार्थानें युध्दामध्यें सकल देव व मनुष्यें पराजित केलीं. लघु अथवा बृहत बाण जरी असले तथापि या धनुष्यास योग्य होतात, हें अत्यंत सकुमार आहे, देव, दानव गंधर्व याणीं बहूत दिवस गांडीवधनुष्याची पूजा केली आहे, पूर्वी ब्रम्हदेवानें सहस्त्र, प्रजापतीनें एकशें आठ, इंद्रानें पंचायशीं, वनस्पतींचा राजा जो सोम याणें पांचशें, वरुणानें शंभर इतकीं वर्षे पर्यंत यानीं पूर्वी धारण केलें होतें. नंतर वरुणानें पार्थास दिलें तें त्यानें पांसष्ट वर्षे धारण केलें. ज्याचा पार्श्वभाग सुशोभित, सुवर्णमय हें भीमसेनाचे धनुष्य, या धनुष्याचा योगें समग्र प्राची दिशा पूर्वी त्याणें जिंकिली. हे उत्तरा, इंद्र गोपक कीटकानीं चित्रविचित्र केल्यामुळें बहूत शोभायमान असें हें धनुष्य धर्मराजाचें आहे, सुवर्णाचे सूर्य ज्याचे ठांई अत्यंत प्रकाशित दिसतात, व तेजें करून अतिजाज्वल्यमान असें हें धनुष्य नकुळाचें आहे. सुवर्णाचे शलभ चित्रविचित्र सुशोभित हेच धनुष्य सहदेवाचें होय. हे विराटपुत्रा, सर्प विषासारिखें जाज्वल्यमान, क्षुर धारेसारिखे तीक्ष्ण असे. सहस्त्र बाण अर्जुनाचे आहेत, हे बाण संग्रामामध्यें प्रज्वलित होत्साते बहूत त्वरेनें जाऊन व्यूह भेद करून रिपूंचा नाश करितात, हे पृथु आणि दीर्घ अर्धचंद्राकार अत्यंत तीक्ष्ण, रिपूचा क्षय करणारे, हे भीमसेनाचे बाण आहेत, हे हरिद्वर्ण, हेमपुंख, शिलाशित असे बाण नकुलाचे आहेत, तसाच हा शार्दूल लक्षण, भाता ज्याचा योगें प्रतिची दिशा ज्याणें जिंकिली, तोही नकुलाचाच आहे, हे उत्तरा हे सूर्याकार लोहमय युध्दामध्यें चित्रविचित्र

क्रिया करणारे. बाण सहदेवाचे आहेत हे तीक्ष्ण, पीतवर्ण, पृथु, दीर्घ ज्यांचे पिसारे, हेमपुंख, तीन तीन ज्यास पर्वे असे हे बाण धर्मराजाचे आहेत हा दीर्घ शिली, पृष्ठ शिली, मुख संग्रामामध्यें गुरुभार सहन करणारा असा हा बाण अर्जुनाचाच आहे, व्याघ्रचर्म कोशामध्यें ठेवलेला गुरुभाराचा सहन करणारा दिव्य, शत्रूस परम भयंकर असा हा बाण भीमसेनाचा आहे, चित्रविचित्र ज्याचा कोश सुवर्णमय मुष्टीनें युक्त असा हा खड्ग धर्मराजाचा आहे, पांचनख कोशामध्यें स्थापित, गुरुभार सहन करण्या विषयीं अत्यंत दृढ असा हा खड्ग नकुलाचा आहे, हा मोठा विपुल गव्य कोशाचे ठाईं स्थापित केलेला व सर्वभार सहन करणारा असा हा खड्ग सहदेवाचा आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

४४ अध्याय चवेचाळिसावा :- उत्तर प्रश्न करितो हे बृहन्नडे महात्मे जे पांडव यांची सुवर्ण विकृत आयुधें फार उत्तम प्रकारचीं शोभायमान अवलोकन करून मला फारच आनंद झाला, बरें अर्जुन, युधिष्ठिर, नकूल, सहदेव, भीमसेन, हे आतां कोठें असतील? महान् पराक्रमी व शत्रूंचा नाश करणारे असे जे पांडव ते अक्ष द्यूतामध्यें पराजित होऊन कोठें गेले यांचा ठिकाण लागत नाहीं, तशीच पांचाली द्रौपदी स्त्रियांत केवळ रत्न भूतच अक्ष द्यूतांत पराजित झालेली ती कोठें गेली असेल बरें. असें उत्तराचें भाषण श्रवण करून अर्जुन भाषण करितो. हे उत्तरा, अरे ज्यास अर्जुन म्हणतात तोच मी, तुझ्या पित्याचा सभासद तो युधिष्ठिर, बल्लव नामें जो स्वयंपाक करितो तो भीमसेन, अश्वाचें बंधन करितो. तो नकूल, गायींचा स्वामित्वावर जो आहे तो सहदेव. अरे ज्या सेरंध्री करितां कीचक मरण पावले ती द्रौपदी, असें भाषण श्रवण करून उत्तर बोलतो. हे अर्जुना पार्थाचीं दहा नावें आहेत असें ऐकिलें यास्तव तीं नावें कोणतीं तीं मला सांग, अर्जुन सांगतो हे उत्तरा, एकाग्रमनें करून श्रवण कर, अर्जुन, फाल्गुन, जिष्णु, किरीटी, श्वेतवहान, बीभत्स, विजय, कृष्ण, सव्यसाची, धनंजय, अशीं अर्जुनाचीं दहा नावें श्रवण करून उत्तर भाषण करितो. हे अर्जुना, कोणाच्या कारणानें हीं नावें तूं पावलास हें मला निवेदन कर,

मीं त्या नावाचे हेतु श्रवण केले आहेत ते सर्व जर तूं सांगशील तर तुझ्या वाक्यावर माझी श्रद्धा उत्पन्न होईल, असें भाषण श्रवण करून अर्जुन बोलतो हे उत्तरा, ज्या काळीं सर्व देश मी जिंकून सर्वांचें धन हरण केलें. आणि त्या धनामध्यें स्थित झालों यामुळें मला धनंजय असें म्हणतात, ज्या काळीं शत्रूं नाश करण्या करितां संग्रामामध्यें मी प्रवेश करितों त्याकाळीं त्यांचा पराजय केल्यावांचून मी माघारा येत नाहीं म्हणून मला विजय असें म्हणतात. माझ्या रथास अश्व, श्वेतवर्ण आहेत म्हणून मला श्वेत वहान म्हणतात. उत्तरा, फल्गुनी नक्षत्रीं दिवसास, हिमालय पृष्ठभागीं माझें जन्म झालें म्हणून मला फाल्गुन असें म्हणतात. पूर्वी दैत्यांशीं स्पर्द्धा करीत असतां इंद्रानें मला सूर्यासारिखा कांतिमान किरीट दिला तेव्हांपासून मला किरीटी असें म्हणूं लागले. युद्धामध्यें मीं फार भयंकर कर्म करितों म्हणून बीभत्स अशी माझी ख्याती झाली. मी दोन्हीं हातानीं गांडीव धनुष्याचें आकर्षण करितों म्हणून सव्यसाची असें म्हणतात. पृथ्वींत माझ्या सारिखा वर्ण दुर्लभ, आणि सात्वीक शुक्क कर्म मी करितों म्हणून मला अर्जुन असें म्हणतात मी शत्रूस अत्यंत दुर्धर्ष आहें व शत्रूचें दमन करितों म्हणून देव मला जिष्णु असें म्हणतात माझा वर्ण भास्वर आहे मी सर्वांचीं चित्तें आकर्षण करितों व बालास मीं अत्यंत प्रीय आहें म्हणोन पितामहानें माझें नांव कृष्ण असें ठेविलें. असें अर्जुनाचें भाषण श्रवण करितांच उत्तर नमस्कार करून भाषण करितो हे पार्था, मला भूमिंजय म्हणतात, आज दैवयोगानें तुला पाहिलें मी कांहीं तुला दुरुक्त भाषण केलें असेल त्या सर्व भाषणाची क्षमा कर. जें पूर्वीं तूं दुष्कर्म विचित्र कर्म केलें आहेस तेणें करून माझें सर्व भय दूर झालें असा विषय या अध्यायांत आहे.

४५ अध्याय पंचेचाळिसावा:— उत्तर भाषण करितो हे अर्जुना, उत्तम प्रकारच्या रथामध्यें आरूढ होऊन मी तुझा सारथी झालों, आतां कोणच्या सैन्यामध्यें गमन करण्याविषयीं आज्ञा करितोस असें भाषण श्रवण करून अर्जुन बोलतो हे पुरुषश्रेष्ठा, तुझें भाषण ऐकून मी सं-

तुष्ट झालों आतां तुला कांहीं भय नाहीं हे रणविशारद, तुझे शत्रु मी आ तां रणामध्यें नष्ट करितों. या संग्रामामध्यें शत्रुसह वर्तमान आज मोठें रण उत्पन्न झालेलें अंवलोकन कर हे सर्व भाते लवकर माझे रथावर ठेव. आणि सुवर्णपरिष्कृत असा एक खड्ग रथावर स्थापित कर असें अर्जु नाचें भाषण ऐकून विराटपुत्र त्वरेनें अर्जुनाचीं आयुधें घेऊन वृक्षा खालीं उतरला. अर्जुन भाषण करितो, हे उत्तरा आतां कौरवांशीं युद्ध करून तुझे पशु आणून देतों, जसा तूं आपल्या नगरामध्यें संरक्षित असतोस तसा या रथामध्यें तुझें मी संरक्षण करीन, हा रथ, चक्र, अ क्ष, ध्वज, कुबर इत्यादिकें करून दृढ केला आहे, तसेच रथाचे अश्व हेही दृढ आहेत, प्राकार तोरणादिकें करून तुझें पूर जसें युक्त आहे तसाच रथही युक्त आहे रथ, हस्ति, सादि इत्यादिकें करून जसें तुझें नगर संर क्षित आहे तसा हा रथ ही इषा आणि उभय पार्श्व दारु यानीं संरक्षित आ हे. अनेक ध्वज संकूल जसें तुझें नगर आहे तसा हा रथ आहे असा हा रथ नगरासमान रक्षण करील, आणि मी गांडीवधन्वा रथामध्यें आरूढ झालों म्हणजे हा रथ शत्रूस सैन्यामध्यें अजय होईल, यास्तव हे विरा टपुत्रा कांहीं भय धरू नको असें अर्जुनाचें भाषण ऐकून उत्तर बोल तो हे पार्था तूं युध्दामध्यें जाण्यास सिध्द झालास आतां मला भय ना हीं, केशव अथवा साक्षात इंद्र जरी संग्रामामध्यें आला तथापि मी भि णार नाहीं. परंतु हें एक अद्भुत पाहून मला मोठा मोह झाला आहे. त्याचा कांहीं एक निश्चय करावा तर मी अल्पबुद्धी असल्यामुळे कोणताच निश्चय करवत नाहीं, हे अर्जुना या प्रकारें तूं उत्तम युधांगे व सकल लक्ष णानें युक्त असतां कोणत्या कर्माच्या योगें मला क्लीबत्व प्राप्त झालें जसा क्लीब वेषानें शूलपाणीच संचार करितो तसा तूं मला दिसतोस, गंधर्वराज किंवा इंद्रच तूं आहेस, असें मला वाटतें. हें ऐकून अर्जुन बोलतो. हे उत्तरा ज्येष्ठ भ्रात्याच्या आज्ञेनें एक संवत्सरपर्यंत हें व्रत मी धरिलें आहे. हे महाबाहो मी कांहीं क्लीब नाहीं, धर्मसंरक्षणा करितां पराधीन झालों आ हें, आतां हें माझें व्रत समाप्त झालें असें तूं समज. असें ऐकून उत्तर बो

लतो हे अर्जुना, मज्यावर तुझा मोठा अनुग्रह झाला मी जे तर्क केले ते के वळ व्यर्थ नाहींत, अरे अशा रूपाचे क्लीब मी कोठेंच पाहिले नाहींत, अ स्तु. आतां मी साहाय्यवान झालों, देव जरी युद्धास आले तथापि त्यांच्या शीं युद्ध करीन, व मीं काय करूं तें सांग. हे पुरुषश्रेष्ठा मला गुरूनें सारथ्य कर्मामध्यें शिक्षित केलें आहे, जसा वासुदेवाचा दारुक किंवा शक्राचा मातली सुशिक्षित आहे. हे अर्जुना तसा मी सारथ्य कर्मांत सुशिक्षित आहें. ज्या काळीं मी अश्वांस प्रेरणा करितों त्या काळीं अश्वाचीं पदें भूमीवर पडतात, तीं कोणास दिसत नाहींत. हा तुझा रथाच्या दक्षणधुरीस जो अश्व आहे तो श्रीकृष्णाचा सुग्रीव अश्वा सारिखा आहे, वामधुरीचा अश्व तो श्रीकृष्णाचा मेघपुष्प अश्वा सारिखा आहे, कांचनानें अलंकृत असून पृष्ठ भाग ज्यांचा सुशोभित दिसतो तो अश्व कृष्णाच्या शैब्य नामक अश्वासारिखा दिसतो, आणि जो पार्ष्णि प्रदेशीं दक्षणभागीं अश्व आहे तो कृष्णाच्या बलाहक अश्वा सारिखा दिसतो, तूं धन्वी आहेस त्यापेक्षां त्या रथावर आरूढ होऊन संग्रामास सिद्ध हो, असें बोलल्यावर अर्जुनानें आपले हस्तांतील्वलयें कर्णांतील कुंडलें काढिलीं. नंतर भागयुक्त कृष्णकेश श्वेत वस्त्रानें बांधून रथामध्यें सकल अस्त्रांचें ध्यान करीत असतां सकल अस्त्रें हस्त जोडून हे नृपात्मजा आम्हीं तुझे किंकर अहोंत. तुला नमस्कार करितों. असें म्हणतांच पार्थानें त्या अस्त्रांस सांगितलें कीं, तुम्हीं सकलांनीं माझा मनोमय व्हावें, असें बोलून तीं अस्त्रें अर्जुनानें ग्रहण केलीं आणि सुप्रसन्न मुख होऊन गांडीव धनुष्यास प्रत्यंचा चढवून त्याचा तो टणत्कार करीत असतां त्यापासून मोठा ध्वनि उत्पन्न झाला, जसा पर्वतावर पर्वताचा आघात होऊन त्या योगें भूमी जशी विदीर्ण होत्ये तशी गांडीव धनुष्याच्या टणत्कारें करून भूमी कंपीत झाली, महा भूवात उत्पन्न झाला एकाएकीं मोठमोठे उत्पात झाले, दिशांचीं तेजें नष्ट झालीं, जसे मोठे वृक्ष वाताचा योगें कंपित होतात तसे योध्यांचे ध्वज कंपित होऊं लागले, आकाश टणत्काराच्या योगें व्याप्त झालें, सकल कौरवांनीं जाणलें कीं हा अशनी सारिखा शब्द अर्जुनाच्या गांडीव धनुष्याचा वाटतो. त्या काळीं उत्तर अर्जुनास भाषण करितो हे पांडवश्रेष्ठा

तूं एकटा आहेस, या संग्रामांत सकल महान शस्त्रास्त्र पारग बहुत महा रथी कसे जिंकिशील? तुला सहाय्य कोणी नाहीं, हे कौरव सहाय्य युक्त आ हेत. यास्तव मला मोठें भय उत्पन्न होऊन तुझ्या अग्रभागीं आलों आहें. असें उत्तराचें भाषण ऐकतांच पार्थ मोठ्यानें हास्य करून भाषण करितो हे उत्तरा, तूं कांहीं भिऊं नकोस. अरे, महा बलवीर गंधर्व घोषयात्रा प्रसंगीं आले होते, त्यांचा पराभव मी एकट्यानें केला. तसेंच देवदानवांनीं प्रतिसंकुल असें जें खांडववन त्याचे ठाईं ज्याकाळीं मी युद्ध केलें व निवांत कवच, पौलोम नामक दैत्यांसहवर्तमान इंद्राकरितां मी युद्ध केलें तसेंच पांचालिच्या स्वयंवरकालीं मी आपल्या बाहुबलें करून सकलराजांशीं युद्ध केलें त्याकाळीं मला साहाय्य कोण होता. अरे माझा गुरू जो द्रोणाचार्य त्याची मजवर बहुत कृपा आहे, त्याच्या कृपेने तसेंच शक्र, वैश्रवण, यम, वरूण, पावक, कृपाचार्य, श्रीकृष्ण व शिव यांच्या कृपेनें कौरवांशीं युद्ध करण्यास मी समर्थ आहें यास्तव हे उत्तरा, तूं मानसज्वराचा त्यागकरून माझा रथ चालीव. असा विषय या अध्यायांत आहे.

४६. अध्याय शेचाळिसावा.– वैशंपायन सांगतात हे जन्मेजया, अर्जुनानें उत्तरास सारथी करून सकल आयुधें घेतलीं आणि शमी वृक्षाच्या संन्निध येऊन त्यास प्रदक्षणा केली आणि सिंह लक्षणानें युक्त जो उत्तराचा ध्वज तो रथापासून खालीं उतरून रथ शमी मूलापाशीं ठेविला, आणि गमनाविषयीं उद्युक्त होऊन सिंह पुच्छाचा लक्षणानें युक्त जो वानर चिन्हीत ध्वज त्याचें चिंतन करूं लागला असतां अग्नीनें अर्जुनाचें चिंतन जाणून ध्वजाचे ठाईं बहुत भुतांची योजना करून विश्वकर्म्यानें निर्मित जी माया तद्युक्त वानर चिन्हित ध्वजासहवर्तमान सपताक, मालासहित दिव्य रूप, मनोरम, चित्र विचित्र अंगानीं युक्त असा रथ पृथ्वीवर पाठविला, त्यास अर्जुनानें पाहून प्रदक्षणा केली आणि अंगुलित्राणें व धनुष्यबाण घेऊन रथारूढ होऊन उत्तर दिशेकडे जात असतां मार्गांत शत्रुंचा शरीरावर रामांच उत्पन्न होण्यासारखा भयंकर शंखाचा नाद केला तेणें करून रथाचे अश्व वेगानें जात असतां त्याणीं आपले जानु भूमीवर टेंकलें, आणि उत्तर ही शंखनादानें त्रस्त होऊन रथांत बसला. नंतर अर्जुनानें अश्वाचा रश्मी ओढून धरून त्यांस पूर्ववत केलें, आणि

उत्तरास आलिंगन देऊन भाषण करूं लागला, हे राजपुत्रा तूं भिऊं नकोस, तूं महाश्रेष्ठ क्षत्रिय असतां शत्रूसैन्यामध्यें कसा भीतोस, तूं बहुत शंखांचे शब्द श्रवण केले आहेस, मोठमोठ्या सैन्यांत कुंजराचे भयंकर शब्दही श्रवण केले असशील, असें असतां माझ्या शंखाचा नाद श्रवण करून तूं कसा भ्यालास असें अर्जुनाचें भाषण ऐकून उत्तर बोलतो हे अर्जुना शंख व भेरी यांचे शब्द बहुत मी श्रवण केले, व सैन्यांतील गजांचे शब्दही ऐकिले आहेत, परंतु असा शंखाचा नाद मी कधींही ऐकिला नाहीं, असें ध्वजाचें रूपही पाहिलें नाहीं. शंख, धनुष्य, ध्वज आणि रथ यांचा नादानें माझें मन अत्यंत मोहित झालें. या नादेंकरून सर्व दिशा व्याप्त झाल्या आहेत, माझें हृदय बहुत व्यथेस पावलें, या रथाचा ध्वजेंकरून सर्व दिशा आच्छादित झाल्यामुळें त्यांचें परिज्ञान होत नाहीं. गांडीव धनुष्याच्या शब्देंकरून माझे कर्ण बधिर झाले असें बोलताना एक मुहूर्त गेल्यावर पार्थ विराटपुत्रास बोलतो हे उत्तरा आतां रथावर चांगला बैस, आपल्यापायांनीं रथास घट्ट धर, अश्वांचा रश्मी चांगल्या ग्रहण कर, मी पुनः शंखाचा नाद करितों, असें म्हणून पुनः अर्जुनानें शंखाचा नाद केला असतां शैल, गुहा व दिशा नादानें पूर्ण होऊन गेल्या, उत्तरही नादानें नादित झाला व गांडिवाचा निर्घोषानें पृथ्वी कंपीत झाली असतां पुनः धनंजयानें उत्तरास अश्वासन दिलें, तेव्हां कौरवसैन्यांत द्रोणाचार्य बोलतात, मेघ जशी गर्जना करितात तशी रथाची गर्जना होत असतां पृथ्वी कंपायमान झाली, त्यापेक्षां हा रथ अर्जुनाचाच आहे, यांत संशय नाहीं, शस्त्रांचीं तेजें, अश्वांचे हर्ष, अग्नीचीं तेजेंही नाहींशीं झालीं. आदित्याची शोभा गेली, मृग नाना प्रकारें घोर शब्द करितात, ध्वजावर वायस पक्षी येऊन बसतात, हे कौरवांस शुभकारक नाहीं. सकल पक्षी अपसव्य जातात तर कांहीं तरी मोठें भय आहे, सैन्यामध्यें गोमायु रोदन करीत धांवतात, आणि त्यांस मारल्यावांचून आक्रोश शब्द करितात. येणेंकरून कांहींतरी महद्भय आहे. अशी सूचना होत्ये, शरीराचीं रोमकुपें प्रहृष्ट झाल्या सारिखीं दिसतात, या कारणावरून क्षत्रियांचा युद्धानें विनाश दिसतो सूर्य, चक्षु, वाणी, मन इत्यादिक ज्योति प्रकाशमान दिसत नाहींत. मृगपक्षी परम दारूण दिसतात असे

इक्षत्रियाचा विनाश करणारे उत्पात दिसूं लागले आहेत, हीं निमित्तें आमचेच ना-शाचीं आहेत, हे दुर्योधना उल्का प्रदीप्त होऊन तुझ्या सैन्यास बहूत बाधा क रितात, सकल वहानें रोदन करितात, बहूत गृध्र पक्षी तुझ्या सैन्यांत आले आहेत, ही तुझी सेना पार्थ बाणानीं प्रपीडित होऊन पराभूत झाल्यासार खी दिसते, युध्द करण्याविषयीं इच्छित नाहीं, सर्व योध्दे विवर्ण झाले आहे त, आम्हीं सकल योध्दे तुझा गाची पाठवून उभे अहोंत, असा विषय या अध्यायांत आहे.

४७ अध्याय सत्तेचाळिसावा:– वैशंपायन सांगतात हे जन्मेजया, द्रोणाचार्यांचें भाषण श्रवण करून दुर्योधन भीष्मास बोलतो, हे पिताम ह द्रोणाचार्य व महारथी कृपाचार्य या उभयतांस मी व कर्णानें वारंवार जें कथन कर्तव्य तें केलेंच आहे परंतु त्यांची समजुत होत नाहीं यास्तव पुनः सांगतों, अक्षद्यूतांत ज्या काळीं पांडव पराजित झाले त्या काळीं असा पण ठरला आहे कीं, पांडवांनीं बारावर्षें वनवास करून एकवर्ष अज्ञातवास क रावा, तें तेरावें वर्ष पांडवांचें अद्याप पूर्ण झालें नाहीं, असें असतां अज्ञात वासामध्यें बीभत्सु जर आम्हांशीं युध्दास सिध्द होऊन प्रगट होईल तर त्याची प्रतिज्ञा पूर्ण न झाल्यामुळें पुनः त्यांस बारावर्षें वनवास करावा ला गेल, राजलोभास्तव आम्हास न जाणून पांडव जर प्रगट झाले अथवा आम्हांसच जर कांहीं मोह उत्पन्न होईल तर या कार्यांत न्यूनातिरिक्त जाण ण्याविषयीं भिष्मा तुम्हीं समर्थ आहांत, दोन कार्यें एककालीं प्राप्त झालीं असतां संशय उत्पन्न होतो, पाहावें गोग्रहणार्थ मत्स्याशीं आम्हीं युध्द करण्याच्या इच्छेनें आलों असतां जर बीभत्सु आम्हांशीं युध्दास येईल तर यामध्यें अपराध कोणाचा आहे, त्रिगर्तांनीं आमचापाशीं येऊन म त्स्याचे अपराध बहूत कथन केले यास्तव त्या करितां आम्हीं मत्स्याशीं युध्दाचा उपक्रम केला, त्रिगर्त भयाभित होऊन ज्या काळीं आमचाकडे प्राप्त झाले तेव्हां आम्हीं त्यांस असें सांगितलें कीं, तुम्हीं पूर्वी विराटाचीं गोध नें हरण करा, ते तीं गोधनें माघारे नेण्याकरितां मत्स्य तिकडे गेले म्हणजे आम्हीं इकडे मत्स्याचीं गोधनें हरण करूं, त्याप्रमाणें सप्तमीच्ये दिवशीं

अपराह्न काळीं सुशर्म्यानें गोधनें हरण केल्यावर अष्टमीचे दिवशीं आम्हीं मत्स्याचीं गोधनें हरण केलीं, आतां मत्स्य तिकडे त्यां पासून गायी घेवोत, व त्यांचा पराजय करोत, त्रिगर्त आमचाशीं प्रतरणा करून मत्स्याशीं स्नेह करोत अथवा त्यांना सोडून मत्स्य आमचाशीं युद्धार्थ येवोत, स्वतः विराटराजा आमचा अपजय करण्या करितां या रात्रीचे ठाईं युद्धास प्राप्त होवो, अथवा अर्जुन येवो, तथापि त्याचाशीं युद्ध करण्याची मी प्रतिज्ञा केलीच आहे, असें असतां हे योद्धे कां स्तब्ध बसले. हे भिष्मा तुम्हीं द्रोणाचार्य, कृपाचार्य, विकर्ण, द्रोणपुत्र, हे सकल महारथी संभ्रांत मनस्क होत्साते कां स्तब्ध बसले, आतां आपल्यास युद्धावांचून श्रेयस्कर नाहीं, आम्हीं प्रत्येक योद्धे देवांसही जिंकण्यास समर्थ आहोंत, पहा हे आमच्याया शरानी युद्धांत शत्रूचे गज, पदाती, अश्व, हे कधींही जिवंत राहावयाचे नाहींत, आतां तुम्हांस जसा विचार सुचेल तसा करावा. हा आचार्य पांडवांचे मतास मिळाला आहे. याची अर्जुनावर अत्यंत प्रीति दिसते म्हणून अर्जुनाची प्रशंसा करितो, हे भीष्मा आतां आपली सेना जणें करून भग्न होणार नाहीं असा प्रकार करा, अश्वांचे हेषित शब्द श्रवण करून द्रोणाचार्यांचें सामर्थ्य नष्ट झालें, द्रोणाचार्यास पांडव अत्यंत प्रियकर आहेत ते त्यांचेच शौर्य वर्णितात, पहा अश्वांचे शब्द श्रवण करून पांडवांची प्रशंसा कोणबरें करील, तस्मात् द्रोणाचार्य यांचा आमचे ठाईं रोष व द्वेष फार आहे म्हणून असें भाषण करितात यांत संशय नाहीं आतां असें करावें कीं, आपणास कांहीं महाभय प्राप्त झालें असतां त्याचे निराकरणा विषयीं त्यांस प्रश्न करूं नये, हे केवळ भिक्षुक याणीं वनें उपवनें या ठाईं कथा सांगाव्या, तसेच दुसऱ्याचें छिद्र जाणण्या विषयीं, याज्ञिकाचें कर्मां विषयीं, गोधना विषयीं, गृहबंधन प्रकारा विषयीं, स्नान आचमनें भोजना विषयीं, यज्ञादिकाचे ठाईं केशपतनादिकांचे प्रायश्चित जाणणे इत्यादिकांचे ठाईं हे मोठे पंडित आहेत, यामध्येच यांची शोभा, असे हे गुण वादी पंडित शत्रूची प्रशंसा करणारे यांस पाठिमागें ठेवून जेणें करून शत्रूवध्य होतील व गायीचें व आपलें रक्षण होईल असा व्यूह करून युद्ध करण्यास तुम्हीं सिद्ध व्हा असा विचार

या अध्यायांत आहे.

४८ अध्याय अठ्ठेचाळिसावा.- कर्ण बोलतो हे दुर्योधना सर्वभिष्मादिक योद्धे त्रस्त झाल्यांसारिखे दिसतात, अस्तु युध्दार्थ प्राप्त झालेला हा विराट अथवा बिभत्सु, यांतून कोणी तरी असो, याचाशीं मी युध्द करून सर्वांचें निवारण करितों. माझ्या धनुष्यापासून मुक्त झालेले सर्पासारिखे तीक्ष्ण बाण ते लक्षभेद केल्यावांचून माघारे येणार नाहींत तसेच पार्थासही आच्छादन करोत, धनुष्यदोरीनें ताडित झालेले जे उभयतांचे शर त्यांचा शब्द दुंदुभीसारिखा श्रवण करोत, आज तेरावर्षांनीं बीभत्सु प्राप्त झाला आहे तर जसा पात्रभूत गुणवान ब्राम्हण दान ग्रहण करण्यास योग्य होतो, तसा अर्जुन माझे सहस्रावधी बाण आज ग्रहण करो, हा अर्जुन जसा तीन लोकांत विख्यात आहे तसा मीही कांहीं अर्जुनापेक्षां कमी नाहीं. पूर्वी मी तुमचाशीं प्रतिज्ञा केली आहे कीं समरामध्यें अर्जुनास मारीन, त्या प्रतिज्ञे प्रमाणें आज युध्दामध्यें अर्जुनास मारून हे दुर्योधना तुझा अनृणी होईन, उभयतांचे बाण परस्पर येत असतां मध्येंच छिन्न होऊन विदीर्ण झालेले आकाशांत आज शलभासारिखे दिसतील. उल्कानीं जसा कुंजर पीडित होतो तसा आज पार्थ माझ्या बाणें करून पीडित झालेला सर्व लोक अवलोकन करतील. ऋषीश्रेष्ठ जो परशुराम याजपासून जें मला अस्त्र प्राप्त झालें आहे त्याच्या आश्रयानें मी इंद्रासहवर्तमान हीयुद्ध करण्यास समर्थ आहें, त्याच्या ध्वजाग्रीं जो वानर आहे, त्यास आज भल्लबाण मारून पृथ्वीवर पाडीन, शत्रूचा ध्वजाच्या ठाईं जीं भूतें वास करितात त्यास मी अत्यंत पीडित करीन हे दुर्योधना तुझ्या हृदयामध्यें एक शल्य राहिलें आहे तें आजमी अर्जुनास रथाखालीं पाडून उपटून टाकीन जसा सर्प श्वासोच्छ्वास टाकितो तसा अर्जुन श्वासोच्छ्वास टाकीत असतां सर्वकौरव त्यास अवलोकन करोत, अशी अर्जुनाची अवस्था केली असतां सकल कौरव सुखें करून गोधनें ग्रहण करोत, रथामध्यें उगीच स्तब्ध बसोत, अथवा माझें युद्ध अवलोकन करोत, असा विषय या अध्यायांत आहे.

४९. अध्याय एकुणपन्नासावा.- कृपाचार्य म्हणतात हे राधेयास्ते

काल तुझी युध्दाविषयीं क्रूर बुद्धी आहे खरी परंतु त्याचा परिणाम कसा होईल हें तूं अवलोकन करीत नाहींस माया अनेक प्रकारच्या आहेत,त्यांतच युद्ध हें पापिष्ट आहे असें पूर्वींचे पुरुष सांगतात, जसे पंडीतजन,रथ करणारानें उत्तम जरी रथ केला तरी तोच विजयास कारण होत नाहीं,असें म्हणतात, तसें तुझें हें भाषण केवळ विजयास कारण होईल असें मला वाटत नाहीं, अर्जुनाशीं प्रसंग करणें तो विचार करून केला पाहिजे, अर्जुन एकटा असून कौरवांशीं युध्दास प्राप्त झाला, एकट्या अर्जुनानेंच अग्नीस तृप्त केलें, सुभद्रेस हैरथ युध्दामध्यें कृष्णास आव्हान केलें, किरातरूपीजो भगवान शिव त्याशीं युध्द केलें इत्यादि अनेक प्रकारचे मोठमोठे पराक्रम एकट्यानेच केले तो हा अर्जुन आज शत्रूंस जिंकून कौरवांचें यश हरण करो, हे कर्णा तूं एकट्यानें पूर्वी कोणतें कर्म केलेंस.जसें प्रत्येक पांडवानीं आपल्या पराक्रमानें राजे जिंकून स्ववश केले तसा कर्णा तूं कोणता पराक्रम केलास तो सांग, जसा एखादा पुरूष तीक्ष्ण विषाचा क्रुध्द झालेल्या सर्पाचे दाढेमध्यें आपला हस्त उचलून प्रदेशिनी आंत घालण्याची इच्छा करितो तशी तूं पार्थाशीं युध्द करण्याची इच्छा करितोस, कोणी एक पुरुष आपल्या गळ्यामध्यें मोठी शिळा बांधोन दोन हस्तानीं समुद्र तरून जाण्याची इच्छा करीत असतां त्यामध्यें त्याचा पौरुषाचें जसें वर्णन होत नाहीं तसें तुझा पौरुषाचें वर्णन होणार नाहीं, जसा अकृतास्त्र कृतास्त्राशीं युध्द करण्याची इच्छा करितो तसा जो अर्जुनाशीं युध्द करण्याची इच्छा करील तो दुर्मती जाणावा, आम्हीं त्यांस कपटानें राज्यापासून भ्रष्ट केला होता तो हा आज तेरावर्षांनीं प्राप्त झालेला पाश विनिर्मुक्त सिंहासारिखा क्रोधानें आम्हांस निःशेष करील जसा एकांतीं कूपामध्यें अग्नि आच्छादित असतो तसा अर्जुन आच्छादित असतां आम्हीं अज्ञानें करून जर त्याजवर उड्या टाकूं तर आम्हांस मोठें भय प्राप्त होईल, बरें असो हा पार्थ आला आहे त्याच्याशीं आपणच सैन्याचा व्यूह करूं. द्रोणाचार्य, दुर्योधन, भीष्म, कर्ण, अश्वत्थामा तसेंच सर्व आम्हीं एकत्र होऊन अर्जुनाशीं संग्राम करूं कर्णा तूं एकटा सहास कर्म करूं नकोस, वज्रपाणी सारिखा सुत

निश्चय होऊन आलेला जो अर्जुन यास आपण षड्रथी एकत्र होऊन गेलों असतां कदाचित त्याच्याशीं साम्यता करूं परंतु एकएकांनीं पृथक् पृथक् संग्राम केला असतां जय प्राप्त होणार नाहीं आतां व्यूहाची रचना करावी आणि आपण संग्रामास सिद्ध व्हावें. असा विषय या अध्यायांत आहे.

५० अध्याय पन्नासावा.- अश्वत्थामा भाषण करितो, हे कर्णा जे शूर आहेत ते मोठमोठे बहूत संग्राम करून धन मिळवितात, व दुःसह शत्रूंचा पराजय करितात. परंतु ते आपलें पौरुष वर्णन करीत नाहींत. तूं तर अद्यापि गायी जिंकल्या नाहींस व आपल्या हस्तनापुराच्या शिवेमध्यें आला नाहींस, असें असतां कर्णा कां बडबड करितोस, अग्नि बोलल्यावांचून जसें दहन करितो, दिवाकर जसा भाषण केल्यावांचून प्रकाशित होतो, तसें शूर भाषण केल्यावांचून आपला पराक्रम दाखवितात. ज्या कर्मे करून द्रव्य प्राप्त व्हावें व जें केलें असतां दोष येत नाहींत अशीं ब्रम्हदेवानें चारी वर्णाचीं कर्मे सांगितलीं आहेत, ब्राम्हणानीं स्वतः आपण वेदाध्ययन करावें व दुसऱ्यास सांगावें, त्याणीं स्वतः यजन करावें व लोकांकडून करवावें. तसेंच दान करावें, व घ्यावें क्षत्रियानीं धनुष्याचा आश्रय करून यजन करावें वैश्यानीं कृष्यादिक कर्मानें वित्त संपादन करून वेदोक्त कर्मे ब्राम्हणाकडून करवावी शूद्रानें नित्य तिन्हीं वर्णाचें सेवन करावें, आणि वेतन न घेऊन रहावें अशा धर्मानें वागत असतां पृथ्वीचें राज्य जरी प्राप्त झालें तथापि आपला गुरु विगुण आहे तरी भाग्यवान पुरुष त्याचा सत्कार करितात. कर्णा तूं तर अन्यायानें पांडवांस जिंकून ते साधू सारिखे असतां त्यांची निंदा करितोस, हा दुर्योधन अधर्मानें पांडवास जिंकून आपल्यास कृतकृत्य मानितो, अरे व्याध जसें दुसऱ्याचें द्रव्य छद्मानें हरण करितो तसें तूं कपटानें पांडवांचें राज्य हरण करून आपल्यास कृतकृत मानितोस, अरे तूं अर्जुनाचा कोणच्या युध्दांत पराजय करून द्रव्य हरण केलेंस, नकुळ, सहदेव, युधिष्ठिर, व बलिश्रेष्ठ भीमसेन, कोणच्या युद्धप्रसंगीं तूं जिंकिलेस. व तूं इंद्रप्रस्थ केव्हां स्ववश केलेंस. व संग्रामामध्यें द्रौपदीस कधीं जिंकिलीस. हें दुष्ट कर्म करणाऱ्या, द्रौपदी एकवस्त्रा

वर रजस्वला असतां तूं तिला सभेंत आणिलीस, जसा एकादा पुरुष म्हणून लोभानें चंदन वृक्षाचें छेदन करितो तसें तूं पांडवांचें मूळ छिन्न केलेंस, महत्‌शब्द वाच्य सत्यसंज्ञक जें ब्रम्ह, त्यास श्रीकृष्ण म्हणतात, तें वेदवाक्य व ब्राम्हण हे पांडवास पूज्य आहेत, याचें ते कधींही उल्लंघन करीत नाहींत. असे पांडव महा श्रेष्ठ असतां तूं वेद विरुध्द द्यूत करून त्यास हरविलेंस येणें करून वेदाची व ब्राह्मणाची अमर्यादा झाली येणें करून श्रीकृष्ण परब्रम्ह जें पांडवांचा वंशाचें मूळ तेंच छिन्न केलेंत, अरे सूतपुत्रा जा काळीं तुम्ही द्यूत करीत होतां त्या काळीं हें द्यूत क्षयाचें मूळ आहे, असें तुम्हांस विदुरानें सांगितलें. त्याचें तूं स्मरण कर, असो, सर्व मनुष्यास शम असावा अशी मी इच्छा करितों परंतु द्रौपदीस जे तुम्ही क्लेश दिले आहेत त्याची क्षमा अर्जुन करणार नाहीं, धनंजय धृतराष्ट्र पुत्राचा क्षय करण्यास आला आहे हा अर्जुन वैराचा अंत करणारा असल्यामुळें आपल्यांतून कांहीं शेष ठेवणार नाहीं देव, गंधर्व, असूर, व राक्षस, यांचा भयें करून धनंजय युद्ध करणार नाहीं असें नाहीं. अरे हा क्रुद्ध झाला असतां आपला निःपात करील. वेगानें गरूड जसा वृक्षावर प्रहार करून जातो तसा हा अर्जुन तुमचावर प्रहार करील. अरे हा वीर्यानें तुमचा पेक्षां अधिक आहे युद्धाविषयीं जो कृष्णा सारिखा. ज्याचें धनुष्य इंद्राच्या धनुष्या सारिखें त्या पार्थानें कोण पूजन करणार नाहीं. व या सारिखा दुसरा कोण पुरुष आहे, पुत्राचा पाठी मागें गुरूस शिष्य प्रिय आहे. असें धर्मवेत्ते सांगतात, त्या निमित्तें करून द्रोणास अर्जुन प्रिय आहे. जसा तूं द्यूतादिकर्मास प्रवृत्त झालास तसा अर्जुनाशीं युद्ध करण्यास सिध्द हो. त्या तुझा मातुलानें दुष्ट द्यूत कसें केलें तसा आतां युध्द करो. हें अर्जुनाचें गांडीव धनुष्य कृत, त्रेता, द्वापार, कलि, इत्यादिकांनी चिन्हित जे पात्रा त्यांचा त्याग करणार नाहीं. गांडीव धनुष्यापासून सुटलेले जे बाण ते पर्वताचेंही विदारण करणारे असल्यामुळें मध्यें राहणारे नाहींत ते बाण ज्यावर पडतील त्याचा निःशेष करितील, अंतक, वायु, मृत्यु, अग्नी, वडवाग्नी, हे कांहीं तरी शेष ठेवितील. परंतु धनंजय क्रुध्द झाला असतां कांहीं शेष ठेवणार नाहीं, असो जसे तूं पूर्वीं मातुला

सह वर्तमान सभेंत पांडवाशीं द्युत केलेंस तसा तूं शकुनी संरक्षित युद्ध कर. मी अर्जुनाशीं युद्ध करणार नाहीं. जर गाईचे शोधार्थ विराटराजा येईल तर आह्मी त्याशीं मात्र युद्ध करूं असा विषय या अध्यायांत आहे.

५१ अध्याय एकावन्नावा:- भीष्म भाषण करितात हे राजा, अश्वत्थामा व कृपाचार्य हे उत्तम दृष्टीनें पाहतात, कर्णमात्र केवळ युद्धाची इच्छा करितो. अभिज्ञ पुरुषानें आपल्या आचार्यापुढें असें तिरस्काररूप भाषण करूं नये देशकाल पाहून युद्ध करावें असें मला वाटतें, तुझे शत्रू पांच पांडव यांचा उदयकाळीं कोण पंडित मोह पावणार नाहीं. हे दुर्योधना! धर्मवेत्ते जन तेही स्वार्थाविषयीं मोह पावतात, यास्तव जर तुला माझें भाषण रूचत असेल तर सांगतो ऐक. कर्ण तुला जें बोलला तें सर्व तुझ्या तेजोवृद्धीस कारण आहे, परंतु आतां हें महत्कार्य उपस्थित झालें आहे यास्तव आचार्यपुत्र अश्वत्थामा क्षमा करो, कौंतेय प्राप्त झाला आहे त्यांपेक्षां आतां हा काल विरोधाचा नाहीं, तूं द्रोणाचार्य व कृपाचार्य यांस दोनीं क्षमा करावी असें बोलून द्रोणाचार्योशीं बोलतात जशी आदित्याचे ठाईं प्रभाव चंद्राचे ठाईं लक्ष्मी तशी तुमचीही कृतास्त्रता जात नाहीं. ब्राह्मण्य व ब्रह्मास्त्र हे तुमचे ठाईं प्रतिष्ठीत आहेत. चार वेद एकिकडे व क्षत्रियकर्म एकिकडे असे बहुत आहेत, कोणास वेद येतात, कोणी क्षात्र धर्मात निपुण असतो, परंतु वेद व क्षात्र धर्म हे उभयतां एकत्र सपुत्र भारताचार्यावांचून अन्यत्र श्रवणांत येत नाहींत. वेदांत, शास्त्रें, पुराणें, इतिहास हे सर्व जाणण्याविषयीं जामदग्न्य परशरामावांचून द्रोणापेक्षां दुसरा कोणी नाहीं, ब्रह्मास्त्र व वेद हे सर्व अन्यत्र कोठेंही नाहींत. तस्मात् आचार्यपुत्राची प्रार्थना करावी. बलानें इंद्रा समान जो अर्जुन तो आला आहे, त्याशीं युद्ध करणें तें सर्वांनीं मिळोन केलें पाहिजे, ज्ञानी पुरुषानीं जी सैन्याची व्यसनें सांगितलीं आहेत, त्या मध्यें मुख्य भेद. हें व्यसन अतिपापिष्ठ आहे; असें भीष्माचें भाषण ऐकून अश्वत्थामा बोलतो हे पुरुषश्रेष्ठा, तूं जें भाषण केलेंस तें आम्हांस मान्य आहे, आचार्यास बहूत संतोष होऊन त्याणीं अर्जुनाच्या गुणाची स्तुती केली यांत त्यांचा दोष काय आहे? शत्रु जर गुणी आहे तर

त्याचे गुण, गुरु जर दोषी आहे तर त्याचे दोष वर्णन करावे. पुत्र व शिष्य हे कसेही असोत त्यांचें जेणें करून हित होईल त्याविषयीं यत्न करीत असावें, असें भाषण श्रवण करून दुर्योधन द्रोणाप्रत बोलतो, हे आचार्य हा अश्वत्थामा आमची क्षमा करून शांत होवो. गुरु जर आपल्यावर संतुष्ट आहे तर आपलें कार्य सिद्धीस जातें असें भाषण करून दुर्योधन, कर्ण, भीष्म, कृपाचार्य, यांचे समक्ष द्रोणापाशीं क्षमा मागता झाला, द्रोणाचार्य बोलतो भीष्मानीं भाषण केलें कीं, प्रथम भेद होऊं देऊं नये, तसेंच मला इष्ट आहे. आतां जेणे करून दुर्योधनास व त्याचे सैन्यास अवलोकन करणार नाहीं व वनवास निवृत्त झाल्या नंतरच अर्जुन येथें आला आहे तो गोधनें घेऊन आईल. आपली उपेक्षा करणार नाहीं कदाचित् आम्हीं युद्धास सिद्ध झालों तर तो सर्वांचा अंत न करून धृतराष्ट्र पुत्राशीं संगत होणार नाहीं असा उपाय कर. हे गांगेया पूर्वी दुर्योधनानें तुम्हांशीं जें भाषण केलें त्याचा विचार करून जें सत्य असेल तें सांगण्यास योग्य आहेस असा वि० या अ० आहे.

५२ अध्याय बावन:-भीष्म भाषण करितात, कला, काष्ठा, मुहूर्त, दिवस, अर्धमास, मास, नक्षत्रें, ग्रह, ऋतु, आणि संवत्सर, अशा काल विभागें करून हें कालचक्र निरंतर चालतें, यांत कला, काष्ठाचा व नक्षत्रांचा व्यतिक्रम करून पांचपांच वर्षांनी दोन अधिक मास येतात, अशा कालमानानें वर्षांची गणना केली असतां पांडवांचीं तेरा वर्षे पूर्ण होऊन पांच मास व बारा दिवस प्रतिज्ञेपेक्षां जास्त होतात, चांद्र, सावन, आणि सौर, अशीं तीन प्रकारचीं संवत्सरांचीं मानें आहेत, चोवीस पक्ष अतिक्रांत झाले असतां चांद्र संवत्सर होतो, त्याचे दिवस एकंदर तीनशें चोपन्न होतात, द्यूतप्रतिज्ञाकालीं संवत्सरमानाचा निश्चय न केल्यामुळें पांडवांनीं चांद्र संवत्सरमान घेऊन तेरा वर्षांत पांच मास आणि बारा दिवस अधिक आणून आपली प्रतिज्ञा पूर्ण केली, असें स्पष्ट दिसतें. विजया दशमीचे दिवशीं पांडव द्यूतांत पराजित झाले, लोक फार करून विजया दशमीचे दिवशीं द्यूतक्रीडा करितात, हा द्यूताचा काल आहे, कौरव नरशीप्रामध्यें गोग्रहणार्थ प्रवृत्त झाले, पुढें विजया दशमी येईल तेव्हां पांडवांचीं तेरा वर्षें पूर्ण

होतील अशी दुर्योधनाची आज्ञा होती परंतु पांडवानीं चांद्रमान ग्रहण केल्यानें त्याची आज्ञा नष्ट झाली, पांडवांनीं विजयादशमीचे पूर्वीच पांच मास व द्वादश दिवस प्रगट व्हावें परंतु प्रतिज्ञेवर कांहीं दिवस अतिक्रांत करून येत्रारव कृष्ण सप्तमीस प्रगट झाले पांडव सर्वही धर्मार्थे सर्वार्थे निपूण ज्यांचा राजा युधिष्ठिर तेकां धर्माचा अतिक्रम करतील. ते कुंती पुत्र तर अलुब्ध दुष्कर्म करणारे, केवळ अनुपायें करून राज्याची इच्छा करणार नाहींत, तेव्हां कौरवानीं त्यांची निर्भत्सना केली त्या काळींच ते आपला पराक्रम करण्यास समर्थ होते, परंतु धर्मपाशानें बद्ध झाल्यामुळें क्षत्रिय व्रतापासून चंचळ झाले नाहींत, जो कोणी हा अर्जुन अनृत आहे असें बोलेल तो पराभव पावेल, पांडव मरण इच्छितील परंतु कधींही अनृत करण्यास इच्छिणार नाहींत, जाकाळीं जे मिळणार तें मिळेल, असें जाणोन पांडव आपला धर्म त्याग करणार नाहींत. असी तो सर्व शस्त्रधारण करणाऱ्यां मध्यें श्रेष्ठ, आतां आपण युध्द करून लोकांमध्यें सत्पुरुषानीं आचरण केलेला जो कल्याण मार्ग तो सेवन करा, म्हणजे तुमचा अर्थ शत्रूच्या हस्तगत होणार नाहीं. हे दुर्योधना, धनंजय आला असतां त्यापुढें कोणाची इष्ट सिध्दी झालेली मी पाहिली नाहीं. संग्राम प्रवृत्त झाला म्हणजे भाव, अभाव, जय, पराजय, अवश्य एका पुरुषास प्राप्त होतात यांत संशय नाहीं, हा धनंजय आला आहे, यास्तव धर्मार्थ युक्त व युध्दास उचित असें शीघ्र कर्म करावें. भीष्माचें भाषण ऐकून दुर्योधन बोलतो, मी पांडवास राज्य देणार नाहीं जें युध्दोपचारी कर्म असेल तें शीघ्र करावें, असें ऐकून पुनः भीष्म बोलतात, हे कुरुनंदना माझे मनांत एक कल्पना आली आहे ती मी तुला सांगतों जेणें करून तुझें कल्याण होईल तें भाषण करीन, आतां आपले सैन्याचे चार भाग करून एक विभाग घेऊन तूं सत्वर हस्तनापुरास जा, दुसरा सेनेचा चतुर्भाग गायी घेऊन गमन करो, मी, द्रोण, कर्ण, अश्वत्थामा, कृपाचार्य हे सर्व कृत निश्चय होऊन आलेला जो बीभत्सू या सह वर्तमान युध्द करूं. हा मत्स्यराज अथवा शतक्रतु इंद्र आले.

त्रा असो तरी मी त्याचें निवारण करीन असें भीष्माचें भाषण सर्वांस रु-
चलें असतां दुर्योधन सैन्याचा चतुर्थांश ग्रहण करून हस्तनापुरीनि
घाला, इकडे भीष्म दुर्योधनास पाठविल्यावर भाषण करूं लागले कीं,
हे आचार्य तुम्ही मध्यभागीं उभें राहावें, अश्वत्थामा सव्य भागीं उभारा
हील, शारद्वत कृपाचार्य दक्षण पार्श्वभागाचें रक्षण करो, सूतपुत्र कर्ण
सर्वांच्या अग्रभागीं कवच बद्ध होत्साता उभारा हो, मी सर्व सैन्याच्या पश्चा
त्भाग रक्षण करीन. असा विषय या अध्यायांत आहे.

५३. अध्यायत्रेपन्नावा.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया,
कौरवांकडील सैनिक व्यूह रचना करीत आहेत तों अर्जुन रथाचा घो
ष करीत आला असतां ध्वजाचें आग्र सकल सैनिकानीं अवलोकन केलें
आणि रथाचा शब्द व गांडीव धनुष्याचा टणत्कार श्रवण केलेला पाहून व
हा गांडीव धन्वा आला आहे असें जाणून द्रोणाचार्य बोलतात अरे हें
पांडवाचें ध्वजाग्र पहा कसें दुरून प्रकाशित दिसतें, रथाचा शब्द ऐका,
वानर पहा कसा वारंवार शब्द करीत आहे, हा रथी श्रेष्ठ रथा मध्यें बसून
गांडीव धनुष्याचें आकर्षण करितो, हे दोन बाण माझ्या पादावर येऊन प-
तीत झाले दोन कर्णास स्पर्श करून गेले त्या बाणीं करून पंडुपुत्रानें मला
सूचविलें कीं, मी वनामध्यें वास करून अतिमानुष कर्मे संपादिलीं, यास्तव
मी आतां आपणास अभिवादन करितों. आज फार दिवसानीं लक्ष्मीनें
पांडुपुत्र अवलोकन केला जसा स्रुवे करून आज्यसिक्त अग्नी शोभतो
तसा हा रथारूढ होऊन धनुष्यबाण धारण केलेला पंडुपुत्र अर्जुन शोभतो
या प्रकारें द्रोणाचार्य सकल सैनिकांप्रत भाषण करीत असतां इकडे अ
र्जुन आपल्या सारथ्यास बोलतो, हे सारथ्या या सैनिकाडे मला इषुपात
कर्तव्य आहे यास्तव तिकडे रथाचे घोडे फिरीव, हें सैन्य सकल अवलो
कन करितों, यामध्यें कुरुकुलाधम दुर्योधन कोठें आहे, याच्या मूर्ध्नीवर
जाऊन पडेन, नंतर द्रोण, अश्वत्थामा, भीष्म, कृपाचार्य, व कर्ण हे सकल
योद्धे, आहेत त्यांचा पराभव करीन, या सैन्यांत दुर्योधन राजा जापेक्षां को-
ठें अवलोकनांत येत नाहीं त्यापेक्षां मला असें वाटतें कीं तो गायीग्रहण

करून दक्षण मार्गानें आपला जीव रक्षण करित चालला आहे, यास्तवहे वैराटे, सैन्य टाकून सुयोधन गेला असेल तिकडे गमन कर, निरामिषयुद्ध चांगलें नाहीं, सुयोधनास जिंकून गायी घेऊन जाऊं, या प्रकारें अर्जुनानें भाषण केल्यावर विराटपुत्रानें जिकडे तो कुरुश्रेष्ठ होता तिकडे रथाचे अश्व फिरविले त्याकाळीं अर्जुन दुर्योधनाकडे गेला तेव्हां त्याचा अभिप्राय जाणून कृपाचार्य बोलतात आतां हा अर्जुन आपला रथ दुर्योधनाच्या सन्निध नेल्यावांचून राहात नाहीं यास्तव त्वरेनें त्याच्या पार्ष्णिभागींआपण जाऊन अत्यंत क्रोधाभत पावलेला जो अर्जुन याजबरोबर एकटा दुर्योधन युद्ध करण्यास समर्थ होणार नाहीं, एक सहस्राक्ष किंवा देवकीसुत कृष्ण अथवा सपुत्र आचार्यांशिवाय पार्थाशीं युद्ध करण्यास इतरांची शक्ती नाहीं, आतां गायी ग्रहण करून आपल्यास काय कर्तव्य आहे, अथवा बहूत द्रव्य जरी प्राप्त होत आहे तथापि त्यास काय करावें, पार्थजलांचेठाई दुर्योधन रूपनौका आज बुडत्ये, याचे रक्षण पूर्वी करावें असा कृपाचार्य विचार करीत आहेत, इतक्यांत अर्जुनें शत्रूंची सेना शरानीं व्याप्त करून टाकिली त्याकाळीं सकल सैनिक व्याप्त झाले. बाणावांचून भूमि किंवा अंतरिक्ष कांहीं दिसेनासें झालें असें योध्यानी पाहून अंतःकर्णपूर्वक पार्थाचाशीघ्रत्वाचें वर्णन केलें. नंतर अर्जुनानें शत्रूंचा शरीरावर रोमांच उत्पन्न करण्यासारिखा शंखाचा नाद करून धनुष्याचा टणत्कार करीत ध्वजस्तंभावरील भूतासही नाद करण्यास लाविलें त्याकाळीं रथ, गांडीव, याच्या घोषानें पृथ्वी कंपायमान झाली, अमानुष जीं भूतें व ध्वजवाजी यांचे शब्द ऐकून सकल गायी ऊर्ध्व पुच्छें करून हंबारीत दक्षिण दिशे पासून पुनः माघाऱ्या फिरल्या. असा विषय या अध्यायांत आहे.

५४ अध्याय चौपन्नावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ जो अर्जुन याणें शत्रुसैन्याचा पराभव करून गायी माघाऱ्या फिरविल्या आणि पुनः संग्राम करण्याच्या इच्छेनें दुर्योधनास न्मुख आला, त्याकाळीं कुरुवीरानीं जाणलें कीं ह्या गायी आतां मत्स्यनगरास गेल्याव अर्जुनकृत कार्य होईल तें न व्हावा म्हणून सकल योद्धे अर्जुनाशीं युद्धास माघ

झाले असतां त्यांस अवलोकन करून अर्जुन विराट पुत्राप्रत बोलतो हे सारथ्या, परम वेगानें शत्रूसैन्य माझ्याकडे येत आहे यास्तव माझे अश्व त्या सैन्याचे सन्निध लौकर ने, हें कौरवाचें सैन्य बहुत ध्वजानीं युक्त अ सूब व्यूह रचित कसें दिसतें तें पहा, असें प्रथम भाषण करून पुनः उत्तरा प्रत भाषण करितो, हे उत्तरा, हे विराटपुत्रा, जसा गज गजावर जातो तसा दुरात्मा सूतपुत्र कर्ण माझ्याशीं युद्ध करण्यास इच्छित आहे यास्तव माझा रथ पूर्वी त्याजकडे ने. दुर्योधनाचा आश्रयानें बहूत गर्व जास झालाआहे, त्याच्याशीं मी युध्द करितों असें ऐकून विराटपुत्र उत्तरानें सुवर्णकक्षा युक्त, मोठ्या वायुसारखा ज्याचा वेग आणि बृहत् अशा रथांचा अश्वांनीं सकल सैन्याचा नाश करीत संग्रामामध्यें अर्जुनास नेला, त्याकाळीं अर्जुन कर्णावर येतो आहे असें जाणून चित्रसेन, संग्रामजित्, शत्रुसह, जय इत्यादिक योद्धे कर्णाचे रक्षणार्थ आले असतां पुरुषश्रेष्ठ अर्जुन धनुष्याच्या तेजानें व बाणाच्या तापानें कौरवश्रेष्ठांतील महान् व भयंकर रथींच्या समुदायास पाहतांच दहन करिता झाला, असें तुमुलयुद्ध प्रवृत्त झालें असतां चित्रसेनादिक योद्धे विशिख व विपाट बाणांची वृष्टी करूं लागले, तसाच विकर्णानें रथारूढ होऊन बाणांची भयंकर वृष्टि अर्जुनावर केली त्याकाळीं भयंकरकर्म करणारा जो अर्जुन यानें विकर्णाचें धनुष्य दृढ प्रत्येचनेंयुक्त होतें तें तोडून पृथ्वीवर पाडिलें आणिध्वजही तोडिला असें पार्थाचें कर्म पाहून अतिरथी विकर्ण परमक्रोधायमान होऊन अर्जुनावर शरांचावर्षाव करूं लागला तेणें करून अर्जुन अत्यंत विद्ध होऊन कौरवांच्या सैन्यांत संचार करीत त्यानें पांच बाणानीं विकर्णास व सत्नासही अत्यंत पीडित केलें तेणें करून सकल सैनिक भग्न होत्साते महावनांतील द्रुम वायुच्या योगें जसे कंपित होतात तसे त्या युद्धामध्यें कौरवांकडील योद्धे गतासू होऊन पृथिवीवर पडले. जसा ग्रीष्म ऋतुच्या अंतीं अग्नी वनास दहन करीत दाही दिशेस जातो तसा गांडीवधन्वा पुरुषश्रेष्ठ पार्थ युद्धामध्यें कौरवांकडील योध्यांप्रत विशीर्ण करिता झाला. पार्थ संग्रामामध्यें रथें करून शत्रुसैन्यांस उडवि

त असतां कर्णाचा बंधूनें प्रथम अश्व मारून नंतर त्याचे शीर तोडून पृ-थ्वीवर पाडलें, हें पाहून कर्ण अर्जुनावर धांवला आणि त्यानें बाणांनीं अर्जुनास ताडण करून त्याचे घोडे आणि उत्तर या प्रत ताडण केलें अ-सतां जसा चित्रविचित्र पक्षयुक्त गरुड एकाएकीं सर्पावर झडप घाल तो तसा अर्जुन आपल्या सन्मुख प्राप्त झालेल्या कर्णातें पाहून त्यावर धां-वला, ते उभयतां महावीर व बली कर्ण आणि अर्जुन एकत्र प्राप्त झालेले कौ-रवांकडील योध्यानीं पाहून त्याचें युद्ध पाहण्याकरितां स्वस्थ उभे राहिले त्याकाळीं अर्जुनास अत्यंत क्रोध येऊन अपराधी कर्णास अश्व, सारथी या सहवर्तमान बाणवृष्टीनें आच्छादित केलें नंतर भिष्मादिक योद्धे रथाश्व गजासहवर्तमान विद्ध करून ते विकीर्ण रथ झाले असतां बाणेंकरून आच्छादित केलें त्याकाळीं अर्जुनाचा बाहूपासून निर्मुक्त झालेले बाण-कर्णानें आपल्या बाणेंकरून दूर केल्यावर स्फुलिंगयुक्त अग्निजसा शो भतो तसा धनुष्यबाण धारण केलेला कर्ण अर्जुनाचा अग्रभागीं शोभूं लागला कौरवाकडील सकल योद्धे वैकर्तनाचें स्तवन करूं लागले कोणी भेरी, शंख, पणव, इत्यादिकांचे शब्द करूं लागले, कोणी हस्ताचे तल शब्द करूं लागले, कोणी धनुष्याच्या दोरीचे टणत्कार करून वैकर्तन कर्णाचा परम सत्कार करीत असतां गांडीव धनुष्याचा टणत्कार शब्द करणाऱ्या किरी-टीस पाहून कर्णानेंही मोठ्यानें नाद केला त्याकाळीं अर्जुनानें कर्णासम र्दन करून त्याचे घोडे सारथी रथ याजवर बहुत बाणांची वृष्टी केली. त्या स पिडीत करून कृपाचार्य व द्रोणाचार्य यांजकडे पाहिलें नंतर कर्णानें अर्जु नाचा रथाचे अश्व व सारथी यांस बाणानीं वेध करितांच अर्जुन कर्णाच्या अग्रभागीं प्राप्त होऊन प्रथम अजिम्हक बाणांची वृष्टी करून पुढें अस्त्रवृ ष्टी करिता झाला नंतर पार्थानें आकर्ण धनुष्य आकृष्ट करून भल्लाकार निशीत बाणानीं सूतपुत्राचीं गात्रें विद्ध करून टाकिलीं आणि गांडीव निर्मु क्त अशनीसमान बाणांनीं कर्णाचे बाहू, शीर, ललाट, ग्रीवा, गुल्फ व इतर अंगें मर्दित केलीं असतां युद्धांत जिंकिलेला गज जसा पलायन करितो तसा कर्ण पार्थानिर्मुक्त शरवृष्टीनें बहुत व्यास झालेला आणि तो संग्रामाच्या

त्याग करून पलायन करिता झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

५५. अध्याय पंचावन्नावा :- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कर्ण पळाल्यावर दुर्योधन प्रभृति योद्धे आपलें सैन्य घेऊन पार्थावर बाणांची वृष्टि करीत असतां जशी समुद्राची वेला समुद्राचा वेग धारण करिते तसा पार्थानें, प्राप्त झालेल्या कौरवांचा सैन्याचा वेग बाणानें धारण केला आणि किंचित् हास्य करून तो दिव्यास्त्राचा प्रयोग करीत करीत योध्यांच्या सन्निध आला. जसा आदित्य आपल्या किरणाच्या योगें मेदिनीस आच्छादन करितो, तसा पार्थ आपल्या गांडिवनिर्मुक्त शरें करून दाही दिशांस आच्छादन करित असतां योध्यांचीं कवचादिक विद्ध झाल्यावांचून दोन अंगुलेंही राहिलीं नाहींत त्या काळीं पार्थाचे दिव्यास्त्र प्रयोग, उत्तराचें सारथ्य चातुर्य पाहून कौरवांकडील योद्धे पार्थाचा पराक्रम व वेग यांची प्रशंसा करूं लागले जसा कालाग्नी प्रजेचें दहन करितो तसा प्रज्वलित अग्निसारिखा पार्थास पाहण्यास शत्रू असमर्थ झाले. जशी सुवर्णचंपकाचीं पुष्पें गलित झालेलीं वायूच्या योगें पृथ्वीवर न पडतां आकाशांत जशीं जातात तशा योध्यांच्या पताका, छत्रें, अर्जुनाचा बाणें करून त्रुटित होत्सात्या आकाशांत उडालेल्या दिसूं लागल्या त्या संधीस कौरवांचे घोडे आपल्या सेनेच्या त्रासानें त्रस्त होऊन दाही दिशेस पलायन करूं लागले. युगांत काळीं स्थावर जंगमात्मक जगतातें काल वशें करून अग्नी जसा निःशेष जाळितो तसा अर्जुन शत्रुसमुदायास जाळूं लागला त्या काळीं सर्व शस्त्रास्त्रांची तेजें, धनुष्याचा नाद, ध्वजस्थभूतांचा शब्द, वानरांची भयंकर गर्जना, शंखाचा नाद येणें करून अर्जुनानें दुर्योधनाचे सकल सेन्यास भय उत्पन्न केलें, ज्या काळीं अर्जुन युद्धास आला त्या काळीं शत्रुंनीं अर्जुनास पाहून अवलोकन मात्रें करून कांहीं योध्यांचा शक्तिपात झाला. अर्जुनाचा रथ कोणच्या स्थळीं आहे असें निश्चय परिज्ञान कौरवांकडील योध्यांस होईनासें झालें या प्रकारें युद्ध करितां करितां अर्जुनानें बहुत रथी परलोकास नेले, असें अर्जुनानें मोठें तुमुल युद्ध करून शत्रु सैन्य परलोकीं नेलें असतां अनंत ज्याचें शरीर, सहस्र जाच्या फणा. असा शेष महार्णवांत जसा

जसा क्रीडा करितो तसा शत्रू सैन्यरूप महार्णवांमध्यें अर्जुन क्रीडा करूं लागला.जसें अलात चक्र दाही दिशांस एक सारिखें एक समया वच्छेदानें दिसतें तसा अर्जुनांचा रथ दाही दिशांस फिरत होता अर्जुनाच्या धनुष्या·च्या शब्दासारिखा शब्द प्राणिमात्रानीं कधींहि ऐकिला नाहीं,सूर्यकिर्णांच्या योगें मेघ जसे आकाशांत दिसतात,तसें रण भूमीवर अत्यांतरानें स्थित झालेले गज अर्जुनाच्या बाणानीं व्याप्त झालेले दिसूं लागले,जसे नेत्र दूरवअ दृश्य पदार्थांचें ग्रहण करीत नाहीं तसे पार्थाचे बाण अलक्ष्याचा त्याग करून लक्ष्याचे ठाईं पतन पावले हजारों गजांचा समुदाय एका देवनामध्यें गेला असतां ते जसे वन भंग करून टाकितात.तसें अर्जुनाच्या रथानें शत्रुसैन्याचें मर्दन केलें.त्याकाळीं अर्जुनानें ताडित सकळ सैनिक असें म्हणूं लागले कीं अ·र्जुनाला जय मिळण्याच्या इच्छेनें सर्व अमरासह वर्तमान इंद्रच आम्हांस आज मारून टाकितो यांत संशय नाहीं.हें पार्थाचें युद्ध होत आहे यास दु·सऱ्याची उपमा नाहीं आज पार्थानें आम्हीं हत झालों असतां दुसरे कोठें जावें? जशी वीह्या दिकांचीं कणसें अनुक्रमें करून तोडिलीं असतां त्या औषधी नष्ट झालेल्या दिसतात तशी अर्जुनानें शत्रुंचीं वीर्यें नष्ट केलीं. अर्जुन हाच कोणी एका युद्याच्या योगानें शत्रुसैन्य परमनाशातें पावून त्याच्या शरीरापासून ज्या रक्त धारा उत्पन्न झाल्या तेणें करून सकल पृथ्वी रक्तमय होऊन गेली असतां तीजपासून लोहितमय पासूं वायूच्या योगें उडून तेणें करून सूर्याचे रश्मी हि लोहितमय दिसूं लागले.सायंकाळीं पृथ्वीच्या रज संबंधानें आकाश व सूर्य लोहित दिसूं लागले तेव्हां सूर्यास्ताचा समय जरी आला तथापि अर्जुनानें युद्धापासून परावृत्त न होतां त्या सर्व धनुर्धारी वीरांस दिव्यास्त्रानीं ताडित केलें तें असें कीं द्रोणाचार्यास त्र्याहात्तर,दुःसहास दाहा,द्रोणपुत्रास आठ,दुःशासनास बारा,कृपाचार्यास तीन,भीष्मास साठ,दुर्योधनास शंभर बाणें करून प्रहार केला आणि कर्णाचा कर्णास कर्णि बाणानीं ताडित केलें त्याकाळीं महा धनुर्धारी शस्त्रास्त्र वेत्ता कर्ण विद्ध झाला आणि त्याचा रथ,सूत व अश्व नष्ट झालें असतां कौरव सैन्य भग्न झालें,तें अवलोकन करून पार्थ रणामध्यें स्तब्ध उभा राहिला त्याचा अभिप्राय जाणोन विराटपुत्र भाषण करितो,हे जिष्णो, आतां

माझ्या सहित या रथावर बसून आपण कोणत्या सैन्याकडे जातां तें सांगित लें असतां तुम्हांस हव र्तमान मी तेथें जाईन असें उत्तराचें भाषण ऐकून अ. र्जुन बोलतो हे उत्तरा, ज्याच्या रथास लोहितवर्ण अश्व असून व्याघ्रचर्मा नें परिवेष्टित आहे आणि ज्याच्या पताका नील वर्णाच्या दिसतात तो रथ पाहिलासना? तो कृपाचार्यांचा रथ आहे, यास्तव तेथें माझा रथ नें म्हणजे कृपाचार्यांस मी आपलें शीघ्रास्त्रत्व दाखवितों, व ज्याच्या ध्वजावर सुवर्ण मय कमंडलू दिसतो तो द्रोणाचार्य सर्वशस्त्र धाऱ्यां मध्यें मला मान्य आहे या महावीरास प्रदक्षिणा करून तेथेंच उभे राहूं, इतकाच आमचा शिष्यां. चा सनातन धर्म आहे, द्रोणाचार्य जर प्रथम माझ्या शरीरावर प्रहार करी ल तर मी त्याच्या शरीरावर प्रहार करीन तेणें करून त्यास राग येणार नाहीं द्रोणाचार्यांच्या कांहीं सन्निध असून ज्याचे ध्वजावर कांहीं धनुष्याचें चि. न्ह दिसतें तो हा महारथी अश्वत्थामा आहे, हाही महारथ्यामध्यें श्रेष्ठ अ सून मला मान्य आहे, याचे सन्निध माझा रथ नें. हा तृतिय सैन्या मध्यें स्थि. त असून ज्याणें सूवर्णाचें कवच धारण केलें आहे, ज्याचे ध्वजावर हेमकेतन ना ग आहे तो धृतराष्ट्राचा पुत्र सुयोधन. याला युध्दा विषयीं मोठा अभिमान अ. सून मोठा बलवान् आहे, याच्या सन्मुख माझा रथ नें, हा दुर्योधन राजा सक ल द्रोणाचार्यांच्या शिष्यामध्यें शीघ्रास्त्र जाणण्या विषयीं श्रेष्ठ आहे, यास मी आपलें शीघ्रास्त्रत्व दाखवितों सुंदर नागकक्षा ज्याचे ध्वजाग्राचे ठाईं दि. सतें तो हा वैकर्तन कर्ण तुला विदितच आहे हा आपले रथामध्यें बसून निरंतर माझ्याशीं स्पर्धा करितो तिकडे माझा रथ नें. ही पाहा ज्याची नीलप ताका दिसते, ज्याचा केतूवर सुवर्णमय मंडलें दिसतात, हस्तत्राण ज्याणें धारण केलेलें, ज्याचा श्रेष्ठ रथाचा ठाईं तारार्कचित्र ध्वज, ज्याच्या शिरप्रदे शीं अतिशयस्वच्छ पांडुरवर्णछत्र शोभतें, चंद्रसूर्या सारिखें ज्याचें तेज असे कवच, सुवर्णाचें शिरस्त्राण ज्याणें धारण केलेलें साक्षात् सूर्यच काय अ सा देदीप्यमान माझ्या मनास ज्याणें संताप उत्पन्न केला यास शांतनव भी ष्माचार्य म्हणतात, हा सर्वांचा पिता महराज्यश्री करून समृद्ध झालेला, हा दुर्योधनास केवळ अत्यंत वश आहे याजकडे पश्चात् गमन करूं. म्हण

जे हा आपल्यास विघ्न करणार नाहीं, यास्तव याच्याशीं युद्ध कर्तव्य तें मग करूं. प्रथम कृपाचार्य आपल्याशीं युद्धास सिद्ध झाला आहे, याजकडे सत्वर माझा रथ नेऊन उभा कर असें अर्जुनानें उत्तरास सांगतांच उत्तरानें अर्जुनाचा रथ कृपाचार्याकडे नेला. असा विषय या अध्यायांत आहे.

५६. अध्याय छपन्नावा.— वैशंपायन सांगतात हे जन्मेजया, अर्जुन युद्धास येणार हें कौरवांकडील योध्यानीं जाणून मावृट् कालीं मंदमारुताच्या योगें मेघ जसे एकत्र जमतात तसे ते योध्दे एकत्र जमले असतां आपआपल्या गजाश्वरूढ होऊन त्या सैन्यांत आले. हा अपूर्व शत्रूसमागम पाहून समस्त सुरगणासह वर्तमान इंद्र दिव्य विमानामध्यें बसून आकाशांत प्राप्त झाला. त्या योगें अभ्रनिर्मुक्त ग्रहमंडळ जसें शोभतें तसें देव, यक्ष, गंधर्व, महोरग, याणीं व्याप्त आकाश शोभूं लागलें. या सकळ विमानांमध्यें इंद्राचें विमान सर्व रत्नानीं विभूषित, यथेच्छ गमन करणारें दिव्य कोट्यावधी सुवर्ण व हिरण्य स्तंभानीं उपयुक्त असें फारच शोभूं लागलें व कौरवांचा युध्दसमारंभ फारच उत्तम होणार तो अवलोकन करण्याकरितां सकल देव, सिध्द, चारण, महर्षींचे समुदाय प्राप्त झाले. देवाच्या दिव्य माल्य संबंधी सुगंध, वसंतऋतु प्रमाणें वायुनें प्राप्त झालेले ग्रहण करून त्याकाळीं सर्वत्रांस बहुत आनंद झाला. पृथ्वी संबंधी रज शांत होऊन गेलें. देवांच्या तेजानें सकल प्रदेश प्रकाशित होऊन त्यांच्या विमानानीं आकाश चित्रविचित्र रूपानें अलंकृत झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

५७. अध्याय सत्तावन्नावा.— वैशंपायन सांगता हे जन्मेजया, कौरवांची व्यूहयुक्त सेना पार्थानें पाहून विराटपुत्रास बोलतो, हे उत्तरा जांबुनदमय वेदीजाचा ध्वजाचे ठाईं दिसतें त्याचे दक्षिणभागीं कृपाचार्य शारद्वत आहेत तिकडे मलानें असें अर्जुनाचें भाषण ऐकून उत्तर वायू वेगानें अश्वातें प्रेरणा करून कौरवांच्या सैन्यांत गेला आणि कृपाचार्यास प्रदक्षिणा करून त्यांच्या अग्रभागीं रथासहवर्तमान उभा राहिला. त्या काळीं अर्जुनानें देवदत्त नामक शंखाचा मोठा शब्द करून

आपलें नाम सकळांस विदीत केलें तो नाद सकल कौरवांकडील योध्यांनीं ऐकून त्यांनीं अर्जुनाची प्रशंसा केली शंखाच्या नादानें योध्यांचीं हृदयें विदीर्ण होऊन तो शब्द आकाशगामी झाला इतक्यांत युद्धामध्यें अत्यंत दुर्जय जो कृपाचार्य याणें तो पर्वताचे विदारण करणारा महा भयंकर अर्जुनाचा शंखाचा नाद ऐकून त्या नादास प्रतिस्पर्धी अशा शंखाचा आपणही नाद केला. त्या नादानें तीन लोक आवृत्त होऊन गेले तसाच धनुष्याचाही टणत्कार शब्द केला. या प्रकारें उभयतां महारथी सूर्यासारिखे तेजस्वी युद्धास उद्युक्त झाले नंतर कृपाचार्यानें मर्मभेदी दहा बाणें करून पार्थास ताडण केलें असतां पार्थानेंही गांडीव धनुष्याचें आकर्षण करून नाराच असे सहस्रावधी बाण कृपाचार्यावर टाकिले असतां कृपाचार्यानें त्यांचें मध्येंच छेदन करून टाकिलें, तेणें करून पार्थानें असंख्यांक बाणानीं दिशा आच्छादित करून जसें आकाश एक छाय दिसतें तशा सर्व दिशा दिसूं लागल्या नंतर कृपाचार्यास शतशः बाणें करून प्रच्छादित केलें आणि चार बाणें करून अश्वांस ताडिन केलें असतां ते अश्व बाणानीं विद्ध झालेले एकाएकीं आचार्यासह वर्तमान रथास ग्रहण करून उधळून गेले तें पार्थानें पाहून आचार्य स्वस्थानापासून भ्रष्ट झाले यास आतां वध करूं नये नंतर कांहीं काळानें आचार्यानें स्वस्थानीं प्राप्त होऊन त्वरेनें दहा बाणानीं पार्थास ताडित केला. त्या काळीं पार्थानें भल्ल बाणें करून आचार्याचें धनुष्य छेदून एक बाणानें तें धनुष्य हस्तापासून विगलित केलें नंतर कृपाचार्यानें दुसरें उत्तम धनुष्य धारण करून सज्ज केलें असतां पार्थानें तेंही छिन्न केलें या प्रकारें आचार्याचीं बहुत धनुष्यें धनंजय याणें तोडून टाकिलीं असतां आचार्यानें अशनी सारिखी अशी एक शक्ति पांडुपुत्रावर टाकिली ती आपले कडे येत्ये हें पाहून दहा बाणानीं तिचा छेद केला हें कृप आचार्यानें पाहून पुनः त्यास ताडित केला नंतर पार्थानें अग्नी सारिखे तेजस्वी बाण कृपाचार्यावर टाकून त्यास विरथ केला व कृपाचार्याचें वक्षस्थल विद्ध केलें त्या काळीं आचार्य छिन्नधन्वा रथहीन झाला असतां त्यानें हस्तामध्यें गदा घेऊन अर्जुनावर फेंकिली ती आपल्यावर

येत्ये हें अर्जुनानें पाहून तिला माघारी फिरविली या प्रकारें अर्जुनाचें घोर कृत्य कौरवांकडील योध्यानीं पाहून पार्थावर बाण वृष्टी केली त्याकाळीं विराटपुत्रानें शत्रूंस भय देण्याकरितां अपसव्य करून रथ फिरविलाआणि योध्यांचें निवारण केलें नंतर कौरवाकडील योध्यानीं कृपाचार्य विरथ झाले ला पाहून त्यास युद्धांतून माघारा फिरविला असा विषय या अध्या० आहे.

५८ अध्याय अठ्ठावन्नावा:- कृपाचार्य युद्धापासून माघारा गेला हें द्रोणाचार्यानें पाहून शोणाश्वरथारूढ असतांच शरासहवर्तमान धनु घ्यातें धारण करून निर्भयपणें अर्जुनावर धांवला, त्याकाळीं रुक्मशरातें ग्रहण करून आपला गुरु द्रोणाचार्य सन्निधआला हें अर्जुनानें पाहून उ- त्तरास सांगितलें कीं, ज्याच्या ध्वजाचा उच्छ्रित दंड असून पताकालंकृत कांचनमय वेदी ध्वजावर दिसत्ये व उत्तम प्रकारचे सुशिक्षित अश्वानीं यु- क्त जो रथ त्यामध्यें स्थित झालेला महा प्रतापी द्रोणाचार्य, बुद्धीनें शुक्रा सारिखा, नीतीनें बृहस्पती सारखा, चार वेद ज्यास पारंगत असून दि- व्यास्त्राचा वेत्ता ज्याचे ठाईं सकल धनुर्वेद प्रतिष्ठीत असून क्षमा, दम, सत्य, आर्जव इत्यादिक बहुत गुण वास करितात, या सहवर्तमान या प्रसंगीं मी युद्ध करणार यास्तव हे उत्तरा माझा रथ लोकर तिकडे नेय असें अर्जुनाचे भाषण ऐकून विराटपुत्रानें रथाचे अश्वांस प्रेरणा करून भारद्वाजासन्निध नेलें असतां परमवेगानें रथी श्रेष्ठ पांडव आपल्या कडे आला हें द्रोणाचार्यानें पाहून जसा उन्मत्त झालेला गज गजावर जातो तसा द्रोणाचार्यानें अर्जुनावर जाऊन शंखाचा नाद केला त्या- काळीं द्रोणाच्या रथाचे आरक्त अश्व आणि मनासारिखे शीघ्रगामी हे सवर्णाचे धनंजयाचे अश्व हे उभयतां मिश्र झालेले पाहून रणभूमी तील सकलनर आश्चर्य पावले, ते उभयतां रथी, वीर्य संपन्न व शत्रूंस अजित, कृतविद्य, मननशील व संग्रामामध्यें एकमेकांस आलिंगन के- लेले असा आचार्य द्रोणार्जुनास पाहून कौरवाचे सैन्यास कंप सुटला त्या काळीं पार्थ हर्षयुक्त होऊन हास्य करीत आपला रथ द्रोणाचार्याच्या र- थास भिडवून नंतर त्यानें गुरूस अभिवादन केलें आणि सामपूर्वक ऋत

क्षण वाणीनें भाषण करितो, हे समर दुर्जय आम्हीं बहुत दिवस वनामध्यें वास केला आतां आम्हांस शत्रूचा कांहीं तरी अपकार करावा अशी इच्छा झाली आहे यास्तव आमचावर आपण क्रोध करूं नये, मजवर आपण पूर्वी प्रहार केला म्हणजे मी आपल्यावर करीन अशी माझी इच्छा आहे ती सिध्द करण्यास आपण योग्य आहां असें भाषण ऐकून आचार्यानें प्रथम अर्जुनावर प्रहार केला ते बाण आले नाहींत तो अर्जुनानें आपल्या हस्तकौशल्यानें तोडून टाकिले हें आचार्यानें पाहून पुनः आपलें शीघ्रास्त्रत्व प्रदर्शीत करण्या करितां पार्थावर सहस्त्र बाणांचा वर्षाव केला आणि पुनः पार्थास कोप येण्या करितां शिळेवर घासलेल्या कंकपत्री बाणानीं रजत वर्ण त्याच्या अश्वास व्यास करून टाकिलें या प्रकारें भारद्वाज आणि अर्जुन या उभतांचें युद्ध झालें. दोघेही वेगानें वायुसारिखे दिव्यास्त्रवेत्ते, तेजस्वी एकमेकावर बाणजालाचा प्रक्षेप करीत असतां सकल राजांस मोह उत्पन्न झाला. जे योद्धे रणभूमीवर प्राप्त झाले होते त्यांणीं साधुसाधु या शब्दानीं उभयतांचें पूजन करून मुखानें बोलूं लागले कीं एक फाल्गुना वांचून समरामध्यें द्रोणाचार्याशीं युद्ध करण्यास कोण समर्थ आहे, कायहो हा क्षत्रियधर्म भयंकर!!! गुरूनें शिष्याशीं युद्ध करावें या प्रकारें भाषण करीत असतां ते उभयतां एकमेकांवर पुनः शराची वृष्टि करूं लागले त्या काळीं भारद्वाजानें आपल्या चापाचें विस्फूर्जन करून क्रोधानें फाल्गुनास वेध केला असतां त्या बाणानीं अर्जुनाच्या रथास आच्छादित करून भानुची प्रभाही आच्छादित केली तेव्हां मेघ वृष्टीनें पर्वत जसा आच्छादित होतो तसा त्याच्या शित बाणानीं पार्थ आच्छादित झाला नंतर त्यानें गांडीवधनुष्य ग्रहण करून चित्रविचित्र शरानीं भारद्वाजाचा शरवर्षाव नाश केला. एकक्षणांत पार्थानें असंख्याक बाणें करून सकल दिशा एकच्छाय आकाशासारिख्या केल्या, त्या काळीं धुक्यानें जसा मनुष्य वेष्टीत होऊन अदृश्य होतो तसा द्रोणाचार्य बाणानीं आच्छादित झाला नंतर पार्थानें आपल्यास रथासहवर्तमान आच्छादित केलें, हें द्रोणाचार्यानें जाणोन मेघाच्या शब्दासारखा

शब्द ज्याचा असा धनुष्याचा टणत्कार करून त्यास बाणाची योजना केली आणि अर्जुनांच्या सकल बाणासमुदायाचा नाश केला असतां वेणूचे समुदायाच्या दाहकाळीं जसा शब्द होतो तसा द्रोणाचार्यांच्या बाणांचा मोठा शब्द झाला त्याकाळीं द्रोणाचार्यांच्या धनुष्यापासून सुटलेले बाण आकाशामध्यें एकत्र होऊन हा एकच दीर्घबाण आहे काय? असें सर्वत्रास भासूं लागले या प्रकारें ते उभयतां वीर बाणानीं एकमेकांस वेष्टन करूं लागले. जशी शरत्कालीं हंसपंक्ती आकाशांत गमन करीत असतां शोभते तसें उभयतां योध्यांचे बाण सुशोभित दिसूं लागले, या प्रकारें ते उभयतां नरश्रेष्ठ क्रोधीत होऊन युद्ध करीत असतां तें युद्ध देव दानवांसारिखें तुमुल झालें. ऐंद्र, वायव्य, आग्नेय इत्यादिक अस्त्रें आचार्यानें अर्जुनावर टाकिलीं असतां अर्जुनानें प्रतिरोध अस्त्रें करून त्या अस्त्रांचा ग्रास करून टाकिला, असे ते महाशूर महा धनुर्धर एकमेकांवर शर वृष्टी करीत असतां समान छाय आकाश जसें दिसतें तसें शर वृष्टी करून एक च्छाय चोंहीं कडे झालें. अर्जुनानें मुक्त केलेले बाण योध्यांच्या शरीरावर जाऊन पडूं लागले असतां ते रक्तानें भरल्यामुळें पळसासारिखे दिसूं लागले, या प्रकारें द्रोणार्जुनाचा समागम झाला असतां सर्व सैन्य घाबरून गेलें. असें प्राणव्यापणाचें युद्ध द्यूत प्रवृत्त झालें असतां एकमेकांस बाणांनीं विदारण करूं लागले इतक्यांत आकाशामध्यें अशी वाणी झाली कीं हे द्रोणाचार्य तूं अर्जुनासहवर्तमान युद्ध केलेंस हें तुझें बहू दुष्कर कर्म घडलें अशी वाणी ऐकून महा प्रमाथी, देवदैत्यांस जिंकणारा, सकल युद्ध शिक्षा निपूण. ज्याचें हस्त लाघव फार उत्तम असा जो पार्थ तो समरामध्यें उभाराहून आपल्या बाहूनीं गांडीव धनुष्याचें आकर्षण करीतच आहे हें आचार्यानें पाहतांच त्यास ही विस्मय झाला, अर्जुनानें तर शलभासारिखा योध्यांवर बाणाचा वर्षाव चालविला तो वर्षाव इतका निबिड होता कीं, मध्यें वायू जाण्यास अवकाश नाहीं, हें पार्थाचें कर्म योध्यानीं पाहून साधुसाधु शब्दानीं त्याचें पूजन केलें. पार्थ भात्यांतून बाण काढून धनुष्यास संधीत करून केव्हां शर संधान क-

रितो हें पार्थाचें अंतर कोणास्सही समजलें नाहीं, असें ज्याचें हस्तलाघवे करून एककाळीं शतसहस्र संख्याक नतपर्व बाण पार्थानें धनुष्यास लावून द्रोणाचार्याच्या आसमंतातभागीं पृथ्वी आकीर्ण करून टाकिली अस्तां कौरव सैन्यांत एकाएकीं हाहाःकार शब्द झाला, हें अर्जुनाचें शीघ्रास्त्र इंद्रानें पाहून त्याचा परम सत्कार केला. गंधर्व अप्सरा व इतर, जे युद्ध पाहण्यास आले होते त्या सर्वांनी पार्थाचें पूजन केलें, हें अर्जुनाचें अद्भुत कर्म, द्रोणपुत्र अश्वत्थामा याणें पाहून अर्जुनाचें कांहींसें निवारण केलें, तथापि तें अर्जुनाचें अत्यद्भुत कर्म केलेलें त्याणें मनामध्यें आणून परम सत्कार केला असतांही त्यास तो दुःसह होऊन अत्यंत कोप आल्यामुळें कांहीं रथांचा समुदाय बरोबर घेऊन रणामध्यें पार्थावर पर्जन्या सारिखी शरवृष्टी करीत आहे तों अर्जुनानें आपला रथ द्रोणाकडे होता तो फिरवून रथाचे अश्व, अश्वत्थाम्याकडे फिरविले आणि आचार्यास युद्धांतून जाण्यास मार्ग दिला. तो गमनाचा मार्ग आचार्यांनें पाहून आपलें सकल शरीर बाणानीं विद्ध झालें. कवच नष्ट झालें, व ध्वज छिन्न होऊन पडला असें जाणून आपले रथाचे अश्वांस प्रेरणा करितांच त्या अश्वानीं परम त्वरेनें आचार्यास युद्धभूमीपासून दूर नेलें, असा विषय या अ० आहे.

५९ अध्याय एकुणसाठावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, द्रोणाचार्य युद्धापासून पराङ्मुख झाल्यावर वायुसमान वेगानें अश्वत्थामा अर्जुनाशीं युद्धास आला तो असा कीं जसा मेघ जलवर्षाव करितो तसा द्रोणपुत्र शरवर्षाव करूं लागला असें उभयतांचे युद्ध होत असतां अर्जुनानें बाणें करून अश्वत्थाम्याच्या रथाचे अश्व निर्जीव करून टाकल्यामुळें ते, बाण ताडणानें मोहित होत्साते कोणच्याही दिशेचें परिज्ञान त्यास न होतां स्तब्ध उभे राहिले, असा तो महावीर्य पार्थ कौरव सैन्यांत संचार करीत असतां द्रोणपुत्रानें पार्थाचें कांहीं छिद्र पाहून एक क्षुर बाण सोडला तेणें करून अर्जुनाच्या धनुष्याची प्रत्यंचा छिन्न झाली हें अश्वत्थाम्याचें मानुषकर्म पाहून सकल देवांनी त्याची पूजा केली तसेच महारथी भीष्म, द्रोण, कर्ण, कृपाचार्य. यांणीं द्रोणपुत्राचें कर्म

पाहून साधुसाधु असें भाषण करून त्याची पूजा केली पुनः द्रोणपुत्रानें श्रेष्ठ धनुष्य आंकृष्ट केलें आणि कंकपत्री बाणेंकरून पार्थाचे हृदयासवेध केला. असें अन्योन्यांचें युद्ध होत असतां असंख्य आणि दिव्य जाचे भाते व शर तो महाशूर अर्जुन युद्धांमध्यें स्तब्ध अचल गिरीसारिखा झाला हें अश्वत्थाम्यानें पाहून पुनः परमत्वरेनें अर्जुनावर बाणांचा वर्षाव करूं लागला. अर्जुन ते सकल द्रोणपुत्राचे बाण मोठ्या त्वरेनें क्षीण करून त्याजपेक्षां अधीक शोभूं लागला. हें अर्जुनाचें कृत्य कर्णानें पाहून आपल्या धनुष्याचा टणत्कार केला त्याकाळीं सकल सैन्यांत एकाएकीं महान् हाहाकार शब्द होऊं लागला, जिकडे कर्णानें आपल्या धनुष्याचा शब्द केला तिकडे अर्जुनानें पाहून हा राधेय आहे असें पाहिलें आणि कोपायमान होऊन परमत्वरेनें कर्णाचा वध करावा ही इच्छा धरून तो कर्णाच्या सन्निध आला शत्रुहंता अर्जुन क्रोधानें आरक्त नेत्र होत्साता कर्णास भाषण करूं लागला.- असा विषय या अध्यायांत आहे.

६० अध्याय साठावा.- अर्जुन भाषण करितो हे कर्णा, पूर्वी तूं सभेमध्यें वल्गना केलीस कीं माझ्या सारिखा योध्धा दुसरा कोणी नाहीं तो समय आज आला आहे यास्तव रणांगणीं माझ्याशीं युद्ध कर. बरें जें कौरवसभेंत भाषण केलेंस तेंच तूं आतां सत्य करून दाखीव. अरे राधेया, दुरात्म्या पांचालीस सभेमध्यें आणून क्लिष्ट केली हें तूं आनंदानें पाहिलेंस त्याचें फळ काय आहे तें पहा मी धर्मपाशानें बध्द होतों म्हणून तुमचें कर्म सहन केलें परंतु तुम्हां विषयीं मला फार कोप आला आहे त्या कोपाचा उत्कर्ष कसा आहे तो पहा. हें अर्जुनाचें भाषण ऐकून कर्ण भाषण करितो हे अर्जुना जसें आपले मुखानें भाषण करीत आहेस तसेंच कर्म करून दाखीव तुझें कर्म काय आहे तें सर्व पृथ्वीवर विख्यात आहे असें असतां अतिशयोक्ति कशाकरितां करितोस, बरें तुझें म्हणणें असें आहे कीं जे पूर्वी आम्हीं कृत्य केलें त्याचें सहन मी अत्यंत अशक्त अवस्थेमध्यें केलें हे पार्था, आतां जो पराक्रम करणार तो आम्हीं पाहतों आतां माझ्याशीं युद्ध कर म्हणजे माझें बल किती आहे हें तुझ्या दृष्टीस पडेल असें कर्ण

चें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे राधेया, आतांच तूं रणापासून पला यन करून गेलास म्हणून जिवंत राहिलास अरे तुझा प्रत्यक्ष भ्राता मी युद्धामध्यें मारिला असतां तो रणामध्यें तसाच टाकून पळून गेला स आणि आतां वल्गना अशा करितोस तर तुला लज्जा कशी नाहीं, इतकी अवस्था झाली असतां असें भाषण करणारा एक तूंच पुरुष आ हेस या प्रकारें अर्जुनाचें भाषण करून कवच भेद करणारे असे बाण त्याजवर टाकिले. त्या काळीं कर्णानें दुसरे भात्यांतून कांहीं बाण घेऊन पां डवांचा हस्ताचे ठाईं वेध केला तेणें करून पार्थाचा हस्तांतील मुष्टी शिथी ल झाला असतां पार्थानें कर्णाचें धनुष्य छेदन केलें नंतर कर्णानें पार्थावर शक्ती टाकिली ती ही शक्ति पार्थानें छिन्न करून टाकिली. हें पार्थाचें कर्म कर्णाच्या पादचारी अनुचरानीं पाहतांच ते कर्णाच्या अग्रभागीं मोठ्या त्वरेनें आले हें अर्जुनानें पाहून गांडीव निर्मुक्त बाणानीं त्या सर्वांस यम लोकीं पाठविलें नंतर अर्जुनानें बाणानीं त्याचें कवच छिन्न केलें तो मूर्छित होऊन पडला आणि अतिवेदना झाल्यामुळें पळूं लागला. तेव्हां कर्णानें पलायन केलें हें पाहून अर्जुन व विराटपुत्र उत्तर आपल्या शंखाचे म हा नाद करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

६१ अध्याय एकसष्ठावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पा र्थानें कर्णाचा पराजय केल्या नंतर तो विराटपुत्रास भाषण करितो कीं हे उत्तरा, ज्या स्थळीं हा सुवर्णमय ताल वृक्ष दिसत आहे त्या सैन्यांत ल वकर मला ने, आमचे पितामह भीष्म त्या रथामध्यें आरूढ आहेत ते माझ्याशी युद्ध करण्या विषयीं फार इच्छा करीत आहेत, असें अर्जु नानें उत्तरास भाषण केल्यावर उत्तरानें रथ, नाग, अश्व, इत्यादिकानीं सं कुल झालेलें सैन्य पाहून पार्थास भाषण करितो, हे वीरा पार्था तुझ्या रथाच्या अश्वांस तिकडे नेण्या विषयीं मला सामर्थ्य नाहीं. हें पहा माझें शरीर बाणानीं अत्यंत विद्ध झालें हे सैन्य पाहून माझें मन विव्हल हो त आहे. या रणभूमीवर, वसा, मांस, रुधिर, इत्यादिकांचा गंध घ्राणें करून. मला अत्यंत मूर्च्छा येत्ये हे पार्था, तुला पाहून मला फार संशय

उत्पन्न झालेला आहे,असा शूरांचा संग्राम कधींही मी पाहिला नाहीं. घोर घोष्या गदांचे पात, शूरांचे सिव्हनाद इत्यादिकरून माझे कर्ण बधीर झाले व विस्मृतिही झाली माझे अंतःकरणास अत्यंत मोह झाला हे वीरा तं गांडीव धनुष्याचें आकर्षण करून अलात चक्रा सारिखें वारंवार परिभ्रमण करितोस तिकडे माझी दृष्टी ही पुरत नाहीं आणि तुझें हें कर्म पांहून माझें हृदय विदीर्ण झालें आहे.साक्षात् पिनाकीच काय असें तुझें शरीर मला उग्र दिसतें, व ही भूमी चलन पावते यास्तव तुझ्या रथाच्या अश्वाचे रश्मी व प्रतोद घेण्याविषयीं मला शक्तीनाहीं असें उत्तराचें भाषण ऐकून अर्जुन भाषण करितो हे उत्तरा असें भय तूं धरूं नकोस. अरे,तूंही अशीं अद्भुत कर्में रणामध्यें बहुत केलीस तुझें कल्याण असो.अरे,मत्स्य राजाचें कुळ सकळांस विदीत आहे त्या कुळामध्यें तूं झाला आहेस म्हणून शत्रू दमनाविषयीं तुला विषाद होणें योग्य नाहीं आतां माझ्या रथामध्यें आरूढ होऊन माझ्या अश्वाचें नियमन कर असें महाबाहु अर्जुन उत्तरास अवधान देऊन बोलतो हे उत्तरा तूं आतां भीष्माचे सेनेच्या अग्रभागीं मला स्वरील नें ह्मणजे भीष्माचें धनुष्य व प्रत्यंचा तोडून टाकितों आकाशीं मेघ मंडळांत वीज जशी चमकत्ये तसें माझें सुवर्ण पृष्ठ गांडीव धनुष्य सर्व कौरव पाहातील हा अर्जुन दक्षण अथवा वाम हस्तानें बाण तोडितो कीं काय असा तर्क संगत झालेले माझे शत्रू करतील, रक्त हेंच उदक, रथ हे आवर्तें व गज हे नक्र जामध्यें परलोकीं प्रवाह जीचा अशी नदी आतां मीं उत्पन्न करितों आणि कौरव कुलरूप वनाचा बाणें करून छेदन करितों मी कौरवांची सेना जिंकीत असतां मला शतावधि मार्ग मिळतील व मी केवळ चक्रासारिखें सैन्य फिरविलेले पहाशील. आकाशाचा अवलंब करून जरी शत्रू राहिले तथापि मी बाणानीं त्याचा भेद करीन, पूर्वी इंद्राच्या वचनें करून संग्रामांत पौलम आणि काल खंजनामक सहस्त्रावधी दैत्य मीं नाशास नेले, मी इंद्रापासून दृढ मुष्टी व ब्रम्हदेवापासून हस्तलाघव संपादन करून घेतलें. उदक वाढलें असतां त्यानें नदीचे तिर जसे पडतात तशीं कौरवांचीं वृंदें भग्न केलेलीं तूं पहाशील ध्वज हेच कोणी वृक्ष पदाती हे को

णी तृण, रथ हे कोणी सिंहांचे समुदाय असें जें कौरवांचें वन तें आज मी अ·
स्त्ररूप अग्नीनें प्रज्वलित करीन. हे उत्तरा या केलेल्या पराच्या बाणानी
कौरवाकडील योद्धे. रथांतून खालीं पडलेले तूं पाहशील वज्रपाणी इंद्र
जसा सर्व असुरास एकत्र करितो तसा मी कौरवांकडील योद्धे एकत्र क·
रीन. रुद्रापासून रौद्रास्त्र, वरुणापासून वारुणास्त्र, अग्नीपासून अग्ने·
यास्त्र, व वायूपासून वायव्यास्त्र मला मिळालें आहे तशीच शक्रापासून
वज्रादि अस्त्रें मला लब्ध झाली आहेत, यास्तव हे विराटपुत्रा तुला जेभ
य झालें आहे त्याचा त्यागकर. धृतराष्ट्रकुळ हेंच कोणी घोरवन तें आतामी
समूळ उपटून टाकितों असें अर्जुनानें उत्तरास आश्वासित केलें असतां
जिकडे भीष्म होते तिकडे अर्जुनाचा रथ उत्तरानें नेला त्याकाळीं कौरवांच्या
पराजयांची इच्छा करणारा महाबाहू अर्जुन आला हें पाहून भिष्म व्यग्र न होता नि
वारण करण्यास उद्यूक्त झाला तों अर्जुनानें धनुष्याचें आकर्षण करून सु·
वर्णाग्र बाणानीं भीष्माचा ध्वज समूळ छिन्न करून पृथ्वीवर पाडला ते
व्हां दुःशासन, कर्ण, दुःसह व विविंशती हे चार योध्धे अर्जुनाचें निवारण
करण्यास आले त्यांत प्रथम दुःशासनानें बाणानीं विराटपुत्रास ताडित
करून दुसऱ्या बाणानीं अर्जुनाच्या उरस्थली ताडिलें, त्या काळीं पार्थानें
दुःशासनाचें धनुष्य ताडिलें असतां तो पार्थ बाणानीं पीडित होतांच यु
द्धाचा त्याग करून गेला नंतर विकर्णानें अर्जुनास ताडण करितांच त्यानें
एक बाणानें ललाटास ताडण करून रथांतून विकर्णास पाडिलें. दुःसह
व विविंशति हे उभतां पार्थावर तीक्ष्ण शरांची वृष्टी करीत अर्जुनानें गा
र्धपत्र निशित बाणें करून दुःसह व विविंशति या उभयतांस विद्ध करू
न त्यांच्या रथाचे अश्व मारिले. त्याकाळीं ते उभयतां धृतराष्ट्रपुत्र हताश्व
व भिन्नांग होतांच पदा त्यानीं त्यास दुसरे रथामध्यें बसवून पळविलें
तर शत्रूनीं पराजय करण्यास अशक्य असा अर्जुन आपल्याशीं कोणी
युद्ध करण्यास आहे किंवा नाहीं हें पाहण्यास सर्व दिशांस निघाला. अ·
सा विषय या अध्यायांत आहे.

६२ अध्याय बासष्ठावा.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया कौर

वाकडील योद्धे एकत्र होऊन अर्जुनाशी युद्ध करूं लागले असतां अर्जु
नानें महाशरजालानीं ते सर्व महारथी आच्छादित केले तेव्हां भाग्यशालि
योद्धे मोठ्यानीं नाद करूं लागले सकल अश्व हंसूं लागले, तसेंच भेरी, शं
ख यांचे नाद महा भयंकर होऊं लागले, पार्थाच्या शरजाळें करून सह
स्रावधी नरांद्रवांची शरीरें भीन्न झाली या प्रकारें तो पांडव शरांचा वर्षा
व करीत असतां शरदृतूनें माध्यान काली मध्यं दिनगत सूर्य जसा शो
भतो तसा त्यामध्यें शोभला तसेच रथी अत्यंत त्रस्त होऊन पळाले. अर्जुना
च्या शरेंकरून सकल योध्यांचीं कवचें छिन्न झालीं असतां त्याचा मोठा
शब्द झाला अशा तुमुलयुद्धामध्यें अर्जुनाच्या बाणापासून मृत झाले
ले गजाश्व, योद्धे व इतर मृत झालेल्यानीं रणभूमी आच्छादित झाली.
धनंजय हस्तामध्यें चाप धरून त्याचे विस्फूर्जन करूं लागला त्या कालीं
कौरवांकडील सैनिक अत्यंत त्रस्त होऊन पळाले. जशी आकाशापासून
पाषाण वृष्टी होत्ये तसें अर्जुनाच्या बाणानीं योध्यांचीं शिरें तोडून पृथ्वी
वर पाडिलीं, असा तो अर्जुन रुद्रासारिखा पराक्रमी तेरा वर्षे अवरूध
झालेला आपलें रुद्ररूप सकल कौरवांस दाखवून धृतराष्ट्र पुत्रावर क्रो
धाग्नीच टाकितो काय असे सकलांस भासविता झाला. हा अर्जुनाचा प
राक्रम पाहून धृतराष्ट्रपुत्रासमक्ष सकल त्याचे योद्धे शांतीस पावले अ
सा अर्जुनानें त्या सैन्यास त्रास देऊन पळविलें त्या कालीं अर्जुनानें रक्तोद
काची मोठी घोर नदी उत्पन्न केली त्या प्रसंगीं अर्जुन गांडीव धनुष्याचें
आकर्षण करून शराचें ग्रहण संधान आणि मोचन कोणत्या कालीं क
व्हां करितो हें कोणाचाही दृष्टीस पडलें नाहीं; असा विषय या अध्याया
त आहे.

६३ अध्याय त्रेसष्टावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, नंत
र दुर्योधन, कर्ण, विकर्ण, विविंशती, पुत्रासह वर्तमान द्रोणाचार्य व महा
रथी कृपाचार्य, हे सकल योद्धे पुन्हा एकत्र होऊन अर्जुनाचा वध करा
वा या इच्छेनें आपल्या बलवत्तर दृढ चापाचा टणत्कार करीत अर्जुनाचे
आग्रभागीं आले त्याकाळीं विस्तीर्ण पताकानीं युक्त आदित्या सारिखा

कांतिमान् वानर ध्वजानें चिन्हित अशा रथामध्यें आरूढ जो अर्जुन या
णें ते सकल योद्धे आपल्याकडे येतात असें पाहून आपणही त्यांच्याअ
ग्रभागीं आला. कृपाचार्य, कर्ण, द्रोण या त्रिवर्गांनीं महावीर्य धनंजयाचें
महास्त्रानें निवारण करून वर्षाकाळीं मेघ जसे वृष्टी करितात तशा धनं
जयावर शर समुदायाची वृष्टी केली ते लोमवाही शर योध्यानीं सन्निध
स्थळावरून टाकलेले सकल प्रदेश पूर्ण करिते झाले त्याकाळीं महारथी
बीभत्सूनें हास्य करून आदित्या सारखे महा तेजस्वी जें ऐंद्र अस्त्र त्या
ची गांडीवाशीं योजना करून शररश्मी आदित्यच काय असा तो सुशो-
भित होत्साता कौरवांवर तें अस्त्र टाकून सकल आच्छादित करीत निघा
ला त्याकाळीं जशी विद्युल्लता मेघमंडळामध्यें तसें अर्जुनाचें ध-
नुष्य इंद्र धनुष्या सारिखें नम्र झालें पर्जन्याचा वर्षाव होत असतां आ-
काशामध्यें विद्युल्लता जशी शोभत्ये तशा अर्जुनानें मुक्त केलेल्या ऐंद्रास्त्रा
च्यायोगें सकळ दिशा दैदीप्यमान दिसूं लागल्या हें योध्यानीं पाहून सक
ळांचीं चित्तें नष्ट होऊन शांतिपरायण होत्साते संग्राम भूमीपासून विमु
ख झाले तसेंच कौरवांचें सैन्य स्वजीविता विषयीं निराश होऊन दाहीदि
शास पळूं लागलें. असा विषय या अध्यायांत आहे.

६४ अध्याय चवसष्टावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया कौ
रवांकडील योध्यानीं युध्दा पासून पलायन केल्यावर भरताचा पिता
महशांतनव भीष्म सुवर्णमय धनुष्य मर्मभेद करणारे बाण घेऊन धनंज
यावर धावून गेला असतां सूर्योदयानें उदयाचल पर्वत जसा शोभतो
तसा तो नरव्याघ्र, मस्तकानें ठाई पांडुरवर्ण छत्र धारण केलेला अत्यंत
शोभायमान दिसूं लागला नंतर भीष्म आपल्या शंखाचा नाद करीत कौ
रव सैन्यांस हर्षीत करून त्यानें श्वासोश्वास टाकणाऱ्या उरगा सारिखे म-
हा वेगवान असे आठ बाण अर्जुनाच्या ध्वजावर टाकतांच त्या बाणानीं
ध्वजस्थीत कपीस ताडण करून ध्वजाग्रवासी जीं भूतें होतीं त्यांसही ता
डण केलें तसाच अर्जुनही भीष्मावर दिव्यास्त्राचा वर्षाव करूं लागला अ
सतां मेघ जसा पर्वतावर वृष्टी करितो तशी परस्परांच्या अस्त्रांची वृष्टी होऊं

लागली, तेणेंकरून सकल लोकांचे शरीरावरें हर्षानें रोमांच उत्पन्न झाले, बली आणि इंद्र यांचें जसें पूर्वी युद्ध झालें तसें भीष्माचार्य आणि पार्थ यांचें घोर युद्ध होत असतां सकल कौरवांचे योद्धे व सैनिक पाहूं लागले तेव्हां उभयतानीं एकमेकावर बाणांची वृष्टी केली असतां ते बाण अंतरिक्षांत वर्षाकालीं न काजव्या सारिखे दिसूं लागले.श्रीकृष्ण अथवा भरद्वाज,द्रोणाचार्य, हे मात्र अर्जुनाचा वेग सहन करतील असें कौरवांकडील सैनिक भाषण करित असतां ते उभयतां एकमेकावर अस्त्रांचा प्रयोग करून युद्धभूमीवर क्रीडा करील करीत सकल भूतांस मोह उत्पन्न झाला त्याकाळीं परस्पर प्राजापत्य, ऐंद्र, अग्नेय, रौद्र, कौबेर, वारुण, याम्य, वायव्य, या अस्त्रांचा प्रयोग करीत सैन्या मध्यें उभयतांही संचार करीत असतां सकलभूतें उभयतांस पाहून विस्मित होत्सातीं शाबास शाबास असा शब्द करून म्हणूं लागली कीं जसा आज भीष्म व पार्थ याणीं महास्त्राचा प्रयोग केला असा अस्त्र प्रयोग मनुष्यांत आम्ही कोठेंही पाहिला नाहीं. या प्रकारें सर्वास्त्र वेत्ते जे भीष्मार्जुन या उभयतांचें महास्त्रांचें युद्ध होऊन नंतर शरयुद्धास आरंभ झाला, प्रथम अर्जुनानें धारेच्या बाणानीं सुवर्णानें परिष्कृत केलेलें भीष्माचें धनुष्य तोडलें असतां एक निमिषमात्रांत भीष्मानें दुसरें धनुष्य घेऊन शरांचें संधान केलें आणि परम क्रुद्ध होऊन धनंजयावर त्वरेनें शर वृष्टी केली, ते भीष्माचे शर अर्जुनानें निशित तीक्ष्ण बाणेंकरून तोडिले असतां पुनः भीष्म अर्जुनावर बाणाची वृष्टि करूं लागला. उभयतांच्या बाणानीं दाही दिशा व्याप्त होऊन गेल्या, त्या काळीं कौंतेय, शांतनव, भीष्म या उभयतांचें युद्ध फार च अद्भुत होऊन पराक्रमानें अर्जुनानें भीष्माचे रथ संरक्षक मारून आपल्या रथाच्या अग्रभागीं पृथ्वीवर पाडले, त्याकाळीं गांडीव धनुष्यापासून मुक्त झालेले शत्रूंचें कृंतन करणारे, पिसाऱ्यानीं व हिरण्यानी भूषित केलेले, शिलेवर घांसलेले, असे बाण आकाशामध्यें जात असतां हंस पंक्तीसारिखे शोभूं लागले, तशीच अर्जुनानें सोडलेलीं दिव्यास्त्रें आकाशगामी झालेलीं पाहण्यास इंद्रासहित देव आले होते त्याणीं अंतरिक्ष

असतां अर्जुनाचें कृत्य पाहिलें. चित्रसेन गंधर्वही देवामध्यें आला होता तो अर्जुनाचें कृत्य पाहून बहुत हर्षित झालेला इंद्राजवळ अर्जुनाची प्रशंसा करून त्यास भाषण करितो हे महाराज अर्जुनाचे बाण कसे मिळून जात आहेत ते पहा. हा अर्जुन बाणातें गृहण करून गांडीव धनुष्याचें केव्हां आकर्षण करितो, आणि बाणाचा केव्हां त्याग करितो, याचें अंतर कोणासंही दिसत नाहीं, आकाशामध्यें मध्यान्हकाळीं ताप करणारा सूर्य जसा पहावत नाहीं तसा अर्जुन सकलसैनिकांस पाहण्यास अशक्य झाला तसाच गांगेय भीष्मही पाहण्यास लोक अशक्य झाले, उभयतांचींही कर्मे सकल लोकांस विश्रुत तीव्रपराक्रमी ज्याचीं कर्मे समान युद्धामध्यें अत्यंत अजय आहेत, असा चित्रसेन गंधर्वानें भीष्म, व पार्थाचा वृत्तांत देवराजास सांगितला असतां देवराज इंद्र, पुष्पांचा वर्षाव करून उभयतांची पूजा करिता झाला. नंतर अर्जुन कांहीं बाण सोडीत आहे हें भीष्मानें पाहून अर्जुनाच्या वामभागीं ताडण केलें त्याकाळीं अर्जुनानें हास्य करून पृथुधार बाणानें सूर्यासारिखा तेजस्वी जो भीष्म याचें धनुष्य छेदन करून दाहा बाणानीं भीष्माचे स्तनांतरीं वेध केला असतां भीष्म महा पराक्रम करणार जरी होतो तथापि अर्जुनबाणानीं अत्यंत पीडित होऊन रथाच्या कुबास धरून उभा राहिला. हें भीष्माच्या सारथ्यानें पाहतांच महारथ्याला रणामध्यें संकट प्राप्त झालें असतां सारथ्यानें रथ्याचें संरक्षण करावें या उपदेशाचें स्मरण करून भीष्माचार्याचा रथ त्याणें रण भूमी पासून दूर नेला. असा विषय या अध्यायांत आहे.

६५. अध्याय पांसष्टावा — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीष्मानें संग्राम भूमीपासून पलायन केलें असतां धृतराष्ट्रपुत्र दुर्योधन आपला ध्वज उभारून व धनुष्यातें गृहण करून नाद करीत अर्जुनाच्या अग्रभागीं आला आणि त्यानें धनंजययास पाहून आकर्णमर्याद धनुष्य ओढून भल्लाकार बाणानें अर्जुनाच्या ललाट प्रदेशीं प्रहार करितांच सुवर्णबाणाच्या योगें एक शृंगपर्वतासारिखा अर्जुन अत्यंत शोभूं लागला, त्या बाण प्रहारानें अर्जुनाच्या ललाटांतून उष्ण असें रक्त उत्पन्न

होऊन ललाट भेद झाला तेणें करून तर अर्जुनास फारच शोभा आली आ णि दुर्योधनानें बाणानें ताडित केल्यामुळें तो बहुत क्रोधित झाला. व परम त्वरेनें कांहीं बाण घेऊन दुर्योधनास वेध करिता झाला या प्रकारें ते पुरुष वीर लाडण करूं लागले. विकर्ण उन्मत्त झालेल्या महां गजावर आरूढ हो ऊन कांहीं गजपदातीरक्षक व चार रथी बराबर घेऊन कुंतीसुतावर परम त्वरेनें धांवून आला असतां कुंतीपुत्रानें आकर्णमर्याद धनुष्य आकृष्ट करून गजाच्यास्थळीं प्रहार केला तो पार्थ पत्र सोडलेला बाण पंखापर्यंत गजाचे शरीरांत प्रविष्ट होऊन जसें इंद्रानें पर्वतावर टाकिलेलें वज्र पर्वता चें विदारण करितें तसा तो गजराज विदीर्ण होऊन कांपत कांपत वज्रह त पर्वताचें शिखर जसे कोसळतें तसा तो पृथ्वीवर पडला. विकर्णही परम त्रस्त होऊन गजापासून खालीं उतरला आणि परम त्वरेनें आठशें पाउलें गमन करून विविंशतीच्या रथामध्यें बसला त्याच प्रकारें पादरक्षक वीक र्णही भग्न होऊन पराङ्मुख झाले व गांडीव निर्मुक्त बाणानीं ताडित होऊन पळूं लागले तेव्हां विकर्णाचा गज मृत झाला. व सकल योद्धे पळूं लागले हें दुर्योधनानें ऐकतांच आपणही रथारूढ होऊन जा स्थळीं पार्थ नाहीं तेथें पळून गेला. दुर्योधन बाणानें विद्ध झाल्यामुळें रुधिर वमन करितो हें पाहू न अर्जुन त्याशीं युध्द करण्याची इच्छा धारण करून त्यास बोलतो हे दुर्योध ना तूं आपलें यश व कीर्तीचा त्याग करून आतां पलायन करितोस काय? जा काळीं युधिष्ठीरराजा राज्य भ्रष्ट झाला त्याकाळीं जसा तुम्हीं वाद्यांचा घोष केला तसा आज कां करीत नाहीं, युधिष्ठिराचा आज्ञाधारक कुंतीपुत्र मी आ ज युद्धांत आलों आहें यास्तव हे धृतराष्ट्रपुत्रा आपलें पूर्वव्रत स्मरून मला मुख दाखीव, तुझें दुर्योधन हें नांव व्यर्थ आहे, तूं रणांतून पलायन करणारा म्हणून हें नांव तुला योग्य नाहीं. तुझें या काळीं रक्षण करणारा आसपास कोणी मला दिसत नाहीं, बरें आतां युध्दापासून पलायन करून आपले प्राण रक्षण कर. असा विषय या अध्यायांत आहे.

६६. अध्याय सासष्ठावा:- वैशंपायन सांगतात हे जन्मेजया युद्धा पासून पलायन करणारा जो दुर्योधन यास अर्जुनानें आव्हान केलें असतां.

अंकुशानें ताडण केलेला जसा मत्त गज माघारा फिरतो तसा बाणीनें ताडित केलेला दुर्योधन पुनः माघारा फिरला. हें कर्णानें पाहून दुर्योधनाचा उत्तरभागें पार्थाशीं युद्ध करण्यास आला नंतर महाबाहू भीष्माचार्य माघारा फिरून दुर्योधनाच्या पश्चिमभागीं आला. व द्रोणाचार्य, कृपाचार्य, विविंशति दुःशासन हे योध्दे दुर्योधनाच्या पुढें त्वरीत आले असतां सकल सैन्यही दुर्योधनाच्या समीप आलें सूर्य जसा मेघास संताप देतो तसा अर्जुनानें त्यासे त्यास त्रास दिला. तेव्हां शत्रुनी त्याजवर बाणाची वृष्टी केली त्याकाळीं अर्जुनानें कौरवांच्या अस्त्राचें आपल्या अस्त्रानीं निवारण करून संमोहनामक अस्त्राचा कौरववीरांवर प्रयोग केला आणि सुधार, निशित, रूपत्र, अशा शरें करून सकल दिशा व्याप्त केल्या व गांडीवाच्या घोषानें योध्यांचीं मनें अत्यंत व्यथित करून पुनः शंखाच्या भयंकर नादानें बाहूचा आस्फोटनानें दिशा, विदिशा, आकाशभूमी नादित केली, त्याकाळीं ते कुरुवीर पार्थाचा शंखनादें करून मोहित झाले हें पार्थानें पाहून उत्तरेच्या वाक्याचें स्मरण केलें नंतर मत्स्यपुत्रास भाषण - करितो कीं, हे उत्तरा, सकल कौरव मोहित पडले आहेत तों इतक्यांत तूं तेथें जा आणि द्रोणाचार्य व कृपाचार्यांनी परिधान केलेलीं शुभ्र वस्त्रें, कर्णाचें अत्यंत सुंदर पीत वस्त्र आणि अश्वत्थामा व दुर्योधनराजा या उभयतांचीं नील वस्त्रें आहेत तीं घे, भीष्माकडे जाऊं नको कारण या अस्त्राचा प्रतिघात तो जाणतो यास्तव त्यास मोह झाला नाहीं त्याच्या रथास सव्य करून तिकडे जा असें अर्जुनाचें भाषण उत्तरानें ऐकून अश्वाचे रश्मी सोडून रथाखालीं उतरल्यावर परम त्वरेनें महारथ्यांचीं वस्त्रें घेऊन तो आपल्या रथावर बसला आणि हिरण्यकक्षानीं युक्त व सुशिक्षित जे अर्जुनाच्या रथाचे अश्व त्यातें प्रेरणा करून पुरुषश्रेष्ठ अर्जुनास रणांतून दूर नेला हें भीष्मानें पाहतांना आतां अर्जुन रणापासून जातो असें समजून शरानें त्यास ताडण केलें त्याकाळीं अर्जुनानें दाहा पृषत्क बाणानीं भीष्माच्या अश्वांस ताडित करून पुढें गमन केलें, सूर्य जसा आपल्या किरणानें मेघाचें विदारण करितो तसा अर्जुन रणांगणस्थ रथवृंदांचा त्याग करून दूर उभारिला इतक्यांत कौरव योद्धे सावध होऊन रणापासून मुक्त झालेला पार्थ

केवळ इंद्रचकाय असा पाहात असतां दुर्योधन आगल्ये योध्यांस बोलतो हेवीरहो, तुह्मीं पार्थास कसा सोडिला याचें मथन केल्यावांचून हा तुम्हांपासून कसा सुटला? असें दुर्योधनांचें भाषण ऐकून भीष्म हांस्य करून भाषण करितात, हे दुर्योधना अरे,तेवेळेस तुझी बुद्धी कोठें गेली होती ज्याकाळीं तूं धनुष्य बाणाचा त्यागकेरून निचेष्टपडलास त्याकाळीं अर्जुनं तुझाप्राण घेता तर तुह्मीं काय केलें असतें? परंतु तो घातुक कर्म करणारा नव्हे तस्मात् तुह्मीं आतां त्याच्याशीं युद्ध करावें हें नीट नाहीं.हे कुरुवीरा आतां आपल्या देशासजा. पार्थ गाईतें ग्रहण करून जावो,स्वार्थ संपाद करण्याकरितांमोहातें पावोन आपलानाशमात्र करून घेशील या प्रकारें भीष्मानें भाषणकेले त्यानंतर दुर्योधनानें व सकलवीरानींहें आपल्यास हितकारक आहे असें जाणलें आणि आपण ज्या कार्यास प्रवृत्त झालों त्या कार्याविषयीं निराश होऊन स्तब्ध बसले आणि सकळ विरत्या रणभूमीपासून गमन करूंलागले हें धनंजयानें पाहून संतुष्टचित्त होत्साता आपण गर्जना करून.सकळविरांस माघारें फिरविण्याविषयीं पृथक् पृथक् हांका मारिल्या आणि पितामह भीष्म व वृद्ध आपला गुरू द्रोणाचार्य याजप्रत मस्तकानें प्रणिपात केला द्रोणपुत्र अश्वत्थामा,कृपाचार्य व मान्यजे कौरवांचे इतर योद्धे यांस चित्रविचित्र शर प्रहार रूप नमस्कार केला.नंतर दुर्योधनाचा उत्तमम ण्यानीयुक्त मुकुटाचें छेदन केलें व त्याहून इतरवीर,त्यांस गांडीव धनुष्याच्या नादानीं विचारून द्वेष करणाऱ्यांचे मनास विदारण केलें असतां ते सर्ववीर निघाले असें पाहून अर्जुन मत्स्यपुत्रासबोलतो हे उत्तरा,तूं सकल शत्रूंस जिंकून गायी जिंकिल्यास आतां आपल्या अश्वांस माघारे फिरीव, हें अर्जुन कर्म देवांनीं पाहून पार्थाच्या कर्माची वारंवार प्रशंसा करीत ते आपआपल्या स्वस्थानीगेले. असा विषय या अध्यायांत आहे.

६७ अध्याय सदुसष्टावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया,अर्जुनानें सकल कौरव संग्रामामध्यें जिंकून विराटाच्या गायी आणिल्या असतां कांहीं कौरवांकडील योद्धे भयें करून त्रस्त झालेले संभ्रांत होऊन पलायन करीत असतां मार्गांत पार्थास पाहतांच हस्त जोडून नम्रपणानें म्हणूं ला-

गेले कीं, हे पार्था आतां आम्हीं काय करावें त्या काळीं अर्जुन बोलला कीं हे वीरहो तुम्हीं भिऊं नका जे आर्त असतील त्यास मी मारणार नाहीं अशी अर्जुनाची अभयवाणी ऐकून त्यास आशिर्वाद देत ते योद्धे गेले नंतर शत्रूचें मर्दन करणारा अर्जुन विराटनगरास जाण्यास निघाला असतां विराटपुत्रास वारंवार आश्वासन देत भाषण करितो हे उत्तरा तुझ्या पित्यापाशीं आम्हीं सकल पार्थवास करितों हें तुला मात्र विदीत केलें परंतु हें वर्तमान तूं आपले पित्यास सांगूं नको तूं नगरांत गेल्यावर मी शत्रूंपासून गायी जिंकिल्या अशी आपलीच प्रशंसा सांग माझें नांव विराटराजास सांगूं नको. असें अर्जुनाचें भाषण ऐकून उत्तर बोलतो हे अर्जुना जे तूं अपार कर्म केलेस तें करण्यास मला शक्ति काय आहे असो तूं सांगतोस तर मी तुझें नांव पित्यास सांगणार नाहीं. या प्रकारें अर्जुनानें शत्रूचें सैन्य जिंकिलें व धन घेऊन तो शमीच्या वृक्षासन्निध उभा राहिला आणि आपलें शरीर बाणानीं व्याप्त होऊन गेलेलें पाहत आहेतों इतक्यांत त्याच्या ध्वजस्तंभीं वास करणारा अग्नितुल्य कपी सकल भूतांस हें वर्तमान आकाशांत उड्डाण करून गेला. आणि विश्वकर्म्यानें जी निर्मित माया होती तीहि नाहींशी होऊन पहिल्याप्रमाणें रथ होतांच सिंहचिन्हीत उत्तराचा ध्वज होता तो पुनः अर्जुनानें रथास लाविला, आपलें आयुध व शर शमी वृक्षावरून काढिले होते ते पुनः वृक्षावर स्थापित करून अत्यंत हर्ष पावलेला असा किरीटी पूर्ववत प्रमाणें आपली वेणी घालून उत्तरास रथामध्यें बसविला आणि आपण सारथी होऊन बृहन्नडारूपानें विराटनगराकडे रथ चालवूं लागला इकडे सकल कौरव युद्धामध्यें भग्न होऊन हस्तनापुरास गेले मार्गांत अर्जुन राजपुत्रास बोलतो हे उत्तरा आपलीं सकल गोधनें व गायींचे रक्षण करणारे गोपाळ पूर्ववत प्रमाणें आहेत किंवा नाहींत याची चौकशी कर नंतर अपराण्हकाळीं आपण नगरांत प्रवेश करूं व गायींचे रक्षण करणार गोपाळ यांणीं नगरांत जाऊन आपल्या जय झाल्याचें वर्तमान सर्वांस सांगावें असें अर्जुनानें सांगितल्यावर उत्तरानें दूतांस आज्ञा दिली कीं तुम्हीं नगरांत जाऊन विराटराजास जय घोष करून

सांगावें कीं शत्रूगणांचा नाश करून आम्हीं गाची आणिल्या असी उत्तरा-
ची आज्ञा होतांच ते दूत विराट नगरीं जाण्यास निघाले, अर्जुन व उत्तर
यांणीं विचार करून पुनः शमीच्या वृक्षा खालीं आले आणि अलंकार अस्त्र
व्यस्त झालेले, रथाचे अवयव छिन्न झालेले नीट करून सकल गोधनें व
शत्रूपासून हरण केलेलें धन घेऊन बृहन्नडे सहवर्तमान उत्तर नगरांत
येण्यास निघाला. असा विषय या अध्यायांत आहे.

६८ अध्याय अडुसष्टावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, उ-
त्तर नगरांत येण्याचे पूर्वींच विराटराजा त्रिगर्तास संग्रामामध्यें जिंकून
आपल्या गायी व जें धन त्याणें नेलें होतें तें सर्व हरण केलें नंतर चार पंडवां
सहवर्तमान आपले नगरांत प्रवेश करून जयश्रीनें अत्यंत शोभला आ-
णि सज्जनास हर्ष करीत सिंहासनीं जाऊन बसला, त्या काळीं ब्रा-
ह्मणासहवर्तमान सकल नगरनिवासी प्रजा राजांच्या पुढें येऊन त्याचा अ-
त्यंत स्तव करूं लागल्या नंतर विराटराजानें संतुष्ट होऊन सकल ब्राह्मणा
स व प्रजेस स्वगृहीं जाण्याविषयीं आज्ञा दिली नंतर आपला उत्तर कोठें गे
ला आहे असें विचारिल्यावर अंतःपुरांत वास करणाऱ्या स्त्रिया व कन्या रा-
जास भाषण करितात कीं कौरवानीं आपलें गोधन हरण करून नेलें त्यांचा
पराजय करण्या करितां उत्तर एकाएकींच कोणी सहाय्य नसतां गेला. परंतु
बृहन्नडामात्र सारथी होऊन गेली आहे, भीष्म, कृप, कर्ण, दुर्योधन, द्रोण व
अश्वत्थामा, हे सहा महारथी तर आले आहेत तेव्हां काय वर्तमान आहे.
हें समजत नाहीं, या प्रकारें स्त्रियानीं भाषण केल्यावर राजा अत्यंत त्रस्त
होऊन मंत्री मुख्यांस भाषण करितो कीं काय हो उत्तर बृहन्नडेस सारथी
करून एकटाच युद्धास गेला! अस्तु मला असें वाटतें कीं त्रिगर्तांचा प-
राजय झाला हें कौरवांस कळल्यावर ते युद्ध न करितां भिऊन जातील,
त्याचे बराबर जे इतर राजे आले असतील तेही जातील परंतु उत्तराचें
रक्षण करण्या करितां त्रिगर्तांनी जे योद्धे विध्द केले नसतील ते सैन्यास घे
ऊन लोकर जावोत. तसेंच अश्व, गज, रथ, पदाती, हे चित्रविचित्र शस्त्रें
घेऊन उत्तराचे संरक्षणार्थ जावोत, या प्रकारें चतुरंग सैन्यास जाण्यावि-

यांनीं आज्ञा देऊन पुनः विराटराजा त्यांस बोलतो लोकरजा व माझापुत्र अ-द्याप जिवंत आहे किंवा नाहीं याची चौकशी करा, ज्यापेक्षां त्याचा सारथी षंढ आहे, त्यांपेक्षां फारकरून जिवंत असेल असें मला वाटत नाहीं, असें विराट राजानें भाषण केलें व तो फार दुःखित झाला आहे हें धर्मराज पहातांच भाषण करितो, हे नरेंद्रा जर बृहन्नडा तुझ्या पुत्राचा सारथी आहे तर शत्रु तुझ्या पुत्राचा पराभव करण्यास समर्थ होणार नाहीं, तूं असें समज कीं बृहन्नडा सारथी आहे तर सकल महिपाल अथवा कौरव तसेच देव व असूर, यक्ष, सिद्ध हे जरीं तुझ्या पुत्राशीं युद्ध करण्यास आले तथापि तुझा पुत्र इतक्यांस पराजित करील असें धर्मराज भाष करीत आहे तों उत्तरानें पाठविलेले दूत परमत्वरेनें नगरांत येऊन जयघोष करिते झाले, हें वर्तमान सांगण्याकरितां मंत्री राजाजवळ जाऊन भाषण करितात कीं, महाराज कौरवांचा पराजय होऊन उत्तराचा विजय झाला तो आतां येण्यास निघाला आहे व सकळ गायीही आणिल्या आहेत, सारथ्यासह वर्तमान पुत्रकुशल आहे असें मंत्र्यानीं येऊन राजास सांगितलें तेव्हां युधिष्ठीर भाषण करितो कीं हे राजा, दैववशात तुझ्या पुत्रानें गायी जिंकिल्या व कौरवांस पळविलें परंतु हें कृत्य तुझ्या पुत्रानें अद्भुत केलें असें मी म्हणणार नाहीं, कारण तुला निश्चयें करून सांगतों कीं बृहन्नडा ज्याचा सारथी आहे त्यास निश्चयें करून जयाची प्राप्ती होणारच विराटराजा आपल्या पुत्राचा जय ऐकून हर्षित झाला व दूतास वस्त्राभरणादि बक्षीस देऊन आपल्या प्रधास भाषण करितो कीं हे मंत्रीमुख्यहो आपल्या नगरांतील मार्ग पताकांनीं अलंकृत करा, पुष्पांनीं नगरांतील सकळ देवांची पूजनें करा याच प्रमाणें जिकडे तिकडे आनंद करा व उत्तरेनें आभरणादि धारण करून बहुत कन्या बरोबर घेऊन उत्तरास सामोरें जावें या प्रकारें राजाची आज्ञा होतांच सकल नगर अलंकृत केलें. घरोघर राजमार्गीत वाद्यांचे गजर होऊं लागले, वस्त्राभरणें धारण करून सकल स्त्रिया हस्तामध्यें मंगलार्ती दधि, दूर्वा, लाह्या इत्यादि मंगल पदार्थ घेऊन सूत, मागध, बंदी यासह वर्तमान वाद्यांचा गजर करीत करी

नगरांतून उत्तरास सामोऱ्या गेल्या या प्रमाणें नगरांत सकल सिद्धता झा
ली असतां राजा अत्यंत हर्षित होऊन सैरंध्रीस भाषण करितो कीं हे सैरं-
ध्री अक्ष घेऊनये आजवर्षाचा दिवस आहे,यास्तव कंकाशीं द्यूत करूं असें
ऐकून धर्मराजभाषणकरितो हे राजा द्यूत कर्म फार दुष्ट आहे असें मी श्रवण
केलें तशांतूनतूहर्षयुक्त आहेस यास्तव द्यूत करण्यास मी इच्छित नाहीं द्यूतां-
त. बहुत दोष आहेत असें जाणोन त्यांचा त्यागकर पांडुपुत्रधर्मराज तूंपा
हिला असशील अथवा तुझ्या ऐकण्यांत आला असेल त्याणें द्यूतक्रीडेंत
आपलें सकल राष्ट्र नष्ट केलें,देवासारखे पराक्रमी असे भ्राते होते तेहीत्या
णें पणामध्यें हरविले असें द्यूत पाप दायक आहे म्हणून मी त्याची इच्छाकरी
त नाहीं जर तुझी इच्छा असेल तर मी क्रीडा करण्यास सिध्द आहें असें ध-
र्मराजानें भाषण केल्यावर द्यूतास आरंभ झाला इतक्यांत मत्स्यराजा पं-
डुपुत्रास भाषण करितो, हे कंका माझ्या पुत्रानें कौरव पराजित केले हें तूं ऐकि
लेंस,त्याकाळीं माहात्मा युधिष्टिर राजा भाषण करितो हे राजा बृहन्नडा ज्याचा
सारथी झाला तो युद्धांत शत्रूंस जिंकिणार नाहीं कीं काय? असें धर्मराजाचें
भाषण ऐकून विराट राजा अत्यंत क्रोधीत होऊन भाषण करितो, हे ब्राम्हणाध-
मा माझ्यापुत्रासमान षंढाची प्रशंसाकरून उत्तराची आणि षंढाची बराब
री करितोस काय? सारासार न जाणतां तूं माझा अवमान करितोस. अरे भी
ष्म,द्रोण प्रमुखास माझा पुत्र जिंकणार नाहीं कीं काय? हे ब्राह्मणा तूं माझा
मित्रआहेसयास्तव आतामी तुझ्या अपराधाची क्षमा केली जर तुला जिवंत
राहण्याची इच्छा असेल तर पुनः असें भाषण करूं नको, असें राजाचें भा-
षण ऐकून युधिष्टीर भाषण करितो, हे राजेंद्रा द्रोण,भीष्म, वैकर्तन, कृप,
द्रोणी, दुर्योधन,व इतर महारथी संग्रामामध्यें जरी आले अथवा मरुद्गणा
सहवर्तमान इंद्र संग्राम करण्यास जर प्राप्त झाला तर त्यास हृवर्तमान प्र-
तियुद्ध करणारा बृहन्नडे वांचून दुसरा योद्धा कोण आहे, ज्याचा बाहुबळा
ची साम्यता पूर्वीं कोणीही केली नाहीं व पुढेंही कोणी करणार नाहीं. इतकें
होत आहे तों विराटराजा अत्यंत कोपीन होऊन तत्काळ युधिष्ठिराच्या मु-
खावर, अक्षाचा प्रहार करून पुनः पुनः त्याची निर्भर्त्सना करून म्हणूं लागला.

कीं पुनः तूं असें बोलूं नको, त्या अक्षांचा प्रहारानें राजाच्या नासिकाद्वारानें रक्ता चा प्रवाह उत्पन्न झाला तें रक्त पृथ्वीवर न पडावें ह्मणून युधिष्ठीर राजानें आपले अंजलिपुटांत घेऊन समभागीं द्रौपदी उभी होती तिजला पाहिलें त्या काळीं ती धर्मज्ञा व भर्त्यास वश असणारी द्रौपदी भर्त्याचा अभिप्राय न जलानें पूर्ण केलेलें एक सुवर्णपात्र हस्तामध्यें घेऊन धर्मराजाचें नासिको त्पन्न रक्त त्यांमध्यें धरिलें इतकें कृत्य होत आहे तों नाना प्रकारचीं सौगंधिक माल्यें ज्यावर अवकीर्ण केलीं आहेत ज्यास अत्यंत हर्ष झाला आहे आणि पौरवासी स्त्रियानीं ज्याची स्तुति केलेली असा विराटपुत्र सत्कार पुर्वक नगरांतून मिरवत मिरवत राज गृहाच्या द्वारासन्निध आला त्याकाळीं द्वारस्थ पुरुषानीं राजास विदित केलें कीं महाराज बृहन्नडे सह वर्तमान आपला पुत्र आला आहे हें वर्तमान मत्स्यराजानें ऐकतांच अत्यंत हर्षित होत्साता क्षत्त्याप्रत भाषण करितो हे क्षत्त्या बृहन्नडा आणि उत्तर या उभयतांस लौकर माझ्या सन्निध आण मला त्यांच्या दर्शनाची बहुत उत्कंठा झाली आहे त्याकाळीं धर्मराजानें त्याच्या कर्णामध्यें मंदशब्दानें असें सांगितलें कीं, उत्तरास एकटाच आंत आण बृहन्नडेला बराबर आणूं नको, कारण बृहन्नडेचें असें व्रत आहे कीं युद्धावांचून जो माझे शरीरास शोणित उत्पन्न करील तर त्यास तो जिवंत ठेवणार नाहीं, यास्तव मला सशोणित बृहन्नडेनें पाहिलें असतां त्यास हें कर्म न सहन होऊन विराट राजास सैन्य वाहनासह वर्तमान मारून टाकील या प्रकारें धर्मराजानें क्षत्त्यास सांगितलें असतां त्याणें राजपुत्रास एकाएकीच राजगृहांत प्रविष्ट केल्यावर तो विराट राजा सन्निध येऊन उभा राहिला, आणि रुधिरानें संयुक्त झालेला, अनपराधी, भूमीवर एकांती स्थित असून सैरंध्री समभागीं उभी राहिली आहे अशा कंकास पाहून परमत्वरेनें पित्यास भाषण करितो कीं हे राजा, कंकास कोणी ताडण केलें, असें पापकर्म करणारा कोण आहे, असें पुत्राचें भाषण ऐकून विराटराजा भाषण करितो कीं हे पुत्रा, मी या कुटिलास ताडण केला, इतक्याच ताडणानें कांहीं झालें नाहीं आणखी ताडण केलें पाहिजे अरे मी तुझ्या शौर्याची प्रशंसा करीत असतां तो ष

ा मत्त झालेल्या गजा सारिखा गमन करणारा, तप्त केलेल्या सुवर्णा सारिखा शुद्ध गौर वर्ण, पुष्ट व रुंद स्कंध जाचे व अत्यंत दीर्घ जाचे बाहु, तो हा ... पहा त्याच्याच शेजारी महाधनुर्धारी श्यामवर्ण पद्मासारिखे जाचे नेत्र, तो हा वीर अर्जुन आहे, राजाच्या समीप भागीं पुरुषांमध्ये उत्तम, विष्णु महेंद्रा सारिखेच केवळ शोभणारे हे नकुळ आणि सहदेव होत सकल मनुष्या मध्यें या उभयतां सारिखें बळ, रूप कोणाचें नाहीं या उभयतांच्या पार्श्वभागीं जी स्थित आहे ती साक्षात् देवताच अथवा मूर्तिमंत लक्ष्मी इलाच द्रौपदी म्हणतात, याप्रकारें उत्तर विराट राजास प्रत्येक पांडवांस दाखवून नंतर अर्जुनाचा पराक्रम वर्णन करण्यास आरंभ करून पुनः भाषण करितो हे राजा, जसा मृगाचें हनन करणारा सिंह तसा अर्जुन शत्रुचें हनन करणारा आहे, याणेंच गायी जिंकून कौरव पराजित केले, याणें ज्या काळीं शंखाचा नाद केला त्याकाळीं माझे कर्ण बधिर होऊन गेले असें उत्तराचें भाषण ऐकून महा प्रतापी विराटराजा मी युधिष्ठिराचा अपराधि आहें असें समजून उत्तरास भाषण करितां हे उत्तरा, जर तुला रुचत असेल तर मी या काळीं पांडवांचे समाधानार्थ अर्जुना कारणें उत्तरेस देतों, असें पित्याचें भाषण ऐकून उत्तर भाषण करितां हे राजा, हे आपल्यास पूज्य व मान्य आहेत या काळीं उत्तरा यास देणें हें मलाही उत्तम वाटतें. यांची पूजा करावी असें उत्तराचें भाषण ऐकून विराटराजा बोलतो हे उत्तरा संग्रामामध्यें मी शत्रूंच्या स्वाधीन झालों असतां मला भीमसेनानें मुक्त केला, व गायी याणेंच जिंकिल्या, याच्या बाहुवीर्येंकरून आमचा संग्रामामध्यें जय झाला, यास्तव आतां आपण अमात्यां सहवर्तमान अर्जुनासहित कुंतीपुत्र धर्मराजास प्रसन्न करून आम्हीं अज्ञानें करून जर न्यूनाधिक धर्मराजास कांहीं भाषण केलें असेल तर हा धर्मात्मा पांडव धर्मराजा क्षमा करो. सर्वांच्या संमत्तानें दंड कोश व नगर यांसहवर्तमान आपलें संपूर्ण राज्य धर्मराजास अर्पण करून धनंजय पुरस्कृत सकल पांडवांस तुम्हीं महा भाग्यवान आहां असें भाषण करूं लागला पश्चात् युधिष्ठिर भीमसेन माद्रीपुत्र यांच्या मूर्ध्यांचें वारंवार आघ्राण करून त्यांस पाहू-

त्यानें राजाच्या दूती आल्या नाहीं, पुनः विराट राजा अत्यंत संतुष्ट होऊन धर्मराजास भाषण करिता झाला. दैव योगानें दुरवस्था प्राप्त झालेल्या तुम्हांस न समजतां कष्टानें एकवर्ष अज्ञातवासानें परिपालन केलें असतां सकल माझें राज्य व हें नगर जें काहीं मजपाशीं आहे तें कुंतीपुत्र अर्जुन नरोत्तमा ग्रहण करोत, ही माझी उत्तरानामक कन्या सव्यसाचीनें ग्रहण करावी. असें विराटाचें भाषण ऐकून धर्मराजानें पार्थाकडे पाहिलें, त्याकाळीं अर्जुन विराटास भाषण करिता हे राजा, तुझी उत्तरानामक कन्या मी स्नुषा होण्याकरितां ग्रहण करीन मत्स्य आणि भरत या उभयतांचा संबंध होणें उचित आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

७२ अध्याय बाहत्तरावा — विराट म्हणाला हे पांडवश्रेष्ठ अर्जुना, मी आपली कन्या तुला भार्या करून कां देत नाहीं असतां तूं घेण्यास कां इच्छीत नाहींस तें सांग असा त्याचा प्रश्न ऐकून अर्जुन भाषण करितो हे राजा, कांहीं गोष्टी अवकाश होता ते मी तुला प्रकाशित केलें. तेणें करून माझे ठाईं निर्दोष पित्या सारखा विश्वास ठेवला आहे तसा आचार्यश्रेष्ठ न्या तो मला आचार्य स्थानीं पाहिलें, हे राजा, ती तुझी कन्या वयस्क असतां ती जरी ह्या वर्तमान एक संवत्सर मी वास केला. या स्तव तुज संबंधी जितके लोक असतील तितके माझेविषयीं अत्यंत शंका धारण करितील म्हणून हे मनुजाधिपा, शुद्ध, जितेंद्रिय, दांत असा मी होत्साता तुझी कन्या ती आपली स्नुषा होण्याकरितां याचना करितो हे परंतपा ज्या मिथ्याभिवादरूप अभिशापास भीऊन मी तुझ्या कन्येचा भार्यार्थ परिग्रह न करितां स्नुषार्थ परिग्रह करितों. साक्षात् देवपुत्रासमान असा माझा पुत्र वासुदेवाचा भागिनेय अभिमन्यु नामक आहे तो तुझा जामात होण्यास योग्य आहे. असें अर्जुनाचें भाषण ऐकून विराटराजा भाषण करितो हे पांडवश्रेष्ठा, तुम्हीं भाषण करितां हें ठीकच आहे, धर्म व ज्ञान तुमचे ठाईं वास करितात, बरें जें कर्तव्य कृत्य तुम्हीं योजिलें तें आतां करण्यास सिद्ध व्हावें, असें विराटाचें भाषण ऐकून कुंतीपुत्र युधिष्ठिर राजा मत्स्य व पार्थ या उभयतांच्या संबंधाविषयीं अनुमोदन देता झाल्या नंतर विरा

रराजा व धर्मराज हे उभयतां आपले मित्र भगवान् वासुदेवयासलग्न समारंभाचे निमंत्रण करितां दूतांस पाठवितें झाले. पांडवांनीं तेरावर्षे पूर्ण होतांच विराट राजाचें उपप्लव्य म्हणून एक नगर होतें तेथें सकल पांडव जाऊन राहिले असतां अर्जुनानें अभिमन्यु व जनार्दन व सकल यादव द्वारकेपासून आणविले, नंतर युधिष्ठिर राजाचे प्रियकाशिराज व शैब्य हे उभयतां क्षितिपती पृथक् पृथक् अक्षौहिणीतें ग्रहण करून लग्न समारंभास आले तसेच द्रौपदीचे पांच पुत्र, धृष्टद्युम्न हे आले. नंतर सकल राजे प्राप्त झाल्यावर वनमाली श्रीकृष्ण, बलराम, सांब, आणि निषद, हे द्वारकेहून सुभद्रेस व अभिमन्यूस ग्रहण करून प्राप्त झाले तसेच इंद्रसेनादिक पांडवांचे सारथी एक संवत्सर पर्यंत पांडवांचा त्याग करून राहिले होते तेही पांडवांच्या रथारूढ होऊन तेथें आले वृष्णी, अंधक, व महा तेजस्वी भोज, हे पृथक् पृथक् स्त्रिया रत्नें व वस्त्रें ग्रहण करून वासुदेवाच्या अनुलक्षानें आले. या प्रकारें मत्स्य, पार्थ यांच्या उभयतांचा विवाह समारंभ यथाविधी होऊन मोठा उत्साह झाला. शंख भेरी, गोमुख, आडंबर इत्यादिवाद्यें वाजविणारे होते, त्या सर्वांस वस्त्रअलंकार अर्पण करून पांडवांनी त्यांचा सत्कार केला असतां ते त्याच्या गृहीं राजांचा गजर बहुत करिते झाले. नंतर पांडवांनीं शतशः उच्चावच मृग पशूंचें हनन करून त्यांचीं मांसें सर्वांस भक्षणास देऊन सुरा मैरेय इत्यादिक पान पदार्थेही त्यांस दिले. त्या लग्नमंडपांत मत्स्यराजाकडील स्त्रिया उत्तम प्रकारच्या सुंदर ज्यांचीं अंगें मणिकुंडलें धारण केलेल्या सर्व गुणानीं उपपन्न, महारूपवान्, अलंकारानीं अलंकृत झालेल्या सुदेष्णास पुरस्कृत करून त्या सकल स्त्रियामध्यें रूप यश, व शोभा इत्यादिकें करून द्रौपदी फारच उत्तम शोभूं लागली नंतर त्या स्त्रिया, इंद्रपुत्रीस देवस्त्रिया जशा वेष्टून बसतात तशा अलंकारानीं विभूषित जी उत्तरा तिजन्या वेष्टून बसल्या होत्या नंतर अर्जुनानें आपला सुत जो अभिमन्यु याज करितां राजकन्या जी उत्तरा इला ग्रहण केली, नंतर इंद्राप्रमाणें युधिष्ठिरराजा तेथें बसला होता त्याणें स्नुषापणें परिग्रहण केलें

नंतर अर्जुन जनार्दनास पुरस्कृत करून सौभद्राचा यथाविधि विवाह करिता झाला, त्याकाळीं विराट राजानें जामातास सात सहस्र वायुसारखे वेगवान् अश्व, सकल गजामध्यें श्रेष्ठ असे दोनशें गज देऊन बहुत धन दिलें. नंतर उत्तम प्रकारें अग्नि सिद्ध करून हवन केलें आणि ब्राम्हणांचें पूजन करून राज्य खजिना, सैन्य या सहवर्तमान आपला आत्मा पांडुपुत्रांकारणें अर्पण केला नंतर श्रीकृष्णानें आपल्यास जें द्रव्य दिलें तें सकळ द्रव्य धर्मराजानें ब्राह्मणांस देऊन सहस्रावधि गायी, वस्त्रें व रत्नें भूषणें व नाना प्रकारचीं वाहनें दिलीं आणि हृदयास प्रियकारक, अशा भोजनानें व पान द्रव्यानें त्यास तृप्त केलें. असा अभिमन्यूचा लग्नसमारंभ फार उत्तम प्रकारचा झाला, हृष्ट पुष्ट जनानीं युक्त अशी मत्स्यराजाचें नगरास बहुत शोभा आली होती. असा विषय या अध्यायांत.

विराटपर्व समाप्त.

---

